# मराठी शब्दकोश

## पहिला खंड

(अ - ते - औ)




ाष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई.

# मराठी शब्दकोश

## पहिला खंड

(अ ते औ)


प्रथम संपादन

य. शं. कानिटकर

*एम. एम*

•

पुन:संपादन

प्राचार्य रामदास डांगे

•

संपादन सहयोग

- पूर्णिमा लिखिते *एम. ए.*
- योगिता अत्तरदे *एम.ए. (संस्कृत), एम. ए.(भारतीयविद्या)*
- अरुण प्रभुणे ( पुणे ) *एम. ए. बी. एड. पीएच. डी.*
- मुहंमद आझम *एम.ए. पीएच. डी.*





महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ -मुंबई

◆ 'मराठी शब्दकोश'

❧

◆ प्रथम आवृत्ती
मार्च २००९

❧

◆ प्रकाशक
सचिव
महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ
रवीन्द्र नाट्य मंदिर, दुसरा मजला
पु. ल. देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी आवार
सयानी रोड, प्रभादेवी, मुंबई – ४०००२५

❧



❧

◆ अक्षर जुळणी
सौ. चेतना विकास वडके
शब्दमाधुरी, पुणे
भ्रमणभाष : ९८९०९८४९२७

❧

◆ मुद्रक
व्यवस्थापक
शासकीय फोटोझिंको मुद्रणालय,
पुणे - ४११ ००१.

❧

◆ किंमत : रुपये २९०/-

# निवेदन

महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाची स्थापना झाल्यानंतर जे काही महत्त्वाचे वाङ्मयीन प्रकल्प हाती घेण्यात आले त्यामध्ये मराठी शब्दकोशाचे प्रकाशन ही एक महत्त्वाची योजना होती. भारतीय आणि मराठी भाषेच्या कोशवाङ्मयाची मोठी परंपरा आहे. प्राचीन काळातील अमरसिंह विरचित 'नामलिंगानुशासनम' कोश, श्रीधर यांचा श्रीधरभाषाकोश, अमरकोशादर्श तसेच धातुकोश, स्थल व्यक्तिनामकोश, उच्चारध्वनिकोश यासारखे विविध विषयांवरील कोश, आधुनिक मराठी भाषेतील डॉ. केतकर, य. रा. दाते, भावे, दातार, नेने आणि मिस् कोहन (लंडन) यांनी संपादित केलेले ज्ञानकोश, शब्दकोश, चरित्रकोश अगदी अलीकडील काळातील तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांनी सिद्ध केलेले विश्वकोशखंड हे सर्व कोशवाङ्मय म्हणजे आपली समृद्ध कोशवाङ्मय परंपरा. यामध्ये शब्दकोश संपादनाचे कार्य विशेष महत्त्वाचे.

मध्यंतरीच्या काळात जे शब्दकोश प्रकाशित झाले, त्यांतील य.रा. दाते आदींनी संपादित केलेल्या महाराष्ट्र शब्दकोशाची रचना होऊन दरम्यान अनेक वर्षे लोटली होती. मध्यंतरीच्या काळात मराठीतील जुन्या शब्दांपैकी काही शब्द व्यवहारातून लोप पावले, तर काहींची रूपांतरे झाली. नव्या काळानुसार ज्ञान, विज्ञान, तंत्रज्ञान, सामाजिक शास्त्रे यासारख्या ज्ञान शाखांमध्ये नवी परिभाषा निर्माण झाली. ग्रामीण भागातील शिक्षणाच्या प्रसारामुळे तेथील प्रादेशिक शब्दांचा अंतर्भावही ग्रांथिक भाषेमध्ये होताना दिसू लागला. याप्रमाणे मराठीच्या भाषा व्यवहारामध्ये अनेक जुने शब्द लुप्त होऊन नवे शब्द जन्माला आले. ही सारी प्रक्रिया भाषिक अंगांचा विचार करता अपरिहार्य होती. एका परीने ह्या प्रक्रियेचे आपण स्वागत केले पाहिजे. कारण तिच्यातून निर्माण झालेली नवीन शब्दसंपत्ती मराठी भाषेची समृद्धी वाढवीत आहे. कोणत्याही भाषेची समृद्धी म्हणजे तिचे शब्दभांडार. मराठीतील शब्दभांडार तिची निर्मिती झाल्यापासूनच अतिशय समृद्ध आहे. जसजसा काळ बदलत जातो. तसतसे शब्दभांडार वाढत जाते. त्याचा समावेश कोशरचनेमध्ये होणे अत्यंत गरजेचे व महत्त्वाचे ठरते.

त्यामुळे महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाने मराठी भाषेचा एक अद्यावत महाकोश किंवा बृहदकोश नव्याने सिद्ध करावा असा निर्णय घेतला व १९७० साली त्या निर्णयाला शासनाची मंजुरी मिळून या प्रकल्पाचे काम सुरू करण्यात आले. या संकल्पित शब्दकोशाचे संपादक म्हणून त्या वेळी डॉ. ना. गो. कालेलकर यांची नियुक्ती करण्यात आली होती. हे काम डेक्कन कॉलेज, पुणे येथे करावे असे ठरले व डेक्कन कॉलेजच्या भाषाशास्त्र विभागात ते १९७० ते १९७२ पर्यंत चालू होते. त्यानंतर या प्रकल्पाचे काम मुंबई साहित्य संघाकडे सोपविण्यात आले. त्या वेळी डॉ. वि. रा. करंदीकर यांचे सहकार्य या कोशाच्या सिद्धतेसाठी घेण्यात आले. त्यानंतर मात्र शब्दकोशरचनेचे काम बराच काळ रेंगाळत राहिले व त्याच्या व्यवस्थेमध्ये काही प्रमाणात शैथिल्य आले. त्यामुळे याबाबत मंडळाने नवीन व्यवस्था करण्याचे ठरवून शब्दकोश प्रकल्पाचे काम टिळक स्मारक ट्रस्ट, पुणे या संस्थेद्वारा करून घेण्याचे ठरविले व श्री. यशवंत कानिटकर यांना शब्दकोशाचे संपादक म्हणून नियुक्त करण्यात आले. त्यांच्या कारकिर्दीपर्यंत प्रस्तुत शब्दकोशाचे तीन पूर्ण खंड व चौथा अपूर्ण खंड तयार झाले; परंतु नंतर शब्दकोशाशी संबंधित तज्ज्ञांमध्ये मतभेद होऊन शब्दकोश प्रकल्पाचे काम खंडित झाले. दरम्यान श्री. कानिटकर हेही निवृत्त झाले व या शब्दकोश प्रकल्पाचे कार्य होते त्याच अवस्थेत राहिले.

मंडळाच्या उद्दिष्टांमध्ये शब्दकोश प्रकल्पाला महत्त्व देण्यात आलेले होते व मंडळाचे ते एक मोठेच अंगीकृत कार्य होते. ते कार्यच खंडित झाल्यामुळे एका महत्त्वाच्या वाङ्मय प्रकल्पाला महाराष्ट्र वंचित झाला होता. २००६ साली मंडळाचे अध्यक्षपद माझ्याकडे आले व मंडळाचे हे खंडित राहिलेले महत्त्वाचे कार्य पुनरुज्जीवित करण्याचा मी निर्णय घेतला. पुनर्रचित मंडळाने त्याला मान्यता दिली. शासनाचीही त्याप्रमाणे मान्यता घेण्यात आली आणि अर्धवट राहिलेल्या शब्दकोश प्रकल्पाचे काम पुढे नेण्याची जबाबदारी प्रा. रामदास डांगे (मंडळाचे सदस्य) यांजकडे सर्वानुमते सोपविण्यात आली. प्रा. रामदास डांगे हे शब्दकोश विषयक कामाचे माहितगार असून त्यांनी या प्रकल्पाच्या शिवधनुष्याची जबाबदारी स्वीकारण्याचे ठरविले. याचा मंडळाला विशेष आनंद झाला. त्यांच्या अपेक्षेप्रमाणे मंडळाने त्यांना पुणे येथे स्वतंत्र कार्यालयीन जागा, त्या कामासाठी लागणारे तज्ज्ञ मदतनीस व आवश्यक तो निधी, हे सारे उपलब्ध केले व जुलै २००७ पासून शब्दकोश निर्मितीचे कार्य रीतसर सुरू झाले. प्रा. डांगे यांनी पूर्वसूरींनी केलेल्या कार्याचे परिशीलन करून तसेच त्यामध्ये आवश्यक ते बदल व सुधारणा करून शब्दकोशाचा पहिला खंड पूर्ण केलेला आहे व त्या सोबतच पुढील खंडांची पूर्व तयारी केलेली आहे. शब्दकोशाचे एकूण दहा खंड विचाराधीन आहेत. प्रत्येक खंडामध्ये सुमारे पंधरा हजार शब्दांचा समावेश असेल. या पहिल्या खंडामध्ये सुमारे वीस हजार शब्दांचा समावेश आहे. जवळजवळ दीड लक्ष मराठी शब्दांचे भांडार या कोशातून उपलब्ध होईल.

प्रस्तुत शब्दकोश प्रकल्पाच्या कामात आंतरराष्ट्रीय कीर्तीचे कोशतज्ज्ञ डॉ. प्रमोद तलगेरी यांचे मार्गदर्शन व सहाय्य मिळाले. याचा कृतज्ञतापूर्वक उल्लेख केला पाहिजे. डॉ. तलगेरी यांची शब्दकोश विषयाची आस्था खरोखरच नमूद करण्याजोगी आहे. त्यांनी वेळोवेळी मंडळाच्या शब्दकोश कार्यालयाला भेटी देऊन कामाची पाहणी केली. आवश्यक तेथे मार्गदर्शन केले.

प्रा. रामदास डांगे यांच्या संपादकत्वाखाली सिद्ध केलेला हा पहिला खंड वाचकांच्या हाती देताना मला आनंद होत आहे. या खंडाचे वाचक स्वागत करतील अशी मला उमेद आहे. कोणताही कोश हा कधीच सर्वार्थाने परिपूर्ण नसतो; परंतु त्याची परिपूर्णतेकडे होणारी वाटचाल ही अव्याहत चालणारी प्रक्रिया असते. या वाटचालीमध्ये सातत्याने चालणारी अद्यावतीकरणाची प्रक्रिया महत्त्वाची असते. त्यामुळे मंडळातर्फे प्रकाशित होणाऱ्या या पहिल्या व यापुढील शब्दकोश खंडांमध्ये त्रुटी आढळल्यास त्या वेळोवेळी पूर्ण करण्याचा प्रयत्न होत राहील व शब्दकोश अद्यावत करण्याची प्रक्रिया चालू राहील. महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळातर्फे एक अद्यावत स्वरूपाचा नवा शब्दकोश मराठी भाषेला उपलब्ध करून देण्याच्या मंडळाच्या प्रयत्नामध्ये मला सहभागी होता आले, याचा सानंद अभिमान वाटतो व एक अडून राहिलेले वाङ्मयीन कार्य पुनश्च सुरू करता आले याबद्दल धन्यताही वाटते.

**मधु मंगेश कर्णिक**
अध्यक्ष,

महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई.
मार्च २००९

# मराठी शब्दकोश
## प्रथम खंड

### पुन:संपादनाच्या निमित्ताने...

'कोणत्याही भाषेची प्रगल्भता म्हणजे तिचा सर्वत्र अप्रतिहत संचार असला पाहिजे,' हा लोकमान्यांचा विचार प्रत्यक्षात साकार करण्याच्या दृष्टीने 'अमृतातेंही पैजा' जिंकणारी मराठी भाषा समर्थ आणि संपन्न व्हावी म्हणून महाराष्ट्र राज्याच्या कल्याणकारी पुरोगामी शासनाने, महाराष्ट्र राज्याची स्थापना झाल्यानंतर काही योजना कार्यान्वित केल्या. 'मराठी शब्दकोश' ही त्यांपैकी एक.

या कोशप्रकल्पासंबंधी इ.स. १९८५ मध्ये प्रकाशित झालेल्या 'भाषा व साहित्य संशोधन' या ग्रंथातील 'कोशरचना व कोशवाङ्मय' या लेखात प्रा. सु.रा. चुनेकर लिहितात 'ऐतिहासिक व भाषाशास्त्रीय पायावर नव्या कोशाची रचना व्हायला हवी. महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळाची 'मराठी शब्दांच्या महाकोशा'ची योजना आता साकार होत आहे.'

इ.स. १९७० मध्ये सुरू झालेल्या या कोशाची इ.स. १९९६ पर्यंत एकूण चार खंडांची (तीन पूर्ण आणि चौथा अर्धवट) कच्ची टंकलिखित प्रत तयार होऊ शकली. कच्ची म्हणण्याचे कारण या टंकलिखित प्रतीत तत्कालीन संपादकांनी काही फेरबदल केले आहेत. पुढे ते कामच बंद पडले. संपादनसमितीच्या कोशासंबंधी भूमिकाही बदलत गेलेली दिसून येते. 'अर्वाचीन मराठी भाषेचा कोश' ही पहिले संपादनप्रमुख डॉ. ना. गो. कालेलकर यांची भूमिका. तीत बदल करून 'सर्वसमावेशक' ही भूमिका स्वीकारून कोशाचे काम श्री. यशवंत कानिटकर, सेवानिवृत्त भाषासंचालक यांच्या संपादनाखाली सुरू झाले.

प्रस्तुत कोशासंबंधी सर्वसामान्य मार्गदर्शक तत्त्वांचा ऊहापोह करणाऱ्या दि. १७.८.१९८१च्या आपल्या टिपणात श्री. कानिटकरांनी 'प्रत्यक्ष कोशलेखन करताना नवे प्रश्न उद्भवण्याची शक्यता आहेच. त्या त्या वेळी चर्चा होऊन ठरेल त्याप्रमाणे यात फेरफार होतील वा भरही पडेल,' असे स्पष्टपणे निवेदिले आहे.

गेली बारा वर्षे बंद असलेला हा शब्दकोशप्रकल्प पुन्हा सुरू करण्याच्या दृष्टीने साहित्य आणि संस्कृती मंडळाचे विद्यमान अध्यक्ष श्री. मधु मंगेश कर्णिक यांनी सर्व सदस्यांच्या सहमतीने केलेल्या प्रयत्नास शासनाने अनुकूलता दर्शविली. या प्रकल्पाचा प्रारंभीचा एक भाग म्हणून पूर्वी पूर्ण झालेल्या चार खंडांची, फारसे फेरफार न करता पुन:संपादन करून मुद्रणप्रत तयार करण्याचे मंडळाने ठरविले आणि ही जबाबदारी माझ्यावर सोपविली.

ठरल्याप्रमाणे या चार खंडांपैकी पहिल्या खंडाचे काम पूर्ण झाले असून दुसऱ्या व तिसऱ्या खंडांच्या कामाची जुळणी सुरू आहे. शक्यतो बदल न करण्याचे धोरण असले तरी काही महत्त्वाच्या सुधारणा करणे अपरिहार्य होते. त्या सुधारणांचे स्वरूप पुढीलप्रमाणे–

१. या प्रकल्पाचे टंकलेखन १९९५–९६मध्ये पूर्ण झाले. शब्दांच्या निवडीचे आणि नोंदींचे काम त्या आधीच स्थगित झाले होते. या पंधरा वर्षांच्या काळात मराठीचे आणि काही बोलींचे कोश प्रसिद्ध झाले आहेत. काही जुन्या कोशांच्या सुधारित आवृत्त्याही प्रकाशित झाल्या आहेत. या कोशांतून काही नव्या शब्दांची उपलब्धी लक्षात घेऊन त्यांची भर प्रस्तुत खंडांत घालणे आवश्यक होते. विशेषत: 'अभिनव मराठी–मराठी शब्दकोश (सं. द. ह. अग्निहोत्री, व्हीनस प्र.), 'प्राचीन मराठी शब्दकोश' (सं. तुळपुळे फेल्डहोऊस, पॉप्युलर प्र.), शब्दरत्नाकर ( वा.गो. आपटे–ह. अ. भावे, वरदा प्र.), ऐतिहासिक शब्दकोश (सं. य.न. केळकर, डायमंड प्र.), राज्यकोश (राज्यव्यवहार कोश. सं. अ. द. मराठे, डायमंड प्र.), झाडी बोलीचा शब्दकोश (सं. हरिश्चंद्र बोरकर, विजय प्रकाशन, नागपूर), लेवा गणबोली कोश (सं. नि. रा. पाटील) इ. कोशांचा त्या दृष्टीने उपयोग केला आहे. (पुढील काळात उपलब्ध होणाऱ्या शब्दसंग्रहातून योग्य शब्दांची निवड करून पुरवणी खंड तयार करण्याची योजना आहे.)

२. पूर्वीच्या संपादनात तत्सम इकारान्त–उकारान्त शब्द, शुद्धलेखनाच्या नियमांनुसार दीर्घांत स्वीकारून, तदनुसार क्रमाने समाविष्ट केले होते. शासनाने प्रसिद्ध केलेल्या नियमावलीत असे शब्द ऱ्हस्वान्त समजून कोशात नोंदी कराव्यात, असा स्पष्ट निर्देश आहे. त्याला अनुसरून पूर्वसंपादित कोशातील क्रमात बदल केला आहे.

३. या संपादनातील बहुतांश नोंदी दाते–कर्वे यांच्या महाराष्ट्र कोशातून जशाच्या तशा घेतल्या आहेत. कोशकार्याच्या संदर्भात असे

ऋण अपरिहार्य असते. दाते-कर्वे यांचे लेखन विशेषत: ऱ्हस्वदीर्घाच्या आणि वाक्यरचनेच्या बाबतीत, काहीसे जुन्या वळणाचे आहे. कालानुरूप त्यावर संपादनसंस्कार झालेले नाहीत. पुन:संपादनात काही ठिकाणी असे संस्कार केले आहेत.

४. प्रस्तुत संपादनात काही शब्दांचे लेखन प्रामादिक आहे. काही नोंदी चुकीच्या आहेत. विशेषत: प्राचीन 'ह य व' कारान्त मराठी पुल्लिंगी शब्दांचे ओकारान्त असे लेखन (उदा. उणावो) नोंदीत आलेले आहे. त्यामुळे अकारण द्विरुक्तीही होते. अशा नोंदी गाळल्या आहेत.

५. वाच्यार्थाशिवाय अधिक अर्थ व्यक्त न करणाऱ्या सामासिक शब्दांची नोंद आवश्यक नसते. अशा काही नोंदी गाळल्या आहेत. मंडळांचे धोरण लक्षात घेऊन ही किंवा अशी गाळागाळ मर्यादित ठेवली आहे. पुढील खंडांत हे धोरण काटेकोरपणे पाळले आहे.

६. विशेष लक्षणार्थ किंवा व्यापक अर्थ नसलेली विशेषनामे गाळलेली आहेत. त्यांचा परिशिष्टात विचार करता येईल. पूर्वसंपादकांच्या धोरणास अनुसरूनच ही सुधारणा केलेली आहे.

७. व्याकरण, व्युत्पत्ती यांच्यात फारसा बदल केलेला नाही. व्युत्पत्तींच्या संदर्भात, तज्ज्ञांच्या साह्याने कानडी, अरबी, फार्शी या व्युत्पत्तीत थोडीशी भर टाकली आहे.

८. प्राचीन मराठीतील शब्दांची अनियमित वैकल्पिक रूपे आणि बोलींतील उच्चारी पर्यायी रूपे यांच्या समावेशामुळे शब्दनोंदीमध्ये द्विरुक्ती-त्रिरुक्ती संभवते. शब्दगळ करताना त्याचाही विचार केला आहे. आवश्यक त्या ठिकाणी तसे जाड मुद्रेत सूचितही केले आहे.

९. काही वनस्पती, पशुपक्षी, जलचर इत्यादींचे अनेक प्रकार, जाती असतात. प्रस्तुत कोशामध्ये, महाराष्ट्र कोशाच्या आधारे, माशांच्या बहुतेक सर्व प्रकारांच्या नोंदी घेतल्या आहेत. अभ्यासकांमध्ये यासंबंधी एकमत नसल्यामुळे आम्हीही त्या नोंदी तशाच ठेवल्या आहेत.

१०. पूर्वसंपादनातच आधी दिलेले शब्दांचे सामान्यरूप, अनेकवचनी रूप नंतर काढून टाकलेले आहे.

११. वर्णानुक्रमीत बदल केलेला नाही. प्रा. अशोक केळकर यांनी 'वैखरी' ग्रंथात सुचविलेला वर्णक्रम येथे स्वीकारला आहे.

## उच्चाराबाबतीत थोडेसे

मंडळाच्या बैठकीत ठरल्यानुसार मराठी शब्दकोशा'च्या पूर्वसंपादनातील 'उच्चार' गाळले आहेत. लेखन आणि उच्चार यांच्यात फरक असला किंवा उच्चारासंबंधी अनियमितता असली तर कोशात 'उच्चार' देण्याची आवश्यकता असते. मराठी भाषकांची प्रवृत्ती आणि मराठी भाषेची प्रकृती लक्षात घेऊन मराठी वर्णोच्चारासंबंधी काही निश्चित नियम निर्धारित करता येतात.

'उच्चार' दर्शविणे हे 'आदर्श' कोशाचे लक्षण असले तरी 'प्रत्यक्षात'त त्याचा उपयोग आहे का हा प्रश्न उपस्थित होऊ शकतो. 'उच्चार' हा श्रवणप्रत्ययी म्हणजे कानाचा विषय. खरे तर तो त्याच पद्धतीने शिकता येतो. कोशातील 'शब्द' हा डोळ्यांचा विषय. अडलेला शब्द कोशात 'पाहावा' लागतो. शिवाय 'एक नेम ना उच्चारी'हे सूत्रही महत्त्वाचे ठरावे. 'उच्चारा'ला देश-काल-परिस्थितीचेही बंधन असते. यादवकालीन किंवा बहामनी कालीन शब्दांचे उच्चार आज कसे ठरविणार? सामान्यरूपामुळे मूळ शब्दाचा उच्चारही बदलतो. 'उच्चार' हा शब्दकोशाचा महत्त्वाचा विशेष ठरू नये हा या विवेचनाचा उद्देश. 'या अभिनव मराठी – मराठी कोशात शब्दाचे प्रचलित प्रमाण उच्चार देण्याचा जो माझा महत्त्वाचा विचार होता, त्याला (रा. श्री. जोग, प्र. न. जोशी, डॉ. मु. ग. पानसे, श्रीपाद जोशी, गं. बा. सरदार यांचा) पाठिंबा मिळाला नाही.' – प्रस्ता. द. ह. अग्निहोत्री. या विधानावरून अभ्यासकांचा दृष्टिकोण लक्षात यावा.

***

पूर्वसंपादित दुसऱ्या व तिसऱ्या खंडांचे काम लवकर पूर्ण करण्याचा आमचा प्रयत्न आहे. या खंडांच्या सुधारित संपादनात साहित्य आणि संस्कृती मंडळाच्या सूचना लक्षात घेऊन तज्ज्ञांच्या मार्गदर्शनाधारे अधिक काटेकोरपणा आणण्याकडे लक्ष दिले आहे.

प्रस्तुत खंडाच्या पुन:संपादनात सहयोगी संपादक म्हणून श्रीमती पूर्णिमा लिखिते व डॉ. अरुण प्रभुणे (पुणे) हे पूर्णवेळ कार्यरत आहेत. या संपादनकार्यात डॉ. मुहंमद आझम (नगर) व कु. योगिता अत्तरदे (पुणे) यांचा सहभाग आहे. कन्नड शब्दांच्या संदर्भात प्रसिद्ध कन्नड संशोधक श्री. रं. शा. लोकापुर यांचे सहकार्य आणि प्रसिद्ध कोशतज्ज्ञ डॉ. प्रमोद तलगेरी, श्रीमती सत्त्वशीला सामंत व डॉ. लीला गोविलकर यांचे मार्गदर्शन या जमेच्या बाजू उल्लेखनीय आहेत.

संदर्भसूची, शब्दनिवड, प्राथमिक मुद्रिते इ. आनुषंगिक कामे श्रीमती जयश्री बागाईतकर, वृंदा धारप, अनघा दळवी ह्या अंशकालिक सहकाऱ्यांच्या मदतीने पूर्ण झाली आहेत. संदर्भसूची तयार करताना काही अडचणी उपस्थित झाल्या. बहुतेक संदर्भ महाराष्ट्र कोशातील आहेत. त्यातील काही संदर्भवाक्यांपुढे ग्रंथनामनिर्देश वा त्याचा संक्षेप दिलेला नाही. संक्षेप असल्यास संदर्भसूचीमध्ये ग्रंथाचा उल्लेख नाही. प्रस्तुत खंडांच्या संपादनात नव्याने उपयोगात आणलेल्या ग्रंथनामांचे संक्षेप आहेत. पण त्या ग्रंथाची सूची उपलब्ध होऊ शकली नाही. क्वचित एका संक्षेपाची दोन ग्रंथनामे किंवा एका ग्रंथनामाचे दोन संक्षेप असेही घडले आहे. या सूचीत आणखी काही ग्रंथनामे व त्यांचे संक्षेप

यांची भर पडणार आहे. ही सूची पुढील खंडात समाविष्ट करण्यात येणार आहे.

मंडळाचे अध्यक्ष श्री. मधुमंगेश कर्णिक यांचे आश्वासन प्रोत्साहन, सचिव सौ. गौरी देशमुख व त्यांचे सहकारी श्री. उ. बा. सूर्यवंशी, श्री. संख्ये के. एल. इ यांची प्रेरक कार्यशैली, फोटोझिंको शासकीय मुद्रणालयाचे व्यवस्थापक श्री. रु. दि. मोरे व त्यांचे सहकारी यांचे काळ कामवेगाचे अचूक गणित यामुळे सरकारी काम 'असरकारी' झाल्याचे प्रत्ययास यावे.

प्रस्तुत खंडाची संगणकीय अक्षरजुळणी 'शब्दमाधुरी'च्या संचालिका सौ. चेतना वडके यांची आहे. मुळातच मूळ प्रतीचे टंकलेखन अतिशय अस्पष्ट, खाडाखोड केलेले असे असताना त्यांनी – मोठ्या चिकाटीने, परिश्रमाने हे काम केले. विद्युद्वारनियमनामुळेही कामाचा उरक मनासारखा होत नव्हता. मराठी शब्दकोश म्हणजे मराठी भाषेची सेवा या धारणेमुळे न कंटाळता, त्यांनी व त्यांच्या सहकारी भगिनींनी हे काम पूर्ण केले. एवढेच नव्हे, तर पुढील दोन्ही खंडांच्या कामासही प्रारंभ केला.

## पुढील कामाची योजना

प्रस्तुत तीन खंडांनंतरचे पुढील काम संपूर्णपणे नव्याने सुरू करण्याची योजनाही कार्यान्वित झालेली आहे. त्यासाठी अनेक अभ्यासकांचे अपेक्षित सहकार्य मिळत आहे. पूर्वसंपादकांनी म्हटल्याप्रमाणे 'स्थल, काल आणि विषय' या त्रिविध कसोटीवर प्रातिनिधिक स्वरूपात नव्या पुस्तकांची निवड करून त्यातील नवोपलब्ध शब्दांचा समावेश करण्यात येणार आहे. शब्दनिवडीची पुढीलप्रमाणे योजना केली असली तरी कार्यव्याप्ती लक्षात घेता आणखी काही अभ्यासकांची आवश्यकता आहे–

१. दलित वाङ्मय – प्रा. डॉ. सुखदेव ढाणके (अमरावती), डॉ. विनायक त्रिपत्तीवार ( धामणगाव रेल्वे.); वऱ्हाडी इ. – प्रा. डॉ. काशिनाथ बऱ्हाटे, प्राचार्य डॉ. आनंद डुडूल (परतवाडा); अहिराणी इ. – श्री. कृष्णा पाटील (अमळनेर), श्री. नि. रा. पाटील (डोंबिवली); गंगथडी (मराठवाडी) – डॉ. धुंडिराज कहाळेकर (समन्वयक, मराठवाडी बोलीचे अभ्यास केंद्र, गणेश वाचनालय), व त्यांचे सहकारी इ. (परभणी); कोकणी इ.– डॉ. बाळकृष्ण लळीत (शिरूर); प्राचीन मराठी– डॉ. मीरा गरुड–(परभणी); तंजावरी, आरे मराठी – प्रा. भगवंत क्षीरसागर (नांदेड); ग्रामीण इ. – प्रा. सुधाकर बोरसे (नाशिक), श्री. विठ्ठल बापूजी ठोंबरे (पुणे); जुनी नियतकालिके – डॉ. प्रदीप कर्णिक (मुंबई). या यादीत आणखी काही विषय आणि अभ्यासक यांच्या नावांची भर पडणार आहे.

पूर्वीच्या संपादकांनी स्वीकारलेले धोरण स्पष्ट व्हावे यासाठी त्यांनी त्या वेळी लिहून ठेवलेले ' प्रास्ताविक ' पुढे दिले आहे. या पुढील संपादनातही सर्वसाधारणपणे ह्या धोरणाचा स्वीकार केला आहे.

म. सा. प. (आंध्र प्रदेश) सुवर्ण महोत्सवी सोहळ्यात प्रबोधन चळवळीचे जाणते भाष्यकार डॉ. भा. ल. भोळे यांनी व्यक्त केलेल्या 'भाषेला ज्ञानभाषा करण्यासाठी जे कोशवाङ्मय तयार केले जाते किंवा ज्या परिभाषा घडविल्या जातात त्या समाजाकडून किती प्रमाणात वापरल्या जातात हे अधिक महत्त्वाचे असते. भाषेचा विचार समाजाला वगळून करता येत नाही कारण भाषा ही समाजजीवनाचे अविभाज्य अंग असते. जनसामान्यांची भाषा आणि ग्रांथिक व्यवहाराची भाषा यांत भिन्नत्व असले तरी त्याचबरोबर परस्पर पोषकत्व असणेही अत्यंत आवश्यक असते. या दृष्टीने केतकर ज्याचं वर्णन 'अशिष्ट वाङ्मयाचे शिष्टीकरण' असे करतात ती प्रक्रिया सुरू राहणं गरजेचं असतं.' या अपेक्षेला योग्य प्रतिसाद मिळणे हेच या कोशकार्याचे 'सार्थ' फलित.

*– रामदास डांगे*
*संपादनप्रमुख*

# प्रास्ताविक

शब्दकोश हे भाषेच्या व साहित्याच्या अभ्यासाचे एक प्रमुख साधन आहे. मराठी भाषेतील शब्दकोशपरंपरा फार उज्ज्वल नसली तरी अगदी दुर्लक्षणीय नाही. १८२९च्या जगन्नाथशास्त्री क्रमवंत यांच्या नेतृत्त्वाखाली तयार झालेल्या कोशानंतर व मोल्सवर्थच्या १८५७ साली प्रसिद्ध झालेल्या त्यांच्या दुसऱ्या आवृत्तीनंतर दाते–कर्वे यांच्या महाराष्ट्र शब्दकोशाचा पहिला खंड १९३२ मध्ये प्रसिद्ध होईपावेतो नाव घेण्यासारखा कोश मराठीत झाला नाही. श्री. वा. गो. आपटे यांचा शब्दरत्नाकर व श्री. विद्याधर वामन भिडे यांचा सरस्वती कोश असे दोन कोश काय ते उल्लेखनीय दिसतात, पण हे दोन्ही कोश शब्दसंग्रह व कोशरचना या दोन्ही दृष्टींनी मोल्सवर्थ कोश किंवा महाराष्ट्र शब्दकोश यांची बरोबरी करू शकत नाहीत. शब्दकोशाचे एकभाषिक, द्वैभाषिक, विशिष्टकालिक, प्रादेशिक, पारिभाषिक, विशिष्टलेखकनिष्ठ असे अनेक प्रकार संभवतात. ऐतिहासिक शब्दकोश, फारसी मराठी कोश, ज्ञानेश्वरी शब्दभांडार, शासनाने, साहित्य संस्कृती मंडळाने व विद्यापीठांनी प्रसिद्ध केलेले परिभाषा कोश यासारखे काही कोश या सदरात मोडतात. यापैकी बरेच कोश द्वैभाषिक असून एकभाषिक कोशांची संख्या अगदीच तुटपुंजी आहे. म्हणून एक परिपूर्ण एकभाषिक कोश करणाऱ्या आजच्या कोशकाराला मोल्सवर्थ कोश व महाराष्ट्र शब्दकोश यांचा विचार अपरिहार्यपणे करावा लागतो. ह्या दोन्ही कोशांची रचना करताना त्या त्या वेळी उपलब्ध असलेल्या साधनसामग्रीचा भरपूर उपयोग या कोशकारांनी केल्यासारखा दिसतो. निरनिराळ्या ठिकाणी माणसे पाठवून किंवा निरनिराळ्या संस्थांची मदत घेऊन ही शब्दसंपत्ती एकत्र केली आहे. त्या त्या वेळी उपलब्ध असलेल्या साहित्याचाही त्यांनी शब्दसंकलनासाठी उपयोग केला आहे हे निराळे सांगावयास नको. प्रस्तुत कोशाचे स्वरूप व व्याप्ती काय असावी यासंबंधी १९७४ साली प्रसिद्ध केलेल्या परिचय पुस्तिकेतील पुढील परिच्छेद महत्त्वाचा आहे. ''एकाच शब्दकोशात साहित्याच्या प्रारंभ कालापासून आजपर्यंतचे आणि भिन्न भिन्न प्रदेशात व लोकसमूहात वापरले जाणारे शब्द एकत्र देण्यात आलेले असतात. त्यामुळे त्यांची उपयुक्तता निश्चित वाढते पण त्याचे स्वरूप मात्र अनिश्चित होते. प्रमाणभाषा व बोली यांचे स्वतंत्र कोश करण्याची शक्यता जोपर्यंत दृष्टिपथात नाही तोपर्यंत अशा प्रकारचे कोश होणेच अपरिहार्य आहे... शब्दसंख्येच्या दृष्टीने महाराष्ट्र शब्दकोशातील सामग्री विपुल आहे... काही महत्त्वाच्या उणिवाही आहेत, मुद्रणदोष आहेत, अनेकवेळा संदर्भाच्या जागी शब्द सापडत नाही, अर्थ देण्यात कच्चेपणा आहे... आज हा कोश अत्यंत दुर्मिळ झाल्यामुळे तसेच मध्यंतरीच्या काळात मराठी शब्दसंपत्तीत फार मोठी भर पडलेली असल्यामुळे नव्या कोशाची फार मोठी आवश्यकता निर्माण झालेली आहे.''

प्रस्तुत कोशाची आखणी करताना वरील धोरण सर्वसाधारपणे अवलंबिण्यात आले आहे. तसेच महाराष्ट्र शब्दकोशातील वरील त्रुटीही लक्षात घेतल्या आहेत. नवा कोशकार हा अगोदर झालेल्या कोशांच्या आधारेच पुढील कोशांची रचना करू शकतो. नव्या कोशकारास काही शब्द अपरिचित व दुर्मिळ वाटणे शक्य असते. संपूर्ण साहित्याचे अवलोकन कोणाही एक कोशकारास शक्य नसते म्हणून त्याला अगोदरचे कोश प्रमाण मानावे लागतात. प्रस्तुत कोशाची रचना करताना वरील मार्गदर्शक सूत्राचेही विवेकपूर्वक व विश्लेषक बुद्धीने अनुसरण केले आहे. प्रस्तुत कोशात, मोल्सवर्थ व महाराष्ट्र शब्दकोश या दोन कोशांतील सर्व शब्दांचा तसेच सरस्वती कोश, शब्दरत्नाकर, ज्ञानेश्वरी शब्दभांडार, ऐतिहासिक कोश इ. शब्दकोशातील शब्दसामग्रीचाही विचार केला आहे. या कोशांबरोबरच शासनाने व विद्यापीठांनी प्रसिद्ध केलेले परिभाषाकोशही शब्दसंकलनासाठी उपयोगात आणले आहेत. शासनाने प्रसिद्ध केलेल्या शासन व्यवहार कोशांतील शेकडो नवे शब्द वृत्तपत्रांतून व इतर लेखनांतून सरसहा वापरले जात आहेत. विधानमंडळात येणाऱ्या सर्व कामकाजात या शब्दसंग्रहाचा आज वापर होत आहे. या नव्या शब्दांनी मराठीत आता चांगलेच मूळ धरले आहे. याशिवाय अनेक शास्त्रीय व तांत्रिक शब्दांचाही या कोशात समावेश करण्यात आला आहे. त्या त्या विषयांच्या परिभाषाकोशांतून या शब्दांची तज्ज्ञांच्या सल्ल्याने निवड करण्यात आली असून त्यांचे अर्थही तज्ज्ञांकडून तपासून घेण्यात आले आहेत. हे तज्ज्ञ आपल्या विषयांवर मराठी लेखन करणारे तसेच ते विषय महाविद्यालयांतून मराठीतून शिकविणारे असेच निवडण्यात आले आहेत. या पारिभाषिक संज्ञा तद्विषयक लेखनात प्रयुक्त होत असून त्यांचा वापर हळूहळू पण निश्चितपणे वाढत आहे हे यावरून उघड दिसते. असे पारिभाषिक शब्द व त्यांचे अर्थ अनेक सर्वसामान्य वाचकांना कदाचित तितकेसे सुबोध वाटणार नाहीत; परंतु त्या विषयांतील अभ्यासकांना त्यांचा निश्चित उपयोग होईल या भूमिकेतून त्यांचा समावेश या कोशात केला आहे. शासकीय कामकाज, न्यायदान, व्यापारउदीम इ. व्यवहारांत वापरले जाणारे शब्द तसेच निरनिराळ्या शास्त्रीय व तांत्रिक विषयांतील संज्ञा हे या कोशाचे एक महत्त्वाचे वैशिष्ट्य म्हणता येईल.

या कोशसाहित्याबरोबरच कोशकार्यालयाने गेल्या आठ–दहा वर्षांत वाचलेल्या सुमारे ७०० पुस्तकांतील शब्दांचाही यात समावेश आहे. स्थल, काल व विषय या त्रिविध कसोटीवर प्रातिनिधिक स्वरूपात या पुस्तकांची निवड करण्यात आली आहे. त्यामुळे या पुस्तकांमधून उपलब्ध झालेला शब्दसंग्रह विपुल व विविध प्रकारचा आहे. तात्त्विक व सैद्धान्तिक चर्चा करणाऱ्या ग्रंथांपासून सामान्य वाचकांकरिता सोप्या भाषेत ज्ञानविज्ञान समजावून सांगणाऱ्या पुस्तकांपर्यंत वा. म. जोशी, श्री. म. माटे, सावरकर यांसारख्या धुरंधर लेखकांपासून श्री. ना. पेंडसे, तेंडुलकर, दळवी या

आजच्या अव्वल दर्जाच्या लेखकांपर्यंत अनेकांचा यात समावेश आहे. स्वातंत्र्याच्या काळात शिक्षणाची वाढ झपाट्याने झाल्यामुळे, सर्व सामाजिक स्तरांतून आज नवा लेखकवर्ग पुढे येत आहे. त्यांच्या व्यथा, वेदना त्यांच्या कृतींतून त्यांनी समर्थपणे व्यक्त केल्या आहेत. पांढरपेशा वर्गाला अपरिचित असलेले लोकजीवन जसे दाहकपणे त्यातून व्यक्त झाले आहे. तसेच त्या निमित्ताने आजवर कोशात समाविष्ट न झालेल्या अनेक अन्वर्थक शब्दांचीही मराठीच्या कोषागारात भर पडली आहे. ग्रामीण व दलित लेखकांचा यात प्रामुख्याने समावेश आहे. ही निवड करताना मराठीच्या भौगोलिक चतु:सीमांचीही दखल घेण्यात आली आहे. कोकण, देश, विदर्भ, मराठवाडा या सर्व भागांतील लेखकांच्या पुस्तकांचे जाणीवपूर्वक वाचन करण्यात आले आहे.

ललित साहित्यातील शब्द कोशात घ्यावेत की नाहीत असाही एक प्रश्न उपस्थित केला जातो. एखादी साहित्यकृती रसिकाला जशी प्रतीत होईल तशी त्यातील शब्दसंहितेची अर्थछटाही बदलण्याचा संभव असतो, हे खरे असले तरी हे कवितेच्या बाबतीत जितके खरे आहे तितके काव्येतर साहित्याबद्दल म्हणता येणार नाही. काव्यातही दीर्घकाव्यात हा संभव कमी. प्रायोगिक कथा, काव्य, नाट्य व अतिशय आत्मकेंद्रित लेखकांच्या लेखनाबद्दल फार तर असे म्हणता येईल. या साहित्यातही संदर्भाप्रमाणे ज्यांचा अर्थ बदलणार नाही असे अनेक शब्द असू शकतात म्हणून ललित साहित्याला कोशाच्या कार्यक्षेत्रापासून दूर ठेवणे बरोबर होणार नाही. सर्व शब्द हे वस्तुत: ध्वनिचिन्हेच असतात. वस्तू व कल्पना यांची त्यांच्याशी सांगड घालणे म्हणजेच अर्थनिष्पत्ती. बव्हंश शब्दांचा अर्थ या प्रक्रियेतून लावता येईल असे वाटते. काही लेखक एका विशिष्ट अभिनिवेशाने व हव्यासाने स्वत: घडवलेले शब्द आपल्या साहित्यात वापरताना दिसतात. अशा शब्दांपैकी जे शब्द रूढ होतात त्यांनाच भाषेत कोशातही स्थान मिळते. अगदी व्यक्तिविशिष्ट अशा शब्दांना कोशात स्थान देण्याची जरूरी नसावी.

बोली भाषांतील शब्दांचा याप्रकारच्या बृहत् शब्दकोशात समावेश करावा की नाही हाही वादाचा विषय होऊ शकतो. मराठीच्या बोली संपन्न असल्या तरी वऱ्हाडी नागपुरीसारखा एखादा अपवाद सोडल्यास इतर बोलींचे कोश तयार झालेले नाहीत. बोली भाषांत लेखन करणारांची संख्या मात्र मोठ्या प्रमाणावर वाढत आहे. बोली भाषांत कै. बहिणाबाई चौधरी, बोरकर यांच्यासारख्या प्रतिभावंतांनी कविता लेखन केलेले असून आज नव्या जोमाने ही प्रक्रिया सुरू झालेली दिसते. या सर्व गोष्टींमुळे बोलभाषेतील व बोलीभाषेतील शब्दांचा प्रमाणभाषेतील वावर वाढला आहे. ही प्रक्रिया भाषेच्या समृद्धीला उपकारक असून तिची अभिव्यक्तिक्षमताही यामुळे वाढणार आहे. अशा परिस्थितीत लिखित साहित्यात आलेले हे शब्दभांडार या कोशाच्या कक्षेतून वगळणे इष्ट ठरणार नाही. या कारणामुळे महाराष्ट्र शब्दकोशात आलेले व कंसात त्या त्या बोलीचे वा ज्या भागात ते बोलले जातात त्या भागांचे नामाभिधान वागवणारे शब्द तसेच ठेवण्यात आले आहेत. ग्रामीण व बोली भाषेतील पुस्तके आता पाठ्यक्रमातही समाविष्ट झालेली आहेत. त्यातील शब्दभांडाराला शब्दकोशात प्रवेश नाकारणे इष्ट ठरणार नाही. हा शब्दकोश ग्रामीण व बोली भाषांतील शब्दांमुळे विद्यार्थ्यांच्या व अध्यापकवर्गाच्याही उपयोगी पडेल असा विश्वास वाटतो.

याशिवाय मराठी भाषेचे प्रमाणित स्वरूप कोणते यासंबंधी ऐतिहासिक दृष्ट्या विचार होऊ शकतो. शुद्ध किंवा प्रमाणित शब्दांचे स्वरूप वैकल्पिक वा बदलणारे असते. प्रदेशपरत्वे, कालभेदाने आणि मान्य ग्रंथकारांच्या धारणेप्रमाणेही शब्दांचे प्रमाणित वा अप्रमाणित स्वरूप सापेक्षतयाच ठरते. विशेष महत्त्वाचे साहित्य उदा. निबंध, संशोधनपर लेख, ललित व वैचारिक लेखन करताना लेखक नवेनवे शब्द वा वाक्प्रयोग घडवतो वा स्वीकारतो. तो उपभाषा, स्थानिक लकबी, बोली वा परभाषेतील शब्द यांचाही उपयोग करतो. त्यामुळे अप्रमाणित समजले जाणारे शब्द वा वाक्प्रयोग प्रमाणित बनू लागतात. जिवंत भाषेची ही रीत असून त्यामुळेच तिचा विकास होतो.

कोशाचा आवाका हा केवळ लिखित वा ग्रंथगत भाषेपुरताच मर्यादित ठेवावा की निरनिराळ्या स्तरांवर व निरनिराळ्या प्रदेशांत बोलल्या जाणाऱ्या भाषेचे वेगळेपण व वैशिष्ट्ये यात प्रतिबिंबित व्हावीत याचा विचार करणेही अशा कोशांच्या बाबतीत आवश्यक ठरते. बोलली जाणारी भाषा हे भाषेचे जिवंत स्वरूप आहे म्हणून तिचा विचार आवश्यक असला तरी आपल्या हाताशी असलेल्या साधनसामग्रीचा तसाच अन्य मर्यादांचा विचारही क्रमप्राप्त आहे. तूर्त तरी बोलीभाषेतील व बोलभाषेतील जी शब्दसामग्री लिखित साहित्यामधून उपलब्ध आहे तिचाच विचार करणे अनिवार्य आहे.

अरबी, फारसी तसेच इंग्रजी व इतर पाश्चात्त्य भाषांतील शब्दांचा व कन्नड, तेलगु, गुजराती, उर्दू आदी भाषांतील शब्दांचाही तारतम्याने या कोशात समावेश केला आहे. इतिहास कालात मुसलमानी सत्तेमुळे, फारसी शब्दांचा पत्रव्यवहारात प्राचुर्याने उपयोग होऊ लागला. बखरकारांच्या लेखनात व शाहिरांच्या लावण्यापोवाड्यांतही हजारो फारसी शब्द वापरले गेले. यांतील शेकडो शब्द मराठी भाषेत इतके एकजीव झालेले आहेत की ते फारसी आहेत ही वस्तुस्थिती केवळ विचक्षण अभ्यासकांनाच कळू शकेल. राज्यकारभार, कायदेकानू, पत्रव्यवहार इत्यादींमध्ये प्रयुक्त होणारे शेकडो शब्द मात्र आज व्यवहारातून पूर्णतया गेले आहेत. इतिहासाच्या अभ्यासकांची तसेच बखरी–लावण्या–पोवाडे यांचा अभ्यास करणाऱ्यांची सोय करण्याच्या दृष्टीने अशा शब्दांचा अंतर्भाव करणे आवश्यक आहे. मराठी भाषेत अरबी, तुर्की, फारसी या भाषांतील शब्दांचा प्रवेश फारसीद्वाराच झालेला असल्यामुळे व्युत्पत्ती देताना त्यांची फारसी अशीच नोंद केली आहे. हिंदी सिनेमा व शेरोशायरीचा वाढता षौक या मार्गांनीही अशा शब्दांची आवक खूपच वाढली आहे. त्यामुळे त्यांची दखल घेणे क्रमप्राप्त झाले आहे.

हिंदी, गुजराती, मराठी या सर्वांचा मूलस्रोत एकच आहे. या भाषांची परस्परसमीपता आणि सांस्कृतिक एकता यामुळे प्राचीन काळापासून त्या

सर्वांशी मराठीची शाब्दिक देवाणघेवाण चालू आहे. त्यात हिंदी व मराठी या एकाच लिपीत लिहिता जात असल्याने व हिंदी केंद्रशासनाची राजभाषा झाल्यामुळे अलीकडील काळात तिचा मराठीवरील प्रभाव वाढत आहे. अतिथी, समारोह, संपन्न होणे असे अनेक शब्द या संदर्भात सांगता येतील. या शब्दांचे अनुसंधान राखणे कोशकाराचे कामच आहे. कन्नड, तेलगु या मराठीच्या दक्षिणेकडील भाषाभगिनी. यांपैकी कन्नडचा व मराठीचा संपर्क फार जुना. धार्मिक व सांस्कृतिक क्षेत्रात विठ्ठलभक्तीच्या तसेच नागर व जानपद जीवनाच्या अनेक आविष्कारांतून कन्नडची मराठीवरील छाप सुस्पष्टपणे दिसून येते.

गेल्या शंभर सवाशे वर्षांपासून इंग्रजीचा एकछत्री अंमल सर्व भारतीय भाषांवर अविच्छिन्नपणे चालू आहे. तत्पूर्वी पोर्तुगीज भाषेनेही काही काळ आपला पगडा मराठीवर बसविला होता. पोर्तुगीज भाषेतील अननस, काजू, फालतू, घमेले, पगार यासारख्या अनेक शब्दांतून त्याचे प्रतिबिंब दिसून येते. अर्थात इंग्रजीच्या तुलनेने मराठीत आलेले पोर्तुगीज शब्द नगण्य म्हटले पाहिजेत. स्वातंत्र्यात्तर काळात इंग्रजीचा प्रभाव कमी होईल व भारतीय भाषांचे अधिराज्य सर्व क्षेत्रात प्रस्थापित होईल अशी अपेक्षा होती. निकटच्या भविष्यकाळात तरी ही शक्यता दिसत नाही. त्याची इष्टानिष्टता ही कोशकाराच्या चिंतेचा किंवा चिंतनाचा विषय असण्याचे कारण नाही. एक वस्तुस्थिती म्हणून या गोष्टीकडे पाहणे त्याला भाग आहे. आक्ट, पुरसिस्, रुळी यासारख्या मूळ इंग्रजी ध्वनिरूप हरवलेल्या शब्दांपासून फोन, रेडिओ, टेबल, सायकल, कोट, पँट, पावडर, कुकर यासारख्या नित्य व्यवहारात असलेल्या हजारो इंग्रजी शब्दांची दखल कोशकाराला घ्यावीच लागेल. ललित साहित्यातील संवादातून येणारे व नित्य वापरले जाणारे थँक यू, गुड मॉर्निंग, प्लीज, ओके यासारखे शब्द मात्र वगळण्यात आले आहेत. ब्रिटिश राजवटीमुळे व पाश्चात्त्य संस्कृतीच्या संपर्काने आपला सर्व जीवनक्रम बदलून गेला आहे. आजची राज्यपद्धती, शिक्षणपद्धती येथपासून तो दैनंदिन व्यवहार व आचारविचार येथपर्यंत सर्वच पालटले आहे. पाश्चात्त्य संकल्पना व्यक्त करण्यासाठी ख्यातनाम ग्रंथकारांनीही इंग्रजी शब्दांचा आश्रय घेतलेला दिसतो. इलेक्शन, कौन्सिल, म्युनिसिपालिटी, बोर्ड, प्रिन्सिपल, कोर्ट, गव्हर्नर, प्रोफेसर, कलेक्टर, कमिशनर यासारखे अनेक शब्द या लेखकांनी सर्रास वापरलेले दिसतात. यासारख्या शब्दांचे पर्यायी शब्द आज रूढ असले तरी लेखनव्यवहारातील त्यांच्या सार्वत्रिक वापरामुळे त्यांना कोशात स्थान द्यावे लागेल.

संस्कृत ही मराठीचीच नव्हे तर जवळ जवळ भारतीय भाषांची गंगोत्री. आधुनिक विचार व संकल्पना व्यक्त करण्याकरिता अनेक नव्या शब्दांची जडणघडण अव्वल इंग्रजीपासून आजपर्यंतच्या अनेक विचारवंतांना करावी लागली. ती त्यांनी संस्कृतच्या आश्रयानेच केली. असे शेकडो शब्द आज मराठीत रूढ झाले आहेत. या सर्व संस्कृतोद्‌भव शब्दांचा व पंडित कवींच्या काव्यांतील संस्कृत शब्दांचीही तारतम्याने या कोशात समावेश केला आहे. स्थलनामे व व्यक्तिनामे कोशात देण्यात आलेली नाहीत. त्राटिका, भीम, पानिपत यासारख्या सामान्य नामांप्रमाणे उपयोग होणाऱ्या विशेष नामांचा कोशात समावेश करण्यात आला आहे.

दळवळणाच्या अत्याधुनिक साधनांमुळे सर्व भाषांचा परस्पर संपर्क वाढला आहे. भाषांच्या व भाषाशास्त्राच्या अभ्यासाला सर्वत्र नवे उधाण आले आहे. निरनिराळ्या विषयांच्या अभ्यासकांना भाषांच्या शास्त्रीय अभ्यासाची गरज वाटू लागली आहे. महाराष्ट्रातील लोकदेवता, महानुभाव संप्रदाय, डॉ. बाबासाहेब आंबेडकरांची दलितोद्धाराची चळवळ, ब्राह्मणेतर चळवळ यासारख्या अनेक प्रश्नांचा व चळवळींचा अभ्यास करण्यासाठी अनेक पाश्चात्त्य विद्वान मराठी भाषा शिकत आहेत. भारतीय भाषांमधील परस्पर देवघेवही उत्तरोत्तर वाढत आहे. या अन्यभाषिकांनाही या शब्दकोशाचा उपयोग व्हावा यादृष्टीने कोशाची मांडणी करणे, उपयुक्ततेच्या दृष्टीने आवश्यक झाले आहे.

उच्चारदर्शन हा आधुनिक कोशरचनेचा एक अनन्यसाधारण विशेष समजला जातो. निव्वळ मराठी भाषकांचाच विचार केला तरी उच्चाराच्या बाबतीत एकसूत्रता अशी कुठेच दिसत नाही. मराठी भाषेतील ध्वनी, वर्णांचे तोकडे व लांबट उच्चार विशिष्ट शब्दोच्चारण प्रक्रियेत शब्दांवर येणारे आघात, भाषेची एकूण लय व आवाजाचा चढउतार यांबाबत फार अनागोंदी दिसते. आकाशवाणी, दूरदर्शन यांसारख्या प्रभावी संपर्कमाध्यमांद्वारे होणारे मराठी कार्यक्रम पाहिले तरी याची प्रचीती आल्यावाचून राहणार नाही. या विषयांचा शास्त्रशुद्ध विचार करणारे लेखनही मराठीत फारसे नाही. कै. गो. कृ. मोडक, कै. रा. श्री. जोग, डॉ. अशोक केळकर, डॉ. ना. गो. कालेलकर, डॉ. द. ह. अग्निहोत्री इत्यादी नावे या संदर्भात महत्त्वाची आहेत. उच्चारदर्शनाचा विचार या विद्वानांनी केलेला असला तरी तो दाखविणाऱ्या चिन्हांचे प्रमाणीकरण अजून झालेले नाही. प्रत्येकाने आपला स्वतंत्र मार्ग चोखाळलेला दिसतो. उच्चारदर्शनाचा प्रयोग पाठ्यपुस्तक मंडळाने शालेय विद्यार्थ्यांसाठी केलेल्या कोशात व डॉ. अग्निहोत्री यांनी तयार केलेल्या कोशात झालेला आहे; परंतु हे दोन्ही कोश अजूनही मुद्रणावस्थेतच आहेत. प्रस्तुत कोशातील उच्चारदर्शनाचा विचार हे दोन्ही कोश नजरेसमोर ठेवून तसेच समाजातील सुशिक्षित वर्गाचे उच्चार प्रमाण मानून करण्यात आला आहे. वाक्प्रचाराची नोंद मात्र त्याच शब्दाखाली करण्यात आली आहे.

शब्दांचे मूळ रूप देऊन त्यापासून बनलेले साधित शब्द, जोडशब्द इत्यादी त्याच शब्दांच्या पोटात देण्याचा प्रघात आजपर्यंतच्या कोशकारांनी अनुसरलेला दिसतो. जिज्ञासू वाचकाला हवा तो शब्द मिळण्यात त्यामुळे अडचण येते हे लक्षात घेऊन व्युत्पत्तिसिद्ध व रूढ रूपांची तसेच त्या शब्दांच्या वैकल्पिक रूपांची, साधित शब्दांची व जोडशब्दांची नोंद स्वतंत्रपणे जाड ठशात करण्यात आली आहे. वाचकांना कोणतीही नोंद चटकन मिळण्यास ही पद्धत उपयुक्त ठरेल. नवीन कोशरचनेचे हे स्वरूप आता सर्वमान्य झाले आहे.

कोशाकडे वाचक वळतो तो मुख्यत: अर्थासाठी, वाचनाच्या ओघात जे अपरिचित, दुर्बोध, कठीण व सुश्लिष्ट शब्द त्याला आढळतात त्यांचा

खुलासा मिळावा व उपयोगही समजावा या हेतूने. शब्दार्थ सहजगम्य व्हावा म्हणून व शब्दगत संकल्पना सुस्पष्ट व्हावी म्हणून अर्थनिश्चितीच्या बाबतीत सर्व प्रकारची काळजी घेण्यात आली आहे. प्राचीन, मध्ययुगीन व अव्वल इंग्रजीतील बहुतेक सर्व उपलब्ध साहित्याचा व त्यातील शब्दसामग्रीचा महाराष्ट्र शब्दकोशाने विचार केला आहे. त्यातील सर्व मजकूर आवश्यक तेथे व शक्य तेथे तपासून व संपादित करून या कोशासाठी वापरण्यात आला आहे. जेथे शंका वाटली तेथे इतरत्र शोध घेऊन अर्थ निश्चित करण्यात आले आहेत. कोश–कार्यालयाने वाचलेल्या सुमारे सातशे पुस्तकांतील नवीन शब्दसंग्रहाचीही अर्थलेखनाच्या दृष्टीने काळजीपूर्वक छाननी करण्यात आली आहे. प्राचीन साहित्याच्या विद्वन्मान्य अभ्यासकांनी त्या साहित्याचे संपादन करताना परिशिष्टरूपाने ज्या अर्थसूची दिल्या आहेत त्यांचाही उपयोग करण्यात आला आहे. दलित व ग्रामीण साहित्याच्या बाबतीत जेथे अडचण आली तेथे प्रत्यक्ष लेखकाशी संपर्क साधण्यात येऊन त्यांचा खुलासा प्रमाण मानण्यात आला आहे. शास्त्रीय व तांत्रिक शब्दांसाठी त्या त्या विषयांच्या तज्ज्ञांची मदत घेऊन अर्थ लिहिण्यात आले आहेत. अर्थलेखनाच्या बाबतीत याप्रमाणे सर्व प्रकारे काळजी घेण्यात आली आहे. या सर्व साहित्यिकांचे व तज्ज्ञांचे कृतज्ञतापूर्वक आभार.

**य. शं. कानिटकर**
**संपादक**
**मराठी शब्दकोश**

**वर्णानुक्रम**

१. या कोशात स्वीकारलेला वर्णानुक्रम मराठी वर्णमालेतील वर्णांच्या क्रमास अनुसरून ठेवला आहे. म्हणजे आरंभी स्वरमाला ('अ' ते 'औ') व त्यानंतर व्यंजने ('क' ते 'ळ'). मराठी शब्दांत दीर्घ 'ॠ' 'ॡ' कोठेच येत नसल्यामुळे स्वरमालेत त्यांना स्थान दिलेले नाही.

२. ं (अनुस्वार) व : (विसर्ग) यांना स्वतंत्र वर्ण मानलेले नाही. ते स्वरानुवर्ती आहेत. 'अं' हा स्वतंत्र वर्ण मानून त्याला 'औ' नंतरचे स्थान न देता अं= अ+ ं व अ: = अ+: असे मानून त्यांना 'अ' वर्णातच समाविष्ट केलेले आहे. यामुळे अनुस्वारयुक्त वर्ण हा अनुस्वार नसलेल्या त्याच वर्णानंतर येईल. जसे अतल–अंतर; आगपेटी–आंगठी; इनाम–इंधन.

विसर्गयुक्त वर्ण हा त्या वर्णांच्या अनुस्वारयुक्त वर्णानंतर येईल. जसे : अतल – अंतराल–अत:पर; अडचण–अंतरंग–अंत:करण.

३. 'ॲ' व 'ऑ'हे दोन नवीन वर्ण मराठीने स्वीकारले आहेत. त्यांची स्थाने ध्वनिशास्त्रदृष्ट्या अनुक्रमे 'ए' व 'ओ' नंतरची असल्यामुळे वर्णमालेत त्यांना तेथेच स्थान देण्यात आले आहे. जसे : एकटा–ॲटलास–ऐटदार–ओणवा–ऑर्डर–औत.

४. शब्दनोंदीचा वर्णानुक्रम लावताना प्रथम स्वर येतील. नंतर स्वरयुक्त व्यंजने (त्यांच्या बाराखडीतील क्रमाप्रमाणे) त्यानंतर जोडाक्षरे (त्यातील घटकवर्णांच्या वर्णमालेतील क्रमास अनुसरून) येतील. जसे : अरविंद–इनाम–एकटा–ॲटम–ऐरावत–ओढणी–ऑडिटर–औदुंबर–करवत–गोडवा–गोंडवन–ग्रामसेवक–ग्लानी–दालन–दांडगा–द्वारका–क्षमा–ज्ञानदेव.

५. 'ळ' हा स्वतंत्र वर्ण मानला असून वर्णमालेत त्याला 'ह' नंतरचे स्थान दिले आहे.

६. 'क्ष' व 'ज्ञ' ही मुळात जोडाक्षरे असली तरी त्यांच्या दृश्य स्वरूपावरून त्यांचे घटकवर्ण ओळखता येत नाहीत. म्हणून हे दोन वर्ण स्वतंत्र मानून मराठी वर्णमालेत परंपरेने त्यांना दिलेली शेवटची स्थाने या कोशात मान्य करण्यात आली आहेत.

७. शब्दनोंदीतील प्रत्येक अक्षर स्वतंत्र एकक मानून वर्णानुक्रम ठरविला आहे.

८. 'ऋ' युक्त अक्षरे (कृ, गृ, तृ, पृ) ही जोडाक्षरे नव्हेत. 'ऋ' हा स्वर असून त्याचे वर्णमालेतील स्थान 'ऊ' नंतरचे आहे.

९. या वर्णानुक्रम पद्धतीस अनुसरून 'प' या वर्णाने सुरुवात होणाऱ्या अक्षरांचा क्रम पुढीलप्रमाणे राहील :

प– पं – प: – पा – पां – पि – पिं – पु –पुं –पू– पूं – पे – पें– पॅ – पॅं – पै – पैं – पो – पों – पॉ – पॉं – पौ – पौं – प्र – प्रं

**उच्चारदर्शन**

'अ'चे उच्चार

१. मराठी अकारान्त शब्दातील शेवटचा वर्ण (अ) हा तोकडा किंवा अपूर्ण उच्चारला जातो. हा तोकडा उच्चार त्या अक्षराचा पाय मोडून दाखविला आहे. जसे – बदक्, गवत्, याचक्.

२. मराठी शब्दातील अन्त्य 'अ' चा तोकडा उच्चार करताना त्याच्यामागील (=उपान्त्य) अक्षरातील स्वराचा उच्चार किंचित लांबट केला जातो. हा लांबट उच्चार त्या अक्षराखाली एक आडवी रेघ (–) देऊन दाखवला आहे. जसे – वचन्, आरास्, विष, गुण्, केस्, ऐक्, ओठ्, औत्.

३. दीर्घान्त शब्दातील उपान्त्य 'अ' हा तोकडा उच्चारला जातो, म्हणून उपान्त्य अक्षराचा पाय मोडून दाखविला आहे. जसे–

बस्का, वाच्णे, पोल्के, बाय्को, निसर्डा, थेर्डी.

४. शब्दातील उपान्त्य अक्षर दीर्घ किंवा लांबट उच्चारले जात असेल, तर त्यामागील 'अ' हाही तोकडा उच्चारला जातो; म्हणून त्याचाही पाय मोडून दाखवला आहे. जसे – पर्कर्, साव्कार्

५. उच्चार प्लुत म्हणजे दीर्घापेक्षाही लांबट होत असल्यास तो अवग्रह किंवा द्विखंड चिन्हाने दाखविला आहे. जसे –अगऽ.

६. अकारान्त शब्दांचे अन्त्याक्षर जोडाक्षरे असले किंवा उपान्त्य अक्षर सानुस्वार असले, तर अन्त्य 'अ'चा उच्चार पूर्ण होतो. जसे – पत्र, शिस्त, पक्ष; अंक, भिंत, पेंड. अशा वेळी अन्त्य अ चा उच्चार तोकडा होत नसल्यामुळे उच्चारलेखनात अन्त्याक्षर व्यंजनान्त ठेवलेले नाही. जसे – पत्र; अङ्क, भिस्त, पेण्ड.

**अनुस्वाराचे उच्चार**

१. मराठीत 'अनुस्वार' म्हणजे नाकातून होणारा खणखणीत उच्चार. हा त्या अक्षरामागे असलेल्या वर्णाच्या डोक्यावर एक टिंब किंवा शीर्षबिंदू देऊन दर्शविला जातो. जसे – अंग, चिंच, गेंद, खोंड.

२. या अनुस्वारापुढे 'क्' ते 'म्' पर्यंतचे म्हणजे पहिल्या पाच वर्गातील कोणतेही व्यंजन आले, तर त्याचा उच्चार व्यंजनाच्या वर्गातील अनुनासिकाने म्हणजे ङ्, ञ, ण्, न्, म् या पंचमवर्णांनी दाखविला जातो. जसे – गंगा (गङ्गा), चंचल (चञ्चल), घंटा (घण्टा), अंध (अन्ध), अंबा (अम्बा).

३. अनुस्वारानंतर य्, र्, ल्, व्, श्, स्, ह्, ज्ञ् हे वर्ण येत असतील तर –

(अ ) शिरोबिंदूनंतर य् आल्यास त्याचा उच्चार अनुस्वार + य्,

(आ) शिरोबिंदूनंतर ल् आल्यास त्याचा उच्चार अनुस्वार + ल्,

(इ) शिरोबिंदूनंतर र्, व्, श्, स्, ह्, ज्ञ् आल्यास त्याचा उच्चार अनुस्वार + व् असा होतो व त्याप्रमाणे तो दाखविला आहे. जसे – संयम (संय्यम), संलग्न (संल्लग्न), संरक्षण (संव्रक्षण), संवाद (संव्वाद), संशय (संव्शय), संसार (संव्सार), संहार (संव्हार), संज्ञा (संव्ज्ञा).

४. च्, ज्, झ् या तीन वर्णांचे मराठीत दोन उच्चार होतात. (१) तालव्य व (२) दंततालव्य किंवा दंतमूलीय. जसे – चहा–चमचा, जेवण–जतन, झकास–झगडा. उच्चारातील हा फरक लक्षात यावा म्हणून दंतमूलीय उच्चार दर्शविण्यासाठी त्या वर्णाखाली एक तलबिंदू किंवा नुक्ता दिला आहे. जसे–चमचा, ज़तन, झ़गडा. तालव्य उच्चार वेगळ्या चिन्हाने दाखवण्याची गरज नाही. तालव्य वर्णाखाली कोणतेच चिन्ह नसल्यास त्याचा उच्चार तालव्य आहे असे समजावे.

५. अनुस्वारापुढे तालव्य अक्षर असो वा दंतमूलीय अक्षर असो, मराठीत अनुस्वाराचा उच्चार 'न्' असाच होतो, म्हणून तालव्यापूर्वीदेखील हा उच्चार 'ञ्' ऐवजी 'न्' या वर्णाने दाखविला आहे. जसे – चंचल (चन्चल), अंजली (अन्जली), झंझावात (झन्झावात).

**आघात** – शक्ती, पुण्य, धन्य, विद्या, चिन्ह यांसारख्या जोडाक्षरयुक्त शब्दांचा उच्चार करताना जोडाक्षराच्या मागील अक्षरावर सामान्यतः आघात येतो. उच्चारदर्शन करताना हा आघात किंवा खटका जोडाक्षरातील पहिल्या वर्णाचे द्वित्त करून दाखवले आहे. जसे – पुण्य (पुण्ण्य), विद्या (विद्द्या), चिन्ह (चिन्न्ह)

जोडाक्षरात मुळातच द्वित्त असेल, तर आघात आणखी एका वर्णाने दाखवलेला नाही. उदा. गप्पा, अन्न, पट्टा, मुद्दा.

जोडाक्षरातील महाप्राणयुक्त अक्षराचे द्वित्त करताना आद्य वर्ण अल्पप्राणयुक्त ठेवला आहे :-

विठ्ठल (विट्ठल्). पृथ्वी (पृत्थ्वी), अभ्यस्त (अब्भ्यस्स्त), अख्खा (अक्खा).

विसर्गयुक्त शब्दांबाबत विसर्गाच्या संधिनियमांस अनुसरून उच्चारदर्शन केले आहे.

जसे – अंतःकरण (अन्तह्करण्, अन्तक्करण्) अंतर्गळ्, अधप्पात, दुश्शासन्, निर्गमन्, निष्कारण्

**शब्दनोंदीतील माहितीचा क्रम**

१. कोशात घेतलेला शब्द प्रारंभी जाड ठशात दिला आहे. या शब्दातील एखाद्या अक्षराला पर्यायी अक्षर किंवा अक्षरे रूढ असतील, तर त्यांच्या दोन स्वतंत्र नोंदी केल्या आहेत. पण पर्यायी अक्षरांमुळे बनणारा शब्द अगदी निकटचा असेल, तर पर्यायी अक्षर तेथेच कंसात दिले आहे. जसे – अजमास, (अदमास), प्रगट, (प्रकट). हकि(की)कत.

२. कवि, गुरु यांसारखे तत्सम इकारांत व उकारांत शब्द मराठीत आता दीर्घान्त लिहिले जातात. म्हणून शब्दनोंद अशा ठिकाणी दीर्घान्त केली आहे. मात्र सामासिक शब्दात मुळाप्रमाणे हे शब्द प्रथमपदी ऱ्हस्वान्त होतात हे समजण्यासाठी तत्सम मूळ शब्दाचे ऱ्हस्वान्त अक्षर शब्दनोंदीत लगेच कंसात दिले आहे. जसे : कवी (वि), राजगुरू (रु).

३. मूळ शब्द दिल्यानंतर लगेच उच्चार गोल कंसात दाखविला आहे. शब्दाच्या उच्चारात बदल नसेल, तर उच्चारलेखन केलेले नाही.

४. त्यानंतर शब्दांचा व्याकरणविषयक तपशील संक्षेपाने दिला आहे. जसे – सर्व. (सर्वनाम), वि. (विशेषण), क्रि. (क्रियापद), सक्रि. (सकर्मक क्रियापद), अक्रि. (अकर्मक क्रियापद), उक्रि. (उभयविध क्रियापद), क्रिवि. (क्रियाविशेषण), शब्द (शब्दयोगी), उभ. (उभयान्वयी), उद्गा. (उद्गारवाची).

नामाच्या बाबतीत त्याचे फक्त लिंगदर्शक संक्षेपचिन्ह दिले जाते. जसे – पु. (पुल्लिंग), स्त्री. (स्त्रीलिंग), न. (नपुसकलिंग). एकच शब्द विविध लिंगी असल्यास तशी नोंद केली आहे जसे – पुस्त्रीन. एखादा शब्द केवळ अनेक वचनात वापरला जात असेल, तर लिंगानंतर अव. असे लिहिले आहे.

५. शब्दाच्या व्याकरणविषयक नोंदी देऊन झाल्यानंतर कोशगत शब्दाचे अर्थ क्रमाने दिले आहेत. मूळ अर्थ प्रथम दिला आहे. एकाच अर्थाचे पर्यायी शब्द असतील तर ते देऊन त्यामध्ये अर्धविरामाचे चिन्ह ठेवले आहे. पर्यायी शब्द संपले की पूर्णविराम दिला आहे. पर्यायी शब्दात एकाच शब्दजातीचे अनेक शब्द आले, तर त्यामध्ये स्वल्पविराम दिले आहेत. शब्दांचे विविध अर्थ असतील, तर त्यांचे गट पाडून ते १. २. ३. ४. अशा क्रमाकांनी दाखविले आहेत. एखादा अर्थ लक्षणेने आला असल्यास त्या गटाच्या आरंभी कंसात 'ल' (लक्षण या शब्दाचा संक्षेप) ठेवला आहे. शब्दांचे अर्थ देताना सामान्यत: पुढील धोरण अवलंबण्यात आले आहे :

(अ) शब्दगत संकल्पना सोप्या शब्दांत स्पष्ट करुन,

(आ) अपरिचित कठीण शब्दांना पर्यायी सोपा शब्द देऊन,

(इ) शास्त्रीय पारिभाषिक शब्दांचा अर्थ व्याख्या देऊन, विश्लेषणात्मक पद्धतीने व उदाहरण देऊन,

(ई) जुन्या व आज व्यवहारात नसलेल्या शब्दांच्या बाबतीत व नवीन अपरिचित शब्दांच्या बाबतीत संबंधित ग्रंथातील ससंदर्भ अवतरणे देऊन,

(उ) झाडे, पशू, पक्षी, अवजारे, यंत्रे यांच्या माहितीबरोबर चित्रे देऊन.

आवश्यक तेथे असे शब्द समाजाच्या ज्या स्तरात किंवा वर्गात वापरले जात असतील त्यांचा निर्देशही केला आहे.

६. दोन शब्दांचे अर्थ सारखेच असतील, तर त्यांतील अधिक प्रचाराच्या शब्दापुढे सर्व नोंदी करण्यात आल्या आहेत. दुसऱ्या शब्दापुढे मात्र कंसात उच्चारलेखन केल्यानंतर 'पहा :...' अशी अस्थलित नोंद करून अन्योन्य संदर्भ दिला आहे. जसे – अंधळा पहा : आंधळा. अणुभार पहा : अणुगुरुत्व. 'आंधळा' व 'अणुगुरुत्व' या नोंदी विस्तृत राहतील.

७. वाक्प्रचार : कोशगत शब्दावर आधारित एखादा वाक्प्रचार असल्यास त्या शब्दाचा अर्थ दिल्यानंतर कंसात (वा.) असा संक्षेप देऊन तो वाक्प्रचार जाड ठशात दिला आहे. त्या वाक्प्रचाराचे विविध अर्थ असल्यास ते १. २. ३. असे आकडे टाकून क्रमवार दिले आहेत. वाक्प्रचार एकापेक्षा अधिक असतील, तर ते क्रमाने दिले आहेत.

८. एखादा शब्द नाम, विशेषण, क्रियाविशेषण अशा शब्दांच्या विविध जातींत वापरला जात असेल, तर या जातींचा उल्लेख त्यांच्या वारंवारतेच्या दृष्टीने ते एकाच नोंदीत क्रमाने स्वतंत्र ओळीत दिले आहेत.

९. व्युत्पत्ती– प्रत्येक शब्दाची व्युत्पत्ती देण्याचा आग्रह धरलेला नाही. सहजसिद्ध अशाच त्या दिलेल्या आहेत. कोणत्या भाषेतून शब्द आला, हे समजावे एवढाच हेतू ठेवला आहे. अरबी, फार्शी, उर्दू इत्यादी सूक्ष्म वर्गीकरणाऐवजी 'फा.' अशीच नोंद केली आहे.

●●●

( पूर्वसंपादनात वरीलपैकी काही बाबींचा काटेकोरपणे विचार झालेला दिसत नाही. पुंन:संपादनात 'उच्चार' गाळले आहेत.)

## कोशात उपयोगात आणलेल्या संक्षेपांची सूची

१ विषय

| संक्षेप | स्पष्टीकरण | संक्षेप | स्पष्टीकरण |
|---|---|---|---|
| अर्थ. अर्थशा. | अर्थशास्त्र | मावंशा., मानव. | मानववंशशास्त्र. |
| इति. | इतिहास | मा.शा. , मानस | मानसशास्त्र. |
| उयंशा, उ यंत्र. | उपयोजित यंत्रशास्त्र | योगशा., योग | योगशास्त्र. |
| कायदा. | कायद्यासंबंधी. | रसाशा. , रसा. | रसायनशास्त्र. |
| कृषि. | कृषिशास्त्र. | राशा., राज्य | राज्यशास्त्र. |
| क्रीडा. | क्रीडा विषयक | वशा., वन | वनस्पतीशास्त्र. |
| ग. | गणिती परिभाषा | वा. | वाणिज्य. |
| छाप. | छापखाना विषयक | वा. ले. | वाणिज्य लेखा. |
| ज्यो. | ज्योतिष | वा. व्य.सं. | वाणिज्य व्यवहार संविधान. |
| तत्त्व. | तत्त्वज्ञान. | वा. व्या.वि. | वाणिज्य व्यावसायिक विज्ञान. |
| तशा. तर्क. | तर्कशास्त्र. | वा. सं. | वाणिज्य संविधान. |
| ना. शा. | नागरिकशास्त्र. | वा. सां. | वाणिज्य सांख्यिकी. |
| नाविक. | नविकांच्या व्यवहारातील | वानस. | वनस्पती संबंधी. |
| नी. शा. नीति. | नीतिशास्त्र | वास्तु. | वास्तुशास्त्र |
| न्याशा. न्याय. | न्यायशास्त्र. | विधी. | कायदेविषयक, विधी. |
| पवि. पदार्थ. | पदार्थविज्ञान. | वै. | वैद्यक |
| पशुवि. पशु. | पशुविज्ञान | व्या. सं. | व्यावसायिक संविधान. |
| प्रा. शा. , प्राणि. | प्राणिशास्त्र. | व्याशा., व्यायाम | व्यायामशास्त्र. |
| बीज. | बीजगणित | शशा., श | शरीरशास्त्र. |
| भा. शा., भाषा | भाषाशास्त्र | शा. प. | शास्त्रीय परिभाषा. |
| भू. | भूगोल | शिशा, शिक्षण | शिक्षणशास्त्र |
| भूग. शा. , भूगर्भ | भूगर्भशास्त्र. | स. शा, समाज | समाजशास्त्र. |
| भूमिती | भूमिती | सा. शा. | साहित्यशास्त्र. |
| भौ., भौतिक | भौतिकशास्त्र. | स्था. | स्थापत्यशास्त्र |

२. भाषा, बोली इ.

| | | | |
|---|---|---|---|
| अपभ्रंश | अपभ्रंश | काथवडी | काथवडी |
| अमा. | अर्धमागधी. | कु. | कुडाळी |
| अर. | अरबी | कु., कुण. | कुणबाऊ |
| आग. | आगरी | कु. गो. | कुणबी गोवानीज |
| आरे. | आरे मराठी | को. | कोकणी |
| इं. | इंग्रजी | कों. | कोंकणी. |
| उ. उर्दू | उर्दू | खा.,खान | खानदेशी |
| कर. | करवीरी | गु,गुज | गुजराथी |
| क., का. | कन्नड, कानडी | गो. | गोमंतकीय |
| कर्ना. | कर्नाटकी | गोंड, गोंडी | गोंडी. |

| संक्षेप | स्पष्टीकरण | संक्षेप | स्पष्टीकरण |
|---|---|---|---|
| घा. | घाटी | प्रा. | प्राकृत |
| चंद्र. | चंद्रपुरी | फा. | फार्सी |
| चि.को. | चित्तपावन कोकणस्थी | फ्रें. | फ्रेंच |
| जुन्नरी | जुन्नरी | बं. | बंगाली |
| झाडी. | झाडी | बाग. | बागलाणी |
| ठा. | ठाकरी | बे. | बेळगावी मराठी |
| ड. | डच | भिल्ली. | भिल्ली |
| त. | तमीळ | मा. | माळवी |
| तंजा. | तंजावरी मराठी | माण. | माणदेशी |
| तु. | तुर्की | माल. | मालवणी |
| ते. | तेलगू | रत्नागिरी | रत्नागिरी |
| दे. | देशी | राजा. | राजापुरी |
| द्रा. | द्राविडी | व.वै. | वऱ्हाडी, वैदर्भी |
| धा. | धारवाडी | वै. सं. | वैदिक संस्कृत |
| ना. | नागपुरी | सं. | संस्कृत |
| नंद. | नंदभाषा | हिं | हिंदी. |
| पा. | पाली | हेट. | हेटकरी |
| पोर्तु. | पोर्तुगीज | | |
| **३. व्याकरण** | | | |
| अ. | अव्यय | पु. | पुल्लिंगी |
| अक्रि. | अकर्मक क्रियापद | प्र. | प्रत्यय |
| अव. | अनेक वचन | (ल.) | लक्षणा; लाक्षणिक अर्थ |
| इ. | इत्यादी. | वा. | वाक्प्रचार |
| उदा. | उदाहरणार्थ, | व्या. | व्याकरण |
| उ.अ. | उभयान्वयी अव्यय. | श. अ. | शब्दयोगी अव्यय. |
| उद्गा. | उद्गारवाची अव्यय. | स. क्रि. | सकर्मक क्रियापद. |
| उक्रि. | उभयविध क्रियापद. | स. ना. | सर्वनाम |
| उप. | उपरोधिक. | सा. | सामान्यरूप. |
| क्रि. | क्रियापद. | सामा. | सामान्यत: |
| क्रि वि. | क्रियाविशेषण | सामाश, समास | सामासिक शब्द. |
| द., सना | दर्शकसर्वनाम. | स्त्री. | स्त्रीलिंगी |
| द्वि. | द्विरुक्त | ( ) | गोलकंस - प्रादेशिक किंवा बोली भाषेसाठी |
| धासा. | धातुसाधित | | |
| ध्व. | ध्वनी, ध्वन्यानुकारी. | [ ] | चौकोनी कंस - शब्दोत्पत्ती दर्शक भाषेसाठी. |
| न. | नपुसकलिंगी. | | |
| न. श. | नवा शब्द. | ० | गाळलेला पूर्व शब्द |
| नाविक. | नाविकांच्या व्यवहारातील | | |

**४. संदर्भ ग्रंथ संक्षेप ( पुढील खंडात )**

# शुद्धीपत्रक

| पृष्ठ क्र. | शब्द | मुद्रित | अपेक्षित |
|---|---|---|---|
| २९ | – | अडथळणी(णूक) | अडथळणी–णूक |
| ३४ | – | अढैच | वर्णानुक्रमे वाचावा |
| ६४ | – | अनावृत्त | वर्णानुक्रमे वाचावा |
| ८४ | – | अन्वये | वर्णानुक्रमे वाचावा |
| ९३ | – | अपाशाई–अप्पाशाही जोडा | पृष्ठ. ९४ वरील 'अपावृत्त' नंतर वाचावा |
| ११५ | अमानत | देखमुखी अनामत | देशमुखी अमानत |
| १२२ | – | अरण्यवास–अरण्यसेवन | अरण्यवास,अरण्यसेवन |
| १३५ | अलक्त | अलकतक | अलक्तक |
| १४३ | – | अल्ला–अल्लाह | अल्ला, अल्लाह |
| १५३ | – | अवर्गीय | वर्णानुक्रमे वाचावा |
| १५४ | अवलंब | दृड, मंडलावरील | दृक मंडलावरील |
| १७३ | – | असमजूत | वर्णानुक्रमे वाचावा |
| १७४ | – | असहमत–ती | हा नोंद शब्द आहे |
| १९१ | – | अक्षकेंद्रण | वर्णानुक्रमे वाचावा |
| २०२ | – | अंगमेळ | वर्णानुक्रमे वाचावा |
| २०५ | – | अंगावणे | वर्णानुक्रमे वाचावा |
| २१७ | – | अंतुरनायक | वर्णानुक्रमे वाचावा |
| २७८ | | आनत्य न. | न. (व्याकरण) |
| २८३ | आपदृष्टी | मलतबी | मतलबी |
| २९५ | – | आयताकार | वर्णानुक्रमे वाचावा |
| ३०६ | – | आर्थिक नियोजन | वर्णानुक्रमे वाचावा |
| ३५१ | – | इथरतिथर | वर्णानुक्रमे वाचावा |
| ३५६ | – | इश्ति–स्ती–स्ते | इश्तिहार, इस्तिहार, इस्तेहार |
| ३६२ | – | इंद्रधनुष्य– धनु | इंद्रधनु, इंद्रधनुष्य |
| ३६४ | – | ईडलिंबू– लिंबू | द्विरूक्त |
| ३६७ | उकरमणे | – | नोंदशब्द म्हणून वाचावा |
| ३८९ | उठताबसता | उपास दिवशी | दिवशी उपास |
| ३९० | उठवळ लागणे | उच्चाटनाची येणे | उच्चाटनाची वेळ येणे |
| ३९७ | उतराई | उतराई स्त्री | स्त्री. (व्याकरण) |
| ४०४ | – | उत्तेजन क्षमता | वर्णानुक्रमे वाचावा |
| ४०७ | – | उत्क्षेपण | वर्णानुक्रमे वाचावा |
| ४३३ | – | उपवंश | वर्णानुक्रमे वाचावा |
| ४४१ | – | उफराट्या | वर्णानुक्रमे वाचावा |
| ५२४ | – | आया | आ–या |

( कोशातील काही शब्दांपुढे कंसात उच्चार दाखविले आहेत. ते अपेक्षित नाहीत. )

## मराठी शब्दकोश

जैसें बिंब तरि बचके एवडें । परि प्रकाशा त्रैलोक्य थोकडें ।
शब्दाची व्याप्ती तेणें पाडें । अनुभवावी ।। ज्ञा. ४.२१५

।। ॐ नमो जी आद्या ।।

[मराठी व्युत्पत्तिकोश (प्रा. कृ. पां. कुलकर्णी), मराठीतील एकाक्षरी शब्दांचा लघुकोश (प्रो. भा. म. गोरे), ग्रामगीता (संत तुकडोजी महाराज) कोश इ. कोशग्रंथांचा प्रारंभ ॐ या एकाक्षरी शब्दाने झालेला आहे.]

सारे विश्व वाक्तत्त्वाने व्यापले आहे. सर्व सृष्टीचे (आणि म्हणून शब्दसृष्टीचेही) आदिबीज ॐ. 'भारतीय तत्त्वज्ञान असे मानते की सृष्टीच्या निर्मितीच्या वेळी ॐ सदृश ध्वनी (Bigbang) उमटला ' - जीवनविकास मे १९९३. सृष्टीच्या प्रारंभी 'There was a word' - बायबल. ''ही सृष्टी ॐ तत्सत नामातून निर्माण झाली आहे. दी वर्ल्ड केम आउट ऑफ वॅर्ड.''- आचार्य विनोबा : वेल्लोर प्रवचने पृ. १६३. आमेन' (Amen हिब्रू) या ॐकारसदृश शब्दाचा अर्थ 'तथास्तु', किंवा 'येशूख्रिस्त' असा आहे. इंग्रजीमध्ये "The word' म्हणजे बायबल किंवा येशू ख्रिस्त. अरबी भाषेतील 'अ व म' या वर्णांचाही 'अल्ला-महंमद पैगंबर' असा अर्थ मानला जातो.

ग्रंथांच्या आणि मंत्रांच्या प्रारंभी ॐ किंवा तत्सदृश शब्द प्रयुक्त करतात. 'ग्रंथसाहिब''ज्ञानदेवी' इ. ग्रंथांच्या प्रारंभी 'ॐ': '१ ओं सतिनामु करता पुरखु'- श्रीगुरु ग्रंथ साहिब १ (गुरुमताचा मूलमंत्र), 'ॐ नमः सिद्धम्' (तिबेटी बौद्ध धर्माचा मंत्र), वैदिक संस्कृतीत हा अत्यंत पवित्र मंत्र आहे.

आधार - विश्वकोश, संस्कृतिकोश इ.

'ॐ' पु. १. एकाक्षरी ब्रह्म. २. अत्यंत पवित्र मंत्र; मंत्रराज. ३. होकार; स्वीकार. ४. मांगलिक उच्चार. ५. प्रतिज्ञापूर्वक विधान.



अ १. देवनागरी लिपीतील आणि मराठी वर्णमालेतील पहिला वर्ण. २. मराठी स्वरमालेतील पहिला स्वर. स्थानपरत्वे ऱ्हस्व, लांबट किंवा निभृत : 'गवत' या शब्दातील 'ग' मधील 'अ' हा ऱ्हस्व, 'व' मधील 'अ' हा लांबट. 'त' मधील 'अ' हा तोटका किंवा निभृत होय. ३. ॐ या अक्षराच्या 'अ', 'उ', 'म्' या तीन घटकांमधील पहिला. हा विष्णूचा निदर्शक मानला जातो. [सं.]

**['अ' ने सुरू होणारे शब्द येथे न आढळल्यास 'आ' मध्ये पाहावेत.]**

अ उपसर्ग. १. व्यंजनादी शब्दांपूर्वी लागणारा, सामान्यतः नकार, अभाव, अल्पत्व, अनौचित्य आणि अन्यत्व दाखविणारा उपसर्ग. अन्याय (नकार); अधर्म (अभाव); अगोड (अल्पत्व); अवेळ (अनौचित्य); अहिंदू (अन्यत्व). स्वरादी शब्दांपूर्वी त्याचे रूप 'अन्' असे होते : अनर्थ, अनपेक्षित. व्यंजनांनी सुरू होणाऱ्या शब्दांपूर्वी क्वचित त्याचे हे रूप वापरलेले आढळते. अनहित, अनमोल. २. मराठीत 'अ' हा उपसर्ग क्वचित अतिशयत्व दाखवतो. अघोर, अचपळ. ३. मूळ स्थितीला जाणे : असुजणे = सूज उतरणे; अहारणे = सुटे होणे.

अ वि. इयत्ता अथवा गुणवत्ता दाखवण्यासाठी वापरले जाणारे चिन्ह : 'अ' तुकडी, 'अ' वर्ग इत्यादी. [सं.]

अ आ : प्रारंभिक ज्ञान; ओ का ठो.

**[अ इ-ई ने सुरू होणारे शब्द येथे न आढळल्यास 'ऐ' मध्ये पाहावेत.]**

**अई** उद्गार. दुःख – शोकदर्शक उद्गार.

**अईन** स्त्री. १. चांगली कुळी; चांगली वर्तणूक; शिष्टाचारयुक्त किंवा रुबाबदार वर्तन. [फा.]

**अईसभईस** वि. अद्भुत (गोष्ट).

**[अउ-ऊ ने सुरू होणारे काही शब्द 'औ' मध्ये पाहावेत.]**

**अउडबारा** वि. (अउड = औट म्हणजे साडेतीन. साडेतीन हात म्हणजे एक पुरुष उंचीचे माप. यावरून ) बारा पुरुष : 'कृष्णें बाण सोडिला तिधारां । रुक्मियासी लागला पिसारा । मागे सारिला अउडबारा । शक्ति अंबरा उडविली ।।' – एरुस्व १२.१२१.

**अउणापाउणा** वि. अर्ध्याने किंवा पावाने कमीअधिक; साधारणपणे संख्येच्या संदर्भात उपयोग केला जातो. [सं. अर्धोनपादोन]

**अउले** न. प्रेमाचे बोलावणे.

**अउड** पु. नांगर; औत.

**अक** न. दुःख; पाप. [सं.]

**अकचाट** वि. अतिकारस्थानी : 'नावडे शास्त्री अकचाट नावडे चातुर्य वटवट ।' – भारा ८.७.

**अकच्छ** वि. कासोटा न घालता नेसलेले (धोतर, लुगडे इ.). [सं.]

**अकट** वि. विशेष चिकित्सा करणारा; हट्टी.

**अकटचिकट** वि. १. विशेष चिकित्सा करणारा; बारीकसारीक तपशिलात शिरणारा. २. आग्रही; हट्टी; चिकट; चेंगट. [चिकटचे द्वि.]

**अकटी** स्त्री. लहान शेगडी; आगटी; शेकोटी. [सं.अग्निष्टिका]

**अकटेदुकटे** न. ठिकरीचा खेळ.

**अकटोविकट** वि. १. प्रचंड; फार मोठा व ओबडधोबड; अवाढव्य; बेढब; अगडबंब. २. अक्राळविक्राळ; भयप्रद; भयानक. ३. (उप.) अत्यल्प; अतिशय थोडे. [विकटचे द्वि.]

**अकड** पहा : **अक्कड** (अकड व त्यापासून तयार झालेले सर्व शब्द 'अक्कड' मध्ये पहा.) [सं. आकृति]

**अकडकडवे** न. गाण्यातील पालुपद; ध्रुवपद; आंकणकडवे.

**अकडणे** अक्रि. १. ऐट करणे; डौल मिरवणे; नखरा करणे. २. पहा : **आखडणे** : 'दररोज सकाळी अकडणाऱ्या कमरेला...' – शिळान १२७.

**अकडबाज** वि. ऐटबाज; गर्विष्ठ.

**अकडंतिकडं** न. १. वायफळ बडबड. २. टाळाटाळ; चुकवाचुकवी. क्रिवि. विसंगतपणे; विचूकपणे (वागणे, बोलणे इ.).

**अकडाई** स्त्री. ऐट करण्याची सवय; नखरेलपणा.

**अकढा** वि. १. पूर्णपणे न कढलेला किंवा कढविलेला (पदार्थ). २. वितळेपर्यंत न तापवलेला (धातू).

**अकण** वि. १. कणी नसलेला स्वच्छ (तांदूळ). २. दाणे नसलेले (कणीस). ३. खायला एक कणही नाही असा; दरिद्री. [सं.]

**अकणनिकण** न. एकदा मळून धान्य काढलेली कणसे पुन्हा मळून त्यातून निघालेले धान्य : 'अकणनिकण कालवून धान्य त्याच्या माथीं मारावयाचे' – गांगा १२३.

**अकथ्या** पु. कथापुराण न सांगणारा माणूस; पोथी न वाचणारा माणूस : 'अजन्म्यासि कैंचि जाति । अक्रिया कासया ज्योति । निर्मळासि कशाने धूति । अकथ्या न पोथी कथनाची ।।' – सिसं १३.१२६.

**अकद** वि. स्थूल; लठ्ठ; बेडौल. [अर.]

**अकदस** वि. अत्यंत पवित्र; पुण्यवान; पुण्यशील. [अर.]

**अकनिष्ठ** पु. १. गौतमबुद्धाचे एक नाव. २. बौद्ध देवतांचा एक वर्ग. [सं.]

**अकपट** वि. १. ज्याच्या मनात कपट नाही असा. २. ज्यात लबाडी, खोटेपणा नाही असा (माल, वागणूक, व्यवहार इ.).
न. मोकळेपणा; निर्व्याजता; शुद्धभाव. [सं.]

**अकब** क्रिवि. मागून; नंतर. [फा.]

**अकबर** वि. सर्वात श्रेष्ठ; थोर; मोठा. [अर.]

**अकबरनवीस – नीस** पु. पहा : **अख्बारनवीस** : 'त्याने लागलीच अकबरनविसास बोलावूनआणून त्यास ते काय आहे ते वाचण्यास सांगितले.' – वज्रा १९१.

**अकबरशाही** वि. १. अकबरबादशहाने चालू केलेले (रुपया, मोहोर वगैरे चलनी नाणे). २. अकबर बादशहाने रूढ, प्रचलित केलेला इ. ३. अकबर बादशहासंबंधीचा.

**अकबरी** स्त्री. १. अकबराने चालू केलेली मोहोर. २. अकबराशी संबंधित (अकबराने चालू केलेले) कायदे, नाणी वागण्याच्या पद्धती वगैरे. ३. तांदळाच्या पिठाचा केलेला एक पदार्थ.

**अकबरी मोहर–मोहोर** स्त्री. १. अकबराने सुरू केलेले पंधरा रुपये

किंमतीचे सोन्याचे नाणे. २. या नाण्यांची केलेली माळ. ३. (ल.) इभ्रतदार (व्यापारी).

**अकबार** वि. चांगल्या बहरलेल्या; पूर्ण बहरलेल्या : 'केतकी कर्दळी अकबार । बहु टवटवीत ।' -पला ३.६.

**अकरकी** स्त्री. अकरे अकरे एकविसाशेपासून वीस वीसे चारशेपर्यंतचे पाढे.

क्रिवि. अकरी; (सोंगट्यांच्या खेळात) अकराव्या घरात. [सं. एकादश]

**अकरण** न. कर्म न करणे; कर्मरहितता; निष्क्रियत्व; कर्मापासून मुक्तता: 'तरी अकरणाचेनि खेदें ।' -ज्ञा १८.५९२. [सं.]

**अकरणरूप** न. क्रियापदाचे नकारदर्शक रूप. उदा. नसणे; नाकारणे. २. नकारार्थक साहाय्यकारी क्रियापद करणरूपी क्रियापदाला जोडून तयार होणारे रूप. उदा. जात नाही, फसवे नसते, जाऊ नये. [सं.]

**अकरण समायोजन** न. ऋणसमायोजन.

**अकरणात्मक (स्वातंत्र्य)** न. (राज्य.) १. नकारात्मक स्वातंत्र्य. २. केवळ बंधनाचा अभाव असलेले स्वातंत्र्य. ३. विधायक किंवा वास्तव आशय, अर्थ नसलेले स्वातंत्र्य. [सं.]

**अकरणी अंक** पु. (ग.) ज्याचा अंश पूर्णांक आहे व छेद शून्येतर पूर्णांक आहे अशा अपूर्णांकाच्या स्वरूपात लिहिता येणारा अंक. [सं.]

**अकरणीय** वि. करण्यास अयोग्य, अनुचित : 'परिकरणीया अकरणीया न देखा ।' - ऋ ४५. [सं.]

**अकरणे- प्रत्यवाय** पु. जे केले नाही तर ते चुकीचे ठरेल असे; जे न करणे लाजिरवाणे ठरेल असे; बंधनकारक. [सं.]

**अकरताल-ल्या** वि. हट्टी; माथेफिरू; कजाग; खोडकर; दांडगा (विशेषतः मुले व स्त्रिया यांच्याबाबतीत). [सं.अकृत+लु]

**अकरनकर** वि. जे करायला हवे ते न करणारा आणि करायला नको ते करणारा; करनकरा; स्वेच्छाचारी.

**अकरम** वि. १. हीन मानलेल्या जातीचा; हीन वृत्तीचा. २. लबाड; धूर्त; कपटी. [सं.अकर्म]

**अकरम** वि. कृपावंत. [अर.अक्राम]

**अकरमाश्या** वि. १. (बारा माशांचा तोळा. त्यात एक मासा हीण, म्हणून अकरामाशा म्हणजे हीन प्रतीचा. त्यावरून ) अनौरस; दासीपुत्र; जारज; हीन बीजाचा; कमजात. २. (ल.) कृतघ्न. ३. (क्वचित) अकरा मासे वजनाचा (तोळा, रुपया इ.).

पु. १. अकरा महिने गर्भाशयात राहून जन्मलेले मूल. २. अकरा महिने पोटात गर्भ बाळगणारा प्राणी (म्हैस).

**अकरमास** पु. वर्षश्राद्ध. (व.)

**अकरमाही** स्त्री. अकरा महिन्यांचा पगार देऊन वर्षभर चाकरी करून घेणे; इंग्रज अमलापूर्वी भारतात बहुतेक ठिकाणी ही पद्धत चालू होती.

**अकरवातोत्तर** वि. करमुक्त : 'अकरवातोत्तरे भूमी १०० दाउपसाउ वाहिला' - पळस शिला १.२.

**अकरा** वि. न करणारा; आळशी; हट्टी.

**अकरा** वि. दहा अधिक एक मिळून होणारी संख्या; ११ ही संख्या. [सं. एकादश]

**अकरावा** वि. क्रमाने १० नंतरचा.

पु. १. माणूस मेल्यानंतर तो दिवस धरून त्याच्या अकराव्या दिवशी करावयाचा वृषोत्सर्गादी विधी.

**अकरावा गुरु-रू** १. भाग्योदय होणे : 'मामलेदार, लष्करी लोक, सावकार, पाटील-कुलकर्णी, देशमुख-देशपांड्ये यांना मात्र अकरावा आला.' - गांगा ४७. २. गुरू हा ग्रह जन्मलग्नाच्या अकराव्या घरात आल्यास अत्यंत अनुकूल समजला जातो. त्यावरून दाट मैत्रीचे निदर्शक.

**अकरावा रुद्र** १. शंकराचा अकरावा अवतार. २. हनुमान; मारुती. ३. (ल.) अति रागीट, तापट माणूस. (अकराही रुद्र अति भयंकर असतात; पण त्यातल्या त्यात अकरावा सर्वांहून भयंकर आहे, अशा समजुतीवरून).

**अकराळविकराळ** वि. प्रचंड; भयंकर; भयानक; भीतिदायक; उग्र; ज्याची भीती वाटेल असा. [सं. करालचे द्वि.]

**अकरी** अ. सोंगट्याच्या पटावरील विवक्षित घरापासून अकराव्या घरी. बुद्धिबळाच्या खेळातील एक संज्ञा.

**अकरुण** वि. निर्दय; निष्ठुर; क्रूर; कठोर. [सं.]

**अकरे** न.अव. १. (देवापुढे लावण्याच्या) अकरा वातींचा समूह. २. आज एक, उद्या दोन, परवा तीन अशी चढत्या क्रमाने अकरा दिवस देवापुढे पिठाचे दिवे ठेवणे व परत एकपर्यंत उतरत्या क्रमाने कमी करणे. ३. चातुर्मास्यात चार चार बोटे लांबीच्या अकरा वाती निरांजनात पेटवून ओवाळण्याचा मुलींचा एक नेम किंवा व्रत.

**अकर्तव्य** वि. १. जे करणे उचित नाही ते; करावयाला योग्य नव्हे ते. २. जे करावयाचे योजलेले नाही ते. [सं.]

**अकर्ता** वि. १. एखादी गोष्ट करण्यास अपात्र, अयोग्य. २. काहीच कर्तव्य कर्म न उरलेला; सिद्ध : 'जे अकर्त्याच्या ठायी बैसो येती ।' -ज्ञा १३.२८१. ३. काही न करणारा (आळशी); सुस्त. [सं.]

**अकर्तात्मबोध** पु. देहीच विदेहता प्राप्त होणे; देहभान नसणे; प्रपंच, व्यवसाय करीत असताना 'स्व' चे अवधान न राहणे.

**अकर्तृक** वि. १. (व्या.) ज्या क्रियापदाचा कर्ता स्वतंत्रपणे वाक्यात दिलेला नसून त्या शब्दातील क्रियेचा मूळ अर्थ म्हणजे भाव हाच त्याचा कर्ता मानावा लागतो, असे क्रियापद. अशा वेळी कर्ता हा क्रियापदातच सामावलेला असतो. २. स्वयंभू; जे कोणीही केलेले नाही असे. [सं.]

**अकर्तृत्व** न. कर्तृत्व नसणे; कर्तबगारी नसणे; नालायकी; कार्यक्षमता नसणे; पुरुषत्व नसणे. [सं.]

**अकर्म** न. १. दुष्कर्म; कुकर्म; वाईट काम; पापकृत्य; नीतिबाह्य, निषिद्ध कर्म; अयोग्य कृत्य : 'तंव तंव होती थोराडें । अकर्माचीं तळबुडें ।।' -ज्ञा १५.१६८.२. ज्यास कर्म नाही असे; कर्मातीत (कर्माच्या पलीकडचे) ब्रह्म : 'जें कर्मविगळे सर्वांगें । जेथ लावितांहि न लगे । जें नव्हें कर्मठाजोगें । तें जाण सवेगें अकर्म ।।' - एभा ७.६६. ३. कर्माचा अभाव. [सं.]

**अकर्मक** वि. (व्या.) कर्म नसलेले किंवा कर्माची गरज नसलेले (क्रियापद). [सं.]

**अकर्मगति** स्त्री. पापमार्ग; वाईट मार्ग: 'तरि कैसी करुं अकर्मगति । स्वामिद्रुही होऊनि ।।' – क्रिपु १२.२२. [सं.]

**अकर्मण्यता** स्त्री. निरुद्योग; काम न करणे; आळशीपणा; कामाबद्दल उदासीनता; नकर्तेपणा. [सं.]

**अकर्मा** वि. १. कर्महीन; कर्मातीत; कर्मरहित; ज्याला कर्माची बाधा नाही असा : 'मी अकर्मा न करोनि करीं कर्मे ।' – एभा २.२९८.२. साहसकर्म करणारा. [सं.]

**अकर्माकार** वि. वाईट, पाप, अघोरी साहस करणारा : 'अंबालयीं यादव वीर । उतरले आहेती अकर्माकार ।।' – एरुस्व ६.४१. [सं.]

**अकर्मी** वि. १. दुष्ट; गुन्हेगार; पाप (अकर्म) करणारा. २. दुर्दैवी; कमनशिबी. [सं.]

**[' अकल ' ने सुरू होणारे शब्द 'अक्कल'मध्ये पाहावेत.]**

**अकल** वि. कला नसलेला; चढउतार नसलेला; अंश, भाग नसलेला; अक्षय : 'जयजय अकलकलाशून्य ।'– रंयो १.९. [सं.]

**अकलकरा – कडा, अकलकाडा–काढा–कारा** पहा : **अक्कलकारा**

**अकलंक** वि. निष्पाप; निर्दोष.

**अकलंकी** वि. निर्मल; निर्दोष; ज्याच्यावर कोणताही डाग नाही असे: 'गोरट्या अकलंकी वृत्तीचे ...' – पासंग ३२.

**अकला** पु. घोड्याला होणारा रोग. हा रोग झाल्यास घोडा लंगडतो.

**अकलाद** वि. पहा : **अल्लाद**

**अकलुषित** वि. खरे; स्वच्छ; प्रामाणिक; दूषित नसलेले: 'त्यामुळे पत्रलेखकांचे खरे व अकलुषीत मत प्रतिबिंबित होत नाही.' – विराशिरो १६. [सं.]

**अकल्पन** वि. १. कल्पनारहित; निरिच्छ; कल्पनेच्या पलीकडील : ' अकल्पनाख्यकल्पतरो ।' – ज्ञा १८.१०. [सं.]

**अकल्पनीय** वि. ज्याची कल्पना करणे शक्य नाही असे; अतर्क्य; न सुचणारे; कल्पनातीत. [सं.]

**अकल्पित** वि. १. ज्याची कल्पना होणार नाही असे. २. ज्याविषयी पूर्वी काही बेत, योजना, तयारी, विचार केलेला नाही असे. ३. अनुद्दिष्ट; अचिंतित; अकस्मात; अतर्कित; विचारात किंवा तर्कात नसलेले; ज्याची पूर्वी सूचना मिळालेली नाही असे. [सं.]

**अकल्मष** वि. १. निष्पाप; निर्दोष. २. स्वच्छ; निर्मल. ३. पूर्वग्रहाने दूषित नसलेले. [सं.]

**अकल्याण** न. अमंगल; अशुभ; अहित; नुकसान.
वि. वाईट; अमंगल; हानिकारक. [सं.]

**अकल्याणकारी** वि. हित न करणारा; नुकसान करणारा; अहितकारक; अनर्थकारी. [सं.]

**अकवि–वी** वि. १. मूर्ख; अज्ञानी. २. कवी नसलेला. [सं.]

**अकशाल, अकसाळी** स्त्री. कर्नाटकी सोनारांची जात.

**अकशेरू** वि. (प्राणि.) पाठीचा कणा नसलेला (प्राणी); पृष्ठवंशहीन (प्राणी). उदा. जेलीफिश, गांडूळ इत्यादी.

**अकसात** स्त्री. वार्षिक वसुलाचे हप्ते.

**अकसीर** वि. गुणकारक; परिणामकारक; रामबाण. [अर.]

**अकस्मात** अ. १. अकल्पित; एकाएकी. २. विचार केल्याशिवाय; आधार नसता; पूर्वसूचना नसता. [सं.]

**अकस्मादिक** वि. अचानक : 'तेयाचे अकस्मादिक : सुजे नाक.' रकौ २९१

**अकळ** वि. न समजणारे; अगम्य; दुर्बोध; दुर्ज्ञेय.

**अकळणे** अक्रि. जांभई, उचकी, अखेरचा श्वास येणे–देणे.

**अकळत–नकळत** क्रिवि. १. चुकूनमाकून; न जाणता; अज्ञानाने. २. यदृच्छेने.

**अकळवणी** न. भलत्याच वेळी पडणारा पाऊस.

**अकळी** स्त्री. १. बुडत्याने किंवा मरणाऱ्याने झटका देऊन जोराने टाकलेला श्वास; अखेरचा श्वास; उचकी; आचका. २. जांभई.

**अकळून–नकळून** क्रिवि. अकळत–नकळत.

**अकंटक** वि. १. निष्कंटक; काटे नसलेला. २. (ल.) संकट, विरोध नसलेला; शत्रू नसलेला. [सं.]

**अकातणे** अक्रि. १. अधाशीपणा करणे. २. आक्रोश करणे : 'अशी अकातल्यासारखी काहून करतं ?' –माणूस ७४. [सं. आक्रांत]

**अकादमी** स्त्री. १. साहित्य, कला, शास्त्र यांचे संगोपन, संशोधन व संवर्धन यासाठी स्थापन केलेली संस्था. २. एखाद्या विशिष्ट कलेचे वा व्यवसायाचे शिक्षण देणारी, त्यासाठी आर्थिक मदत व प्रोत्साहन देणारी संस्था. उदा. सैनिकी अकादमी. [इं. ॲकॅडमी]

**अकामी** वि. निरुपयोगी; निकामी; व्यर्थ.

**अकाम्य** वि. फलाची अपेक्षा न करता, निष्काम बुद्धीने केलेले; कामनारहित; निरपेक्ष; निर्हेतुक; निर्लोभी. [सं.]

**अकार** पु. 'अ' हा स्वर. [सं.]

**अकारण** वि. १. निमित्तावाचून; विनाकारण; व्यर्थ; उगीचच. २. गरज नसताना; उपयोग नसताना; काही फायदा नसताना; निरुपयोगी; मिथ्या. ३. स्वयंसिद्ध (ईश्वर) : 'म्हणवुनि मज एकेविण । हे त्रयीधर्म अकारण ।।' –ज्ञा ९.३३४. [सं.]

**अकारण बंधु–धू** पु. निरपेक्ष सहायक; निमित्त नसताना होणारा मित्र : 'सरकारचे अकारण बंधूही त्याजविरुद्ध आहेत.' –लोटिकेले २.२.२७५.

**अकारणिक** वि. १. निरुपयोगी; निष्फळ. २. ज्याची गरज नाही असे; ज्यातून काही निष्पन्न होऊ शकत नाही असे. [सं.]

**अकारणी** पहा : **अकारणिक**

**अकारादी वर्ण** अकारापासून सुरू होणारी वर्णमाला; 'अ' पासून आरंभ होणारी मूळाक्षरे. [सं.]

**अकारान्त** वि. अ ज्याच्या शेवटी आहे असे. [सं.]

**अकारीब** पु. १. नातलग; जवळचे लोक; अंतेवासी. २. माहीतगार; जाणते : 'तुम्ही सर्व त्या प्रांतीचे अकारीब. जावे न जावे.' – मइसा १.२८१. [अर.]

**अकार्पण्य** न. १. कृपणतेचा अभाव; समृद्धी. २. उदारपणा; सढळपणा. [सं.]

**अकार्बनी** वि. (रसा.) रसायनशास्त्राची एक शाखा; ज्याच्या मूलद्रव्यातील सूत्रामध्ये कार्बन–कर्ब – नाही अशी वस्तू. उदा. प्राणी

किंवा वनस्पती ज्या पदार्थांचे बनलेले असतात त्यापेक्षा वेगळ्या पदार्थांचे बनलेले किंवा असलेले; अनैसर्गिक प्रक्रियेपासून बनलेले.

**अकार्य** न. अयोग्य कृत्य; गुन्हा; पाप; अपराध; दोष.
वि. करण्याची गरज नाही असे; अयोग्य; जे करू नये असे. [सं.]

**अकार्यक्षम** वि. एखादे काम करण्याची कुवत नसलेला.

**अकाल** पु. शीख धर्मीयांचा ईश्वर.

**अकाल** पु. १. अयोग्य वेळ; भलतीच वेळ. २. दुष्काळ; दुर्भिक्ष; बेमोसमी घडलेली, झालेली गोष्ट. [सं.]

**अकालज** वि. अवेळी जन्मलेला; भलत्याच किंवा अशुभ वेळी उत्पन्न झालेला किंवा जन्मलेला. [सं.]

**अकालजन्म** पु. अवेळी जन्म. [सं.]

**अकालपक्व** वि. (वन.) १. लवकर फुले व फळे धरलेला; आगस; आगसलेला; हळवा; हळा. २. (ल.) वागणे बोलणे यात अवेळी प्रौढपणा आलेला; अकाली वयस्क झालेला. [सं.]

**अकालपक्वता** स्त्री. १. अवेळी आलेले पिकलेपण (फूल व फळ). २. अवेळी आलेला प्रौढपणा; लहान वयात आलेली समजूत. [सं.]

**अकालप्रसव** पु. दिवस पूर्ण भरण्यापूर्वी झालेला जन्म. [सं.]

**अकालप्रसूत** वि. दिवस पूर्ण भरण्यापूर्वी प्रसूत झालेली (स्त्री). [सं.]

**अकालप्रौढ** वि.(समाज.) लहान वयातच प्रौढाप्रमाणे वागणारा; अधिक समजूतदार. [सं.]

**अकालमृत्यु –त्यू** पु. वय झाले नसताना आलेले मरण; अवेळी मरण; लहानपणी, तरुणपणी आलेले मरण. [सं.]

**अकालवचन** न. वेळप्रसंगाला धरून नसलेले, असमयोचित बोलणे. [सं.]

**अकालवृष्टि–ष्टी** स्त्री. बेमोसमी पाऊस, अवेळी पडलेला पाऊस.[सं.]

**अकालिक** वि. अवेळी; फार आधी; लवकर; योग्य वेळेपूर्वी; भलत्याच वेळी; अयोग्य वेळी केलेले, घडलेले. [सं.]

**अकालिका** पु. तांबडसर रंगीबेरंगी पानांचे शोभेचे एक झाड. [इं.]

**अकाली** पु. १. शीख धर्मातील एक पंथ. २. या पंथाचा अनुयायी.

**अकालीन** वि. अवेळचा; अप्रासंगिक; अयोग्य वेळी आणलेला, केलेला; भलत्याच वेळचा. [सं.]

**अकालोत्पन्न** अकाली उत्पन्न झालेला. पहा : **अकालज**

**अकाल्पनिक** वि. वास्तविक ; बनावट नसलेला; मुळास धरून; कल्पनेत नसलेला; कल्पनेतून न काढलेला; सत्य; खरा; अकृत्रिम. [सं.]

**अकाळ** पु. (ल.) अयोग्य वेळ; अवेळ; अकाल; दुष्काळ: 'जैसें कां अभ्रपटल । अकाळीचें ।।' – ज्ञा ३.१४१. [सं.]

**अकाळणी** पहा : **अकाळवणी** : 'चोच व्यथेची टिपते दाणा, अकाळणीच्या मृद्गंधाचा' – पुथें ८३.

**अकाळवणी** पहा : **अकळवणी**

**अकाळविजू** स्त्री. अवेळी चमकणारी वीज : 'जो अरिराय अकाळ – विजू' –रुस्व २४८. [सं.अकालविद्युत्]

**अकाळवेळ** स्त्री. कोणतीही वेळ; अनिश्चित वेळ: 'बेबंद धाडी येत अकाळवेळी'– एहम १. [सं.अकालवेला]

**अकाळ्या** वि. अवेळी पडलेला (पाऊस); पावसाळा नसताना पडलेला; अप्रासंगिक.

**अकांचन** वि. निर्धन; द्रव्य नसलेला; द्रव्यहीन; कंगाल. [सं.]

**अकांचित** क्रिवि. अवचित; अचानक; एकाएकी : 'अकांचित कानात बसलेला विमानाचा आवाज सुरू झाला' – ऊन ३७.

**अकांड–डी** वि. अकाली; अनपेक्षित : 'अकांड प्रलयीं रक्षणकारी ।'– सप्र ६.२१. [सं.]

**अकांडतांडव** न. १. प्रमाणाबाहेर राग आल्यामुळे केलेला आरडाओरडा; मोठमोठ्याने बोलणे; हातपाय आपटणे.२. जाणूनबुजून रागाचे नाटक करणे; आरडाओरडा करणे. [सं.]

**अकांडा** पु. आकांडा; वाडग्यात जाण्यासाठी वाटेत लावलेल्या दुबेळक्यावरील आडवे लाकूड : 'फाटकाला लावलेल्या अकांड्यावरून चपळ उडी घेऊन...'– शेलूक १२९.

**अकांडी** पहा : **अकांड**

**अकांतणे** क्रि. आक्रोश करणे.

**अकांत लोकांत** पु. १. लोकांसमोर गळे काढून रडणे; सर्वांसमोर आक्रोश मांडणे. २. घाबरणे. (गो.)

**अकि** स्त्री. सडीक तांदूळ. [का. अक्की]

**अकिलाट प्रवृत्ती** स्त्री. (आयु.) जखमेतील रक्त न गोठणेमुळे व रक्ताचा अखंड प्रवाह चालू राहण्यामुळे होणारा विकार.

**अकिंचन** वि. ज्याच्याजवळ काहीही नाही असा; अतिशय गरीब; कंगाल. [सं.]

**अकिंचित** वि. क्षुल्लक; क्षुद्र; निरुपयोगी; बेकाम; प्रभाव, महत्त्व किंवा उपयोग नसलेली (व्यक्ती किंवा वस्तू). [सं.]

**अकिंचितज्ञान** न. अगदी थोडे ज्ञान. [सं.]

**अकीक** पु. १. तांबूस, कठीण असे एक प्रकारचे रत्न; अगेट(गोमेद) आणि सिलिका (गार) यांनी बनलेले रत्न. २. सिलिकाचे गूढस्फटिकी किंवा अर्धस्फटिकी खनिज. [अर.]

**अकीद–अकीदत** पु. स्त्री. निष्ठा; दृढविश्वास.

**अकीन** पु. १. दृढविश्वास; खात्री; सत्य. २. सत्याचा वाली. [अर.यकीन]

**अकीर्तनीय** वि. स्तुती करण्यास अपात्र; प्रशंसापर उल्लेख करण्याजोगा नसलेला. [सं.]

**अकीर्ति –र्ती** स्त्री. दुष्कीर्ती; बदनामी; दुर्लौकिक; कुप्रसिद्धी; नाचक्की.[सं.]

**अकीर्तिकर** बदनामी करणारे; दुर्लौकिक पसरवणारे. [सं.]

**अकीलदाना** वि. सुज्ञ; प्रज्ञावन्त : 'दराज काय लिहिणे आभोहिबापन्हा –अकीलदाना आहेत.' –शिचसाखं ५. [अर.]

**अकुटेदुकुटे** मुलांचा ठिकरीचा खेळ.

**अकुतोभय** वि. १. ज्याला कशाचीही भीती नाही असा; ज्याला कुठूनही भय नाही असा; निर्भय; धीट; संकटे सहन करण्यास समर्थ; बेडर; निर्धास्त : 'हा संपूर्ण प्रबंध म्हणजे.... अकुतोभय अधिकारी पुरुषाचे बोल वाटतात.' – आज्ञा उपोद् ३९.२. सुरक्षित; पक्की; मजबूत (इमारतीसंबंधी). [सं.]

**अकुल** पु. शंकराचे एक नाव : 'हा योगू शास्त्रार्थ बोलिला । विशद केला अकुलागमीं ।' – एभा १४.४६०.
वि. हीन कुल. [सं.]

**अकुलज** वि. हलक्या, हीन कुळात जन्मलेला; क्षुद्र; नीच. [सं.]

**अकुलीन** आचारहीन; चारित्र्य नसलेला.

**अकुशल** वि. १. एखाद्या कामाचे कसब न शिकलेला; बिनकसबी; अनिष्णात; केवळ अंगमेहनतीचे काम करणारा (कामगार). २. अशुभ; दुःखकारक. [सं.]

**अकुहरी** (भूशा.) वि. १. घट्ट बांधलेला; सुसंबद्ध; घट्ट. २. छिद्रे नसलेला; एकसंध. [सं.]

**अकुळी** वि. ज्याचे कूळ कुणालाही माहीत नाही असा; कुलरहित : 'एक म्हणती नंदाचा । एक म्हणती वसुदेवाचा । ठाव नाही बापाचा । अकुळी साचा श्रीकृष्ण ।।' –एरुस्व २.३. [सं. अकुल]

**अकुंठ,अकुंठित** वि. अडथळा न येता चालू असलेले; अखंड; अप्रतिहत; अबाधित; अप्रतिबद्ध; अरुद्ध. (वाचा, गती इ.) : 'रोटीबेटीच्या अकुंठित व्यवहाराचे.' – केतका ७८. [सं.]

**अकुंठित** वि. (वन.) अंकुर किंवा फुलोरा यांच्या प्रमुख अक्षाची न थांबता चालू राहणारी (वाढ). [सं.]

**अकूट** न. विष न पाजलेले (शस्त्र.). [सं.]

**अकूपार** पु. १. समुद्र. २. खडक.३. कासव. ४. सूर्य. [सं.]

**अकूर** पु. घोड्याचा एक रोग : 'घोड्याने उडी मारली असता बरगडी मोडते तो.' – अश्वप ३०१. [सं.]

**अकृत** वि. न केलेले; न संपविलेले.
न. वाईट कृत्य; पातक. [सं.]

**अकृतकाल** वि. बिनमुदतीचे (कर्ज, व्याज इ.); कालमर्यादा नसलेले.

**अकृताकृत** पहा : **अक्रीत**

**अकृताभ्यागम** पु. (तत्त्व.) स्वतः न केलेल्या कर्माचे फळ एखाद्याला मिळणे. [सं.]

**अकृताश्रम** वि. आश्रमातीत; वर्णाश्रम धर्मापलीकडे गेलेला : 'आत्माभ्यासी परिश्रम । करूनि निरखिले कर्माकर्म । यालागीं ते अकृताश्रम । निज निभ्रम स्वयें जाहले ।।' –एभा २.१६६. [सं.]

**अकृति–ती** स्त्री. (विधी) कायद्याप्रमाणे करायला हवी अशी गोष्ट न करणे; न केलेली कृती. [सं.]

**अकृत्य** न. निषिद्ध कर्म; गैरकृत्य; वाईट काम; पाप. [सं.]

**अकृत्रिम** वि. १. नैसर्गिक; स्वाभाविक; सहज; स्वयंभू; अनिर्मित; मनुष्याने न केलेला.२. वास्तविक; खरे; वस्तुस्थितीस धरून. ३. अस्सल; बनावट नसलेला. ४. स्वयंभू. ५. निष्कपटी; प्रामाणिक; मोकळ्या मनाचा.

**अकृष्य** वि. उखर; कसण्यास योग्य नसलेली; बरड (जमीन).

**अक्लृप्त** वि. ज्याबद्दल पूर्वी काही योजना केली नाही असा; विचार न केलेला; न शोधलेला. [सं.]

**अकेवलत्व** न (तत्त्व.) बहुविधत्व; अनेकविधत्व; विविधत्व.

**अकोचणे** अक्रि. संकोचणे; आकाराने लहान होणे; अंग लपविणे : 'मूळ तो लपाला अकोचुनि ।' – दावि ३.२८. [सं.आ+कुच]

**अकोचन** न. आकुंचन; आखडणे : 'अकोचन प्रसरण वळण धावन आणि निरोधन । हे वळणास पांचैजण । पंचीकृत वायोचे ।' विसिं ६.२८.

**अकोटापत्र** न. एकाच्या मालकीचे गलबत दुसऱ्याला वापरावयास दिल्याबद्दलचा भाडेपट्टा. (को.)

**अकोल–ळ** न. (वन.) कण्हेरीच्या पानाप्रमाणे लांबट, रुंद वर रेघा असलेल्या पानांचे एक औषधी झाड. [सं.]

**अकोशिक–कीय** वि. (जीव.) पेशींचा अभाव असणारे सजीव. उदा. विषाणू. [सं.]

**अक्कड** स्त्री. १. ऐट; मिजास; आव; डौल; दिमाख; नखरा. २. एखाद्या गोष्टीचा दिमाख दाखवणे–मिरवणे–करणे. ( क्रि. बाळगणे, धरणे, दाखवणे.) [हिं. अकड]

**अक्कडखोर–अक्कडबाज** वि.ऐट, छानछोकी करणारा; फाकडा; नटवा.

**अक्कडसासू** स्त्री. बायकोची वडील बहीण. (व.)

**अक्कडी** स्त्री. मुख्य पिकाच्या रांगामधील पाट काढण्याकरिता किंवा दुय्यम पीक काढण्याकरिता चालवायचे कोळपे. [का.]

**अक्कण** वि. चिकट : 'अक्कण माती चिक्कण माती खळगा जो खणावा...' – मसाप २.१. [चिक्कणचे द्वि.]

**अक्करताळा** माथेफिरू; कजाग; खोडकर. [को.]

**अक्करमाशा** वि. हलक्या जातीचा; लग्नबाह्य संबंधातून जन्मलेला. पहा : **अकरमाशा**

**अक्कल** शहाणपणा; समज; चातुर्य; बुद्धी; तारतम्य; जाणण्याची शक्ती. [अर. अक्ल] (वा.) **अक्कल गुंग होणे** – बुद्धी कुंठित होणे; दिङ्मूढ होणे; एखादा कठीण प्रश्न, समस्या सोडविण्याचा मार्ग न सुचल्याने गोंधळात पडणे. **अक्कल जाणे**– सारासार विचारशक्ती नाहीशी होणे; शहाणपण नाहीसे होणे. **अक्कल पाजळणे**– (उप.) नको तिथे शहाणपणा दाखवणे: 'ती अक्कल हितं गावात पाजळा !' – पडघवली १२५. **अक्कल विकत घेणे** – पुष्कळ किंमत देऊन शहाणपण शिकणे; धडा शिकणे; फार महाग पडलेल्या अनुभवाने शहाणे होणे. **अक्कल शेणात जाणे**– शहाणपणा वाया जाणे; निरुपयोगी ठरणे : 'नुसते वाचून काय करायचे ? सारी अक्कल शेणात जायची ' – श्याआ १५०. **अक्कल सांगणे**– सल्ला देणे. **अकलेचा कांदा, अकलेचा खंदक** – (उप.) मूर्ख मनुष्य; अतिशहाणा; दीडशहाणा; काही न समजणारा. पहा : **अकलेचा कांदा. अकलेचा गधडा**– मूर्ख; ढ; मतिमंद; बावळट; ज्याला मुळीच शहाणपण नाही असा; समज कमी असलेला. **अकलेचा बंद**– दूरदर्शित्व; शहाणपण : 'चातुर्य : अकलेचा बंद नाही घातला.' – दास १९.८.१५. **अकलेचे तारे तोडणे**– मूर्खपणाने बडबडणे; अविचाराने बोलणे. **अकलेचे सागर** – (उप.) अतिशहाणे : 'अंताजीपंत कितीकसे मर्द माणोस व अकलेचे सागर आहेत.'– पुरंदभा १.२३२. **अकलेच्या वाटेने पाहणे**– तर्क करणे; विचार करणे : 'गुडीविंड्यास पुढे फौज असता बेदडे येऊन ठरणार नाहींत, हे अकलेच्या वाटेने पाहता दिसते.' – ऐलेसं १७०२.

**अक्कलकारा** पु. एक औषधी वनस्पती. हे हातभर उंचीचे झाड असून ते बंगाल, अरबस्तान, इजिप्त या भागांत विशेषत्वाने आढळते. या झाडास पिवळी फुले (बोंडे) येतात. [अर. आकरकरहा]

**अक्कलखाद** अ. वि. संपूर्ण; सपशेल; समूळ; अगदी साफ : 'यंदा आमचा जोंधळा अक्कलखाद बुडाला.' – सश ५.

**अक्कलखार** पहा : **अकलकारा**

**अक्कलदाढ** स्त्री. खालच्या व वरच्या अगदी शेवटच्या दाढांपैकी प्रत्येक. ही साधारणपणे माणसाला विसाव्या वर्षांनंतर येते. साधारणपणे सर्व दात आल्यावर खालच्या आणि वरच्या अगदी शेवटच्या दाढांपैकी प्रत्येक दाढ; शेवटी उगवणारा दात.

**अक्कलबाज** पहा : **अक्कलमंद.**

**अक्कलबुद्धीने** क्रिवि. शहाणपणाने; विचारपूर्वक, हुशारीने.

**अक्कलमंद** वि. १. बुद्धिमान; शहाणा; चतुर; युक्तिबाज; धूर्त. २. (उप.) मंद बुद्धीचा; मूर्ख. [अर. अक्लमंद]

**अक्कलमान –वंत–वान** पहा : **अक्कलमंद**

**अक्कलहुशारीने** क्रिवि. राजीखुषीने; सावधान चित्ताने; पूर्ण विचारांती; सक्ती, जोरजबरदस्ती व फसवणूक याशिवाय (कागदपत्र; दस्तऐवज वगैरेमध्ये वापरतात.).

**अक्का** स्त्री. वडील बहीण. [सं.]

**अक्काबाई** १. लक्ष्मीची वडील बहीण. २. दुष्ट, भांडकुदळ स्त्री. ३. (ल.) दारिद्र्य; दुर्दशा; दुर्बुद्धी. (वा.) **अक्काबाई आठवणे**– दुर्बुद्धी होणे; विपरीत बुद्धी होणे. **अक्काबाईचा पाया** – दुर्दैवाची, वाईट स्थिती येण्याची पूर्वचिन्हे. **अक्काबाईचा फेरा** – भरभराटीचा, वेगवान काळ जाऊन दारिद्र्य येणे; दुर्दशा; दैन्य. **अक्काबाईची दया** – (ल.) दारिद्र्य; दुरवस्था. **अक्काबाईचे पोर** – दुर्बुद्धी; दुर्दैव : 'हे अक्काबाईचे पोर (१९०१ चे शेतकी बिल) सर्व इलाखा भिकारी करील.' – लोटिकेले. २:२.२६७. **अक्काबाईचे बाळ** – (ल.) कमनशिबी माणूस; दुर्दैवी व्यक्ती.

**अक्कबपेनी** वि. कपाळावर पानासारखा टिळा असणारा (घोडा).

**अक्रम** वि. १. हीन जातीचा, वृत्तीचा. २. लबाड; धूर्त; कपटी. [सं. अ +कर्म]

**अक्रम** वि. १. अनियमित; क्रमविरहित; अव्यवस्थित : 'वाचेचें वितुळणें । सावरोनि प्राणें । अक्रमाचें श्वसणें । ठेवोनि ठायीं ।।' – ज्ञा १८.१५५७.

**अक्रम** पु. पत्त्याचा एक खेळ. यात सर्व पत्त्यांची किंमत ठरवलेली असते; त्यावरून हातात असलेल्या पानांचे गुण २१ अगर जवळजवळ २१ होतील असा प्रयत्न खेळाडूने केला पाहिजे. २१ पेक्षा जास्त गुण झाल्यास नुकसान होते.

**अक्रमित युग्म** न. (ग.) राशींचा क्रम महत्त्वाचा नसलेल्या अव्यक्त राशींची जोडी. [सं.]

**अक्रस** वि. रुक्ष; नीरस; अरबट चरबट (अन्न).

**अक्रसणे, आक्रसणे** अक्रि. आखडणे; घट्ट होणे; आकुंचित होणे; (कापड वगैरे) आटणे; संकुचित होणे. [सं.]

**अक्रसतक्रस** वि. तिखट; जाडेभरडे; रुक्ष. [अक्रसचे द्वि.]

**अक्रस्ताळा – ळी** वि. पहा : **अकरताळ**

**अक्रान** वि. समकालीन; सारख्या वयाचे; सारख्या योग्यतेचे. [फा.करीन]

**अक्राळ, अक्राळविक्राळ** पहा : **अकराळविकराळ** [सं.कराल]

**अक्रिय** वि. १. कोणतीही क्रिया न करणारा; क्रियाशून्य (ईश्वर); क्रियारहित; निष्कर्म; ज्याला कोणतेही कर्म करण्याची गरज नाही असा : 'मज अक्रियासी कर्म ।' – ज्ञा ९.१५६. २. तटस्थ. [सं.]

**अक्रिय घट** पु. (विअ) गतिहीन, चलनशून्य, अचेतन पोकळी. [सं.]

**अक्रियावाद** पु. क्रियाशील मनोवृत्ती, दृष्टिकोन किंवा वर्तन यांचा अभाव. [सं.]

**अक्रीत** न.१.भुताटकी; देवस्की. २. अपूर्व गोष्ट; विलक्षण घटना; चमत्कार. [सं. अकृत्य]

**अक्रांत** वि. असंभवनीय; न करण्यासारखी (कृती). [सं.अ + कृ]

**अक्रीत** वि. १. मोफत; फुकट; किंमत न देता घेतलेला; लबाडीने मिळवलेला. २. बेसुमार; अतिशय. [सं. अ + क्री.] (वा.) **अक्रीत घेणे** – भरमसाट किंमतीला घेणे. **अक्रीत देणे**–१. एखादी वस्तू जास्त किंमत घेऊन विकणे; जबर व्याज घेऊन रक्कम देणे. २. भलत्याच दराने, बाजारभावाच्या मानाने अतिशय जास्त भावाने विकणे.

**अक्रेय** वि. विकत घेता न येण्यासारखा; विकता न येण्यासारखा.[सं.]

**अक्रोट, अक्रोड** पु. हे झाड हिमालयाच्या आसमंतात व चीन, उत्तर हिंदुस्तान, इराण इकडे आढळते. याला तीस–चाळीस वर्षांनी छोट्या पेरूएवढे फळ येते. लाकूड सुरेख व मजबूत असल्याने नक्षीकामास चांगले. हा वृक्ष शंभर–सव्वाशे फूट उंचीचा असतो. [सं. अक्षोट]

**अक्रोध** पु. रागाचा अभाव; रागाचे दमन; यतिधर्माचे एक लक्षण. वि. रागरहित.

**अक्लिष्ट** वि. गुंतागुंत नसलेले; सोपे; सहज होण्याजोगे; सरळ; सुलभ; सुबोध. [सं.]

**अक्लिष्टपणे** क्रिवि. अनायासे; त्रासाशिवाय; मुक्तपणे; सहज; सुखाने; अगदी सहजासहजी; त्रास न होता; तारांबळ न उडता.

**अक्लेश** क्रिवि. त्रास, श्रम, काळजी याशिवाय; सहजासहजी. [सं.]

**अक्लेश–शी** क्रिवि. पूर्णपणे; सर्वथा; अगदी; जितका लाभ व्हायला हवा त्यात काही कमी न होता; बाकी न राहता (नाश होणे, भंगणे, वागणे, मारणे, मरणे, जाणे इ. क्रियापदांबरोबर उपयोग करतात.)

**अक्शा (क्सा) बोक्शी (क्सी)** वि. ओक्साबोक्सी; ढसढसा.

**अक्शी** समूळ; सर्वांशी; अगदी पूर्णपणे.

**अखई** क्रिवि. सदोदित टिकणारे; शाश्वत; अखंड; अक्षयी : 'करी लागपाठ चित्तवित्त नको पाहो । अखई तो चुडा तुज भोगईल नाहो ।।' – तुगा २८८. [सं.अक्षय]

**अखजा –जी–ज्जी** पहा : **अखतीज**

**अखटा** वि. वाईट; तिरस्करणीय; दुःखद : 'जेथे अशा स्नेहाची जात । तेथे उभयतांचे द्वैत अखटा' – होला ७२.१०५. [सं.]

**अखटाई, अखटाय** स्त्री. १. लबाडीचा अभाव. २. (ल.) शहाणपण. (गो.)

**अखत** पहा : **अक्षत**

**अखतीज** स्त्री. वैशाख शुद्ध तृतीया. : पहा **अक्षयतृतीया** : 'मी गोसावीयाचां ठाईं : अखतीज करीन.' – लीचउ १५१.

**अखतेसाली** अ. पुढल्या वर्षी.

**अखत्काल** क्रिवि. अकस्मात.

**अखबारनवीस–अखबारनीस** पु. १. बातम्या किंवा हकिकती लिहिणारा किंवा लिहून पत्राने दुसऱ्यांना कळविणारा. २. वर्तमानपत्र इ. चा बातमीदार; पत्रकार. [फा.]

**अखम** वि. कोणतीही गोष्ट करण्यास असमर्थ; पंगू; निर्बल; अशक्त; रोगी; दुबळा : 'दाते हो दान करा, जाते पंढरपुरा । न्या मज तेथवरी, अखमाचा सोयरा ।।' – तुगा ३४९. [सं. अक्षम]

**अखय** वि. अक्षय, नित्य; सदैव; अखंड; नाशरहित : 'दिले अखय अभयदान गा ।' –तुगा ३४९ . [सं. अक्षय]

**अखर–री** पु. स्त्री. गावाच्या कडेची जागा. [अर. आखिर]

**अखर** वि. अक्षर; अक्षय; अविनाशी; नाश न पावणारा; चिरंतन. क्रिवि. अखेरीस. पहा : **अखेर**

**अखरकणे** सक्रि. ओढून आणणे; ताब्यात ठेवणे : 'मंत्रें देव प्रगटती । मंत्रें भुतें अखरकिर्ती ।।' –दास ९.८३३. [सं. आ+कृष्]

**अखरनखर, आखरनखर** क्रिवि. अखेरीस; काही केले तरी; सरतेशेवटी.

**अखरपख–क्ष** पु. भाद्रपदवद्य (सर्वपित्री) अमावस्या; पक्ष (श्राद्ध) करावयाचा शेवटचा दिवस, पितृपक्ष. [सं. अक्षर + पक्ष]

**अखरा** पु. आखाडा; शस्त्रागार.

**अखरी** स्त्री. गाडीची दोन बाजूंची समोरासमोर असणारी चाके ज्या आसाभोवती फिरतात त्याच्यावर बसवलेले तुळईसारखे लाकूड. गाडीचा आस व साटी यामधले लाकूड. [सं. अक्ष]

**अखरे** वि. खरे नसलेले; खोटे (नाणे); भ्रम : 'पारखियाचि अखरे पडे' – ज्ञा १७.३९२.

**अखर्किणे** क्रि. आकर्षिणे; मंत्रसामर्थ्याने ओढून आणणे : 'एजिप्ताचे जोतिसी समस्त । अपुले मंत्र अखर्कित ।' –क्रिपु. १६.५६. [सं. आकर्ष]

**अखव** वि. सर्व : 'अखवा लोकु जेवीला' – लीचपू २.

**अखवानजी** पु. पंतोजी; शिक्षक: 'आमच्या अखवानजीला व्याकरण येत होतें असें नाही.' – अरू २.१०–११.

**अखसा–से** वि. अख्खा; सर्व; संपूर्ण.

**अखळ** न.अक्षर; शब्द; नाव [सं. अक्षर]

**अखळी** वि. प्रौढ; अविवाहित : 'तुम्ही अखळीचीया राजकुमारी' – शिव ६७८.

**अखंगळ** वि. खोडकर. (व.) [क. अखाळे – श्रेष्ठता]

**अखंड** वि. १. संपूर्ण; न तुटलेला; तुकडे न जोडता बनलेला; एकाच लाकडाच्या, दगडाच्या तुकड्यातून बनवलेला; सलग; एकसंध; समग्र. २. मध्ये न थांबता चालू असलेला; सतत; अविरत; ज्याला खंड, अडथळा, विसावा, थांबणूक इ. नाही (तो). ३. न फाडलेले; न तोडलेले; जोड न लावता केलेले किंवा शिवलेले. [सं.]

**अखंडचोळी** स्त्री. तुकड्यांच्या चोळीमध्ये कापतात तसे लाग, पखे, ठुशा व पाठजोड असे तुकडे न कापता बाह्या वगळून सलग शिवलेली चोळी; नवऱ्या मुलीने तेलफळाच्या वेळी ल्यावयाची दोन हातांसाठी दोन तुकडे व पाठ यांसाठी एक तुकडा अशा तुकड्यांची शिवलेली चोळी.

**अखंडत्व** न. सलगपणा; अखंडितता; अविच्छिन्नता. [सं.]

**अखंडदंडायमान** वि. अमर्याद; अनंत (काळ); घटिका, पळे, दिवस, वर्ष इ. कालविभागविरहित; सतत असणारा; ज्याला शेवट नाही असा; अखंड काठीसारखा. [सं.]

**अखंड द्वादशी** स्त्री. मार्गशीर्ष शुद्ध द्वादशी.

**अखंडधारी** स्त्री. अखंड अभिषेक : 'लिंगाशी अखंडधारी'–वैवंस २४.

**अखंडनीय** पहा : **अखंड्य**

**अखंड रज्जुपथ** एका टोकाहून दुसऱ्या टोकाला जाण्यासाठी तयार केलेला दोरखंडाचा मार्ग. [सं.]

**अखंडश्रेढी** स्त्री. (ग.) गणितातील एक श्रेढीप्रकार. यातील पदे क्रमाने खंड न पडता एकसारखी असतात. [सं.]

**अखंडसौभाग्य** न. १. वैधव्य प्राप्त न होणे; नवऱ्याच्या अगोदर मृत्यू येणे; सवाष्णपण. २. अव्याहत; एकसारखे; सततची भरभराट; ऐश्वर्य; कल्याण.

**अखंड सौभाग्यवती** स्त्री. जिला सतत सौभाग्यसुख लाभले किंवा लाभणार आहे अशी स्त्री; अविधवा. २. (ल.) वेश्या.

**अखंडस्वारी** स्त्री. सर्व लवाजम्यांसहित असलेली स्वारी : 'अखंड स्वारी रायाची निघाली चौथीच्या अमलामधी' – प्रला ३०९.

**अखंडज्ञान** न. १. पायरीपायरीने ज्ञान मिळण्याऐवजी एकदमच सर्व ज्ञान प्राप्त होणे. २. नित्य ज्ञानमय अवस्था. ३. संश्लेषणात्मक ज्ञान. [सं.]

**अखंडाकार** अ. अखंडितपणे; खंड न पडता; सतत. [सं.]

**अखंडित** वि. १. अत्रुटित; अविभक्त; अविच्छिन्न; न थांबलेला; चालू राहिलेला; बिनतुकड्याचा. २. (ल.) पुष्कळ; अपरंपार; अगाध; अतिशय; अमर्याद. ३. अपराजित; खोडून न टाकलेला; खोटा न ठरलेला; रद्द न केलेला. [सं.]

**अखंडी** क्रिवि. नेहमी; सतत; अडथळा न येता; न थांबता.

**अखंडैकरस** पु. पूर्णब्रह्म; परब्रह्म. [सं.]

**अखंड्य** वि. खोडून काढण्यास अशक्य; प्रत्युत्तर देण्यास कठीण. [सं.]

**अखाद्य** वि. खाण्यास अयोग्य; खाऊ नयेत असे; खाण्याकरता नसलेले, निषिद्ध; अभक्ष्य; अभोज्य : 'अखाद्याचेनि भोजनें ।'– ज्ञा १८.८०६.

**अखिल–ळ** वि. १. सर्व; सकळ; संपूर्ण : 'तूंचि अवघे अखिल जन ।' – एरुस्व १.२. २. अनंत; न संपणारे. [सं.]

**अखिलार्थ** पु. मुख्य मुद्दा; सारांश; तात्पर्य . [सं.]

**अखीती, अखीतीज** स्त्री. पहा : **अक्षयतृतीया**

**अखीरनखीर** पहा : **अखरनखर**

**अखुडु** वि. हात आखडणारा; कंजूष : 'देवो म्हणे माजाकरू । अखुडु न्हवे मी परमेश्वरु ।' – क्रिपु २१.०९.

**अखुनजी,अखुंजी** पहा : **अखवानजी**

**अखूट** वि. न खुंटणारा; कमी न होणारा; सारखा वाढणारा : 'तो अवीट, अखूट असा निर्मळ आनंद होतो.' – भासं ६१.

**अखेव** न. कंठाळी, पडशी, गोणी, पखाल, माकण इत्यादिकांची एक बाजू; बैलाच्या पाठीवरील तूप, तेल इत्यादिकांचा एका बाजूचा बुदला; अटके. [सं. अर्द्धक]

**अखेतय, अखेती, अखेतीज** पहा : **अक्षयतृतीया**

**अखेर** स्त्री. शेवट; समाप्ती; अंत; परिणाम; मृत्यू; मरण.
वि. शेवटील; शेवटचा; पूर्ण झालेला; संपलेला; मृत.
क्रिवि. शेवटी; अंती; शेवटास. [फा. आखिर]

**अखेरआढावा** पु. सालअखेर येणे – देणे समजण्याकरता मांडलेला जमाखर्च.

**अखेरची शिल्लक** कोणताही व्यवहार संपवताना संबंधित खात्यावर शिल्लक असलेली शेवटची रक्कम.

**अखेर नौबत – नौबद** १. चौघडा बंद करतेवेळी जलद वाजवण्यात येणारी गत. २. (ल.) शेवटचे यश. [फा.]

**अखेर साल** १. वर्षाचा शेवट; मृगारंभ; उन्हाळ्याचा शेवट व पावसाळ्याचा प्रारंभ म्हणजे ज्येष्ठ महिना : 'शेवटी अखेरसाल जहाले.' – मइसा १९.७६. २. विशिष्ट वर्षचक्रातील शेवटचे वर्ष. ३. हिशेबाच्या वर्षाचा शेवट. [फा.]

**अखेरी** स्त्री. समाप्ती; अंत; शेवट (कामाचा); संपवणे; खलास होणे; आटोपणे; (सामूग्री; धान्य). [अर.] (वा.) **मारणे–साधणे–सांभाळणे** – १. प्रथमपासून आघाडी मिळालेली नसताही एकदम जोराचा प्रयत्न करून यश मिळवणे; जिंकणे; शेवटचा तडाखा लगावणे. २. (दशावतारी गंजिफा) शेवटचा हात मिळवणे; डाव साधणे.

**अखेरीचे दिवस** शेतकामात हंगामाचे शेवटचे दिवस; वैशाख (मे) महिन्याचा शेवटचा पंधरवडा.

**अखेलेखे** क्रिवि वारंवार.

**अखोटा** पु. १. (एखाद्या काठीच्या किंवा खुंटीच्या भोवती) दोरी बांधण्याकरता पाडलेली वाटोळी खाच; खोबण; कंगोरा. २. खराडी किंवा कप्पी (पुली) मधील वाटोळी खाच. ३. विहिरीत घागर सोडताना घागरीच्या गळ्यासाठी केलेला दोरीचा फास. ४. पुढे आलेले टोक; धस; सुळका. (वा.) **अखोटा भरणे** – आखटणे; धस लागणे; खोचाटा लागणे : 'हा पाहिलास पाटावरन उठताना मुकट्याला केवढा अखोटा भरला तो.' – खेस्व १११. **अखोटा लागणे** – खोचाटा लागणे; कपड्याला धस लागून फाटणे.

**अखोड** वि. १. कोणतीही खोड नसलेला; व्यंग, दोष, डाग नसलेला. २. शुद्ध; निर्मळ.

**अखोभे** क्रिवि. शांत मनाने; स्थिर चित्ताने; प्रक्षुब्ध न होता : 'हे गीता पढतां अखोभें – राज्ञा १८.१५०७. [सं. अक्षोभ]

**अखोर** वि. आणिक; अधिक. (खा.)

**अखोरी** वि. १. न खोरलेला; न खोदलेला : 'अखोरी अबोटी जन्म परमेश्वरासि देयावे ।।' चक्रसू २९.२२३. २. राखेने झाकलेल्या अग्नीप्रमाणे; अप्रज्वलित. ३. (ल.) शारीरिक विकाराची सेवना न करता. [क. अकुलिसु]

**अख्खा** वि. १. सगळा; संपूर्ण; सबंध; अखंड; वट्ट; धड; शाबूत; एकूण; सर्व; एकंदर. [सं. अक्षत]

**अख्ज** पु. ग्रहण करणे; प्राप्ती; हस्तगत करणे. [फा.]

**अख्तर** पु. १. तारा; नक्षत्र. २. सुदैव; शकुन. [अर.]

**अख्त्यार** पु. १. सोपवलेला अधिकार; दिलेला हक्क; मुखत्यारी; सत्ता. २. निवड; पसंती. [इख्तियार अर.]

**अख्त्यारपत्र** न. प्रतिनिधित्वाचा अधिकार देणारे पत्र; ज्या लेखाने किंवा पत्राने काही अधिकार, हक्क, वहिवाट इत्यादी दिलेले असतात असे पत्र.

**अख्त्यारी** पु. अधिकार दिलेला प्रतिनिधी; व्यवस्थापक; चालक; अधिकारी; मुख्त्यार. [अर. इख्तियार]

**अख्बार** पु. स्त्री. वर्तमानपत्र; बातमीपत्र; दुसऱ्या राज्यातील दरबारात असलेल्या प्रतिनिधींनी पाठवलेले पत्र. [अर.]

**अख्बारनवीस** पु. १. बातमीपत्र पाठवणारा; खास बातमीदार. २. मंत्री. ३. (राजदरबारातला) घटना लिहून ठेवणारा अधिकारी.

**अख्री– अखरी** स्त्री. धान्य; सामुग्री इ. संपणे.

**अख्वान** पु. भाऊ; सहोदर. [फा.]

**अग** पु. वृक्ष; पर्वत (न जाणारा, न चालणारा यावरून).

**अग** (अग ऽ) उद्गा.१. जिव्हाळ्याच्या वा नातेसंबंधातील किंवा वयाने लहान असलेल्या स्त्रीचे लक्ष वेधण्यासाठी काढलेला संबोधनार्थी उद्‌गार. २. स्वस्त्रीस उद्देशून वापरावयाचे संबोधन.

**अगइ – ई, अगग्, अगगाई** उद्गा. आनंद, आश्चर्य किंवा भय दाखवणारा उद्‌गार. अगबाई; अगाई अगग ! : 'म्हणे अगइ! ऐकिलेंहि न कधीं असे पाप गा ।' – केका १०. [म. अग+आई]

**अगट** न. कोडे; उखाणा. [सं. अघटित]

**अगट चिगट** वि. मंद; चेंगट; आळशी.

**अगड–डू, आगड** पु. १. आड; बांधीव विहीर. २. खंदक; खाच; लवण. ३. तट : 'हा लोकालोक महागड । त्रैलोक्याशी अगड । रचिला असे ।' – कथा ६.४.१०. ४. जनावरांचे (विशेषत: हत्तींचे) खेळ– झुंज यासाठी बांधलेले उंच तट असलेले आवार, (साठमारीचे मैदान). ५. लवणामधील वाट. (गो.) [सं. आगर्त.]
वि. अगाध.

**अगडत(द) (ध) (ब) गड** न. १. क्षुल्लक वस्तू; अडगळ; सटरफटर. २. अमर्याद, शुष्क, निरर्थक बडबड; वेडेवाकडे वागणे, बोलणे वगैरे. ३. शिळेपाके, जाडेभरडे अन्न; नि:सत्त्व खाणे; गरिबीचे खाणे; भिकार खाणे. क्रिवि. कसेतरी; अव्यवस्थितपणे; ओबडधोबडपणे.

**अगडधू–धूव** वि. लठ्ठंभारती; लठ्ठनिरंजन; फोपशा (माणूस); अगडबंब; धिप्पाड (स्त्री, पुरुष); हत्तीचे पिल्लू.

**अगडधूत** पु. गोसावी; बैरागी; दिगंबर साधू; अगडबंब माणूस; लठ्ठंभारती माणूस. [सं. अवधूत]

**अगडधोबड** वि. खरखरीत; ओबडधोबड.

**अगडबंब** वि. लठ्ठेश्वर; फार लठ्ठ; धिप्पाड; फार मोठ्या आकाराचा.

**अगडा** पु. गाडीचे जू व दांडी यांना बांधणारी दोरी; कसणी; धुरेकट.

**अगडीदगडी** क्रिवि. अडचणीत. (वा.) **अगडीदगडी जीव घालणे**– अडचणीत आणणे.

**अगणनिगण** पहा : **आकणनिकण**

**अगणनीय, अगणेय** वि. १. ज्याची गणना, मोजणी करता येणार नाही असे. २. (ल.) क्षुल्लक; खिजगणतीत नसलेले.

**अगणित** वि. १. गणना न केलेले; न मोजलेले. २. असंख्य; अमाप; गणना करता येणार नाही इतके. [सं.]

**अगण्य** वि. पहा : **अगणनीय;** मोजता न येण्याजोगे : 'अनादि जें अगण्य । परमतत्त्व ।' – ज्ञा ६.३२०. [सं.]

**अगत** क्रिवि. अगत्यपूर्वक; खचित. (गो.)

**अगतिक** वि. काय करावे ते सुचत नाही असा; कुंठित; निराधार; निरुपाय; असहाय. [सं.]

**अगतिक गतिती** स्त्री. १. संकटावस्थेतून किंवा अनेक अडचणीतून पुढे जाणे; संकटातून निभावून जाणे. २. संकटसमयीचा उपाय; अखेरचा उपाय; आणीबाणीच्या वेळची हिकमत. ३. नाइलाजास्तव निरुपायास्तव पत्करलेली स्थिती, दशा, व्यवस्था, सोय.

पु. असहाय व्यक्तीला मदत करणारा; अनाथनाथ; वाली (देवता, परमेश्वर वगैरे). [सं.]

**अगतून** क्रिवि. अगत्यपूर्वक; मन:पूर्वक. (कु.)

**अगत्य** न. १. आस्था; जिव्हाळा; कळकळ; आदर. २. अत्यंत आवश्यकता; फार जरुरी; केलीच पाहिजे अशी वाटणारी गोष्ट; टाळता न येण्यासारखी स्थिती : 'जे अगत्य होते तैसे जाले' – दावि ३५.

क्रिवि. अवश्य; न चुकता; निश्चयेकरून; खात्रीने. [सं.अ+गम्]

**अगत्यपूर्वक** क्रिवि. १. मनापासून; आवर्जून. २. निश्चयाने; खात्रीने; अवश्यमेव. ३. बुद्धिपुरस्सर; मुद्दाम. [सं.]

**अगत्यबुद्धि, अगत्यवाद** स्त्री. महत्त्व; जरूरी; काळजी; आवश्यकता वाटणे; भीड; मुर्वत. [सं.]

**अगत्यमेव** वि. कळकळीने; कोणत्याही सबबी न सांगता; निष्ठापूर्वक. [सं.]

**अगत्यरूप** क्रिवि. मुद्दाम; बुद्धिपुरस्सर; अगत्यपूर्वक : 'सद्विद्या विरक्त पुरूषें अभ्यासावी ।अगत्यरूप ।।' – दास २.८.३२. [सं.]

**अगत्यवादी** वि. १. एखाद्या गोष्टीचे महत्त्व मानणारा; एखाद्या गोष्टीची जरुरी, गरज मान्य करणारा, कामाबद्दल, व्यक्तीबद्दल, तत्परता, आस्था बाळगणारा. २. जरुरीच्या वाटणाऱ्या गोष्टीची तरफदारी करणारा; एखाद्या गोष्टीशी अतिशय जवळकीने बांधलेला.

**अगत्य सागत्य** न. आगत स्वागत.

**अगत्या** क्रिवि. अगतिकतेने; अपरिहार्यतेने : 'ते आंतर नेणती चि बापुडे । म्हणौनि अगत्या सेवणे घडे' –ज्ञा ५.१२०.

**अगत्याअगत्य** क्रिवि. अगत्यापुरता; जरूर तितका : 'सारांश हा ऐवज सत्वर आणवून अगत्याअगत्य फौजेच्या समजाविशीस खर्च करणे.' – इएमपी ४२.

**अगद** न. (आयु.) १. औषध : 'मद्वाक्य तुला न रुचे मरणारा अगदसें अगा बापा ।' – मोसभा ४.१३. २. विषनाशक, विषाचा परिणाम नाहीसे करणारे औषध.

वि. निरोगी. [सं.]

**अगदी** वि. १. सर्व; सर्वांशी; एकूणएक; तमाम; पूर्ण; बिलकूल; नि:शेष; समूळ; अपवादरहित. २. शेवटच्या पायरीवरचा; पहिल्या नंबरचा; पक्का; खरोखर; आत्यंतिक; निखालस; पूर्ण. ३. पराकाष्ठेचा; अतिशय.

क्रिवि. १. (होकारवाचक वाक्यात) पूर्णपणे : 'तो अगदी वेळेवर आला.' (नकारवाचक वाक्यात) अजिबात; मुळीच; जराही : 'त्याचं म्हणणं अगदी खरं नाही.' २. नक्की : 'अगदी येणारच असशील तर सोमवारपूर्वी ये.' [सं. अग्नि]

**अगन** पु. अग्नी; विस्तव. (कु.)[सं. अग्नि]

**अगननगन, अगाननगान, आगानीनगानी** क्रिवि. चुकून; चुकीने; अन्यायाने; विनाकारण.

**अगनबंद –ध** पु. भिलावा; बिब्बा; बिब्ब्याचे झाड; त्याचे फळ. [सं. अग्निबंध]

**अगबाई** उद्गा. भीती, आनंद, आश्चर्य इत्यादी भावना दाखवणारा उद्गार.

**अगम** पु. वृक्ष; झाड : 'झालो कृत्यकृत्य तर्पी बहु शक्ति न पारिजातकीं अगमीं ।' – मोसभा १.३६. [सं.]

वि. १. न समजणारा; गूढ : 'अगमि बोलणी जेसुची न कळे तेया ।।' – क्रिपु ५५९. २. गुप्त; जाणता न येणारे : 'आदीं तेआचा जल्मु कवणें जाणितला । कि होता अगमु ।' – क्रिपु १.१६३. [सं. अगम्य]

**अगम्य** वि. १. जाता न येण्यासारखे; दुर्गम; जाण्यास कठीण; अगमनीय. २. जेथे जाऊ नये असे; गमनास अयोग्य. ३. (ल.) जेथे जाणे वा प्रवेश करणे अयोग्य आहे असे (तीर्थक्षेत्र, शास्त्र); संभोगास अयोग्य असे नातेसंबंध. ४. बुद्धीस आकलन न होणारे; अतींद्रिय; असमर्थ; दुर्ज्ञेय; गहन : 'अगम्य तेज हृदयींच्या पदका' – एभा ११.१४८.५. जेथे पोचता येणार नाही असे. [सं.]

**अगम्यगमन** न. १. निकटचे नातेसंबंध असलेल्या स्त्रीपुरुषांचा लैंगिक समागम. २. कायद्याने वा रूढीने जे स्त्रीपुरुष विवाहबद्ध होऊ शकत नाहीत त्यांच्यामधील लैंगिक संबंध. [सं.]

**अगम्यपण** न. न समजण्यासारखी स्थिती; अज्ञेयता; माहीत नसण्याची अवस्था : 'बैसर्सी सहजासनीं । अगम्यपणी अगोचरू ।' – एभा १.२२.

**अगम्या** वि. विवाहास अयोग्य; जवळच्या नात्याची; सकुल; सगोत्र; भिन्नवर्णीय किंवा आपल्याहून वडील अशी (स्त्री). [सं.]

**अगम्यागमन** न. शास्त्राने संभोगास अयोग्य मानलेल्या स्त्रीशी संभोग; व्यभिचार. [सं.]

**अगर –रू** पु. आसाम, भूतानकडील एक मोठे सदोदित हिरवे असणारे झाड. पाने अडुळशासारखी, लाकूड नरम, सच्छिद्र व राळेसारख्या पदार्थाने भरलेले; याच्या लाकडाचे तुकडे पाण्यात कुजवतात तेव्हा त्यास सुगंध येतो. झाड २० वर्षाचे झाल्यावर त्यापासून ऊद (अगर) काढतात. : 'कर्पूर चंदन अगरु । ऐसे या सुगंधाचा महामेरू ।' – ज्ञा ९.३९१. [सं. अगरु]

**अगर** अ. अथवा; किंवा; जर; जरी; यद्यपि; जेव्हा. [फा.]

**अगरगंड** वि. हट्टी; निष्काळजी; बेफिकीर; बेगुमान; आळशी; सुस्त. (व.)

**अगरचंदन** न. सुगंधी धूप; अगरबत्ती; उदबत्ती; उटी. [सं. अगरु + चंदन]

**अगरडा, अगाडा** पु. शिखर; टोक; शेवट; शेंडा. [सं. अग्र]

**अगरबत्ती** स्त्री. चंदन, कापूर, ऊद वगैरे सुगंधी द्रव्ये घालून तयार केलेली उदबत्ती; धूपकांडी; सुगंधी कांडी. [सं. अगरु + वर्ति]

**अगरवादी** पु. फिर्यादी; वादी. [सं. अग्रवादी]

**अगरसाळ** स्त्री.देवळाजवळ बांधलेली धर्मशाळा; देवळासभोवार मुख्यत: उत्सव प्रसंगीच्या जेवणावळीसाठी बांधलेली इमारत. (गो.) [सं. अग्रशाला]

**अगरामेर** स्त्री. शेताची कड किंवा मर्यादा; बांध.

**अगरी** स्त्री. डिरी; कोंब; मोड. [सं.अग्र]

**अगरी** स्त्री. शहरातील व्यापारी पेठ.

**अगरू** न. गुदद्वारातून बाहेर आलेले अंग; आतडे; हगरू रोग.

**अगर्ह्य** वि. अनिंद्य; निंदा करण्यास अयोग्य; अदूषणीय. [सं.]

**अगल- ला** वि. १. पुढचा; पुढील; अग्रभागी असलेला; पहिला. २. नांगर ओढण्यासाठी त्याला लावलेल्या एकापेक्षा अधिक जोडीतील पुढची (जोडी); ती हाकणारा (मुलगा); सदर जोडी हाकण्यासाठी बसण्यास असलेली बैठक.

**अगला** स्त्री. अगळ; कडी; अडसर. [सं. अर्गला]

**अगलामागला** वि. पुढचा व मागचा.

**अगल्याबगल्या** वि. आश्रित; एखाद्याच्या पदरी किंवा एखाद्यावर अवलंबून असलेला; कनिष्ठ प्रतीचा; कोणीतरी अलबत्या गलबत्या; य:कश्चित. [बगलचे द्वि.]

**अगल्यामियां** पु. बाप; एक शिवी : '... आतां तुले कोन्ता अगल्यामियाँ सोडाले धावते.' – धग ९४.

**अगवळ, अगळ, अगूळ** पु. वेणी घातल्यावर तिच्या टोकास बांधली जाणारी लोकर, दोरा, दशी इत्यादी.

**अगवाडा** पु. घराच्या पुढला भाग; अंगण. [हिं.]

**अगविणे** क्रि. प्राप्त करून घेणे, संपादणे.

**अगस्ता – त्या** पु. हदगा; हेटा; आवळीच्या पानासारखी पाने असलेला वृक्ष. याला तांबडी किंवा पांढरी फुले येतात. याच्या फुलांची व शेंगांची भाजी करतात. (व.) [सं. अगस्त्य]

**अगस्ताळ** वि. हट्टी; माथेफिरू; कजाग; खोडकर.

**अगस्त्यपत्र** स्त्री. सहस्रपुटी अभ्रक भस्मास ज्या वनस्पतींच्या भावना द्यायच्या असतात त्यांपैकी एक वनस्पती. – आयुसिद्ध १.४.

**अगळ** पु. दाराला लावण्याचा अडसर, कडी, साखळी, अडणा. (वा.) **अगळ घालणे** – अडवणे. **अगळ पडणे** – प्रतिबंध होणे. [सं. अर्गला]

**अगळ** न. १. कोकंबाचा रस. (गो.). २. (ल.) लालभडक पातळ पदार्थ.

**अगळ** वि. दहा : 'अगळ हस्त शोभती जाण । त्याचे धन सांगतो तुज ।' – भवि १८.८९. (नंद.)

**अगळ** स्त्री. गोट्या खेळण्याकरता केलेली खळगी, गल, बदा; विटी कोलण्याची गली. [का. अगळु]

**अगळगोटी, अगळडाव** पु. ज्या गोट्यांच्या डावात बदे (जमिनीतील गल) असतात तो. कोंडडाव याच्यापासून निराळा.

**अगळावणे** सक्रि. कोकंबाची सोले जास्त आंबट होण्यासाठी त्यांना कोकंबाच्या रसाची पुटे देणे. पहा : **अगळ** (गो.)

**अगळी** स्त्री. अर्गला; अडसर.

**अगंद** न. कोडे; नवल; आश्चर्य : 'धर्मविरुद्ध हे घडलं कसं? हेच ज्याला त्याला एक कोडं. एक अगंद.' – नागीण ९६.

**अगा** स्त्री. १. अंदाज; पूर्व सूचना; आगाऊ कल्पना : 'वाघ पाठीवर येईल ही अगा नव्हती.' – ख ६६२५. २. सावधपणा [फा. आगाही] (वा.) **अगा घेणे** – एखाद्या गोष्टीची व्यवस्था किंवा जबाबदारी अंगावर घेणे; एखाद्या कार्यात पुढाकार घेणे. **अगा बांधणे** – पुढील अंदाज, तजवीज, तरतूद करणे; अटकळ किंवा अजमास करणे.

**अगा** उद्‌गा. १. संबोधन; हे नामाच्या पूर्वी लावतात किंवा 'अ' गाळून पुढे जोडतात; अरे !; अहो ! : 'राज्ञी म्हणे तरि अगा! जा पूस सभेत तू असे आर्या ।' – मोसभा ४.९५.२. पहा : **अग**

**अगाई** पहा : **अगई**

**अ(अं) गाकडा** पु. पानगा; रोट; रोडगा.

**अगाजणे** अक्रि. १. गाजावाजा होणे; सगळीकडे प्रसिद्ध होणे; टिमकी वाजणे. २. कीर्ती, लौकिक होणे; प्रसिद्धी होणे : 'हे भीमकी ही नवरी अगाजे ।' – रुह २.६०.

**अगाजा** पु. १. ओरड; आरडाओरड; गवगवा; गलबला; गोंगाट; कल्ला; बोभाटा. २. गाजावाजा; कीर्ती; प्रसिद्धी : 'कौरवेंद्र दुर्योधन राजा । ज्याचा महिबरि थोर अगाजा ।।' – वत्स.

**अगाडो** वई; कुंपण; खंदक; आडोसा; सीमेवरील गर्ता वगैरे. (ग्रा.)

**अगात** न. लवकर पिकणारे, हळवे, हंगामाच्या आधीचे पीक – धान्य (मागातच्या उलट).

वि. अगोदरचे; (हंगामाच्या) पूर्वीचे – पेरलेले, पिकलेले.[सं. अग्रजात]

**अगादी** स्त्री. अगाधी; अडचण; संकट; काठिण्य : 'आता आम्हासी अंमल बसावयासी फौजदारीच्या शहरात अगादी काय आहे' – पेद २.२६.

**अगाध** वि. १. अमर्याद; गूढ; गंभीर; खोल; गहन; ज्याचा अंत लागत नाही असे (पाणी, ज्ञान, संपत्ती इ.) : 'ऐसे जे अगाध । जेथ वेडावती वेद ।' – ज्ञा १.७३. २. अगम्य; अतर्क्य; तुंबळ. ३. कठीण; असंभाव्य; अशक्य. न. समुद्र; गंभीर सागर; खोल पाणी : 'अगाधे हीं उचंबळती । ते चंद्रीचि ना शक्ती ।' – अमृ १०.५. [सं.]

**अगाध खिंडार** न. (भू.) जेथे सूर्यप्रकाश पोहचत नाही अशी, सागरातील अत्यंत खोल जागा.

**अगाधपण** न. गूढपणा; (ल.) मोठेपणा; महत्ता : 'ते अगाधपण जाईल । मग हिणावो अंगा येईल ।' – ज्ञा २.२१७.

**अगाव** वि. मजबूत; श्रेष्ठ. [फा.]

**अगाबानी** स्त्री. अंगरख्याची मलमल; कापड. याचे अंग पांढरे व विणकरीत किंवा कशिद्यात बुटी असते.

**अगारडा** पहा : **अगरडा**

**अगारणे** सक्रि. (पदार्थ ताटात) वाढणे; ओगरणे.

**अगारिधर्म** पु. श्रावक आणि श्राविका या गृहस्थाश्रमी जैनांनी पाळायचा आचारधर्म.

**अगारी** पहा : **अगेरी** : 'तुझ्या अस्थि सात नद्यांत टाकल्या, तुला दर पितरांना अगारी मिळते. आता तुझं काय राहयलं मागे?' – कोसला २०९.

**अगारी** स्त्री. कोंब; डिरी; अंकुर. [सं. अग्र]

**अगारी** स्त्री. आघाडी; पुढाकार : 'हिंदुस्थानात तो वैसा कोण्ही दिसत नाही की अगारी घेऊन स्वामीवर यावे' – पेद १५ २६.

**अगारी** स्त्री. तूप वाढायचे भांडे. (व.)

**अगावित** क्रिवि. अभावित; एकाएकी. (गो.)

**अगाशी** स्त्री. १. खुली गच्ची; अटाली : 'दुसऱ्या मजल्यावर । अगाशी गच्ची चौफेर ।।' – गापो ३६. २. पडवी; सोपा.

**अगास** न. आकाश. (ग्रा.) [सं. आकाश]

**अगांतुकी** स्त्री. बोलावलेले नसताना दुसऱ्याच्या घरी जाणे.

**अगिदवणा** पु. (वन.) एक प्रकारचा दवणा. पहा : **दवणा**

**अगि–गी** न पु. अग्नी; आग.

**अगिनडाव** पु. अग्निदाह; अंत्यसंस्कार; अग्नी देणे : 'मग सुभेदारानी कारभारी आपले मातबर दोघे पाठवून व सेला पाठवून अगिनडाव दिला.' – पेद २.३५. [सं. अग्निदाह]

**अगिनबंद** वि. न जळणारे; अग्नीने नाश न पावणारे; अदाह्य.

**अगियारी** स्त्री. पहा : **अग्यारी**

**अगीडगा** पु. भाताचा (तांदूळ) एक प्रकार. (बे.)

**अगीन** पु. विस्तव; अग्नी. (ग्रा.) [सं. अग्नि]

**अगीनीष्टीका** स्त्री. शेगडी : 'इतुकेनि ते चांदौरीसि गेले : अगीनीष्टीकेसि राहिले' – लीचपू २५७.

**अगुण–णी–ण्या** वि. १. निर्गुण : 'सर्वे तुकया मेला । त्याणें अगुणा आणिला ।' – तुगा २१६. २. गुणरहित; द्वाड; खोडकर : 'कृष्ण अगुणाचा अरूप । कन्या सगुण आणि स्वरूप ।।' – एरुस्व १.९६. ३. अवगुणी. [सं.]

**अगुंथित** वि. न गुफंलेली; मोकळी.

**अगेट** पु. एक मौल्यवान दगड. हा विविधरंगी छटात असतो. 'मॉस अगेट' (आत शेवाळे सदृश वनस्पती असलेला ) हा याचा एक प्रकार. पहा : **अकीक** [इं.]

**अगेरी, अग्यारी** स्त्री. १. पारशांची अग्निशाळा; पारशी लोक अग्नीची पूजा करतात ते देऊळ वा धर्मस्थान. २. ब्राह्मणेतर वर्गात श्राद्धाच्या दिवशी अग्नीत दिली जाणारी तुपाची आहुती. [सं. अग्नि + अगार]

**अगेल** वि. पहिला; अगल.

**अगेवान** पु. जात पाटील : 'जात पाटलांना सिंध गुजरातेत अगेवान म्हणतात.' – गांगा २१.

**अगो** स्त्री. स्वत: ची बायको, 'गो' असाही प्रचार आहे.पहा : **अग**(को.)

**अगोचर** वि. १. ज्ञानेंद्रियांना जाणता न येणारा; न भासणारा; अज्ञात; अगम्य : 'ध्यानासिही जे नागवे । ते अगोचर फावें ।' – ज्ञा १५.१६. २. चमत्कारिक; नवीन; पूर्वी ऐकण्यात न आलेला. [सं.]

**अगोचर** वि. १. आडदांड; द्वाड; खोडकर; अविचारी; अगोचर; व्रात्य; खट्याळ : 'काय मेलीं अगोचर पोरं ही!' – सुशिलेचा देव २७. २. अफाट; अवघड : 'नाही कवणाचे कटाव दखनेला पडले अगोचर' – ऐपो ३४७.

**अगोचरपणा** पु. दांडगाई; व्रात्यपणा.

**अगोचरी** स्त्री. योगशास्त्रातील चौथी मुद्रा. या मुद्रेत दृष्टी आकाशाकडे असते : 'अगोचरी मुद्रा यांची जानकी ।' – सप्र ८.१३.८०.

**अगोट–अघोट–ठ** स्त्री. पावसाळ्याचा आरंभकाळ; मृगारंभ; शेतीच्या हंगामाची सुरुवात. (ल.) चातुर्मास; सबंध पावसाळा. [सं. अग्रवृष्टि]

**अगोदर** क्रिवि. विवक्षित क्रियेच्या किंवा काळाच्या पूर्वी; आधी: पहिल्यांदा; पूर्वी. [सं. अग्रतर]

**अगोधले** पहा : **अगोतली** : 'विस्तीर्ण अगोधल्याच्या केळीच्या पानांवरून...' –मंजु १३७.

**अगोपचार** पु. देवाच्या मूर्तीचे उपचार.

**अगोलीय भिंग** न. (भौ.) गोलाकाराहून वेगळ्या आकाराचे भिंग. [सं.]

**अगोस्ती** स्त्री. (विप्र.) अंगुस्ती; (अंगावरील) शहारे; काटा: 'तिच्या (घोडीच्या) अंगास अगोस्ती येऊन ती अंग झाडते.' – अश्वप १५७.

**अग्गड** पहा : **अगड**

**अग्गद** क्रिवि. अगदी; कायमचा; पूर्णत्वाने; निरंतरचा. (तंजा.)

**अग्गिणी** वि. अवघे; सर्व.

**अग्न** पु. अग्नी; आग; विस्तव : 'बाच्छायंजादी क्रोधा आली । जैसी अग्न परजळली ।' – ऐपो १०. [सं. अग्नि]

**अग्नि –ग्नी** पु. १. आग; विस्तव. २. (अन्नाचे पचन करणारे शरीरातील तत्त्व) क्षुधा; भूक; जठराग्नी. ३. आग्नेयी (दक्षिण-पूर्व) दिशेचा अधिपती. ४. वैदिक देवता. तीन प्रकार – १) पृथ्वीवरील. २) आकाशातील विद्युत व ३) सूर्य. ५. यज्ञीय देवता; गार्हपत्य, आहवनीय व दक्षिणाग्नी असे त्रैताग्नी व सभ्य आणि आवसथ्य मिळून पंचाग्नी. ६. तीन हा अंक. ७. चित्रक वगैरेसारख्या जठराग्नी प्रदीप्त करणाऱ्या (वाढवणाऱ्या) वनस्पती. [सं.] (वा.) **अग्नये स्वाहा करणे** – जाळून टाकणे. **अग्नी घेणे** – दारूगोळ्याचा मारा सहन करणे. **अग्नी देणे** – प्रेत जाळणे; उत्तरक्रिया करणे; पूर्णपणे नष्ट करणे : '...स्वधर्म आणि स्वभाषा यांना आपण अग्नी दिला पाहिजे असे मुळीच नाही.' – मसासं १.३७९. **अग्नीचा पाऊस पडणे** – (युद्धात वगैरे) अग्निवर्षाव होणे; एकावेळी अनेक संकटे येणे; आपत्ती कोसळणे.

**अग्निकण** पु. विस्तवाची ठिणगी; स्फुल्लिंग.

**अग्निकमळ** न. योगशास्त्रातील एक संज्ञा; त्याचे वर्णन पुढीलप्रमाणे केले आहे : 'भुवयांच्यामध्ये अग्निनामक कमळ आहे. ते विद्युद्वर्ण असून त्याला दोन पाकळ्या आहेत. तेथे 'हं' 'क्षं' ही बीजचिन्हे आहेत.' – विसिं १.५३. [सं. अग्निकमल]

**अग्निका** स्त्री. अग्निहोत्र्याचा अग्नी : 'नैरुत्य चवरधरु । श्रमु जानवताहे अवस्वरु । अग्निका नाही तये ठाइं तया आनिक असे व्यापारु' – उह १००.

**अग्निकार्य** न. मुंजीनंतर (उपनयनानंतर) बटूने ब्रह्मचारी धर्माप्रमाणे करावयाचा होम; अग्नि – उपासना. [सं.]

**अग्निकाष्ठ** न. पेटलेले लाकूड; विस्तव; निखारा. [सं.] (वा.) **अग्निकाष्ठ भक्षणे** – १. आगीत उडी घेणे; अग्निप्रवेश करणे: 'अर्जुन

म्हणे हेचि शपथ । जरी मोडोनि पडेल सेत । तरी मी अग्निकाष्ठे भक्षिन सत्य ।' – हरि ३२.१६९. २. सती जाणे.

**अग्निकुमार** पु. पारा, गंधक, बचनाग, टाकणखार वगैरेचे केलेले औषध; रसायन. [सं.]

**अग्निकुल** न. ज्या वंशास सोम अगर सूर्यवंशाशी संबंध लावता येत नाही असा व अबूच्या पहाडावर ऋषींनी केलेल्या यज्ञातून उत्पन्न झालो असे मानणारा रजपूत वंश. यात परमार, सोळंकी, चौहाण, परिहार, राठोड व जाधव (यादव) यांचा समावेश होतो. [सं.]

**अग्निकुंड** न. होमाच्या वेळी यज्ञात अग्नी पेटता ठेवण्यासाठी केलेला खड्डा; पात्र; वेदी. [सं.]

**अग्निक्रीडा** स्त्री. दारूकाम; आतषबाजी; फटाके; दारू उडवणे; दारूगोळ्याचा भडिमार. [सं.]

**अग्निखांब** पु. तप्तलोहस्तंभ; तापलेल्या लोखंडी खांबास कवटाळण्याची शिक्षा; नरकयातनांपैकी एक; यमलोकीची एक शिक्षा.

**अग्निगमन – प्रवेश** सती जाणे; जाळून घेणे.

**अग्निगोलक** पु. १. (शत्रुपक्षावर टाकण्यासाठी किंवा आग लावण्यासाठी तयार केलेला) ज्वालाग्राही किंवा स्फोटक पदार्थ भरलेला चेंडूच्या आकाराचा गोळा. २. सूर्यासारखा आगीचा गोळा. [सं.]

**अग्निचक्र** न. १. षट्चक्रांपैकी एक; अग्निकमळ. २. शकुन, फलज्योतिष यातील एक संज्ञा; शांतिकर्मासाठी अग्नी कोठे आहे हे पहावयाचे एक चक्र. [सं.]

**अग्निज** वि. (भूशा.) गोठून घट्ट झालेला द्रव; शिलारस.

**अग्निज खडक** पु. पृथ्वीच्या पोटातील अग्नीने आतील पदार्थांचा रस होऊन त्यापासून बनणारा खडक; लाव्हा.

**अग्निज्वाला** स्त्री. ज्योत; जाळ; अग्निशिखा; आगीचा झोत. [सं.]

**अग्निडाग** पु. अगिनडाव; अग्निदाह; दहनविधी : 'जमातदार पडले होते ते रणातून शोधून काढून कोणास पुरविले व कोणास अग्निडाग दिले.' – पाणि बख पूर्व २७.

**अग्नितीर्थ** न. ज्यातून पाणी प्यायले जाते किंवा ज्यावर दक्षिणा दिल्यावर पाणी सोडले जाते, तो तळहाताचा खळगा. [सं.]

**अग्निदलिक** न. (भूशा.) ज्वालामुखीतून बाहेर पडणारे घनावस्थेतील खडकांचे लहान मोठे तुकडे.

**अग्निदिव्य** न. १. आपला निरपराधीपणा सिद्ध व्हावा म्हणून तापलेल्या लोखंडाचा गोळा हातात घेणे, उकळत्या तेलात हात घालणे इ. गोष्टी. २. करावयास अतिशय अवघड गोष्टी; स्वतःच्या सामर्थ्याची, सहनशीलतेची ज्या गोष्टीत परीक्षा होईल अशी गोष्ट; कसोटी : 'लढ्याचे अग्निदिव्य पुनश्च करण्यास ते कदापि तयार होणार नाहीत.' – आआ ६७. पहा : **दिव्य** [सं.]

**अग्निनिर्वापक** आग विझवण्याचे यांत्रिक साधन.

**अग्निपरीक्षा** स्त्री. खरेखोटे सिद्ध करण्यासाठी अग्नीत उभे राहणे.

**अग्निपंचक** न. अग्नीपासून भय दर्शविणारा फल ज्योतिषातील एक योग.

**अग्निमापक** पु. अत्युष्णतामान मोजण्याचे यंत्र. [सं.]

**अग्निमांद्य** न. अपचनाचा रोग; जठराग्नी मंद होणे; भूक न लागणे. [सं.]

**अग्निमुख** न. १. पाचक औषधी – हिंग १ भाग, वेखंड २ भाग, पिंपळी ३ भाग, सुंठ ४ भाग, ओवा ५ भाग, हिरडेदळ ६ भाग, चित्रकमळ ७ भाग व कोष्ठ ८ भाग यांचे चूर्ण. २. देव. ३. ब्राह्मण. [सं.]

**अग्नियंत्र** न. १ बंदूक; तोफ : 'यांच्या अग्नियंत्रशौंडत्वाची तारीफ व्हायला वेळेनुसार चुकायची नाही.' – निमा ८०८. २. दारू कामाची व आतषबाजीची करामत दाखवणारे यंत्र : 'भरुनी रजतमाचे औषध । करूनी अग्नियंत्र सन्नद्ध । कृष्णापुढे अति विनोद । एक प्रबुद्ध दाविती ।'– एरुस्व १५.११७. [सं.]

**अग्निरथ** पहा : **आगगाडी** [सं.]

**अग्निरोधक** वि. आगीपासून होणाऱ्या नुकसानीस प्रतिबंध करणारा; ज्यावर अग्नीचा परिणाम होणार नाही असा. [सं.]

**अग्निरोधन** न. (भूशा.) एखादी वस्तू अग्नीपासून संरक्षित (रोधक) करण्याची क्रिया. [सं.]

**अग्निरोहिणी** स्त्री. काळपुळी (पाठीच्या कण्यावर येणारा फोड. हा फार घातक असतो.). [सं.]

**अग्निवर्ण** वि. अग्नीसारखा तांबडालाल असलेला. [सं.]

**अग्निवर्धक** वि. भूक वाढवणारे, पाचक. [सं.]

**अग्निवर्धन** न. पचन; जठराग्नीचे उद्दीपन; भूक वाढणे.

**अग्निविच्छेद** पु. अग्निनाश; पत्नी मृत झाली असता अथवा इतर काही कारणांनी अग्निहोत्र बंद पडणे. (त्याबद्दल प्रायश्चित्त सांगितले आहे.) [सं.]

**अग्निवृद्धि–द्धी** स्त्री. अग्निवर्धन; पचनशक्तीची वाढ; जठराग्नी प्रदीप्त होणे; आहाराचे प्रमाण वाढवणे – वाढणे. [सं.]

**अग्निशमन** न. आग विझवणे. [सं.]

**अग्निशस्त्र** न. दारूने उडणारे बंदूक, तोफ यासारखे हत्यार. [सं.]

**अग्निशामक** पु. आग विझवणारे रसायन बाहेर फेकणारे यांत्रिकी उपकरण. [सं.]

**अग्निशामक दल, पथक** न. आग लागणे, घर कोसळणे, यांसारख्या अपघातात सापडलेल्या लोकांची मुक्तता करणे व तदनुषंगिक मदत कार्यासाठी नगरपालिका किंवा तत्सम संस्थांकडे असलेले पथक; आगीशी झुंज देणारे दल.

**अग्निशाळा** स्त्री. अग्न्यागार; अग्निगृह; (अग्निहोत्राची) अग्नी ठेवण्याची जागा; यज्ञशाळा; होमशाळा. [सं.]

**अग्निशिखा** स्त्री. अग्निज्वाला; ज्योत. [सं.]

**अग्निष्टोम** पु. सप्तसोमसंस्थां (यज्ञां) पैकी एक; सोमयाग; यज्ञ; वेदांतील एक यज्ञ. [सं.]

**अग्निष्वात्त** पु. पितृदेवता; ज्यास मंत्राग्नी मिळाला आहे असे; ज्यांनी जिवंतपणी अग्निहोत्र पाळले नाही असे; मरीची पुत्रांपैकी पितर; जिवंतपणी श्रौताग्नी ज्यांनी ठेवला नाही (अग्निष्टोमादि याग केले नाहीत) असे पितर. [सं.]

**अग्निसमाधि** स्त्री. अग्नीला शरीर समर्पण करून देहत्याग करणे.

**अग्निसंस्कार** पु. प्रेताचे दहन; प्रेत जाळणे. [सं.]

**अग्निसात होणे** आगीत लोप पावणे; आगीत नष्ट होणे : 'ती अग्निसात झाली.'– युगान्त ८५.

**अग्निसाद** पु. (आयु.) अपचनाचा विकार. पहा : **अग्निमांद्य** : 'अग्निमांद्य किंवा अग्निसाद, अरोचक हे विकार पित्त दुष्ट झाल्यामुळेही होतात व कफदुष्टीनेंही होतात.' –आयुसिद्ध १.६१.

**अग्निसेवा** स्त्री. अग्नी या देवतेची उपासना; पूजा. [सं.]

**अग्निस्तंभ** पु. १. अग्नी शांत करण्याचा मंत्र. २. दीपमाळ : 'इय अग्निस्तंभाचे अक्षेर । पुसां कां सिद्धांतें' – नरुस्व ५९३. [सं.]

**अग्निस्थान** न. अग्निकमळ – चक्र : 'आकळलेनी योगें । मध्यमा मध्यमार्गे । अग्निस्थानौनि निगे ब्रम्हरंध्रा ।।' – ज्ञा ८.९४. [सं.]

**अग्निस्नान** न. एक तांब्याभर पाण्यात स्नान करणे. (व.) [सं.]

**अग्निहोत्र** न. १. श्रौत म्हणजे वेदविहित अग्नीची उपासना; सकाळ संध्याकाळ अग्नीला आहुती देऊन अग्नी सतत राखण्याचे व्रत. २. (ल.) विडी, सिगारेट ओढणे; एकसारखे धूम्रपान करणे. [सं.]

**अग्निहोत्री** १. अग्निहोत्राचे व्रत घेतलेला. २. (ल.) एकसारखे धूम्रपान करणारा. [सं.]

**अग्न्यस्त्र** न. अग्निक्षेपक अस्त्र; आग ओकण्याचे तोफेसारखे शस्त्र.

**अग्न्यायतन** न. अग्निकुंड. [सं.]

**अग्न्युत्पात** पु. वणवा; भडका; आगीचा डोंब; उल्का. [सं.]

**अग्या** पु. काजवा : 'अग्या निजतेजसत्ता । अग्नितेज प्राशूं जातां ।' – एभा ४.८६.

स्त्री. एक खाजरी, अंगाची आग करणारी वनस्पती (खाजकुयरी).

**अग्या** वि. म्होरक्या; पुढारी; (मुलांच्या खेळात)पुढारीपण; पुढाकार.

**अग्याचे बोंड** अतिशय तापट माणूस : 'भटजी तर अग्याचे बोंड' – एहोरा ६.३१.

**अग्यारी** स्त्री. पंगतीच्या सुरवातीस पत्रावळीवर निखारे ठेवून त्यावर तूप टाकून पंगतभर फिरवलेला धूप; जेवणाला सुरुवात करण्याची सूचना; 'पण त्याच्यासमोरून अग्यारी काही जातच नाही' –मेइं ४.

**अग्र** न. १. अणी; अणकुची; टोक; अगदी पुढचा भाग. २. मंदिराचा कळस; शिखर; बिंदू; (वृक्षाचा) शेंडा. ३. पुढचा भाग; आघाडी. ४. दिगंश. ५. (समासात श्रेष्ठार्थी) पहिला; पुढचा; मुख्य; प्रधान. ३. (ग.) ज्या बिंदूपासून एकरेषीय नसलेले दोन किरण निघतात असा बिंदू. उदा. कोनाचा अग्र, त्रिकोणाचे तीन अग्र, शंकूचा अग्र. ७. (जीव.) सजीवांच्या शरीराचा किंवा अवयवाचा पुढचा (डोक्यावरील, टोकाकडील) भाग. [सं.]

**अग्रका** स्त्री. दिगंश; सूर्य, तारे किंवा इतर ग्रह हे क्षितिजाच्या ज्या बिंदूत उगवतात किंवा मावळतात तो बिंदू आणि क्षितिजावरील पूर्व किंवा पश्चिम बिंदू ह्यांच्यामध्ये जो कंस होतो तो. [सं.]

**अग्रकृत** वि. शत्रूने हल्ला करण्यापूर्वीच काही कारवाई करून त्याची आक्रमणसिद्धता कमी करणे : 'दुसरी शक्यता अग्रकृत युद्धाची..' – सैस्वा१२५. [सं.]

**अग्रक्रम** पु. १. क्रमशः पहिले स्थान; पहिला मान; प्राधान्य. २. सर्वांत अधिक महत्त्व; श्रेष्ठत्व. [सं.]

**अग्रक्रयाधिकार** पु. १. इतर गिऱ्हाईकांपूर्वी खरेदी करण्याचा अधिकार; अग्रक्रमाने विकत घेण्याचा अधिकार. [सं.]

**अग्रगण – णी** वि. श्रेष्ठ; प्रवीण; तरबेज : 'चपळविशई अग्रगण ।' – दास १.२.२२. [सं.अग्रगण्य]

**अग्रगण्य** वि. श्रेष्ठ; प्रमुख; सर्वप्रथम; पुढे नेणारा; ज्याचे प्रथम नाव घ्यावे असा. अग्रण्य हे अपभ्रष्ट रूपही क्वचित आढळते. [सं.]

**अग्रगामिनी** वि. पुढे जाणारी; पुढारीण. [सं.]

**अग्रगामी** वि. पुढे जाणारा; नेता; पुढारी. [सं.]

**अग्रगामी आयात** पु. प्रधान उत्सर्जनाच्या (बाहेर फेकण्याच्या) पूर्वी होणारा विद्युत उत्सर्जनाचा आघात. तो ज्या मार्गाने जातो त्याचे आयनीकरण करतो.

**अग्रज** वि. प्रथम जन्मलेला; मोठा; वडील (भाऊ). गोविंदाग्रज, कुसुमाग्रज यांसारख्या टोपणनावांत द्वितीयपदी येतो.' [सं.]

**अग्रजाधिकार** पु. १. प्रथम अपत्य म्हणून असणारा अधिकार. २. वडीलोपार्जित इस्टेटीत ज्येष्ठ पुत्र म्हणून वारशाने मिळणारा हक्क. [सं.]

**अग्रज्या** पहा : **अग्रका**

**अग्रणी, अग्रणीया** वि. मुख्य; म्होरक्या; नेता; मार्गदर्शक नायक : 'तुमचीए गांवी ब्राह्मणाची घरे थोडी : तरी तुम्ही अग्रणीया होआवे' – लीचउ २८८. [सं.]

**अग्रत:** क्रिवि. पुढे; समोर; आघाडीवर; पुढील बाजूस; अग्रभागी. [सं.]

**अग्रता नियम** पु. प्राधान्य देण्याचे नियम.

**अग्रतालु–लू** स्त्री. वरच्या दातांच्या मागील बाजूस कंठापर्यंत जिभेच्या वर जो घुमटाकार भाग आहे ती तालू, त्याच्या पुढच्या दातांजवळील भागास अग्रतालू म्हणतात. [सं.]

**अग्रदीप** पु. (यंअ.) १. पुढचा रस्ता प्रकाशात स्पष्ट दिसावा म्हणून वाहनाच्या पुढील भागावर बसवलेला विशिष्ट भिंगाचा परावर्तक दिवा. २. खाणकामगार, पाणबुडे, शिकारी इत्यादींनी आपले लक्ष्य शोधण्यासाठी कपाळावर बांधलेला विशिष्ट प्रकारचा दिवा. [सं.]

**अग्रदूत** पु. सर्वांत आधी बातमी घेऊन येणारा पुरुष; पुढे घडणाऱ्या गोष्टींची जाणीव करून देणारा पुरुष; राजकीय, सामाजिक घडामोडींची पूर्वकल्पना असणारा द्रष्टा पुरुष. [सं.]

**अग्रधन** न. १. एखादा सार्वजनिक उद्योगधंदा उभारण्यास किंवा सेवा चालू करण्यास सरकारी निधीतून दिलेली आगाऊ रक्कम. २. किरकोळ खर्चासाठी कार्यालयाने दिलेली रक्कम. विशिष्ट कालानंतर ही रक्कम जमाखर्चात दाखवली जाते. [सं.]

**अग्रधन्व** पु. (भूशा.) जेथील वनस्पतीजीवन पूर्णपणे स्थिर झालेले आहे अशी वाळूच्या टेकड्यांची रांग. [सं.]

**अग्रधान्य** न. खरिपाचे पीक; पहिले पीक; पहिल्या पावसानंतर येणारे पीक – जोंधळा, अरगडी, भात, बाजरी वगैरे. [सं.]

**अग्रपूजा** स्त्री. १. राजसूयासारख्या यज्ञात किंवा सार्वजनिक समारंभात श्रेष्ठ व्यक्तींच्या पूजेतील सर्वांत पहिली पूजा; विद्या, तप यामुळे जो श्रेष्ठ असतो त्याची सभेत प्रथम करण्यात येणारी पूजा. २.सर्वश्रेष्ठ पूजा, सन्मान. [सं.]

**अग्रप्रवाली** वि. (भूशा.) पाण्यातील खडकांच्या रांगेपुढील किंवा पाण्याच्या पृष्ठभागाजवळील; प्रवाळी खडकांच्या रांगांचा पुढील भाग. [सं.]

**अग्रफूल** न. वेणीच्या शेवटी गुंतवलेले सोन्याचे जोडफूल; वेणी खोवली असता तिच्या मध्यभागी हे दोन बाजूंनी दिसते; एक दागिना.

**अग्रभाग** पु. सर्वांत पुढचा भाग; कोणत्याही सूचीपत्रावरील नोंदीतील पहिला विभाग. [सं.]

**अग्रभूमी** स्त्री. (भू.) समुद्रालगतचा सपाट पठारी प्रदेश. [सं.]

**अग्रभोजन** न. पहिल्याप्रथम जेवणे; प्रथम जेवण्याचा मान. [सं.]

**अग्रभोजी** वि. अग्रभोजनाचा मान असणारा; आधी जेवणारा. [सं.]

**अग्रलेख** पु. नियतकालिके, वर्तमानपत्रे इत्यादींमध्ये ठरावीक स्तंभात लिहिलेला, चालू घडामोडींबद्दल संपादकीय मतप्रदर्शन करणारा प्रमुख लेख. वृत्तपत्रातील संपादकाने लिहिलेला मुख्य लेख. [सं.]

**अग्रवण, अग्रवन** न. १. फांदीची कोवळी डिरी; कोंब : 'अर्धुकामुपसरे । अग्रवनें घेती थारे ।' – ज्ञा १५.१५७. २. अरण्याची सरहद्द.

**अग्रवर्ण** पु. सर्वांत श्रेष्ठ वर्ण; अग्रेसर जात; ब्राह्मण : 'त्यांहीं माजीं उत्तमता कैशी । अग्रवर्णासी पै जन्म ।।' – एभा ७.६३५. [सं.]

**अग्रवर्ती** वि. सर्वांत पुढे असणारा; आघाडीवर असणारा – जाणारा. (स्थल व काल यांना अनुलक्षून लावतात.) [सं.]

**अग्रवर्धी** वि. (वन.) केवळ टोकाशीच वाढणारे (खोड, अक्ष इ.) [सं.]

**अग्रवाट** स्त्री. अग्रभाग : 'नारा गोंदा महादा विठा । ठेवियले अग्रवाटा' – जना ६७.

**अग्रवादी** पु. १. वादी; फिर्यादी; न्यायालयात वादाचा प्रथम उपक्रम करणारा. २. आपल्या मताचा, पक्षाचा जोराने पुरस्कार करणारा. [सं.]

**अग्रवेशन** न. दुखणे विकोपास जाणे; गंभीर होणे : 'एवढ्याच त्रासानं काहीतरी अग्रवेशन होतं की काय असं भय वाटू लागलं' – माबा २९७. [इं. ॲग्रव्हेशन]

**अग्रशाळा** स्त्री. (देवळाच्या वगैरे) अग्रभागी समोर असलेली धर्मशाळा, अग्निशाळा इत्यादी. [सं.]

**अग्रसर** पहा : **अग्रेसर**

**अग्रसूचक** वि. पुढे होणाऱ्या गोष्टीचे चिन्ह दाखवणारे; पुढची सूचना देणारे; भविष्यसूचक. [सं.]

**अग्रस्कंध**पु. (शिवण.) खांद्याचे पुढच्या भागाचे माप.

**अग्रस्थ धुके** न. (भू.) उष्ण अथवा थंड हवेच्या राशीच्या पुढच्या बाजूस निर्माण झालेले धुके.

**अग्रस्थित संस्तर** पु. (भूशा.) पुढे असलेला स्तर (खडकांचा किंवा गाळाचा). [सं.]

**अग्रस्वर** पु. (भाषा.) जिभेच्या पुढचा भाग हा उच्चारण अवयव असताना उच्चारला जाणारा स्वर. उदा. इ, ए, ॲ इत्यादी. [सं.]

**अग्रहक्क** पु. पहा : **अग्रक्रम**

**अग्रहणीय** वि. पहा : **अग्राह्य**

**अग्रहार** पु. १. ब्राह्मणांना किंवा देवस्थानांना निर्वाहासाठी दिलेले गाव, जमीन वगैरे इनाम : 'वापी कूप आराम । अग्रहारें हन महाग्राम ।' – ज्ञा १८.९९. २. एक दुमाला. एका कुटुंबाहून जास्त कुटुंबांस निर्वाहार्थ जो गाव अगर जमीन देतात त्यास अग्रहार दुमाला म्हणतात. – इनाम २८. [सं.]

**अग्रा** स्त्री. पहा : **अग्रका.** समांशाचा कोटिकोन पूर्व किंवा पश्चिम समबिंदूपासून दृग्मंडलाच्या पातापर्यंत मोजला जातो त्यास अग्रा म्हणतात. [सं.]

**अग्रार** पहा : **अग्रहार** : 'तीर्थी अर्पी जो अग्रारें' – दास २.७.१९.

**अग्रासन** न. १. सभेतील प्रमुख स्थान; मुख्यासन; अध्यक्षपद. २. अग्रपूजा; ज्येष्ठ जामातपूजा. (लहान बहिणीच्या लग्नाच्यावेळी वरपूजा करण्यापूर्वी तिच्या वडील बहिणीच्या पतीची पूजा करणे). [सं.]

**अग्राह्य** वि. १. मान्य न करण्याजोगा; अस्वीकार्य; बेकायदेशीर : 'माँटेग्यू सुधारणा अग्राह्य आहे.' – लोटिकेले ३.४२५ २. (राज्य.) घटनेचा किंवा कायद्याचा भक्कम आधार नसलेला. [सं.]

**अग्राह्यता** स्त्री. १. मान्य न करणे; न स्वीकारणे; अस्वीकार्यता. २. दाखल करून न घेणे. [सं.]

**अग्राळी** स्त्री. शेंडा; टोकाची फांदी : 'आंब्याच्या अग्राळीला घारीचा मोठा घरटा होता.' – आआशे १५५.

**अग्रांशु** पु. प्रकाशकिरणांचा शेवट; केंद्रबिंदू.

**अग्रिका** स्त्री. (मानस.) मानसशास्त्रीय प्रयोगात वापरली जाणारी, धातूचे टोक असलेली, पेन्सिलीसारखी नळी. (हिच्या मागच्या भागाला एक विद्युत तार जोडलेली असते.) [सं.]

**अग्रिका रेषा** (ग.) अग्रे जोडणारी रेषा. उदा. चौकोनाचे कर्ण. [सं.]

**अग्रिम** वि. १. मुख्य; प्रमुख. २.आधीचा. ३. म्होरक्या; पुढचा; पुढारी. ४. आगाऊ दिलेली रक्कम. [सं.]

**अग्रिमधान्य** पहा : **अग्रधान्य**

**अग्रेवन** पहा : **अग्रवन**

**अग्रेषण** न. (पत्र, अर्ज वगैरे) पुढे पाठवणे, धाडणे. [सं.]

**अग्रेषण अभिकर्ता** पु. (अर्थ.) माल गोळा करणे, तो पाठवणे, पोहचवणे वगैरे व्यवहार करणारी व्यक्ती किंवा संस्था. [सं.]

**अग्रेषण पत्र** न. एखादी वस्तू, दस्तऐवज, कागदपत्रे, मजकूर इ. ज्या पत्रान्वये पाठवले जातात ते पत्र. या पत्रात त्यासोबत पाठवल्या जाणाऱ्या वस्तू, कागदपत्रे इत्यादींची तपशीलवार नोंद असते. [सं.]

**अग्रेषित** वि. पुढे पाठविलेला. [सं.]

**अग्रेसर** वि. १. सर्वांत पुढे जाणारा; अग्रगण्य; पुढारी; नेता; मुख्य. २. (ग.) प्रमाणात असलेल्या दोन संख्यांपैकी पहिली. उदा. ३६, ४८ यातील ३६ ही संख्या. – छअं १०४. [सं.]

**अग्रोदक** कोणाचाही स्पर्श होण्याआधी घेतलेले पाणी; ताजे व स्वच्छ पाणी; स्वयंपाकासाठी किंवा पूजेसाठी सोवळ्याने आणलेले पाणी : 'अग्रोदकाचा भरून कलश...' – हरि ३४.१८२. [सं.]

**अग्र्य** वि. प्रमुख; श्रेष्ठ; नेता; पुढारी. [सं.]

**अघ** न. पाप : 'म्हणोनि सांडिजे तो अघीं ।।' – ज्ञा ३.१२३.१९.

**अघटघटी** वि. अशक्य गोष्ट घडवून आणणारी : 'अघटघटी हरीची माया ।' – एभा ७.५०४. [सं.]

**अघटमान** वि. न घडणारे; असंभाव्य; अशक्य; आश्चर्यकारक.

**अघटित** वि. १. असंभाव्य; विलक्षण; चमत्कारिक; लोकोत्तर : 'हरिच्या दासां चिंता । अघटित हे वार्ता ।।'– तुगा २३११. २. अघोर; अतिवाईट; भयंकर; आसुरी.

न. अतर्क्य, अश्रुतपूर्व गोष्ट- प्रसंग; 'कर्मी त्यांचे अघटित।' – ऐपो १४५. [सं.]

**अघटितघटी** वि. न घडणारे ते घडवून आणणारी : 'ईश्वराची माया पूर्ण । अघटितघटी तिचें लक्षण ॥'– एभा २३.४२१. [सं.]

**अघटित विंदाण, विंदान** न. विलक्षण किंवा आश्चर्यकारक गोष्ट; नवल; चमत्कार; करणी (काल, दैव, ईश्वर यांची).

**अघड** वि. न घडवलेले; ओबडधोबड (दगड, वस्तू इ.). [सं.]

**अघडता** वि. न घडणारा; अशक्य : 'येथ परिवारू बहुये । अघडता कीं ॥' –अमृ ९.२८. [सं.अ + घट]

**अघमर्षण** वि. १. पापनाशक २. पापाचा नाश करणारा.

न १. स्नानविधी व संध्या या कर्मात घ्राणस्थित पापपुरुषाचे उच्चाटण करण्यास, हातात उदक घेऊन त्यावर नाकातील वायू सोडून त्या पाण्याने जमिनीवर आघात करणे. (म्हणजे पापपुरुषाचा नाश झाला, ही भावना). २. एका पापनाशक व्रताचे नाव. [सं.]

**अघरडा** पु. १. जीभ, नाक, बोट, लेखणी इ. चे टोक; झाडाचा शेंडा; (सामान्यत: ) शेवट; टोक. [सं. अग्र].२. पहा : **अघाडा**

**अघव –वा** वि. अवघा –घे; पूर्ण; सर्व; एकंदर : 'देवकी उदरींचा आठवा । निजध्यास बैसला कंसभावा । जनीं वनीं अघवा । आठवा आठवा आठवत.' – हरि ३.६०. [सं.]

**अघळ** वि. पूर्ण; परिपूर्ण.

**अघ(घा)ळणे** सक्रि. (कपडे इ. धुण्याकरता) पाण्यात खळबळणे; धुणे : 'धुणी चुबकून व अघळून धुवावी.' – विरं ६५.

**अघळपघळ** वि. १. ऐसपैस; मोकळे; सैल; पुष्कळ; भरपूर; लांबलचक. २. (ल.) निष्कपट, मोकळ्या मनाचा. ३. मोकळेपणाने; ऐसपैस रीतीने (बोलणे, बसणे इ.). [का. अगलचे द्वि.]

**अघळाअघळ** स्त्री. (पाण्यात) पुन्हा पुन्हा खळबळणे.

**अघा** पु. १. धनी; यजमान. २. मुसलमान बादशहाचा खास खोजा. ३. सरदार, मुख्याधिकारी इ. ची पदवी. [फा.आघा]

**अघोर** वि. १. अचाट; फार भयंकर; भीतिप्रद; अमंगळ (वस्तु, क्रिया, स्थान). २. अक्राळविक्राळ; अकटोविकट. ३. निष्काळजी; बिनघोर; निर्भय; स्वस्थ; बेफिकीर. ४. सौम्य; घोर नाही असा.

पु. १. संकट : 'घोर माझी हरिली त्वा जरां आणि देहींच्या अघोरा दवडिले ।' –कथा २.५.१७७.२. शंकर; रुद्र. ३. एक नरक. ४. एक पंथ.

**अघोर अरण्य** न. भयंकर अरण्य; घनघोर जंगल.

**अघोरकर्म** न. भयंकर, धाडसी किंवा अमंगळ काम. [सं.]

**अघोरजप** पिशाच मंत्राचा जप. [सं.]

**अघोरदंड** पु. भयंकर शिक्षा; अमानुष दंड. [सं.]

**अघोरनिद्रा** स्त्री. गाढ झोप; अति निद्रा; कुंभकर्णी झोप. [सं.]

**अघोरपंथ–मत–मार्ग–योग**पु. गोसाव्यांचा एक पंथ; हे लोक हातात नरकपाल घेणारे व नरमांसभक्षण, मलभक्षण व इतर अघोर (भेसूर व अमंगळ) कृत्ये करणारे असतात. [सं.]

**अघोरपातक** न. भयंकर पाप; नीच अमंगळ कृत्य. [सं.]

**अघोरयोगी** पु. अघोरपंथाचा अनुयायी : 'शाक्त आगम अघोरयोगी । कैसे ते ऐकावे ॥' –दास ४.१.१३. [सं.]

**अघोरी** पु. अघोरपंथी; साहसादी कर्मे करणारा; स्नानसंध्यादी आचार न पाळता स्वैर वागणारा : 'राखेचा बोकणा तोंडात भरून मेल्यासारखा पडतो. तिळाची पेंड कुजविली म्हणजे तिची विष्ठेसारखी घाण येते. ही नकली विष्ठा खाण्याची भीती घालून अघोरी पैसे उकळतो.' –गाव १३३. वि. तिरस्करणीय; निंद्य; त्याज्य; किळसवाणा; भयंकर; दुष्ट; साहसी; अमंगळ. [सं.]

**अघोष** वि. (भाषा.) ज्यां ध्वनीचा उच्चार करताना स्वरनलिका कंपित होत नाहीत असा (ध्वनी); कठोर वर्ण. [सं.]

**अघोषित** वि. न पुकारलेले; जाहीर न केलेले; उघड नसलेले; लपूनछपून खेळलेले (युद्ध) : 'जपानने चीनशी अघोषित युद्ध खेळून...' युयंतं २०३. [सं.]

**अघ्राणता** स्त्री. (वै.) वास घेण्याची अक्षमता; काही कारणामुळे वास येण्याची संवेदना नाहीशी झाल्यामुळे किंवा जन्मत:च नसल्यामुळे कोणताही वास न जाणवणे. [सं.]

**अघ्रार** पहा : **अग्रहार** : 'नवी अघ्रारें : मा चणेचि पीकति : ' – लीचउ ८.

**अचकट, अचकटविचकट** वि. अश्लील; वाईट; घाणेरडे; बीभत्स; वाह्यात; शिनळ; चावट (बोलणे, बोलणारा).

**अचकन** स्त्री. एक प्रकारचा लांब व छातीशी अरुंद अंगरखा; बंद गळ्याचा लांब कोट : 'पोषाखात पायजामा, जामानिमा, फर्गोल, अचकन इत्यादी विविध प्रकार आले' – मजिस्थि ९०. [हिं.]

**अचकबोचक, अचकवचक** स्त्री गैदीपणा; गैरशिस्त.

क्रिवि. अव्यवस्थितपणे; गैदीपणाने; कसेतरी. पहा : **अचटबोचट**

**अचकय** क्रिवि. अजगय; हळूच नकळत. (गो.) [सं. अ +जागृ]

**अचकलदचकल** न. कोणतेही वाईट अन्न किंवा खाद्य पदार्थ.

**अचकळ** वि.पाणचट, पाचकळ.

**अचका** वि. सगळा; सर्व. पहा : **असका**

**अचकागचका, आचकागचका** पु. १. अपस्मार, फेफरे वगैरेत शरीराला बसणारा हिसका. २. झटक्याने चलाखीने ओढणे; ढकलणे; ठोसा देणे; धक्का मारणे (क्रि. देणे). ३. धसका; दशहत (क्रि. बसणे). [गचकाचे द्वि.]

**अचकागचका खाणे** बोलण्यात अडखळणे.

**अचकाविचका** पु. गोंधळ; गुंतागुंत; चिवडाचिवड; अव्यवस्थितपणा; (ल.) नाश; बिघाड; दुर्दशा. [विचकाचे द्वि.]

**अचकी, आचकी** स्त्री. शेवटचे आचके; बुडताना किंवा मरताना लागलेली धाप (क्रि. देणे, येणे); घरघर. पहा : **उचकी**

**अचकी, आचकी** वि. सर्व; संपूर्ण; असगी : 'ठेवलीस (अवनी) अचकी रदनाग्रीं ।' – गगवि ४६.

**अचकुल, अचगुल** वि. १. नाजूक; हळुवार. २. अशक्त; फुसका; रोगट; निरुपयोगी; कुचकामी (इंद्रिय, अंग, यंत्र वगैरे.). ३. मोडलेला; दुखावलेला; पंगू. (बे.)

**अचकोविचको** पु. फटफजिती; बोजवारा; छी; थू.[सं.विचकोचे द्वि.]

**अचक्रीय जनित्र** न. (विअ.) ज्यात प्रवाह उलट दिशेने वाहत नाही असे दिष्टधारा जनित्र. तत्त्वत: याचे 'फेरडी डिस्क' शी साधर्म्य असते. [सं.]

**अचटबोचट** क्रिवि. कमी जास्त; विषम; अर्धेमुर्धे; एकसारखे नव्हे असे; उंचसखल रीतीने (कापणे, झाडणे, सारवणे, लावणे). पहा : **अचकबोचक.**
वि. अव्यवस्थित; अर्धवट; असमान; खुंट वा टेंगळे तशीच ठेवून (गवत कापणे, काढणे इ.) [बोचटचे द्वि.]

**अचडेबचडे, अचडंबचडं, अचडुबचडू** न. १. लाडके मूल. २. लहान मुलाला कौतुकाने मारावयाची हाक; संबोधन : 'अचडुबचडु नामे आळविला ।' – अमृत ५९. [सं.वत्स]

**अचतुर** वि. अकुशल; बावळट; अडाणी; बिनकसबी; अज्ञ. [सं.]

**अचपट** वि. काहीतरी; भलतेच; विसंगत.(ग्रा.)

**अचपळ** वि. १. खोडकर; उच्छृंखल; उत्पाती; चंचल : 'अचपळ मन माझे नावरे आवरीतां ।' –मश्लो. २. अतिचपळ; तरतरीत; उत्साही; तल्लख; हुशार; 'अचपळ गुण गुणी बैसली प्रीति दूणी ।'–दावि १५४. [सं. अचपल]

**अचपळ ठेव** स्त्री. स्थिर ठेव.

**अचपळपण** अनावरपणा; खोड्याळपणा; चपलपणा : 'भरारी तो वारा अचपळपणे देश पिकती ।'– दावि २२५.

**अचर** वि. स्थिर; स्तब्ध; गतिरहित; अढळ; स्थावर; अव्यभिचारी; अविकारी. [सं.]

**अचरट** वि. १. कुठे कसे वागावे व केव्हा काय बोलावे हे न कळणारा. २. मूर्खपणाचा; फाजील (विनोद, विधान इ.). २. अर्धवट; बावळट, मूर्खासारखे वर्तन करणारा.

**अचरटपचरट, अचरपचर, अचरबचर** वि. १. कोरडे; भरड; रूक्ष; बेचव (अन्न). २. असंबद्ध; पाल्हाळिक; अवाच्यासवा (बोलणारा). [अचरटचे द्वि.]

**अचर्च** वि. ज्याची चर्चा करता येत नाही असा; जो वादाचा किंवा चर्चेचा विषय होऊ शकत नाही असा : 'देवी देवो म्हणती अचर्चाते ।' – ज्ञा ४.६९.
पु. (ल.) नवरा (बायकोने त्याचे नाव घेता किंवा चर्चा करता कामा नये म्हणून). [सं.]

**अचर्चित** क्रिवि. चर्चा न करता : 'वैचारिक ग्रंथ अचर्चित बाजूला ठेवण्याची नवीन प्रथा....' – मागोवा १२३.

**अचल** वि. १. स्थिर; गतिरहित : 'अचलु हा शाश्वतु ।' – ज्ञा २.१४७. (ग.) जिचे मूल्य बदलत नाही अशी (राशी). २. शांत; थंड; अचंचल; दमदार; निश्चित हेतू असलेला. ३. अक्षय; अखंड.
पु. पर्वत; टेकडी.

**अचला** पु. हातरुमाल. पहा : **अचळ** [सं. अंचल]

**अचला** स्त्री. पृथ्वी : 'कंपाते भीष्मार्जुन देती अचलेसि शस्त्र संपातें ।' – मोभीष्म ३.३०. [सं.]

**अचलित** वि. स्थिर; स्थावर; ठाम; निश्चल; न हललेले [सं.]

**अचलिष्णुता** स्त्री. (भौ.) स्थिरपणा; गतिमानता नसणे. [सं.]

**अचलूक** वि. न चालण्यासारखे; निरुपयोगी; अयोग्य : 'भवसागर तरून जाण्याला यज्ञरूपी नावा अगदीच अचलूक व अविश्वासू ठरतात.'– भात २६.

**अचळ** वि. १. न हाललेला किंवा हालवलेला; उपयोग न केलेला; स्पर्श न केलेला; अस्पृष्ट (खाण्याचा पदार्थ इ.). २. (ल.) बाकी; शिल्लक; अत्राप.
क्रिवि. अलगत; अल्हाद; दमाने; हळूहळू.

**अचळ, अंचळ** पु. १. पदर; ओचा : 'लपविलाच कृष्ण अचळ पल्लव मुखावरी घाली ।' – भज ३५. २. अचल आचळ; सड; स्तन; थान (गुरांचे). ३. बारीक वस्त्र; हातरुमाल. [सं. अंचल]

**अचळनाभी** निश्चित अभय : 'राया अचळनाभी देसी तरि सांघौनि' – लीचपू २२५.

**अचळपद** न. मोक्ष; अढळपद. [सं.]

**अचळय** क्रिवि. १. अलगत; धक्का न लावता. २. (ल.) सहज, कष्ट न पडता, अनासाये. (गो.)

**अचळवी** वि. न हलवलेले; न स्पर्शिलेले. न ढवळलेले; पहा : **अचल–ळ**
क्रिवि. हलकेच; नाजूक हाताने; सौम्यपणाने. [सं. अचल]

**अचळवी वाण** न. मकरसंक्रांती दिवशी करावयाचे एक वाण. आदल्या दिवशी विरजून ठेवलेले व हात न लावलेले असे दही पात्रासुद्धा (भांड्यासकट) स्वत:च्या मुलांच्या दीर्घायुष्यासाठी जिची सर्व मुले जिवंत आहेत अशा सुवासिनीस वाण म्हणून देतात. [सं. अचलवायन]

**अचळागौर, अचलागौर** स्त्री. अचळवी वाण जिला द्यायचे ती स्त्री. तिची न्हाऊ खाऊ घालून ओटी भरून पूजा करतात. [सं.]

**अचळोजी, अचळोबा** पु. आळशी; मंद; मठ्ठ; लठ्ठ; ऐदी; लडदू; गुळाचा गणपती. [सं. अचल]

**अचक्षु** वि ज्याला डोळे नाहीत असा, आंधळा. [सं.]

**अचक्षुदर्शन** न. डोळे सोडून बाकीच्या इंद्रियांनी व मनाने होणारे ज्ञान. [सं.]

**अचक्षुपण** न. चक्षुरहित स्थिती; आंधळेपणा : 'जयाचेनि बळें । अचक्षुपण आंधळे । फिटोनि वस्तु मिळे ।'– अमृ ७.१२०.

**अचंगळ, अचंगु** वि. कृपण; भ्रष्ट; वाईट; चांगला नव्हे तो.[सं. अचंग]

**अचंचल** वि. १. न चळणारा; न हलणारा; दृढ; स्थिर. २. न बदलणारा; ठाम निश्चयाचा; निश्चल. [सं.]

**अचंब** पु. घोड्याचा एक रंग. – अश्वप २८.

**अचंबर** वि. अचाट; आश्चर्यजनक; आश्चर्यकारक : 'खंदकाचे लावले काम अचंबर ।' – ऐपो २.१८६.

**अचंबा** पु. १. आश्चर्य; चमत्कार; कौतुक; नवल. २. आश्चर्याची गोष्ट; नवलपरी.

**अचंबीत** वि. आश्चर्यचकित; विस्मित; थक्क.
क्रिवि. अचानक, एकाएकी.

**अचाट** वि. १. सामान्य प्रमाणापेक्षा फार अधिक; कल्पना करता येणार नाही असा; अतिशय मोठा; अमर्याद. २. विलक्षण; अफाट; लोकोत्तर; बेसुमार; अपरिमित; अतर्क्य; चमत्कारिक; फाजील;

अनिर्बद्ध : 'लाटावरी अचाट लाटा ।' – एभा २.९४. (क्रि. बोलणे, लिहिणे, करणे). [सं. अत्यर्थ ]

**अचाट** वि. चावट; फाजील; लुच्चा : 'केली मुलें ही अवघी अचाटें ।' – सारु १.६७. [सं.]

**अचात** वि. अलगद; वरच्यावर : 'त्याला अचात उचलून धरले. '– टाफु १७०.

**अचानक** क्रिवि. १. कल्पना नसताना; अनपेक्षितपणे; अकस्मात; एकाएकी. २. तडक; सरळ. ३. हळूच; अलगद. ४. सहज; सुलभपणे; विनासायास. ५. चोरून; गुपचूप. ६. अस्पृष्ट; अचळ; जसेच्या तसे. [हिं. अचानक]

**अचापल्य** न. चपळपणाचा अभाव; निश्चलपणा; स्थिरता; दृढता. [सं.]

**अचार** पु. लोणचे. [हि.]

**अचाल** स्त्री. खोटी; खोळंबा; अडचण.

**अचावचा** क्रिवि. १. अद्वातद्वा; मनाला येईल तसे असंबद्ध (बोलणे). २. अशोभनीयपणे; अस्वच्छपणे (खाणे). ३. अव्यवस्थित; कसेतरी; गैदीपणाने (काम करणे). [ध्व.]

**अचांगणे** अक्रि. १. उमेद, हुशारी, वाढ नाहीशी होणे; कोमेजणे; वाळणे; आजारी होणे. २. अपकर्माच्या स्थितीस पोहचणे. [सं. अचंग ]

**अचांगळा–ळी** वि. उणे; वाईट; अभद्र; निंदात्मक : 'अचांगळी अधिक शब्द । ऐकून उठिला वीर गद ।।' – एरुस्व ९.४. [सं. अचंग]

**अचांगी** स्त्री. आजार; दुर्बलता; ऱ्हास.(वा.) **अचांगी भरणे, होणे** आजारी पडणे. **अचांगीने शिवी देणे, बोलणे**– तोंडाने वाईट बोलणे; शिव्या देणे.

**अचांचल्य** न. स्थिरपणा; निश्चितपणा; अचलता; चंचलपणाचा अभाव. [सं.]

**अचिकित्सनीय** वि. १. असाध्य; उपायाबाहेर गेलेला. (रोग इ.). २. ज्याची चिकित्सा, मीमांसा करता येत नाही किंवा करणे योग्य नाही असा (विषय). [सं.]

**अचित** न. अज्ञान.
वि. चैतन्य नसलेला, जड. [सं.]

**अचिंत** वि. चिंतारहित; काळजी नसलेला : 'जे अचिंता अनाथांचे मायपोट ।' – ज्ञा ८.१९५. [सं.]

**अचिंतित** वि. पूर्वी न चिंतिलेले; पूर्वी मनात नसलेले किंवा न आणलेले; एकाएकी उद्भवलेले; अकल्पित; अतर्कित; अभावित [सं.]

**अचिंत्य** वि. विचारांच्या पलीकडचा; कल्पनातीत; अतर्क्य : 'हेतु जया बिहे । अचिंत्य जें ।'– ज्ञा ८.८८. [सं.]

**अचिद** न. चेतना नसलेले; जड (वस्तु, जग); अज्ञान : 'अचिदाचेनि नाशे । आले जे चिन्मात्रदशे ।'– अमृ ५.२९.

**अचिन्ह** न. दुश्चिन्ह; अशुभ गोष्ट. [सं.]

**अचिर** क्रिवि. लवकरच; अल्पावधीत : 'सुरवरदाय काही न पवें अचिरें ।' – आसु ७.१. [सं.]

**अचिरकाय** स्त्री. अवधान; आठवण. (गो.)

**अचिरकाल–ळ** पु. थोडावेळ, कमी अवधी. [सं.]

**अचिरकाले** क्रिवि. अल्पकाळात; थोड्या दिवसात : 'श्रीकृपें अचिरकालेच मुख्य शत्रूचा पराभव करून...' – आज्ञा ६७.[सं.]

**अचिरेकरून** क्रिवि. लवकरच.

**अचीपची** स्त्री. सागरगोट्याप्रमाणे दगड झेलून खेळावयाचा एक खेळ; हा पाच किंवा सात खड्यांनी खेळतात. (गो.)

**अचीर** न. आश्चर्य; नवल; अद्भुत गोष्ट. (ग्रा.) [सं. आश्चर्य]

**अचुकविचुक** वि. क्रिवि. अस्पष्ट, असंबद्ध; गैरशुद्धीतील (भाषण, शब्द इ.); भरमसाट.

**अचुंबित** वि. १. नवीन; साजूक : 'विशेष भक्तिप्रेम अचुंबित ।' – एभा ११.६८१. २. अपूर्व; अद्भुत : 'पुढे अचुंबित निरूपण ।' – एभा ३०.४१३. ३. बिनचूक : 'जो परिणामीचा निर्वाळा अचुंबितु ये फळा ।' – ज्ञा ५.७. ४. स्पर्श न झालेले; अस्पृष्ट; अबाधित : 'जैसे वज्रकवच लेईजे । मग शस्त्रांचा वर्षावो साहिजे । परि जैतेंसी उरिजे । अचुंबित ।।' –ज्ञा २.२३२. ५. निर्भेळ; निर्लेप : 'ते ज्ञानपावे निश्चित । जयामाजि अचुंबित । शांति असे ।।' – ज्ञा ४.१.८८. ६. निर्मळ : 'तेणे श्रीकृष्णे स्तविली भक्ती । परम प्रीती अचुंबित ।' – एभा २९.६४९. ७. सर्व; अगणित : 'तुझ्या विभूती अचुंबिता । कृपेने.... सांग ।।' – एभा १६.२३४. ८. अनासक्त; नि:संग : 'परी अचुंबित वर्तणे अघटमान कर्म करणे ।।' –एभा ३.२९३. ८. जिचा उपभोग घेतला गेलेला नाही अशी (स्त्री). [सं.]

**अचुंबित** क्रिवि. अकस्मात; अचंबीत. (को.)

**अचूक** वि. १. नेमके; बिनचूक; दोषरहित; निर्दोष : 'अचुक येत्न करवेना । म्हणून केले ते सजेना ।' –दास १२.२.६. २. चूक नसलेले; अगदी बरोबर. ३. निश्चिपणे लागू पडणारे (निदान).

**अचूकपणा** पु. बिनचूकपणा; नेमकेपणा; दोष, चूक किंवा त्रुटी नसणे.

**अचूकसंधान** न. १. न चुकणारा नेम, क्रिया, गोष्ट. २. बरोबर घडणारा बेत; न चुकणारी सल्ला मसलत.

**अचूक संधानी** वि. बिनचूक कार्य करणारा.

**अचेत** वि. अचेतन; निर्जीव; जड; चैतन्यरहित : 'अचेत लोहचुंबकें चळे ।' – एभा २.७०२. [सं.]

**अचेतन** वि.१. निर्जीव; प्राणरहित; मृत; जड : 'अचेतन पुतळ्या नाचवी यंत्री ।' – एरुस्व १३.६४. २. बेशुद्ध; मूर्च्छित. [सं.]

**अचेतनभार** पु. (स्था.) निर्जीव वजन. [सं.]

**अचेष्ट** न. (भौ.) वातावरणातील वायूघटकांपैकी एक मूलद्रव्य. [सं.]

**अचेष्ट** वि. अतिशय; कमालीची; नितांत : 'जर सोडुन अनंतपूर फिराल माघार । तुझ्या आईच्या लावशिल हात निरीला म्होर । तेव्हां निपाणकराला अचेष्ट पडली ईर (ईर्षा) ।' –ऐपो १९१.

**अचैतन्य** न. बेशुद्धी; मूर्च्छा; निरुत्साहीपणा; चैतन्याचा अभाव; जिवंतपणा नसणे. [सं.]

**अचोज, आचोज** न. १.आश्चर्य, नवल : 'अचोज हा बळिया झाला ।' – निगा १६.६५.२. न सापडणारा.

**अचोष्य** वि. चोखता न येणारे; चोखण्यास अयोग्य-अशक्य. [सं.]

**अच्कलेविच्कले** क्रिवि. १. अचकटविचकट; अव्यवस्थित; वाह्यात : 'किती येक ते अच्कलेविच्कलेसी ।' - दावि २८४. पहा : **अचकुल** [विचकलचे द्वि.]

**अच्कित, अचूकिते** क्रिवि. अकस्मात; अवचितपणे. (गो.)

**अच्कुलाविच्कुला, अच्कुलेविच्कुले** वि. बेशुद्ध; भ्रमिष्टपणाचे. क्रिवि. गैरशुद्धीत, बेशुद्धीत.

**अच्चळ** क्रिवि. अलगद; हळुवारपणे : 'रस्त्याकडेला नेऊन (रथ)... अच्चळ उभा केला.' - कोउ १५४.

**अच्छ** वि. १. स्वच्छ; निर्मल; विमल : 'बहुधां समर्चिला बहु जन्म श्रीराम अच्छ विभवाने ।' -मोभीष्म ३.६४. २. श्रेष्ठ; उत्कृष्ट; उत्तम.[सं.]

**अच्छ** पु. (आयु.) प्रमेहाचा एक प्रकार : 'सांद्र अच्छ, इक्षु, हस्ति प्रमेहांत याचा उपयोग जास्त झालेला आहे.' - आयुसिद्धभा १.१०३.

**अच्छंदस्क** वि. छंदशास्त्राच्या नियमांना सोडून असलेला; छंदोनियमांचे उल्लंघन करणारा. [सं.]

**अच्छा** अ. (उद्‌गा.). १. छान; सुंदर; चांगले; होय. २. निरोप घेताना, आश्चर्य व्यक्त करताना, एखाद्याच्या विधानावर पसंती व्यक्त करताना काढला जाणारा उद्‌गार; उत्तम, बरे, ठीक या अर्थाचा उद्‌गार. [हिं.]

**अच्छिद्र** वि. छिद्र, भोक नसलेला (मोती इ.); व्यंगरहित. [सं.]

**अच्छिन्न** वि. अखंड; अभग्न; सबंध; न कापलेले -विभागलेले; भोक न पडलेले (रत्न); न तुटलेले; न जोडलेले. [सं.]

**अच्छेखाँ, अच्छेखान** वि. तिस्मारखान; टिकोजी; वरिष्ठ; मोठा; अच्छा. (व.)

**अच्छेय** पहा : **अच्छिन्न.**

**अच्छेर** पु. अर्धा शेर (वजनी, मापी).
वि. अर्धा शेर मापाचा किंवा वजनाचा.

**अच्छेर पावशेर** पु. अव. कच्चीबच्ची. (कु.)

**अच्छेरी** स्त्री. अर्ध्या शेराचे माप (भांडे) किंवा वजन.

**अच्छेव** पु. उच्छाद; धांगडधिंगा; हैदोस; धुडगूस. (गो.)

**अच्याद** क्रिवि. अलगद; अल्लाद : 'त्येला अच्याद झेलू' - गजरा १४८.

**अच्युत** वि. च्युत न होणारा (परमेश्वर); स्थिर; न पडणारा; न ढळणारा; अचल; नाशरहित : 'अचळु मी अच्युतु ।'- ज्ञा १८.११९४.[सं.]

**अच्युत** पु. १. महानुभाव पंथाचे एक नाव : 'या पंथास 'महात्मा' 'अच्युत'... अशीही नावे आहेत.'- मसं. २. विष्णु. ३. अंजीर : 'आतां पूर्व कीर्ण प्रांत बहल । अच्युत लगडोनि सफळ । पाथिक संत श्रांतांसि तुंबळ । कैवल्य विश्रांति देतसे ।।'-स्वानु ६.५.१. [सं.]

**अच्युतफळ** न. आंबा (फळ). [सं. चूतफल ]

**अच्संधि-धी** पु. दोन स्वरांचा संधी किंवा तात्पुरता समूह. [सं.]

**अछंदस्क** वि. कविताबद्ध नसलेला (गद्य). [सं.]

**अछांदस** वि. वेदांचे पठण न करणारा : 'अछांदसु पाणिबुडा : युधिष्ठिरू साबडा : तो माझेया कांडा : सदा भीए'- शिव ८९३.

**अछिद्री** वि. (वै.) ज्याला बाहेर उघडणारे तोंड नाही असा; छिद्र किंवा भोक नाही असा.

**अछोडा** पु. कासरा (बैलाचा); दोर; काढणी; चाबूक. [गुज.]

**अज** वि. अजात; नित्य; जन्मरहित; ज्याला जन्म नाही असा; स्वत:सिद्ध : 'मी अजुही परि संभवे । प्रकृतियोगें ।'-ज्ञा ४.४४.
पु. १. परमेश्वर; ब्रह्मदेव; शिव; विष्णू; चंद्र; कामदेव; सामान्यत: ईश्वर. इ.; रघुवंशातील अज नावाचा राजा. २. बोकड; बकरा. [सं.]

**अज** शअ. पासून; मुळे; कडून : 'अज रक्तखाने' शिकाप (शिवकालीन पत्रव्यवहार) रक्त=शाई; रक्तखाना=कचेरी.
नाम खात्यावरील हिशेबाच्या निरनिराळ्या बाबींच्यावर ओढलेली रेघ व निरनिराळे रकाने दाखविणाऱ्या रेघा. [फा.]

**अजकदीम** क्रिवि. पहिल्यापासून; पूर्वीपासून : 'अजकदीम इनायत असे'- थोमारो१.६५. [फा.]

**अजगय** क्रिवि. हळूच; नकळत.

**अजगर** पु. १. एक निर्विष व दात नसलेला साप. याची लांबी ३० पासून ४० फुटांपर्यंत (१० ते १५ मीटर) असते. हा बकरीलाही गिळतो म्हणतात म्हणून अज+गर (गिळ) हे नाव.
वि. १. सुखदु:खातीत (योगी); केवळ ईश्वरावर भरवसा ठेवणारा. २. आळशी, सुस्त (माणूस). अजगरासारखा पसरणे- पडणे- पोसणे- निजणे - चालणे असे शब्दप्रयोग केले जातात.

**अजगरवृत्ती-त्ती** १. आपोआप मिळेल त्या भिक्षेवर राहण्याची वृत्ती; साधुत्व. २. (ल.) आळशीपणा; ऐदीपणा; अगांतुकी करण्याचा स्वभाव.

**अजगा** वि. सगळा; असगा; असका.

**अजगूल** वि. १. अधू नेत्रांचा. (को.) पहा : **अचकुल.**

**अजगे** क्रिवि. वाजवीपेक्षा अधिक. (गो.)

**अजज** पु. घोड्याच्या पायाचा (खुराचा) रोग.

**अजड** वि. १. चैतन्ययुक्त; अमूर्त; निराकार : 'तो जडाजडातें विरवितु ।'- ज्ञा ८.९७. २. चपल बुद्धीचा; मूर्ख नव्हे तो. [सं.]

**अजडवाद** पु. (तत्त्व.) अजड द्रव्यवाद; जडाभाववाद; सर्व सृष्टी सजीव आहे, असे मत. [सं.]

**अजडांश** पु. १. जडपणा नसणारा पदार्थ, गोष्ट इत्यादी. २. पंचमहाभूतात्मक शरीर नसलेला आत्मा, ब्रह्म इत्यादी. [सं.]

**अजतरफ** शअ. बाजूने; तर्फे; कडून. बहामनी कालात व नंतर पत्रव्यवहारामध्ये वरिष्ठ अधिकाऱ्यांकडून कनिष्ठास जाणाऱ्या पत्रव्यवहारात वापरला जाणारा शब्द. - पया ४००. [फा.]

**अजदेहे** पु. एकंदर गाव, सर्व गाव. : 'अजदेहेपैकी वजा दुमाले गाव'- थोमारो १४७.३. [अर.]

**अजन्म-न्मा** वि. १. न जन्मलेला; ज्यास जन्म नाही असा. २. शाश्वत; निरंतरचा.
पु. ब्रह्म, ईश्वर : 'अजन्मा होता निजेला ।' - दास [सं.]

**अजप** १. यथाशास्त्र जप न करणारा ब्राह्मण; अस्पष्ट रीतीने जप करणारी व्यक्ती. २. शास्त्रनिषिद्ध ग्रंथ वाचणारा मनुष्य.

**अजपत्र** न. शेरेपत्र; अभिप्रायपत्र.

**अजपा** पु. १. एका अहोरात्रात माणसाचे २१६०० श्वासोच्छवास होतात.

त्यावर 'सोहं' हे बसवून जो सहज, आयासाविरहित जप करावयाचा तो. श्वासाबरोबर 'सः' व उच्छ्वासाबरोबर 'अहं' (ते ब्रह्म मी आहे.) म्हणावयाचे; याला हंस मंत्र असेही म्हणतात : 'येकवीस सहस्त्र स्वासें जपा । नेमून गेली ते अजपा ।'-दास १७.५.१. २. (सामान्यत:) श्वासोच्छ्वास : 'पवन विजितसे अजि पालवें । मृदु असूं गतिनें अजपा लवे ।' -मराधा-मक १६२. [सं.]

**अजपा गायत्री, अजपा मंत्र** वरील जपालाच म्हणतात. [सं.]

**अजपूजाश्रीसरस्वती** स्त्री. श्रीसरस्वतीच्या पूजामंदिरातून. (विजापूरचा दुसरा इब्राहीम अदिलशहा हा हिंदुधर्माला मान देणारा असून त्याला हिंदी गायनाची फार आवड होती व त्यासाठी त्याने राजवाड्यात सरस्वतीची मूर्ती स्थापली होती. त्या सरस्वतीच्या मंदिरात राज्यकारभाराची कचेरी करून तेथून तो सर्व फर्माने काढी. म्हणून असल्या फर्मानांच्या डोक्यांवर किंवा समासात - 'अजपूजा श्रीसरस्वती' ही अक्षरे लिहिली जात.) - भाद्विसंवृ ५१;६८.

**अजब, अजप** न. आश्चर्य : 'ती अजब करीत राहिली.' - रथ १२३.

वि. विलक्षण; अद्भुत; असामान्य; अनपेक्षित; अपूर्व. [फा.]

**अजबखाना-बंगला** पु. दुर्मिळ व सहसा पाहायला न मिळणाऱ्या वस्तूंचा संग्रह असलेले ठिकाण; वस्तुसंग्रहालय; पदार्थसंग्रहालय. [फा.]

**अजबाई** स्त्री. नवल; आश्चर्य; चमत्कार; अलौकिकपणा.[फा.]

**अजबाब-अज्बाब** पु. १. मालमत्ता; चीजवस्तू; सरंजाम : 'जुन्या कमिटीकडून अजबाब सोपून घेण्याचे काम सुरू होऊन तें सन. १८८६ साली पुरे झाले.' - जनि ३. २. हत्यारे; युद्धसामग्री; असबाब. [फा. अस्बाब चे अप.]

**अजबायेस** शअ. कारणाने; कारणामुळे: 'अजबायेस बिमारी' = आजारामुळे - पदमव ११४. [फा.]

**अजबुनात-दी** वि. स्थापनेपासूनचे; प्राचीन : 'बाछाई तक्त दिल्ली अजबुनांत जागा'- पला ९. [फा. अजबुनयाद्]

**अजम** वि. श्रेष्ठ; थोर; सन्मान्य; राजश्री. (विशेषत: ) मुसलमान आणि ब्रिटिश लोक यांच्या नावापूर्वी : 'अज्जम चापलेन साहेब यांनी....' - मुंब २३६. मुसलमानी आणि पेशवाईतील पत्रव्यवहारात कनिष्ठांकडून वरिष्ठास हा शब्द लावला जात असे. 'अजम अफ्झलखान महमदशाही.' परंतु इंग्रजी अमदानीत हा कनिष्ठास लावला जात असे : 'अजम पाटील कुळकर्णी.'

पु. १. सामर्थ्य; जोर. २. अभिमान. ३. निश्चय; विचार : 'ऐशा समयास नबाब मौसुफ यांनी अजम केल्यास पातशाही दाब व बहुत कामे घडून येतील.' - दिमरा १.४९०. [फा.]

**अजमत** स्त्री. थोरवी; श्रेष्ठता; प्रभाव; मोठेपणा; प्राबल्य; करामत : 'काही एक अजमत दाव मला ।'- अज्ञाअ १०. [फा.]

**अजमाईसीस येणे** निदर्शनास येणे : 'आमचे तर्फेने ही गोष्ट येकंदर जाली नाही. पुढे आपले अजमाईसीस येईल...' -पेद २५.३४.

**अजमाव-वा** पु. १. अंदाज; अदमास; हिशोब; गणती. २. प्रयोग; परीक्षा; कसोटी. [फा. अझमाइश्. ]

**अजमावणे** सक्रि.१. अंदाज करणे; अजमास पाहणे; ठोकताळा पाहणे; हिशेब करणे; पारखून किंवा कसून पाहणे. २. परीक्षा घेणे; प्रयत्न करणे : 'शमनापींरें समर्थ अजमाविले ।'- सप्र ८.३.७३.

**अजमास, अज्मास** पु. १. अंदाज; हिशेब; गणती. २. सालाची जमाबंदीची ठराविक रक्कम; बजेट; जमाखर्च; अंदाजपत्रकाचा तक्ता. [ फा. अझमाइश् ] (वा.) **अजमास पंचे दाहोदर्शे** - अंदाजाने केलेले विधान; नक्की माहिती नसता केलेले विधान. **अजमासाने खोगीर खाणे** - अनुमानाने विधान करणे.

**अजमासणे** उक्रि. अंदाज बांधणे; कल्पना करणे. [ फा. अझमाइश् ]

**अजमासी** वि. १. अंदाजी; स्थूल हिशेब करून काढलेला, गणती केलेला. २. अनुमानाने निश्चित केलेला. [ फा.अझमाइश्]

**अजमासे** क्रिवि. अंदाजे; सुमारे.

**अजमोदल - देल** न. ओव्याचे तेल. [ हिं.]

**अजमोदा** पु. ओव्याचा एक प्रकार. याला पांढऱ्या रंगाची फुले येतात. [हिं.]

**अजय्य** वि. अजिंक्य; जिंकता न येण्याजोगा. [सं.]

**अजर** न. परब्रह्म; देव.

वि. ज्याला म्हातारपण नाही असा; शाश्वत; अविनाशी; क्षय न पावणारा; ज्याला जरा प्राप्त होत नाही असा (देव). [सं.]

**अजरख्तखाने** क्रिवि. कचेरीतून; कार्यालयाकडून. [फा.]

**अजरह** क्रिवि. चालू. [ अर.]

**अजरामर** वि. १. ज्याला म्हातारपण व मरण नाही असा; कधीही नाश न पावणारा; अक्षय; अविनाशी. २. चिरकालीन. [सं.]

**अजरामरा(न्हा)मत** क्रिवि. कृपादत्त; कृपेने दिलेले ( बक्षीस ) : 'हे वतन यास अजरामऱ्हामत वतन करून दिल्हे असे....' -मइसा ८.४७. [फा.]

**अजल** पु. अंत; मरण. [फा.]

**अजवला** पु. १. एक औषधी वनस्पती. याचे पांढरा व काळा, असे दोन प्रकार आहेत. पांढऱ्या अजवल्याला 'माली तुळस' व काळ्या अजवल्याला 'काळी माली तुळस' असे म्हणतात. याची पाने तुळशीच्या पानांपेक्षा मोठी असतात. २. काळी तुळस; वैजयंती.

**अजवान, अजवायन** पु. ओवा; अजमोदा [हिं. अजवायन]

**अजशृंगी** स्त्री. मेढशिंगी; मेषशृंगी; काकडशिंगी. सह्याद्री भागात ही औषधी वनस्पती आढळते. [सं.]

**अजस्र** वि. प्रचंड; धिप्पाड; मोठा; विस्तृत; जंगी; राक्षसी; अवाढव्य.

पु. अग्निहोत्राचा एक प्रकार. त्यात तिन्ही कुंडातील अग्नी कायम ठेवतात- अजस्रपक्ष. [सं.]

**अजस्रलय** स्त्री. नृत्यातील द्रुत, मोठी लयदारी. [सं.]

**अजस्वारी** क्रिवि. स्वारीतून; स्वारीपासून. [अर.]

**अजहत** पु. प्रतिनिधी; गुमास्ता.

**अजहतस्वार्थलक्षणा, अजहल्लक्षणा** स्त्री. शब्दाचा वाच्यार्थाहून अधिक अर्थ करावा लागतो अशी लक्षणा. [सं.]

**अजहतीदार** पु. मुतालिक; मुखत्यार; प्रतिनिधी : 'काटे देशमुख याचे अजहतीदार जमान देऊन सोडिला'- मदरु ३.३५. [फा.]

**अजक्षर** न. स्वर. (अ, इ इत्यादी स्वर). [ सं. अच् + अक्षर]

**अजंगम** वि. स्थावर; अचल; एका जागेहून दुसरीकडे जाऊ न शकणारे (घर, झाड इ. संपत्ती) : 'अजंगमाची खाल काढविली ।'-ज्ञा १३.२२७.

**अजंट** वि. अट्टल; अस्सल; लफंगा; लबाड. (ना.) [ हिं.]

**अजा** स्त्री. १. बकरी; शेळी. २. माया; मोह; भास : 'अजाची ते अजामाया ।'- एभा ७.५८६. [ सं.]

**अजाइब** पु. आश्चर्य; अजब : 'तुम्ही ऐशा गोष्टी करितां अज्याइब आहे.'- मइसा १.५२. [फा.]

**अजाकृपाणीयन्याय** पु. शेळी आणि तलवार यांचा दाखला; टांगती तलवार; योगायोगामुळे होणारी अनिष्ट घटना दाखविण्याकरिता या सिद्धांताचा उपयोग करतात. हतबल असहाय अवस्था. [ सं.]

**अजागल–ळ** वि. १. बावळट; मूर्ख. २. निरर्थक; निरुपयोगी. ३. कर्तृत्वहीन. [सं.]

**अजागळस्तन** पु. (शेळीच्या गळ्याजवळचे स्तनासारखे मांसल अवयव. याचा उपयोग नसतो म्हणून लक्षणेने) निरर्थक; कर्तृत्वहीन; कुचकामाचा. [सं.]

**अजागळी** स्त्री. मनस्वी खोड्या; दांडगाई; धिंगाणा; अरवाळी.

**अजाण** वि. १. जाण नसलेला; अनभ्यस्त; समज न आलेला; अडाणी. २. उपकाराची जाणीव नसलेला; कृतघ्न. ३. विचारशून्य; बुद्धिहीन. [सं. अज्ञान]

**अजाणता अजाणतेपणी** क्रिवि. पहा : **अजाण;** कळत नसल्यामुळे; माहीत नसल्यामुळे; नकळत.
वि. साधाभोळा; भाबडा.

**अजाणपणा** पु. अज्ञान; नेणतेपणा.

**अजात** वि. उत्पन्न न झालेला; जन्मास न आलेला.

**अजात** वि. १. अज्ञात जन्माचा किंवा ज्यांच्या जन्माचा ठावठिकाणा लागत नाही असा; अकुलीन; बदलौकिकाचा. २. लुच्चा; बनेल.

**अजात** वि. मुक्त; स्वतंत्र : 'तुम्हासं माथां तेल घालोन अजात केले असे' - वाशाछ २१३.
क्रिवि. अल्लाद; अलगद; कोठे किंवा कशाला न लागता. [फा. आझाद]

**अजातपत्र** न. मुक्तिपत्र; मोकळे केल्याचा दाखला. [फा.]

**अजातपक्ष** वि. पंख न फुटलेला : 'जैसी अजातपक्षांचेनि जीवें पक्षिणी जिये' - ज्ञा ९.३३९. [सं.]
पु. (अजातप्रकार) जेथे जातिभेद पाळीत नाहीत असा आचार; वागणूक; पद्धती. (तुळजापूर, व्यंकटगिरी येथे प्रचलित.) [सं. अजातिप्रकार ]

**अजातवाद** पु. उत्पन्न न होणे; कोणतीही नवीन वस्तू उत्पन्न होत नाही असा एक विचार : '(अमृतानुभव) या ग्रंथात अजातवादाचाच पुरस्कार केलेला असल्यामुळे....' - अज्ञे ३४. [ सं.]

**अजातव्यवहार** वि. वयात न आलेला (मुलगा); अज्ञान. [ सं.]

**अजातशत्रु–त्रू** वि. १. ज्याला कोणी शत्रू नाही असा; शत्रुरहित; सात्त्विक. २. जो दुसऱ्याचे शत्रुत्व करीत नाही असा. ३. शांत, कोणास त्रास न देणारा (मनुष्य). ४. धर्मराज, युधिष्ठिर : 'यजमानहि गुरुदेव द्विजभक्त अजातशत्रु तज्जाया ।' - मोसभा २.२१. [ सं. ]

**अजातसिद्ध** वि. स्वयंसिद्ध.

**अजाति–ती** वि. १. जातिविरहित; कुलहीन : 'हां तो दिसे कृष्ण स्वयं अजाति ।' - नदा २.५७. २. कोणत्याही वर्गात घालता येत नाही असा; वर्गातीत : 'ते वीर अनाम अजाती ।' - ज्ञा १७.३२९. [सं.]

**अजादुजा** वि. माझातुझा; मी-तू पणाचा; आपपर. [दुजाचे द्वि.]

**अजान** स्त्री. नमाजाकरिता पुकारा; मशिदीत प्रार्थनेसाठी निमंत्रणादाखल होणारा पुकारा. [ फा.]

**अजानवृक्ष** पु. आळंदीस ज्ञानेश्वराच्या देवळात समाधिमंदिराच्या आवारात ज्ञानेश्वरांनी लावलेल्या फांदीपासून वाढलेला वृक्ष. पृथ्वीवर हा अद्वितीय समजला जातो : 'वृक्ष अजाना देखुनि वंदी जरि भावें ।' - निमा १.९४.

**अजाप** क्रिवि. अल्लाद; अलगत.

**अजापालक** पु. १. धनगर; मेंढपाळ. २. मल्हारराव होळकर व त्यांचे वंशज यांच्यासंबंधी जुन्या कागदपत्रांतून लक्षणेने हा शब्द वापरला आहे. [सं.]

**अजापुत्र** पु. कोकरू; निरुपद्रवी, स्वभावाने गरीब माणूस. [सं.]

**अजाबा** पु. वृद्ध माणूस; आजोबा. (ग्रा.)

**अजाबाद** क्रिवि. १. मुळीच. २. अचानक [अजीबाद अप.]

**अजाम्ल** न. कॅप्रिक ॲसिड. हे आम्ल लोणी, खोबरेल वगैरेपासून काढतात. - सें २.

**अजायब** पहा : **अजब**

**अजायुद्ध** न. बोकडांचे युद्ध; बोकड फार वेळ भांडत नाहीत. नुसता आव आणतात. त्यावरून लक्षणेने पोकळ धमकी, भांडण. [सं.]

**अजाहत** प्रतिनिधी; बदली अधिकारी; संपूर्ण अधिकार असलेला दुय्यम अधिकारी; पाटील, कुलकर्णी, देशमुख, देशपांडे आणि इतर वतनी अधिकारी इत्यादींच्या बाबतीत या शब्दाचा उपयोग करतात. एक पदवी. [फा. वजाहत]
वि. अबाधित; अव्याहत.

**अजांबर** वि. फाजील; दांडगा; हट्टी.

**अजि** उद्गा. अहो! (हे संबोधन पुरुषांना किंवा स्त्रियांना उद्देशून लावतात.) : 'धृतराष्ट्रासि म्हणे मी संजय व्हा सावधान अजि राया ।।'- मोकर्ण १.५. [सं. अयि]

**अजिजी, अजीजी** स्त्री. दीनता; लीनता; वाजवीपेक्षा अधिक नम्रता; लाचारी; गयावया; हाजाहाजी : 'किती अजिजीने हातापाया पडून त्यांनी माझ्याकडून तसे वचन घेतले'- भाबं १५४. [अर. आजिझी] (वा.) **अजिजी करणे** - आर्जव करणे; लाचारीने वागणे; गयावया करणे; खुषमस्करी करणे.

**अजिटन, अजिटंट** पु. एक लष्करी अधिकारी; वरिष्ठ अधिकारी किंवा सेनापती सांगेल ते हुकूम काढणे व रवाना करणे हे त्याचे काम असते. [इं. अडज्युटंट]

**अजित** वि. जिंकला न गेलेला; सदैव विजयी; ज्याचा कोणी कधी पराभव केला नाही असा (ईश्वर) : 'अजित नाम वदो भलत्या मिसे । सकल पातक भस्म करीतसे ।' - वामन. [सं.] (वा.) **अजित**

जाणे - एखाद्याला हार जाणे; एखाद्याचे वर्चस्व मान्य करणे. **अजित होणे** - मेटाकुटीस येणे; रडकुंडीस येणे; नुकसान होणे.

**अजितपत्र, अजिंक्यपत्र** न. १. जितपत्र; वादात किंवा खेळात पराभूत झाल्याने तशी कबुली देणे. २. खटल्यात हरलेल्या पक्षाने ज्यावर आपला पराभव लिहून दिला ते पत्र.

**अजितेंद्रिय** वि. ज्याने आपली इंद्रिये, मनोधर्म किंवा विकार जिंकले नाहीत असा; विरक्त नसलेला; वैराग्य अंगी नसलेला. [सं.]

**अजिदिल्यखलास्** क्रिवि. ज्याचे अंतःकरण प्रेमाने बद्ध आहे, अशा माणसाकडून; (दरबारी व्यवहारात कनिष्ठाने वरिष्ठाला) पत्र लिहिताना योजावयाचा वाक्प्रचार. [फा.]

**अजिन** न. बसण्यासाठी किंवा पांघरण्यासाठी वापरले जाणारे (विशेषतः हरणाचे) कातडे; मृगचर्म; कृष्णाजिन. [सं.]

**अजिन्नाफुस्की** स्त्री. भित्री भागुबाई; (ल.) भ्याड; नामर्द.

**अजिबात-द** क्रिवि. १. बिलकुल; अगदी; सर्वस्वी; निखालस; समूळ; मुळीच. २. यापुढे; यानंतर. ३.(नकारवाचक प्रयोगात) जरासुद्धा; अगदी अल्पप्रमाणात सुद्धा.

**अजिर** न. अंगण; चौक; खुली जागा : 'होय असृक स्रोत : शत वाहे समराजिरीं खळखळाते ।'- मोद्रोण २.२३. [सं.]

**अजिसौब** - कडून, पासून. (वरिष्ठाने कनिष्ठास लिहावयाच्या पत्रात योजावयाचा वाक्प्रचार). [फा.]

**अजिंक** पहा : **अजिंक्य** : 'तू तव अजिंक गा धडफुडा'- एरुस्व ४.३६.

**अजिंक्य** वि. जिंकता न येण्यासारखा; अजेय; खेळांच्या स्पर्धांत शेवटपर्यंत विजयी; सर्वश्रेष्ठ. [सं.]

**अजिंक्यपत्र** न. इतर पंडितांना वादविवादात हरवल्यामुळे एखाद्या विद्वानाला मिळणारे त्याच्या सर्वश्रेष्ठतेसंबंधीचे पत्र; कोणत्याही कलेत, वादात, खेळात, कुस्तीत, स्पर्धेत सर्वांवर विजय मिळवला आहे अशा अर्थाची सनद.

**अजिंक्यपद** न. एखाद्या खेळात इतर सर्व खेळाडूंचा पराभव केल्यामुळे किंवा खेळाचे सर्व किंवा बहुसंख्य डाव जिंकल्यामुळे मिळणारे स्थान.

**अजिँ(ज)सबब** अ. याकरिता; म्हणून; या कारणास्तव : 'अजिंसबब वतन चालविणे मौकुफ राहिले होते.'-थोमारो २५.१९. [फा.]

**अजी** क्रिवि. पूर्णपणे; अगदी; मुदली; मुळीच : 'शिंगी मोडकी अजी बोडकी'- अमृतबाल ८. [फा.]

**अजी अजी करणे** क्रि. आर्जव करणे; खुषमस्करी करणे; पहा : **अजिजी**

**अजीज** वि. १. प्रिय; लाडका; प्यारा. २. बहुमूल्य; महाग; दुर्मिळ; उत्कृष्ट.
पु. नातेवाईक; आप्त. [ फा.]

**अजीज** वि. १. मोताद; महाग : 'सिपीभर धान्यास अजीज जाहलो...'- आंपव्य ३७. २. दीन; लीन : 'सरदार याणी जाऊन इंग्रजांस अजीज केले'- मइसा १९.१०५. [फा. अजीज]

**अजीब** वि. विलक्षण; अद्‌भुत; अजब. [फा.]

**अजी बात करणे, अजी वजा करणे** मुळातच काढून टाकणे.

**अजीम** व. मोठा; थोर; अपार; अफाट; प्रचंड : 'दुतर्फा फौजा अजीम मिळाल्या आहेत.'- पेदभा ३८; पहा : **अजम** [फा.]

**अजीमाफी** स्त्री. सबंध सारा माफ असणारी जमीन. [फा.]

**अजीर्ण** न. अन्न न पचल्यामुळे होणारा विकार; अपचन.
वि. १. न फाटलेले; जुने नसलेले; खराब न झालेले. २. न पचलेले; न जिरलेले. [सं.]

**अजीर्णाशन** न. (आयु.) न पचणारा आहार. [सं.]

**अजीर्णांश** पु. १. अन्नाचा न पचलेला भाग. २. अर्धवट पचन. [सं.]

**अजीर्णी** स्त्री. अपचनावर देण्यात येणारा काढा. [सं.]

**अजीव** वि.१. निर्जीव; जीवरहित. २. (भूशा.) जीवसृष्टी निर्माण होण्यापूर्वीच्या कालमापन विभागाशी संबंधित. ३. जीवांच्या अस्तित्वाचे कसलेही पुरावे ज्यांच्यात मिळत नाहीत असे (खडक). [सं.]

**अजी वास्ते** अ. याकरिता; म्हणून. [फा.]

**अजीवोपजीवी** वि. (जीव.) पोषकांच्यावर निर्वाह अवलंबून नसणारे (जीव). [सं.]

**अजीष्टान** वि. क्रिवि. माफ.

**अजीहूनी** क्रिवि. आजपासून : 'तुज ऐसे भ्रमें अजीहूनी भ्रतारासी ।' सप्र २.३१.

**अजीँबाय(ये)स** क्रिवि. कारणाने; म्हणून; पहा : **अजबायेस** : 'अजी बायेस अर्ज ऐसी जे'- पदमव ११२. [फा.]

**अजु** क्रिवि. अजून; अद्यापि : 'अजु ते कृत्य न साधले'- दावि १८०.

**अजुक** क्रिवि. उजुक; आणखी; पुन्हा एकदा. पहा : **अजून** (व.)

**अजुनिया-अजुनी-अजुनी** पहा : **अजून.**

**अजुरदगी-अजुर्दगी** स्त्री. खिन्नता; नाराजी; रुसवा : 'या दिवसांत कोणाची अजुर्दगी नसावी.' - मइसा १०.६८. [ फा.]

**अजुरदा-अजुर्दा -आजुर्दा** वि. १. निष्काळजी; निरुत्साही; आस्थाहीन; अनुत्सुक; त्रासलेला; खिन्न; उदासीन. २. दुःखी; कष्टी; श्रमी : 'लष्करी एकही नाही अजुरदा.' - ऐपो ३५१. [फा. आजुर्दा]

**अजुरदार-अजुर्दार** पु. अमुक मुदतीत पत्र पोहोचविण्यास भाड्याने ठेवलेला माणूस; नोकर; मजूर; जासूद : 'आपली मुलगी व उमेदवार अजुरदार या दोघांनी मिळून चोरी केली असे त्याचे मनात पक्के भरले.'- घाको ६६०. [अर.]

**अजु(जू)रा, अजु (जू)रदारी** स्त्री. १. मजुरी; वेतन, जासुदाचा पगार. 'कासीद पाठवावा त्यासी अजुरा पोचत नाही.' - मइसा ८.२१२. २. उक्ती कामे करणाऱ्यास द्यावयाचे पैसे. ३. त्रास; मेहनत. (बा.) ४. पहा : **अजोरा**

**अजूग** वि. १. उद्धट; अनादर करणारा; बेगुमान; आडदांड. (को.) २. जोडीला दुसरा नसलेला; एकटा; एकाकी. ३. एकेरी; न जुळलेली; एकटी (सोंगटी). ४. कामाला किंवा जुवाला न लागलेला; न जुंपलेला (माणूस किंवा बैल). [सं. अ +युज् ]

**अजून-नी** क्रिवि. अद्यापि; आजपावेतो; आतापर्यंत. [सं. अद्यातन]

**अजेय** वि. अजिंक्य; अजय; जिंकला न जाणारा. [सं.]

**अजेवणी** वि. जेवणारा; भोजन करणारा.

**अजेंडा** पु. कार्यसूची; कार्यक्रमाची यादी; कार्यक्रमपत्रिका. [इं.]

**अजोगी** वि. १.अळंटळं किंवा चेंगटपणा न करणारा; न गमणारा; न रेंगाळणारा. (को.) २. स्थिर.

**अजोड** वि. १. ज्याला कोणी जोड नाही असा; ज्याची बरोबरी कुणी करू शकत नाही असा. २. ज्याच्या जोडीला कुणी नाही असा. ३. ज्याला सांधा किंवा जोड नाही असे (भांडे वगैरे).

**अजोडा** वि. धन न जोडणारा; काही न मिळवणारा.

**अजोर-रा** पु. कटकट; त्रास : 'खाल्लेल्या पिकाकडे हात फेकून सता म्हणाला : 'बघ काय थोडा अजोर हाय हये ?'– गागो ८१.

**अजोरा** पु. गाय वगैरे जनावराचा गर्भ (क्रि. टाकणे, पडणे, येणे).

**अजोरा** पु. पगार; करणावळ : 'लग्नसंबंधे पालख्या ३ करून दिल्या होत्या त्याच्या अजोऱ्याबद्दल देणे'– पेसाप ४८. [फा. अजुरा]

**अज्जात** वि. अलगत; वरच्यावर; नकळता; एकदम : 'पत्रा तर अज्जात गेला कुठं....' मंपंवा ७१.

**अज्जी** पहा : **अजिबात** : 'ही हुंडणावळ कधीच अज्जी बंद पडली असती.' –लोटिकेले १.१.६८.

**अज्जुत** वि. बिनचूक; अचूक : 'अज्जूत नेम मारिन'– मसाप ४.४.२७९. (कु.) [सं. ऋजु]

**अज्तरीक मेहर्बानी** कृपापूर्वक : 'अज्तरीक मेहेर्बानी, दर्खास्त करितात, कीं व्याज माफ करावे '– पया ४००. [फा.]

**अज्या** क्रिवि. इकडे. (ना.)

**अज्ज्रा** पहा : **अज्राहे**.

**अज्रामन्हामत** क्रिवि. कृपेने; मेहेरबानीने. [फा.]

**अज्रावळ** स्त्री. दृष्ट लागू नये म्हणून लहान मुलांच्या गळ्यात घातली जाणारी दृष्टमण्यांची माळ. पहा : **वज्रावळ**

**अज्राहे** क्रिवि. रस्त्याने; मार्गाने; पूर्वक; रीतीने. [फा.अझ +राह]

**अज्रूय** क्रिवि. प्रमाणे; अनुसार; रीतीने; रूढीने : 'अज्रूय वाजवीच्या हक्क परस्तीच्या इन्साफाच्या रीतीने इन्फिसाल करितील'– पेअ ६१. [फा.]

**अज्लाल** स्त्री. भव्यता; श्रेष्ठता. [अर.]

**अझुइं** अ. अजूनही; अजूनपर्यंत : 'तू अझुइं हित । विचारि पां ।' – राज्ञा २.२२.

**अझूनिवरी** क्रिवि. अद्यापपर्यंत; अजूनपर्यंत.

**अट** स्त्री. १. जी गोष्ट मान्य करण्यावर किंवा होण्यावर नंतरची एखादी गोष्ट करणे किंवा होणे अवलंबून असते ती; शर्त. २. हट्ट; हेका; दुराग्रह. ३. अडथळा; अटकाव; हरकत. ४. चाक पुढे जाऊ नये म्हणून चाकास लावलेला दगड किंवा घुणा; उटी. ५. घट्ट बसविलेला सांधा उचकटण्याकरिता तरफेप्रमाणे लावलेला दगड, पहार इ. ६. वीणेची किंवा सतारीची घोडी; जिच्यावरून तारा खुंटीला अडकवलेल्या असतात अशी सतारीच्या दांडीवरील हस्तिदंती पट्टी. ७. दोरीचा गुंता; पीळ; अढी. ८. मनातील गाठ; अढी. ९. गोट्या खेळताना हातास व बोटास जोर येण्यासाठी आधाराला जमिनीवर टेकलेला अंगठा; असा अंगठा जेथे टेकला जातो ती जागा. १०. (वस्त्रो.) हातमागाच्या परदेशी नावाच्या खुंट्यापुढे बांधलेली, करकोचे पाडलेली काठी– हिला विणावयाच्या धाग्याचे पुंज निरनिराळे बांधलेले असतात. ११. पहा : **आट** [का. अड, अड्ड]

**अट** स्त्री. मोटेतून एका खेपेस येणारे पाणी; मोट थांबल्यानंतर पाटातून वाहणारे पाणी. (अटत अटत राहिलेले पाणी).

**अटअट** स्त्री. परिश्रम; त्रास. पहा : **अटाअट, अटापिटा**

**अटक** पु. तुरुंग : 'यादी बंदीवान अटकांत, किल्ले मिरज'– ऐलेसं ३७२०.

वि. अवघड; दुष्प्राप्य : 'तीर्थरूप राजेश्री रायांचा पुण्यप्रभाव विचित्र. तत्प्रभावेकडून मोठेही अटक कर्म स्वल्पायासे होते.' – पेद १०.४६.

**अटक** स्त्री. १. बंदी; अडथळा; अटकाव; प्रतिबंध; मर्यादा : 'जया सोहंभाव अटकु ।' – ज्ञा ६.११५. २. वचक; धाक; दबदबा. ३. पकडणे; धरणे (संशयावरून). ४. अडचण; नड; खोळंबा : 'तरी उरले असे एक । थोर अटक मजलागी ।'–एभा ६.२६७. ५. (करार मोडल्याबद्दल) प्रायश्चित्त; दंड; शिक्षा. ६. कापड विणण्याच्या मागात ज्यावर फणी आपटते ते लाकूड; (वीण घट्ट, मजबूत व ठासून बसवण्याच्या कामी याचा उपयोग होतो.) ७. गाडीचा वेग कमी करण्याकरता केलेला चाप; घुणा. ८. गाडीची साठी व बुटे यांना जोडणारा दांडा. ९. हद्द, सीमा. पहा : **अट.** [का.अड, अड्ड] (वा.) **अटक करणे** – कैद करणे; पकडणे. **अटक पडणे** – अडचण पडणे; मात्रा न चालणे; हात टेकावे लागणे.

**अटक कोठडी** स्त्री. आरोपीला कच्च्या कैदेत ठेवण्याची जागा; एखाद्यावरील आरोप सिद्ध होऊन निर्णय लागण्याच्या दरम्यान आरोपीला ठेवण्याची कोठडी.

**अटकचटक-मटक** स्त्री. १. लीला; चेष्टा; खेळ; नखरा : 'अटक चटक मटक दाउनि मन तुझे मोहिले रे ।।' –अमृत २३.२. २. एक खेळ.

**अटकडी** स्त्री. १. माळवदाची माती वाहून जाऊ नये म्हणून चौकट पक्की करणारी तुळई. २. खिडकी उघडी राहावी म्हणून वापरण्यात येणारी लोखंडी आकडी. ३.छताच्या खालची तुळई, हिच्यावर नक्षी काढतात. [ का. अड]

**अटकण** पहा : **अडकण**

**अटकणे** अक्रि. अडकणे; गुंतून किंवा अडकून पडणे; गती कुंठित होणे; अटकाव होणे.

**अटकबंद** वि. अटकेत ठेवलेला; कैदेत घातलेला.

**अटकमटक** लहान मुलांचा एक खेळ; या खेळात म्हणायच्या नादबद्ध वाक्यातील, गाण्यातील सुरुवातीचा चरण : 'अटक मटक, चवळी चटक । चवळी झाली गोड गोड ।'.

**अटकर** वि. १. हट्ट करणारा; हेकेखोर; अडेल. २. प्रमाणबद्ध, सुटसुटीत (शरीर); बांधेसूद : 'अटकर बांधा लहान खुजि'– मला १२९.

क्रिवि. १. घट्ट; गच्च. २. आटोपशीर; ठसठशीत ३. टापटिपीने; नीटनेटकेपणाने; व्यवस्थित रीतीने.

**अटकविणे** पहा : **अडकविणे**

**अटकळ** स्त्री. १. अंदाज; अनुमान; तर्क; अजमास; सुमार लौकिकातील चाल; रीत (कुस्ती वगैरे खेळण्याची). २. गणित किंवा इतर शास्त्रातील नियम; सिद्धांत; रूढ; चाल; रीत. ३. पडताळा; ठोकताळा. ४. विचार; समजूत : 'कारभारी यांच्या अटकळेस आले तर सलुख होईल'- ऐलेसं २७०७. ५. युक्ती. (वा.) **अटकळ बांधणे** – तर्क करणे; अंदाज बांधणे; कल्पना करणे. **अटकळ असणे** – कल्पना असणे; खात्री असणे; अंदाज असणे;

**अटकळणे** पहा : **अडक(ख)ळणे**

**अटकळपंचविशी** स्त्री. पुरेशा पुराव्याशिवाय, आधारावाचून बांधलेला तर्क, केलेले अनुमान, विधान.

**अटकळ पाटकळ घालणे** मांडी घालून ऐसपैस आरामात बसणे : '... रामा ... सावलीला बसलेला होता... त्याने अटकळ पाटकळ घातली होती.' – व्यंमाक ८९.

**अटकळबाज** वि. अंदाज करण्यात तरबेज.

**अटका, आटंका** पु. १. ग्रहणशक्तीचा आवाका; आटोका; आकलनशक्तीचे किंवा अधिकाराचे क्षेत्र. २. अंदाज; अदमास; हिशेब; गणना.

**अटका, आटंका** पु. भोग; नैवेद्य : 'देवास अटका चढविण्यास पंडे सांगतात'- चिज १९३५.

**अटका आटंका** एक तांब्याचे नाणे; अर्धा रुक्का; अडका. [सं. अर्धक.]

**अटकाव-वा** पु. १. अटका; अडथळा; प्रतिबंध; प्रतिरोध; विघ्न; आडकाठी. २. कैद; अटक : 'त्याच्या अटकावापासून... शोध लागेल'- लोटिकेले २.२०१.

**अटकावण-णी** स्त्री. अडथळा; हरकत.

**अटकाविणे** सक्रि. थांबवणे; अडथळा करणे; अटकविणे; अटकाव करणे.

**अटकी** स्त्री. १. सागरगोट्याच्या खेळातील एक डाव. पाच असतील तर चार, सात असतील तर सहा आणि नऊ असतील तर आठ एकदम घेऊन उरलेला खडा वर टाकून झेलण्याचा डाव. २. चेंडूच्या खेळात करायच्या ठरावीक टप्प्यांची संख्या. [सं. अष्टक]

**अटकी** स्त्री. एक औषधी वनस्पती.

**अटकीचा** वि. आठ माणसांच्या ओझ्याचा; अटकुल्या (डुक्कर) : 'डुक्कर अटकीचा (आठ माणसांच्या ओझ्याचा) असल्यामुळे....' -शिस २२.

**अटकीचा दगड** पु. शेताच्या बांधावरील हद्द दाखविणारा दगड.

**अटके** न. अडथळा; अटकाव; हरकत.

**अटके** न. १. बैलावर लादलेल्या ओझ्याचा, पडशीचा एका बाजूचा भाग. २. अर्धा भाग; अखे (विड्याच्या पानाचे, भाजीचे, फळाचे वगैरे). [सं. अर्धक]

**अटकेपार** क्रिवि. सीमेपलीकडे; मर्यादेबाहेर.

**अटकेवर झेंडे लावणे** (राघोबादादाने अटकेपर्यंत मुलूख काबीज केल्यावरून) शतकृत्य करणे; मोठा दिग्विजय मिळविणे : 'अटकेवर झेंडे न्याया यापुढे आणिता कोठुनि भरारी (राघोबा) ।' -विक ९.

**अटकोल** वि. पान्हा चोरणारी, दूध काढू न देणारी; दूध द्यावयास खळखळ करणारी (गाय, म्हैस इ.).

**अटखोर** वि. हट्टी; हेकेखोर; अटीबाज; आग्रही.

**अटघोळणा** पु. त्रास; उपद्रव; छळणूक; गांजवणूक; हालहाल (क्रि. करणे, होणे).

**अटण** स्त्री. टेकण : 'झाडाच्या खोडाला पाठीची अटण देऊन मी बसून राहिलो.' – व्यंमाक ७३.

**अटण–न, आटण** न. भ्रमंती, भटकंती; हिंडणे : 'समर्थे भरतखंडी अटणें केली.' – सप्र ५८.३५; 'तिये अटन विशेषे हालिचालि करति भिक्षुके ।' – ऋ २१. [सं.]

**अटणावळ** स्त्री. सोने, चांदी आटविण्याची मजुरी. [का. अड्डु=अटविणे]

**अटणी** स्त्री. १. मूस. २. धातूचे वितळणे; रस होणे. ३. शोष; लुप्त होणे; सुकणे; वाळणे. ४. दाब; धाक; जरब; प्रतिरोधन. ५. झिजणे; श्रम; यत्न : 'तैशी लटकियालागी अटणी । विषयसाधनी नरदेहा ।।' – एभा २.२२६. ६. क्लेश; त्रास : 'तेवी आपलिया आटणिया । सुखे असतया प्राणिया ।।'- ज्ञा १७.२६१. ७. मिश्रण.

**अटणी** स्त्री. गोणपाटाच्या मागातील ताण्याचे धागे खालीवर होऊन मधून धोटा किंवा आडवा दोरा टाकण्यास जागा करण्याकरिता घालतात ते रुळासारखे वाटोळे लाकूड.

**अटणूक** स्त्री १. आटणे; कोरडे पडणे; दुर्भिक्ष; शोषण. २. (ल.) व्यापारात उतरती कळा; अवकळा; जाता पाय. ३. ऱ्हास; अपकर्ष; मंदी.

**अटणे** अक्रि. १. (उष्णतेने ) घट्ट होणे; कमी होणे (दूध, रस वगैरे). २. आकसणे; आखूड होणे; आकुंचन पावणे; आक्रसणे (कापड इ.). ३. कामात येणे; खपणे; विवक्षित कार्याकडे विनियोग होणे. ४. (ल.) व्यापणे; एकजीव, एकरूप होणे : 'मीचि होऊनि आटले उपासिती ।' – ज्ञा ८.१२६. ५. सोने, चांदी वगैरेचा रस होणे; वितळणे. ६. ऱ्हास, क्षय पावणे; खर्च होणे (मालमत्ता). ७. घट्ट होणे; मजबूत होणे. ८. नाश होणे; लुप्त होणे; शुष्क होणे; वाळणे; नाहीसे होणे : 'दुहोत भलते सदा तरि न लेशही आट्ती ।' – केका ५८. ९. उक्रि. पीळ घालणे; वळणे. १०. त्रास देणे; बेजार करणे; नि:पात करणे; निकाल करणे. पहा : **आटणे** [क. अड्डुयिसु]

**अटणे** अक्रि. भ्रमण करणे; प्रवास करणे; भटकणे; हिंडणे. [सं. अट्]

**अटदार** पहा : **अटखोर**

**अटप, आटप** पु. १. संकुचित करणे; थोडक्यात आणणे; आकुंचितपणा – स्थिती. २. ताबा; वचक; अंमल; दाब. ३. व्यवस्थितपणा; सुटसुटीतपणा; आटोप; आवर; उरक. ४. आटपणे; गुंडाळणे; मोडणे; बंद करणे. ५. सफाईने किंवा तल्लखपणाने काम करण्याची रीत. [सं. आटोप]

**अटपणे, आट्पणे** उक्रि. १. एकत्र करणे; गुरफटणे; अकुंचित करणे. २. व्यवस्थित लावणे (पुस्तके, हत्यारे इ.). ३. ताब्यात घेणे; हातात घेणे; गोळा करणे. ४. उरकणे; झटपट करणे. ५. गाठणे; मजल मारणे; मिळणे. ६. सांभाळणे; व्यवस्थितपणे चालविणे. ७. संपवणे; खलास करणे. ८ आवरणे; थांबवणे; मर्यादा घालणे : 'धीर धरोनी

आटप म्हणुनी बाष्पें मजसाठी ।।' – केक ४१.

अक्रि. १. मरणे; नाश पावणे. २. सुकणे; संपणे; नाहीसे होणे.

**अटपता, अटपशुद्ध, अटपसार** वि. बेताचा; सुटसुटीत; टुमदार; बांधेसूद; लहानसर; सोइस्कर (शरीर, इमारत, कपडा). (वा.)

**अटपता करणे, घेणे, धरणे** – १. थोडक्यात आवरणे; संकुचित करणे (काम, धंदा). २. शेवटास नेणे; संपवीत आणणे.

**अटपविणे** उक्रि. १. एकत्र, एके ठिकाणी, जमा करणे; गुंडाळणे. २. उरकणे; संपविणे; विल्हेवाट लावणे; फन्ना करणे (काम, खाद्यवस्तू वगैरे).

**अटपळ–फळ** न. पासोडीच्या दोन तुकड्यांपैकी प्रत्येक; कांबळ्याचा एक भाग. [सं. अर्धपट]

**अटरणे, आटरणे** (अट्रणे) उक्रि. १. आक्रसणे; आखडणे. २. रुसून बसणे; फुगणे; ताठणे.

**अटरमफटरम** न. आलतूफालतू; बिनमहत्त्वाच्या किरकोळ गोष्टी : 'सारं अटरमफटरम खरेदी करण्यात अविचारीपणा केला...' – बाविबु २६१.

**अटरफटर** न. १. रद्दी; सटरफटर. २. बडबड; वाचाळपणा; वटवट. वि. अप्रस्तुत; निरुपयोगी.

**अटरंद** न. करवंदासारखे एक फळ.

**अटवळा** पु. शेताची राखण करण्यासाठी, धान्य उफणण्यासाठी किंवा कडबा वगैरे ठेवण्यासाठी शेतावर बांधलेला माळा किंवा माचण; अटोळा. पहा : **अटाली, अटाळा** [ सं. अट्टाल ]

**अटवी** स्त्री. रान; अरण्य; जंगल : 'अटवियेमाजी जैसा । वन्हि रिघता सहसा ।।' – ज्ञा १८.१५३१. [सं.]

**अटवून टाकणे** क्रि. (मंत्राने भूत, सर्प वगैरे) बांधून टाकणे, रोखणे.

**अटव्य** वि. घोर; निबिड (रान, अरण्य) : 'चोरांच्या अटव्य रानात नेऊन सांडा' – रोज्यू १६२. [सं.]

**अटस** वि. अडस; लहानखोर; अटकुरा पण भक्कम; सुटसुटीत व घट्ट (शरीर, बांधा).

क्रिवि. करकचून; घट्ट; आवळ (बांधणे वगैरे).

**अटसटा** पु. आवाका; गवस; तावडी; आटोका; अडसट्टा : 'जर आपले अटसटीयात गोष्ट आली तर वेळास न चुकावे' – पेद १५.१७.

**अटळ** वि. न टळणारा; चुकविता येणार नाही असा; अनिवार्य; न सुटणारा. [सं.]

**अटंका** पु. आटोका; व्याप.

**अटंकाळ** पु. दुष्काळ; चणचण; दुर्भिक्ष; महर्गता (पाऊस, पाणी, धान्य वगैरेची.). (क्रि. पडणे, होणे.)

**अटंग–ग्य** वि. १. अवाढव्य; अफाट; भयंकर; विस्तीर्ण; २. घनदाट; निबिड. (गो.)

**अटा** पु. १. टेकण. २. अडथळा; प्रतिबंध : 'हृदय विकळ जेव्हा देहभावा अटा कीं ।' – राधा १४८.

**अटाअट** स्त्री. १. विहिरी, तलाव, नद्या इ. चे पाणी आटून कमी होणे. २. टंचाई; उणीव; कमतरता (धान्य, पैसे वगैरेची).

**अटघाट, आटाघाट** स्त्री. आटापिटा; दगदग; थकवा; शीण.

**अटाट** पु. स्त्री. सोस; हव्यास : 'काय सामानाचा अटाट तुला.' – स्मृचि ५८. श्रम; यातायात : 'ग्रंथ लिहून पूर्ण झाल्यावर छापून काढायची अटाट पडली' – निमा ६१०.

**अटाटा** पु. स्त्री. १. खल; बोलबाला; गाजावाजा : '... त्या रुपयांचा इतका अटाटा झालेला आणि त्या कशा ते मागतील'–पलकोघे २०८. २. धांदल; गडबड. ३. जोर : 'प्रथम दशेचिये अटाटे । माझि कंसा ऐसीं अचाटें । लीळाचि नाशिलीं' – ज्ञा १०.२६८. [क. आड्ड = नाचणे]

**अटाटी** स्त्री. हाल; कष्ट; श्रम : 'टाकिली अटाटी भोगावया'– दावि ३५.

**अटानिमा** पु. त्रास; छळणूक; गांजणूक.

**अटारन्या घोळणे** सतावून सोडणे. (व.)

**अटारा** पु. १. काबाडकष्ट; ढोरमेहनत. २. कष्टामुळे येणारा थकवा, ग्लानी. (क्रि. पडणे, पाडणे.)

**अटारे(रो)टा** पु. १. सारा वसूल करणाऱ्या शिपायाला द्यावयाचा शिधा. २. मोलमजुरी. [ हिं. अटारोटी]

**अटालदार** वि. जमीनजुमला असलेला; मालदार : 'फक्त थोड्या अटालदार शेतकऱ्यांकडे भाताचा साठा... शिल्लक राही.' – माआ २७६.

**अटाला** पु. घरची एकूण माणसे, जनावरे, सामानसुमान; खटला; पसारा; लष्करी तळाचे सामानसुमान, सरंजाम, अवजड सामान इत्यादी.

**अटाली** स्त्री. १. मनोरा; मोठा वाडा. २. गच्ची; माडी; माळा. [सं. अट्टाल]

**अटास** पु. प्रचंड उद्योग; फार कष्ट; अत्यंत परिश्रम; मेहनत; कष्ट; अटाआट. [सं. अट्टायास]

**अटाळा–ळी–ळे** पु. स्त्री. न. १. खटला; मोठा पसारा : 'माझे तीन चुलते व त्यांची मुलेबाळे असा अटाळा होता.'– माआ १३. २. माडी; हवेली : 'माड्या अटाळ्या आणि उंच भिंती' –सारुह ७.६८. ३. गच्ची; मनोरा : 'भाऊसाहेबांच्या आगमनाची बातमी कानी पडताच गणोबा अटाळीवर चढले.' – सोआ ८०.४. अडगळीचा माळा. (व.) [सं. अट्टाल]

**अटांगपटांग** वि. १. लांबलचक; अघळपघळ; लंबाचवडा. २. (ल.) असंबद्ध; विसंगत.

**अटी** स्त्री. १. मोहरमात हातात घालावयाची पिळदार दोरी; सैली; सुताची किंवा रेशमाची लड; कळी. २. पहा : **अट** ९ ३. हट्ट; अट : 'ऐसी एका अटीं । रितीं, शिणतीं करंटी ।।'– तुगा २७८४. ४. कष्ट; श्रम.

**अटीचा करार – खेळ, अटीची बोली** हरेल त्याने आधी कबूल केलेली शिक्षा भोगावी किंवा दंड द्यावा असे ठरवून खेळतात तो शर्तीचा खेळ.

**अटीचा रुपया** पु. आटवण्यास योग्य असे खराब झालेले रुपये.

**अटीतटीचा** वि. चुरशीचा (खेळ, सामना, प्रयत्न इत्यादी.).

**अटीतटीने** क्रिवि. प्रयासाने; प्रयत्नांची पराकाष्ठा करून; चुरशीने.

**अटीतटीला पडणे** इरेला पडणे; हट्टाला पेटणे; दुसऱ्याचे म्हणणे मुळीच मान्य न करता आपलेच म्हणणे पूर्ण मान्य व्हावे असा हेका धरणे : 'या बाबतीत इतक्या अटीतटीला पडायचं कारण काय ?'– दुर्दम्य २३८.

**अटील** वि. हट्टी; अडेल; मानी; अटी घालणारा. [सं. अटल]

**अटीव, आटीव** वि. १. आटीव; उकळून घट्ट केलेले (दूध, खीर इ.). २. वितळलेले ( सोने, धातू इ.). ३. ओतीव; धातू वितळवून त्यापासून बनवलेले पुतळे, शिल्पकाम, इमारती वगैरे : 'अटींवा लोहाचे खांब जैसे ।' – ज्ञा १६.३७९. ४. व्यायामामुळे पिळदार बनलेले (शरीर) : 'जो आटीव जेठिया ऐसा ।'– मुसभा ६.१५३. ५. संकुचित; आकुंचित; आखूड; कमी केलेले (कपडा, पातळ वगैरे).

**अटीवाद** पु. इतरांचे म्हणणे ऐकून न घेता घातलेला वाद; वितंडवाद; हेकेखोरपणाचा वाद; हटवाद.

**अटुकमटुक** पहा : **अटकमटक**

**अटुव–वे** वि. आक्रसलेले; संकुचित; वाकडे : 'अटुवें हिये आवळी ।'– ज्ञा ६.७७.

**अटेट** स्त्री. चपळता : 'जिव्हेचिया अटेटा बडबड कु(र)ठा जीभटा जीभ तुझी' – गरा १७३.

**अटेटा** वि. दांडगा : 'गावामध्ये अटेटा । गजघट वरीठा ।'– गरा २३.

**अटेटा** पु. गोंधळ

**अटेपटेदार** वि. चट्‌ट्यापट्‌ट्याचा; रंगीबेरंगी पट्टे असलेला (पतंग, कपडा वगैरे).

**अटोका** पु. १. बुद्धीची, शक्तीची किंवा सामर्थ्याची मजल. २. झेप; आवाका; योग्यता; आकलन शक्ती; आटोका.

**अटोका (क)ट** वि. १. फार; शिकस्तीचा; पराकाष्ठेचा; सर्व सामर्थ्यानिशी (केलेला प्रयत्न, कष्ट इ.). २. पूर्ण; समग्र; सर्व; एकूणएक.

**अटोप** पहा : **अटप**

**अटोपणे** अक्रि. आच्छादणे : 'तेथे तो वेष द्वीपी : न दिसे तैसा अटोपी : स्वीकरिले तिए स्वरूपी : मागील अंश नाही'. – शिव १८४.

**अटोपी** वि. (व्यवस्था करण्यात) हुशार; तरबेज; चपळ; चलाख.

**अटोफळी** स्त्री. आठ फळांचे वायन; प्रत्येकी आठ असे आठ ब्राह्मणांना द्यायचे ६४ फळांचे वाण; अठफळी; अष्टफळी. [सं. अष्टफल]

**अटोळी** स्त्री. १. फणस व त्यासारख्या खारीक, जांभूळ इ. फळांतील बी; अठळी; आंब्याची कोय. १. पुरुषांच्या वृषणातील दोन गोट्यांपैकी एक; अंड. [सं. अष्टीला]

**अट्ट** पु. बाजार; हाट. [सं.]

**अट्टरणा पाडणे** जनावरांस खूप दमविणे. (माण.)

**अट्टल** वि. १. निपुण; हुशार; उत्तम प्रतीचा; निष्णात. उदा. अट्टल पोहणारा, लिहिणारा. २. पक्का; वस्ताद; तरबेज; बेरकी; लबाड. ३. अस्सल; खरा. ४. स्थिर; अढळ; निश्चल.

**अट्ट(ट्टा)हास** पु.१.जोराने मोठ्याने हसणे; विकटहास्य.२. मोठ्या आवाजात केलेला आक्रोश, मोठा आवाज : 'अचेतन पडिले शरीर प्रेत । जवळी स्त्री आली धावत । अट्टाहासे शोक करीत ।' – हरि ३३.२०८. ३. हट्ट; आग्रह. पहा : **अटास** [सं.] (वा.) **अट्टहास धरणे** – १. महत्त्वाकांक्षा बाळगणे : 'मराठेशाही बुडविण्याचा अट्टाहास धरून आपल्या अफाट सेनेसह...' –स्वप १३३. २. हट्ट धरणे; आग्रह धरणे; हटून बसणे.

**अट्टा** पु. विहिरीच्या तळाशी, बांधकामाच्या खाली बसवलेली चौकट.(बे.)

**अट्टी** स्त्री. पहा : **अट ९**

**अट्टी** वहाणांचा तळ.

**अट्टीखोर – बाज** पहा : **अटखोर**

**अट्टीवाद** पु. हट्ट; दुराग्रह. पहा : **अटीवाद** (क्रि. करणे, लावणे, धरणे.)

**अठ** क्रिवि. इथे, येथे. पहा : **अठे** (खा.)

**अठताल** पु. कर्नाटक संगीतातील एक ताल. याचे मात्राप्रकार पाच आहेत, ते असे : १०, १२, १४, १८, २२, पहा : **अष्टताल** [सं अष्टताल]

**अठतीस** पहा : **अडतीस**

**अठप(फ)ळा–ळे** पहा : **अटपळे**

**अठफळी** पहा : **अटोफळी**

**अठरण** पहा : **अटरणे**; हटणे; अडून बसणे.

**अठरा** वि.१.दहा अधिक आठ मिळून झालेली संख्या. २. (सांकेतिक) पुराणे : 'तो हा पंढरीचा राणा । पुसा सहा चौ अठरा जणा ।' – तुगा २५३९. [सं. अष्टादश]

**अठरा खूम** न. लोकांच्या अठरा जाती. सर्व प्रकारचे लोक; अठरापगड जात : 'या गावात एक मुकादम नाही, अठराखुमाचे अठरा वेगळाले आहेत.'– भाअ १८३४.४७.

**अठरा गुणांचा खंडोबा** पु. १. सर्व (दुर्) गुणांनी भरलेला; लुच्चा किंवा लबाड इसम; अट्टल सोदा. २. कायम रोगी; दुखणेकरी; अनेक रोगांनी, दुःखांनी व्याप्त.

**अठरा धान्याचे कडबोळे** न. १. अठरा धान्ये भाजून केलेल्या पिठाचा एक खाद्य प्रकार. २. (ल.) निरनिराळ्या प्रकारांच्या गोष्टींचे मिश्रण. ३. अनौरस अपत्य. ४. भिन्न जातींचा संकर किंवा त्यातील व्यक्ती.

**अठरा पगड जात** स्त्री. १. तांबट, पाथरवट, लोहार, सुतार, सोनार, कासार, कुंभार, देवळक (गुरव), धनगर, गौळी, लाडवाणी, जैन, कोष्टी, साळी, चितारी. माळी, तेली, रंगारी' – आदि ६.५.३५.३६. जशी युरोपियनांत टोप्यांची अठराटोपकर – तशी हिंदू लोकांची पगड्या बांधण्याची तऱ्हा जातीजातीत वेगळी आहे. तेव्हा जितक्या जाती तितके पगड्यांचे प्रकार; यावरून सर्व जाती किंवा जातीचे लोक; एकूण लोक. अव्यवस्थित, मिश्र जनसमूह; नाना धर्मांचा जमाव.

**अठरा पद्मे वानर** पु. तरुणांचा जमाव, टोळी; सैन्य; वानरसेना. (रामाला मदत करणारी अठरा पद्मे वानरे होती.).

**अठरा पर्वे भारत** न. (ल.) मोठी कंटाळवाणी गोष्ट; अनेक भारुडे व दुःखप्रसंग भरले आहेत असे लांबलचक कथन; चऱ्हाट.

**अठरा बाबू** पु. लबाड किंवा लुच्च्या लोकांची टोळी; आळशी लोकांचा कंपू; अव्यवस्थित लोकांचे मंडळ; बारभाई.

**अठराभार वनस्पती** स्त्री. पृथ्वीवरील सर्व वृक्ष – वनस्पती यांचा समुदाय : 'अठराभार वनस्पतींची लेखणी ।' – व्यं ३१.

**अठरा विश्वे–विसवे** वि. (ल.) अतिशय; आत्यंतिक; पराकोटीचे. (अठरा वीसांश, वीस विसवांचा एक रुक्का. अठरा विसवे म्हणजे दोन विसवा कमी इतके; बहुतेक पूर्ण.)

**अठव, अठवगिरी** पु. आठवण; स्मृती; स्मरण.

**अठवडकरी** पु. आठवड्याच्या आठवड्याला (आठ दिवसांनी) व्याज मागणारा; पिळून काढणारा; सावकार.

**अठवड्या** वि. १. आठ दिवसांनी तापाने आजारी पडणारा; कधी बरा तर कधी दुखणेकरी (चाकर, मूल इ.). २. आठ दिवस दूध देऊन नंतर ते देण्यास बंद करणारी (गाय, म्हैस).

**अठवडे पा(वा)ईक** वि. थोडे दिवस चालणारा किंवा टिकणारा; आठवड्याच्या मुदतीचा; (ल.) थोड्या मुदतीचा, लवकरच कामावरून दूर होण्यासारखा (सरकारी कामगार, नोकर इ.); आठ दिवसांनी बदलायचा नोकर. [पाईक-गावकामगार. वाईक प्रत्यय]

**अठवणूक** स्त्री. १. स्मरण; आठवण. २.एखाद्या माणसाचे, प्रसंगाचे किंवा गोष्टीचे स्मरण करून देणारी वस्तू.

**अठवर, आठुवर** वि. १. अविवाहित; विवाहाचे वय होऊन गेले आहे असा; घोडनवरा-री : 'फुन भूतळीचेआं रायां अठवरां । माझे या खांड्याचा करौनि नोवरा ।।'- शिव ७२७. २. निबर; मोठा.

**अठवे** न. एक माप; अर्धाशेर; पायलीचा आठवा हिस्सा.

**अठसटी-साठ** वि. ६८ संख्या, अड्सष्ट : 'अठसटि तीर्थांचा तोडरू ।' - शिव १४.

**अठळी** पहा : **अटोळी**

**अठंगुळा-ळे, अठंगूळ.** पहा : **अठांगुळे**

**अठायी** क्रिवि. १. अनाठायी; भलत्याजागी; एकीकडे. २. धोक्याच्या जागी; शरीराच्या नाजूक, गुह्यभागी (दिलेला ठोसा, धक्का इ.). ३. दूरच्या जागी.

**अठाविसायुगी** क्रिवि. अठ्ठाविसाव्या युगात. (ल.) कधीच नाही (चार युगांची एक अशा सात आवृत्त्या व्हावयाच्या म्हणजे इतका लांबचा काळ, यावरून लक्षणेने); कडच्या आदितवारी (शेवटच्या रविवारी म्हणजे कधीच नाही).

**अठांगळे-गुळे-गूळ** न. गर्भाधान संस्कार योग्य काळी व्हावयाचा राहिल्यास गर्भधारणेपासून आठव्या महिन्यात पुंसवन व सीमंतोन्नयन या दोन संस्कारांसह गर्भाधान संस्कार करावयाचा असतो. पहा : **अष्टमांगल्य** : 'मग जीवांचेनि मेळे । विकरलेपणाचे आठांगुळे केले ।।' -शिव ९०. [सं. अष्ट +अंगुल]

**अठि** स्त्री. अष्टमी : 'आषाढ मासे अठि'- कनाइ शिला १.४.

**अठिवेठी, अठीवेठी, आठीवेठी** स्त्री. येरझारा; जा-ये; जाणे-येणे.

**अठी** स्त्री. १. कपाळावरील सुरकुती; अढी; वळी; मोहरममधील सैली. पहा : **अटी**. २. बैदुलाच्या खेळात बैदूल उडविणाऱ्या बोटाला आधार म्हणून जो आंगठा टेकतात तो. (क्रि. धरणे). ३. मिठी; ऐक्य.[का. अड्ड]

**अठी** स्त्री. १. फळातील बी; अटोळी; अठळी. २. (ल.) कठीण, चिवट, गोष्ट, मुद्दा, प्रसंग; अवघड, भानगडीची बाब. ३. लाकूड, झाड इत्यादीचा गाठाळ भाग. ४. मनातील गाठ किंवा विपरीत ग्रह.

**अठी-ठे** क्रिवि. इथे, येथे. [सं. अत्र ]

**अठी-अठे** क्रिवि. १. आठांनी गुणले असता, 'एकी अठी आठ.' २. कोणत्याही अंकाला आठने गुणायचे असता त्या अंकाच्या सामान्य रूपापुढे योजावयाचा शब्द. [सं. अष्ट]

**अठीतठी** क्रिवि. इकडे तिकडे; येथे तेथे. [सं. अत्र +तत्र]

**अठुला** पु. एक कर्णभूषण : 'अठुळे लोळीया ढाळ देती' -ज्ञागा २२४.

**अठुरठी** क्रिवि. पुष्कळ; भरपूर. (कु.)

**अठूळ** अटोळी.

**अठेताळीस** वि.अठ्ठेचाळीस : 'हे सोने अठेताळीस कस' - गोप्र ३०६.

**अठोक परब्रह्म** न. (ब्रह्माचे एक गुणनाम). १. असामासिक सिद्ध किंवा असाधित शब्दाला ही उपरोधिक संज्ञा लावतात; मूळ शब्द. २. (ल.) मठ्ठ; दगड; ठोंब्या; ज्याला शिकवण्याचा काही उपयोग नाही असा; शुद्ध, जन्मजात दगड. ३. ज्याची व्युत्पत्ती देता येत नाही असा शब्द; स्वयंसिद्ध; न घडलेला. ४. न घडवलेला काळा फत्तर.

**अठोनी वेठोनी** वि. १. पिळदार; पट्टीदार, अक्कडबाज. २. (ल.) वेडावाकडा; कसातरी : 'अठोनी वेठोनी बांधला मुंडासा । फिरतसे म्हैसा जनामधी ।।' - तुगा ३१७४.

**अठोपहार, आठोपहार, आठोपार** क्रिवि. १. नेहमी; सतत; कायम. २. दिवसाचे आठ प्रहर म्हणजे सारा दिवसभर. [सं. अष्टौप्रहर]

**अठोपहार बत्तीसघड्या** क्रिवि. निरंतर; रात्रंदिवस; चोवीस तास.

**अठोफळी** पहा : **अटोफळी**

**अठोळा-ळी** पु. अठळी; बी. पहा : **अटोळी** : 'बोरामध्ये वसे अळी । अठोळीच भोवती ।।' - तुगा २४५२.

**अठ्ठा** पु. फाशाच्या खेळात आठाचे दान; पत्त्याच्या खेळातील आठ चिन्हांचा पत्ता; अड्डा : 'तरीही तो अठ्ठ्यावर जातोच, अन् न खेळता नुसताच बसून राहतो' - चिताक १८३. [ सं. अष्ट ]

**अठ्ठावन-न्न** वि. ५८; पन्नास आणि आठ मिळून होणारी संख्या. [सं.अष्टपंचाशत]

**अठ्ठावीस** वि. २८; वीस आणि आठ मिळून होणारी संख्या. [सं. अष्टाविंशती]

**अठ्ठी** क्रिवि. (पटाच्या खेळात) आठव्या घरात; पत्त्यांच्या खेळातील आठ चिन्हांचे पान. पहा : **अठी** [सं.अष्ट]

**अठ्ठेचाळ-चाळीस,अठ्ठेताळ-ताळीस,अठ्ठ्येचाळ-चाळीस-** वि. चाळीस आणि आठ मिळून होणारी संख्या; ४८. [सं. अष्टचत्वारिंशत]

**अठ्ठ्या** पु. गंजिफा आणि पत्त्यांच्या खेळातला आठ चिन्हांचा पत्ता; अठ्ठा.

**अठ्ठ्याऐंशी, अठ्ठ्यांयाशी, अठ्ठ्याशी** वि. ऐंशी व आठ मिळून होणारी संख्या; ८८. [ सं. अष्टाशीति]

**अठ्ठ्याणव** वि. १. नव्वद आणि आठ मिळून होणारी संख्या; ९८. २. (व.) बदमाष; लबाड. [सं. अष्टनवति]

**अठ्ठ्याहत्तर** सत्तर अधिक आठ मिळून होणारी संख्या; ७८. [सं. अष्टसप्तति]

**अड** पु. १. अडथळा; अटकाव; आडकाठी; प्रतिबंध; विघ्न; हरकत. २. दुराग्रह; हट्ट; हेका. ३. बोली; अट; शर्त : 'ते नवऱ्याकडचे, जर त्यांनी अड घेतली की नाच पाहिजे तर तुमचे चालणार नाही.'-

मासंवा २.१८३. ४. ठरावातील शर्ती पूर्ण न केल्याबद्दल लागणारा दंड.(वा.)**अड खाणे** – आड खाणे; आडकाठी घालणे; हटून बसणे : 'रोखच रुपये द्यावयाचा पंथ पहिल्याने घातला, आता पागेची घोडी देणार, तेव्हा लोक अड खातात.'– ऐलेसं १८२८. [का. अड्ड]

**अड** पु. तट, खोळंबा.

**अड** पहा : **आड** : 'आदीत्या उत्तरे अडु ॥' –स्थापो ५५.

**अड, आड** अ. कमीपणा, उणेपणा, दुय्यमपणा, न्यूनता, गौणता दर्शविणारे उपपद. हे उपपद लागून कित्येक सामासिक शब्द बनतात; जसे अडघोडा, अडधोतर, अडलंड, अडसर इ. अडच्याऐवजी कधीकधी 'आड' असे रूप येते.

**अडआडी** स्त्री. प्रतिबंध; तेढ.

**अडउ** वि. अवघड; दुर्गम : 'योगिंया रिगता अडउ : जेथ शक्तितरूचा आरउ' – शिव १०९.

**अडकट–कंठ** पु. आडमार्ग; आडवाट; कठीण वाट; रान : 'येई प्राणायामाचेनि अडकंठे । वरौता गा ॥'–ज्ञा ६.५५.

**अडकण** न. अडथळा किंवा अटकाव करणारी कोणतीही वस्तू. उदा. धुणा; गाडी थांबविण्यासाठी लावलेला दगड; दाराची खिटी; उटी; माळेची गाठ; अडसर; खिळा वगैरे.

**अडकणी** स्त्री. तांदूळ, डाळ इत्यादिकांची मोठी कणी; फुटका अर्धवट दाणा; कणी : 'कापुरांचिआं भांजनियां । वाटौनि मौक्तिकांचिआं अडकणियां ॥'–शिव ५९१. [सं. अर्धकण]

**अडकणी** स्त्री. १. अडकवणे; थोपवणे; थांबवणे; अडचणे; अडथळा करणारी गोष्ट. २. दाराची कडी; खीळ; खिळी.

**अडकणे** अक्रि. १. पुढे सरकू न शकणे. २. कुंठित होणे; थांबून राहणे; कुचंबणा होणे. ३. पेचात पडणे; गोवले जाणे किंवा सापडणे. ४. कशात तरी रूतणे, फसणे. ५. प्रतिबंध होणे; चिकटले जाणे; कुंठितगती होणे; थांबवले जाणे; एखादे काम, भानगड इ.त गुंतून पडणे.

**अडकणे** न. पुरुषांचा एक सोन्याचा दागिना.

**अडकर** वि. १. हट्टी; हेकेखोर. पहा : **अटखोर**. २. अडून बसणारा; अडेल (घोडा).३. गच्च बसणारा; कठीण; जड (कपडा, खिट्टी इ.).

**अडकवण** स्त्री. ज्यामुळे अटकाव होतो ती वस्तू (गाठ, आकडा, घोडा, फासा इ.); अडकण.

**अडकवि (व)णे** उक्रि. १. थांबविणे; थोपविणे; हरकत करणे; अटकाव करणे; प्रतिबंध करणे; बंद करणे. २. गुंतविणे; बांधून टाकणे.

**अडकळणे** अटकळ असणे; अंदाज असणे.

**अडका** पु. १. अर्धा रुका (नाणे); एक अतिशय कमी किंमतीचे तांब्याचे नाणे. २. (सामान्यत:) दाम; पैसा : 'ऐसे गुरू अडक्याचे तीन । मिळाले तरी त्यजावे ॥' – दास ५.२.२१. ३. रुक्याचा चतुर्थांश. ४. जमिनीच्या मोजमापात अर्धा रुका (६५ बिघे जमीन.) [सं. अर्द्धक] (वा.) **अडक्याचा घोडा** – (ल.) थोडक्या प्रवासाने व हलक्या मोलाने मिळणारी वस्तू. **अडक्याचे तीन** – अतिशय स्वस्त; क्षुद्र.

**अडका, अडके** न. स्त्री. (गोंडी)

**अडकाअडकी** स्त्री. गुंतागुंत; अटकाव; अडथळा.

**अडकित्ता** पु. १. सुपारी कातरण्याचे-कापण्याचे एक हत्यार; साधन; सरोता. २. (ल.) ताब्यात किंवा धाकात ठेवणारा माणूस; वस्तू. (वा.) **अडकित्त्यात घालणे, धरणे**–अडचणीत, पेचात धरणे. **अडकित्त्यात पडणे, सापडणे** संकटात, पेचात पडणे. [क. अडकोत्त]

**अडकूल, आडकूल** न. पोहे; भातकूल. (व.)

**अडके** न. अडथळा; आडकाठी; प्रतिबंध; विघ्न; त्रास.

**अडखप्या** वि. १. अंगमेहनतीने कामे करून पोट भरणारा (मुलगा, पोऱ्या). २. किरकोळ काम करणारा (नोकर); आडकाम्या; बगल्या; दुसऱ्याच्या हाताखाली काम करणारा.

**अडखर्च** पु. संसारास नित्य लागणाऱ्या अन्नवस्त्रादी जरुरीच्या मुख्य खर्चाखेरीज किरकोळ खर्च किंवा जादा खर्च.

**अडखळ–खुळा–खूळ** १. अडथळा; अटकाव; व्यत्यय; अडचण; अडगळ : 'कर्माकर्म अव्यक्त मूर्ती । कैशापरी अडखळ ॥' – भवि १४.१५४. २. ठेच लागण्यासारखी, अडथळा होण्याजोगी जागा. ३. खोळंबा; खोटी; विलंब.

**अडखळण–णी** स्त्री. १. ठेचकाळून पडण्यासारखी जागा, प्रसंग; अडखळ; ठेचकळणी. २. एखादी वस्तू पडू नये, सांडू नये म्हणून केलेली योजना (उदा. दौतीचा ठोकळा, दाराची खिटी, खीळ, जोडवे पडू नये म्हणून केलेले वलय इ.).

**अडख(खु)ळणे** अक्रि. १. ठेचकाळून थांबणे; ठेचकाळणे; धडपडणे; गतिरोध होणे; अडणे : 'अडखुळलों भ्यालों म्हणती ते पतिव्रते ।' – वसा ४.२. २. जिव्हादोषामुळे किंवा घाबरून भीतीने बोलताना अडणे; चाचरणे; घुटमळणे. ३. कामात कचरणे; घरसोड करणे; कां कूं करणे; ना नू करणे. ४. गुंतणे; हात अडकणे. ५. तडकणे. [सं. अर्धस्खलन]

**अडखंड** पु. तुकडा; अर्धवट, अपुरा भाग : 'मालात माती नसून अडखंड नसावेत.' – मुंव्या २६.

**अडखुळा** वि. १. भयभीत; भेदरलेला; स्तंभित : 'जेहि अडखुले केले असुर । धाकुटेपणी ॥'– नरुस्व २९२. २. बोलताना चाचरणारा; तोतरा.

**अडखोर** वि. हट्टी; आडमुठा; हेकेखोर; आग्रही; अडेल. पहा : **अडकर**

**अडखोल** न.१. बांधून न काढलेली, सरासरी खणलेली विहीर; रेताड जमिनीत खणलेली व न बांधलेली विहीर. २. केरकचरा टाकण्याची विहीर; खड्डा; अर्धीच खणून टाकलेली विहीर.

**अडगई** स्त्री. महाळुंग सोलून, शिजवून त्यात दही, हिंग, मीठ वगैरे घालून केलेले रायते; कोशिंबीर; लिंबू आदि फळांची साले व आले, इ. चे लोणचे.

**अडगव, अडगवणी** स्त्री. १. भाताचे पीक तयार होऊन कापून वाळले म्हणजे त्यांचे भारे बांधून उडवी डाळतात ती कृती. २. रचना; लावालाव; व्यवस्था; यथायोग्य मांडणी. (कों.)

**अडगव (वि)णे** सक्रि. १. योग्य जागी, जागच्याजागी ठेवणे; व्यवस्था करणे; योग्य रीतीने निकालात काढणे; नीट लावणे. (कों.)

२. कामधंद्याकडे उपयोगात आणणे; उपयोगी लावणे; (कों.) ३. (ल.) मरणोत्तर निरवानिरव करणे; विल्हेवाट लावणे. ४. निवडणे. अक्रि. १. आळसाने पडून राहणे. २. सुस्त पडून राहणे किंवा निजणे.

**अडगळ** स्त्री. १. निरुपयोगी, अडचण करणाऱ्या वस्तू, सामान; पसारा; परवड; नको असलेली वस्तू, माणूस. २. निरुपयोगी वस्तू टाकण्याची, उपयोगात नसलेली, अडचणीची जागा. ३. वाडी; खेडेपाडे.

**अडगळ** पु. (क्र.) दाराला लावलेला अडसर; अगळ. [सं. अर्गला]

**अडगळीचा** वि. गावंढळ; खेडवळ; गव्हार; अप्रसिद्ध.

**अडगा** वि. अडाणी; अशिक्षित; अज्ञ : 'एखाद्या अडग्या कुंभाराने गणपती करावा तसा त्याला देवाने घडवला होता.' – काआ १८. (ग्रा.)

**अडगाई चाटाई** स्त्री. लाडिकपणा; लघळपणा : 'ऐसे लटिकेचि अडगाई चाटाईने बोलिला ।'– पंच २.१५.

**अडगाळा** पु. बैलगाडीचा साटा. (बे.)

**अडगिरा(ऱ्हा)इक** पु. दुकानदारापासून प्रत्यक्ष विकत न घेणारा माणूस. [सं. अर्धग्राहक]

**अडगुण बडगुण** न. निरुपयोगी, फालतू वस्तू; सटरफटर सामान; अडगळ.

**अडगुलं मडगुलं** वि. खेळकर आणि बोलके (मूल). [ का. आडु= खेळ + कुळी =कर याप्रमाणे प्रत्यय]

**अडगोण–णी** स्त्री. बैल वगैरे जनावरांच्या पाठीवरून वाहून नेतात ती धान्याची लहान गोणी.

**अडघडी** स्त्री. मांडणी; रचना.

**अडघण** न. हट्टी; हेकेखोर; लवकर वठणीस न येणारा. (ना.)

**अडघर** न. १. मुख्य घराजवळ बांधलेले लहानसे घर किंवा छप्पर; झोपडे. २. सोपा; पडवी. [ सं. अर्धगृह]

**अडघाली** स्त्री. आडमार्ग.

**अडघोडा** पु. लहान घोडा; प्रसंग विशेषी मोठ्या घोड्याचेही काम करणारा घोडा; तट्टू. [ सं. अर्धघोटक]

**अडच–च्च** क्रिवि. गच्च; मजबूत; घट्ट; आवळून; अडून.

**अडचण** स्त्री. १. अरुंदपणा; चिंचोळेपणा; जागेचा अभाव; आकुंचितपणा; संकोच; दाटीवाटी; कोंडी. २. गर्दी, दाटी यामुळे होणारा त्रास किंवा उपद्रव; गैरसोय. ३. सटरफटर; निरुपयोगी सामान; अडगळ. ४. (ल.) पंचाईत; निकड; तारांबळ; लगबगीचे, घाईचे काम, वेळ, स्थिती; संकट; निरुपाय दशा; त्रास. ५. बैगुण्य; तंगी; टंचाई; पैशांचा अभाव. ६. ज्यामुळे काम थांबते अशी गोष्ट. (वा.) **अडचण येणे** – १. काही विघ्न येणे. २. सुतक येणे. ३. रजःस्वला होणे. **अडचण सांगणे** – सबब, खेकटे, नड सांगणे.

**अडचणणे** अक्रि. १. गर्दी, दाटी, अडचण होणे, चिमटले जाणे. २. तारांबळ होणे; ओढ, निकड, टंचाई जाणवणे. ३. अतिशय घट्ट किंवा तंग होणे, (वस्त्र, पोशाख इ.).

**अडचणीचे दुःख** न. भलत्याच किंवा अवघड जागी (गुह्य जागी) झालेले दुःख, आजार, विकार.

**अडचणूक** स्त्री. घोटाळा; गैरसोय. पहा : **अडचण**

(वा.) **अडचणूक मोडणे**– नड, अडचण नाहीशी करणे; अडचण काढून टाकणे; विघ्न, संकट निवारणे.

**अडचणे** अक्रि. १. आवळ, घट्ट होणे; दाटणे; अडस होणे (कपडा, बांगडी). २. आवळणे; आवळून बांधणे; थोड्या जागेत समाविष्ट करणे (वस्तू, ओझी). ३. (ल.) अडचणीत सापडणे; संकटात असणे.

**अडची** स्त्री. १. गाय, म्हैस इत्यादिकांचे दूध काढण्याच्या वेळी त्या हालू नयेत, त्यांनी लाथा मारू नयेत म्हणून दोन्हीकडे बांधायचे वासे. २. दुर्गम मार्ग.

**अडचे–जे** क्रिवि. (अडचाच्या पाढ्यात) अडीच वेळा : 'पंचवीस अडचे साडे बासष्ट'; अडीचपट.

**अडण** स्त्री. १. सुपाच्या काठाला मजबुतीसाठी लावलेली कामटी. (ही चिव्याची असते.) २. संकट; अडचण: 'धावसी आडणीं ऐकोनियां धावा । कइवारें देवा भक्तांचिया ।।' – तुगा ८६८.
वि. हट्टी; माथेफिरू; स्वेच्छाचारी. [का. अड्ड ]

**अडण, अढण** न. गाई–म्हशीचे सड; कास; अडाणा.

**अडणा–णे** पु. अडसर; अगळ : 'पाठोपाठ अडणा सरकवल्याचा आवाज आला.' – श्रीयोभा १. [का. अड्ड]

**अडणी,अढणी** स्त्री. १. दिवा, भांडी वगैरे ठेवण्याकरता तिवई, चौरंग : 'अडणीवरि सोन्याचे ताट ।।'–सुदा ३४; बैठक; स्थान. २. शंखाची बैठक; तिवई. ३. अडसर. ४. लाकडी पाटास खालून लावलेल्या दोन लाकडी कातीव पट्ट्या. ५. दाराची लाकडी कडी.(कों.) ६. टेका; आधार : 'घायाळा घालोनि वोडणी । धनुष्यदंडाच्या अडणीं । उचलोनि दोघीं दोघीजणी । वीर श्रेणी आणिल्या ।।' – एरुस्व १२.२६. ७. सुपाची पुढील कामटी. ८. मर्यादा; सीमा; रंगण : 'इंद्रधनुष्याचिये अडणीं । माजी मेघ गगनरंगणी । तैसे आवरिले शारङ्गपाणी वैजयंतिया ।' – ज्ञा ११.६०३. [का. अड्डणी]
(वा.) **अडणीवरचा (शंख)**– १. शंख. २. (ल.) मूर्ख; अशिक्षित माणूस. ३. उच्च स्थानावर–अधिकारावर असलेला बेअकली माणूस: 'पण शिकण्यासवरण्यात तो अडणीवरचाच झाला.' – यख ४४.

**अडणी** स्त्री अडचण; संकट : 'पडिलेयां संसारीचीए अडणी : जो पुरवी ब्रह्मविद्येची तवनी'–उगी ४.

**अडणूक, आडणूक** स्त्री. १. अडचण; अडथळा; हरकत : 'परोपरी सिकावणें । आडणुका सांगत जाणें ।।' – दास १९.१०.१५. २. अट; हट्ट; विरोध. ३. अडवणूक; प्रतिबंध करणे. [का. अड्ड]

**अडणे** अक्रि. १. प्रतिबंध–अडथळा होणे; अडकला जाणे; वेढला जाणे; खोळंबून राहणे. २. आवळ, घट्ट बसणे; अडस होणे; जेमतेम जाणे, दाटणे. ३. प्रसूतीत अडथळा येणे. ४. दाटणे; संकटात सापडणे–पडणे; चिमटले जाणे. ५. चालता–चालता थांबणे; स्तब्ध राहणे; पुढले पाऊल न टाकणे (गाडी, घोडा इ.) ६. वेढणे; अडविणे; व्यापणे. ७. रुसून बसणे; हट्टाला पेटणे. ८. इनकार करणे; ना म्हणणे; नाकारणे. ९. कुंठणे; कुंठित होणे; निरुत्तर होणे. १०. काही नवीनच अटी उपस्थित करून एखादे कार्य करण्याचे नाकारणे. ११. अडचणीत किंवा नडीला सापडणे. १२. एखादी वस्तू नसल्याने खोळंबा होणे;

गरज लागणे. [का. अड्ड]

**अडत** स्त्री.१. व्यापारातील देवघेव; दलाली. २. माल घेतल्याची पावती, पट्टी.

**अडत** स्त्री. १. सराफी किंवा व्यापारी व्यवहारातील पत्रव्यवहार किंवा देवघेव. २. दलाली. ३. दस्तुरी; दुकानाची पट्टी. ४. मुनीमपणा, गुमास्तेगिरी.

**अडत** स्त्री. अट : 'मी त्याजला अडत लिहून दिली आहे की आम्ही तुमचे व्याज सुद्धा पैसे दिल्यास यात्रेचे पुण्य आमास मिळावे.' –जयराम स्वामी बखर ३.

**अडत करणे** व्रत किंवा नेम करणे.

**अडतट्टू** पु. १. अडणारा, अडून राहणारा तट्टू; अडेलतट्टू २. (ल.) अडून बसणारा; तिरसटपणा, हेकेखोरपणा करणारा; सरळ न वागणारा.

**अडत विक्रेता** पु. अडत घेऊन विक्री करणारा; कमिशन घेऊन विकणारा.

**अडताल** पु. एकताल. (संगीत) पहाः **झंपाताल**

**अडताळा** पु. १. पहा : **अडथळा** : 'काहीच सद्भक्ता नसे अडताळा ।।' – दावि ५. २. हिशेबाचा पडताळा. (क्रि. येणे, पाहणे.). ३. घोळ; घोटाळा; गोंधळ : 'नरहरराव लक्ष्मण याचे कर्जाचा हिशेबाचा अडताळा पडला आहे.'– मइसा १३.१५५.

**अडती** स्त्री. १. प्रतिकार; अडवणूक; अडथळा; विरोध. २. सतारीची – वीण्याची खालची घोडी; चौकी. ३. दाराची खिटी. (वा.) **अडती घालणे**– मोडता घालणे.

**अडतीस** वि. ३८ ही संख्या; तीस अधिक आठ मिळून होणारी संख्या. [सं. अष्टत्रिंशत]

**अडत्या** (स्था.) पु. बाजूचे हुक.

**अडत्या** पु. मध्यस्थ; दलाली घेऊन मालाची खरेदी विक्री करणारा.

**अडथ** वि. भरदार; विस्तृत : 'अडथा उंचा स्तनाचिया आबुलिया... आलिंगन देति' – वैवसं ११.

**अडथळणी(णूक)** स्त्री. हरकत. पहा : **अडथळा**

**अडथळणे** उक्रि. प्रतिबंध, हरकत, अटकाव करणे; प्रत्यवाय, विघ्न आणणे; बंद पाडणे.

**अडथळा** पु. १. चालणाऱ्या माणसाला, वाहनाला पुढे जाता येणार नाही अशी मार्गात आलेली वस्तू. २. अटकाव; हरकत; अडचण; प्रतिबंध; विरोध.३. खोळंबा; खोटी; गुंता.

**अडदर–दरा** पु. धाक; भय : 'तेथ दानवा अडदरू । नागार्जुनाचा दातारू ।' – शिव ३६३.

**अडदरणे** अक्रि. घाबरणे; हादरणे; थरथरणे : 'आकाश असे अडदरत ।' – राज्ञा १.१५६.

**अडदरी** स्त्री. खोल, अडचणीची, एकीकडची दरी, जागा : 'दंभमान तो पहाडफत्तर । अडदरी वागती पाशादि तस्कर ।।' –दावि ७६१.

**अडदल, अडली** पु. लष्करी अधिकाऱ्याचा हुजऱ्या. [इं. ऑर्डली]

**अडदाणा** पु. हरभरा खेरीजकरून घोड्याला जे इतर धान्य खायला देतात ते. (हरभरा हे घोड्याचे उत्तम पौष्टिक धान्य समजले जाते. त्याला नुसता दाणा हा शब्द लावतात.)

**अडदाणी** स्त्री. कपडे वाळत टाकायची दांडी : 'हे घ्या. आंग पुसा नि अडदाणीवर टाका.'–खळाळ ८३.

**अडदावा** पु. गूळमिश्रित हरभऱ्याची डाळ. (तट्टांचा खुराक.)

**अडदाळ** स्त्री. डाळीतील कणी, जाड तुकडे; अडकणी.

**अडन** संकट; अडचण : 'पडलियां संसाराचियां अडनीं' – एभा ११.४.

**अडनड** स्त्री. अडचण.

**अडनर** स्त्री. स्त्रीत्व नसलेली स्त्री; ऋतू प्राप्त होत नाही अशी स्त्री.

**अडनळ** पु. १. रहाटगाडग्याच्या कोळंब्यापासून मोठ्या पन्हाळापर्यंत पाणी जाण्यासाठी घातलेला, दोन्ही तोंडे बंद असलेला व एका टोकास खालच्या बाजूस पाणी पडण्यासाठी भोके असलेला लहान आडवा पन्हळ. २. दार लावल्यावर दारावर बसवितात ती चिमणी; खिटी.

**अडना** पु. दाराचा अडसर.

**अटनाट–ड,अडनीट–नेड** वि.नीट किंवा बरोबर नसलेला; अधल्यामधल्या संख्येचा किंवा परिमाणाचा, मापाचा; गैरसोईचा.
वि. भूपृष्ठाशी समांतर.
क्रिवि. अनिश्चितपणे; धड इकडे नाही, धड तिकडे नाही अशा तऱ्हेने. [सं. अर्ध + नीत ]

**अडपझडप** क्रिवि. १. चोरूनमारून; अयोग्य किंवा भलत्याच प्रकारे; कपटाने; अनेक उपायांनी; नाना तऱ्हेने; हरएक युक्तीने; (प्राप्ती, मिळविणे) डल्ला मारणे. २. लपूनछपून; गुप्तपणे (व्यभिचार करणे). वि. १. अप्रत्यक्ष; अनिश्चित; जादा (नफा, खर्च) २. संकीर्ण; मिश्र; अस्पष्ट (गोष्टी). ३. बिनमाहितीचा; जमावातील किरकोळ, अप्रसिद्ध (इसम, माणूस) : 'काही अडपझडप सरदार विशाळगड सोडून पळण्याच्या बेतात होते.'– स्वप १७३. ४. लहान; हलकी; किरकोळ (कामे, उद्योग).

**अडपडदणी** स्त्री. न्हाताना किंवा आंघोळ करताना स्त्रियांचे अंगाभोवती गुंडाळण्याचे लहानसे जुनेर किंवा वस्त्र.

**अडपणे** उक्रि. १. अडचणीत, दगदगीत पडणे. २. अडवणे. [का. अड्ड]

**अडपतादडपता** वि. देखरेख करणारा; ताळ्यावर आणणारा; नियंता; दाबात, धाकात, जरबेत ठेवणारा (वडील माणूस) : 'कुणी अडपतं नाही, दडपतं नाही, नवरा आंधळा' – पडघवली २०५. [ दडपताचे द्वि.]

**अडपदडप** स्त्री. दाब; धाक; वचक.

**अडपन्हळ** पहा : **अडनळ**

**अडफळे** पहा : **अटपळ**

**अडबंक–ग,अडबंगा–गी, अडवांक** वि. १. भसाडा; वाकडातिकडा; ढोबळ; भोंगळ; ओबडधोबड. २. मूर्ख; स्वेच्छाचारी; अडमुठा; दुराग्रही; अडेल (घोडा); हेकट. ३. ठोकळ; आडमाप. [हीं. अडबंगा]

**अडबंकी** स्त्री. दाराची खीळ.

**अडबंद** पु. कटिसूत्र; करदोडा : 'नासिले अडबंद कौपिन माळा ।' – तुगा २८९७.

**अडबेले** न. गळ्यात होणारा एक रोग.

**अडभरी भरणे** १. धुमाकूळ, धिंगाणा, दंगा घालणे. २. हट्टास पेटणे; हेका न सोडणे.

**अडभंग** अडबंक.

**अडमड** स्त्री. १. लहान मुलाची लुडबूड; चुळबूळ; अंगवळा; खोडकरपणा. २. अधेमधे येणे.

**अडमडणे** अक्रि. १. खोड्या करणे; चुळबुळ करणे (लहान मुलाबद्दल वापरतात.) २. धडपडणे; ठेचाळणे; त्रासात, संकटात असणे. ३. अडथळा होईल अशा प्रकारे चालणाऱ्याच्या वाटेत येणे; पायात गुरफटणे.

**अडमाप** न. १. वाजवी; खऱ्या मापापेक्षा कमी अगर जास्त असलेले असे अधलेमधले माप. २. (ल.) खोटे माप. ३. ठरावीक मापाच्या बरोबर नसणारे माप. (वा.) **अडमापाने मोजणे** - १. बेसुमार, गैरशिस्त अंदाज बांधणे; अपेक्षा करणे; फाजील आशा धरणे. २. ठराविक प्रमाणाच्या मापाहून अन्य मापाने मोजणे. ३. भरमसाटपणे गणती, मोजणी किंवा मापणी करणे.

वि. प्रमाणशीर किंवा प्रमाणबद्ध नसलेला; आडवातिडवा.

**अडमुसणे** अक्रि. १. गुदमरणे; घाबरा होणे; जीव कोंडल्यासारखा होणे; २. (तापामुळे) नि:शक्त होणे; गठडी वळणे; अडमुशी होणे. [ सं. अर्ध +मुह् ]

**अडल-ला** न. अडचण; प्रतिबंध. पहा : **आडल** : 'दिशा झालिया सानुकूल । मधील गेले माया अडल ।' - सिसं ४.५१.

**अडल** पु. संरक्षण; साहाय्य : 'तूं धर्माचा कुढावा : तरि तयाचा अडलु करावा'- शिव ४९०.

**अडल** स्त्री. बदकाची एक जात.

**अडलंड** वि. १. प्रसंगी आडवा किंवा विरुद्ध बाजूचा होणारा; गरजेच्या वेळी धोका देणारा; संकटप्रसंगी सोडणारा; तोंडघशी पाडणारा (इसम, घोडा). २. हेकट; हट्टी; कटकट्या; अडतट्टू.

**अडलाऊ, आडला** पु. स्त्री. न. १. फळे वगैरे चिरण्याचे, सोलण्याचे, कापण्याचे साधन; पोलादी पाते; विळी; कोयती : 'की प्रमदाचा बळिया । अडलाऊं तो ।।' - शिव २६४. २. (सामान्यत:) शस्त्र. पहा : **आढाल**

**अडलाव** संरक्षण; पाठीराखेपणा : 'तू धर्माचा कुढावा । तरि तेयांचा अडलाओ करावा ।' -शिव ४९१.

**अडलाग** पु. चोळीच्या दोन्ही बाजूंची पट्टी (बगलेच्या खाली येणारी) : 'खणावर जागा नाही म्हणून अडलागाचे दोन्ही तुकडे खोळंबून होते.' - रथ १८८.

**अडला भिडला** वि. संकटात, अडचणीत पडलेला; त्रस्त : 'अडल्या भिडल्यासी वेगीं पार पाडूं ।' -दावि ४२८.

**अडलेपण** न. १. हट्ट. २. संकटात सापडणे : 'जीव अत्यंत अडलेपणे । ईश्वरासि 'धांव धांव' म्हणे ।'- एभा ११.१७२.

**अडव** न. जंगल; अरण्य : 'तरि वाघाचिये अडवे ।'-ज्ञा १३.७६४. [सं. अटवी]

**अडव** न. शेतात उपटून ठेवलेले हरभऱ्याचे डाहळे; रोपे; मुठीत मावेलशी (हरभऱ्याची) पेंढी.

**अडव** पु. १. अडचण; अटकाव; हरकत. २. परीक्षा; कसोटी.

**अडव** वि. वाईट; असार.

**अडवट-ठ, आडवट** न. १. अनघड तुळई; तुळईच्या उपयोगी लाकूड; आडवे, मोठे लाकूड; आडवा सोट. २. आडवी तुळई; लाट; गज. ३.विणलेल्या कापडातील आडवे धागे; आडवीण. ४. गोणीच्या मधोमध असलेली बैलाच्या पाठीवरील रुंद पट्टी. ५. गाडीची खरडी; उतारावरून जाताना गाडी घसरू नये म्हणून गाडीच्या मागच्या चाकांना बांधलेली आडवी काठी.

पु. नथीचा मधला भाग. त्यातील दोन मोती.

**अडवड** स्त्री. काळी-तांबडी मिश्र जमीन.

**अडवण** स्त्री. न. १. अडवणूक; अडथळा; हरकत; प्रतिकार. २. अडचण; अडथळा करणारी किंवा थांबविणारी कोणतीही वस्तू; अडकण; आडकाठी; उटी.

**अडवण** स्त्री. आडवी वीण; आडवीण; पूरण; बाणा (उभवण किंवा ताणा यांच्या उलट). वस्त्र विणताना धोट्याने शिरकावले, गुंफले जातात ते आडवे धागे (ताणे).

**अडवणी** स्त्री. (नाविक) १. (अव.) गलबताच्या दोन फळ्यांना जोडणारे सरळ वळ किंवा आडव्या रांगा. २. (एकव.) समुद्राच्या पाण्याच्या झडीकरिता गलबताच्या दोन्ही बाजूंस बांधलेली लाकडी साटी.

**अडवणूक** स्त्री. १. अडवणे; थोपवणे; थांबवणे; अडथळा; हरकत; प्रतिबंध; अटकाव. २. बहिष्कार; नि:शस्त्र प्रतीकार; सत्याग्रह : 'अडवणुकीच्या मार्गानेच सरकारास वठणीवर आणले पाहिजे.' - लोटिकेले ३.१९९. ३. कामात आणलेल्या अडचणी.

**अडवणे-विणे** सक्रि. अडथळा आणणे; आडवे येणे; रोखणे; जात असलेल्या माणसाला -जाणाऱ्याला, पुढे जाऊ न देणे.

**अडवण्या** स्त्री. जेष्ठा नक्षत्र व त्या नक्षत्रात पडणारा पाऊस.

**अडवण्या** वि. थोपवणारा किंवा अडथळा करणारा; अडवणारा.

**अडवताव, अडवंताव** पु. अडथळा : 'आणि राजा जिया वाटा जाए । ते चोरांसि अडवंतावो होये ।' - राज्ञा १८.७२१. [क्र. अड्ड +ताव ]

**अडवळघुम पडवळघुम** मुलींचा एक खेळ. दोन मुलींनी पाठीला पाठ लावून उभे राहून परस्परांचे हात धरून हे गाणे म्हणत हा खेळ खेळावयाचा असतो.

**अडवंकी-गी, आडवंकी** स्त्री. १. अडसर, खीळ : 'नवद्वारांचिया चौचकीं । बाणूनि संयतीची आडवंकी ।।' - ज्ञा १२.५२. २. अडथळा; अडकाठी. ३. आडमार्ग; वाईट मार्ग.

**अडवंटी** स्त्री. आडमार्ग; कुमार्ग.

**अडवंता** पु. अडवण्या.

**अडवाल** वि. हट्टी; हेकेखोर (मूल).

**अडविणे** सक्रि. १. थोपविणे; थांबविणे; हरकत, अडथळा, अटकाव करणे; प्रतिबंध करणे.२. हरकत आणून किंवा शंका काढून कामाचा खोळंबा करणे.

**अडवा** स्त्री. रान; आडमार्ग; अरण्य : 'आढ्यु आतुडे आडवी । मग

आढ्यता जेवी हारवी ।' -ज्ञा १३.२०६.

**अडवी** स्त्री. लहान अडणा; आडखिळी; गज; गराद; दाराचा वा खिडकीचा लहान खिळा.

**अडवे** न. कणसासकट धान्याच्या ताटांची रचलेली रास.

**अडवेल** पु. आडवा पसरणारा एक चर्म रोग : 'गोडी काळफोड दुर्गम । अडवेल टाळवेल ।' - स्वानु २५७.

**अडशेरी** स्त्री. १. अडीच शेरांचे माप-वजन; (पूर्वी पाच शेरांची पायली असे ) या पायलीचा अर्धा भाग. २. अधोली; अर्धी पायली. ३. नोकरास दररोज किंवा महिन्याच्या महिन्याला दिले जाणारे धान्य; मासिक वेतन; मजूरी. (एका दिवसाचा २ ।। शेर वजनाचा शिधा, भत्ता यावरून).

**अडस-सो** वि. १. घट्ट; गच्च; आवळ; मजबूत बसणारी (खुंटी, खिळा वगैरे). २. (खिळा वगैरे गच्च बसतो असे) बारीक भोक, बीळ, छिद्र वगैरे. ३. आटोपशीर : 'तेणे परवटा वरिया अडस ।' - उषा २९.

**अडसखोर** पहा : **अडसी**

**अडसटणे** सक्रि. अंदाज करणे; कच्चा खर्डा काढणे; अदमास पाहणे. पहा : **अडसट्टा**

**अडसट्टा** पु. १. अंदाज; बेत; आटोका. २. अटकळ; अनुमान धपका; सरासरी अनुमान [हिं. ] (वा.) **अडसट्ट्यात येणे** - अडचणीत येणे; कचाट्यात सापडणे.

**अडसण** न. १. पाखडलेले किंवा पाखडण्याकरिता सुपात ठेवलेले धान्य. २. सुपाने घोळताना मागे राहिलेले खडेमिश्रित धान्य.

**अडसण** न. खट्याळ गाईम्हशीची धार काढण्यासाठी तिच्या भोवती बांधलेल्या आडव्या काठ्या; अडची.

**अडसणी** स्त्री. आच्छादन. (गो.)

**अडसणे, आडसणे** सक्रि. १. सुपाने पाखडणे; निवडणे; निवड करणे : 'आडसोनी शुद्ध करी वो साजणी ।' - तुगा २६१. २. सुपाने धान्यातील कोंडा उडवून लावणे.

**अडसणे** सक्रि. १. फांद्या तोडणे; छाटणे; खडसणे. २. आवळणे; घट्ट बांधणे; कसणे; अडचणे : 'दोऱ्या अडसून पालींना ताण देणं सुरू होतं'- धग ११०. ३. रूसून बसणे; अडून राहणे; हट्ट धरणे. ४. आड बसणे; लपून बसणे; आश्रय करणे : 'आडसूनी अंधारी । खद्योत दीप्तीर्शी धरी ।'- अमृ ७.२. ५. मानास चढणे; ताठणे; गर्व धरणे. (व.) ६. अडचण करणे. [का. अड्डविसु = लपणे]

**अडसतटटू** पहा : **अडसी**

**अडसभडस** वि. १. काहीतरी; अरबटचरबट; रुक्ष; भरड. : 'साधुसंत अडसभडस । न खाती का प्रश्न ।' -दावि २७३. २. यथेष्ट; भरपूर. [भडसचे द्वि.]

**अडसर** पु. दार किंवा खिडकी बंद करण्याकरिता असलेली लाकडी किंवा लोखंडी दांडी; गज, खीळ, अडणा, अड्डू, लाकडी अगळ. ही कोठे कोठे दाराच्या पाठीमागच्या भिंतीत भोक ठेवून त्यात बसवलेली असते.

**अडसर** पु. नारळ; शहाळे; ताजा नारळ : 'पण दादांनी मीनासाठी अडसर काढून द्यायला सांगितले मात्र; लाडक्या अंगणातल्या माडावर कसा वानरासारखा चढला.'- पापू ३३.

**अडसंधी** स्त्री. १. शरीरातील अडचणीच्या जागी असलेले सांधे. २. अडचणींची जागा. ३. रिकामा वेळ. ४. संकट; आपत्ती. ५. अडगळ. [सं. अष्टषष्ठी ]

**अडसाळ** न. कुळवाचे आडवे लाकूड.

**अडसांगड-डी** स्त्री. १. लहान सांगड : 'मोठे विस्तीर्ण पात्र ते सुजाउद्दवला याने अडसांगडीने रिकामे यावे जावे.' -भाब ६४. २. पोहणाऱ्याकरिता भोपळे जोडून केलेला ताफा. ३. लहानसर तराफा.

**अडसांगडी-ड्या** वि. १. अडसांगड चालवणारा. २. सांगड न घेता पोहणारा.

**अडसी** वि. हट्टी; दुराग्रही; अडेलतट्टू. [ का. अडसु]

**अडसुडी** पु. गुऱ्हाळात गुळव्याच्या हाताखाली काम करणारा गडी.

**अडसूनखडसून** क्रिवि. हडसूनखडसून; स्पष्टपणे; बजावून.

**अडसेरी** पहा : **अडशेरी** : 'यास दररोज अडसेरी गल्ला कैली.'- बाबारो ५७.८४.

**अडसोंग** नाटकातील दुय्यम किंवा हलका नट; हलके गौण पात्र.

**अडळ** पु. १. साह्य; मदत. २. पृथकपणा; वेगळेपणा. ३. विकल्प. खोळंबा.

**अडळ** पु. शोध.

**अडळ-ळू** पु. (नांगऱ्याने हातात धरण्याची) नांगराच्या रुमणीची खुंटी-दांडा.

**अडळणे** अक्रि. अडखळणे.

**अडंगा** पु. अडसर; अडवणूक; अडचण(वा.)

**अडंगा लावणे** क्रि. अडचण निर्माण करणे; हस्तक्षेप करणे; आडवे येणे : 'बांधकामाला कर्जे मिळत नाहीत. ग्रामपंचायतीने अडंगा लावला आहे'- एगाएपा ११७. [हिं. अडंगा=अडचण]

**अडंगेबाजी** स्त्री. अडवणूक; अडथळा उत्पन्न करणे : 'प्रश्नातील अडंगेबाजी लक्षात घेऊन मी उत्तरे देत होतो.'- एगाएपा १५.

**अडंडळ** वि. अढळ; बिनधोक : 'तरावया भवाब्धि प्रबळ । चरणाची नाव अडंडळ ।।' - एभा ५.३७९.

**अडंबर** पहा : **अवडंबर**

**अडाअड-डी** स्त्री. मोठा अडथळा; खोळंबा; अडचण; अटकाव (क्रि. करणे, घालणे, होणे.).

**अडाघडी** स्त्री. मांडणी; रचना : 'क्षणिक जाणून अडाघडी । वेगे लावी प्रेमाची शिडी' - हरि १९.७६.

**अडाडी** स्त्री. १. प्रतिबंध; अटक : 'तमी दाटती खद्योतकोडी । तेवी अज्ञानी कर्माची आडाडी ।' - एभा २७.३९. २. उत्कंठा; घाई : 'होत डोळ्या आडाडी । अभिनव गोडी कृष्णाची ।।' - एभा ३१.३०. ३. गर्दी; पसारा; रगाडा : 'सर्व धर्माची आडाडी । घायेंवीण बापुडी निमाली ।।'- एभा ११.११०४.

**अडाण** न. शेती नसलेले किंवा न करणारे गावकरी; बलुतेदारांपेक्षा हे निराळे. [सं. अज्ञान]

**अडाण** न. पाटबधांरा; बंधारा.

**अडाण** स्त्री. पाणभरित जमीन.

**अडाण** न. १. दुभत्या जनावराची कास; ओटी.

**अडाणकबाड** पु. अडाण; खेड्यातील कारागीर, व्यापारी, मजूर, कामकरी इ. (शेतकरी नव्हेत ते). सुतार, लोहार, गवंडी, शिकलगार : 'अडणारा; शेतकऱ्यांवर अवलंबून राहाणारा तो अडाणी.' – गांगा ८.

**अडाणगावीक** पु. शेती नसलेले किंवा शेती न करणारे गावकरी : 'आम्हांमध्ये कसबेमजकूरचे जोतीष देव दिवाण अडाणगावीक एकूण कलमे चार याच्या बोलण्याविसी कलह लागला.'– ऐसंसाखं ४.७५.

**अडाणचोट** वि. अडाणी; मंदबुद्धीचा; घोडचूक करणारा; मट्ठ.

**अडाणजात** स्त्री. अशिक्षित, रानवट, जंगली लोक; रीतभात माहीत नसणारे लोक. [सं. अज्ञानजात]

**अडाणपट्टी** स्त्री. शेतकरी व बलुतेदार या लोकांखेरीज बाकीच्या सर्व धंद्यांच्या म्हणजे अडाणी लोकांवर बसविलेला कर.
सामा. :– अडाणबाकी; अडाणवसुली.

**अडाणमत** न. विलक्षण, भलतेच विचार–समजूत–कल्पना वगैरे; हटवादीपणाचे मत; दांडकमत.

**अडाणवस्ती** स्त्री. बलुतेदार व शेतकरी यांच्याखेरीज बाकीच्या लोकांची म्हणजे अडाणी लोकांची खेड्यातील अगर त्यांच्या एखाद्या भागातील वस्ती.

**अडाणा** पु. संगीतातील एक राग. कानडा रागाचा एक प्रकार. गानसमय रात्रीचा तिसरा प्रहर.

**अडाणा** पु. १. अडची; अडसण २. उसाच्या चरकाला बैल जुंपण्याचा दांडा –लाट. ३. दरवाजाचा अडणा; अडसर.

**अडाणी** वि. १. अकुशल; अनिपुण; अनभ्यस्त; कलाहीन (माणूस); रानटी; असंस्कृत; रांगडा; गावंढळ; ग्राम्य; जंगली; असभ्य; अशिष्ट; उद्धट. २. खेडवळ (भाषा, रीतभात). ३. ओबडधोबड, वेडीवाकडी (वस्तू पदार्थ). ४. अज्ञानी; न शिकलेला; विद्याहीन. ५. बिगर शेतकरी; अडाण : 'थोड्याशा भांडवलावर व्याजबट्टा करणारे अडाणी त्यांचे दस्तैवज प्रपंच खर्चासाठी होतात.'– गांगा १६०. (वा.) **अडाणी गाठ** – चुकीची निरगाठ; सहज सुटणारी चाडेगाठ.

**अडाणीकबाडी** पु. १. अडाणकबाड २. मजूर; काबाडकष्ट करणारे. ३. गावंढळ; टोणपे; वेडगळ; अशिक्षित; अडाणी.

**अडाणीजात** स्त्री. रानटी, अर्बुज जात.

**अडात–थ** पु. १. दरवाजा, फाटक, खिडकी इ.च्या दारावर मजबुतीसाठी खिळे मारून बसविलेला आडवा गज. २. बसावयाच्या पाटाखालील आडव्या पट्ट्या किंवा पाय.

**अडातुटी–डी** क्रिवि. मधूनमधून; थांबून; राहूनराहून; केव्हातरी; विसावा घेतघेत.

**अडाव–वा** पु. वाटेल ते हत्यार घेऊन लढणारा; आडहत्यारी : 'असामी एकूण बेचाळीस अठरा अडाव; चोवीस बरकंदाज'– पेद ३३.१८५.

**अडावणी** स्त्री. अडवणूक; अटक : 'त्याचे व आमचे तरांड्याची अडावणी केली.'– विवि ८.३.५५. (वा.) **अडावणीस येणे, अडावणी करणे** – गलबताला गलबत भिडवून हल्ला करणे : 'त्याचे वस्तू श्यामलाचे (शिद्दीचे) गलबतासी अडावणी करवत नाही'– पेद ३३. ३८.

**अडावणी** स्त्री. होडी, गलबत यांच्या दोन्ही कुशींकडील मालाच्या सोयीसाठी मारलेली अगदी वरची फळी, विणलेला साठ.

**अडास** न. आडवे तास; आडवी नांगरणी.

**अडाळा** पु. अडला; विळी; मोरळी.

**अडांख** समसंख्या. [ अर]

**अडांख** पु. अज–रेघ; हिशेबाच्या कागदावरील आकड्यावरून ओढलेली रेघ. पहा : **अज**

**अडांखताळा** पु. आडव्या व उभ्या रकान्यातील रकमांची बेरीज करून ती बरोबर येते की नाही ते पाहणे.

**अडांबरी** पु. १. नैऋत्येकडून वाहणारा वारा. (हा आषाढाच्या सुमारास ४२ दिवस वाहतो.) [ सं. आडंबर]

**अडिवा** पु. १. संचार; वारे; 'शृंगाराचा अडिवा ।'–उगी १८०. २. अतिशय आवड; सोस.

**अडिवाळ** पहा : **अडवाल–ळ**

**अडिशेरी, अडिस्त्री** पहा : **अडशेरी**

**अडिंबा** पु. अडसर (दार, खिडकी इ.चा).

**अडी** स्त्री. फळे पिकविण्यासाठी गवतात घातलेले फळाचे थर. पहा : **अढी**

**अडी** स्त्री.१. जमीन खोदून केलेली लांब चूल; चर (स्वयंपाकाकरिता). (व.)२. अडसर; अट; प्रतिबंध. ३. खळे; मळणीची जागा. ४. ओढ्यावरील तात्पुरता पूल; साकव.

**अडीच** वि. १. दोन आणि अर्धा. २. बुद्धिबळाच्या खेळातील घोड्याची दोन सरळ व एक आडवे घर अशा प्रकारची चाल.

**अडीचकी** स्त्री. एक ते शंभरपर्यंतच्या संख्या क्रमाने अडीचपट करून मिळणारा पाढा. (एक अडचं अडचं, बे अडचं पाच). [ सं. अर्धय]

**अडीच पेडी वेणी** स्त्री. दोन मोठे व मध्ये एक लहान पेड ठेवून घातलेली वेणी.

**अडीचमासा** पु. श्रावणघेवडा. हा २ ।। महिन्यांनी तयार होतो. याला अडीच माशाची शेंग असेही म्हणतात. (बे.)[का.]

**अडीर** वि. अडेल; हटवादी : 'शिंदेही अजिंठ्याचे घाटची लढाई वसली साहेबाची खाऊन पुरकस गळाठ्यांत आले पण तेही अडीरच होते.'– होकै १६७.

**अडील** वि. अडेल; हट्टी; हेकेखोर; स्वेच्छाचारी : 'पावसाचा काय नेम सांगावा, महाअडील जात'– पेरणी ११५.
क्रिवि. आडू, आड; आश्रयार्थ पुढे.

**अडीशिरी, अडिशेरी, अडिश्री, अडीसरी** पहा : **अडशेरी** : 'एका वाण्याच्या दुकानात एक अडीशिरी चिरमुरं उधार घेतलं'– ऊन ३९.

**अडु** स्त्री. १. दोन तुळ्या अगर चिरेबंदी फरशी यात मजबुतीसाठी मारलेली

लोखंडी पट्टी. २. लाकूड कापताना हलू, सरकू नये म्हणून मारलेली पट्टी, ठोकळा. ३. विहीर खणण्याची दीड फूट लांबीची मोठी छिन्नी; पाथरवटाचे एक हत्यार.

**अडुक** वि. तुरट; कडू. (कों.)

**अडुखुळणे** पहा : **अडखळणे**

**अडुमाडू** न. माडू नावाचे एक हत्यार.

वि. १. (ल.) शूर; धीट; धाडसी; आडदांड (शिपाई, योद्धा- मारावयास व मरावयास सिद्ध असा.). (उप.) शेंदाड शिपाई; रगडमल्ल; वीरपीर; तिस्मारखान. २. दांडगा; जबरा; अतिहुशार-निपुण (लेखक, वक्ता इत्यादींबद्दल गौरवपर किंवा व्याजोक्तिपूर्वक). ३. अलबत्यागलबत्या; कोणी तरी न समजण्याजोगे बोलणारा. [माडूचे द्वि.]

**अडुसष्ट** वि. साठ अधिक आठ मिळून होणारी संख्या; ६८ ही संख्या. [सं. अष्टषष्ठि ]

**अडुळसा, अडोळसा** पु. एक औषधी वनस्पती. याच्या पांढरा व काळा अशा दोन जाती आहेत. फुले पांढरी. [सं. अटरुष]

**अडू** पु. १. पिंजऱ्यातील पक्ष्याची बसायची दांडी. २. लाट; आडकाठी. (लोकांनी आत घुसू नये म्हणून देवळात लाकडाचे दांडे उभे करून त्याला आडवे लाकूड बसवतात ते.) ३. एखाद्या वस्तूस बांधलेली दोरी मजबूत बसण्यासाठी किंवा आवळण्यासाठी जिने पीळ देतात ती काठी. ४. तरफ लावताना उपयोगात आणलेला दगड किंवा ठोकळा; उटाळी; टेका. ५. सडकेच्या उतारावरून पाणी वाहून चर पडू नयेत म्हणून जागजागी लहान आडवे बांध घालून पाणी बाजूच्या चरात वाहून जाण्याकरिता जे बांध घालतात ते प्रत्येक.

वि. हट्टी; हेकेखोर; अडेल; अडेलतट्टू; नाठाळ.

**अडूनझडून** क्रिवि. आडून; लपूनछपून : 'कोणी अडुनझडुन अडचणीत दडुन । कोणी राहाती पडुन ।। खालती ।।'- प्रला २०५. [अडूनचे द्वि.]

**अडे** न. १. नदीकाठाजवळ असलेले वावर. २. आढे. ३. नावेचा कणा.

**अडेक** वि. गौण वरकरणी. (गो.)

**अडेचा** वि. कृत्रिम; उसना. (गो.)

**अडेजाव बडेजाव** पहा : **बडेजाव**

**अडेबाटको** वि. नवशिक्या. (गो.)

**अडेल** वि. अडखोर; हट्टी; दुराग्रही; हेकेखोर; अडून बसणारा.

**अडेलगुण** अडचणीची, संकटमय स्थिती; तारांबळ.

**अडेलतट्टू** वि. हट्टी; हेकेखोर; दुराग्रही; अडेल माणसे : 'एखाद्वेळी अडेलतट्टू ड्रायव्हरशी प्रसंग.'- हाचिं २६१.

**अडेशिरी** स्त्री आहार; खाणे. पहा : **अडशेरी** (गो.)

**अडोपार** स्त्री. १. अटकाव; अडथळा; प्रतिबंध; विरोध; हरकत; अडवणूक (क्रि. करण, दाखविणे, लावणे). २. आग्रह करणे - धरणे; पाठीस लागणे; पिच्छा पुरविणे. ३. अडून बसणे; खनपटीस बसणे; एकच धरून बसणे (क्रि. दाखविणे, धरणे, लावणे). ४. सबबी हरकती पुढे आणणे; शंका काढणे; कठीण करून ठेवणे (क्रि. धरणे). ५. गरज; नसले तर अडेल अशी स्थिती; जरूरी. ६. (सामान्यत: ) गुंता; रुद्धता; प्रतिबद्धता; अगतिकपणा (क्रि. पडणे, लागणे, होणे).

**अडोब** पु. कच्ची वीट. (स्था)[इं]

**अडोर** न. मूल.

**अडोशीपडोशी, आडोशीपाडोशी** वि. जवळपासचा; शेजारपाजारचा; आसपासचा.

क्रिवि. आसपास; आसमंतात; आजूबाजूस. [हिं. पडोसीचे द्वि.]

**अडोसा** पु. आडपडदा, आच्छादन, आडबाजू करण्याकरिता उभारलेला कूड; दृष्टीस प्रतिबंध करण्यासाठी केलेली पडद्यासारखी योजना; आसरा (क्रि. करणे, घेणे, देणे).

**अडोळ** न. कुंपण; वई (टहाळे लावल्यास वई, नसल्यास कुंपण).

**अडोळणे** आढळणे.

**अडोळसा** वि. चाहूल लागू न देता अचानक येणारा (पाऊस) : 'त्या एकाकी असह्य जीवनात विठ्ठलचा प्रवेश असाच अडोळशा पावसासारखा अचानक.' - उरा ९९.

**अडोळा** पु. आढे (घराचे); छपराच्या पाख्याना मधोमध जोडणारी तुळई.

**अडोंगी** क्रिवि. एका-आडबाजूस; एका बाजूने; आडमार्गाने; सरळ रस्ता सोडून; रहदारीची वाट सोडून.

**अड्डा** पु. १. जूट; संघ; एकत्र जमाव; समुदाय (गाडीवान, मजूर वगैरे विशिष्ट व्यवसायी लोकांचा). २. तळ; गोट; नाके; खुंट; चव्हाट; अखाडा; बाजारातील देवघेव करण्याची जागा; प्रवासी लोकांची विसावा देण्याची - मध्यंतरी उतरण्याची जागा. ३. सतत किंवा मोठ्या प्रमाणावर चालणारा व्यवहार, उद्योग. जसे : - गाण्याचा - नाचण्याचा - वादाचा अड्डा. ४. आखाडा; तालीम; रंगभूमी. ५. आळशी किंवा व्यसनी लोकांची पत्ते, जुगार, खेळण्यासाठी जमण्याची - शिळोप्याच्या गप्पा मारण्याची जागा. [का. अट्टसु :]. (वा.) **अड्डा जमवणे** - समानशील व सारख्या आवडीनिवडीच्या लोकांनी ठरावीक ठिकाणी नियमाने एकत्र येणे.

**अड्डा** पु. आढ्यता; बाणा; प्रौढी; प्रतिष्ठा; फुशारकी. (क्रि. बाळगणे.) [सं. आढ्य] (वा.) **अड्डा बाळगणे** - ऐट मिरविणे; फुशारकी मारणे.

**अड्डा** पु. (विणकाम) फणीच्या चोया करण्याची सुरी. ही लाकडी ठोकळ्यात बसवलेली असते. फणीचे दात तयार करायची विणकराची सुरी.

**अड्डावणे** अक्रि. ओरडणे; बोंबलणे.

**अड्डेकरी** पु. अड्डा ठेवणारा इसम किंवा अड्ड्याचा मालक; अड्डा चालवणारा मनुष्य; अड्ड्यावर नियमित उपस्थित राहणारा मनुष्य.

**अड्डेबाज** वि. अड्ड्यावर जाणारा; अड्ड्यात पडून असणारा; अड्ड्यावर जाण्याचे व्यसन असणारा.

**अड्डेबाज, अड्डेवाइक** वि. टेंभा, प्रौढी, शेखी मिरवणारा.

**अड्याल** वि. अलीकडील; इकडील.

क्रिवि. ह्या बाजूला; अलीकडे; इकडच्या बाजूला; या अंगाला. (ग्रा.)

**अड्यालपड्याल** अलीकडे पलीकडे.

**अड्याळू** पु. लाकडी नांगरास मागच्या बाजूस हाती धरण्याकरिता

असणारा वीत दीड वीत लांबीचा एक खुंटा. (व.)

**अढण** स्त्री. सुपाच्या तोंडाशी असणारी कांबटी. पहा : **अडण**

**अढल** वि. पहा : **अढळ**; वाकबगार : 'अढलाचे बरकंदाज' - समारो २.१८७.

**अढळ** पु. १. आढळ; थांग; पत्ता; शोध; भेट; उपलब्धी. २. ज्ञानाचे - अनुभवाचे क्षेत्र; आटोका.

**अढळ** न. अविनाशपद; स्थिरपद; ध्रुवपद; मोक्ष : 'शरण येती त्यांचे न विचारिसी दोष न मागता त्यांस अढळ देसी ।।' - तुगा ८६८.

वि. १. अचल; कायम; स्थिर; दृढ : 'तेचि प्रमेय एक वेळ । शिष्यीं होआवया अढळ ।' -ज्ञा १८.१२३८. २. खरा; खात्रीचा : 'हा बोलु तुझा कीर अढळु मानू आम्ही ।।' - ज्ञा ११.४११. [सं. अटल]

**अढळ** न. १. नशीब; प्राक्तन : 'वैद्य म्हणती तये वेळीं । नव्हे बरवें यासि अढळीं ।' - गुच ३०.४३. [सं. अटल]

**अढळपद** न. अचल, निश्चल, कायम असे ध्यान; स्थिरपद; कोठल्याही गोष्टींमुळे जे जाण्याची, ढळण्याची भीती नाही असे स्थान, पद. (ध्रुव ताऱ्याच्या किंवा नक्षत्रांच्या अचलपणाला तसेच स्वर्गातील वैकुंठादी स्थानांना हा शब्द वापरतात.).

**अढंच** वि. मोठा; थोर; वरचा : 'ऐसें नाममात्रें येणें । धात्रेया अढंच करणे ।।'-ज्ञा १७.३४१.

**अढा, आढा** पु. १. काठी खांब वगैरे भोवती घातलेला दोरीचा वेढा, वळसा, विळखा. २. दोरीचा फासा; अढी; दुमड; पेच : 'मी वावडी तू एक सडा नको मारू आढा.' - सभा २. ३. मुरड. ४. वेटोळे.

**अढाई** स्त्री. घोड्याची धावण्याची एक चाल.

**अढाउ(ऊ), आढाउ(ऊ)** पु. १. आढाव; सैन्यात एक प्रकारची बरची बाळगणारा आडहत्यारी शिपाई; सामान्यत: सैनिक; शिपाई : 'भीतरी परवडी आढावाची । शस्त्रें उघडीं होतीं त्यांचीं ।' - एरुस्व ६.५१. २. सैन्यातील परिचारक; जखमी झालेल्यांची सेवाचाकरी करणारा : 'अढाउ - करीं लोटुनी नेला । काठीचिये मानेवरी ।।' - उषा १६.

**अढाऊ** वि. १. मूर्ख; अडाणी; मठ्ठ. २. द्वाड; उनाड; बदमाष; लबाड. ३. न पेरता आपोआप उगवणारा; मेहनत न करता उत्पन्न होणारा.

**अढाल, आढाल** स्त्री. ढाल; निशाण; झेंडा : 'फडकती तडकेंचि अढाला ।' - दावि ३७९.

**अढावेढा** पु. १. पहा : **अढा**. २. आळा; प्रतिबंध; आडकाठी. ३. हट्ट; पोकळ सबब; हरकत; निमित्त. ४. दोरीची मुरड; दोरीच्या पदरांना फार पीळ घातल्यामुळे जो मेंढा पडतो तो किंवा जी पिंपळी पडते ती. ५. दोरीची किंवा सुताची गुंतागुंत.

**अढाळ** वि. अतिशय मोठे (पात्र, गृह इ.); विस्तृत, अजस्त्र, प्रचंड (घर, शेत, अरण्य, गलबत, शरीर इ.).

न. मोठे स्थान (सिंहासन, अर्धासन) : 'जे आदरिले अढाळ । राजाश्रियेचें ।' - शिव ७२६.

**अढी** स्त्री. अडी; एक थर फळांचा व एक गवताचा या पद्धतीने फळे रचून ती पिकविण्यासाठी केलेली योजना.

**अढी** स्त्री. रास; ढीग.

**अढी** स्त्री. दूध तापविण्याची आगटी.

**अढी** स्त्री. १. पायावर पाय ठेवून तिडा देऊन बसण्याची रीत. २. फाल्गुन अमावस्येच्या दिवशी शकुन पाहून पीकपाण्यासंबंधी भविष्य सांगण्याची एक रीत. ३. धान्याच्या राशीवर कडब्याच्या पेंढ्या घालून केलेले छप्पर. ४. गाई, म्हशी यांचे दूध काढताना त्यांना घालण्यात येणारा भाला (लाथ मारू नये म्हणून दाव्याने पाय बांधणे). ५. दोरीचा वेढा, विळखा, दुमड, मुरड, गुंता. पहा : **अढा** ६. (ल.) अडचण, बाधा; नड : 'ऐशिया निरूपण घडमोडी । तुझेनि बोले पडे अढी ।' - एभा २०.५६. (क्रि. उलगडणे; पडणे). ७. तेढ; मनातील गाठ; विपरीत ग्रह; हट्ट; अनिष्ट शंका; विचार; रुसवा. (क्रि. धरणे, पडणे). (वा.) (मनात) **अढी धरणे** - मनात वैरबुद्धी बाळगणे. **अढीला येणे** - हट्टाला पेटणे : 'चार जोडे हाना पर म्यां म्हनून पुढं न्हाई यायचा, ग्यानबा अढीला आला.' -पेरणी ११३. ८. कपाळावरील सुरकुती, वळी : 'भृकुटिये आढी घालोनी ।' - रावि १०.३९. ९. रहाटगाडग्यामधील रव्यांच्या वरील आडवे लाकूड. (यावर माळ टाकलेली असते.) १०. मिठी : 'चरणी घालुनियां अढी । कांसव गजाते पैं ओढी ।।' - मुआ ५.१०८. ११. स्वयंपाकासाठी खणलेले चर. (व.)

**अढीखोर** वि. मनात तेढ बाळगणारा; खुनशी.

**अढीच्या दिढी** क्रिवि. अव्वाच्या सव्वा; प्रमाणाबाहेर; फाजील (क्रि. बोलणे, वागणे). [दीडचे द्वि.]

**अढे** न. कास (गाय, म्हैस इ. जनावराची).

**अढेकड, आढेकड** पु. चाकाच्या आऱ्यांची दोन्ही टोके सांधणारा आडवा तुकडा.

**अढेपाट** पु. आढ्याचे लाकूड; आढे; छपराच्या एका कडेच्या खाली आधार म्हणून जे आडवे लाकूड घातलेले असते ते.

**अढेपारडे–ढे** पु. जमिनीच्या उत्पन्नातील गाव पाटलाचा हिस्सा, पाटलाचे हक्क. (पाटलाच्या इनाम जमिनीला 'पासोडी' व गावातल्या लग्नसमारंभातील त्याच्या हिश्शाला 'शेलावाटी' म्हणतात.)

**अढैच** वि. अडीच: 'अढैचां आसुचे वस्त्र गोसावियालागौनि' - लीचउ ३९८.

**अढेवेढे, आढेवेढे** पु. १. वाकडेतिकडे, आड फाट्याचे, टाळाटाळीचे मुद्दे; हरकती. २. अळेपिळे; आडवे तिडवे वळसे. ३. खोट्या सबबी सांगणे; हरकती आणणे. ४. शुष्क वाद करून एखादे काम टाळण्याचा प्रयत्न करणे. (वा.) **अढेवेढे घेणे** कांकू करणे; अडचणी - हरकती उपस्थित करणे.

**अढ्या** पु. सूत काढण्यासाठी किंवा मोकळे करण्यासाठी ज्या दोन खुंट्यांभोवती ते गुंडाळतात त्यापैकी प्रत्येक.

**अढ्या–आढ्याकरवत** पु. स्त्री. दोन्ही टोकांस लाकडी मुठी असलेला दोघांनी चालवावयाचा मोठा करवत; अढे.

**अणकट–टी** स्त्री. वस्त्राचा कमरेकडील (कडोसरीचा) भाग; कनवट.

**अणकुची** स्त्री. अग्र; टोक; तीक्ष्णबिंदू; शेवट.

**अणकुचीदार** व. अतिशय तीक्ष्ण टोक असणारा.

**अणखर** पु. दूध काढताना जोराने पिळाव्या लागणाऱ्या शेवटच्या लहान धारा.

**अणखर** वि. १. बळकट; मजबूत; टिकाऊ; भक्कम (लुगडे, सणंग). भरीव, शुद्ध धातूचे (दागिने). २. कठीण; कठोर; तडकाफडकी; रोख-ठोक; निर्भीड (भाषण वर्तन). ३. दु:खप्रद, मर्मभेदी, खोचदार (भाषण). ४. विलक्षण; चमत्कारिक; कधी न घडणारी; अलौकिक.

**अणखव** पु. हट्ट.

**अणखुरणे** अक्रि. दुधाचा पान्हा दाटल्यामुळे सड, आचळ, ओटी ताठणे, तरारणे, फुगणे.

**अणगट** स्त्री. १. (अंगापासूनची) फांदी; अणी; टोक; अंकुर : 'विशिष्टां व्रतांचे फोक । धीराच्या अणगटी तिख ।' - ज्ञा १५.१९१. २. मूळ वस्तू; न घडविलेली वस्तू. [सं. अंग + गत]

**अणगे** न. तंबाखूची मोठी मोट; अखे; गठ्ठा. (गो.)

**अणणु-णू** वि. १. स्थूल; मोठा. २. अणू इतकाही नसणारा : 'अस्थूलु मी अणणू । जे कांहिं तें मीं ।' -राज्ञा १८.११९१ तुल० 'स्थूलु मी अणु । जें काहीं तें मी ।' - (बं) ज्ञा १८.११९७.

**अणदळ** न.ताम्हन. (ना.)

**अणबुजणे** अक्रि. चमत्कारिक, नवल, आश्चर्य वाटणे.

**अणबूज** वि. परका; अपरिचित; नवीन; चमत्कारिक; आश्चर्यकारक.

**अणव** स्त्री. आणव देवतांची विद्या : 'सांभवीचा राईम होए तरि जीउ सकळै आत्मत्वें नेदखे ? हा अणवीचा एकु रश्मि'- लीचपू २६३.

**अणवट** पु. एक तऱ्हेचा रुप्याचा दागिना (पायातील); पायाच्या आंगठ्यात घालावयाचे जोडवे : 'चटपट अणवट जोडव्याची झटपट । दाहीं बोटीं मेंदी रंगली ।'- राला ६०. [गुज.]

**अणवट** स्त्री. हनुवटी; खालच्या ओठाखालचा निमुळता भाग.

**अणवा, अणवाई** पहा : **अनवाणी**

**अणवा** वि. १. न शोभणारा; हलक्या, कमी प्रतीचा. २ अव्यवहारी; अडाणी. (गो.)

**अणस** स्त्री. लोखंडाचा वाळा; वेढे. उदा. मुसळाची अणस.

**अणसूट** पहा : **अनसूट** : 'अणसूट निर्मल चार बाजी ।' - वेसीस्व ८.१०९.

**अणी-णि** स्त्री. १. टोक; शेवटचा बिंदू; अग्र. २. अंकुर, अग्र (वृक्ष,पर्ण इ.चे). ३. ऐन वेळ; आणीबाणीची वेळ. ४. भोवऱ्याची आर, अरी; गिरमिटाच्या टोकाशी बसवण्याचा भाग. ५. जोड्याचे बाकदार मुरडलेले टोक. ६. लगामाचे हातात धरावयाचे टोक, शेवट. ७. गाडीच्या आसात घालण्याची खीळ, खुंटी, खाप, शकल. [सं. अणि]

**अणिदार** वि. तीक्ष्ण; अणकुचीदार; टोक असणारे : 'सर्पाच्या दोन्ही जबड्यांत आणि टाळूवर बाक आलेले अणीदार दात असतात...' - भासर्प २९.

**अणिमा** पु. स्त्री. १. अष्ट सिद्धीतील एक. अणू एवढा लहान. पहा : **अष्टमहासिद्धी** : 'दिले अणिमादैश्वर्य अष्टगुण गा या' - मोअनु ६.५१. २. अणुत्व; अतिशय सूक्ष्मपणा; बारकाई. [सं. अणिमन्]

**अणिया** वि. अणीदार : 'पुढील अणिया भाले ।'- उषा १४. स्त्री. गलबताच्या पुढचा (अणकुचीदार) भाग. [सं. अणि]

**अणियाळे** वि. अणीदार; अणकुचीदार; टोकदार; तीक्ष्ण : 'दीर्घ नासिक अणियाळें ।' - एभा १४.४७५. [सं. अणि]

**अणी** स्त्री. १. लकडीच्या खेळातील एक हात व मार. २. बेंबीच्या वर भोसकून केलेला वार.

**अणीकसा** वि. विलक्षण; असाधारण; असामान्य; चमत्कारिक; विचित्र.

**अणीकाट** स्त्री. पट्टा व बनेटीच्या खेळातील पट्ट्याची खोच.

**अणी चोरणे** ऐन वेळी माघार घेणे : 'काट्यादाट्यात गनीम सापडला आणि अनी चोरली म्हणजे जीव जाण्यानिसी जाल यैसी ताकीद समजोन वर्तणूक करणे.' - पेद.

**अणीयस** वि. (तत्त्व.) १. बराच छोटा; खूप थोडा; अतिसूक्ष्म. २. तीक्ष्ण टोक किंवा धार असलेला. [सं.]

**अणीसी अणी भिडणे** (अणी म्ह. लगामाचे, हातात धरावयाचे टोक किंवा शेवट त्या वरून) अंगाला अंग भिडणे; हातघाई : 'दिवसांत वजीर व गाजुद्दीनखान यांत मोठे झुंज पडल्याखेरीज राहत नाही. आणीसी अणी तर येऊन भिडली आहे.' -हिंद खं १.६७.

**अणु-णू** पु. १. ज्यामध्ये एखाद्या मूलद्रव्याचे सर्व गुणधर्म कायम असतात असा त्या मूलद्रव्याचा लहानात लहान भाग; पदार्थाचा स्वतंत्र रीतीने अस्तित्व असणारा अतिसूक्ष्म भाग; रज:कण (सूर्य किरणात जे धुळीचे कण दृग्गोचर होतात त्यांच्या षष्ठांशाने लहान असणारा) : 'जे पाहता त्रिभुवन ।अणुही नोहें ।।- ज्ञा १६.३३१. २. कालाचा एक भाग; मुहुर्ताचा (४८ मिनिटांचा) ५४६७५००० वा हिस्सा. ३. (संगीत) पावमात्रा काल. ४. वैशेषिक दर्शनाप्रमाणे ज्याच्या संयोगाने पदार्थ बनतात असा निरवयव सूक्ष्मतम कण.

वि. अति लहान; अल्प; सूक्ष्म : 'तुम्हासमचि हें गुणें अणुउणें नसे नाम हा ।' - केका ७५. [सं.]

**अणु आकारमान** न. (भौ.) मूलद्रव्याच्या आण्विक वजनाला त्याच्या विशिष्ट गुरुत्वाने भागल्यानंतर येणारी संख्या. [सं.]

**अणुआर** पु. बारीक चुरा; चाराचुरा : 'तेथे त्रिवर्गाचा अणुआरु । आडऊ निघाला जो अपाक्षरु । तो महाभारतप्राकारु । भोंवता केला ।।'- ज्ञा १८.३६. [क. अणियार = अतिशय]

**अणुइंधन** न. अणुभट्टीत वापरण्यात येणारी सामग्री.

**अणुऊर्जा** स्त्री. अणुइंधन; अणुशक्ती : 'ह्या पाणबुडीचे नाव नॉटिलस असे होते. ती अणुऊर्जेवर चालणारी होती.'- महा ९१. विशिष्ट वैज्ञानिक प्रक्रियेने अणूपासून निर्माण होणारी शक्ती; वीज. [सं. अणु +ऊर्जस्]

**अणुकेंद्र** न. (रसा.) अणूच्या मध्यभागीचा धनविद्युत् - उच्चय असलेला भाग. [सं.]

**अणुक्रमांक** पु. अणुभारांक : 'अणूंचे एकस्थ (आयसोटोप) व अणुक्रमांक (ॲटॉमिक नंबर) या विषयीच्या कल्पना स्पष्ट झाल्यावर वरील रचनेतील दोष निघून गेले.' - अयु ४. [सं.]

**अणुगर्भ** पु. पहा : **अणुकेंद्र** : 'अणूच्या केंद्रभागास अणुगर्भ असे म्हणतात.' - आईन्स्टाइन ३९. [सं.]

**अणुगर्भीय** वि. अणूच्या केंद्रकाशी संबंधित असलेले. [सं.]

**अणुगुरुत्व** न. (पदा. रसा.) वाफेचे विशिष्ट गुरुत्व; अणुभार.

**अणुजीव** पु. जिवाणू; एकपेशी सूक्ष्मजंतू. [सं.]

**अणुजीवशास्त्र** न. सूक्ष्म जीवांसंबंधीचे शास्त्र, सूक्ष्म जीव जंतुशास्त्र. [सं.]

**अणुध्वम** पु. पहा : **अणुबाँब** [सं.]

**अणुपोषक** पु. शरीराच्या निकोप वाढीसाठी अत्यल्प प्रमाणात पण आवश्यक असलेली जीवनसत्त्वासारखी कोणतीही गोष्ट. [सं.]

**अणुबाँब** पु. अणूचा स्फोट करून ज्याला ऊर्जा पुरवली जाते असा एक प्रकारचा बाँब. अणुबाँबमध्ये युरेनियम २३५ आणि प्लुटोनियम २३९ हे समप्रोटान्स बहुधा वापरले जातात.

**अणुभट्टी** स्त्री. न्यूक्लीय क्रियाधानी; अणुऊर्जा निर्माण करण्याकरता अणुप्रक्रियेवर नियंत्रण ठेवण्यासाठी बांधलेली भट्टी : 'प्रगत देशातून अणुभट्ट्यांपासून उर्जा निर्मिती होत आहे.' – आशा ८५.

**अणुभंजी** वि. (विअ.) अणूचे विभाजन करणारा (न्यूट्रॉनमुळे ही क्रिया होते). [सं.]

**अणुभार** पु. (भौ.) एखाद्या मूलद्रव्यातील अणूचे सापेक्ष वजन. ते दुसऱ्या मूलद्रव्याला प्रमाणभूत समजून काढलेले असते. उदा. हायड्रोजनचा अणुभारांक १ मानलेला आहे. ऑक्सिजन १६. [सं.]

**अणुमन्द्रसप्तक** न. (संगीत) मंद्रनादापेक्षा ध्वनीने नीच नाद असणारे स्वरसप्तक. [सं.]

**अणुमाणि (नि) या** अणुइतक्या बारीक : 'माणिकुलेयांचिया कणियां। सावियांचि अणुमानियां।' – ज्ञा ६.२६४. [सं. अणु + मान]

**अणुमात्र** वि. अगदी थोडे; किंचित; ईषन्मात्र; किंचिन्मात्र : 'तुज भय नाही अणुमात्र।' – रावि ९.६७. [सं.]

**अणुयुग** अणूच्या अंगी असलेल्या शक्तीचा शोध लागून तिचा व्यवहारात उपयोग करायला सुरुवात झाल्यापासूनचा चालू कालखंड. [सं.]

**अणुयुद्ध** न. अण्वस्त्रांचा उपयोग करून होणारे युद्ध : 'आज सर्वत्र अणुयुद्धांचं भय निर्माण झालं आहे' - साहेब ३८१. [सं.]

**अणुरचना** स्त्री. अणूंची संरचना; अणुकेंद्राभोवती प्रोटॉन व न्यूट्रॉन सर्वसाधारण वर्तुळाकार कक्षेत फिरत असतात. अणूच्या केंद्रस्थानी प्रोटॉन आणि न्यूट्रॉन यांचा समूह नैसर्गिक शक्तीने एकत्र बांधलेला असतो. या संघटनेस अणुरचना म्हणता येईल. [सं.]

**अणुरेणु–णू** पु. अतिशय लहान कण; सूर्यकिरणात दृष्टीस पडतात असे जे धुळीचे वगैरे अतिसूक्ष्म कण त्यातील एक : 'अणुरेणु सूक्ष्मस्थूळा पार नाहीं। श्रुती नेती त्याही खुंटलिया।' – तुगा २२०४. [सं. अणु + रेणु]

**अणुरेणुजाल** न. १. सूर्य किरणातील अणु-परमाणू. २. अतिसूक्ष्म कणांचा समुदाय. [सं.]

**अणुवाद** पु. (तत्त्व.) जगातील सर्व वस्तुमात्रांची उत्पत्ती अणूपासून झाली आहे असा सिद्धांत. [सं.]

**अणुविज्ञान** न. अणुविषयक शास्त्र; अणूचे स्वरूप, शक्ती व उपयोग यांचा अभ्यास करणारी विज्ञानशाखा. [सं.]

**अणुव्रत** न. गृहस्थाश्रमी जैनाने पाळावयाची व्रते व नियम.

**अणुशक्ति–क्ती** पहा : **अणुऊर्जा**

**अणुशास्त्रज्ञ** पु. अणुविषयक शास्त्र जाणणारी, अणुविषयक संशोधन करणारी व्यक्ती. [सं.]

**अणुसट** वि. १. अनुच्छिष्ट. २. ज्याचा अर्थ कळत नाही अशी. [सं. अनुच्छिष्ट]

**अणुसंरचना** स्त्री. (विअ.) अणू किंवा परमाणूची रचना, बांधणी.

**अणुसंशोधन केंद्र** न. अणूंच्या गुणधर्माचा अभ्यास ज्या ठिकाणी होतो अशी संस्था.

**अणुसिद्धान्त** पु. मूलद्रव्ये ही अणूंची बनलेली असून त्यांना एक निश्चित सापेक्ष वजन असते आणि भिन्न मूलद्रव्यांचे अणू एकत्र येऊ शकतात हे तत्त्व. [सं.]

**अण्णा** पु. १. (मूळ अर्थ) वडील भाऊ. २. बहुमानार्थी टोपण नाव; लहान मुलांनाही लाडाने म्हणतात.

**अण्णाठे** न. पायलीच्या १६व्या भागाएवढे एकमाप. (गो.)

**अण्य** पु. अणकुचीदार बाण.

**अण्णोविन्न** वि. दु:खीकष्टी 'तेणे दु:खे अण्णोविन्न झालीसे'– श्रीकृष्णाच

**अण्वस्त्र** न. अणूपासून मिळणाऱ्या शक्तीचा वापर करून तयार केलेले युद्धोपयोगी संहारक साधन. [सं.]

**अण्वी** वि. अणुरूप; सूक्ष्म : 'अण्वी जीवकळा तेथ। पहावी माझी।।'– एभा २७.१८७. [सं.]

**अतएव, अतेव** क्रिवि. याच कारणासाठी, यासाठी : 'ऐक परमहंसाचे लक्षण। ज्ञानपरिपाकें परिपूर्ण। अतएव शांति ओळंगे आंगण।' – एभा १८.१८४. [सं.]

**अतकाद** पु. विश्वास. [फा.]

**अतखानी** वि. मत्सरी; द्वेषी, दीर्घद्वेषी.

**अतत** उद्गा. आश्चर्यदर्शक उद्गारवाची अव्यय.

**अततता** स्त्री. १ तोतरे किंवा बोबडे बोलणे. (क्रि. लावणे किंवा मोडणे.). २. आढेवेढे घेणे; कां कूं करणे; सबबी सांगणे.

**अतत्त्वार्थ** वि. तत्त्वार्थ नसलेले; तथ्य नसलेले; असत्य; अयथार्थ : 'अतत्त्वार्थ भाषणी धरावें मौन।' – गुच ५३.८८.[सं.]

**अतथ्य** वि. खोटे; असत्य; बनावट; दिशाभूल करणारे (भाषण इ.); आशय नसलेले; निरर्थक : 'ही अनेकांची झालेली समजूत मुळातच अतथ्य नि निराधार आहे.'– ससावा ३. [सं.]

**अतप** वि. (तत्त्व.) तपस्या न करणारा किंवा तपस्येची अवहेलना करणारा. [सं.]

**अतदगुण** एक अर्थालंकार. जेव्हा एखादी न्यून गुणवस्तु जवळच असलेल्या अतद्गुण वस्तूच्या सान्निध्यात असूनही उज्ज्वल गुण घेत नाही असे वर्णन असते, तेव्हा हा अलंकार होतो.

**अतद्व्यावृत्ति–त्ती** स्त्री. सर्व पदार्थांचा निरास करणे; आत्म्याशिवाय सर्व पदार्थ दूर करणे, वेगळे करणे : 'श्रुति नेति नेति येणे शब्द। अतद्व्यावृत्ती निषेधबोधें' –एभा ३.६६७. [सं.]

**अतरल** वि. (अर्थ.) चटकन रोखीत (रोख पैशात) रूपांतर न होणारा

(माल, वस्तू इ.). [सं.]

**अतर्कित** वि. अटकळ, कल्पना, तर्क न केलेले; अनपेक्षित; अचिंतित; अगोदर लक्षात न आलेले; आकस्मिक; अकल्पित. [सं.]

**अतर्क्य** वि. कल्पनातीत; अचिंत्य; गूढ; तर्क करण्यास कठीण : 'अतर्क्य महिमा तुझा गुणहि फार बा हे विधी ।'– केका २७. [सं.]

**अतर्पणी, अतर्प्य** वि. संतुष्ट करण्यास कठीण; समाधान न पावणारा; तृप्त न होणारा; असोशी; ज्याची तृप्ती करणे योग्य किंवा शक्य नाही असा. [सं.]

**अतल–ळ** न. विवर; नरक; सप्तपातालांपैकी पहिले : 'आताळो गेलों; पाताळो गेलों । तिथून आणली... ।' – लोक. वि. ज्याचा तळ लागत नाही असा; अगाध; अतिखोल. [सं.]

**अतल(ळ)स्पर्श** वि. ज्याचा तळ, ठाव लागत नाही असा; अतिखोल (डोह वगैरे).

**अतल(ळ)स** स्त्री. १. साटीन; रेशमी कापड; गर्भरेशमी कापड; काळसर लाल साटीण. २. मखमल. [फा.]

**अतल(ळ)स** पु. परिमळ; स्वाद : 'वडे धिरडीं स्वाद घेती । आतळस आपालांचा ।' – दास १८.१.८.

**अतलाद** वि. समतोल; नेमस्त. [फा. एअतिलाद]

**अतस, अतसिका, अतसी** स्त्री. जवस; अळशी : 'ज्या सावळ्या अतसिका कुसुमासमाना ।' –वामन ४.३.६. [सं. अतसी]

**अतसपुष्प** न. जवसाचे फूल; अळशीचे फूल : 'नाना अतसपुष्पाचिया परी ।' – रंयोवा ४३. [सं.]

**अतक्षणी** क्रिवि. याच क्षणी; याच वेळेला. [सं. एतत्क्षण]

**अत:** क्रिवि. म्हणून; एतदर्थ; अतएव; यामुळे; या कारणास्तव.

**अत:कारणात** क्रिवि. अतएव; यामुळे; या कारणास्तव. [सं.]

**अत:पर** क्रिवि. म्हणून; यापुढे; पुन : (बहुधा नकारार्थी वाक्यात); यानंतर [सं.]

**अता** स्त्री. बक्षीस; देणगी. [फा.]

**अताई–यी** पु. १. शिक्षकाच्या मदतीवाचून नुसत्या परंपरेने शिकलेला गवई, वैद्य; स्वयंशिक्षित व्यक्ती; विनाशिक्षक येत असलेली गायनादी कला : 'बादशहाच्या पदरी तानसेनासारखे नुसते 'अताई' जास्त होते.' –अस्ताई ४१. २. (ल.) दक्ष; कुशल; प्रवीण. [हिं.]

**अतातय, अताता** उद्गा. आश्चर्यदर्शक उद्गार – अतत.

**अतात्त्विक** वि. १. असत्य; असार; अवास्तविक; पोकळ. २. खऱ्यास सोडून असलेले; तत्त्वास बाध आणणारे, धरून नसणारे. ३. उथळ; दांभिक. ४. निराधार. [सं.]

**अतापता** पु. नावनिशाणी; पत्ता; अस्तित्वाचे चिन्ह : 'काळ्या यादीतील लोकांच्या बाबतीत मात्र त्यांचा आतापताही शिल्लक राहणार नाही.' – अआबांदे ७०. [पताचे द्वि.]

**अतायत** क्रिवि. आजन्म; तहहयात; मरेपर्यंत. [फा. ता-हयात]

**अतार–री** पु. १. सुगंधी अत्तरे करणारा, विकणारा; अत्तारी, आतारी; गंधी. २. वेगड, मिऱ्याचे कागद, रंग वगैरे विकणारा. [फा.]

**अतारांकित** वि. १. ज्यावर तारे अंकित, रेखित केलेले नाहीत असे. २. संसदेत किंवा विधानसभेत जी प्रश्नोत्तरे मांडली जातात त्यांचे तारांकित व अतारांकित असे दोन प्रकार असतात. अतारांकित प्रश्नांवर उपप्रश्न विचारले जात नाहीत. [सं.]

**अतांत्रिक** वि. १. औद्योगिक, प्रायोगिक किंवा यांत्रिक कला व उपयोजित शास्त्रे यांच्याबाबतच्या विशिष्ट तंत्राशी संबंधित नसलेले. २. विशिष्ट शास्त्रीय परिभाषेशी संबंधित नसलेले. [सं.]

**अति** क्रिवि. पुष्कळ; फार; अधिक; जास्त; अतिशय. (शब्दापूर्वी हा उपसर्ग पुढील काही अर्थांनी योजतात.) वरचढ; सरस; मागे टाकणारा; पलीकडे. वरून. उदा. अतिकठीण – क्रोधी – गर्व – मिष्ट – मृदू – वास्तववाद इ. [सं.]

**अतिअवर्णी** वि. (भौ.) वर्णीय आणि गोलीय विपथनाचा दोष येऊ नये यासाठी जास्तीत जास्त काळजी घेऊन तयार केलेले, सूक्ष्मदर्शकामध्ये पदार्थ भिंग किंवा वस्तुभिंग म्हणून वापरण्यात येणारे (भिंग).[सं.]

**अतिइच्छा** स्त्री. फार लोभिष्टपणा; अतिशय लुब्धता.

**अतिकरणे** सक्रि. ओलांडणे; पलीकडे जाणे; अतिक्रांत होणे. [सं. अति- कृ.]

**अतिकरे** वि. फार वेळ राहिलेले, शिळे (अन्न इ.). : 'निपजले अन्न तैसें । दुपाहरीं का येरें दिवसें । अतिकरें तें तामसें । घेईजें तें ।।' – ज्ञा १७.१५५.

**अतिकल्पित** वि. विलक्षण; कल्पना युक्त; चमत्कृतिपूर्ण; कल्पनेचा जास्त वापर केलेले. [ सं.]

**अतिकादू** वि. जुलमाने, लबाडीने लोकांपासून द्रव्य उकळणारा; जाचक (सावकार वगैरे); पिळणारा.

**अतिकाल–ळ** पु. १. उशीर; अवेळ; विलंब; योग्य वेळ टळून गेलेला काळ. (पेरणी, भोजन वगैरेस योग्य काळ जो वर्षाऋतू, मध्यान्ह इ. तो टळून अनुक्रमे शरदृतू, तृतीय प्रहर इ. पुढचा काळ). २. नियत कार्यालयीन वेळेनंतर केलेल्या जास्त कामाचा अवधी. [सं.]

**अतिकालिक** वि. कार्यालयीन वेळेनंतर केलेल्या कामाचा, कामासंबंधीचा. [सं.]

**अतिकाळ्या** पु. स्नानसंध्या, पूजा, भोजन इत्यादी नित्य कर्मे उशीरा करणारा माणूस; अतिकाळी वागणारा माणूस; चेंगट, धिम्या.

**अतिक्रम, अतिक्रमण** न. १. उल्लंघन; अतिक्रांत करणे; ओलांडून जाणे : 'तैसें भेटलिया न करवें । अतिक्रमु ।' – ज्ञा १३.२६०. २. (ल.) अमर्यादा; अपमान; अव्हेर (गुरु, शास्त्र इ.चा) अनादर. ३. (कायदा) हळूहळू चोरून किंवा कावेबाजपणाने दुसऱ्याच्या मालमत्तेवर सांगितलेला हक्क, हद्दीत केलेला प्रवेश, दुसऱ्याच्या हक्कात व अधिकारात केलेली ढवळाढवळ. ४. (समाज) परवानगीशिवाय एखाद्या निषेधक्षेत्रात केलेला प्रवेश. सामा. – आज्ञातिक्रमण, कालातिक्रमण, मार्गातिक्रम, मर्यादातिक्रम. [सं.]

**अतिक्रमणे** अक्रि. १. पलीकडे जाणे; उल्लंघणे. २. आज्ञा मोडणे; अमर्यादा करणे; अवमानणे; अपराध करणे : 'व्यसनी स्वयें नव्हे हा आर्य अतिक्रमिसि कां बुधा याला ।' – मोसभा ५.३९. ३. पराभव

करणे; जिंकणे. ४. व्यापणे. ५. न मानणे; दुर्लक्ष करणे.

**अतिक्रांत** वि. १. (काल, स्थल मर्यादा इ.) ओलांडलेला, पलीकडे गेलेला. २. ज्याने अतिक्रमण केले आहे तो. ३. टळलेली, संपविलेली, होऊन गेलेली (गोष्ट इ.). ४. व्यापलेला. ५. जिंकलेला. [सं.]

**अतिक्रांताशौच** न. सुतकाचा अवधी टळून गेल्यानंतर मृत्यूची वार्ता समजल्यामुळे धरण्यात येणारे सुतक. [सं.]

**अतिगणन** न. एखाद्या वस्तूचे मूल्य, किंमत वाजवीपेक्षा अधिक ठरविणे. [सं.]

**अतिगंड** पु. (ज्यो.) सत्तावीस योगांतील सहावा योग. [सं.]

**अतिचर** वि. अतिवेगवान; अतिचंचल (ग्रह, मंगळ वगैरे).

**अतिचार** पु. १.(ज्यो.) एखाद्या ग्रहाने पूर्व राशीचा शेष शीघ्र गतीने उल्लंघून दुसऱ्या राशीवर जाणे : 'तेथ एकाची ते शीघ्रगती । एकग्रह मंदगामी होती । अतिचार का वक्रगती । मंडळभेदें येती एकत्र ।।'– एभा २३.८२७. २. अतिवेगवान माणूस, ग्रह इ. ३. मर्यादेबाहेर वागणे, बोलणे, परवानगीशिवाय अनधिकृतपणे दुसऱ्याच्या हद्दीत जाणे. [सं.]

**अतिचार** वि. अतिविस्तृत; पाल्हाळिक : 'सांघता पृथकाकार अळंकारू : प्रबंध होईल अतिचारू'– रुस्व २७३६.

**अतिचाल नियंत्री** पु. (विअ.) एखाद्या यंत्राच्या प्रमाणापेक्षा जास्त असलेल्या वेगावर नियंत्रण ठेवणारे उपकरण.

**अतिचिकित्सक** वि. चिकित्साखोर; वाजवीपेक्षा जास्त चिकित्सा करणारा; चिरफाड करणारा. [सं.]

**अतिचेष्टा** स्त्री. वाजवीपेक्षा जास्त आचरण : 'हे जाणिजे तेथ अतिचेष्टा न कीजति कीं' – लीचउ ५०३.

**अतिचौकस** वि. फाजील, वाजवीपेक्षा जास्त चौकशी करणारा.पहा : **चौकस**

**अतिछत्र** न. १. शेपूभाजी. २. बडीशेप. ३. भुईछत्र, आळंबे. ४. वेखंडासारखा वास येणारे एक गवत. [सं.]

**अतिजलधारी** वि. (भू.) पाण्याने परिपूर्ण; पाण्याने भरलेले.

**अतिजीवन** न. एकदा मेलेला मनुष्य परत जिवंत होणे.

**अतित–अभ्यागत** पु. अतिथी; बैरागी, गोसावी इ.; अचानक येणारा पाहुणा.

**अतितत** वि. अतिशय विस्तृत : 'पुरोभागी जो हा अतितत सभामंडप असे ।' – सारुह ८.९२. [सं.]

**अतिथि–थी** पु. १. पाहुणा; पांथस्थ. २. ऐन जेवणाच्या वेळी आलेला, अनाहूत मनुष्य; आगंतुक पाहुणा : 'असा अतिथि धार्मिक स्तुतपदा । कदा सापडे । – केका १२१. ३. आगाऊ वेळ न कळवता येणारी व्यक्ती. ४. सभासंमेलनात निमंत्रित केलेली सन्मान्य व्यक्ती.[सं.]

**अतिथिकाळ** पु. पाहुणा येण्याची वेळ; (ल.) दोन प्रहर; जेवणाची वेळ : 'अन्न द्यावें निर्धारीं । अतिथिकाळीं परियेसा ।' – गुच ३२.२९. [सं.]

**अतिथिगृह** अतिथिभवन; पाहुण्यांची किंवा प्रवाशांची उतरण्याची जागा. [सं.]

**अतिथिपूजन** न. अतिथीचा आदरसत्कार, स्वागत. [सं.]

**अतिथिभवन** न. १. प्रवासी, यात्रेकरू यांना उतरण्यासाठी बांधलेले, असलेले निवासस्थान. २. शासनाने किंवा इतर संस्थांनी, पाहुण्यांकरिता किंवा आपल्या कर्मचाऱ्यांकरिता ठिकठिकाणी बांधलेली निवासस्थाने. [सं.]

**अतिथियज्ञ** पु. पंचमहायज्ञांपैकी दुसरा; ब्राह्मणभोजन. [सं.]

**अतिथिसंतर्पण** न. पहा : **अतिथियज्ञ;** पंचमहायज्ञांपैकी एक : 'अतिथिसंतर्पण हा मनुष्य यज्ञ ।' – गीर २८८. [सं.]

**अतिदक्षता विभाग** पु. अत्यवस्थ रुग्णावर विशेष उपचार करण्याचे ठिकाण.

**अतिदिष्ट** वि. आज्ञापित. पहा : **अतिदेश**

**अतिदेव** पु. शिव; विष्णू; सर्वांत श्रेष्ठ (मोठा) देव. [सं.]

**अतिदेश** पु. १. प्रस्तुत विषयाच्या बाहेरील विषयास एखादा नियम, मुद्दा, विधान, तत्त्व लागू करणे, लागू पडेल त्या ठिकाणी लावणे. २. आज्ञा; हुकूम; आदेश.

**अतिदेश** पु. अतिदंश; द्वेष; आकस.

**अतिदेशन** न. (ग.) माहीत असलेल्या क्षेत्राबाहेरील मूल्याबाबत अंदाज करणे. उदा. 'क्ष' या अपरावलंबी राशीच्या १,५,८,११ या ठराविक किंमती असताना 'य' या 'क्ष' वर अवलंबून असलेल्या राशीची मूल्ये काय असतात हे माहीत असल्यास, त्यावरून 'क्ष' ची किंमत १ व ११ यांच्यापलीकडील म्हणजे १, १२ असताना 'य' ची किंमत काय असेल याचा गणिताने अंदाज बांधणे. [सं.]

**अतिधारण करणे** (विधी.) मुदतीपेक्षा अधिक काळ जवळ ठेवणे.

**अतिधारी** वि. (विअ.) ज्याची तीव्रता विशिष्ट प्रवाहापेक्षा उच्च आहे असा (विद्युतप्रवाह). [सं.]

**अतिनव तारा** पु. (ज्यो) ज्याचा महाप्रस्फोट झालेला आहे असा तारा.

**अतिनिद्र** वि. सुस्त; झोपाळू; जास्त झोप घेणारा. [सं.]

**अतिनिर्वातनलिका** स्त्री. (विअ.) (इलेक्ट्रॉनची) अतिनिर्वात पोकळी असलेली नलिका. [सं.]

**अतिनिर्वाती** वि. (भौ.) पृथ्वीभोवतीच्या वातावरणापलीकडचा अजिबात हवा नसलेला (प्रदेश). [सं.]

**अतिनील किरणे** न. (अव.) सूर्याच्या वर्णपटातील नीलकिरणांच्या पलीकडची किरणे. 'अल्ट्रा व्हायोलेट' किरणे : 'सूर्याच्या अतिनील किरणांचा मारा पृथ्वीवर होत होता.' – महा १७. [सं.]

**अतिनील दीप** पु. (विअ.) अतिनील प्रकाशकिरण (आत) असलेला दिवा.

**अतिनीललोहित** वि. दृश्य वर्णपटाच्या (स्पेक्ट्राम) नीललोहित किरणांच्या पलीकडचे; परानीललोहित. [सं.]

**अतिनूतन** वि. (भूशा.) भूशास्त्रीय दृष्ट्या अगदी अलीकडचा.

**अतिनैसर्गिक** वि. रोजच्या सामान्य व्यवहारात न आढळणाऱ्या पण केव्हातरी दृष्टोत्पत्तीस येणाऱ्या (घटना, वस्तू इ.). गहन; अनाकलनीय. [सं.]

**अतिपत्ती –त्ति** स्त्री. (तत्त्व.) १. सन्मार्गभ्रष्ट होणे, स्खलन. २. असिद्धी, असफलता. ३. अतिक्रमण. [सं.]

**अतिपरमाणुविद्युत्कण** पु. पदार्थाचा विद्युतयुक्त असा परमाणूपेक्षाही लहान कण; अत्यंत सूक्ष्मकण. [सं.]

**अतिपाड** पु. १. अतिशय मोल; किंमत. २. (ल.) फार मोठी सीमा, मर्यादा : 'ब्रह्मविद्या देतां उदारू । जे अति पाडाचे ।।' – विसिं १.१.४६.

**अतिपात** पु. १. (नियम) भंग; उल्लंघन; अतिक्रमण; शास्त्र, रीतीभाती यांना न जुमानणे. २. (भू.) ताण व दाब यामुळे फुटणे. [सं.]

**अतिपूर्व** स्त्री. (राज्य.) यूरोपच्या पूर्वेकडील देश पूर्वीय देशात गणले जातात. निकटपूर्व, मध्यपूर्व व अतिपूर्व असे तीन गट पडतात. आशिया खंडाच्या पूर्वेकडील चीन, जपान, कोरिया, विशेषतः इंडोनेशिया, जावा, सुमात्रा इ. देशांना उद्देशून. [सं.]

**अतिप्रदान** न. १. फार चढ्या दराने किंमत अदा करणे. २. देय असलेल्या रकमेहून अधिक रक्कम देणे. [सं.]

**अतिप्रभार** पु. (विअ.) नेहमीपेक्षा जास्त दाबाने सोडलेला विजेचा प्रवाह. [सं.]

**अतिप्रयुक्त** वि. वारंवार प्रयोग केल्यामुळे अर्थहीन झालेले, वापरून गुळगुळीत झालेले (शब्द). [सं.]

**अतिप्रसंग** पु. १. असभ्य वर्तन; लघळपणा; मर्यादा सोडून वागणे. २. वाईट परिणाम, अनर्थ. ३. फार निकट; संबंध, सलगी. ४. विषयांतर, अप्रासंगिक भाषण; पाल्हाळ : 'हा असो अतिप्रसंगु । न संडी पां कथालागु ।।' –ज्ञा ५.६६. ५. कमाल अमर्यादा. [सं.]

**अतिबद्ध** वि. १. अतिकृपण, चिक्कू : 'एकें उदारें अतिबद्धें । क्रद्धें एकें ।।' –ज्ञा ११.१२६. २. जखडलेला; बद्ध केलेला. [सं.]

**अतिबला** स्त्री. (आयु.) एक औषधी वनस्पती; प्रचलित नाव – चिकणा, चिकणी.

**अतिबळी** वि. अतिशय ताकदवान, बलिष्ठ. [सं. अतिबलिन्]

**अतिभर** पु. विपुलता; तीव्रता; फार जोर; चढ : 'व्यथेचनि अतिभरें ।' – विसिं १.६.२३. [सं.]

**अतिभार** पु. (विअ.) क्षमतेपेक्षा जास्त असलेला विद्युत्प्रवाह. [सं.]

**अतिभौतिक** वि. १. निसर्ग नियमाप्रमाणे ज्या गोष्टींचे स्पष्टीकरण देता येत नाही अशा गोष्टीविषयी. २. दैवी, अतिमानवी. ३. सृष्टिनियमांच्या पलीकडचा. [सं.]

**अतिभौतिकशास्त्र** न. भौतिकेतर शास्त्र, तत्त्वज्ञान, अध्यात्मविद्या, अतींद्रिय विद्या. [सं.]

**अतिभौतिकी** स्त्री. भौतिकशास्त्राच्या पलीकडचे ज्ञान; अध्यात्मशास्त्र; भौतिकशास्त्राच्या कक्षेत न येणाऱ्या ज्ञानासंबंधीचे शास्त्र. [सं.]

**अतिमनुष्य** पहा : **अतिमानुष** : 'ज्यांना अतिमनुष्यकोटीचा दर्जा प्राप्त झाला.' – केले १.१८१.

**अतिमर्याद** वि. मर्यादेपलीकडे; सीमेपलीकडे; निःसीम; पुष्कळ; अतिशय; वाजवीपेक्षा जास्त; फाजील. [सं.]

**अतिमात्र** वि. १. अत्यधिक; अतिशय; उचितमात्रा किंवा परिमाणाहून अधिक. ३. तीव्र वासाचा; उग्र. [सं.]

**अतिमात्रा** स्त्री. ठरावीक प्रमाणापेक्षा अधिक दिलेला औषधाचा भाग; नित्यापेक्षा मोठा डोस. [सं.]

**अतिमान** वि. १. अतिशय; बेसुमार; अमर्याद; मर्यादेच्या पलीकडे गेलेला (काम, क्रोध, वायू, पित्त इ.) : 'ब्रह्मगोल अतिमाने कोंदटला ।' – सप्र ८.२०.१७. २. खालावलेली, बिघडलेली (प्रकृती). [सं.]

**अतिमानव** पु. १. (नित्शेचा) आदर्श मनुष्य; मानवी उत्क्रांतीचा परमोत्कर्ष असलेला माणूस. २. सकृद्दर्शनी अतिमानवी शक्ती, गुण ज्याच्याजवळ आहेत असा मनुष्य. [सं.]

**अतिमानवी** वि. असामान्य; ईश्वरी; अगम्य (घटना, गोष्टी). [सं.]

**अतिमानुष** वि. १. मनुष्याला असाध्य असे; अमानुष; अपौरुष, अमानव. २. अलौकिक; मनुष्यापेक्षा गुणाने अधिक; मनुष्याच्या आटोक्यापलीकडचे; दैवी : 'हे सर्वच चक्रवर्ती अतिमानुष आहेत.' – जैवा [सं.]

**अतिमानुषी** वि. मानवाच्या सामर्थ्याच्या पलीकडचा; माणसाहून अधिक शक्तिशाली; माणसाच्या सर्वसाधारण क्षमतेहून अधिक. [सं.]

**अतिमार्गी** पु. एका टोकाला जाणारा; जहाल मनुष्य; दहशतवादी; आतंकवादी. [सं.]

**अतिमुक्त** वि. निरिच्छ. [सं.]

**अतिमुक्तता** स्त्री. १. मधुमाधवी; वीरवंती; माधवीलता; कस्तुरमोगरा. २. तिवस; टेंभुरणी. [सं.]

**अतिमोदा** स्त्री. नवमल्लिका नावाची वेल.
वि. अतिशय सुवासिक.

**अतियुक्ति** स्त्री. अतिशयोक्ती : 'पुण ते अवस्था वाणितां : अतियुक्ति न म्हणावी जाणतां :' – शिव ७४४.

**अतिरक्तदाब** पु. प्रमाणाबाहेर रक्ताचा दाब वाढणे.

**अतिरथ–रथी** पु. १. रथात बसून असंख्य योद्ध्यांशी एका वेळी लढणारा; मोठा योद्धा; वीर, शूर पुरुष. २. (ल.) वादविवादांत हार न जाणारा. [सं.]

**अतिरथी महारथी** पु. १. मोठमोठे वीर; एकापेक्षा एक वरचढ; पराक्रमी पुरुष; श्रेष्ठ पुरुष. २. आपापल्या विषयांतले फार मोठे तज्ज्ञ. [सं.]

**अतिरस** पु. अतितीव्रता; अतिशयपणा; अत्युष्णता; कडक ऊन : 'ग्रीष्माच्या अतिरसीं । सबीजें तृणें जैसीं ।' – ज्ञा ९.१०१. [सं.]

**अतिरंजन** न. १. अतिशयोक्ती; भडकपणा. २. प्रमाणाबाहेर करमणूक. '...त्या अतिरंजनामुळे फाटक इतके भडकतात...' – सप्त २४०. [सं.]

**अतिरंजित** वि. १. अतिशयोक्तिपूर्ण; भडक; फुगवून सांगितलेली, लिहिलेली; तिखटमीट लावलेली : 'चौकीदार व खलाशी यांच्यामध्ये बाचाबाची झाल्याची अतिरंजित बातमी प्रसिद्ध झाली.' – के ७.११.४१. २. भपकेबाज; दिखाऊ; डामडौलाचा. [सं.]

**अतिरंथणे** सक्रि. अंथरणे; पसरणे : 'एवं सिंहासन अष्टभावान्वित । वरि नवरसमय मंडप शोभत । मार्जी अनन्यतेचे आसन आद्यंत । अतिरंथिले ।।' – स्वादि ८.५.५२.

**अतिराग** पु. अत्यंत राग, क्रोध.
वि. अतिशय रागीट, क्रोधी. [सं.]

**अतिरात्र** स्त्री. (तत्त्व.) १. सात सोमयागांपैकी एक याग. २. ज्योतिष्टोम यज्ञाचा एक ऐच्छिक भाग; या यज्ञाशी संबंधित एक मंत्र. ३. चाक्षुस मनूचा एक मुलगा. [सं.]

**अतिरिक्त** वि. १. अतिशय; मर्यादेच्या पलीकडे गेलेला : 'पूर्वीच्या काळी मराठी व इंग्रजी शाळेंत असताना मुले अतिरिक्त अभ्यास करीत होती.' – ब्रावि १०६. २. पलीकडे; शिवाय; वर; निराळा; पुढे या अर्थी समासात. उदा. एतदतिरिक्त. ३. जादा; पहिले असून शिवाय जास्त दिलेले (काम, अधिकार इ.) [सं.]

**अतिरुद्र** पु. रुद्राच्या १३३१ एकादशण्या. (रुद्राची ११ आवर्तने = १ एकादशणी; ११ एकादशण्या = १ लघुरुद्र; ११ लघुरुद्र किंवा १२१ एकादशण्या = १ महारुद्र; ११ महारुद्र किंवा १३३१ एकादशण्या = १ अतिरुद्र) : 'अतिरुद्र केले फळदृशा ।' – गुच १९.८९. [सं.]

**अतिरेक** पु. १. भरमसाटपणा; अमर्यादा; पराकाष्ठा; विपुलता; आधिक्य; कळस; प्रमाणापलीकडे करणे. २. तक्रार; त्रागा; निकड; करडा अंमल. [सं.]

**अतिरेकी** पु. घातपाताची कृत्ये करणारा; विध्वंस करणारा.

**अतिरोग** पु. कफक्षय रोग. [सं.]

**अतिवर्णाश्रमी** वि. १. ब्राह्मणादी चार वर्ण व ब्रह्मचर्यादी चार आश्रम यांच्या पलीकडील (व्यक्ती). २. वेदान्त वाक्यांच्या फक्त श्रवणाने आत्म्याचे स्वरूप समजू शकणारा. [सं.]

**अतिवर्धित** वि. विकृतीमुळे अतिशय जाड झालेला, वाढलेला. [सं.]

**अतिवस** वि. पुष्कळ; बहुत; अतिशय : 'तैसें सकल जीवांचे जीवन । जें अतीवस प्रसन्न ।' – ऋ ३२. [सं.]

**अतिवाद** पु. १. हेकटपणाचा, तर्कटीपणाचा वाद; वितंडवाद : 'आम्हां समक्ष करिशी अतिवाद, त्यजुनि लाजत आर्येशीं ।' – मोसभा ६.३६. २. निंदा; अपशब्द; कठोर भाषण; द्वेष; आकस. [सं.]

**अतिवादी** वि. १. अतिवाद करणारा; वितंडवाद घालणारा; कठोर भाषण करणारा; आपल्याच पक्षाचे समर्थन करणारा. २. सभ्य रीतींचे उल्लंघन करून वाद करणारा. [सं.]

**अतिवास्तववाद** पु. विलक्षण परस्पर विरोधी व व्यामिश्र प्रतिमांच्या साहाय्याने अबोध मनाचे चित्रण करून कला व साहित्य यांची निर्मिती करण्यासंबंधीची चळवळ, विचारप्रणाली. [सं.]

**अतिविष–षा** न. अतिविख (विप्र.) एक औषधी वनस्पती. हिची साल पांढरी, तांबडी अगर काळी असते. [सं.]

**अतिविज्ञान** न. अध्यात्म.

**अतिवीर** पु. श्रेष्ठ योद्धा : 'विश्वाचा विजेता तो अतिवीर तिच्या वचनात होता.' – पहव्र ४४. [सं.]

**अतिवाहिक** न. जीवाला एका कर्मफलातून दुसऱ्या कर्मफलामध्ये घालताना त्याला वाहून नेण्याचे साधन : 'प्रतिदेहापासौनि निवर्तलेया मग अतिवाहिके फलासि नेति' – लीचउ ६३८.

**अतिवृद्धि–द्धी** स्त्री. १. विकृतीमुळे होणारी फाजील वाढ. २. (कृषी.) वनस्पतीचा बुंधा, पाने अथवा फांद्या यावर पेशींची भरमसाट वाढ होऊन बनलेली गाठ. [सं.]

**अतिवृष्टि–ष्टी** स्त्री. अतिशय, प्रमाणाबाहेर पडणारा पाऊस; अनर्थकारक वृष्टी. [सं.]

**अतिव्यय** पु. अमर्याद खर्च; उधळेपणा; उधळपट्टी. [सं.]

**अतिव्ययी** वि. उधळ्या; अतोनात खर्च करणारा. [सं.]

**अतिव्याप्ति–प्ती** स्त्री. १. वाजवीपेक्षा अधिक विस्तार; फाजील गोष्टींचा समावेश; मर्यादेचे उल्लंघन; अतिविस्तृतता. २. (न्याय.) अलक्ष्यावर लक्षणाची व्याप्ती; व्याख्येय जातींमध्ये ज्या ज्या वस्तूंचा समावेश व्हावा अशी इच्छा असते, त्याखेरीज एखाद्या निराळ्या वस्तूचा समावेश होतो असे दिसले तर त्या व्याख्येमध्ये 'अतिव्याप्ती' हा दोष आहे असे म्हणतात. [सं.]

**अतिशय** वि. फार; विपुल; बहुत; वाजवीपेक्षा जास्त; भरमसाट. पु. १. वैपुल्य; विपुलता; भरमसाटपणा; विस्तार; पाल्हाळ. २. अतिरेक; अत्याचार; दांडगाई : 'जो हा करूं अतिशय । कांहो तुम्हां दया नये ।' – तुगा ५२५. ३. आग्रह; हट्ट. ४. अतिप्रसंग; अनर्थ : 'तेवींची संजयो म्हणे चित्तीं । हा अतिशयो या नृपती ।' – ज्ञा १७.४३१. ५. निकड; तक्रार; त्रागा; जिकीर; राग; करडा अंमल : 'तथापि अतिशय करतील. ' – मइसा ३.४३६. ६. उत्कट इच्छा; नेट; माथेफोड.

**अतिशयता** स्त्री. १. (तत्त्व.) जैन अर्हतांना लावण्यात येणारा अतिमानवी गुणविशेष. २. ज्यात एखाद्या वस्तूची उत्तरोत्तर शक्यता वा अशक्यता दाखविली जाते असा एक अर्थालंकार. [सं.]

**अतिशयित** वि. १ अतिशय; फार मोठे; पुष्कळ; विपुल : 'अतिशयित भाग्य त्याचें स्वीयहि अतिशयित दुःख कळवीलें ।।' – मोसभा ३.३९. २. अतिनिद्रित. ३. मागे टाकलेला. [सं.]

**अतिशयेकरून** क्रिवि. आग्रहाने : 'अतिशयेकरून बोलावून ।' – ऐलेखं १९१९.

**अतिशयोक्ति–क्ती** स्त्री. १. आहे त्यापेक्षा अधिक करून सांगण्याची, तिखटमीठ लावून सांगण्याची रीत. २. वाचाळता; बडबड (क्रि. करणे). ३. एखाद्या वस्तूचे लोकमर्यादेच्या बाहेर प्रतिपादन, वर्णन केले असता होणारा एक अर्थालंकार : 'जो अंबरीं उफळतां खुर लागलाहे । तो चंद्रमा निजतनूवरि डाग लाहे ।' – नल ३१. [सं.]

**अतिशहाणा** वि. लुच्चा; अति धूर्त; फाजील शहाणा; ज्याची योजना चुकते असा; अव्यावहारिक; (ल.) मूर्ख.

**अतिशीतन** न. (भौ.) एखाद्या द्रव पदार्थाचे त्याच्या गोठणबिंदूच्याही खालील तपमानावर शीतन करणे. [सं.]

**अतिशुद्धवाद** पु. धर्मशास्त्र आणि नीतिमत्ता याविषयीचे नियम काटेकोरपणे पाळले जावेत असा आग्रह धरणारे मत. [सं.]

**अतिशून्य** वि. (तत्त्व.) १.गुणातीत. २. शून्यावकाशापलीकडचा. ३. अनुभवातीत. [सं.]

**अतिशूद्र** पु. शूद्रजातीपेक्षा हलकी जात; या जातीचा मनुष्य. [सं.]

**अतिशोष** पु. १. वारंवार तहान लागणे; घसा कोरडा पडणे. २. आत्यंतिक ओढ; आकर्षण : 'नव्याचा पाश्चात्य अतिशोष पडल्यामुळे ह्यांची रुची फार बिघडत चालली आहे.' – विराशिंरो १३९. [सं.]

**अतिश्रम** पु. अतिशय मेहनत; जीवापलीकडचे, शक्तीपलीकडचे कष्ट. [सं.]

**अतिसर्ग** पु. १. देणगी. २. निरोप. ३. अनुदान. ४. कृपा. ५. वियोग.

**अतिसंवाहक** पु. मोठ्या प्रमाणात वहन करणारा.

**अतिसंवेदी** वि. जास्त संवेदनशील. [सं.]

**अतिसंवेद्यता** स्त्री. त्वचा व इतर इंद्रियांची संवेदना अतिशय तीव्र असणे. [सं.]

**अतिसामान्य** वि. (मानस.) सर्वसामान्यांपेक्षा वरच्या पातळीवरचा, सर्वसामान्यांपेक्षा जास्त बुद्धिमत्ता असलेला. [सं.]

**अतिसार** पु. अतिहगवण; अति मलविसर्जन. [सं. अति + सृ]

**अतिसारी** वि. अतिसाराने पीडित असा; पहा : **अतिसार**

**अतिसूक्ष्म** वि. १. अत्यंत बारीक, लहान; दुर्बिणीशिवाय न दिसणारा. २. अतितलम; अत्यल्प; अतिशय थोडे. [सं.]

**अतिसूक्ष्मदर्शक यंत्र** अत्यंत लहान वस्तू ज्याच्या योगाने पाहता येतात असे यंत्र. [सं.]

**अतिसूक्ष्म रोगाणु –णू** पु. दुर्बिणीतूनही न दिसणारे रोगजंतू.

**अतिसेवन** न. १. प्रमाणाबाहेर सेवन. २. आरोग्य – विघातक द्रव्यांचे प्रमाणापेक्षा अधिक सेवन. [सं.]

**अतिसेवा योजन** न. (अर्थ.) देशात उपलब्ध असलेल्या नोकऱ्यांपेक्षा उपलब्ध कर्मचाऱ्यांची संख्या कमी असणे.

**अतिक्षेतृ** वि. अत्यंत पराक्रमी : 'सागर संगमीचा अतिक्षेतृ । कांतिमंडळिचा राजपुत्र' – रुस्व २३८.

**अतीत** वि. १. गत; भूत; गेलेला; संपलेला; अतिक्रांत (काल, मार्ग वगैरे). उदा. अतीत काल = गेलेली वेळ : 'तेवीं अतीता जन्माचें । उणें जो वाहे ।।' – ज्ञा १३.५३८. २. मुक्त झालेला. उदा. दुःखातीत, देहातीत : 'म्हणौनि जन्मक्षयां । अतीत ते धनंजया ।।' – ज्ञा १४.५९. ३. पलीकडे गेलेला; पलीकडचा; भावातीत; शब्दातीत. ४. (तत्त्व) ईश्वरकल्पनेला बाहेर ठेवणारा हर्बर्टचा तात्त्विक सिद्धान्त – अतीत ईश्वरवाद. ५. अनुभवता न येणारा. ६. माया मोह आदी नसलेला; निर्लेप; निर्विकार (ब्रह्म). [सं.]

**अतीत** पु. १. पाहुणा; पहा : **अतिथी** : 'तेथें समयीं आला अतीत । संन्यासी ब्रम्हचारी अन्नार्थ ।।' – एभा ८.१५४. २. पाहुणचार : 'तेहीं अतीत केले' – स्मृस्थ ६९. ३. बैरागी, भिकारी, पांथस्थ.

**अतीत – अभ्यागत** पु. अतिथी; पाहुणा; आगंतुक; बैरागी; गोसावी इ. [सं. अतिथि + अभ्यागत ]

**अतीत अंक** पु. (ग.) ठरावीक मूल्य असलेल्या अंकापेक्षा जास्त मूल्य असलेला अंक. [सं.]

**अतीतणे** अक्रि. होऊन जाणे : 'येथें भूतें जिथें अतीतलीं ।।' – ज्ञा ७.१६१. [सं.अतीत]

**अतीत्व** न. अतीतत्व; पलीकडे असण्याचा धर्म : 'आधीं आत्मत्वा रूप करूं : मग अतीत्त्वा पाड धरूं' – मूप्र ११८८.

**अतीव** क्रिवि. फार; पुष्कळ; अत्यंत; बहुत; अतिशय : 'अतीव दुःखानं त्याच्यामागे...' – आभा १०३. [सं.]

**अतींद्रिय** वि. इंद्रियास आकलन न होणारा; त्याच्या सामर्थ्याबाहेरचा; इंद्रियास अगम्य; अगोचर (परमाणू, ईश्वररूप इ.) : 'जरी अतींद्रिय लाहिजे । ज्ञानबळा ।।' – ज्ञा ६.३३. [सं.]

**अतींद्रिय विचारसंक्रांति, संक्रमण, सहसंवेदन** दूरच्या दोन व्यक्तींच्या मनात एकाच वेळी एकच विचार, भावना येणे. [सं.]

**अतींद्रिय संवेदन** न. (मानस.) ज्ञानेंद्रियांनी आकलन न होणाऱ्या अतिसूक्ष्म वस्तू, गोष्टी वगैरेंचे संवेदन, जाणीव. [सं.]

**अतींद्रिय ज्ञान** न. पंच ज्ञानेंद्रियांना आकलन न होणारे ज्ञान; इंद्रियास अगम्य ज्ञान; भूत भविष्य कालासंबंधी, तसेच दुसऱ्याच्या मनात काय विचार चालले आहेत त्याचे ज्ञान. [सं.]

**अतुरबळी, अतुरबळीया** पहा : **अतुर्बली** : 'सहस्त्रभुजा होतील : अतुरबळीया होसील' – लीचउ १४५.

**अतुर्बली–ळी अतुलबळी** वि. १. अतिशय कणखर; मजबूत; बलाढ्य; दांडगा; पराक्रमी; बिनजोड; धाडसी : 'ज्ञानमार्गी अतुर्बळी । तुमचें दैन्य हरील ।।' – गुच ५.३१. (ल.) फारच मोठा; अवाढव्य; अचाट. २. असह्य वर्तणुकीचा; त्रास देणारा; उद्धट; अरेराव. [सं. अतुलबल]

**अतुर्बळ** न. अपार शक्ती; धाडस.
वि. बलाढ्य; शक्तिमान : 'यादव करूनि अतुर्बळ । नाना दुष्ट दमिले सकळ ।।' – एभा १.२२१ [सं. अतुलबल]

**अतुल** वि. तुलना नाही असे; बिनजोड; असामान्य; अनुपम : 'अतुल बळें अतिप्रबळ । वाढलें जें यादवकुळ ।।' – एभा १.२२७. [सं.]

**अतुल** ना. लबाडी; विश्वासघात; प्रतारणा.

**अतुलनीय,अतुल्य** वि. १. बिनजोड; अजोड; कशाशीही तुलना न करता येण्याजोगा; ज्याला तुलना नाही असा. २. असमान; असदृश. पहा : **अतुल** [सं.]

**अतेली** वि. तैलहीन; तेल न वापरता केलेले (अन्न) : 'गोसावी हळूहळू एकु दी अलणी : अतेली : (पदार्थ आरोगिती)' – लीचपू १९.

**अतोज** न. आश्चर्य; नवल : 'तुवां सांगितलिया अपुर्वी कथा । तेणे आइकोनि आमचेआ चिता । अतोज जाहले ।।' – क्रिपु १५.१३३.

**अतोनात, आतोनात** वि. अतिशय; बहुल; भरपूर; पुष्कळ; विपुल. [सं. अतः+नास्ति]

**अतोर्ध्व** क्रिवि. त्यानंतर.

**अतौत** शअ. आत; मध्ये : 'तेथें कृष्ण जळा अतौता ।' – निगा ४५. [सं.अन्तः]

**अत्तर** न. सुवासिक फुलांचे अगर पदार्थांचे शुद्ध सत्त्व, अर्क; सौगंधिक अर्क; पुष्पगंधार्क. [फा. इत्र]. (वा.) **अत्तर जाळणे, अत्तराचे दिवे लावणे** – मूर्खपणाने उधळपट्टी करणे.

**अत्तर गुलाब** पु. सभा, मंगलकार्य प्रसंगी पानसुपारी, अत्तर, गुलाबपाणी वगैरे देण्याचा प्रघात; (सामान्यतः) पानसुपारी; संभावना; आदरसत्कार. [फा.]

**अत्तरदाणी** स्त्री. अत्तर ठेवण्याचे पात्र.

**अत्तार– री** पु. सुगंधी; सुवासिक द्रव्ये विकणारा; गंधी. पहा : **आतार** [फा.]

**अत्तुरी** स्त्री; भार्या; बायको. पहा : **अंतुरी** [अस्तुरी]

**अत्यग्निष्टोम** पु. १. सोमयागाचा एक प्रकार. या मार्गात अग्नीची स्तुती असल्यामुळे याला हे नाव. २. ज्योतिष्टोम यज्ञाचा ऐच्छिक दुसरा भाग. ३. तीव्र किंवा प्रबल पाचक शक्ती. [सं.]

**अत्यणु-णू** पु. (वै.) अतिसूक्ष्म जीव (व्हायरस). [सं.]

**अत्यधिक** वि. प्रमाणापेक्षा जास्त; बेसुमार; वाजवीपेक्षा अधिक; परमावधीचा. [सं.]

**अत्यय** पु. १. विध्वंस; शेवट; अखेर; नाश; नुकसान; नाहीसे होणे. (सामा.) धनात्यय; धर्मात्यय; पापात्यय इ. : 'जीर्णे असे अत्यय पातकासी ।' - सारुह १.३९. २. सोडणे; पलीकडे जाणे; त्याग करणे; (ल.) मरण. उदा. गेहात्यय, देहात्यय. ३. अतिशय, पराकाष्ठेचे, मर्यादेबाहेर असणे; अमर्यादता; अतिक्रांतता.

**अत्यर्तव** पु. (आयु.) योनिमार्गातील रक्तपित्ताचा विकार. - आयुसिद्ध १.७८.

**अत्यर्थ** क्रिवि. पुष्कळ; अतिशय; फार; अतोनात. [सं.]

**अत्यल्प** वि. खूप कमी; फार थोडे; अत्यंत अल्प. [सं.]

**अत्यवस्थ** वि. मरावयास टेकलेला; मरावयाच्या बेतात असलेला; मरणोन्मुख; प्रकृती अत्यंत बिघडलेला. [सं.]

**अत्यवस्था** स्त्री. वाईट बिकट दशा (शरीराची) : 'मागे काहीं दिवस मदनमंजरीची अत्यवस्था झाली होती.' -मर्म १४१. [सं.]

**अत्यशन** न. अति खाणे : 'तिळगुळाचे अत्यशन इ. च्या परिणामी दुसऱ्याच दिवशी मला रक्ताचे जुलाब होऊ लागले.' - माजी ५०६.

**अत्यंत** वि. क्रिवि. अतिशय; फाजील; फार; मनस्वी; बेसुमार; अमर्यादपणे; बहुत; बेहद्द. [सं.]

**अत्यंतणे** अक्रि. पूर्णपणे नष्ट होणे; मरणे : 'एथ भूतें जिये अत्यंतलि ।' - राज्ञा ७.१५७. [सं.अत्यन्त]

**अत्यंताभाव** पु. १. तिन्ही काळी किंवा कधीही एखादी वस्तू अस्तित्वात नसण्याची स्थिती; पूर्ण अभाव. उदा. वंध्येचा पुत्र. २. (न्याय) अभावाच्या चार प्रकारांपैकी एक प्रकार. पहा : **अभाव** [सं.]

**अत्यंती** स्त्री. बारकाईने पाहणे.

**अत्याचार** पु. १. अविहित, व्यवहाराविरुद्ध वर्तन. २. अधर्माचरण; अनुचित आचार. ३. जोर जबरदस्ती; जुलूम : 'चालू हिंदवासियांवरचे राज्यकर्त्यांचे अत्याचार आणखी किती दिवस सहन करावयाचे?' - के १६.४.३०. ४.बेकायदेशीर, राज्यद्रोही, घातपातादी कृत्य : 'हिंदुस्थानांत इतर कोठेहि अत्याचार झाला तरी मी (गांधी) माझा निश्चय पार पाडणार.' - के २५.३.३०. ५. माणुसकीला सोडून केलेले वर्तन. (खून, जाळपोळ, बलात्कार, नासधूस.) [सं.]

**अत्याचारी** वि. १. विहित आचार-विधी सोडून वागणारा. २. जुलमी; कुकर्मी.

**अत्यादर** पु. १. पूज्यभाव; सत्कार; स्वीकार; सन्मान; अंगीकार : 'असेल अशी आवडी करिशी कां न अत्यादर ।' - केका ६१. २. विशेष प्रेम; श्रद्धा : 'मज हृदयीं सद्गुरु । जेणें तारिलों हा संसारपुरु । म्हणऊनि विशेष अत्यादरु । विवेकावरी ।' - ज्ञा १.२२. [सं.]

**अत्याधान** न. १. अतिक्रमण. २. होमाग्नीला कशावर तरी ठेवण्याची क्रिया. [सं.]

**अत्याम्लता** स्त्री. जठर भागात निर्माण होणारे आम्लाचे आधिक्य; छातीत जळजळ निर्माण करणारे आम्लपित्त. [सं.]

**अत्युद्गारवात** पु. एक प्रकारचा वात. यात रोग्याला ढेकर फार येतात. [सं.]

**अत्र** पु. स्पर्श : 'सुखुदुःखाचे अत्र । जीवा लागो नेदी ।' - ज्ञाप्र ८३४.

**अत्र-त्रे** क्रिवि. ह्या स्थळी; येथे : 'अत्र गंध सुमनी पूजा । करीतसे धर्मराजा ।।'- कथा ६.२१.४. [सं.]

**अत्रक** प्रतिबंध : 'प्रसिद्ध लेखाने आईकट करून एकत्र राहण्यास अत्रक होत नाही.'- गोरी ११. (गो.)

**अत्रत्य** वि. येथील; या ठिकाणचे; स्थानिक. [सं.]

**अत्रप** वि. निर्लज्ज; दुःशील; उद्धट. [सं.]

**अत्रप-फ-ब** वि. १. अधिक; फालतुक; जास्ती; रिकामा; निराळा; वापरात नसलेला : 'एक अत्रप लुगडे व शालजोडी, अंथरण्यास व पांघरण्यास येथे आहे.' - मंघो १०९. [अर.अत्राफ]

**अत्रप, अत्राप-फ-ब** न. अनिश्चितपणा; असंबद्धपणा; दुटप्पीपणा (भाषणाचा, आचरणाचा). (क्रि. ठेवणे, राखणे).
वि. अनिश्चित; मोघम.
क्रिवि. असंबद्धपणे; विसंगतपणे; अनिश्चितपणे; दुटप्पीपणाने.

**अत्रस्थित** वि. येथे असलेले : 'ये प्रांतीचे ग्रहस्त वतनदार तत्रस्थित व अत्रस्थित प्रसंगांस अनुपयोगीच ।' - पेद ३९.१५५. [सं.]

**अत्रास** पु. त्रागा; कष्ट; श्रम : 'उपास अत्रास करू नये. वेळेवर बाहेर शरम राहे तें करावे'- मइसा ६.१५३.

**अत्रुण** न. (वन.) फ्लॅकोर्टिप्टसी कुलातील काटेरी झुडूप. हे कोकण, बंगाल, बिहार, ओरिसा, तामिळनाडू या ठिकाणी आढळते. साल तिळाच्या तेलात उगाळून संधिवातावर लावतात.

**अत्लस** स्त्री. अतलस; रेशमी कापड; साटीण: 'अत्लस हात चौदा'- मइसा ३.१९.

**अथ** अ. १. (संस्कृत ग्रंथारंभी लिहिण्याचा शुभ शब्द) आता येथून; पुढे; नंतर; अशा रीतीने. २. अथवा : 'आपण अश्व असे विकिले मग एक बसो अथ दोन वरी ।'- वामन ४.४ (वा.) **अथपासून इतिपर्यंत**- आरंभापासून अखेरपर्यंत; आदीपासून अंतापर्यंत; साद्यंत. (ग्रंथाच्या आरंभी 'अथ' व शेवटी 'इति' असते म्हणून.).

**अथज्या** क्रिवि. इकडे. (ना.) [सं. अत्र+त्य]

**अथ तु** अ. जर; परंतु : 'अथ तु जो कोणु हुवि ए सासन लोपी' -प्रारा शिला.

**अथर्गण** न. १. रानटीपणाची, आडदांड वागणूक; आरडाओरडा; अट्टाहास; आदळआपट, शिवीगाळ, उतावीळपणा; घाई किंवा आग्रह; २. स्वार्थ साधण्यासाठी रडणे, उर्मटपणे बोलणे इ. (कों)

**अथर्व** पु. १. अग्नी किंवा सोम पूजणारा. २. अथर्ववेद. [सं.]

**अथर्वण** पु. १. ऋग्वेदादी वेदांपैकी चौथा वेद. 'अथर्व' वेदाची २० कांडे आहेत. २. अथर्व वेदाचा द्रष्टा, संपादक, ऋषी. ३. आपल्या फायद्यासाठी दुसऱ्याची चहाडी, लावालावी इत्यादी खेळ करणे किंवा जारणमारण करणारा. [सं.]

**अथवा** उअ. विकल्पबोधक अव्यय. अगर; किंवा; निरनिराळे किंवा विरुद्ध पदार्थ, शब्द, गोष्टी वेगळे करण्यासाठी योजावयाचा शब्द;

साधारण मानाने 'किंवा, वा, अथवा' हे शब्द सारख्याच अर्थाने योजतात. [सं. अथ + वा]

**अथश्री** स्त्री. प्रारंभ; सुरुवात. [सं.]

**अथाऊं** वि. अत्यंत खोल : 'माझि अथाउं म्हणतां । थडिये चि पांडुसुता ।' - राज्ञा १३.५४४.

**अथाक, अथांग** वि. तळ, ठाव, थांग लागत नसलेले; अतिशय खोल; अतल स्पर्श : 'क्षमा आणि शांतीचा दुजा अथाक सागर तूं ।'- प्रला १७१. [सं. अस्थाग=फार खोल]

**अथापि** उअ. असे असताही; तथापि; तरीसुद्धा. [सं.]

**अथारी** स्त्री. १. सामाईकीने शेत वखरण्याची अगर नांगरण्याची पाळी. २. एखाद्या शेती कामाच्या मोबदल्यात गडी माणसांना दिलेले जेवण. (व.)

**अथाव** पु. १. खोल पाणी : 'पैं अथावी घट बुडाला ।'- ज्ञा ८.६५. २. खोली : 'तो विषयविषाचा अथावो ।'- ज्ञा १८.१०५४. वि. खोल; अथांग; अगाध.

**अथांबी** क्रिवि. अथांग; खोल : 'वधू गौतमाची पतिशाप डोही । बुडाली अथांबी शिळारूप होई ।'- वाबो ३०. [अथांगीचे अप.]

**अथिर** वि. चळवळ्या; चळवळ करणारा. [सं. अस्थिर ]

**अथिल-ला** वि. आश्रय केलेला; योग्य; समर्थ; थोर; भाग्यवान : 'चिद्धाग्यें अथिला विदेह मिथिलाभूपाळ भूपावली ।'- आसी १. पहा : **आथिला** [सं. अस्ति]

**अथिलीथडी** स्त्री. १. अलीकडील बाजू २. (ल.) आस्तिक्य बुद्धी.

**अथेति** अ. आरंभापासून शेवटपर्यंत; अथपासून इतिपर्यंत. [सं. अथ+इति]

**अद-आद** वि. अर्धा; निम्मा; शब्दांना हा उपसर्ग म्हणून लागतो. जसे : - अदघडी, अदपाव, अदशेर इ.

**अद** न. एक अधातुद्रव्य. (आयोडीन.)

**अदए** न. देता न येण्याजोगे : 'इस्वरी काइ अदए असे ?' - लीचपू २४४.

**अदखणा** वि. १. कुरूप; देखणा नव्हे तो. २. ज्यास पाहवत नाही तो; दुसऱ्याच्या उत्कर्षाबद्दल असहिष्णु; दुष्ट; मत्सरी : 'पंडित वाचाळी ठकडे अदखणी ।' - दावि ४५८.

**अदखलपात्र** वि. पोलिसांकडून आपणहून दखल घेण्यास योग्य नाही असा (गुन्हा): 'गुन्हे जसे दखलपात्र असत तसे अदखलपात्रही असत.' - पब्र १२२.

**अ-दखली** वि. १. ज्या अपराधात स्वत: होऊन हस्तक्षेप करण्यास पोलिसास अधिकार नाही असा (अपराध). २. दखल न घेण्याजोगा; अहस्तक्षेप्य. [अ. +फा. दखल]

**अदगज** वि. अर्धा गज. अर्धावार : 'अदगजास . ।।. रुपये'- समारो २.३५. ४. [ सं. अर्ध +फा. गज]

**अदगळणे** अक्रि. झुरणे; दु:खित होणे; व्यथित होणे; वेदनांनी विव्हळ होणे. [ व.]

**अदट-टु** वि. १. दृढ; पक्का निश्चल : 'रुक्मिणीचा भक्तिभावो अदट ।'- कथा ४.८.१७३. २. धीट; अजिंक्य; पराक्रमी; सामर्थ्यवान : 'भगवंत महाअतुर्बळी । अदट दैत्यातें निर्दाळी ।'- एभा २.७७६. [क. अदटु = धैर्य, सामर्थ्य]

**अदट** न. अदृष्ट, नशीब, दैव.

**अदट** वि. दाट; विरळ नसलेले.

**अदत्त** वि. १. कृपण; चिक्कू; कवडीचुंबक; कद्रू. २. न दिलेला.

**अदत्त अभ्यर्थन** हक्काची यावयाची राहिलेली रक्कम.

**अदत्त बाकी** स्त्री. १. न दिलेली, द्यावयाची राहिलेली रक्कम; देणे असलेली शिल्लक रक्कम. २. मेळ न जमलेली रक्कम.

**अदत्तमत** न. न दिलेले मत.

वि. ज्यावर मतदान झालेले नाही अशा (मागण्या). [ सं.]

**अदत्त याचना** स्त्री. आर्थिक अदत्त प्रभाग.

**अदत्तव्यय** द्यावयाची राहिलेली खर्चाची रक्कम.

**अदत्त शिखामणी-शिरोमणी** पु. पराकाष्ठेचा कृपण.

**अदना** वि. १. नीच; कनिष्ठ; कमी प्रतीचा. २. अडाणी; अज्ञानी : 'आमचे नावे मिरजेतील अदना मनुष्य देखील दगड फोडीत असतो.' - ऐलेसं ६४१८. [फा. अद्‌ना ]

**अदपाव** पु. अर्धापावशेर; शेराचा आठवा हिस्सा.

**अदपुत्तिक** न. (शाप.)अद (आयोडिन) संयुक्त द्रव्य; जखमा भरून काढण्यास उपयोगी.

**अदब-बी** मर्यादा; विनय; नम्रता; सन्मान; प्रतिष्ठा; मोठेपणा; आदर (क्रि. ठेवणे, राखणे, संभाळणे, राहणे). [अर. अदब]

(वा.) **अदब चालविणे** - सन्मान राखणे; **अदब ठेवणे** - सांभाळणे; मान देणे; आदर दाखवणे; **अदब धरणे**- सलामी देणे. **अदब बजावणे** - आदर दर्शविणे; छातीवर एकावर एक हात ठेवून नम्रतापूर्वक उभे राहणे. (मुजरा करणे, मान देणे.) : 'बोटं जुळवून ती पेशव्यांना अदब बजावीत होती'- राऊ १२१.

पु. १. चिंता; श्रम; दु:ख; त्रास (क्रि. पडणे, पावणे, सोसणे). २. निकड; जरुरी (कामाची, बाबीची) (क्रि. पडणे).

**अदबखाना** पु. तुरुंग; कैदखाना : 'हरदोजणास अदबखाना ठेवले.'- मइसा १८.१९.

**अदबणे** अक्रि १. (आजाराने) खालावणे; अशक्त-अधू होणे; खितपत पडणे. २. टेकीला येणे; गांजणे; बेजार होणे (दु:खाने, त्रासाने, पीडेमुळे). ३. रंजीस येणे; मेटाकुटीस येणे; थकूनभागून जाणे. (श्रम, मेहनत, कष्ट-काळज्या यांनी). ४.परिश्रम करणे; काबाडकष्ट करणे; अति खटपट करणे; दगदग सोसणे.

**अदबशीर** वि. १. आदर बाळगणारा; सन्मान ठेवणारा. २. पडदा इत्यादिकाने आच्छादलेले; सुरक्षित; मर्यादेने राहिलेला. ३. आटोपशीर. क्रिवि. नम्रतापूर्वक; लक्षपूर्वक; काळजीने; कळकळीने. (क्रि. ठेवणे, राखणे, सरणे, हालणे). [अर. अदब]

**अदभागी** वि. हतभागी; फुटक्या कपाळाचा, नशिबाचा; दु:खी व दरिद्री; उपभोग नशिबात नसणारा. [सं. हतभागिन्]

**अदभ्र** वि. बहुत; मोठा; फार : 'अन्योन्य कृताघातें बा मूर्छा पावले अदभ्रा ते ।' - मो.

**अदमण-णी, आधमण** पु. अर्धामण, अंदाजे २० किलो. (माप-वजन); अर्धा मण वजनाचा जिन्नस. [सं. अर्ध +मान]

**अदमनका, अदमणा** वि. अर्ध्या मणाच्या वजनाचे – मापाचे (भांडे, वजन, दगड इ.).

**अदमीयता** स्त्री. माणुसकी : '....म्हणो लागला, जे मजवर बाजीरायाचा इतबार अगर अदमीयेतेची वचनाची सत्यता वाटत नाही'- पेद १०.५८. [फा. आदमी]

**अदमुरे –मोरे, आदमुरे** न. पूर्णपणे तयार न झालेले दही; गोड दही; आंबटपणा कमी असलेले दही. [क. अधमुरे = अर्धा मोडलेला] वि. अर्धे मुरलेले; घट्ट न झालेले (दही).

**अदमुरे चांदणे** कोवळे चांदणे : 'अदमुरें चांदिणे फोडिजे । कैरवांचा मकरंदु काढिजे ।' – शिव ७७६.

**अदमुस** क्रिवि. दमछाक. 'पावन्याले अदमुसं करे' – मेइं३९.

**अदम्य** वि. १. दमन करण्यास कठीण; ताब्यात आणण्यास कठीण; वश, अंकित करता येणार नाही असा; अतिशय प्रबल. २. सतत राहणारा; टिकणारा (उत्साह इ). ३. कोणाचेही दडपण, दाब न जुमानणारा. ४. (वै.) ज्या रोगावर औषधे किंवा वैद्यकीय चिकित्सा यांचा उपयोग होत नाही असा. [सं.]

**अदय** वि. निर्दय; कठोर; दुष्ट; क्रूर. [सं.]

**अदये** वि. देता न येण्याजोगे : 'गोसावी ईश्वरू आणि ईश्वरी तरि अदये नाही.' –लीचपू ३८४.

**अदर्शन** न. १. दर्शन न होणे; नाहीसे होणे. २. दिसण्याची स्थिती नसणे; न दिसणे; लोप; तिरोधान; अदृष्टावस्था. [सं.]

**अदल** पु. पहा : **अद्दल**
वि. वास्तविक; खरा; रास्त; न्याय : 'या खटल्यात अदल इन्साफ झाला'–विक्षिप्त १.४०. [फा. अदल]

**अदलणे** अक्रि. बुडणे : 'यंदा सेतेही अदलली. दिवाणचा धारा वारतां संकट झाले असें'–वैद १७४३.३६.

**अदलाबदल** स्त्री. १. याचे त्याला व त्याचे याला असा फेरफार; येथले तेथे, तेथले येथे; परस्पर देवघेव; बदलाबदल. २. मोबदला. [बदलचे द्वि.]

**अदलामधला** वि. मधल्या भागातला; ना पहिला ना शेवटचा; कोठला तरी.

**अदलिंकित** वि. (वन.) गर्भात दलिकेचा अभाव असलेली (वनस्पती). [सं.]

**अदल्या घरचा** वि. पहिल्या नवऱ्यापासून झालेला (मुलगा).

**अदवट** न. अधोड; जनावरांचे न कमावलेले कातडे.

**अदवा सुंठ** स्त्री. आले; सुंठ. [सं. आर्द्रक]

**अदशेर** पु. अर्धशेर (माप किंवा वजन), अंदाजे अर्धा किलो.

**अदहनीय, अदाह्य** वि. १. जाळण्याला किंवा दहन करण्याला कठीण, अयोग्य; दहन न करता येण्यासारखे. २. जे जाळता कामा नये ते. [सं.]

**अदळ** पु. स्त्री. १. झीज; बापर; वर्दळ; रहदारी; त्रास; जिकीर; छळ; आटआट. २. घाव; धक्का; हेलकावा (क्रि. काढणे, लागणे, लावणे). वि. १. अयोग्य; असार; गर किंवा मगज कमी असलेला. २. कच्चा; हळवा. ३. दळे नसलेले; डाळिंब्या नसलेले; एकदल; (धान्य, फळ, फूल इ. जसे तांदूळ वगैरे). [सं. आ+दल]

**अदळपण** न. १. असमर्थता; अयोग्यता; असारता : 'जें अदळपण देखिलें । तुझिये प्रति ।' – ज्ञा १३.९४९. २. दुबळेपण [क. अदिर्]

**अदंडनीय, अदंड्य** वि. दंड–शिक्षा–शासन करण्यास अयोग्य.[सं.]

**अदंतता** स्त्री. (वै.) दात नसणे; दंतहीन अवस्था. [सं.]

**अदंबरी** वि. मेघवर्णी; ढगाच्या रंगाचा. [सं.आडंबर ]

**अदंभित्व, अदांभित्व** न. साधेपणा; नम्रता; आढ्यता नसणे; ढोंग न करण्याचा गुण; साधुपणा : 'तरि अंदभित्व ऐसें । लोभियाचे मन जैसें ।।'– ज्ञा १३.२०३. [सं.]

**अदा** पु. १. नखरा; नजर फिरविणे, डोळे मोडणे वगैरे शृंगारिक हावभाव; अभिनय; विलास; अंगविक्षेप; ऐट : 'हसतमुख सदां पाहुनि तुझी अदा । भुलुन झुकले ।'– होला १३५. २. खूण; शकुन; चेष्टा: 'जवळ जाऊन पाहतों तो कावळा अदा दावितो ।' – अफला ७५.

**अदा** पु. १. पूर्ण करणे; भरपाई; फेड : 'आम्ही आपला आमील ठेवून तुमचा पैका अदा करून देऊं'– दिमरा १.२१४. २. लाभ; नफा; फायदा. ३. संग्रह; साठा; संचय; मुद्दल; भांडवल; मालमत्ता. ४. उत्पन्न; वसूल; मिळकत; प्राप्ती. (वा.) **अदा करणे**– फेडणे; देणे; वारणे; देऊन टाकणे (मागणी, कर्ज): 'परवानगी अदा केली होती.' – ओंकार ३२६. [अर. अदा]

**अदाई** स्त्री. १. फेड; भरपाई. २. मिळकत; प्राप्ती; उत्पन्न. ३. (ल.) कामाची पूर्णता.
वि. हाती आलेले; भागविलेले– देऊन टाकलेले (पैसे).[फा. अदा]

**अदाकारी** स्त्री. १. अभिनय; बतावणी.२. भावनाविष्कार : 'त्या नयनातील अदाकारी जाणत्याला समजत होती.'– राऊ ७९. [फा.]

**अदात** वि. दात न उगवलेला; अल्पवयी.

**अदाता** वि. अनुदार; कृपण; कंजूष.

**अदातृत्व** न. कृपणपणा; अनुदारपणा; कंजूषपणा. [सं.]

**अदानुमायन्द** वि. जमा दाखविणारा; वसूल दाखविणारा. [फा. अदा]

**अदाब अर्ज बजावणे** झुकून– नम्रतापूर्वक सलाम करणे : '.... पेशव्यांना तीनदा अदाब अर्ज बजावत.' – राऊ १२०.

**अदायित्व** न. १. जबाबदारी नसणे; जिम्मेदारी नसणे; २. आर्थिक बोजा, जबाबदारी नसणे. [सं.]

**अदालत** स्त्री. १. न्यायकचेरी; न्यायालय. २. खटला; चौकशी; इन्साफ; न्यायव्यवहार. [फा.]

**अदावत, अदायम** स्त्री. १. वैर; दुष्टावा; हेवा; भाऊबंदकी; आकस; शत्रुत्व; द्वेष; मत्सर; दावा : 'धर्मावरून कोणी कोणाची अदावत करू नये.' – चंद ३८. २. आळ; दोषारोप. (क्रि. करणे, घालणे, घेणे, पडणे.) ३. दुखापत. ४. संकट. ५. सतावणे.

**अदावती – त्या** वि. द्वेष्टा; वैर साधणारा; अदावत करणारा; भांडखोर; कुंभांड रचणारा; शत्रुत्व करणारा. [फा.]

**अदावळ** स्त्री. १. खोडसाळपणा; टवाळकी; दांडगाई; चेष्टा; उपद्रव (लहान मुलांचा). २. खोटा आरोप; तोहोमत; दोषारोपण; आळ

(क्रि. घालणे, टाळणे, येणे) : 'मल्हारराव यांनी पुत्राच्या कटाक्षें हे अदावळ घातली आहे.' – भाब ६. २. लचांड; संकट; छळ; त्रास.

**अदिकि** वि. आद्य; सर्वात पहिली : 'तूं अदिकि गे देवमाते ।।' – क्रिपु ५.

**अदिति–ती** स्त्री. इंद्रादी देवतांची – आदित्यांची माता; पृथ्वी. [सं.]

**अदिनाशंबा** शुक्रवारची रात्र. [फा.]

**अदी** वि. जन्माने हलका; अयोग्य; लहान.

**अदीक** वि. अधिक; जास्त : 'तव आबैस अदीक दुख उपनलें' – लीचपू ३२६.

**अदीप्त प्रदेश** पु. (भौ.) शीत कॅथोड इलेक्ट्रॉन नळीच्या वायुक्षेत्रातील आयन; त्यांच्यात प्रकाशित होण्याची क्षमता येईपर्यंत अनुदीप्तहीन किंवा कमी प्रकाशित दिसतात. या अप्रकाशित भागाला अदीप्त प्रदेश असे म्हणतात. [सं.]

**अदीप्त विमोच** न. वायूमध्ये दृश्य प्रकाश निर्माण न होता वीज मोकळी होणे. [सं.]

**अदीबिदी** क्रिवि. सर्वांच्या आधी.

**अदीक्षित** वि. दीक्षा न झालेला; प्राकृत; सामान्य. [सं.]

**अदुगर** क्रिवि. अगोदर : 'ए बया! माझा अदुगर कडेलोट कर!' – बाय २.२ (ग्रा.)

**अदुभणी** वि. दोहिले न जाणारे : 'चांदिणेयाचा पाण्हावनी : चंद्रकांत दुभती अदुभणी' – रुस्व ५६९.

**अदुलागदुला** पु. एक खेळ : 'कुणी वर्तुळात बसून अदुलागदुला खेळत असतो.' – शिळान ६२.

**अदुहनी** पहा : **अदुभणी** : 'शब्दब्रह्म दुहिलें अदुहन : काढिले लीलामृत' – रुस्व २०

**अदु:खनवमी** स्त्री. भाद्रपद शुद्ध नवमी (भावी वर्षातील सर्व दु:खे टळावी म्हणून या दिवशी स्त्रिया देवीची पूजा करतात); सुखप्राप्तीसाठी करावयाच्या देवीच्या पूजेचा दिवस. [सं.]

**अदृशी** वि. अदृश्य; गुप्त : 'श्रीगुरू जाले अदृशी ।' – गुच ५१.४४४.

**अदृश्य** वि. दिसेनासा, दिसत नाही असा; गुप्त; अगोचर; अलक्ष्य.[सं.]

**अदृश्य आयात** स्त्री. (अर्थ.) बँकिंग, विमा, वाहतूक (हवाई, जल इ.) यासारख्या सेवांची आयात.

**अदृश्यकणी** वि. (भूशा.) ज्याच्या घट्ट रचनेतील विभक्त कण नुसत्या डोळ्यांना दिसत नाहीत असा (अग्निज खडक).

**अदृश्य निर्यात, निष्क्राम्य** स्त्री. (अर्थ.) बँकिंग, विमा, वाहतूक (हवाई, जल इ.) यांसारख्या सेवांची निर्यात.

**अदृश्यवाद** पु. ध्येयवाद.

**अदृष्ट** वि. न दिसलेले; न पाहिलेले; गुप्त.

न. नशीब; दैव; प्राक्तन; कपाळ; प्रारब्ध; ईश्वरी संकेत : 'होय अदृष्ट आपैतें । तयिं वाळूचि रत्नें परते ।।' – ज्ञा १५.२२. [सं.] (वा.) **अदृष्टास येणे** – १. अनुचित गोष्टही करावी लागणे; नशिबी येणे; भोगावे लागणे. २. ईश्वर; परमतत्त्व : 'वेधु केव्हडा अदृष्टाचा : जीव जातांसि' .– ऋम ८९.

**अदृष्टखर्च** पु. दानधर्म इत्यादी न दिसणारा खर्च; याचे फळ पुढील जन्मी मिळते; मरणोत्तर किंवा परलोकी सुफल मिळावे म्हणून केलेला खर्च. (अन्नदान वगैरे). [सं. अदृष्ट + फा. खर्च]

**अदृष्टणे** अक्रि. लोपणे; दृष्टिआड, गुप्त होणे : 'तैसे स्थूळ ते सवाखंडी धुळीची मोट । त्यामाजी वस्तु अदृष्टली चोखट ।' – योसं ६.४७.

**अदृष्ट धनसंचय** पु. गुप्त धनसंग्रह; गुप्त धनाचा साठा.

**अदृष्ट पूर्व** वि. पूर्वी कधीही न पाहिलेला; न कल्पिलेला. [सं.]

**अदृष्ट फल, अदृष्टफलन** भविष्यकाळी मिळणारे फल. अकल्पित फळ. [सं.]

**अदृष्टभय** न. १. स्वकर्माच्या परिणामासंबंधाची, कृतकर्माविषयीची भीती किंवा काळजी. २. भवितव्यासंबंधीची भीती. [सं.]

**अदृष्टवशात्** क्रिवि. यदृच्छेने; दैवयोगाने; नशिबाने. [सं.]

**अदृष्टवंत–वान्** पु. ज्याचे नशीब चांगले आहे असा (माणूस); भाग्यवान. [सं.]

**अदृष्टवाद–मत, अदृष्टार्थ, अदृष्टमतवाद** १. दैववाद किंवा तसे मत; कर्मवाद. २. मागील जन्मातील पापपुण्याचे या जन्मी फळ मिळते असा विश्वास.

**अदृष्टवादी, अदृष्टार्थवादी** पु. दैववादी; अदृष्ट मताचा पुरस्कर्ता. [सं.]

**अदृष्टसेवा** स्त्री. परमेश्वराची सेवा : 'श्रीप्रभूची सेवा जे अदृष्टसेवा' – लीचपू ५८५.

**अदृष्टहीन** वि. दैवहीन; दुर्दैवी; फुटक्या नशिबाचा : 'शक्तिहीन सामर्थ्यहीन, अदृष्टहीन भिकारी ।' – दास २.३.३४. [सं.]

**अदृष्टार्थी** वि. पारलौकिकाची इच्छा करणारा :'अदृष्टार्थींचे जे असति तयांची करणे तियें ऐसीचि की' – स्मृस्थ ६३.

**अदेख** वि. मत्सरी; असहिष्णु; दुसऱ्याचा उत्कर्ष पाहवत नाही असा; वाईटावर असलेला. [सं. अ+दृश]

**अदेखणा** वि. १. कुरूप; बेडौल; दिसण्यात वाईट. २. मत्सरी; हेकेखोर; असहिष्णू. पहा : **अदेखणा**

**अदेखणेपण** न. १. दुसऱ्याचे बरे न पाहवणे; विघ्न संतोषीपणा; मत्सर. २. कुरूपता.

**अदेखाई** स्त्री. शत्रुत्व; मत्सर; हेवा : 'दुसऱ्याचे भाग्याची अदेखाई न करावी.' – सिंब ५१.

**अदेय** वि. देता न येण्यासारखे; बहाल न करण्यासारखे : 'विचारवन्तां महापुरुषां । अदेय कांहीं असेना ।' – मुक्तेश्वर. [सं.]

**अदेयदान** न. अयोग्य देणगी; अपात्री दान. [सं.]

**अदेयमत** वि. मत देता येणार नाही असे; मत दिले जाणार नाही असे.

**अदेश** पु. उपदेश : 'आम्हापासि ये ना आम्हांसी अदेश न करी' – लीच २.२८.

**अदेशिता** स्त्री. (राज्य.) कोणत्याही राष्ट्राचे नागरिकत्व नसल्याची अवस्था. [सं.]

**अदैव** वि. हानिकारक; मारक; विरुद्ध : 'अदैव वडवानळू । दानवांसी ।' – शिव ५१६. [सं.]

**अदोष** वि. १. दोषरहित; निरपराध. २. अदूषणीय; दोषास अपात्र. [सं.]

**अदोळणे** अक्रि. अंदोळणे; आपटणे; आदळणे; हालणे; आंदोलन पावणे : 'हार गळ्यांतिल ख्याल करित महिभाळ अदोळित ।' – अमृतक ५१. [सं. आंदोलन]

**अद्दण** पु. अर्धा मण : 'कुंदगोळ्या धर्मिष्ठ शेतकऱ्यांनी तेलाचा एक अद्दण घाण्यापाठीमागे देवतेच्या नंदादीपासाठी दिला.' – के १०.७.३९.

**अद्दल** स्त्री. न्याय; (ल.) ठेच; ठोकर; कृतकर्माचे प्रायश्चित्त; शासन; शिक्षा. [फा. अदल] (वा.) **अद्दल घडणे** – शिक्षा मिळणे; ठोकर बसणे; इशारत मिळणे.

**अद्दल** वि. हुशार (चांगल्या अर्थी), न्हावी–शिंपी–कसबी इ.; (वाईट अर्थी) चोर–लबाड–शिनळ–हरामी. पहा : **अट्टल**

**अद्दल** वि. नेमके, बरोबर, तितकेच, मोजके (माप, प्रमाण, वजन, हिशेब इ.) : 'जी खेळांतील मार्कांची सीमा ठरवावी तितकेच अद्दल मार्क झाले तरच तो खेळ जिंकतो.'– पाट २६. [सं.]

**अद्ना** कनिष्ठ; नीच.

**अद्धा** पु. एक प्रकारचा पतंग.

**अद्भुत** वि. अपूर्व; आश्चर्यकारक; पूर्वी न झालेले; चमत्कारिक; विलक्षण; अचंबा वाटण्यासारखे.
न. आश्चर्य; उत्पात; चमत्कार (धरणीकंप, उल्कापात इ.). विश्वास बसणार नाही अशी गोष्ट. (वा.) **अद्भुत मांडणे** – नवीन, चमत्कारिक चाल रूढ करू पाहणे. [सं.]

**अद्भुत कौतुक** न. चमत्कार; आश्चर्यकारक कृत्य.

**अद्भुतरम्य** वि. १. विलक्षण; चमत्कारिक; तऱ्हेवाईक; कल्पनारंजित; मनोरंजक. २. अवास्तव; कल्पनानिर्मित. [सं.]

**अद्भुतरस** पु. साहित्यातील नवरसांपैकी एक रस. [सं.]

**अद्भुतवाद** पु. वस्तुजाताकडे नवलाईने पाहण्याची वृत्ती; प्रत्येक वस्तूमध्ये काही तरी विशेष असते असे मानण्याची पद्धती. [सं.]

**अद्भुतशांति–ती** स्त्री. (शेंडे नक्षत्र, धरणीकंप इ.) भावी अरिष्टसूचक काही अद्भुत झाले असता त्या अरिष्टाच्या निरसनार्थ जे होमादी कर्म (विधी) करतात ते. [सं.]

**अद्य** क्रिवि. आज; हल्ली. [सं.]

**अद्यतन** वि. आजचे; चालू दिवसासंबंधाचे.
न. एका मध्यरात्रीपासून दुसऱ्या मध्यरात्रीपर्यंत चोवीस तासांचा काल; आजचा दिवस. [सं.]

**अद्यतनता** स्त्री. नावीन्य; आधुनिकता : 'ते आपल्यात अद्यतनता राखायची काळजी घेत असत.' – सासिं २१७. [सं.]

**अद्यतनभूत –काळ** पु. १. (व्या.) अपूर्ण भूतकाळ (चालू भूतकाळ). २. सामान्य–अनियमित भूतकाळ. [सं.]

**अद्यप्रभृति** क्रिवि. आजपासून. [सं.]

**अद्यायावत्** क्रिवि. (वि. प्र.अद्यावत) आजपर्यंत; आज पावेतो.
वि. अगदी अलीकडचा; अगदी नवा; आधुनिकतम; अगदी नवीन.

**अद्या** पु. अदा; नफा; मिळकत; लाभ; प्राप्ती (व्यापार, नोकरी यापासून).

**अद्याप–पि** क्रिवि. अजून; अजूनही; आजपर्यंत. [सं.]

**अद्यावत** पहा : **अद्यायावत** : 'अमृतराव यास आणावयास यांजकडून गेले आहेत, अद्यावत आले नाही.'– ऐसंसा ५. ५७.

**अद्यावर** अ. आजवर, अद्यापपर्यंत : 'पारावा आपल्या माहेरास जाऊन गोसावी होऊन तिकडेच राहिली. ती अद्यावर जिवंत आहे.' – ऐसंसा १३४.

**अद्र** उअ. उलट.
क्रिवि. मुद्दाम; हटकून. (व.)

**अद्रक** न. आले, ओली सुंठ. [सं. आर्द्रक]

**अद्रिष्ट** वि. पारलौकिकाची इच्छा करणारा : 'परि अद्रिष्टाची सोय सांगे । ऐसे सामर्थ्य नाही.' – मूप्र ४५१.

**अद्राव्य** वि. वितळण्यास कठीण; ज्याचा रस होत नाही किंवा जे विरघळत नाही असे. [सं.]

**अद्रि –द्री** पु. पर्वत; डोंगर. [सं.]

**अद्रीण** न अजीर्ण. (गो.)

**अद्रुण** क्रिवि. निश्चितपणे; हटकून; पूर्णपणे : 'त्याचा सरळपणा त्याला अद्रुण फशी पाडतो.' – तोरण २६५.

**अद्रुम** अ. खात्रीने : 'ढग आले की मासे अद्रुम मरतात.' – शेलूक ३७.

**अद्रे** क्रिवि. आदरून; मुद्दाम. (खा.) [सं. आदर]

**अद्रोह** पु. द्रोह, बेइमानी, विरोध न करणे : 'अद्रोह अहिंसा आदि गुणांच्या अभावाने' – ज्ञासौ ७१. [सं.]

**अद्वय** वि. द्वैतविरहित; एकरूप; अभेद : 'ते आपणचि अद्वय ब्रह्म ।' – ज्ञा ५.१६. [सं.]

**अद्वयवादी** वि. अद्वैतवादी; सर्व वस्तू एकचित्स्वरूप आहेत असे मानणारा. [सं.]

**अद्वंद्व** न. १. सुखदुख, मान–अपमान यासारख्या द्वंद्वांपलीकडील; पहा : **निर्द्वंद्व**. २. विरोधाचा अभाव. ३. ज्यात किंवा ज्याच्या संबंधाने तंटा किंवा मतभेद नाही असे. ४. ब्रह्म आणि जग, जीवात्मा आणि परमात्मा ह्यांचे ऐक्य आहे असे मत. [सं.]

**अद्वातद्वा** क्रिवि. विसंगत; असंबद्ध; भरमसाट; भलतेसलते; अचकट विचकट; ताळतंत्र सोडून; मनस्वीपणाने; बेतालपणे (भाषण, वर्तणूक, बोलणे) : 'त्याने अद्वातद्वा विचार प्रकट केल्यास तो उपहासास पात्र होईल.' – लोटिकेले ४.३१५.

**अद्वितीय** वि. १. ज्याच्यासारखा दुसरा कोणी नाही असा, विलक्षण; निरूपम; बिनजोड; सर्वश्रेष्ठ; लोकोत्तर; असामान्य.

**अद्वैत** न. १. जीव व शिव (परमात्मा) एकच असे मत : 'जडसृष्टी आभासात्मक असल्यामुळे खोटी व ब्रह्म हेच एक सत्य व आत्मतत्त्व आहे. जीव हा परमात्म्यापासून अभिन्न असल्यामुळे तो व शिव एकच होय.' हे (शंकराचार्यांचे) मत. २. ब्रह्म. ३. (ल.) मतैक्य; ऐक्य; दाट परिचय; सलगी; एकोपा. [सं.]

**अद्वैतकुसरी** स्त्री.अद्वैत मताचे गूढ ज्ञान.

**अद्वैतभाव** पु. अद्वैतपण; एकी; ऐक्यमत्य. [सं.]

**अद्वैतमत** न. जीवात्मा व परमात्मा यांचा वस्तुतः अभेद आहे असे मत. [सं.]

**अद्वैतवाद** पु. (तत्त्व.) भेदाभेदांवर आधारलेला दृश्य–संसार हा मिथ्या असून भेदरहित ब्रह्म तेवढेच सत्य आहे असे प्रतिपादणारे वेदान्तमत. शब्द, शुद्ध, केवल असे अद्वैतवादाचे प्रकार आहेत. [सं.]

**अद्वैतसुख, अद्वैतानंद** न. अद्वैताच्या साक्षात्कारामुळे मिळणारे सुख, आनंद; ब्रह्मसुख. [सं.]

**अद्वैती** वि. अद्वैत तत्त्वज्ञानावर श्रद्धा असणारा. [सं. अद्वैत]

**अध** वि. अर्धः 'कीं (चंद्र) बहुता कपाळा वरिपडा जाला । तेणेंही अधा होए' – सव ८४.

**अध** न. १. खालचा भाग : 'परि अर्धीहि असोसें । मूळ यया' – ज्ञा १५.५७. २. गुदद्वार : 'आकुंचूनु अध । देऊनि तीन्ही बंध' – ज्ञा १८.१०३१.

**अधउर्ध** वि. खालीवर : 'ऐसी यककी जीवघडी । अधउर्ध क्रमुनि परिवडी । मागुतिया येति बुढी । कर्मभूमी'–ज्ञाप्र २४८.

**अधकाव, अदकाव** वि. अधिक; उरलेला; जास्त; फालतूक; फाजील. [सं. अधिक]

**अधकुरो** वि. अर्धवट; अपूर्ण. (गो.) [सं.अर्ध+कोर]

**अधकोर** पु. नितकोर; आठवा भाग (भाकरीचा). [सं. अर्ध+कोर]

**अधचामधचा** वि. १. अधीलमधील; अर्धवट; मधल्या ठिकाणचा; ना पहिला ना शेवटचा; कोठील तरी. २. कोणत्याही एका वर्गात न पडणारा; धड ना शहाणा धड ना मूर्ख; न खरे न खोटे; ना शैव ना वैष्णव इत्यादी. [सं. आद्य + मध्य]

**अधन व्यवहार** पु. फौजदारी प्रकरण, बाब; ज्यात पैसा किंवा मालमत्ता यांचा संबंध नाही अशी कायद्याची बाब.

**अधपणे** क्रि. होरपळणे : 'अधपर्ली तवकें । इंद्रियें धरिर्ली ।' –ज्ञा १२.४६. [सं. अर्ध+तपन]

**अधम** वि. १. हलका; कनिष्ठ; क्षुद्र; क्षुल्लक. २. (ल.) नीच; वाईट; हलकट; नष्ट; निंद्यकर्मी; दुष्ट. [सं.]

**अधमअर्ध** न. बेंबीखालचा शरीराचा भाग. [सं.]

**अधमअंग** न. पाय. (उत्तमांगाच्या उलट) [सं.]

**अधमकिडा** पु. १. बकऱ्याच्या यकृतामधील रक्त ज्या विकारावर सांगितले आहे असा घोड्याचा एक विकार. २. माणसाचे यकृत ज्यावर औषध म्हणून सांगितले आहे असा एक रोग (एका दंतकथेप्रमाणे). ३. काळपुळी. ४. नेहमी दुखणेकरी माणूस.

**अधमति** वि. दुष्ट बुद्धीचा : 'कंसे श्रीकृष्णरामा अधमति मरणा मूळ धाडी अक्रूराते' – गरा २२.

**अधमदा दृष्टि–ष्टी** स्त्री. (नृत्य.) खाली बसणे, डोळ्यांची उघडझाप करणे, बाहुल्या कधी दृश्य व कधी अदृश्य करणे असे प्रकार ज्यात होतात ती. [सं.]

**अधमर्ण** पु. कर्जदार; ऋणी; देणेदार. [सं. अधम+ऋण]

**अधमुसा होणे** क्रि. अर्धमेला होणे; रडकुंडीस येणे; हिरमुसणे : 'न्यून गंडापायी मी अगदी अधमुसा झालो होतो.' – एपिआ ३४०.

**अधर, अध्धर** वि. १. अधीर; उतावीळ; दम, धीर नसलेला; असहिष्णू. २. धर; बैठक नसलेला; निराधार; अधांतरी असलेला; अंतराळी असलेला.

क्रिवि. १. अल्लाद; वरच्यावर; अधांतरी; हलकेच; सैलपणे. २. अचळवी; अरळ; अचानक. [सं. अ+धृ] (वा.) **अधर ठेवणे, लोंबविणे** – अधांतरी, काही आधार नसता मध्येच लोंबत ठेवणे.

**अधर** वि. १. खालचा; तळचा. २. हलका.

पु. १. खालचा ओठ. २. (सामान्यतः ) ओठ : 'जीवशिव एकाकार तैसे मिनले दोन्ही अधर ।।' –एरुस्व १.५७. ३. (नृत्य अभिनय) खालच्या ओठाने (अधराने) दाखविले जाणारे अभिनय. (वा.) **अधर चावणे, चावून खाणे** – रागाने ओठ चावणे; अतिशय रागात असणे. [सं.]

**अधर** पु. (जीव.) उभ्या अक्षाशी काटकोनात असलेल्या व प्रकाशाकडे वळलेल्या पानाचा किंवा तत्सम सपाट अवयवाचा खालचा पृष्ठभाग. [सं.]

**अधरअग्र** वि. (वन.) झाडाच्या खोडापासून फुटून जमिनीत जाणारी (मुळे). [सं.]

**अधरखंडन** न. ओठांचा चावा; चुंबनप्रकार; आवेशाने घेतलेले चुंबन : 'पहिले नाजूक चुंबन ही पुढल्या अधरखंडनाची प्रस्तावना.' – ब्रम्हकु ४. [सं.]

**अधरचतुर्थक** पु. न. (वा.सां.) प्रथम, खालचा चौथा भाग.

**अधरती** स्त्री. अधःपाताची प्रवृत्ती : 'हा मुख्य परिसावा गुणु : अधरतीचा' – मूप्र १२२२.

**अधरनिर्यास** न. ओठावरील पाणी; अधरामृत : '(देवो) मानु दे अधरनिर्यासी'– रुस्व ७०.

**अधरपान** न. ओठांचे चुंबन; मुका. [सं.]

**अधरपुट** न. १. दोन्ही ओठ. (अंजलिपुट या शब्दाप्रमाणे शब्द) : 'बत्तीस हिरकण्या एकवळीनें विराजती अधरपुटीं ।' [सं.]

**अधरमूल** न. (वन.) झाडाच्या खोडापासून फुटून जमिनीत जाणारे मूळ.

**अधरस्पंथ** पु. आगापिछा; आधार; धरबंध; मागचा पुढचा संदर्भ जुळेल असे बोलणे; ठावठिकाणा; मुद्दापत्ता; थांगपत्ता.

**अधरामृत** न. ओठांच्या चुंबनापासून मिळणारा अमृततुल्य रस; ओठांतील अमृत. [सं.]

**अधराक्ष** पु. (वन.) बीजातील दलिकांच्या खाली असलेला प्रारंभिक अक्षाचा भाग; द्विदलिकित बीजातून बाहेर आलेल्या मूलांकुरांच्या टोकामागील भाग. [सं.]

**अधरोत्तर** न. १. दुरुत्तर. २. उद्धट उत्तर. [सं.]

**अधरोत्तर पद्धती** स्त्री. (वानस.) जीत लहान शाखा शेंड्याजवळ असतात अशी शाखा फुटण्याची पद्धत.

**अधर्म** पु. १. शास्त्रविरुद्ध आचरण; वर्तन; धर्मबाह्य आचरण. २. पाप; गुन्हा; वाईट कर्म. [सं.]

**अधर्मचारी** वि. अधर्माने वागणारा; धर्मबाह्य वर्तन करणारा. [सं.]

**अधर्मयुद्ध** न. बेकायदेशीर, नियमाविरुद्ध, अनीतीचे युद्ध; कपटयुद्ध. [सं.]

**अधर्मरत** वि. अधर्माचरण करण्यात आनंद मानणारा; पापकृत्यात रमणारा. [सं.]

**अधर्मविपाक** पु. अधर्माचा अखेरचा (वाईट) परिणाम; अनीतीचे फल; पापाची निष्पत्ती. [सं.]

**अधर्माचरण** न. धर्माविरुद्ध वर्तन; अनीतीची वागणूक. [सं.]

**अधर्मात्मा** वि. अतिदुष्ट; अनीतिमान (मनुष्य.). [सं.]
**अधर्मिष्ठ** वि. अतिशय अधर्मी (माणूस); धर्मनिष्ठ नसलेला. [सं.]
**अधर्मी** वि. अधर्माने वागणारा. [सं.]
**अधलंड** व. न अधला न मधला असा.
**अधलंड मधलंड, अधरलंड मदलंड** वि. १. धड ना इकडचा धड न तिकडचा; अधचा मधचा; कोठला तरी. २. अनिश्चित प्रकारचा.
**अधला** वि. पहिला; आधीचा.
**अधलामधला** वि. मधील भागाचा; अधील मधील. [सं. आद्य+मध्य]
**अधवड** पहा : **अधोड**
**अधवडचा** वि. अलीकडचा; ताजा; अर्वाचीन. [सं. अद्य+वर्त]
**अधवणी** न. आधण येण्यासाठी, उकळण्यासाठी ठेवलेले पाणी; आधणाचे पाणी.
**अधवरौते** क्रिवि. खालचा वरती. 'तेथ अधवरौते आकुंचे' - ज्ञा ६.२२७.
**अधवा** वि. १. तिघात वडील (अधवा, मधवा, धाकटा). २. परंपरेला धरून नसलेला; परंपरा सोडून वागणारा. ३. नवीन; अर्वाचीन. [सं. आद्य]
**अधव्याचा** व. १. उपटसुंभ; उपरा; अकस्मात प्राप्त. २. सरळ मार्गात नसलेला; शिरस्त्यात नसलेला; मध्येच आढळणारा. ३. कायमचा नव्हे असा; तात्पुरता. ४. बापजाद्यांना माहीत नाहीत अशा गोष्टी करणारा; कधी कुळात कोणी केले नाही अशा भानगडीत पडणारा. ५. एकाएकी सत्ताधारी बनलेला. ६. अलीकडील.
**अधस्तन** वि. खालचा [सं]
**अधस्त्वचा स्तर** पु. (वै.) त्वचेच्या खालचा चरबीचा किंवा स्नायूंचा स्तर. [सं.]
**अधस्वी** स्त्री. १. दासी. २. ठेवलेली बाई; रखेली.
**अधस्वी** वि. अधाशी; अघोरी; अतिखादाड.[अधाशी अप.]
**अध:** क्रिवि. खाली; तळाला; समासात खालचा या अर्थी. जसे:- अध:प्रदेश, अधोभाग. [सं.]
**अध:कृत्त** वि. (भूशा.) ज्याच्या खालचा थर (बाजू) कापला गेला आहे असा (खडक).
**अध:ताप, अधस्ताप** पु. संकट; अडचण; असहाय स्थिती : 'आर्यपुत्रा मला एकटीला अशी अध:तापी टाकून आपण जावे हे योग्य नव्हे.' - चारु ९६. [सं. अध:+ताप]
**अध:पतन** न. १. खाली पडणे; अध:पात. २. पुण्य-क्षयामुळे नरकात पडणे; स्वर्गातून मृत्युभूमीवर किंवा नरकात पडणे. ३. नरकपुरी: 'वेदशास्त्रे पुराणें तया बोलती अध:पतन । जया नाहीं परिज्ञान गुरुपरंपरेची ।।' ४. वाईट मार्गाला लागणे; स्थानभ्रष्ट होणे; नैतिक घसरगुंडी. [सं.]
**अध:पंथ** पु. नरकात जाण्याचा मार्ग. [सं.अध:पथ]
**अध:पात** पु. १. अध:पतन २. सदाचरणातून दुराचणाकडे जाणे. ३. चांगल्या परिस्थितीतून वाईट परिस्थितीत जाणे.[सं.] (वा.) **अध:पात होणे** - हीनावस्थेस पोचणे; नरकात पडणे.

**अध:प्रमाण** वि. प्रमाणापेक्षा कमी; खालच्या प्रतीचे; कमी तीव्र (मद्य). [सं.]
**अध:प्रवाही चक्र** न. पाणी जेथून पडते अशा ठिकाणी बसविलेले चक्र; हे पाण्याच्या जोराने फिरते. उंचावरून पडणाऱ्या पाण्याच्या प्रवाहाच्या जोराने फिरणारे चक्र.
**अध:स्तर** पु. १. तळचा थर; खालचा थर.२. (भूशा.) पृथ्वीच्या कवचाखाली असणारा खडकांचा भाग. [सं.]
**अध:स्थ** वि. (वन.) पुष्पदलांच्या खालच्या पातळीवर असणारा (किंजपुट). उदा.पेरू, डाळिंब, भोपळा इ. [सं.]
**अध:स्थळी** क्रिवि. (बायकी) १. खाली; अधोदिशेकडे. २. अभरवशी (पडणे, पाडणे).[सं.अध :+ तल किंवा स्थल] (वा.) **अध:स्थळी पहावयास लावणे**- मानखंडना करणे; फजिती करणे; तोंडघशी पाडणे.
**अध:स्थापित** वि. (भूशा.) तळाशी गेलेला. [सं.]
**अध:स्वस्तिक** न. (ज्यो.) स्वस्तिकापासून काढलेली लंबरेषा अधो दिशेकडे वाढवली असता आकाशाच्या अदृश्य गोलार्धाला ज्या बिंदूत छेदते तो बिंदू; स्वस्तिकाच्या थेट उलट दिशेला म्हणजे द्रष्ट्याच्या तळपायाच्या दिशेला असणारा खगोलावरील बिंदू. [सं.]
**अध:क्षति-ती** स्त्री. १. (भू.) उघड्या पडलेल्या खडकांवर वातावरणप्रक्रिया झाल्याने निर्माण झालेला खडकांचा चुरा उंचभागाकडून सखल भागाकडे वाहून जाणे. २. (भूशा.) खालचा टप्पा; खालची स्थिती.
**अध:क्षेप** पु. (भूशा.) विभंग होऊन सापेक्षत: खाली गेलेला खडकाचा भाग.
**अधाडा** पु. १. तुटलेला कडा; अर्धकडा : 'जिये ब्रह्माचळाचा आधाडा ।'- ज्ञा ७.६९. २.(ल.) आधार.
वि. अधांतरी. [सं. अर्ध+तट]
**अधाडे** शअ. मध्ये;कडे. वि. अर्धवट.
**अधाधा, अधाधे** वि. अर्धे अर्धे : 'स्त्री-पुरुष नामभेदे नांदे । जग सकळ आधाधे- ।पणे जिहीं ।' -अमृ १.१७. [सं. अर्ध+अर्ध]
**अधाधिणे** अक्रि. भिवविणे; भेडसावणे.
**अधार्मिक** वि. धर्माप्रमाणे न चालणारा; धर्म न मानणारा; दुराचारी; अन्यायी; पातकी. [सं.]
**अधाशी-सा- सी** वि. हावरा; असोशी; अतृप्त; लोभी; खादाड. [सं. अति किंवा अधि+आशी]
**अधास** स्त्री. हाव; लोभ; उत्कट इच्छा; खा खा; हावरेपणाची वासना. [सं. अधि किंवा अध:+आश = खाणारा]
**अधांटी** स्त्री. केवळ दुसऱ्याला त्रास देण्यासाठी वात्रटपणाने काढलेल्या शंका-कुशंका, हरकती इ. (देणे, काढणे, फोडणे).
**अधांतर** न. आकाश व पृथ्वी यांच्या मधला प्रदेश. [सं.]
**अधांतरी-अधांत्री** क्रिवि. हवेत; अंतराळी; आकाशात; वर; मध्येच. (वा.) **अधांतरी ठेवणे**- लोंबकळत ठेवणे; निकाल न लावता ठेवणे; अनिर्णीत ठेवणे.

वि. निराधार; एकांडा.

**अधि** अ. नेहमी नामाशी संयुक्त असणारा उपसर्ग; वर; वरचढ; आधिक्य; अधिकृतता या अर्थी (स्थल, परिमाण, गुण याने). उदा. अधिपती. [सं.]

**अधिऔष्णिक** वि. (भूशा.) कमी उष्णतामानाच्या परिस्थितीत मॅग्मीय जलाद्वारे तयार झालेले (धातुक निक्षेप). [सं.]

**अधिक** वि. १. जास्त; पुष्कळ; फार. (ल.) नकोसा; नावडता : 'मावशींना चंद्रिका जशी अधिक झाली तशी चंद्रशेखरांना काही झाली नव्हती.'– निचं ११८. २. अधिक मोठे; गुरुतर. ३. वर; पेक्षा; जास्त. ४. (ग.) दोन संख्यांची बेरीज करण्यासाठी वापरण्यात येणारा शब्द व त्याचे चिन्ह; जास्त; बेरीज केल्यावर येणारी राशी; संख्या. उदा. अ+ब (अ अधिक ब). ५. विशेष पटाईत; निष्णात; अव्वल; असाधारण (वाईट अर्थी–आगाऊ, दीड शहाणा). ६. जादा, वाढीचा (महिना अधिकमास)[सं.] (वा.) **अधिक होणे–** संपणे; कमी होणे. २. वाजवीपेक्षा जास्त पिकणे; उतरणे. (फळ वगैरे).

**अधिक आगळा** १. थोडेसे वर; थोडे जास्त. २. प्रमाणाबाहेर : 'आम्ही तिघीजणी त्यांना यत्किंचित देखील अधिक आगळे काम पडू देत नव्हतो.' – पलकोघे ४०१.

**अधिक उणा** वि. १. कमीजास्त. २. लहान मोठा. २. बरावाईट.

**अधिक उणा शब्द** १. मर्यादेचे उल्लंघन करण्यासारखा शब्द; टाकून बोलणे. २. बोलू नये असा शब्द.

**अधिक उत्पन्नाचे वाण** न. (कृषी.) गहू व ज्वारी पिकांमध्ये निवड पद्धतीने व संकर पद्धतीने निर्माण केलेली जास्त उत्पन्न देणारी जात.

**अधिक चिन्ह** न. १. (ग.) बेरजेची क्रिया दर्शविणारे '+' हे चिन्ह.२. आरोग्यसेवा दर्शक चिन्ह. [सं.]

**अधिक तरलता** स्त्री. (अर्थ.) व्यवहार अधिक सुलभपणे चालावेत यासाठी बँकांनी स्वत:जवळ ठेवलेला जास्तीचा रोख पैसा असलेली स्थिती.

**अधिक नोंद** स्त्री. (ग्रं.) सूची लेखन करताना मुख्य नोंदीपासून तयार केलेल्या त्रोटक नोंदी.

**अधिक प्रसंग** १. दंगामस्ती; भांडण; उपमर्द. २. आगाऊपणा; फाजीलपणा : 'अधिक प्रसंग करशील तर एका क्षणात तुझं तोंड कायमचं बंद करीन.' – अस्तंभा १२४.

**अधिक भेट** स्त्री. साक्षात्कार.

**अधिक महिना, मास** पु. (ज्यो.) सौर कालगणना पद्धतीशी समन्वय साधण्यासाठी चांद्र कालगणनेत दर २८ ते ३५ महिन्यांनी धरण्यात येणारा एक अधिक महिना. ज्या चांद्र महिन्यात सूर्याची कोणतीही संक्रांत पडत नाही असा महिना; धोंड्याचा महिना.

**अधिकर** पु. प्रमाणापेक्षा अधिक उत्पन्न असल्यास द्यावा लागणारा कर : '१९६४–६५ पर्यंत अधिकर हा प्राप्तिकराहून वेगळा होता.' – कराअ २४. [सं.]

**अधिकरण** न. १. स्थान या अर्थी व्याकरणातील एक पद. (सप्तमीचा अर्थ). २. पाया; विषय; आधार; आश्रयस्थान; एखादा सिद्धांत किंवा प्रमेय ज्यावर उभारले असते ते स्थल : 'सकळ विद्यांचे अधिकरण ।'– ज्ञा १३.१. ३. नेमणूक. ४. संबंध. ५. आधार. ६. ग्रंथाचा विषयानुरोधाने पाडलेला विभाग. ७. एखाद्या शासकीय विभागातील, विषयातील विवादांचा निर्णय करण्यासाठी नेमलेले, न्यायालयीन अधिकार असलेले मंडळ. उदा. महसूल न्यायाधिकरण. ८. परमेश्वराने अधिकार देऊन स्थापन केलेला आचार्य. 'अधिकरणाने परमेश्वरुचि उद्धरिती'– लीचउ १३४. [सं.]

**अधिकरण सिद्धान्त** पु. पुष्कळ सिद्धान्तांना मूलभूत असा सिद्धान्त.

**अधिकरणिक** पु. न्यायाधीश : 'सरदार हो, अधिकरणिकास सांगा की, राज्ञीच्या अपराधाची चौकशी कर्तव्य आहे.' –मोहवि.

**अधिकरणी** वि. ज्यास काही आधार, आश्रय आहे असा.

**अधिकर्ष** पु. (अर्थ.) बँकेतील खात्यात शिल्लक असलेल्या रकमेपेक्षा जास्त रकमा काढणे; अशाप्रकारे रक्कम काढण्यासाठी वापरलेला चेक; दस्तऐवज. [सं.]

**अधिक वाण** न. अधिक महिन्यात सासूने जावयाला द्यावयाचे वाण.

**अधिकंस** पु. (ग.) मोठा कंस. वर्तुळ परिघावरील कोणत्याही दोन बिंदूंनी सीमित असा परिघाचा भाग म्हणजे कंस व अशा तऱ्हेने निर्माण होणाऱ्या कंसातील मोठा कंस. [सं.]

**अधिकाई** स्त्री. १. समृद्धी; अधिकपणा; वैपुल्य. २. मोठेपणा; श्रेष्ठत्व; वरचढपणा : 'भक्ति अधीन तुझे देवपण । मा मोक्षासि कोण अधिकाई ।'– एभा २९.७३७.

**अधिकाधिक** वि. जास्त जास्तच.

**अधिकाध्ययन** (मानस.) पहा : **अत्यभ्यसन**

**अधिकार** पु. १. सत्तेचे स्थान; जबाबदारीची जागा. २. धनीपणा; वर्चस्व; प्रभुत्व; हक्क. ३. कार्यक्षेत्र; मर्यादा; प्रांत. ४. योग्यता : 'जैसा पाहोनि अधिकार । तैसे बोलावें उत्तर ।'– तुगा ८१७. ५. (व्या.) सर्वसाधारण नियम; विधान; दिग्दर्शक वाक्य; काही विशिष्ट गोष्टींना लागू होणारा सामान्य नियम अथवा मथळा; अशा नियमाचा उपयोग. ६. विषय; प्रकरण; ज्याविषयी विचार केला आहे ते. ७. राज्य; अधिसत्ता; अंमलदारी. ८. विवेचनाचे किंवा निरूपणाचे क्षेत्र किंवा विषय. ९. देखरेख. १०. ग्रंथाचा पोटविभाग; प्रकरण. [सं. अधि+कृ]

**अधिकारग्रहण** न. मंत्री, राज्यपाल इ. नी आपल्या पदावर रुजू होणे. [सं.]

**अधिकारच्युत–भ्रष्ट** वि. (मंत्री, सचिव इ.) मानाच्या अधिकारापासून भ्रष्ट; अधिकारावरून, नोकरीवरून काढलेला, कमी केलेला.[सं.]

**अधिकारच्युति–ती** स्त्री. पद जाणे; अधिकार जाणे; सत्तानाश; पदच्युती; अपकर्ष; ऱ्हास. [सं.]

**अधिकारणे** अक्रि. एखाद्याला उद्देशून बोलणे (उघड किंवा मनामध्ये). स्पष्टपणे एखाद्यास उद्देशून एखादी गोष्ट करणे.

**अधिकारत्याग** पु. सत्ता किंवा स्थान सोडणे; अधिकार टाकणे. [सं.]

**अधिकारपत्र** न. नियुक्त व्यक्तीची ओळख व परिचय करून देणारे पत्र; सामान्यत: परदेशी राजदूत वगैरेना असे अधिकारपत्र, ते ज्या देशात

नेमले जातात त्या देशाच्या राष्ट्रपतींना सादर करावे लागते. [सं.]

**अधिकारपदाची शपथ** स्त्री. (राज्य.) राज्यपालपद, मंत्रिपद या सारखे अधिकारपद ग्रहण करताना घ्यावयाची शपथ.

**अधिकारपृच्छा** स्त्री. (राज्य.) एखादी व्यक्ती कोणत्या अधिकाराने विशिष्ट पद मागत आहे याची विचारणा करणारे अधिकृत पत्र. [सं.]

**अधिकारप्रयोग** पु. हक्काची अंमलबजावणी.

**अधिकारबाजी** स्त्री. अधिकाराचा हव्यास; आहे त्यापेक्षा अधिक अधिकार गाजविण्याचा दिमाख; अधिकाराचा दुरुपयोग.

**अधिकारलेख** पु. अधिकार देणारा लेख; रिट : 'घटनेसंबंधीचे काही अधिकार लेख कित्येक वर्षे'– आंवि १५०. [सं.]

**अधिकारवस्त्र** न. विशिष्ट अधिकाऱ्याने कार्यालयात घालायची अधिकार दर्शक विशिष्ट वस्त्रे.

**अधिकार विभागणी** स्त्री. मध्यवर्ती सरकार व वसाहती किंवा प्रांतिक सरकार यांच्यामधील अधिकाराची वाटणी; अधिकाराचे वाटप.

**अधिकारविसर्जन** अधिकार बरखास्त करणे; अधिकार नष्ट करणे. पहा : **अधिकारत्याग** [सं.]

**अधिकारशिष्टाई** स्त्री. एखाद्या अधिकाराच्या स्थानी असल्यामुळे वागणुकीत दाखवावयाची अदब, गौरव वगैरे.

**अधिकारशुल्क** न. अधिकाराचा मोबदला.

**अधिकारश्रेणी** स्त्री. शासनातील किंवा कोणत्याही संस्थेतील व्यक्तींची ज्येष्ठ-कनिष्ठता दाखवणारी पद्धती; प्रत्येक कर्मचाऱ्यांचे स्थान दाखवणारी सोपानपरंपरा. [सं.]

**अधिकारस्थ** वि. स्थानापन्न; सत्ताधिष्ठित; अधिकारावर-सत्तेवर असलेला. [सं.]

**अधिकारक्षेत्र** (कायदा.) ज्या क्षेत्रावर अमल करण्याचा शासनाचा, न्यायालयाचा वा प्राधिकरणाचा हक्क असेल ते क्षेत्र.

**अधिकाराभिलेख** पु. एक नोंद, याची कागद पत्रे; दप्तर.

**अधिकारी** पु. १. कामदार; अंमलदार; हुद्देदार: 'अधिकारिया रिगतां गावो । होय जैसा उत्साहो ।'– ज्ञा १८.७९५. २. विशिष्ट स्थानाबद्दल सत्ता, हक्क, विशिष्ट गुण-पात्रता असलेला; हक्कदार; वारसदार. ३. अध्यक्ष; चालक; देखरेख करणारा; व्यवस्थापक. ४. देशमुखाच्या खालील एक जिल्हा कामगार; गाव कामगार, पाटील यासही हा शब्द लावतात. ५. नियामक; प्रवर्तक.

वि. अधिकार असलेला; योग्यतेचा; पात्र. [सं. अधिकारिन्]

**अधिकारोत्सर्ग** पहा : **अधिकारत्याग**

**अधिकाव** पु. गर्व; उन्मत्तपणा : 'ऐसा तेयाचा अधिकाओ देखोनि तो एथोनि चडकणा हाणीतला'– लीचपू ५५.

**अधिकांग** न. एखादा अधिक असलेला अवयव (उदा. सहावे बोट) वि. ज्यास एखादा अवयव अधिक आहे असा.

**अधिकीलन** (अर्थ.) दुसऱ्या देशाच्या चलनात आपल्या देशाच्या चलनाचा दर निश्चित करून त्याच किंमतीला खिळवून ठेवणे, कमीजास्त होऊ न देणे. [सं.]

**अधिकुल** न. (वै.) वांशिक गुणधर्मानुसार एकमेकांशी संबंधित असलेल्या कुलांचा गट किंवा उपगट. [सं.]

**अधिकृत** वि. १. विशिष्ट स्थानापन्न; सत्ताधिष्ठित. २. अधिकार मिळालेला; नेमलेला : 'ठाणेदाराची आपण अधिकृत बातमीदार आहोत अशी खात्री पटवावी लागे.'– के १२.७.३०. ३. मनात असलेले उद्दिष्ट. ४. साधार; शासनाची किंवा अधिकाऱ्याची मान्यता असलेला; त्यांच्या सूचनेवरून केलेला; झालेला (खुलासा वगैरे). [सं.]

**अधिकृत दर** पु. (अर्थ.) एखाद्या कंपनीने आपल्या उत्पादित वस्तूची ठरविलेली विक्री किंमत [सं.]

**अधिकृत सूची** (अर्थ.) कंपनीने संमत केलेली भागधारकांची यादी.

**अधिकेंद्र** न. (भूशा.) १. भूकंपाच्या उगमस्थानावरील भूपृष्ठाचा भाग. २. भूकंपाचा जमिनीवरील केंद्रबिंदू. [सं.]

**अधिकोत्तर** वि. १. विशेष; अधिक; याहून जास्त. २. असामान्य; विलक्षण; वाजवीपेक्षा जास्त; लोकोत्तर; वरचढ; एकाहून एक; अभूतपूर्व; भयंकर : 'तेथे न चालें तंतर मंतर । वर्तमान हे एक अधिकोत्तर ।' – ऐपो २१४. [सं.]

**अधिकोष** पु. (अर्थ.) बँक; पैसे व्याजाने ठेव म्हणून स्वीकारणारी व कर्ज देणारी संस्था.

**अधिक्रम** पु. (समाज.) वरिष्ठांपासून कनिष्ठांपर्यंतची पायरीपायरीने केलेली अधिकार विभागणी. [सं.]

**अधिक्रमण** न. १. दुसऱ्याची जागा घेणे; दुसऱ्याला पाठीमागे टाकणे. २. दुसऱ्याला डावलून वरच्या पदावर जाणे. ३. (ज्यो.) बुधाचे किंवा शुक्राचे पृथ्वी आणि सूर्य यांच्या मधून जाणे. या वेळी सदर ग्रहाचा काळा ठिपका सूर्यबिंबावरून सरकताना दिसतो.

**अधिक्रमी** वि. (समाज.) श्रेष्ठ कनिष्ठतेच्या तत्त्वावर आधारित. [सं.]

**अधिक्रय** पु. वाजवीपेक्षा अधिक, अनावश्यक खरेदी.

**अधिखंडीय** वि. (भूशा.) १. भूखंडांवर, गाळांवर सापडणारा अथवा पडून असलेला. २. भूखंडाच्या किनाऱ्यालगतच्या उथळ सागरकिनाऱ्यावरचा (भूखंडमंचावरचा). [सं.]

**अधिगण** पु. (वै.) वांशिक गुणधर्मानुसार पडणारा वर्ग, गट. [सं.]

**अधिगत** वि. १. प्राप्त; पोचलेला. २. ज्ञात; जाणलेला; अवगत; माहीत. [सं. अधि + गम्]

**अधिगम** पु. १. बोध; उमज; प्राप्ती; ज्ञान. २. (कायदा.) सापडलेली ठेव, पैसा. [सं.]

**अधिगम्य** वि. प्राप्त होण्यासारखे; प्राप्त व्हावयाचे (ज्ञान, ज्ञानाचा विषय). [सं.]

**अधिचार** पु. मारकमंत्र; शत्रूचे नुकसान व्हावे म्हणून करावयाचा मंत्रप्रयोग. [सं.]

**अधिचिन्ह** न. अधिकारदर्शक, मानदर्शक चिन्ह. [सं.]

**अधिछात्र** पु. विद्यापीठात विशिष्ट कालखंडाकरिता संशोधन किंवा अध्यापन यासाठी शिष्यवृत्ती देऊन नेमलेला पदवीधर विद्यार्थी. [सं.]

**अधिछात्रवृत्ति–त्ती** स्त्री. अधिछात्राला मिळणारी शिष्यवृत्ती.

**अधिछाद** पु. (स्था.) एकमेकांना किंवा परस्परांना व्यापणे. [सं.]

**अधिजन सत्ता** स्त्री. (राज्य.) उमरावशाही; समाजात उच्च स्थानावर

असलेल्या लोकांची शासनसत्ता; अमीर, उमरावांची सत्ता. [सं.]

**अधिजल भुयार** पाणचक्की, वीजचक्की इत्यादीकडे जाणाऱ्या जलप्रवाहाचे भुयार.

**अधिजलवाह** पु. पाणचक्की, वीजचक्की यांकडे जाणारा पाण्याचा प्रवाह.

**अधिजालक** न. (भौ.) धातुमिश्रणातील अवकाशजालकाची पद्धत. उदा. तांबे व सोने यांच्या मिश्रणात प्रत्येक प्रकारचा अणू हा वाटेल तसा विभागला न जाता योग्य भौमितीय जागा व्यापतो. ही त्याची प्रवृत्ती असते. [सं.]

**अधिजिव्ह** पु. (आयु.) घशाचा एक विकार. – आयु सिद्ध १.३१.

**अधिटिप्पण** न. एखाद्या विषयावर स्पष्टीकरणासाठी केलेली टिपणी.

**अधित्यजन** न. मालकी वा इतर हक्काचा आपणहून उघडपणे केलेला त्याग. [सं.]

**अधित्वचा** स्त्री. (जीव.) सजीवांच्या शरीरातील कोणत्याही भागावरचा सर्वात बाहेरच्या कोशिकांचा थर. [सं.]

**अधिदान** न. पगार, वेतन इ. अदा करणे, देणे. [सं.]

**अधिदान अधिकारी** पु. पैसे, वेतन इ. देणारा अधिकारी.

**अधिदिन** पु. जादा दिवस. दर चार वर्षांनी येणाऱ्या ३६६ दिवसांच्या वर्षातील फेब्रुवारीत २८च्या ऐवजी २९ दिवस येतात. हा ज्यादा दिवस म्हणजे अधिदिन. अशा वर्षाला अधिदिन वर्ष म्हणतात.

**अधिदेय** न. भत्ता.

**अधिदेवता** स्त्री. १. मानलेली, स्थापन केलेली, अधिष्ठित देवता. २. मनुष्याच्या विशिष्ट अवयवात, इंद्रियांत, शक्तींत अधिष्ठित असलेली देवता. उदा. सूर्य नेत्रांमध्ये, अश्विन नाकामध्ये, दिशा कानांमध्ये, वरुण तालूमध्ये, वायू त्वचेमध्ये इ.; अधिभूत हे ज्ञेय म्हणजे जाणण्याची वस्तू असते; अध्यात्म हे ज्ञानसाधन म्हणजे जाणण्याचे साधन असते व अधिदेवता हे ज्ञान जाणणारी शक्ती असते. ३. ग्रहमख वगैरे कृत्यांत मुख्य देवतेच्या उजव्या बाजूला स्थापन केलेली देवता. डाव्या बाजूच्या देवतेस प्रत्यधिदेवता म्हणतात. [सं.]

**अधिदैव** पहा : **अधिदेवता.** जीव; प्रकृतिभोक्ता पुरुष : 'जीउ येणें नावे । जेयाते आळविजे स्वभावें। तें अधिदैव जाणावें।'–ज्ञा ८.५५.

**अधिदैवत** न. पहा : **अधिदेवता.** १. कुलदैवत; अधिष्ठात्री देवता. २. रक्षण करणारा देव. ३. त्या त्या इंद्रियांचा अधिष्ठाता देव. ४. सकल विश्वरूप असलेला विराट पुरुष. [सं.]

**अधिधारण करणे** क्रि. (भौ.) आतमध्ये शोषून घेऊन पुन्हा बाहेर न पडेल अशा रीतीने बंद करणे.

**अधिनियम** पु. संसदेने किंवा विधानसभेने केलेला व राष्ट्रपतींनी किंवा राज्यपालांनी मान्यता दिलेला कायदा; अधिकृत कायदा.

**अधिनियमिती** पु. १. कायद्यात किंवा विधिविधानात रूपांतरित झालेला मसूदा. (अधिकृतपणे जारी झालेले अधिनियम, नियम, विनियम, अध्यादेश इत्यादींचा यात समावेश होतो.). [सं.]

**अधिनिर्णय** पु. १. न्यायाधीशासारख्या एखाद्या पदाधिकाऱ्याने दिलेला निर्णय. २. संसद, विधानसभा यासारख्या सभांच्या अध्यक्षांनी दिलेला निर्णय. [सं.]

**अधिप, अधिपति–ती** पु. १. स्वामी; मालक; धनी; सत्ताधीश; राजा; अधिराजा. उदा. ग्रामाधिपती, राज्याधिपती. २. (आयु.) मस्तकाच्या अग्रभागी (वरच्या भागी) आतल्या अंगास जेथे शिरा एकत्रित झाल्या आहेत व जेथे केसांचा भोवरा आहे असे मर्मस्थान. [सं.]

**अधिपणन** न. अधिकृत प्रमाणाहून अधिक व्यापार.

**अधिपत्र** न. १. अधिकारपत्र. २. पकडण्याचा लेखी हुकूम.

**अधिपरिव्यय** पु. १. कोणत्याही एका विशिष्ट शीर्षकाखाली टाकता येणारा खर्च. २. वरकड खर्च. [सं.]

**अधिपात** पु. (ज्यो.) एखादा आकाशस्थ गोल आपल्या कक्षेत फिरताना ज्या बिंदूत आयनिक वृत्ताचे संदर्भप्रतल भेदून दक्षिणेकडून उत्तरेकडे जातो तो बिंदू.

**अधिपायता** पु. शासकीय अधिकारी : 'श्री कान्हरदेव तं निरोपित अधिपायता मुहमद प्रोस्नाहि को शिला' – कोशिला ५–६.

**अधिपृष्ठ** न. (ग.) वरचा भाग; पृष्ठभाग. [सं.]

**अधिप्रमाणता** स्त्री. एखाद्याच्या खरेपणासंबंधाने खात्री देणे.

**अधिप्रमाणन** न. एखादे कागदपत्र अस्सल किंवा वैध असल्याचे प्रस्थापित करणे; एखाद्या दस्तऐवजास किंवा कागदपत्रास अस्सलपणा किंवा कायदेशीरपणा देणे. (क्रि. करणे.)

**अधिप्लवक** वि. (भूशा.) समुद्रपृष्ठभागापासून खाली १०० वाव (फॅदम) खोल असा किनाऱ्यालगतचा व ज्यात सागरपृष्ठावर तरंगणाऱ्या सूक्ष्म वनस्पतींचे व प्राण्यांचे वैपुल्य असते असा. [सं.]

**अधिभार** पु. १. सर्वसामान्य करांव्यतिरिक्त द्यावा लागणारा जादा आकार. २. लादलेला जादा बोजा (पैशांचा). [सं.]

**अधिभावी ठरणे** क्रि. १. वरिष्ठतेच्या अधिकाराने एखादी गोष्ट बाजूला सारणे किंवा दुर्लक्षिणे. २. प्रभावी ठरणे. [सं.]

**अधिभाषा** स्त्री. (तत्त्व.) पराभाषा; भाषेविषयीची भाषा. [सं.]

**अधिभूत** न. १. साक्षात वस्तू; ज्ञानाचा विषय होण्यासारखी वस्तू. पहा : **अधिदैवत.** २. पंचमहाभूतांची विनाश पावणारी सृष्टी : 'तयाते अधिभूत म्हणिजे'– ज्ञा ८.३३. [सं.]

**अधिभोगी स्वामी** पु. दुसऱ्याच्या मालकीच्या जमिनीचा किंवा घराचा (वाट, विहीर इ.चा) वापर करण्याचा हक्क असलेला इसम. [सं.]

**अधिमत** न. १. न्यायचौकशीसाठी सुपूर्त केलेल्या प्रकरणावरील ज्यूरीचा निर्णय. २. न्यायनिर्णय; न्यायनिवाडा. [सं.]

**अधिमंडल–ळ** न. सर्वसाधारण सदस्य मिळून होणारे मंडळ; सर्वसाधारण सभा; जनरल बॉडी. [सं.]

**अधिमान** पु. अग्रक्रमाने पसंती; अधिक पसंती; सापेक्षतया जास्त पसंती. [सं.]

**अधिमानतः** क्रिवि. अधिक पसंतीने. [सं.]

**अधिमान भाग** पु. (व्यापार.) ज्यावर अग्रहक्काने लाभांश दिला जातो असा भाग. (शेअर).

**अधिमान्य** न. (अर्थ.) पूर्णपणे मान्य असलेले (कर्ज.)

**अधिमान्य भाग** पु. (अर्थ.) सामान्य ठेवीदारांना नफ्याची वाटणी मिळण्यापूर्वी ज्यावर ती प्रथम मिळते असे विशेष सवलतीचे रोखे, शेअर्स इत्यादी.

**अधिमास** पहा : **अधिकमास**

**अधिमूल्य** न. (अर्थ.) सेवकांना, कर्मचाऱ्यांना मिळणारी मजुरी, वेतन, श्रममोबदला इत्यादीपेक्षा जास्त दिली जाणारी रक्कम. [सं.]

**अधिमूल्यन** न. (अर्थ.) किंमत वाढवणे; मूल्य वाढवणे; चलनाची ठरलेल्या किंमतीहून अधिक किंमत येण्याची स्थिती.

**अधियज्ञ** पु. १. शरीरभाव नाहीसा करून, मन व प्राणांचे संयमन करून, ज्ञान व ज्ञेय यांचे ऐक्य करणारा : 'आता इये शरीरग्रामी । जो शरीरभावांते उपशमी । तो अधियज्ञु गा मी । पांडुकुमरा ।।'– ज्ञा ८.३७. २. सर्व यज्ञांचा अधिपती; ईश्वर. [सं.]

**अधिराज** पु. सार्वभौम राजा; मुख्य : 'तरी सकळ वीराधि– राजु । जो सोमवंशी विजयध्वजु ।' – ज्ञा १२.२०. [सं.]

**अधिराजदूत** पु. (राज्य.) आपल्या शासनसंस्थेच्या वतीने निर्णय घेण्याचा, कृती करण्याचा पूर्ण अधिकार किंवा सत्ता असलेला राजनैतिक प्रतिनिधी. [सं.]

**अधिराज्य** न. सार्वभौमत्व : 'संस्कृतचे अधिराज्य मान्य करून मराठीची स्वायत्तता त्यांनी स्थापित केली.'– संसाफ १२०.

**अधिराज्य विधान मंडळ** न. सार्वभौम राजाच्या सत्तेखालील अधिकार गाजवणारे मंडळ.

**अधिरोध** पु. व्यापारी जहाजांना आपल्या बंदरात येण्यास किंवा बंदरातून जाण्यास प्रतिबंध करणारा सरकारी आदेश. [सं.]

**अधिरोपण** न. (वै.) आरोपण; एखादा अवयव किंवा त्याचा भाग शरीराच्या दुसऱ्या ठिकाणी बसवणे. [सं.]

**अधिरोहण** न. बसणे; चढणे (राज्यावर, सिंहासनावर).

**अधिलाभांश** पु. १. बाजवी पगाराव्यतिरिक्त दिलेली, मिळालेली अधिक रक्कम. २. झालेल्या नफ्याचा कामगारांना दिलेला भाग. [सं.]

**अधिलेख** १. प्रस्तुत लेख. २. विक्रय लेख; फरोक्तखत; सनद; बक्षीसपत्र; मुखत्यारपत्र. [सं.]

**अधिलेप** पु. १.(वन.) बाह्यावरण (परागकणांचे). यातील विविधता (काटे, रंध्रे, रेषा, आकार) लक्षात घेऊन त्यांचे प्रकार अथवा जनक वनस्पती ओळखणे शक्य असते. २. (प्राणि.) दातांचे बाह्य आवरण. [सं.]

**अधिलोक** पु. संसार; जग; ब्रह्मांड. [सं.]

**अधिवक्ता** पु. उच्च न्यायालयात मूळ खटले चालविणारा वकील.

**अधिवचन** न. १. प्रमाणवचन; उक्ती. २. प्रत्यक्ष दाव्याशी संबंधित नसलेल्या, परंतु परंपरागत सत्य असलेल्या मुद्द्यांवर, तत्त्वांवर न्यायाधीशांनी दिलेले मत. [सं.]

**अधिवार्षिक** वि. ठरवलेल्या वर्षाची मुदत संपल्यानंतर मिळणारी.

**अधिवास** पु. १. राहण्याचे स्थान; मुख्य वसतिस्थान; वास्तव्य; राहणे : 'यज्ञें अधिवासु श्रुति ।' –ज्ञा ३.१३७. २.शेजार. ३. (अर्थ.) हुंडी किंवा वचनपत्र निर्दिष्टस्थानी देय करणे. [सं.]

**अधिवासन** व्रतांचे उद्यापन करण्याचे वेळी त्या त्या कर्माच्या देवतांची विधिपूर्वक सर्वतोभद्रादी आसनांवर अगोदर केलेली स्थापना; देवता स्थापन. २. देवतेची प्राणप्रतिष्ठा किंवा स्थापना करण्यापूर्वी आदल्या दिवशी तिला अक्षतांवर किंवा पाण्यामध्ये ठेवणे. ३. (ल.) कर्ज वसूल करण्यासाठी किंवा आपली एखादी मागणी मान्य करून घेण्याकरिता एखाद्याच्या दारात धरणे धरून बसणे. ४. (समाज.) एखाद्या प्रदेशात नव्याने वसाहत करणे. [सं.]

**अधिवास प्रमाणपत्र** न. एखाद्या ठिकाणी राहत असल्याबद्दलचे दंडाधिकाऱ्याने दिलेले अधिकृत प्रमाणपत्र; निवासी दाखला.[सं.]

**अधिवासांतर** न. राहण्याचे कायदेशीर ठिकाण बदलणे.

**अधिवासी** पु. एका विशिष्ट ठिकाणी कायम वास्तव्य करणारी व्यक्ती.

**अधिविक्षेप** पु. अपमान; अधिक्षेप : 'अधिविक्षेपु जो करी कवीं...तेहाचिए माये...'– कालवर्षी शिला १.१९.

**अधिवृक्क प्रपिंड** पु. (प्राणि.) मूत्रपिंडाजवळ असलेली अंत:स्रावी ग्रंथी.

**अधिवेशन** न. १. सभा; बैठक; सत्र : 'हे प्रज्ञा–परिषदेचे ८वे अधिवेशन आहे.'– के १६.४.३०. २. विधानसभा, संसद इ.चे कामकाज चालू असतानाचा कालावधी. [सं.]

**अधिव्याख्याता** पु. महाविद्यालयात किंवा विद्यापीठात शिकविणारा अध्यापक. प्रोफेसर, रीडर व लेक्चरर यांना अनुक्रमे प्राध्यापक, प्रपाठक व अधिव्याख्याता हे शब्द योजिले जातात. [सं.]

**अधिशकली** वि. (भूशा.) खडकांचा चुरा व तुकडे एकत्र साचले जाऊन तयार होणारा (खडक). [सं.]

**अधिशक्ति–क्ती** स्त्री. (सं.वि.) अंमलबजावणीचा अधिकार.

**अधिशयन काल** पु. जंतूंचा शरीरात प्रवेश झाल्यापासून रोगाची भावना व लक्षणे दिसू लागेपर्यंतचा काल.

**अधिशासी** वि. अंमलबजावणीसंबंधी.

**अधिशून्य करणे** असंमत करणे; न करणें; निष्प्रभावी करणे.

**अधिशोषण** न. (जीव.) दोन भिन्न जातींचे घनपदार्थ परस्परांच्या सान्निध्यात आले असता वरच्या थरातील रेणूंच्या घनतेत होणारा बदल. [सं.]

**अधिश्रयण** न. (तत्त्व.) पात्रात ठेवून उकळणे; गरम करणे; (अधिश्रयणी म्हणजे यज्ञातील अग्निकुंड त्यावरून) अग्निकुंडावर ठेवून उकळण्याचा विधी. [सं.]

**अधिश्रित खडक** पु. (भूशा.) १. हिमवाहाने वाहून आणलेला व लहान दगड गोट्यांवर उचलून ठेवल्याप्रमाणे स्थिर झालेला मोठा पाषाण खंड. २. उंच जागी असलेला अशाच प्रकारचा खडक. [सं.]

**अधिषद** स्त्री. (अर्थ.) व्यवसाय संघ; ज्याला बरेच भांडवल लागेल असा प्रकल्प चालू करण्याकरता औद्योगिक संस्थांनी एकत्र येऊन स्थापन केलेली संघटना. [सं.]

**अधिषवण** न. (तत्त्व.) १. सोमरस काढण्याचे पात्र, साधन. २. सोमरस काढणे, पिळणे. [सं.]

**अधिष्टा** पु. अधिष्ठाता : 'की तो सकळवेधाचा अधिष्टा'– मूप्र ७१४.

**अधिष्ठणे** अक्रि. १. (चुकीने अधष्ठणे) आश्रय करणे; राहणे; असणे; वास करणे; बसणे; युक्त होणे: 'तैसें देख पां विहंगममतें अधिष्ठूनि ज्ञानाते ।'– ज्ञा ३.४३. २. स्वीकारणे; अंगीकारणे; हाती येणे: 'म्हणे जें जें हा अधिष्ठील । तें आरंभीचि यया फळेल ।'– ज्ञा ६.१५१. [सं.अधि + स्था]

**अधिष्ठाता-त्रा** पु. १. राहणारा; वास करणारा; आश्रयभूत: 'इंद्रियप्रौढीमंडळा । शृंगारु एकचि निर्मळा । जें अधिष्ठात्रिया कां मेळा । देवतांचा जो ।'- ज्ञा १८.३४९. २. अध्यक्ष; आश्रयस्थान; नियामक (परमेश्वर)'ब्रह्मपदींचा अधिष्ठात्रा । त्यासी देती ब्रह्मसूत्रा ।'- एरुस्व १५.१४७. ३. विद्यापीठातील विद्याशाखेचा प्रमुख. [सं.]

**अधिष्ठात्री** स्त्री. नियंत्रण करणारी, अधिकार गाजवणारी स्त्री. [सं.]

**अधिष्ठान** न. १. वास; निवास; राहणे; वास्तव्य. २. स्थान; ठिकाण; आश्रम; मठ; निवासस्थान; राहण्याचे मुख्य घर : 'येती अधिष्ठानें पहावया ।' - सप्र ८.१०.९३. ३. (ल.) एखाद्याच्या दारी धरणे धरून बसणे (कर्जवसुलीकरता). ४. दिखाऊ पसारा; आव; अवडंबर; थाटमाट; बडेजाव; बोभाटा (ज्ञान, विद्वत्ता, संपत्ती, पावित्र्य इ.चा) (क्रि. माजणे, मांडणे, वाढणे). ५. भ्रामक आश्रयस्थान; आरोपित वस्तू. ६. ब्रह्म; परब्रह्म : 'जेथ अधिष्ठान प्रगट । डोळां दिसें ।'- ज्ञा ६.१७१. ७. प्रभुत्व; सत्ता. ८. आसन; सिंहासन. ९. बैठक; भूमिका (सामाजिक अधिष्ठान). १०. आश्रय; आधार : 'जंव प्रकृतीचें अधिष्ठान ।'- ज्ञा ३.५३. [सं.]

**अधिष्ठापन** न. पद्धतशीरपणे, विधिवत स्थापना करणे. [सं.]

**अधिष्ठित** वि. १. व्यापलेला; ताब्यात घेतलेला; वास केलेला. २. बसविलेला; स्थापलेला. ३. निश्चित केलेला; नियत. [सं.]

**अधिष्ठिति-ती** स्त्री. १. स्थिती; अस्तित्व; वस्ती; निवास; वास्तव्य. २. वसतिस्थान; निवासस्थान. ३. निवेश; स्थापना. [सं.]

**अधिसभा** स्त्री. विद्यापीठाचे व्यवस्थापक मंडळ; फ्रान्स, अमेरिका इत्यादी देशातील वरिष्ठ सभागृह. [सं.]

**अधिसंख्य** वि. ठरावीक, आवश्यक संख्येपेक्षा जास्त, अधिक. [सं.]

**अधिसंरचना** स्त्री. (समाज.) समाजाच्या मूलभूत व्यवहारास फारशी उपयुक्त नसलेली, वरच्या थरातील, व्यक्तिगत कल्पनेवर आधारलेली रचना. [सं.]

**अधिसिलिक खडक** पु. (भूशा.) सिलिकाचे प्रमाण भरपूर असणारा अग्निज खडक. [सं.]

**अधिसूचना** स्त्री. एखादी बाब जाहीर करणारे अधिकृत निवेदन; औपचारिक घोषणा; अधिकृत निर्णय जाहीर करणारी राजपत्रातील सूचना; नोटीस. [सं.]

**अधिसूचित** वि. सरकारने जाहीर केलेले; अधिकृतपणे जाहीर झालेले. [सं.]

**अधिसूचित क्षेत्र** न. अधिकृत जाहीर केलेला भाग.

**अधिसेविका** स्त्री. रुग्णालयातील मुख्य परिचारिका. [सं.]

**अधिस्कंध** पु. (स्था.) कमान व तिच्यावरील चौकटीतील तिरपा भाग. [सं.]

**अधिस्थगन** न. १. कायदेशीर, अधिकृत स्थगिती. २. एखादी गोष्ट कायदेशीरपणे पुढे ढकलणे.ऋणकोला कर्जफेडीची मुदतवाढ देणे.[सं.]

**अधिस्थापन नियम** पु. (भूशा.) गाळांचे खडक एकावर एक आडवे समांतर रचले जातात. त्यावरून त्यांचा सापेक्ष काल ठरवण्याचा नियम. [सं.]

**अधिस्नातक** पु. पदव्युत्तर विद्यार्थी. [सं.]

**अधिस्वीकृत** व. मान्यता दिलेला; पसंती दिलेला. [सं.]

**अधिहरण** न. सरकारजमा करणे; जप्त करणे; सरकारने दंडासाठी घेणे.

**अधिक्षेप** पु. अपमान; निंदा; दूषण; आरोप; हेटाळणी : 'इतरांचा अधिक्षेप किंवा तेजोभंग न करता'- व्यारे ९३. [सं.]

**अधिक्षेपिका** स्त्री. निंदाव्यंजक लेख; उपरोधिक लेख.

**अधिज्ञापक** वि. हो नाही म्हणण्यास अवसर नसलेला; स्पष्ट; खरमरीत; निर्वाणीचा. [सं.]

**अधीचा** वि. खालचा : 'अधींचीं ही मूळें । उपपत्ती परिसविली सविवळें ।'- ज्ञा १५.२०९.

**अधीचे बदी-बिदी, अधीबिदी** क्रिवि. सर्वांच्या पूर्वी; सगळ्यात आधी. पहा : **आदीचेबिदी** [अधीचे द्वि.]

**अधीत** वि. १. पठण केलेला, वाचलेला (भाग, ग्रंथ.). २. ज्याने पठण केले आहे असा; शिकलेला (माणूस). [सं.]

**अधीन** वि. १. अवलंबून असलेला; ताब्यात असलेला; सत्तेखालील; वश; हातातील; विशेषत: समासात - दैवाधीन, पराधीन, स्वाधीन : 'प्राप्ताप्राप्तीची गणना । अधीन कोणा पैं नाहीं ।।'- एरुस्व. २. हाताखालचा; कनिष्ठ. [सं.]

**अधीनपण** न. ताबा; वर्चस्व; सत्ता.

**अधी ना मधी, अधीमधी** क्रिवि. १. मध्याजवळ; आरंभी ना शेवटी; कोठेतरी; भलत्याच ठिकाणी. २. अव्यवस्थितपणे. ३. अवेळी. [सं. आदि+मध्य]

**अधीमधी, अध्यामध्यात, अधेमधे (असणे, पडणे)** संबंध ठेवणे; मध्ये पडणे. [सं. आदि+मध्य].

**अधीर** पु.१. धैर्याचा अभाव; भीती; भ्याडपणा : 'अधीरें दुणावती कष्ट'- मुआदि २९.१४३. २. उतावीळपणा; चंचलपणा.
वि. १. उतावीळ; चंचल; अस्थिर; घोटाळलेला; धरसोडचा; अनिश्चित : 'कळों ही आली तयाची जोडी । अल्प रोकडी बुद्धि अधिरा ।।'- तुगा ७००. २. धीट नव्हे असा; भ्याड; भेकड. [सं. अ + धीर]

**अधील** वि. खालचा; नीच; क्षुद्र : 'मग अधिलीं देहांतरें ।' - ज्ञा १५.९२. [सं. अध : +ल]

**अधीलपण** न. १. श्रेष्ठपणा; मुख्यपणा; अग्रता : 'तुका म्हणे अधीलपणें । नेली लांकडें चंदनें ।'- तुगा १०४७. २. मूळ स्वरूप; पूर्व स्वरूप.

**अधीलमधील** वि. मध्याजवळचा; पहिला किंवा शेवटचा (बगळून); मधलाच कोठला तरी. [सं. आदि+मध्य]

**अधीश, अधीश्वर** पु. धनी; मालक; राजा; सार्वभौम; स्वामी.[सं.]

**अधीक्षक** पु. १. देखरेख करणारा; व्यवस्थापक. २. कार्यालयातील एका विभागाचा मुख्य. [सं.]

**अधीक्षण** न. देखरेख.

**अधीक्षिका** स्त्री. १. महिला वसतिगृहाची प्रमुख. २. प्रमुख; व्यवस्थापक; अधीक्षक म्हणून एखाद्या ठिकाणी काम करणारी महिला.

**अधुना** क्रिवि. आता; सध्या; हल्ली; अलीकडे. [सं.]
**अधुपा–वा** वि. न धुतलेला (तांदूळ वगैरे). [सं. अ+धू]
**अधुरा** वि. १. अपूर्ण; अर्धवट; अपुरा. २. पूर्णपणे तयार नसलेला; कच्चा; अप्रवीण; गुप्त गोष्ट मनात न ठेवणारा.
क्रिवि. अर्ध्या मार्गात.
**अधुरी** वि. उतावीळ; अधीर. २. कच्ची; अर्धवट (गाठ). ३. अधाशी; हपापलेला; हावरा; अघोरी.
**अधू** वि. १. व्यंग असलेला; क्षीण, कमजोर, उणीव असलेला; कुरूप; बेढब; लुळा (अवयव); अशक्त; विकल; पंगू (इसम). २. नीट न चालणारा. ३. कच्चा (विषय वगैरे). ४. हळवा (मनाचा).[सं. अर्ध]
**अधृति–ती** स्त्री. अधैर्य; भीती; भय : 'तयासि क्षोभु नाहीं बुद्धि । आणि न पवतां न बाधी । अधृति तयातें ।।'– ज्ञा २.३५९. [सं.]
**अधेमधे** क्रिवि. पहा : **अधीमधी**
**अधेला** पु. १. अर्धा पैसा; खानदेशाकडे पाव आणा : 'मज तरि सपनींही हा दिसेना अधेला । – सारुह ४.६८. २. (ना.) भागीदारीने शेती करणारा; अर्धे उत्पन्न स्वत:ला ठेवण्याच्या बोलीने दुसऱ्याची शेती करणारा. [सं. अर्ध + ल]
**अधेला–ले** पु. एका जातीचा निर्विष साप. हा पिवळट रंगाचा, बराच लांब असून फक्त रविवारी चावल्यास याचे विष बाधते अशी समजूत.
**अधेली** स्त्री. १. अर्धा रुपया; आठ आण्याचे नाणे : 'अधेल्याची माळ = घोड्याच्या गळ्यातील दागिना. २. अर्धा पैसा : 'तुम्हासारखे सरदार लोक देतात शिवराई अधेली.'– स्वप ३०. ३. निम्म्या हिश्शाने शेत करण्याची पद्धती. (व.) [सं. अर्ध + ल.]
**अधैर्य** न. धैर्याचा अभाव; अनिश्चितता; भीती; भय.
वि. अस्थिर; चंचल; अनिश्चित; उतावळा; भित्रा; भेकड. [सं.]
**अधोइं** क्रिवि. अजून : 'अधोइं हाती पाई जेवतें असा'– लीच ३.२४.
**अधोक** वि. सुरक्षित; नुकसानीपासून मुक्त (व्यापार, सावकारी यासंबंधी).
क्रिवि. सुरक्षितपणे; बेशक; भरभराटीने; नुकसानीशिवाय. निर्धोक.
**अधोकढ** पु. अर्धवट शिजणे.
**अधोकर्ष** पु. (स्था.) खाली ओढणे.
**अधोगत** पु. (नृत्य.) एक अभिनय; डोके अगदी खाली करून पाहणे; लाज दाखविणे, नमस्कार करणे, दु:खाने तोंड खाली घालणे ह्या गोष्टी दाखविण्याकरिता हा अभिनय करतात.
वि. १. खाली आलेला; उतरलेला; गेलेला; राहिलेला. २. हीन स्थितीस, निकृष्ट अवस्थेस गेलेला; पतित.
क्रिवि. १. खाली; खालच्या बाजूस. २. (ल.) व्यर्थ.
**अधोगति–ती** स्त्री. १. उंच प्रदेशाकडून खोल प्रदेशाकडे जी गती ती; वरून खाली जाण्याची क्रिया; अवपतन; अवतरण. २. नरक; नरकगती. ३. अध:पात; निकृष्ट जन्म; हीन स्थिती; अवनती; दीन अवस्था : 'पुढीले अधोगतीची लाज नेणवे ।'– ज्ञा ७.१०४.
वि. क्रिवि. खाली उतरणारा; खाली जाणारा; नीच स्थितीप्रत जाणारा; खालावणारा; खालावत चाललेला; खाली; खालच्या दिशेस; हीनावस्थेस; अवनतीप्रत: 'तैसे मस्तकीं केश कुरळ । कृष्ण मुखेंशी विन्मुख सबळ । अधोगती धावित्नले ।'– एरुस्व १.६३. [सं.]
**अधोगमन** न. १. खाली जाणे; अवनती; अध:पात ; अवपतन; हीनावस्था; निकृष्टावस्था; फजिती. २. व्यर्थपण : 'या नाव सार्थक चरण । इतर संचार ते अधोगमन ।'– एभा ११.१२११. [सं.]
**अधोगामी** वि. १. वाईट मार्गाकडे जाणारा; हीनावस्थेस जाणारा; खालावत चाललेला; नरकाकडे जाणारा : 'देओ परात्परू तरु । मी अधोगामिया निरंतरु ।'– ऋ ४७.
**अधोगामी कर** पु. कमी होत जाणारा कर.
**अधोजठर** वि. (वै.) ओटीपोटाच्या भागाशी संबंधित. [सं.]
**अधोजिव्हिका** स्त्री. पडजीभ; प्रतिजिव्हा; उपजिव्हा. [सं.]
**अधोड** वि. धिप्पाड; खादाड व मद्दड; ओबडधोबड; लठ्ठ व फार वाढलेल्या अविवाहित मुलीबद्दल योजतात.
**अधोड** न. १. अर्धे कातडे; फाकी. २. (म्हशीचे, बैलाचे) न कमावलेले कातडे; चामडे; लोथ (क्रि. कापणे, टांगणे, बेतणे, साल– हिरडा भरणे–ढोरांच्या धंद्यातील शब्दप्रयोग). ३. गुरांचे कातडे घेण्याचा महारांचा हक्क. (वा.) **अधोड शिवणे** – चामडे कमावण्यासाठी टांगतात, त्याकरता व त्यात मसाला भरण्याकरिता पिशवी शिवणे.
**अधोडी** वि. कच्च्या कातड्याचा बनविलेला (डोल, जोडा, बादला वगैरे) : 'आम्हा आधोडीचे जोडे ।'– तुगा ४३५४. २. दांडगा; राकट (अकुशल कारागिराच्या कामाबद्दल योजतात). ३. हावरा; लोभी.
**अधोदंत** पु. खालच्या जबड्यातील दात. [सं.]
**अधोदिशा** स्त्री. खालची दिशा; अध:स्वस्तिक; अधरदिशा. [सं.]
**अधोद्वार** न. १. उपस्थ; योनि–लिंग. २. गुदद्वार; मलद्वार : 'चरण आणि अधोद्वार । पायू हे प्रकार ।'– ज्ञा १३.१००. [सं.]
**अधोधार** स्त्री. वरून होणारी जोराची वृष्टी : 'श्रोणितापुराचा आखरी : नाराजांचां अदोधारी ।तै वरिखतेया बाणासुरावरी : कोपलासि तूं'– शिव ४५३.
**अधोनासा बिंदु–दू** (वै.) नाकाचा खालचा भाग आणि वरच्या ओठाचा भाग ज्या ठिकाणी मिळतात तो बिंदू.
**अधोपर** न. १. शिखर : 'ना तरी कैलासाचीं अधोपरें । आळंगितु इन्द्रनीलांचीं शिखरें ।।– शिव ६. २. डोंगराचा पायथा : 'ब्रह्मगिरीचा अधोपरीं कोळाइ (देवी)'– स्थापो ३०. [सं. अर्ध + उपरि]
**अधोपरी** वि. जन्मजात नव्हे ते; नवीन; स्वकर्तृत्वाचे; स्वकर्तृत्वाने.
क्रिवि. मध्येच; अर्ध्यावर. [सं. अर्ध + उपरि]
**अधोपी** पहा : **अधुपा**
**अधोबद्ध** वि. (वन.) तलबद्ध; तळाशी चिकटून आधारलेला (पराग कोष). उदा. मोथा, वांगे, टोमॅटो, मोहरी इ. [सं.]
**अधोबिंदू** पु. (स्था.) सर्वात खालचा किंवा खोलवरचा बिंदू. [सं.]
**अधोभाग** पु. १. खालचा भाग; तळ; बूड. २. गुदप्रदेश; अधोद्वार.[सं.]
**अधोभुवन** न. पाताळ. [सं.]
**अधोभूमि–मी** स्त्री.तळमजल्याची जागा; खालची जागा; खोल जागा.
**अधोमार्ग** पु. (स्था.) भुयारी मार्ग. [सं.]
**अधोमुख** वि. १. अधोवदन; खाली तोंड करून असलेला. २. (ल.) खिन्न;

ओशाळलेला; लाजलेला; शरमलेला : 'तेथे अवघीं झालीं पराङ्मुखें। पाठमोरीं निघालीं अधोमुखें। -एभा ४.८८. ३. (वन.) अधोवर्ती; खाली वळलेले बीजकरंध्र असलेले उदा. सूर्यफूल.

न. (ल.) भीड : 'अधोमुखें भेद वाढतो।'- दास २०.३.२२. [सं.]

**अधोमुख स्थिती** स्त्री. (वै.) १. कमरेच्या वरचा भाग खाली वाकला आहे अशी अवस्था. २. पोटावर झोपण्याची स्थिती.

**अधोमुखी** वि. खाली तोंड केलेला; खाली झुकलेला; उतरत्या स्थितीतला. [सं.]

**अधोमुखी गोम** स्त्री. खाली तोंड करून असलेले गोमेच्या आकाराचे केसांचे वळण. हे एक घोड्याचे शुभ चिन्ह मानतात.

**अधोमुखी लवणस्तंभ** पु. (भूशा.) वरून ठिपकणाऱ्या व कॅल्शियम कार्बोनेटने संयुक्त असलेल्या पाण्यामुळे तयार झालेले, छतापासून खाली लोंबणारे चुनखडीचे सुळके. [सं.]

**अधोमूल्य** न. कमी किंमत, दर. [सं.]

**अधोमूल्यन** न. (अर्थ.) चलनाची किंमत कमी होणे. [सं.]

**अधोमृदा** स्त्री. (भूशा.) सर्वात वरच्या मातीच्या थराखाली व खालच्या घट्ट खडकाच्या वर असणारा अर्धविकसित मातीचा थर. [सं.]

**अधोयंत्र** न. अर्क काढण्याच्या जोड नळ्यांचे अध:पात्र. दारू- अर्क काढण्याच्या भांड्याचा एक भाग. [सं.]

**अधोरक्त** वि. किरणांच्या पट्ट्यातील लाल रंगापलीकडचा अदृश्य रंग

**अधोरंध्र** . अपानद्वार; गुदद्वार : 'अधोरंध्राचेनि वाहे। अपानु हे नाम लाहे।'- ज्ञा १८.३३८. [सं.]

**अधोरेखा** स्त्री. (मजकुराच्या, आकृतीच्या) खाली ओढलेली रेघ.[सं.]

**अधोरेखित** वि. ज्याच्या खाली रेघ ओढली आहे असा (मजकूर, चिन्ह इ.) [सं.]

**अधोर्ध्व** पु. १. श्वासोच्छवास. २. अस्तित्व; जीवमानता.

क्रिवि. खालीवर : 'अध्योर्ध्व काय नेणों जाहलें।'- ज्ञा ११.१८९.[सं.]

**अधोलोक** पु. १. पाताळ; अधोविश्व. २. गुन्हेगारांचे व त्यांच्या साथीदारांचे जग. [सं.]

**अधोली** स्त्री. १. पायलीच्या अर्धभागाचे माप; दोन शेराचे माप. २. अधोलीच्या आकाराचे शोभेच्या दारूचे एक खापरी भांडे. ३. धान्याने भरलेले माप : 'दारात अधोली ठेवून ती सुनेने लाथेने पाडायची...'- पलकोघे १६८. [सं. अर्ध]

**अधोलेप** पु. (यंअ.) पाण्यापासून संरक्षण करण्यासाठी एखाद्या वाहनाच्या खालील पृष्ठभागावर (जमिनीलगतच्या) दिलेले विशिष्ट आवरण. [सं.]

**अधोवदन** वि. अधोमुख; खाली मान घातलेला; खिन्न; दु:खी : अवमानित. [सं.]

**अधोवर्धन** न. (वन.) ज्या द्विपार्श्व अवयवामध्ये अधर पृष्ठभागाची वाढ पृष्ठीय पृष्ठभागापेक्षा जास्त क्रियाशीलतेने होते असा अवयव. उदा. फुलांचे प्रसरण. [सं.]

**अधोवलि-ली** स्त्री. (भूशा.) दोन्ही बाहू परस्परांकडे कललेले अशी (खाली वाक असलेली) घडी. [सं.]

**अधोवाक** पु. (भूशा.) कमानीच्या उलट वाक असणारी, (खाली वाकलेली)वली.

**अधोवात,वायु-यू** पु. पाद; अपानवायू; पंचप्राणांपैकी एक; गुदद्वारातून सरणारा वायू. [सं.]

**अधोविभाग** पु. (भूशा.) (जेथे तपमान व दाब उच्च असतात असा) भूस्तरांच्या, खडकांच्या खूप खोलीवरचा विभाग. [सं.]

**अधोशाख** वि. खाली फांद्या असलेला : 'हे असो अधोशाखा।'- ज्ञा १५.५२०. [सं. अध:शाखा]

**अधोष्ठ** न. भगोष्ठ; स्त्रीजनन्नेंद्रियातील ओष्ठसदृश भाग. [सं.]

**अधोहिम** वि. (भूशा.) १. हिमक्षेत्राखालील. २. हिमनदीच्या तळाचा. [सं.]

**अध्धर** क्रिवि. अधांतरी; निराधार. पहा : **अधर** [सं. अ + धर]

**अध्धा** पु. (ताल.) पहा : **तिलवाडा** [सं. अर्ध]

**अध्धी** स्त्री. अर्धशिशी.

**अध्यग्नि-ग्नी** न. लग्नाच्या वेळी होमासमोर दिलेले स्त्रीधन. - यास्मृति; व्यवहाराध्याय. ८.१४३. [सं.]

**अध्ययन** न. १. पठण; वाचन; अभ्यास. २. शिकलेले; पठण केलेले शास्त्र; एखाद्या विषयाचा अभ्यास; मनन-चिंतन. [सं.]

**अध्ययन रजा** स्त्री. एखाद्या विषयाचे संशोधन, अभ्यास करण्याकरिता अध्यापकवर्गाला किंवा इतरांना मिळणारी किंवा देण्यात येणारी रजा.

**अध्ययनशील** वि. अभ्यासू; वाचनाची, शिकण्याची वगैरे गोडी किंवा आवड असलेला; अभ्यासू. [सं.]

**अध्यर्थन** न. १. (खालच्या न्यायाधीशाने दिलेला ठराव तपासण्याकरिता) वरच्या न्यायाधीशाकडे अर्ज करणे; अपील करणे. २. पंचांच्या किंवा तिऱ्हाईतांच्या निवाड्यावर सोपवणे. ३. विनंती; प्रार्थना. ४. मदतीकरिता अर्ज, विनवणी. ५. साक्षी-पडसाक्षी ठेवणे. [सं.]

**अध्यलंड मध्यलंड** पहा : **अधलंडमधलंड**

**अध्यवसाय** पु. १. आत्मबोध; सदसद्विवेकबुद्धीने केलेला निश्चय; मनोभाव. २. ठराव; निर्धार. ३. दीर्घोद्योग; प्रयत्न. ४. (तर्क.) तर्कनि-कार्यकारण संबंध पाहून एखादे निश्चित अनुमान किंवा कार्याकार्य निर्णय करणे. - गीर १२३. ५. तत्परता; दक्षता; नेट. [सं.]

**अध्यवसित** वि. १. स्वत: किंवा आत्म्याने जाणलेले, निश्चित ठरविलेले. २. अंगीकारलेले. ३. प्रयत्न केलेले.

**अध्यशन** न. अति खाणे. २. पूर्वी खाल्लेले पचनी पडण्यापूर्वी आणखी खाणे. [सं.]

**अध्यस्त** वि. १. आरोपित; कल्पित; मानलेले. (दोरीच्या ठिकाणी सापच आहे असे, मृगजळाच्या ठिकाणी पाणीच आहे असे इ.)२. चिंतिलेले; चिंतन केलेले; विचार केलेले; मनन केलेले. ३. चुकीने किंवा अज्ञानाने गृहीत धरलेले. [सं.]

**अध्यस्थि-स्थी** स्त्री. १. घोड्याच्या पायाचा रोग-अश्वप २.२८. २. (आयु.) हाडावर येणारी अस्थिमय सूज किंवा उंचवटा.

**अध्यक्ष** पु. १. संस्था अगर मंडळ यांच्या नियमाप्रमाणे निवडलेला अगर ठरविलेला मुख्य, नियंता, प्रमुख. २. विधानसभेचा किंवा संसदेचा

नियंता; सर्वाधिकारी. ३. स्वामी; वरिष्ठपणाने देखरेख करणारा; दिशा दाखविणारा; नियामक; नियंत्रक. उदा. दानाध्यक्ष, धनाध्यक्ष, धर्माध्यक्ष : 'जो इंद्रियदेशींचा अध्यक्षु ।'-ज्ञा ८.३४. [सं.]

**अध्यक्षपद** न. अध्यक्षाची जागा; अध्यक्षस्थान. [सं.]

**अध्यक्षाधिष्ठित** वि. जिचा प्रमुख अध्यक्ष आहे (अशी एक प्रकारची प्रातिनिधिक शासनपद्धती, राज्य.). [सं.]

**अध्यक्षी** पु. सर्वांकडे पाहणारा; ज्याची दृष्टी सर्वत्र आहे असा; सर्वश्रेष्ठ : 'सर्वांसाक्षी । अध्यक्षी हें नाम त्या ।।'-निगा ४१३. [सं.]

**अध्यक्षीय** वि. अध्यक्षासंबंधी; अध्यक्षाची; अध्यक्षाने केलेली.[सं.]

**अध्यक्षीय पद्धत** स्त्री. (राज्य.) गणराज्याचे शासनप्रमुख म्हणून सार्वत्रिक मतदानाने अध्यक्षांची निवड करण्याची पद्धत.

**अध्या** पु. अध्याय; प्रकरण; सर्ग : 'अध्या इतुकेन जाला ।'- दावि २५६.

**अध्यातमध्यात न पडणे** कोणाच्याही भानगडीत नसणे; दुसऱ्याच्या कामात लुडबूड न करणे; दुसऱ्याच्या खाजगी गोष्टींमध्ये कोणत्याही प्रकारची ढवळाढवळ न करणे; त्या जाणून घेण्याची इच्छा न करणे.

**अध्यात्म** न. १. आत्म्याबद्दलचे ज्ञान; ब्रह्मज्ञान; अधिभूतापासून परिणाम पावलेली भावना; सामर्थ्य; वेदान्त : 'तेथ अध्यात्माचे नवलपण पुरे ।'- ज्ञा ७.१७७. २. शरीरस्थित त्वंपदवाच्य आत्मा. ३. प्रत्येक वस्तूचा स्वतःचा मूळ भाव (स्वभाव). ४. परमात्म्यासंबंधी निरूपण. वि. १. आत्मविषयक; आत्म्यासंबंधी; आत्म्याबद्दलचे; शारीरिक; शरीर, इंद्रिये व प्राण यांपासून होणारे : 'तैसे अधिभूताधिदेवां । अध्यात्मादि उपद्रवां । पातलेया पांडवा । गिळूनि घाली ।।'-ज्ञा १६.१९५. २. अध्यात्मासंबंधी; वेदान्तविषयक. [सं.]

**अध्यात्मयोग** पु. बाह्य सृष्टीतून मन काढून ते आत्मध्यानी लीन करणे. [सं.]

**अध्यात्मविद्या** स्त्री. वेदान्तशास्त्र; ब्रह्मविद्या; उपनिषदांत सांगितलेले ज्ञान. [सं.]

**अध्यात्मविज्ञान** न. परलोकविद्या. 'आपल्या स्त्रीच्या मृत्यूच्या शोकाने फार विव्हल होऊन ते अध्यात्म विज्ञानाची चर्चा करू लागले.'- पलोवि ३६. [सं.]

**अध्यात्मशास्त्र** न. ब्रह्मज्ञानाचे शास्त्र.

**अध्यात्मज्ञान** न. ब्रह्मज्ञान : 'प्रकृती व पुरुष हे सांख्यांचें द्वैत भगवद्गीतेस मान्य नसून या दोहोंच्याही पलीकडें तिसरें सर्वव्यापक अव्यक्त व अमृततत्त्व चराचर सृष्टीच्या बुडाशी आहे, हा गीतेतील अध्यात्मज्ञानाचा व वेदान्तशास्त्राचाही पहिला सिद्धान्त आहे'- गीर १८९ आ. सहावी. [सं.]

**अध्यात्मा** पु. १. आत्मा; ईश्वरांश; शरीरात व्यापून असणारा परमात्म्याचा अंश; चैतन्य. २. आत्मज्ञान. [सं.]

**अध्यात्मी** पु. १. वेदांतशास्त्रामध्ये मग्न; परमार्थी; वेदांतीः 'देवगृहीं अवघे अध्यात्मि जालेती सर्वही ।' – सप्र ८.१०.३०. २. अध्यात्माचा अभ्यास करणारा. [सं.]

**अध्यादेश** पु. संसदेचे किंवा विधानसभेचे अधिवेशन चालू नसताना एखाद्या तातडीच्या प्रश्नावर कायदा करून तो अंमलात आणण्याची शासनाला गरज भासते; त्यावेळी अनुक्रमे राष्ट्रपतींच्या किंवा राज्यपालांच्या किंवा तत्सम पदाधिकाऱ्यांच्या सहीने प्रसृत होणारा हुकूम; वटहुकूम. [सं.]

**अध्यापक** पु. शिक्षक; गुरुजी; शाळेत किंवा महाविद्यालयात शिकविणारी व्यक्ती. [सं.]

**अध्यापन** न. शिकविणे; पढविणे; अध्यापकाचा व्यवसाय. [सं.]

**अध्यापन शास्त्र** न. शिक्षणाची तत्त्वे व नियम; कसे शिकवावे हे सांगणारे शास्त्र; शिक्षणशास्त्र. [सं.]

**अध्यापिका** स्त्री. शिक्षिका; मास्तरीण. [सं.]

**अध्याय–व** पु. १. खंड; पर्व; परिच्छेद (पुराणादी ग्रंथांचे); प्रकरण; विभाग : 'एवं जन्यजनकभावें । अध्यावो अध्यायातें प्रसवे । – ज्ञा १८.७५. २. नियमित करायचा अभ्यास, वाचन इ. [सं.]

**अध्यारोप** पु. १. मिथ्या आरोप; भ्रम; कल्पना; माया : 'सुखद सृष्टीचा आटोप । वेदांत्या अध्यारोप ।।' – टिक १६२. २. भ्रामक, चुकीचे विधान.

**अध्यारोपण** न. १. वर ठेवणे; रोवणे; उपरिस्थापन. २. (वै.) वरून लावणे; थर देणे; एकमेकांत न मिसळून जाणाऱ्या गोष्टी एकमेकांना लावणे; चिकटविणे. ३. (ग.) (दोन भिन्न आकृती) एकाच स्थळी ठेवलेली स्थिती. [सं.]

**अध्यावरण** न. (वन.) बीजोपांग; बीजकाच्या तळापासून उगम पावून बीजकाभोवती अंशतः किंवा पूर्णपणे वाढणारे बीजावरण. उदा. लिची, कमळ, विलायती चिंच इ. [सं.]

**अध्यावरणयुक्त** वि. (वन.) बीजोपांगयुक्त; बीजोपांग (तिसरे आवरण) असलेले (बीज). [सं.]

**अध्यावाहनिक** न. वरातीच्या वेळी मिळालेले स्त्रीधन – यास्मृ ८.१४३. [सं.]

**अध्यास** पु. १. पूर्ण चिंतन; ध्यास; लक्ष लावून केलेला विचार; निरंतर ध्यान : 'अध्यास बळाने पुण्यपुरुष । होऊनिं तद्रूपें दिसती ।।' – दावि ७७९. २. चुकीची कल्पना; जाणीव; खोटी कल्पना; मिथ्याग्रह; आरोप; आळ : 'देहादि अध्यासू आपुल्याठायीं । श्रवणें मननें मिथ्या केला पाही ।।' – एभा ११.६४०. [सं.]

**अध्यासन** न. विशिष्ट विषयाच्या अभ्यासासाठी निर्माण केलेले पीठ, अभ्यासकेंद्र, संशोधनकेंद्र. उदा. मराठीचे अध्यासन. [सं.]

**अध्याहार** पु. १. वाक्य पुरे करण्यासाठी एक किंवा अनेक शब्द घेणे; पदरचे घालणे. २. अध्याहृत किंवा गाळलेला शब्द; पदरचा घातलेला शब्द. [सं.]

**अध्याहार्य** वि. अध्याहार करावयाचे (पद); पदरचा घालायचा (शब्द). [सं.]

**अध्याहृत** वि. १. प्रत्यक्ष वाक्यात नाही पण अर्थ पूर्ण करण्यासाठी ज्याची जरुरी आहे असा (शब्द इ.); व्यक्त न केलेला: 'बरं आहे, येतो.' यात 'येतो' पूर्वी 'मी' हा कर्ता अध्याहृत आहे. २. तर्कित; गृहीत. [सं.]

**अध्येता** पु. अध्ययन करणारी व्यक्ती. [सं.]

**अध्येमध्ये** पहा : **अधीमधी**

**अध्रीत** वि. धारण न करता येणारे; अतिगहन : 'हे अध्रीत शास्त्र की गा' - लीचउ २०४; ६३४.

**अध्रुव** वि. चिरकाल न टिकणारे; अनिश्चित; चंचल; क्षणभंगुर. [सं.]

**अध्रुवात्मक** वि. ध्रुवीभवन न झालेले. [सं.]

**अध्रुवित** वि. ज्याला ध्रुव-केंद्रबिंदू नाही तो (अणू, विद्युतप्रवाह इ.). [सं.]

**अध्वपरिमाण** न. मार्ग किंवा अंतर मोजण्याचे साधन - माप, कोस, योजन इत्यादी रस्त्याच्या लांबीचे परिमाण. [सं.]

**अध्वर** पु. यज्ञयाग : 'ऐशी हे आदि परंपरा संक्षेपें तुज धनुर्धरा । सांगितली या अध्वरा । लागौनियां ।।' - ज्ञा३.१३८. २. अष्टवसूंपैकी एक. ३. (ज्यात हिंसा नाही असा) यज्ञ. [सं.]

**अध्वरकांड** न. शतपथ ब्राह्मणातील यज्ञकांड. [सं.]

**अध्वर्यु-र्यू** पु. १. यज्ञ चालविणारा; उपाध्याय : 'अध्वर्यु याज्ञवल्क्य, ब्रह्मा श्रीव्यास पैल मुनि होता ।' - मोसभा २.१८. २. यज्ञातील मुख्य ऋत्विज. ३. (ल.) मुख्य व्यवस्थापक; पुढारी; नायक; अध्यक्ष; धुरीण; प्रमुख; मुख्य. ४. यजुर्वेदातील निष्णात. [सं.]

**अध्वा** पु. रस्ता; मार्ग; पथ. [सं.अध्वन्]

**अध्वी** स्त्री. अर्धशिशी. (व.) [सं.अर्ध]

**अध्व्यावरचा** वि. १. मार्गातील; रस्त्यावरील. २. (ल.) तात्पुरता; उपरि पहा : **अधव्याचा**

**अन्** स्वराने सुरू होणाऱ्या शब्दाला लागणाऱ्या नकारार्थी 'अ' उपसर्गाचे रूप 'अन्' असे होते. उदा. अनपेक्षित.

**अन्, अन** वि. अन्य; इतर; दुसरा.

क्रिवि. १. एकूण एक; सर्व : 'वाघाला पाहताच अन् माणसे पळू लागली.' २. ऐन; अतिशये करून : 'अन उन्ह पडलें होतें तशांत मी शेतात गेलों.' - उभ.

आणि; आणखी : 'यापुढे अन् मला सुचवेना' - किंगवि ५५.

**अनकरोट** न. अन्नपाणी.

**अनकष्टी** वि. आळशी; कष्ट न करणारा (माणूस).

**अनकळित** क्रिवि. अडचणीत न पडता; प्रयासरहित; श्रमविरहित; सहज होणारे; न कळता; अक्लेश; निर्वैर; निष्कंटक : 'मग निघाले अनकळित निवृत्तितटीं ।।' - ज्ञा ७.१०१.

**अनखर** वि. १. कठीण : 'कधी अनखर असे वाटलेच ...' - उपा २२४. २. पहा : **अणखर**

**अनगट** पहा : **अणगट**

**अनगार** वि. अपरिग्रह वृत्ती; साठा न करण्याची वृत्ती : 'दीक्षेनंतर हा साधू अनगार होतो. याच्याजवळ कसलाही परिग्रह असत नाही.' - जैवा ६५.

**अनग्नि-ग्नी** वि. १. अग्निहोत्र न ठेवणारा, निरग्नी २. ज्याच्या जठरातील अग्नी मंद आहे, असा. [सं.]

**अनग्निदग्ध** वि. शास्त्रोक्त, विधियुक्त अग्नी देऊन ज्याचे दहन केले नाही असा. [सं.]

**अनघ** वि. १. निष्पाप. २. निर्मल. ३. सुंदर; दुःखरहित : 'जो अनघ जीवनाचा अनिर्वचनीय प्रसाद त्यांच्या वाङ्मयात आढळतो ...' - व्यरे ९९. [सं.]

**अनघटित** वि. १. अद्‌भुत; अघटित; न घडणारे. २. अवघड; कठीण : 'तरी हे असे अनघटित । वायां दुःख दुणावत ।' - कथा १.४.१७९. [सं. अ+ घटित]

**अनघड** वि. १. न घडलेला; न घासलेला; संस्कार न झालेला; न तासलेला (लाकूड, दगड). २. अप्रबुद्ध; अज्ञान; अजाण; अडाणी; असंस्कृत : 'अनघड संग प्रसंग नकोरे देवराया ।' - दावि १८६. [सं. अ+घट]

**अनघता** स्त्री. निरागसपणा : 'त्यांच्या वृत्तीत एक प्रकारची मोहक अनघताहि होती.' - व्यरे ४.

**अनघादेवी** स्त्री. प्रकृती; माया; देवी; स्त्री. [सं.]

**अनच्छ** पु. अस्वच्छ पदार्थ; चिखल; गाळ : 'मग चिरकालें गा तो अनच्छ । उपसिल येळर्यां ।' - कथा २.१६.१४३. [सं. अ+अच्छ]

**अनणु-णू** पहा : **अणणु**

**अनत्याचारी** वि. अत्याचाररहित; सात्त्विक; सनदशीर; अत्याचारी हिंसक मार्गाचा अवलंब न करणारा; हिंसा न करणारा किंवा शांततेच्या मार्गाने चळवळ करणारा (पक्ष, माणूस इ.) [सं.]

**अनद्यतन** वि. आजचा नाही असा; पूर्वी घडलेला. [सं.]

**अनद्यतनभूत** पु. (व्या.) संस्कृत व्याकरणातील एक भूतकाळ; मागील दिवसांसंबंधी नव्हे तो. [सं.]

**अनधिकारी** वि. १. अधिकार, हक्क, योग्यता नसलेला; अपात्र; अयोग्य. २. ज्याचा वारसा-हक्क गेला आहे असा; बेवारशी. ३. साधनचतुष्टयसंपन्न नव्हे असा. [सं.]

**अनधिकृत** पु. अधिकृत नसलेले; संबंधित अधिकाऱ्याची रीतसर परवानगी न घेता केलेले (काम); शासनमान्य नसलेले. [सं.]

**अनधिकृत विनिमयदर** पु. (अर्थ.) शासनमान्य दराऐवजी प्रत्यक्ष बाजारात चालू असलेला दोन देशांच्या चलनांच्या अदलाबदलीचा दर.

**अनधिगत** वि. माहीत नसलेले; शोध लावून न काढलेले; अज्ञात; अलब्ध; न संपादिलेले; प्राप्त न झालेले. [सं.]

**अनधिप्रवेश** पु. अनाहूत प्रवेश; बळजबरीने शिरणे, घुसणे. [सं.]

**अनधीत** वि. १. न वाचलेले; न शिकलेले (पुस्तक). २. जो शिकला नाही किंवा ज्याने वाचले नाही असा; अक्षरशत्रू; न शिकलेला. [सं.]

**अनध्याय** पु. १. (वेद) पठण करण्यास निषिद्ध मानलेला दिवस; (वेद) पठणात किंवा अभ्यासात खंड, खळ, अडथळा; अष्टमी, चतुर्दशी, पौर्णिमा, अमावस्या, प्रतिपदा, सूर्यसंक्रांती, मन्वादी, युगादी; कार्तिक, आषाढ, फाल्गुन या महिन्यांच्या कृष्ण पक्षातील द्वितीया; तूळ व मेष या संक्रांतीचे १२ प्रहर हे काल वेदाभ्यास करण्यास अयोग्य व अनध्यायाचे समजतात. - धसिं २. 'की अनध्यायामाजी रसाळ । वेदाध्ययन राहिले ।।' २. (ल.) सुट्टी. [सं.]

**अनन** न. सीताफळ.

**अननगण** पु. अन्नान्न गत; अन्नान्नदशा.

**अननस, अननास** पु. एक फळ व झाड. हे उष्ण प्रदेशात होते; मूळचे दक्षिण अमेरिकेतले केतकीच्या झाडाप्रमाणे व झुपकेदार. फळे रुचकर व गोड.

**अननं** न. १. अन्न. २. जेवणखाण; भोजन. [सं. अन्न]

**अननिल** वि. (वन.) अवायुजीवी; हवेशिवाय जगणारे. उदा. नायट्रेट क्षारांचा नाश करणारे जमिनीतील सूक्ष्म जंतू. [सं.]

**अननुभूत** वि. न अनुभवलेला; अपूर्व; ज्याची प्रचीती आली नाही असा : 'पण कोणत्यातरी अननुभूत स्पंदनानी ...'-किरी ८. [सं.]

**अननुरूप** वि. अनुरूप नसलेला; योग्य नसलेला; विसंवादी; मिळताजुळता नसलेला. [सं.]

**अननुवादी क्षेत्र** न. (वै.) ज्या भागातून कृतीला प्रतिसाद लगेच मिळत नाही असा शरीराचा किंवा त्वचेचा भाग; मंद भाग.

**अननुसूचित** वि. अनुसूचीत समाविष्ट नसलेला; यादीत नसणारा. [सं.]

**अननुसूचित बँक** शासनाने अनुसूचित बँकांच्या (शेड्यूल्ड बँकांच्या) यादीत समाविष्ट न केलेली बँक.

**अनन्य** वि. १. एकरूप : 'सोऽहबोधें तयाच्या ठायीं । अनन्यु होय ।' - ज्ञा १८.१३९७. २. एकमेव; एकटा : 'येणेपरी परिसतांचि तया अनन्या ।'-नल १२१. ३. एकनिष्ठ; दुसऱ्याचा आश्रय न घेतलेला : 'जाति कुळ नाहीं तयासी प्रमाण । अनन्या अनन्य तुका म्हणे ।।' - तुगा ६९. ४. अन्योन्य; परस्पर : 'न तुटे अनन्यमिळणी योग । भिन्न विभाग दावितां ।' - एभा २४.२७. ५. एकाकी; अनाथ; ज्यास दुसरा कोणी तारणारा नाही असा; ज्यास दुसरा उपासना-विषय, देव, आश्रयदाता वगैरे नाही असा : 'अनन्यास रक्षीतसें चापपाणी ।' - राम ३५. ६. स्वकीय; स्वतःचा (मुलगा, मूल) : 'पाये अनन्य लोटुनि लावावें काय अन्यथा नातें ।' - मोभीष्म ४.५. [सं.]

**अनन्यगतिक** वि. एकनिष्ठ; दुसरा मार्ग किंवा उपाय नसलेला; अगदी अवलंबून असलेला : 'ऐसे अनन्यगतिकें चित्तें । चिंतितसांतें मातें ।' - ज्ञा ९.३३७. [सं.]

**अनन्यचित्त, अनन्यमानस** वि. चित्ताच्या, मनाच्या वगैरे सर्व शक्ती ज्याने एकाच ठिकाणी लावल्या आहेत असा. [सं.]

**अनन्यता** स्त्री. एकरूपता; पूर्णतः समरस, लीन होणे; अविभक्तता; तत्स्वरूपता; भिन्नता; एकाश्रयता; एकनिष्ठा. [सं.]

**अनन्यभक्ति-क्ती** स्त्री. केवळ एका (देवा) चीच भक्ती. [सं.]

**अनन्यभाव** पु. १. अंतःकरणात एकच एक विचार असणे; निस्सीम भक्ती; कळकळ; आस्था; एकनिष्ठता. २. सरळभाव; प्रामाणिकपणा; साळसूदपणा; कपटराहित्य. [सं.]

**अनन्यविषय** वि. केवळ एकच विषय असलेला; एकचित्त; एकनिष्ठ; एकदिलाचा. [सं.]

**अनन्यवृत्ति-त्ती, अनन्यमनस्क** वि. एकाच पदार्थावर, विषयावर, मन, ध्यान किंवा लक्ष असलेला; सावधानचित्त; एकाग्रचित्त. [सं.]

**अनन्यवेद्य** वि. दुसऱ्याला जाणता न येण्यासारखे; स्वतःलाच समजणारे; आपल्या अनुभवानेच जाणता येणारे; दुसऱ्यास त्याची जाणीव करून देता न येण्यासारखे (ब्रह्म, सुख, मनातील गुप्त गोष्ट इ.). [सं.]

**अनन्यशरण** वि. दुसरा आसरा किंवा आधार नसलेले; दुसरा ठाव नसलेले; एकाच आश्रयावर अवलंबून असलेले. [सं.]

**अनन्यशासन** क्रिवि. सार्वभौम; दुसऱ्या कोणाचा अंकित नसणारा.

**अनन्यसाधारण-सामान्य** वि. इतरत्र न आढळणारे; अलौकिक; सामान्यतः न दिसणारे (धैर्य, शौर्य इ.) : 'तो अनन्यसाधारण कादंबरीकार नि तत्त्वचिंतक बनला.' - न्यूगं १४४. [सं.]

**अनन्योदक** न. १.एकनिष्ठारूपी पाणी. २. (ल.) भक्ती : 'अनन्योदकें धुवट । वासना जे तन्निष्ठ ।' - ज्ञा १५.३. [सं.]

**अनन्वय** पु. १. विसंगतपणा; असंबद्धता; अप्रस्तुतता. २. एक अर्थालंकार; एकाच अर्थास उपमानत्व आणि उपमेयत्व कल्पून जो उपमानोपमेयभाव वर्णिलेला असतो तो उदा. 'समर्था या लोकीं तुजसम अये तूंचि अससी ।'-वागंल. [सं.]

**अनन्वित** वि. १. भयानक; घोर; बेसुमार (छळ, अत्याचार इ.). २. बेताल; अमर्याद; प्रमाणाबाहेर (छळ इ.). ३.असंबद्ध; विसंगत; अव्यवस्थित; भलभलते (भाषण, ग्रंथ इ.) शास्त्र व लोकव्यवहार याच्या विरुद्ध; अनियमित; अयोग्य (वर्तन, वगैरे). [सं.]

**अनपत्य** वि. १. अपत्यरहित; वांझ; वांझोटी. २.(ल.) फटिंग. [सं.]

**अनपराध** वि. निर्दोष-निष्पाप; निरपराध.

क्रिवि. दोष, चूक नसताना; विनापराध. [सं.]

**अनपाय** वि. १. अपाय न करणारा; अविघ्नकारी. २. अपायरहित; नाश न पावणारी; अविनाशी; अखंड : 'तैसी क्रियाशक्ती पवनी । असे जे अनपायिनी । ते पडिली नानास्थानीं । नाना होय ।' - ज्ञा १८.३३३. क्रिवि. अपाय न करता; उपद्रव दिल्याशिवाय; त्रासरहित : 'तया वनीं एक तडाग तोयें । तुडुंबले तामरसानपायें ।' - नल ३६.[सं.]

**अनपाळणे** सक्रि. न पाळणे; सांगितलेले न ऐकणे. (गो.)

**अनपेक्ष** वि. १. अपेक्षा नसलेले; निरपेक्ष; निरिच्छ; बेगरजू. २. बेफिकीर; उदासीन. [सं.]

**अनपेक्षित** वि. १. अनिच्छित; जरूर नसलेले. २. अनिष्ट. ३. ध्यानीमनी नसलेले; अकल्पित; अकस्मात उत्पन्न झालेले. [सं.]

**अनफायोग** पु. (ज्यो.) जन्मकुंडलीमध्ये चंद्र ज्या स्थानी असेल त्या स्थानाच्या द्वादश स्थानी सूर्याव्यतिरिक्त कोणताही ग्रह असेल तर अनफायोग होतो. - जाबो १७०. [सं.]

**अनबनाव** पु. बेबनाव; वैमनस्य; शत्रुत्व. [हिं. अ + बनाव]

**अनबुज** वि. अज्ञानी; बुद्धिहीन; अडाणी : 'तुझे थोरपण तुजलाचि साजे । येरी अनबुजे होय देवा ।'- बगाथा ७१०. [सं. अ + बुध]

**अनभरवसा** पु. अविश्वास; बेभरवसा. [अ + भरवसा] **अनभव** पु. भोगवटा; भोगण्याचा हक्क; अम्मल किंवा ताबा.

**अनभावार्थी** वि. कपटी, धूर्त. [सं. अ + भाव]

**अनभिगम्य** वि. दुर्गम; बेलाग; अगम्य; न पोहोचण्याजोगा. [सं.]

**अनभिमत व्यक्ती** आवडीतली, मर्जीतली नसलेली व्यक्ती; नको असलेली व्यक्ती. [सं.]

**अनभिषिक्त** वि. अभिषेक न झालेला (राजा, पुढारी इ.); रीतसर, कायद्याने नसलेला पण लोकमानसात स्थान असलेला (नेता).[सं.]

**अनभिसंगत** वि. १. क्रम, संगती नसलेले. २. (भूशा.) एकमेकांवर समांतर रचल्या गेलेल्या खडकांच्या दोन स्तरांमध्ये कालाच्या दृष्टीने अंतर असणारे. [सं.]

**अनभिज्ञ** वि. १. परिचय नसलेला; अपरिचित; बिन माहितीचा. २. अजाण; अडाणी, जाणकार नसलेला. [सं.]

**अनभोग** पु. भोगवटा; भोगण्याचा हक्क; ताबा; अंमल : 'सदर लिहिलेप्रमाणे आम्हांस वतन व इनाम गाव अनभोग जाहले; त्यात तफावत नाही.'– दसकैया २५४.

**अनभ्यस्त** वि. न आचरलेला; सराव किंवा परिपाठ नसलेला; अपरिचित; तरबेज किंवा कुशल नसलेला; माहिती नसलेला. [सं.]

**अनभ्यास** पु. १. अभ्यासाचा, परिपाठाचा अभाव; परिचय नसणे. २. (संगीत.) एखादा स्वर रागालापात फार थोडा वेळ घेणे. [सं.]

**अनभ्यासी** वि. १. न अभ्यासिलेले; सराव किंवा परिपाठ नसलेले. २. अभ्यास किंवा सराव न करणारा; अभ्यासाच्या कामी आळशी; अनभ्यस्त. [सं.]

**अनमान** पु. १. अनादर; दुर्लक्ष; उपेक्षा; अवगणना; हेळसांड हयगय. २. संशय; शंका : 'तैसाचि तो मयूरकेत । पूर्ण करील मनोरथ । यांत नसे अनमान' – जै ४६.८५. ३. संकोच. [सं. अ + मन्] (वा.). **अनमान न ठेवणे, धरणे, पाहणे** – १. संकोच न करणे; भीड न धरणे. २. अव्हेरणे; अनादर करणे; दुर्लक्ष करणे; हयगय करणे.

**अनमान** पु. अंदाज; अदमास; अनुमान. [सं. अनुमान]

**अनमानणे** सक्रि. अव्हेरणे; अवज्ञा करणे; उपेक्षणे.

**अनमानधप(ब)का** पु. निव्वळ तर्क; कल्पना; अंदाज; अटकळ; अटकळ पंचविशी. (बहुधा तृतीया विभक्तीत उपयोग– अनमानधपक्याने = अंदाजाने, ठोकळ मानाने.)

**अनमानिक** वि. १. निष्काळजीपणाचे; बेफिकीरपणाचे; अनादराचे; ज्यात अनमान आहे असे (भाषण वगैरे.) २. अनिश्चित; मोघम; संदिग्ध; (माणूस, भाषण वगैरे). [सं. अनुमान]

**अनमानीत** वि. घोटाळ्याचे; संशयित; मोघम; अनिश्चित; संदिग्ध; दुटप्पी (उद्योग, कारभार, भाषण वगैरे). [सं. अनुमान]

**अनमार्ग** पु. १. वाईट मार्ग; असन्मार्ग; कुमार्ग. २. दुसरा रस्ता; अन्यमार्ग: 'सन्मार्ग तो जीवीं धरणें । अनमार्गाचा त्याग करणें ।'– दास ५.१०.२.

**अनमित, अनमीत** वि. अकारणमित्र; कशाचीही अपेक्षा न करता बंधुभाव धरणारा : 'अनमित बंधु करुणाकरा'– वछा ३९५.

**अनमीख** वि. अनिमिष; पापणी न हलवता : 'अनमीख पाओ ठेले । राया मुरारीतें ।' – वछा ७३. [सं. अनिमिष]

**अनमीत** वि. ज्याचा ठाव लागत नाही असे : 'चरणविहिरांचे पाणी अनमीत' – लीचपू १९६.

**अनमोल** वि. १. बिनमोल; ज्याची किंमत करता येत नाही असे; २. बहुमोल; अमोल. [सं. अ + मूल्य]

**अनम्यता** स्त्री. ताठरपणा.

**अनय** पु. १. अन्याय; अनीती; अप्रामाणिकपणा. २. कपट; पाप. वि. अनीतीचे; अन्यायाचे. [सं. अ+नय]

**अनयाळें** पहा : **अणियाळे**

**अनर** न. १. रामफळ. २.(दारुकाम) अनारनळा.(कों.) [हिं. अनार]

**अनरसा** पु. तांदळाच्या आंबलेल्या पिठात गूळ मिसळून त्याच्यावर खसखस थापून तुपात तळून (वडेघारग्यासारखा) केलेला पदार्थ.

**अनराहाटी** स्त्री. गैररीत; कुमार्ग; आडरस्ता : 'अधर्म अनरहाटी शोकसंग्रहो ।'– दास २.३.२७.

**अनरीती** स्त्री. अन्याय; गैर गोष्ट; पद्धतीविरुद्ध आचरण. [सं. अन् + रीति]

**अनरूढा** वि. अनूढा; अविवाहित; कुमारिका : 'जैसी अनरूढा रूपवंती ।। देखोनि वेधे चक्रवर्ति ।'–ऋ ५३.

**अनर्गल–ळ** वि. आडकाठी नसलेला; उच्छृंखल; स्वच्छंदी; मनस्वी; स्वेच्छाचारी : 'तू ठायींचा गोवळ । अविचारी अनर्गळ ।'– तुगा १८५. क्रिवि. मनसोक्त; स्वेच्छाचाराने; स्वैर; अप्रतिबद्ध : 'शिष्या मुक्तपणे अनर्गळ । करिसीं इंद्रिये बाष्कळ ।'– दास ५.६.६०. [सं.]

**अनर्गलता** स्त्री. स्वच्छंदीपणा; स्वैराचार; स्वैरवर्तन : 'अनर्गळता करू नये ।'– दास १४.१.२५. [सं.]

**अनर्गळी** स्त्री. स्वच्छंदी आचरण; स्वैरवर्तन; खोड्या; चाळे; लहर. [सं. अनर्गल]
वि. ज्याला अर्गला नाही तो; स्वच्छंदी.

**अनर्घ–र्घ्य** वि. १. अमोल; अंदाज न करता येण्यासारखा; बहुमोल; अतिशय मौल्यवान : 'कंठी माळा अनर्घ्यमणी ।'–सीस्व ४.४७. [सं. अ + अर्घ; अर्घ्य]

**अनर्जित** वि. स्वत: न मिळवलेला; श्रम न करता अप्रत्यक्षपणे मिळवलेला– मिळालेला. [सं.]

**अनर्जित संपत्ति–त्ती** स्त्री. वारसा हक्काने, लॉटरीत, सट्ट्यात मिळालेली संपत्ती.

**अनर्थ** पु. १. अतिशय अनिष्ट गोष्ट; मोठे अरिष्ट. २. अव्यवस्था; थैमान; दंगा किंवा त्यापासून उद्‌भवणारे दुःख; संकट; विघ्न : 'हे असो जे सागरु । अनर्थांचा ।।'– ज्ञा ८.१४९. ३. अर्थहीनता; अर्थशून्यता; निरर्थकता; पोकळपणा.[सं.] (वा.) **अनर्थ ओढवणे–** संकट येणे. **अर्थाचा अनर्थ करणे** – १. एखाद्या गोष्टीचा विपर्यास करणे. २. बोलणाऱ्याच्या शब्दाचा हेतू लक्षात न घेता. भलताच अर्थ लावणे. ३. अतिशय अमर्यादता. ४. शत्रुत्व वैर.

**अनर्थक** वि. १. निरर्थक; अर्थशून्य (ग्रंथ, पद्य, वाक्य इ.). २. बिनकायदेशीर; व्यर्थ; पोकळ. ३. अनर्थकारी; उपद्रवी.

**अनर्थकारक** वि. ज्यामुळे फार मोठे संकट येते, नुकसान होते असा; उपद्रवकारक [सं.]

**अनर्थगर्भ** वि. अनर्थास कारण होणारा. [सं.]

**अनर्थभान** न. अरिष्टाची, दुर्दैवाची जाणीव; मानसिक विकलता; हुरहूर; अनर्थाची पूर्वकल्पना. [सं.]

**अनर्थापात** न. १. मोठ्या अरिष्टाचा आघात; अरिष्ट कोसळणे; संकटे वगैरे येणे. २. अतिशयितता; अतिरेक. [सं.]

**अनर्थावह** वि. ज्याच्यामुळे संकट ओढवेल असा; अनर्थकारक; संकटकारक [सं.]

**अनर्हता** स्त्री. एखाद्या पदाकरिता लायक, पात्र नसणे; अयोग्यता; अपात्रता. [सं.]

**अनल–ळ** पु. १. अग्नी; विस्तव; आग. सामा. शब्द – कामानल, तृषानल इ. : 'जैसा उद्यानामाजीं अनळु ।।'– ज्ञा १.२३०. [सं.]

**अनलस** वि. आळस नसलेला; तत्पर; दक्ष; उद्योगी; मेहनती. [सं.]

**अनल्प** वि. पुष्कळ; थोडा नव्हे तो. [सं.]

**अनव** वि. वृद्ध; जुनाट : 'बहु हेंही पदभरिहि जरि सारील अनव करी रणगा ।।'– मोभीष्म ४.१०. [सं.]

**अनवकाश** पु. काळाचा, जागेचा अभाव.

वि. १. वेळ; सवड नसलेला; बिनफुरसतीचा. २. स्थल, प्रसंग, संधी, जागा, सोय, प्रवेश, शिरकाव, पोकळी वगैरे नसलेला. ३. पूर्ण व्याप्त; पूर्ण भरलेला. [सं.]

**अनवछिन्न** वि. अखंड; अकुंठित; व्यापक; अभंग: 'ऐसी अनवच्छिन्न समता । भूतमात्रीं सद्यता ।'– ज्ञा २.२९८. [सं.]

**अनवट–ठ** पु. १. पायाच्या अंगठ्यात घालावयाचा रुप्याचा दागिना. पहा : **अणवट** : 'अनवट निटत्या ही जोड त्या जोडव्यांची ।' – सारुह ६.३१; 'जोडवी अनवठ मासोळ्या ।।'–स्त्रीगीत ६५. २. (संगीत.) अपरिचित राग; फारसा प्रचारात नसलेला राग.

**अनवटी–ठी** स्त्री. हनुवटी. [सं. हनु + वृत्त]

**अनवद्य** वि. अदूषणीय; निर्दोष; ज्यात उणे काढायला यत्किंचितही जागा नाही असे. [सं.]

**अनवरणे** सक्रि. त्याग करणे; सोडणे; टाकून देणे : 'लोभ आणि अहंकार आम्ही अनवरिला बाई ।' – भज ४१. [सं. अ + वृ]

**अनवरत** वि. अविरत; अविश्रांत; अव्याहत – सतत चालणारे; अखंड : 'जयजय वो शुद्धे । उदारे प्रसिद्धे । अनवरत आनंदे ।वर्षतिये ।' – ज्ञा १२.१.

क्रिवि. न थांबता; न अडखळता; एकसारखे; सतत; निरंतर.

**अनवल** स्त्री. रामफळाचे झाड. (को.)

**अनवला** पु. आबाळ; हेळसांड. (बे.) [सं. अ + नवस]

**अनवलिप्त** वि. व्याप्त किंवा गुरफटलेले नाही असे; संपूर्ण परिपूर्ण नसलेले : 'कोणतेही तत्त्व सर्वथा निरपेक्ष, अनवलिप्त... आहे असे समजणे धोक्याचे आहे.' – विश २१. [स.]

**अनवले,अनोले** न. रामफळ.

**अनवलोभन** न. सोळा संस्कारांपैकी एक. स्त्री गरोदर असताना तिसऱ्या महिन्यात हा संस्कार करावयाचा असतो. अश्वगंधा वनस्पतीचा रस नवऱ्याने आपल्या गरोदर स्त्रीच्या नाकात पिळावयाचा असा यात मुख्य विधी असतो. त्या रसामुळे गर्भ सुरक्षित राहतो.[सं.]

**अनवसन्न कर्ज** न. मुदत न भरलेले कर्ज; चालू कर्ज.

**अनवसर** पु. १. अवेळ; अकाल; फुरसत किंवा सवड नसलेली वेळ; असमय; भलतीच वेळ : 'अथवा अवचटें ऐसें धडे । जें अनवसरें देह साडे ।'–ज्ञा ८.२०५. २. अनधिकार; अयोग्यता : 'स्त्री शूद्रादिकां प्राणियां । अनवसरु मांडुनियां ।राहिला आहे ।'– ज्ञा १८.१४५८. ३. वियोग; लोप; अभाव : 'जयाचेनि अनवसरें । द्रष्टा ले दृश्याचें मोहिरें ।'– अमृ २.९. ४. जागेचा अभाव; अवकाशाचा अभाव. ५. संकट; दुष्काळ; वाईट काल; आपत्काल; आपत्ती. [सं.]

**अनवसरी** स्त्री. अकाल; जागेचा अभाव; अवकाशाचा, अस्तित्वाचा अभाव : 'अनुभवो हा ठाववेऱ्ही ।आपुलीचि अनवसरी'–अमृ २८१.

**अनवसित** १. न संपलेले. २. न ठरवलेले.

**अनवस्था, अनावस्था** स्त्री. १. अनिश्चित, चंचल, विस्कळीत स्थिती; निराश्रित स्थिती; निराधारता. २. अव्यवस्था; घोटाळा; तारांबळ. ३. अवस्थेच्या, अस्तित्वाच्या पलीकडील स्थिती; अमूर्त, निराकार स्वरूप, स्थिती. ४. अमर्यादता; असमाप्ती. ५. अनास्था; दुर्लक्ष; हेळसांड (मुलांची, जनावरांची). ६. अनियमितता. [सं.]

**अनवस्था प्रसंग** पु. १. निराधार स्थिती; अव्यवस्था; अमर्यादपणा. २. कठीण, विचित्र परिस्थिती. [सं.]

**अनवस्थित** वि. १. अनिश्चित; अव्यवस्थित; विस्कळीत. २. वास्तव नसलेले; मोकळे; रिकामे. [सं.]

**अनवस्थिति–ती** १. अनिश्चितपणा; कायम नसलेली अवस्था. २. (ल.) (कामाचा, मनाचा, स्वभावाचा) चंचलपणा. [सं.]

**अनवस्वर** पु. अवेळ : 'तुम्हांसि अवस्वरू–अनवस्वरू नाही' – लीचपू २९८.

**अनवहाणी, अनवाहाणी** पहा : **अनवाणा–णी**

**अनवळता** क्रिवि. अचानक; नकळत.

**अनवा** पु. फणसाप्रमाणे खाण्याचा, गोराडू जातीचा मोठा कंद.

**अनवा** पु. घाईघाईने खरडलेला लेख, मसुदा; कच्चा खर्डा.

**अनवा** वि. १. सर्वोत्कृष्ट; अमौलिक : 'नवरत्नामधीं चंद्र पाहिला तेजस्वी अनवा ।'– सला ५३. २. नवीन तऱ्हेचे; विलक्षण; विचित्र; तऱ्हेवाईक. (चुकीने अनवल अवरूप) नवनवीन; विलक्षण; अपूर्व व मनोवेधक; आश्चर्यकारक; अप्रतिम. [फा. अन्वा]

**अनवाणा–णी** वि. पायात पादत्राण (वाहणा, जोडा) न घातलेला; उघड्या पायाचा : 'अनवाणी घाई राव हळुहळु ।'– सप्र २.१४.

क्रिवि. पायात पादत्राण न घालता उघड्या पायांनी.[सं. अ + उपानह]

**अनवाणा काशीकर** पु. पक्का लबाड; लुच्च्या; पादत्राण न घालता काशीला गेल्याची थाप मारणारा.

**अनवाळ** वि. उच्छृंखल; बेफिकीर; खोडकर; स्वैर; उनाड : 'दशवर्षामाजीं बाळ । तारुण्यांत अनवाळ ।'– आप ८१.

**अन(नु)वाळी** स्त्री. १. टवाळी; चेष्टा; खोड्या : 'तु व्रजपाळ बाळक होउनि हे अनुवाळी, करिशी मुरारी ।'– वामन ४. २. कात्याव्रत.

**अनवाळे** न. सोवळे. [सं. अनाविल]

**अनविश्वास** पु. अविश्वास.

**अनवेक्षण** न. अनादर; दुर्लक्ष : 'म्हणे ही तप:सिद्धी तत्त्वतां अनवेक्षणी रूसली ।'– जै १९.२. [सं.]

**अनव्यावृत्तिसिद्ध** वि. दुसऱ्याच्या निरासाने सिद्ध होणारा.

**अनशन** न. उपवास; उपोषण; निराहार [सं.]

**अनशनव्रत** न. उपोषण करण्याचे व्रत. [सं.]

**अनशवे-शिळे, अनशे, अनशो, अनशोय** वि. रिकामे किंवा अन्न नसलेले (पोट).(अनशवे वगैरे विशेषणांचा कधी कधी प्रथमा विभक्तीत उपयोग करतात. उदा. अनशवे पोटी पाणी प्याले असता.)

**अनशवे पोटी** क्रिवि. काही न खाता; खाल्ल्यावाचून; उपाशी असता.

**अनशिट** न. १. ठसका; अळसूत. २. उष्टा न केलेला पदार्थ. पहा : **अनसूट** [ सं. अन् + उच्छिष्ट]

**अनशुद्ध, अनशुद, अनसूद** पहा : **अन्नशुद्धी**

**अनसाईपणा** पु. उतावीळपणा; असहिष्णुता.

**अनसारिखी** वि. सारखी नसलेली; वेगळी : 'तेथिची व्यवस्था ते अनसारिखी आणिकीचि ।'– चक्रसू १३४.

**अनसूट** वि. १. चव न घेतलेले; उष्टे न केलेले; न वापरलेले; स्पर्श न केलेले; जसेच्या तसे असणारे. (दुभते, पाणी वगैरे) : 'म्हणे दधि दूध जें सांचलें ।अनसूट परी येथूनी ।' – हरि ७.२८. २. खर्च न करावयाचे; न वापरण्याजोगे; आधी उष्टे न करण्याचे : 'माता म्हणे आजि मित्रवार । दुग्ध अनसूट असे समग्र ।' – हरि ९.१९३. ३. (ल.) वाटणीचा भाग ज्यास मिळाला नाही असा. ४. वैषयिक अनुभव न घेतलेला; ब्रह्मचारी (पुरुष किंवा स्त्री) : 'उरों नेदी कोठें अनसूट । परद्वारी हा क्रियाभ्रष्ट ।' –हरि १६.१६. ५. बिन बडवलेला (बैल); खच्ची न केलेला (घोडा). ६. (ल.) वीर्यवान : 'अनसूट निर्मळच्या रिवाजी ।' – सीस्व ८.१७९. ७. पहा : **अन्नशुद्धि** [सं. अनुच्छिष्ट]

**अनसूट** वि. १. पूर्ण; अखंड : 'दोरी दोरपण अनसूट' – एभा २९.३६३. २. (श्राद्ध किंवा पक्ष या शब्दाला जोडून) भरणी श्राद्ध भाद्रपद वद्य पक्षातले. (न जोडता) मृताच्या वर्षश्राद्धाच्या आधीच्या दिवशीचे श्राद्ध. [सं. अनुस्यूत]

**अनसूट** वि. शुद्ध; पवित्र : 'वाचा अनसूट धरणे जाण ।'– एभा १७.२३८. [सं. अ + अशुद्ध]

**अनसूय** वि. मत्सररहित. [सं.]

**अनसूया** स्त्री. १. मत्सर नसणे; मत्सर न वाटणे. २. जिच्या मनात मत्सर नाही अशी स्त्री.

**अनसोले (पोट)** पहा : **अनशवे**

**अनस्फूर्ति** स्त्री. बुद्धिमांद्य : 'एक वेळ केसोबासांसि अनस्फूर्ती ऐसी वाटली : काही काळीचें काळीं आठवेना'–स्मृस्थ ७१.

**अनस्यूत** वि. अखंड वाहणारा; सतत वाहणारा : 'जैसा प्रवाहो अनस्यूतु । गंगाजलाचा ।' – ज्ञा २.१५३.

**अनहित** न. तोटा; अहित; नुकसान; अकल्याण. [सं.]

**अनळ** पु. अग्नी. पहा : **अनल** [सं. अनल]

**अनक्षर** वि. क्षयरहित; कमी न होणारा; न झिजणारा. [सं.]

**अनक्षर** वि. १. निरक्षर; खेडवळ; अशिक्षित; जंगली; अडाणी. २. शब्दातीत (परब्रह्म). [सं. अ + अक्षर]

**अनंकुश** वि. १. स्वैरवर्तनी; अनावर. २. नियम न पाळणारा; ज्याच्यावर ताबा चालत नाही किंवा चालविता येत नाही असा; बेशिस्त; स्वच्छंदी. [सं.]

**अनंग** पु. मदन; कामदेव; काम.
वि. अंगरहित; निराकार : 'जे अनंगु तो पेंधा ।निकवडा नुसधा ।।' – ज्ञा १३.९८०. [सं.]

**अनंगक्रीडा** स्त्री. रतिविलास; कामक्रीडा. [सं.]

**अनंगदहन** पु. मदनाला जाळून टाकणारा शंकर; शिव.

**अनंगदानी** स्त्री. वेश्या. [सं. अनंग + दान]

**अनंगपण** न. देहबुद्धीची जाणीव :'अनंगपण फिटलें । माया छंद साठविले ।'– ज्ञागा ४९५.

**अनंगलेख** पु. प्रणयपत्रिका; प्रेमपत्र. [सं.]

**अनंत** पु. १. विष्णूच्या नावांपैकी एक : 'आपुलिये चाडे श्री अनंता ।उमगु नोहे ।।'– ज्ञा ५.३. २. सर्पांचा राजा–नागांपैकी एक शेष : 'नागांमाजीं समस्ता । अनंतु तो मी ।' – ज्ञा १०.२४२; 'अनंतासी (शेष) म्हणे अनंत (विष्णू) ।' – हरि ३.१४. ३. अनंतचतुर्दशी (संक्षिप्त रूप). ४. भाद्रपद शु ।। १४ च्या दिवशी पूजा करून उजव्या हातात बांधावयाचा चौदा गाठींचा रेशमी गोफ–दोरा. ५. कानात घालण्याचा एक दागिना. ६. एक फुलझाड; अनंततगर. याची फुले शोभिवंत, वास मोहक मधुर असा असतो. पांढरा व तांबडा अशा याच्या दोन जाती आहेत. ७ (ग.) अमर्याद संख्या; अगणित संख्या; पहा : **अनंतराशी**. ८. (सामान्यत:) परमेश्वर; परब्रह्म. ९. जैन लोकातील चौदावा तीर्थंकर.
वि. ज्यास अंत नाही असा; शाश्वत; अमर्याद; असंख्य; अपार (काळ, स्थळ, संख्या, ब्रह्म) : 'अनादि मी अनंत मी अवध्य मी भला...'–साक; अनवच्छिन्न; अक्षय. [ सं. अन् + अंत]

**अनंतक्रमिका** स्त्री. (ग.) ज्यात अंतर्भूत असलेल्या राशींची संख्या अनंत आहे असा राशिक्रम. [सं.]

**अनंतख्याल** पु. अपार विनोदी– लहरी–मौजा–गमती–युक्त्या–चाळे.

**अनंतख्याली** वि. अनंतख्याल किंवा अमर्याद; अपार विनोद करणारा.

**अनंतगाठ्या** पु. समुद्रातील किड्यासारखा बारीक व विळविळीत मासा.

**अनंत चतुर्दशी** स्त्री. १. भाद्रपद शुद्ध चतुर्दशी गणेशोत्सवाचा शेवटचा दिवस. २. भाद्रपद शुद्ध चतुर्दशी या दिवशी (विष्णूप्रीत्यर्थ) करण्याचे व्रत– चौदा प्रकारची फुले, फळे, नैवेद्यास चौदा पक्वाने. अनंत दोऱ्याला चौदा गाठी व चौदाव्या तिथीला पूजा हा चौदांचा मेळ.

**अनंततगर** पु. एक फूल.

**अनंततृतीया** स्त्री. भाद्रपद, मार्गशीर्ष आणि वैशाख या मासांतील शुक्ल पक्षातील तृतीया. [सं.]

**अनंतत्व** न. १. ज्या स्थितीला अंत नाही अशी शाश्वत स्थिती; अनंतता; अपारता; निरवधिभाव; अमर्याद असण्याचा गुण. २. संपूर्णता; अव्यंगता. ३. (ग.) अनंत संख्या; अनंतता. [सं.]

**अनंतपाद** पु. (प्राणि.) घोण वर्गातील अनेक पाय असणारा प्राणी.

**अनंतपार** वि. ज्यास अंत किंवा पार नाही असा; अमर्याद; अफाट. [सं.]

**अनंत प्रतिगम** पु. (तत्त्व.) स्पष्टीकरणातील एक दोष. ज्यानुसार आपली स्पष्टीकरणाची प्रक्रिया कोठे पूर्ण होतच नाही आणि आपण एका संकल्पनेचे स्पष्टीकरण दुसरीच्या भाषेत, दुसरीचे तिसरीच्या भाषेत करीत राहतो. [सं.]

**अनंतमूल–ळ** न. एक औषधी वनस्पती; रक्त शुद्ध करण्याचा गुण हीत आहे. पर्यायी नामे : उपळसरी; तुणतुणी; दुधी.

**अनंत मूल्य** न. (ग.) कुठल्याही विशिष्ट मूल्यापेक्षा मोठे असे मूल्य. अनंत मूल्यापेक्षा कोणतेही मूल्य मोठे असू शकत नाही. [सं.]

**अनंतर** वि. १. मध्यंतरी अंतर न ठेवता, खंड न पडता येणारा; अगदी लागून किंवा पाठोपाठ येणारा; अनुक्रमिक. २. अव्याहत; निरंतर; अविच्छिन्न; अखंड; सतत.

क्रिवि. मागाहून; पश्चात; नंतर; पाठीमागून; मग.

शअ. मागे; मागून; पश्चात; पाठीमागे; नंतर. [सं. अ + अंतर]

**अनंतराशी** स्त्री. (ग.) अगणित संख्या, रक्कम, राशी. [सं.]

**अनंतलोम** पु. (प्राणि.) अंगावर पुष्कळ केस असलेला प्राणी. [सं.]

**अनंतवात** स्त्री. चार बोटांवर १४ दोरे घेऊन केलेली कापसाच्या सुताची वात. अनंतचतुर्दशीपासून दररोज दोन वाती अशा या वर्षभर लावतात अगर एकदम लक्ष वाती लावतात.

पु. डोळे, भुवया व आख या ठिकाणी होणारा एक त्रिदोषजन्य विकार. [सं. अनंत + वर्ति]

**अनंतव्रत** न. अनंतचतुर्दशीच्या दिवशी करण्याचे व्रत. [सं.]

**अनंतश्रेणी** स्त्री. (ग.) अंत न पावणारी श्रेणी. [सं.]

**अनंतिम** वि. (तत्त्व.) तात्कालिक; क्षणभंगुर; अंतिम नसलेले. [सं.]

**अनंती** स्त्री. १. अनंताची बायको. अनंतचतुर्दशीस अनंताबरोबर दुसऱ्या एका लहान रेशमाच्या दोऱ्याची पूजा करतात व तो पूजा करणाऱ्याच्या पत्नीच्या डाव्या दंडास बांधतात. २. गळ्यातील एक दागिना : 'मग गळा अनंती घातलीया. नमस्कार करितां वाजीनलीया' – लीचउ ४७०.

**अनंतोपगा** स्त्री. (ग.) दिलेल्या आकृतीस एकमेकांपासून अनंत अंतरावर असलेल्या दोन बिंदूंत भेटणारी, परंतु स्वतः मात्र त्या आकृतीपासून अनंत अंतरावर नसणारी रेषा. उदा. अपास्ताला दोन अनन्तोपगा असतात. [सं.]

**अनंदक** वि. ज्या ठिकाणी नांदणूक होत नाही असे; अपेशी; भूतादी बाधेमुळे ज्यात कुटुंब नांदत नाही असे (राहण्याला अयोग्य घर).

**अनाकलनीय** वि. न समजण्याजोगा; आकलन न होण्याजोगा. [सं.]

**अनाकार** वि. १. आकाररहित; निराकार. २. (भूशा.) ज्यांची आंतरिक रचना स्फटिकीय नाही असे (खनिज); स्फटिकीभवन न होता द्रवावस्थेतून घन झालेला पदार्थ. [सं.]

**अनाकृति** वि. १. आकार नसलेला; आकृतिरहित. २. (भूशा.) बाह्य आकार विकसित झालेला नाही असा (स्फटिक). [सं.]

**अनाक्रमक** वि. आक्रमक नसलेला; हल्ला न करणारा; आक्रमण न करणारा. [सं.]

**अनाक्रमण** न. (राज्य.) (देशादेशांमधील) आक्रमणाचा प्रतिबंध; परस्परांवर हल्ला न करणे. उदा. अनाक्रमण करार. [सं.]

**अनागत** वि. १. पूर्वी न झालेला; पुढे होणारा : 'जें कां अतीत अनागत । वर्तमान जें प्रस्तुत ।'– एभा ४.३४. २. भविष्यकालचे; भावी : 'अतित अनागत वर्तमान । हें तापसासि उठे प्रपंचज्ञान ।'– विसिंउ ४.४२.[सं.]

**अनागत चिंता** स्त्री. पुढील तरतूद, काळजी; भविष्य काळासंबंधी विचार. [सं.]

**अनागतदर्शी, अनागतद्रष्टा** वि. भविष्य जाणणारा, भविष्यवेधी : 'जे तपसामर्थ्ये समर्थ घोर । अनागतद्रष्टे ऋषीश्वर ।'–एभा २२.२२.[सं.]

**अनागत विधाता** वि. दूरदर्शी; भविष्य ओळखणारा; धोरणी; पुढील तरतूद करणारा. [सं.]

**अनागम** वि. ज्याचा आरंभीचा अथवा सुरुवातीचा काल माहीत नाही असा; पूर्वापार; अतिप्राचीन; स्मृतिकालातील (वतन, मालमत्ता, हक्क, रिवाज). [सं.]

**अनागम्य** वि. १. दुर्गम; जे गाठणे वा करणे अशक्य आहे असे. २. अप्राप्य; अवघड; दुरापास्त; असाध्य; दुर्मिळ. [सं.]

**अनागामी** वि. १. न येणारा. २. (ल.) पुनर्जन्मरहित : 'इतर सर्व कर्मांचे फळ क्षांती अनागामी (पुनर्जन्मरहित) वृत्ति अथवा अर्हत्पद प्राप्त केले असतां चुकवितां येतें.' – ज्ञाको (क) १२९. [सं.]

**अना(नि)गोंदी** स्त्री. सावळागोंधळ; अराजकसदृश परिस्थिती; कोणाचा पायपोस कोणाच्या पायात नाही अशी स्थिती; कर्नाटकातील विजयानगर साम्राज्याची अनागोंदी ही राजधानी होती. तेथील अराजकसदृश्य कारभारावरून लक्षणेने हा अर्थ.

**अनागोंदी कारखाना, कारभार, जमाखर्च, बक्षीस , बोलणे** खोटा, अव्यवस्थित, पोकळ, रिकामा कारभार, जमाखर्च इ.

**अनागोंदीचा राजा** पु. मागितलेली वस्तू विचार न करता देणारा; भोळा सांब; गबाळा.

**अनाघात** क्रिवि. अतिशय; प्रमाणाच्या बाहेर; भरमसाटपणे.

**अनाघ्रात** वि. १. वास न घेतलेले. २. (ल.) उपभोग न घेतलेली स्त्री; कुमारिका. [सं.]

**अनाचार** पु. अनिष्ट, अनियमित वर्तन; विहित आचार सोडून वागणे; आचारभ्रष्टता; अधर्म; दुराचार : 'विवेकें त्यजावा अनाचार हेवा ।' – राम ६९. [सं.]

**अनाचारी–रीय** वि. धर्मलंड; अनाचार करणारा; स्वेच्छाचारी; दुराचारी : 'दारिद्री आडखुळे विधी : अनाचार्याते वरित सिधी' – ऋव ४६. [सं.]

**अनाच्छादन** १. आवरण, आच्छादन दूर होणे. २. (भूशा.) झीज आणि धूप होऊन खडक उघडा पडणे. [सं.]

**अनाज** न. धान्य. [हिं.]

**अनाटोप** वि. आवरता न येणारी; अनावर : 'तुंगाच्या भुकेपेक्षाही त्याची भूक अनाटोप होई.' –ककां १०.

**अनाठाय** पु. लय; लोप : 'ज्ञानेसी विज्ञान गेले अनाठाया'– निगा २०५.

**अनाठायी** क्रिवि. १. अयोग्य ठिकाणी, स्थळी, जागी; गैरमार्गाने; भलत्याच गोष्टीत. २. व्यर्थ; फुकट; अनावश्यक. [सं. अन्य + स्थान]

**अनाड** स्त्री. अडचण; संकट : 'येथ मांडलिया तातडी । तें प्राण पडेल अनाडी ।' – एभा १४.४२५.

वि. १. अडाणी : 'मी अनाड काही कळेना गे येथे ।देहजड पडली भ्रांति ।।'– पला २२.५६. २. उनाड; द्वाड; नाठाळ.[सं. अज्ञानी]

**अनाड-ढ, अनाडकी, अनाडचाळा, अनाडबाहुला, अनाडभाजी, अनाडझाड, अनाडणे** वगैरे शब्द उनाड या अर्थी आहेत. ह्याकरिता पहा : **उनाड**

**अनाडचोट** पहा : **अडाणचोट**

**अनाडी** वि. १. अडाणी; अशिक्षित; मूर्ख; खेडवळ; अनभिज्ञ; गावंढळ; निरक्षर; अजागळ : 'अनाडी लोकांचा चौथा वर्ण झाला असेल.' – निमा १०७४. २. अजाण; वयाने लहान : 'कोणी वदती रे अनाडी सुंदरी ।' – दावि २५. [सं.अज्ञानी]

**अनाढळ** वि. निराळे; भिन्न : 'भृंगीचिया अंगी कोणते हो बळ शरीरे अनाढळ केली आली.' –जना २३४.

**अनात-थ** स्त्री. कृपा; मेहेरबानी; खैर. [फा. इनायत्]

**अनातप** वि. छायायुक्त; शीतल.

**अनात्म** वि. मायामय; नश्वर; आत्म्याविरहित; आत्मा नसलेला; अशाश्वत; जड : 'आणि अनात्मवर्गनीर । सांडुनि आत्मरसाचें क्षीर । चरताति जे सविचार । राजहंस ।' – ज्ञा १५.२९६.
पु. आत्मा नव्हे तो म्हणजे शरीर; स्थूल देह. [सं.]

**अनात्मक** वि. अशाश्वत.

**अनात्मवर्ग** पु. जग; जडसमुदाय.

**अनात्मज्ञ** पु. १. मूर्ख; अनात्मकवान. २. इंद्रियनिग्रहशून्य.

**अनात्मसंपन्न** पु. बुद्धिहीन; ज्याने इंद्रिये जिंकली नाहीत असा.

**अनाथ** वि. दीन; निराश्रित; गरीब; पोरका; निरालंब. [सं.]

**अनाथनाथ** पु. ईश्वर; मालक; गरिबांचा कैवारी; पालक. [सं.]

**अनाथवाणी** क्रिवि. अनाथाप्रमाणे; केविलवाणी; दीन; असहाय्य : 'झाली असें परिसतांची अनाथवाणी । ठावी नसे जीस कधीं अशि नाथवाणी ।' – वारू १८.

**अनाथालय** न. पोरक्या, आईबाप नसलेल्या मुलांचा सांभाळ करण्यासाठी असलेले गृह. [सं.]

**अनाथाश्रम** पु. पोरक्या, अनाथ मुलांसाठी काढलेला आश्रम. [सं.]

**अनाद** स्त्री. १. अन्न. २. तांदूळ. (गो.)

**अनादर** पु. आदराचा अभाव; तिरस्कार; अवहेलना; तुच्छता; अपमान; अवज्ञा. [सं.]

**अनादि-दी** न. परब्रह्म.
वि. १. आरंभरहित; उत्पत्तिरहित (ईश्वर, माया) : 'अनादिमाया प्रभावें ।' – ज्ञा १७.५६. २. ज्याच्या आरंभकाळाचा थांग लागत नाही तो; चिरंतन. ३. मूळचा; स्वभावतः 'तैसाचि श्रुत स्वर्गादिक । अनादि दोषयुक्त देख ।' – एभा १०.४९६. [सं.]

**अनादित्व** न. आरंभरहित अवस्था :'आपुलें अनादित्व भेटे ।'– ज्ञा १७.२२०. [सं.]

**अनादिपरंपरा** स्त्री. अतिप्राचीन काळापासून चालत आलेली रीत, पद्धती. (क्रि. असणे, चालत येणे, होणे.) [सं.]

**अनादिसिद्ध** वि. अनादिकालापासून असलेला; स्वयंसिद्ध; अनिर्मित; स्वयंभू (ब्रह्म, ईश्वर इ.) : 'जरी भिन्नचि अनादिसिद्ध ।' – ज्ञा १५.३२३. [सं.]

**अनादिसोयरा** पु. ईश्वर : 'भेटला तो अनादि सोयरा ।।'

**अनादृत** वि. तिरस्काराने, तुच्छतेने वागविलेला. [सं.]

**अनाद्यनंत** वि. १. आरंभ व शेवट नाही असा; चिरकाल टिकणारा. २. ईश्वर. [सं.]

**अनान** पु. पृथकत्व; वेगळेपणा : 'दोहींचीं अभिधानें । अधीचेनि अनानें । विप्लावलीं ।' – अमृ ८.१३ .
वि. वेगवेगळा; निरनिराळा; पृथक. [सं. अन्य+अन्य]

**अनापेक्षी** वि. १. अपेक्षेबाहेरचा; कल्पनेबाहेरचा. २. कोणतीही अपेक्षा, इच्छा नसलेला; निरिच्छ; निष्काम : 'सुगड संगीत गुणग्राही । अनापेक्षी लोकसंग्रही ।' – दास २.८.१९. [सं. अन+अपेक्षा]

**अनाप्त** वि. परकीय; नातलग किंवा संबंधी नव्हे तो : 'जे नवमास वाहे उदरांत । ते माता करूनि अनाप्त । स्त्रियेसि मानिति अति आप्त ।' – एभा ३.२३६. [सं.]

**अनाप्तता** स्त्री. १. समाजापासून दूर, एकीकडे पडल्याची भावना. २. समाजाचा घटक नसल्याची भावना. ३. एकाकीपणा; समाजबाह्यता. [सं.]

**अनाबशाही** वि. द्राक्षाची एक जात.

**अनाम** वि. नामरहित असा (ईश्वराचे विशेषण) : 'यया अनाम्या नामें ठेविती ।' – ज्ञा ४.६९. [सं. अ+नामन्]

**अनाम** न. लोक; जग; मनुष्यमात्र. [फा.]

**अनामत** वि. १. विश्वासाने दुसऱ्याजवळ ठेवलेली (ठेव.). २. (ल.) विश्वास पटण्यासाठी दिलेली अगाऊ (टेंडर बरोबरची वगैरे) रक्कम. ३. जप्त; सरकार जमा : 'जयदेवरायास हरामखोरी लावून देशमुखी अनामत केली.'– इमं ३३. ४. तसलमात; मोघम; हिशेबात नावाखाली दाखल न केलेले. ५. तिऱ्हाइताकडे ठेवलेली (वादातील वस्तू) सामाशब्द – अनामत खर्च-खाते -जमा-रक्कम-हिशेब इत्यादी.
क्रिवि. १. खर्च न करता; उपभोग न घेता; स्पर्श करून न बिघडवता; जशीच्या तशी. २. अलगत; अल्हाद; हळूच; सावकाश; स्थिरपणे. [फा. अमानत – वर्णविपर्यय ]

**अनामतवही** पूर्ण कायमचा निकाल न लागलेल्या अशा अनिश्चित पैशाच्या देवघेवीसंबंधी – तसलमात रकमांची ठेवलेली हिशेबाची चोपडी.

**अनामपत्र** न. ज्याला पत्र पाठविले तो न सापडल्यामुळे टपाल कचेरीत पडून राहिलेले पत्र; बेवारशी पत्र.

**अनामय** वि. निरोगी; सुदृढ; निकोप (प्रकृती). [सं.]

**अनामिक** वि. १. अनामक; नामरहित असा; नाव नसलेला (ईश्वर). २. ज्याने आपले नाव गुप्त ठेविले आहे असा; निनावी. ३. अपवित्र; ज्याचे नाव घेऊ नये असा अंत्यज : 'पवित्राला म्हणती नको हा कंटक । मानिती आत्मिक अनामिका ।।'– तुगा ४०८. [सं.]

**अनामिक कृति-ती** स्त्री. (ग्रं.) ज्याचा लेखक किंवा कर्ता अज्ञात आहे असे ज्ञानसाहित्य. [सं.]

**अनामिकता** स्त्री. १. कोणतेही विशिष्ट नाव नसणे. २. (मानस.) विचारशून्य, अविवेकी वर्तन करताना जमावातील व्यक्तीच्या मनात मीच हे कृत्य केले,

याला पुरावा काय ?– अशी भावना निर्माण होणे.

**अनामिका** स्त्री. करंगळीच्या शेजारचे बोट; अंगठीचे बोट. [सं.]

**अनाम्ल** न. १. आम्लास निर्गुणत्व आणणारा जो पदार्थ त्यास अनाम्ल म्हणतात. २. भस्म; लवणोत्पादक धातू.

**अनायक, अनायकी** वि. नेता किंवा सत्ताधारी पुढारी नाही असा; बेबंद; निर्नायक; अंदाधुंदीचे; अव्यवस्थित : 'सत्यासत्य हारपलें । अवघें अनायेक जाले । चहुंकडे ॥' – दास ११.२.२४. [सं.]

**अनायती** स्त्री. कृपा. [फा. इनायत]

**अनायत्त** वि. स्वतंत्र; पराधीन नसलेले; स्वावलंबी; स्वायत्त. [सं.]

**अनायास** पु. परिश्रमाची किंवा कष्टाची जरुरी नसणे किंवा त्यापासून मुक्तता; (बहुतकरून तृतीया विभक्तीत उपयोग. जसे –अनायासे, अनायासाने = परिश्रमावाचून). [सं.]

**अनार** न. १. डाळिंबाचे झाड; फळ : 'विलायती अनारे या दिवसांत तेथवर गर्मीमुळे न पावतील.' – दिमरा १.३३. २. (साधारणत: डाळिंबाच्या आकाराचा) दारूचा नळा; हिंगणबेट : 'हवया भुनळे चंद्रज्योती जळती । अनारे जातणी या जागोजागीं लाविती ।' –स्त्रीगीत ३७. [फा.]

**अनारणे** क्रि. आळसणे; सुस्त होणे.

**अनारत** वि. सततचे; निरंतनचे.

क्रिवि. सतत; अविरत.

**अनारदाणा** पु.१. डाळिंबाच्या बियांप्रमाणे दिसणारे एक धान्य. २. डाळिंबाचे दाणे. [फा.]

**अनारदाणी** वि. डाळिंबाच्या रंगाप्रमाणे किंवा दाण्यासारखे ठिपके ज्यावर विणले आहेत असे (पागोटे, शेला, दुपेटा वगैरे.)

**अनारब्ध** वि. न आरंभलेले; सुरू न केलेले; भावी; पुढचे. [सं.]

**अनारब्ध कार्य** न. पुढे सुरू करावयाचे काम; भविष्यकालीन कार्य; क्रियमाण असे कर्म : 'वेदान्त सूत्रात प्रारब्धासच प्रारब्धकार्य आणि जीं प्रारब्ध नाहीत त्यास अनारब्ध कार्य अशी नावे दिली आहेत.' – गीर २६९.

**अनारसा** पहा : **अनरसा**

**अनाराध्य** वि. १. ज्याचे शंकानिरसन करता येत नाही असा; खातरजमा करून घेता येत नाही असा. २. अपूजनीय. ३. अप्राप्य. [सं.]

**अनारिस–सा** वि. १. भिन्न; दुसरा; वेगळा; भलता : 'आपण विसरोनि अनारिसें । देखे पिसे जयापरी ।' –रंयोवा १.४६३. २. दुसऱ्या जातीचे–रीतीचे; विलक्षण; नवीन; निराळे : 'बाई तुझा नवा शृंगार । अनारिसा दिसतो मुखचंद्र । तरी कोण जोडला वर । सांगे आम्हा ।'– कथा १.१२.९.३. अपूर्व; अद्वितीय : 'अमृत पाजीले चवी अनारिसी । साक्ष ज्याची त्याची मनामाजी ।' – बगा २५.१२. [सं. अन्यादृश]

**अनार्त** वि. निरिच्छ; दु:खरहित; सुखी : 'होआल तुम्ही अनार्त ।'– ज्ञा ३.१०२. [सं.]

**अनार्तव** पु. (वै.) मासिक पाळी न येणे. [सं.]

**अनार्द्र** वि. ओलावा नसलेले; शुष्क; कोरडे. [सं.]

**अनार्य** वि. १. आर्य वंशातील नव्हे तो; द्राविड, मोंगल वगैरे आर्येतर वंशातील. २. आर्य किंवा श्रेष्ठ नव्हे तो; नीच; दुष्ट. ३. आर्यास अनुचित; अयोग्य; न शोभणारे; अप्रतिष्ठाकारक. ४. असभ्य; गावंढळ; प्रतिष्ठा नसलेला [सं.]

पु. १. भिल्ल, कोळी, कातकरी इ. जमाती – गांगा. २. म्लेछ, शक, हूण वगैरे वंशातील व्यक्ती.

**अनार्यजुष्ट** वि. कुलीन माणसाला न शोभणारे : 'हे त्याचे कृत्य अनार्यजुष्ट होते.' – युगान्त २१७.

**अनावर** वि. बेलगामी; स्वैर; अमर्यादित; बेताल; आटोक्याबाहेरचे : 'हे अनावर न विचारितां । बायाचि धिंवसा उपनला चित्ता ।' – ज्ञा १.६७. [सं. अनिवार्य]

**अनावरण** वि. ज्यावर झाकण नाही असा; वस्त्रात गुंडाळता न येण्यासारखा; उघडा : 'मज अनावरणा प्रावरण । भूषणातीतासि भूषण ।'–ज्ञा ९.१६२ [सं.]

**अनावरण काल** (मानस) एखादी वस्तू उघड करण्याचा कालावधी; मानसशास्त्रीय प्रयोगात वापरले जाणारे चित्र किंवा वस्तू प्रथम झाकून ठेवून ज्या थोड्या वेळासाठी उघड करून दाखवले जाते तो काळ. [सं.]

**अनावरण समारंभ** (एखादा पुतळा, चित्र, सभागृह वगैरे) खुले करण्याचा, उद्घाटन करण्याचा समारंभ.

**अनावर्त दशांश** पु. (ग.) ज्या दशांश स्वरूपात लिहिलेल्या संख्येत, तोच अंक अथवा अंकांचा समूह पुन्हा पुन्हा येत राहत नाही असा दशांश. [सं.]

**अनावर्ती** वि. पुनपुन्हा न येणारा; एकदाच दिला जाणारा (खर्च, अनुदान); ठराविक काळानंतर फिरून फिरून दिला न जाणारा. (आवर्ती = ठराविक काळानंतर पुन्हा मिळणारा) : 'प्राथमिक शिक्षणासाठी मोठ्या प्रमाणात आवर्ती व अनावर्ती अनुदान मंजूर केले.' – आशिआस २७. [सं.]

**अनावळी** स्त्री. खोडी; चेष्टा.

**अनाविल** पु. गुजराती ब्राह्मणांची एक जात.

वि. शुद्ध; सोवळे. [सं.]

**अनावृत** वि. १. आवरण, झाकण नसलेले; उघडे; जाहीर; प्रकट; बंद न ठेवलेले; न झाकलेले. २. अनिग्रहित; अनावर; आटोक्यापलीकडील; बाहेरचे; अतीत : 'माझें स्वरूप गा असमसहस । गुणमायेसी अनावृत ।' – एभा १५.२२७. ३. (ल.) असंरक्षित. [सं.]

**अनावृत करणे** (वै.) उघडे करणे; बाहेर काढणे (म्यानातून तलवार इ.); आवरण बाजूला करणे.

**अनावृत पत्र** न. एखाद्या व्यक्तीला किंवा संस्थेला उद्देशून वर्तमानपत्रातून प्रसिद्ध होणारे जाहीर पत्र. [सं.]

**अनावृत्त** वि. आवृत्ती नसलेला; पुन्हा न येणारा. [सं.]

**अनावृत्ति–त्ती** स्त्री. पुन्हा न येणे; आवृत्ती न निघणे इ.

**अनावृष्टि–ष्टी** स्त्री. अवर्षण; पावसाचा अभाव.

**अनाश्य** वि. न बिघडणारे; नाश न पावणारे; क्षय न होणारे; ऱ्हास न पावणारे. [सं. अ+नश्]

**अनाश्रम-मी** वि. सोडमुंज होऊन विवाह झाला नाही असा; चार आश्रमात जो मोडत नाही असा. [सं.]
**अनाश्रय-यी** पु. आश्रय, संरक्षण किंवा आधार यांचा अभाव.
**अनाश्रय, अनाश्रित** वि. निराधार; आश्रयहीन; निराश्रित. [सं.]
**अनास** क्रिवि. अकस्मात : 'अनास एकेकडून हैदरखान उठेल. तिकडून तसी गत असे.' – ऐलेसं ३२५०.
**अनासक्त** वि. विरक्त; उदासीन; आसक्त, लिप्त नसलेला : 'तैसा भूतकर्मी अनासक्तु मी भूतीं असे ।' – ज्ञा ९.१२९. [सं.]
**अनासक्ति-क्ती** स्त्री. कर्मफळाची अपेक्षा न करणे; वांछा, वासना नसणे; विरक्ती. [सं.]
**अनास्था** स्त्री. १. निष्काळजीपणा; बेफिकिरी; हयगय; हेळसांड; धरसोड; कळकळीचा अभाव. २. आस्था, आपुलकी नसणे. [सं.]
**अनास्वाद्य** वि. बेचव; रुचिहीन; आस्वाद न घेण्यासारखा. [सं.]
**अनाहत** वि. १. न मारलेला; न हाणलेला. २. स्वयमेव; स्वभावत:च उत्पन्न झालेला. ३. कोरे; न धुतलेले (वस्त्र). ४. सततचा; अखंड. ५. योगामुळे ऐकू येणारा दशनादांचा ध्वनी : 'तव अनाहताची बोली । चावळे ते ॥' – ज्ञा ६.२७४. [सं.]
**अनाहत कमळ, अनाहत चक्र** न. (योग.) शरीरातील षट्चक्रांपैकी हृदयामध्ये अनाहत नामक चौथे कमळ आहे. त्याचा रंग अग्नीसारखा असून ते बारा पाकळ्यांचे असते. क पासून ठ पर्यंत तेथे बीजाक्षरे प्रत्येक दळावर प्रकाशमान झालेली असतात : 'हृदयीं अनाहत कमळ । तें अग्निवर्ण द्वादशदळ । कं पासूनि ठं बीजीं करी झळाळ । प्रतिपत्रीं ॥' – विउ १.५१. [सं.]
**अनाहत गजर, ध्वनि, नाद** १. योगसाधनेने ऐकू येणाऱ्या दश नादाच्या ध्वनीपैकी एक किंवा दहाही. २. एकसारखा अखंड अव्याहत सूर – आवाज : 'जैसा अनुहाताचा गजर । तैसीं तुरें वाजती अपार ।' – एरुस्व ६.७२. ३. सोहंशब्द; श्वासोच्छ्वास.
**अनाहार** पु. उपवास; उपोषण; अन्नावाचून राहणे. [सं.]
**अनाहारी** वि. १. उपवास करणारा. २. ज्याने काही खाल्ले नाही असा.
**अनाहुत** न. दुर्मिळता; दुर्भिक्ष्य; अप्राप्यता; अनुपलब्धता : 'येक प्यादा कोठेहि मिलेना आणि चहूकडे अनाहुत जाले आहे.' – पेद ४०.१०७.
**अनाहूत** वि. १. न बोलावलेला; आमंत्रण न दिलेला; आगंतुक. २. अनपेक्षित; अकल्पित; आकस्मिक.[सं.] (वा.) **अनाहूत करणे** – अत्याचार करणे : 'मालवणीस शिंद्यांच्या लोकांनी फार अनाहूत केले.' – ऐलेसं ५८२२.
**अनाहूतपणे** क्रिवि. आपण होऊन; बोलावणे नसता; लोचटपणे.
**अनाक्षरिक** वि. (भाषा.) श्वासोच्छ्वासाच्या एका सपाट्यामध्ये उच्चारल्या गेलेल्या ध्वनिसमूहातील अमुखर (स्पष्टपणे ऐकू न येणारा) ध्वनी – विशेषत: व्यंजन. तुलना : आक्षरिक. [सं.]
**अनाक्षेपित** वि. ज्यावर आक्षेप घेतलेला नाही असा; ज्यास आव्हान दिले नाही असा. [सं.]
**अनि** उभ. आणि; अन् : 'मुदित अनि श्रीगुरुचे स्मरता उपकार होय सद्‌गदित ।' –कीर्त १.८४.
**अनिकट** पु. नदीला बांधलेला बंधारा; बांध. [इं. अनिकट]
**अनिकेत** वि. बेघर; निवारा नसलेले : 'आम्ही दोघेच त्या वेळी अगदी अनिकेत असे होतो.' – व्यरे २. [सं.]
**अनिगा-घा** स्त्री. निगा न ठेवणे; हयगय; देखरेख न ठेवणे; आबाळ; अनास्था; दुर्लक्ष. [फा. निगाह].
**अनिगूत-ती** स्त्री. आबाळ; दुर्लक्ष; हेळसांड; टापटिपीचा अभाव.
**अनिचाड** वि. चाड नसणारा; अनास्थ; बिनघोर.
**अनिच्छा** वि. निरिच्छ; इच्छा, अपेक्षा नसलेला. [सं. अ+इच्छा]
**अनिच्छा** स्त्री. १. निरिच्छता; अपेक्षेचा अभाव. २. बेफिक्रीरपणा. [सं.]
**अनिच्छा प्रारब्ध** न. १. दैववशात प्राप्त; इच्छा नसताना घडून आलेली गोष्ट. २. नको ते नशिबी येणे. [सं.]
**अनिच्छित** वि. नको असलेले; अवांछित. [सं.]
**अनित्य** वि. नित्य शाश्वत नसलेला; नश्वर; विनाशी; क्षणिक. [सं.]
**अनित्य** न. अनीती (अप.); वाईट गोष्ट, हेतू : 'अनित्य पोटीं धरू नये ।' – दास १४.१.२८. [सं. अ + नीति]
**अनिबद्धगान** न.(संगीत.) ज्या गायनात रागाच्या धोरणाने केवळ स्वरांचे अनेक प्रकारे उच्चारण होते; पण त्यात चीजेची अक्षरे व ताल नसतो असे गायन.
**अनिभ्रांत** वि. १. नि:संशय; खात्रीचा; निश्चित; खचित. २. भ्रांतिरहित; विकल्परहित. [सं.]
**अनिम** पु. न शमणारा; न ओसरणारा; पडत राहणारा (आषाढ-मेघ) : 'अनिम आखाडमेघ ।' – राज्ञा १६.३६४.
**अनिमित्त** कारणांचा अभाव; अकारण; अहेतुक.
**अनिमि(मे)ष** पु.ज्याच्या डोळ्यांच्या पापण्या लवत नाहीत असा, देव किंवा मासा.
वि. न मिटणारे; लवणारे; उघडे (डोळे); सदा जागरूक.
क्रिवि. डोळे न मिटता; डोळ्यात तेल घालून; टक लावून; सावधानतेने.
**अनियत** वि. १. अनिश्चित; अनियमित; अनियंत्रित; पक्के न ठरलेले. २. नियमाने न वागणारा : 'अनियतासि सर्वथा योग्यता नाही ।' – ज्ञा ६.३४४. [सं.]
**अनियतकालिक** न. निश्चित वेळी न निघणारे; वाटेल तेव्हा सवडीनुसार प्रसिद्ध होणारे; प्रसिद्धीचा निश्चित कालावधी नसलेले. [सं.]
**अनियत बाजार** पु. (कृषी.) शेतकऱ्यांच्या मालाचे वर्गीकरण, वजन व त्याला वाजवी भाव मिळण्यासंबंधी निश्चित नियम व यंत्रणा नसलेला बाजार. उदा. खेडेगावातील आठवडे बाजार.
**अनियतरूप** वि. नियत रूप नसलेले; बेडौल; बेढब; आकृतिहीन. [सं.]
**अनियम** पु. अनिश्चितपणा; कायमपणाचा अभाव; कायम न केलेली स्थिती.
**अनियम, अनियमित** वि. १. अनिश्चित; न ठरलेला. २. अमर्याद; अपरिमित; निरंतरचा. [सं.]
**अनियम्य** वि. नियमन किंवा दमन करता न येण्याजोगे; आवाक्यात न आणण्याजोगे; हुकूमत न चालविता येण्यासारखे; अनिवार. [सं.]
**अनियंत्रित** वि. १. नियंत्रण नसलेला; ताब्यात नसलेला; निर्बंध नसलेला;

बेफाम; अमर्याद. २. स्वैर; जुलमी (सत्ता). [सं.]

**अनियाळ–ळे** वि. १. अणकुचीदार; टोकाचे. २. वाकडा; तिरकस : 'मुरडिवें आंगें झाडी करितु । अनियाळां डोळां वेंझ घेतु ।।' – शिव ७१०.

**अनियाळपण** न. वक्रता; तिरकसपणा : 'पांता दिठीचें अनियाळपण । कमळदळें होति साधारण ।' – नरुस्व ९२.

**अनिरुता** पु. वि. स्पष्ट : 'भावो अनिरुता बोळखिला ।' –रुस्व १२२५.

**अनिरूप** वि. अर्थ विशद करण्यास कठीण : 'ते अनिरूप कीं निरूपिजे । ऐकतां बुद्धि आणिजे ।' –ज्ञा १३.१७७; वर्णन करता न येण्यासारखे; न सांगण्यासारखे. [सं.]

**अनिर्णय** पु. अनिश्चितता; धरसोड; निश्चित किंवा कायम नसलेली अवस्था; निकालाचा अभाव.

वि. अनिश्चित; अनियत. [सं.]

**अनिर्णायक** वि. संदिग्ध; अनिश्चायक. [सं.]

**अनिर्णीत** वि. १. कायम किंवा निश्चित न केलेला; संशयित. २. ज्याचा अद्यापि निकाल लागला नाही किंवा निर्णय झाला नाही असा.[सं.]

**अनिर्देश** पु. दखल न घेणे; उल्लेख न करणे. [सं.]

**अनिर्देश्य** वि. दाखविता येत नाही, उल्लेख करता येत नाही असा.[सं.]

**अनिर्धारित** वि. १. निश्चित न केलेला, न ठरवलेला, मोघम. २. (ग.) ज्याचे निश्चित मूल्य काढता येत नाही असा. (गुणक, रूप इत्यादी). [सं.]

**अनिर्धार्य** वि. जे ठरवता येत नाही असे.

**अनिर्बंध** वि. कोणत्याही प्रकारचे बंधन किंवा मर्यादा नसलेला.

**अनिर्बंध व्यापार** पु. (अर्थ.) जकातीचे बंधन नसलेला दोन देशांमधील मुक्त व्यापार.

**अनिर्वचनीय** अत्युत्कट, ज्याला पार नाही असा अपरंपार (आनंद).

**अनिर्वाच्य** वि. १. अवर्णनीय; वर्णन करण्यास कठीण; विवेचन, स्पष्टीकरण करण्यास अवघड (ईश्वर, सुख, दुःख) : 'आणि इये अनिर्वाच्यपण । ते दुजें ही देवांगण ।' – अमृ ६.३९. २. सांगण्यास अयोग्य. ३. अर्वाच्य; ज्याचा उच्चार करू नये असा. [सं.]

**अनिर्वाच्यपण** न. उच्छृंखलपणा.

**अनिर्वाह** पु. निभाव न लागण्याची स्थिती किंवा अनिष्ट अवस्था; निरुपायाची स्थिती; नाइलाज. [सं.]

**अनिर्वाह्य** वि. आवरण्याला, व्यवस्था करण्याला, चालवण्याला कठीण.

**अनिल** पु. १. वायु; वारा. २. अष्टवसूंपैकी एक. [सं.]

**अनिवड** वि. १. अतुल; निवड करता येत नाही असा. २. प्रचंड; भयंकर : 'अनिवड उठला टणकु । अंबरीं नादु येकु ।।' – गीता १.७७८.

**अनिवार** वि. १. अतिशय; अमर्याद; प्रमाणाबाहेर; फार मोठा. २. आवरण्याला कठीण; दुर्निवार; खोडकर : 'मूल तुझा अनिवार यशोदे ।' – राला १८. ३. अपरिहार्य; न टाळता येणारी; न चुकविण्यासारखी (आपत्ती, विपत्ती, गंडांतर, अरिष्ट इ.) : 'आम्हा जन्ममरण अनिवार ।' – एभा ३.१११. ४.जागृत; कडक; पराक्रमी : 'दख्खनदेशी अंबाभवानी दैवत अनिवार ।।' – ऐपो २७४. ५. अमोघ. [सं. अनिवार्य]

**अनिवार्य** वि. १. टाळता येणार नाही असा; अपरिहार्य; अटळ. २. आज्ञाबोधक; करायलाच हवा असा; आवश्यक.३. (शिक्षण.) आवश्यक; जरुरीचा; घेतलाच पाहिजे असा (विषय). [सं.]

**अनिवार्य गट** पु. (समाज.) ज्या गटाचे सदस्यत्व व्यक्तीच्या इच्छेवर अवलंबून नसते व अपरिहार्यपणे स्वीकारावेच लागते असा गट. उदा. कुटुंब, वंश, देश इत्यादी.

**अनिवास** पु. रहिवास नसणे; न राहणे. [सं.]

**अनिवासी** पु. न राहणारी व्यक्ती; वस्ती न करणारा माणूस; रहिवाशी नसलेला माणूस.

वि. राहण्याची व्यवस्था नसलेली (शाळा, महाविद्यालय इ.).

**अनिश्चित** वि. १. खात्री, निर्णय न केलेला. २. न ठरलेला. [सं.]

**अनिषेक फलन** न. (वन.) फलनाच्या लैंगिक प्रक्रियेशिवाय फल बनण्याची घटना. [सं.]

**अनिषेचित** वि. (जीव.) संयोग न झालेले पुंबीज किंवा स्त्रीबीज.[सं.]

**अनिष्ट** न. तोटा; नुकसान; अनर्थ; अहित; अकल्याण; अप्रिय; गोष्ट वगैरे. वि. १. इष्ट नसलेले; अप्रिय; नापसंत. २. प्रतिकूल; अशुभ; वाईट; अकल्याणकारक; अननुकूल. [सं.]

**अनिष्टसूचक** वि. अनिष्ट फल सुचविणारे; वाईट गोष्टीचे पूर्वसूचक; अशुभ दर्शविणारे; दुर्लक्षणी; अभद्र; अमंगल. [सं.]

**अनिष्टापत्ति–त्ती** स्त्री. १. अनिष्ट घडणे; संकट येणे; अनर्थ ओढवणे. २. (न्याय.) जे सिद्ध करावयाचे नाही ते सिद्ध करणे, होणे.[सं.]

**अनिष्टापात** पु. अनिष्ट घडणे; आपत्ती; दुर्दैव; विपत्ती; दुर्घटना; संकट कोसळणे, येणे; अपशकुन. [सं.]

**अनिष्पन्न** वि. १. न संपलेले; अपुरे; अर्धेमुर्धे. २. ज्यापासून काही एक झाले नाही असे; निष्फळ. [सं.]

**अनिंदक** वि. निंदा न करणारा : 'जो अनिंदकु अनन्यगती ।' – ज्ञा ९.४०. [सं.]

**अनिंदित** वि. न निंदिलेले; दोषरहित; निर्दोष. [सं.]

**अनिंद्य** वि. निंदा न करण्याजोगे; निष्कलंक; उपहास करण्याला अयोग्य; स्तुत्य. [सं.]

**अनीक** पु. न. १. सैन्य; फौज. २. समुदाय; जमाव : 'पुनरपि परते मार्गी माधव हरिसा शिरे गजाअनिकीं ।' – मोद्रोण ११. [सं.]

**अनीगा** स्त्री. आण; शपथ; आणेगा : 'माझें चरित्र कोणी पाहू नये अशी अनीगा विनायकाने घातली ' – विक. चरित्र. [सं. आज्ञा]

**अनीति–ती** स्त्री. १. अधर्म; पाप; अनाचार; अन्याय; व्यभिचार. २. असभ्यपणा; अशिष्टता; ग्राम्यता; वाईट चालरीत. [सं.]

**अनीन** स्त्री. लगाम (वादी, दोरी) : 'एकदाच घोड्याच्या अनिना उठवून मोहळाच्या माशा उडतात, त्याप्रमाणे सर्वत्रांनी उडी घातली' – पाब ४५.[फा. इनान] (वा.) **अनीनीस अनीन लागणे** – हातघाईस येणे : 'ज्या वेळीं अनीनीस अनीन लागेल त्या वेळी येतील तितके ठेवून घेऊ' – मइसा १२.३४.

**अनीमोल** पहा : **अनमोल** : 'मुक्त तुरा पदकी रत्न असे अनीमोल । राजेंन्द्र भूपती शान सर्वावर डोल ।' – होला ११९.

**अनीश्वरभाव** पु. ईश्वर नाही असा भाव; नास्तिक मताचा पुरस्कार; ईश्वर नाही या मताचा पुरस्कार करणारा वाद. [सं.]

**अनीस** पु. मित्र; सखा. [फा.]

**अनु** क्रिवि. अणुमात्रदेखील; मुळीदेखील; किंचितसुद्धा : 'मुसळाचे अनु। तुका म्हणे नव्हे हा धनु।'–तुगा ३१४५. [सं. अणु]

**अनु** अ. एक उपसर्ग. १. मागून; पश्चात. उदा. अनुगमन; अनुचर. २. सारखा; प्रमाणे; बरहुकूम. उदा. अनुरूप. ३. खाली (ल.) खालोखाल; दुय्यम प्रकारचा; पेक्षा हलका. उदा. अनुकल्प. ४. मिळून; बरोबर. उदा. अनुकंपन. [सं.]

**अनु–अक्ष** पु. (ग.) आडवा अक्ष. उदा. अपास्त्याच्या दोन भागांच्या अग्रांना जोडणारी आडवी रेषा. [सं.]

**अनुकरण** न. १. नक्कल; दुसऱ्याप्रमाणे वागणे; प्रतिकृती. २. हुबेहूब काढलेला आवाज (जनावर, पक्षी इ. चा); ध्वन्यनुकरण. [सं.]

**अनुकरणधातु–तू** पु. (व्या.) आवाजाच्या अनुकरणाने बनविलेला धातू; अनुकरण वाचक धातू. जसे : – करकरणे, खरखरणे, चुकचुकणे, चुरचुरणे. [सं.]

**अनुकरणप्रिय** वि. ज्याला अनुकरण, नक्कल करणे आवडते असा. [सं.]

**अनुकरणशब्द** पु. आवाजावरून बनविलेला शब्द. उदा. सपसप, सळसळ. [सं.]

**अनुकरणसिद्धांत** (भाषा.) प्रत्येक भाषेत असे काही शब्द आढळतात की जे आजूबाजूच्या आवाजांचे अनुकरण आहेत, असे मानणारा सिद्धान्त. [सं.]

**अनुकरणे** उक्रि. १. अनुकरण करणे; नक्कल करणे; सदृश वागणे, होणे : 'जे प्रकृति डंका अनुकरे। ते प्रकृति डंकें अवतरें।' – अमृ ५.३६. २. उत्पन्न करणे : 'तया कर्मामाजीं मग। संहरो आघवे जग। अथवा नवें चांग। अनुकरो॥' – ज्ञा १८.४३२. ३. आकारास येणे; उद्युक्त होणे; सरसावणे : 'तेथ इंद्रियेंही अनुकारती। अपुलालिये कर्मीं॥' – स्वादि ५.२.३१.

**अनुकर्ष** पु. १. आकर्षण. २. विहित कालानंतर केलेली क्रिया. ३. मंत्राने बोलावणे. ४. पूर्वीच्या नियमातील शब्द घेणे. [सं.]

**अनुकल्प** पु. १. मुख्यत्वेकरून जे धर्मकृत्य सांगितलेले असते त्याच्या अभावी काही गौण कर्म करावे अशी जी शास्त्रादिकात अनुज्ञा असते ती; गौणकल्प. जसे :– कुशाच्या ऐवजी दूर्वा उपयोगात आणणे. २. प्रतिनिधी; पर्याय. [सं.]

**अनुकंपनीय** वि. दयेस योग्य; केविलवाणा; दयनीय. [सं.]

**अनुकंपा** स्त्री. दया; करुणा; कृपा; कळवळा; कीव : 'नच सुंदरी करू कोपा। मजवरि धरि अनुकंपा।' – सं. सौभद्र. [सं.]

**अनुकंपी चेता** स्त्री. (वै.) अस्वायत्त चेता.

**अनुकंप्य** वि. दयेस पात्र; दया करण्याजोगे. [सं.]

**अनुकार** पु. १. अनुकरण; अनुसरण : 'जातीचेनि अनुकारें। जेणें अवसरें। करणे पावें॥' – ज्ञा ६.४५. २. आकार; स्वरूप : 'कैवल्ययंत्राचा उद्धारू। करावेआं रेखाचा विस्तारू। तैसे दिसे अनुकारू। वळीत्रयांचा॥' – शिव ३९५. ३. संप्रदाय. ४. प्रतिबिंब; नक्कल : 'ते आनंदाचे अनुकार। सुखाचे अंकुर।' – ज्ञा ५.१३८. ५. साम्य; सारखेपणा; सादृश्य. [सं.]

**अनुकारी** वि. १. अनुकरण करणारा. २. सदृश असणारा, दिसणारा. [सं. अनुकार]

**अनुकारी जीन** स्त्री. (वै.) एकमेकांशी युग्मविकल्पी पद्धतीने न वागणाऱ्या व सारखाच परिणाम असणाऱ्या जीनपैकी प्रत्येक.

**अनुकार्य** वि. अनुकरण करण्याजोगा; नक्कल करण्यायोग्य. [सं.]

**अनुकुंचनी** स्त्री. (वन.) लांबीमध्ये होणाऱ्या पारंपरिक वृद्धीमुळे द्विपार्श्व अवयवांमध्ये निर्माण होणारी स्वयंचलित वक्रता. [सं.]

**अनुकूल – ळ** न. योग्य परिस्थिती; सहायक परिस्थिती; अनुकूलता; सोईस्करपणा.

वि. १. फायदेशीर; उपकारक; सहायक; धार्जिणा; शुभ; कल्याणप्रद; हितकर; हितावह; योग्य. २. जुळणारा; संमत; अनुसरून असणारा. ३. तयार, हातात, ताब्यात, हुकमतीत असणारा (पैसे, धान्य वगैरे) : 'अनुकूल स्त्रियापुत्र। अनुकूल मंत्री पवित्र। अनुकूल राज्य सर्वत्र। भोगिले विचित्र नाना भोग॥' – एभा २.१.४३. [सं.]

**अनुकूल आंतरराष्ट्रीय ताळेबंद** पु. (अर्थ.) एखाद्या देशाचे दृश्य निर्यातमूल्य दृश्य आयात मूल्यापेक्षा जास्त असणे.

**अनुकूलक** न. एखाद्या यंत्राचे वा वस्तूचे सुटे भाग एकमेकांना मिळते जुळते करून देणारे उपकरण; अनुकूल करणारे साधन. [सं.]

**अनुकूलक्रम** पु. (ग्रं.) वर्गीकरण करताना संबंधित विषय एकमेकांशेजारी येण्याच्या दृष्टीने लावलेला क्रम. [सं.]

**अनुकूलता** स्त्री. १. ऐपत; सामर्थ्य. २. संमती.

**अनुकूलन** न. १. उचित किंवा हवी असलेली परिस्थिती निर्माण करणे; अनुकूल करणे. २. नियमाने, संकेताने बांधणे. ३. (वै.) बाह्य परिस्थितीशी (उष्णता, प्रकाश, अंधार इ.) जमवून घेण्याची क्षमता येण्यासाठी शरीरात घडून येणारे बदल. [सं.]

**अनुकूल प्रारण** न. (भू.) सूर्यकिरणांचे प्राणी व वनस्पती यांच्या वाढीला पोषक असणारे व घातक नसणारे किरण.

**अनुकूलित** वि. उचित किंवा वांछित स्थितीप्रमाणे केलेले, ठेवलेले. उदा. वातानुकूलित. [सं.]

**अनुकृति–ती** स्त्री. १. अनुकरण; एखाद्याचे अनुकरण करून लिहिलेली, तयार केलेली कलाकृती. २. नक्कल; वाकुल्या; विडंबन. [सं.]

**अनुकेंद्री** वि. (भूशा.) १. केंद्राकडे झुकलेले. २. सर्व बाजूंनी मध्यकेंद्राकडे झुकलेले. [सं.]

**अनुकोन प्रतिचित्रण** न. (भौ.) रेखांश व अक्षांश या दोन्हींना एकच प्रमाण धरून व त्यामधील कोन काटकोन धरून काढलेला नकाशा. यामुळे पृथ्वीवरील लहान लहान प्रदेशांचेही योग्य मापात चित्रण करता येते. [सं.]

**अनुक्त** वि. १. अविहित; निषिद्ध (शास्त्राने न सांगितलेले म्हणून). २. न बोललेले; न सांगितलेले; न उच्चारलेले. [सं.]

**अनुक्त संकेत** पु. प्रत्यक्ष न बोलता परस्पर समजुतीने ठरलेली गोष्ट; मुग्ध करार.

**अनुक्रम** पु. १. ओळ; एकामागून एक येणे; परंपरा. २. पद्धती; नियम. ३. विशिष्ट पद्धतीप्रमाणे किंवा नियमाप्रमाणे रचना; मांडणी : 'देखें अनुक्रमाचेंं'। स्वधर्मु जो आधारे ।' – ज्ञा ३.८०. [सं.]

**अनुक्रमणिका** स्त्री. एखाद्या पुस्तकात समाविष्ट असलेल्या विषयांची पृष्ठक्रमांकासह सुरुवातीला दिलेली क्रमवार यादी; विषयसूची; प्रकरणसूची. [सं.]

**अनुक्रमणे** क्रि. योग्य काळी सुरुवात करणे, प्रारंभ करणे; करू लागणे; हाती घेणे (काम वगैरे).

**अनुक्रमांक** पु. क्रमाने येणारा अंक; क्रमाप्रमाणे दिलेला अंक; अंकांचा क्रम. [सं.]

**अनुक्रमित** वि. (ग.) ज्यांचा क्रम निश्चित आहे असे. उदा. बिंदूचे सहनिर्देशक अनुक्रमित असतात. त्यांच्या विशिष्ट क्रमामुळेच कोणता सहनिर्देशक अंक कोणत्या मितीशी संबंधित आहे हे निश्चित होते. [सं.]

**अनुक्रमे** क्रिवि. १. अनुरूप; अनुसरून : 'जेवीं राजाज्ञा अनुक्रमें ।' – एभा ३.५३५. २. ओळीने; क्रमाने; क्रमवार. ३. (ग.) सारख्याच क्रमाने (संबंधित). उदा. अ, ब, क, यांच्या किंमती अनुक्रमे ३, ७ व ९ आहेत. याचा अर्थ अ ची ३, ब ची ७ व क ची ९.

**अनुक्रांत** वि. अनुक्रम लावलेला; अनुक्रमाने मांडणी केलेला; विशिष्ट रचना केलेला. [सं.]

**अनुक्रोश** पु. १. दोषारोपण; आरोप; निंदा. २. कीव; दया; अनुकंपा. [सं.]

**अनुखंड** पु. पोटकलम.

**अनुग** पु. अनुचर; अनुयायी : 'कला त्यांची त्यांना असतिल तयांचे अनुग जे । तयांना, आम्हांला अरसिक जनां काय समजे ।' –टिक ८७.

**अनुगत** वि. अनुसरणारा; जोडलेला; पुरवणी लावलेला. [सं.]

**अनुगतधर्म** पु. नैसर्गिक गुणधर्म; आनुवंशिक गुण; सहजधर्म. [सं.]

**अनुगम** पु. १. एखाद्या विषयाचे संपूर्ण आकलन. २. सर्व शास्त्रांचा विचार करून होणारे ज्ञान. ३. मागे जाणे; अनुसरणे. [सं.]

**अनुगमन** न. १. मागून जाणे; अनुसरण. २. सती जाणे; सहगमन; पतीबरोबर चितारोहण. [सं.]

**अनुगामिनी** वि. १. मागे जाणारी;– च्या मताप्रमाणे वागणारी. [सं.]

**अनुगामी** वि. १. नोकर; शिष्य; अनुयायी; आश्रित; खिदमतगार. २. अनुसरणारा; मताप्रमाणे वागणारा; सांप्रदायी : 'बहुतेक ते अनुगामी आहेत. ' – विक्षिप्त १.१४२. [सं.]

**अनुगामी विवर्तन** न. (अर्थ.) मागील जागी जाणे.

**अनुगामी समीकरण** न. (ग.) मूलतःच, संबंधित असलेले समीकरण.

**अनुगुण** वि. १. जुळणारा; जमणारा; समानशील; अनुकूल. २. योग्य; शोभणारा; मनाजोगता. सामा. शब्द – कर्मानुगुण, देवानुगुण इ. ३. एक अर्थालंकार : – एकाचे गुणदोष दुसऱ्याच्या गुणदोषांच्या साहाय्याने चढत्या क्रमाने वर्णन करणे : 'आधीच मर्कट तशांतहि मद्य प्याला.' [सं.]

**अनुगुणोत्तर** न. (ग.) सरळ क्रमाने राशी घेऊन काढलेले गुणोत्तर. उदा.अ व ब यांचे अनुगुणोत्तर अ ब हे आहे. [सं.]

**अनुगृहीत** वि. अनुग्रह, कृपा केलेला; कृपाळूपणाने, अनुकूलतेने वागविलेला, मानलेला; काळजी घेतलेला : 'तैसा मी अनुग्रहीतू । साधूचा निरूपितू । ते आपुला अलंकारितु ।।' – ज्ञा १.८२. [सं.]

**अनुग्रह** पु. १. कृपा; दया; दयाळूपणा; मेहेरबानी; प्रभाव (देवता, राजा, गुरू इ. चा) : 'तुमचा अनुग्रहो गणेश ।' – ज्ञा १०.५. २. वेदमंत्राचा उपदेश; गुरूपदेश (क्रि. देणे, घेणे). २. अवलंबन ह्व साहाय्यकारी संबंध.(वा.) **अनुग्रह करणे** उपदेश देणे; कल्याण करणे; गुरूने शिष्याला ज्ञान देणे. २. मेहेरनजर, कृपादृष्टी असणे. [सं.]

**अनुग्रह अवधी** पु. ठरलेली मुदत संपल्यानंतर मेहेरबानी म्हणून वाढवून दिलेली मुदत.

**अनुग्रहगुण** पु. कृपेने दिलेले जादा गुण. [सं.]

**अनुग्रहवाद** पु. ईश्वराची कृपा संपादन करण्याचे तत्त्व; भक्तिमार्ग : 'युरोपातील अनुग्रहवाद आणि आपल्याकडील पुष्टिवाद यांची वाचकांना आठवण करून दिली.' – विचावि ८२. [सं.]

**अनुग्रहविपत्र** न. (व्या.सं.) सवलतीचे विनिमय देयक.

**अनुग्रही** वि. उपदेश दिलेली; अनुग्रह झालेली (व्यक्ती); उपदिष्ट.

**अनुग्राहक** वि. १. अनुग्रह करणारा; दया दाखवणारा. २. उपदेश देणारा; उपदेष्टा (गुरू). [सं.]

**अनुग्राह्य** वि. १. अनुग्रह, दया करण्यास पात्र. २. उपदेश करण्यास योग्य. [सं.]

**अनुघटी** क्रिवि. घड्याळाचे काटे ज्या दिशेने फिरतात त्या दिशेने. [सं.]

**अनुघड – डु** पु. आच्छादन; आवरण; ढगांची काळोखी. [अ + उघड] (वा.) **अनुघड फुटणे** – उघडणे; आवरण नाहीसे होणे : 'जेव्हां शारदीयेचा अनुघडु फुटे । तेव्हां घनजात आटे ।' – ज्ञा ९.३०२.

**अनुघड** स्त्री. अडचण; अवरोध (हालचाल बंद पडणे) : 'इंद्रियां अनुघडं पडलिया ।' – ज्ञा ८.१२१. [सं. अनु+घट]

**अनुघडी** क्रिवि. एकसारखी; निरंतर; सतत : 'अमृताची सातवांकुडी । लागो कां अनुघडी ।'–ज्ञा १३.६४१. [सं. अनु+घटि]

**अनुचर –चारी** पु. १. अनुयायी; सेवक; आश्रित; भक्त. २. (वै.) शरीरातील एका भागाशेजारी असलेला किंवा त्याच्याशी संबंधित दुसरा भाग. उदा.धमनीच्या बरोबर असणारी शीर. [सं.]

**अनुचरण–चर्या** न. अनुसरण; चाकरी; नोकरी; सेवाशुश्रूषा. [सं.]

**अनुचलन** न. १. (ग.) सारख्याच दिशेने होणारे चलन. उदा. क्ष = २य या समीकरणात क्ष चे य बरोबर अनुचलन होते. क्षची किंमत य च्या बरोबर त्याच प्रमाणात कमीजास्त होते. २. (जीव.) सजीवांची पाणी, प्रकाश इत्यादी बाह्य उत्तेजनाला प्रतिसाद देण्यासाठी होणारी हालचाल. [सं.]

**अनुचार** पु. अनुचरण; अनुक्रम; अनुसरणक्रिया; पाठीमागून येणे : 'चाप ओढणें व आवाज ह्यांमध्ये अनुचार आहे. ' – न्याप २६. [सं.]

**अनुचित** वि. १. अयोग्य; अशिष्ट; वावगे; न शोभणारे; अप्रशस्त. २. अपात्र; अयोग्य; असमर्थ; योग्य गुण नाहीत असा. [सं.]

**अनुचित्र** न. (विअ.) प्रतिमा; हुबेहूब नक्कल. [सं.]

**अनुच्चारणीय** वि. बोलण्यास अयोग्य; अशिष्ट; अश्लील; उच्चार

करण्यास अयोग्य; उच्चारता न येणारे. [सं.]

**अनुच्चारित** वि. न उच्चारलेला; ज्याचा उच्चार झाला नाही, केला नाही असा. [सं.]

**अनुच्छिष्ट** वि. १. उष्टे न केलेले; उपभोग न घेतलेले; उपयोगात न आणलेले; नवीन; न विटाळलेले; सोवळे; ताजे (अन्न, पाणी इ.) : 'सातही पदें अनुच्छिष्टे । नवले आहाती ।' – ज्ञा ७.१९७. २. (ल.) अप्राप्य; आटोक्याबाहेर; शक्तीपलीकडील : 'असो हे अनादि अविट । जो वाक्चतुष्ट्या अनुच्छिष्ट ।' – ऋ ४३. [सं.]

**अनुच्छेद** पु. धारा; घटनेचा, कायद्याचा किंवा एखाद्या तहनाम्याचा स्वतंत्रपणे क्रमांकित केलेला भाग. [सं.]

**अनुज, अनुजन्मा** पु. पाठीमागून जन्मलेला; धाकटा भाऊ. [सं.]

**अनुजा** स्त्री. धाकटी बहीण; नंतर जन्मलेली. [सं.]

**अनुजात** वि. (ग.) दुसऱ्या एखाद्या राशीवर विशिष्ट गणिती क्रिया करून येणारी (राशी.). [सं.]

**अनुजात पदार्थ** (भौ.) काही प्रक्रिया केल्यामुळे किंवा झाल्यामुळे एका पदार्थापासून तयार झालेला दुसरा पदार्थ.

**अनुजात फल** न. (ग.) विशिष्ट क्रियेने दुसऱ्यापासून निर्माण झालेली राशी. [सं.]

**अनुजायिनी** वि. अनुकूल असणारी : 'पै स्वहिता अनुजायिनी । मेधा ते गा मी ये जनी ।' –ज्ञा १०.२१९.

**अनुजाव** पु. हलका वार : 'तयाचेया हातियराचा अनुजावो ।'– रुस्व २९७.

**अनुजीवी** पु. आश्रित; नोकर; हुजऱ्या; दास. [सं.]

**अनुज्जिद** न. (शाप.) उज्ज (हायड्रोजन) विहीन (अम्लें); अनार्द्र.[सं.]

**अनुतट** वि. (भू.) समुद्रकिनाऱ्याला लागून असणारे (प्रवाळी खडक.)[सं.]

**अनुतट दांडा** पु. (भू.) समुद्राच्या किनाऱ्यावर वाळू साचून तयार झालेला उंचवट्याचा लांबट पट्टा.

**अनुतप्त** वि. पश्चात्ताप, अनुताप पावलेला; दुःखी; पश्चात्तापदग्ध.[सं.]

**अनुतरंग** पु. (भौ.) एखाद्या माध्यमातून जाणाऱ्या (ध्वनी, विद्युत इ.) तरंगामुळे त्यातील कण त्या तरंगाच्या दिशेनेच एका रेषेत कंपित होत राहणे. [सं.]

**अनुताप** पु. पश्चात्ताप; अयोग्य कृत्याबद्दल वाटणारा खेद : 'अनुदिनीं अनुतापें तापलों रामराया ।' – राक. [सं.]

**अनुतापणे** अक्रि. पश्चात्ताप पावणे; खिन्न होणे; दुःखाने व्याप्त होणे : 'ऐसा अनुतापोनि वाल्हा । नारदापासीं परतोनि आला ।।' रावि.[सं.]

**अनुतापी** वि. १. आपल्या कृत्याबद्दल लगेच किंवा नेहमी पश्चात्ताप पावतो असा; अशा स्वभावाचा. २. पश्चात्ताप झाला आहे असा; अनुतप्त; खिन्न; दुःखी.

**अनुताल** पु. एक प्रकारचा ताल. [सं.]

**अनुतोष** पु. (विधि.) पीडानिवारण. [सं.]

**अनुत्तर** न. १. उत्तराचा अभाव; विसंगत, भलते, अपूर्ण उत्तर. २. वचनभंग; करार न पाळणे; ठरलेल्या गोष्टीप्रमाणे न वागणे, करणे.

वि. १. उत्तर देण्यास असमर्थ; निरुत्तर. २. अद्वितीय; सर्वात श्रेष्ठ.[सं.]

**अनुत्तरित** वि. ज्याचे उत्तर मिळाले नाही असा; न सोडवलेला : 'काही समस्या अजून अनुत्तरितच आहेत.' – लोस ४७. [सं.]

**अनुत्तीर्ण** वि. (शिक्षण.) नापास झालेला (परीक्षेत); अयशस्वी. [सं.]

**अनुत्पत्ति – त्ती** स्त्री. निष्पत्ती न होणे; उत्पन्न न होणे. [सं.]

**अनुत्पन्न** वि. १. उत्पन्न न झालेला. २. उपजीविकेचे साधन नसलेला : 'श्रोत्री, कुटुंबवत्सल, अनुत्पन्न, असे सद्ब्राम्हण पाहून ग्राम अथवा भूमि देणें ती द्यावी.' – आज्ञा २५. ३. गरीब; अकिंचन : 'तर गरीब अनुत्पन्न असे ब्राम्हण पुण्यात असतील... त्यास शंभर रुपयेपर्यंत येकास याप्रमाणे धर्मादाय करणें.' – पेद १८.१३०. [सं.]

**अनुत्पादक** वि. १. ज्यातून प्रत्यक्ष हाती काही पडत नाही असे. उदा. अनुत्पादक गुंतवणूक. २. नापीक; पीक देत नाही अशी (जमीन). [सं.]

**अनुत्पादक कालावधि–धी** पु. जेव्हा काही उगवत नाही असा ऋतू, कालखंड.

**अनुत्पादक भूमि–मी** स्त्री. (कृषी.) ज्या जमिनीत काही कारणांमुळे उत्पन्न काढता येत नाही अशी जमीन. उदा.कोकणातील खारवट अथवा देशावरील लोणा पडलेल्या जमिनी. [सं.]

**अनुत्पादन** न. उत्पन्न न होणे.

**अनुत्साह** पु. कोणत्याही गोष्टीबद्दल आवड, गोडी, हुरूप किंवा आनंद नसणे; उत्सुकता नसणे; उदासीनता. [सं.]

**अनुदर** वि. सडपातळ; खपाटी पोटाचा.

**अनुदात्त** वि. १. उदात्त नसलेला; श्रेष्ठ नसलेला. २. आघात नसलेला स्वर; वैदिक ऋचा म्हणताना ज्या स्वरावर कोणताही आघात नसतो असा स्वर; स्वरित, उदात्त, अनुदात्त यापैकी एक स्वर. [सं.]

**अनुदान** न. एखाद्या व्यक्तीला किंवा संस्थेला लोकोपयोगी किंवा कल्याणकारी कामाकरता शासनाकडून किंवा इतर प्राधिकरणांकडून दिली जाणारी रक्कम किंवा जमीन वगैरे. [सं.]

**अनुदानग्राही** पु. शासनामार्फत कल्याणकारी कामासाठी दिली जाणारी रक्कम स्वीकारणारी व्यक्ती, संस्था. [सं.]

**अनुदार** वि. १. कोत्या मनाचा; उदार नाही असा; क्षुद्र बुद्धीचा; संकुचित मनाचा. २. स्वार्थी; कृपण. [सं.]

**अनुदित** वि. १. प्रकट न झालेला. २. न उगवलेला. [सं.]

**अनुदिन – नी** क्रिवि. दररोज; प्रत्येक दिवशी : 'अनुदिनीं अनुतापें तापलो रामराया ।' – राक. [सं.]

**अनुदीप्ति–प्ती** स्त्री. (भौ.) आकाशातील तारे किंवा तत्सम पदार्थ यांनी बाहेर टाकलेला प्रकाश. [सं.]

**अनुदृष्टि–ष्टी** वि. ज्याची चर्या अनुकूल आहे असा.

स्त्री. कृपायुक्त मुद्रा किंवा अवलोकन.

**अनुदेश** पु. आदेशवजा सूचना; मार्गदर्शनपर सूचना. [सं.]

**अनुद्भूत** वि. उत्पन्न, प्रकट न झालेला; न उद्भवलेला; गुप्त. [सं.]

**अनुद्भूत उष्णता** स्त्री. अप्रकट उष्णता. [सं.]

**अनुद्रुत** वि. प्रतिध्वनी झालेला (शब्द), गायनात मात्रेचा चतुर्थांश.

**अनुद्वाह** पु. लग्न न होणे; अविवाहित अवस्था, स्थिती, ब्रम्हचर्य; कौमार्य. [सं.]

**अनुद्वेग** पु. उद्वेगाचा अभाव; प्रसन्नता; संतोष; आनंद. [सं.] क्रिवि. निश्चित; बेफिकीर : 'रहावें आपण अनुद्वेग ।' एभा २९.८२३.

**अनुधार** क्रिवि. न थांबता; सतत; अविरत.

**अनुधावन** न. १. मागून धावणे; पाठलाग करणे. २. पूर्ण तपास; शोध; चौकशी; पिच्छा; दीर्घशोध; अभ्यास; संशोधन. ३. निदिध्यास : 'साक्षरता टिकविण्याचे अनुधावनात्मक काम (फालोअप) अंतर्भूत करणे आवश्यक आहे.' - आशिआस १९५. [सं.]

**अनुधावन** न. शुद्धी किंवा स्वच्छता. [सं. अनु+धू]

**अनुध्यास** पु. अविचलित चिंतन; एकाग्र मनाने आराधन; पूर्ण लक्ष; चित्ताची एकाग्रता; मनन. [सं.]

**अनुध्वनि–नी** पु. १. मुख्य आवाजानंतरचा आवाज; पडसाद. २. वाद्य बंद केल्यानंतर चालू राहणारा नाद, सूर, कंप. [सं.]

**अनुनती** स्त्री. (भौ.) समस्थितीपासून किंवा सरळ रेषेपासून वळण्याच्या अंतराचा कोन. [सं.]

**अनुनय** पु. १. प्रियाराधन; नम्र आर्जव; विनंती; प्रार्थना; मनधरणी. २. बरोबर नेणे; अनुसरण्यास लावणे. ३. (ल.) शिकवण; शिकवण लावणे; वळण लावणे.

**अनुनय धोरण** न. (राज्य.) शांतता किंवा सलोखा टिकविण्यासाठी विरोधी सत्तांच्या किंवा राष्ट्रांच्या मागण्या मान्य करणे; त्यांना सवलती देत जाणे.

**अनुनयी** वि.१.विनयशील; सभ्य.२.शिकवणारा; वळण लावणारा.

**अनुनाद** पु. १. प्रतिध्वनी. २. (भावनिक) आवेगामुळे शारीरिक क्रियांमध्ये होणारी गुंतागुंत व तज्जन्य ध्वनी. ३. तोंड किंवा स्वररज्जूंच्या हालचाली आणि नाकपुडीतून येणारा ध्वनी; यातून निर्माण होणारा आवाज; आवाजाचा खणखणीतपणा. [सं.]

**अनुनादक पेटी** स्त्री. नादवर्धक किंवा ध्वनिवर्धक अशी पेटी; आवाज वाढवणारी, मोठा करणारी पेटी.

**अनुनादकक्ष** पु. (भाषा.) स्वरयंत्रणेतील ध्वनिनिर्मिती करणारे मुखविवर, नासिकाविवर आणि ग्रसनी(घसा) हे भाग. [सं.]

**अनुनायिका** स्त्री. नाटकातील दुय्यम किंवा गौण स्त्रीपात्र. (सखी, दासी इ.)

**अनुनासिक** न. (भाषा.) ज्याचा उच्चार नाकातून होतो असा वर्ण. तोंडाची पोकळी बंद राहून नाकावाटे हवा बाहेर जात असताना उच्चारला जाणारा ध्वनी. उदा. ङ्, ञ , ण्, न्, म् इत्यादी. [सं.]

**अनुनासिकता** स्त्री. बोलण्यात किंवा गाण्यात अनुनासिक ध्वनींचे प्रमाण खूप अधिक असणे.

**अनुनिरीक्षण** न. (मा.शा.) घटनांचे मागाहून निरीक्षण. निरीक्षणाची पुनरावृत्ती. [सं.]

**अनुनीत** वि. १. नम्रपणाने विनवलेले, प्रार्थिलेले; २. पुढे नेलेले; शिक्षण दिलेले; वळण लावलेले. ३. शांत केलेले; मनधरणी केलेले; संतुष्ट केलेले. [सं.]

**अनुनीति–ती** स्त्री. १. समजूत काढलेली, सांत्वन केलेली अवस्था; संतुष्ट स्थिती; समाधान. २. शिकवण, शिस्त लावलेली अवस्था. [सं.]

**अनुपकारी** वि. १. उपकाराची फेड न करणारा; उपकार न जाणणारा; कृतघ्न. २. दुसऱ्यावर उपकार न करणारा. ३. (व्यापक) निरुपयोगी; कुचकामाचा; निरर्थक (वस्तू, पदार्थ).

**अनुपचयस्थान** न. (ज्यो.) कुंडलीतील १ ।२ ।४ ।५ ।७ ।८ ।९ ।१२ या स्थानांना अनुपचयस्थाने म्हणतात.

**अनुपठण – न** न. दुसऱ्याच्या मागून वाचणे, म्हणणे; पाठ करणे; संथा घेणे. [सं.]

**अनुपठित** वि. दुसऱ्याच्या मागून म्हटलेले; पाठ केलेले. [सं.]

**अनुपत – द** क्रिवि. व्यर्थ : 'अनुपद तुझिया मी व्यर्थ पोटास आलें ।' - सारुह २.१०६. [सं.]

**अनुपत–द, अनुपत्ति – त्ती** स्त्री. १. उत्पन्न नसणे; निर्वाहाच्या साधनाचा अभाव : 'आपदा अनुपत्ती कदान्न । या नांव आदिभूतिक ।' - दास २.७.८१. २. विपत्ती; दारिद्रय; कंगालपणा; ओढ; आपत्काल : 'ब्राम्हणासि हिंसाकर्म । तो जाण पां परम अधर्म । लागल्या अनुपत्ती दुर्गम । तैं क्षात्रधर्म करावा ।।' - एभा १७.४५५.

**अनुपत्य** न. चणचण; दुष्काळ : 'सेवकाचा अनुपत्ये विचार. दूर करणार स्वामी धणी आहेत. ' - पेद २६.१७०.

**अनुपत्र** न. मुख्य कागदाला पुढील मजकूर लिहिण्यासाठी लावलेला कागद. [सं.]

**अनुपद** क्रिवि. पावलोपावली; वरचेवर : 'अनुपद तिस कोणी विंझणे जाणवीती ।' - सारुह ३.६६. [सं.]

**अनुपदे** क्रिवि. मागाहून; पाठोपाठ : 'अनुपदें औरंगाबाद बुऱ्हानपूर... त्यावरी चालोन घेतले असता. ' - आज्ञा ६६.

**अनुपनीत** वि. अविवाहित : 'नव्हें मी पराची अंगना । अनुपनीत निधरिं ।।' - मुआदि २.२२.५७. [सं.]

**अनुपपत्ति – त्ती** स्त्री. १. निर्वाहाच्या साधनांचा अभाव; दारिद्र्य. २. काथ्याकूट; काही निष्पन्न न होणे. ३. अप्रगती; अयोग्यता : 'अंगाचिया अनुपपत्ति । आटलिया उपपत्ति ।' - अमृ ५.५५. [सं.]

**अनुपपन्न** वि. १. सिद्ध न झालेले; स्थापित न झालेले; पोकळ. २. निर्वाहाचे साधन नसलेले; कंगाल. ३. उत्पन्न न झालेले; अनुत्पन्न. ४. असंगत; अयुक्त; असंबद्ध. [सं.]

**अनुपभुक्त वन** न. जेथे पूर्वी कधीच पीक काढले नाही अशी जमीन.

**अनुपम, अनुपमेय, अनुपम्य** वि. १. दुसरी उपमा किंवा तुलना नाही असे; अतुल्य; निरूपम. २. प्रतिस्पर्धी नसलेला. ३. सर्वोत्कृष्ट : 'आकर्ण अवघ्याचें वचन । ऐशिया श्रद्धा राजा पूर्ण । अनुपम्य प्रश्न पुसेल ।।' - एभा २.७९१. [सं.]

**अनुपयुक्त** वि. १. निरुपयोगी; निकामी. २. न जमणारा; न जुळणारा; न शोभणारा; विशोभित. [सं.]

**अनुपयोगिता** स्त्री. (अर्थ.) ऋण उपयोगिता; एखाद्या वस्तूच्या अधिकाधिक उपभोगाने मिळत जाणारे समाधान शेवटी शून्यापेक्षाही कमी (ऋण, उणे) होत जाणे. [सं.]

**अनुपरोध** वि. निर्विकार; स्पष्ट; यथार्थ : 'हे अनुपरोध मत माझें । जिहीं परमादरें स्वीकारिजे ।' - ज्ञा ३.१९२. [सं.]

**अनुपलब्ध** वि. प्राप्त न झालेला; न गवसलेला; न मिळालेला; मिळत नसलेला. [सं.]

**अनुपलब्धता** स्त्री. दुर्लभता; न मिळणे; मिळण्याजोगे नसणे [सं.]

**अनुपलब्धि–ब्धी** स्त्री. (तत्त्व.) एखाद्या विषयाचे ज्ञान नसणे. (भट्ट मीमांसकांनी अनुपलब्धी नावाचे प्रमाण वा ज्ञानांचे साधन मानले आहे.) [सं.]

**अनुपलंभ** पु. (तत्त्व.) बोध अथवा प्रत्ययाचा अभाव. [सं.]

**अनुपशय** पु. (वै.) रोगलक्षणे वाढणे; रोग आटोक्याबाहेर जाणे. [सं.]

**अनुपसंजाति–ती** स्त्री. (विधि.) अनुपस्थिती.

**अनुपसंहारी** पु. (तर्क.) १. एक तर्कदोष. पुरेशी कारणे न देता एखादा सिद्धान्त मांडणे. २. (न्या.) एक प्रकारचा हेत्वाभास. [सं.]

**अनुपस्थित** वि. १. प्रचलित नाही असे; लुप्त; नामशेष झालेले (शास्त्र, कला इ.). २. गैरहजर; उपस्थित नसलेला. ३. मागितल्याबरोबर तयार नसलेला; सिद्ध नसलेला. ४. स्मरणात नसलेले (संपादित ज्ञान, अभ्यास इ.). [सं.]

**अनुपस्थिति पद्धती** स्त्री. (समाज.) जेथे आपला जमीनजुमला असेल तेथे न राहता तेथील उत्पन्नावर दुसऱ्या ठिकाणी ऐषारामात राहण्याची जमीनदारांची पद्धत; प्रत्यक्ष व्यवसाय असलेल्या ठिकाणी न राहण्याची पद्धत.

**अनुपागमन** न. (कायदा.) लैंगिक समागमाची संधी नसणे. (विशेषतः पत्नी आणि पती यांच्या संदर्भात.)

**अनुपात** पु. त्रैराशिक; प्रमाणगणित. [सं.]

**अनुपातिक** वि. प्रमाणानुसार.

**अनुपातिक करप्रणाली.** (अर्थ.) प्रमाणानुसार अनुपातिक कर आकारणी पद्धत.

**अनुपाति प्रतिनिधान** न. लोकसंख्येच्या प्रमाणात प्रतिनिधित्व. [सं.]

**अनुपान** न. १. औषध घेताना त्याबरोबर घ्यावयाचा पदार्थ; रसायनादी सिद्ध औषध ज्यात मिसळून घेतात असे पदार्थ (आल्याचा रस, मध इ.) : 'भोजना न द्यावें आन । जेणें चुके अनुपान । तरीच घेतल्याचा गुण । होईल जाण सत्य भाव ।।' – तुगा ७२४. २. औषध घेत असता खाण्यास योग्य पदार्थ; पथ्य पदार्थ. ३. औषधावर, विषावर किंवा इतर बाबतीत उतारा. उदा. पालीचे तेल विंचवावर अनुपान; अजीर्णाचे अनुपान लंघन. ४. भोजन; खाद्य; साहित्य: 'भवानराव प्रतिनिधी आले अनुपान भोगुनि । एक मोर्चा त्यानि रोखुनि ।' – ऐपो २७८. ५. शेत, मळा वगैरे संबंधीच्या लक्षात घ्यावयाच्या गौण (आनुषंगिक तत्संबंधी, बरोबर असणाऱ्या) बाबी, गोष्टी. [सं.] (वा.) **अनुपान जमणे, बसणे, साधणे, होणे** – प्रधान किंवा मुख्य गोष्टीशी गौण गोष्टींचा मेळ बसणे; उतारा लागू पडणे.

**अनुपाय** पु. निरुपाय; नाइलाज; अगतिकता.
वि. निरुपायाचे; नाईलाजाचे; उपायहीन. [सं.]

**अनुपालन** न. नियमाप्रमाणे वागणे, करणे; नियमानुरूप कृती करणे; आदेशांचे पालन करणे. [सं.]

**अनुपालनाधीन** वि. मान्यता मिळण्याच्या स्थितीत असलेले; कार्यवाहीत येणार आहे असे.

**अनुपूरक** वि. (कायदा.) कायद्यातील एखाद्या कलमात भर घालणारी (तरतूद); भर घालणारा (उपबंध).

**अनुपेग – गी** वि. निरुपयोगी; निष्फळ; निकामी : 'त्यासि इंद्रियांचे बंधन । सर्वथा जाण अनुपेगी ।' – एभा २८.३२६.

**अनुप्रतिमा** स्त्री. १. मुख्य प्रतिमेनंतर येणारी प्रतिमा. २. मुख्य संवेदनेनंतर जाणवणारी संवेदना. [सं.]

**अनुप्रमाण** न. (ग.) सतत कायम असलेले प्रमाण. [सं.]

**अनुप्रमाणन** न. प्रमाणपत्राच्या प्रतीच्या खरेपणाबद्दल, अस्सलपणाबद्दल ग्वाही देण्याकरिता केलेली सही अगर दिलेली साक्ष. [सं.]

**अनुप्रमाणित करणे** क्रि. प्रमाणपत्राच्या प्रतीच्या खरेपणाबद्दल खात्री देणे, साक्ष देणे, सही करणे.

**अनुप्रयुक्त** वि. व्यवहारोपयोगी : '... अनुप्रयुक्त गणित विभागाचे दालन जगाला प्रथम खुले केले अर्किमिडीजनेच.' – कग ३७.

**अनुप्रवेश** पु. १. मुख्य प्रवेशामागून झालेला, केलेला प्रवेश. २. मागोमाग, क्रमाने आत जाणे, शिरणे. उदा. विषयानुप्रवेश. [सं.]

**अनुप्रवेशनीय** वि. (भूशा.) ज्यातून द्रव व वायू आरपार जातात असे, (खडक). [सं.]

**अनुप्रस्थ** वि. (वै.) आडवा. [सं.]

**अनुप्रस्थ भ्रंश** पु. (भूशा.) खडकांच्या प्रादेशिक रचनेला काटछेद देणाऱ्या दिशेतील प्रस्तर भेग. [सं.]

**अनुप्रास** पु. एक शब्दालंकार. काव्यात एका किंवा अनेक अक्षरांची पुनःपुन्हा आवृत्ती आली असता हा अलंकार होतो. अनुप्रासाचे छक, वृत्ती, श्रुती, लाट असे चार प्रकार आहेत. [सं.]

**अनुफा** पु. शिधा; रोजमुरा : 'जे शिपाई लोक सरकार इंग्रजांकडून येतील त्यास अनुफा अडीश्री श्रीमंत राजे देतील.'– पया ४०१. [फा.]

**अनुबद्ध करणे** (कार्यालयीन पत्रव्यवहारात) मागाहून जोडणे.

**अनुबद्ध कोन** पु. (ग.) विशिष्ट प्रकारे संबंधित कोन. दोन त्रिकोणांच्या संदर्भात पायालगतचे डावीकडील व उजवीकडील कोन; तसेच उरलेले शिरोकोन या अनुबद्ध कोनांच्या जोड्या देता येतात. [सं.]

**अनुबद्ध मूल्य** न. (ग.) दुसऱ्याशी असलेल्या विशिष्ट संबंधामुळे प्राप्त झालेले मूल्य. 'क्ष' या स्वचल राशीवर अवलंबून असलेल्या 'य' या परचल राशीच्या संदर्भात; 'क्ष'चे विशिष्ट मूल्य असताना 'य' चे जे मूल्य असेल ते 'क्ष' च्या मूल्याशी अनुबद्ध मूल्य होय. [सं.]

**अनुबल** न. (मागे) असलेले बल; पिछाडीचे सैन्य; कुमकीचे सैन्य. [सं.]

**अनुबंध** पु. १. पाश; बंधन; बेडी; लोढणे; अडथळा; कुटुंबासंबंधी ओढा; ओझे; काळजी; संसारपाश. २. भाषेचे मूलतत्त्व. जसे धातू; प्रत्यय; कार्य. ३. अवलंब; आश्रय; जवळचा संबंध; उपांग; अंग; आनुषंगिक भाग. ४. गौण, दुय्यम प्रतीची सूचक प्रीती, भाव. ५. सतत प्रवाह; अखंडता; परंपरा. ६. आरंभ. ७. अवस्था. ८. आसक्ती. ९. हेतू. १०. आनुषंगिक; –च्या बरोबर उद्भवणारी (व्याधी किंवा पीडा) उदा. मूर्च्छानुबंध. ११. वंशज; आप्त. १२. गुन्हा; अपराध.

१३. एखाद्या गोष्टीचा आग्रह; अभिनिवेश. १४. पूर्णांक व अपूर्णांक असेलेली संख्या. [सं.]

**अनुबंधचतुष्टय** पु. शास्त्रातील, वादविवादातील प्रतिपादनाचे चार प्रकार : १. विषय २. प्रयोजन ३. संबंध ४. अधिकारी. [सं.]

**अनुबंधन** न. (जीव.) (दोन किंवा अधिक जनुकांचे एकाच रंगसूत्रावर असल्यामुळे माळेतील मण्याप्रमाणे असलेले) साहचर्य. [सं.]

**अनुबंधी** वि. १. जवळचा; संबंधी. २. आनुषंगिक; अनुयोगी; अवलंबून असणारा; कार्यकारणसंबंधी. सामा. शब्द – कर्मानुबंधी, हितानुबंधी, नाशानुबंधी. ३. आसक्त. ४. जोडणारे. [सं.]

**अनुबिंब** न. प्रतिबिंब; हुबेहूब प्रतिमा : 'तो नैषधेंद्र तुमचा अनुबिंब भासे ।।' – दस्व ३३. [सं.]

**अनुबोधपट** पु. एखाद्या विषयाची, कलेची, प्रकल्पाची, वस्तूची उद्‌बोधक माहिती करून देणारा चित्रपट; शैक्षणिक माहितीपट. : 'लोकनृत्यांच्या ध्वनिमुद्रिका, ध्वनिपट्टिका आणि अनुबोधपटांचे संग्रहालय ....' – जात्यांदे १५८. [सं.]

**अनुबोध श्रुतिका** स्त्री. (आकाश.) एखादा प्रकल्प किंवा संस्था यांची माहिती देणारी, तेथील प्रत्यक्ष ध्वनिमुद्रणावर आधारित अथवा अशी माहिती कल्पनाजन्य प्रसंगात गुंफून तयार केलेली नभोवाणी श्रुतिका. [सं.]

**अनुभग्न** वि. अनोळखी; .. ची ओळख नसणे; .. चा परिचय नसणे. [सं. अनभिज्ञ]

**अनुभव** पु. १. प्रत्यक्ष ज्ञान; प्रचीती; स्वतः मिळवलेले ज्ञान; अनुमान; शब्द इ. द्वारा मिळालेले ज्ञान; साक्षात्कार. २. (कायदा.) उपभोग; कब्जा. ३. (ल.) परीक्षा. ४. (तत्त्व.) निरनिराळ्या गोष्टींचे स्मरण. ५. दृष्टांत; दाखला. ५. चव; आस्वाद. ७. (ल.) ईश्वरविषयक ज्ञान. ८. (मास.) भावभावनांच्या प्रतीतितून मनावर झालेला परिणाम; कलाकृतीच्या आस्वादाचे फलित. [सं.] (वा.) **अनुभव घडणे** – आस्वाद मिळणे. **अनुभव भोगणे** – प्रत्यय येणे.

**अनुभवकोश –ष** पु. (मानस.) नव्या अनुभवांची जुन्या अनुभवांशी सांगड घातली गेल्यामुळे सर्व अनुभवांचे झालेले एकत्रीकरण. [सं.]

**अनुभवगम्य** वि. प्रत्यक्ष अनुभवाने जाणण्याजोगे; अनुभवाने समजणारे; अनुभवज्ञेय (ब्रह्मज्ञान इ.). [सं.]

**अनुभवजन्य** वि. अनुभवाने मिळालेले : 'अनुभवजन्य ज्ञानाच्या समुच्चयाने विषयग्राहकता उत्पन्न होते.' – सुकौ ९. [सं.]

**अनुभव(वि)णे** सक्रि. १. प्रचीती घेणे; अनुभव घेणे; अनुभवास येणे; चांगले कळून येणे : 'देव तेही सर्व येती तीर्ये वेळीं । मृत्यु अनुभवेल तूज तेव्हां ।।' – बगाथा ८६. २. उपभोग घेणे; उपयोग करणे किंवा फायदा घेणे. [सं. अनुभव]

**अनुभवपंथ** पु. अनुभवाचा आटोका : 'परब्रह्म कीरू अकथ्य । येसैंचि ये येथातथ्य परी न ये अनुभवपंथ । श्रीगुरूवाक्येवीण ।' – विसिं १४.८८.

**अनुभववाद** पु. १. (तत्त्व.) आपल्याला असलेले सर्व ज्ञान हे अनुभवजन्य आहे असे प्रतिपादन करणारे मत, वाद. २. संकेत, अंतर्ज्ञान याऐवजी फक्त प्रत्यक्ष अनुभवाने मिळणाऱ्या ज्ञानाच्या आधारानेच एखाद्या विषयाचा अभ्यास करण्याची पद्धत. [सं.]

**अनुभवशीर, अनुभवसिद्ध** वि. अनुभवाने किंवा प्रचीतीने निश्चित किंवा सिद्ध झालेले.

**अनुभवाद्वैत** न. प्रचीतीने जीवाशिवाचे ऐक्य सिद्ध करावे असे मत प्रतिपादन करणारे तत्त्वज्ञान. [सं.]

**अनुभवार्थी** वि. श्रद्धाहीन : 'पापियां अनुभवार्थियां हातीं । कां विकिती मज ।।' – क्रिपु १२१.

**अनुभविक** वि. १. प्रचीती घेतलेले; माहीत झालेले; चव घेतलेले; ज्याचा अनुभव आला आहे असे; अनुभवसिद्ध. २. (ल.) तिखट; तीक्ष्ण; झोंबणारे; जहाल; कडक; पटणारे; लागणारे; हृदयस्पर्शी (काव्य वगैरे). ३. अनुभवी. ४. जगाच्या व्यवहारात मुरलेला; जगातील टक्केटोणपे खाऊन शहाणा झालेला; हुशार.

**अनुभवी** वि. १. अनुभव, प्रचीती घेतलेला; अनुभव आलेला : 'ह्या बुद्धी जो अनुभविया ।' – परमा १४.२५. २. ज्याने उपभोग घेतला आहे असा; ज्याने उपयोग केला आहे असा. [सं.]

**अनुभाजन** न. (अर्थ.) सूक्ष्म विभागणी.

**अनुभाव** पु. १. योग्यता; मान्यता; प्रभाव; माहात्म्य; अधिकार; सामर्थ्य; मोठेपणा. २. (साहित्य) एकभाव; आंतरिक भावावस्थेचा शारीरिक आविष्कार. उदा. भ्रूभंग; मनोवस्थेची बाह्य चिन्हे; आविर्भाव. पहा : **भाव;** २. तेज; कांती; शौर्य; वैभव. [सं.]

**अनुभाविक** पु. अनुभवणारा : 'तैसे अनुभाव्य अनुभाविक । इहीं दोही अनुभूतिक । तें गेलिया कैचें एक । एकासीचि ।' – अमृ ५.६२. पहा : **अनुभविक** [सं.]

**अनुभाव्य** न. १. अनुभवण्याचा विषय. २. पहा : **अनुभाविक** [सं.]

**अनुभूत** वि. १. चव घेतलेले; प्रत्ययास आलेले; कसोटीस लावलेले; अनुभवसिद्ध. २. माहीत असलेले; परिचित. [सं.]

**अनुभूति–ती** स्त्री. १. प्रत्यय; अनुभव : 'अनुभवु वेडावला । अनुभूतिपणे ।' –ज्ञा १८.१२१७. २. प्रत्यक्ष ज्ञान. ३. एखाद्या तत्त्वाच्या खऱ्या स्वरूपाची जाणीव. ४. बाह्य घटनांचा व्यक्तीच्या मनावर होणार परिणाम. ५. (मानस.) प्रत्यक्ष अनुभवाच्या आटोक्याबाहेरच्या गूढ कल्पनांची मानवी मनाला झालेली जाणीव. [सं.]

**अनुभूयमान** वि. प्रचीती येत असलेले; उपभोगीत असलेले. [सं.]

**अनुमत** न. १. अनुमोदन; संमती; मान्यता; खात्री; अभिमत; कबुली : 'तोचि मार्ग दावि आम्हांते । तुझिया अनुमते चालू आम्ही ।' २. अनुकूल मत; एकमत; एक भाव. ३. निर्णय; बनलेले मत; निवाडा; फैसला (न्यायाधीश किंवा पंच यांचा ).

वि. पसंत केलेले; आवडलेले; अनुकूल असलेले. [सं.]

**अनुमति–ती** स्त्री. १. पसंती; कबुली; संमती; मान्यता; अनुज्ञा; संसदेत किंवा विधानसभेत मान्य झालेल्या विधेयकास अनुक्रमे राष्ट्रपती व राज्यपाल यांनी दिलेली संमती; मान्यता. २. चतुर्दशीयुक्त पौर्णिमा तिथी; श्रौत कर्मात या देवतेस हविर्भाग देतात. राजसूय यज्ञात ह्या तिथीची पूजा करतात. [सं.]

**अनुमरण** न. सती जाणे; पतीबरोबर चितारोहण, अनुगमन.

**अनुमंत्रण** न. मंत्राभिषेक. [सं.]

**अनुमान** न. १. कल्पना; अटकळ; अंदाज (क्रि. काढणे, बांधणे) : 'एऱ्हवीं अनुमानाचेनि पैसें । आवडे कीर कळलें ऐसें । परि मृगजळाचेनि वोलांशें । काय भूमि तिमे । ' – ज्ञा ९.१३७. २. ज्ञात गोष्टीवरून अज्ञात गोष्टीबद्दल काढलेला तर्क किंवा निर्णय. (न्यायशास्त्रातील चार प्रमाणांपैकी दुसरे); (सामान्यतः) तर्क; सिद्धांत. ३. (कायदा.) तर्कावरून काढलेला पुरावा. ४. (काव्य.) (अनमान अप.) दोलायमान वृत्ती; संकोच; शंका; संशय; किंतू : 'तुका म्हणे आहे ठायीचाचि मान । आता अनुमान कायसा तो ।' – तुगा १४९३. ५. एक अर्थालंकार. साधनावरून साध्याचे तर्काने ज्ञान : 'भवन्मतिस आवडे जरि धनादिकांलागि ते । मदीय गुणकीर्तनश्रवण कां तरी त्यागिते । असेहि म्हणशील बा । जरि तरी तुझी मावली । तुज त्यजुनि पाजितां कशि दुधाकडे धांवली ।।' – केका ५२. [सं.]

**अनुमानगम्य** वि. तर्काने, धोरणाने, अंदाजाने, कल्पनेने जाणण्यासारखे. [सं.]

**अनुमानजन्य** वि. अनुमानातून आलेले; तर्काने समजणारे; धोरणाने जाणलेले : 'संगीताचा आढळ जरी अनुमानजन्य म्हटला तरी' – मागोवा १०. [सं.]

**अनुमानणे** सक्रि. १. तर्क करणे; तर्काने ताडणे; कल्पना करणे; अजमावणे : 'मनी अनुमानी पै येथू । कपटाचार दिसतसे ।' – मुआदि ४.१६०. २. अनमान करणे; का कू करणे : 'बळिभद्र लागला अनुमानु' – उह १३५०.

**अनुमानधप(ब)का** पहा : **अनमानधपका**

**अनुमानसिद्ध** वि. तर्काने निश्चित केलेले, ठरवलेले, जाणलेले. [सं.]

**अनुमानित** वि. १. अंदाज केलेला; अनुमान केलेला. २. तर्कगत; तर्कसाध्य. [सं.]

**अनुमानित देयता** स्त्री. (वा. ले.) अंदाजी, अपेक्षित देणे.

**अनुमानी** वि. तर्क करण्यात, तर्काने ताडण्यात कुशल; धोरण बांधण्यात, अटकळ किंवा अंदाज करण्यात कुशल, तरबेज. [सं.]

**अनुमानोक्ति – क्ती** स्त्री. १. तर्काने बोलणे; अंदाज अटकळ करणे. २. अनुमानाने किंवा तर्काने केलेली मांडणी; अनमानधपका. [सं.]

**अनुमानोपलब्ध** न. तर्काने मिळणारा : 'सांख्यांचे मूलकारण अचेतन, सूक्ष्म व अनुमानोपलब्ध असे आहे.' – मागोवा २५६. [सं.]

**अनुमापक** वि. ज्याच्यावरून अनुमान करता येईल असे; यथार्थ कल्पना देणारे; अनुमानाला साधन किंवा जागा करून देणारे; तर्क करण्यास आधारभूत (गोष्ट) : 'प्रतिबिंब बिंबा अनुमापक' – अमृ १.२६. [सं.]

**अनुमापन** न. (रसा.) अम्लधर्मी किंवा अल्कधर्मी संयुगे, तसेच ऑक्सिडीकारक किंवा क्षपणक गुण अंगी असलेल्या संयुगांच्या विद्रवाची संहती ठरवण्याची पद्धती. [सं.]

**अनुमित** वि. अनुमानाने, तर्काने ठरवलेला, जाणलेला. [सं.]

**अनुमिति–ती** स्त्री. तर्क; निर्णय; अनुमानाने, तर्काने होणारे ज्ञान. [सं.]

**अनुमेय** वि. तर्क करता येण्याजोगे; अटकळ करता येण्यासारखे : 'हा कां प्राणानुमेयो । येवो का हाती देवो ।' – अमृ ७.२३८. [सं.]

**अनुमोदक** वि. संमती देणारा; पसंती दर्शविणारा; अनुकूल मत देणारा (ठरावास वगैरे). [सं.]

**अनुमोदणे** सक्रि. प्रशंसा; स्तुती करणे : 'मग ते एकमेकांप्रति सुखानंदु म्हणौनि अनुमोदों लागले ।' – लीचपू ५२.

**अनुमोदन** सक्रि. १. पसंत करणे; संमती; मान्यता; कबुली; परवानगी. २. वाहवा करणे; प्रशंसणे . ३. चित्त; लक्ष : 'श्रवणीं पठणीं निजध्यास । आदरें धरावा दिवसेंदिवस । अनुमोदन देतां कथेस । सर्व पापास क्षय होय ।।' – शिली १.६९. ४. सूचनेस दुजोरा; पाठिंबा : 'बहुधा अनुमोदनाशिवाय सूचना (ठराव) विचारास घेत नाहीत. सभापतीने सुचविलेल्या सूचनांस अनुमोदनाची जरुरी नसते.' – सभा ७१. ५. उत्सव; अनुष्ठान; उपासना; समारंभ; सांगता : 'माझ्या पर्वाचे अनुमोदन । करी करवी आपण ।' – एभा ११.१२५५. (क्रि. करणे, घेणे, देणे, पडणे.) [सं.]

**अनुमोदनार्थ** वि. (व्यापार.) १. पसंतीसाठी पाठविण्यात आलेला (माल.). २.मान्यतेसाठी सादर केलेला (मसुदा, प्रस्ताव.) [सं.]

**अनुमोदित** वि. पसंत केलेले; वाखाणलेले; स्तुती केलेले; मान्यता दिलेले; परवानगी दिलेले. [सं.]

**अनुयान** न. १. अनुसरणे; मागून जाणे; येणे. २. वाहनाच्या मागच्या बाजूला जोडलेले; सुटे करता येणारे वाहन; वाहनाबरोबर ओढले जाणारे मागचे वाहन; जोडगाडीचा मागचा भाग. ३. (ल.) निकाल; निर्णय; परिणाम; शेवट. [सं.]

**अनुयायिनी** वि. अनुकूल असणारी : 'पै स्वहिता अनुयायिनी । मेधा ते गा मी ये जनी ।' – ज्ञा १०.२७९. [सं.]

**अनुयायी** वि. १. अनुसरणारा; मागून येणारा; (ल.) शिष्य; अनुचर. २. एखाद्या पक्षाचा, पंथाचा किंवा विशिष्ट मताचा. उदा. बौद्धानुयायी, टिळकानुयायी. [सं.]

**अनुयोग** पु. १. प्रश्न; चौकशी. २. बोलणे; निंदणे. ३. प्रयत्न; उद्योग. ४. ध्यान. ५. टीका; भाष्य. [सं.]

**अनुयोगित्व** न. अभियोग; प्रारंभीचा हल्ला; आपण होऊन केलेली चढाई : 'राजकारणाच्या युद्धास प्रजेकडे व त्यांच्या पुढाऱ्यांकडे केवळ प्रतियोगित्वाचा मान असतो; अनुयोगित्वाचा म्हणजे प्रारंभीची चढाई किंवा हल्ला करण्याचा मान सरकारकडे असतो.' – टिच २.१.[सं.]

**अनुयोगी** वि. १. पूर्वीचा; अगोदर येणारा; मूळचा; आरंभीचा; विषय; आधार; उगम इ. अधिकरणविषयक. २. जोडणारा, संबद्ध.

**अनुयोजन** न. १. जेथल्या तेथे लावणे; ठेवणे; ठाकठीक करणे. २. मेळ; सुस्थापन. ३. (भूशा.) योग्य अथवा विशिष्ट रीतीने स्थिर होण्याची क्रिया. [सं.]

**अनुयोजी** वि. (विअ.) १. एखाद्या यंत्राची पाहणी करून ते एकसुरात चालू करणारा किंवा ते बसवणारा. २. विजेच्या उपकरणाचे सुटे भाग एकत्र जोडणारा. ३. एखाद्या यंत्रातील किंवा उपकरणातील एका भागाचे दुसऱ्या भागाशी (त्याच्या योग्य जागेवर) पद्धतशीर अनुयोजन करणारा. [सं.]

**अनुयोज्य पटल** न. (भौ.) दर्शक भिंगाचे छिद्र लहानमोठे करण्यासाठी

असलेला पातळ, अपारदर्शक, पट्टीचा पडदा. हा एका गोल कड्याने फिरवता येतो. त्यामुळे मध्यवर्ती छिद्राचा व्यास लहानमोठा करता येतो. [सं.]

**अनुयोज्य पाना** पु. (यंअ.) आट्यांच्या साहाय्याने दाते खाली – वर करून योग्य त्या अंतरावर स्थिर करता येण्याजोगा पाना.

**अनुयोज्य पेच** पु. (यंअ.) योग्य त्या ठिकाणी स्थिर करता येण्याजोगा पेच; सरकता पेच.

**अनुरक्त** वि. १. अनुरागी; प्रेमबद्ध; विषयी; संसारी; ज्याचे प्रेम बसले आहे असा; मन गुंतले आहे असा. २. निष्ठावंत; रत; परायण; आसक्त. [सं.]

**अनुरक्ति–क्ती** स्त्री. प्रीती; आसक्ती; भक्ती; आवड; इच्छा; निष्ठा; स्नेह. [सं.]

**अनुरणन** न. १. प्रतिध्वनी; पडसाद. २. वाद्य वाजविणे बंद झाल्यावर त्यातून काही वेळ घुमणारा, टिकणारा ध्वनी; आवाजाची धून. ३. सतारीच्या जोडांच्या तारांतून निघणारा ध्वनी किंवा कंपन. ४. (साहित्य) व्यंग्यार्थ. [सं.]

**अनुरत** वि. आसक्त; लंपट; अनुरक्त. [सं.]

**अनुरति–ती** स्त्री. अनुराग; आसक्ती; प्रेम; प्रीती. [सं.]

**अनुरक्षण गृह** न. मुलाच्या जन्मानंतर त्याची काळजी घेणारी संस्था. [सं.]

**अनुरंगणे** अक्रि. तन्मय होणे; रंगून जाणे : '(नामा) संतचरणी अनुरंगला' – नाम ८४५.

**अनुरंजक** वि. करमणूक करणारा; मन वेधणारा; संतोष देणारा; सुखदायी. [सं.]

**अनुरंजन** न. १. करमणूक; मनोरंजन; विहरण; संतोष; मौज. २. सुखावस्था; आनंदवृत्ती. [सं.]

**अनुराग** पु. प्रेम; प्रीती; इच्छा; निष्ठा; अंतःकरण वेधणे : 'हा अनुरागु भोगितां । कुमुदिनी जाणे ।।' – ज्ञा १.६०. [सं.]

**अनुरागी** वि. प्रेमी; शौकी; आसक्त; इच्छा, प्रेम असलेला; प्रणयी; प्रीतियुक्त; ममताळू; स्नेहाळू. [सं.]

**अनुराधा** स्त्री. क्रांतिवृत्तातील सत्तावीस नक्षत्रांपैकी १७ वे नक्षत्र. (राधा – विशाखा या नक्षत्राच्या मागोमाग येणारे नक्षत्र.). [सं.]

**अनुरावक** वि. ध्वनिसाम्य असणारा : 'साध्या भाषणातसुद्धा कर्म, मर्म वगैरे अनुरावक शब्द घातल्याने ....' – सको ६६.

**अनुरूप** वि. १. जुळणारे; शोभणारे; योग्य; यथायोग्य; साजणारे; संयुक्तिक. २. सदृश; सारखे; समान. सामा. शब्द – आज्ञानुरूप, कालानुरूप, देशानुरूप, सामर्थ्यानुरूप, योग्यतानुरूप. शअ. अनुसरून; अन्वये; यथावत्; अनुरोधाने. [सं.]

**अनुरूप अनुदान** न. एखादा प्रकल्प किंवा योजना पूर्ण करण्याच्या दृष्टीने मूळ खर्च व गुंतवणूक यांच्याशी मिळती–जुळती अशी शासनाने दिलेली रक्कम. [सं.]

**अनुरूपता** स्त्री. जुळणारे, साजेसे असणे; सदृशता; सारखेपणा.

**अनुरूप बाजू** स्त्री. (ग.) सरूप त्रिकोणाच्या समान कोनांसमोरच्या बाजूंना परस्परांशी अनुरूप बाजू म्हणतात. – महमा १५०.

**अनुरेख** पु. (भौ.) एखादी वस्तू नाहीशी झाल्यानंतर पाठीमागे राहिलेली तिची खूण किंवा रेषा. [सं.]

**अनुरेखन** न. एखाद्या आकृतीवर पातळ कागद ठेवून त्या आकृतीची प्रत काढणे.

**अनुरोध** पु. १. कल; गती; धोरण; रोख; लावून दिलेली दिशा; सरणी : 'आता प्रतीतिने जो अनुरोधु । तो सत्यासि बाधू करू न शके ।।' – एभा ११.३६. २. विनंती; मान्यता; संमती; अनुसंधान; मर्जी. ३. शिफारस : 'हिंदुस्थानसरकारास लिहिले तर त्यांनी म्हणावे हा मुंबईसरकारच्या अनुरोधावर (शिफारशीवर) अवलंबून राहणारा प्रश्न आहे.' – माज ४११. ४. हुकमत; वर्चस्व; आटोका; कह्यात जाणे; तावडीत सापडणे : 'मीपणाचेनि अनुरोधें । गिळिलों होतो मोहमदें ।' – एभा ३.५९५. तृतीया विभक्तीत नेहमी उपयोग. [सं.]

**अनुरोधी** वि. अनुसरणारा; अनुरूप; यथायोग्य; अनुसरून असलेला; अनुकूल : 'तो आळु नोहे अनुरोधी । बोलति या ।।' – ज्ञा १५.२३०.

**अनुर्वाच्य** वि. बोलता न येण्यासारखे; अवर्णनीय : 'अनुर्वाच्य जे शब्दब्रह्म । स्वानंदसुख ।' – स्वादि १.५.३९. [सं. अनिर्वाच्य अप.]

**अनुलग्न** वि. अंगभूत असलेली; मुख्य वस्तूच्या अनुषंगाने असलेली, जोडलेली, लावलेली (वस्तू इ.). [सं.]

**अनुलग्नक** न. मुख्य वस्तूला जोडून असलेली वस्तू.

**अनुलग्निक** वि. जबाबदार; संबंधी. (गो.) [सं.]

**अनुलक्षून** क्रिवि. अवधान देऊन; लक्षात घेऊन; मन लावून; अवलोकन करून; अनुसरून; उद्देशून. [सं. अनु+लक्ष]

**अनुलक्ष्य** न. १. लक्ष देऊन केलेली वागणूक; आज्ञेनुसार, अनुकरणपूर्वक किंवा लक्ष देऊन केलेली गोष्ट; धोरण; अनुवर्तन. पहा : **अनुरोध**. २. लक्ष्याकडे, संबंधित बिंदूकडे वळवणे. [सं.]

**अनुलंब विपथन** न. (भौ.) भिंगाच्या नाभीय अंतरातील लंबरेषेपासून किरण बाजूला जाणे. [सं.]

**अनुलंब सोपान** पु. (स्था.) लोंबता जिना. [सं.]

**अनुलिपी** स्त्री. (विधी.) लिप्यंतर.

**अनुलेख** पु. (ज्यो.) रेषेच्या दोन टोकांपासून दोन लंब काढले तर त्यांचे पाये सांधून जी रेषा त्या पातळीत होते ती. [सं.]

**अनुलेखक**. दुसऱ्याने सांगितलेला मजकूर लिहून घेणारा किंवा लिहिलेला मजकूर उतरवून काढणारा लेखनिक. [सं.]

**अनुलेखन** न. १. छापलेला किंवा लिहिलेला उतारा पाहून तो जसाच्या तसा पुन्हा लिहून काढणे. २. (ग्रं.) सूचीलेखन करताना, नोंद करण्याच्या दृष्टीने ज्ञानसाहित्याची आवश्यक ती माहिती नमूद करणे. ३.(ग.) स्वचलाची किंमत वाढवत जाऊन त्याबरोबर त्यावर अवलंबून असलेल्या परचलाच्या किंमतीनुसार आलेखपटावर मिळणाऱ्या बिंदूचा आलेख काढण्याची क्रिया. [सं.]

**अनुलेप– न** पु. १. माखणे; लेप देणे; शरीरास उटणे चोपडणे : 'जयाचे निर्लेप अनुलेपु करी' – ज्ञा ११.२२५. २. उटी; उटण्याचे द्रव्य; लेप (पदार्थ). ३. माखलेली, चोपडलेली, लेप लावलेली स्थिती. [सं.]

**अनुलोम** वि. १. योग्य क्रमाने उत्पन्न झालेला किंवा जन्मलेला (विशेषतः

संकर जातीविषयी उपयोग); उच्च वर्णाचा पुरुष व खालच्या वर्णातील स्त्री, यापासून झालेली संतती. २. (ल.) अन्वय : 'अनुलोम प्रतिलोम । विवंचना वाढेल दुर्गम । हें न करितां सांख्य सुगम । आकळे तें वर्म सांगेन ।' - एभा २४.६०३. ३. (आयु.) स्वाभाविक दिशेस अनुसरून असणारा.

क्रिवि. योग्य क्रमाने; व्यवस्थित पद्धतीने; नैसर्गिक पद्धतीप्रमाणे किंवा रीतीने; शिस्तवार. [सं.]

**अनुलोमज** पु. अनुलोम विवाहापासून झालेली संतती : 'हीन वर्णाची जे नारी । उत्तम पुरुषाचा गर्भ धरी । ते अनुलोमज संसारी । शास्त्रकारी बोलिजे ।' - एभा २०.३२. [सं.]

**अनुलोमन** न. (आयु.) वातादिकांना स्वमार्गाकडे वळविणे; अशी क्रिया करण्यास उपयोगी ठरणारे औषध. [सं.]

**अनुलोमपद्धति-ती** स्त्री. १. यथाक्रम चालणारी रीती; ज्या कालानुक्रमे गोष्टी घडल्या असतील त्याच क्रमाने सांगणे; सुलट क्रमाने घडणे, करणे, बनणे याच्या उलट प्रतिलोम पद्धती. २. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र हा वर्णक्रम अनुलोम आहे. याच्या उलट प्रतिलोम.

**अनुलोमविलोम श्लोक** पु. सुलटा किंवा उलटा वाचला असता सारखाच वाचला जाणारा श्लोक. उदा. ' या माता ममता माया.'

**अनुलोम विवाह** पु. अनुलोम पद्धतीने झालेले लग्न; उच्च वर्णाचा पुरुष व कनिष्ठ वर्णाची स्त्री यांचा विवाह. [सं.]

**अनुल्लंघनीय** वि. उल्लंघन न करता येण्याजोगे. [सं.]

**अनुल्लंघनीयता** स्त्री. १. जिच्यावर मात करणे शक्य नाही अशी स्थिती. २. दुर्लंघ्यता; दुस्तरता. [सं.]

**अनुल्लेख** पु. ज्याबद्दल लिहिले किंवा बोलले पाहिजे त्याबद्दल न लिहिणे किंवा न बोलणे. [सं.] (वा.) **अनुल्लेखाने मारणे** - उल्लेख करण्यासारख्या गोष्टीचा मुद्दाम उल्लेख न करणे.

**अनुल्लेखनीय** वि. दुर्लक्षणीय; बिनमहत्त्वाचे; क्षुल्लक. [सं.]

**अनुवर्जणे** सक्रि. पाठीमागून जाणे; बोलवणे : 'गोसावी तेयाते अनुवर्जीत निगाले' - लीचपू ४८३.

**अनुवर्जन** न. बोळवण; वाटेला लावणे; विदा करणे: 'अनुवर्जन करी ते आली' - महानु. [सं.]

**अनुवर्तणे** सक्रि. १. दुसऱ्याच्या मर्जीप्रमाणे वागणे; सेवा करणे. २. एखाद्याच्या मागे मागे असणे; चिकटून राहणे; धरून बसणे. ३. एखाद्या परंपरेतील प्रत्येक वस्तूला, भागाला किंवा गोष्टीला लागू करणे, संबंध लावणे. [सं. अनु+वृत्]

**अनुवर्तन** न. १. अनुकरण; अवलंबन; सेवा; चाकरी; अनुरूपत्व; मागून जाणे. २. (भौ.) एका पाठोपाठ एक असे परत परत येणे. ३. (वन.) वाढीची प्रक्रिया; वनस्पतींच्या वाढीच्या दिशेवर अवलंबून असणारा गुण. [सं.]

**अनुवर्तनी** वि. (वन.) चेतना निर्माण करणाऱ्या घटकाकडे किंवा घटकाच्या विरुद्ध दिशेने वाढत जाणारे अवयव अथवा होणारी वाढ.

**अनुवर्ती** वि. १. सेवा किंवा चाकरी करणारा; कामास किंवा उपयोगास येणारा. २. आश्रय, आधार देणारा. ३. खालच्या प्रतीचा; दुय्यम. ४. समाविष्ट; अंगभूत असणारा. ५. संबंध धरून असणारा. ६. आज्ञांकित; मताप्रमाणे वागणारा; मागोमाग, नंतर येणारा; नंतरचा.

**अनुवर्ती स्थायी दंत** (वै.) पहिले दात पडून गेल्यानंतर आलेले दुसरे कायमचे दात; सलगपणे असलेले स्थायी दात.

**अनुवर्धन** न. (स्था.) दीर्घीकरण; विस्तार. [सं.]

**अनुवंश** पु. वारसा; आईवडील व इतर पूर्वज यांच्यातील गुणदोषांचे अपत्यांमध्ये झालेले संक्रमण. [सं.]

**अनुवंशक्रम** पु. (जीव.) कुलपरंपरेचे अथवा वंशावळीचे कोष्टक. [सं.]

**अनुवंशज्ञ** पु. (जीव.) आधुनिक संकरण शास्त्रातील तज्ज्ञ; अनुवंशिकता व तिचे स्वरूप या विषयातील तज्ज्ञ. [सं.]

**अनुवंशिकता** स्त्री. पूर्वजांचे गुणावगुण पुढल्या पिढीत संक्रांत होणे : 'काही बाबतीत अनुवंशिकतेचा प्रभाव असतो.' - कशी मी १.[सं.]

**अनुवंशिकतावादी** वि. मुलांच्यात असणारे सर्व गुणदोष आईवडील व इतर पूर्वज यांच्यापासून येतात असे मानणारा.

**अनुवाक** पु. ऋग्वेदसूक्तांचा एक समुच्चय; संहितेंच्या अध्यायातील पोटभाग; प्रकरण; परिच्छेद. [सं.]

**अनुवाद-दन** पु. १. भाषांतर; एका भाषेतील मजकूर दुसऱ्या भाषेत आणणे; नक्कल (ग्रंथ, काव्य वगैरेची). २. (सभेमध्ये) दुसऱ्याचे बोलणे किंवा स्वतःचे म्हणणे पुनःपुन्हा सांगणे किंवा मांडणे; पुनःपुन्हा स्पष्टीकरण; स्पष्टीकरणार्थ पुनरुक्ती. (ल.) वर्णन. ३. एखाद्यावरचा शाबीत झालेला आरोप सर्वांस सांगून त्याला दिलेले शासन पुन्हा सांगणे. ४. दुसऱ्याची दुष्कृत्ये उघडकीस आणणे. ५. (व्यापक.) संवाद; संलाप; भाषण. ६. (धर्म.) प्रायश्चित्त घेते वेळी पातकांचा व प्रायश्चित्ताचा उच्चार करणे. ७. (कायदा.) सिद्ध करणे; प्रस्थापित करणे (जुनी रीत, रिवाज वगैरे). ८. (तत्त्व.) यथार्थ निरूपण : 'अर्थ व वेदातील वर्णन वस्तुस्थितीस धरून असेल तर त्यास अनुवाद म्हणतात.' - गीर २२. ९. दुजोरा. [सं.]

**अनुवादक, अनुवादी** पु. १. अनुवाद, भाषांतर, नक्कल करणारा. २. प्रायश्चित्त घेते वेळी, प्रायश्चित्त घेणाऱ्याच्या पातकांचा उच्चार करणारा. [सं.]

**अनुवादणे** सक्रि. १. पुन्हा पुन्हा सांगणे, म्हणणे; पाठ करणे; पोपटपंची करणे. २. बोलणे; सांगणे : 'तो स्वयें सर्वेश्वरु । प्रत्यक्ष अनुवादला' - ज्ञा १.७२. ३. स्पष्ट करणे : 'ऐसे बहुधा निरोपिले । ग्रंथगर्भी जे बोलिले । ते अवघेंचि अनुवादलें । न वचे किं कदां ।' - दास १.१.१३. [सं.]

**अनुवादी** वि. संगीताचे सौंदर्य वाढवणारे सहायक स्वर; वादी व संवादी खेरीज रागात लागणारे बाकी सर्व स्वर अनुवादी समजले जातात.[सं.]

**अनुवाय** पु. संबंध; संसर्ग : 'वायुचेनि अनुवाये । धूं दिगंत वेऱ्ही जाये ।' - राज्ञा १३.६८५.

**अनुवास-सन** पु. न. १. उटणे. २. सुवासिक करण्याची क्रिया. ३. (वै.) तैलबस्ती; तेलाचा एनिमा. [सं.]

**अनुविकरण** न. (व्या.) प्रत्यय. [सं.]

**अनुविद्ध** वि. भोक पाडलेले; वेष्टिलेले; आच्छादित; व्याप्त; संबद्ध; कोंदण करून बसवलेले; जडवलेले. [सं.]

**अनुविधान** न. सुचवल्याप्रमाणे करणे.

**अनुविभाग** पु. धारा; अनुच्छेद.

**अनुवृत्त** वि. संबद्ध; निगडीत; अनुयायी. [सं.]

**अनुवृत्तदर्शन** न. (नृत्य.) नृत्यामध्ये एखादा पदार्थ निरखून पाहण्याचा अभिनय. [सं.]

**अनुवृत्ति – त्ती** स्त्री. १. परंपरेने चालत आलेला संबंध; क्रम; मालिका; रांग : 'अर्जुना इया परी । मिथ्यादृष्टीच्या घरीं । युगानुवृत्तीची करी । चोज पाउलें ।' – ज्ञा १४.११३. २. सेवा; चाकरी; आज्ञापालन; शुश्रूषा. ३. साहचर्य. ४. अनुकरण; नक्कल. ५. संमती. ६. (व्या.) पूर्वगामी नियमांचा प्रभाव प्रचलित नियमावर चालू राहणे. [सं.]

**अनुवेल– ळ** क्रिवि. पुनःपुन्हा; वारंवार; फिरफिरून; अनेकवार. [सं. अनु + वेला]

**अनुव्यवसाय** पु. प्रबोध; भान; सारासार विचार; चैतन्य; जाणीव. [सं.]

**अनुव्याख्यान** न. मंत्रादिकांचे विवरण; मंत्रादिकांचे अर्थ विषद करणारे व्याख्यान. [सं.]

**अनुव्रत** क्रिवि. अनुसरून : 'अनुव्रत नवा रसां ।' – राज्ञा १८.३३०. [सं.]

**अनुशय** पु. (तत्त्व.) १. दुष्कर्मांचा परिणाम. २. पश्चात्ताप : 'अनुसो आर्तिसी सीकवी आलवांका' – मूप्र २१५४.

**अनुशंसा** स्त्री. एखाद्या गोष्टीस प्रशस्तिपूर्वक मान्यता देणे; शिफारस करून संमती देणे. [सं.]

**अनुशासणे** सक्रि. १. नियमित, परिमित करणे; बंदोबस्त ठेवणे; राज्यकारभार चालविणे; कायद्याने, नियमाने बांधून टाकणे. २. विवरण, विवेचन, ऊहापोह करणे. [सं. अनु +शास्]

**अनुशासन** न. १. आज्ञा. २. कायदा; नियम; ठराव. ३. शिस्त; नियमन. ४. निश्चित, मर्यादित, सुनियंत्रित करण्याचा व्यापार. ५. व्यवहारशास्त्र. ६. अनुष्ठान : 'मग मांडिले अनुशासन । आणि रुद्राचे करी चिंतन ।' – कथा ४.१३.२८. ७. एखाद्या विषयाचे विवेचन, विवरण, ऊहापोह, स्पष्टीकरण इ. [सं.]

**अनुशासन संधारण** न. शिस्तपालन; शिस्तरक्षण.

**अनुशास्ता** पु. १. अनुशासन, नियमन करणारा; राज्य चालविणारा; बंदोबस्त राखणारा; कारभारी; शिक्षा करणारा; नियंता. २. उपदेश करणारा. [सं.]

**अनुशास्ति–स्ती** स्त्री. कायद्याचे पालन करावे म्हणून योजलेली शिक्षा, शासन इ. [सं.]

**अनुशीतन** न. (शाप. ) (काच, धातू, प्रस्तर इ. तापविल्यानंतर) सावकाश थंड होण्याची प्रक्रिया. [सं.]

**अनुशीलन** न. १. परिशीलन; पिच्छा; हव्यास; आसक्ती; अनुरक्ती; पाठीस लागणे; पाठपुरावा; सराव; अभ्यास. २. एकनिष्ठ सेवा. ३. (मानस.) उजळणी; एखादी कृती करण्यातील वाकबगारपणा व सुलभता मिळवण्यासाठी ती कृती वारंवार करणे. [सं.]

**अनुशेष** पु. साठून राहिलेली कामे, अपुरी राहिलेली आश्वासने इ. निर्धारित कालावधीत पूर्ण न झाल्यामुळे पुढे चालू राहणे. [सं.]

**अनुश्रवण** न. रेडिओ किंवा दूरदर्शनाच्या ध्वनिक्षेपणाची तांत्रिक तपासणी. [सं.]

**अनुश्रुत** वि. परंपराप्राप्त; पूर्वापार चालत असलेले : 'अनुश्रूत हे प्रासादिक । कृपाभीक स्वामीची ।' – तुगा २१३२. [सं.]

**अनुषक्त** वि. चिकटून असलेला; बिलगून असलेला. [सं.]

**अनुषंग** पु. १. संगती; भागीदारी; संसर्ग; सोबत; साहचर्य; सख्य; निकटसमागम; संबंध. २. आश्रय. ३. मिश्रण; जोड; मिलाफ. ४. एक अलंकार – एका क्रियेपासून अनेक कार्यसिद्धी झाल्याचे वर्णन जेथे असते तेथे हा अलंकार साधतो. उदा. 'छळी नृप बळी बळी तरिच तो नसे आटला ।' – केका ७६. [सं. अनु + संग]

**अनुषंगिक** वि. संबंधी; बरोबरचा. पहा : **आनुषंगिक**

**अनुष्ट** पहा : **अनुच्छिष्ट**

**अनुष्टुप–ब–भ** पु. चार चरण, आठ अक्षरे, लघु गुरू अनिश्चित असा एक छंद. उदा. 'मातेचि मानुनी थोर । कर्मे सर्व समर्पिती । तरी अद्वैतयोगेचि । मातें ध्याती उपासती ।' – वामन गीस १२.६.
न. (वैदिक छंदात याच्या चरणांत अक्षरे सर्वात कमी असल्यामुळे लाक्षणिक अर्थाने) अल्पत्व; अल्पराशी; थेंब; संक्षेप : 'केवळ अनुष्टुप निर्बळ । ऐसे दिसे पांडवदळ ।' – जै ४२.३२. [सं.]

**अनुष्ठणे** क्रि. १. विधिपूर्वक आचरण करणे : 'म्हणोनि आपुलियापरी । शास्त्र अनुष्ठिती कुसरी ।' – ज्ञा १७.९२. २. अनुष्ठान करणे : 'जियें कर्मी हा प्रयोगु । अनुष्ठिजे सद्विनियोगु । तेथ अनुष्ठिला सांगु । वेदुचि तो ।' – ज्ञा १७.४१३. ३. करणे; संपादणे; साधणे; सिद्ध करणे; शेवटास नेणे; पार पाडणे (धंदा, उद्योग इ.) : 'अन्योक्तीने प्रसंगीं चतुरा । धाकुटे काज सांगे असुरा । त्यावरी अभिमान ये थोरा । कार्य अनुष्ठितील ते ।' – मुआदि ४.६५. [सं. अनु+स्था]

**अनुष्ठाता** वि. देवतांच्या प्रसादार्थ धार्मिक विधी करणारा. [सं.]

**अनुष्ठान** न. १. विधिपूर्वक धर्मकृत्य, कर्म यांचे आचरण : 'म्हणोनि स्वधर्मानुष्ठान । ते अखंड यज्ञयाजन । जो करी तया बंधन । कहींच न पडे ।' – ज्ञा ३.८३. २. देवाप्रीत्यर्थ अभिषेक, पूजा, पाठ, होम, हवन, दानधर्म वगैरे कर्म. ३. (ल.) मोठ्या परिश्रमाचे काम; महत्कार्य; अवघड कृत्य. ४. (सामान्यतः) संपादणी; आचरण; पार पाडणे. (क्रि. करणे, चालवणे, बजावणे, मांडणे). [सं. अनु + स्था]

**अनुष्ठान पद्धति–ती** स्त्री. धार्मिक विधी यथासांग करण्याची पद्धती. : 'प्रभुचे भोजन म्हणजे पवित्र सहभागिता इची अनुष्ठान पद्धती ।' – साप्रा ९०.

**अनुष्ठानी** वि. १. अनुष्ठान करणारा : 'जैसे अनुष्ठानिअें लोचनु । ते वांचवेआं स्त्री रत्नु । करितांति धारी तर्पणु । मदनलिंगांसी ।'– शिव ८४९. २. अनुष्ठानामध्ये कुशल, निपुण; यजमानाचे अनुष्ठान चालविणारा; अनुष्ठान प्रतिनिधी.

**अनुष्ठित** वि. केलेले; बजावलेले; उरकलेले; आचरलेले; अनुष्ठिलेले; साधलेले. [सं.]

**अनुष्ठेय** वि. अनुष्ठान करण्यास योग्य; करणीय; करण्याजोगे; आचरणीय; बजावण्यास योग्य : 'हेंचि नित्यनैमित्तिक । अनुष्ठेय आवश्यक ।' – ज्ञा १८.११९. [सं.]

**अनुसट** वि. मोकळा : 'पुत्र पुत्र संग्राम केला । निजपुत्र अनुसट राहिला । आतां माझा युद्ध सोहळा । दुरून पाहे स्वामिया ।।' – जै ४.१०१. [सं. अनुच्छिष्ट]

**अनुसपोटी** पहा : **अनशवे पोटी** (व.)

**अनुसमर्थन** न. (कायदा.) औपचारिक संमती देणे; औपचारिक मंजुरी देणे. [सं.]

**अनुसर** पु. १. संमती : 'अस्त्रेया अनुसरू नास्ति । बलात्कारे संगु करिती' – उह ५३९. २. आविष्कार : 'परि वीणभक्ती अनुसरे : नव्हेति मोक्षा हेतु' – ज्ञाप्र ११७६. (वा.) **अनुसर होणे–** कबूल होणे.

**अनुसरण** न. १. अनुकरण; अनुवर्तन; मागोमाग जाणे; सदृश आचरण; नक्कल करणे : 'अनावडीचा वर्षावो । तेणे नुगवे अनुसरन भावो ।' – ज्ञाप्र २४३. २. अंगीकार. [सं.]

**अनुसरणे** सक्रि. १. अनुकरण करणे; सदृश आचरण ठेवणे; अनुलक्षून वागणे. २. अनुकूल होणे; संमत होणे; मिलाफ करणे; जुळणे; जमणे. ३. मताचा स्वीकार करणे; अनुयायी होणे; वश होणे. ४. स्मरणे; भजणे : 'नारायण भय येऊं नेदी गांवा । तुका म्हणे नांवा अनुसरे त्या ।' – तुगा ८३. ५. अनुरक्त होणे; अधीन होणे; वरणे : 'योजनगंधा मुनिला जसि गंगा शंकराशि अनुसरली ।' – मोआदि ८.३७ [सं. अनु + सृ]

**अनुसरळ** क्रिवि. अनुसार; च्याप्रमाणे : 'धान्य सुवर्ण तांबोळ : कर्पुरादि सकळ : वेचिजे वित्तानुसरळ' – रसकौ ३७८.

**अनुसर्पी** वि. (विअ.) पाठोपाठ येणारा. [सं.]

**अनुसंकट** न. संकट.

**अनुसंग** पहा : **अनुषंग** : 'तू अनुसंगाचा ठावो ।' – ज्ञा ४.३०.

**अनुसंगे करून** क्रिवि. दिमतीस; तर्फेने : 'सदाशिव माणकेश्वर हे सवाई माधवराव पेशवे सरकार यांचे कारकिर्दीत वकिलीचे वगैरे राजकारणाचे लिहिण्यात गोविंदराव पिंगळे यांचे अनुसंगे करून सरकारकामात वागत होते.' – दसकैया ११५.

**अनुसंतति संबोधन** न. (समाज.) मुलाच्या नावाने आई वडिलांना ओळखण्याची पद्धत.

**अनुसंधान** न. १. जोडणी; जुळणी; मांडणी; संगती; संगतवार जुळविणे, जोडणे, व्यवस्थित लावणे (मुद्दा, विषय, अनुक्रम इ.). २. लक्ष; अवधान; चित्त; ध्यान : 'कृष्ण चरणी जडलें मन । या लागी वाचे पडले मौन । दृढ लागलें अनुसंधान । सहजस्थिति चालली ।' – एरुस्व ६.६७. ३. हेतू; ध्येय; बेत; लागाबांधा; योजना; वळण; वशिला; मसलत; धोरण; युक्ती (क्रि. बांधणे, लावणे.). ४. कीर्तनातील उत्तररंग; कथेतील आख्यान : 'अवघें पोटासाठी सोंग । तैथे कैचा पांडुरंग । लावी अनुसंधान । काही देईल म्हणवून ।' – तुगा २८८३. ५. जम; मेळ; समन्वय; मिलाफ; अनुकूलता. ६. (कधीकधी) अनुरोध या अर्थी. ७. प्रस्ताव; प्रस्तावना; प्रवेश. ८. चौकशी; शोध; मागोवा. ९. क्रमप्राप्त गोष्ट; ओघाने आलेली गोष्ट. १०. (न्यायात) पंचावयवी वाक्यातील जो उपनय तो. हे पंचावयव येणे प्रमाणे – प्रतिज्ञा, हेतू, उदाहरण, उपनय आणि निगमन. [सं.]

**अनुसंधानी** वि. १. मसलत करण्यात धूर्त; युक्त्या, बेत योजण्यात हुशार; मोठा हिकमती; शक्कल लढविणारा. २. आख्यान लावणारा (हरिदास). ३. (वासावरून) मार्ग काढणारा; सुगावा लावणारा. [सं.]

**अनुसार–रा** पु. १. अनुसरण; अनुवर्तन; सारखे वागणे. २. क्रम; सरणी; मार्ग : 'जो दाविला तुम्हीं अनुसारा ।' – ज्ञा ५.१६५.

वि. प्रमाणे; सारखा; सदृश; अनुरूप; जुळणारा. सामा. शब्द – आज्ञेनुसार वर्तन, पापानुसार क्लेश.

क्रिवि. धोरणाने; क्रमाने; अनुरूप. [सं.]

**अनुसारी** वि. अनुसरणारा; मागोमाग जाणारा; अनुकरण करणारा; आज्ञेप्रमाणे वर्तणारा. पहा : **अनुसार** [सं. अनुसार]

**अनुसिद्ध** वि. (ग.) दुसऱ्या गोष्टीच्या आधाराने सिद्ध झालेला. [सं.]

**अनुसिद्धता** स्त्री. (ग.) गृहीत गोष्टींवरून दुसरी गोष्ट सिद्ध करणे. [सं.]

**अनुसिद्धांत** पु. (ग.) उपसिद्धांत; एखाद्या स्वतंत्र व महत्त्वाच्या सिद्धांताचा आधार घेऊनच जो सिद्ध करता येतो असा दुसरा सिद्धांत. [सं.]

**अनुसूचि** पहा : **अनुसूची**

**अनुसूचित** वि. सरकारने नक्की केलेल्या विशिष्ट कोष्टकात जिचा समावेश केलेला आहे, अशी (जात, जमात).

**अनुसूचित जमाती** स्त्री. शासनाने आदिवासी व भटक्या, विमुक्त जमातींची जी यादी केली आहे त्यात समाविष्ट केलेल्या जमाती.

**अनुसूचित जाती** स्त्री. शासनाने अस्पृश्यादी दलित, मागासलेल्या जातींच्या तयार केलेल्या यादीत समाविष्ट असलेल्या जाती.

**अनुसूचित दर** पु. (व्यापार.) एखाद्या कंपनीने उत्पादित केलेल्या वस्तूंची अधिकृत कोष्टकात नमूद केलेली किंमत; अधिकृत दर.

**अनुसूचित बँक** स्त्री. बँकासंबंधीच्या कायद्याला जोडलेल्या यादीत समाविष्ट असलेली बँक.

**अनुसूची** स्त्री. कायद्याला, कराराला वगैरे अधिकृतरीत्या जोडलेली यादी; फेरिस्त; तालिका; माहितीपत्रक. [सं.]

**अनुसृत** वि. १. अनुसरलेला; अनुयायी झालेला; प्रमाणे वागलेला. [सं.]

**अनुसेवन करणे** उक्रि. (स.वि.) साहाय्यक होणे.

**अनुसेवी** वि. १. साधनभूत; साध्य प्राप्त करून घेण्यासाठी साधनभूत होणारा. २. हाताखालचा; कनिष्ठ; दुय्यम. [सं.]

**अनुसेवी स्थावर** (विधि.) नियमानुसार मिळालेली जमीन.

**अनुसो** पु. पश्चात्ताप : 'अनुसो आर्तिसि सीकवी आवाका:' मूप्र.

**अनुस्तरणी** स्त्री. (मूळ वैदिक अर्थ : सूत्रकाळी अग्निहोत्र्याच्या उत्तरक्रियेत गाय मारून तिची वपा काढून तिने अग्निहोत्र्याच्या प्रेताचे आच्छादन करीत. त्या गाईस वैतरणी म्हणत.) उत्तरक्रियेत वैतरणी तरावयासाठी देण्यात येणारी गाय. [सं.]

**अनुस्फटिक** वि. स्फटिकमय. [सं.]

**अनुस्फुरण** न. (जीव.) येणाऱ्या प्रकाशाचे पारदर्शक पदार्थात शोषण व रूपांतर होऊन तो बाहेर पडण्याची क्रिया. [सं.]

**अनुस्यूत** वि. नियमितपणे, अखंडित जाणारा; अत्रुटित (उपभोग, कारभार, वृत्ती इ.); सरळ व न अडखळणाऱ्या गतीचा; एकसारखा; एकत्र गुंफलेला; व्यापक : 'सत्ता अनस्यूत अबाधिति ।' – रंयोवा १.८१. [सं.]

**अनुस्यूतपण, अनुस्युति** न. स्त्री. अखंडितपण; सतत स्थिती; अखंड गती, व्याप्ती; एकसारखेपणा : 'गंधा पासोनि पृथ्वी कठिण । उपजली आपी आपण । येरयेरांचे अनुस्यूतपण । सर्वथा जाण मोडेना ।' – एभा २४.१२५; 'वेगळाल्या मूर्ती । जयाचिये अनुस्यूती ।' – ज्ञा १३.९१७. [सं.]

**अनुस्रोत** वि. (भूशा.) प्रवाहाच्या खालच्या दिशेला. [सं.]

**अनुस्वार** पु. १. नाकातून होणारा स्पष्टोच्चारदर्शक शीर्ष बिंदू. २. य, र, ल, व, श, स, ह या अक्षरांवरील नाकातून होणारा स्पष्ट उच्चार दर्शविण्याकरिता योजावयाचे टिंब. ३. पुढे कोणतेही व्यंजन असून त्यापूर्वी ङ्, ञ्, ण्, न्, म् यापैकी कोणतेही व्यंजन उच्चारावयाचे असले म्हणजे येणारे अक्षरावरील टिंब. [सं.]

**अनुहत–हात** वि. अखंड; निरंतर; सतत; एकसारखा; न थांबता.

**अनुक्षणी** क्रिवि. क्षणोक्षणी; प्रत्येकक्षणी : 'आनंदाब्धि अनुक्षणीं भरतसें यांच्या कृपाईक्षणीं ।' – आसी १६.१८. [सं. अनु + क्षण]

**अनुक्षेत्र** न. लहान क्षेत्र किंवा महत् (काशी आदी) क्षेत्र सदृश – पंढरपूर. [सं.]

**अनुक्षेत्रपाळ** पु. १. क्षेत्रस्थानाची प्रतिपाळक देवता. २. (ल.) पंढपूरचा विठोबा : 'धन्य वेणुनाद अनुक्षेत्रपाळा ।' – विठोबाची आरती.

**अनुक्षेप** पु. युद्धकलेतील पवित्र्याचा एक प्रकार. [सं.]

**अनुज्ञप्ति–प्ती** स्त्री. परवानगी; हुकूम; सनद; अनुज्ञापत्र; परवाना; मान्यता; प्रमाणपत्र अगर दस्तऐवज. [सं.]

**अनुज्ञप्तिदाता** पु. एखादी गोष्ट करण्याची परवानगी देणारे अधिकृत प्रमाणपत्र मंजूर करणारा. [सं.]

**अनुज्ञप्तिधारक** पु. एखादी गोष्ट विकण्यासंबंधीचे लेखी प्रमाणपत्र ज्याच्याकडे आहे असा विक्रेता. [सं.]

**अनुज्ञा** स्त्री. आज्ञा; हुकूम; परवानगी; संमती : 'वरिपडले जयाचिया । अनुज्ञा कां ।' – अमृ २.१७. २. एक अलंकार; दोषात काही एक गुण आहे या बुद्धीने केलेली दोष देण्याविषयीची प्रार्थना : 'तुका म्हणे गर्भवासी । सुखे घालावे आम्हासी ।' – तुगा ११९३.

**अनुज्ञात** आज्ञापित; हुकूम केलेले; संमत; विहित. [सं.]

**अनुज्ञापक** वि. शिफारस करणारे; परवानगी देणारे. [सं.]

**अनुज्ञापत्रिका** स्त्री. (ग्रं.) ग्रंथादी साहित्य ग्रंथालयाबाहेर नेण्यासाठी परवानगीदाखल दिलेली लेखी चिठ्ठी. [सं.]

**अनुज्ञेय** वि. परवानगी देण्याजोगा; परवानगी असलेला. [सं.]

**अनुन** वि. १. कमी नसलेला. २. समग्र विस्तृत; मोठा. ३. सर्व हक्क, अधिकार असलेला.

**अनूढ – ढा** वि. लग्न न झालेला; अविवाहित. [सं.]

**अनूढमातृत्व** न. विवाहपूर्व मातृत्व.

**अनूप** वि. १. निरुपम; असाधारण; अलौकिक; विलक्षण; चमत्कारिक; असामान्य; नवलाईचे; आश्चर्यकारक.२. (वायु.) जेथे झाडी व पाणी फार आहे असा (देश). ३. महामृग (रानडुक्कर, रेडा, मृग, हत्ती, रानगाय, गेंडा, गवा इ.), जलचर (हंस, सारस, बदक, बगळा, पानकोंबडा इ.), मत्स्य (रोही, पाठीन, कासव, कालव, शंख इ.) हे (प्राणी). ४. दलदलीच्या प्रदेशात कुजलेल्या पदार्थापासून निघणारा (वायू, मिथेन, मार्श गॅस.) [सं.]

**अनूप समावास** पु. (वन.) कायम दलदलीत वाढणारा वनस्पतींचा समुदाय.

**अनूरु–रू** पु. मांड्या नसलेला; सूर्याचा सारथी, अरुण. (याला मांड्या नव्हत्या. हा गरुडाचा थोरला भाऊ). [सं.]

**अनूर्णक** पु. (भौ.) लव किंवा लोकर नाहीशी करणारे उपकरण. [सं.]

**अनृण–णी** वि. कर्ज, ऋण नसलेला; ऋणमुक्त. [सं.]

**अनृत** न. लबाडी; खोटेपणा; असत्यता.

वि. खोटे; लबाड; अतथ्य (भाषण इ.). [सं.]

**अनृत्य** पहा : **अनृत** : 'द्वेषवचनी अनृत्यवचनी । बाष्कळवचनी धि:कारू ।' – दास २.३.२२.

**अनेक** वि. एकापेक्षा अधिक; काही; पुष्कळ. सामा. शब्द – अनेकविध, अनेकसत्ताक, अनेकवार. [सं.]

**अनेककोशिक** न. (वन.) १. बहुकोशिक; अनेक कोशिकांचे बनलेले (शरीर किंवा अवयव).२. बहुपेशीय; अनेक शरीरघटक असलेले.

**अनेकचर** वि. कळप करून राहणारा; संघचर; समूहचर.

**अनेकजिव्ह** वि. पुष्कळ जिभा असलेला; (ल.) खोटे बोलणारा; बोलणे बदलणारा. [सं.]

**अनेकत्र** क्रिवि. अनेक ठिकाणी. [सं.]

**अनेकदा** क्रिवि. पुष्कळ वेळा.

**अनेकधा–विधा** क्रिवि. पुष्कळ रीतींनी, प्रकारे; पुष्कळ वेळा. [सं.]

**अनेकमातृक** वि. पुष्कळ आया असलेला. [सं.]

**अनेकवचन** १. ज्यावरून अनेक वस्तूंचा बोध होतो ते; बहुवचन. २. नामाचे निरनिराळ्या विभक्तींमधील बहुसंख्याबोधक व क्रियापदांचे त्यांच्या पुरुष आणि काळ यामधील बहुसंख्याबोधक कर्तादी रूप. ३. बहुवचनातील शब्द. [सं.]

**अनेकवर्ण समीकरण (द्वि त्रि इ. अज्ञात वर्ण )** न. (ग.) ज्या समीकरणात दोन अथवा अधिक वेगवेगळ्या अज्ञात राशींचा अंतर्भाव असतो असे समीकरण. उदा.२ क्ष + ३ य+ ७र = ० या एकाच समीकरणात क्ष, य, र या तीन वेगवेगळ्या अज्ञात राशी आल्या आहेत. [सं.]

**अनेकवादी** वि. पाखंडी मताचा. [सं.]

**अनेकवार** क्रिवि. पुष्कळ वेळा; वारंवार; नेहमी सतत.

**अनेकशः** क्रिवि. पुष्कळ प्रकारे. [सं.]

**अनेकसदस्य मतदारसंघ** पु. (राज्य.) ज्या मतदारसंघातून एकाहून अधिक उमेदवार निवडून द्यावयाचे असतात असा मतदारसंघ. [सं.]

**अनेकसंधिपाद प्राणिवर्ग** (प्राणि.) ज्यांच्या पायांना अनेक सांधे आहेत असे प्राणी. [सं.]

**अनेकार्थता** स्त्री. १. एकार्थतेचा अभाव; अर्थाची अनेकता. २. संदिग्धता; मोघमपणा. [सं.]

**अनेकांगी वर्ग** पु. (ग्रं.) अनेक पैलू अथवा अंगे असलेला विषय; वर्गीकरणाच्या दृष्टीने दोन वेगवेगळे विषय एकत्रित मांडणारे पुस्तक.

**अनेगा** स्त्री. १. आण. पहा : **आणेगा** : 'रामसमर्था त्याची आहे मज अनेगा ।' – पला ३८.९९. २. प्रत्यवाय; दोष; विघ्न; अडचण; निषेध : 'खुटेकर धनगरांना जाते, कंजारणीला सूप, फासेपारध्यांना दिवा व जोडा, अशा अनेक अनेगा आहेत.' – गांगा १६७.

**अनेटी** क्रिवि. फुकट; वाया : 'तवा तुमास द्येला तर, ता काय अनेटी जाणार नाय!' – अउआ १२५.

**अनेत्र** क्रिवि. अन्यत्र; दुसऱ्या ठिकाणी. [सं. अन्यत्र]

**अनेत्रता** स्त्री. (वै.) आंधळेपणा; दृष्टिहीनता. [सं.]

**अनेळी** वि. गुळाची एक जात. (विशिष्ट पद्धतीने बनविलेला गुळाचा प्रकार; याचा उपयोग औषधात व काही दुखण्यात करण्यात येतो.) (को.)

**अनैकमत्य** न. एकमत नसणे; मतभिन्नता (ऐकमत्याचा उलट).[सं.]

**अनैकांतिक** वि. १. अस्थिर; चंचल. २. मूळ मुद्दयास सोडून असलेले; गौण. ३. (न्याय.) असिद्ध, विरुद्ध, अनैकांतिक, प्रकरणसम आणि कालात्ययापदिष्ट या पाच हेत्वाभासांपैकी एक; साध्याविषयी संशय उत्पन्न करण्याला जो कारणीभूत होतो तो किंवा जो व्यभिचारयुक्त असतो तो अनैकांतिक होय. [सं.]

**अनैक्य** न. १. फरक; भिन्नत्व; एकत्वाभाव. २. एकी नसणे; वैमनस्य; बेबनाव; बिघाड; वाकडे. २. द्वैत, अर्थ, वचन किंवा संदर्भ यामधील विरोध, तफावत. [सं.]

**अनैच्छिक** वि. (वै.) यदृच्छेने किंवा आवेगामुळे नकळत होणारी (हालचाल, कृती); स्वाधीन नसलेली. [सं.]

**अनैच्छिक बचत** स्त्री. (अर्थ.) सक्तीची बचत; व्यक्तीच्या इच्छेविरुद्ध करावी लागणारी बचत.

**अनैच्छिक बेकारी** स्त्री. (अर्थ.) स्वतःचा कोणताही दोष नसताना, इच्छा असूनही एखाद्याला नोकरी न मिळणे.

**अनैतिक** वि. (समाज.) सर्वसामान्य रूढ नीतिनियमांना धरून नसलेला; नीतितत्त्वाविरुद्ध असलेला; नीतिबाह्य. [सं.]

**अनैतिक व्यापार** पु. (समाज.) वेश्याव्यवसायासाठी चोरून चालणारा स्त्रियांचा व्यापार.

**अनैतिहासिक** वि. १. इतिहासाशी संबंधित नसलेली. २. वस्तुस्थितीवर, प्रत्यक्ष घडलेल्या घटनांवर न आधारलेली (कथा). ३. काल्पनिक; कल्पित. [सं.]

**अनैसर्गिक** वि. १. अस्वाभाविक; स्वभावाविरुद्ध. २. निसर्गनियमाविरुद्ध; सृष्टिक्रमाबाहेरचा; सृष्टिबाह्य. [सं.]

**अनैसर्गिक मैथुन** न. माणसाने पशूंशी केलेले मैथुन.

**अनोखा** वि. नवीन; अपूर्व; न पाहिलेला; अनोळखी : 'युद्धसहाय्यक फंडाचे मदतीकरितां मनोरंजक व अनोखे खेळ व्हावयाचे आहेत.' – के १४.२.४१. [हिं.]

**अनोज** वि. कुचंबलेले; कंटाळलेले; खिन्न झालेले : 'वनी वाट पहात असे यादव कटक । थोर अनोज झाले सकलिक । खानपानें विणें.' – जांस्व.

**अनोठा** वि. नवीन; विलक्षण; असामान्य; चमत्कारिक.

**अनोपत** न. आपत्ती; अनुपत. गावातील किंवा घरातील पुष्कळ माणसे एकाच वेळी आजारी असणे.

**अनोपाय** पु. निरुपाय; अगतिकत्व : 'प्रस्तुत आमचा अनोपाय झाला आहे.' – पेद २९.९५.

**अनोल** न. रामफळाचे झाड.

**अनोल** वि. अळणी. (खा.) [सं. अलवण]

**अनोळख** वि. १.ओळख नसणारा; नवा; अपरिचित. २. उपकार न जाणणारा : 'दुष्ट दुरात्मे अनोळख ।'– एभा २९.३७५.

**अनोळखपण** न. परकेपणा; अपरिचितपणा : 'तयां आपवियांचेंचि फिटलें । अनोळखपण ।।' – ज्ञा १०.१६३.

**अनोळखी, अनवळखी** वि. १. न ओळखीचा; न ओळखणारा; नवखा. २. बिनमाहितीचा; गैरमाहीत; ठाऊक नसलेला (इसम, बाब, लोक, वस्तू इ.).

**अनौचित्य** न. १. उचितपणा नसणे; अयुक्तपणा; अयोग्यपणा; गैरशिस्त; चुकी. २. काल व प्रसंग यांना न शोभेलसे वागणे, बोलणे. [सं.]

**अनौपचारिक** वि. १. उपचारांचा डामडौल न ठेवता केलेला; खेळीमेळीचा; मैत्रीपूर्ण. २. उपचारांची तमा न बाळगणारा; रीतीकडे, पद्धतीकडे दुर्लक्ष करणारा. ३. अनधिकृत; खाजगी. [सं.]

**अनौरस** वि. औरस नसलेला; जारज; अकरमाशा; विवाहबाह्य संबंधापासून झालेला. [सं.]

**अनौरसता** स्त्री. औरस नसलेल्या संततीचा दर्जा. [सं.]

**अनौरस संतति–ती** स्त्री. (कायदा.) ज्यांचा कायदेशीर रीतीने विवाह झालेला नाही अशा स्त्री–पुरुषांची संतती. [सं.]

**अन्करीब** क्रिवि. १. जवळ : 'फिल्हाल मऊल रोज अन्करीब येऊन पोहचतील.' – पया ३८४. २. लवकरच.

**अन्न** न. १. धान्य वगैरेचा तयार केलेला खाण्याचा पदार्थ; (विशेषतः) भात, भाकरी, भाजी पक्वान्न वगैरे नेहमीच्या खाद्यातील शरीर पोषणार्थ असलेले जिन्नस; आहार; भक्ष्य; भोज्य : 'मृत्यूचे आघवेंचि अन्न ।' – ज्ञा १८.५६३. २. (सामान्यतः) धान्य. ३. चरितार्थाचे साधन (रोजगार, नोकरी). ४. पक्वान्न; जेवण्याचा पदार्थ. ५. यंत्र इत्यादींची हालचाल चालू राहण्यासाठी द्यावे लागणारे इंधन. (वा.) **अन्न अन्न करणे – करीत फिरणे** – अन्नाकरिता भिक्षा मागणे; दारोदार फिरणे. **अन्न अंगी लागणे** – पचणे; कामी येणे; उपयोगी पडणे. **अन्न चारणे** – खाऊ घालणे; जेवू घालणे; पोसणे. **अन्न जाणे** – भूक असणे; अन्न पचणे; तोंडाला चव असणे. **अन्नपरब्रह्म** – अन्न हेच परब्रह्म. (ल.) अन्नाशिवाय दुसरे काही महत्त्वाचे नाही (असा माणूस); खादाड. **अन्नपाणी तुटणे, राहणे** – अन्नावर वासना नसणे; तोंडास चव नसणे; भूक कमी होणे. **अन्नपाणी सोडणे** – अन्न न खाणे; अन्नपाणी टाकणे; उपाशी राहणे. **अन्न व खोबरे बरोबर असणे** – श्रीमंत पण कंजूष माणसाला लावतात. **अन्नाआड येणे, वर उठणे** – एखाद्याच्या उदरनिर्वाहाच्या साधनात व्यत्यय आणणे किंवा ते साधन नाहीसे करणे; पोटावर पाय आणणे. **अन्नाचा किडा** – १. खादाड. २. नुसता खाऊन स्वस्थ बसणारा माणूस; वृद्ध किंवा लहान मूल. **(एखाद्याच्या) अन्नाचा असणे** – एखाद्याचा आश्रित असणे. **अन्नाचा मारलेला खाली पाही** –

(तलवारीचा मारलेला वर पाही) = अन्न खाऊ घातल्यास तो नेहमी आपल्याशी नम्र आज्ञाधारक राहतो. परंतु मनुष्यावर प्रहार केल्यास तो उलट प्रतिकार करण्यासाठी मगरूरपणे टवकारून वर पाहू लागतो. (ल.) दयेने, सौम्यतेने माणूस जिंकला जातो, कठोरतेने मनुष्य शत्रू बनतो. **अन्नाची लाज धरणे**– खालेल्या अन्नाबद्दल उतराई होणे; कृतज्ञता वाटणे. **अन्नाचे खोबरे होणे** – अन्नाची वाण किंवा दुष्काळ होणे – पडणे, (ज्या देशात खोबरे फार कमी व महाग तेथील लोकांच्या तोंडात असलेली म्हण). **अन्नाचे पाठी लागणे** – निर्वाहाच्या साधनांच्या मागे लागणे; नोकरी करणे, पाहणे. **अन्नाचे पाणी करणे, होणे** – अन्नातील पौष्टिकपणाचा व चवीचा नाश करणे, होणे; अन्न निःसत्त्व व बेचव करणे; (खाण्याच्या वेळी काहीतरी अभद्र, अनिष्ट किंवा भीतिप्रद बोलण्यामुळे). **अन्नाच्या गारगोट्या** – (गारगोट्यासारखे थंड झालेले) अगदी निवलेले अन्न. **अन्नात माती कालविणे, घालणे** – एखाद्याच्या निर्वाहाच्या साधनांचा नाश किंवा बिघाड करणे; पोटावर पाय आणणे; अन्नाआड येणे; नोकरी घालविणे. **अन्नात माशी पडणे** – माशी अन्नाबरोबर पोटात गेली असता अन्न ओकून पडणे. त्यावरून, अगदी सिद्ध होत असलेल्या कामात अवचित काही अनिष्ट गोष्ट घडून कार्यनाश होणे : 'त्यागमति असी कोठुनि आली या भोजनांत हे मासी ।' – मोआश्रम ३.२९. **अन्नामुळे वाळणे** – अन्नाच्या अभावामुळे रोड किंवा कृश होणे; खंगणे. **अन्नावर अन्न वस्त्रावर वस्त्र** – अन्न जिरले नाही तोच पुन्हा अन्न सेवन करणे व एकाच्या ठिकाणी अनेक वस्त्रे घालणे (केव्हाही अहितकारक आहे; यावरून कोणतीही वस्तू चांगली असली तरी मितपणा सोडून एकसारखे अधिक सेवन करू नये.). **अन्नावर वाढणे** – आश्रयावर लहानाचे मोठे होणे. **अन्नास जागणे** – (पोशिंद्याला) कृतज्ञ राहणे; ऋणी असणे; उपकार स्मरून उतराई होणे. **अन्नास महाग, मोताद** – अत्यंत दरिद्री; कंगाल; नेहमीच्या सामान्य गरजांची वाण असलेला; बुभुक्षित. **अन्नास याजित होणे** – अन्नास महाग होणे; पारखे होणे : 'घरेदारे प्रपंच केला तो सर्वस्वी हरण होऊन अन्नास याजित जाहलो. ' – ऐसंसाखं ११.२८. **अन्नास लावणे** – निर्वाहाचे साधन मिळवून देणे; काम, उद्योग, धंदा देणे.

**अन्न** वि. (अप.) दुसरा : 'देवावाचूनि नेणे अन्न ।' – दास १४.५.३०.

**अन्न–अरिष्ट** (कृषी.) अन्नधान्याची कमतरता; अतिवृष्टी, अवर्षण, थंडीची लाट, रोग व कीड इत्यादींमुळे घटलेले अन्नधान्य पिकांचे उत्पादन.

**अन्नई** स्त्री. ताट ठेवण्याची लोखंडी अगर पितळी तिवई; अडणी. (व.)

**अन्नकूट – कोट** पु. बलिप्रतिपदेच्या दिवशी गोवर्धनादी देवापुढे ठेवण्याचा अनेक प्रकारच्या खाद्यपदार्थांचा ढीग. [सं.]

**अन्नकोश–ष** पु. शरीर; पहा: **अन्नमयकोश** [सं.]

**अन्नगुरु–रू** पु. १. खादाड. २. अन्नाचा किडा, पिंड.

**अन्नछत्र** पहा : **अन्नसत्र** [सं. अन्नसत्र]

**अन्नत्याग** पु. प्रायोपवेशन; अन्न वर्ज्य करणे. [सं.]

**अन्नदाता** पु. १. अन्न देणारा; जेवू घालणारा; पोषण करणारा. २. यजमान. ३. चरितार्थाची साधने मिळवून देणारा; अन्नास लावणारा. [सं.]

**अन्नदान** न. अन्नसंतर्पण; जेवू घालणे; भोजन देणे. [सं.]

**अन्नदेवता** स्त्री. १. खाद्यपदार्थादी उपजीविकेच्या वस्तूंवर अधिष्ठित असलेली देवता; अन्न देणारी देवता; प्रयोजन, जेवणावळ वगैरे प्रसंगी हिची आराधना करतात. २. (देवतातुल्य) अन्न; धान्य. [सं.]

**अन्नद्वेष** पु. १. अन्नाचा वीट, तिटकारा, कंटाळा असे ज्यामुळे होते तो विकार. [सं.]

**अन्नधान्य पीक** न. (कृषी.) ज्वारी, बाजरी, गहू, भात, मका, नाचणी यासारखी पिके.

**अन्नधान्ये** न. अन्न म्हणून उपयोगात आणली जाणारी धान्ये. [सं.]

**अन्ननलिका** स्त्री. पहा : **अन्नमार्ग**

**अन्नपचन, परिपाक** न. अन्न पचणे, जिरणे. [सं.]

**अन्नपाणी** न. १. अन्न आणि पाणी. २. जीविताला आवश्यक असलेल्या वस्तू; निर्वाहसाधने.

**अन्नपान** न. (विप्र.) अन्नप्राशन. [सं.]

**अन्नपूर्णा** स्त्री. १. दुर्गा; पार्वती; भवानी; अन्नदात्री; अन्नाधिष्ठित देवता; समृद्धिदेवता. २. (ल.) जिच्या हातचा स्वयंपाक, अन्न पुरवठ्यास येते अशी बाई; स्वयंपाकीण. ३. (उप.) भिक्षेची, माधुकरीची झोळी.

**अन्नपूर्णी** स्त्री. काशीकडील पाणी पिण्याचे भांडे (काशीच्या अन्नपूर्णा देवीच्या नावावरून). (वा.) **अन्नपूर्णी येणे** – अन्नास पुरवठा येणे.

**अन्नप्रपाक** पु. (प्राणि.) अर्धवट पचन झालेले आतड्यातील अन्न. [सं.]

**अन्नप्राशन** न. लहान मुलास प्रथम अन्न खाऊ घालण्याचा, उष्टावण्याचा विधी. (सोळा संस्कारापैकी एक) : 'गर्भादान, पुंसवन । जातकर्म अन्न प्राशन । ही समस्त कर्मे पूर्वी जाण । केलीं संपूर्ण चौलांत ।।' – एभा १७.२७०. [सं.]

**अन्नब्रह्म** न. पहा : **अन्नपरब्रह्म** : 'अन्नब्रम्हाते आळंकारणें ।' – दावि ३११. [सं.]

**अन्नभूली** स्त्री. अन्नाची किळस; अन्नद्वेष : 'नियतच तुज आली हे असे अन्नभूली ।' – सारुह २.८०.

**अन्नमय** वि. अन्नापासून, अन्नाचे बनलेले; अन्नावर अवलंबून असणारे (प्राण, देह, इंद्रिये इ.).

**अन्नमय कोश** पु. १. चैतन्याला आवरणभूत असलेल्या पाच कोशांपैकी पहिला; स्थूल देह (कारण हा देह अन्नापासून बनलेला असतो). २. पहा : **पंचकोश**

**अन्नमार्ग** पु. तोंड आणि पक्वाशय यांच्यामध्ये एक लांब नळी असते ती; अन्ननलिका, ही स्नायूंची असून सुमारे नऊ इंच लांब असते. [सं.]

**अन्नमोड** पु. १. अन्नपचन. २. भुकेचे समाधान; तृप्ती; अन्नासंबंधी आशापूर्ती.

**अन्नरस** पु. १. अन्नाचे पचन होऊन झालेला रस. २. अन्नांश. ३. खाणे; आहार; भक्ष्य. [सं.]

**अन्नवस्त्र** न. १. मनुष्यास निर्वाहार्थ लागणारे अन्न आणि वस्त्र. २. (कायदा.) आपल्या पोषणाची तजवीज कायदेशीर रीतीने एखाद्या व्यक्तीकडून

अगर मालमत्तेतून करून घेण्याचा हक्क; यास अन्नवस्त्राचा हक्क असे म्हणतात; कायदेशीर विभक्तता किंवा घटस्फोट यानंतर स्त्रीला नवऱ्याकडून दिली जाणारी रक्कम; पोटगी; जितरोटी; खावटी. [सं.]

**अन्नवाहिन्या** स्त्री. अव. (वानस.) पानातून अन्य भागात अन्न पोहोचवणाऱ्या वाहिन्या.

**अन्नविकार–विकृति** पु. स्त्री. १. अपचनामुळे पोटात – आतड्यात झालेला विकार, बिघाड. २. अन्नद्वेष; अन्नावर वांच्छा नसणे. ३. अन्नाचे रूपांतर; एक अवस्था; अन्नापासून बनलेले (प्राणी, शरीर, अवयव इ.) रूप. ४. अन्नामध्ये होणारा रासायनिक फरक; अन्नाच्या घटकांपासून तयार होणारा एक नवीन पदार्थ. [सं.]

**अन्नविपाक** पु. १. अन्नपचन झाल्यानंतरची अवस्था. २. अन्नपचनाची क्रिया. ३. अन्नपचनानंतर बनलेले द्रव्य (रक्त, मांस इ.)

**अन्नविषबाधा** स्त्री. (वै.) रोगकारक सूक्ष्म जीव अथवा त्यापासून निर्माण झालेल्या विषारी पदार्थामुळे दूषित झालेल्या अन्नाच्या सेवनामुळे होणारी विषबाधा. [सं.]

**अन्नव्यवहार** पु. रोटी व्यवहार; जेवण; पंक्तिभोजन; एकमेकांच्या हातचे खाणे; एका ठिकाणी किंवा परस्परांच्या घरी भोजन करणे. [सं.]

**अन्नशांति–ती** स्त्री. १. (विप्र. अन्नशांत). भुकेल्यांना, क्षुधितांना अन्नदान करणे. २. ब्राह्मणभोजन. [सं.]

**अन्नशुद्धि–द्धी** स्त्री. १. अन्न भोजनास योग्य करण्यासाठी किंवा नैवेद्यासाठी भातावर तूप वाढावयाचे हा विधी. २. तूप; अन्नशुद्धीचा पदार्थ. [सं.]

**अन्नशेष** पु. उच्छिष्ट अन्न; उष्टे; जेवण झाल्यावर राहिलेले अन्न. [सं.]

**अन्नसत्याग्रह** पु. एखाद्या गोष्टीचा निषेध म्हणून अन्न घेण्याचे नाकारणे; एखाद्या तत्त्वासाठी उपोषण करणे : 'बाहेरच्या उठावाची आग तुरुंगात अन्नसत्याग्रह करून पेटत नसते.' – पएको २१४.

**अन्नसत्र** न. (विप्र. अन्नछत्र) १. याचकवर्ग किंवा ब्राह्मणलोक यांना भोजन देणे; अन्नदानाचे धर्मकृत्य. २. या कामासाठी बांधलेली इमारत; अन्नछत्राचे गृह. ३. मुक्तद्वार.

**अन्नसंतर्पण** न. अन्नदान; अन्नशांती. [सं.]

**अन्नसंपर्क– संस्कार** पु. जेवण जेवणे; भोजन करणे. (प्रत्यक्ष जेवणे. उपहार किंवा अल्पाहार नव्हे); आहार.

**अन्नसामग्री** स्त्री. स्वयंपाकासाठी आवश्यक असलेली सामग्री. [सं.]

**अन्नाच्छादन** न. उदरनिर्वाहाची तरतूद; अन्नवस्त्र. [सं.]

**अन्नाठी** स्त्री. पावशेर. (गो.) [अर्ध + निठवे]

**अन्नादि–दी** वि. १. अन्न आणि इतर. २. जीवनाच्या अत्यावश्यक गरजांसाठी वापरण्यात येणारा शब्द.

**अन्नान्नगत–ती, दशा** स्त्री. अन्न! अन्न! करीत दारोदार भटकत फिरण्याची अवस्था; अत्यंत विपन्नावस्था; कंगालपणा; घोर दारिद्र्य. [सं.]

**अन्नाभायर** वि. (अन्नाबाहेर अप.) अन्न खावयास मिळू नये असे (करणे). [सं. अन्न + बहिः]

**अन्नार्थी** वि. १. अन्नाची जरुरी असलेला; अन्नाच्या मागे लागलेला; अन्नासाठी हपापलेला. २. जीविताला आवश्यक असलेल्या वस्तूंची जरुरी असलेला किंवा त्या वस्तूंच्या शोधात असलेला. [सं.]

**अन्नावणे** अक्रि. भुकावणे; भुकेजणे; भुकेलेला असणे; भुकेने व्याकूळ होणे; अन्न न मिळाल्यामुळे दुःस्थितीत असणे. [सं. अन्न]

**अन्नाशय** पु. जठर; पोट; उदर; कोठा; कोथळा. [सं.]

**अन्नाहारी** वि. शाकाहारी; निरामिष : 'मी अन्नाहारी आहे.' – सप्र ६५.

**अन्नोदक** न. १. अन्न आणि पाणी. २. योगक्षेम वृत्ती; उपजीविका साधन, व्यवस्था. [सं.]

**अन्नोदक ऋणानुबंध** पु. १. अन्नोदक दिल्या घेतल्याने उत्पन्न होणारा संबंध; पूर्वजन्मी केलेल्या सुकृताची, ऋणाची किंवा उपकाराची या जन्मी फेड; प्रारब्धाने कारणीभूत झालेला संबंध. २. अन्नोदक देण्यासारखा जडलेला संबंध; झालेला उपकार. [सं.]

**अन्मार्ग** पु. वाईट मार्ग : 'अशुद्ध अन्मार्गी चालती जन ।' – दावि ३. [सं. अ + मार्ग किंवा अन्य मार्ग]

**अन्मीख** वि. अनिमिष; पापण्यांची उघडझाप न करता : 'अन्मीखे पाहों ठेलें । राजा मुरारि तें ।।' – वछा ७३. [सं. अनिमिष]

**अन्य** वि. १. दुसरा; इतर. २. एकरूप नसलेला; परका; निराळा; भिन्न; वेगळा. ३. अधिक. [सं.]

**अन्यकथन** न. इतर पंथीयांना आपले शास्त्र सांगणे : 'अन्यकथने जाए' – लीचउ १९८.

**अन्यकारणक** ज्याचे कारण वेगळे आहे असा : 'अन्य कारणकाचि तैशिया ।'– ज्ञा १६.२७७.

**अन्यक्रामण** न. १. तणाव २. हस्तांतरण ३.भिन्न कार्याकडे वळवणे.

**अन्यच्च** वि. दुसरे; अधिक.
क्रिवि. पुन्हा; आणखी. [सं.]

**अन्यजन्मार्जित** वि. मागील जन्मात केलेले किंवा मिळवलेले (सुकृत, दुष्कृत, पुण्य, पाप). [सं.]

**अन्यतम** वि. दुसरा; अनेकांपैकी कोणताही एक; कोणीही एक; कोणीही; कोणताही. [सं.]

**अन्यतर** वि. १. दोहोपैकी कोणताही एक. २. दुसरा; वेगळा; निराळा; भिन्न. [सं.]

**अन्यतः** अ. दुसऱ्यामुळे, कडून, पासून, कडे. [सं.]

**अन्यत्किंचित्** न. १. दुसरे काहीतरी; वेगळे; निराळे. २. सध्या न दिसणारे; (वर्तमान सुखदुःखास कारणीभूत असा) पूर्वजन्मातील पापपुण्याचा शेष; पूर्वजन्मार्जित; संचित. [सं.]

**अन्यत्र** क्रिवि. १. दुसरीकडे; कोठेही दुसऱ्या ठिकाणी; इतर स्थळी : 'नाना एका ठाऊनि उठी । अन्यत्र नव्हे पैठी ।' – अमृ ७.१८८. २. खेरीज; शिवाय; वाचून. [सं. अन्यत्र]

**अन्यत्र उपस्थिति–ती** स्त्री. (कायदा.) गुन्हा घडला त्यावेळी आपण त्या ठिकाणी नव्हतो तर इतर ठिकाणी होतो असा आरोपीचा दावा.

**अन्यत्रजात** वि. (भूशा.) दुसरीकडे तयार झालेला, बनलेला; तयार.

**अन्यत्रठायी** क्रिवि. (अशुद्ध प्रयोग) दुसऱ्या ठिकाणी; अन्यस्थळी.

**अन्यत्रवासी जमीनदार** पु. आपल्या मालकीची जमीन जिथे असेल

तिथे न राहता दुसऱ्या ठिकाणी राहणारा जमीनमालक.

**अन्यत्रवासी क्षेत्रस्वामी** पु. इतर ठिकाणी राहून मालकीहक्क बजावणारा जमीनमालक, घरमालक इत्यादी.

**अन्यथा** क्रिवि. १. नाहीतर; नाहीपेक्षा; एरवी; असे नसेल तर. २. दुसऱ्या रीतीने, प्रकाराने, पद्धतीने; अन्य प्रकारे; वेगळ्या तऱ्हेने : 'हें वांचूनि पार्था । राहाटों नये अन्यथा ।' – ज्ञा ३.१२६. ३. खोटे; असत्य; मिथ्या; अयथार्थ; अनृत. ४. विपरीत; व्यर्थ. ५. चुकीनें; अयोग्यपणाने; गैररीतीने. [सं.]

**अन्यथाख्याति–ती** स्त्री. (तत्त्व.) एका प्रकारचे विधान; चुकीचे विधान; पहा : **ख्याति** : 'आख्याति अन्यथाख्याती । शून्यख्याती सत्ख्याती । अनिर्वचनीय जे ख्याती । तो वादू निश्चिती मी उद्धवा ।।' – एभा १६.२०७. [सं.]

**अन्यथात्व** न. विपरीत प्रकार : ' जे नेणणें माझें प्रकाशूनि । अन्यथात्वें मातें दाऊनिं ।' – ज्ञा १८.१११४. [सं.]

**अन्यथादृष्टि–ष्टी** स्त्री. विपरीत ज्ञान : 'अवस्थात्रय तिन्ही लोक । प्रकाशूनि अशेख । अन्यथा दृष्टि पांथिक । चेवविलें ।' – ज्ञा १८.१३००. [सं.]

**अन्यथानुपपत्ति–त्ती** स्त्री. (तत्त्व.) एका वस्तूच्या अभावी दुसऱ्या वस्तूच्या अस्तित्वाची किंवा उत्पत्तीची असंभवनीयता.

**अन्यथाबोध** पु. विपरीत ज्ञान; समजूत : 'पै अन्यथाबोधु आघवा । मावळौनि तया पांडवा ।' – ज्ञा १८.९६४. [सं.]

**अन्यथाभाव** पु. पालट; बदल; अवस्थांतर (विशेषतः वाईट); अपकर्ष; ऱ्हास; अधोगती. [सं.]

**अन्यथामति–ती** स्त्री. विपरीत ज्ञान, बुद्धी : 'ते वेळीं विश्वस्वप्नासहितें । कोण अन्यथामति निद्रेतें । सांभाळी नुरेचि जेथे । मायाराती ।।' – ज्ञा १६.११.

**अन्यथावृत्ति–त्ती** वि. वृत्तीत फरक किंवा चलबिचल झालेला; मनोविकारांनी पीडित.

**अन्यथासिद्ध** वि. १. इतर काही उपायांनी, मार्गांनी साधलेले, स्थापन केलेले. २. (तर्क.) जो नसला तर गरज भागविता येईल असा; ज्या वाचून अडणार नाही असा; अनावश्यक; (जसे मडक्याची माती आणावयास गाढवच पाहिजे असे नाही. दुसरा आणू शकेल यावरून व्यापक) कुचकामाचा; व्यर्थ; फुकट; निरुपयोगी. ३. चुकीने सिद्ध केलेला (योग्य कारण न देता). [सं.]

**अन्यथासिद्धि–द्धी** त्री. १. काहीतरी, निराळ्या उपायाने सिद्ध करणे; साध्य करणे. २. त्याचा पूर्वपक्षावरून वेगळा, भलता निर्णय प्रस्थापित करणे. ३. (ल.) चुकीचे अनुमान.

**अन्यथाज्ञान** न.१. विपरीत ज्ञान : 'आतां अन्यथाज्ञानीं । या दोनी अवस्था जया जनीं ।' – ज्ञा १५.५२६. २. चूक. [सं.]

**अन्यदा** क्रिवि. दुसऱ्या वेळी, प्रसंगी; एकदा; कोणे एके काळी.

**अन्यदीय** वि. दुसऱ्यासंबंधी; दुसऱ्याच्या; परकीय. [सं.]

**अन्यदेशीय** पु. दुसऱ्या देशाचा नागरिक; दुसऱ्या राष्ट्राचा प्रजाजन; परदेशी मनुष्य. [सं.]

**अन्यदेशीयता** स्त्री. १. दुसऱ्या देशाशी असलेली बांधीलकी, निष्ठा. २. विदेशीयत्व. [सं.]

**अन्यधर्म** पु. ईश्वराव्यतिरिक्त इतर देवतांचे धर्म : 'श्रेष्ठत्व प्रकाशे तेणे अन्यधर्मु : विकारू उपजे : अन्यधर्में पुरुषु धर्मापासौनि जाए '– लीचउ ४८२.

**अन्यपूर्व** वि. पूर्वी दुसऱ्याचे असलेले; विवक्षित कालापूर्वी जीवर दुसऱ्याची मालकी होती अशी (भूमी, वृत्ती इ.). [सं.]

**अन्यपूर्वा** स्त्री. एकाशी अगोदर वाङ्‌निश्चय झाला असून मग दुसऱ्याशी जिचे लग्न झाले आहे किंवा होणार आहे अशी मुलगी. वि. पुनर्विवाहित. [सं.]

**अन्यबीज** वि. दुसऱ्याच्या पोटचा; जारज : 'कुलगुरू देव विद्या जो शिकवी । त्यासी जो नाठवी अन्यबीज ।।' – ब गाथा २५०.

**अन्यभृत्** पु. कावळा; दुसऱ्यांना पोसणारा . (कावळी कोकिळेची अंडी स्वतःची म्हणून उबवते यावरून). २. कोकिळ; दुसऱ्याने पोसलेला. [सं.]

**अन्यमनस्क, अन्यमना, अन्यमानस** वि. १. विचारात व्यग्र असल्यामुळे भोवतालच्या परिस्थितीचे भान नसलेला; आपल्याला काय करावयाचे आहे व आपण काय करीत आहोत याची जाणीव नसलेला. २. मन किंवा विचार इतरत्र संचारत असणारा; अनवधानी; दुर्लक्ष असलेला; बेभान; भ्रमिष्ट; विमनस्क. ३. चंचल वृत्तीचा; अविश्वासू; एकनिष्ठ नसणारा. [सं.]

**अन्यमूर्ति–र्ती** वि. दुसऱ्या आकाराचा; रूपांतरित; भिन्नरूपी; दुसरा देह धारण केलेला. [सं.]

**अन्यरेताचा** वि. अन्यबीज; जारज (शिवी) : 'यः पुत्रो पितरोद्वेषी वचन । द्वेषी ब्रम्हविदो जनः दुर्जन । तो अन्यरेताचा म्हणोन खूण । दाविती पंडित शास्त्रांतरीं ।।' – दावि ७६३. [सं. अन्यरेतस्]

**अन्यवसें** वि. इतरांच्या अधीन : 'हे (वाहांटुळी) अन्यवसें' – लीचउ ५८५.

**अन्यवादी** वि. १. खोटी साक्ष देणारा. २. प्रतिवादी.

**अन्यव्रत** वि. १. वेदोक्त देवतार्चन व विधी न पाळणारा. २. नास्तिक; पाखंडी. ३. विधर्मी.

**अन्यशाखी** वि. दुसऱ्या शाखेचा; पंथाचा (वेद, धर्ममत इ. च्या). [सं.]

**अन्यसंक्रामक** वि. (कायदा.) मालमत्ता दुसऱ्याच्या हवाली करणारा; विकणारा. [सं.]

**अन्यसंक्रामण** न. (कायदा.) दुसऱ्याच्या हाती देणे; परहस्तगत करणे; मालकी हक्काचे हस्तांतरण. [सं.]

**अन्यसंक्राम्यता** स्त्री. (कायदा.) मालकी हक्काचे हस्तांतरण करण्याची क्षमता, शक्यता. [सं.]

**अन्यसाधारण** वि. सर्वसामान्य; सर्वांना लागू पडणारा; सामान्य; सार्वजनिक. [सं.]

**अन्याकार** वि. खिन्न; उदास : 'ते उठिलेः परि नावेक अन्याकार जाले' – स्मृस्थ ८०.

**अन्याय** पु. १. अपराध; गुन्हा; कायदा सोडून केलेले वर्तन; कायदेभंग. २. अनीती; अधर्म; शास्त्रातिक्रम. ३. जुलूम जबरदस्ती. ४. चुकीचा निकाल. (वा.) **अन्याय बक्षीस करणे** – अन्याय माफ करणे. **अन्याय मागून**

**घेणे** – गुन्हा कबूल करून तो माफ करवून घेणे.

**अन्यायवर्तन** पहा : **अन्यायवृत्ति**

**अन्यायवर्ती** वि. दुर्व्यसनी; दुर्वर्तनी; दुराचारी; वेडीवाकडी वर्तणूक करणारा; गैरशिस्तीने वागणारा.

**अन्यायवृत्ति** स्त्री. अनीतीने वागणे; गैरशिस्त वागणूक; स्वैर–वर्तन. [सं.]

**अन्यायाचा प्रतिबंध** पु. (कायदा.) ज्या दिशेकडे कोणा मनुष्याचा हक्क आहे, त्या दिशेकडे जाण्यास हरकत.

**अन्यायाची कैद** स्त्री. अमुक मर्यादेच्या पलीकडे कोणत्याही दिशेने जाण्यास केलेला प्रतिबंध.

**अन्यायी** वि. १. अपराधी; अपराधाचा; गुन्हेगारीचा; दोषी. २. अनीतीचा; अधर्मी; अयोग्य आचरण करणारा; पापी. ३. कायदा सोडून वागणारा. [सं.]

**अन्यायोपार्जित** वि. अनीतीने संपादिलेले; अन्यायाने, अनीतीने मिळवलेले (द्रव्य वगैरे). [सं.]

**अन्याय्य** वि. सदोष; कायद्याला, नीतीला धरून नसलेले.

**अन्याय्य वर्तन** न. अनीतीने वागणे; गैरशिस्त वागणूक; स्वैर वर्तन. [सं.]

**अन्याव –अन्यो** पु. अपराध; चुकी; गुन्हा : 'द्रौपदी वस्त्र हरण पहाहो । मुख्य अन्यावो हा कौरवांचा ।।' – एभा १.२१२. [सं. अन्याय अप.]

**अन्यून** वि. उणीव नसलेले; पूर्ण; सगळे; अव्यंग. [सं.]

**अन्येद्युष्क** पु. (आयु.) रोज येणारा हिवताप. [सं.]

**अन्योक्ति –क्ती** स्त्री. १. आडून बोलणे; अप्रत्यक्ष बोलणे. २. एक अर्थालंकार; अप्रस्तुत प्रशंसा. अप्रस्तुत गोष्टीच्या वर्णनाने प्रस्तुत गोष्टीची प्रतीती. (१) कार्यावरून कारणाचे, (२) कारणावरून कार्याचे, (३) सामान्यावरून विशेषाचे व (४) विशेषावरून सामान्याचे वर्णन करणे. ही अन्योक्तीची काही अंगे आहेत. ३. गूढ अर्थाचे भाषण : 'परोक्ष वाद वेदव्युत्पत्ती । त्यागसुखें गा अन्योक्ती । सांडवी विषयासक्ती । ब्रह्मप्राप्ती लागूनी ।।' – एभा २१.३५३. [सं.]

**अन्योन्य** वि. १. एकमेक; परस्पर : 'धावति अन्योन्यवरि ते दोघे आठवूनि अपकार ।' – मोकर्ण ४५.२. २. एक अर्थालंकार. एकाच क्रियेच्या द्वारे दोन वस्तू परस्परांस उपकारक होतात असे वर्णन. परस्परांनी परस्परांना भूषविण्याचा प्रकार. ३. सर्वस्वी. [सं.]

**अन्योन्यक्रिया** स्त्री. एकमेकांवर अवलंबून असलेल्या किंवा एकमेकांवर परिणाम करणाऱ्या क्रिया. [सं.]

**अन्योन्यक्रिया संरूपण** न. (भौ.) दोन पदार्थांची एकमेकांवर क्रिया होऊन त्यांचा होणारा बाह्याकार.

**अन्योन्यता** स्त्री. १. एकमेकांशी संबंधित असणे: 'द्विघातीक अन्योन्यतेविषयी त्याला नियम शोधावयाचा होता...' – कग १७२. २. राष्ट्राराष्ट्रातील परस्पर देवाणघेवाण; दोन राष्ट्रांनी परस्पर संमतीने केलेली कामे; परस्परसंबद्धता. [सं.]

**अन्योन्यदर्शी** वि. (भू.) एखादी विशिष्ट कल्पना अथवा वस्तू चित्ररूपाने दाखविण्यासाठी वापरलेले (चिन्ह अथवा आकृती.) उदा. धोका दाखविण्यासाठी कवटी व फुलीच्या आकारात दोन हाडे दाखवतात ती. [सं.]

**अन्योन्यपक्षनयन** न. (गणित) संख्या एका पक्षातून दुसऱ्या पक्षात नेणे.

**अन्योन्यपोषक** वि. परस्परांचे समर्थन करणारे.

**अन्योन्यभाव** पु. १. परस्परांमधील परस्परांचा अभाव. उदा. घट तो पट नव्हे, पट तो घट नव्हे अशा प्रतीतीने समज. २. (न्याय.) पूर्ण भेद. पहा : **अभाव** [सं.]

**अन्योन्य लवचिकता** स्त्री. (अर्थ.) वस्तूंच्या मागणीचा व किंमतीचा परस्परावलंबी लवचिकपणा; एकमेकांवर अवलंबून असल्याने सहजपणे बदलण्याची स्थिती.

**अन्योन्यविण** वि. अनन्वित; भलतेसलते; गैरशिस्त : 'बोलो नये घडलें ऐसें अन्योन्यविण । दासीगमन आदिकरूनी ।' – तुगा ४०६५.

**अन्योन्यविसरण** न. (भौ.) परस्परावलंबी अभिसरण. रेणूंची मर्यादित कक्षेतील इतस्ततः हालचाल. या हालचालीमुळे ते एकमेकांत मिसळून जातात. [सं.]

**अन्योन्यसंपूरक** वि. एकमेकांना पूरक. [सं.]

**अन्योन्यसंबंध** पु. दोन व्यक्तींचा, गोष्टींचा किंवा वस्तूंचा परस्पर संबंध.

**अन्योन्यसंमिश्रता** स्त्री. दोन व्यक्तींचा किंवा वस्तूंचा एकमेकात मिसळून जाण्याचा गुण.

**अन्योन्याध्यास** पु. सत्यावर मिथ्याचा व मिथ्यावर सत्याचा होणारा आभास. [सं.]

**अन्योन्यावलंबी** वि. एकमेकांच्या आश्रयाने असलेले; एकमेकांवर अवलंबून असलेले; परस्परावलंबी. [सं.]

**अन्योन्याश्रय** पु. परस्परांचा परस्परांना आधार; परस्परांमधील साहाय्य; परावलंबन; कार्यकारणभाव संबंध. [सं.]

**अन्योन्याश्रयता** वि. परस्पराश्रयित्व; एकमेकांचा आश्रय घेणे. [सं.]

**अन्योन्याश्रित** वि. परस्परांवर अवलंबून असणारे; परस्परांकडून साहाय्यभूत. [सं.]

**अन्योन्योक्ति–क्ती** स्त्री. संभाषण. [सं.]

**अन्योविण्य–न्य** वि. १. असंबद्ध; विचित्र; अर्धवट; विसंगत; गैरशिस्त (भाषण, लेखन इ.) २. कल्पनातीत; स्वैर; बेफाम; बेकैद (आचरण, वर्तन इ.) : 'जैसा मदिरापानें उन्मत्त । विसरूनि आपुला निजस्वार्थ । मग अन्योविन्य अनर्थ । आत्मघात करू धावे ।' – एभा १३.२२७. ३. भरमसाट; अद्वातद्वा : 'पुढे अन्योविण्य वर्णसंकर ।' – दास ६.४.८६. पहा : **अन्योन्यविण**

**अन्वय** पु. १. संबंध; अवलंबून असणारे अस्तित्व; आधार; मिलाफ; योग; संयोग : 'प्रसंग अन्वय राखतें ।' – वेसीस्व २.२३. २. (व्या.) व्याकरणात अनेक पदे, वाक्ये यांचा परस्पर अर्थानुरोधी संबंध (कर्तृकर्मक, क्रियाकारक, विशेषण = विशेष्य इ.). ३. काव्याची गद्यमय सरळ रचना; एखाद्या कवितेतील शब्दांची रचना बदलून आपण नेहमी बोलतो त्याप्रमाणे करणे. ४. तर्क पद्धतीस अनुसरून रचना. ५. इंगित; कल; धोरण; मुद्दा; हेतू; उद्दिष्ट; सारांश. ६. कुल; जाती; परंपरा; वंश : 'विटंबिला अन्वय भूभुजांचा ।' – सारुह ३.२३. ७. (न्याय.) विगमनाचा एक मार्ग. ८. ओघ; अनुसंधान : 'पुढे कथेचा अन्वय । सावध ऐका ।।' – दास ५.१०.८. ९. व्याप्ती;

पहा : **अन्वयव्याप्ती.** १०. (सामान्यतः) कार्यकारण संबंध. ११. मागून जाणे. १२. योग; संबंध. [सं.] (वा.) **अन्वय लावून बोलणे** - दुसऱ्यास न दुखविता बोलणे; गोडीने बोलणे; (ल.) काम साधणे; लांबण लावणे.

**अन्वयमार्ग** पु. वृत्ताच्या (घटनेच्या) दोन किंवा अधिक उदाहरणांमध्ये आणखी एक सर्वसाधारण कारण दाखविणारे वृत्त. [सं.]

**अन्वयमुखे** क्रिवि. प्रत्यक्ष रीतीने; पदार्थ आहे असे कल्पून अर्थ समर्थन करण्याचा एक प्रकार (व्यतिरेक मुखे याच्या विरुद्ध). [सं.]

**अन्वययोजना** स्त्री. काव्यातील शब्द सरळ गद्य वाक्यात मांडणे; अन्वय करणे. (सामा.) वाक्यरचना. [सं.]

**अन्वय व्यतिरेक** पु. १. एकी व भेद; ऐक्य भेदाची सांगड. २. (तर्क.) अन्वय म्हणजे अमुक गोष्ट असता अमुक गोष्ट घडणे आणि व्यतिरेक म्हणजे अमुक गोष्ट न घडली तर अमुक दोष उत्पन्न होईल अशा प्रकारचा साध्य व साधन यांच्यामधील परस्परसंबंध; भावाभाव संबंध : 'अन्वये आणि वीतरेक । हा शब्दभेद कोणी येक । निःशब्दाचा अंतरविवेक । शोधिला पाहिजे ।।' - दास ९.२.२१. [सं.]

**अन्वयव्यतिरेक व्याप्ति-प्ती** स्त्री. (तर्क.) अन्वय (अस्ति) व व्यतिरेक (नास्ति) उभयपक्षी संबंध; दोन वस्तूंचा भाव व अभाव यांचे साहचर्य. उदा. जेथे धूर असतो तेथे विस्तव असतो, ही अन्वय व्याप्ती आणि जेथे विस्तव नसतो तेथे धूर नसतो ही व्यतिरेकव्याप्ती. तेव्हा विस्तव आणि धूर या जोडीसंबंधाने अन्वय व्याप्ती आणि व्यतिरेक व्याप्ती अशी आहेत. [सं.]

**अन्वयव्यतिरेकी** वि. ज्या विधानांची सत्यता सरळ व उलट दोन्ही पक्षी पटते ते. जेथे अन्वय आणि व्यतिरेक या दोहोंचाही उपयोग होतो ते. [सं.]

**अन्वयव्याप्ति-प्ती** स्त्री. (तर्क.) भावांचे साहचर्य; कार्यकारण संबंध; अस्तिपक्षी प्रमेयापासून अस्तिपक्षी अनुमान. एकाच्या अस्तित्वावर दुसऱ्याचे अस्तित्व अवलंबून असणे. उदा. धूर असेल तेथे अग्नी असतो. [सं.]

**अन्वयस्थळ** न. शिष्यपरंपरा, ग्रंथ व इतर वृत्त ज्यात कथन केलेले आहे ते ठिकाण. [सं.]

**अन्वयज्ञ** पु. वंशावळ जाणणारा. [सं.]

**अन्वयागत** वि. परंपरागत. [सं.]

**अन्वयी** वि. १. संबंधी. सामा. शब्द - अन्य - अपर - इतर - उत्तर - उभय - एतत् - सत् - दूर - पूर्व - अन्वयी. २. दोन गोष्टींचे साहचर्य असणारा. [सं.]

**अन्वये** (अन्वये) अ. .... ला धरून; .... प्रमाणे.

**अन्वर, अन्वार** वि. दोहोत तेजस्वी; अनेकात तेजस्वी; अधिकतर, अधिकतम तेजस्वी. [अर. अन्वार]

**अन्वर्थ, अन्वर्थक** वि. १. यथार्थ वर्णनात्मक; गुणदर्शक; सार्थ; यथार्थ; यौगिक अर्थ न सोडता अर्थाची अभिधानता पावलेला (शब्द, नाव इ.) [सं. अनु = प्रमाणे + अर्थ = शब्दार्थ] २. वास्तविक; सत्य; आभासात्मक नव्हे तो; खरा. ३. नावाबरहुकूम; लायक; योग्य. [सं. अनु + अर्थ = सत्यता]

**अन्ववसर्ग** पु. (तत्त्व.) स्वेच्छाचार; भोगवाद; मनःपूत, यथेच्छ आचरणाची मुभा. [सं.]

**अन्ववाय** पु. कुळ; वंश. [सं.]

**अन्वष्टका** स्त्री. मार्गशीर्ष, पौष, माघ आणि फाल्गुन या महिन्यांतील वद्य नवमी. [सं.]

**अन्वष्टक्य** न. अन्वष्टका दिवशीचे श्राद्ध. [सं.]

**अन्वस्त** पु. (ग.) शंकूचा विशिष्ट प्रकारे छेद घेतल्यास मिळणारी विशिष्ट रेखाकृती. तिची विमध्यता १ असते. य = ४ अक्ष² असे तिचे साध्या स्वरूपातील समीकरण असते. एक स्थिर बिंदू व रेषा यांच्यापासून नेहमी सारख्याच अंतरावर असणाऱ्या चल बिंदूमुळे निर्माण झालेली आकृती अन्वस्त असते. [सं.]

**अन्वस्ताभ** वि. (ग.) जिचा कोणत्याही अक्षास समांतर घेतलेला छेद अन्वस्त असतो अशी (त्रिमित आकृती). [सं.]

**अन्वस्तीय** वि. (वै.) परवलयाचा; परवलयधर्मी [सं.]

**अन्वा** पु. ओक्तीने पाणी चढविणारा मनुष्य उभा असतो ती जागा. पहा : **ओक्ती** [हिं. अनवा]

**अन्वाख्यान** न. स्पष्टीकरणार्थ पुन्हा सांगणे. [सं.]

**अन्वागत** वि. (तत्त्व.) संलग्न; पूर्वापार संबद्ध. [सं.]

**अन्वाचय** न. (तत्त्व.) १. संलग्नता. २. दोन गोष्टींचा परस्पर संबंध जोडणे. ३. मुख्य कार्याच्या सिद्धीबरोबर अप्रधान (गौण) कार्याचीही सिद्धी. [सं.]

**अन्वादेश** (तत्त्व.) १. पूर्वोक्त विधानाशी संबंध जोडणे. २. एका आज्ञेच्या पाठोपाठ दुसरी आज्ञा देणे. [सं.]

**अन्वाधान** न. (याज्ञिक) १. अग्नीवर समिधा ठेवणे. २. ज्या देवतांना उद्देशून याग करावयाचा त्यांचा व त्यांच्यासाठी उपयोगात आणावयाचे होमद्रव्य यांचा व आहुतीच्या संख्येचा उल्लेख करणे.

**अन्वाधेय-धेयक** न. स्त्रीधन. (विवाहानंतर बापाकडून किंवा सासरकडून मिळालेले.) [सं.]

**अन्वायोजन** न. नंतर जुळवणे, बसवणे.

**अन्वारब्ध** वि. १. एकाच कर्माचे दोन अधिकारी असल्यास एकाने प्रत्यक्ष कर्म करावे व दुसऱ्याने त्याच्या हातास आपला उजवा हात लावावा म्हणजे कर्माचे फल हात लावणारास मिळते. उदा. धार्मिक कृत्यात यजमानाच्या हातास हात लावणे. २. संबंध, स्पर्श असलेला; अनुसरलेला. [सं. अनु + आरब्ध]

**अन्वारम्भण** न. एखाद्या विशेष धर्मानुष्ठानानंतर यजमानाला स्पर्श करून वा त्याच्या पाठीवर शाबासकी देऊन त्याचे कृत्य सफल झाल्याचे त्याच्या निदर्शनास आणून देणे. [सं.]

**अन्वारंभ** पु. पहा : **अन्वारब्ध,** आचार्य, यजमान इ. जो मुख्य कर्ता त्यास कर्मकाळी इतर ऋत्विज, पत्नी इ. माणसे जो हस्तस्पर्श करतात तो. [सं. अनु +आरंभ]

**अन्वारोहण** न. सहगमन; सती जाणे. पहा : **अनुगमन**

**अन्वालोप** पु. (ग.) एखाद्या चल राशीच्या निरनिराळ्या मूल्यांमुळे निर्माण झालेल्या रेखाकृतींच्या संचातील प्रत्येक रेखाकृतीस स्पर्श करील अशी

दुसरी रेखाकृती म्हणजे त्या रेखाकृतींच्या संचाचा अन्वालोप.

**अन्वाहार्यपचन** न. (तत्त्व.) दक्षिणाग्नी; अन्वाहार्य यज्ञात वापरला जाणारा अग्नी. [सं.]

**अन्वाहार्यश्राद्ध** न. दर अमावास्येला करावयाचे पार्वण श्राद्ध; मासिक पितृश्राद्ध. [सं.]

**अन्वाहित** वि. मालकाला देण्याकरिता एखाद्या इसमाजवळ ठेवलेली (एखादी वस्तू, ठेव). उपनिधीच्या पाच प्रकारांपैकी दुसरा प्रकार.

**अन्वित** वि. १. संबद्ध; जोडलेला; युक्त. २. युक्त असलेला; आधीन; ग्रासलेला. [सं.]

**अन्विती** स्त्री. (भाषा.) वाक्यामधील शब्दांची व्याकरणाच्या दृष्टीने असलेली अनुरूपता. [सं.]

**अन्वीक्षा** स्त्री. (कायदा.) एखाद्या दिवाणी किंवा फौजदारी प्रकरणातील तथ्यांची, कायद्याप्रमाणे केलेली न्यायचौकशी. [सं.]

**अन्वेषक, अन्वेषी** १. एखाद्या घटनेची अगर प्रसंगाची तपशीलवार चौकशी, तपासणी करणारा अधिकारी; संशोधक. २. पाठपुरावा करणारी व्यक्ती. [सं.]

**अन्वेषण** न. १ एखाद्या घटनेची अगर प्रसंगाची तपशीलवार चौकशी; शोध; संशोधन. २. एखाद्या घटनेमागील हेतू, प्रेरणा इत्यादी वस्तुस्थितीची तपासणी; पाठलाग; माग काढणे. [सं.]

**अन्वेषण युग** न. (भू.) ज्या काळात नवे संशोधन सुरू होऊन नवे नवे शोध लागले व विविध साधने विकसित झाली तो काळ. [सं.]

**अन्वेषणे** सक्रि. तपास करणे; शोध करणे; माग काढणे; धुंडाळणे.

**अन्वेष्टा** पु. संशोधक; अन्वेषण करणारा. [सं.]

**अन्सार** पु. मददगार. [सं.]

**अप्–प** न. पाणी. [सं.]

**अप** अ. एक उपपद किंवा शब्दयोगी अव्यय. याचे अर्थ – १. कमीपणा; हीनता. उदा. अपशब्द, अपपाठ, अपकीर्ती. २. अभाव. उदा. अपयश, अपमान. ३. दूरता; वियोग. उदा. अपभय, अपकरण. ४. विरुद्धता. उदा. अपसव्य. [सं.]

**अपक** वि. १. न पिकलेले; अपरिपक्व; ज्यांची बुद्धी परिपक्व नाही असा : 'या अपक बुद्धीच्या बालकाला वाटले की, तो एक रत्नस्तंभच असून आपण त्यावर गंडस्थळे घासावी.' – तीम १२०. [सं. अपक्व]

**अपक(ख)रा, अपकुरा** पु. १. करवलीच्या हातात असलेले (घट) भांडे; त्यास करा म्हणतात त्यात पाणी असते म्हणून अपकरा. २. अपकारा; पाण्याची झारी : 'जिल्हइदार अपकरे वाटतें आज चरकीं धरिले । बिंब दिसे कलशांत शुद्ध अवयव शरिरावरले ।' – प्रला ११९. ३. पूजेला पाणी घेण्याचे लहान भांडे. [फा. अवखुरा]

**अपकर्ता** पु. गैरकृत्य करणारा. (विशेषतः दुसऱ्याच्या संबंधात).[सं.]

**अपकर्ष–ण** पु. १. ऱ्हास; अवनती. २. खाली ओढणे; मागे ओढणे; दूर ढकलणे. ३. कमीपणा येणे; हीनपणा येणे; अपमान–अप्रतिष्ठा होणे; हीनस्थितीस पोहोचणे. ४. वेळेपूर्वीच, अगोदर करणे (धर्मकृत्य). ५. (काव्य.) पुढे येणाऱ्या एखाद्या शब्दाचा अगोदरच अध्याहार करून एखाद्या ओळीचा किंवा श्लोकाचा अर्थ पूर्ण करणे. ६. (संगीत) पहा : **विकर्षण**

**अपकर्षक** वि. हीनता आणणारा; अपकर्षण करणारा. [सं.]

**अपकर्षणे** उक्रि. १. हीनता आणणे. २. मागे घेणे; ओढणे. ३. अर्थ लावण्याकरिता पुढील शब्द मागे घेणे. पहा : **अपकर्ष** [सं. अपकर्ष]

**अपका** पु. हपका; हाताने पाण्याचा जोरात केलेला मारा; छिडकाव (पाणी, दूध इ. शिंपडणे.) जोराने मारणे. (क्रि. टाकणे, देणे, मारणे). [सं.]

**अपकाज** न. आपले स्वतःचे काम : 'तया अपकाजार्थी : अनेगीं शब्दी प्रार्थी : परितोखु पुरलिये; स्वार्थी : यन्हवी निंदा' – ज्ञाप्र ३३०.

**अपकार** पु. १. इजा; नुकसान; दुःख; उपद्रव; रोग. २. एखाद्याचे नुकसान; दुखापत वगैरे. ३. गुन्हा; अन्याय; दोष : 'जी भृगूचा कैसा उपकारू ।।' – ज्ञा १६.२६ ४. दुसऱ्याचे वाईट किंवा अनिष्ट चिंतणे. [सं.]

**अपकार–री–कारीक** वि. अपकार करणारा; इजा, नुकसान करणारा, देणारा; त्रासदायक; उपद्रवी : 'परी तेथींची नवलपरी । अपकाऱ्या होय उपकारी ।'– एभा १७.१०८. [सं.]

**अपकारणे** अक्रि. नासून जाणे; खराब होणे : 'हा (पाऊस) असाच धिंगाणा घालत राहिला तर कोंब पिवळे पडतील. पीक अपकारेल !' – काआ ७८.

**अपकारी** पु. १. (कायदा.) कायद्याचे उल्लंघन करणारी व्यक्ती; गुन्हेगार. २. अपकार करणारा; कृतघ्न. [सं.]

**अपकार्य** न. (कायदा.) गैरकायदा वर्तणूक; गैरकायदेशीर कृत्य करणे.

**अपकिरण** न. (वा. सां.) विखुरणे.

**अपकीर्ति–र्ती** स्त्री. १. निंदा; अपमान; मानहानी. २. दुष्कीर्ती; दुर्लौकिक; बदनामी; बदलौकिक. [सं.अप+कीर्ति]

**अपकृति–ती** पहा : **अपकार**

**अपकृत्य** न. १. (कायदा.) कायद्याने घालून दिलेला नियम मोडला म्हणून नुकसान भरपाईदाखल कोर्टात फिर्याद आणता येते असा विशिष्ट गुन्हा. २. दुष्कृत्य; विघातक कृत्य: 'किचनेर यांनी लष्करी खर्च वाढविला काय आणि कर्झन साहेबांनी तिबेट मिरानमध्ये पैसे ओतले काय, हिंदुस्थानातील लोकांच्या दृष्टीने दोन्हींही एकसारखीच अपकृत्यें आहेत.'– लोटिकेले २.५९७. [सं. अप +कृ]

**अपकृष्ट** वि. १. खाली ओढलेला; अवनत. पहा : **अपकर्ष**. २. नियमित; ठरावीक काळापूर्वी केलेले. ३. मंत्रसाहाय्याने खेचून आणलेला; वश. ४. नीच; हलका; दुष्ट; अधम. [सं.अप+कृष्]

**अपकेंद्री** वि. (भौ.) केंद्रापासून दूर जाणारे, सरणारे; केंद्रपरावर्ती; केंद्रोत्सारक. [सं.]

**अपकेंद्री बल** न. (भौ.) मध्यभागातून बाहेर पडणारे बल; केंद्रापासून दूर फेकली जाणारी शक्ती. [सं.]

**अपक्रम, अपक्राम** पु. १. उलटा क्रम; व्युत्क्रम. २.(ल.) उलथापालथ; अव्यवस्था. ३. अतिक्रम; टळून जाणे; निघून जाणे. ४. (ज्यो.) क्रांती; अपम (तारे, नक्षत्र इ.चा) [सं. अप+क्रम्]

**अपक्रमण** पहा : **अपक्रम**

**अपक्रांत** वि. निघून गेलेला; टळलेला; उलटून गेलेला. [सं.]

**अपक्रिया** स्त्री. १. दुष्कृत्य; वाईट काम.२. (कायदा.) मालकाचे नुकसान

व्हावे या इराद्याने त्याच्या मालाची खराबी करणे. [सं. अप+कृ]

**अपक्व** वि. १. कच्चा; हिरवा; न पिकलेले (फळ वगैरे). २. न शिजलेला, कच्चा, अर्धवट, (भात, स्वयंपाक वगैरे.). ३. अननुभविक; कच्चा; अडाणी; कोरा. [सं.]

**अपखडी** स्त्री. निंदा : 'तरि कां अपखडि । आणावी आंगा ।।'- राज्ञा १८.९३६. [सं. अप +अक्षरी]

**अपखंडन** न. तुकडे करणे.

**अपख्यात–ति** स्त्री. अपकीर्ती : 'दयाधर्म सत्कीर्ति लोटूनि पाये । सखी जोडली म्यां अपख्यात माये ।'- मुरामा २.८७. [सं.अप+ख्या]

**अपगत** वि. १. दूर केलेला, गेलेला. २. वियुक्त; विभक्त. [सं.अप+गत]

**अपगम** न. (ज्यो.) (परम पूर्व) एखाद्या ग्रहाचे आयनिक वृत्ताच्या अनुषंगाने मोजलेले सूर्यापासूनचे किंवा एखाद्या उपग्रहाचे त्याच्या ग्रहापासूनचे पृथ्वीवरून दिसणारे कोनात्मक अंतर.

**अपगम** न. (ज्यो.) (परम पश्चिम) सूर्याच्या पश्चिमेला सूर्यापासून जास्तीत जास्त कोनात्मक अंतरावर एखादा ग्रह असताना आयनिक वृत्ताच्या अनुषंगाने मोजलेले त्या दोघांमधील कोनात्मक अंतर. [सं.]

**अपग्रह** पु. (वै.) एखाद्या पदार्थास शरीराने दिलेला (अवाजवी) प्रतिसाद.

**अपघटन** न. १. निरनिराळ्या घटकात विलग होणे; विलगीकरण. २. जीवाणूंमुळे किंवा बुरशीमुळे कुजणे, सडणे. २. विघटित होणे; नष्ट होणे; विघटन. [सं.]

**अपघटनक्षमता** स्त्री. (भौ.) पदार्थाची विघटित होण्याची क्षमता. [सं.]

**अपघर्षण** न. घर्षणाने होणारी झीज. [सं.]

**अपघर्षीवाह** पु. (भूशा.) खडकांची ज्यामुळे झपाट्याने झीज होते असा प्रवाह. [सं.]

**अपघात** पु. १. अकल्पित, अकस्मात घडलेली दुर्दैवी घटना. (आगगाड्यांची टक्कर, मोटार उलटणे इ.) २. आकस्मिक मरण (वरील रीतीने आलेले); अकाली मरण : 'मग प्रसन्न होऊनि रुक्मिणीकांत । चुकविला काळाचा अपघात ।।' ३. योगायोग; अचानक घडलेली घटना. [सं.]

**अपघातविमा** पु. (अर्थ.) अपघातामुळे होणाऱ्या नुकसानीबद्दल विमा कंपनीने घेतलेली हमी.

**अपघाती** वि. हट्टी; आडदांड; धाडसी; साहसी.

क्रिवि. आकस्मिक; अकस्मात; एकाएकी.

**अपचन** न. भूक नसताना खाल्यामुळे किंवा काही आजारामुळे अन्नाचे पचन नीट न होणे; अन्न न जिरणे. पहा : **अजीर्ण** [सं.]

**अपचय** पु. १. ऱ्हास; तोटा; अवनती; क्षय; नाश. २. (रसा.) ज्यामध्ये अधिक रेणवभार असलेल्या जटिल पदार्थांचे विघटन होऊन त्यापासून कमी रेणवभार असलेले सुटसुटीत पदार्थ बनतात अशी क्रिया. [सं.]

**अपचयन** न. (प्राणि.) अधिकाधिक रासायनिक विघटन होत असतानाचे चयापचय. [सं.]

**अपचार** पु. १. अपथ्य आहार; कुपथ्य. २. वाकडा मार्ग; दुर्वर्तन; कुमार्ग. ३. उपद्रव; पीडा. ४. (कायदा.) समाजविघातक वा गुन्हेगारी स्वरूपाचे कृत्य (विशेषत: अल्पवयीन तरुणांचे). [सं.]

**अपचारि** न. आपचार्य; मूल जन्मण्यापूर्वी करायचा एक विधी : 'ऐसे अपचारीएं जाले'- लीचपू ३०.

**अपचारिता** स्त्री. (समाज.) १. कर्तव्यात केलेली कसूर; कर्तव्याची उपेक्षा. २. अपराध; दुष्कृत्य; समाजविरोधी वर्तन. [सं.]

**अपचारी** पु. (कायदा.) समाजविघातक अगर गुन्हेगारी स्वरूपाचे कृत्य करणारी (विशेषत: अल्पवयीन) व्यक्ती. [सं.]

**अपचारी बालक** न. (समाज.) बालगुन्हेगार.

**अपचित** वि. १. कृश; रोड; ऱ्हास पावलेला. २. पूजित; श्रेष्ठ.

**अपचिति–ती** स्त्री. १. ऱ्हास; तोटा. २. खर्च; व्यय. ३. प्रायश्चित्त. ४. सूड. ५. ऋणाची फेड. ६. आदर. ७. पराजय. [सं. अपचिति]

**अपची** स्त्री. गंडमाळा रोग. [सं.]

**अपच्छाय** वि. १. छायारहित. २. अंधूक. [सं.अप+छाया]

**अपच्छाया** स्त्री. १. अशुभ छाया. २. पिशाच्च; भूत. [सं. अप+छाया]

**अपजणे** अक्रि. उपजणे; उत्पन्न होणे : 'कीळेचे पांघुरण । रत्ना (अ) उपजवी कोण ।' - अमृ ७.१६६. [उपजणे अप.]

**अपजय** पु. पराजय; पराभव. [सं.]

**अपजात** वि. आईबापांहून कमी गुणांचा पुत्र. [सं.]

**अपजाल–ळ** न. आळ; खोटा आरोप. (क्रि. घालणे, टाकणे) : 'जो तुझे करील मुखावलोकन । त्यावरी येती अपजाळ ।' - हरि २५.१४३. [सं. अप+जाल ]

**अपट** पु. पडदा; आडोसा; आडभिंत : 'ते रोख गा तंव वैरी । आइकिजति गा अपटांतरी ।' - राज्ञा १६.४२५. [सं.]

**अपटचापट** स्त्री. (पत्त्यांच्या खेळात) पत्ते पिसणे.

**अपटफ(फु)टी** स्त्री. एक झुडूप; झाडरू.

**अपटांतर** वि. १. मध्ये पडदा नसलेला; आड नसलेला; (ल.) प्रत्यक्ष; जवळचा. २. पडद्यामागे; आड. पहा : **अपट** [सं.]

**अपटी** स्त्री. १. धक्का; संकट; दुर्दशा, (व्यापारात) नुकसान; तोटा; बूड. २. (व.) चाकोरीवर पावसाळ्यात पडलेल्या खड्ड्यावरून जाताना गाडीचे आपटणे. ३. (सामान्यत:) पडणे; ठेचकाळणे. (क्रि. खाणे.)

**अप–टु–डेट** (अप्–टु–डेट्) वि. १. आजतागायत. २. (ल.) पूर्ण सुधारलेला; आधुनिक; अगदी फॅशनेबल. ३. चोख; अगदी व्यवस्थिशीर; टापटिपीचा. [इं.]

**अपटौळ** वि. नाठाळ : 'की मी अपटौळ आज्ञापालनी'-ऋव ३०९.

**अपड** स्त्री. रुसणे; पड न घेणे; ओढून धरणे : 'तव बोलिले दैत्यविभांडे । आतां उसीरू होइलु अपडें ।।' - शिव १८५.

**अपड** पु. विटाळ; शिवाशिव; अस्पृश्यता. (ग्रा.)

**अपडीची** वि. रजस्वला; विटाळशी; अस्पर्श. (ग्रा.)

**अपढंग** पु. स्वेच्छाचार; स्वैरवर्तन; दुर्वर्तन.

**अपढंगी** वि. स्वैराचारी; खट्याळ; मन मानेल तसे वर्तन करणारा.

**अपढंगीपणा** पु. वाईट वर्तणूक; चाल.

**अपतट** वि. किनाऱ्यावर; किनाऱ्याच्या पलीकडे; किनाऱ्यापासून अंतरावर; तटपार. [सं.]

**अपतर** वि. खोडकर; अचपळ. पहा : **अप्तर.** [फा. अप्तर]
**अपत्य** न. १. मूल; संतान (पुत्र किंवा कन्या); संतती : 'जैसा स्वभावो मायबापांचा । अपत्य बोले जरी बोबडी वाचा । तरी अधिकचि तयाचा । संतोष आथी ।।' -ज्ञा १.६४ २. पुढची पिढी. [सं.]
**अपत्यधर्म** पु. आपल्या आईवडिलांच्या संदर्भातील मुलांचे कर्तव्य. [सं.]
**अपत्यवाचक** वि. (व्या.) मात्यापित्याच्या किंवा एखाद्या पूर्वजाच्या नावावरून पडलेले; वांशिक (वंशनाम). उदा. राघव, कौशिक.
**अपत्यविक्रय** पु. मुलाची विक्री (एक महापातक). [सं.]
**अपत्रप** वि. निलाजरा; निर्लज्ज. [सं.]
**अपत्रपा** स्त्री. १. लाज; भीड; मर्यादा; संकोच. २. गोंधळ; लाज; शरम (अपराध उघडकीस आल्यामुळे वाटणारी) : 'हें कटक सोड तिकडे चाल तुझ्या हरुनि गोधना खळ तो । प्राणत्राणपरायण जिकडे निरपत्रपाग्रणी पळतो ।'- मोविराट ४.८० (क्रि. पावणे, येणे.)[सं.]
**अपथ** पु. १. पाखंड; कुमार्ग. २. अनियमितपणा; रूढमार्गाविरुद्ध आचरण; रीतीवेगळे बाहेरचे वर्तन. [सं.]
**अपथगमन, अपथवर्तन, अपथसंचार** पु. १. पाखंडमार्ग. २. नियमाविरुद्ध अशिष्टवर्तन; दुराचरण; वाईट वर्तन. [सं.]
**अपथगामी, अपथचार, अपथवर्ती** पु. १. पाखंडी; धर्मबाह्य आचरणाचा. २. नियम, रूढी न मानणारा; दुराचारी; कुमार्गी .[सं.]
**अपथ्य** न. १. अयोग्य; अपायकारक; रोग्याला वर्ज्य (तेलकट, तिखट असे) अन्नपदार्थ; कुपथ्य : 'अपथ्यरुचिरुग्ण तो कटुक ओखदे कोण पी ।'- केका ८९. २. पथ्याला, नियमांना सोडून वागणूक; नियमच्युती. ३. (ल.) अहित; अकल्याण; अमंगल.
वि. अहितकारक; अशुभ; इजा करणारे; न सोसणारे; वर्ज्य.[सं.]
**अपथ्यशील** वि. पथ्य न करणारा : 'जरी अपथ्यशीळा व्याधी । कळे साधूसी दुर्जनाची बुद्धी ।' - ज्ञा ७.९३.
**अपदारण** न. (राज्य.) १. अपघाताने वेगळा झालेला भाग; आघाताने वेगळा केलेला भाग. २. पुरासारख्या आपत्तीने एखाद्याची जमीन दुसऱ्याच्या जमिनीस जोडली जाणे. [सं.]
**अपदार्थ** पु. १. (तर्क.) नास्तित्व; अभाव; अविद्यमानता. २. (व्या.) वाक्यात नसलेल्या शब्दाचा अर्थ. ३. वाक्यातील शब्दांचा नसलेला अर्थ. [सं.]
**अपदास्थपण** पु. पदभ्रष्टता.
**अपदेवता** स्त्री. दुष्ट देवता; राक्षस; पिशाच्च इ. [सं.]
**अपदेश** पु. १. सबब; मिष; सोंग. २. तोड; युक्ती; बेत. ३. गुप्त वेश; छद्मवेश; कपटरूप. ४. (तर्क.)अनुमानातील दुसरे प्रमेय; उद्देश.[सं.]
**अपद्रव्य** न. अशुद्ध द्रव्य; भेसळ असलेले द्रव्य. [सं.]
**अपधाक** पु. १. आकस्मिक भीती; एकाएकी मनावर होणारा भीतीचा परिणाम; धडकी; धसका : 'अपधाकासि ताडिलें । लिंगदेहासि विभांडिले ।' - दास ५.९.४३. २. आपलीच आपल्याला वाटणारी भीती : 'तीं अपधाकांनी अर्धमेलीं झाली.' - बाळमित्र १.१.७०.८०.
**अपधाकणे** अक्रि. भीती वाटणे; भिणे; घाबरणे; हाय घेणे; धसका बसणे.
**अपनय** पु. १. दूर नेणे. २. निवारण करणे. ३. खंडन. ४. मूर्खपणा. ५. अपकार; अन्याय. ६. अनीती; दुर्वतन. [सं.अप+नय]
**अपनयन** न. १. अपहार (पैशाचा इ.). २. निवारण करणे; खंडन करणे. [सं. अप + नी ]
**अपनयन** न. डोळे पुसणे; समाधान करणे; सांत्वन करणे.[सं. अप+नयन]
**अपनिदेशन** न. १. चुकीचे मार्गदर्शन; गैरमार्ग दाखविणे; दिशाभूल. २. (कायदा.) चुकीची समजूत करून देणे. [सं.]
**अपनेय संपर्क** पु. (विअ.) तोडता येण्याजोगा, बदलता येण्याजोगा, स्थानभ्रष्ट करता येण्याजोगा संपर्क (विजेचा).
**अपन्यास** पु. (संगीत.) राग-आलापी करताना ज्या स्वरावर मध्यंतरी विश्रांती घेतात तो स्वर. [सं.]
**अपन्हव, अपन्हुति** पहा : **अपह्नव, अनुह्नुती.**
**अपपर्णन** न. १. (भूशा.) (खडकांच्या पृष्ठापासून आत रासायनिक क्रियेने अपक्षरण झाल्यामुळे खडकाचे) पापुद्रे, छिलके सुटणे. २. (वन.) अनुस्तर धागे किंवा पट्टिका यांचे मूळ अवयवापासून अलग होणे. उदा. खोडापासून सुटणाऱ्या झाडाच्या साली. [सं.]
**अपपाठ** पु. चुकीचा पाठ; अशुद्ध पाठ (ग्रंथादिकातील); चुकीचा शब्द, तऱ्हा, सरणी. [सं.]
**अपप्रचार** पु. १. खोटा, विपरीत प्रचार करणे. २. एखाद्याची बदनामी होईल अशा गोष्टी सर्वत्र पसरवणे : 'अपप्रचार होतो हे ऐकून मला अतिशय वाईट वाटतं.' - लोआ २५. [सं.]
**अपप्रयोग** पु. १. शब्दाचा अशुद्ध प्रयोग; दुरुपयोग. (एक भाषादोष.) २. चुकीची शब्दयोजना; व्याकरणाच्या नियमांना सोडून असलेली शब्दांची मांडणी, सरणी. ३. भाषेतील सर्वमान्य व शिष्टसंमत प्रयोगाऐवजी चुकीचा, असंमत व अपमानकारक शब्दप्रयोग. ४. भलत्याच सरणीने पद्धतीने एखादे काम करणे. [सं.]
**अपप्रवाद** पु. कुटाळकी; कंडी पिकविणे; लोकापवाद; निंदास्पद गोष्ट; जनापवाद. [सं.]
**अपप्रवेश** पु. बेकायदेशीर प्रवेश; कायदेशीररीत्या प्रवेश नसलेल्या जागी प्रवेश करणे; हुकमावाचून किंवा हुकूम मोडून एखाद्या ठिकाणी प्रवेश करणे. [सं.]
**अपप्रेरक** दुष्कृत्याला प्रेरणा देणारा, मदत करणारा. [सं.]
**अपप्रेरण** न.फूस लावणे, देणे; बेकायदेशीर कृत्यास, दुष्कृत्यास प्रोत्साहन देणे.गुन्ह्यास दिलेले उत्तेजन, केलेली मदत. [सं.]
**अपबळ -आपबळ** अ. आपण होऊन; स्वतः होऊन : 'छपन देशिचे गुणीजन येती या जागीं अपबळ'-होला १८४.
**अपभरंत** वि. (प्राणि.) बाहेर वाहून नेणारी. [सं.]
**अपभरंत चेतनतंतू** पु. (प्राणि.) चेतापेशीपासून स्नायू व ग्रंथीकडे संवेदना वाहून नेणारा तंतू.
**अपभवन** न. (भौ.) प्रकाशकिरण सरळ रेषेपासून च्युत होणे.
**अपभाषण** न. वाईट भाषण; शिवीगाळ; निंदा; दुर्भाषण; अपशब्द; सभ्याचाराला सोडून असणारे बोलणे. [सं.]
**अपभाषा, अपभ्रष्ट भाषा** स्त्री. मूळ भाषेची अपभ्रष्ट झालेली भाषा;

अशुद्ध, गावंढळ भाषा. पहा : **अपभ्रंश** [सं.]

**अपभ्रष्ट** वि. १. विकृत, अशुद्ध रूप पावलेला. २. नष्ट; अधोगतीस पोचलेला; दुराचारी; हीन. [सं.]

**अपभ्रंश** पु. १. एका भाषेतील शब्द दुसऱ्या भाषेत जाताना झालेले त्या शब्दांचे ध्वनिपरिवर्तन, विकृती किंवा रूपांतर. उदा. सं. गृह–म. घर; सं. अक्षयतृतीया – म. अखेती इत्यादी. २. दूषित होणे; अशुद्ध स्वरूप प्राप्त होणे; भ्रष्ट होणे. (ल.) विकार; नाश; हानी. ३. भ्रष्टाचार : 'म्हणौनि हा अपभ्रंशु । विषयसंगु' – ज्ञा २.११८. (वा.) **अपभ्रंशी पाडणे** – भ्रष्ट करणे; कुळास कलंक लावणे : 'ऐसी वर्तणूक करून अपभ्रंशी पाडिले. गोतपत आरंभिली.'– पेदसमा ७.

स्त्री. एक प्राकृत भाषा (ही मूळ संस्कृत भाषेपासून अपभ्रष्ट झाली म्हणून.)

वि. भ्रष्ट करणारा; अधोगतीला नेणारा; मुकवणारा; विघ्नकारी.

**अपम, अपममंडल, अपमवृत्त** पु. (ज्यो.) क्रांती; उलथापालथ; पलीकडे जाणे; क्रान्तिवृत्त. पहा : **अपक्रम**

**अपमध्य** वि. (ग.) वर्तुळाकृती मार्गावरून फिरताना त्रिज्येच्या दिशेने कार्य करणारा. [सं.]

**अपमंदन** न. हळूहळू कमी होत नाहीसे होणे. [सं.]

**अपमान** पु. अनादर; मानभंग; मानखंडना; अप्रतिष्ठा; तेजोभंग; पाणउतारा; बेअब्रू. [सं.] (वा.) **अपमान गिळणे**– पाणउतारा, अपमान सहन करणे.

**अपमानणे** अक्रि. अपमान, मानखंडना किंवा अनादर करणे; धिक्कारणे : 'तुझे महिमानु कवण जाणे ।। जेणें एके शक्तीचे नि गुणें । ब्रह्मा अपमानिला ।।' – दावि ३४१.

**अपमानि(नी)त** वि. अपमान केलेला; धिक्कारलेला.

**अपमार्जित** वि. (संवि.) काढून टाकलेले.

**अपमिश्र** न. भेसळ करण्यासाठी वापरण्यात येणारी हलक्या प्रतीची वस्तू, माल. [सं.]

**अपमिश्रण** न. भेसळ. [सं.]

**अपमुरे** वि. अधमुरे; अर्धवट मुरलेले; आपोआप मुरलेले; विरजलेले

**अपमृत्यु –त्यू** पु. १. जिवावरचे दुखणे; (सर्पदंश वगैरे) गंडांतर; फार मोठे संकट. २. आकस्मिक मृत्यू; अपघात; अकाली मृत्यू. (क्रि. चुकणे, निवारणे, टळणे, येणे.) [सं.]

**अपमृत्युनिर्णेता** (विधि.) पु. अपमृत्यू आहे असा निर्णय देणारा.

**अपयश** न. पराजय; कार्यनाश; अपकीर्ती. [सं.] (वा.) **अपयशाचा धनी होणे, अपयशाचे खापर फुटणे**– दुसऱ्याच्या चुकीकरता स्वत:वर दोषारोप घेणे किंवा प्रायश्चित्त भोगणे.

**अपयशस्कर** वि. अपमानकारक; लाजिरवाणा; इज्जतखाऊ.

**अपयशी** वि. दुर्दैवी; अयशस्वी; मंदभाग्य; कपाळकरंटा.

**अपर** वि. १.दुसरा; द्वितीय; अन्य : 'सुंदर तरी अपर मदन क्रोधी तरी यमासमान'– जै २३.४. २. (ल.) अतुल. ३. (समासात) दूरचा; पुढील; मागचा; पलीकडचा. उदा. अपरार्ध (दुसरा, पुढला, अर्ध); अपरात्र (उत्तररात्र); अपराण्ह – दिवसाचा उत्तरार्ध; दोन प्रहरानंतरचा; पूर्वापार (पहिला व दुसरा) इ. ४. पश्चिमेचा : 'कां पूर्वापर सरिता भिन्न दिसती पाहतां' – ज्ञा ३.३९. ५. श्रेष्ठ; ज्याच्या पलीकडचा कोणी नाही असा. ६. अधिक –अपर सचिव, अपर न्यायाधीश. [सं.]

**अपरक्राम्य** वि. विकता न येण्याजोगा; दुसऱ्याच्या नावावर करून न देता येण्याजोगा (कर्जरोखा, शेअर इ.). [सं.]

**अपरक्रिया** स्त्री. और्ध्वदेहिक उत्तरक्रिया.

**अपरजाति–ती** स्त्री. प्रकार; पोटभेद; इतर तऱ्हा; भेद. [सं.]

**अपरत्र** क्रिवि. दुसरीकडे : 'एकत्र केशव वसे अपरत्र वैरी ।'–नीतिश्लोक १८.

**अपरदन** न. (भूशा.) (खडकांची) झीज व धूप. [सं.]

**अपरधर्म** पु. परमधर्म; ब्रह्मविद्या मार्ग सोडून इतर मार्ग : 'अपरधर्माचे धारण यातें विकल्पुं बोलिजे'– लीचउ ३८६.

**अपरपर्याय** पु. प्रतिशब्द; तद्वाचक दुसरा शब्द. [सं.]

**अपरपक्ष** पु. १. दुसरा पंधरवडा; वद्यपक्ष. २. खटल्यातील दुसरी बाजू; प्रतिवादी; सामनेवाला. ३. पितृपक्ष; पितृपंधरवडा : 'आला विप्र महाधनी । अपरपक्ष करणे मनीं ।' – गुच ३६२२. [सं.]

**अपरपाठ** पु. दुसरा पाठ; इतर पाठ. [सं.]

**अपरमात–वाद** पु. ठपका; बोल; आरोप; मिथ्यादोष; अन्यथागोष्ट; आळ : ' हा माझ्यावर निव्वळ अपरमात आहे'– भा ७५.

**अपरमाय** स्त्री. दुसरी आई; श्रेष्ठमाता : 'जय जय देवी सर्व गे । सत्वश्रिया श्रीरंगे । सर्वातीत निसंग संगे । अपरमाय तूं ।'– स्वादि १.४.५.

**अपररूपी** वि. (भूशा.) एकापेक्षा अधिक रूपात आढळणारे.[सं.]

**अपरलोक** पु. स्वर्ग.

**अपरव** पु. १. मालमत्तेसंबंधी भांडण. २. (सामान्यत:) भांडण; कब्जा; तंटा; बखेडा.

वि. निर्विवाद; हक्कशाबीत (मालमत्ता, वारसा). [सं.]

**अपरवड–डी** स्त्री. १. क्रम सोडणे; पद्धत नसणे, सोडणे. २. (काव्य.) विलक्षणपणा; तऱ्हेवाईकपणा; वैचित्र्य; असामान्यपणा; नवलाई (क्रि. वाटणे, होणे). ३. अन्याय; गैररीत : 'परी धर्मपत्नी धांगडी । पोसिता जरी एकी बोढी । तरी कां अपरवडी । आणावी आंगा ।।'– ज्ञा १८.९४२. ४. अपकीर्ती; आगळीक : 'युद्धी खांडमिशा बोडी । हे अपरवडी तुवा केली ।' – एरुस्व १३.११ ५. भटकणे; मार्ग सोडून जाणे : 'वेशधारी वृथा मुंडी । त्यांचे संगतीची अति गोडी । जेथ अपरवडी विधिवेदां ।।'– एभा १३.१२१. [सं. अपरिपाठ]

**अपरवय** न. वृद्धापकाळ : 'अपरवय होतां काळें । पति तुझा यती होईल ।।'– गुच १२.५४. [सं.]

**अपरवाद** पु. अपरमात; ठपका.

**अपरवासी** वि. विटाळशी; रजस्वला; अस्पर्श. (व.)

**अपरसचिव** पु. जादा चिटणीस; शासकीय विभागाचा प्रशासकीय कारभार पाहणाऱ्या सचिवाशिवाय त्याच विभागाचा जादा सचिव.

**अपरसामान्य** वि. सामान्यत: एकाच जातीचा परंतु थोडाफार किरकोळ फरक असणारा; पोटजातीचा; पोटभेदाचा. [सं.]

**अपरसूर्य** पु. सूर्यासारखा; दुसरा सूर्यच. (ल.) अत्यंत विद्वान, तेजस्वी व्यक्ती; दैदीप्यमान तारा इ. [सं.]

**अपरस्वस्तिक** न. (ज्यो.) क्षितिजावरील पश्चिम दिग्बिंदू. [सं.]

**अपरंपार** वि. अनंत; अमर्याद; असंख्य; अफाट; अगणित (शक्ती, गुण, बुद्धी, पराक्रम, महत्त्व वगैरे); सर्वातीत : 'विठ्ठल अपरंपार न कळे'- ज्ञागा १८५. [सं. अ+पर+पार]

**अपरंपूर** वि. अतिशय; पहा : **अपरंपार** (ग्रा.)

**अपरा** वि. कनिष्ठ प्रतीची : 'ही अपरा म्हणजे खालच्या प्रतीची (प्रकृती) झाली.'- गीर ७१५; परस्वरूप; अलीकडील; अवर : 'देवता आदिकरूनि सकळ देवता अपरा अमोचका बोलिजेति'- लीचउ. २०९. पहा : **अपर** [सं.]

**अपरा** वि. अपुरा; आखूड. उदा.अपरे नाक, अपरा अंगरखा.

**अपराग्नि-ग्नी** पु. १. प्रेतदहनाचा अग्नी. २. दक्षिण आणि गार्हपत्य हे अग्नी. [सं.]

**अपराजित** वि. पराभूत न झालेला; अजिंक्य : 'सात्यकि अपराजितु ।' - ज्ञा १.१५२. [सं.]

**अपराजिता** स्त्री. १. (विजयादशमीस जिची पूजा करतात ती) दुर्गा देवी. २. जमिनीवर पसरणारी एक वेल; दूर्वा, शेफालिका, जयंती, विष्णुकांता, शमी वगैरे वनस्पती. ३. ईशान्य दिशा. ४. एक अक्षरगण समवृत्त. यात प्रत्येक पादात १४ अक्षरे : 'धन यश मिळण्या त्यजू निज तत्त्व मी ? । स्वहृदयमणि तो न कांहीं मला कमी ।।'- छंर ३३. [सं.]

**अपराण्ह** पु. १. दिवसाच्या १९-२४ किंवा २१-२५ या घटका; पाच भागांपैकी चौथा भाग; दिवसाचे दोन भाग केले असता दुसरा, तीन भाग केले असता तिसरा भाग. २. तिसरा प्रहर. [सं.]

**अपरात-त्र** स्त्री. अपररात्र; उत्तररात्र; मध्यरात्री नंतरचा काल; रात्रीचा शेवटचा भाग. [सं. अपररात्र]

**अपराध** पु. १. दोष; चूक; अन्याय; अतिक्रमण; गुन्हा; अधर्माचरण; दुर्वर्तन. २. (कायदा) कायद्यात ज्याला शिक्षा सांगितली आहे असे कृत्य. (कर्तव्य न करणे, हयगय). [सं.] (वा.) **अपराध पोटात घालणे** - अपराधाबद्दल क्षमा करणे.

**अपराधकर्म** न. व्यभिचार; बदअम्मल : 'कोंडो मल्हाराची भावजई विधवा इजपासून अपराधकर्म घडले सबब गुन्हेगारी ८०० रुपये.'- ज्युसिम ३६४. [सं.]

**अपराध सहायक** पु. गुन्ह्यात सामील असणारी, मदत करणारी व्यक्ती. [सं.]

**अपराधसिद्धि-द्धी** स्त्री. अपराधी ठरविणे; अपराधाची खातरजमा करणे. [सं.]

**अपराधी** वि. दोषी; गुन्हेगार. [सं.]

**अपरापरी** स्त्री. १. दुर्दशा; वाताहत : 'एकीं घरीं कोणी कोणासी न धरी । ऐसी अपरापरी केली आम्हां ।' - तुगा २९९४ २.परकेपणा. [अपरचे द्वि.] [सं. अपरापरण]

**अपरावर्ती यंत्र** न. उलटे न फिरणारे यंत्र.

**अपरांत** पु. कोकण देश. [सं.]

**अपरिगण्य** वि. गणना करता न येण्यासारखा; मोजता न येण्यासारखा; अपरिमित. [सं.]

**अपरिग्रह** पु. १. असंग्रह; असंचय. २. परिवारशून्यत्व. ३. उपाधिराहित्य; उपाधी जवळ न बाळगणे; कोणत्याही वस्तूचा स्वीकार न करणे : 'साधूची अपरिग्रहता । परिग्रहो नातळे चित्ता ।' -एभा ११.९०१ ४. दारिद्य; निर्धनता. [सं.]

**अपरिचित** वि. ओळख नसलेला; अनोळखी. [सं.]

**अपरिच्छिन्न** वि. क्रिवि. अखंड; सतत; एकसारखा. [सं.]

**अपरिणीत** वि. (अप. रूपे- अपर्णीत-र्णित) अविवाहित; लग्न न झालेला. [सं.]

**अपरितुष्ट** वि. असंतुष्ट; असमाधानी; अतृप्त. [सं.]

**अपरितोख** पु. असंतोष; असमाधान : 'तरी तेथिंचेनी अपरितोखें । क्षोभावें ना ।'- ज्ञा २.२६९.

**अपरिदल** वि. (वन.) परिदले (संवर्त व पुष्पमुकुट) नसलेले. उदा. अळू, केवडा यांची फुले. [सं.]

**अपरिपक्व** वि. पूर्ण वाढ किंवा विकास न झालेला. [सं.]

**अपरिपक्व मृदा** स्त्री. (भू.) अपक्षरणाने (झीज) खडकांचे मातीत रूपांतर होण्याच्या अवस्थांतील एक अवस्था. (अशा मातीत खडकांचा ओळखता येण्याइतका अंश शिल्लक असतो. )

**अपरिपुष्ट** वि. (विधि.) ज्याचे (पुराव्याचे) समर्थन केले गेले नाही किंवा ज्या कथनाला बळकटी आणली गेली नाही असे.

**अपरिपूर्ण** वि. गुण, घटक इत्यादी बाबतीत पूर्णत्वास न गेलेला. [सं.]

**अपरिपूर्ति** स्त्री. एखादी इच्छा, वचन पूर्ण न होणे; सिद्धीस न जाणे. [सं.]

**अपरिमाणिक साधने** न. अव. (अर्थ.) अविशेषोपयुक्त साधने. [सं.]

**अपरिमित** वि. १. अतिशय; अगणित; असंख्य. २. अनियमित; अमर्यादित; अचाट; अवाढव्य. ३. वाजवीपेक्षा अधिक; फाजील. पहा : **अपरिगण्य** [सं.]

**अपरिमेय संख्या** स्त्री. (ग.) दोन पूर्ण संख्यांचे गुणोत्तर या स्वरूपात मांडता न येणारी संख्या. [सं.]

**अपरिवर्तनीय** वि. बदल करता न येण्यासारखा. [सं.]

**अपरिवर्ती** वि. फेरफार न होणारा; ज्याच्यात बदल नाही असा. [सं.]

**अपरिवर्त्य** वि. रूपांतर, बदल होणे शक्य नसेलला; न बदलणारा.

**अपरिशुद्ध** वि. (वा.सां.) चुकीचा; तंतोतंत नसलेला. [सं.]

**अपरिष्कृत** वि. संस्करण न केलेला; पैलू न पाडलेला; जाडाभरडा. [सं.]

**अपरिहर** वि. टाळण्यास अशक्य; अपरिहार्य : 'जे जन्ममृत्यू हे पाहीं । अपरिहर'- ज्ञा २.१५८. [सं. अपरिहार्य]

**अपरिहार्य** वि. अनिवार्य; न टाळता येणारे; परिहार करण्यास अशक्य; अपरिहर; (ल.) असाध्य; अलंघ्य. [सं]

**अपरिहार्य कामबंदी** स्त्री. (अर्थ.) कामावरून तात्पुरते कमी करणे; नाईलाजाने, निरुपायाने काम थांबवणे.

**अपरिहार्य गर्भपात** (वै.) न टाळता येण्यासारखा, काही रोगामुळे किंवा इतर कारणाने होणारा गर्भपात.

**अपरिहार्यता** स्त्री. अनिवार्यता; आवश्यकता

**अपरीति-ती** स्त्री. गैरशिस्त वर्तन; वाकडा मार्ग. [सं.]

**अपरीक्षित** वि. न तपासलेले; सिद्ध न केलेले; परीक्षा न केलेले. [सं.]

**अपरूक** वि. अपरूप; आवडते; अपूर्व : 'देई आई जें बांधून । आपरूक ते सारं म्हणून ।' – न्यासे. [सं. अपूर्व]

**अपरूप–ब–भ** वि. १. विचित्र; चमत्कारिक; विलक्षण; अद्भुत : 'अपरूप होये ब्रह्मादिका ।' – दावि ८७. [वैदिक सं.= अप+रूप=कौतुक, आश्चर्य, आनंद किंवा सं. अपूर्व] २. दुर्मिळतेमुळे महत्त्व आलेले; मौल्यवान; दुसऱ्या ऋतूत उत्पन्न होणारे पण सांप्रत मिळालेले. [सं. अप + ऋतु–अपर्तु–अपरूक–अपरूप] ३. (ल.) दुर्लभ; दुष्प्राप्य.(ल) मुष्कील; मोताद; पारखा. ४. (ल.) प्रिय; आवडते.(व.) ५. अपूर्व : 'प्रभाकर गाई बुट । अपरूप अनुसुट ।' – प्रला १२२. [सं. अपूर्व ]

**अपरूप** वि. कुरूप; बेढब; बेडौल. [सं. अप+ रूप]

**अपरूपमेवा** पु. १. दुर्मिळ खाद्य. २. (ल.) स्वतःचे मूल; अपत्य.

**अपरूपाई –बाई–भाई–वाई** स्त्री. १. दुर्मिळता; अपूर्वाई; नवलाई; उत्कृष्टता; बहुमोलपणा. २. दुर्मिळतेमुळे आलेले महत्त्व. ३. अत्यंत चळ लागल्यासारखे प्रेम.

**अपरूपी** वि. (रसा.) एका रासायनिक प्रक्रियेतून तयार झालेल्या पदार्थाचा निरनिराळ्या रूपात राहण्याचा धर्म. उदा. कार्बन. हा प्लबॅगो, चारकोल व डायमंड या तीन रूपांनी आढळतो. [सं.]

**अपरोखी** क्रिवि. पाठीमागे; मागून; डोळ्याआड (ग्रा.) [सं.अपरोक्ष]

**अपरोद्धान** न. (ज्यो.) मोठे उधाण; अमावस्येला व किंचित कमी प्रमाणात पौर्णिमेला चंद्राच्या व सूर्याच्या आकर्षणाचा परस्परपूरक परिणाम होऊन सागराला येणारी मोठी भरती व ओहोटी. [सं.]

**अपरोध** पु. १. अवरोध; विरोध; अडथळा. (को.) २. लाजाळूपणा; विनय; संकोच; मर्यादा. [सं.]

**अपरोधणे** अक्रि. १. विरोध होणे. २. लज्जित होणे; थोडेसे गोंधळणे; संकोचणे. [सं.अप+रोध् ]

**अपरोधित** वि. १. विरोधलेला. २. लाजलेला; संकोचलेला किंचित गोंधळलेला. [सं.]

**अपरोक्ष** वि. दृष्टिआड नव्हे, अदृश्य नव्हे असा. दृश्य; दृग्गोचर. क्रिवि. १. (चुकीने पण रूढ) गैरहजेरीत; पाठीमागे; दृष्टिआड : 'ज्यासि अपरोक्ष पूर्ण शांति । तो सद्गुरुमूर्ति निश्चयें ।' – एभा ३.३१५.[सं.]

**अपरोक्षबोध** पु. प्रत्यक्ष ज्ञान; अपरोक्षानुभूती : 'स्वप्नींचें दरिद्र समर्थता । जेवीं मिथ्या दोनी जागतां । तेवीं द्वंद्वबाधेची वार्ता । न बाधे गुरुभक्तां अपरोक्षबोधें ।'– एभा ३.४७१. [सं.]

**अपरोक्षस्थिति–ती** स्त्री. साक्षात्कार : 'प्राप्ती म्हणजे अपरोक्षस्थिति । भगवंत स्फूर्ती अनिवार ।' – एभा २.६०९. [सं.]

**अपरोक्षज्ञान** न. १. प्रत्यक्ष ज्ञान; साक्षात्कारपूर्वक ज्ञान. २. आत्म्यासंबंधी किंवा ईश्वरासंबंधी ज्ञान; आत्मज्ञान–प्रतीती : 'अपरोक्ष ज्ञान प्राप्त । सद्गुरू वांचोनि न घडे ।'– हरि १.५६. [सं.]

**अपरोक्षानुभव** पु. ब्रह्मसाक्षात्कार. [सं.]

**अपर्याप्त** वि. १. अमर्यादित; अफाट; अगणित.२. अपुरे.

**अपर्याप्तता** (भौ.) अपुरेपणा; हवे त्यापेक्षा कमी असण्याची अवस्था . [सं.]

**अपर्शी** वि. १. नीट न पाहणारा; नीट न दिसणारा. २. (ल.) मूर्ख. (ग्रा.)

**अपऱ्हासन** न. घट; कपात. [सं.]

**अपलवणे** अक्रि. आसक्त होणे : 'ही जीवु इतुलेनि सुखें अपलवतें.' – अज्ञातच ५८.

**अपलक्षण** पहा : **अवलक्षण**

**अपलक्ष्य** (भौ.) निरीक्षणातून किंवा गणिताने काढलेले परिमाणाचे मूल्य व त्याचे खरे मूल्य यातील फरक. [सं.]

**अपलाण–णी** वि. उपलाणी; खोगीर न घातलेला (घोडा.) [ फा. पालान = खोगीर ]

**अपलाप** पु. १. सत्य लपविणे, टाळणे; सत्यगोपन. २. अज्ञानप्रदर्शन; उडवाउडवी; विपर्यास : 'ह्या रीतीनें काही सत्याचा अपलाप करून कॅबिनेटचा कारभार सुरळीत चालवावा लागतो.' – इंमू ३५२. पहा : **छेकापन्हुति** [सं.]

**अपलाभ** पु. वाईट मार्गाने झालेला लाभ, मिळालेला –मिळवलेला पैसा. [सं.]

**अपलेखन** न. यादीतून रद्द करणे.

**अपलौकिक** पु. दुर्लौकिक : 'इंग्रजाने वसईस वेध लावून घेतली हे अपलौकिक लोकांतरी काय आहेत (ते) श्रवण करावे.'– ऐलेप्र १०५. [सं.]

**अपवर्ग** पु. १. मोक्ष; चार पुरुषार्थांपैकी चवथा; मुक्ती : 'जयाचिए गाविचा मार्गु । चुके साधनाचा वर्गु । देआवेया अपवर्गु । धावे घरोघरी ।' – ऋ ७७. २. समाप्ती. ३. अपवाद; विशेष नियम. ४. देणगी. ५. त्याग. [सं.]

**अपवर्जक** वि. १. प्रवेशाला प्रतिबंध असलेला; वर्जक; प्रतिबंधक. २. विशेष; अनन्य; व्यावर्तक. [सं.]

**अपवर्जक करार** पु. (अर्थ.) आपल्या उत्पादनासारखा दुसऱ्या उत्पादकाचा माल किरकोळ विक्रेत्याने विकू नये म्हणून उत्पादकाने त्याच्याशी केलेला करार.

**अपवर्जन** न. वगळणे; व्यावृत्ती; काढून टाकणे. [सं.]

**अपवर्जी अधिकार** पु. (संवि.) एकाधिकार.

**अपवर्जीशक्ति–क्ती** एकालाच असलेले सर्व सामर्थ्य.

**अपवर्ण** वि. रंगहीन; विवर्ण; रंग काढलेला. [सं.]

**अपवर्त** पु. १. संक्षेप देणे; काढून टाकणे. २. (ग.) सामान्य साधारण भाजक. [सं. अप+वृत्]

**अपवर्तक** वि. ज्याने संक्षेप देण्यात येतो तो (अंक); संक्षेपक.[सं.]

**अपवर्तन** न. (ग) १. सामान्य भाजकाने भागणे; संक्षेप देणे. २. संक्षेप देऊन आलेले रूप. उदा. भाज्य ६४ व भाजक ४० तेव्हा अपवर्तक ८ ने अपवर्तन करून ८ (भाज्य) व ५ (भाजक) अशा लघुभूत राशी होतील. ३. (भौ.) (एका माध्यमातून दुसऱ्या माध्यमात शिरताना सरळ रेषेत जाणाऱ्या प्रकाशाची) दिशा बदलणे. [सं.]

**अपवर्तन कोन** पु. (भौ.) प्रकाशकिरण एका माध्यमातून दुसऱ्या माध्यमात जाताना सरळ रेषेत न जाता वळतात त्यावेळी त्या माध्यमाच्या पृष्ठभागाशी वळणाऱ्या किरणांचा होणारा कोन.

**अपवर्तनांक** पु. (भौ.) एका माध्यमातून दुसऱ्या माध्यमात जाताना

प्रकाशकिरणाचा त्या माध्यमाच्या रेषेशी होणारा कोन. [सं.]

**अपवर्तनी** वि. (भौ.) (प्रकाशकिरणांच्या) वक्रीभवनाविषयी. [सं.]

**अपवर्त्य** वि. गुणक.

**अपवहन** घट; कपात.

**अपवाड्** पु. १. बोलण्यास, सांगण्यास असमर्थ असणे; अकथनीयत्व : 'वाचेसि अपवाडु ।' -ज्ञा १३.५६८. २. अशक्तता. ३. मार्ग किंवा प्रवेश नसणे : 'तिये गावी देसी : अपवाडु तिहीं तापासी '- ज्ञाप्र ५०८. [सं. अप्रवाद]

**अपवाद** पु. १. नियमाविरुद्ध गोष्ट; नियमास बाध. २. अयोग्य, अन्यायमूलक निंदा; दोष : 'हानि लाज न देखे । परापवादु नाइके ।' - ज्ञा १३.७९१. ३. आळ; ठपका; प्रच्छन्न निंदा : 'आता सांगेन अपवादातें । सावधचित्तें परियेसी ।'- एभा ९.२८७. [सं.]

**अपवादक-वादी** वि. १. अपवाद, नियमन करणारे; मर्यादित करणारे (वचन, वाक्य). २. अपवाद काढणारा; निंदक; दोषी. ३. (ल.) वाईट भाषण करणारा : 'भूमीवरी मनुष्य लोक । असत्य निंदा अपवादक ।' - गुच २.६५. [सं.]

**अपवारक** पु. १. आच्छादन. २. पडदा. ३. आडोसा.[सं. अप+वृ]

**अपवारण** न. लपविणे; झाकणे; आच्छादणे. [सं.]

**अपवारित** वि. १. झाकलेला. २. अदृश्य.

**अपवाहन** न. (भूशा.) १. खाली वाकणे; बाजूला जाणे. २. नेहमीच्या प्रवाह मार्गापासून दूर जाणे. [सं.]

**अपवाहन धरण** न. (स्था.) मुख्य धरणात पाणी भरण्यापूर्वी ते पाणी वळवून साठविण्यासाठी केलेली योजना.

**अपवाह क्षेत्र** न. (भूशा.) मुख्य नदी व तिच्या सर्व उपनद्या यांच्या उगमाशी जेथे भरपूर पाऊस पडतो व जेथून पडणारे पाणी नदीतून वाहून नेले जाते तो प्रदेश. [सं.]

**अपवाहिनी नदी** स्त्री. (भूशा.) मुख्य नदीच्या प्रवाहाच्या सर्वसाधारण दिशेच्या विरुद्ध दिशेने वाहणारी उपनदी. [सं.]

**अपविक्रय करणे** सक्रि. नीच कामासाठी, वेश्या व्यवसायासाठी विकणे.

**अपवित्र** वि. १. अशुद्ध; अनिर्मळ; गढूळ; अमंगळ; अस्वच्छ; घाणेरडे. २. भ्रष्ट; अनैतिक; पातकी. ३. सोवळे नव्हे ते; ओवळे. [सं.]

**अपविद्ध पुत्र** पु. आईबापांनी टाकलेला व तिऱ्हाईतांनी पुत्राप्रमाणे मानलेला मुलगा. मनूने सांगितलेल्या बारा वारसपुत्रांपैकी एक.[सं.]

**अपविद्ध बाहू** पु. (नृत्य.) छातीवरील बाहू तोंडासमोरून डोक्यापर्यंत नेत असताची स्थिती. [सं.]

**अपविद्या** स्त्री. माया; अज्ञान. [सं.]

**अपविन्यस्त** वि. (भूशा.) १. अव्यवस्थित; बिघडलेला; असंतुलित; अनुक्रमे नसलेला. [सं.]

**अपविन्यास** पु. गैरव्यवस्था; अव्यवस्था; क्रमभंग; उलटापालट. [सं.]

**अपवृद्धि-द्धी** (अपवृद्धी) स्त्री. (वन.) अवयवांचा अकाली ऱ्हास.[सं.]

**अपव्यय** पु. १. उधळेपणा; निरर्थक खर्च; उधळपट्टी; दिवाळखोरी. २. अयोग्य कामात घालवलेला काळ, पैसा, शक्ती. [सं.]

**अपव्ययी** वि. अतिशय खर्च करणारा; उधळ्या.

**अपव्यापार** पु. वाईट व्यापार.

**अपशकुन** पु. १. अशुभ गोष्ट; दुश्चिन्ह : 'सत्यवंत म्हणे सावित्री । अपशकुन तुज देखा ।' - वसा ५९. २. अवलक्षण. [सं.]

**अपशकुनी** वि. अपशकुन करणारा; यश न देणारा.

**अपशब्द** पु. (व्या.) १. अशुद्ध शब्दप्रयोग; अपप्रयोग दुरुक्ती; २. शिवी; दुर्वचन; दुर्भाषण. ३. अशुभ अपशकुनी शब्द, वचन.[सं.]

**अपशराण - न** १. आळ; तुफान (घेणे). (को.) २. वाईटपणाची जबाबदारी; अपेश; ठपका; दोष. [सं.अपसरण]

**अपशाच-अपशेच-अपशा-शी** क्रिवि. आपोआप; आपसूक; आपण होऊन; आपशाच. (गो.)

**अपशारण** पु. विनाकारण आळ. पहा : **अपशराण**

**अपशिष्ट** न. (यंअ.) निरुपयोगी अवशेष. [सं.]

**अपशोषण** शोषून घेणे; आत्मसात करणे. [सं.]

**अपश्रद्धा** स्त्री. चुकीची श्रद्धा.

**अपश्रेय** न. दोष, ठपका, पाप : 'तुमच्या कामात विनाकारण ढवळाढवळ केल्याचे अपश्रेय येईल.' - विराशिरो ८९.

**अपसगुण** पु. अपशकुन : 'हातीं पडला : अपसगुण जाला'- लीपू २२६.

**अपसद** वि. दुष्ट; अधम : 'अश्व - अरेरे सूतापसदा तू माझी निंदा करतोस काय ?' - वेसंअ ३. [सं.]

**अपसम** वि. (ग.) ठरावीक साचा किंवा नियम नसलेला. [सं.]

**अपसमायोजन** न. एखाद्या गोष्टीची व्यवस्थित जुळणी नसणे. [सं.]

**अपसया** क्रिवि. आपोआप; अपसूक : 'उसळोनि सर्पाची वेटाळीं । कुंडीं पडली अपसया ।' -मुआदि ९.४.

**अपसरण** न. १. दूर सरणे; बाजूला जाणे; इच्छित मार्ग सोडून दिशा बदलणे. २. आळ; ठपका; बोल; दोष.[सं. अप+ सृ]

**अपसव्य** वि. १. उजवा : 'पितरस्वरूपी तूंचि जनार्दन । सव्य तें कवण अपसव्य ।' - तुगा ३७८०. २. विरुद्ध; उलट; विपरीत. जसे- उजवीकडून डावीकडे लिहीत जाणे. (फारसी, उर्दू लेखनपद्धती); उजव्या खांद्यावरून जानवे घालणे. (श्राद्ध इ. मध्ये).
क्रिवि. घड्याळाच्या काट्यांच्या गतीच्या उलट दिशेने. [सं.]

**अपसव्य विद्येचे विद्यार्थी** उलट्या बाजूने म्हणजे उजवीकडून डावीकडे लिहिणारे; मुसलमान : 'मोलवी व अपसव्य विद्येचे विद्यार्थी बहुत जमा होते हे पाहून वजीर राजा मशारनल्हेस बोलले कीं, तुम्ही दोन्ही धर्म आचरतां; सारांश ईश्वर एकच आहे.'- भाअख ७.

**अपसंगति-ती** (अपसङ्गती) स्त्री. (भौ.) दोन वस्तूंचा आकार, गुणधर्म किंवा आकृतिबंध यात वेगळेपणा असणे; साम्य नसणे. [सं.]

**अपसंचय** पु. फायदा मिळविण्याच्या हेतूने एखाद्या वस्तूचा छुपा आणि अमर्याद साठा करणे. [सं.]

**अपसंवेदन** न. (वै.) कोणत्याही बाह्य कारणाशिवाय त्वचेला टोचल्यासारखी, चुरचुरल्यासारखी, खाजवल्यासारखी संवेदना. संवेदी चेतेचा क्षोभ किंवा चेतेला दुखापत झाल्याने अशी संवेदना होते.

**अपसंज्ञा** स्त्री. खोटे नाव; बनावट नाव. [सं.]

**अपसातुपसी** स्त्री. हमरीतुमरी; विरोध; वादविवाद; कलह; भांडण.
**अपसानी** वि. हबसाणी; कागदाचा एक प्रकार.
**अपसामाजिक** वि. समाजाच्या हिताचे नसलेले; अहितकर.
**अपसामान्य** वि. १. ठरावीक प्रमाणाहून भिन्न; सामान्यत्वाच्या रेषेखाली असणारा. २. (मानस.) सर्वसामान्यापेक्षा खालच्या पातळीवरचा; कमी बुद्धिमत्ता असलेला; मानसिक विकृती, अपंगत्व असलेला. [सं.]
**अपसारण** न. १. दूर करणे; काढून टाकणे. २. ठपका; आळ; दूषण; दोषारोप; अपसरण. [सं.]
**अपसारित** वि. दूर केलेला; टाकलेला. [सं.]
**अपसारी** वि. (जीव.) परस्परापासून दूर होत जाणाऱ्या (शिरा इ.).[सं.]
**अपसिद्धांत** पु. चुकीचा नियम, प्रमेय, निर्णय; तर्कशास्त्रास सोडून केलेला निकाल. [सं.]
**अपसुऱ्या** वि. बेसूर आवाजाचा (गवई, वाद्य इ.). [सं. अपस्वर]
**अपसूर** पु. (संगीत.) षड्जादी स्वरांच्या मर्यादेचा भ्रंश होऊन निघणारा भलताच स्वर; वर्ज्य स्वर.
वि. बेसूर; स्वरशून्य; रुक्ष. [सं. अपस्वर]
**अपसृत** वि. दूर केलेला; दूर अंतरावर गेलेला. [सं.]
**अपसृतपार्श्व** (नृत्य.) एका पायाच्या चवड्यावर उभे राहून कटी विवृत करीत असता वरचा सर्व भाग फिरवावा लागतो तो फिरवून पुन्हा जशाच्या तसा आणण्याची क्रिया. [सं.]
**अपसृत होणे** क्रि. (भौ.) एका बिंदूपासून निघून वेगळे होणे; सरकणे; विरुद्ध दिशांना जाणे.
**अपसोय** स्त्री. गैरव्यवस्था; अव्यवस्था.
**अपसोशी–सी** वि. दुःख करणारा; दुःखी. [फा. अफ्सोस]
**अपस्करण** न. १. प्रकाशाचे निरनिराळ्या रंगांत होणारे विलगीकरण. २. विकीरण; फाकणे; फाकवणे; पांगणे; उडवणे. [सं.]
**अपस्करण शक्ति–क्ती** स्त्री. (भौ.) प्रसरणशील, विकीरणशील शक्ती.
**अपस्कारिता** स्त्री. (भौ.) बदलण्याचा गुणधर्म. [सं.]
**अपस्तम्भ** पु. (आयु.) श्वासनलिका; छातीतील मर्मस्थान. [सं.]
**अपस्थापन** न. चुकीच्या ठिकाणी ठेवणे; अस्थानी ठेवणे; भलत्या ठिकाणी स्थापन करणे. [सं.]
**अपस्थित कटक** न. (भूशा.) प्रस्तरभंगामुळे खडकांचे थर खालीवर होऊन तुटलेली डोंगररांग. [सं.]
**अपस्नात** वि. मृत माणसाच्या उत्तरक्रियेसाठी बरोबर गेल्यामुळे स्नान केलेला. [सं.]
**अपस्नान** न. १. मृत माणसाच्या उत्तरक्रियेसाठी बरोबर गेल्यामुळे करावे लागणारे स्नान. २. प्रेतास घातलेले स्नान. ३. एकदा स्नान केलेल्याच पाण्याने पुन्हा स्नान. [सं.]
**अपस्फीति –ती** स्त्री.(वै.) शीर किंवा चेता प्रमाणाबाहेर फुगणे, विस्फारण.
**अपस्मरी** वि. अपस्मार हा रोग ज्याला झाला आहे असा.
**अपस्मार** पु. फेफरे; मिरगी; एक मानसिक विकृती. या विकृतीत एकदम मूर्च्छा येणे, छाती धडधडणे, घाम येणे, तोंडातून फेस येणे वगैरे लक्षणे आढळतात : 'अपस्मार एका आंगी ते भीति पाणिया लागीं । – गीता १३.२४९३. [सं. अप + स्मृ]
**अपस्मार** न. १. अपथ्य. २. अपस्मारपण. (गो.)
वि. दुष्ट; मृत्यूसमान : 'पापी अपस्मार जनीं । राक्षेस जाणावे ।' – दास १८.६.५. [सं.अप + मारण]
**अपस्मारण** न. आवाक्याबाहेर काम करणे. [सं. अप + मारण]
**अपस्मारी** वि. अपस्मार, फेफरे याविषयीचा; ज्याला अपस्मार रोग आहे असा.
**अपस्वार्थ** पु. स्वतःचा वैयक्तिक स्वार्थ : 'श्रीमंतांचे राज्यात फळी बांधून (स्वतंत्र एक पक्ष निर्माण करून) धनी माथ्यावर नसता अपस्वार्थाकरिता बखेडा करावा हे नेकसल्ला नाहीं'– हौके ६१. [सं.]
**अपस्वार्थी** वि. स्वतःचा स्वार्थ साधणारा. [सं.]
**अपहरण** न. १. हिरावून घेणे; लुटणे; लुबाडणे; नागविणे. २. जबरदस्तीने पळवून नेणे; फसवून पळवणे. [सं.]
**अपहर्ता** वि. लुटणारा; हिरावून घेणारा; लुबाडणारा. [सं.]
**अपहसित** न. मान वगैरे हलवून मुक्तपणे हसणे; डोळ्यात पाणी येईपर्यंत हसणे. [सं.]
**अपहस्तकी – अपहस्तें** आपल्या हातांनी. पहा. **आपहस्तक**
**अपहानि–नी** स्त्री.नुकसान; खराब होणे (करणे, पोचविणे.) [सं.]
**अपहार** पु. १. अन्यायाने घेणे; कपटाने संपादन करणे; लबाडीने मिळवणे.२.अन्यायाने संपादन केलेले द्रव्य : 'आईते अपहार । आणूनियां भरी घर ।'– तुगा २९७४. ३. ज्याचे अपहरण झाले आहे, त्यास होणारे दुःख. ४. चोरी. ५. नाश ६. कसर ७. (विधि.) अफरातफर.
**अपहारक–री** पहा : **अपहर्ता**
**अपहृत** वि. फूस लावून, फसवून–पळवून नेलेला; जबरदस्तीने पळवून नेलेला; ज्याचे अपहरण केले गेले आहे असा. [सं.]
**अपहृतयश** न. हिरावून घेतलेले यश. [सं.]
**अपह्नव–अपह्नुति –ती** पु. स्त्री. १. लपवणूक; लपवणे; दडवणे : ' करीतसें नित्य अपन्हवाला ।'– सारुह २.७४.२. एक अर्थालंकार. उपमेय उपमान असल्याचे वर्णन. उपमेयावर त्याच्या वास्तविक स्वरूपाचा अपलाप करून उपमानाचा आरोप करणे. हा अलंकार उपमेचाच एक प्रकार आहे.३. शांत करणे. [सं.]
**अपळे** वि. पूर्ण दिवस भरण्यापूर्वी जन्म झाल्याने अवयवांची संपूर्ण वाढ न झालेले (मूल.)(व.)
**अपक्ष** वि. १. कोणत्याही राजकीय पक्षाचा सदस्य नसलेला. २. कोणाच्याही बाजूने न बोलणारा, वागणारा. ३. पंख नसलेला (मनुष्य, पशू इ.)
**अपक्षपात** पु. १. कोणत्याही पक्षाचा किंवा बाजूचा कैवार न घेणे; निःपक्ष असणे. २. लोकांची भीडमुर्वत न ठेवणे. [सं.]
**अपक्षय** पु. १. ऱ्हास; अवनती; झीज; उतार; उतरती कळा; क्षय; कमजोरपणा. २. (भू.) खडकांवर रासायनिक प्रक्रिया झाल्याने, वातावरणाचा परिणाम झाल्याने खडकांची झीज होऊन त्यांचे मऊ, भुसभुशीत मातीत रूपांतर होणे. [सं.]

**अपक्षरण** न. १. झीज; धूप. २. (भूशा.) (हवेमुळे, विरघळल्यामुळे, घर्षणामुळे) भूपृष्ठावरील खडकांची झीज होण्याची क्रिया. [सं.]

**अपक्षरणक्षमता** स्त्री. (भौ.) झीज होण्याची क्षमता. [सं.]

**अपक्षारण** न. (भू.) क्षार कमी किंवा नाहीसे करणे. [सं.]

**अपक्षालन** न. (भूशा.) पृष्ठभागावर पडणारे पाणी जमिनीत मुरून खाली जात असता जमिनीतील विद्राव्य घटक व पोषक द्रव्ये पाण्याबरोबर निघून जाणे. [सं.]

**अपक्षिप्त** वि. खाली फेकलेले, टाकलेले. [सं. अप+ क्षिप्]

**अपक्षीण** वि. ऱ्हास पावलेला; अवनत स्थितीस आलेला; उतरती कळा लागलेला; कमजोर झालेला. [सं. अप+ क्षी]

**अपक्षेप-अपक्षेपण** पु. न. १. खाली फेकणे, टाकणे. २. (व्यापार.) सर्वसाधारण हिताचा विचार करून वादळात किंवा संकटात सापडलेल्या जहाजावरील माल स्वखुशीने समुद्रात फेकून देणे. [सं. अप + क्षिप् ]

**अपंक्त** वि. (प्र. अपांक्त) पंक्तीतून, जातीतून बाहेर टाकलेला; जातिबाह्य; बहिष्कृत. [सं. अ +पंक्ति ]

**अपंग** वि. स्वतःची कामे स्वतः करावयाला असमर्थ; विकलांग; व्यंग असलेला; लुळा, आंधळा, पांगळा इ. [सं. अप+अंग]

**अपंगणे** उक्रि. (प्र. आपंगणे) १. सांभाळणे; वाढविणे; पालन-पोषण करणे; आश्रय देणे; जवळ करणे : 'वैभवहीन जाल्यां अपंगी कोण ।'- दावि ७८. २. स्वीकारणे : 'गति रीति कैसी अपंगिती । सज्जनाची स्थिती न कळे हो कवणासी ।' - दावि २३०.

**अपंगत करणे** क्रि. बहिष्कृत करणे : 'त्यास अपंगत केले होते.' -आंप ५३.

**अपंगत्व** न. शरीरात काहीतरी व्यंग असणे : 'ज्यामुळे यश मिळविण्यात अडथळा निर्माण होण्याची शक्यता आहे असे व्यंग असणे म्हणजे अपंगत्व होय.'-आशिआस २०१. [सं.]

**अपंगालय** न. अपंग, अशक्त, विकलांग असणाऱ्यांची देखभाल, व्यवस्था जेथे केली जाते अशी जागा, गृह. [सं.]

**अपंगिता** वि. आश्रयदाता; सांभाळणारा; पोसणारा; पोशिंदा. पहा : **आपंगिता**

**अपंगिस्त** वि. परावलंबी नाही असा; स्वतंत्र : 'जें जें विषयांचे सुख । तें तें इंद्रियपंगिस्त देख । अपंगिस्त भक्तिसुख । सभाग्य लोक पावती ।।'- एभा १४.२१७.

**अपंडित** पु. अविद्वान; न शिकलेला. [सं.]

**अपा-प्पा** पु. १. थोर किंवा वडील माणसाचे आदराने घ्यावयाचे टोपण नाव. २. लहान मुलास ठेवलेले प्रेमाचे नाव. ३. (वरील अर्थी) नावाच्या पुढे हा शब्द कित्येक वेळा जोडतात. उदा. चिमाजीअप्पा. [का. अप्पा]

**अपाशाई - अप्पाशाही जोडा**- चढावासारखा जोड्याचा एक प्रकार.

**अपाकरण** न. १. चोहोकडे विखरून, उडवून नाहीसा करणे. २. उधळपट्टी; व्यर्थ अपव्यय; चैनबाजी.(संवि.) गुन्हा लपविण्यास मदत करणे. [सं.]

**अपाकृत होणे-करणे** क्रि. (भौ.) तुकडे होणे, करणे; विखुरणे; विखुरले जाणे; खूप विखुरले गेल्यामुळे दिसेनासे होणे. [सं.]

**अपाच्य** वि. (वै.) न पचणारे; अपचनीय.

**अपाच्छेदन** न. (वन.) झड; स्वाभाविकपणे अवयव गळून पडण्याची (झडण्याची) प्रक्रिया. उदा. काही झाडांच्या सालीचे तुकडे, पाकळ्या, फळे इ. [सं.]

**अपाटा की झपाटा** पु. मुलींचा एक खेळ. [झपाटाचे द्वि.]

**अपाड** वि. १. अपक्व. २. चुकीचे; खोटे : 'तुम्हीं चालिजे हें मत कुड । अपाडू कीं ।' - शिव ४८५.

**अपाड-डु-डे** वि. क्रिवि. १. अतिशय; फार : 'याच्या बळा ब्रम्हांडगोळा । तुळितां अुणा अपाडें ।' - मुआदि २७.१८३. २. अतुल; अप्रतिम : 'जरी चतुर अपाडाचा ।' - विसिंपू १.१७ . ३. अशक्य; योग्यतेबाहेरचा : 'म्हणऊनि अपाडु हें आघवें । निर्धारितां । - ज्ञा १.६९. ४. अंतर; असाधारणत्व; असादृश्य : 'कनका आणि कापूसा । अपाडु कां जैसा ।'- ज्ञा .१३.११०१; नवल : 'सिंहासि झोंबे कोल्हा । ऐसा अपाडु अधिक जाला' । -ज्ञा २.१६ [सं. अ+प्रति]

**अपात्र** वि. १. अयोग्य (दान करण्यास वगैरे); नालायक : 'देता न म्हणसी पात्रापात्र ।' - ज्ञा ११.९८ २. एखाद्या पदाकरिता किंवा जागेकरिता आवश्यक असलेली योग्यता अगर अर्हता नसलेला; अनर्ह.

**अपात्रता** स्त्री. अयोग्यता; एखाद्या पदाकरिता योग्य नसणे; लायक नसणे; पात्र नसणे. [सं.]

**अपात्रदान** न. अयोग्य ठिकाणी दिलेली देणगी. [सं.]

**अपाद** वि. ज्यास पाय नाहीत असे. [सं.]

**अपादणे** सक्रि. संपादणे; ओढवून घेणे. [सं. अप+आ+दा] अक्रि. कंटाळणे; त्रासणे; जीवित नकोसे होणें.[सं. आपदा]

**अपादान** न. १. दूरीकरण; वियोग. २. पंचमी विभक्तीचा अर्थ. ३. पंचमी विभक्तीतील नाम. पंचमी विभक्तीचे रूप. [सं.]

**अपान** न. न पिणे.

**अपान** पु. १. पंच प्राणांपैकी दुसरा; अधोगामी वायू. हा गुदप्रदेशी राहतो; पाद : 'मग अपानाग्नीचे मुखीं । प्राणद्रव्ये देखीं ।'- ज्ञा ४.१४५; 'कंठी उदान गुदीं अपान ।' -दास १७.८.१२. २. गुदद्वार. ३. बाहेर जाणारा श्वास; उच्छ्‌वास. [सं.]

**अपानद्‌वार** न. गुदद्वार; मलद्वार. [सं.]

**अपानरंध्रद्वय** न. शिस्न व गुद : 'अपानरंध्रद्वया - । माझारी धनंजया ।' - ज्ञा १८.१०३६. (वा.) **अपानी मेखा मारणे** - अपानी खुंटी ठोकणे; पूर्वीच्या शिक्षांपैकी एक : 'कानीं खुंट्या आदळती । अपानी मेखा मारिती ।' - दास ३.७.७३. [सं.]

**अपानवायु-यू** पु. १. गुदद्वारी स्थिर झालेला वायू. २. पाद. [सं.]

**अपाप** वि. निष्पाप; निर्दोष; शुद्ध. [सं. अ + पाप]

**अपामार्ग** पहा : **आघाडा**

**अपाय** पु. इजा; विपत्ती; अनर्थापात; कहर; आपदा; विनाश : 'शिणतां बाह्य उपायीं । जन अपायीं पडताती ।' - एभा १३.५३८.[सं.] (एखाद्याचा) **अपाय होणे** - ठार होणे.

**अपायकारक** वि. इजा करणारा; हानिकारक; नुकसान करणारा. [सं.]
**अपायन** न. मार्गच्युती; प्रकाशकिरणांचे पथपरिवर्तन; विपथीभवन. [सं. अप + अयन : ]
**अपाययंत्र** न. १. अपायकारक प्रकार; युक्ती : 'एकालागी उभारिती अपाय यंत्रे । '- ज्ञा १६.३४४. २. नुकसान करण्याचे करणीचे साधन. [सं.अपाय + यंत्र]
**अपायी** वि. अपायकारक. [सं.]
**अपायु** पु. गुद.
**अपार** वि. १. अमर्याद; अपरिमित : 'हे अपार कैसेनि कवळावें ।'- ज्ञा १.७४.२. अतिशय; पुष्कळ:'तेणे देवयानीच्या चित्ता । स्नेह वाढला अपार ।'- मुआदि १७.५५. [सं.]
**अपारणे** क्रि. दूर जाणे; कमी होणे; उतार पडणे; ओसरणे. [सं. अ+पृ]
**अपारदर्शक** वि. ज्याच्यातून पलीकडचे दिसत नाही असे. [सं.]
**अपारदर्शकता–त्व** स्त्री. पारदर्शक नसणे; वस्तूच्या पलीकडे प्रकाश न जाणे; प्रकाश प्रतिबंधकत्व. [सं.]
**अपारांतर** न. फार अंतर : 'एवं तपसाधन जें ठेलें । अपारांतरें ।' - ज्ञा ११.६२०.
वि. अमर्याद अंतरावर असलेले. [सं. अपार + अंतर]
**अपार्थ** वि. निरुपयोगी; निरर्थक : 'जेथ सत्य अर्थ नाहीं, तो अपार्थ म्हणिजे पाही ।'- एभा २८. १५९. [सं. अप +अर्थ ]
**अपार्थसिद्धि–द्धी** स्त्री. (ग.) एखादी गोष्ट खरी मानून त्या आधारे येणारा निष्कर्ष गणिताच्या मूलतत्त्वांशी अथवा पूर्वसिद्ध गोष्टींशी विसंगत आहे व म्हणून चूक आहे असे दाखवून त्यावरून खरी मानलेली गोष्ट खोटी असली पाहिजे असे सिद्ध करण्याची पद्धत. [सं.]
**अपार्थिव** वि. १. पार्थिव वस्तूंशी संबंधित नसलेला; मानसिक; आध्यात्मिक : ' रोमच्या सेंट पीटर्सने मला असाच अपार्थिव आनंद दिला आहे.'- दिअहो ५. २. अमूर्त; निराकार. [सं.]
**अपार्य** वि. १. पलीकडे जाणे अशक्य असलेला; अभेद्य; दुर्भेद्य. २. मध्ये वाट पाडता येणार नाही असा. [सं.]
**अपार्यता** स्त्री. १. अभेद्यता; दुर्भेद्यता. २. अपारदर्शकता. [सं.]
**अपालन** न. नियमांचे पालन न करणे; आदेशांचे, सूचनांचे पालन न करणे; आदेशाबरहुकूम न वागणे. [सं.]
**अपालिपा** पु. (लु.) लपंडावाचा एक खेळ; आंधळी कोशिंबीर पहा : **अपाय** : 'विकळ जाहलिया साधनांसी । ये साधकांसी अपावो ।' - एभा २९.६८.
**अपावृत–त्त** वि. प्रकट; उघड : 'तेथ अपावृत जाहले । इंद्रियानळ ।' - ज्ञा ४.१२८. [सं.]
**अपास्त** वि. दूर अंतरावर टाकलेला, फेकलेला.
पु. (ग.) शंकूचा विशिष्ट प्रकारे छेद घेऊन मिळणारी विशिष्ट रेखाकृती. हिची विमध्यता एकापेक्षा जास्त असते. [सं.] **पास्त अन्वस्तीय** (ग.) जिचा एका विशिष्ट दिशेत घेतलेला छेद नेहमी अन्वस्त असतो व त्या दिशेस काटकोनात घेतलेला छेद नेहमीच अपास्त असतो अशी एक त्रिमीत आकृती. [सं.]

**अपास्तीय** वि. (ग.)आडव्या आसाभोवती अपास्त पूर्ण फिरवल्यानंतर तयार होणारा (पृष्ठभाग). [सं.]
**अपांक्त** पहा : **अपंक्त**
**अपांक्तपत्र** न. (जातगंगेने) एखाद्यास जातीबाहेर टाकल्याबद्दलचे निर्णयपत्र. [सं.]
**अपांग** वि. १. अवयवात किंवा इंद्रियात व्यंग, खोडी असलेला; विकलांग उदा. आंधळा, लंगडा. २. (कों.) स्वतंत्र. [सं.]
**अपांग** वि. १. डोळ्यांच्या बाहेरच्या अंगाचा कोन; नेत्रप्रांत. २. कटाक्ष; दृष्टिक्षेप : 'ज्याचेन कृपाअपांगे ।' - एभा १.७९. [सं.]
**अपांगणे** १. विघ्न उपस्थित होणे; उखळणे; लंगडे होणे; हातपाय मोडल्यासारखे होणे; नडणे. २. जाचणुकीच्या स्थितीत असणे; पेचात सापडणे. ३. पहा : **आपंगणे** [सं.अपांग]
**अपांगपात** पु. कटाक्ष टाकणे : 'जयाचेनि अपांगपातें । बंध मोक्षपर्णी आते ।' -अमृ २.४. [सं.]
**अपांपति–ती** पु. समुद्र : ' मोक्षासकट गती । जेथे येती विश्रांति । गंगादि अपांपती । सरिता जेवी ।'- ज्ञा १३.१०७४. [सं.]
**अपांपरी** स्त्री. उ व्यवस्था; दुर्दशा; पहा : **अपरापरी** : इंद्रियें प्रकृति भूललीं । वाच प्राणासि चूकली । ऐसी अपांपरी होती जाली शरीरग्रामीं ।'- राज्ञा ११.६५५.
**अपिकिंज** न. (वन.) किंजमंडल खालच्या पातळीवर (अध:स्थ) राहून बाकीची पुष्पदले वरच्या पातळीवर येतात, तो प्रकार. येथे पुष्पस्थली किंजपुटाला पूर्णपणे वेढून राहते. उदा. पेरू, काकडी, निशिगंध यांची फुले. [सं.]
**अपिचक्र** न. (ग.) ज्याचा मध्य बिंदू स्थिर नसून तो दुसऱ्या मोठ्या वर्तुळाच्या परिघावर फिरत आहे असे लहान वर्तुळ.
**अपितर** वि. बदमाष; खोडकर; उनाड. (व.)
**अपितार** पु. अजागळ व्यक्ती.(ग्रा.) [फा. अब्तर]
**अपिधान** न. १. झाकणें; आच्छादन; लपविणे : 'भरलें रतीसागरी विषय उद्यान । करूं कुठवर करी अपिधान ।'- प्रला ३९. २. (वन.) शेवाळीच्या बीजुकाशयावरचे झाकण; नेपैंथस (कलशपर्णी) या कीटकभक्षक वनस्पतींच्या चंबूसारख्या अवयवाचे टोपण; परागनलिका बाहेर येण्यापूर्वी अलग होणारा भाग. ३. शेवाळीतील बीजुकाशयाचे किंवा काही बीजी वनस्पतीतील करंडकरूप फळाचे टोपण. उदा. घोळ, कुरडू. ४. काही परागकणांवरील टोपण. ५. निलगिरीच्या फुलावरील टोपण. [सं.]
**अपिभौम** न. (वन.) बी रुजण्याचा एक प्रकार. बी रुजल्यावर दलिका जमिनीवर येऊन बहुधा हिरव्या बनतात व काही वेळ अन्ननिर्मिती करतात. [सं.]
**अपिलेट कोर्ट** न. मूळ दिवाणी किंवा फौजदारी न्यायालयांनी दिलेल्या निकालांचा फेरविचार करणारे वरच्या दर्जाचे न्यायासन. [इं.]
**अपिसंवर्त** न. (वन.) १. संवर्ताखाली असलेले छदांचे वर्तुळ. उदा. कापूस, जास्वंद, भेंडी इ. येथे संवर्त या मंडलावर असतो. २. संदलाखाली असलेल्या पानासारख्या उपांगाचे (छदांचे)

वर्तुळ. उदा. जास्वंद. [सं.]

**अपिस्तर** पु. (प्राणि.) त्वचेमधील पेशींचा बाहेरील स्तर. [सं.]

**अपीडित** वि. (वै.) परिणाम न झालेले; त्रास न पोहोचलेले; पीडा न झालेले. [सं.]

**अपील** न. १. खालच्या न्यायाधीशाने दिलेल्या निकालाविरुद्ध वरच्या न्यायालयाकडे अर्ज करणे : 'त्या अपिलाचा जो निकाल होईल तो कायमचा वज्रलेप समजला जाईल.'– घका १२२. [इं.]

**अपुत** वि. अशुद्ध; अपवित्र : 'रमुनि अपुत केली ते कशी पूत नारी ।' –मंराधा ८. [सं. अ+ पूत]

**अपुत्रक -अपुत्रीक** वि. निपुत्रिक; संतती नसलेला; संतानविरहित; अपत्याशिवाय. [सं.]

**अपुनरावृत्ति–त्ती** स्त्री. १. पुन्हा न होणे, घडणे; परत न येणे. २. अखेरची मुक्ती; मोक्ष (जेथून पुन्हा जनन-मरण लागत नाही); निर्वाण; जननमरणाच्या फेऱ्यापासून आत्म्याची मुक्तता. [सं.]

**अपुनर्भव** पु. पहा : **अपुनरावृत्ती** २.

**अपुनर्लभ्य** वि. पुन्हा न मिळणारे, प्राप्त न होणारे. [सं.]

**अपुरकी** क्रिवि. पश्चात; मागे; अपरोक्ष. (गो.)

**अपुरबाय, अपुराबाय, अपुर्बाय** स्त्री. १. नवलाई; अपूर्वता. २. अतिशय ममता, प्रेम, लाड. (गो.) [सं. अपूर्व ]

**अपुरा–अपुरता** वि. १. पूर्ण न भरलेला; न संपलेला; पुरा न झालेला; कमी असलेला. २. पुरेसा किंवा भरपूर नसलेला; उणा; थोडा; असमर्थ; अयोग्य : 'मी अपाडे कीर अपुरा ।'– ज्ञा ६.१४०. ३. अपरिपक्व; अर्धवट; पोरकट : 'अपुरती बुद्धि पुण्य नाही पाठी ।' – तुगा १८७८. [सं. अपूर्ण]

**अपुरी** स्त्री. पहिलीच्या आधीचा बालवर्ग : 'अपुरीत आणि पहिलीत प्रथम उजळणी काढायची असे' – माजीया २८.

**अपुष्क** वि. (वन.) गर्भपोषहीन; पुष्क नसलेले. उदा. चिंच, हरभरा, वाटाणा यांची बीजे. [सं.]

**अपुष्ट** वि. न पोसलेला; हडकुळा; रोडका; अशक्त. [सं. अ + पुष्ट]

**अपुष्टत्व–ष्टार्थत्व** न. मुख्यार्थात भर न घालणारा शब्द; जो शब्द गाळला असता अर्थहानी होत नाही असा शब्द योजणे हा दोष. [सं.]

**अपुष्टि–ष्टी** स्त्री. (वै.) पूर्ण काळजी घेऊनही शरीराच्या एखाद्या भागाचे किंवा स्नायूचे पूर्ण पोषण न होता तो दुर्बल होत जाणे. [सं.]

**अपुष्प वनस्पति–ती** स्त्री. वनस्पतिशास्त्रातील दोन मुख्य भागांपैकी एक. वनस्पती जननपेशीपासून उत्पन्न होते व सपुष्प बियांपासूनही होते– ज्ञाको २०७. [सं.]

**अपूट** वि. पुट न दिलेले. २. अस्पृष्ट; हात न लावलेले(वस्त्र, अन्न इ.): 'कुंजपुरीयाची वस्ती अपूट होती; लूटहि मुबलक सापडली.'– भाब १२१. ३. स्वतंत्र शिल्लक राहिलेले; वगळलेले. ४. वैषयिक समागम झाल्याने दूषित न झालेला (पुरुष, स्त्री.) ५. अशिक्षित; वठणीवर न आणलेले (अपेट या अर्थी). ६. (व्यापक) अचानक या अर्थी. ७. अचूक; अखंड. [सं. अस्पृष्ट]

**अपूप** पु. अनरसा; घारगा : 'निंबे नारिंगे नारेळे । अपूप लाडू अमृतफळें ।'– एरुस्व ६.८६. [सं.]

**अपूर** स्त्री. उणीव; कमरता; उणेपणा; भरपूर नसणे. पहा : **अपुरा** [सं. अपूर्ण]

**अपूरकी** स्त्री. अपूर्वाई; नवलाई : 'तुरीच्या शेंगा काय अपूरकीची जिन्नस हाय ?'– आआशे १६. [सं. अपूर्व]

**अपूरनपूर** स्त्री. किंचित उणीव.

**अपूर्ण** वि. १. न भरलेले; अपुरे; कमतरतेचे; पूर्ण नसलेले; कमी असलेले. २. निष्णात किंवा तरबेज न झालेला. ३. अतृप्त : 'आणि पसरिला अभिलाषु । अपूर्ण होय तोचि द्वेषु ।' – ज्ञा १६.३९९. ४. तुटक.[सं.]

**अपूर्ण–गुणन** न. (जीव.) एकगुणित रंगसूत्रांच्या पटीपेक्षा जास्त किंवा कमी रंगसूत्रे असणे. [सं.]

**अपूर्णपदी** वि. पदातील चरण अपूर्ण असलेला; अपुऱ्या मात्रांचा.[सं.]

**अपूर्ण पिच्छाकृती** वि. (वन.) अर्ध्यापेक्षा बरेच अधिक आणि पिसासारखे (पाते) विभागलेले (साधे पान.) उदा. झेंडू, कॉसमॉस, कामलता.

**अपूर्ण बीजुक** न. (वन.) ज्यात काही भागांची पूर्ण वाढ होत नाही असे बीजुक.

**अपूर्ण भविष्य** वि. (व्या.) एखाद्या क्रियेस आरंभ होऊन तिचा व्यापार त्या काळी चालत राहणार असेल, असा बोध ज्या क्रियापदापासून होतो त्याचा काल. [सं.]

**अपूर्णभूत** वि. (व्या.) हा काळ भूतकाळात एखादी क्रिया अर्धवट झालेली असून पुरी व्हावयाची असते असे दाखवितो. या काळाच्या ठायी क्रियेची अपूर्णता दर्शविली जाते. [सं.]

**अपूर्णमाफी** स्त्री. साऱ्यात थोडीशी सूट असते अशी जमीन.

**अपूर्ण वर्तमान** वि. (व्या.) एखादी क्रिया चालू आहे हे दाखविणारा काळ.

**अपूर्ण स्पर्धा** स्त्री. (अर्थ.) मर्यादित स्पर्धा; बाजारात अनेक उत्पादक, विविध वस्तूंचे उत्पादन करीत असूनही ग्राहक तुलनेने कमी असल्यामुळे प्रत्येक उत्पादक बाजारपेठेवर आपला प्रभाव पाडू शकतो अशी स्थिती. [सं.]

**अपूर्ण हस्ताकृती** स्त्री. (वन.) अर्ध्यापेक्षा अधिक विभागलेले हस्ताकृती पाते, पान उदा. गारवेल. [सं.]

**अपूर्णांक** पु. (ग.) १. पुरा नसलेला अंक; अंकाचा भाग; उदा. एक चतुर्थांश, सात अष्टमांश. २. पूर्ण मूल्य न दाखवणारा अंक. ३. तुकडा. [सं.]

**अपूर्णांग ढाचा** पु. (स्था.) अपुऱ्या अवस्थेत असलेली जोडणी; कच्ची जोडणी.

**अपूर्व** न. १. चमत्कारिक, आश्चर्यकारक गोष्ट; अद्भुत वस्तू; नवल : 'येता देखिले मार्गासी । अपूर्व परियेसा ।' – गुच ३४.१०२. २. (तत्त्व.) पूर्वजन्मविरहित इह जन्मातील कृत्यांपासून होणारे पापपुण्य.

वि. १. पूर्वी कधी न घडलेले, झालेले, प्रथमचे; अगोदरचे; आरंभाचे. २. विलक्षण; चमत्कारिक; असाधारण. ३. अद्भुत; आश्चर्यकारक; असामान्य; श्रेष्ठ दर्जाचे; अत्युत्कृष्ट; फार मोलाचे : 'म्हणोनि तया

निर्मळा । सुख ज्ञानी सरळा । अपूर्व ये फळा । सात्त्विक ते ।'- ज्ञा १४.२६१. [सं.]

**अपूर्व दर्शन** न. १. पहिले दर्शन. २. काहीतरी नवीन किंवा चमत्कारिक पाहणे; पूर्वी कधीही न पाहिलेली गोष्ट पाहणे, दिसणे.

**अपूर्वाई** स्त्री. नवलाई; विलक्षणपणा; असाधारणपणा; उत्कृष्टपणा; भलाई; अत्यंत चांगलेपणा. (वा.) **अपूर्वाई करणे** - कौतुक करणे; फार प्रशंसा करणे; फार फार मानणे. [सं. अपूर्व]

**अपूस- अपोस** पु. एक उत्कृष्ट जातीचा आंबा; हपूस; हापूस. [पोर्तु. आल्फान्सो]

**अपृष्ठवंश-वंशीय** पु. पाठीला कणा किंवा मणके नसलेला एक प्राणिवर्ग. [सं.]

**अपृष्ठीय** वि. (भूशा.) ज्यांचे बाह्याकार स्फटिकरूपात विकसित झालेले नाहीत अशी (खनिजे). [सं.]

**अपेट** वि. १. अंडील; अंड न बडविलेला (बैल, पशू); सांड : 'अपेट वृषभ असती सात । त्यांसी घालील जो नाथ ।'- कथा ४.११.११२. २. अंगातली रग न मोडलेला; बठणीस न आलेला; नरम न झालेला; काम न शिकविलेला; तरबेज न झालेला. ३. अननुभवी.४. संसारकृत्य इत्यादिकांनी जर्जर न झालेला; जगाचे व्यवहार माहीत नसलेला. [सं. अ +पिष्ट]

**अपेटी** वि. रस्त्यापासून दूर; आडवळणी; एका बाजूस. (व.)

**अपेत** वि. दूर गेलेला; मार्गच्युत-भ्रष्ट. [सं. अप+इ=जाणे]

**अपेप** क्रिवि. पहा : **आपोआप** : 'सहस्त्र वर्षे होता पूर्ण । अपेपचि उलेल हे ।' - मुआदि ४.३९.

**अपेय** वि. पिण्यास अयोग्य, निषिद्ध मानलेले (दारू इ.) : 'कां बधिराचे नीट कान । अपेया नाम पान ।'- ज्ञा १८.५८०. [सं.]

**अपेयपान** न. दारू वगैरे निषिद्ध पेयाचे सेवन करणे. [सं.]

**अपेरण** न. (शाप.) किरणांचे अकेंद्रीभवन; केंद्रातून न जाणे; अपायन.

**अपेश** न. अपयश; दुष्कीर्ती; पराभव : 'आणि अपेश ते न वचेल । कल्पांतवरी ।' -ज्ञा २.२०१.[सं.अपयश](वा.) **अपेशाचे खापर-टोपले -मोटकुळे** - अपमानाचे व लाजेचे (काही अनिष्ट कृत्यामुळे) दुसऱ्यांनी टाकलेले - लादलेले ओझे. (वर किंवा डोक्यावर शब्दाबरोबर आणणे, देणे, घालणे, फोडणे, येणे या क्रियापदांशी योजतात.)

**अपेशी** वि. पराभव झालेला; दुष्कीर्ती झालेला; ज्याला यश किंवा सिद्धी मिळाली नाही असा; अपयशी; निष्फळ : 'निर्गुण सांडून अपेसी । सर्व ब्रह्म म्हणे ।'- दास १५.५.२८. [सं.अपयशी]

**अपेशीय** वि. (वै.) १. ज्याच्या शरीराचे अनेक पेशींमध्ये विभाजन झालेले नाही असा (प्राणी, वनस्पती). २. पेशीपासून न बनलेले. [सं.]

**अपेष्टा** स्त्री. त्रासदायक, दु:खदायक स्थिती; कष्ट; त्रास; खेकटे; लचांड; ब्याद; विघ्न. [सं. अप + इष्ट]

**अपेस** क्रिवि. आपोआप : 'रूप सद्गुण संगती तुझ्या तैसें । भाग्य निश्चित असणार तें अपेसें ।।'- फुओं १९.

**अपेक्षणीय** वि. वाट पाहिलेला; मार्ग प्रतीक्षा केलेला; साकांक्ष पाहिलेला, शोधलेला; आशा वाटत असलेला; वचन किंवा खात्री दिलेला. २. इच्छा करण्यास योग्य : 'अपेक्षणीय जे काहीं । ते मीचि केला ।'- ज्ञा १८.१११८. [सं.]

**अपेक्षणे** अक्रि. इच्छा करणे; वाट पाहाणे; जरूर असणे : 'जे अपेक्षिजे विरक्ती । सदां अनुभविजे संतीं ।' - ज्ञा १.५२. [सं.अप+ ईक्ष]

**अपेक्षया** शअ. पेक्षा. उदा. तदपेक्षया = त्यापेक्षा; मदपेक्षया = माझ्यापेक्षा. [सं.]

**अपेक्षा** स्त्री. १. इच्छा; वांच्छा; आकांक्षा; वासना : 'ऐसी अपेक्षा जालिया । बद्ध मुमुक्षते आलिया ।' -ज्ञा १८.१४४१. २. गरज; कारण; प्रयोजन; जरुरी; मागणी. [सं.](वा.) **अपेक्षा करणे**- (मिळण्याच्या आशेने किंवा इच्छेने पाहणे, बघणे, शोधणे, मार्गप्रतीक्षा करणे, इच्छा करणे. ३. साठी, करिता : 'घरापेक्षा स्नानभोजन । परापेक्षा वस्त्रपरीधान' - विसिं. ११.९७.

**अपेक्षापूर्ति-र्ती** स्त्री.अपेक्षा पूर्ण होणे; मनाप्रमाणे घडणे.

**अपेक्षाबुद्धि-द्धी** स्त्री. आकांक्षा; मनीषा; आशा (काही मिळण्याची). (क्रि. धरणे, ठेवणे, करणे.) [सं.]

**अपेक्षाभंग** पु. वाटले होते तसे न घडल्यामुळे झालेली निराशा; मनाविरुद्ध घडणे; आशाभंग. [सं.]

**अपेक्षित** वि. १. आशेने इच्छिलेले; मार्गप्रतीक्षा केलेले : 'काय अपेक्षित तुमचें चित्त । तें निश्चित मी करीन ।'- एरुस्व ३.४२. २. वांच्छित; इच्छित. ३. जरूर असलेले : 'मग अपेक्षित जें आपुलें ।' - ज्ञा ४.१६७.

**अपेक्षित वित्तीयभार** पु. (अर्थ.) एखाद्या वस्तूचे उत्पादन करताना त्यासाठी अपेक्षित असलेली आर्थिक तरतूद.

**अपेक्षितव्य** वि. १. अपेक्षा करावयाचे. २. काम्य; स्पृहणीय; इच्छिण्याजोगे. [सं.]

**अपेक्षी** वि. १. अपेक्षा, इच्छा करणारा. २. गरजू. [सं.]

**अपैता-ते** वि. स्वाधीन; प्राप्त; वश.

क्रिवि. आपोआप; सहज : 'जागर क्षिरापती वैष्णवा सांगाते । घडेल अपैते लाभ मज'- चोखा १८६.

**अपैशुन-न्य** न. सरळपणा; प्रामाणिकपणा; इमान; दोष टाकून गुण घेण्याची दृष्टी; सौजन्य : 'अगा अपैशुन्याचे लक्षण । अर्जुना हे पुढे जाण ।'- ज्ञा १६.१५२. [सं.]

**अपोढ** पु. (भौ.) एका जागेवरून दुसऱ्या जागेवर ढकलले जाणे.[सं.]

**अपोढ निक्षेप** पु. (भूशा.) प्रवाहातून वाहून आलेला गाळ. [सं.]

**अपोढ प्रदेश** पु. (भौ.) बदलत्या बाह्य क्षेत्राचा ज्यावर परिणाम होत नाही अशी इलेक्ट्रॉन नळीतील रिकामी जागा; अवकाश.

**अपोढ वाळू** स्त्री. (भूशा.) प्रवाहातून वाहत आलेली वाळू.

**अपोढ स्तर** स्त्री. (भूशा.) हिमनदीच्या प्रवाहामुळे विस्तीर्ण प्रदेशावर साचलेला गाळ. [सं.]

**अपोशन - अपोषण -अपोष्णी** न. १. पाणी पिणे. २. आचमन; ब्राह्मणादी त्रैवर्णिकांनी संध्यादी कर्माच्या वेळी किंवा भोजनाच्या वेळी चित्राहुती घातल्यानंतर व भोजनांती तळहातावर थोडे पाणी घेऊन आचमनासारखे एकदाच पिणे : 'शुद्धमतीनें आपण । कृष्णासी दिधलें आचमन । तीन वेळां न करी जाण । सर्वापोशन एक वेळा ।'-

एरुस्व १५.१४६. ३. लग्नात जेवावयास बसताना सासूने आपल्या पतीचे नाव घेऊन जावयाच्या हातावर तूप घालणे. ४. (ल.) त्याग : 'केले अपोषण कर्मासी ।'– निगा ४२. [सं. आप : + अशन]

**अपोहन** न. १. त्याग; दूर करणे; घालवणे : 'सविलास अविद्यानिरसन । अपोहन या नांव ।'– एभा १३.१८५. २. (रसा.) मोठ्या रेणुभाराच्या पदार्थांपेक्षा कमी रेणुभार असलेले, सामान्यत: स्फटिकवृत्तीचे पदार्थ वेगळे करण्याची क्रिया. [सं.]

**अपौरुष** वि. १. मनुष्याने केलेले नव्हे ते; ईश्वरकृत. २. मनुष्याच्या आवाक्याबाहेरचे; दैवी; अतिमानुष. ३. भिन्न; भिन्नपणाचे.[सं.]

**अप्तर** वि. १. बिघडलेले; दोषयुक्त; नासलेले : 'तितका बयान श्रीमंतास लिहिला असतां बाजी अप्तर होती.'– मइसा. ५.११६ २. उनाड; उजाड.

**अप्तरी** स्त्री. बिघाड; नुकसान : 'यांत कांहीं विपरीत दिसल्यानें अधिक सावधगिरी जाली म्हणजे गोष्ट बहकण्यात येऊन अप्तरी होईल.'– मइसा ७.११६.

**अप्ती** स्त्री. १. आपत्ती; संकट. २. वाण; उणीव. [सं. आपत्ति]

**अप्पा** पहा : **अपा**

**अप्पाध(धो)प्पा** पु. लहान मुलांचा एक खेळ. 'अप्पा धप्पा । वेणी वेणी गप्पा । आणा दोर । बांधा चोर ।' इत्यादी गाणे म्हणून टाळ्या वाजवीत फिरावयाचे.

**अप्रकट** वि. १. अप्रगट; अप्रसिद्ध; विख्यात नसलेला; उघडा न केलेला; न दाखविलेला. २. अस्पष्ट; संदिग्ध; सुप्त. ३. (जीव.) दोन वैकल्पिक गुणांपैकी संकरप्रजेत न दिसणारे पण त्यापुढच्या पिढीतील काही अपत्यांत आढळणारे गुणदोष. [सं.]

**अप्रकाशित** वि. प्रकाशित न झालेले, केलेले; प्रसिद्ध न केलेले, झालेले (पुस्तक इ.). [सं.]

**अप्रकांड** वि. ज्यास बुंधा किंवा कांडे नाही असे छोटे (झाड). [सं.]

**अप्रकांडकथा** (अप्रकाण्डकथा) स्त्री. विसंगत भाषण; भाकडकथा; अवांतरकथा; आडकथा. [सं.]

**अप्रकृत** न. (साहित्य.) उपमान.

वि. विषय, प्रसंग सोडून असलेले; विसंगत; अप्रस्तुत. [सं.]

**अप्रक्रिय** वि. (यंअ.) असंस्कारित; कोणतीही प्रक्रिया न केलेला परंतु पुढील प्रक्रियेसाठी तयार असलेला (धातूचा तुकडा). [सं.]

**अप्रगत** वि. मागे राहिलेला; शास्त्रीय सुधारणात व आर्थिक दृष्ट्या मागे असलेला (देश वगैरे) : 'अप्रगत राष्ट्राचे स्वरूपही असेच झपाट्याने पालटण्याची कुवतही आजच्या विज्ञानाच्या ठिकाणी आहे.'– लोस ३. [सं.]

**अप्रगल्भ** वि. अपक्व; पूर्णावस्था प्राप्त न झालेले; कच्चे; पूर्ण न झालेले (विचार वगैरे). २. भिडस्त; लाजाळू. [सं.]

**अप्रगामी** वि. (भौ.) पुढे न जाणारे (पाणी इ.); एकच तापमान असलेले (हवामान इ.). [सं.]

**अप्रचलित** (अप्रचलित्) वि. प्रचारात चालू नसलेले; व्यवहारात वापरात नसलेले; व्यवहारातून गेलेले; लुप्त (शब्द, रीत वगैरे). [सं.]

**अप्रचेता** पु. ज्ञानी : 'येरा प्रतिग्रहो ठाकला । अप्रचेतया' – तसा ८०६.

**अप्रज** वि. १. संतान नसलेला; निपुत्रिक. २. प्रजा, लोक नसणारा; उजाड (गाव, राज्य वगैरे). ३. न जन्मलेला. [सं.]

**अप्रणीत** वि. १. न केलेले; न बनविलेले. न पुरस्कारिलेले. २. न रचलेले. ३. न उपदेशलेला; कर्तव्य म्हणून न सांगितलेला. [सं.]

**अप्रतर्क्य** वि. १. तर्क न करता येण्याजोगे; न जाणण्याजोगे. (ईश्वर स्वरूप-माहात्म्य इ). २. दुर्ज्ञेय.३. अवर्णनीय. [सं.]

**अप्रतल वक्र** पु. (ग.) एकाच प्रतलात पूर्णपणे सामावली न जाणारी वक्र रेषा. [सं.]

**अप्रतिकार्य** वि. (आयु.) ज्याच्यावर उपाय करता येत नाही असा; असाध्य (रोग इ.). [सं.]

**अप्रतिदेय** वि. तंतोतत भरून देता न येण्याजोगा; भरपाई करता न येण्याजोगा . [सं.]

**अप्रतिदेय ऋणपत्र** न. (व्यापार.) ज्याची परतफेड होत नाही, करता येत नाही असा कर्जरोखा.

**अप्रतिदेय भाग** पु. (व्यापार.) ज्याची परतफेड होत नाही असा भाग.

**अप्रतिपत्ति–त्ती** स्त्री. १. अज्ञेयता; गूढता. २. अनाकलनीयत्व. ३. कर्तव्यासंबंधीच्या निश्चयाचा अभाव. [सं.]

**अप्रतिबंध** वि. १. अडथळा न केलेले; अटकाव, हरकत नसलेले. २. (कायदा.) अनिर्बंध; निर्विवाद; तंटा, भांडण किंवा वाद नसलेले (वतन वगैरे.). [सं.]

**अप्रतिबंधदाय** पु. ज्या मिळकतीवर जन्मत:च मालकी हक्क प्राप्त होतो म्हणजेच असा हक्क प्राप्त होण्यास कोणत्याही प्रकारचा अटकाव नसतो ती मिळकत; बापरोटी. [सं.]

**अप्रतिबंध व्यापार** पु. खुला व्यापार; आयात व निर्यात मालावर जकात न घेण्याची पद्धती : 'अर्थशास्त्रावरील इंग्रजी पुस्तकांत अप्रतिबंध व्यापाराचें जें महत्त्व गाईलें असते'– लोटिकेले १.५१६. [सं.]

**अप्रतिभट** पु. दुसरी तोड किंवा जोड नसलेला योद्धा; दुसरा प्रतिस्पर्धी नाही असा वीर; सेनापती. [सं.]

**अप्रतिम** वि. ज्याची बरोबरी करणारा दुसरा कोणीही नाही असा; जोड किंवा तोड नसलेला; अद्वितीय; अनुपम. [सं.]

**अप्रतिमल्ल** पु. बिनजोड पहिलवान. पहा : **अप्रतिभट** : 'हे अप्रतिमल्ल जगीं । पुरता प्रतापु अंगीं ।'– ज्ञा १.११०. [सं.]

**अप्रतिरव** पु. अविवादित मिळकत. पहा : **अप्रतिबंधदाय**

**अप्रतिवाद्य** वि. वादविवादास किंवा हो नाही म्हणण्यास जागा नसलेला; खंडन करता न येणारा; निर्विवाद. [सं.]

**अप्रतिष्ठा** स्त्री. दुष्कीर्ती; दुर्लौकिक; अपमान; फजिती; मानखंडना.

**अप्रतिष्ठित** वि. १. तिरस्कृत; बदनाम. २. (तत्त्व.) अस्थिरचित्त. [सं.]

**अप्रतिहत** वि. १. अनिरुद्ध; स्वैर; अनिर्बंध; अप्रतिबंध; नेहमी, सदोदित असणारे; अव्याहत : 'कोणत्याही भाषेची प्रगल्भता म्हणजे सर्वत्र तिचा अप्रतिहत संचार सुरू असला पाहिजे'– लोटिकेले ४.४.१५७. २. निराश न झालेला. [सं.]

**अप्रतीत** वि. १. माहिती नसलेले; अननुभवी; अपरिचित. २. असंतुष्ट. ३. (साहित्य.) ज्याचा अर्थ स्पष्ट होत नाही असा. [सं.]

**अप्रतीति-ती** स्त्री. १. अनुभवाचा अभाव; प्रतीती, अनुभव, माहिती नसणे. २. ज्ञानगोचर न होणे. [सं.]

**अप्रतोख** पु. असमाधान : 'भांडारेकार तो अप्रतोखु भावीतचि असति'- लीचपू ४८.

**अप्रत्यय** पु. १. प्रत्ययाचा, अनुभवाचा अभाव. २. अविश्वास; विश्वासाचा, भरवशाचा अभाव; बेभरवसा.
वि. (व्या.) ज्याला प्रत्यय लागत नाही असा. [सं.]

**अप्रत्ययी** वि. १. अनुभवशून्य. २. अविश्वासू; बेभरवशी.

**अप्रत्यर्पण** न. अर्पण न करणे; स्वाधीन न करणे, होणे; ताब्यात न देणे; हवाली न होणे, करणे. [सं.]

**अप्रत्यक्ष** वि. १. समक्ष नव्हे तो; एखाद्याच्या पाठीमागे. २. स्वतः न करता इतरांच्या मार्फत केलेला. उदा. अप्रत्यक्ष मतदान; अप्रत्यक्ष करआकारणी. [सं.]

**अप्रत्यक्ष कर** पु. (अर्थ.) १. व्यक्ती किंवा कंपन्या यांच्याऐवजी वस्तूंवर किंवा सेवासुखसोयींवर बसवलेला कर. २. ज्या करात कराघात (कायद्याने सरकारात कर भरण्याची व्यापारी, उत्पादक यांची जबाबदारी) व करापात (कराची रक्कम प्रत्यक्ष खिशातून देणारा ग्राहक) भिन्न व्यक्तींवर असतो असा कर.

**अप्रत्यक्ष दायित्व** न. अप्रत्यक्षपणे आलेली जबाबदारी (कर्ज फेडण्याची, पैसे वगैरे देण्याची).

**अप्रत्यक्ष निवडणूक** स्त्री. (राज्य.) प्रत्यक्ष मतदारांकडून नव्हे तर निर्वाचक गुणांमार्फत होणारी निवडणूक. उदा. राज्यसभेची निवडणूक.

**अप्रत्यक्ष पुरावा** पु. अनुमानिक व परिस्थितिजन्य पुरावा.

**अप्रत्यक्ष प्रतिकार** पु. १. प्रत्यक्ष विरोध न करणे; सरळ मार्गाने प्रतिबंध, अडवणूक न करता अन्य मार्गाने अडवणूक करणे : 'अप्रत्यक्ष प्रतिकार हें एक बलवान शस्त्र आहे.'- टिव्या. [सं.]

**अप्रत्यक्ष मतदान न.** मतदारांऐवजी त्यांच्या प्रतिनिधीने केलेले मतदान.

**अप्रत्यक्ष लोकशाही** स्त्री. (राज्य.) लोकांनी निवडून दिलेल्या प्रतिनिधींमार्फत कायदे करून चाललेली शासनव्यवस्था.

**अप्रत्यादेय राशी** स्त्री. वसूल न होणारा पैसा.

**अप्रत्यास्थ** वि. (भौ.) कठीण, घणाघाती (आघात).[सं.]

**अप्रत्यास्थ संघात** पु. (भौ.) अस्थितिस्थापक (घन) पदार्थांचा एकमेकांवर होणारा आघात. या आघातातून शक्ती निर्माण होते. [सं.]

**अप्रदल** वि. (वन.) प्रदलहीन; पाकळ्या (पुष्पमुकुट) नसलेले (फूल). उदा. गुलबक्षी; एरंड. [सं.]

**अप्रदान** न. (पगार, हिशेब इ.) चुकता न करणे; फेड न करणे. [सं.]

**अप्रधान** वि. दुय्यम; वरिष्ठ किंवा मुख्य नसलेले; गौण; कमी प्रतीचे. [सं.]

**अप्रफुल्ल** वि. अविकसित; न फुललेले. [सं.]

**अप्रबुद्ध** वि. १. अज्ञानी ; मठ्ठ; मूर्ख; मद्दड. २. अपक्व समजुतीचा. ३. माहिती नसलेला; तरबेज नसलेला; विषयाशी अपरिचित.[सं.]

**अप्रभु-भू** वि. १. बलहीन; सामर्थ्यहीन. २. ज्याचा दुसऱ्यावर दाब, ताबा किंवा नियंत्रण नाही असा. [सं.]

**अप्रमत्त** वि. १. कर्तव्यात न चुकणारा. २. सावध; हुशार; दक्ष; जागरूक. ३. उन्मत्त नसलेला; न शेफारलेला. [सं.]

**अप्रमाण** वि. १. पुरावा, आधार नसलेले; अविश्वसनीय; खोटे; निराधार. २. जे प्रमाण होऊ शकत नाही असे; भरमसाट : 'प्रपंची जो अप्रमाण । तो परमार्थी खोटा ।'- दास १२.१.९. ३. किंमत, महत्त्व नाही असे; गैर लागू; आदर्श न मानलेले : 'म्हणोनि भक्ति गा येथ सरे जाती अप्रमाण ।' -ज्ञा ९.४५२. [सं.]

**अप्रमाणता** स्त्री. (राज्य.) तर्कहीनता; बेकायदेशीरपणा. [सं.]

**अप्रमाणित** वि. ज्याला विशिष्ट गुणवत्तेचे, दर्जाचे प्रमाणपत्र मिळाले नाही असा; प्रमाणित नसलेला; प्रमाणित न केलेला. [सं.]

**अप्रमाद** पु. १. मोठा प्रमाद, दोष. (अचपळ प्रमाणे) : 'करूं आवडे अप्रमाद तो तमोगुण ।' - दास २.६.१९. २. दंगा; बंडाळी. वि. बिनचूक; दोषरहित : 'विहित परी अप्रमादें । अनुष्ठावें ।'- ज्ञा ११.१४३८. [सं. अ+प्रमाद]

**अप्रमीलक भेषज** न. गुंगी न आणणारे औषध.

**अप्रमेय** वि . १. मापता न येण्यासारखे; अमर्याद. २. निश्चित करता न येण्यासारखे; प्रमाणांनी सिद्ध करता येत नाही असा : 'तरि आतां अप्रमेया । मज शरणागता अपुलिया ।' - ज्ञा ११.५६०. [सं.]

**अप्रयास** पु. श्रमांचा, कष्टाचा अभाव : 'निधान लाधे अप्रयासीं । तरी कां कष्ट सायासीं ।'- गुच १.५८. [सं.]

**अप्रयोजक-जिक** वि. १. निरुपयोगी; कवडीमोल; अनावश्यक : 'परी रात्रीविषयी अप्रयोजिकु । जालाचि कीं ।'- अमृ ६.६४. २. गैरवाजवी; विसंगत; हेतुशून्य; अनुचित : 'हा सुधारणेचा हुतूतू अगदी अप्रयोजक होता'- लोटिकेले ४.२९४. ३. कृतघ्न; उपकार न समजणारा. [सं.]

**अप्रयोज्य** वि. लागू न पडणारा. [सं.]

**अप्रवर्ती** वि. अकार्यकारी; अंमलात नसलेला, आणला जात नाही असा (कायदा इत्यादी.). [सं.]

**अप्रवाही** वि. न वाहणारा; घन (पदार्थ). [सं.]

**अप्रवृत्ति-त्ती** स्त्री. १. प्रवृत्तीचा अभाव; नावड; मनाचा ओढा नसणे. २. शास्त्रनिषिद्ध कर्म; कुमार्ग : 'जे अप्रवृत्तीचा अव्हांटा । सांडूनि विधिचिया निघे वाटा ।'- ज्ञा ७.४८. [सं.]

**अप्रवेश्य** वि. दुर्भेद्य; ज्यातून वाट मिळत नाही असा. [सं.]

**अप्रवेश्यता** स्त्री. दुर्भेद्यता; वाट मिळत नाही अशी स्थिती.[सं.]

**अप्रशस्त** वि. १. अरुंद; मोकळे नसलेले; चिंचोळे. २. बेडौल; विशोभित. ३. गैर; अशिष्ट; अनभिमत; संप्रदायास सोडून.[सं.]

**अप्रसक्त** वि. विसंगत; असंबद्ध; अप्रस्तुत; विषय, प्रसंग सोडून असलेले; अनुचित. [सं.]

**अप्रसन्न** वि. १. नाखुष; नाराज; असंतुष्ट; इतराजी झालेला; गैरमर्जी असलेला. २. अस्वच्छ (पाणी इ.). [सं.]

**अप्रसरणशील** वि. ज्याच्या अंगी विस्ताराचे - प्रसरणाचे गुणधर्म नाहीत असा; विस्तार न पावणारा. [सं.]

**अप्रसवा** स्त्री. (वै.) जिला मूल झाले नाही अशी स्त्री; वांझ. [सं.]

**अप्रसंग** पु. १. अवेळ. २. अप्रस्तुत, अयोग्य गोष्ट: 'म्हणौनि अप्रसंगु तेणें । म्हणावा कीं तो ।'- ज्ञा १८.१६२६. [सं.]

**अप्रसंगालाप** पु. विषय सोडून बोलणे : 'परि हे अप्रसंगालाप ।' - ज्ञा ७.३८. [सं.]

**अप्रसाद** पु. अवकृपा; असंतोष; नाराजी.

**अप्रसि(सी)का** स्त्री. हरकत; अडथळा; शंका; आक्षेप.(वा.) **अप्रसि(सी)का मांडणे** - अडथळा किंवा तक्रार करणे.

**अप्रसिद्ध** वि. १. अप्रकाशित; न छापलेला (ग्रंथ). २. सांदीकोंदीचा; अविख्यात; कीर्ती, लौकिक यामुळे प्रसिद्धीस न आलेला. ३. प्रचलित, रूढ नसलेला. ४. खरे अस्तित्व नसलेले; विद्यमान नसलेले; उपलब्ध नसलेले; कवींच्या असंभाव्य कल्पनेतील. जसे - खपुष्प, सशाची शिंगे, वगैरे. ५. गुप्त; हलका; क्षुद्र. [सं.]

**अप्रस्तुत** वि. १. चालू काळाला किंवा विषयाला अयोग्य किंवा न शोभणारे; अप्रासंगिक; अनुचित; विसंगत. [सं.]

**अप्रस्तुत तथ्य** असंबंधित गोष्ट किंवा घटना.

**अप्रस्तुत प्रशंसा** स्त्री. एक अर्थालंकार. पहा : **अन्योक्ति** [सं.]

**अप्राकर्णिक** वि. प्रकरणास सोडून; अप्रस्तुत. [सं.]

**अप्राकृत** वि. १. असामान्य; असाधारण; सृष्टिक्रमाबाहेरचा; अलौकिक; अद्‌भुत. २. (वन.) नेहमीपेक्षा वेगळी रचना असणारा. उदा. परागकोश पाकळीसमोर नसण्याची स्थिती. [सं.]

**अप्राट** वि. अपरंपार : 'अप्राट त्यानें पुण्य केला'- मसाप ३२०. (काथ.) [सं. अपार]

**अप्राप्त** वि. १. न मिळालेले; अनागत; अलब्ध. २. अकृतार्थ; (ल. ) ज्यास ब्रह्मानंद मिळाला नाही असा : 'परी नेणती ते काय कीजे । अप्राप्त देखें ।'- ज्ञा २.२५२. [सं.]

**अप्राप्तकाल** वि. (तर्क.) दिलेल्या प्रमाणावरून सिद्ध न होणारा; तर्कशुद्ध नव्हे असा; अकालिक; अयोग्यकालिक.
पु. (तत्त्व.) १. येणारा काळ; भविष्यकाळ. [सं.]

**अप्राप्त यौवन** वि. वयात न आलेला; यौवनावस्था प्राप्त न झालेला; कोवळा. [सं.]

**अप्राप्त व्यवहार** पु. कायद्याने वयात न आलेले मूल; अज्ञान. पहा : **अजात व्यवहार** [सं.]

**अप्राप्ति** स्त्री. न मिळणे; प्राप्ती न होणे; (ल.) ब्रह्मानंदप्राप्तीचा अभाव.

**अप्राप्य** वि. अलभ्य; मिळण्यास कठीण. [सं.]

**अप्रामाणिक** वि. अविश्वसनीय; विश्वासार्ह नाही असा; विश्‍वासास अपात्र; लुच्चा; खोटा; शंका येण्यासारखा. [सं.]

**अप्रामाण्य** न. पुराव्याचा, आधाराचा अभाव. [सं.]

**अप्रामाण्य ग्रह** प. खोटे मानणे; असत्य मानणे; अविश्वास. [सं.]

**अप्रार्थित** वि. आगंतुक; अनपेक्षित; आकस्मिक.

**अप्रासंगिक** वि. अयोग्य काळी, अवेळी केलेले; विषयाला किंवा प्रसंगाला सोडून असलेले; विसंगत; असमयोचित.

**अप्रास्ताविक** वि. अयोग्य तऱ्हेने, अवेळी सुरुवात केलेले, सांगितलेले; प्रसंगाला न शोभणारे; अप्रासंगिक; अप्रस्तुत. [सं.]

**अप्रास्य** वि. अप्रशस्त; घाणेरडे : 'कुचीळ मळीन अप्रास्य ।'- आचामा २३७. [सं. अप्रशस्त]
न. कडक व्रत; उपासतापास : 'देह तुटले अत्यंत अप्रास्य केले'- स्मृस्थ १०६.

**अप्रांत** वि. अमर्याद : 'पृथुतरें सरळें ।अप्रांतें एकें ।'- ज्ञा ११.१२४.[सं.]

**अप्रिय** वि. पसंत न पडणारे; न आवडणारे; नावडते. [सं.]

**अप्रीत-ति-ती** स्त्री. १. असंतोष; नापसंती; नावड; अरुचि. २. तिरस्कार. [सं. अ+प्रीति]

**अप्रुक** वि. (ना.) अलौकिक; नावीन्यपूर्ण. पहा : **अप्रूप** (ग्रा.)[सं.]

**अप्रुब** वि. अपूर्व; प्रिय. (गो.)[सं. अपूर्व ]

**अप्रूप** न. अपूर्व घटना; आश्चर्य.
वि. अपूर्व. पहा : **अपरूप** [सं.अपूर्व किंवा अपरूप]

**अप्रेरित** वि. उत्तेजन न दिलेला; उद्युक्त न केलेला; प्रोत्साहन, प्रेरणा न दिलेला. [सं.]

**अप्रोद** पु. भीड; लाज; संकोच.

**अप्रोदणे** अक्रि. भीड वाटणे; संकोचणे; लाजणे.

**अप्रौढ** वि. १. लहान; वयात न आलेला : 'नाना अप्रौढी बाळकीं । तारुण्य राहे थोकी ।'- ज्ञा १२.७८. २. अप्रगल्भ. [सं.]

**अप्सरण** न. दोष. पहा : **अपशरण** : 'जीव देण्याचें अप्सरण माझ्यावर लादू पाहतोस काय ?'- मेनका २८.(बे.)

**अप्सरा** स्त्री. १. इंद्रसभेतील नर्तकी व गायिका; कंचनी (ह्या समुद्रमंथनाच्या वेळी अप: म्हणजे पाणी यापासून उत्पन्न झाल्या.); गंधर्वांगना; देवलोकीच्या नृत्यांगना. २. (ल.) अतिशय सुंदर स्त्री. [सं.]

**अफ्-फ्** उद्गा. धनगराचा बकऱ्या हाकण्याचा शब्द; हर्र.

**आफजाईश** स्त्री. वृद्धी; वाढ. [फा. आफ्जाईश]

**अफट्ट** वि. तुडुंब. (गो.)

**अफतर** वि. बिघडलेला; नष्ट झालेला; उजाड. [अर. इफ्तर]

**अफतरी** स्त्री. खराबी; दुर्दशा; नाश; हानी. [फा. अब्तरी]

**अफतागीर अफताबगीर** पहा : **अबदागीर**

**अफतादार** वि. उजाड; ओसाड; न व्यापलेली; पडून राहिलेली (जमीन, घर, मकान).

**अफरातफर** स्त्री. १. लबाडीने केलेला अपहार; स्वत:च्या ताब्यात असलेला दुसऱ्याचा पैसा किंवा मालमत्ता लबाडीने घेणे; अपहार; खोटे हिशोब दाखवून सरकार, संस्था इ.चा पैसा लुबाडणे. २. घोटाळा; गोंधळ; गडबड (देशातील); परागंदा स्थिती (लोकांची). ३. अव्यवस्थित, विस्कळित स्थिती (वस्तूंची, कामाची). [फा.]

**अफरातफरा-तफ्रीक** वि. परागंदा; बेपत्ता : 'हिंदू माणूस होते तेही अफरातफरा जाहले.' -मइसा १०.२९८.

**अफरातफरी** क्रिवि. अव्यवस्थित रीतीने; ढिलाईने; गडबडीने; तारांबळीने. [फा.]

**अफराद** पु. १. सेवक. २. एकटा : 'हाली विसाजी राम, कृष्णाजी बायदेऊ याचा फर्जंद हा अफराद देशपांडेगिरीचा वारिसी होय.'– भाइसंअ १८३४.५७. [फा.इफ्राद]

**अफल–ळ** वि. १. निष्फळ; व्यर्थ; फुकट. २. ज्याच्यापासून काही कार्यनिष्पत्ती होत नाही असे. ३. जे फळ नव्हे ते. ज्याला फळ म्हणता येत नाही असे. [सं.]

**अफल–लक अंडी** न. अव. नर व मादी यांचा संयोग न होता केवळ खुराक खाऊन कोंबडीने घातलेली अंडी. यात जीव नसतो. यास बार अंडी असेही म्हणतात. [सं. अफल + अंड]

**अफलाकांक्षी** वि. बक्षिसाची इच्छा न धरणारा; निरिच्छ. [सं.]

**अफलातून** वि. १. इतरांपेक्षा निराळा; ज्याच्या वागण्यात, बोलण्यात काही विशेष आहे असा : 'रघुनाथपंत हणमंते तशीच अफलातून असामी आहे.'– श्रीयोभा २.२९२. २. विलक्षण; अप्रतिम; आश्चर्यकारक. ३. अरबी भाषेतील 'प्लेटो'चे नाव. [फा.]

**अफलाद–अफवाद–अहफाद** स्त्री. १. मुलीचा वंश : 'अव्लादअफ्वाद (वंशपरंपरा) देविले असे.'– मइसा १५.१५९; 'ओलाद व अहफाद चालविजे' – मइसा २०.१४१. २. दत्तक पुत्राचा वंश. ३. रखेलीची, पाटाच्या बायकोची, दासीची संतती. [फा. अहफाद्]

**अफलित** वि. (जीव.) नर व मादी गंतुकांचा संयोग न झालेला. [सं.]

**अफवा** स्त्री. कंडी; बाजारगप्पा; आवई; जिचा पुरावा, जिचे मूळ सापडत नाही, पण जी अनेकांनी ऐकली आहे अशी बातमी. [फा.]

**अफसाणी, हबसाणी कागद** पु. सोन्याचा वर्ख लावलेला सोनेरी बुट्ट्यांचा विशिष्ट कागद. मातब्बर लोकांना पत्रे लिहावयाची असता अशा उंची कागदाचा उपयोग करीत.

**अफसोस** पु. १. शोक; दुःख. २. (ल.) पश्चात्ताप. ३. उद्गा. दुःखदर्शक उद्गार : 'अरेरे! हाय हाय!' [फा. अफसोस्]

**अफळणे** अक्रि. १. हिरवे, कच्चे किंवा अपक्व राहणे (फळ इ.). २. अर्धवट शिजणे (अन्न). [सं. अ+फल्]

**अफाट** वि. १. विस्तीर्ण; विस्तृत; विशाल (स्थळ, अरण्य, तलाव, समुद्र, इमारत, काम). २. मोठे; अचाट. ३. प्रबळ; अतिशय सामर्थ्यवान; आश्चर्यकारक; उत्कृष्ट. ४. उनाड; मोकाट (जनावर.) ५. (ल.) अशिक्षित; अडाणी; ठोंब्या; दांडगट.

**अफार** वि. १. अतृप्त : 'आनंदसुत विभु हा नंदनंदन अफार विचरे घरे ।'– आपद ८४. २. फार; अतिशय : 'पुष्पा वैल वारा ।परीमळ येतसे अफारा ।' – श्रीकृच १९४.

**अफिण्या, अफिमी– म्या** वि. अफूचे व्यसन असणारा.

**अफीण–म** स्त्री. अफू; खसखशीच्या बोंडातील वाळलेला मादक किंवा कैफ आणणारा चीक.[सं. अहिफेन. फा.अफीन] (व.) **अफीण उतरवणे**– एखाद्याची चांगली खोड जिरवणे. **अफीणीसारखा जीव ओढणे, लागणे**–अतिशय आवड किंवा उत्कंठा असणे; ओढा असणे.

**अफीणबाज** वि. अफूचे व्यसन असणारा.

**अफु–फू : अफीण**

**अफूचा गाळावा** पु. गाळलेली अफू किंवा अफूची गोळी. (वा.) **अफूचा गाळावा घेणे**– पैजेचा विडा उचलणे किंवा आणप्रमाण करणे. अशा वेळी अफू गाळून प्यायचा काही विधी रजपूतात होता.

**अफूचे झाड** न. (वन.) पॅपॅव्हरेसी कुलातील वनस्पती. तुर्कस्तान, इराण, चीन, ब्रह्मदेश व भारत येथे आढळते. अफूचा अर्क औषधात व गुंगी आणण्यासाठी वापरतात.

**अफेक** स्त्री. प्रबळ इच्छा; उत्कंठा; आशा; आवड; चट; चटक; ध्यास; ओढा. (क्रि. धरणे, बाळगणे). [सं. अपेक्षा]

**अफेनद** वि. जड; फेन (फेस) न देणारे; ज्या पाण्यात साबणाचा फेस जास्त व लवकर होत नाही व अन्न लवकर शिजत नाही असे खडकाळ किंवा रेताड जमिनीतील पाणी. [सं.]

**अफोडी** वि. न फोडता; सबंध : 'सर्वज्ञें भणीतलें अफोडी उदंबरू खाईजे.'– लीच २.५५.

**अफौटे** वि. न फुटणारी; अभंग : 'अफौटे ब्रिदे पढवी सैंग.'– नरुस्व ३७१.

**अफ्जल** वि. उत्तम; सर्वश्रेष्ठ : 'लोक म्हणतात की ती केवळ अफ्जली परी आहे.'– म्हैवा १३६.

**अफ्तर, अफ्तरी, अफ्तागीर–गिऱ्या, अफ्ताब, अफ्लातून, अफ्लाद, अफ्वा, अफ्वाई** पहा : **अफतर – अफवा** इ.

**अबई–आबई** स्त्री. १. एक फुलझाड. २. एक वेल; घेवड्याची एक जात; याला खडसंबळ, पठारी, कोयतेवाल, ब्रह्मी अशी नावे आहेत. आश्विनात शेंगा येतात त्यांची भाजी करतात.

**अबक** विटीदांडूच्या किंवा चेंडूच्या खेळातील शब्द 'एक'. या अर्थी. जसे – अबक, दुबक, तिबक; अबकी, दुबकी, तिबकी; एक, दोन, तीन.

**अबकार** पु. एक प्रकारचा विषारी किडा. हा चावल्याने अंग सुजते. [का.]

**अबकारी** वि. १. दारू, अफू वगैरे मादक पदार्थांवरील (जकात, कर.) २. दारु वगैरे काढण्याचा (कलाली धंदा). ३. मादक पदार्थविषयक (खाते, उत्पन्न वगैरे).

**अबगाळला** वि. आबाळ झालेला; ज्याच्याकडे दुर्लक्ष झाले आहे असा. (व.)

**अबजब** पु. हमरीतुमरी; वादावर किंवा हमरीतुमरीवर येणे; एकेरीवर येऊन केलेले भांडण; अरेतुरे. [हिं. अबे–जाबे.]

**अबजाळ** पहा : **अपजाळ**

**अबजुक** स्त्री. अवघडपणा : 'पुन्ना सुगीला पैसं साठवून झकास नवा शालू जसाच्या तसा आणायचा. त्यात एवढी काय अबजूक?'– खळाळ ३१.
वि. अवघड.

**अबडू** न. जाकीट : 'अंगरखे जाऊन अबडू, पाटलोणी, कोट निघाले.' –ज्ञान १८.९.१८७१.

**अबतूर** वि. बिघडलेले; दोषयुक्त.

**अबद** वि. १. बोलू नये असा; अभद्र : 'येर सकळा सोमवंते राहुनि । द्वेसिती अबद वचनीं ।।' –क्रिपु ८५३. [सं.अभद्र]

**अबदा** स्त्री. १. संकट; विघ्न; अरिष्ट. २. पीडा; त्रास; दुःख; जाचणूक. [सं. आपदा]

**अबदागि(गी)र** स्त्री. राजे, सरदार वगैरे लोकांच्या डोक्यावर, सूर्याचे

ऊन लागू नये म्हणून मिरवणुकीच्या वेळी धरावयाचे छत्र. नवऱ्या मुलाच्या मस्तकावरही असे छत्र धरण्याची पद्धत. [फा.]

**अबदागिरबाळ्या** स्त्री. अव. कानात घालावयाच्या ३२ बाळ्यांपैकी एक प्रकार : 'नालबाळ्या अबदागिरबाळ्या तर्कधर ।'– अफला ५५.

**अबदागिऱ्या** पु. अबदागीर धरणारा सेवक.

**अबदार** पु. जलशाळेवरील अधिकारी. पाणी स्वच्छ, थंड करणे वगैरे कामावरचा अधिकारी. [फा. आब्दार]

**अबदार** क्रिवि. जपून; बेताने : 'पारूनं चुलीवरचं... गाडगं उचलून दारातल्या दगडाशेजारी अबदार ठेवलं.' –खळाळ ८२.

**अबदारखाना** पु. १. पिण्याच्या शुद्ध पाण्याचा खजिना, साठा; जलशाला; हौद. २. पाण्याचे खाते व त्या खात्याचे काम.

**अबदारी** स्त्री. अबदाराची कचेरी व काम; अबदारखाना.

**अबद्ध** वि. १. न बांधलेले; मोकळे; स्वतंत्र. २. (ल.) असंबद्ध; मूर्खपणाचे; विसंगत (भाषण, वर्तन वगैरे) : 'देह पांचभौतिक प्रसिद्ध । तो मी म्हणणे हे अबद्ध ।' – एभा ९.२८८. ३. ढिले; ढिलाईचे; बेकैद; बेबंद; स्वैर; स्वच्छंदी (वर्तन, वागणूक). ४. अशुद्ध; वेडेवाकडे : 'अबद्ध वांकुडें जैशातैशापरी । वाचे हरिहरि उच्चारावे ।' – तुगा ८०९. ५. चूक; प्रमाद. [सं.]

**अबद्ध अधिकर्ष** पु. कोणत्याही प्रकारच्या अटी जोडलेल्या नाहीत असा अधिकर्ष.

**अबद्ध मंत्र** पु. पिशाच्चादी साधनांचा मंत्र; अघोरी विद्या. [सं.]

**अबद्धमुख** वि. घाणेरड्या तोंडाचा; शिवराळ; अभद्र बोलणारा; फटकळ. [सं.]

**अबधाक-णे** पहा : **अपधाक-णे**

**अबनाल-ळ** न. तलवारीच्या म्यानाचे वरचे टोपण (चांदीचे अगर सोन्याचे).

**अबनूस** पु. (वन.) एबेनेसी कुलातील सदापर्णी वृक्ष. हा कोचीन, त्रावणकोर, श्रीलंका व मलाया येथे आढळतो.

**अबब** उद्‌गा. आश्चर्योद्‌गार; अहह!

**अबरगत** स्त्री. संकटाची भीती; खोटे संकट. पहा : **बलामत** (ग्रा.)

**अबरगोबर** क्रिवि. अव्यवस्थितपणे; ढिलाईने; गबाळपणे (क्रि. सारवणे, माखणे वगैरे).

**अबरचबर** न. (विप्र. अरबटचरबट); नि:सत्त्व, बेचव अन्न; नीरस-रुक्ष खाणे; बोलणे.

क्रिवि. १. मूर्खपणाने; नीरसपणाने. २. अव्यवस्थितपणे.

**अबरवण** न. १ वाहते पाणी. २. कापडाचा एक प्रकार.

**अबरवा** क्रिवि. वाहणारे पाणी, यावरून सरळ अखंडितपणे.

**अबरूगबरू** वि. खाऊन पिऊन पोसलेला, वाढलेला. सुखवस्तू : 'कोण अबरूगबरू हरिजन गेला तर उभा चिरून टाकतील.' – अगाअवि ५३.

**अबर्गत** वि. १. लहान मुलासारखा; असहाय. (कों.) २. रोगिष्ट. [सं. अर्भकवत्]

**अबलक-ख** वि. १. चित्रविचित्र रंगाचा; अनेक रंगांचा; सर्व शरीर लाल असून त्यात पांढरे, काळे, जर्द पट्टे असलेला हा घोडा फार दुर्मिळ होय. – अश्वप २९ : 'पंचकल्याणी घोडा अबलक ।' –ऐपो १२९. २. तेज दौड करणारे : 'हरितवर्ण अबलख वारू' – गादै ९. ३. अनेक रंगाच्या नक्षीचे. [फा. अब्लक]

**अबला** स्त्री. बाई; स्त्री. [सं.]

**अबळ** वि. १. ताकद किंवा बळ नसलेला; अशक्त; कमजोर; दुर्बळ; दीन : 'बळी अबळातें खाय ।हेचि बाधित जरी होय ।' – ज्ञा १६.३०२. २. (ल.) अज्ञानी : 'बाळकाहातीं दिधल्या फळा ।खावे हे न कळे त्या अबळा ।।' – एभा १५.२०. [सं. अबल]

**अबंदपैबंद** वि. अशाश्वत : 'दौलत अबंदपैबंद' – मइसा २०.२८६.

**अबंध** वि. निर्बंधरहित; स्वैर; मोकळा; मोकाट : 'परि अबंधा नित्य ब्रह्मभावा ।बिघाड नाही ।' –ज्ञा २.२५७. [सं. अ + बंध]

**अबंधडका** वि. अनागोंदी; अंदाधुंदीचा कारभार. (को.)

**अबा, आबा** १. वयाने मोठ्या माणसासाठी वापरायचे आदरार्थी संबोधन. २. बाप. ३. आजोबा.

**अबाजबा** क्रिवि. अद्वातद्वा; अचकटविचकट; वाटेल तसे : 'तो तिला अबाजबा बोलू लागला.' –धग ३५.

**अबाजा** पु. संबंध; अधिकार : 'मठानजीक माती खणावया तुमचे काय अबाजा आहे :' – मइसा १५.१५९.

**अबाट** वि. १. न बाटलेला; जो भ्रष्ट झाला नाही असा; दूषित नसलेला; दोष न देता येण्यासारखा. २. (क.) जातीबाहेर, वाळीत न टाकलेला. [सं. अभ्रष्ट]

**अबाठ** वि. ज्यात कोयीची नीट वाढ झाली नाही असा.

**अबादगुण** पु. दुर्गुण : 'पोट्टीत काही अबादगुण आहे वाटतें, नाही रे?' –बाविबु ५५.

**अबादगुणी** वि. ज्यात अनेक दुर्गुण आहेत असा. (व.)

**अबादान** वि. समृद्ध : 'साहुकाराकरितां राज्य अबादान होते.' –आज्ञापत्र ८९.

**अबाधित** वि. १. बाधा, दोष नसलेला; अदूषित; आक्षेप न घेतलेला; शास्त्रादिकांनी संमती दिलेला; अविरोध. २. विरोध,प्रतिकार न करता येण्यासारखे; कायम; नाकबूल करता न येण्यासारखे. ३. उत्पत्ती, स्थिती व लय यांची बाधा न होणारे; मुक्त. ४. स्वाधीन; स्वायत्त; कोणतेही निर्बंध नसलेला. ५. परिणाम न झालेला; अविकृत; बाधा न झालेला.

**अबाब** पु. १. अबवाब(अव.); बाबी. २. निरनिराळ्या प्रकारचे सरकारी कर. ३. गावच्या हक्कदाराचा वाटा वजा करून सरकारला साऱ्याबद्दल जे धान्य, तेल जिन्नस द्यावयाचे ते. ४. (नगर) आंब्याच्या पिकाचा अंदाज. [फा.]

**अबाबय, अबाबा** उद्‌गा. आश्चर्य; अचंबा. पहा : **अबब** (व.)(वा.)

**अबाबय, अबाबा करणे, वाटणे** – अवडंबर माजविणे; कांगावा करणे; थैमान मांडणे; बोंबाबोंब करणे.

**अबालबोध** वि. अवघड; समजण्यास कठीण : 'आमचे शब्द जरी मराठी असतात तरी विचार इंग्रजी व अबालबोध असतात.' –विराशिंरो ४३. [सं.]

**अबाव** न. कांगावा; थैमान; बोंबाबोंब.

**अबा (ब्वा) शाई–ही–अब्बाशी** वि. गहिरा-गर्द तांबडा व काळसर-अब्बास फुलासारखा रंग; या रंगाचे वस्त्र. [हिं.]

**अबाष्पनशील** वि. (भौ.) ज्याचे लगेच बाष्पीभवन होत नाही असा. [सं.]

**अबांधविक बहुपतित्व** न. (समाज.) विवाहाचा एक प्रकार; एकमेकांचे नातलग नसलेले अनेक पुरुष एकाच स्त्रीशी विवाह करतात. मलबारमधील नायर जमातीत प्रचलित असलेली विवाहपद्धती.

**अबिल खेळू का तबिल खेळू** मुलींचा एक खेळ.

**अबिस्टी** वि. तेजः पुंजः'येकि थोरि अबिस्टी मुहुर्ति ।माहा भयेंकरि दिसती ।' -क्रिपु ३१.२९.

**अबिळाखण** स्त्री. अभिलषण; अभिलाषा; इच्छा: 'लोकीं न्हवावेया अभिळाखण । तुमी वर्जिले आळंकार भूषण ।' – क्रिपु १.१०२.

**अबिळोखणे** अक्रि. अभिलाषणे; अभिलाषा करणे : 'परनारी अबिळोखिलेया । ते योग्य नव्हे कवणा प्राणिया ।'-क्रिपु २.२३.७६.

**अबीजी** वि. (वन.) ज्या वनस्पतींना फुले किंवा बी धरत नाही अशी.

**अबीजुक शाकाणू** पु. (कृषि.) पुष्कळशा सूक्ष्म जीवांच्या पेशीमध्ये अतिउष्ण हवेमुळे एक वाटोळ्या आकाराचे बीजुक तयार होते. ज्या सूक्ष्म जीवांमध्ये बीजुक तयार करण्याची नैसर्गिक शक्ती नसते असे बीजुक.

**अबीर** पु. चंदन, केशर, कापूर, कस्तुरी अशा सुगंधी द्रव्यांच्या मिश्रणाने केलेला सुगंधी पदार्थ. [फा. अबीर]

**अबुज** क्रिवि. बुजल्यासारखे; ओके-ओके. (व.)[सं. अ+बुध] (वा.) **अबुज वाटणे** – न करमणे; चैन न पडणे; न सुचणे.

**अबुद्ध** वि. १. माहीत नसलेले; न समजलेले. २. बुद्ध धर्मीय नसलेला. [सं.]

**अबुद्धि–द्धी** वि. मूर्ख; समज नसलेला; शहाणा नसलेला. [सं.]

**अबूज** वि. अडाणी; अल्लड; चमत्कारिक; विचित्र.[सं. अबुद्ध] (वा.) **अबूज वाटणे** – गोंधळून जाणे; चैन न पडणे.

**अबे** उद्गा. अरे! [हिं.]

**अबेदाबे** स्त्री. १. अरेतुरे; हमरीतुमरी. २. उद्धटपणाची भाषा वापरणे, करणे; वाकडेतिकडे बोलणे. (क्रि. करणे). [हिं. अबेचे द्वि.]

**अबोट** वि. बोट न लावलेले; स्पर्श न केलेले; चव न घेतलेले; उपयोगात न आणलेले (अन्न, पदार्थ वगैरे).

न. १. अखंडित लेप; २. अनामिका : 'तें लागलेसे अबोट चंदनाचें ।' – ज्ञा १५.३.

**अबोटी** स्त्री. अलिप्तता; स्पर्श न करणे : 'तेथोनि देह आवघें । अबोटी कीजे ।' -ज्ञा १७.२१०.

वि. अस्पृष्ट; (ल.) विषयोपभोग न करणारे : 'अखोरी अबोटी जन्म परमेश्वरासि देयावे'– लीचउ ५८८.

**अबोध** पु. अज्ञान; ज्ञानाभाव : 'वस्तूसी अपुला जो अबोधु ।तो उर्ध्वी आठुळैजे कंदु ।' – ज्ञा १५.८८.

वि. १. (समाज.) जाणीव नसलेला; जागृत नसलेला. २. (मानस.) सुप्त; अव्यक्त; जागृत नसलेले (मन). [सं.]

**अबोधन–ध्य** न. १. मूर्खास शिकविणे. २. जाणीव नसणे; बोध न होणे. [सं.]

**अबोधनीय–ध्य** वि. १. सांगण्यास, जाणण्यास, बोध होण्यास, शिकविण्यास कठीण. २. जड; मंद; बुद्धिहीन. [सं.]

**अबोध्यबोधन** न. मूर्खाला शिकवणे. [सं.]

**अबोल, अबोलका–णा, अबोल्या** वि. १. मुखस्तंभ; बडबड न करणारा; जास्त बोलावयास नको असलेला; मितभाषी : 'आत्मा अबोलणा स्वयें । परि तोचि बोलतो म्हणावा निश्चयें ।' – यथादि ४.३०७. २. गाण्यातला विशिष्ट स्वरयुक्त जो बोल त्या विरहित असा : 'कां न सज्जितां वीणा ।तो नाद जो अबोलणा ।' – अमृ ५.४१. ३. मुका; स्तब्ध : 'एक सदा गाती नाचती । एक तो होती अबोलणे ।'– एभा २.६३१.

**अबोलणे** न. मौन : 'काही बोलसी तरि अबोलणे बोल' –चांगा २१.

**अबोलण्या** वि. न बोलण्यासारखा : 'तुका म्हणे नष्टा । अबोलण्या तुझ्या चेष्टा' – तुगा १४१९.

**अबोला** पु. १. दुसऱ्याने केलेल्या चुकीबद्दल अजिबात न बोलता राग व्यक्त करणे; कुढ्या मनाने राहणे; परस्पर मैत्रीत अंतर पडणे; रुसवा किंवा द्वेष इ. कारणांमुळे एकमेकांशी न बोलणे. २. (सामा.) मौन : 'ब्रह्माचा अबोला फिटावा । अद्वैतत्त्वें भेटावा ।' – ज्ञा १७.३२२.

**अबोली** स्त्री. (वन.) कोरांटी कुलातील अबोली रंगाची फुले येणारे एक लहान फुलझाड.

**अब्ज** न. १. एक संख्या; शंभर कोटी; अर्व. २. दहाव्या स्थानाची संख्या.

**अब्ज** न. कमळ.

पु. १. शंख. २. चंद्र. ३. धन्वंतरी. [सं.]

**अब्जिनी** स्त्री. कमलिणी : 'अद्वयाब्जिनीविकाशु । वंदूं आता ।' – ज्ञा १६.१.

**अब्जिनी भोग** पु. कमळिणीचे मूळ.

**अब्जुग** न. नवलविशेष; अद्भुत.

**अब्द** पु. १ मेघ. २. वर्ष. ३. सांवत्सरिक श्राद्ध : 'प्रयागी अब्दचवदा श्रीरामें सांग सारिले ।' – मोरा १३. [सं.]

**अब्द** वि. १. खूप. २. अभद्र.

**अब्दागिरी बाळी** स्त्री. कानात घालावयाची अब्दागिरीसारखी बाळी.

**अब्धकणे** क्रि. धक्का बसणे; भीती वाटणे.

**अब्धि–ब्धी** पु.समुद्र, महासागर : 'नातरी शब्दब्रह्माब्धि । मथिलेया व्यासबुद्धि ।' – ज्ञा १.५१. [सं.]

**अब्धिगजाळ** वि. समुद्रातल्या हत्तीसारख्या : 'कुठे पूर्वीची कूपमंडुकी । कुठे अतां ही अब्धिगजाळ ।' – मक ११७.

**अब्ब– ब्बा** उद्गा. अहा! ओहो! अबब. (क्रि. करणे, म्हणणे.)[ध्व.]

**अब्बस** स्त्री. निर्भर्त्सना; फजिती; अपमान. (क्रि. करणे).

**अब्बा** पु. बाप; बाबा (ख्रिस्ती व मुस्लिम समाजात). पहा : **अबा**

**अब्बा** उद्गा. खेळामध्ये, धरणारा मुलगा पळणाऱ्या मुलास धरावयास आला असता त्याने पकडले जाऊ नये म्हणून खाली बसताना म्हणावयाचा शब्द : 'एकाद्यास आता धरणार अशा वेळी त्याने धरण्यापूर्वी अब्बा म्हणून खाली बसावे.' – व्याज्ञा १.१३६.

**अब्बाशाई–ही** पहा : **अबाशाई**

**अब्बाशी** स्त्री. १. अबाशाही. २. लहर; मिजास. (व.)
**अब्रश** वि. घनश्याम; काळासावळा; ठिपकेदार. [फा. अब्रस]
**अब्रह्म** न. (तत्त्व.) ज्याची तार्किक उपपत्ती देता येत नाही, पण ज्याचा स्वीकार अनिवार्य आहे असा पदार्थ म्हणजे माया होय. ही माया आणि तिचा पसारा म्हणजेच अब्रह्म. [सं.]
**अब्रह्मण्य** वि. ब्राह्मणांनी करू नये असे; निषिद्ध.
न. ब्राह्मण्याविरुद्ध गोष्ट; पाप; दुष्कृत्य.
उद्गा. (ल.) अरेरे! घात झाला! (याअर्थी). [सं.]
**अब्राह्मण** पु. हिंदू धर्मातील ब्राह्मण सोडून इतर जाती.
**अब्राह्मण** न. ब्राह्मणांची जी विशेष कर्तव्ये त्याविरुद्ध आचरण.
अब्रू स्त्री. मान; कीर्ती; लौकिक; प्रतिष्ठा; मान्यता; इज्जत. [फा.] (वा.) **अब्रू घालवणे** - वाईट वागून लोकांचा स्वत:विषयी वाटणारा आदर गमावून बसणे. **अब्रू घेणे** – १. अपमान करणे; अप्रतिष्ठा करणे; मानहानी करणे. २. शील भ्रष्ट करणे; बलात्कार करणे. **अब्रू गाड्यावरून चालणे–जाणे**-दुष्कीर्ती होणे; बदलौकिक होणे. **अब्रू जाणे**– अपमान होणे; किर्तिनाश होणे; नालस्ती होणे.
**अब्रूखाऊ– घेणा** वि. १. दुसऱ्याची अब्रू घालविणारा, घेणारा. २. भ्रष्ट; मोडता घालणारा; भोंदणारा; चकविणारा; पेचात घालणारा.
**अब्रूचा, अब्रूदार** वि. प्रतिष्ठित; योग्यतेचा; माननीय; लौकिकवान; इभ्रतदार.
**अब्रूची चाड** स्त्री. मानसन्मानाची, प्रतिष्ठेची आस्था, काळजी.
**अब्रूचे काकडे** पु. अव. अब्रूचा नाश.
**अब्रूनुकसानी** स्त्री. (कायदा.) लेखाने, भाषणाने, खुणांनी अगर चिन्हांनी एखाद्याची बेइज्जत करणे; मानहानी करणे.
**अभक्त** वि. १. भक्त नसलेला; पूज्यबुद्धी नसलेला. २. रुष्ट; नाराज : 'तुम्ही नानावर अभक्त जाहला आहा.' –पेद ८.३१. [सं.]
**अभक्ति–क्ती** स्त्री. १. अप्रीती; श्रद्धेचा अभाव. २. द्वेष; नावड; तिरस्कार. [सं.]
**अभद्र** न. १. वाईट गोष्ट; अकल्याण; अरिष्ट : 'अभद्र व्हावे शिशुपाळासी ।' – एरुस्व १३.४२.
वि. १. वाईट; अशुभ; अमंगल; अनिष्ट (भाषण); घाणेरडे, अपशब्दाचे बोलणे; गचाळ; तिट्कारा उत्पन्न करणारे; बीभत्स; द्वाड : 'असा जरि नसे रुचे तरि न तो अभद्र क्षण ।' – केका ९४. २. वाईट नजरेचा; दुष्ट भाषण करणारा. ३. दुर्दैवी. [सं.]
**अभय** न. १. सुरक्षितपणाची, निर्भयतेची खात्री; हमी. २. भीती नसणे; सुरक्षितता. ३. अभयमुद्रा.
वि. निर्भय : 'स्वकर्म आचरणारे अभय जे बळी सर्वां ठाई ।' – ऐपो ४२०. [सं.]
**अभयकर** पु. अभय दर्शविणारी देवतेची किंवा राजाची हस्तमुद्रा : 'तुझीयेन अभयंकरे । अनावर माया हे बोसरे ।'– दास १. ४. ९. [सं. ]
**अभयडिंडिम** पु. १. निर्भयता, सुरक्षितता असल्याबद्दल वाजविण्याचा डमरू, दुंदुभी वगैरे. २. (ल.) संरक्षणाच्या खात्रीबद्दल स्पष्टपणे जाहीर रीतीने बोलणे; सुरक्षितपणाबद्दलचे अभिवचन, कौल वगैरे. [सं.]
**अभयदान** न. सुरक्षिततेबद्दलची देण्यात येणारी खात्री, हमी, वचन. [सं.]
**अभयपण** न. अभयदान.
**अभयपत्र** न. (समाज.) १. परदेशात निर्भयपणे प्रवास करण्याचा परवाना. २. मर्यादित क्षेत्रात फिरण्यासाठी किंवा काही कामकाज करण्यासाठी सैन्याच्या अधिकाऱ्यांनी सर्वसामान्य माणसांना दिलेला अधिकृत परवाना. ३. सुरक्षितपणाबद्दलचे अधिकृतपत्र; कौल; सरकारच्या दहशतीने अथवा दुष्काळाने रयत परागंदा झाली असता तिला आश्वासन देण्यासंबंधीचे पत्र, दवंडी, जाहीरनामा. [सं.]
**अभयमुद्रा** पहा : **अभयकर**
**अभयलेख** पु. पहा : **अभयपत्र** : 'समुद्रयान करण्याचा जर त्यास प्रसंग आला तर कप्तानाकडून नौकेबद्दल अभयलेख घेतल्यावाचून तो तिजवर पाऊल ठेवणार नाही काय?' – निमा ८८८.
**अभयवचन** पहा : **अभयदान**
**अभयवन** न. वन्य पशुपक्ष्यांची शिकार करण्यास जेथे मनाई आहे असे अरण्य; वन्य पशुपक्षी निर्भयतेने राहू शकतील असे जंगल.
**अभयस्थान** न. सुरक्षित स्थान; आश्रयस्थान; जेथे कशाचेही भय नाही असे ठिकाण. [सं.]
**अभयहस्त** पहा : **अभयकर** : 'धर्मप्रतिष्ठा तो सिद्धु । अभयहस्तु ।' – ज्ञा १.१३.
**अभयंकर** वि. भयप्रद नसलेले; भीती वाटण्यासारखे नसलेले; सौम्य. [सं.]
**अभयारण्य** न. पशुपक्षी मारण्यास जिथे बंदी आहे असे अरण्य; पशुपक्षी पूर्णपणे नष्ट होऊ नयेत म्हणून त्यांना सुरक्षित ठेवण्यासाठी केलेली जागा. पहा : **अभयवन** [सं. अभय + अरण्य]
**अभर** स्त्री. आकंठतृप्ती; पूर्णता; विटेपर्यंत समाधान (क्रि. करणे.).
वि. अतिशय तृप्त झालेला; भरलेला; श्रीमंत : 'येक लाभें अभर जाले ।' – दास ११.४.४५. [सं. आ + भृ]
**अभर – अभार** पु. गावाचे उत्पन्न, वसूल; कच्चा अभर किंवा अभार = काही वजा न देता एकूण जमा केलेला वसूल.
**अभरवण** स्त्री. १. अतृप्ती; पुरेसे न होणे; वखवख. २. आकंठ भरणे; अधिक येणे. ३. प्रमाणाबाहेर जेवण. [सं. अ + भृ]
**अभरवशी** क्रिवि. १. आपत्तीत; निराशेच्या अवस्थेत; आशाभंगाने ओढवलेल्या संकटात. २. बेभरवसेपणाने.
वि. विश्वासघाताने. अविश्वासाने.
**अभरवसा** पु. विश्वासाचा अभाव; निराशा; विश्वासघात. वि. अनिश्चित.
**अभराड** वि. गर्भधारणेशिवाय जाणारे वर्ष; वांझ काळ (गाय, म्हैस इत्यादींच्या बाबतीत).(कों.)
न. गर्भधारणेशिवाय राहणारे गुरू, जनावर.
**अभर्जित** वि. न भाजलेले : 'मृग मारुनि असंख्यात ।भक्षूनि भर्जित अभर्जित ।।' – मुआदि २.५.६४. [सं.]
**अभर्तृका** स्त्री. पती नसलेली स्त्री; विधवा; (प्र.) गतभर्तृका.
**अभव** पु. संसारनिरपेक्ष, अप्रापंचिक अवस्था; मोक्षाची स्थिती: 'ॐ नमो श्री जनार्दना । नाही भवअभवभावना ।' – एभा १.१. [सं.]

**अभक्षणीय–अभक्ष्य** न. निषिद्ध पदार्थ (गोमांस इ.) खाणे; खाण्यास अयोग्य ठरवलेले पदार्थ खाणे. जिवास अपायकारक पदार्थ खाणे. [सं.]

**अभंग– गी** वि. १. अविनाशी; अखंड; अक्षय; निश्चल; निरंतर : 'श्रीकृष्णरंगें सुरंग । अहेवपण तेणें अभंग । तेचि कुंकुम पैं चांग । मुखचंद्रीं चंद्रमा ।' – एरुस्व ७.१७. २. (ल.) ब्रह्मस्वरूप; अविनाशी स्थिती : 'हे करणी केली जनार्दनें । मज अभंगीं घातलें तेणें ।' – एभा १८.३९३. ३. न तुटलेले; न फुटलेले; न उल्लंघलेले; सतत; अविरत : 'प्रपंचाची धाडी ।अभंग हे ।' – ज्ञा १३.९९२. [सं.]

**अभंग** पु. १. एक मराठी लौकिक छंद. हा लगलाभेदातील (लघु–गुरू इ. भेदांच्या पलिकडचा) अक्षरसंख्यांक पद्यप्रकार आहे. यांचे लहान व मोठा असे दोन प्रकार. २. कविनाममुद्रा.

**अभंग** पु. अयोग्य गोष्ट; खोटी रीत : 'तेथ न सुवावा अभंगी ।आत्मराजु ।' – ज्ञा १८.२८०. [सं.]

**अभंगता** स्त्री. (राज्य.) (एखाद्या नियमाचा, कायद्याचा) भंग किंवा उल्लंघन न करता येण्याजोगी स्थिती. [सं.]

**अभंड** न. १. भांड्यातून जिन्नस तोलून देण्यापूर्वी त्या भांड्याचे वजन करण्यासाठी वजने किंवा इतर जिन्नस तराजूतील दुसऱ्या पारड्यात टाकून काटा समतोल करणे. अशा तऱ्हेने वजन करण्यासाठी टाकलेली वजने किंवा इतर पदार्थ; पासंग.(क्रि. करणे). २. जिनसांचे फार मोठे गठ्ठे; एका गाडीत दोनच डाग जातील अशा प्रकारचे मालाचे गठ्ठे. [सं.]

**अभंड** न. संकट, चिंता. (व.)

**अभंड** वि. १. पुष्कळ; अमर्याद; फार. सामा. शब्द – अभंड पाऊस –पीक – धान्य – वार इ. : 'तुका म्हणे काळें काळें केलें तोंड ।प्रकाश अभंड देखोनियां ।' – तुगा २९८६. २. कुभांडी; खोडसाळ. ३. जहांबाज; आडदांड; भांडखोर; कजाग : 'सवती ग सवती नित्य भांडती नाही कोणाचा कमजोरा ।पति पांगळा करूनि बसविला अभंड नारी शिरजोरा ।' – पला ५.९. [सं.]

**अभाक** क्रिवि. जरा; थोडा; न्यून. (खा.)

**अभागी, अभाग्य, अभाग्यवान** वि. कपाळकरंटा; खोट्या नशिबाचा; दुर्दैवी : 'त्यासी न भजे अभाग्य कोण ।'– एभा २.२२९.

**अभाग्याची पुतळी** स्त्री. दुर्दैवी, कपाळ करंटी स्त्री : 'तिथही अभाग्याच्या पुतळ्या, कपाळकरंट्या गोपिकाबाई.' – तोबं १९.

**अभाग्ये** न. अभागी माणूस : 'अभाग्यें तू नशिबान मेळौंवु जाय.' (गो.)

**अभाय** न. आभाळ. (खा.)

**अभारण** न. निरवणूक; सोपवणूक; भार घालणे, टाकणे : 'पांडवांचे अभारण घातले कवणासंगे ।'– उगी ११६. [सं. आ + भार]

**अभारित** वि. वजन न केलेले.

**अभाव** पु. १. घाण; मुळीच नसणे; शून्यता; नास्तित्त्व २. नास्तिकपणा; नास्तिकबुद्धी : 'अभावाची घेतली नरडी । धाके उदरणा तडाडी ।' – दास ५.९.४६. [सं.]

**अभाव** पु. १. डाव; देखावा; शंका; वहीम; अंदेशा; कल्पना; समजूत. २. भरवसा; विश्वास : 'भाषेचे तिसरे वसतिस्थान न्यायाधिशांच्या कचेऱ्या. या ठिकाणचा मराठी भाषेच्या कैवाऱ्यांस मोठा अभाव आहे.' – निमा ११३. [सं. आ + भाव]

**अभावणी** स्त्री. १. पिकाचा अंदाज; आणेवारी; कोकणात खोत प्रत्येक शेताचा, पीक उभे असताना पंचांसमक्ष व पाटलासमक्ष पाहणी करून जो पिकाचा अंदाज ठरवतो तो; ठरविलेली पिकांची आणेवारी : 'अर्धेलीबद्दल पुढे मागे तक्रार पडू नये म्हणून शेतात पिके उभी असतानाच एकंदर उत्पन्नाचा अजमास किंवा अभावणी करण्यात येते'– लोटिकेले २.६०७. २. प्रत्येक शेतावरील अभावणीचे नोंदणीपत्रक हे खोताचे नोंदणीपत्रक असून त्यात एकंदर कुळांची नावे, जमीन, पीक व खोताने घ्यावयाचे पीक यांची नोंद असते. यावरूनच खतावणी म्हणून दुसरे एक नोंदणीपत्रक करतात; अंदाजपत्रक.

**अभावनीय** वि. १. अतर्क्य; न जाणण्याजोगे; न समजण्याजोगे; अनाकलनीय. २. अचिंतनीय; मनात घेण्यास, विचार करण्यास अयोग्य. [सं.]

**अभावात्मक** वि. अभावाने जाणवणारा : 'मराठी भाषेचा हा अभावात्मक कलंक'–अंया २. [सं.]

**अभावात्मक पद्धति–ती** स्त्री. नकारात्मक पद्धती.

**अभाविक** वि. १. देवावर विश्वास न ठेवणारा; श्रद्धा नसलेला; भाविक नव्हे तो. २. अतर्कित; अकल्पित; आकस्मिक; आगंतुक; विचार न केलेला; चिंतन न केलेला.

न. अल्पराशी; जवळजवळ अभाव. [सं. अ + भाव]

**अभावित** वि. १. अकस्मात; एकाएकी; अचानक; अकल्पित. २. अस्वाभाविक. ३. यादृच्छिक. [सं.]

**अभावित नमुना चाचणी** स्त्री. कोणतेही ठराबीक तत्त्व किंवा क्रम निश्चित न करता घेतलेल्या नमुन्यांची चाचणी.

**अभावितपणे** क्रिवि. एकाएकी.

**अभावी** अ. नसल्यामुळे; अभावामुळे.

**अभावे ब्रह्मचर्य** न. विषयपूर्ततेची साधने नसल्यामुळे, न मिळाल्यामुळे आपोआप घडणारे ब्रह्मचर्य; तुरगब्रह्मचर्य; 'वृद्धानारी पतिव्रता' यासारखा सोवळेपणा.

**अभांड** पहा : **अभंड**

**अभांडकुभांड** न. तोहमत; आळ; किचाट. पहा : **कुभांड**

**अभांडीकुभांडी** वि. तोहमत घेणारा; आळ घेणारा. [कुभांडचे द्वि.]

**अभि** उपसर्ग व शब्दयोगी अव्यय. १. सारखेपणा, साम्य, सादृश्य. उदा. अभिरूप, अभिराम (याप्रमाणे). २. सान्निध्य. उदा. अभ्यग्नी, अभिचर, अभिमुख (पुढे, समोर याअर्थी). ३. वेगळेपणा; पृथकत्व (निरनिराळ्या प्रकारे, वेगवेगळे)४. संयोग; विवक्षितपणा (संबंधी, विषयी). उदा. अभिधान. [सं.]

**अभिकथन** न. १. दृढकथन; निश्चित कथन. २. आळ; दोषारोप.[सं.]

**अभिकथित** वि. १. (कायदा.) निश्चयात्मक रीत्या कथन केलेले. २. दोषारोप केलेले. [सं.]

**अभिकरण** न. (अर्थ.) १. एजन्सी; अडत. २. विशिष्ट काम किंवा सेवा पुरविणारा व्यवसाय किंवा संघटना. [सं.]

**अभिकर्ता** पु. १. अडत्या; ठरावीक अडत घेऊन काम करणारी व्यक्ती. २. प्रतिनिधी. [सं.]

**अभिकर्तृत्व** न. १. दलालाचे काम किंवा अधिकार. २. मुखत्याराचे काम, अधिकार.

**अभिकल्प** पु. (यंत्र.) संकल्पचित्र; नकाशा; आराखडा. [ सं.]

**अभिकार – अभिगार – अभिघार** पु. १. यज्ञात हवन करावयाच्या द्रव्यावर किंवा होमाकरिता घेतलेल्या अवदानावर तूप घालणे. २. जेवणाच्या सुरुवातीस वाढावयाचे तूप; अन्नशुद्धी. (व.) ३. (ल.) पाहुण्यांच्या पानावर थोडेसेच तूप घालणे. ४. सिंचन.

**अभिकारक** पु. (शाप.) एकमेकांवर क्रियाप्रतिक्रिया करणाऱ्या वस्तू, पदार्थ. [सं.]

**अभिकेंद्री** वि. (भौ.) बाहेरील भागाकडून रूपांतर होत होत मध्यबिंदूकडे जाणारे; केंद्रगामी; मध्याभिगामी. [सं.]

**अभिकेंद्री निस्सार** पु. (भूशा.) केंद्राकडे द्रव वाहून जाणे, नेणे.[सं.]

**अभिकेंद्री बल** न. (भौ.) केंद्रामध्ये एकत्र होणारे बल, शक्ती.[सं.]

**अभिक्रम** पु. १. प्रारंभ; उपक्रम; पुढाकार घेऊन काम करणे. २. जोराचा हल्ला. ३. जवळ जाणे. [सं.]

**अभिक्रमण** न. (भौ.) एखाद्या ठिकाणाहून, पदार्थातून किंवा एखाद्या बिंदूतून दुसरीकडे जाण्याची क्रिया. [सं.]

**अभिक्रिया** स्त्री. प्रतिक्रिया; आधीच्या क्रियेमुळे घडणारी उलट क्रिया, नंतर घडून येणारा बदल. [सं.]

**अभिगम** पु. (स्था.) प्रवेश. [सं.]

**अभिगमन** न. १. प्रातःकाळचे अनुष्ठान, उपासना. २. मंदिराची स्वच्छता, झाडलोट. ३. जवळ जाणे; सहवास. [सं.]

**अभिगृहीतक** न. (तर्क.) १. सिद्ध केल्याशिवाय अगदी खरी समजून सत्य मानलेली गोष्ट. २. गृहीत कृत्य. [सं.]

**अभिग्रहण** न. १. (कायदा) पकडणे; काबीज करणे; जप्ती आणणे. २. लुबाडणे. ३. हल्ला, युद्धार्थ आव्हान. ४. सत्ता; वजन. [सं.]

**अभिघर्षण** न. (भूशा.) घासून पृष्ठभागाची झीज होणे. [सं.]

**अभिघात** पु. १. धक्का किंवा मार लागणे. २. आघात; धडक.[सं.]

**अभिघारणे** सक्रि. तुपाने सिंचन करणे : 'नमस्कारावे वाढितां अन्न ।अभिघारावे पहिले चि जाण ।' – गुच ३७.१२५.

**अभिचार** पु. १. एखाद्याला दुखापत करण्याचे किंवा त्याचा नाश करण्याचे मंत्र किंवा जादूटोणा, जारणमारण; करणी : 'यालागीं रिघे अभिचारी ।ते ममता खरी तामस ।' –एभा २५.१३२. २. यासंबंधी होमादिकर्म; अनुष्ठान इ. ३. हिंसा; वध. [सं.]

**अभिचारक – रिक** वि. १. जारणमारण करणारा; करणी करणारा : 'आणि अभिचारकीं तिहीं ।उपद्रविजे जेतुलें कांहीं ।' – ज्ञा १६.४००. २. जारणमारणासंबंधी; अभिचाराचे; जादूगिरीचे : 'तेथींचा अगम अभिचारक ।वेदविरुद्ध मार्ग देख ।' – एभा १३.१२०.[सं.]

**अभिचारी** पु. अभिचार करणारा; चेटक्या; मांत्रिक; जादूगार. [सं.]

**अभिजन** पु. १. जन्मभूमी; मातृभूमी; स्वदेश. २. कुटुंब; कुल; वंश. ३. उत्पत्ती. ४. उच्च कुल; सत्कुल. ५. पूर्वज किंवा वंशज. ६. नातलग; परिवार; सेवकजन; अनुचर. ७. समाजातील प्रतिष्ठित उच्चभ्रू वर्ग (बहुजनच्या विरुद्ध). [सं.]

**अभिजनक बी** न. (वन.) बी-बियाणे; प्रजननासाठी, लावणी, पेरणीसाठी उपलब्ध असलेले बी. [सं.]

**अभिजनवाद** पु. समाजातील निवडक उच्चविद्याभूषित व गुणी लोकांनीच राज्य करावे असे मत. [सं.]

**अभिजनसत्ता** स्त्री. ज्या पद्धतीत सरदार प्रमुख आहेत अशी राज्यपद्धती; उमरावसत्ता : 'परंतु त्यांतील अभिजनसत्तेचे बीज मात्र त्यांनी नेले नाही.' –पार्ल २७६. [सं.]

**अभिजपणे** सक्रि. जप करणे; पुनः पुन्हा उच्चार करणे; पठण करणे : 'शब्दगर्भमंत्र अभिजपून लतांच्या पानांतील हिरव्या रंगाच्या मनोहारितेला हरताळ फासणार असेल.' – विचावि २. [सं. अभि + जप्]

**अभिजात** वि. १. उच्चतम प्रतीचे, श्रेष्ठ; पहिल्याप्रतीचे (साहित्य, कला). २. प्रस्थापित नियम व तत्त्वे यांचे पालन करून लिहिलेले. ३. संयम, समतोल इत्यादी सांभाळून लिहिलेले. [सं.]

**अभिजात– त्य** वि. १. कुलीन; सभ्य; थोर मनाचा; प्रतिष्ठित; उच्च दर्जाचा : 'तरि आतां पवित्र तयाचेचि कुळ । अभिजात्य तेचि निर्मळ ।'– ज्ञा ९.४२१. २. सुसंस्कृत; विदग्ध. ३. प्रिय; मधुर; रमणीय. [सं.]

**अभिजात कृति** स्त्री. उत्तम कृती; एखाद्या विशिष्ट कलाविभागातील श्रेष्ठ कलाकृती; मानदंड समजल्या जाणाऱ्या साहित्यकृती, कलाकृती. [सं.]

**अभिजात तत्त्वज्ञान** न. (तत्त्व.) कालाच्या ओघात नष्ट न झालेले प्राचीन व मध्ययुगातील तत्त्वज्ञान. [सं.]

**अभिजाततावाद** पु. (सास.) १. साहित्यातील पारंपरिक मूल्यांचे पालन करावे असे प्रतिपादणारा संप्रदाय. २. साहित्याविष्कारातील भावनिक संयम व नियमबद्धता यांचा पुरस्कार करणारा, अद्‌भुतरम्यता वादाच्या विरोधी वाद. [सं.]

**अभिजात धातु–तू** पु. (रसा.) सोने व प्लॅटिनम कुलातील धातू. हवा, पाणी सामान्य आम्ले अथवा अल्कली यांची त्यांवर विक्रिया होत नाही. हे धातू निसर्गात मुक्त अवस्थेत आढळतात. [सं.]

**अभिजात बी** न. (वन.) ज्या बीजाची संपूर्ण जातकुळी, वंशावळ माहिती आहे असे बी. [सं.]

**अभिजात भाषा** ज्या भाषांचे स्वरूप संभाषणातील अथवा प्रचलित लेखनातील वापरावरून न ठरवता त्या भाषांमध्ये उपलब्ध असलेल्या साहित्यावरून निश्चित केले जाते अशा भाषा. (संस्कृत, ग्रीक, लॅटीन इत्यादी). [सं.]

**अभिजात वर्ग** पु. महाजन वर्ग; उमराव वर्ग; बडे लोक; खानदानी वर्ग; समाजातील प्रतिष्ठित, पिढीजात वरिष्ठ वर्ग. [सं.]

**अभिजात वाङ्मय** न. १. कोणत्याही भाषेतील श्रेष्ठ साहित्यकृती. वैश्विक मूल्य असलेले वाङ्मय. २. रसिकमान्य झालेले प्राचीन साहित्य. ३. संस्कृत, ग्रीक, लॅटीन आदी भाषांतील साहित्य.[सं.]

**अभिजाति–ती** स्त्री. १. मनाचा थोरपणा; सभ्यपणा. २. कुलीनता; उच्चवंश. [सं.]

**अभिजात्य** न. कुलीनता; सभ्यपणा, शास्त्रोक्तता.

**अभिजित** न. २८ वे नक्षत्र. उत्तराषाढा नक्षत्राचा शेवटचा (चौथा) भाग व श्रवण नक्षत्राचा १५ वा अंश एवढ्या कालास अभिजित नक्षत्र म्हणतात. या नक्षत्राचा क्रांतिवृत्ताशी संबंध नाही. हे फारच उत्तरेस आहे : 'तो मी अभिजितू म्हणे हरी ।' – एभा १६.२२१. पु. १. दोन प्रहरचे बारा वाजण्याच्या पूर्वी एक घटका व नंतर एक घटका मिळून दोन घटकांचा काळ; सूर्योदयापासून आठवा मुहूर्त : 'वीरांच्या अभिमाना झाला अस्त । मध्यान्हीं आला आदित्य । मुहूर्ती मुहूर्त अभिजित ।समयो उचित लग्नाचा ।' – एरुस्व ७.६४. २. आगंतुक; आकस्मिक; अनपेक्षित (पाहुणा, खर्च, गोष्ट). [सं.]

**अभिजेता** पु. जेता; विजय मिळविणारी व्यक्ती.

**अभितः** क्रिवि. सभोवार; सर्व बाजूंनी; सर्व दिशांनी. [सं.]

**अभित्यजन** न. (विधि.) सोडून जाणे.

**अभित्यागी** पु. सैन्यातील नोकरी सोडून पळून जाणारा, गेलेला; फरारी. [सं.]

**अभित्याजक** पु. (विधि.) सोडून जाणारा.

**अभिदत्त भांडवल** न. (अर्थ.) भरणा झालेले, केलेले भांडवल.

**अभिधर्म** पु. (तत्त्व.) १. बौद्ध तत्त्वज्ञानाप्रमाणे अंतिम सत्य. २. पाली त्रि-पिटक ग्रंथांमध्ये विनय-पिटक, सुत्त-पिटक व अभिधम्म-पिटक असे तीन भाग आहेत. अभिधम्मामध्ये धर्माची तत्त्वे सांगितलेली आहेत. – मतम १.२६. [सं.]

**अभिधा** स्त्री. १. शब्दाचा वाच्यार्थ दाखविण्याची शक्ती. २. शब्दशः अर्थ; वाच्यार्थ; यौगिक अर्थ. ३. नाव; पदवी; लक्षण : 'वाघोबा या अभिधेला शोभण्यासारखेच त्याचे नोकरीतले वर्तन होते.' – आमाणसे १. [सं.]

**अभिधान** न. १. नाव; नाम; संज्ञा; गुणनाम; वर्ग : 'आता विषयाभिधान । भेदु आईकें।।' – ज्ञा १३.११६. २. नामनिर्देश; उल्लेख; संकेत शब्द; जातिवाचक नाम; अर्थबोध. ३. नाव सांगणे; नाव घेणे. ४. व्याख्या करणे; लक्षण करणे : 'आता दुःखाची आंतुवट वेली ।दोषकाट्यांची जरी भरली । तरी निजाभिधानीं घाली ।असुरी ते ।' – ज्ञा १६.२१३. ५. शब्द. ६. (व्या.) कर्त्याबद्दल विधान. ७. (अर्थ.) मूल्य, वजन, माप इ. मालिकेत प्रत्येक एककाला (युनिटला) दिलेला दर्जा. उदा. रुपयाच्या मालिकेत ५० पैसे, १० पैसे इ. नाणी. [सं.]

**अभिधानकोश** अनेक कोशांचे ज्ञान. (चौसष्ट कलांपैकी एक.). [सं.]

**अभिधानवाद** पु. अन्वयार्थवाद.

**अभिधायक** वि. नामनिर्देश करणारा; उल्लेख करणारा; कथन करणारा; दर्शविणारा (शब्द, वक्ता). [सं.]

**अभिधावृत्ति** स्त्री. शब्द व त्याचा यौगिक अर्थ यांमधील संकेत.

**अभिधेय** वि. नावाचे; उल्लेखिलेले; निर्दिष्ट केलेले; निर्देशिलेले; दाखविलेले; कथन केलेले.

न. अर्थ (शब्दाचा); विषय (बोलण्याचा). [सं.]

**अभिध्यान** न. (तत्त्व.) १. ध्यान, चिंतन, मनन. २. आतुरता.[सं.]

**अभिनती** स्त्री. १. एका बाजूला झुकणे. २. (मानस.) पूर्वग्रह; एकाच बाजूला असलेली मनाची प्रवृत्ती; कल. [सं.]

**अभिनय** पु. १. मुद्रेने किंवा अंगविक्षेपाने किंवा इतर हावभाव करून मनातील भावना व्यक्त करणे. २. (नाट्य.) ज्याचे रूप घेतले असेल त्याचा वेश, भाषण, चेष्टा, मनोविकार इत्यादी सर्व गोष्टींमध्ये अनुकरण. नाटककाराने रंगविलेल्या भूमिकेचे तंतोतंत ज्ञान, हावभाव व वेश या साधनांनी, प्रेक्षकांना करून देणे. ३. (नृत्य.) हस्तपादादी अवयवांच्या नियमबद्ध हालचालीने रस व भाव प्रकट करणे. ४. (सामान्यतः) हावभाव; चेष्टा; अंगविक्षेप. [सं.]

**अभिनव** वि. १. नवीन; नूतन : 'आतां अभिनव वाग्विलासिनी ।' – ज्ञा १.२१. २. अपूर्व; आश्चर्यकारक; विलक्षण : 'कृष्ण पाहावयाच्या लोभा । नयनीं नयनासी निघती जिभा । श्रवण श्रवणासी वल्लभा । अभिनव शोभा कृष्णाची ।' – एरुस्व १.७६. ३. तरुण, कोवळा. ४. ताजा, टवटवीत. ५. नवशिका.

न. नवल; आश्चर्य : 'अभिनव करिती सकळ जन । म्हणती वांझेसी गर्भधारण ।' – गुच ३९.३३. [सं.]

**अभिनवणे** अक्रि. १. अपूर्वतेने प्रकट होणे : 'तो शांतुचि अभिनवेल ते । परियसा मऱ्हाठे बोल ।' – ज्ञा ४.२१४. २. ताजे होणे; नवीन दिसणे. ३. शब्दांनी किंवा अभिनयाने साकार होणे. [सं. अभिनव]

**अभिनवता** स्त्री. नावीन्य, नवलाई, अपूर्वाई.

**अभिनवतावादी** वि. चाकोरीला कंटाळलेला; परिचित गोष्टींत कुतूहल न उरलेला आणि नावीन्याची इच्छा करणारा. [सं.]

**अभिनंदन** न. कोणी काही चांगले केल्यास किंवा कोणाचे काही चांगले झाल्यास त्याबद्दल आनंदप्रदर्शन, कौतुक, स्तुती. [सं.]

**अभिनंदनीय** वि. अभिनंदन करण्यालायक; प्रशंसेस पात्र. [सं.]

**अभिनियोक्ता** पु. आपल्या जागी दुसऱ्याची नेमणूक करणारा.

**अभिनिर्णय** पु. (कायदा.) संपूर्ण चौकशी करून दिलेला निर्णय, निवाडा. [सं.]

**अभिनिर्णयन** सक्रि. निर्णयात्मक घोषणा.

**अभिनिर्णेता** पु. (कायदा.) चौकशी करून निवाडा देणारा; निर्णय सांगणारा. [सं.]

**अभिनिर्धारण** न. (जीव.) ज्यांच्याविषयी कमी माहिती आहे अशा सजीवांची पूर्ण माहिती असलेल्या तशाच प्रकारच्या सजीवांशी साधर्म्य पडताळून पाहण्याची कृती. [सं.]

**अभिनिर्धारण** सक्रि. सत्काराचे भाषण करणे, अभिभाषण करणे.

**अभिनिविष्ट** वि. १. अभिनिवेशयुक्त; उत्सुकतापूर्वक लक्ष देणारा; पूर्ण व्यग्र किंवा एकचित्त झालेला; अती आसक्त; २. निपुण; परिचित; निष्णात असलेला. ३. गर्विष्ठ; हेकेखोर. [सं.]

**अभिनिवेश** पु. १. औत्सुक्य; एकचित्तता. २. निश्चय; प्रयत्न; नेट; आग्रह; धीर. ३. दमदारपणा; नैपुण्य; तरबेजपणा; प्रगती; परिचय; परिज्ञान. ४. मनावरील परिणाम किंवा ठसा; कल्पना; ग्रह. ५. अहंकार; अभिमान; आवेश. ६. (व्यापक) संचार. (क्रि. धरणे). ७. भक्ती; प्रेम. ८. उत्कट इच्छा; कळकळ. [सं.]

**अभिनिवेशी** वि. १. अभिनिवेश, आवेश बाणलेला. २. हेका धरणारा;

हेकट; हट्ट धरून राहणारा. ३. निग्रही; दमदार; चिवट; पिच्छा पुरवणारा. ४. चिकाटीने प्रयत्न करणारा. [सं.]

**अभिनीत** वि. १. हावभाव करून व्यक्त केलेले किंवा अभिनयाने दर्शविलेले (मनोविकार, भावना). २. चांगला शिकविलेला; शिक्षण दिलेला; तरबेज केलेला. ३. क्षमाशील, शांत, कृपाळू. ४. सुशोभित. [सं.]

**अभिनीति-ती** १. पहा : **अभिनय.** २. मैत्री; स्नेह. [सं.]

**अभिनीलन** न. अतिशय तापविल्याने स्टील वगैरे निळे होणे. [सं.]

**अभिनेता** पु. कलाकार; नट; सोंगाड्या. [सं.]

**अभिनेत्री** स्त्री. नटी.

**अभिनेय** वि. ज्याचा अभिनय करायचा ते; अभिनयातून व्यक्त करायचे ते. [सं.]

**अभिन्न** वि. १. पृथक् किंवा वेगळे असलेले; भेदरहित : 'एवं जीवधर्महीनु । जो जीवेंसी अभिन्नु ।' –ज्ञा १३. १०६६. २. (ल.) अद्वैत; एकरूप; सरूप : 'अभिन्न सुखमेवे आंतू । नारद आनंदें नाचत गातू ।' – एभा. १.९३. ३. (ग.) अपूर्णांक नसलेले; पूर्णांक. संकलन (बेरीज), व्यकलन (वजाबाकी), गुणन (गुणाकार), भाजन (भागाकार) या शब्दांशी जोडून उपयोग करतात. ४. अखंड सगळा. [सं.]

**अभिन्नता** स्त्री. एकरूप भेदरहितता; भेदाचा अभाव. [सं.]

**अभिन्न परिकर्माष्टक** न. (ग.) पूर्णांकाची मुख्य आठ कृत्ये. (बेरीज, वजाबाकी, गुणाकार, भागाकार, वर्ग, वर्गमूळ, घन, घनमूळ). [सं.]

**अभिन्नबोधन** न. एकरूपतेची जाणीव; एकरूपता सिद्धी.

**अभिन्नवेशु** पु. ध्यान; चिंतन; विशेष मनोधर्म. [सं. अभिनिवेश]

**अभिन्यास** पु. विन्यास; प्रन्यास.

**अभिपट्टी** स्त्री. जास्तीचा कर.

**अभिपत्रक** न. शासन व तत्सम संस्था यांनी काढलेले परिपत्रक, माहितीपत्रक. [सं.]

**अभिपुष्टी** स्त्री. निश्चयात्मक घोषणा; दुजोरा.

**अभिपूरण** न. अंमलबजावणी.

**अभिप्राय- व** पु. १. अर्थ; उद्देश; हेतू; भाव : 'तुझा अभिप्राय पाहून मला फार खेद वाटतो.' – बाळमित्र २.२२१. २. भावार्थ; सारांश; मथितार्थ : 'भक्तिचेन योगें देव । निश्चयें पावती मानव । ऐसा आहे अभिप्राव ।' – दास १.१.४. ३. मत; शेरा; सरकारी अधिकाऱ्याचा शेरा किंवा अहवाल. [सं.]

**अभिप्रेत** न. अर्थ; हेतू; उद्देश; योजना; सारांश.
वि. १. उद्देशिलेले; योजिलेले; ठरविलेले. २. इष्ट; प्रिय : 'निष्कामासि अभिप्रेत । सर्वदा जें ।' – ज्ञा ८.१०५; 'प्रार्थना हे या वर्गास अभिप्रेत असलेल्या साधनांपैकी मुख्य साधन आहे.' –हि २.२४३. [सं.]

**अभिभव** पु. पराभव; पराजय; मोड; दाणादाण : 'विघ्नी अभिभव नव्हे त्यासी । तूं हृषीकेशी रक्षिता ।' – एभा ४.१५५. [सं.]

**अभिभवणे** उक्रि. १. पराभव करणे; जिंकणे; घेरणे: 'ना तरी रणीं शव सांडिजे । तें चौमेरी गिधीं विदारिजे । तैसें स्वधर्महीन अभिभविजे । महादोषी ।' –ज्ञा २.२००. २. उदय पावणे; पसरणे : 'तेथ यजन म्हणिजे स्वयें यज्ञ करावे । जे कां सोमादि अश्वमेधांत बरवे ।अथवा नित्यकर्मी अभिभवे । श्रौतस्मार्तादिक ।' – स्वादि ५.४.४. [सं.अभिभव]

**अभिभवन** न. १. वश होणे; च्या कबजात जाणे. २. तिरस्कार; अपमान; उपमर्द.

**अभिभार** पु. (भौ.) रॉकेटसारख्या अवकाशयानातील यंत्रसामग्री व इंधन यांच्या वजनाव्यतिरिक्त असलेले त्यातील प्रवासी व त्यांचे सामान यांचे वजन. [सं.]

**अभिभाव** पु. वर्चस्व; वर्चस्व असणे. [सं.]

**अभिभाषण** न. १. औपचारिक भाषण; समारंभप्रसंगी करावयाचे पूर्व नियोजित भाषण. २. संसद, विधानसभा यांच्या अधिवेशनप्रसंगी राष्ट्रपती, राज्यपाल यांनी केलेले भाषण. [सं.]

**अभिभूत** वि. पराभूत; पराजित; वश : 'देखें कामना अभिभूत ।' – ज्ञा २.२४८. [स.]

**अभिमत** वि. प्रिय; संमत; पसंत.
न. १. इच्छा. २. स्वीकार. [सं.]

**अभिमत व्यक्ती** स्त्री. मर्जीतला मनुष्य; आवडीची व्यक्ती; कृपापात्र व्यक्ती. [सं.]

**अभिमनस्क, अभिमना** वि. १. विशिष्ट गोष्टीकडे मन वळले आहे असा; विशिष्ट गोष्ट ज्याच्या मनात आहे असा; चित्त एकाग्र असलेला; तल्लीन; आसक्त. २. उद्युक्त; तयार; उत्कंठित असलेला; सावधान. [सं.]

**अभिमर्द** पु. १. जोराने तुडविणे किंवा मर्दन करणे, मळणे; अतिशय तुडवातुडव, चेंदामेंदा; नाश; नासधूस. [सं.]

**अभिमंत्रण** न. १. मंतरणे; मंत्र म्हणून विशिष्ट संस्कार करणे; सुसंस्कृत करणे; मंत्राने पवित्र करणे; भारणे. २. आमंत्रण; निमंत्रण; बोलावणे; हाक मारणे. [सं.]

**अभिमंत्रणे** क्रि. मंतरणे; मंत्र म्हणून सुसंस्कृत, शुद्ध करणे; परिणामकारक बनवणे; बोलावणे. [सं.अभिमंत्र]

**अभिमंत्रित** वि. १. मंतरलेले; अभिमंत्रण केलेले; मंत्र म्हणून पवित्र केलेले. २. बोलाविलेले; आमंत्रण दिलेले – केलेले; आमंत्रित. [सं.]

**अभिमंदन** (भौ.) (रंग व प्रकाश) हळू हळू कमी होत जाणे.

**अभिमान** पु. १.स्वत्वाची जाणीव; तोरा; गर्व; मीपणा. २. आत्मिक भावना; आपलेपणाची दृष्टी किंवा जाणीव; आपल्या स्वत:विषयी किंवा आपल्या वस्तूसंबंधी 'हा माझा' असा ग्रह असणे; मन व अंत:करण लावणे किंवा गुंतविणे. त्या त्या विषयाचे जे बरे वाईट ते ते आपलेच असे वाटणे. सामा. शब्द. – कुलाभिमान, अधिकाराभिमान, जात्याभिमान, देशाभिमान. ३. एखाद्याकडे ठेवलेला, लावलेला हक्क; हक्क सांगणे; स्वत्व–स्वामित्ववाद. ४. मान; योग्य गर्व; उच्चतेबद्दलची भावना; उदात्त किंवा थोर मनोविचार. (क्रि. धरणे, भोगणे, वाहणे, मानणे, करणे). ५. ईर्षा. (वा.) **अभिमान धरणे** – एखाद्या गोष्टीबद्दल अतिशय काळजी, कळकळ, आस्था बाळगणे. **अभिमानाखाली जाणे** – १. गर्वामुळे नाश पावणे; नुकसान होणे. २. अहंकाराने बोलणे, वागणे. **अभिमानाने मरणे** – १. गर्वामुळे आपला जीव, दर्जा किंवा सौख्य नाहीसे करणे. २. काही

झाले तरी (जिवावर बेतले तरी) आपला ताठा किंवा मत, पक्ष, हेतू, हेका न सोडणे. **अभिमानास पडणे, पेटणे**–लाजेमुळे किंवा केवळ अपमानाच्या कल्पनेमुळे मोठ्या खटपटीस लागणे; ईर्षेस चढून कार्योद्युक्त होणे. **अभिमानास झोंबणे** – मन:पूर्वक अभिमान धरणे.

**अभिमानणे** उक्रि. अभिमान (सर्व अर्थी) धरणे, बाळगणे.

**अभिमानधन** वि. अभिमानाला महत्त्व देणारा; अभिमान धरणारा; स्वत:च्या शब्दास जागणारा; धीराचा; दमदार. [सं.]

**अभिमानशून्य** वि. अभिमान नसलेला; स्वाभिमान न बाळगणारा. [सं.]

**अभिमानी** वि. १. स्वत्वाची जाणीव असणारा; गर्विष्ठ. २. योग्य अभिमान बाळगणारा. [सं.]

**अभिमुक्ति–क्ति** स्त्री. कर्जातून पूर्णपणे मुक्त होणे; अशा प्रकारे मुक्त झाल्याचा लेखी पुरावा. [सं.]

**अभिमुख** वि. १. सामोरा; सन्मुख; कडे तोंड केलेला; रोख असलेला. उदा. पूर्वाभिमुख, सूर्याभिमुख, मदभिमुख इ. २. (ल.) प्रवृत्त; उद्युक्त; सज्ज असलेला; इरादा असलेला; (अमुक एका गोष्टीच्या) चिंतनात किंवा विचारात गढून गेलेला. उदा. यज्ञाभिमुख, प्रयाणाभिमुख इ. ३. अनुकूल; फायदेशीर; उत्कर्षकारक (नशीब, काल, परिस्थिती). उदा. दैवाभिमुख. [सं.]

**अभिमुखता** स्त्री. सुधारणा, बदल करण्याच्या दृष्टीने दिशा दाखवणे. [सं.]

**अभियंता** पु. (अभि.) १. धरणे, कालवे, घरे, रस्ते, यंत्रे इत्यादीचे आराखडे, बांधकाम व उभारणी करणारा तंत्रज्ञ. २. अभियांत्रिकी (इंजिनियरिंग) महाविद्यालयातील ठरावीक शिक्षणक्रम पूर्ण केलेला पदवीधर. [सं.]

**अभियंत्रणा** स्त्री. तंत्रज्ञास्त्र, यंत्रे, वास्तु इ. चे शास्त्र.

**अभियाचना** स्त्री. प्रार्थना, याचना, मिनतवारी करणे. मागणी. [सं.]

**अभियान** न. १. जवळ जाणे. २. कूच करणे; प्रयाण. ३. हल्ला. ४. मोहीम; आंदोलन. [सं. अभि + या]

**अभियांत्रिकी** स्त्री. निरनिराळी यंत्रे, संरचना व उत्पादने यांद्वारे वस्तुमात्रातील गुणविशेष व निसर्गातील ऊर्जाविषयक साधनांचा मानवी उपयोगासाठी वापर करणारे शास्त्र; वास्तुविज्ञान; शिल्पविज्ञान; धरणे, कालवे इत्यादींचे बांधकाम शिकविणारे शास्त्र; यंत्रउभारणीविद्या. उदा. स्थापत्य अभियांत्रिकी, विद्युत अभियांत्रिकी, यंत्र अभियांत्रिकी इ. [सं.]

**अभियुक्त** वि. १. आरोप असलेला; विरुद्ध तक्रार असलेला; आरोपित; आरोपी. २. पूज्य; पवित्र मानलेला; अधिकारी म्हणून मानलेला (ग्रंथ, ग्रंथकार). [सं. अभि + युज्]

**अभियुक्त उक्ती** स्त्री. अधिकारयुक्त वचन किंवा बोलणे; अभियुक्त जनांची उक्ती, सूत्र, वचन. [सं.]

**अभियुक्त प्रयोग** पु. अधिकारयुक्त प्रयोग; अधिकारी माणसांनी योजलेला प्रयोग. [सं.]

**अभियोक्ता** पु. (कायदा.) फौजदारी न्यायालयात खटला चालविणारा (वकील); फिर्याद करणारा फिर्यादी; खटला दाखल करणारा. [सं.]

**अभियोग** पु. १. फिर्याद; आरोप; (वादीची) तक्रार; आळ; दोष. २. वाद; युद्ध; भांडण; हल्ला : 'श्रींच्या अधिकाऱ्यासमोर वादी प्रतिवादीच्या अभियोगांत झालेला पुरावा कोणत्या तरी सभेपुढे यथेच्छ वाचीत बसण्याचे... नाकारले' – लोटिकेले. ३. फौजदारी; खटला; फिर्याद. ४. निकट संबंध. ५. (एखाद्या कामाला) वाहून घेणे. [सं.]

**अभियोग्यता** स्त्री. कल; योग्यता; प्रवृत्ती. [सं.]

**अभियोग्यता कसोटी** स्त्री. विशिष्ट प्रकारचे काम करण्यास एखादी व्यक्ती योग्य आहे की नाही हे पाहण्यासाठी घेतली जाणारी चाचणी.

**अभिरति–ती** स्त्री. (तत्त्व.) हर्ष; संतोष; अनुराग; भक्ती. [सं.]

**अभिरक्षक** पु. एखाद्या विशेष गोष्टीचा प्रतिपाळ व देखरेख करण्यासाठी नेमलेली व्यक्ती; ग्रंथ, हस्तलिखिते, प्राचीन दुर्मिळ वस्तू यांच्या सुरक्षिततेसाठी व्यवस्थापक म्हणून नेमलेली व्यक्ती. [सं.]

**अभिरक्षा** स्त्री. संरक्षण; प्रतिपालन; राखण. [सं.]

**अभिरंग** पु. (रसा.) रंगद्रव्ये, सरस, पाणी इ. एकत्र करण्याच्या पद्धतीतून रंगकलेचे विकसित झालेले तंत्र.

**अभिराम** वि. १. सुंदर; रमणीय. २. आनंददायक; आल्हादकारक; सुखदायक; समाधानकारक.
पु. प्रियकर; पती. [सं.]

**अभिरुचि –ची** स्त्री. १. चव; गोडी; आवड; शौक. २. वाङ्मयीन, कलात्मक कृतींचा हंसक्षीरन्यायाने आस्वाद घेण्याची, परीक्षण करण्याची शक्ती. [सं.]

**अभिरूप** वि. १. सदृश; सारखे; एकरूपी; साजेसा; शोभेसा. २. सुंदर; रम्य; देखणे; सुरेख. ३. आवडता; प्रिय. ४. लुटूपुटूची: 'एक अभिरूप लढाई आखण्यात आली.' – स्वादे १४. [सं.]

**अभिरूप न्यायालय** न. न्यायालय नाट्य.

**अभिरूप संसद** पु. संसदेतील कामकाजाचे अनुकरण करून सादर केला जाणारा मनोरंजनपर कार्यक्रम; संसदीय कामाची विडंबनपर नक्कल.

**अभिरोधिता** स्त्री. (भौ.) चुंबकीय प्रवाहाचे नियंत्रण करणाऱ्या साधनांची क्षमता. [सं.]

**अभिरोप** पु. (वै.) कलम; आरोपण. [सं.]

**अभिरोपण** न. (वै.) १. जखम भरून काढण्याकरता पेशीजाल, शरीरघटक किंवा धातू यांची योजना करणे. २. एका अवयवावर दुसऱ्या अवयवाचे कलम करणे. [सं.]

**अभिलग्न** वि. (जीव.) दिसण्यास वेगळे असणारे पण युती होणारे (दोन अवयव.) [सं.]

**अभिलषित** वि. इच्छित; इष्ट; प्रिय : 'जो अभिलषित मनोरुचि । पुरविता तो ।' – ज्ञा १.२७. [सं.]

**अभिलक्षण** न. वैशिष्ट्य; विशेष लक्षण; विशेष गुण.

**अभिलाष** पु. स्त्री. १. प्राप्तीची इच्छा, हेतु. २. लोभ, हाव. ३. दुसऱ्यांच्या द्रव्यादिकांचा अपहार करण्याची इच्छा.

**अभिलाष(ख)णे** क्रि. १. इच्छा करणे; अपहार करणे : 'शरीरनिर्वाहाविसीं । कोठे कांहीं नाभिलाखी ।' – एभा ३.५०१. [सं. अभिलाष]

**अभिलाष बुद्धि–द्धी** स्त्री. अपहार करण्याची इच्छा.
**अभिलाषित** वि. वांच्छित; मनोगत; इच्छा केलेले; लोभ ठेवलेले; हाव धरलेले. पहा : **अभिलषित** [सं.]
**अभिलाषी** वि. लुब्ध; लोभिष्ट; हावरा; इच्छा करणारा : 'तैसेनि साहंकारें । फळाभिलाषियें नरें ।' – ज्ञा १८.६०५. [सं. अभिलाषिन्]
**अभिलेख** पु. एखाद्या घटनेचा किंवा वस्तुस्थितीचा तपशील असलेला लेखी वृत्तांत; सरकारी, न्यायालयापुढील कामकाजाचा लेखी वृत्तांत; एखाद्या व्यवहाराचा सविस्तर अहवाल नोंदविणारा लेख.
**अभिलेखक** पु. ध्वनिलेखन यंत्र. [सं.]
**अभिलेख कार्यालय** (राज्य.) सरकारची दप्तरे व जुनी कागदपत्रे जेथे संग्रहीत केली जातात असे कार्यालय. [सं.]
**अभिलेखन** न. १. नोंद; कंपनीतील किंवा सरकारी कार्यालयातील कामकाजाची संगतवार नोंद करून ठेवणे. २. नोंदणी करण्यासाठी मिळणारे वेतन. ३. विद्युत्‌शक्तीच्या साहाय्याने ध्वनींचे लेखन करणे. [सं.]
**अभिलेखपाल** पु. जुन्या व ऐतिहासिक किंवा सरकारी कागदपत्रांच्या संग्रहाचा, अभिलेखागाराचा मुख्य अधिकारी. [सं.]
**अभिलेखमाला** स्त्री. (भूशा.) (खडकांच्या एकावर एक झालेल्या थरांची) कालानुसार विभागणी व नोंद. [सं.]
**अभिलेख शाखा** स्त्री. एखाद्या कंपनीतील किंवा सरकारी कार्यालयातील कामकाजाच्या संगतवार नोंदी जेथे व्यवस्थितपणे ठेवल्या जातात असा विभाग.
**अभिलेखागार** न. १. एखाद्या व्यक्तीच्या, संस्थेच्या किंवा शासनाच्या निरनिराळ्या कागदपत्रांचा, अभिलेखांचा संग्रह; असे अभिलेख ठेवलेली इमारत. २. जुने सरकारी व ऐतिहासिक महत्त्वाचे कागदपत्र व्यवस्थितपणे ठेवण्याची जागा. [सं.]
**अभिवक्ता** पु. वकील.
**अभिवचन** न. वचन; खात्रीचा शब्द; वाग्दान; हमी. एखाद्याची वकिली करणे; बाजू मांडणे. [सं.]
**अभिवर्धक** वि. (यंअ.) १. कुंडलातील (सर्किटमधील) विजेचा दाब वाढविणारे (उपकरण). २. प्रवाही पदार्थांचा दाब वाढविणारा (पंप). [सं.]
**अभिवर्धन** न. वाढ; विकास; वृद्धी; भर. [सं.]
**अभिवंदणे** सक्रि. नमस्कार करणे : 'तैसा पुढत पुढती तोचि । मियां अभिवंदिला श्रीगुरुचि ।' – ज्ञा १.२७. [सं. अभि + वन्द्]
**अभिवंदन** न. प्रणाम; साष्टांग नमस्कार; सर्वांगीकरून नमन; वडील, गुरू यांना नामगोत्रोच्चारपूर्वक नमस्कार करणे. [सं.]
**अभिवादक** वि. नमस्कार करणारा; (मी अमुक अमुक असे सांगून) अभिवादन करणारा. [सं. अभि + वन्द्]
**अभिवादन** न. १. वडील, गुरू यांना नामगोत्रोच्चारपूर्वक नमस्कार. २. नमस्कार; प्रणिपात; नमन. [सं.]
**अभिवाह** पु. खळाळ; वेगवान प्रवाह. [सं.]
**अभिवाहखडक** पु. (भूशा.) अति उष्णतेमुळे वितळून वाहणारा खडक. [सं.]
**अभिवाहिनी** स्त्री. (वै.) एका स्थानाकडून दुसऱ्या स्थानाकडे जाणारी (शीर, चेता इत्यादी.). [सं.]
**अभिवाही** वि. एका स्थानाकडून दुसऱ्या स्थानाकडे जाणारा. [सं.]
**अभिविधि–धी** पु. समावेश; अंतर्भाव; पासून-पर्यंतच्या सर्वांचा समावेश. [सं.]
**अभिविन्यसन** न. (वाणिज्य.) प्रदर्शन; प्रगटीकरण; वातायन.
**अभिवृत्ति–त्ती** स्त्री. मनाचा कल; प्रवृत्ती; एखादी क्रिया करण्यासाठी आवश्यक असलेली मानसिक पूर्वतयारी. [सं.]
**अभिवृद्धि–द्धी** स्त्री. वाढ; उत्कर्ष; वृद्धी; भरभराट; चढ; वाढावा; वर्धन. उदा. आयुष्याभिवृद्धी, ऐश्वर्याभिवृद्धी. [सं.]
**अभिवेदन** न. विनंती अर्ज; निवेदन; आपले म्हणणे किंवा गाऱ्हाणे संबंधित अधिकाऱ्यांपुढे मांडणारा अर्ज. [सं.]
**अभिव्यक्त** वि. स्पष्ट; स्वच्छ; उघड; खुले. [सं.]
**अभिव्यक्ति–क्ती** स्त्री. १. खुलासा; स्पष्टपणा; उघडपणा; स्वच्छपणा; पूर्णपणे व्यक्त करणे; पूर्ण प्रदर्शन; स्पष्ट रूपरेषा किंवा गुणवर्णन; प्रकटभाव : 'तेणे महाभूतांची ।अभिव्यक्ति होय ।' – ज्ञा १४.९२. २. अमूर्त कल्पनेला मूर्त रूप देणे. ३. विचार, भावना, अनुभव इत्यादींचा शब्द, चित्र, संगीत इत्यादी माध्यमातून केलेला आविष्कार. [सं.]
**अभिव्यंजक** वि. स्पष्ट, उघड व्यक्त करणारे; पूर्ण रूपरेखा, वाढ दर्शविणारे; खुलासा करणारे; गुणादिकांची अभिव्यक्ती करणारे; सूचक. [सं.]
**अभिव्यंजन** न. लक्ष्यार्थ; मथितार्थ; ध्वनितार्थ; प्रकट, व्यक्त, स्पष्ट किंवा सूचित करावयाचा भाव. [सं.]
**अभिव्यापक** वि. सर्वत्र वेढणारे, पसरणारे; सर्व कवटाळणारे, व्यापणारे; स्वीकारणारे; आक्रमण करणारे; सर्वव्यापक. [सं.]
**अभिव्यापणे** उक्रि. (काव्य.) सर्वत्र पसरणे, आक्रमणे, फैलावणे.
**अभिव्याप्ति–प्ती** स्त्री. सर्वत्र विस्तार, फैलाव, प्रसार; सर्वव्यापकता.
**अभिशपन** पहा : **अभिशाप**
**अभिशप्त** वि. १. खोटा आळ (अभिशाप) ज्याच्यावर आला आहे असा. २. शाप दिलेला : 'यांत निंद्य जे ब्राह्मणाआंतू । केवळ दोषी अथवा अभिशप्तू ।'– एभा १८.११३.
**अभिशस्त** वि. निंदित; आरोपित. पहा : **अभिशप्त**
**अभिशस्ती** १. आळ; आरोप. २. निंदा; अपमान.(व.) [सं.]
**अभिशंसन** न. १. बालंट; अभिशाप; खोटा आरोप; आळ. २. निंदा; अपमान. [सं.]
**अभिशंसी** वि. खोटा आरोप पसरविणारा, फैलावणारा; निंदक. [सं.]
**अभिशाप** पु. १. अन्यायाने ठेवलेला आरोप, आळ; खोटा आरोप; ठपका. २. तळतळाट; शाप; निंदा. (क्रि. देणे) : 'असतीं कीर्ती जाईल जगचि अभिशापु देईल ।' –ज्ञा २.१९८. [सं.]
**अभिशीतन** न. (यंअ.) अतिशय थंड करणे; गोठवणे.
**अभिशून्यन** न. १. निरुपयोगी ठरणे. २. रद्द करणे.
**अभिशोधन** न. (भूशा.) धातूकातील अनावश्यक भाग काढून टाकून उपयुक्त खनिजाचे घातुकातील प्रमाण वाढवणे. [सं.]

**अभिशोषण** न सामावले जाणे; शोषले जाणे.

**अभिश्रवण** न. १. श्राद्धाचे ब्राह्मण जेवावयास बसले असता म्हणण्यात येणारे वेदमंत्र. २. असे मंत्र म्हणणे. [सं.]

**अभिश्राप** पहा : **अभिशाप :** अभिश्राप पूर्ण तुजवरी ।' – सप्र २.३.

**अभिश्लेषाश्म** पु. (भूशा.) संयोगातून, मिलाफातून तयार झालेला दगड. [सं.]

**अभिषवण** पु. १. धर्मकृत्य करण्यापूर्वी स्नान. २. सोमलतेचा रस काढणे; (सामान्यत:) मद्य तयार करणे. ३. यज्ञयाग. ४. अभिषेक. ५. (सामन्यत:) स्नान.
न. काजी; आंबील. [सं. अभि + सु]

**अभिषंग – संग** पु. १. संगती; संबंध; आसक्ती; आलिंगन; संभोग. २. पराभव. ३. अकल्पित संकट. ४. भूतबाधा. ५. शपथ. ६. शाप; आळ.७. दुष्कीर्ती. ८. तिरस्कार. ९. मानसिक अशांतता. [सं.]

**अभिषिक्त** वि. (विप्र.) अभिषेकी. १. ज्याला अभिषेक केला आहे असा (देव, राजा). २. संस्कार करून स्थापलेला. [सं.]

**अभिषेक** पु. १. विधिपूर्वक व संस्कारपूर्वक स्नान घालणे; अभिषेक पात्रात पाणी, दूध वगैरे घालून मंत्र म्हणून पात्रातील पाणी थेंब थेंब पाडून देवाची मूर्ती, राजा आदींना स्नान घालणे; देवपूजेतील स्नान; धर्मसंस्कारात यजमानावर पाणी प्रोक्षण करणे; सतत धार धरणे. २. सिंचन; शिंपडणे. ३. राज्याभिषेक. [सं.]

**अभिषेक(च)णे** उक्रि. संस्कारपूर्वक स्नान घालून प्रतिष्ठापना करणे. [सं. अभि + सिंच्]

**अभिषेक पात्र** न. देवादिकांवर अभिषेक करावयास, सतत धार पडण्याजोगे सच्छिद्र भांडे. [सं.]

**अभिषेकी ओलीत** न. (कृषि.) थेंब ओलीत; पिकाच्या मुळालगत थेंब थेंब पाणी ठिपकत ठेवण्याची पद्धत. ठिबक सिंचन. पाण्याची फार टंचाई असलेल्या ठिकाणी या पद्धतीचा वापर करण्यात येतो.

**अभिष्टव** पु. स्तुती; स्तोत्र. [सं.]

**अभिष्यंद** न. डोळे येणे; डोळे लाल होऊन त्यातून सतत पाणी वाहणे; एक नेत्ररोग. [सं.]

**अभिसरण** न. १. इकडे तिकडे धावणे, वाहणे (द्रवपदार्थ). २. खाली जाणे, सरकणे. (आतड्यातील वायू). ३. ... कडे जाणे = जवळ पोहोचणे; अभिगमन; परिभ्रमण. ४. (शाप.) दोन द्रवरूपी पदार्थांचे एकमेकात संमिश्रण होणे. ५. प्रसरण; विक्षेप. उदा. उष्णताभिसरण, रक्ताभिसरण. ६. राशीक्रमातील राशींच्या किमतीस अन्तिम मर्यादा असण्याचा गुणधर्म. ७. (समाज.) वेगवेगळ्या संस्कृतींची सरमिसळ; संयोग. [सं.]

**अभिसरण तंत्र** न. एकसारखी फिरत राहण्याची क्रिया. [सं.]

**अभिसंगति–ती** स्त्री. सुसंगती; अनुरूपता; सादृश्य. [सं.]

**अभिसंधान** न. (मानस.) एखाद्या प्रतिक्रियेचे नैसर्गिक चेतक बाजूस ठेवून त्या ठिकाणी नव्या कृत्रिम चेतकाची स्थापना करून त्याच्या साहाय्याने हवी असलेली प्रतिक्रिया घडवून आणणे. [सं.]

**अभिसंधि–धी** पु. १. ध्येय; लक्ष्य; उद्देश; बेत (क्रि. ठेवणे). २. वचन. ३. मथितार्थ, आशय. ४. मत; समज. ५. करार; कराराच्या अटी. ६. फसवणूक. ७. तह करणे. ८. मित्र-भाव किंवा सलोख्याचा संबंध स्थापित करणे. (एका राजाने दुसऱ्या राजाबरोबर). [सं.]

**अभिसंधित प्रतिक्षेप** पु. (शिक्षण.) विशिष्ट उत्तेजनाची विशिष्ट वस्तूशी सांगड घालून मिळणारी एकचएक प्रतिक्रिया. [सं.]

**अभिसंधीकरण** (मानस.) पहा : **अभिसंधान**

**अभिसंमुख** पु. (ग.) चौकोनाचे समोरासमोरचे कोन.

**अभिसंस्करण** न. (समाज.) दोन भिन्न संस्कृतींमध्ये होणारी देवाणघेवाण व त्यामुळे झालेले बदल; विशेषत: आदिम समाजावर प्रगत समाजाच्या दीर्घ सहवासामुळे झालेले संस्कार. [सं.]

**अभिसंहित** वि. (समाज.) नियमाने किंवा संकेताने बांधलेले; कृत्रिमरित्या तयार केलेली (विशिष्ट परिस्थिती).

**अभिसादन** न. (जीव.) एकमेकाशेजारी असलेल्या वायूंचे, द्रवांचे किंवा घनपदार्थांचे हळूहळू आंतरमिश्रण घडून येणे. [सं.]

**अभिसार** पु. सांडलवंड; इकडे तिकडे पसरणे; विस्कळीत होणे; वाताहत; दाणादाण; सैरावैरा होणे. [सं.]

**अभिसार, अभिसारण** पु. प्रियकराची प्रेयसीशी भेट; अशा भेटीचे ठिकाण; संकेतस्थान. [सं.]

**अभिसारिका** स्त्री. संकेत ठरवून प्रियकराकडे ठरलेल्या जागी मीलनार्थ जाणारी स्त्री. [सं.]

**अभिसाक्ष** स्त्री. प्रतिज्ञापूर्वक सांगणे

**अभिहत** वि. १. वश झालेला; नरम झालेला; वठणीस आलेला; नम्र झालेला. २. मारलेला; पीडलेला; बडवलेला; झोडपलेला. ३. अतिक्रांत. ४. जर्जर. ५. अडवणूक झालेला. ६. गुणलेला. [सं.अभि + हन्]

**अभिहस्तांकन** न. (कायदा.) आपला एखादा अधिकार, हितसंबंध अगर स्वत:च्या मालमत्तेवरील हक्क दुसऱ्या व्यक्तीस देणे, त्याचे हस्तांतरण करणे. [सं.]

**अभिहस्तांतरणपत्र** न. मालमत्तेवरील आपला हक्क कायदेशीररीत्या दुसऱ्यास ज्या लेखाद्वारे दिला जातो तो लेख. [सं.]

**अभिहित** वि. १. म्हटलेले; बोललेले; कथन केलेले; नामनिर्देश केलेले. २. स्मरण दिलेला. ३. ठरविलेला. [सं.अभि + धा]

**अभिहितान्वयवाद** पु. शब्दांना स्वतंत्र अर्थ असतो आणि शब्दांचे स्वतंत्रपणे अर्थ केल्यावर वाक्याचा अर्थ आपोआप समजतो असे मत (नैयायिकांचे). [सं.]

**अभिक्षमता** स्त्री. (मानस.) उपजत क्षमता; एखाद्या विशिष्ट क्षेत्रात गुणवत्तापूर्वक काम करण्याची व्यक्तीची नैसर्गिक क्षमता, कुवत. [सं.]

**अभिज्ञ** वि. १. जाणणारा; माहीतगार : 'कैवल्यमार्गीचा अभिज्ञु । सांगाती हा ।' – ज्ञा १६.९९. २. निपुण; कुशल; तरबेज; निष्णात; पारंगत; मर्मज्ञ.
पु. परमात्मा. [सं.]

**अभिज्ञता** स्त्री. समज; जाणकारी; समजूतदारपणा; जाणण्याची ताकद: 'डॉ. केतकरांनी फार अभिज्ञता दाखविली आहे.' – केतका २४.

**अभिज्ञा** पहा : **अभिज्ञान**

**अभिज्ञात** वि. पूर्ण माहीत असलेले; पूर्णपणे जाणलेले; अवगत असलेले. पहा : **अभिज्ञ** [सं.]

**अभिज्ञान** न. १. पूर्ण किंवा खोल ज्ञान; संपूर्ण ज्ञान; माहिती. २. खूण (ओळख पटण्यासाठी केलेली किंवा दिलेली). उदा. अभिज्ञान शांकुतल. ३. चंद्रबिंबावरील काळा भाग. [सं.]

**अभिज्ञानपत्र** न. १ दाखला. २. शिफारसपत्र.

**अभिज्ञेय** वि. (भौ.) ओळख पटण्याजोगा; ओळखण्यासारखा.[सं.]

**अभीप्सित** वि. १. प्रिय; आवडलेले; इच्छित; वांच्छित; मनोगत. २. अनुकूल; उत्कर्षकारक; फायदेशीर.
न. कल्याण; हित. [सं.]

**अभीयंक** न. अभ्यंग, तैलमर्दन : 'लाळीचे पाझर येती जिभेतून ।अभीयंकावीण स्नान होते ।।' – फुसवा ४९९. [स. अभ्यंग]

**अभीष्ट** पहा : **अभीप्सित**

**अभीष्टचिंतक** वि. एखाद्याचे कल्याण इच्छिणारा; तशी प्रार्थना करणारा. [सं.]

**अभीष्टचिंतन** न. कल्याण व्हावे अशी (ईश्वराजवळ) प्रार्थना; इच्छा. [सं.]

**अभीष्टतत्त्व** न. (ग्रं.) ग्रंथांचे वर्गीकरण करताना तौलनिकदृष्ट्या ज्या विषयावर अधिक वाङ्मय प्रसिद्ध झाले असेल त्या विषयाला प्राधान्य द्यावे लागते. हे ठरविण्याचे तत्त्व. [सं.]

**अभुक्त** वि. १. ज्याचा उपभोग कोणी घेतला नाही असा; न उपभोगलेला; उपयोग न केलेला; उपयोगात न आणलेला. २. न जेवलेला; उपाशी; उपभोग न घेणारा. ३. ज्याने उपभोग (संभोग) घेतला नाही असा (मनुष्य). [सं.]

**अभुक्त मूळ(ल)** न. ज्येष्ठा नक्षत्राच्या शेवटच्या चार व मूळ नक्षत्राच्या पहिल्या चार घटिका असा आठ घटिकांचा काळ. [सं.]

**अभुला** वि. न भुलणारा; न विसरणारा.

**अभूक** स्त्री. भूकेचा अभाव; तृप्ती.

**अभूट** न. अभ्रे मळभ; ढग. (खा.) [सं.]

**अभूत** वि. न झालेला; नसलेला. [सं.]

**अभूतआहरण** न. गर्भित किंवा लाक्षणिक भाषण.

**अभूतपूर्व** वि. पूर्वी कधी झाला नाही, घडला नाही असा; अपूर्व; लोकोत्तर. [सं.]

**अभूतोपमा** स्त्री. असंभवनीय कल्पनेपासून घेतलेली उपमा किंवा उदाहरण; जी गोष्ट संभवनीय नाही, घडलेली नाही तिची उपमा. [सं.]

**अभेद** पु.१.अभिन्नता; फरक नसणे; भेद नसणे; एकरूपता; एकत्रता; एकी; एकदृष्टी व एकभावना असणे; ऐक्य : 'आतां अज्ञानाचेनि मारें। ज्ञान अभेदें वावरें ।' – अमृ ४.१. २. पहा: **अभेदभाव – मत**
वि. अभिन्न; भाग करता न येण्यासारखे; अद्वैत; एकरूप. [सं.]

**अभेदभक्ति–क्ती** स्त्री. आत्मा व ईश्वर (जीवात्मा व परमात्मा) एक होत ही जाणीव; तसेच या भावनेने केलेली ईश्वराची भक्ती. [सं.]

**अभेदभाव, अभेदमत** पु.विश्व व ब्रह्म किंवा जीव व शिव ही एकच आहेत असे मत, तत्त्व; अद्वैतमत. [सं.]

**अभेदवाद** पु. अभेदमत व त्याचे समर्थन. [सं.]

**अभेदवादी** वि. अभेदमताचे अनुकरण करणारा; अभेदमत मानणारा.

**अभेदित** वि. ज्यात वेगळेपणा मानला नाही असे.

**अभेद्य** वि. १. वेगळे न होणारे; न फुटणारे, मोडणारे, तुटणारे; अभंग; भाग न करता येण्यासारखे. २. ज्यात काही शिरू शकत नाही असे. [सं.]

**अभेंड** वि. अडाणी; अल्लड.(व.)

**अभोक्ती** स्त्री. कोणताही उपभोग न घेणारी प्रौढ विधवा : 'अभोक्त्या म्हातारीचिया परी असावे' –लीच ६१०.

**अभोगत** वि. १. न भोगलेले; हिशेबात न घेतलेले; अनिश्चित; न ठरवलेले; अखेरचा निकाल लागला नाही असे; अनिर्णित; न स्वीकारलेले किंवा न केलेले. २. मोघम; अजमासाने घेतलेले. [सं. अभुक्त]

**अभोगती जाणे** क्रि. अधोगतीस जाणे; चिरडले जाणे; चुराडा होणे; नाश होणे.पहा : **अधोगती** [सं. अधोगति]

**अभोगी** पु. (संगीत.) एक दाक्षिणात्य राग. गानवेळ रात्रीचा दुसरा प्रहर. याला काही लोक चुकीने कानडा रागाचा एक प्रकार मानतात. हा काफी थाटाचा मल्हार राग आहे.

**अभोग्य** वि. उपभोग घेण्याला अयोग्य; भोग घेता येत नाही असा.[सं.]

**अभोज्य** वि. न खाण्याजोगे; खाण्यास अपवित्र; अयोग्य; निषिद्ध; अभक्ष्य. [सं.]

**अभोज्य अन्न** वि. ज्याच्या (पतित, सुतकी इ.) हातचे अन्न खाण्यासाठी निषिद्ध मानले आहे असा. [सं.]

**अभोट** पु. पावसाळ्याची सुरुवात. पहा : **अगोट**

**अभोळ** वि. १. दुर्बल; अशक्त : 'आम्हां सारखिया अभोळां ।' – ज्ञा ५.१६६. २. अत्यंत भोळा; भाबडा. [सं. अबल]

**अभौतिक** वि. अजड : आधिभौतिक नसलेले; अप्राकृतिक; आधिदैविक. [सं.]

**अभ्यक्त** वि. तैलमर्दन वगैरे केलेला; अभ्यंग केलेला. [सं.]

**अभ्यर्चणे** सक्रि. पूजा करणे. [सं.]

**अभ्यर्चना** स्त्री. पूजा.

**अभ्यर्चित** वि. पूजित. [सं.]

**अभ्यर्थना** स्त्री. प्रार्थना; विनंती; विनवणी; याचना. [सं.]

**अभ्यर्थी** पु. उमेदवार; पदप्राप्तीसाठी प्रयत्न करणारा.

**अभ्यर्पित** वि. देऊन टाकलेले; वाहिलेले.

**अभ्यसन** न. अध्ययन; शिकणे.

**अभ्यस्त** वि. सूर्यास्ताच्या वेळी निजलेला.
क्रिवि. सूर्यास्तकाली; सूर्यास्तासमोर. [स.]

**अभ्यस्त** वि. १. निपुण; अभ्यास केलेला; वाकबगार; पटाईत. २. ज्याचा अभ्यास, सराव केलाआहे तो (शास्त्रादिक). ३. गुणलेला; आवृत्ती केलेला. ४. (व्या.) एकाच शब्दाची किंवा शब्दातील काही अक्षरांची पुनरावृत्ती होऊन नवीन बनणारा (शब्द). उदा. लाललाल; झुळुझुळु; फडफड; वटवट; दगडबिगड. [सं.]

**अभ्यस्त अवधान** न. (मानस.) अभ्यासाने आणि सवयीने लक्ष्य विषयावर केंद्रित केलेले अवधान, लक्ष. [सं.]

**अभ्यंग** न. १. (स्नान करण्यापूर्वी) तेल, तूप, अत्तर इत्यादी स्निग्ध पदार्थांचा शरीरास करण्यात येणारा लेप; माखणे; चोपडणे; उटी लावणे; शरीर मर्दन करणे : 'नाही अभ्यंग केशविंचरण ।तेणे जटा वळल्या आपण । हे ब्रह्मचारियासि जाण ।व्रतधारण नेमस्त ।।'– एभा१७.२८१. २. (ख्रि.)'अंक्शन' या इंग्रजी शब्दाचा पर्याय; प्रभूच्या नावाने आजारी मनुष्याच्या सर्वांगास आशीर्वादित केलेले तेल लावून त्याच्यासाठी प्रार्थना करणे :'प्राचीन एक्लेसियेमध्ये अभ्यंग करण्याचा प्रघात होता.' – ईवि १९६. [सं.]

**अभ्यंगस्नान** न. तेल, उटणे इ. लावून केलेले स्नान; न्हाणे. [सं.]

**अभ्यंजन** न. तैलमर्दन. पहा : **अभ्यंग**

**अभ्यंतर** न. १. आतील भाग; गाभा; मध्यभाग; अंतरंग : 'आणि अभ्यंतरिलियेकडे ।'–ज्ञा १३.३८४. २. मन; हृदय; अंत:करण. ३. समाविष्ट झालेली जागा; माजघर; आतील बाजू. ४. अंत: करणातील हेतु : 'तुका म्हणे यासी । न लावी उशीर । माझे अभ्यंतर जाणोनियां ।'– तुगा १६४७. ५. उदर; अंतरंग; पोट : 'नित्य निर्माल्य मिरवेशिरी । चरणतीर्थ अभ्यंतरी ।'– एभा२.२९६. [सं.]

**अभ्यंतरज्ञ** पु. अंतर्ज्ञानी. [सं.]

**अभ्यंतरज्ञान** पहा : **अंतर्ज्ञान**

**अभ्यंश** पु. हरवलेला भाग.

**अभ्यंशपद्धत** स्त्री. मालाचा ठरावीक भाग देण्याची रीत.

**अभ्यागत** पु. १. पाहुणा; अतिथी. २. सत्कार; पाहुणचार : 'कांई करी अभ्यागतु । तुम्ही निजानंदे तृप्तु ।'– शिव ७४. [सं.]

**अभ्यागत पुस्तक** न. ज्यात पाहुणा आपला अभिप्राय लिहितो ते पुस्तक.

**अभ्यारोप** पु. फौजदारी प्रकरणातील दोषारोप.

**अभ्यास** पु. १. व्यासंग; सराव; परिपाठ; सवय : 'अभ्यासें प्रगट व्हावें । नाही तरी झांकोन असावें ।'– दास १९.७.१७. २. मर्म जाणण्यासाठी केलेली आवृत्ती; घोकणे; पुनरुक्ती; निदिध्यास : 'ग्रंथांत अभ्यास म्हणजे पुनरुक्ती किंवा वारंवार काय सांगितले आहे तें पहावें'– गीर २२. ३. (ग.) गुणाकार; पट. ४. (संगीत.) रागविस्तार करताना एखाद्या स्वराचे पुन्हा पुन्हा उच्चारण करणे. ५. (व्या.) एकाच शब्दाची किंवा शब्दातील काही अक्षरांची पुनरावृत्ती होऊन नवीन शब्द बनणे. उदा. लाललाल; हळुहळू; फडफड; वटवट; दगडबिगड; किडूकमिडूक. (वा.) **अभ्यासाखाली पडणे** – एखाद्याच्या नेहमीच्या सरावामध्ये असणे.

**अभ्यासक** वि. १. अभ्यास केलेला; निष्णात. २. अभ्यास करणारा; व्यासंगी; अध्ययनशील; एखाद्या विशिष्ट विषयाचे ज्ञान मिळविण्याजोगे असलेला (माणूस). [सं.]

**अभ्यासक्रम** पु. १. शाळा, विद्यापीठ इत्यादिकातील ठरावीक कालावधीत पूर्ण करण्याचा ठरावीक शिक्षणक्रम; अध्ययनक्रम; पाठ्यक्रम. २. शाळा, विद्यापीठे इ. ठिकाणी शिकवल्या जाणाऱ्या विषयांचा तपशील देणारे माहितीपत्रक. [सं.]

**अभ्यासगम्य** वि. सरावाने प्राप्त होणारे. [सं.]

**अभ्यासजड** वि. १. पांडित्य प्रदर्शन करणारा; अभ्यासाचा डौल मिरवणारा. २. अभ्यासाखाली वाकलेला; विद्याभ्यास ज्याला मानवला नाही असा. [सं.]

**अभ्यासणे** क्रि. अभ्यास करणे; शिकणे; सराव करणे; नेहमी परिपाठ ठेवणे; पाठांतर करणे; आवृत्ती करणे.

**अभ्यासन** न. अभ्यास, सराव करणे; शिकणे : 'नलगे यापरते काही करणे । नाना परींचीं अभ्यासनें । संकल्पविकल्पात्मक साधनें । सर्व त्यजीजें ।।'– परमा २.४. [सं.]

**अभ्यास मंडळ** न. (शिक्षण.) शासनाच्या शिक्षण विभागाने किंवा विद्यापीठाने, शाळांतील अगर विद्यापीठातील अभ्यासक्रम तयार करणे, पुस्तके नेमणे, पुस्तके लिहून घेणे, कालावधी ठरविणे इत्यादी कामांसाठी नेमलेले मंडळ. [सं.]

**अभ्यासवर्ग** पु. एखाद्या विषयाचा लहानसा प्रशिक्षण वर्ग. [सं.]

**अभ्यासशाखा** स्त्री. अभ्यासाची किंवा शिक्षणाची विशिष्ट शाखा; ज्ञानशाखा. [सं.]

**अभ्यासानुवर्ती** वि. (शिक्षण.) नेहमीच्या वेळापत्रकाबाहेरचा परंतु अभ्यासाला अनुकूल असलेला. [सं.]

**अभ्यासिका** स्त्री. लेखन, वाचन, अभ्यास यासाठी घरात अगर इतरत्र राखून ठेवलेली खोली; अभ्यास करण्याची खोली. [सं.]

**अभ्यासी** पहा : **अभ्यासक**

**अभ्यासू** वि. अभ्यासाची आवड असणारा; सतत अभ्यास करणारा.

**अभ्युक्ति** स्त्री. शेरा.

**अभ्युत्थान** न. १. भेटावयास आलेल्याच्या स्वागतार्थ उठणे; मानसन्मान (क्रि. देणे, घेणे). २. उदय; उत्कर्ष. ३. एखाद्याविरुद्ध शस्त्र उचलणे; मोहिमेवर निघणे. [सं.]

**अभ्युदय** पु. १. वर येणे; दिसू लागणे; उदय पावणे; उगवणे (आकाशातील ग्रह–तारे इ.). २. (ल.) उत्कर्ष; भरभराट; चालता काळ; नशीब उघडणे –उदयाला येणे; उर्जितावस्था : 'म्हणोनि जेथ श्री तेथें श्रीमंतु । जेथे तो पांडूचा सुतु । तेथ विजय समस्तु । अभ्युदयो तेथ ।।'–ज्ञा १८.१६५५. [सं.]

**अभ्युदयिक** न. नांदी श्राद्ध; विवाहादी समारंभाच्या आरंभी पुण्याहवाचनानंतर करावयाचा एक विधी; वृद्धिश्राद्ध. [सं.]

**अभ्युदित** वि. १. उगवलेला (सूर्य इ.). २. (ल.) नशीब काढलेला; अभ्युदय झाला आहे असा. ३. सूर्योदयाच्या वेळी किंवा त्यानंतर निजलेला. [सं.]

**अभ्युपगम** पु. १. गृहीत गोष्ट; पूर्वपक्ष; (विशेषत: प्रतिपक्षाचे म्हणणे पुढे खोडून काढण्यासाठी तूर्त) गृहीत धरून चालणे; काही वेळ अनुमती देणे; स्वीकारणे. २. जवळ जाणे, येणे; आगमन; अभिगमन.३. सारखेपणा; साम्य; तुल्यभाव; उपमान. [सं.]

**अभ्युपेत्यवाद** पु. पुढे खोडून काढण्यासाठी प्रतिपक्षाचे म्हणणे काही वेळ गृहीत धरून त्यावर भाषण करणे. [सं.]

**अभ्र** न. १. मेघ; ढग : 'ना तरी अभ्रवातें हाले ।'– ज्ञा २.२. २. ढगांची काळोखी; आभाळ; मळभ. ३. आकाश; अंतरिक्ष. ४.(ल.) संकट. [सं.]

**अभ्रक** पु. न. पारदर्शक व पापुद्र्यांनी युक्त असे खडकात सापडणारे एक खजिन द्रव्य. प्रकार चार- पांढरा, तांबडा, पिवळा, काळा. उद्योगधंद्यात व औषधाच्या कामी याचा विशेष करून उपयोग.

**अभ्रक भस्म** न. अभ्रकावर विशिष्ट प्रक्रिया करून तयार करण्यात येणारे आयुर्वेदिक औषधी भस्म.

**अभ्रक मारणे** न.क्रि. खडीकामावर चकाकी यावी यासाठी अभ्रकाचा भुसा वर मारणे.

**अभ्रछाया** स्त्री. १. ढगाची सावली. २. (ल.) क्षणभंगुरता; पाण्यावरचा बुडबुडा. [सं.]

**अभ्रछायापटल–पडळ** न. ढगांनी आकाश आच्छादिले जाणे, व्याप्त होणे, किंवा व्याप्त झालेली स्थिती, अवस्था; मेघावरण. [सं.]

**अभ्रट** न. अभ्रयुक्त आकाश; मळभ. [सं. अभ्र]

**अभ्रट–अभ्राट** वि. गर्भधारणेशिवाय असलेली; गाभास न गेलेली; गाभण न राहिलेली (गाय, म्हैस इ.) भाकड.

**अभ्रमु–मू** स्त्री. (इंद्राचा हत्ती) ऐरावताची मादी : 'त्यासि जयश्री न त्यजि तसि जशि ऐरावतासि अभ्रमु रे ।'– मोसभा ७.८२. [सं.]

**अभ्रा** पु. छत्री, लोड, तक्या, गादी, गालिचा इत्यादिकांवरील वस्त्रांचे आच्छादन. (अभ्र आकाशास झाकते याप्रमाणे). [सं.]

**अभ्रांत** वि. भ्रांतिरहित; निःसंशय : 'तरि मी धनंजयाधिक होईन तुज जय घडेल अभ्रांत ।' – मोकर्ण २०.४१. [फा. अब्र] [सं.अ+भ्रांति]

**अभ्रिका** १. धुके व धूळ यांनी बनलेला छोटा ढग; आकाशगंगेतील फिकट, धुरकट व स्पष्ट सीमा नसलेले भाग. २. लहान मेघ; नीहारिका; लहान तेजोमेघ : 'नुसत्या डोळ्यांनी जी तारका अंधुक दिसते तीच साध्या दुर्बिणीने पाहिल्यास तेथे असंख्य तारकांचा समुदाय दिसतो. त्यासच अभ्रिका किंवा तेजोमेघ म्हणतात.'– अंद १३४. [सं.]

**अमइ** उद्गा. अगबाई; आई ! (आश्चर्य – उद्‌गारवाचक) : 'अमइ निरखिली म्या चोरटी चौदिसां गे ।'– आकं १८.

**अमका** वि. १. कोणी एक इसम; फलाणा; कोणी विवक्षित मनुष्य; कोणी एक : 'लोक म्हणतील अमक्याचा अमुक । घरोघरी मागतो भीक ।'– नव १८.५१. २. (नामाबरोबर उपयोग) कोण; विशिष्ट; विवक्षित (माणूस, पदार्थ). [सं.अमुक]

**अमकातमका–ढमका–धमका** वि. कोणीतरी; काहीएक (इसम, वस्तू). [अमकाचे द्वि.]

**अमत्र** न. पात्र; भांडे. [सं.]

**अमद** स्त्री. आगमन; येणे; उत्पन्न होणे; उत्पत्ती : 'येकायेकीच पाण्याची अमद आल्यामुळे कितेक माणसे असावधपणे मेलीं गेलीं व जिंदगीस तर ठिकाणच नाही' – मइसा ७.७०. [फा. आमद]

**अमद(दा)नी** स्त्री. १. हंगामात उत्पन्न होणाऱ्या वस्तू; विवक्षितकाली बाजारामध्ये येणारा माल. २. हंगाम; मोसम; सुगी; विपुलता. ३. आयात मालावरील जकात; दस्तुरी. ४. (जकाती भाषेत) नव्या रस्त्यावरील, पुलावरील किंवा नदीतील तरीवरील रहदारी; व्यापारी वाहतूक. ५. उत्कर्षाचा, भरभराटीचा काळ; उर्जित काळ. ६. अवांतर मिळकत; खेरीज प्राप्ती; आगंतुक लाभ; आडमिळकत. ७. कारकीर्द; अंमल. ८. आवक; उत्पन्न; वसूल : 'चहूकडून गल्ला येथे येण्याची आमदानी बंद जाली'– मइसा ५.४४. ९. मुक्काम; वस्ती; स्वारी : 'प्रस्तुत पंतप्रधान यांची आमदानी कोणते ठिकाणी झाली; नदी कोणते उतरास उतरतात हे लिहावे' – ऐलेसं ११८४. [फा.]

**अमन** वि. मनरहित; निर्विकार : 'व्रत तप यज्ञ दान त्याहून अधिक हरीचे ध्यान । निमिषामाजी समाधान । अमन मन होऊनि ठाके ।।' – एरुस्व ४.२२. [सं. अ+मन]

**अमन** स्त्री. शांती. [फा.]

**अमनचमन–चमीन–चैन** स्त्री. १. शांती-समृद्धी; वैपुल्य; मुबलकपणा. २. मौज; मजा; गंमत.

वि. विपुल; भक्कम; पुष्कळ; अघळपघळ; अतिशय; उदंड; यथेच्छ.

क्रिवि. सुरक्षितपणे; शांतपणे; निर्धास्तपणे; सुखाने; चैनीने. [फा.]

**अमनमन** न. 'मन' या उपाधिरहित मन; मनावाचून उत्पन्न झालेला आदी संकल्प : 'इये प्रकृति पुरुषें दोनी । उपजतीं जयाचिया अमनमनीं ।' –ज्ञा १.२७२. [सं.]

**अमनसभा** स्त्री. शांतता सभा; जातीय, धार्मिक दंगलीच्या प्रसंगी शांतता प्रस्थापित करण्याचे उपाय सुचविणारी सभा. [फा. अमन]

**अमनस्क–स्थ** वि. १. विमनस्क; मनरहित; शून्यमताचा; लक्ष नसलेला; व्यग्रचित्त उदास : 'तया अमनस्काचे मन । बुद्धीही होय ।'– ज्ञा १३.१००२.

**अमनस्कता** स्त्री. (वै.) प्राथमिक बौद्धिक वाढीच्या अभावी झालेली मानसिक अवस्था मतिमंदता. [सं.]

**अमनी** उद्गा. आई ! अगबाई ! इत्यादी उद्गार; पहा : **अमई** : 'मुखि म्हणती अमनी अमनी ।' – आपद ९०.

**अमर** वि. ज्याला मरण नाही असा; मृत्यूच्या आधीन नसलेले; मृत्युरहित; नाशरहित : 'सहजे दुर्वेचा डिरु । आंगेचि तव अमरू । वरी आला पुरू । पीयुषाचा ।।'– ज्ञा १४.२८.

पु. अमर्त्य; देव; देवता; सुर : 'कृष्णरस जे सेवित । तयांसि फिकें होय अमृत । अमर अमृतातें सेवित । तेही चरफडित हरिरसा ।।' – एरुस्व १.७७. [सं.]

न.करचंद-फळ.(गो)

**अमरओळी, अमरोळी** स्त्री. योगमार्गातील एक सिद्धी : 'अमरओळीचा देह' – लीचपू १९८.

**अमरकंद–कांदा** पु. १. या नावाच्या अनेक प्रकारच्या वनस्पती व कांदे आहेत. उदा– गुळवेल; कोरफड; निर्गुडी इत्यादी. २. अमरवेलाचा कांदा, गड्डा : 'नवसार अमरीसी वाटुनु अंजन कीजे '– वैद्यक ७७. ३. (काल्पनिक) सर्व रोगनाशक मुळी. हिच्या सेवनाने तारुण्य कायम राहते अशी कल्पना आहे. ४. महाबळेश्वराकडे मिळणारा एक कांदा.

**अमरकाया** स्त्री. न मरणारे शरीर; निरोगी व जोमदार शरीर. [सं.]

**अमरतरु –रू** कल्पवृक्ष; स्वर्गातला वृक्ष; देवदार. [सं.]

**अमरता** स्त्री. अमरपणा; चिरंजीवपणा; मरण नसणे; नष्ट न होणे.

**अमरपट्टा–टा, अमरपत्र–पाट** (अमर्‌पट्टा) पु. अमरपणाचा लेख;

मृत्यूपासून सुटका केल्याचा हुकूम- आज्ञा- ताम्रपट; मरण न येण्याचे आश्वासन : 'तू आपणाला महाराणी म्हणवितेस म्हणून तुला देवाकडून अमरपट्टा थोडाच मिळाला आहे ?' -रामह. [सं.अमर+पट]

**अमरपण** पहा : **अमरता** : 'सेविती अमृतसरिता । रोगु दवडूनि पंडुसुता । अमरपण उचिता । देऊनि घाली ।'- ज्ञा १५.५८३.

**अमरलोक** पु. स्वर्ग.

**अमरवेल** स्त्री. १. सोनवेल; आकाशवेल; ही आंब्याच्या झाडावरही उगवते. हिची पाने सूक्ष्म असतात किंवा नसतात. ही वेल पिवळ्या रंगाची व संपूर्ण परोपजीवी असते. २. पहा : **अमृतवल्ली**

**अमरसाहित्य** न. मरणास प्रतिबंध करणारे साधन; अंगात घालावयाचे चिलखत इत्यादी : 'अमर साहित्य अंगातील काढोन.'- मइसा २.१९३.

**अमरंथ** न. १. कोरांटी, गुलमखमल वगैरे फुलझाडे. २. तांदुळजा, माठ, राजगिरा वगैरे पालेभाज्या. [सं.]

**अमराचार्य** पु. देवांचा गुरू; बृहस्पती; एक पदवी.

**अमराधिप** पु. देवांचा राजा इंद्र. [सं.]

**अमरावती** स्त्री. इंद्राची राजधानी : 'जेथ अमरत्व हेचि सिंहासन । ऐरावतासारिखे वाहन । राजधानी भुवन । अमरावती ।।' - ज्ञा ९.३२०.

**अमरांगना** स्त्री. **अप्सरा** [सं.]

**अमर्त्यभाव** पहा: **अमरता**

**अमर्पीत** न. १. आम्लपित्त रोग. (गो.) २. नाकातून निघणारे रक्त. [सं. आम्लपित्ताचा अप.]

**अमर्याद** वि. १. (लोक, शास्त्र इत्यादींच्या) मर्यादेच्या किंवा योग्य सीमेच्या पलीकडे गेलेला; ठरावीक मर्यादा उल्लंघन करणारा; स्वैर; स्वेच्छाचारी; मोकाट; अव्यवस्थित; (ल.) फन्दी; अनाचारी; चैनी. २. अतिशय; अत्यंत; प्रमाणाबाहेर; बेसुमार; कल्पनेच्या बाहेर; विपुल (क्रिया, रक्कम, गुण, इसम वगैरे). [सं.]

**अमर्यादा** स्त्री. १. सीमा, मर्यादा यांचे उल्लंघन; मर्यादातिक्रम. २. अनादर; अपमान; उद्धटपणा; विनय सोडून वागणे. [सं.]

**अमर्ष** पु. क्रोध; संताप; असहनशीलता : 'जगचि देह जाहले । म्हणोनि प्रियाप्रिय गेले । हर्षामर्ष ठेले । दुजेविण ।।'- ज्ञा १२.१६८.
वि. सहन न करणारा; न सोसणारा; असहिष्णू. [सं.]

**अमल** वि. १. मलरहित; शुद्ध; स्वच्छ; चकचकणारे : 'उघडी अमल राजीव नयन ।' - रावि ६.२४८.

**अमल** वि. आवळी; शिकेकाई; खडीसाखर. [सं.]

**अमल** पु. १. अधिकार; स्वामित्व; सत्ता; राज्य; हुकूम. २. बजावणी; निवाडा लागू करणे; कृतीत आणणे : 'पुढे अमलात येईल ते मागाहून विनंती लिहू'- दिमरा १.३७. ३. कैफ; नशा; औषधाचा पगडा : 'दारूच्या अंमलात झमाझम उडू लागल्या तलवारा.'- ऐपो ३२४. ४. पदार्थातील कैफ आणणारा गुण. ५. दारू, गांजा वगैरे कैफी पदार्थ : 'रुक्या दोरूक्याचा अमल सेउनि' - दावि ४५२. ६. सुभा, मामला इत्यादी जागा; हुद्दा; अधिकार. ७. (अमीन अप.) जमिनीचा सारा वसूल करणारा सरकारी अधिकारी; कलेक्टर; ह्यावरून सध्या खेड्यातील सारावसुलीतील एक हक्क. ८. वेळ; काळ; प्रभाव: 'साखरा वाटून दीड प्रहरचे अमलात तोफांचे बार पाच करविले' -ख ११.५६९६. [फा.अर. अमल] (वा.) **अमल करणे** –मादक पदार्थ खाऊन कैफांत गुंग होणे; दारू वगैरे घेणे; **अमल गाजविणे**- अधिकार चालविणे; **अमलाच्या जोराने**–अधिकारामुळे प्राप्त झालेल्या सत्तेने. **अमलात आणणे**- १. (निवाडा, ठराव, हुकूम वगैरे) लागू करणे. २. (गाव किंवा देश वगैरे) आपल्या सत्तेखाली आणणे; ताब्यात घेणे. ३. कृतीत आणणे : 'तो निश्चय अंमलातहि आणला.' - वज्राघात ४६.

**अमलकलम** न. क्रियालेख : 'बोलण्यात गोष्टी आल्या असतील, परंतु दस्तैवज अथवा वचन, शपथ, क्रिया, अमलकलम असे काही झाले नाही'- मइसा ५.१५.

**अमल गहाण** न. ताबे गहाण; तारणावर घेतलेले कर्ज.

**अमलतास** पु. बहाव्याच्या शेंगांचा मगज. [हिं.]

**अमल दस्तूर** पु. नियम; कायदा; वटहुकूम; शासन.

**अमलदार** पु. अधिकारी; अखत्यार असलेला सरकारी नोकर; सुभेदार; मामलेदार वगैरे. [फा. अमल+दार]

**अमलदारी** स्त्री. अमलदाराचे काम, हुद्दा. [फा.]

**अमल बजावणी** स्त्री. प्रत्यक्षात आणणे; कृतीत उतरविणे; कार्य घडवून आणणे; अधिकार वर्तविणे; अमलात आणणे; (हुकुमा) प्रमाणे वर्तन करणे; अनुरूप वागणे : '(रामकालीन) राजा हा फक्त अंमलबजावणी करणारा अधिकारी असून तो प्रजेच्या नियंत्रणाखाली असे' - मसाप २.११२.

**अमलमणी–रत्न** पु. न. स्फटिक.

**अमलमस्त** वि. सत्ता असल्यामुळे मगरूर बनलेला. [फा.]

**अमलमस्ती** स्त्री. सत्तेचा गर्व; ताठा. [फा.]

**अमलवारी** स्त्री. अमदानी; कारकीर्द; अमल : 'अलिकडल्या शतकातलेच पांचवे पायस व पांचवे सेक्टस यांच्या अमलवारीचा विचार करा.'- विद्याभिवृद्धी ४०.

**अमला** पु. कारकून; अधिकारीवर्ग; अंमलदार : 'तालुक्यास अमला योजून बंदोबस्त करावा.'- मइसा ७.४५. [फा. आमिला]

**अमला** पु. सोन्याचा डूल; लोलक; आंबला. [सं. आमलक]

**अमलाफैला** पु. १. अमल; अधिकार; ताबा. २. कारकून; पांढरपेशा; इतरलोक; प्रजा : 'दिल्लीतही अमलाफैला पळावयाचा इरादा करीत आहेत.'- मइसा १०.३४०.
क्रिवि. पूर्णपणे; एकंदर; निखालस (विक्री, देवघेव कामात).[फा.]

**अमली** वि. १. कबजी; सरकारच्या सत्तेतील (गाव, कसबा, प्रांत).
पु. १. कैफी; नशा आणणारे. २. नशा करणारा; व्यसनी.[फा. अमल]

**अमली पदार्थ** पु. मादक पदार्थ.(ज्यामुळे अंमल चढतो असे, दारू, भांग इ. पदार्थ).

**अमली बाब** स्त्री. जमाबंदीतील एक खाते (दारू, कलाली, अफू, ताडी, माडी, शिंदी इत्यादी); अंमली पदार्थांच्या विल्हेवारीचे खाते व त्यापासून होणारे उत्पन्न. अबकारी खाते, उत्पन्न.

**अमली मुलूख** पु. अंमल असलेला मुलूख; ज्याच्यावर ताबा आहे असा मुलूख.

**अमलीसन** पु. ओरिसात प्रचारात असलेला एक शक. याचा आरंभ भाद्रपद शु. ॥ १२ पासून होतो.

**अमले फाले** पु. अव. अमलाफैला; कारकून; कामकरी; नोकरचाकर : 'खान मजकूर दरजबाब आरज करून पाठविले की ३० रुपये सालखर्चास महाराजाचे बहादरानी करार करून दिले आहे. माह बमाह पोचतात आणि अमलेफाले हुजूरचे मुखत्यार आहे'- हिंद ८१.

**अमवाल** पु. द्रव्य; संपत्ती : 'येलची याही बादशहासी बहुत सख्त रदबदली करून शुजाउद्दौलाचा अमवाल इच्छून; काही द्रव्य घेतले व बहुत तगादा केला'- हिंद

**अमवाळ** वि. आंबट : ' न साहे रुक्ष, क्षार, अमवाळ'- गीता १२. १८१. [सं. अम्ल]

**अमसर** वि. फार; पुष्कळ : 'किल्ल्यावरून पथरबाजी केली. खानाचे लोक अमसर जखमी झाले.' -शिचसा २.१३२.

**अमसू(सो)ल** न. कोकमसाल; रातंबीच्या फळाची सुकविलेली साल.

**अमसूळ** वि. आंबटसर : 'रसास थोडा कचरा लागला तरी तो अमसूळ होतो.' - कृषिवि ४८०. [सं. अम्ल+सदृश]

**अमळ-अमळसा** वि. थोडा; किंचित; जरासा; काहीसा. क्रिवि. थोडावेळ; अल्पकाल.

**अमळत्रय** न. वर्तमान, भूत आणि भविष्य हे तीनकाळ : 'तेथ प्रभुत्वे म्हणिजताये नाभी अमळत्रयाते '- ऋव ४०६.

**अमळशाने** क्रिवि. जरा वेळाने; थोड्या वेळाने : 'अमळशाने मी त्यांचा परिचय करून दिला.'- दिअहो ८६.

**अमंगल-ळ** वि. (विप्र. अमंगळ.)१. अशुभ; मंगल नसणारे; अनुकूल नसलेले; अहितकारक; अनिष्ट. २. घाणेरडे; खराब; गचाळ; अपवित्र; ओंगळ; भ्रष्ट (काही विधी, आचार, क्रिया, स्थळ, इसम). ३. ओवळे. (को.) ४. (उप.) ज्याच्या कुंडलीत मंगळ अशुभस्थानी नाही असा.

**अमंत्र-अमंत्रक** वि. १. ज्यास वेदमंत्राचा अधिकार नाही तो (स्त्री, शूद्र); वेदाचा अधिकार नसलेला. २. न मंतरलेले; वैदिकमंत्र न म्हणता केलेला (विधी, समारंभ). ३. मंत्राखेरीज. [सं.]

**अमंत्रि-त्री** वि. ज्याला मंत्री (प्रधान) नाही असे (राज्य) : 'अमंत्रिया राज्याची परी होये । बळासिया ।' - राज्ञा १३.५५५. [सं.]

**अमंद** वि. १. शीघ्र; मंद नव्हे असा.२. पुष्कळ : 'सस्नेह ज्यात अतिसुंदर हास्यमंद । प्रेमप्रसाद शुभ ज्यात असे अमंद ।'- ध्यानमाश्लो ११.[सं.]

**अमा** स्त्री. अमावास्या; आवस. सूर्य व चंद्र यांच्या युतीचा दिवस; चंद्राची १५ किंवा१६ वी कला : ' अमारात्रीचे तम केवळ ।' - कथा ५.५.४०. [सं.]

**अमा, आमा** पु. १. स्तन. २. (पोर्तु.) अंगावर दूध पाजणारी दाई.

**अमा** स्त्री. आई; एखाद्या स्त्रीस आदरार्थी संबोधितात. [का.]

**अमा** अ. परंतु; तरीपण; उलट; इकडे; इतक्यात : 'कागद घेतला अमा दाम दिला नाही' - भाइ (१८३४) १४४; 'अमा पातशहा खलेल करवितातीं'- राराभा १५.२११. एकत्र : 'का कळीं पूर्ण चंद्रमा । आणौनि मेळवी अमा'- अमृ ४८६. [फा.]

**अमाइक** वि. मायेपलीकडला; खराखुरा; वास्तव : 'अमाइक तव नव्हसी । कवणहि विषो ।'- अमृ २.३६.

**अमाईकपण** न. निष्कपटपण; सरळपणा : 'अमाईकपणे मनींचे सांगसी'- दावि २६२. [सं.अ+माया]

**अमाजिद** वि. शुद्ध; पवित्र; श्रेष्ठ. [फा. अम्जद]

**अमातृक** वि. मातृहीन; आई नसलेले पोरके मूल. [सं.]

**अमात्य** पु. १. आठ प्रधानांपैकी एक; याने सर्व राज्यांतील लष्करी आणि मुलकी वसूल व हिशोब ठेवून युद्धावरही जाण्याचे काम करावयाचे असे. फडणिशी पत्रावर याची निशाणी असे. २. (सामा.) मंत्री; प्रधान; सल्लागार; सचिव. [सं.]

**अमात्र** वि. १. निर्विषय; अविषय. २. प्रणवातीत. ३. अभौतिक; पंचमहाभूतात्मक नव्हे तो.
पु. परमात्मा.

**अमाथ** क्रिवि. अचूक. (बे.)

**अमान** स्त्री. अमान्य करण्याची बुद्धी; अनादरवृत्ती : 'सर्व शस्त्रविद्या शिकवोन कोणी । परिपूर्ण जाले वदतां ऐकूनि । चेले न लेखिती पडोन अमानीं ।' - दावि २०१. [सं. अ+मन्]

**अमान** न. कृपा; दया; संरक्षण : 'तेथील लोकांना आपले रक्षण होणे कठीण वाटून त्यांनी अमान मागितले.'- ऐपो २.६. [फा.]

**अमानणे** सक्रि. न ऐकणे; अनादर करणे. [सं.]

**अमानत** स्त्री. १. (विप्र.अनामत) ठेव; निधी; विश्वस्त वस्तु. २. जप्त; सरकारजमा : 'जयदेवरायास हरामखोरी लावून देशमुखी अनामत केली.'- इम २३. [फा.]

**अमानतदार** पु. विश्वस्त; ठेव सुरक्षित ठेवणारा. [फा.]

**अमानतनामा** पु. विश्वस्तपत्र; ठेवपत्र. [फा. अनामत+नामा]

**अमानतपत्र** न. जप्तीपत्र; वादग्रस्त वस्तु तात्पुरती सरकारताब्यात घेतल्याबद्दल किंवा एखाद्या विश्वस्ताजवळ ठेवल्याबद्दल लिहिलेला लेख.

**अमानतपन्हा** पु. 'श्रेष्ठ' या अर्थी एक पदवी. [फा.]

**अमानवी** वि. मानवेतर; अमानुष; दैवी : 'त्यांतून (प्रसंगांतून) पार पडून पुनः आज आपले पूर्ण कर्तव्य करण्यास त्यास जें सामर्थ्य आलें आहे तें त्याच्या दृष्टीनें तरी कांहीं अमानवी कारणांमुळें आलेलें आहे.'- लोटिकेले २.१.

**अमानित्व** न. निगर्वता; अहंभाव नसणे; निगर्वीपणा; नम्रता; विनय : 'पैं अमानित्व पुरुषीं । तें जाणावें इहीं मिषीं ।' - ज्ञा १३.२०२. [सं.]

**अमानी** स्त्री. १. गैरइजारा; गैरमक्तेदारी; रयतवारी (पद्धत) : 'तालुक्यावर ताहूद केलें तें मोडावें आणि अमानी करावी.' -मइसा ५.२३. २. ठेव; विश्वस्त वस्तु. पहा : **अमानत**
वि. १. तात्पुरता कामावर नेमलेला; कायमची नेमणूक न झालेला; बदली. २. कायम नसलेल्या अमलदाराने चालविलेले. [फा.]

**अमानुष-ष्य** वि. १. मानवी सत्तेबाहेरचे; अमानवी; दैवी; स्वर्गीय; अद्‌भुत; मनुष्यदेहधर्मरहित : 'तेविं अमानुष मानुष । मानाल मातें ॥'-

ज्ञा ९.१४२.२. मनुष्यजातीला अयोग्य – न शोभणारे; राक्षसी; पाशवी; क्रूर; निर्दय; माणुसकी सोडून वागणारा. ३. मनुष्याने न आचरण्यासारखे. [सं.]

**अमान्य** न. कच्चे अन्न; शिधा : 'अयाचित अमान्यें उदंड आलीं ।'– सप्र ८.११४. [सं.]

**अमान्य** वि. पसंत, मान्य नसलेले; स्वीकारण्याला अयोग्य; नापसंत; अप्रिय; तुच्छ. [सं.]

**अमाप–अमाय** वि. १. न मापता येण्यासारखा. २. न मावणारे. ३. (ल.) असंख्य; पुष्कळ : 'अमाय पोरांची मिळवीन मांदी ।'– दावि २१. ४. भरघोस; अफाट : 'अमाप यश पदरात पडलं.' – जटापा ८८.

**अमापपणे** क्रिवि. अमोजपणे; मोजता येणार नाही असे; विपुलतेने; वैपुल्याने.

**अमाय** वि. १. निष्कपटी; प्रामाणिक. २. अमर्यात.[सं. अ+ माया] पु. मायेचा अभाव; सत्यज्ञान.

**अमायिकवृत्ति–त्ती** स्त्री. मायेमध्ये न गुरफटलेली वृत्ती –वर्तन –ज्ञान; निर्विकार स्थिती; निर्लेपवृत्ती. [सं.]

**अमारत** स्त्री. महानुभावित्व; संपन्नता. [फा. इमारत]

**अमारतपन्हा** पहा : **अमानतपन्हा**

**अमारत मर्तबत** वि. प्रतिष्ठेची पदवी, चिन्ह : 'अमारत मर्तबत खान अनम याकूबखान यांजकडील तहनामा.'–थोमारो १२१.१. [फा.]

**अमार्ग** पु. १. आडमार्ग; चुकीचा रस्ता. २. असमंजसपणा. ३. व्यतिक्रम; विलक्षणपणा (बोलणे, वागणे, न्याय करणे यामध्ये). ४. कुमार्ग; व्यभिचार : 'मार्गामार्ग येकवढें । करीत चाले ।'–ज्ञा १८.६२५. [सं.]

**अमार्दव** नाजुकपणाचा अभाव; निबरपणा; काठिण्य; (ल.) सौम्यपणाचा, मवाळपणाचा अभाव. [सं.]

**अमालत** पु. वर्चस्व; सत्ता. [फा. अमल्]

**अमा(व)वास्या–अमावास** स्त्री. कृष्णपक्षाची अखेरची तिथी; सूर्य व चंद्र ज्या दिवशी जवळजवळ येतात तो दिवस; अवसेची तिथी. [सं. अमा=जवळ+वस=राहणे]

**अमासा** वि. क्रिवि. अल्प; लहान. पहा : **अमळसा** : 'तो अंतरात्मा आहे कैसा । प्रस्तुत वोळखाना अमासा ।' – दास १०.१०.३६.

**अमासुस्त** वि. सर्वस्वी थंड; आळशी : 'मोगलाई कारभार अमासुस्त ।' – मइसा १.१४७. [फा.]

**अमासे** क्रिवि. थोड्या वेळाने; अंमळशाने : 'किंबहुना ज्याचे नाम ऐसें । त्याचे स्वरूप असेल कैसें । ते पाहो आद्यंत अमासें । निजमान सोई ।'– स्वादि १.५.४१; अमाशाने (व.) [सं.]

**अमाळ** वि. शुद्ध; स्वच्छ; शुभ्र : 'चाफेकळ्यांच्या मिरवेत माळा । मुक्ताफळांच्या दिसती अमाळा ।'– सारुह ६.२९.

**अमित** वि. १. न मापलेले, मोजलेले. २. मोजता न येण्यासारखे; अमर्याद; अंदाज किंवा अटकळ न करता येण्याजोगे; अपरिमित; पुष्कळ : 'तुज नमो अमितविक्रमा ।' – ज्ञा ११.५३३. ३. असंस्कृत.

**अमितभाषी** वि. फार बोलणारा : 'खरे यांच्याप्रमाणे ते आत्मश्लाघी अमितभाषी आणि अमर्याद मात्र नाहीत.'– व्यरे २३.

**अमितीय** वि. (भौ.) ज्याला उंची, लांबी, रूंदी, जाडी नाही असा; सूक्ष्म; मोजता न येण्यासारखा. [सं.]

**अमित्य** वि. (अमित अप.) पुष्कळ : 'अमित्य सेना न्यावी होती ।'– वेसीस्व १.९०. [सं. अमित]

**अमित्र** पु. शत्रू; स्नेही नसलेला; द्वेषी; वैरी. [सं.]

**अमिद** न. (रसा.) अम्लसंयुक्तद्रव्य.

**अमिदिन** न. (रसा.) इमिदाचे अनाम्ल. हे एकाम्लक असून फार स्थिर नसते. अमिदहरिदे किंवा गंधकिल अमिदे यावर अम्न किंवा अमिने यांची क्रिया केली म्हणजे अमिदिन तयार होते. – ज्ञाको अ ३३८.

**अमिन** न. (रसा.) अम्न (अमोनिया) मधून उज्ज (हायड्रोजन) परमाणु नि:सारित करून होणारे द्रव्य.

**अमिराई** स्त्री. सरदारकी, अमिराचे ऐश्वर्य.

**अमिरी** स्त्री. १. सरदारी सत्ता. २. बडेजाव.

**अमिल** पु. अमलदार; अधिकारी : 'चांगलसा आश्रय मिळता तर तुमच्या अमिलाचा रंगमहाल टाकून देखील मी ह्या भिकार गांवकुसाच्या बाहेर पडतों.' – विवि ८.११.२०६. [अर. आमिल्]

**अभिश्रेणीयता** स्त्री. (रसा.) दोन पदार्थांची एकमेकात मिसळण्याची अक्षमता. उदा. तेल व पाणी. [सं.]

**अमीन** पु. १. निधिधारक; विश्वस्त : 'वारीसदार हजर नसेल तर ती जिनगी अमीन याचे ताब्यात देऊन'– ऐस्फु ५८. २. मोगलाईतील व पेशवाईतील एक अधिकारी. याची कामे – प्रत्यक्ष वसूल जमा करणे, कब्जांचा निवाडा करणे, सामान्य राज्यव्यवस्थेत देखरेख ठेवणे इत्यादी; तपासणी अंमलदार; तालुकादार; मामलेदार; तहसीलदार; लवाद; पंच; पगार व काम यासाठी–थोमारो. पहा : **आरमारअमीन** [फा.]

**अमीनचमीन** पहा : **अमनचमन**

**अमीनी, अमिनी** स्त्री. १. अमिनाचे काम. २. व्यवस्थितपणा. ३. सरकारी अधिकाऱ्याकडून जमिनीची ताबडतोब लागलेली व्यवस्था. [अर. अमीन]

**अमीबा** पु. एकपेशीय सूक्ष्मजंतू; जलचर आदिजीव : 'जीवकोटींतील अगदी खालच्या दर्जाचा अमीबा नावाचा जो प्राणी आहे त्याची रचना इतकी साधी... असते.'–वस्व ७९. [इं.]

**अमीर** पु.१. थोर किंवा बडा इसम; सरदार; उमराव; उच्च घराण्यातील मनुष्य : 'थोर वीर किती अमीर होउनि फकीर भिक मागती ।' – ऐपो ३६७. २. आज्ञा करणारा अधिकारी. [फा.]

**अमीर अकारिब** सरदार व नातलग : 'मग मसनदेवर जाऊन बैसिले. तमाम अमीर आकारिबाहीं नजरा दाखविल्या'– पेद २५.९५.

**अमीर उमराव** पु. बडे लोक; सरदार मंडळी. [फा.]

**अमीरउल्–उमरा(व)** अमिरातील श्रेष्ठ; सरदारांचा नायक. (मालोजी घोरपडे यास ही पदवी होती.)

**अमीरउल ममालिक** राज्यातील श्रेष्ठ अधिकारी.

**अमीरराव** एक पदवी.

**अमी(मि)राई** स्त्री. सरदारी; सरदारी वैभव : 'आहे घरी पुरी अमिराई' – प्रला १२९. [फा. अमीर]

**अमी (मि)री** स्त्री. १. सरदारी; सत्ता; सर्वाधिकारित्व. २. बडेजाव; मोठा थाट. ३. अमीराचा दर्जा. ४. उदारता. [अर. अमीर ]

**अमीष** न. उत्पन्न; मिळकत; देणगी : 'याचे घरचे लग्नमुहुर्ताचें अमीष जंगमांनी निमे घ्यावे व निमे जोशांनी घ्यावे अशी चाल आहे.'– बाबारो ३७.५५. [सं. आमिष]

**अमु–मू** वि. ज्यास वाचा नाही असे (पशुपक्ष्यादी, लहान मूल). (को.)

**अमु–मू** पहा : **आमा**

**अमुक** वि. विवक्षित; कोणी एक; नाव न घेता सामान्यरूपाने सांगण्यास इष्ट असा.

न. १. विवक्षित वस्तु; इसम : 'तरी अमुकाचि मी स्वयमेव । तो सांग कवण तूं ।'– विसिं ३.११. २. फलाणा; कोणीतरी माणूस. पहा : **अमका** [सं.]

**अमुकतमुक** वि. अमकातमका; विवक्षित; कोणी एक वस्तु; ही किंवा कोणतीही वस्तु. [अमुकचे द्वि.]

**अमुक्त** वि. १. बद्ध; बंदिस्त. २. न सोडलेला. ३. न सुटलेला. ४. मोक्षपदास न पोहोचलेला. [सं.]

**अमुक्ताभरण** न. भाद्रपद शुद्ध सप्तमीस आचरावयाचे देवीचे व्रत. [सं.]

**अमुत्र** पु. परलोक; पुढील जन्म; जन्मांतर.

क्रिवि. तेथें; तिकडे; परलोकी. [सं.]

**अमुद्रांकित** वि. महसूल मुद्रांक किंवा डाक मुद्रांक न लावलेला; महसुली तिकीट किंवा पोष्टाचे तिकिट न लावलेला.

**अमुद्रित** वि. न छापलेले.

**अमुर्पिका** वि. अर्धवट, न मुरता पिकलेला. (गो.)

**अमूप** वि. (विप्र. अमाप) मोजता न येण्याजोगे; असंख्य; अतिशय; फार; पुष्कळ; अपार; अमित; पहा : **अमाप :** 'कुळशीळ धनरूप । विद्यावयसा अतिस्वरूप । शांति कांति तेज अमुप । करिती तप तुजलागीं ।'– एरुस्व ४.९.

**अमूपार** वि. अनंत. [सं. अमूप+अपार]

**अमूर्त** वि. आकार किंवा रूप नसलेले; आकृती रेखाटून स्पष्टीकरण किंवा विवरण न करीता येण्यासारखे; अव्यक्त; निराकार; आकाररहित. उदा. आकाश, हवा, वेळ, काळ, अंतर, आत्मा, ब्रह्म. [सं.]

**अमूर्त अंक** पु. (ग.) अमूर्त राशीचा मूल्यदर्शक अंक. [सं.]

**अमूर्त अधिकार** पु. अदृश्य, दैवी अधिकार.

**अमूर्त अर्थ** पु. अभौतिक संपत्ती.

**अमूर्तमत्ता** स्त्री. (अर्थ.) एखाद्या कंपनीचे ख्यातिमूल्य (गुडविल), एखादी वस्तू तयार करण्याचे अधिकार (पेटंटचे अधिकार) यासारखी उत्पादक नसलेली पण विक्री करता येण्याजोगी मालमत्ता.

**अमूर्तीकरण** न. १. समूर्त वास्तव; विशिष्ट वस्तू किंवा प्रत्यक्ष घटना यांचा आधार न घेता केलेले संकल्पन. २.(तत्त्व.) ध्यानातील एकाग्रता. ३. अशरीरीकरण. [सं.]

**अमूल्य** वि. किंमत करता न येण्यासारखे; अमोल; मूल्यवान. [सं.]

**अमूस, अमोस, अमोशा** स्त्री. अमावास्या; आवस.

**अमृत** न. १. देवलोकींचे पेय (याने वृद्धावस्था किंवा मृत्यू येत नाही); समुद्रमंथनात निघालेल्या चौदा रत्नांपैकी चौदावे; सुधा; पीयूष; सुधारस : 'जोडे अमृताची सुरसरी । तैं प्राणांतें अमर करी ।'– ज्ञा १७.२१९. २. दूध आटवून त्यात खडीसाखर, जायफळ, वेलदोडे वगैरे पदार्थ घालून रात्री थंडीत उघड्यावर ठेवून दुसऱ्या दिवशी प्रात:काळी ते दूध घुसळून त्यावर फेस येतो तो. ३. मरणापासून मुक्तता; सुटका; मोक्ष: 'जिणें गरळ पाजिलें अमृत पाजिलें तीस तां ।' – केका ९१. ४. उदक; (ल.) देवाचे चरणतीर्थ. ५. ब्रह्म : 'अमृत म्हणजे अविनाशी ब्रह्म हा अर्थ उघड असून'– गीर ३५८. ६. दूध : 'सर्प पोसूनिया दुधाचाही नाश । केलें थीता विष अमृताचें ।' – तुगा ३०७३; 'अमृतें तरिच मरिजे । जरी विखेंसीं सेविजे ।'– ज्ञा २.२२४. ७. पंचमहायज्ञ करून जे अन्न शिल्लक राहते ते किंवा यज्ञशेष अन्न – गीर २८८. ८. विष : 'त्यांणी रात्री अमृतप्राशन केले व ते देवाधीन झाले'– ऐलेसं ५३८४. ९. शीख पंथातील एक संस्कार – एका मोठ्या भांड्यात पाणी व साखर घालून ते मंत्र म्हणत किरपाणाने ढवळतात व मग ते प्राशन करावयास देतात. [सं.]

**अमृत** वि. १. अमर; मरणाधीन नसलेला; मृत्यूपासून सुटका झालेला. २. थंड; आल्हादायक (पेय इ.). [सं.]

**अमृत अशन** वि. अमृत सेवन करणारे (देव). [सं.]

**अमृतअंशु** वि. ज्याचे किरण अमृतासारखे सुखप्रद आहेत असा (चंद्र). [सं]

**अमृतकर** पु. चंद्र; चंद्रकिरण. [सं]

**अमृतकळा** स्त्री. १. गाल; गालफड.२. घशातल्या गाठी : 'येकांच्या बैसल्या अमृतकळा.' –दास २.५.४. ३. चंद्राची सतरावी कळा. (वा.)

**अमृतकळा बसणे** – मृत्यूचा काळ जवळ येणे : 'अमृतकळा बसल्या आता वाचणे कठीण.'

**अमृतकुंड** न. स्वर्गातील अमृत भरलेले पात्र; भांडे.

**अमृतकुंडली** स्त्री. एक चर्मवाद्य.

**अमृतकोकम** न. रातांबा किंवा कोकंब यांच्यापासून तयार केलेले मधुर पेय : 'समुद्र काठालगतच्या त्याच्या भावाने अमृतकोकमचे आसव तयार केले असावे.'– माजिस्थि ६.

**अमृतघटका–घडी** पहा : **अमृतवेळा**

**अमृतघुटका–घुटिका** पु. १. अमृताचा घोट. २. मजेदार गोष्टींचा चुटका. ३. छोटीशी व सुंदर गाण्याची चीज.

**अमृतझोप** स्त्री. पहाटेची सारखझोप.

**अमृततुल्य** वि. अमृताशी तुलना करण्यासारखा; अमृताप्रमाणे मधुर.[सं.]

**अमृतधारा** स्त्री. एक वृत्तप्रकार. [सं.]

**अमृतध्वनि–नी** पु. एक छंदवृत्त. याच्या प्रत्येक चरणात बावीस अक्षरे असून त, भ, य, ज, स, र, न हे गण आणि एक अक्षर गुरू असते. [सं.]

**अमृतपाक** पु. रव्याच्या एक प्रकारच्या वड्या.

**अमृतपान–प्राशन** न. १.अमृत पिणे; अमृतसेवन; अमृतघुटका. २. (ल.) विष पिणे, खाणे. [सं.]

**अमृतपी–प्राशी** वि. अमृत पिणारा.

**अमृतफळ** न. १. जे फळ खाल्ले असता मनुष्य अमर होतो ते. एक

काल्पनिक फळ. राजा भर्तृहरीला असे फळ मिळाले होते. २. पेरू, आंबा, द्राक्ष, बेदाणा, खिसमिस वगैरे. ३. एक पक्वान्न; मोदक : 'कीं देवाचिये सन्निधी अमृतफळें पावतें जाली' -ऋ ८२. [सं.]

**अमृतमहाल** वि. कर्नाटक राज्यातील अमृतमहालातील बैलांची एक जात : 'खिलारी, अमृतमहाल व कृष्णाकांठ या जातीचे बैल तयार करणें.'- के १८.७.३१.

**अमृतमहोत्सव** पु. एखाद्या संस्थेला किंवा व्यक्तीच्या वयाला पंचाहत्तर वर्षे पूर्ण झाल्यानंतर करण्यात येणारा समारंभ. [सं.]

**अमृतमंथन** न. अमृतासाठी देव व दैत्य यांनी केलेले समुद्राचे मंथन; घुसळण : 'एऱ्हवीं अमृतमंथना । सारिखे होईल अर्जुना ।'- ज्ञा १८.१४८२. [सं.]

**अमृतवर्षाव** पु. अमृताचा पाऊस; चांगल्या व संतोषकारक गोष्टींचा किंवा पदार्थांचा वर्षाव किंवा देणगी; समृद्धी. [सं.]

**अमृतवल्ली** स्त्री. १. जिच्यामुळे अमरत्व प्राप्त होते अशी एक काल्पनिक वेल. २. (ल.) भांग. ३. अमरवेल; गुळवेल. [सं.]

**अमृतवेळ** स्त्री. १. तीस घटकांपैकी एक शुभ काल. एकंदर दिनमानाचे व रात्रिमानाचे आठ भाग धरून मुख्यत: आठ वेळा कल्पिल्या आहेत. ३ ।।। घटका हे यांचे मध्यम प्रमाण आहे. दिनमानाप्रमाणे त्यांचा काल कमीजास्त होतो : 'अमृतवेळ प्रसंगज्ञान । कैसें तें ऐकावें ।' -दास ४.१.२०. २. करमणूक; विलास व उपभोग यांची योग्य वेळ. ३. औषध देण्याची योग्य वेळ (सकाळ).४.शांत, खुषीत असण्याचा-स्नेहभावाचा काल. [सं.]

**अमृतसर्वा** वि. पु. अमृत स्रवणारा :'जेवि पूर्णचंद्र अमृतसर्वा'- ऋम ७२१.

**अमृतसंजीवनी** स्त्री. १. मृतास जिवंत करणारी विद्या; मृतसंजीवनीचा पर्याय. २. अमृत. ३.(ल.) अद्वैतबोधरूपी अमृत : 'ते नमस्करूं अमृत संजीवनी । श्री देववाणी ।' -१. ४. चंद्राची अमृत झिरपणारी १७ वी कळा.

वि. मृतास सजीव करणारी : 'अमृतसंजीवनी विजविली बाई । अंगें तये ठायीं हारपलीं ।'- तुगा ३७८९. [सं.]

**अमृतसिद्धि-द्धी** स्त्री. अमृत स्वाधीन असणे : 'कां मृत ही जीवित लाहे । अमृतसिद्धी ।'- ज्ञा १.७७. [सं.]

**अमृतसिद्धियोग** पु. रविवारी हस्त, सोमवारी श्रवण किंवा मृग, मंगळवारी अश्विनी, बुधवारी अनुराधा, गुरुवारी पुष्य, शुक्रवारी रेवती, शनिवारी रोहिणी याप्रमाणे वार व नक्षत्र यांचा योग. हा कोणत्याही कार्यास शुभ असतो. [सं.]

**अमृता** स्त्री. गुळवेल. (औषधी वनस्पती). [सं.]

**अमृताहरण** पु. १. अमृतचोर. २. गरुड : 'जैसा अमृताहरणि स्वर्गा । खगनायक आक्रमि ।।' [सं.]

**अमृति-ती** स्त्री. १. वैष्णव लोकांजवळील देवाचे तीर्थ ठेवण्याची लहान गिंडी : 'अमृतीमधें आकाश । सगळें साठवतां प्रयास ।'-दास ७.४.१८. २. पाणी पिण्याचे लहान भांडे. ३. हिरडा, आवळी, तुळस, दुर्वा इत्यादी वनस्पती. [सं. अमृत]

**अमृतीकरण** न. (आयु.) धातू व उपधातू यावर करण्यात येणाऱ्या संस्काराचा एक प्रकार.

**अमृतोपम** वि. अमृतासारखे, प्रमाणे. [सं.]

**अमृत्यु-त्यू** पु. अमरत्व.

**अमृत्युपत्रीयता** स्त्री. (कायदा.) कायदेशीर मृत्युपत्र अथवा मृत्युलेख केल्यावाचून मरण पावणे, मृत्यू येणे; अकृतमृत्युपत्रता. [सं.]
वि. अमर. [सं.]

**अमेज-द** स्त्री. मिश्रण; गायनातील राग वगैरेचा मिश्र सूर. वि. मिसळलेले; मिश्रित. [फा. आमेज मिसळणे] पहा : **आमेज**

**अमेध्य** वि. १. हवन करण्यास अयोग्य; अपवित्र; घाणेरडे; कुजके; बिघडलेले (अन्न, वस्त्र इ.) : 'मग केवळ ये देह खोडा । अमेध्योदकाचा बुडबुडा ।'- ज्ञा १६.३१७. २. विष्टा; मल. [सं.]

**अमेय** वि. मोजता न येण्याजोगे; अगणित; फार मोठा; अमोज : 'मज अमेया मान ।'-ज्ञा ९.१५९. [सं.अ+मा=मोजणे]

**अमोघ** वि.१. योग्य प्रकारे लागू होणारे; अचूक, हटकून काम करणारे : 'आपल्या मनांत येणारे विचार तसेच कांहीं तरी अमोघ असायचे.' -चंद्र ११९. २. गुणदायी; फलदायक (शक्ती, पराक्रम, औषध, मंत्र, कौशल्य, शस्त्र, वीर्य) : 'मग तेथिंचे जे अमोघ । अलौकिक भोग ।'- ज्ञा ६.४४२. ३.(चुकीने) निरुपयोगी; निष्फळ; बिनकिफायतीचे; व्यर्थ. [सं.]

**अमोघदर्शन** वि. ज्याचे दर्शन निष्फळ होत नाही असा; ज्याच्या दर्शनाने निश्चित लाभ होतो असा. [सं.]

**अमोघवीर्य** वि. १. ज्याचे वीर्य (रेत) व्यर्थ जात नाही असा; प्रजननशक्ती चांगली असणारा (माणूस). २. (ल.) पराक्रमी; उत्कर्षकारक; सामर्थ्यवान. ३. नेहमी गुणकारक असलेले; रामबाण; हटकून गुण आणणारा (उपाय, मंत्र, औषध.). [सं.]

**अमोचक** वि. बंधनातून सुटका न करणारा; ज्यामुळे मोक्षप्राप्ती होत नाही असा : 'म्हणूनच ते वेदशास्त्र अमोचक आहे.'- मसं ६५. [सं.]

**अमोज** वि. १. मोजमाप करता न येण्यासारखा; ज्याची गणना करता येत नाही असा; अमाप; असंख्य. २. न मोजलेला; न गणलेला. [सं. अ+मा=मोजणे]

**अमोड-डी** वि. न मोडलेला; साग्र : 'तळवटीं अमोडी । कुशांकुर ।।' - ज्ञा ६.१८२. [सं. अ+मृद् =मोडणे]

**अमोढ** वि. अजिंक्य : 'तूं अमोढा देवां माहांकाळु'- मूप्र २५९१.

**अमोण** पहा : **आंबोण**

**अमोणी** स्त्री. (वन.) त्रिदली पर्णाचे झुडूप. (फुले जून-जुलैमध्ये).

**अमोद** आमोद; आनंद.

**अमोनाइट** पु. (भूशा.) शंखासारख्या वर्तुळाकार चपट्या कवचात मृदू शरीर असणारा; प्राचीन काळी अस्तित्वात असलेला व सध्या नामशेष झालेला एक सागरी प्राणी. (याचे अश्मीभूत अवशेष गाळाच्या खडकात सापडतात.)

**अमोनियम** न. (रसा.) अल्कधर्मी एकसंयुजी मूलक.

**अमोनिया** पु. (रसा.) नत्रवायू (नायट्रोजन) व उद्जन वायू (हाईड्रोजन) यांचे अल्कधर्मी मिश्रण. हा हवेपेक्षा हलका असून याची चव व वास

दोन्ही तीव्र असतात. हा पाण्यात चटकन विरघळणारा आहे. कृत्रिम रीत्या तापमान खाली आणण्यासाठी बर्फाच्या कारखान्यात याचा वापर होतो. हा नवसागरासारख्या क्षार पदार्थापासून उत्पन्न होतो.

**अमोप** वि. पुष्कळ; खूप : 'अंगावर... ओरखडे आणि टेंगळे यांची अमोप पेरणी ...'– हाचिं ११२.

**अमोरसमोर** क्रिवि. समोरासमोर; एकमेकांकडे तोंड करून : 'ती दोघं दोन धोंड्यांवर अमोरसमोर बसली.' – जैजै १५४.

**अमोल, अमोलिक, अमोल्य, अमौल्य** वि. १. किंमत करता न येणारा; बिनमोल; किंमत किंवा महत्त्व, अंदाज करता न येण्यासारखा; अमूल्य; अनर्थ. २. उत्कृष्ट; सुंदर; छानदार; सुरेख. ३. (ल.) ज्याची मुळीच किंमत नाही असा; कवडी किंमतीचा; पदार्थ : 'बापु राऊत वेठिला । जीतेयां शिशुपाळाचा अमोला ।' – शिव ५१५. [सं.]

**अमोला** वि. पराक्रमी : 'तु अशुभादेवांचा अमोला : रणकठीयां देवांचा नीपातु केला' – मूप्र २६०६. [क. अम्मला]

**अमोह** पु. (तत्त्व.) भ्रांतिमुक्तता; मायारहितता; विरक्ती. [सं.]

**अम्न** न. नवसागर.

**अम्न** स्त्री. सुरक्षितता. [फा. अमन]

**अम्मल, अम्मलदस्तुर–दार–दारी–बजावणी** पहा : **अमल**

**अम्मळ–सा** अमळसा; थोडा; किंचित.

**अम्मा** स्त्री. आई; (सामान्यत:) स्त्री; बाई (दक्षिणेकडील प्रातांतूनं हा सर्रास आढळतो) : 'अम्माचे उतावीळ चित्त ।'– दावि ४११. [सं. अंबा]

**अम्मा** उभ. पण; तथापि. पहा : **अमा** [फा.]

**अम्याग** वि. १. सौम्य; नरम. २. भ्याड; भेकड; निरुपद्रवी. ३. स्वभावाने अति गरीब, कर्तृत्वशून्य (असा माणूस.) (कों.)

**अम्र** पु. १. हुकूम; आज्ञा. २. कार्य; गोष्ट; विषय. [फा.]

**अम्ल** न. १. आंबटपणा. २. रासायनिक आंबट द्रव.

वि. आम्ल; आंबट. [सं.]

**अम्लत्व** न. आंबटपणा. [सं.]

**अम्लपरीक्षा** स्त्री. तेजाब लावून केलेली पारख.

**अम्लपित्त** न. एक रोग. हा स्वतंत्र नसून अग्निमांद्य किंवा दीर्घकालीन अपचन या रोगांच्या अनेक लक्षणांपैकी एक आहे. याने आंबट ढेकरा, घशात जळजळ व अन्नाची आंबट वांती होते. [सं.]

**अम्लमिति–ती** स्त्री. (रसा.) एखाद्या विद्रवात असलेल्या आम्लाचे मापन. [सं.]

**अम्ल संख्या** (रसा.) तेल, चरबी इत्यादी पदार्थात स्वतंत्र स्थितीत असलेले आम्ल दर्शविणारी संख्या. [सं.]

**अम्लान** वि. १. म्लान नसणारे; न कोमेजणारे; ऱ्हास न पावणारे; खिन्न न होणारे; टवटवीत; प्रफुल्ल. २. स्वच्छ; चकचकीत. [सं.]

**अम्ली** स्त्री. चिंच (झाड व फळ). [हिं. सं. अम्लिका]

**अम्लीकरण –अम्लीभवन** न. अम्ल तयार होण्याची क्रिया. [सं.]

**अय** न. लोखंड. [सं. अयस्]

**अयणी** पहा : **आयणी**

**अयणी, अयणुटे** वि. अळणी; अळणुटे; किंचित अळणी असलेले. (को. व.) पहा : **अळणी** [सं. अलवण]

**अयत्नत:, अयत्नाने, अयत्ने** क्रिवि. कष्ट, श्रम, प्रयत्न न करता; अनायासे; सहज; सहजगत्या; सहजासहजी; आपोआप. (क्रि. सापडणे, मिळणे.) [सं. अ+यत्न+त:]

**अयत्नसिद्ध** वि. प्रयत्न न करता मिळविलेले– साधलेले – केलेले; सायास न करता मिळवलेले. [सं.]

**अयथा** क्रिवि. अयोग्य रीतीने; चुकीने. [सं.]

**अयथातथ्य** वि. १. अयोग्य. २. निष्फळ.

न. १. अयोग्यपणा. २. निरर्थकता.

**अयथार्थ** वि. १. खरे किंवा खऱ्याप्रमाणे, वस्तुस्थितीस धरून नसलेले; खोटे; असत्य. २. बुद्धीस न पटणारे; अवास्तव; निराधार; अयोग्य.

क्रिवि. १. खोटेपणाने; लबाडीने. २. अप्रमाणशीर; निराधारपणे.

**अयथार्थता** स्त्री. मुळाबरहुकूम नसणे; तफावत; तंतोतंत नसणे. [सं.]

**अयथावत** वि. चुकीचे; अयोग्य; गैरशिस्त; संशयित. [सं.]

**अयन** न. १.उत्तर किंवा दक्षिण दिशेने सूर्याचे गमन. उदा. उत्तरायण; दक्षिणायन. २. सहा महिने; तीन ऋतू. ३. रस्ता; मार्ग; ग्रंथ : 'पौष्याप्रति जातां जो पुरुष वृषारूढ देखिला अयनीं ।' – मोआदि २.१२८. ५. जाणे; येणे; गती. ६. प्रवेशद्वार. [सं. इ = जाणे ]

**अयनक** पु. आरसा; दर्पण; काच.

स्त्री. चष्मा; उपनेत्र; चाळिशी; आरशी. [फा. ऐनक]

**अयनकाल** पु. सूर्याच्या उत्तरायण व दक्षिणायन या गतींच्या दोन बिंदूमध्ये लागणारा काळ. पहा : **अयन** [सं.]

**अयनचलन** न. पृथ्वीचे ध्रुव एका बिंदूभोवती फिरत असल्याने ताऱ्यांचे होणारे चलन. [सं.]

**अयनवलन** न. विशिष्ट ताऱ्याच्या क्रांतिवृत्तीय स्थानापासून ध्रुव व कदंब यावर जाणाऱ्या सूत्रांमधील कोन. [सं.]

**अयनवायु–यू** पु. ठरावीक वेळी वाहणारे वारे; सहा–सहा महिन्यांनी यांची दिशा बदलते. [सं. अयन+वायु]

**अयनवृत्त** न. क्रांतिवृत्त; विषुववृत्तापासून २३.५ अंश उत्तरेस व दक्षिणेस असलेली अक्षवृत्ते : उत्तरेकडील कर्कवृत्त व दक्षिणेकडील मकरवृत्त. यामधील प्रत्येक अक्षांशावर एकदा सूर्य अगदी डोक्यावर येतो. [सं.]

**अयनावरण** न. रसायनावरणाचे वर पृथ्वीच्या पृष्ठभागापासून सुमारे ३२० किमी. पर्यंत असणारा हवेचा भाग. [सं.]

**अयनांत** पु. अयनाचा शेवट; अयनबिंदू; दोन अयनांमधील संधिकाल.

**अयनांश** पु. निरयन गणनेचे आरंभस्थान. नि:शर रेवती योगतारा (झिटापीशियम) यापासून सायन मेषसंपातापर्यंतचे क्रांतिवृत्तीय अंशादी अंतर. [सं.]

**अयनी** पहा : **आयणी**

**अयनीकरण** न. एखादा पदार्थ पाण्यात विरघळतो म्हणजे त्या पदार्थाच्या रेणूंची पाण्यात गेल्यावर फोड होत असते. याला अयनीकरण म्हणतात. – निप्र ७१. [सं.]

**अयनेमहाल** सर्वत्र आरसे असलेला दिवाणखाना. [फा.]

**अयन्याची अंबारी** स्त्री. राजे लोकांची आरसे असलेली अंबारी :

'अयऱ्यांची अंबारी गगनीं तारांगण ।' – ऐपो १०९.

**अयब, आयब्** पु. १. दोष; उणीव; अपुरेपणा; खोड; व्यंग; न्यून. २. दुर्गुण; दुराचार. ३. (ल.) धक्का. [फा. अयब]

**अयबदार** वि. न्यून, दोष असलेला; अपुरेपणाचा. [फा.]

**अयुबूगयबू, अयबोगयबो** पु. कोणीतरी व्यक्ती; कोणीही आला गेला; कोणतेही सर्वसामान्य लोक; नगण्य मनुष्य.

**अयमुर्चे** क्रि. फुलाची कळी अर्धवट उमलणे.(गो.) [सं. अधी+ मुच्]

**अयय्यो** उद्‌गा. आई! आई! बापरे !; आश्चर्य किंवा दया, भीती वाटली असता निघणारा उद्‌गार. [का. अय्याचे द्वि.]

**अयराण–न** न. १. अरण्य; जंगल; रान. २. आडरान. ३. वाळवंट.

**अयस** न. १. लोखंड : 'त्वद्‌गुरुचे काष्ठायस दंत हिरण्मय तुझे असोत असे ।' – मोआदि २.४८. २. पोलाद. [सं.]

**अयस्कपण** न. एक शस्त्र. यातून लोखंडाचे तुकडे बाहेर पडतात.

**अयस्कार** पु. लोहार. [सं.]

**अयस्कांड** पु. लोखंडी बाण. [सं.]

**अयस्कांत** पु. लोहचुंबक; लोहकांत. [सं.]

**अयं विशेष** प्रथम मान्य झालेली गोष्ट, युक्तिवादपूर्वक पुन्हा सांगितली असता पहिल्यापेक्षा जास्त मान्य होते तेव्हा हे वाक्य म्हणतात.[सं.]

**अया–य्या** पु. १. लिंगायत लोकांत सन्मानदर्शक संज्ञा. २. त्यांचा गुरू – जंगम : 'आकर्णुनि ऐस्या शुद्ध ज्ञानगोष्टी । वृत्ती अय्याची जाली उफराटी ।' – दावि ३५७. ३. (सामान्यतः) बहुमानार्थी पदवी (स्वामी, साहेब याप्रमाणे). ४. गुरव; पुजारी. कर्नाटकात हा एक बलुतेदार आहे. ५. स्वयंपाकी; आचारीः 'हुजूर मुदबकखान्यातील कामाठी, भालेकरी,अय्या लोकांशी संबंध येत असे.' – विक्षिप्त १.९. [सं. आर्य]

**अया–य्या** स्त्री. युरोपियन लोकांजवळ असणारी हिंदू दाई; (सामान्यतः) दासी. [सं. आर्या]

**अयाचित** वि.१. याचना न केलेले; न मागता मिळालेले. २. न मागता इतरांकडून सहज मिळणाऱ्या भिक्षेवर निर्वाह करणारा : 'धनाचा सद्वयो खरा । द्यावें अनाथ प्रेतसंस्कारा । अर्पावें दीनांच्या उद्धारा । धाडावें घरा अयाचिताच्या ।।' – एभा २३.३९६.

क्रिवि. न मागता; आपोआप; सहजासहजी (मिळालेले); (बायकी) अनाहूत; अवचित. [सं. अ + याच्]

**अयाचित खून** एकाएकी केलेली, घडलेली हत्या, मनुष्यवध.

**अयाचितबाबा** अवचितपणे येणारा साधू.

**अयाचितवृत्ति–त्ती** स्त्री. १. याचना न करता जे मिळेल तेवढ्यावर निर्वाह करण्याची वृत्ती. २. (ल.) संतोषवृत्ती. [सं.]

**अयाचितव्रत** न. याचना केल्यावाचून ज्या दिवशी जे अन्न मिळेल तेच सेवन करून राहण्याचा केलेला निश्चय. [सं.]

**अयाचिती** स्त्री. १. न मागता मिळेल त्यावर राहण्याची ज्याची वृत्ती आहे असा. २. अयाचिताकडे पाठविलेले द्रव्य, भिक्षा वगैरे. [सं.]

**अयान–अयाँ** वि. व्यक्त; श्रुत; स्पष्ट : 'मुकादमे इजविहार केले; अयाँ आले.' – पया ४९०. [फा.अयाँ]

**अयाल–ळ** स्त्री. विधवेच्या नावापुढे नवऱ्याच्या नावापूर्वी (कागदोपत्री) लिहिण्यात येणारा ( भ्रतार या अर्थी) शब्द. [फा.]

**अयाव** अविधवा; सवाष्ण.(शब्द रूपे– आयाव, आयव, अहेव) (गो.)[सं. अविधवा]

**अयावया** क्रिवि. गयावया; दीनवाणे, रडवे तोंड करून. (क्रि. करणे.) (ध्व. गयावया)

**अयांनम** पहा : **अविधवानवमी** (गो.)

**अयीन** पु. कायदा; नियम.

**अयुक्त** वि. १. न जोडलेले, जुळलेले. २. अयोग्य; अनुचित; निरुपयोगी.

**अयुक्तपण** न. विलगता; चंचलता : 'म्हणोनि अयुक्तपण मनाचें ।'– ज्ञा २.३४७.

**अयुत** दहा हजार ही संख्या : ' जो देवालयाची वृत्ति हरी । जो ब्राह्मण वृत्तीचा लोप करी । तो अयुतायुत वर्षसहस्त्री । योनीं सूकरी विष्ठा भोगी ।।' – एभा २७.३९२. [सं.]

**अयुद्ध्यमान** वि. युद्धात न गुंतलेले; युद्ध न चालविणारे (राष्ट्र, देश इ.).

**अये** उद्‌गा. हे! अगे! (संबोधन) : 'अये ये भूलोकीं कवण तरुणीचें तप फळे ।' – सारुह ७.८२. [सं. अयि]

**अयोग** न. (आयु.) सुई लागू न होणे; पिचकारीचा उपयोग न होणे.

**अयोगसंभव, असंयोगिक** वि. (शाप.) स्त्रीबीज – पुंबीज यांच्या संयोगाशिवाय झालेली. [सं.]

**अयोगोल** पु. लोखंडाचा गोळा : 'आकाशातून खाली येणाऱ्या अयोगोलाचें संविधानकानें अनुकरण केलेलें बरें.' –मरारंग २३०. [सं.]

**अयोग्य** वि. १. न शोभणारे; योग्य, युक्त नसलेले; अनुचित. २. निरुपयोगी; नालायक; अपात्र. [सं.]

**अयोनवमी** अविधवानवमी. (को.)

**अयोनिज** विष्णू. [सं.]

**अयोनिसंभव** वि. १. शुक्रशोणित संयोगाने उत्पन्न न झालेला; जारज, अंडज, स्वेदज नव्हे असा : 'जो अयोनिसंभव श्रीहरी । जगन्निवास लीलावतारी ।' – हरि ५.१५. २. योनिमार्गाने ज्याचा जन्म झाला नाही असा. ३. मानसपुत्र. [सं.]

**अयोमुख** पु. लोखंडी टोक असलेला बाण. [सं.]

**अयोहृदय** वि. लोखंडासारखे कठोर, निष्ठुर हृदय असलेला.

**अयौतक** न. स्त्रीधनाचा एक प्रकार; विवाहप्रसंगाशिवाय इतर वेळी मिळालेले स्त्रीधन. [सं.]

**अय्यनवस** पु. जंगम.

**अय्या** उद्‌गा. महिलांच्या तोंडी असलेला लज्जादर्शक उद्‌गार.

**अय्याम** पु. काल; दिवस. [फा. योम = दिवसचे अव]

**अर** पहा : **अरे**

**अर** स्त्री. अलीकडील बाजू : 'अर बांधे तर बांधे '– वैद्यक ८५.

पु. अजगर.

**अरई–य** स्त्री. (विप्र. आरई.) मांडीवरील खांडुक किंवा गळू; गुदस्थानातील गळू (भगंदर).

**अरकट** वि. माथेफिरू; भांडखोर; वस्ताद; बनेल; लुच्चा : 'आमच्या

साऱ्या तालुक्यात हे गाव अरकट म्हणून प्रसिद्ध होते.' - बनगर ९७.

**अरकशी** पु. करवत्या; करवतीने कापणारा माणूस; पहा : **अरकस** वि. करवत्याने केलेले (काम).

**अरकशी-बरकशी** स्त्री. कलागत; कचकच; कटकट; धुसफूस; तोंडातोंडी; हमरीतुमरी. (क्रि. लागणे, चालणे.)

**अरकस-सी** पु. १. करवत चालविणारा. २. करवत.[फा. अराकश]

**अरकसकाम** न. चिरकाम; करवतीने कापण्याचे काम.

**अरकसणे** सक्रि. करवत चालविणे; करवतीने कापणे; करवतणे.

**अरकसदार** पु. करवत चालवणारा; करवत्या.

**अरकस बरकस** १. भिकार, बेचव, सत्त्वहीन अन्न; रुक्ष अन्न; कदन्न. २. नीरस बोलणे; मुळमुळीत भाषण करणे; काहीतरी पाणचट बोलणे. ३. भांडाभांड; तोंडातोंडी; कचकच.

**अरकसले बरकसले** (अरकसूले बरकसूले) न. पचनास कठीण किंवा जड, रुक्ष, जाडेभरडे अन्न. पहा : **अरकसबरकस**

**अरकाट** वि. लुच्चा; भांडखोर; धूर्त. पहा : **अर्कट**

**अरकान** पु. अव. १. खांब. २. (ल.) संचालक; आधारस्तंभ; प्रधान. [फा. रकन = खांबचे अव.]

**अरकान - इ - दौलत** स्त्री. राज्याचे मंत्री; राज्याचे आधारस्तंभ (एक पदवी). [फा.]

**अरक्तता** स्त्री. (वै.) हिमोग्लोबीन किंवा लाल रक्तपेशींची कमतरता असल्यामुळे येणारा पांढरेपणा, अशक्तपणा. [सं.]

**अरखणा-अराखणा** स्त्री. निग्रह; दमन; निरोधन; दाब; प्रतिरोध. [सं. आरक्षण]

**अरखुडा-खुंडा** पु. १. चोळवटून, घासून पडलेली खूण (दोरीने वगैरे); करकोचा. २. खाच; खोबण (दोरी बांधण्यासाठी, काठीला खुंटीला पाडलेली).

**अरगजा** पु. अनेक सुवासिक द्रव्यांचे मिश्रण करून बनवलेली सुवासिक पूड; एक सुगंधी, सुवासिक उटीचा पदार्थ. [फा.अर्गजा]

**अरगजा** पु. गोंधळ; घोटाळा; अनिर्बंधता : 'तमाम अवघा अरगजा जाला आहे. पाहावे. कार्याचा परिणाम कोणासही न कळे.' - पेद २५.८७. [फा.]

**अरगड-डी** स्त्री. खरिपाच्या पिकांपैकी हलकी, तीन महिन्यांत येणारी ज्वारी. ही मृगारंभी पेरतात.

**अरगला** स्त्री. कैद; अडथळा, बंधन घालणे (क्रि. करणे) : 'शहानवाजखान यास अर्गला केली.'-पेद २५.१७७.(वा.) **अरगल्यात बसविणे** - बंदोबस्तात ठेवणे; कैदेत ठेवणे : 'त्यांजपासी कांहीं घेऊं नये. अगरल्यांत बसवावा असें असतां त्यास जाऊं देता या अर्थी हे कष्टी आहेत.' - ऐलेपा ४९.

**अरगळणे** सक्रि. गोंधळणे; अडखळणे; घोटाळणे; कुंठित होणे; भांबावणे. [सं. अर्गला]

**अरगाल** न. चाकोरी; नेमी. [कर्ना.]

**अरगिन-ल** पु. टांगण्याचा (लोंबता) रॉकेलचा दिवा.

**अरगीपारगी पारगीवारगी** स्त्री. १. आळीपाळी; हातोहात; अलटापालट. २. हातोहात देवघेवीची क्रिया. उदा. कौले, विटा वगैरेच्या भरलेल्या टोपल्या एकाने दुसऱ्याच्या, दुसऱ्याने तिसऱ्याच्या हाती अशा रीतीने घेऊन जाणे व रिकाम्या टोपल्या परत आणणे. (तृतीया किंवा सप्तमी विभक्तीत उपयोग.)

**अरजणे** सक्रि. परवडणे; बनणे; चालणे; जमणे; जुळणे. (व.) [सं.अर्ज् = मिळवणे]

**अरजल-जली-जेल** वि. एका (किंवा तीन) पायाने पांढरा असलेला (घोडा); चित्रभंगी; हा अशुभकारक मानतात. [अर.]

**अरड** स्त्री. तेल काढण्यासाठी करडई, एरंडी वगैरेचा भाजून कुटून तयार केलेला कुट्टा; करडई वगैरेपासून तेल काढून घेण्याची क्रिया. (क्रि. घेणे.) (वा.) **अरड काढणे, घेणे** - एखाद्याची खरवड काढणे; हजेरी घेणे; (जिवाला) मरमरेतोपर्यंत त्रास देणे किंवा बेजार करणे; दमवणे; शिणवणे; झिजवणे; झीज सोसावयास लावणे; घायकुतीला आणणे; भंडावणे; हाडे घुसळणे. **अरड निघणे** - जोर गमावणे; सत्त्वहीन होणे; दमणे; त्रासणे; गळणे; थकणे.

**अरडीदरडी** स्त्री. अवघड जागा; कडा; उतरणचढण; नदीचा काठ; झाडेझुडूपे : 'महा अवघड अरडी-दरडी । उतरतां कडे कडाडी ।' - कथा ६.५.९८. [दरडीचे द्वि.] (वा.) **(जीव) अरडीदरडी घालणे, पाडणे** - संकटात घालणे; साहस करणे; त्रास सोसणे; अतिशय कष्ट करणे. **अरडीदरडी पडणे** - संकटात सापडणे; पेचात येणे.

**अरडीपरडी** स्त्री. परडी : 'अरडी ग बाई परडी । परडी एवढं काय ग । परडी एवढं फूल ग ।'- भोंडल्याची गाणी. [परडीचे द्वि.]

**अरडेल** न. अरड घेऊन काढलेले तेल. पहा : **अरड**

**अरण** न. रान : 'म्हैसा एकु अरणी होता.' - लीचपू ५८.

**अरण** न. वैदिक ग्रंथाचा एक भाग. [सं. आरण्यकचा अप.]

**अरणी** स्त्री. ऐरण; लोखंड वगैरे धातू ठोकण्याचा ठोकळा : 'जैसी लोहाची अरणी । तैशी मेरूची घडणी ।'- कथा ६.२.२६. [सं.अरणि]

**अरणी** स्त्री. १. शेताची बांधवरूळी; सीव; ओटा. २. रणांगण; रणमैदान; युद्धभूमी; रणक्षेत्र : 'पारकियांचिए अरणी । घालितुं आला लोहाची गवसणी ।' - शिव ९७९. ३. (ल.) पुढारी; सेनाव्यूह : 'देषा (खा) मोडलिया अरणी ।'- उषा १६०६. ४. सेना : 'दोन्ही अरणी उनता जालीया'- लीचउ ४६०.

**अरणी** स्त्री. एक प्रकारच्या फुलाची वेल. ही बहुधा काटेरी कुंपणात वाढते. फुलांचा वास दुरून चांगला येतो व जवळून वाईट येतो. (व.)[सं.]

**अरणी, अरणीपात्र** न. अग्न्याधानाच्या वेळी अग्निहोत्री ज्या लाकडातून मंथन करून अग्नी पाडतात ते (पिंपळाचे) लाकूड : 'जैशा दो काष्ठांच्या अरणी । मधूनि काढिजे जेवीं अग्नि ।' - एरुस्व ५.५. [सं. अरणि]

**अरणे** सक्रि. आवळणे; आखडणे. (गो.)

**अरण्य** न. १. ओसाड, निर्जन प्रदेश; मोठे जंगल; वन; झाडी. २. जमिनीची स्थिती, पाण्याची दुर्भिक्षता आणि अशाच काही दुसऱ्या कारणांनी लागवडीस व वसाहतीस निरुपयोगी झालेली जमीन. वैराण प्रदेश. ३. गोसावी लोकांतील एक पंथ. [सं.]

**अरण्यपंडित** पु. अडाणी लोकांतील शहाणा; ज्याच्या विद्वत्तेचा व्यवहाराला उपयोग नाही असा. (ल.) मूर्ख. (फक्त अरण्यात विद्वान, तेथे त्याची विद्वत्ता अजमावण्यास कोणी येत नाही.) : 'असे अरण्यपंडित इंग्लंडात गेल्यावर 'एरंडोपि द्रुमायते' या न्यायाने तेथे मान पावतात.' – निमा. [सं.]

**अरण्यराज** पु. सिंह. [सं.]

**अरण्यरुदन–रुद्रित–रोदन** न. (निर्जन अरण्यातील निष्फळ रडणे) ज्या तक्रारीचा किंवा विनवणीचा उपयोग होत नाही अशा वेळी योजावयाचा शब्द; व्यर्थ श्रम; निरुपयोगी खटपट : 'आपल्या देशबंधूंची जी काकूळत केली ती केवळ अरण्यरुदिताप्रमाणें निष्फळ झाली.' – निमा. [सं.]

**अरण्यवास अरण्यसेवन** पु. तपश्चर्येकरिता, शिक्षा म्हणून वा स्वेच्छेने गाव सोडून अरण्यात राहणे. [सं.]

**अरण्यसोर** पु. रानडुक्कर : 'रुक्ष रोही गवे मांसळ । अरण्यासोर माजले ।' – मुआदि १५.५९. [सं. अरण्यसूकर]

**अरण्यायन** न. संन्यास घेणे.

**अरतणेपरतणे** उक्रि. उलथेपालथे करणे. (भाकरी, पोळी.)[परतणेचे द्वि.]

**अरतवण परतवण** न. नवीन लग्न झालेल्या मुलीचे सासर–माहेर करणे. [परतवणेचे द्वि.]

**अरता–ती–ते, अरुता** क्रिवि. अलीकडे; इकडे; येथे; ह्या बाजूला; भागाला.

**अरतापरता** क्रिवि. १. अलीकडे पलीकडे; इकडेतिकडे; दोन्ही बाजूला, सर्व बाजूंनी; सभोवार. २. तेथेच; आगेमागे; जवळ; आसपास; कमीअधिक; लवकर किंवा उशीरा.

वि. १. इकडचा तिकडचा; या बाजूचा त्या बाजूचा; दोन्ही कडील; एकाच विविक्षित सदराखाली न येणारे. २. क्षुद्र; किरकोळ; अवांतर.

**अरती** स्त्री. १. कंटाळा; तिटकारा; वीट; विरक्ती. २. असमाधान; अतृप्ती.

वि. कंटाळा करणारा; विरक्त; अतृप्त; असमाधानी. [सं.]

**अरतीर** न. अलीकडची थडी, काठ वगैरे : 'प्रपंच नगरासभोंवर्ती । कर्मनदीची महाख्याति । तिचेंनि जेथें जीव वर्तती । उत्पत्तिस्थिती अरतिरीं ।' – एभा ११.१०५२.

**अरत्नी** स्त्री. कोपरापासून करंगळीच्या टोकापर्यंतचे हाताचे माप; हात. (अंदाजे २४ अंगुळे, २४ बोटे).

**अत्र** क्रिवि. वि. १. येथे. २. इहलोकातले, मृत्यूलोकातले (जीवित) : 'तेथें अत्र ना परत्र । कांहीच नाहीं ।' – दास ५.३.४.

**अत्र ना परत्र** अ. इकडे नाही व तिकडे नाही अशा प्रकारे; इथे ना तिथे; अधांतरी.

**अरद** वि. पहा : **अर्ध.** ज्या सामासिक शब्दात अर्ध हे पद आहे त्या ठिकाणी अरद हेही पद पुष्कळदा वापरतात. उदा. अरद कच्चा – जेवा – पडा – पिका – वाट. (गो.) [सं. अर्ध]

**अरदळ** स्त्री. तैनातीची अर्धी रक्कम; अर्धेली. [सं. अर्ध]

**अरद्र** वि. ओले : 'कितेक दिवस अरद्र शुष्कपणें' – सप्र ८.२०. [सं. आर्द्र]

**अरब** पु. अरबस्तानातील रहिवासी – माणूस – घोडा.

**अरबचरब, अरबट, अरबटचरबट** वि. १. बेचव; नीरस; निःसत्त्व; रुक्ष (अन्न). २. धश्चोट; निलाजरा; उनाड; तोंडास तोंड देणारा; उद्धट; राकट; असभ्य; जंगली; खेडवळ (माणूस, भाषण, चालरीत, सवय, देश, मुलूख, रान, जागा इ.).

क्रिवि. निरर्थकपणे; बाष्कळपणे; काहीचेबाही (बोलणे).

न. बडबड; बकबक; वटवट; बाष्कळ, निष्कारण गप्पा.

**अरबट** वि. भयंकर : 'अरबटें सिंगें रणीं वाजती' – गोप्र १०२. [क. आर्भाट]

**अरबट दांड** वि. जंगली; खेडवळ; आडमुठ्या. [सं. आरभट]

**अरबा, अर्बा** वि. चार ही संख्या; (सूर सन.) [अर. अरबाह]

**अरबा** पु. १. अरबांची लढाई, हल्ला; युद्ध. (क्रि.(वर) झाडणे). २. शिव्यांचा किंवा धमक्यांचा वर्षाव. ३. कोणतीही तडफदार, जोराची क्रिया; सपाटा; तडाखा; धडाका. जसे – रागाचा, जेवणाचा, लिहिण्याचा अरबा. ४. गावाची किंवा किल्ल्याची वेस.(सोलापूर ) [फा.] (वा.) **अरबा उडणे** – रागाने त्वेषाने उठणे; उठाव करणे; शिव्यांचा वर्षाव करणे. **पिऊन जाणे, पिणे, सोसणे** – १. त्वेष, राग, आवेश सहन करणे, सोसणे. २. तोफांचा मारा सहन करून आत घुसणे.

**अरबाड** न. ऊर; फासळ्या; बरगड्या किंवा त्यांची बाजू. (व.)

**अरबाडी** पु. विंचू व सर्प दंशावरील मंत्र जाणणारा मांत्रिक. (व.)

**अरबाणा** पु. हुकमत; वर्चस्व; ताबा; आटोका. [फा.] (वा.) **अरबाण्यात असणे, चालणे, राहणे, वागणे**– आज्ञेत किंवा कह्यात असणे. **अरबाण्यात नसणे, अरबाण्यातून जाणे** – आज्ञेत नसणे; आटोक्याबाहेर जाणे.

**अरबाळणे** अक्रि. घाबरणे; कासावीस होणे : 'हरनकाळजाची माजी पोर हाय ! आयकील आन जाईल अरबाळून.' – पेरणी ५५.

**अरबी** वि. अरबस्तानासंबंधी. (ल.) भाषा, घोडा, वेष, लिपी, फळफळावळ वगैरे : 'मंद हळुहळु चालतो । चपळ कैसा आटोपतो । अरबी फिरवणार तो । कैसा असावा ।' – दास १९.७.१८. (वा.) **अरबी तगादा** – अरबी शिपायांनी लावलेला तगादा. हा अतिशय जुलमी व त्रासाचा असतो. यावरून (ल.) अतिशय निकडीची, सक्तीची, जोराची मागणी. **अरबी पहारा** – अरब लोकांची चौकी. हा फार कडक व जालीम असतो त्यावरून कडक व सक्त पहारा. (क्रि. करणे, लावणे, मांडणे, बसवणे, लागणे, बसणे.).

**अरबी सन, साल** न. अरबी वर्ष; मृगसाल; शुहूरसन (सूर).

**अरबूज–द** वि. (विप्र. अर्बुज) राकट; आडदांड; खेडवळ; मठ्ठ; रानटी; जंगली; अडाणी; रद्दड; क्रूर; ओबडधोबड : 'अतिसात्विकता दृष्टीं पडे । तरी मानी वेडे अर्बुज ।' – एभा २३.२६४. [सं. अ+बुध] (वा.) **अरबूज जात** – रानवट, आडदांड जात; अशा जातीचे लोक – भिल्ल, पठाण वगैरे : 'इराणी दुराणी, जात अर्बुज. त्यांनी कित्येक तरुण स्त्रियांच्या अब्रू घेतल्या.' –भाव ८०.

**अरबैन** वि. ४० ही संख्या. [अर.]

**अरमिन्** पु. मुंगसाच्या जातीचा, अंगावर लोकर असलेला एक प्राणी. [इं. इर्मिन]

**अरर** स्त्री. दार; दाराची फळी; कवाड : 'जाय बळें उघडाया कर देउनि उघडिल्याहि अररा ज्या.' – मोसभा २.४. [सं.]

**अरर** उद्गा. अरेरे!; दुःख, आश्चर्य व्यक्त करणारा उद्गार.

**अरल–ळ** न. १. शेज; आच्छादन : 'आता कवणाचिये सेजे : फुलांचे अरल घालिजे' – वह १९३. २. फूल. [क.अरल्]

**अरली** स्त्री. सुताराचे लाकूड कापण्याचे हत्यार. (ग्रा.) [सं. आर]

**अरव** वि. अर्व; दहाकोटी ही संख्या. [सं. अर्बुद]

**अरव** पु. १. अंकुर : 'चला कल्पतरूचे अरव ।' – ज्ञा १८.१७९८. २. टेटु नावाचे झाड, शुकनास; ऋक्ष.

**अरव** वि. निःशब्द; शांत. [सं. अ+रव]

**अरवली–वाळी** स्त्री. खोड्या; दांडगेपणा; (लहान मुलांच्या) चेष्टा; उनाडक्या; मस्ती : 'येथे असल्यास अरवली फार करतात. यास्तव त्यांची काय सोय करावयाची असेल ते करून देऊन त्यास कोपरगावीं लवकर रवाना करावे.' – पेद ४.४.

वि. खोडकर पहा : **अरवळ**

**अरवस** पहा : **अरव**

**अरवळ** वि. खोडकर; पोरकट; वेडसर. (गो.)

**अरवा** (अऱ्वा) वि. नाजूक; अरवार. पहा : **अरूवार** : 'माशुक मऊ मुखचंद्र सुकुमार पुष्पाहुनचि अरवा ।' – प्रला २३०.

**अरवाडी–ळी** क्रिवि. अवेळी; अकाली. (व.) [सं.]

**अरवार–ळ** वि. खोडकर; खोडसाळ; उनाड; दांड; अवखळ (मूल).(गो.)

**अरवार–ल–ळ** वि. १. हलके; सहज तुकडे पडणारी (भाकरी, पोळी इ.); खुसखुशीत (पक्वान्न). २. मऊ; नरम (आंबे, केळी इ.). २. (काव्य.) नाजूक; सुकुमार.

स्त्री. मृदुशय्या; शेज. पहा : **अरुवार**

**अरविंद** न. कमळ. [सं.]

**अरवी** स्त्री. तामिळ : 'अरवी लिपीहि अभ्यासिले.' – मऐशि ११२.१४. (तंजा.) [ते. अरवम् = तामिळ]

**अरशिसी** पहा : **अर्धशिशी**

**अरस** वि. रसहीन; नीरस. (ल.) बेचव; शुष्क : 'कशासाठी गावीं अरस कवनें मी स्ववदनें ।'–केका ६. [सं.]

**अरसपरस** क्रिवि. १. भोवताली; जवळपास; आसपास; आजूबाजूस. २. अवरस चवरस. (कों.)

**अरसपरस** क्रिवि. परस्पर : 'अरसपरस सलाम्या होऊनी । परत आले.' – गापो ६७; 'शेवटी उभयपक्षी अरसपरस हळदी कुंकू देण्यात येते ।' – ऐरापुविवि १४६. [सं. परस्पर]

**अरसमात्र** वि. (वन.) दोन किंवा अधिक विभागात समान विभाजन होऊ शकते अशी (फुलांमधील अवयवांची रचना).

**अरसा** पु. अवधी; अंतर : 'जाण्यास दिवसगत न लागावी अरसा न्याहायेत (निहायत) कमी राहिला.' – मशिंका १६७. [फा.]

**अरसिक** वि. १. साहित्य, कला आदींची आवड, रुची नसलेला; सौंदर्य व मोहकपणा न जाणणारा किंवा त्यासंबंधी चव गोडी नसलेला; मर्म न जाणणारा : 'सेवंतीयें अरसिकांही । आंग पाहतां विशेषु तरीं नाहीं । परी सौरभ्य नेलें तिहीं । भ्रमरीं जाणिजे ।।' – ज्ञा १५.५९४. २. बेचव; नीरस. [सं.]

**अरसुकुंची** स्त्री. अठरा इंच लांबीचा टिकाव; बेरडांचे घरफोडीचे हत्यार.

**अरसेनिक** न. (रसा.) सोमल; ताल; रसायनातील एक मूलद्रव्य; होमिओपॅथीत हे औषध आहे.

**अरसेमहाल**पु. चहुबाजूंना आरसे आणि चित्रे टांगलेला दिवाणखाना.

**अरस्य** वि. नीरस : 'चार्खो ते ते अरस्य.'– गीता १.२३१८.[सं. अरस]

**अरळ** न. १. फूल : 'शेजेवरी अरळ सुकले' – हरि ३०.२७. २. मऊ झालेले. (गो.)

क्रिवि. (अल्लाद या अर्थी ) : 'उंच होवोनि ऊर्ध्व हस्तें । अरळ कळिका तोडिल्या ।' – हरि १७.१०९.

वि. (ल.) नाजूक; मृदू : 'शय्या घालुनि एकांती । अरळ सुमनांची निगुति ।' – एरुस्व ३.२६. पहा : **अरवार**

**अरळ, अरळतरळ** वि. १. सैल, ढिले. (बोचके, गाठोडे). २. अव्यवस्थित बसवलेले; नीट, सरळ नसलेले; वेडेवाकडे; अयोग्य रीतीने बसवलेले (घोडा, खांब, तुळई). ३. अनिश्चित; घोटाळ्याचे; घालमेलीचे; मोघम; पिळपिळीत (बोलणे, भाषण). ४. अव्यवस्थित; ढिलाईची; मंदीची (वागणूक, उद्योगधंदा). ५. तात्पुरती, अर्धवट व्यवस्था : 'प्रतिवर्षी आल्याप्रमाणें मात्र मनसबा वरचेवर करून परत जावयाचे न करावे. अरतळतरळ करून रा. पंतप्रधान स्वदेशास गेले म्हणजे मागें आम्हांस कठिण पडते.' – ऐलेसं १४६८. [तरळचे द्वि.]

(वा.) **अरळतरळ होणे** – गळती लागणे :'खर्चास न मिळाल्यामुळे फौज अरळतरळ होऊं लागली.' – विंचूब ६.

क्रिवि. ढिलाईने; सैलपणाने; सरळ नव्हे (बांधणे); अयोग्य रीतीने (बसवणे, लावणे, रोवणे); सैल; विस्कळीत (रचणे, ठेवणे); मोघम; पिळपिळीतपणे (बोलणे, करणे).

**अरळी** स्त्री. घोड्याच्या अंगावरील उलटी (केसांची) गोम; एक अशुभ लक्षण.

**अरक्षित** वि. रक्षण न केलेले; असंरक्षित; न जपलेले; न राखलेले, पाळलेले. [सं.]

**अरंग** वि. निर्गुणत्वाने : 'म्हणे तेथें चौक्या ज्या रंगल्या । अरंग मिरवल्या संतसंगे ।' – नाम २०३३.

**अरंदळणे** सक्रि. १. ओरडणे; गर्जना करणे; गोंगाट करणे. २. हातपाय आपटणे; चरफडणे; आदळआपट करणे. [सं. आक्रंदन]

**अरंधे** न. १. स्वतःचे मूल नसणे; अनपत्यता. २. अपत्य नसल्याचे दुःख.

**अरंबळ** न. क्षीणता; कासावीस होणे; घाबरणे; कुंथणे : 'तेवि मुडपोनि सुजला पाये । तरी अरंबळ न करिती ।' – दावि १३३.

**अरंबळणे** सक्रि. पोळणे; भाजणे.

**अरंबळणे** सक्रि. (विप्र. आरंबळणे). १. झोपेत बरळणे; बडबडणे; कण्हणे. २. झोपेने घेरलेला असणे; पेंगणे. ३. ओरडणे; भ्रमात विव्हळणे; आक्रोश करणे; हंबरडा फोडणे; व्यर्थ बडबड करणे.

**अराकस** पहा : **अरकस**

**अराख** वि. निंदाप्रचुर; विरोधी : 'अराख बोलती नित्य । मजकारणे ।।' – क्रिपु २.२८.५१.

**अराखणा–डा** स्त्री. दमन; निग्रह; संयमन; आकलन; दाब; प्रतिरोध; दाबात ठेवणे; रोंधणे.(कों.) [सं. आरक्षण]

**अरागती** स्त्री. (ज्यो.) तारा किंवा तत्सम गतिमान आकाशस्थ पदार्थ आणि द्रष्टा यांना जोडणाऱ्या रेषेची गती.

**अराजक** न. शासन व कायदा नसलेली अवस्था; बेबंदशाही; अंदाधुंदी; निर्नायकी.

वि. १. राज्यसत्ता नष्ट करू पाहणारा; बंडखोर; क्रांतिकारक. २. राजसत्ता विरहित; शास्ता नसलेला (देश). [सं.]

**अराजकता** स्त्री. १. (राज्याच्या) सिंहासनावर किंवा गादीवर कोणी नसणे. २. (ल.) निर्नायकी; अंदाधुंदी; बेबंदशाही; अराजक काल; सरकार या संस्थेचा अभाव. [सं.]

**अराजकत्व** न. बंडाकडे प्रवृत्ती; बेबंदशाही; अराजकता : 'एखादी सुधारणा करणें म्हणजे अराजकत्वाकडे पाऊल टाकणें कीं काय असे लोकांस वाटू लागले होते' – इंराम् ३१३.

**अराजपत्रित** वि. शासकीय राजपत्रात ज्यांच्या नेमणुकीचा वा अन्य तपशील येत नाही असे सरकारी नोकर; अराजपत्रित कर्मचाऱ्यांना राजपत्रित कर्मचाऱ्यांपेक्षा अधिकार, वेतन वा अन्य सोयी, सवलती कमी असतात. [सं.]

**अराज्यवाद** पु. (राज्य.) शासनसंस्था आणि कायदे यांची आवश्यकता न मानणारी राजकीय तत्त्वप्रणाली, विचारसरणी.

**अराटी** स्त्री. काटी; एक झुडूप; ही झाडे काटेरी वेलीप्रमाणे पसरणारी आहेत. पाने खैराच्या पानासारखी असतात. (सामान्यतः) काटेरी झुडूप : 'अराटीलागी मृदुता । कोठोनि असेल कृपावंता ।' – व्यं १५.

**अराठणे, आरठणे** अक्रि. काबूत येणे.

**अराणूक** स्त्री. १. विश्रांती; स्वस्थता; स्वास्थ्य; फुरसद; रिकामपण. २. शांतता; सौख्य; शांती; तृप्ती; समाधान : 'तुका म्हणें नाहीं । अराणूक तुज काहीं ।' – तुगा १८२.

**अराबा** स्त्री. १. तोफ; तोफेची गाडी. २. बातेरी; तोफांचा मारा; सरबत्ती; अरब लोकांचा सपाट्याचा गोळीबार. पहा : **अरबा**. ३. गराडा; व्यूह : 'देउनि अरावा भंवती ।' - संगी ५८. ४. लवाजमा; इतमाम; ताब्यातील मालमत्ता; प्रापंचिक पसारा; निरनिराळे व्याप (कुटुंबे, गुरेढोरे, जमिनी वगैरे). (क्रि. पडणे, हालणे, मांडणे, पसरणे, उचलणे, आटपणे). ५. मोठा बडेजाव; डौल; दिमाख; भपकेदार प्रदर्शन; अवडंबर. (क्रि. घालणे, घालून बसणे.) ६. घोटाळा; गोंधळ. (व.) [फा.] (वा.) **अराबा पिणे** – शत्रूचा गोळीबार सहन करणे : 'इंग्रजांचा अराबा पिऊन मराठी फौजा आंत घुसल्या, हत्यार चालले, इंग्रजी लोक बहुतेक कापून काहाडले.' – मइसा १९.६३.

**अराय** पु. मुक्काम; थांबणे; राहणे : 'सर्वे सोयरे प्रपंच ममता । करितां ना अराय क्षणभरीं ।' – स्वादि ३.१.२०.

**अराल** वि. वाकडे : 'आम्हांसी सांगाती । होती अराले ते होती ।' – तुगा १८०७. [सं.]

**अराल (हस्त)** पु. (नृत्य.) आंगठा आकुंचित करून तर्जनी धनुष्याच्या आकाराप्रमाणे मध्येच वाकवून ठेवणे व बाकीची बोटे सरळ पसरून ठेवणे. [सं.]

**अराष–स–सी, आराष–सी** शोभिवंत रचना; आरास; सुंदर रीतीने केलेली मांडणी; सजावट; आरसे, छत्ते, चित्रे, दिवे इत्यादिकांनी शृंगारलेले घर; थाटमाट; भपका; आराईश : 'करून तेव्हा घरिंच्या अरासी ।' – सारुह ८.३१. [फा. आरईश]

**अराष्ट्रीय** वि. राष्ट्रासंबंधी नसलेले; राष्ट्रहिताचे नव्हे असे; विदेशी; परकीय.

**अराळफराळ** न. अप्रस्तुत भाषण. पहा : **अरळतरळ** (कु.)

**अराक्ष** न. (प्राणि.) हाताचे किंवा चतुष्पाद प्राण्यांच्या पुढील पायाचे एक हाड.

**अराक्षीय** वि. (प्राणि.) हाताच्या किंवा चतुष्पाद प्राण्यांच्या पुढील पायांच्या हाडांशी संबंधित.

**अरि** पु. १. शत्रु; वैरी; दुष्मन : 'मज सर्वांतराते कल्पिली । अरि मित्र गा ।' – ज्ञा ९.१६६. २. चक्र. [सं.]

**अरिख** वि. ऋषिप्रणीत. [सं.]

**अरिघर** पु. गोफणगुंडा : 'फरसी दीघल गोफणी अरिघरी'– गोप्र ११२.

**अरिते** वि. न. हीन; वक्र : 'अरिते संहारी आम्हांमाजी' – निगा २८३.

**अरिमर्दन** वि. शत्रूला ठार मारणारा; नाश करणारा: 'अरिमर्दना उठे आता ।' – रावि.

न. शत्रूचे निर्दालन; हनन; शत्रूचा पराजय : 'तेचि धगधगीत चक्र । अरिमर्दनी उद्भट ।' – एरुस्व १.४७. [सं.]

**अरिराय** पु. शत्रूचा राजा; शत्रुश्रेष्ठ : 'देवाचेनि तेजे बहुवशें । अरिराए जिंतिलें अनायासे ।।' – शिव ७३५. [सं. अरिराजन्]

**अरिवेग** पु. जोरदार वेग : 'अरिवेगे मारिला वत्स रागे' – गोप्र ९.

**अरिष्ट** न. १. अनिष्टकारक, दुःखकारक गोष्ट, अशुभ किंवा त्रास उत्पन्न करणारी गोष्ट. २. लुटारू, दरोडेखोर, टोळधाड, धूमकेतू, उल्कापात, धरणीकंप, नैसर्गिक संकट किंवा अशा तऱ्हेचा अनिष्टकारक प्रसंग; आपत्ती. ३. खोडचा (लहान मुलांच्या). ४.दुर्दैव; दुर्भाग्य. ५.अनर्थकारक अतिरेक; नुकसानीचा जोर. ६. (वै.) आसव; अर्क; द्रव पदार्थात औषधी द्रव्ये, मद्य, पाणी वगैरे घालून काढ्याप्रमाणे तयार केले जाणारे पेय औषध. ७. (वै.) मरणचिन्ह. ८. सूतिकागृह; बाळंतिणीची खोली. ९. (राज्य.) एखाद्या घटनाक्रमातील निर्वाणीचा क्षण; राजकारण, अर्थकारण या सारख्या क्षेत्रातील अस्थिर व कमालीचा तापदायक काळ.

वि. कठीण; अवघड; प्रचंड; प्रयासाचे : 'वेद मुखोद्गत करणे म्हणजे केवढे अरिष्ट काम.' – निमा १०५५. [सं.]

**अरिष्ट कुल** न. (वन.) उष्ण प्रदेशीय व उपोष्ण कटिबंधी विभागात आढळणारे १२० प्रजाती व १००० जाती असलेले वनस्पतींचे कुल.

**अरिसे** न. अर्धशिशी : 'सांपे अरिसाचा उपद्रव ।' – लीचउ ३१. [सं. अर्धशिशी]

**अरिसे** मूळव्याध : 'भटोबासांसि अरिसेयाचा उपद्रो' – लीचउ ४१८.

**अरी** स्त्री. १. आर (चांभाराचे कातडे टोचण्याचे हत्यार); टोचणी. २. लोखंडी अणकुचिदार टोक. (भोवऱ्याचे, पराणीचे). [सं. अरा]

**अरी** स्त्री. हारी; ओळ; रांग. [सं. अर]

**अरीणी** वि. अऋणी; कर्ज नसलेला. (गो.) [सं. अऋणी]

**अरीन्वख़्त** क्रिवि. सध्या. [फा.]

**अरीभवन** न. (शाप.) (प्रकाशाचे) सरळ रेषांत बाहेर पडणे ; किरणरूपाने निघणे; किरणोत्सर्जन : 'ग्रहांची बिंबे वास्तविक आपणांस जेवढी दिसावयाची त्याहून काहीशी मोठी दिसतात. किरणांच्या अरीभवनामुळे म्हणजे त्यांचे तेज चोहोंकडे फांकत असल्यामुळे हे असे होते.' – सुज्यो ३२१. [सं.]

**अरीय** वि. आंगठ्याच्या मुळाजवळची; आंगठ्याच्या बाजूकडील; बाह्यप्रकाष्ठास्थिकडील. [सं.]

**अरीयक** (ग.) पहा : **अरीय माप**

**अरीय करवतन** न. (यंअ.) वर्तुळाकृती करवतीने कापणे. (ही करवत एका फिरणाऱ्या दांड्यावर बसवलेल्या चक्राने चालविण्यात येते.)

**अरीय माप** न. (ग.) वर्तुळाच्या साहाय्याने निश्चित केलेले कोनाचे माप. कोनाच्या अग्राशी मध्यबिंदू कल्पून कोणत्याही सोयीस्कर त्रिज्येने वर्तुळ काढले तर कोनामुळे एक वर्तुळकंस (परिघाचा खंड) निश्चित होईल. त्या कंसाची लांबी व वर्तुळाची त्रिज्या यांचे गुणोत्तर म्हणजे त्या कोनाचे अरीय माप होय. (हे गुणोत्तर वर्तुळाच्या त्रिज्येवर अवलंबून नसून फक्त कोनाच्या मूल्यावर अवलंबून असते आणि म्हणूनच ते कोन मोजण्याचे योग्य परिमाण ठरते.)

**अरीस** स्त्री. मूळव्याधीचे मोड : 'एकवडी सेविजे अरीस मरति ।' – वैद्यक ४६. [सं. अर्श]

**अरीळ** वि. न चाखलेले; शुद्ध : 'फळें कंदमुळें जरी ही न मीळे । तरी काळ कर्मी जळें कीं अरीळें ।' – किंसुदा २.८.

**अरुआर्** पु. शिल्पकार.

**अरुच** वि. १. रुचकर नसलेला; बेचव. २. तुच्छ; न आवडणारे, पटणारे, रुचणारे. २. उदासीनता; राग : 'राव मजकुरांचे ठायीं अरूच फार धरले आहे.' – पेदभा २५.२०८.

**अरुचि–ची** स्त्री. १. कंटाळा; तिटकारा; अनावड; अप्रीती; नापसंती. २. (वै.) पोटात भूक असूनही रोगामुळे तोंडात घातलेले अन्न खाववत नाही अशी अवस्था. चव नाहीशी होणे; जिभेला गोडी नसणे. ३. अमान्यता; अननुकूलता; अनभिमतत्त्व (प्रतिपादित अर्थासंबंधी).

**अरुचिर** वि. १. बेचव; कंटाळवाणे; नापसंत; तिटकारा उत्पन्न करणारे. २. सुंदर नसलेला.

**अरुण** पु. १. सूर्याचा सारथी; कश्यपपुत्र; गरुडाचा वडील भाऊ. २. उषःकाल; प्रभात; पहाट; अरुणोदय (तांबडे फुटणे).
वि. तांबडा; लाल : 'रागेजली अरुणकांति विराजवीते ।'– नल ९७. [सं.]

**अरुणसारथि–थी** पु. सूर्य. [सं.]

**अरुणाग्रज** पु. गरुड. [सं.]

**अरुणाचल** पु. १. पूर्वेकडील पर्वत. २. भारतीय गणराज्यातील एका राज्याचे नाव. हे राज्य भारताच्या पूर्वोत्तर दिशेस आसामला लागून आहे. [सं.]

**अरुणात्मज** पु. जटायू. [सं.]

**अरुणिमा** स्त्री. पु. तांबडेपणा; लाली; रक्तिमा. [सं.]

**अरुणोदय** पु. तांबडे फुटणे; सूर्योदयापूर्वी पूर्व दिशेकडे लाल रंगाचा प्रकाश दिसू लागणे; सूर्य उगवण्यापूर्वी तीन घटकांचा काळ; प्रभात; पहाट : 'घनश्याम सुंदरा श्रीधरा अरुणोदय झाला ।' – होला १६. [सं.]

**अरुत–ता** क्रिवि. इकडे; अलीकडे. पहा : **अरता.** : 'तो बुद्धियोग विवरितां । बहुतें पाडें पार्था । दिसे हा अरुता । कर्मयोगु ।' – ज्ञा २.२७४.
स्त्री. १. अपेक्षा; आशा : 'या युद्धात वाचून पुन्हा दक्षणेत जाऊन संसार करावा ही अरुता कोणी ठेवली नाही.'–पाब २५. २. मोकळीक : 'हल्लीं दारूने गोळा बंदुकीच्या गोळीप्रमाणे देखील जात नाहीं. तोफेजवळ बाळाराम व राणेखान उभे राहतात आणि शिस्त लागत नाहीं. तेव्हां आता गोलंदाजाच्या पारिपत्यास अरूता आहे.' – ऐलेसं ३२९३.

**अरुता–अरू** स्त्री. १. हक्क; जागा; योग्यता; योग्यस्थान किंवा धंदा उद्योग. २. पूर्ण आवश्यकता – जरूरी (हजेरीची, मतांची, येण्याची); अपरिहार्यता; अगत्य : 'त्याच्यापुढें बोलण्याची कांही अरूता नाहीं.' – ऐलेख १२.३. (क्रि धरणे, ठेवणे). [सं. अर्हता]

**अरुवार** वि. १. कोमल; नाजूक; मृदू; सुंदर; मऊ; हळुवार; सुकुमार : 'रातोत्पल सुकुमार । त्याहूनि पदें तुमची अरुवार ।' – रावि १३.५९. २. खुसखुशीत, हलकी; हळू : 'एक सच्छिद्रें अरुवार नवनीतसङ्गे गोडसी ।'– मुआदि २९.८४. ३. हलकें : 'वाळल्या अनुतापकाचरिया । वैराग्य – तळणे अरुवारिया ।' – एरुस्व १४.१०८. न. मृदुशय्या : 'तो असे क्षीरसागरी । निद्रिस्त शेषाचे अरुवारी ।' – कथा २.५.१५७. पहा : **अरवार** [क. अडे]

**अरु(रू)श–ष,अरूसा** वि. १. आर्ष; मूढ; मंद; जड; वेडावाकडा; मंदबुद्धीचा; रेम्याडोक्या; मूर्ख : 'हा अरूष भक्तिचा भाव । दयाळ धांव घेई धनुकरा ।' – देप २८.१. २. विचित्र; विक्षिप्त (माणूस) : 'येक अरूषे आक्षेपिले ।' – सप्र ८.१२२. [सं. आर्ष]

**अरुंतुद** पु. (रसा.) एक उत्कर्ब.

**अरुंद** वि. (कधी अरुंध) रुंदीला कमी किंवा अपुरा; चिंचोळा.

**अरुंधती** स्त्री. १. वसिष्ठ ऋषींची पत्नी; कर्दमकन्या. २. सप्तर्षी मधील वसिष्ठाच्या जवळचा तारा; (ज्याला अरुंधती दिसत नाही तो लवकर मरतो. कारण दृष्टी इतकी मंद झाल्यानंतर आयुष्य फार थोडे उरलेले असते असा समज.) ३. (योग.) जीभ; जिव्हाग्र. [सं.]

**अरुंधती केश** ही राशी उत्तरगोलार्धात सिंह आणि भूतप यांच्यामध्ये आहे. [सं.]

**अरुंधतीदर्शनन्याय** पु. अरुंधती तारा वसिष्ठाच्या खुणेवरून दाखवितात. त्यावरून लक्षणेने. शेजारच्या मोठ्या गोष्टीवरून लहान गोष्टीचा निर्देश करणे. [सं.]

**अरूप** वि. १. आकार किंवा रूपविरहित; निराकार (ब्रह्म, वायू, ध्वनी

इ.). २. कुरूप; बेढब; बेडौल : 'कृष्ण अगुणांचा अरूप । कन्या सगुण आणि स्वरूप ।' - एरुस्व १०.९६. [सं.]

**अरूपता** स्त्री. (वै.) इंद्रियजन्य विकृती. [सं.]

**अरूपांतरणीय** वि. (अर्थ.) दुसऱ्या कोणत्याही वस्तूत न बदलता येण्याजोगा. (विशेषकरून कागदी मुद्रा, नोटा वगैरेच्या बाबतीत वापर.) [सं.]

**अरूपी** वि. आकार - आकृती नसलेले. [सं.]

**अरे** उद्गा. पुरुषाला हाक मारताना - बोलवताना सलगीने अगर तिरस्काराने बोललेला शब्द; संबोधन - रे, ए वगैरे. कधी आश्चर्य वाटले असताना अरे ! असा उद्गार निघतो. नामापुढे लावताना अ गाळतात. जसे : - राम रे ! [सं. अरे] (वा.) **अरे अरे करणे** - करू नको म्हणणे; मना करणे; ताकीद देणे. आश्वासनाचे उद्गारवाचक : 'अरे कोण्ही कव्हणाते न मारी' - ज्ञा ११.४०३.

**अरे** स्त्री. गळू : 'इंद्रभटा अरे जाली होती : ते अरे फुटली' -लीचउ २९८.

**अरेकस** (अरेकस्) पु. करवत्या; पहा : **अरकस** : 'अरेकसाच्या कामाला चिरकाम म्हणतात.' - महमा १२६.

**अरेखित धनादेश** पु. (व्यापार.) रेखांकित (क्रॉस) न केलेला धनादेश (चेक).

**अरेखित प्रतिमा** स्त्री. (भौ.) जिची बाह्यरेषा स्पष्ट दिसत नाही अशी आकृती. [सं.]

**अरेजारे** भांडण; उद्धटपणा; उर्मटपणा. (क्रि. बोलणे, म्हणणे, चालणे.) [सं. अरेचे द्वि.]

**अरेतुरे** न. शिष्टाचार सोडून अमर्यादपणे, हलकटपणाने बोलणे; एकेरीवर येणे; हमरीतुमरी; हातघाई. (क्रि. बोलणे, करणे). (वा.) **अरेतुरेवर येणे** - एकेरीवर येणे; भांडावयास लागणे : 'बाईसाहेब असें अरेतुरेवर एकदम येऊ नका.' - इंप १०१.

**अरेतुरेने** क्रिवि. अहमहमिकेने; अधिक उत्साहाने :'योग्य मनुष्यास उमेद चढून दुसऱ्यानें अरेतुरेने कामें करीत असावे.'- स्वप २७१.

**अरेबापरे** उद्गा. आश्चर्याचा, भीतीचा उद्गार.

**अरेराव** पु. मुजोर; अरे!अरे! करण्यात पटाईत; फुशारकी मारणारा; फुकट प्रतिष्ठितपणा दर्शविणारा; धटिंगण; टिकोजी; लोकांत मन मानेल तसे वागणारा; रगडमल्ल; अहंमन्य; गर्विष्ठ; अत्यधिकाराने प्रमत्त झालेला; तिस्मारखान : 'राष्ट्रीयसभा पूर्णपणे राष्ट्रीयहित साधणारी व्हावी, तिचे काम जनतेच्या बहुमतानें व जाहीर रीतीनें व्हावें, तें एखाद्या अरेरावाच्या खोलीत खाजगी रीतीनें होऊं नये असे आमचें म्हणणें आहे.' - टिव्या.

**अरेरावी** स्त्री. जुलूम; अहंमन्यता; दडपशाही; फुशारकी : 'विद्या - खात्याचे धोरण अरेरावीचें असून' - केले ३.४९.

वि. जुलमी; अहंपणाचे; आडदांडपणाचे; उद्धट; स्वैर; अन्यायी : 'चार्लस इलियट यांच्यासारख्या अरेरावी अंमलदारास खोल पाण्यात शिरावयाचे होते.' - लोटिकेले २.१६२.

**अरेरे** उद्गा. दुःखोद्गार; शोक, विस्मय, भय यांसारख्या प्रसंगी आणि पश्चात्तापाच्या वेळी येणारा उद्गार.

**अरेरेपणा** पु. १. सहानुभूती व्यक्त करणे. २. खोटी सहानुभूती : 'तुमच्या डोळ्यात आता जो अरेरेपणा तरळून गेला ना तो ...' -विभूत ४.

**अरेलिया** न. बागेतले सुंदर पानांचे एक झाड. [इं.]

**अरैठ** न. अनर्थ; पहा : **अरिष्ट** : 'शैल्ये थोर अरैठ केलें । तवकें तीनि ओतना वाइले ।' - शिव ९८७. [सं. अरिष्ट]

**अरोग-गी** वि. निरोगी; आजारी नसलेला; निकोप प्रकृतीचा; धडधाकट; सुदृढ. [सं.]

**अरोचक** पु. १. अरुची; तोंडाला चव किंवा रुची नसणे; भूक नसणे; (अपचनाचा विकार). २. (ल.) कंटाळा; शिसारी : 'तेतुलें अरोचक । विषयीं घेईल ।।' - ज्ञा १२.१०६.

वि. न रूचणारा; न आवडणारा; कंटाळवाणा. [सं.]

**अरोथा** पु. अपूर्व इच्छा.

**अरोपण** न. उभारणी : 'चैत्र अरोपणि देवपरिवारे ग?'-पंढर शिला १.७

**अरोबा** पहा : **अराबा**

**अरोसा** पु. १.अणकुचीदार, निमुळते टोक; शेवट (दोरी - दोराचा). २. निमुळत्या शेवटाची दोरी. ३. जीभ.

**अरोसापरोसा** वि. अंघोळ न केलेला; अस्नात; अशुद्ध; अपवित्र; अस्वच्छ (मनुष्य, भांडे इ.). पहा : **पारोसा** [द्वि.] [सं. पर्युषित]

**अरोळी** स्त्री. निखाऱ्यावर भाजलेली चांदकी. पहा : **अहारोळी**

**अरॉन मापक** न. (विअ.) गॅस, वीज, पाणी वगैरेचे प्रवाह चालू असताना त्यांचे प्रमाण मोजण्याचे किंवा नोंदण्याचे अरॉन या शास्त्रज्ञाने सिद्ध केलेले एक उपकरण.

**अर्क** पु. १. सूर्य; आदित्य : 'तो तंव अर्काचाहि आदि अर्क ।'- एरुस्व ७.६१. २. रुईचे झाड; मंदार. ३. बारा ही संख्या (बारा आदित्य असतात म्हणून). ४. सूर्यकांत. ५. स्फटिक. ६. अश्वमेधाच्या उपयोगाचा अग्नी. ७. (ज्यो.) उत्तरा फाल्गुनी. [सं.]

**अर्क** पु. १. सत्त्वांश; तत्त्वांश (औषधादिकांचा); रस; मद्य; सार; कस; निष्कर्ष; काढा. २. गड्डा; गाभा; गाळीव सार. ३. (ल.) अट्टल सोदा; चोर; लबाड. [सं.]

**अर्क** वि. मुख्य; महत्त्वाच्या : 'या खेरीज येथे किल्ले अर्कात तोफा पाचसात आहेत.'-मइसा १.१८. [फा. अर्क = बालेकिल्ला]

**अर्ककला** स्त्री. सूर्यबिंबाचा बारावा भाग.

**अर्कट, अर्काट** (अर्कट्) वि. लबाड; वस्ताद; हट्टी. पहा : **अरकाट**

**अर्कतरु-रू** पु. रुईचे झाड : 'मग धेनु चारिता तो क्षुद्दिकळ वनांत अर्कतरू लक्षी ।' - आर्याभा १.२.३७. [सं.]

**अर्कद्रुदळ** न. रुईच्या झाडाचे पान : 'झालो अंध स्वकृतें; अर्कद्रुदळें यथेष्ट भक्षूनीं.' - आर्याभा १.२.४१. [सं.]

**अर्कद्वेष** पु. उभा दावा; हाडवैर. [सं.]

**अर्कबंधू** पु. १. गौतमबुद्ध. २. सूर्यकमल. [सं.]

**अर्कविवाह** (अर्कविवाह्) पु. पुरुषाच्या तिसऱ्या लग्नाच्या वेळी रुईशी प्रथम विवाह करतात तो. कारण लग्नाची तिसरी बायको ही भाग्यशाली नसून लवकर मरते अशी समजूत. [सं.]

**अर्कशी-अर्कस** पहा : **अरकस**

**अर्कान** पु. अव. थोर सरदार; दौलतीचे आधारस्तंभ : 'असा डौल

घातला पातशहानी अवघ्या अर्कान वगैरेपासून मुचलके घेतले जे यास सर्वथैव मारावे.'- हिंदस २.२४. [फा.]

**अर्कान दौलत** स्त्री. राज्याचे आधारस्तंभ : 'राव मात्र गेले परंतु सर्व अर्कान दौलत व सरदार फौज कुल आहे ते आहेच.' - हिंद १.१७. [फा.]

**अर्कांश** पु. (ज्यो.) ग्रहणाचा विस्तार दाखविण्याकरता सूर्याचे (व्यासाचे) १२ भाग करतात, त्यापैकी प्रत्येक. [सं.]

**अर्की** स्त्री. मंदार; रुई. [सं. अर्क]

**अर्कुले, अर्कूल** न. १. रकार किंवा रफार याबद्दलची अर्ध्या र ची अक्षराच्या डोक्यावर द्यावयाची (ˆ) खूण; रेफ. २. इ, उ या स्वरांना दीर्घत्व येण्याकरिता दिलेले चिन्ह (ˆ) : 'अडव्या मात्रा त्याही नीट ।अर्कुलीं वेलांट्या ।' - दास १९.१.३.

**अर्केंदुसंगम** पु. अमावास्या; आवस. (सूर्य व चंद्र यांची युती (संगम) यादिवशी होते.) [सं.]

**अर्कोपल, अर्काश्मा** (अर्कोपल्,अर्काश्मा) पु. सूर्यकांतमणी. [सं.]

**अर्खंणे** पु. तांदुळाचे तुकडे; मोठाल्या कण्या. (को.) [सं. अर्धखंड]

**अर्ग** न. (भू.) वाळवंटातील सरकत्या वाळूचे प्रदेश. उदा. सहारा वाळवंटातील वाळूच्या टेकड्या. [इं.]

**अर्गट** वि. हेकेखोर; पहा : **अर्कट**

**अर्गलकरण** (नृत्य.) उजवा पाय पाठीमागच्या बाजूस दोन ताल उचलून पसरणे. तसेच उजवा हात पुढच्या बाजूस तितक्याच अंतरावर पसरणे. [सं.]

**अर्गली** पु. (भू.) १. मध्य आशिया, चीन, मंगोलिया या प्रदेशात जळण म्हणून वापरात असणारे उंट, मेंढ्या इ. जनावरांचे वाळलेले शेण. २. मंगोलियातील एका थोराड जातीची मेंढी.

**अर्गळ–ळा–ला** स्त्री. १. अडसर; अडणा; कढी; अगळ: 'घेतली द्वाराची अर्गळा ।' - कथा १.७.२३. २. शृंखला; साखळी; बेडी; खोडा; पायबेडी. ३. (ल.) दाब; दमन; निग्रह;प्रतिरोध; नड; अटकाव. (क्रि. घालणे). [सं. अर्गला]

**अर्गानर्गा** पु. वेढा; कोंडमारा : 'मोगलांचा अर्गानिर्गा केला आहे. गल्ला, वैरण, काडी कूल बाद जाहली आहे.' - पया २९. [फा. नर्गा. = वेढाचे द्वि.]

**अर्घ** पु. १. किंमत; मूल्य. २. पहा : **अर्घ्य** [सं.]

**अर्घपाद्य** न. अर्घ्यप्रदान आणि चरणप्रक्षाळण : 'अर्घपांद्य भरूनि सूदले' - इप्र २.२३.

**अर्घ्य** न. पु. १. ओंजळीत किंवा लहान पात्रात पाणी घेऊन त्यात गंध, अक्षता, फुले वगैरे घालून देवादिकांस, ब्राह्मणास अर्पण करणे : 'भरूंनियां पुष्पांजुळी । अर्घ्यु देवों ।।' - ज्ञा १५.२. २. संध्यावंदनादी कर्मात सूर्यास उद्देशून ओंजळीतून उदक सोडणे. [सं.](वा.) **अर्घ्य देणे** – देवादिकांस, ब्राह्मणांस पाणी अर्पण करणे. (ल.)उदक सोडणे; नाश करणे; इजा करणे; सत्यानाश घडवून आणणे.**अर्घ्य घेणे – घेऊन उभा, तयार राहणे, असणे** - नाश करण्यासाठी तयार असणे, टपून बसणे.

वि. १. पूज्य; पूजनीय; दर्शनीय; सन्माननीय. २. मूल्यवान. [सं.]

**अर्घ्या** पु. अर्घ्य देण्यासाठी उपयोगात आणले जाणारे एक पात्र. [सं.]

**अर्चक** वि. पूजा करणारा; अर्चन करणारा. [सं.]

**अर्चणे – अर्चिणे** उक्रि. उपासना, सेवा, पूजा करणे; भजणे; स्तवन करणे : 'देखे मातापितरें अर्चिजती ।' - ज्ञा २.३२. [सं.]

**अर्चन–ना** न. स्त्री. पूजा; अर्चा; उपासना; सेवा; वंदन (देव, ब्राह्मण, थोर लोक यांना केलेले) : 'सर्वही अर्चनें घडली हो ।' -सप्र ८.५४. [सं.]

**अर्चनपात्र** न. देवपूजेच्या साहित्याचे भांडे; पूजापात्र. [सं.]

**अर्चन पूजन** न. पूजाअर्चा; उपासना; सेवा. [सं.]

**अर्चन भक्ति–क्ती** स्त्री. नवविधाभक्तीपैकी 'अर्चन' - पूजा ही पाचवी भक्ती. [सं.]

**अर्चनाकुंड** न. (पुरा.) मातीचे बनविलेले, चौरस आकाराचे कुंड. भारतात ते रोमन संस्कृतीच्या संपर्कातून आले. अशी कुंडे भारतात तेर, नेवासा, तक्षशिला, अहिच्छत्र वगैरे ठिकाणच्या उत्खननात सापडली आहेत. महाराष्ट्रात पूर्वी अशा कुंडांची पूजा होत असे. [सं.]

**अर्चनीय, अर्च्य** वि. पूजनीय; वंदनीय; वंद्य. [सं.]

**अर्चमार्ग** पु. देवयान पंथ; योग्यांचा प्रयाणमार्ग : 'जेथ अर्चमार्गाचे खालहाट : धर्ममार्गाचे राजहाट' - शिव ९६.

**अर्चा** स्त्री. १. पूजा; अर्चन; उपासना. २. मूर्तीची स्थापना, प्राणप्रतिष्ठा (नवीन बसविलेल्या) किंवा पुनःशुद्धी (विटाळल्यामुळे) करण्याचा विधी; अर्चाशुद्धी. ३. स्तुती (वैदिक). ४. देवाची प्रतिमा. [सं.]

**अर्चाशुद्धि–द्धी** स्त्री. देवाची मूर्ती अपवित्र झाली असता किंवा नवीन मूर्ती बसविताना होम वगैरे अनुष्ठानाने केली जाणारी शुद्धी.

**अर्चि–र्ची** स्त्री. ज्वाला; दिव्याची ज्योत : 'दीपकाची अर्ची ।' - ज्ञा १३.११२३.

**अर्चिक तान** (संगीत.) एकाच स्वराची तान (सामगायनातील एक प्रकार, त्यावरून पूर्वी ऋचा एकाच स्वरात म्हटल्या जात असाव्यात.) [सं. ऋक्]

**अर्चित** वि. पूजित; वंदित; पूजिलेला. [सं.]

**अर्चिरादि मार्ग, अर्चिरमार्ग** पु. १. ब्रह्मलोकाचा मार्ग; ह्याला देवयान, उत्तरायण मार्ग असेही म्हणतात. या मार्गाच्या सर्व गोष्टी प्रकाशासंबंधीच आहेत. उदा. नित्य दिवस; प्रत्यही सूर्याचे समीपगमन, चंद्रबलाची वृद्धी इ. : 'यातें अर्चिरा मार्गु म्हणिजे ।' - ज्ञा ८.२२५. २. ज्योतिमार्ग. ३. (ल.) उत्तममार्ग. ४. योग्यांचा प्रयाणमार्ग. [सं.]

**अर्चिष्मान** पु. १. सूर्य. २. अग्नी.

**अर्ज** पु. जमिनीची रुंदी; विस्तार. [फा.]

**अर्ज** पु. १.विनंती; प्रार्थना; निवेदन; आवेदन; अभ्यर्थन; विज्ञप्तिपत्र. २. फिर्याद; दरखास्त. ३. ऐकलेली; श्रुत; मारूज : 'हे खबर श्रीमंत खुदावंत न्यामत यांस अर्ज होतांच.' - पया ४८२. (क्रि. करणे, ठोठावणे, ठाकणे, सजविणे, बनविणे). [फा.]

**अर्जक** वि. १. मिळविणारा; संपादन करणारा. २. नशीब. [सं. अर्ज्]

**अर्ज करणे** क्रि. १. आपली तक्रार किंवा विनंती अधिकाऱ्यापुढे मांडणे. २. नोकरीसाठी उमेदवार म्हणून पत्र पाठवणे.

**अर्जकाठी** स्त्री. जमीन मोजण्याची काठी. [अर. अर्ज = जमीन]

**अर्जणे–अर्जिणे** सक्रि. संपादन करणे; मिळविणे; प्राप्त करून घेणे: 'जरी बहुतां जन्मीं बहुते ।अर्जिलें सुकृतें ।' – रासपं १.७८४. [सं. अर्ज्]
**अर्जणे–अर्जिणे** क्रि. अर्ज करणे; विनंती करणे : 'अर्जिती आम्हा कीजे पावन ।'– दावि ४११. [अर.– अर्ज]
**अर्जदार** पु. विनंती करणारा; याचक; दरखास्त देणारा; फिर्यादी.[फा.]
**अर्जदास्त** स्त्री. लेखी अर्ज; दरखास्त. [फा.]
**अर्जन, अर्जना** न. १. मिळवणूक; संपादन; प्राप्ती, संपादणी : सामा. शब्द – द्रव्यार्जन, विद्यार्जन. २. (अर्थ.) व्यक्तीला सेवेबद्दल मिळणारी मजुरी, वेतन इत्यादी. ३. उत्पादन खर्च आणि इतर खर्च वजा जाता, विशिष्ट कालावधीतील महसुलातील शिल्लक. [सं.]
**अर्जनवीस** पु. अर्ज, आवेदनपत्र लिहिणारा. [फा.]
**अर्जबाब** स्त्री. तैनातीशिवाय कारणपरत्वे लग्न वगैरे कार्यप्रसंगी सरकारातून मिळालेली देणगी. [फा.]
**अर्जबेग–बेगी** पु. अर्जदाराचा (लेखी किंवा तोंडी)अर्ज हुजुरास, राजास ऐकविणारा अधिकारी : 'महाराजांचा भोळा अर्जबेगी' – दावि.[फा.]
**अर्जभूज** स्त्री. रुंदी (जमीन मोजणीतील). [फा. अर्ज]
**अर्जमंद** वि. १. उत्कंठित; उत्सुक. २. प्रिय; सुखी. [फा. आर्झुमंद]
**अर्जमंदी** स्त्री. प्रियता; सौख्य; उत्सुकता. [फा.]
**अर्जमात** स्त्री. १. अर्ज. २. अर्जदार : 'सर्व अर्जमात आले भेटी ।' – सप्र २.९६. [फा.]
**अर्जमूळवस** न. मूळ वस्ती करताना असलेल्या जमिनीनंतर मागाहून संपादन केलेली जमीन.
**अर्जल** वि. हलके; गैरनामी; किरकोळ; कनिष्ठ : 'सत्तावीस सरकार नामी मारिले; दीडशें सरदार अर्जल जखमी केले.' – जोरा ९०. पहा : **अरजल** [फा. अरजल = नीच]
**अर्जवणे** क्रि. खर्ची घालणे; झटणे.
**अर्जविनंति–ती** पहा : **अर्ज**
**अर्जानी** वि. हस्तगत; प्राप्त; ताब्यात असलेले : 'हाली साहेबासी मुकासा अर्जानी जाला आहे.'–इम ४४. [फा.]
**अर्जित** वि. मिळविलेले; संपादिलेले. [सं.]
**अर्जित आय** पु. (अर्थ.) मजुरी, पगार, व्यवसायशुल्क इ. मार्गांनी जमा होणारी व्यक्तीची मिळकत. [सं.]
**अर्जितप्राप्ति–प्ती** स्त्री. (अर्थ.) मिळविलेले उत्पन्न; कमाई.
**अर्जित रजा** स्त्री. सरकारी, निमसरकारी, बिनसरकारी कर्मचाऱ्यांना वर्षातून ठरावीक दिवस मिळणारी पगारी रजा; मिळविलेली, संपादित केलेली रजा.
**अर्जिलाइट** पु. (भूशा.) चिकणमातीपासून बनलेला एक प्रकारचा घट्ट खडक. [इं.]
**अर्जी** पहा: **अर्ज** (वा.) **अर्जी सजविणे** – अर्ज किंवा विज्ञप्तिपत्रक तयार करणे.
**अर्जी इनाम** न. सरकारास नजराणा देऊन घेतलेले इनाम.
**अर्जी इल्तमास** विनंती : 'नबाब व राजेबहद्दर यांस माघारे फिरल्यावरी अर्जी इल्तमास लिहावी कीं' –ऐलेखं २.४७९.[फा. अर्झ + इल्तिमाश]
**अर्जीदास्त, अर्जदस्ती** पहा : **अर्जदास्त**
**अर्जीमर्जी** स्त्री. स्नेह; मैत्री : 'अर्जीमर्जीमध्यें विकल्प उडवा ।' – पला १६४. [फा.]
**अर्जुदा** वि. कष्टी:'लोक फार अर्जुदे आहेत. गोपाळराव गेल्यामुळे साऱ्यांच्या शक्ती गेल्या आहेत.' –ऐलेसं १९७०. [फा. आजुर्दा]
**अर्जुन** पु. १. पाच पांडवापैकी तिसरा. २. सहस्रार्जुन, कार्तवीर्य. ३. अर्जुनसादडा–साताडा; पांढरा ऐन. हे झाड कोकणात आढळते. पाने वीतभर लांब, फुले, साल पांढरी, लाकूड हरकामास उपयोगी. वि. पांढरा; श्वेत. [सं.]
**अर्जुनकुल** न. (वन.) अर्जुनसादडा, हिरडा, बेहडा, ऐन किंजळ, घावडा, धापटी इत्यादी द्विदलिकित वनस्पतींचे कुल. [सं.]
**अर्जुनध्वज** पु. हनुमान. [सं.]
**अर्जुनरुख, अर्जुनसादडा** पहा : **अर्जुन ३**
**अर्जुनवाद्य** न. बोंब; शंखध्वनी; अर्जुनाचे दुसरे नाव फाल्गुन यावरून फाल्गुनातील वाद्य म्हणजे बोंब : 'अर्जुन वाद्यें केली' – मइसा १९३०. [सं.]
**अर्जुनी** क्रिवि. आर्जवाने; दीनवाणीने : 'कृष्णराव बल्लाळ यास निजाम बहुत बहुत अर्जुनी बोलेले की राव पंडित प्रधान याचे फौजेचा कसेही करून येथून कूच करवा.' –सब २९.
**अर्जू** वि. इच्छुक; तयार; मान्य : 'आज दोन सालांपासून चेनापट्णकराचा दोस्तीचा इरादा. खुद्द एक पालखी व दहा जवानांनसी येण्यास अर्जू. लेकीन जात मकरी.' – मशिंका १६६.
**अर्णव** पु. समुद्र; सागर; सामा. शब्द – शोकार्णव, मोहार्णव, दुःखार्णव : 'मग मोहार्णवगवाक्षें । रिघोनी ठेला ।' – ज्ञा ११.६१. [सं.]
**अर्णवयान** न. होडी; गलबत. [सं. अर्णव + यान]
**अर्णवोद्भव** पु. १. समुद्रात जन्मलेला. २. चंद्र. [सं.]
**अर्णवोद्भवा** स्त्री. १. समुद्रातून निघालेली स्त्री. २. लक्ष्मी. [सं.]
**अर्त(र्त्त)णे** अक्रि. अत्यंत उत्सुकतेने, उतावळेपणाने अधीर, व्याकूळ होणे; पीडित होणे. [सं. आर्त]
**अर्तलोपर्तुलो** पु. ये–जा; येरझार :'ब्रीधासंगमापासौनि वाघाडसंगमुवरि अर्तलो-पर्तुलो करा' – लीचउ ४५४.
**अर्ता–र्ति–र्ती** क्रिवि. अलिकडे : 'तया अर्ता पर्ता नाहीं काहीं ।'– दावि ३५. पहा : **अरता**
**अर्ता–र्ति–र्ती** स्त्री. आवड; इच्छा; आशा; काळजी :'माझे मनी असे जे अर्ता पुरवावी ते देवराया ।' – गुच ५.१८. [सं.आर्तिः]
**अर्तांग** न. अर्धे तांग; अदतांग – आठ रेसांचे तांब्याचे नाणे.(गो.) [सं. अर्ध + टंक]
**अर्तिहरी** वि. दुःख हरण करणारा. [सं.]
**अर्ती** स्त्री. अपेक्षा; आवड; इच्छा; उत्कंठा. [सं. आर्तिः]
**अर्थ** पु. १. अभिप्राय; भाव; भावार्थ; तात्पर्य; काम; हेतू; कारण : 'हे आणिकाही एका अर्था उपकारेला.' – ज्ञा ३.१५३. २. द्रव्य; लाभ; मालमत्ता; धन : 'जया पासोनि होय अर्थप्राप्ति । ते समर्थ शिष्य आवडती ।' – एभा २३.२३३. ३. मिळविण्याची किंवा साध्य वस्तू;

संपादनीय गोष्ट, विषय, ध्येय. ४. धर्म, अर्थ, काम, मोक्ष या चार पुरुषार्थांपैकी दुसरा; कीर्ती, सत्ता व संपत्ती यांपासून मिळणारे सुख. ५. द्रव्य; जड पदार्थ, वस्तू; सृष्ट पदार्थ; निर्माण केलेला जिन्नस; (व्यापक अर्थाने) अस्तित्व किंवा संबंध; इंद्रियांचा विषय : 'तैसें भारती सुरवाडलें ।अर्थजात ।।' - ज्ञा १.४०. ६. फळ; निष्पत्ती; परिणाम; बनाव; (ल.) प्रसंग : 'अर्थ तसा आलाहे कां, जी मधुसूदना कपाळालां ।' - मोभीष्म ९.५८. ७. इच्छा; आकांक्षा; अपेक्षा. ८. कस; दम; जोर; सत्त्व; हशील. ९. (समासात) आशय, भावार्थ या अर्थी विद्वानांचे संभाषण, चर्चा यांतून नेहमी उपयोग करतात. जसे -लक्ष्यार्थ, वाच्यार्थ, व्यंग्यार्थ. १०. (समासात) साठी, स्तव, करिता म्हणून इ. हेतुदर्शक अर्थाने : 'कामसुख कामिनीमेळी । सुखार्थ स्त्रियेतें प्रतिपाळी ।' - एभा २३.४२७. ११. जरकरिता तरकरिता (त्या) साठी, (ज्या) पक्षी - पेक्षा, (त्या) पक्षी - पेक्षा ह्या अर्थी. १२. (कायदा.) दावा; बाब; फिर्याद; विवादाचा विषय. १३. करावयाची समजावयाची - विश्वासावयाची वगैरे कोणत्याही प्रकारची गोष्ट, बाब. १४. काळजी; आस्था; गरज; हितसंबंधाची जाणीव. १५. (व्या.) कर्त्याचा क्रियाविषयक हेतू. १) स्वार्थ. २) आज्ञार्थ. ३) विध्यर्थ. ४) संकेतार्थ. १६. (ल.) ब्रह्म : 'जेंहीं शोधून पाहिला । त्यासी अर्थ सांपडला । येरां असोनि अलभ्य जाला । जन्मोजन्मीं ।' - स १.९.१२. १७. (ल.) स्वतः ची सत्ता, स्त्री : 'आपुलें अर्थ दुसऱ्यापाशीं । आणि दुसऱ्याचें अभिळासी ।' - दास २.१.६१. १८. बोल; दोष : 'या प्रकरणात आपलेकडे काही अर्थ नाही.' - शिवदि २.२. १९. (समासात) प्रभाव; सामर्थ्य; जोर; कारण; अवलंबन : 'जन्मलासि बळार्थे । धर्माचेनि ।'- ज्ञा १६.४६४. २०. (ज्यो.) कुंडलीतील द्वितीय स्थान (धनस्थान). [सं. अर्थ] (वा.) **अर्थ फावणे** सापडणे; मिळणे; संगती लावणे : 'एवं सर्व शब्दाचा अर्थ फावे ।' - यथादी ११.५४५. **अर्थाला मरणे** - स्वतःच्या फायद्यासाठी धडपडणे किंवा अति उतावीळ असणे.

**अर्थ** पु. रथ : 'पर्वतवेन्ही अर्थेसी बीजें केलें । तेथ अर्थु राहाविला' -लीचपू ३६३.

**अर्थअपुर्वाय** स्त्री. लाड; कोड; कौतुक. (गो.)

**अर्थआयोग** पु. शासनाच्या आर्थिक व्यवहाराची व्यवस्था पाहणारे खाते, विभाग, अधिकरण.

**अर्थकारण** न. समग्र आर्थिक बाबींचा विचार; देशाची वगैरे अर्थव्यवस्था : 'अर्थकारणाचा अभ्यास करून माझी ही भूमिका तयार झालेली आहे.'- धरागा २.१६६. [सं.]

**अर्थगम्य** न. अर्थाचे ज्ञान; अर्थबोध.
वि. समजण्यासारखे; कळण्यासारखे. [सं.]

**अर्थगर्भ** वि. आशयपूर्ण; अर्थघन. [सं.]

**अर्थगौरव** पु. अर्थाचा भारदस्तपणा. [सं.]

**अर्थग्रहण** पु. अर्थ जाणणे, समजणे, स्वीकारणे; अर्थबोध होणे; ग्रहणशक्ती. [सं.]

**अर्थच्युती** स्त्री. (भाषा.) एखाद्या शब्दाचा मूळचा चांगला अर्थ जाऊन त्याला वाईट अर्थ प्राप्त होणे. उदा. गोस्वामी शब्दाचा मूळ अर्थ गाईंचा मालक, परंतु त्यापासून झालेल्या गोसावी शब्दाचा अर्थ बैरागी, सडाफटिंग असा होतो. [सं.]

**अर्थछटा** स्त्री. (सास.) अर्थातील सूक्ष्म भेद, फरक; अर्थाची वेगळी छटा; अर्थाचा भिन्न पैलू. [सं.]

**अर्थणे** उक्रि. मागणे; याचना, विनंती, विनवणी, प्रार्थना करणे : 'अर्थी आल्या अर्थावयासी । विमुख न व्हावे सर्व सर्वस्वेंसी ।' - एभा ७.४०५.

**अर्थतः** क्रिवि. १. अर्थाप्रमाणे; अभिप्रायाप्रमाणे; भावार्थाप्रमाणे. २. अलबत; अर्थात; खात्रीने; जरूर. [सं.]

**अर्थदर्शक** वि. १. अर्थ विशद करणारे, दाखवणारे. २. किमती दाखविणारे. उदा. अर्थदर्शक परिमाणे (किंमती दाखविणारी.) [सं.]

**अर्थदास** वि. द्रव्याची अति हाव बाळगणारा; कवडीचुंबक; पैशासाठी धडपडणारा; पैशासाठी वाटेल ते करेल असा; अर्थप्राप्ती हेच सर्वस्व मानणारा. [सं.]

**अर्थदोष** पु. ज्यामुळे काव्यातील मुख्यार्थाची हानी होते असा दोष. हे दोन प्रकारचे. नित्य दोष व अनित्य दोष. [सं.]

**अर्थना** स्त्री. याचना; विनंती; मागणी; अभ्यर्थना; प्रार्थना : 'हेचि होऊनि अर्थना ।मीचि माझ्या अर्थी अर्जुना ।' - ज्ञा १८.११२०.[सं. अर्थ]

**अर्थनिरूपण** न. (सास.) अर्थाचे स्पष्टीकरण, विवेचन; अर्थाचा उलगडा.

**अर्थपती** पु. कुबेर; अतिधनवान; श्रीमंत माणूस. [सं.]

**अर्थपरायण व्यक्ती** (अर्थ.) काहीतरी इच्छित प्राप्त करून घेण्याच्या हेतूने, नियमितपणाने आणि पुढे काय घडणार आहे ह्याची कल्पना करून आपले सर्व आर्थिक व्यवहार करणारी, अर्थशास्त्रज्ञाने निर्माण केलेली काल्पनिक व्यक्ती.

**अर्थपरिवर्तन** न. (भाषा.) भाषेतील शब्दांच्या अर्थात कालौघात झालेला बदल. [सं.]

**अर्थपूर्ण** वि. १. संकेतगर्भित; हेतुगर्भ. २. अर्थबोधक; अर्थसूचक.[सं.]

**अर्थपूर्ण शीर्षक** न. (ग्रं.) सूचिलेखन करताना नोंदीमध्ये घ्यावयाचा ग्रंथनामातील उपयुक्त भाग. [सं.]

**अर्थप्रशस्ति-स्ती** स्त्री. (भाषा.) एखाद्या शब्दाचा मूळचा वाईट अर्थ जाऊन चांगला अर्थ प्राप्त होणे.

**अर्थबंध** पु. अर्थाला अनुसरून वाक्यातील शब्दांची मांडणी.

**अर्थबुद्धि-द्धी** स्त्री. १. गरज; इच्छा. २. आवड; कळकळ; हितबुद्धी.
वि. पैशांवर, फायद्यावर नेहमी लक्ष असणारा; स्वार्थी; आपमतलबी.

**अर्थभेद** पु. अर्थातील फरक : 'ना कांही आथी अर्थभेदु ।तो देव करीतु विशदु ।'- ज्ञा १८.८९. [सं.]

**अर्थमंत्री** पु. देशाचे किंवा राज्याचे उत्पन्न व खर्च पाहणारा व त्यासंबंधीचे धोरण ठरविणारा मंत्रिमंडळाचा सभासद. [सं.]

**अर्थमिति-ती** स्त्री. (अर्थ.) सिद्धान्ताची चाचणी, पडताळा घेण्यासाठी गणित आणि संख्याशास्त्रातील पद्धतींचा केलेला वापर. [सं.]

**अर्थमीमांसा** स्त्री. (सास.) शब्दांचे अर्थ भिन्न संदर्भात का व कसे बदलतात याचा ऊहापोह करणारे शास्त्र.

**अर्थवाद** पु. १. अतिशयोक्तिपूर्वक स्तुती किंवा निंदा; अतिप्रशंसा; अतिनिंदा; अतिशयोक्तीचे वर्णन : 'कां हा अर्थवादु म्हणती । वाचाळपणें ।।' – ज्ञा २.१९५. २. (सास.) स्पष्टीकरणार्थ करण्यात येणारा युक्तिवाद; फलश्रुती; अर्थगौरव; कविलाघव; काल्पनिक मंडन: 'वेदींच्या अर्थवादासरिसा । मनीं बांधोनि भोगाशा । यज्ञमिषे पशुहिंसा । भोगलिप्सा करू धावतो ।।' –एभा ५.२६२. ३. मिथ्या कल्पना; काल्पनिक स्पष्टीकरण; ऊहापोह; चुकीची समजूत. ४. (ल.) (मीमांसा) आगंतुक विधान. ५. अर्थासंबंधी वादचर्चा; वादविवाद. ६. उद्देशाचे कथन; विवरण; स्पष्टीकरण. ७. अमुक आपत्ती टाळण्यासाठी अमुक करावे असे सांगणारे वचन. [सं.]

**अर्थवादात्मक** वि. मोठेपणा देणारी; अतिशयोक्तिपूर्ण; खुशामत करणारी : 'तर्कतीर्थांची स्तुती अर्थवादात्मक वाटते.' – मागोवा १२२.

**अर्थवाहक** वि. ज्यामुळे अर्थ चांगला समजतो अशी (शब्दाची निवड, रचना इ.); अर्थपूर्ण; अर्थवत्ता असलेला. [सं.]

**अर्थविचार** पु. (भाषा.) शब्दाला प्राप्त होणाऱ्या अर्थाचे स्वरूप, अभिव्यंजक व अभिव्यक्त यांच्यामधील नाते, अर्थाचे विविध प्रकार, अर्थामध्ये होणारी परिवर्तने इत्यादी प्रश्नांची मीमांसा; शब्द आणि त्याचा अर्थ यांच्या परस्परसंबंधाचा सर्व बाजूंनी होणारा अभ्यास. [सं.]

**अर्थविणे** क्रि. अर्थ करणे; अर्थ सांगणे; प्रतीती सांगणे : 'यथार्थपूर्ण अर्थवी ।'– एभा २.७९३. [सं.]

**अर्थविस्तार** पु. (भाषा.) एखादा शब्द भाषेच्या पूर्वावस्थेत ज्या संदर्भात वापरला जात असेल त्यापेक्षा नंतरच्या अवस्थेत तो जास्त संदर्भात वापरला जाणे. उदा. 'तांब्या' या शब्दाचा मूळ अर्थ तांब्याच्या धातूपासून बनवलेले विशिष्ट आकाराचे भांडे; परंतु आता या अर्थाचे सामान्यीकरण 'पितळेचा तांब्या', 'स्टीलचा तांब्या'. [सं.]

**अर्थविज्ञान** पहा : **अर्थविचार** [सं.]

**अर्थव्यवस्था** स्त्री. (अर्थ.) १. देशाची संपत्ती, साधनसामग्री व उत्पादन यांची निर्मिती व वितरण यांच्याशी संबंधित व्यवस्था; देशातील संपत्तीच्या व उत्पादनाच्या वितरणाची व उपभोगाची कार्यपद्धती. २. समाज, आस्थापना किंवा कुटुंब यांच्या, प्रामुख्याने उत्पादनाशी निगडित असलेल्या व्यवहारांची, सुसंगत मांडणी आणि त्याचे व्यवस्थापन. [सं.]

**अर्थशास्त्र** न. (अर्थ.) १. अमर्याद गरजा आणि मर्यादित व पर्यायी उपभोगाची साधने यांच्यामुळे निर्माण होणाऱ्या समस्यांचा अभ्यास करणारे शास्त्र. २. संपत्तीचे उत्पादन व व्यय यांचे विवेचन ज्यात केले आहे ते शास्त्र : 'पण त्या घडवून आणण्याचे खरे उपाय आमचे वृथा देशाभिमानी अर्थशास्त्री सांगतात ते नव्हत.' – आगर २.९७. ३. ऐहिक सुखासंबंधी लौकिक व्यवहारशास्त्र (धर्मशास्त्राच्या उलट). ४. राज्यव्यवहारशास्त्र; राजनीतीशासनशास्त्र. उदा. कौटिलीय अर्थशास्त्र. ५. दंडनीती. [सं.]

**अर्थशास्त्रज्ञ** पु. (अर्थ.) अर्थशास्त्र जाणणारा; अर्थशास्त्राचा तज्ज्ञ; अर्थशास्त्राची पद्धतशीर माहिती असणारी व्यक्ती. [सं.]

**अर्थशून्य** वि. काहीही अर्थ, आशय नसलेला; निरर्थक; मुद्द्याला सोडून असलेला. [सं.]

**अर्थसत्ता** स्त्री. संपत्तीच्या उत्पादनाचे व वितरणाचे अधिकार; पैशाचे अधिकार व व्यवहार; आर्थिक सत्ता : 'सर्व अर्थसत्ता सरकारच्या हाती केंद्रित होते.'– लोस ३४. [सं.]

**अर्थसमर्थता** स्त्री. अर्थाच्या अभिव्यक्तीचे सामर्थ्य; मनातील आशय स्पष्ट करण्याची कुवत. [सं.]

**अर्थसमाजशास्त्र** न. (समाज.) समाजशास्त्राच्या दृष्टिकोनातून केलेला अर्थशास्त्राचा अभ्यास. आर्थिक व्यवहार आणि समाजजीवनाची अंगे यांचा संबंध, संपूर्ण अर्थव्यवस्थेचा समाजसंघटनेवर आणि समाजातील इतर संस्थांवर पडणारा प्रभाव इत्यादींचा अभ्यास.

**अर्थसंकल्प** पु. आगामी वर्षातील उत्पन्नाचा व खर्चाचा तपशील देणारे विवरण; अंदाजपत्रक; अर्थमंत्र्याकडून संसद किंवा विधानमंडळ यांच्यापुढे मांडण्यात येणारे, जमाखर्चाचा अंदाज दाखविणारे पत्रक. [सं.]

**अर्थसंकोच** पु. (भाषा.) व्यापक संदर्भात वापरला जाणारा शब्द कालांतराने मर्यादित संदर्भात वापरला जाणे. [सं.]

**अर्थसंबंध** पु. अर्थाचा शब्दाशी किंवा वाक्याशी असलेला संबंध. [सं.]

**अर्थसाहाय्य** न. आर्थिक मदत; शासनाने कल्याणकारी कामाकरिता दिलेले आर्थिक साहाय्य. [सं.]

**अर्थसिद्ध** वि. १. अर्थदृष्ट्या सिद्ध; गर्भित; ध्वनित; फलापेक्षित. २. सिद्धार्थ; ज्याचा हेतू तडीस गेला आहे असा. [सं.]

**अर्थहानि–नी** स्त्री. अयोग्य शब्द, रचना इ. मुळे स्पष्ट न समजणे. [सं.]

**अर्थहीन** वि. अर्थ नसलेले; अर्थशून्य. [सं.]

**अर्थाअर्थी** क्रिवि. कोणत्याही मार्गाने, रीतीने, पद्धतीने; काहीएक अर्थाने, कराराने, काहीएक संबंध नसताना; किमपि, यत्किंचितही. [सं. अर्थ]

**अर्थागळे** वि. अर्थप्रचुर; सार्थ; अन्वर्थक; ज्यापासून काही बोध होईल असे; सुबोध : 'कवित्व असावे अर्थागळें ।' – दास १४.३.२७.

**अर्थात** क्रिवि. १. कारणामुळे; कारणास्तव; अवश्य परिणामाने; ओघानेच; साहजिकच; आपोआप. २. वस्तुतः; वास्तविक; परिणामी; अंती; फलदृष्टीने पाहता. [सं. अर्थ-पंचमी विभक्ती]

**अर्थादेश** पु. (भाषा.) शब्दाच्या अर्थाच्या अलंकारिक उपयोगामुळे झालेले मूळ अर्थात परिवर्तन. उदा. 'अब्रू' या शब्दाचे मूळ ज्या अरबी शब्दात आहे (आबरु) त्याचा अर्थ 'चेहऱ्यावरची चमक' असा आहे; परंतु आता तो 'चांगले नाव, प्रतिष्ठा, स्त्रीची लज्जा' या अर्थी रूढ आहे. [सं.]

**अर्थानुसंधान** पु. मागील विधानांचा व पुढील विधानांचा अर्थाच्या दृष्टीने समन्वय; अर्थसंदर्भ; पूर्वापार संबंध किंवा धागा. (क्रि. राखणे, ठेवणे.) [सं.]

**अर्थान्तरन्यास, अर्थान्तरोपन्यास** पु.अर्थालंकाराचा एक प्रकार.

**अर्थान्वय** पु. अर्थाचा संबंध; अर्थाविषयी धोरण; संदर्भ; संबंध; वाक्यामधील शब्दांच्या अर्थातील एकसूत्रीपणा. [सं.]

**अर्थापत्ति–त्ती** स्त्री. १. स्पष्ट न केलेले परंतु गर्भितपणे किंवा ध्वनित करून समाविष्ट केलेले अनुमान; गर्भितार्थ. २. अनुमान किंवा तर्क

करणे, काढणे, बांधणे; अनुमान सिद्धान्त; कल्पना; तर्क; अटकळ; आनुषंगिक सिद्ध गोष्ट. ३. एक अर्थालंकार.

**अर्थापन्न** वि. अर्थातून निष्पन्न होणारे; आशयसिद्ध; संदर्भगत. [सं.]

**अर्थाभास** पु. अर्थाचा आभास; अर्थसादृश्य; चुकीची विचारसरणी.[सं.]

**अर्थार्थी** वि. १. धनाची इच्छा करणारा; द्रव्येच्छु : 'तिजा अर्थार्थी जाणिजे । ज्ञानिया चौथा ।।'– ज्ञा ७.१०९. २. प्रवृत्तिपर अशा चार प्रकारच्या भक्तांतील पहिला; सकाम भक्त.पहा : **अर्थाअर्थी** [सं.]

**अर्थालंकार** पु. अर्थाच्या योगाने काव्याला शोभा आणणारा अलंकार. (उपमा, रूपक इत्यादी). [सं.]

**अर्थिक** वि. १. याचक. २. उपयोगी पडणारा सेवक : 'कोणकोणा अर्थिकु । कोण जाणें ।।' – ज्ञा १८.१५९८. [सं.]

**अर्थित** वि. मागितलेले.

**अर्थिम** पु. (भाषा.) भाषेतील आशयाचा कार्यकारी घटक. [सं.]

**अर्थिल** वि. जरूरी असलेला; गरजू; आस्थेवाईक. [सं. अर्थिन्]

**अर्थिले ठिकाण** न. गरजू ठिकाण, स्थळ; जेथे जरुरी आहे असे स्थळ.

**अर्थी** स्त्री. ताटी; तिरडी : 'शुद्धिचळवळीची अर्थी यमुनेच्या तटावर लवकरच जाळली जाईल.'– ससावा ३.२४७. [हिं.]

**अर्थी** वि. १. अर्ज, याचना, विनंती करणारा; प्रार्थना करणारा : 'अर्थी आल्या अर्थावयासी । विमुख न व्हावें सर्वस्वेसीं ।' – एभा ७.४०५. २. (समासात) इच्छिणारा; आकांक्षा असणारा; गरजू. उदा. विद्यार्थी, पुत्रार्थी, मोक्षार्थी धनार्थी. ३. धनवान. [सं. अर्थिन्]

उभ. (ज्याअर्थी...त्याअर्थी...) कारण व कार्यदर्शक उभयान्वयी अव्यय : 'ज्याअर्थी तू बोलत नाहीस त्याअर्थी पैसे तूच घेतलेले आहेत.'

**अर्थी प्रत्यर्थी** वि. परस्परापेक्ष; परस्परांवर अवलंबून असणारा; एकमेकांची गरज असणारा : 'या प्रकरणी त्यांचा थोडासा अर्थी प्रत्यर्थी संबंध आहे.'– लोटिकेले ४.६६. [सं.]

**अर्थे** क्रिवि. करता; साठी. पहा : **अर्थ १०**

**अर्थे (च) प्राणे (च)** क्रिवि. सर्वस्वी; पूर्णपणे; तनमनधनेकरून : 'मल्हाररावाचे व आमचे नासावे हे फारास सुख. गंगोबा तो बाबासाठी अर्थेप्राणे असतील असे वाटते.'–पुद १८७. [सं.]

**अर्थेला** पहा : **अर्थिल**

**अर्थोपाय** पु. (राज्य.) १. सरकारच्या उपयोगासाठी पैसा उभा करण्याची योजना; या संबंधीचा कायदा. २. एखाद्या गोष्टीकरिता पैसा उभा करण्याच्या पद्धती व साधने. [सं.]

**अर्दखाप्** न. प्रत्येक फळीला अर्धी खाच घेऊन फळ्या जोडण्याचा साधाप्रकार. (गो.)

**अर्दन** न. पीडन; क्लेश; दु:ख : 'लिंगदेहाचे मर्दन । तेचि जनाचे अर्दन' – एभा ६.२.

**अर्दमापटे** वि. अर्धे मापटे; एक माप; पावशेर. (गो.)

**अर्दली** पु. नोकर, वैयक्तिक चाकर.

स्त्री. वैयक्तिक नोकरी, चाकरी. [इं. ऑर्डर्ली]

**अर्दाळ** पु. गोंगाट; आरडाओरड.

**अर्दितवायु–यू** न. पु. तोंडाचा पक्षघात; पक्षवायू; अर्धांग वायू. [सं.]

**अर्दुवटो** वि. अपुरे; अर्धवट. (गो.) [सं. अर्धवत्]

**अर्दुक** न. अर्धाभाग; नारळाचा अर्धा भाग(कु.) [सं.अर्ध]

**अर्दो** वि. अर्धा. (गो.) [सं. अर्ध]

**अर्ध, अर्द्ध** न. १. एका पदार्थाचे जे दोन सम विभाग ते प्रत्येकी; निम्मा तुकडा. अर्धा भाग. २. (समासात) अर्धा; निम्मा. उदा. अर्धकोस, अर्धघटका इ.

वि. अपूर्ण; अपुरा. उदा. अर्धसत्य, अर्धनग्न इ. [सं.]

**अर्धक** न. अर्धा भाग; निम्मा हिस्सा.

वि. दोन समान भाग करणारा. [सं.]

**अर्धकच्चा** वि. १. अर्धामुर्धा पिकलेला, तयार झालेला किंवा अर्धवट शिजलेला (फल, धान्य, विद्या, अन्न); अर्धामुर्धा; अपूर्ण; अपुरा. २. पूर्णपणे शेवटास न जाता अर्धवट राहिलेले (काम). ३. पूर्ण ज्ञान नसलेला किंवा माहिती नसलेला.

**अर्धकंदरा** पु. घोड्याच्या लगामाचा एक प्रकार.

**अर्धकालिक** वि. ठरलेल्या वेळेच्या निम्मावेळ कामावर असलेला. [सं.]

**अर्धकुशल** वि.एखाद्या कामातील कौशल्य पूर्णपणे आत्मसात न केलेला (कामगार). [सं.]

**अर्धकुंभ** पु. (ज्यो.) सूर्य कुंभ राशीस येतो त्या वेळी दर सहा वर्षांनी प्रयागक्षेत्री त्रिवेणी संगमावर भरणारा मेळा. [सं.]

**अर्धकोर** त्री. अर्धा चतकोर; नितकोर (भाकरी).

**अर्धगज** पु. एक हात लांबीचा. पहा:**अरत्नी**

**अर्धगोल** पु. १. गोलाचा बरोबर निम्मा भाग. २. पृथ्वीचा अर्धा भाग: '... चंद्रसंमुख पृथ्वीचा जो अर्धगोल असतो त्यावरील सर्व लोकांना चंद्रग्रहण दृष्टीस पडते.' –आसू ६६.

**अर्धघबाड** पु. घबाडमुहूर्तापेक्षा कमी महत्त्वाचा एक शुभमुहूर्त.[सं.]

**अर्धचरतीय–जरतीय** वि. अर्धे किंवा अर्धवट काम; अनिश्चित स्वरूपाचे काम; मोघम किंवा अनिश्चित भाषण.

**अर्धचंद्र** पु. १. वद्य किंवा शुद्ध अष्टमीचा चंद्र; अर्धा चंद्र. २. अर्ध चंद्राच्या आकारासारखी वस्तू. ३. (गचांडी देताना हाताचा आकार अर्धचंद्राकार होतो म्हणून) हकालपट्टी : 'या अष्टमीच्या चंद्राच्या मुहूर्तावर मलाही अर्धचंद्र मिळाला.' – मूकनायक. (क्रि. देणे, मारणे, मिळणे इ.). ४. (नृत्य.) हाताची चार बोटे एकमेकास लावून ताठ ठेवणे व अंगठा दूर पसरून ठेवणे. ५. अर्धचंद्राकृती (फाळाचा) बाण. [सं.]

**अर्धचंद्रयोग** पु. (ज्यो.) केंद्राव्यतिरिक्त कोणतेही एक स्थान आणि त्यापुढील सहा स्थाने यामध्ये सर्व ग्रह असतील तर होणारा योग – जाबो १७२.

**अर्धचंद्राकृति–ती** १. अर्ध्या चंद्राच्या आकाराची (वस्तू.) २. (पुरा.) लघुपाषाणयुगामध्ये वापरली जाणारी दगडाची अर्धचंद्राकृती (हत्यारे) त्यांचा त्यावेळी बाणांच्या टोकांसाठी उपयोग करत असत. [सं.]

**अर्धचंद्री, अर्धतंद्री** स्त्री. वि. अर्धवट झोप; मूर्च्छा : 'बाण भेदिला जिव्हारी । विदूरथ पडिला धरणीवरी । डोळां लागली अर्धचंद्री । जेवी खेचरी योगिया ।' – एरुस्व ९.३२.

**अर्धजेवा** वि. अर्धवट जेवलेला; अर्ध्या जेवणातून उठलेला; अर्धपोटी.

**अर्धदृष्टिता** स्त्री. (वै.) वस्तू अर्धी दिसणे. (हा दृष्टिदोष आहे). [सं.]

**अर्धदेशी कापड** न. विदेशी सुताचे, हिंदुस्थानात विणलेले कापड.

**अर्धधणी** वि. अर्धतृप्त; अर्धपोटी : 'भलतें करीं परी अर्धधणीं । नुठी कदा ।'– ज्ञा १६.३०.

**अर्धधनुरासन** न. (मल्लखांब) मल्लखांबाकडे पाठ करून कमान टाकून मारलेली अढी. [सं.]

**अर्धनरेश** स्त्री. अर्धा पुरुष व अर्धी स्त्री असा देह धारण करणारा शंकर; अर्धनारीनटेश्वर. [सं.]

**अर्धनार** पु. स्त्रीत्व अपुरे असलेली स्त्री; स्त्री धर्मापैकी काही बाबतीत उणीव असलेली स्त्री. [सं. अर्धनारी]

**अर्धनारीनटेश्वर, अर्धनारीश्वर** पु. १. अर्धे आपले (पुरुषाचे) व अर्धे पार्वतीचे असे शंकराचे रूप; शिवशक्ती. मोहिनीराज हे विष्णूचे रूप (यात अर्धा विष्णू व अर्धी अमृतकलश घेतलेली मोहिनी असे अर्धनारीश्वर स्वरूप असते. नेवासे येथे अशी मूर्ती आहे.) २. अर्धा पुरुष व अर्धी स्त्री एकत्र; शिवशक्ती : 'प्रकृतिपुरुष शिवशक्ती । अर्धनारीनटेश्वर म्हणती ।'– दास २०.३.१०. [सं.]

**अर्धनाल चुंबक** पु. घोड्याच्या नालाच्या आकारासारखा चुंबक.

**अर्धपगारी** वि. निम्म्या पगारावर, निम्म्या वेतनावर काम करणारा.

**अर्धपड–डा** वि. अर्धवट पडलेले, केलेले, बजावलेले, म्हटलेले; अपुरे साधलेले, बजावलेले, वरकरणीपणाने केलेले. (सामान्यत:) अपुरें; वरवर; सरासरी.

**अर्धपद्मासन** न. डाव्या पायाची मांडी मुडपून बसणे व उजवा पाय मुडपून डाव्या पायावर ठेवणे. [सं.]

**अर्धपरोपजीवी वनस्पति–ती** स्त्री. (वानस.) अंशत: दुसऱ्या वनस्पतीतील जीवनरसावर वाढणारी वनस्पती.

**अर्धपक्षकीटक** पु. (प्राणि.) एक कीटक वर्ग. यातील किड्यांचे पुढील अर्धे पंख शृंगी द्रव्याने कठीण झालेले असतात म्हणून त्यास हे नाव आहे.

**अर्धपारदर्शक काच** स्त्री. अस्फुट काच; ज्या काचेतून अस्पष्ट दिसते अशी काच.

**अर्धपार्य** वि. (जीव.) पाणी व विरघळलेले पदार्थ पूर्णपणे आरपार जाऊ न देणारा; अर्धवट झिरपणारा. [सं.]

**अर्धपिका** वि. अर्धवट पिकलेला (फळ वगैरे).

**अर्धपिच्छाकृती** वि. (वन.) अर्ध्यापर्यंत पिसासारखे विभागलेले (पाते, पान). उदा. काटेधोत्रा, मुळा. [सं.]

**अर्धपुडी** वि. अर्धवट; अल्पायुषी (अर्धे झोपेत जाते):'थोडें जिणें अर्धपुडी काया । गर्व करिती रडाया ।'– दास १८.५.३५. [सं.]

**अर्धपुतळा** पु. शरीराचा छातीपासून वरच्या भागाचा पुतळा; मुखवटा. [सं. अर्ध+पुत्तल]

**अर्धपोटी** क्रिवि. अर्धेच पोट भरले असता; पूर्ण न जेवता; भूक पुरी न भागता. (क्रि. जेवणे, जाणे, असणे, उठणे, राहणे.)

**अर्धप्रतिमा** स्त्री. अर्धपुतळा. [सं.]

**अर्धफोड** स्त्री. अर्धवट फोडलेली लाकडे; ठोकळे;(बुरूड) बांबू उभा चिरून केलेले दोन भाग.

**अर्धबाट–बाटगा** वि. १. अर्धवट संस्कार झालेला (वाटण्याचा, कुटण्याचा, शिजण्याचा इ.); अर्धवट बनवलेला; अर्धबोबडा. २. अर्धवट भ्रष्ट झालेला; बाटलेला; जातीतून अर्धवट बाहेर पडलेला; वाळीत टाकलेला. ३. ज्याचा बाप एका जातीचा व आई दुसऱ्या जातीची आहे असा. ४. ज्याला अर्धवट किंवा वरवर माहिती–परिचय आहे असा. ५. (ल.) अर्धवट शिकलेला (विद्यार्थी, कारागीर, पंडित इ.); कडेकडेने पोहणारा.

क्रिवि. अर्धेमुर्धे करून; अपुरेपणाने. [सं. अर्धभ्रष्ट]

**अर्धबाटे पाऊण मराठे** न. १. संकर; पंचमिसळ; खिचडी; धेडगुजरी (भाषा, काम, पदार्थ). बारभाई; बजबजपुरी. २. (ल.) उच्छृंखलपणाची वागणूक, आचार.

**अर्धबिंब** न. १. अर्ध वर्तुळ आणि त्यावरील टिंब; चंद्रबिंदू. २. (ल.) ओंकाराची –प्रणवाची अर्ध मात्रा : 'जंव मात्रात्रय मावळे । अर्धबिंबी ।'– ज्ञा ८.११५. [सं.]

**अर्धबुकट–बुकुट** वि. पहा : **अर्धवट** (राजा.)

**अर्धबेकार** वि. वर्षातून केवळ काही महिनेच काम असणारे (लोक). दिवसाचा काही वेळच काम असणारे (लोक).

**अर्धबोबडा** वि. १. अर्धवट कुटलेले, चेचलेले, वाटलेले (मिरे वगैरे). २. अर्धवट शिजलेला (भात, डाळ इ. पदार्थ); शिजून मऊ न झालेला, बोटचेपा. ३. (ल.) कसे तरी ओबडधोबडपणे केलेले, बिगारी–वेठ (काम.)

**अर्धमागधी** स्त्री. एक प्राकृत भाषा. जैन धार्मिक ग्रंथ या भाषेत लिहिले आहेत. शौरसेनी व मागधी भाषाप्रदेशांच्यामध्ये अर्धमागधी भाषाप्रदेश होता. (म्हणजे हल्लीचा अयोध्या–प्रदेश). त्याच्या दक्षिणेकडील मराठी भाषा काही अंशी या भाषेवरून बनली आहे. प्रचारकाल. ख्रि. पू. ४ थ्या शतकाचा शेवट – ज्ञाको अ ४७५.

**अर्धमातृका अक्षर** न. ओंकारातील बिंदू; तुरीय अवस्था; वैकुंठ : 'बाप रखमादेवीवरु सुलभ साकारु अर्धमातृका अक्षरु'– ज्ञागा १९३.

**अर्धमात्रा** स्त्री.१. ओंकारातील अर्धी मात्रा : 'अर्धमात्रापरते न सापडे । – परमा २.१३. २. एका वेळी घ्यावयाच्या औषधाच्या प्रमाणाच्या अर्ध्या इतके : 'अर्धमात्रा रस देउनिया जीव । रोग दूरी सर्व करिताती ।'– बगाथा २२२.१. ३. (ल.) औषध; रसायन गुटिका: 'पंचगव्य तेंचि जाण अर्धमात्र'– ब गाथा १०४. ५. ४. किंचित; थोडे : 'हे कृष्णकथा अलौकिक । महादोषासि दाहक । भवरोगासी छेदक । अर्धमात्रा सेविलिया ।'– एरुस्व १८.७५. ५. व्यंजन; अर्धस्वर. ६. संगीतात स्वर घेताना घेतलेली विश्रांती; एक मात्रेचा अर्धा काल. पहा : **अर्धमातृका** [सं. अर्ध + मात्रा]

**अर्धमांडीदंड** पु. दंडाचा एक प्रकार. यात दंड काढल्यावर एका मागून एक पाय जवळ घेऊन अर्धी मांडी घालावयाची असते.

**अर्धमुकुल दृष्टि–ष्टी** स्त्री. (नृत्य.) अर्धवट डोळा उघडणे; पापण्यांचे केस एकमेकांस लागतील इतक्या पापण्या मिटणे; आल्हादकारक

सुगंध, सुखस्पर्श ह्या गोष्टींचा या अभिनयाने अर्धबोध होतो. [सं. मुकुल=किंचित उमलेली कळी.]

**अर्धमुर्ध, अर्धेमुर्धे** वि. बरेचसे; अर्धेअधिक; जवळजवळ अर्धे : 'माझं चरित्र तर आप्पांनी अर्धमुर्ध लिहूनच टाकलंय.' – अचावा १०.

**अर्धमूर्ति–र्ती** पहा : **अर्धपुतळा**

**अर्धमेला** वि. १. अर्धवट मेलेला; थोडासा जिवंत राहिलेला. २. जर्जर; मृतप्राय; व्याकूळ : 'ती भुकेने अर्धमेली झाली आहे.'– पाव्ह २३.

**अर्धरथी** वि. (रथात बसून) एका रथीला घेऊनही युद्ध करता येत नाही तो; रथीहून कमी प्रतीचा; (ल.) कच्चा योद्धा : 'अतिरथ नव्हे रथ नव्हे हा केवळ अर्धरथचि ।' – मोउद्योग १२.५८. [सं.]

**अर्धरात्र** स्त्री. मध्यरात्र. [सं.]

**अर्धल–ली–ल्या** पहा : **अर्धेल**

**अर्धलंड –मर्धलंड** पहा : **अधलंड–मधलंड**

**अर्धली पद्धत** स्त्री. (अर्थ.) जमिनीचा मालक व शेत कसणारा यांच्यामधील करारानुसार शेतमाल निम्मा निम्मा वाटून घेण्याची पद्धत.

**अर्धवज** न. अर्धे ओझे; निम्मे ओझे, माल : 'उंट साधारणत: बैलगाडीच्या अर्धवज व माणूस त्यावर व सलित्यात पाला गच्च भरून न कचरता नेतो.'–आप ३५.

**अर्धवट** क्रिवि. १. अर्धेपणाने; अपुरेपणाने; उणीव असलेल्या रीतीने; वरवर; वरकरणी; मोघमपणे. २. अर्ध्यात; मध्यभागी; दोन्ही टोकांच्या मध्ये.
वि. १. अधलामधला; अपुरा. २. (ल.) वेडा; अप्रबुद्ध; कमी समजूत असलेला. ३. अर्धे वय झालेला; तरणा नव्हे असा. [सं. अर्धवत्]

**अर्धवर्तुल–ळ** न. (ग.) अर्धे वर्तुळ; व्यासामुळे होणारा वर्तुळाचा बरोबर निम्मा भाग. [सं.]

**अर्धवार्षिक** वि. सहामाही; अर्धसांवत्सरिक; दर सहा महिन्यांनी होणारे, येणारे, पडणारे. [सं.]

**अर्धवाहक डायोड** पु. (भौ.) अर्धवाहक स्फटिकाचा म्हणजे वाळू किंवा जर्मानियमचा डायोड.

**अर्धवाहकता** स्त्री. (भौ.) विद्युत, उष्णता वगैरेसारख्या शक्ती पूर्णपणे वाहून नेण्याची वाहकाची अक्षमता. [सं.]

**अर्धविराम** पु. १. अर्धी विश्रांती. २. स्वल्पविरामाहून अधिक पण पूर्णविरामापेक्षा कमी विश्रांतीसूचक चिन्ह (;).

**अर्धवेडा** वि. वेडसर; मूर्ख; अर्धवट.

**अर्धवेतन** न. अर्धा पगार; निम्मे वेतन.

**अर्धशासकीय** वि. निमसरकारी; अंशत: अधिकृत. [सं.]

**अर्धशिजा** वि. अर्धवट शिजलेला; पुरता न शिजलेला (भात वगैरे).

**अर्धशिशी** स्त्री. अर्धे कपाळ दुखण्याचा रोग; याने अर्ध्या मस्तकाकडील मानेचा भाग, भुवई, कान, डोळा व अर्धे कपाळ याठिकाणी तरवारीच्या आघातासारख्या वेदना होतात. [सं. अर्धशीर्ष]

**अर्धसत्य** न. अर्धवट खरे; अंशत: सत्य : 'आपला देश मागासलेला आहे हे एक अर्धसत्य आहे.'– श्री ग्रामायन ६९. [सं.]

**अर्धसमवृत्त** न. ज्यात दोन दोन चरण उदा. पहिला आणि तिसरा व दुसरा आणि चौथा यांच्या गणमात्रा सारख्या असतात अशी वृत्ते. उदा. पुष्पिताग्रा. [सं.]

**अर्धसंवेष्टी** वि. (वन.) ज्या पानाचा अगदी खालचा भाग खोडाला अर्ध्यापर्यंत कवटाळतो असे (पान). [सं.]

**अर्धसाप्ताहिक** न.आठवड्यातून दोनदा निघणारे नियतकालिक.
वि. आठवड्यातून दोनदा असलेला. [सं.]

**अर्धसूचीकरण** न. (नृत्य.) उजवा पाय सूची करून उजवा हात उपपद्म करणे व डोक्याच्या वरच्या बाजूस नेऊन ठेवणे.

**अर्धसूत्रण** न. (वन.) पेशीचे विभाजन होत असताना गुणसूत्रांची संख्या अर्ध्याने कमी होण्याची क्रिया. [सं.]

**अर्धसूत्री विभाजन** न. (वै.) गुणसूत्रांचे विभाजन अर्धवट होणे.

**अर्धस्थितस्वर** पु. (संगीत.) द्व्यर्थ आणि द्विगुण या स्वरामधील म्हणजे पाचवा, सहावा व सातवा हे स्वर. [सं.]

**अर्धस्फोटक** पु. (भाषा.) तोंडातून बाहेर जाणारी हवा थोडी जास्त वेळ अडवून ठेवून हळूहळू मुक्त केली असता निर्माण झालेला ध्वनी. [सं.]

**अर्धस्वर** पु. य्, र्, ल्, व् ही व्यंजने स्वरांबद्दल योजतात म्हणून त्यांना 'अर्धस्वर' किंवा 'अंत:स्थ वर्ण' म्हणतात. [सं.]

**अर्धस्वस्तिककरण** पु. (नृत्य.) पाय स्वस्तिक ठेवून उजवा हात कमरेवर व डावा वक्ष:स्थलावर ठेवणे. [सं.]

**अर्धहार** पु. बारा किंवा चौसष्ट सरांचा (पदरांचा) हार; एक दागिना. [सं.]

**अर्धा** वि. एखाद्या वस्तूचे दोन सारखे भाग केले असता त्यापैकी प्रत्येक; निम्मा. [सं. अर्ध] (वा.) **अर्ध्या हळकुंडाने पिवळे होणे –** थोड्याशा लाभाने फुगून जाणे, ताठून जाणे, गर्विष्ठ होणे. **अर्धा जीव होणे–** आजार, काळजी, कष्ट, भीती इ. ने त्रासणे; जर्जर होणे; अधीर होणे.

**अर्धा अधिक** वि. अर्धा व किंचित जास्त; अर्ध्यापेक्षा जरा मोठा.

**अर्धा अर्ध** क्रिवि. निम्मेनिम; अर्धार्धा; अर्धे अर्धे करून. (गो.)

**अर्धाकोर** पु. भाकरीचा आठवा भाग; अदकोर; नितकोर; (काहींच्या मते अर्धा कोर= एक चर्तुथांश किंवा लहान तुकडा.)

**अर्धानिर्धा** वि. जेमतेम अर्धा; अपुरा : '... त्याचे ओठ अर्धानिर्धा शब्दही उच्चारायचे नाहीत.' – झाकोळ १०.

**अर्धामर्धा–मुर्धा** वि. जवळजवळ अर्धा, निम्मा; सरासरी अर्धा; अर्ध्यापेक्षा कमी किंवा अधिक. [सं. अर्धचे द्वि.]

**अर्धायु काल** पु. (भू.) किरणोत्सारी मूलद्रव्याच्या विघटनामुळे मुख्य विघटनक्रिया सुरू झाल्यापासून निम्मी राशी विघटित होण्याचा काळ. [सं.]

**अर्धाला** वि. १. अर्धा (वाटणीचा भाग दर्शविताना एकंदर संख्येपैकी प्रत्येकाविषयी बोलावयाचे झाल्यास).

**अर्धावगुंठित** वि. अर्धवट वेष्टिलेले; अर्धवट आच्छादलेले. [सं.]

**अर्धासन** न. १. अर्धे आसन; बसावयाच्या आसनाचा अर्धा भाग. २. (ल.) सहचारित्व (नवरा आणि बायको, दोन मित्र, राजा आणि सामान्य प्रजाजन इत्यादींचे). ३. ह्या वरून अर्ध्या आसनावर बसण्याचा दिलेला मोठा मान; विशेष घरोबा; परिचय; सलगी; जिवलगपणा. [सं.]

**अर्धासनी** वि. अर्ध्या आसनाच्या वाटणीचा मान उपभोगणारा; अर्ध्या आसनावर बसण्याची पात्रता असणारा; विशेष स्नेह असलेला.

**अर्धासा** वि. अर्ध्यासारखा; जवळजवळ निम्मा. [सं. अर्धसदृश]

**अर्धांग** न. १. अर्धे शरीर; शरीराची एक बाजू; मांड : 'जगजननी असे वामभागीं । भीमकी शोभलीं अर्धांगीं । जैसी विद्युलता झळके मेघीं । दर्शनें भंगी महादोष ।।' – तुगा ७३३. २. पत्नी; स्वस्त्री; गृहस्वामिनी; घरधनीण: 'कीं ते (यमुना) रत्नाकराचे अर्धांग ।' – वह १७८. ३. (ल.) मित्र; साहाय्यक. ४. पक्षवायू; अर्धांगवायू. [सं.]

**अर्धांगवायु–यू** पु. १. अर्धांग; लकवा; ज्यामुळे शरीराचा अर्धा भाग निकामी होतो असा वात रोग. २. घोड्याचा एक रोग. [सं.]

**अर्धांगी** स्त्री. पत्नी; भार्या; स्त्री; बायको : 'अर्धांगी पार्वती सुमनांच्या माळा ।' – शंकराची आरती. [सं.]

**अर्धांगीकार** पु. अर्धी अनुमती; अर्धवट संमती; माफक कबुली. [सं.अर्ध+अंगीकार]

**अर्धी** स्त्री. पहा : **अर्ध, अर्धा** १. निम्मी : 'वडिलांची अर्धी भाकर खाऊं धुऊन ।' – पला ९.१९. २. एक पै किंमतीचे जुने नाणे. ३. तीन आणे चार पै किंमतीचे नाणे. पहा : **अर्दी** (गो.) [सं. अर्ध]

**अर्धी कोर** स्त्री. अदकोर. पहा : **अर्धकोर**

**अर्धी पट्टी** स्त्री. ओझे लादलेल्या बैलावरील पट्टी, कर.

**अर्धी मांडणी शिरस्ता** पु. कुळास शेत करण्यास देताना शेताचे निम्मेनिम उत्पन्न व निम्मेनिम सारा मालकाने व कुळाने वाटून घेण्याची रीत.

**अर्धी म्हैस** स्त्री. चार वेते दिलेली म्हैस (कारण म्हैस सुमारे आठ वेते देते.)

**अर्धूक** न. अर्धा भाग; अर्धेल; निम्मे; निमाई; निमखाई. [सं. अर्ध]

**अर्धेल** स्त्री. १. (सामान्यत:) निम्मी वाटणी. २. (शेतकी व्यापारी) उत्पन्नाच्या वाटणीतील अर्धा हिस्सा; शेतीच्या उत्पन्नातील अर्धा शेतकऱ्याचा व अर्धा कुळाचा हिस्सा; भांडवल पुरविणाऱ्याचा व अंगमेहनत करणाऱ्या इसमाचा प्राप्तीतील अर्धा वाटा. ३. अशा पद्धतीवर दोन इसमांची ठरलेली भागीदारी; अर्धेली. ४. लागवड करणाऱ्याने जमिनीच्या मालकास उत्पन्नाचा अर्धा वाटा देण्यासंबंधीचे कबुलीपत्र. ५. पैशाची, मालाची अर्धी होण्याची स्थिती; मूळ वस्तूचे अर्धे होणे; निम्म्या भांडवलाइतके नुकसान येणे. ६. निम्मे; निमखाई.[सं. अर्ध]

**अर्धेल तिर्धेल** स्त्री. जमिनीच्या उत्पन्नातील तिसरा हिस्सा; एक तृतीयांश उत्पन्न; हे उत्पन्न घेण्याचा खोत वगैरेचा हक्क.

**अर्धेली–ल्या** वि. अर्धेलीचा व्यवहार व तो करणारा (शेतकरी,व्यापारी) : 'गावांत उंड्या गोळा करून अर्धेलीच्या करारावर गाळण्याचा त्यांचा मुख्य व्यवसाय होता'– एल्गार ३६. (वा.) **अर्धेलीने करणे** – जमिनीच्या उत्पन्नाचा अर्धा भाग मालकाला व अर्धा कुळाला अशा कराराने शेत पिकविणे.

**अर्धेवचन** न. ताबडतोब फलद्रूप होणारे वचन, वचक किंवा अधिकार. [सं. अर्ध+वचन] (वा.) **अर्ध्या वचनात असणे, वागणे**– आज्ञाधारक असणे; अगदी तत्परतेने मुकाट्याने आज्ञा पाळणे.

**अर्धोअर्धा** पहा : **अर्धाअर्ध**

**अर्धोत्पादित** वि. (अर्थ.) उत्पादनाची संपूर्ण प्रक्रिया पूर्ण न झाल्याने अर्धवट तयार झालेला (कारखान्यातील माल इ.) [सं.]

**अर्धोत्रा** पु. दरमहा दरशेकडा अर्धा (टक्का) रुपया व्याज किंवा ते देण्याची पद्धती. [सं. अर्ध +उत्तर=वर किंवा अधिक ]

**अर्धोदक** न. १. कमरेइतके खोल पाणी. २. (ल.) उपोषण करून अर्धे शरीर बुडेल इतक्या गंगेच्या पाण्यात राहून प्राणत्याग करणे; जलसमाधी : 'कां बुडोनि प्राण गेले । ते अर्धोदकी निमाले ।' – ज्ञा १८.१९४. [सं.](वा.) **अर्धोदकी येणे** – अर्धवट स्थिती होणे; धड इकडची कड नाही धड तिकडची तड नाही, याप्रमाणे जणू काही नदीच्या पात्रात कमरेइतक्या पाण्यात अडून राहणे. अर्धवट आधार सुटणे : 'क्षेपनिक्षेप तरी बोलत नाही. रेवा तीरींही राहूं देत नाहींत असे अर्धोदकीं झालो आहो' – मइसा १२.१०९.

**अर्धोदय** न. १. एक पर्व; पौष वद्य अमावस्येचा प्रथम भाग, रविवार व श्रवण नक्षत्राचा मध्यभाग व व्यतिपाताचा अंत्यभाग हे योग असता ते पर्व असते. याचे पुण्य कोटी सूर्यग्रहणसमान आहे : 'हे कृष्ण उद्धव अर्ध मात्रा । अर्धोदयो महायात्रा ।'– एभा ५.५५९. २. आकाशस्थ ग्रहांचा किंवा ताऱ्यांचा अर्धा उदय होणे. [सं.] (वा.) **अर्धोदयी पडणे** – आरंभलेले काम अर्धवट होणे, लांबणीवर पडणे; भिजत घोंगडे राहणे.

**अर्धोन्मीलित** वि. अर्धे उघडलेले (डोळे, कळी इ.): 'तेथ अर्धोन्मीलित स्थिती । उपजे तया ।' –ज्ञा ६.२०३. [सं.]

**अर्धोसो** वि. अर्धासा. (गो.)

**अर्ध्या जिवाचा** वि. १. अर्धमेला; अशक्त. २. आजार, काळजी, कष्ट यामुळे बारीक झालेला.

**अर्पण** न. १. देणे; समर्पिणे. २. (देवाला फुले, अलंकार) वाहणे; बक्षीस देणे; बहाल करणे; दान. [सं.]

**अर्पण करणे** क्रि. श्रद्धापूर्वक देणे; प्रेमाने देणे; वाहणे; दान करणे.

**अर्पणपत्रिका** स्त्री. ग्रंथ ज्यास अर्पण करावयाचा त्या संबंधीचा मजकूर असलेले प्रारंभीचे पृष्ठ.

**अर्पणीय** वि. बक्षीस, भेट देण्यायोग्य; अर्पण करण्यास योग्य; देय.[सं.]

**अर्पणे, अर्पिणे** उक्रि. १. बक्षीस देणे; इनाम देणे; दान करणे : 'योगी विषय जे त्यागिती । ते भक्त अर्पिती भगवंती ।।' – एभा २.२८९. २. ओपणे; वाहणे; भक्तिपूर्वक देणे : 'कर्मफल ईश्वरीं अर्पे । तत्प्रसादें बोधु उद्दीपे ।' – ज्ञा १८.२६६. पहा : **अर्पण** [सं. अर्प्]

**अर्पित** वि. १. उपायन, वायन दिलेले; दान केलेले; बक्षीस दिलेले. २. दिलेला; अर्पण केलेला; वाहिलेला. [सं.]

**अर्बुज** वि. अडाणी, पहा : **अरबूज :** 'आम्ही तरी श्रेष्ठ तुझे । तीं गौळियें असतीं अर्बुजे ।'– कथा ४.६.५२.

**अर्बुज** वि. दशकोटी; अर्बुद : 'एका पासौनि एकु आगळां । ऐसिआं सैन्यां अर्बुजें सोळां ।'–शिव ९.२६. [सं.अर्बुद]

**अर्बुद** वि. दशकोटी : 'अर्बुद गायी देतो अथवा देतो स्वराज्य भोगाया ।'– मोआदि ३२.१०. [सं.]

**अर्बुद** न. (वै.) १. गळू; आवाळू; बेंड. २. कर्कपेशींच्या अनियमित

वाढीमुळे निर्माण झालेली गाठ. [सं.]

**अर्भक** न. १. लहान मूल; बालक; लेकरू; तान्हे मूल : 'अर्भकाचे साठीं । पंतें हातीं धरली पाटी ।' – तुगा ४०८२. २. मूर्ख, वेडसर, मतिमंद, असंमजस माणूस. [सं.]

**अर्भकहत्या** स्त्री. नुकत्याच जन्मलेल्या मुलाची हत्या; बालहत्या. [सं.]

**अर्भकावस्था** स्त्री. मुलाच्या जन्मापासून साधारणत: तीन ते चार महिने वयापर्यंतची अवस्था. [सं.]

**अर्भकी** स्त्री. लहान मुलगी; अजाण पोर. [सं.]

**अर्भाटी** स्त्री. एक काव्यप्रकार; भाटांनी रचलेली गीते या काव्यप्रकारातील असतात : 'नेटे गर्जति भाट भाटिव । महाअर्भाटि आरंभिले ।'– असी ८१. [सं. आरभटी]

**अर्मरोग** पु. (आयु.) डोळ्यातील पांढऱ्या भागाकडून बुबुळाकडे पसरत जाणारा एक विकार. [सं.]

**अर्यमा** पु. १. सूर्य. २. पितृगणांपैकी मुख्य : 'आणि पितृगणा समस्ता । माजी अर्यमा जो पितृदेवता ।' – ज्ञा १०.२४४. ३. उत्तराफाल्गुनी नक्षत्र. [सं.]

**अऱ्या** पु. आऱ्या; बोऱ्या; फजिती.

**अर्व** वि. दहाकोटी. [सं. अर्बुद]

**अर्व** स्त्री. (रसा.) दुर्मिळ मृत्तिकाधातूपैकी एक धातू. एक रासायनिक मूलद्रव्य; यास गादोलिनाइत असेही म्हणतात. [सं.]

**अर्वाक** पहा : **अर्वाच्य** : 'अर्वाकानें फार बोलत्ये हाचि त्रास जाला ।' –बयाबाई ९०.

**अर्वाक–च** वि. आधीचा; ठरलेल्या वेळेच्या अगोदरचा; पूर्वीचा; अलीकडचा.

क्रिवि. अगोदर; आधी; अलीकडे. [सं. अर्वाच्]

**अर्वाचिक** वि. कच्चा; अननुभवी; अकुशल; नवखा; नवशिक्या; आधुनिक: 'नाथवाणी सिद्धवाणी गावो ए : तैसे अर्वाचिक गावों नेंए' – लीचउ १९८. [सं. अर्वाचीन]

**अर्वाचिणे** अक्रि. अर्वाचीन रूप देणे; वर्तमान काळास अनुसरून भाषेचे स्वरूप बदलणे: 'प्राचीन मराठी वाङ्मय सामान्य जनतेला सुबोध करण्याच्या काळात अर्वाचिले जाण्याचा संभव आहे. वेदवाङ्मयातसुद्धा फार प्राचीन काळी असे मिश्रण व अर्वाचीकरण झाले होते.'– मसाप ६२.२६०. [सं.]

**अर्वाचिलेली** वि. अलीकडील; अर्वाचीन केलेली; नवीन (भाषा): 'त्याची भाषा अर्वाचिलेली आहे'– वैद्यक ७८.

**अर्वाचीन** वि. अलीकडचा; सद्य:कालीन; आधुनिक; हल्लीचा : 'म्हणितले या ज्ञप्ती । अर्वाचिना ।'– ज्ञा १३.४०. [सं.]

**अर्वाच्य** वि. १. नीच; हलकटपणाचे; खेडवळ; गलिच्छ; घाणेरडे; अभद्र (भाषण, माणूस वगैरे). २. खोडकर; खोडसाळ; खट्याळ; उनाड; उच्छृंखल; द्वाड. [सं. अवाच्य]

**अर्वाच्यगिरी** स्त्री. तोंडाने वाटेल ते भेकत सुटणे; उडाणटप्पूपणा: 'तो अर्वाच्यगिरी करीत भटकत असे'– ओंकार ३०९. [सं. अवाच्य]

**अर्वाळी** पहा : **अरवाडी(ळी)**

**अर्श** पु. १. मूळव्याध. २. बेंड; गळू. उदा. नासार्श; कर्णार्श: 'अर्श, कृमी इ. वर कच्च्या अक्रोडचा रस पिण्यास द्यावा'– फचि २४. [सं.]

**अर्शग्रहणी, अर्षग्रहणी** अतिसार; संग्रहणी; कॉलरा: 'एकार्त अर्ष ग्रहणी' – गीता १३.२४८८. [सं.]

**अर्शद** पु. उत्तम मार्गदर्शक; चांगल्या मार्गाने जाणारा, नेणारा. [फा.]

**अर्शी** वि. मूळव्याधीने पीडलेला; दु:खी; मूळव्याधीचा विकार झालेला.

**अर्सा** पु. १. अंतर; आडपडदा; कालावधी; अवकाश: 'लाड कारण वालीस सर्हद्देस दाखल होण्यास अर्सा फार थोडा' – ऐलेखं ८.४४२४. २. फेरा; मैदान; क्षेत्रफळ; आंगण. [फा.]

**अर्ह** वि. योग्य; साजणारे; शोभणारे; युक्त; लायक: 'यालागी तनुज त्यागावया । अर्ह नव्हेसी निर्धारें ।।' – मुआदि १६.१८१. [सं.]

**अर्हत** पु. १. जैन यती.२. बौद्ध साधू. [सं.]

**अर्हता** स्त्री. एखादे काम करण्यासाठी आवश्यक असलेली पात्रता; योग्यता; लायकी. [सं.]

**अर्हताकारी काळ** पु. एखाद्या पदाकरिता आवश्यक असलेली पात्रता मिळवण्यासाठी विहित करण्यात आलेला कालावधी.

**अर्हताप्राप्त** वि. योग्यता संपादन केलेला; लायक. [सं.]

**अर्हा** स्त्री. मूल्य; किंमत.

**अऱ्हा** क्रिवि. अलीकडे : 'जेया जे अऱ्हां परौते ।'–ज्ञा १५.७५.

**अल्** १. अरबी भाषेतील षष्ठीचा प्रत्यय – चा, ची, चे. उदा. अल् बेरुनी = बेरुनीचा. २. इंग्रजी 'दी' प्रमाणे वापरले जाणारे उपपद. उदा. अलहिलाल = चंद्रकोर. [अर.]

**अल्अवलाद** स्त्री. संतती; मुले, नातवंडे इ. [फा.]

**अल्एकचित्त** न. संपूर्ण एकी; मतैक्य : 'पुढे तुमचे आमचे अल एकचित्त; तफावत न होऊ पावे असा कौल करार करा.'– हिंदभा २.३१.

**अलक** पु. केस; कुरळे केस; केसाची बट. [सं.]

**अलकट– पालकट,** पहा : **अलखट–पालखट** : 'एवढा वेळ भिमा कोळी अलकटपालकट घालून गप बसला होता.'– वाकि ९५.

**अलकतरा** पु. राळ आणि तेल यांचे मिश्रण करून बनवलेला पदार्थ; डांबर. [फा.]

**अलका** स्त्री. १.जिचे वय आठ व दहाच्या दरम्यान आहे अशी मुलगी. २. कुबेराच्या राजधानीचे नाव. [सं.]

**अलकापुरी** स्त्री. १. आळंदी; ज्ञानेश्वरांच्या समाधीचे गाव. २. आळे (जि. पुणे) – ज्ञानेश्वरांनी ज्या रेड्याच्या तोंडून वेद म्हणवले त्या रेड्याच्या समाधीचे गाव. ३. अलका; हिमालयाच्या उत्तरेकडील कुबेराची राजधानी.

**अलकाब** पु. पत्रामध्ये लिहावयाच्या मायन्यातील पदव्या किंवा मायने: 'हलका अलकाब लिहिलियामुळे विषम मानतात.' – दिमरा १७. [फा. लकबचे अव.]

**अलकूत** वि. नाजूक; कोमल; सुकुमार. (व.)

**अलकूत**ू. एक प्रकारचा मासा.

**अलकोल** पहा : **नवलकोल**

**अलक्त, अलक्तक** पु. लाख; अळता; पहा : **अळिता** [सं.]

**अलख** पु. १. अलक; ब्रह्म; त्यावरून ईश्वर. २. गोसावी लोक भिक्षा मागताना हा शब्द उच्चारतात. ३. अदृश्य. ४. अगोचर. [सं. अलक्ष्य]

**अलखगीर – नामी** पु. बिकानेर येथील एका चांभाराने स्थापिलेला पंथ. हा मूर्तिपूजेविरुद्ध होता.

**अलखट–पालखट, अलखंड–पालखंड, अलखण–पालखण, अलखत–पालखत** न. चाराच्या आकड्यासारखी घातलेली मांडी; मारलेली बैठक; आसन मांडी. [पालखचे द्वि.]

**अलखनिरंजन** पहा : **अलख**

**अलखालक–ख, अलखालिक** स्त्री. रू भरलेले एक किनारीदार वस्त्र. एक प्रकारचा डगला, अंगरखा. [फा.]

**अलग** वि. वेगळे; निराळे; भिन्न; स्वतंत्र. [सं. अलग्न]

**अलग–अलगत** क्रिवि. १. निराळ्या प्रकारे; भिन्नपणे; फटकून. २. कशास न लागता; स्पर्श न होता; सरळ अडथळ्याशिवाय; तडक (धोंडा, गोळी इ. जाणे, उडणे, पाठ म्हणणे वगैरे). ३. पृथक; दूर. ४. विवक्षित संस्कार सबंध न होता (क्रि. असणे, राहणे, ठेवणे). ५. हलकेच; अचळ; अल्हाद. ६. स्वतंत्रपणे; मोकळेपणे. ७. लोंबकळत; ओळंबत; अधांतरी; एकीकडे; एकलकोंडे. [सं. अलग्न]

**अलगट** वि. १. स्वतंत्र; फाजील : 'अहो सत्यभामे अलगटी । सांपे जाहलीस तूं धीटी । परि न मागतां जगजेठी । मणीलागी दीपलीसी ।।'– कथा ४.१८.११८. २. द्वाड; कुभांडी; भांडखोर.

**अलगटबलगट** न. आळ; तोहमत; बालंट; विघ्न; संकट. [बलगटचे द्वि.]

**अलगड** स्त्री. १. घोटाळ्यात पाडणारे, मती कुंठित करणारे काम, उद्योग; त्रास; अडचण (क्रि. पडणे, येणे). २. पेच; कोंडी; कातरी. [अडगळचा वर्णव्यत्यास]

**अलगणे** अक्रि. १. (पासून) लोंबकळत किंवा लटकत राहणे (पिकलेली फळे वगैरे). २. झुबके घड किंवा घोस लटकत राहणे – (फळासंबंधी). ३. (सामान्यत:) ओळंबणे; लोंबकळणे. ४. पूर्ण पिकून गळावयास होणे (फळ). (को.) : 'त्यातून अलगलेले चांगले चांगले पाड तेवढे भागीरथीचे ओटीत पडले.'– बाळमित्र २.६७. [सं. आ + लग]

**अलगत–द–ज** १. पहा : **अलग** २. अचळ; अधर; हळूवारपणे : 'त्याने मेहेरजानला आधार देऊन अलगत उचलून नावेत घेतले.' – वज्राघात ४.

**अलगन** न. अलग असणे, राहणे; सर्वांपासून बाजूला, एकटे राहणे किंवा ठेवणे.

**अलगपीत** क्रिवि. १. एकदम; एकाएकी; अकस्मात. २. सावकाश; हळूच; अलगत; न हालवता, हलता; बेताने. ३. चोरून; छपून; चोर पावलाने; नकळत. ४. (इतर अर्थासाठी) पहा : **अलग–अलगत** [सं. अकल्पितचा अप.]

**अलगरजी–जू, अलगरदी** वि. १. मंद; ढिलाईचा; निष्काळजी; हलगर्जी; अव्यवस्थित; बेशिस्त; विस्कळीत; सैल (इसम, उद्योगधंदा) : 'परंतु अलगर्जीपणामुळे'– साक्रेसं ९. २. (विशेषत: अलगरजी) ऱ्हास पावलेला; खालावलेला; वय झाल्यामुळे उतरलेला; चुराडा झालेला; बिनटिकाऊ; पहा : **हलगर्जी.** ३. आपल्या कामापुरते दुसऱ्याचे बाह्यात्कारी आर्जव करणारा; आपलपोट्या; स्वार्थी. [अर. अहल्–ई–गरज]

**अलगरजी–ने** क्रिवि. ढिलेपणाने; सैलपणाने.

**अलगी** स्त्री. समुद्रावरील शेवाळसदृश वनस्पती : 'या निळ्या हिरव्या अलगीचे पंधराशे प्रकार ज्ञात आहेत.'– महासागर १००.

**अलगुजे–गूज** न. १. एक प्रकारचा पावा. हे वाद्य बांबूचे किंवा धातूच्या नळीचे असते. लांबी वीतभर, जाडी अंगठ्याएवढी. बासरी, मुरली हीही याच जातीतील वाद्ये आहेत. २. खोगिराच्या दोन्ही बाजूंना पाठीवर जोडणारे नवारीचे पट्टे. [फा. अल्गोजाह]

**अलगे** अ. समोर.

**अलजुल** न. देहधर्मावर अवलंबून असलेले आलंबनादी दोष : 'तैं स्वभाव राहिलेले उगे तेथे अलजुल कें रीगे'– सव ३६४. [क. अले]

**अलटापालट** स्त्री. मागचे पुढे; आधीचे मग. पहा : **उलटापालट** [पालटचे द्वि.]

**अलणवाड** पु. खार किंवा खाजण नसणारा भू–भाग.

**अलतगमा** वि. अक्षयी : 'मौजे मदनू इनाम अलतगमा बाफरजंदा बहाल करावा.'– पुअभा १.२५२

**अलतड** स्त्री. ऐलतड; नदीची अलीकडली बाजू, अलीकडचा काठ; अल्याड.

**अलतमघा** स्त्री. राजाने दिलेली इनामी जमीन; सनद; वंशपरंपरागत जहागीर.

**अलता भलता** वि. कोणीतरी; अनोळखी; अलबत्या गलबत्या; गोमाजी तिमाजी; गैरमाहितीचा. [भलताचे द्वि.]

**अलप** पु. सरकी, पेंड, ढेप वगैरे जनावरांचा खुराक.

**अलपकरणी** वि. हलक्या कानाचा : 'खावंद अल्पकरणी. मुत्सद्दी व सर्व जी जी म्हणतात'-पेदभा २९. १७५. [सं.अल्प+कर्ण]

**अलपट** वि. सोपा; फालतू; नगण्य : 'केमिस्ट्रीसारख्या अलपट विषयानं त्याचा मुडदा पाडला'– लव्हाळी २८४.

**अलफ** वि. एक हजार. (अरब सालाबाबत उपयोग). [अर.]

**अलबत्–त्ता** क्रिवि. १. खचित; खात्रीने; जरूर; खरोखर; निश्चयाने; निश्चितपणे; खास; अगत्यपूर्वक; हमखास: 'हे गृहस्थ संभावित, शांत आणि अलबत्ता जमाखर्चाचे कामात हुशार असलेच पाहिजेत'– विक्षिप्त १.१४४. २. निदानपक्षी; निदान; कमीत कमी (रक्कम, संख्या). ३. तथापि. [अर. अलबत्ताह]

**अलबत्या–गलबत्या** पु. कोणीही; कोणीतरी; भलतासलता; साळकोजी माळकोजी; सोमाजी गोमाजी; य:कश्चित, लुडबुड्या माणूस; आलतूफालतू; कधी विशेषणार्थी उपयोग : 'कित्येक अलबतीं गलबतीं माणसें किल्लेदारांच्या घरीं येऊन रहात'– कोरकि ८०. [अलबत-त्याचे द्वि.]

**अलबम** चित्रवही; चिकटवही; चित्रे, छायाचित्रे वगैरे एकत्र ठेवण्याचे (संग्रह) पुस्तक; यात प्रसिद्ध पुरुषांचे फोटो, लग्नकार्यातील सणसमारंभातील फोटो, तसेच स्वदस्तुरचे लेख, गद्यपद्यातील वेचे

वगैरे ठेवतात. [इं.]

**अलबला** पहा : **अलाईबलाई**

**अलबलीत गलबलीत** वि. ढिला; मंद; सैल; अव्यवस्थित; विस्कळीत. [सं. गलितचे द्वि.]

**अलबिदा** पु. ताबूत बुडविल्यानंतर या शब्दाचा उच्चार करतात. याचा अर्थ निरोप असा होतो. [फा. अलविदा]

**अलबेल** स्त्री. सर्व नीट सुरळीत चालले आहे अशी हमी; अहवाल; हालहवाल : 'पार्लमेंटच्या माहितीकरिता प्रति दहा वर्षी हिंदुस्तानची अलबेल कशी आहे याचा रिपोर्ट.' - लोटिकेले १.३२९.

**अलबेला** वि. १. हलका; हवेशीर; बेफिकिरीचा (कपडा, गती). २. सैल; पोकळ; ढिले (गाठोडे, बोचके, काम). ३. कमजोर; जुजबी; दिखाऊ (इमारत). ४. अक्कडबाज; नखरेबाज (इसम). ५. सुंदर; रंगेल; प्रिय; लाडका : 'तो जिवबादादा बक्षी अलबेला ।'- ऐपो २८३. ६. मोघम; गुळमुळीत; अनिश्चित (भाषण). [हिं अलबे (भे) ला= १. अकृत्रिम २. निरपराध (मूळ अर्थ)]

**अलबेली** स्त्री. रंगेल स्त्री; चाळकभवानी; चटकचांदणी.
क्रिवि. सहजासहजी.

**अलबेले** वि. अलगद : 'पागोटें तसेंच अलबेलें डोकीवर ठेऊन तो उठला'- सुय ४१.

**अलभ्य** वि. मिळण्याला, लाभण्याला कठीण; संपादन करण्याला कठीण, अशक्य. [सं.]

**अलभ्यलाभ** पु. लाभण्याला अशक्य; अटकळीच्या बाहेर किंवा असंभवनीय असा लाभ; अनपेक्षित फायदा; दुष्प्राप्य मिळकत; केवळ दैव योगाने झालेला लाभ. [सं.]

**अलम्** क्रिवि. पुरें; बस. [सं.]

**अलम** पु. झेंडा; निशाण. [फा. अलम]

**अलम** पु. लहान पागोटे; बत्ती (मुलाकरिता). [फा.]

**अलम** वि. १. जग; लोक; जनसमुदाय. २. काळ; स्थिती; अंमल. पहा : **आलम**. ३. सर्व. [फा. आलम =जग]

**अलमक** क्रिवि. नेमका. (व.)

**अलमखाना** पु. वाद्यशाळा; छत्र, पालखी, चवरडोल, हौद, निशाणे इ. सामान ठेवण्याचे ठिकाण. [फा.]

**अलमगिरी** वि. एक नाणे. [फा.]

**अलमगिरी पैसा** पु. औरंगजेबाच्या शिक्क्याचा पैसा.

**अलमगीर** पु. जगज्जेता; औरंगजेबाची पदवी, किताब. [फा.]

**अलमदांड** वि. अतिशय उद्धट; दांड; आडदांड; मस्तवाल; धिंगाणा घालणारा.

**अलमदुनिया** स्त्री. सर्व जग; मानवी जात. [फा.]
(वा.) **अलम दुनिया झुकणे** -(विशिष्ट प्रसंगी) १. सर्व जग विनम्र होणे. २. माणसांची अलोट गर्दी होणे; सर्व लोक भुलून जाणे.

**अलमपन्हा** वि. जगाचा प्रतिपाळ करणारा; जगरक्षक. [फा. आलमपनाह]

**अलमरोशन** वि. जगाला प्रकाशविणारा; जगद्विख्यात : 'त्याचा फायदा तो अलम-रोशन आहे.'- पया [फा.]

**अलमस्त** वि. दांडगा; धटिंगण; बळकट; मत्त : 'इथलें साधू चार महिन्यात असे काही लालबुंद व अलमस्त होतात की ?' - हिप्र १८०.

**अलमारी** स्त्री. १. खण असलेले कपाट. २. (ल.) साठा; संचय; तिजोरी.

**अलर्क** पु. १. पिसाळलेला कुत्रा व त्याच्या चावण्यापासून होणारा रोग. २. रुईचे झाड (पांढरी रुई).

**अलल् हिशेबी** वि. चालू हिशेबी : 'अलल् हिशेबी वसूल' - मइसा २२.७३. [अर. अल्हाल=चालू+हिसाब]

**अललल्डुर्र** उद्गा. पौराणिक नाटकांत देव व राक्षस यांची लढाई चालली असता अललडुर्र असे राक्षस ओरडत असत; म्हणून पौराणिक नाटकांना अललडुर्रची नाटके म्हणत असत.

**अलवचिक** वि. (अर्थ.) स्थिर (मागणी); ताठर.

**अलवण-णी** वि. बिगरमीठ; अळणी : 'हरिप्राप्तीविण प्रवृत्तिक ग्रंथ । काय कविता अलवण ते ।' -हरि २१.२४. [सं.]

**अलवण,अलवाण** स्त्री. न. १. एक प्रकारची शाल. २. एक प्रकारचे तांबडे कापड. ३. केशवपन केलेल्या ब्राह्मण विधवा नेसत असत ते तांबडे वस्त्र.

**अलवर तालवर, अलवार तलवार** न. पु. अव. थोर किंवा सन्माननीय समजून वागविणे; शिष्टाचार; सभ्यपणा दाखवून मोठेपणा राखणे किंवा मोठेपणाने वागविणे. (क्रि. करणे, ठेवणे, राखणे); एखाद्याची मिजास राखणे. [तालवरचे द्वि.]

**अलवार** वि. कोमल (व.); पहा : **अरूवार-ल :** 'अधिकचि ते अलवार जाहलें ।' - विक ५५.

**अलस** पहा : **आळस**

**अलसंदा, अलमंदा** पु. अळसुंदा; चवळीसारखे मोठे कडधान्य. [का. अलसंदी]

**अलसिका** स्त्री. पेटके आणणारी महामारी; कॉलऱ्याची दुसरी अवस्था; पेटके; पहा : **विषूचिका** [सं.]

**अलक्ष** न. १. दुर्लक्ष; हयगय; आळस; टाळाटाळ; चुकवाचुकव : 'कोणा एका यक्षें केलें अलक्ष आपुल्या कामीं' - मेघदूत. पहा : **अलक्ष्य** २. अदृश्य: 'ते संधीस गोरक्ष जाऊन । अलक्ष आदेस जल्पतसे ।'- नव ९.११०. [सं. अलक्ष्य]

**अलक्षपण** लक्षात न येण्याजोगी स्थिती; दुर्ज्ञेयता : 'बोलता ना उगला अलक्षपणें ' - ज्ञा १३.११११. [सं.]

**अलक्षित** वि. अटकळ किंवा अनुमान न केलेले. (बद्दलचे किंवा विषयी) लक्ष न दिलेले; न शोधलेले; न पाहिलेले; अकस्मात.

**अलक्ष्मी** स्त्री. दुर्दैव; दुर्भाग्य; दारिद्र्य; विपत्ती; अवलक्ष्मी; अक्काबाई; गैरव्यवहाराने आलेला पैसा. [सं.]

**अलक्ष्य** न. १. दुर्लक्ष; गैरसावधता; अनवधानता. २. परमेश्वर; ब्रह्म. वि.(अप. अलक्ष); कल्पनातीत; दुर्बोध; अज्ञेय; अतर्क्य : 'ध्वज-वज्रां कुशरेखा । चरणींची सामुद्रिकें देखा । न वर्णवतीं सहस्रमुखा । ब्रम्हादिकां अलक्ष्य ।'- एरुस्व १.२२.(वा.) [सं.] **अलक्ष्य**

**लेखणे, धरणे, मोजणे, मानणे, पाहणे, जाणणे** - किंमत न देणे; क्षुद्र किंवा क्षुल्लक मानणे; तिरस्कारणे; अनादरणे; अवज्ञा करणे.

**अलक्ष्या** स्त्री. १. योग्यांची एक मुद्रा. पहा : **मुद्रा** २. योग्यांचे एक प्रकारचे आसन. [सं.]

**अलंकरण** न. शोभविणे; भूषविणे; नटविणे; अलंकृत करणे. [सं.]

**अलंकार** पु. १. दागिना; भूषण (पोषाखातील व दागिन्यातील), रत्ने, दागदागिने, शोभादायक वस्तू इत्यादी : 'अलंकारातें आलें । तरी सोनेपण काई गेलें ।'- ज्ञा २४.१२४. २. (भाषेतील) शब्दरचना, अर्थरचना, उपमा, रूपक, यमक, प्रास, अनुप्रासा इ. अलंकार. ३. (सामा.) शोभणारी, शोभा देणारी वस्तू; गुण. ४. (संगीत.) स्वरांची विशेष व नियमित रचना. ५. साहित्यशास्त्र. [सं.]

**अलंकारणे** उक्रि. अलंकार घालणे; सुशोभित करणे; आरास करणे. [सं. अलं+कृ]

**अलंकारशास्त्र** न. (सास.) भाषेची चित्ताकर्षक शब्दरचना; अर्थरचना करणाऱ्या उपमा, रूपक, यमक, अनुप्रास इत्यादी अलंकारांचे विवेचन करणारे शास्त्र. साहित्यशास्त्रातील अलंकारांची चर्चा, विवरण करणारे शास्त्र. [सं.]

**अलंकृत** वि. शोभविलेले; विभूषित; सुशोभित; सजलेले.

**अलंग** स्त्री. १. लांबच लांब सोपा; चाळ; गोठा; खंदक; तट; कोट; संरक्षक भिंत; फौजेची पागा; रांग वगैरे : 'इकडील अलंग फोडून पलीकडील सफेल फोडून गोळा फा(पा)र झाला'- होकै२०. २. फरा (लढाईतला); एक टोकदार शस्त्र. ३. बाजारपेठेतील दुकानांची लांब ओळ, रांग. [क. अलगु]

**अलंग** पहा : **अलंबी**

**अलंगणे - दुलंगणे** अक्रि. चुकणे -मुकणे; चुकून राहणे.(व.) [अलगचे द्वि.]

**अलंगधुपार्ती** स्त्री. निशाण व धुपार्ती (दाखविणे); फसविणे; चकविणे. [अलंग=निशाण+ धुपारती]

**अलंगनौबत** स्त्री. डंका-निशाण; पहारा : 'अलंग नौबतीची सेवा घेणें.'- शाछरो ५९२.

**अलंगभवरी** स्त्री. पायाच्या एका अंगठ्यावर फिरणे : 'देता छत्रभवरी अलंगभवरी ।' - उगी ४५९. [अलग + भवरा]

**अलंघन** न. (संगीत.) रागविस्तार करताना एखादा स्वर पूर्णपणे घेणे. [सं.]

**अलंघनीय-अलंघ्य** वि. ओलांडून जाण्याला कठीण; दुर्लंघ्य; उल्लंघन करण्याला कठीण. [सं.]

**अलंटपू** वि. उडाणटप्पू; उनाड; व्रात्य : 'बेकार प्वार अलंटपू निपजला' - मसाप ४.४२.८. (कु.)

**अलंदे** न. मातीचे मोठ्या तोंडाचे भांडे. डेरा. [सं. अलृजर]

**अलंप्रतीति, अलंप्रत्यय** स्त्री. पु. पुरेसेपणाची जाणीव; समाधान; तृप्तता; शांती. [सं. अलम्+प्रतीति]

**अलंबी** क्रिवि. आधारावाचून; निराधारी; अनिश्चित; धोक्याच्या ठिकाणी (फांदीच्या टोकावर, कड्याच्या काठावर); भक्कम आधार आश्रय किंवा टेका नसता. (कों.)[सं. आलंब]

**अलंबुद्धि-द्धी** स्त्री. समाधान, तृप्ती; तृप्तता; तृप्ततेची भावना. [सं. अलम् = पुरे + बुद्धी]

**अला** पु. वैभव; श्रेष्ठता.
वि. सर्वश्रेष्ठ; सर्वज्ञानी. [अर.]

**अलाईबलाई, अलायबलाय** स्त्री. सर्व दु:ख - त्रास - पीडा, संकट. दृष्ट काढण्यासाठी दिवे ओवळताना किंवा कानशिलावर बोटे मोडताना अनिष्ट निवारण व्हावे म्हणून असे म्हणतात; (यावरून) दृष्ट काढणे. (क्रि.घेणे) : 'मातुश्रींनी अलायबलाय घेऊन मस्तकी विजयहस्त ठेवला' - चित्रगुप्त ११; 'तुका म्हणे वर्णु काय घेतो अलाया बलाया ।' [अर. बला = दुर्दैव]

**अलागत** पहा : **अलग**

**अलाड** क्रिवि. अलीकडे; येथे; इकडे; ह्या किंवा जवळच्या बाजूस. पहा : **अलतड** [क. अल]

**अलाड पलाड** क्रिवि. अलीकडे पलीकडे; इकडेतिकडे; ऐलपैल.

**अलाणटप्पू-अलालटप्पू** पु. १. निष्काळजीपणे, उनाडपणे भटकत राहणारा इसम; उडाणटप्पू. २. आयतगब्बू; ऐदी.

**अलात-थ** न. (नाविक.) १. वल्ह्याचे पाते किंवा फळी. २. तारवे पाण्यातून जमिनीवर ओढण्याची जाड व बळकट दोरी : 'गलबताची मरामत करून सा गलबते अलाथ अवदाण अवजारसह वर्तमान तयार केली असत ' - पेद ३३.१०.

**अलात** (अलात्) न. कोलीत; मशाल. [सं.]

**अलात अवदात** न. (नाविक) गलबताचे सामानसुमान. [फा. आलात = हत्यारे द्वि.]

**अलातचक्र** न. कोलीत गरगर वाटोळे फिरवले असता दिसणारे चक्र; अग्निचक्र. [सं.]

**अलाद** स्त्री. गंजिफातील एक संज्ञा.

**अलाद-अलादि-दी** क्रिवि. अचानक; अलगद. पहा : **अलग** ५ : 'स्वस्थ गच्छलों, अलाद ठकलों ।' -अमृत२८.

**अलादा** पहा : **अलाहिदा** : 'बराता तीन अलादा अलादा सावकाराचे नांवें होत्या.'- मदभा २.३४. [फा.]

**अलादियाशाही व्यवहार** पु. बिनहिशोबी कारभार; येईल तो जमा, होईल तो खर्च आणि राहील ती शिल्लक असा व्यवहार.

**अलाब-(म)-ला** संकट. पहा : **अलाईबलाई** : 'मी एकटा मेलों तरी शिवाजी राजे यांची अलाबला गेली; लाख मरावे परंतु लाखांचा पाळणारा कायम रहावा.'-मदरु १.५४. (बा.) **अलाबला घेणे**- मायेने गालावरून हात फिरवणे : 'अलामला घेईस्तवर तर निगालासुदा' - पाचोळा २३. पहा : **अलाईबलाई**

**अलाबु-बू** पु. १. दुध्या भोपळा : 'बुडतां जों चिंतेच्या झालें अद्भुत अलाबु ओघीं तें ।' -मोसभा १.७६.
स्त्री. १. पेशी; पिशवी. २. रक्त काढण्याची तुंबडी.
न. भोपळ्याचे बनविलेले पात्र, भांडे. [सं.]

**अलाभ** पु. १. लाभ, मिळकत न होणे. २. जरुरी; पाहिजे असणे;

अभाव; वाण. [सं. अ + लाभ; लभ् = मिळणे]

**अलायी** वि. प्रचंड; व्यापक; अलिजाही. [अर्. अला = मोठा]

**अलायी कारखाना** पु. मोठा कारखाना; फापटपसारा; प्रचंड तयारी; मोठे प्रदर्शन; डामडौल; व्याप.

**अलालनामा, अलाल हिशेब** पु. १. चालू हिशेब; देण्याघेण्याचा किंवा आगाऊ दिलेल्या रकमांचा हिशेब; चालू खाते. २. (विशेषत : अलालनामा) कच्चा हिशेब, टाचण.

क्रिवि. अशा हिशेबाप्रमाणे-रीतीने. [अर्. अलहाल = चालू, वर्तमान]

**अलालय–अलाला** उद्गा. आश्चर्य व्यक्त करणारा उद्गार.

**अलावत** स्त्री. बायको. (कु.)

**अलावत लावणे** एखादा जड पदार्थ ओढण्याकरिता बैलांच्या जोड्या लावणे. (व.)

**अलावह–अलावा** वि. शिवाय; वेगळे; निराळे : 'अलावा टपाल हशील' – के १२.२.२९. [फा.]

**अलावा** पु. १. मोहरमात डोल्यांच्यापुढे जी खाच खणतात ती. या खाचेत आग पेटवून मुसलमान लोक तिच्याभोवती नाचतात. २. आगटी; नगारा, चौघडा तापविण्याची जागा. [सं. अलात]

**अलाहिदा** वि. अलादा; वेगळा; भिन्न; पृथक; विभक्त; स्वतंत्र.

क्रिवि. वेगळेपणाने; भिन्नपणे; अलगपणे. [अर.]

**अलाहिदा जमा** स्त्री. स्वतंत्र जमा; जमीन महसूल सोडून आलेली इतर बाबींपासूनची जमा रक्कम.

**अलांछन** वि. कलंकरहित : 'चंद्रमे जे अलांछन ।' – ज्ञा १८.१७९८. [सं.]

**अलांडाबलांडा** पु. अडथळा; विघ्न : 'नसता अलांडा बलांडा व जेवे वेठबिगारी मनस्वी घालून तगादा करितातित.'– मसाप २.२९६.

**अलि** पु. भुंगा; भ्रमर. [सं.]

**अलिउल–ळ** न. भुंग्यांचा थवा : 'माझि सांपडलेनि अलिउळें । जळावरि कळिका जेवि आंदोळे ।' –ज्ञा ११.२४९.

**अलिक** न. कपाळ; ललाट; भाल : 'भीमातें वारुनि गुरूनें नाराच हाणिला अलिकीं ।' – मोद्रोण ११.६३. [सं.]

**अलिखित** वि. लेखी नसलेला (कायदा, ठराव, नियम). [सं.]

**अलिखितभाषी** वि. लिपिबद्ध नसलेल्या अशा भाषा बोलणारा (आदिवासी).

**अलिजिव्हा** स्त्री. पडजीभ; मृदुतालूच्या टोकाला चिकटलेला जिभेसारखा एक मांसल भाग. [सं.]

**अलिज्याहा कारभार** पहा : **अलीजाहाँ दरबार**

**अलिता** पु. १. लाख वगैरे पदार्थांचा रंग; अळिता; याचा तांबड्या शाईप्रमाणे उपयोग होतो. बायका पायांनाही लावतात. २. अलित्याच्या रंगात बुडविलेला कापूस. २. अर्धे सुती व अर्धे रेशमी कापड.[सं. अलक्त]

**अलिनी** स्त्री. भ्रमरी : 'कस्तुरि जें तिजसवें अलिनी विराजे'– दस्व १४.

**अलिप्त** वि. १. तटस्थ; तिऱ्हाईत; अलग; वेगळा; न गुंतलेला. २. न चोपडलेले–माखलेले; भ्रष्ट न झालेले; निर्मळ. २. (ल.) दुष्कृत्ये करून पुन्हा शुद्ध किंवा पवित्र दिसणारे. ३. संलग्न; संयुक्त न झालेला; निराळा : 'आता ऐक वो सुंदरी । परमात्मा अलिप्त चराचरीं । संयोग वियोगाची परी । न धरीं संसारी सर्वथा ।।'– एरुस्व १३.६२. [सं.अ + लिप्= माखणे]

**अलिप्तता** स्त्री. दूर राहण्याची, तटस्थ राहण्याची वृत्ती. [सं.]

**अलिप्ततावाद** पु. जागतिक सत्तास्पर्धेत किंवा संघर्षात कोणत्याही बाजूने भाग न घेता तटस्थ राहण्याचे धोरण. [सं.]

**अलिप्ततावादी** वि. तटस्थतेचे धोरण अनुसरणारा. [सं.]

**अलिप्तपणा** पु. अलिप्त असण्याची अवस्था; तटस्थता; अनासक्तता; पवित्रता : 'अलिप्तपणाचा निश्चयो बोलिला असे ।।' – दास १.१.७.

**अलिप्तस्थिती** पहा : **अलिप्तपणा**

**अलिबंद** पु. बंदुकीचा एक भाग : 'बंदुखा–खाशाच्या सुमार चार. १ प्रत दरोबस्त मुलामा सोनेरी अलिबंदास कड्या दोन रुप्याच्या.'– ऐसंसा २.२२०.

**अलिबागी** वि. रुपयाचा एक प्रकार. याच्या एका बाजूस फारशी अक्षरे काढलेली असत व दुसऱ्या बाजूस 'छत्र-पति' अशी अक्षरे असत.

**अलिंग** न. (तत्त्व.) प्रकृति पुरुष संयोगजन्य संसाराच्या चार अवस्था योगात मानल्या आहेत. त्यातील पहिली अवस्था म्हणजे अलिंग. या अवस्थेत त्रिगुण साम्यावस्थेत असतात.

वि. (वन.) निर्लिंग; लिंगभेदयुक्त प्रजोत्पादनाचा संबंध नसलेली व बीजुकांच्या साहाय्याने घडुन येणारी नवीन वनस्पतीची निर्माणपद्धती. [सं.]

**अलिंद** पु. घराच्या पुढील ओटा; देवडी; महाद्वारावरील गोपुर : 'अलिंदी नंदाचे घन, रुचिर चैतन्य मिरवे ।' – सारुह १.५७. [सं.]

**अलीक** वि. खोटे; असत्य.

पु. खोटा माणूस; लबाड माणूस : 'काय अलीका ? सगळी प्रीति लटकी ती ठरली ?' – मंमं ३. [सं.]

**अलीकडचा–अलीकडील** वि. १. ह्या किंवा जवळच्या बाजूचा. २. हल्लीचा; थोड्या दिवसांचा; नवा; आधुनिक; अर्वाचीन.

**अलीकडून** क्रिवि. १. ह्या किंवा जवळच्या बाजूने; इथून. २. (अमुक–मागील काळापासून) आतापावेतो; अमुक काळापुढे.

**अलीकडे–स** क्रिवि. १. ह्या किंवा जवळच्या बाजूला; येथे; इकडे. २. (या काळात); सांप्रत, हल्ली.

**अली–(लि)–गोल** पु. गोलंदाज; तोफची : 'पुण्याहून बारुद आली त्याजबरोबर अलीगोल दोनशे नवे माणूस आलें'– ऐलेख १२.६३४४. [फा. अह्लिगोल]

**अलिजाहाँ** वि. महामान्य; थोर पदवीचा (राजा, बादशहा).

**अलीजाहाँ दरबार** पु. १. अवाढव्य थाटमाट. २. (ल.) अव्यवस्थित व अंदाधुंदीचा कारभार. (वैभवशाली).

**अलीजाहाँ बहादर** पु. १. एक पदवी २. (ल.उप.) महामान्य, श्रेष्ठ, थोर गृहस्थ; बडे लोक. [अर. आलीजाह]

**अलीजाही** पहा : **अलीजाहाँ दरबार**

**अलीफ** पु. 'अ' या उच्चाराचा अरबी पहिला वर्ण. पत्रात डोक्यावर मराठीतील श्रीकाराप्रमाणे लिहितात. [अर्.]

**अलुक समास** पु. ज्या समासात विभक्तीच्या प्रत्ययाचा लोप होत नाही तो. उदा. सरसिज (कमळ), युधिष्ठिर इ. [सं.]

**अलुका–की** पु. स्त्री. व्यसन; भूक. पहा : **अळका**
वि. भुकेलेला.

**अलुणा** पहा : **अलवण**

**अलुता–त्या** पु. तेली, तांबोळी, साळी, माळी, जंगम, कळावंत, डौरी, ठकार, पडशी, तराळ, सोनार, चौगुला हे बलुत्याच्या खालच्या वर्गाचे १२ हक्कदार. (यातील सोनार=सरकारी नाणी पारख करणारा पोतदार).

**अलुतीं बलुतीं** न. अलुतेदार व बलुतेदार यांना असणारे वतनी हक्क.

**अलुतेदार** पु. अलुत्याचा हक्क असणारा.

**अलुदा** वि. १. मिश्रित. २. (ल.) जुळणारा; परिचित ३. (ल.) दूषितपणे; अपवित्रपणे मिसळलेला.

**अलुबुखार** पु. एक प्रकारचे आंबूस व रुचकर फळ.

**अलुमंदार** पु. मोठ्या, पिवळ्याधमक शोभापुष्पांची वेल.

**अलुमालु** व. थोडे; लहान; किंचित.

**अलुलकी** स्त्री. १. मोहबत; कृपा; मेहरबानी. २. आत्मीयता; आपलेपणा.

**अलुलित, अलूल** वि. बुजट; नाचरा; बुजरा; रगेल; मस्त (ठाणबंद घोडा). [सं. आ+लुल्=लोळणे]

**अलू** वि. थोडासा.

**अलेकम सलाम** उद्गा. तुम्हांला सुखशांती लाभो, असे मुसलमानांत एकमेकांस भेटताना नमनार्थी म्हणण्याचा प्रघात. [अर. अलेकुम् अस्सलाम्]

**अलेख** वि. अगणित; अमाप : 'नेली संपति अलेख ।तेया तस्करी ।'– क्रिपु ४२.८८.

**अलेपाक** पु. आल्याचा तयार केलेला एक औषधी प्रकार. आले व साखर शिजवून तयार केलेल्या वड्या.

**अलेमान** स्त्री. दोन हात लांब व काहीशी बाकदार पात्याची उत्कृष्ट पोलादी तलवार. [अर.]

**अलेल** वि. पक्का; अट्टल; अस्सल (सोदा, लुच्चा, चोरटा, शिनळ, बटक्या, मस्त्या या शब्दांबरोबर विशेषतः उपयोग). (को.)

**अलेलटप्पू** उडाणटप्पू; उनाड; भटक्या.(ना.)

**अलेवार तालेवार** लाड; कौतुक : 'ज्याचे कितीतरी अलेवार तालेवार झाले असते तोच मुलगा आज रानांत येऊन पडून त्याची आईसुद्धा त्याचेजवळ नाही.'– रूरा २३९.

**अलैय्या** पु. (संगीत.) एक राग. बिलावलचा एक प्रकार. [हिं.]

**अलोचणे** सक्रि. न पाहणे : 'सांगता आपुली गुह्यगोष्टी ।अलोचावया वेगळा नुठी ।'– एभा ११.१०.३६. [सं.अ + लोचन]

**अलोट** वि. १. मागे न परतणारा, पडणारा; फरक न पडणारा; न बदलणारा–उलटणारा–फिरणारा; दुर्निवार; अनिवार्य : 'आतां घेई शाप दुर्गम ।जो कां अलोट हरिहरां ।' –मुआदि १९.६८. २. अनिर्वचनीय; अचाट; अपरंपार; अतिशय : 'किं गगन चक्र उठावलें अलोट । काळरात्रीचें ।' – शिव ९३१. ३. अचूक; खरे. ४. निश्चित; दृढ : 'जेणें चैतन्य ईश्वरा ब्रह्मा ।देहचि केलें परमसीमा । तया आत्मा कर्ता हे प्रमा । अलोट उपजे ।।'– ज्ञा १८.३८२. ५. अनुल्लंघनीय; दूर टाकून देता न येणारे; अतिरस्करणीय : 'त्या आज्ञा अलोट माते.' ६. प्रचंड. [सं. अ + लुट = लोटणे]

**अलोट** पु. अधिक परिचय किंवा तरबेजपणा; निपुणता; अनायासाने, सवयीने आलेला शहाणपणा. [सं. आलोड्य]

**अलोटणे** क्रि. करणे; बजावणे; साधणे. [सं. आलुट]

**अलोढणे** सक्रि. १. धुंडाळणे; शोधणे. २. पारंगत होणे; हस्तगत करणे; आलोडन करणे. [सं. आलोहन]

**अलोणि–णी** अलोणी वि. पहा : **अलवणी** : 'अलोणि कीं जाहलें क्षारें ।म्हणोनि चोखले जिव्हाग्रें ।'– कथा ४.१२.८३. [सं. आलवण]

**अलोभ** वि. निर्लोभ; लोभरहित.
पु. प्रेमाचा किंवा प्रीतीचा अभाव. [सं.]

**अलोल** वि. १. स्तब्ध; शांत; स्थिर; अचंचल. २. निरिच्छ; लंपट नसलेला. [सं.]

**अलोलकी, अलोलिका** स्त्री. १. अतिशय आवड, प्रेम असणे; महत्त्व; प्रेमळपणा; भावुकता; लडिवाळपणा; मान; किंमत (क्रि. करणे.). २. कौतुक; हौस; लालनपालन; लाड. (व.) ३. प्रेम; भक्ती. ४. देव्हारे, स्तोम माजविणे : 'सर्वत्रांसी भजनाची अलोलिका.'– सप्र ८.९१.
वि. १. चमत्कारिक; आश्चर्यकारक; नावीन्याचे; कौतुकास्पद; अपूर्व : 'रामावेगळें अलौकिक ।तां मज दिधले तिन्ही लोक ।' – वेणासीस्व १.३८. २. प्रेमळ; आवडते; हृदयंगम; लडिवाळपणाचे (भाषण, चालरीत, वागणूक.) : 'पुढील कथा अलोलिक ।' –एरुस्व १०.१००. ३. सुंदर; नाजूक; सुकुमार; उत्कृष्ट (माणूस, स्वभाव) : 'ते महालावण्यरूपकळा । श्रृंगारे अथिली मंगळा । चंद्रवदनीं तेजकळा । अलोलिक ।।'– कथा २.११.२०.

**अलोलिक तालोलीक** न. लाड; लडिवाळपणाची वागणूक; कोड पुरवणे; कौतुक करणे; खुशामत करणे; मिजास पुरवणे. [अलोलिकचे द्वि.]

**अलोलिक रचना** स्त्री. अपूर्व रचना–घडण (विशे. सृष्टीची.) [सं.]

**अलोलुप** वि. निरिच्छ; अलंपट; विषयवासनारहित. [सं.]

**अलोलुपत्व** न. अनासक्ती; निर्लोभता; लोभ नसणे; निरिच्छा : 'अलोलुपत्वदशा ठाऊकी ।जाण ते हे ।' – ज्ञा १६.१६७. [सं.]

**अलोहित** वि. फिकट लालसर रंगाचे. [सं.]

**अलौकिक** वि. १. चमत्कारिक; जगविरहित; लोकोत्तर; अद्वितीय; विलक्षण; अपूर्व; असाधारण (इसम, क्रिया, गुण, दोष वगैरे) : 'विश्व हे मोहरें लावावें । अलौकिक नोहावें । लोकांप्रति ।' – ज्ञा २.१७१. २. अरण्यवासी; लोकांत न राहणारा.
पु. दुर्लौकिक; दुष्कीर्ती; अपमान; फजिती; सार्वत्रिक अनादर. [सं.]

**अल्क, अल्कली** खार; क्षार; अम्लप्रतियोगी. अल्क पदार्थांचे विशिष्ट गुणधर्म : हे पाण्यात विरघळतात, अम्लाचे निर्गुणीकरण करतात, सेंद्रीय पदार्थाला जाळतात वगैरे.

**अल्कखडक** पु. (भूशा.) सोडियम व पोटॅशियमयुक्त खनिजांचे प्राबल्य

असणारा अग्निजखडक. [सं.]
**अल्कधर्मी** वि. (वै.) अल्कलीचे प्रमुख गुणधर्म असणारा पदार्थ.
**अल्कधर्मी मृदा** स्त्री. (भूशा.) सोडियम व पोटॅशियमयुक्त माती. [सं.]
**अल्कधातू** पु. (रसा.) आवर्ती कोष्टकाच्या पहिल्या गटात असणारे एकसंयुजी धातुरूपी मूलद्रव्य.
**अल्क फेल्डस्पार** पु. (भूशा.) सोडा पोटॅश व अल्युमिना यांचे सिलिकेट हे रासायनिक संघटन असणारी खनिजे.
**अल्कल–अल्कहल** पु. अल्क; मद्यार्क. [अर.]
**अल्कक्षार** मूलक्षार. : हिंग हा एक अल्कक्षार आहे.'– पाकसिद्धी ६६.
**अल्काव** पु. मायना; पदव्या. पहा : **अलकाव** : 'हलका अल्काव लिहिलियामुळे विषम मानितात ।'– दिमरा १.७.[अर. लकब्चे अव.]
**अल्कारस** पु. अशरक नावाचे झाड; पिशुना. [सं.]
**अल्कोद** पु. वनस्पतिजन्य व फार विषारी अनाम्ल.
**अल्कोहोल** न. मद्यार्क; मद्याचा अर्क; मद्य. [इं.]
**अल्गर्जी** वि. स्वार्थी. पहा : **अलगरजी** : 'आतां कशाला जाऊन राहिला पोकळ अल्गर्जी ।' – पला १७१. [फा. अहलि-गरझ]
**अल्तमिश** पु. सेनापती.
स्त्री. १. आघाडीची फौज. २. सहाची संख्या. ३. सुलतान शमसुद्दीन घोरीची पदवी. [फा.]
**अल्तम्गा** बक्षीस; सनद: 'पर्वाना अल्तम्गा'– पया २३.[फा. अल्तमघा]
**अल्ताफ** स्त्री. कृपा, प्रसाद. [फा. लुत्फ]
**अल्प** वि. १. थोडे; लहान; कोते. २. क्षुद्र. (जन, पुरुष); दरिद्री; भिकारी : 'कृष्णासि भेटला हो स्पर्शसुख जगीं अलभ्य अल्पाते ।'– मोकर्ण ५०.१६. ३. मूढ; मूर्ख : 'मानिति माया केवळ अल्प सभेंतील भूमितळ–पट हो ।' – मोसभा ५.८७. [सं.]
**अल्पक** वि. दरिद्री; कंगाल : 'एके दिवसीचेनि परान्नें । अल्पकु जैसा ।।'– ज्ञा १६.२२७. [सं.]
**अल्पकरणी** स्त्री. थोडे, किंचित किंवा अपुरे करणे. [सं.]
**अल्पकर्ण–र्णी** वि. (विप्र. अल्पकानी) १. हलक्या कानाचा; कानपिसा; सहज विश्वास ठेवणारा; भाविक; भोळा; श्रद्धाळू. २. गुप्त गोष्ट ज्याच्याजवळ ठरत नाही असा; जिभेचा हलका; ढिल्या जिभेचा. [सं. अल्प+कर्ण]
**अल्पकालिक** वि. थोडा काळ टिकणारा; थोड्या काळापुरता; क्षणभंगुर. [सं.]
**अल्पकालिक तारे** पु. अव. क्षणिक दिसणारी नक्षत्रे.
**अल्पकाळ** पु. थोडा काळ; थोडा वेळ; थोडा कालावधी.
**अल्पक्रोधी** वि. लवकर रागावणारा; चिडखोर; शीघ्रसंतापी, शीघ्रकोपी. [सं.]
**अल्पखादी** वि. थोडेसे खाणारा : 'अशा प्रकारची आखूडशिंगी, कृष्णवर्णी, बहुदुधी, अल्पखादी व अल्पमोली गाय पैदा करावी.' – आगर २.८४. [सं.अल्प + खाद्य]
**अल्पगति–ती** वि. मंदगतीचा. [सं.]
**अल्पगुणे** क्रिवि. सहज; थोडक्यात : 'आणिक एक आम्हा देणे । मुक्ति होय अल्पगुणें ।' – गुण २९.१९. [सं.]
**अल्पगोष्ट** स्त्री. लहान, क्षुल्लक गोष्ट; बिनमहत्त्वाची बाब.
**अल्पग्रह** पु. (आकाशातील) किरकोळ ग्रह. [सं.]
**अल्पजन सत्ता** स्त्री. (राज्य.) समाजातील बलदंड लोकांच्या छोट्या गटाची सत्ता. [सं.]
**अल्पजनसत्ताक** वि. थोड्याशा लोकांची हुकमत असलेली. [सं.]
**अल्पजीवि –वी** वि. अत्यल्पकाल जगणारा (कीटक, माशी इ.).[सं.]
**अल्पतम** वि. कमीत कमी; लघुतम. [स.]
**अल्पतमयुग्म** न. (भाषा.) ज्या दोन शब्दांचा अर्थ भिन्न आहे, परंतु बाह्य ध्वनिरूप जवळजवळ सारखे आहे अशा शब्दांची जोडी. उदा. काळ बाळ. [सं.]
**अल्पताण** पु. (वै.) आवश्यक त्यापेक्षा कमी ताण असलेले (स्नायू वगैरे). [सं.]
**अल्पतृष्णा** स्त्री. थोडीशी तहान, हाव. [सं.]
**अल्पत्व** न. १. थोडेपणा; कमीपणा. २. (संगीत.) रागालाप करताना एखादा स्वर थोडक्या प्रमाणात घेणे; ह्याचे प्रकार दोन आहेत– लंघन व अनाभ्यास. [सं.]
**अल्पदाबमापी** पु. (भौ.) कमी दाब मोजण्याचे यंत्र, साधन.
**अल्पदृष्टि–ष्टी** वि. १. संकुचित, कोत्या मनाचा; अदूरदृष्टीचा. २. बारकाईने व काळजीने पाहणारा; काटेकोर, बारीकसारीक देखील पाहणारा. ३. (ल.) कृपण; चिकट. [सं.]
**अल्पधन** वि. गरीब; दरिद्री; कंगाल; अपुऱ्या साधनाचा, ऐपतीचा. [सं.]
**अल्पनिद्रा** वि. थोडीशी झोप ज्याला पुरते असा; ज्याची झोप लवकर मोडते असा. [सं.]
**अल्पपिच्छाकृती** वि. (वन.) अर्ध्यापेक्षा कमी व पिसासारखे विभागलेले (साधे पान). उदा. अफू, शेवंती, भुईपात्रा. [सं.]
**अल्पप्राण** वि. (भाषा.) ज्याच्या उच्चारणात प्राण (तोंडाच्या पोकळीतून जोराने बाहेर पडणारा हवेचा लोट) नसतो असे (व्यंजन.) उदा. क्, ग्, ङ्, च्, ज्, ञ, ट्, ड्, ण्, त्, द्, न्, प्, ब्, म्, य्, र्, ल्, व् आणि ळ् एकूण २०. पहा : **महाप्राण** [सं.]
**अल्पबचत** स्त्री. थोड्या थोड्या प्रमाणात शिल्लक टाकलेला पैसा; थोडे, थोडे द्रव्य साठविणे : 'अल्पबचत योजनेपासून बालवीर चळवळीपर्यंत ... हा तालुका आजवर नेहमीच आघाडीवर राहिलेला आहे.'– श्रीग्रामायन १३.
**अल्पबचत निधी** पु. थोड्या प्रमाणात शिल्लक टाकलेल्या पैशांतून उभी राहिलेली रक्कम.
**अल्पबलता** स्त्री. (वै.) अशक्तपणा. [सं.]
**अल्पबुद्धि–द्धी–मति, ती** वि. कोत्या बुद्धीचा; अल्प समजुतीचा; मंद बुद्धीचा. [सं.]
**अल्पभागी** वि. (ज्यो.) भाग्यकाल थोडा असणारा : 'चंद्र नवम स्थानी मकर किंवा कुंभ राशीचा असेल तर मनुष्य...अल्पभागी असतो.'– जाबो ६६.
**अल्पभाष–भाषी** वि. मितभाषी; अबोलका; घुम्या; वटवट न करणारा;

कमी बोलणारा. [सं.]

**अल्पमत** न. (राज्य.) निम्म्याहून कमी संख्येत असणे; एखाद्या व्यक्तीला किंवा पक्षाला पन्नास टक्क्यांहून कमी मते मिळणे : 'काँग्रेस अल्पमतात गेली; पण बहुमत कोणाला मिळाले ?' – रचिं ४५. [सं.]

**अल्पमुदती** वि. थोडा कालावधी व्यापणारा; थोड्या काळात संपणारा; थोड्या कालावधीसंबंधी; थोड्या मुदतीपुरता.

**अल्पमोली** वि. थोडक्या किंमतीचा; हलक्या किंमतीचा, स्वस्त.

**अल्परक्तता** स्त्री. रक्ताची कमतरता; रक्त कमी होणे.

**अल्परक्तदाब** पु. (वै.) रक्ताचा दाब कमी होणे.

**अल्पलोमश** (वन.) ज्यावरील लव सूक्ष्म, मृदू व उभट असून नुसत्या डोळ्यांना दिसत नाही असे (अवयव). [सं.]

**अल्पवय** न. शैशव; कौमार्य; अजाणवय. [सं.]

**अल्पवय–वयस्क** वि. लहान वयाचा; बाल; कायद्याने ठरविलेल्या वयोमर्यादेपेक्षा कमी वय असलेला. [सं]

**अल्पवयीन** वि. लहान वयाचा. [सं. अल्प + वयस्]

**अल्पविकसित** वि. मर्यादित प्रमाणात विकास झालेला, फारसा विकास न झालेला (देश, राज्य, जमात); अपूर्ण वाढ झालेले (झाड इ.). [सं.]

**अल्पविचार–री** पहा : **अल्पबुद्धि**

**अल्पविणे** उक्रि. बुडविणे. पहा : **आल्पविणे** (अप.) : 'तिन्ही लोक अल्पावती'– विउ ५.३७. [सं. आप्लवन]

**अल्पविद्य–द्या** वि. थोडके शिकलेला; वरवर ज्ञान असलेला; उथळ ज्ञान असलेला. [सं.]

**अल्पविषय** पु. क्षुल्लक बाब, गोष्ट; हलके काम; बारीक सारीक प्रकरण. [सं.]

**अल्पवृत्त** न. लहान वर्तुळ, मंडळ (भौगोलिक किंवा खगोलिक); लघुवृत्त. [सं.]

**अल्पवृंत** वि. (वन.) वनस्पतींचे अगदी आखूड देठ असलेले अवयव. उदा.पाने, फुले, फळे. [सं.]

**अल्पव्याजी द्रव्य** न. अगदी कमी व्याजावर मिळणारा पैसा.

**अल्पव्याप्ति–प्ती** स्त्री. छोटा विस्तार, पसारा किंवा व्याप असलेला; कमी विस्ताराचा; छोटा : 'हे मासिक फारच अल्पव्याप्तीचे होते.'– बासारू ४३. [सं.]

**अल्पशक्ति–क्ती** वि. अशक्त; निर्बल; कमजोर. [सं.]

**अल्पशः** क्रिवि. थोड्या प्रमाणात; किंचित; काही अंशाने; थोड्या थोड्या क्रमाने. [सं.]

**अल्पसता** वि थोडक्या पैशात आणि श्रमात : 'अल्पसता तीर्थ होईल' – लीचउ १५८.

**अल्पसमजूत** वि. कोत्या समजुतीचा; अडाणी.

**अल्पसंख्य, अल्पसंख्यांक** वि. संख्येने कमी असलेला; थोड्या प्रमाणात असलेला. (गट, समाज इ.)

पु. एखाद्या राज्यातील, देशातील बहुसंख्येने असलेल्या लोकांपेक्षा धर्माने, भाषेने, वंशाने वेगळा असलेला लहान गट, समाज. [सं.]

**अल्पसंतुष्ट, अल्पसंतोषी, अल्पसमाधानी** वि. ताबडतोब किंवा थोडक्यात संतुष्ट होणारा, खूष होणारा; कमी महत्त्वाकांक्षी. [सं.]

**अल्पसामर्थ्य** न. थोडीशी शक्ती; अल्पबल. [सं.]

**अल्पसिद्ध** वि. थोडक्या श्रमाने–मोलाने–साधनेने–मिळविलेले, मिळालेले, केलेले. [सं.]

**अल्पसूचना** स्त्री. अगदी थोड्या कालावधीत मिळालेली, दिलेली सूचना.

**अल्पसूचना प्रश्न** पु. विधिमंडळ–संसदेत पुरेशी पूर्वसूचना न देता विचारलेला प्रश्न; तातडीचा प्रश्न.

**अल्पस्वल्प** वि. काहीसे; थोडेसे; जरासे; किंचित; लहान प्रमाणाचे, रकमेचे; थोडेबहुत. [सं.]

**अल्पहस्ताकृति–ती** वि. (वन.) अर्ध्या अंतरापर्यंत कातरलेली हाताचा आकार असलेली (पाने). [सं.]

**अल्पज्ञ–अल्पज्ञान** वि. कोत्या बुद्धीचा, समजुतीचा; अल्पबुद्धि; अल्पसमजूत. [सं.]

**अल्पाक** न. दक्षिण अमेरिकेतील पेरू देशातील अल्पाका नावाचे उंटासारखे जनावर. त्याच्या लोकरीपासून तयार केलेले कापड : 'अंगात काळ्या अल्पाकाचा लांब कोट होता.' – शंशिं ५५. [इं.]

**अल्पाकपिवळी** वि. सर्व पिवळा उभार व आडवण सर्व तांबडी, किनार कोणत्याही रंगाची. अशा प्रकारचे (लुगडे, पातळ).

**अल्पाक हिरवी** वि. (विणकाम) सर्व पोत हिरव्या उभाराचा व आडवण सर्व तांबडे, किनार कोणतीही अशा प्रकारचे (लुगडे, पातळ).

**अल्पायास** पु. थोडके परिश्रम, कष्ट, मेहनत. षष्ठी किंवा तृतीया विभक्तीत फक्त उपयोग. उदा. अल्पायासाचा, अल्पायासाने. [सं.]

**अल्पायुप्रवाह** पु. (भूशा.) अल्पायुषी प्रवाह; अल्पकालिक प्रवाह. (हा वर्षातून फक्त काही कालच वाहतो.) [सं.]

**अल्पायु, अल्पायुष–षी** वि. थोड्या, अपुऱ्या आयुष्याचा, जीविताचा; थोडे दिवस जगणारा. [सं.]

**अल्पारंभ** पु. थोड्या किंवा कमी प्रमाणात सुरुवात करणे; हळूहळू किंवा थोडासा प्रारंभ, सुरुवात; सावकाश व संथ आरंभ; मंद प्रवेश, शिरकाव. [सं.]

**अल्पार्द्र** वि. कमी प्रमाणात ओलेपणा असलेला; थोडा ओलसर. [सं.]

**अल्पावधी कर्ज** न. थोड्या कालावधीसाठी दिलेले कर्ज.

**अल्पावशिष्ट** वि. थोडेसेच शिल्लक असलेले; ज्यातील शिल्लक अल्प राहिले असे. [सं.]

**अल्पाहार** वि. मिताहारी; खाणेपिणे नेमस्त, माफक असलेला.

पु. थोडेसे खाणे; फराळ; उपाहार. [सं.]

**अल्पांतरी** स्त्री. गणितशास्त्राची एक शाखा. यामध्ये पृथ्वीची क्षेत्रगणना वगैरेंचा समावेश होतो. [सं.]

**अल्पित** वि. गुप्त, अव्यक्त.

**अल्पिष्ठ** वि. अल्पतम; अत्यल्प.

**अल्पोन्माद** पु. (मानस.) आत्यंतिक भावनिक बदलामुळे निर्माण झालेली मानसिक विकृती. या विकृतीत अस्थिरता, चिडचीड, अधीरता, असहनशीलता, थकवा, अतिशय बडबड इत्यादी लक्षणे आढळतात. [सं.]

**अल्पोपाहार** पु. फराळ; चहा, कॉफी, इ. पेय व काही खाद्यपदार्थ. (चुकीने अल्पोपहार) [सं.]

**अल्फ** वि. हजार. [फ़ा.]

**अल्फा व ओमेगा** पु. ग्रीक वर्णमालेतील पहिले व शेवटचे अक्षर. यावरून लक्षणेने आदी व अंत.

**अल्फाप्रारण** न. (भूशा.) १. अल्फा किरणांचे अरीभवन. २. किरणोत्सारी पदार्थातून बाहेर पडणारे, फेकले जाणारे अल्फा कण.

**अल्बत-ता-त्ता** पहा : **अलबत** : 'अल्बता येणे, काही मुलाहिजा न करणे' - मइसा १७.७.

**अल्बिदा** पु. अखेरचा सलाम; निरोप; ताबूत बुडवल्यानंतर ह्याचा उच्चार करतात. [फा. अल् + विदाअ = पाठवणूक]

**अल्मुल्कलिल्लाह** 'विश्व परमेश्वरासाठी आहे' हे वाक्य आदिलशाही व बादशाही फर्मानाच्या प्रारंभी नेहमी असे.

**अल्यक** वि. सर्वात योग्य. [फा. अहलियार]

**अल्याड पल्याड** पहा : **अलाड**

**अल्युमिनिअम** न. एक रासायनिक धातुरूप मूलद्रव्य; हे शुद्ध स्वरूपात सापडत नसून सिलिकेट रूपाने इतर पदार्थांशी संयुक्त स्थितीत सापडते. हा धातू फार हलका व पांढरा असतो. ह्याचे पातळ पत्रे करून त्यांची भांडी करतात. तारही काढता येते. ह्यावर क्षाराचा परिणाम होतो. याला डाग देता येत नाही. [इं.]

**अल्युमिनिअम ब्राँझ** सोन्यासारखा दिसणारा परंतु सोन्याहून कठीण अल्युमिनिअम व तांबे यांचा संमिश्र धातू. हा हलका असतो. याच्या डब्या, साखळ्या व काही अलंकार करतात. [इं.]

**अल्ल** पहा : **अले**

**अल्लख** वि. अलग अलग; स्वतंत्र. पहा : **अलग** : '- गोटे, फाकडे अल्लख अल्लख' - ऐपो २४०. [सं. अलग्न]

**अल्लख** पहा : **अलख**

**अल्लखणे** पहा : **अलगणे**

**अल्लख दादोजी** पु. कफल्लक मनुष्य. (गो.)

**अल्लड-अल्हड** वि. १. अननुभवी; कच्चा; निपुण, प्रौढ नसलेला; कुशल नसलेला; अपक्व बुद्धीचा; अज्ञानी (माणूस, विशेषत: तरुण). २. निरागस; निष्पाप. पहा : **अपेट** [हिं. अल्हड]

**अल्लफ** पहा : **अलफ**

**अल्ला-अल्लाह** पु. (मुसलमानात) ईश्वर; देव; खुदा : 'अल्ला करें सो होय बाबा करतारका सिरताज ।'- तुगा ३२७. [फा.]

**अल्ला अल्ला** उद्गा. आश्चर्य किंवा दु:खोद्गार.

**अल्लाची गाय** स्त्री. (ल.) अत्यंत गरीब निरुपद्रवी माणूस. (कारण खाटीक गाईच्या मानेवर सुरी ठेवीत असतांही ती शांत व स्तब्ध असते.)

**अल्लाम** वि. विद्वान; सर्वसाक्षी. [फा.]

**अल्लाद-दी, अल्हाद-दी** क्रिवि. हळू; अलगद; धक्का न लागू देता.

**अल्लारखी** वि. परमेश्वराने सुरक्षित ठेवलेला. ज्याला कोणी वाली नाही असा; अनाथ इसम; कोणी पाहत नाही अशी बाब.

**अल्लारशी, अल्लाऋषी** वि. १. ढिलाईचे; निष्काळजीपणाचे; गैदीपणाचे; गबाळग्रंथी, अव्यवस्थित (काम, वागणूक). २. नेभळट; माभळट; भोंगळट; ढिला; शिथिल; सुस्त; हयगयी; दुर्लक्ष करणारा (माणूस). [फा. अल्ला + वारसी किंवा ऋषी.]

**अल्लाला प्यारा होणे** मरणे : 'बादशहा केव्हाच अल्लाला प्यारा झाला आहे.'- शश २३१.

**अल्ला हो अकबर** ईश्वर सर्वश्रेष्ठ आहे.

**अल्सेशियन** वि. कुत्र्याची एक जात.

**अल्हक** क्रिवि. खरोखरी. [फा.]

**अल्हिदह** वि. निराळे. [फा. अलहिदा]

**अल्हे** क्रिवि. लवकर; एकदम : 'तुकिलासि तें अल्हें । पुरें करीं जी ।।' - राज्ञा १६.२८.

**अव** शअ. बाहेर; पासून खाली; पासून दूर, लांब.
उपसर्ग १. न्यूनता; ऱ्हास; कमीपणा. उदा. अवदशा. २. अनादर. उदा. अवज्ञा, अवमान. ३. निश्चय. उदा. अवधारण. ४. विस्तार; व्याप; पसारा. उदा. अवकीर्ण. ५. आधार. उदा. अवलंब: ६. खाली; खाली जाणे. उदा. अवतार, अवगाह. शिवाय पहा : **अप** [सं.]

**अवई** पहा : **अवाई**

**अवकटा** क्रिवि. एकाएकी; अकस्मात; एकदम. पहा : **अवचट**

**अवकण** पु. १. धान्याचा दाणा. २. जलबिंदू; तुषार : 'हिमाचे घडिता दामोदर अवकण उसळले थोर' - रुस्व ४८९८. (डोळके)

**अवकणे** अक्रि. (विप्र. अविकणे) १. अधिक पिकून जाणे व बिघडणे. (कों.) पहा : **अलगणे** २. अतिशय पीक येणे.

**अवकर** पु. कंटाळा; तिरस्कार : 'हिंवाचा करितां उपचारू । परिचारिकांचा घेत अवकरू । म्हणे हा नव्हे चंद्रचंदन कापुरू । मारू पंचाग्नीचा ।' - रुस्व ५.६०. [सं.अव + कृ]

**अवकल-ळ** वि. १. न आकळलेला; अनावर; दाबात नसलेला; ओढाळ; हट्टी, बेलगामी. २. आकळण्यास कठीण; दु:साध्य; दांडगा. [सं. अव +आकलन]

**अवकल-ळ** स्त्री. आयुष्यातील उतार, ऱ्हास; अध:पात; शक्तिहानी; सत्त्वहानी; दुर्बलता; नि:सत्त्वता. [सं. अवकला]

**अवकलणे** अक्रि. उतरती लागणे; कमजोर होणे; ऱ्हास पावणे (आयुष्य). [सं. अवकला]

**अवकलन** न. (अभि.) वर्ग पाडणे; विभक्त करणे; वर्गीकरण; विशेषीकरण; वैशिष्ट्य दाखवून विभक्त करणे. [सं.]

**अवकहडाचक्र** न. (ज्यो.) मुलाचा जन्म ज्या नक्षत्रावर झाला असेल त्या नक्षत्राचे चार चरण कल्पून त्यांस दिलेल्या संज्ञेवरून नाव ठेवण्याविषयी तयार केलेले कोष्टकवजा चित्र. यात प्रत्येक नक्षत्राच्या चारी चरणांच्या निरनिराळ्या संज्ञा, अंत्य-मध्य इत्यादी नाडी, वर्ण, गण, योनी, इत्यादी दाखविलेल्या असतात.

**अवकळवणी** स्त्री. अकाली पडणारा पाऊस. [सं. अव + काल + वन = पाणी]

**अवकळा** स्त्री. १. तेजोहीन दशा; अवदशा; निस्तेजता; ऱ्हास; उतरती कळा; अध:पात : 'कटाक्षाचा मोसु देखिला । तेथें नीलोत्पलां आली

अवकळा ।।'- शिव ८०६. २. दुर्दशा; अप्रतिष्ठा; फजिती : ' आणि हे पळतां पळों नेदिती । धरूनि अवकळा करिती ।।'- ज्ञा २.२१८. [सं. अवकला]

**अवकंठिक** वि. कंठिकास्थीच्या खालचा. [सं.]

**अवकाट** वि. तमाम; सर्व : 'त्याउपर महाराजांनी अवकाट फौजास हुकूम केला' - मइसा १६.३.

**अवकात-द** स्त्री. १. औकात; शक्ती; सामर्थ्य; प्राज्ञा; ताकद; बळ; उपाय; साधन (शरीर-धन-संबंधी). २. निर्वाह; गुजारा. ३. आब; अब्रू; मान्यतेनुरूप योगक्षेम; संसार; उदरनिर्वाह : 'मौजे मुलखेड यास इनाम दिल्हे होते. तेणे करून त्यांचा अवकात चालेना म्हणोन दूर केला.' - शिचसा ५.१९१. [फा. ओकात]

**अवकार** पु. कठीण प्रसंग. [सं. अपकाल]

**अवकाल** पु. अकाल; अयोग्य काल; अवेळ. पहा : **अवकाळ**

**अवकाश** पु. १. अवधी; समय; वेळ; प्रसंग. २. फुरसत; निवांतपणाची वेळ; सवड; रिकामा वेळ : 'व्योमकेश ऋषीकेश । स्मरतां नाही ज्या अवकाश ।।' - मुविराट ५.२७. ३. जागा; प्रदेश; स्थल; विस्तार : ' न त्यांत अवकाश या स्थळ दिलें तदा कां देवा ।'- केका १७. ४. मधले अंतर, जागा, काळ, वेळ : 'पाहतां ब्रह्मीं नाहीं अवकाशु । दोहीं माजी ।।' - ज्ञा ६.४०. ५. भेद; वेगळेपणा; अंतर : 'तो आत्मारज्जुसर्पाभास । अवकाश हा ।'- यथादी २.६४५. ६. विलंब; उशीर; वेळ. ७. सामर्थ्य : 'मातें जाणावया होआवा अवकाशु गा ।' - ज्ञा १०.७१. ८. पृथ्वी व आकाशस्थ ग्रहगोल यांच्यामधील पोकळी; रिकामी जागा; शून्य; आकाश : 'जेथुन तेथवरी अवकाश ।'- दास २०.१०.२२. ९. सवड; सोय; संधी. १०. शौचविधी : 'उमाइसे अवकासा गेली'- लीचपू ३०७.११ मळ : 'हात अवकासां भरे' - लीचउ ५०६. १२. ठिकाण; पत्ता; आधार; सोय; : 'काही संसार कृत्यांचा योग असता. तरी त्यामध्येच थोडाबहुत निर्गम करितो (केला असता). प्रस्तुत अन्नवस्त्रास अवकाश नाही असा प्रसंग आहे.' - वै ४.१७४५. १. (वा.) **अवकाश धरणे** - वाट पहाणे; दम धरणे.

**अवकाश पोषाख** पु. (भौ.) अवकाशात वावरणाऱ्या माणसाला जिवंत राहण्यासाठी हवेचा पुरवठा करणारी साधने, तसेच इतर उपयुक्त व आवश्यक साधने यांनी परिपूर्ण असा बनवलेला पोषाख.

**अवकाशभीति-ती** स्त्री. (वै.) आकाशाची, अवकाशाची किंवा पोकळीबद्दलची भीती; धास्ती. [सं.]

**अवकाश भूमिती** अवकाश मापनाचे शास्त्र (स्पेस जॉमेट्री) : 'प्रतल भूमिती व अवकाश भूमिती याबद्दल युक्लिडचे कार्य आहे.' - कग २६. [सं.]

**अवकाश यात्री** पु. पृथ्वीच्या कक्षेच्या पलीकडे असलेले इतर ग्रह, उपग्रह यांच्या दिशेने जाणारा, अवकाशात भ्रमण करणारा मनुष्य. [सं.]

**अवकाशयान** न. पृथ्वीच्या वातावरणाच्या बाहेरून पृथ्वीभोवती फेऱ्या मारण्यासाठी किंवा अवकाशातील दूरस्थ ग्रहगोलापर्यंत जाण्यासाठी तयार करण्यात आलेले, अग्निबाणाच्या साहाय्याने जाणारे, मनुष्यरहित वा मनुष्यचालित वाहन. अंतराळाचा शोध व संशोधन या उद्देशाने याचा मुख्यत्वेकरून वापर करतात. [सं.]

**अवकाश समीप** थोडा अवधी : 'पुढे अवकाश लग्नास समीप जाणोन जुन्या कोटातील श्रीगणपतीस अक्षत जाली.'- ऐलेसं ४६३८.

**अवकाशिक** वि. अवकाशाशी संबंधित असलेला. [सं.]

**अवकाशिक** स्त्री. (वै.) पेशीतील पेशीभित्तींनी वेढलेली पोकळी. सजीव पेशींमध्ये ती रंगहीन पेशीद्रव्याने व्यापलेली असते. [सं.]

**अवकाळ** पु. अकाल; अयोग्य वेळ; भलतीच वेळ.

स्त्री. दुर्दशा; वाईट काळ : 'फुटली मुठ आवळ्याची राव पडला अवकाळीला ।' -ऐपो ४१०.

वि. अकाली आलेला, योग्य वेळेपूर्वी येणारा : 'एऱ्हवीं तरी आकाश मांडी । जो गर्जोनि ब्रह्मांड फोडी । तो अवकाळु मेघु काय पडी । राहात आहे ।।'- ज्ञा १७.२५१.

क्रिवि. सांप्रत; सध्या; हल्ली; अलीकडे; आताशी.[सं. अवकाल]

**अवकाळ** वि. पुष्कळ; पोटभर. (व.)

**अवकाळवणी** पहा : **अवकळवणी**

**अवकाळी-ळ्या** वि. अयोग्य काळचा; बेहंगामी; अयुक्त वेळचा; अकाली येणारा, पडणारा (पाऊस वगैरे): 'हा पहा अवकाळ्या वारा आणि पाऊस आला.'- बाळमित्र २.२४.

**अवकिराय** स्त्री. दुखणे; आजार. (कु.) [सं. अवक्रिया]

**अवकिंज** न. (वन.) संदले, प्रदले व केसरदल हे किंजमंडलाच्या खाली असतात अशी फुलामधील अवस्था. [सं.]

**अवकीर्ण** वि. पसरलेले; विस्तारलेले; विखुरलेले; वरून आच्छादलेले, माखलेले; व्याप्त. [सं.]

**अवकृपा** स्त्री. गैरमर्जी; इतराजी; नाखुशी; राग; प्रेमाचा अभाव. [सं.]

**अवक्कल** पु. संकोच. [फा.]

**अवक्र** वि. १. वाकडा नसलेला; सरळ. २. प्रामाणिक; निष्कपटी; शुद्ध अंत:करणाचा. [सं.]

**अवक्रमण** न. (भौ.) उर्जा कमी होणे; हळू हळू खाली येणे; अनेकांच्या हातातून येणे. [सं.]

**अवक्रय** पु. भाडे.

**अवक्रिय** वि. विकार न पावणारे; अविकारी.

**अवक्रिया** स्त्री. १. तिरस्कार; निंदा; हेटाळणी; फजिती; उपहास; पाणउतारा. २. अपमान; हयगय; उपेक्षा; कमी लेखणे. [सं.] (वा.) **अवक्रियेस येणे**- बेईमान होणे; दगलबाजी करणे : 'त्याचे वडील नीमसोड मायणीची देशमुखी खात आले. त्यांचे बंदे दोघेजण करोजी व चापजी, हे दोघे अवक्रियेस येऊन त्यास रात्रीं वडगांवांत जीवें मारिलें.' - मइसा ३.११५.

**अवखणणे** अक्रि. अडचणीत सापडणे; आखडणे; अवघडणे. (व.) [सं. अव + कृष्]

**अवखळ** वि. पहा : **अवकल** १. अनिर्बंध; बेलगामी; आळा नाही असा. २. उनाड; दांडगा; खोडकर (मूल) : 'देहयोगासाठीं अवखळजनीं लोक पडला ।' - दावि २२७. ३. चंचल.

**अवखळा** स्त्री. कमताई; न्यूनता : 'तेवीं अपेक्षेचा अवखळा । न पडे जयां ।' – ज्ञा १५.२०३. [सं. अवकला]

**अवखंद** पु. मोठा खड्डा; मोठा ओहोळ : 'खंदक अवखंदे भडमार । जळें जाती ।' – दावि २४४. [सं. अवखात]

**अवखा** स्त्री. दुखणे; विकार; अस्वास्थ्य; असमाधान.[सं. अपक्षय]

**अवखात** स्त्री. (भूशा.) पाण्याच्या प्रवाहाच्या जोरामुळे जमिनीस पडलेली खाच, खंदक. [सं.]

**अवाखाद–म** स्त्री. शक्ती; सामर्थ्य; कुवत. [अर. औकाद्]

**अवखाद** वि. अवघड; अडचणीची; कठीण (जागा इ.) : 'गवत रानामध्ये बहुत जागा अवखाद.' – पेद २२.२३४. [सं. अवस्नात]

**अवखाद** स्त्री. खरे अंत:स्वरूप. अवलादच्या उलट. अवलाद म्हणजे कायदेशीर औरस संतती. त्या उलट अवखाद म्हणजे कडू संतती. भावार्थाने पोटातील कुकल्पना : 'हरामखोरीचा डाग तुम्हांकडे न लागतां महाराजांकडून तुम्हांस देववावा अशाकरितां तुम्हांस बोलाविलें ते आमचे आम्हापाशी राहून तुम्ही आपली अवखाद बाहेर काढून हरामखोरीचा मदसद (मुखवटा) परिधान केला.' –होकै १५०.

**अवखादणे** अक्रि. त्रासणे, वैतागणे. (कु.) [सं. अव+खिद्]

**अवखुण** स्त्री. वाईट कृती; खोडी; दोष : 'बाई ! हे हरिची अवखुण गे ।'– आगो ११०. [सं. अवक्षुण्ण, अवगुण]

**अवखुळा** पु. आडकाठी; अडथळा. [सं. अव +स्खलन्]

**अवग–अवाग** न. माशाचे हृदय व फुप्फुस.(कु.)

**अवगण** पु. अनादर; उपेक्षा; त्याग. पहा : **अवगणना** : 'अनंत तपाच्या अवगणा । जोडिलें विदेहनाम भूषणा ।'– सीस्व १०.५८. [सं. अवगणन]

**अवगणणे** उक्रि. तिरस्काराने किंवा उपहासपूर्वक वागवणे; कमी लेखणे; तिरस्कारणे; अवहेलणे; तुच्छ मानणे : 'पिता अवगणुनी तूंतें निंदी । होय अपराधी सर्वथा ।'– एरुस्व १२.१४२. [सं.अव+गण्]

**अवगणन–ना** न. स्त्री. १. तिरस्काराने किंवा हेटाळणी करून वागविणे; झिडकारणे; अवमान; अपमान; हेटाळणी : 'भक्तवचनाची अवगणना । देव सर्वथा न करीचि ।' – एरुस्व ४.७१. २. एखाद्या वस्तूचे मूल्य, किंमत वाजवीपेक्षा कमी ठरवणे. [सं.]

**अवगणित** वि. अवमानलेला; अपमान केलेला; तिरस्कृत. [सं.]

**अवगणी** स्त्री. वेष; रूप; सादृश्य; सोंग; ओळखण्याची खूण : 'आत्मा घे नाना शरिराची अवगणी ।'–उगी ५१८. [सं.अव+गम्]

**अवगणे** क्रि. १. दिसणे; सारखे वाटणे; सादृश्य असणे; भासणे : 'तो सूत्रधारु राऊ तें अवगला । तो कैसा सांगौं ।'– शिव. ९९८. २. समजले जाणे; माहीत होणे; ठाऊक होणे; जाणणे. ३. धारण करणे; आचरणे; स्वीकारणे; अंगीकारणे. ४. सोंग घेणे; नटणे : 'राजसां तामसां भावाची परी । तेहि नटिला तो ।। ऐसें अवगोनि मुरारी । येतुसें गोकुळा माझारी ।' – वह २८९.९०. [सं.अव+गम्]

**अवगणे–आवगणे** अक्रि. १. बाष्कळपणे, स्वच्छंदीपणे वागणे. (को.) २. माणसांतून उठणे. (कर्ना.) [सं.अव+गम्=जाणे]

**अवगणे** क्रि. धारण करणे, आच्छादन घेणे : 'जैसे वीळसी अवगले स्वांग । विमंछाचें ।'–ज्ञाप्र ७४३. [सं.अप+ग्रह]

**अवगणे** पहा : **अवंगणे**

**अवगत** वि. ठाऊक असलेला; कळलेला; समजलेला; माहीत असलेला : 'भ्रमणचंचला, त्या भूलीला । अवगत नव्हत्या कुमारिकेला ।' – बालकवि (फुलराणी)

पु. ज्ञान, माहीत असलेली गोष्ट : 'कोण कधीं आला काय तो भाव । नुच्चारितां अवगतामाजीं ठेवी ।'–दावि ७६३. [सं.]

**अवगत, औवग** स्त्री. गरोदरपणात मेलेली स्त्री. [सं. अवगत]

**अवगतणे** क्रि. अवलंबणे.

**अवगति–ती** स्त्री. १. अधोगती; अध:पात (नरकात, दु:स्थितीत वगैरे पडणे) : 'युद्ध सांडून जे पळाले । ते पावले अवगती ।' – एरुस्व १०.९८. २. (सामान्यत:) खाली येणे; उतार; उतरण. ३. पहा : **अवगत** ४. सोंग : 'भरी तन्मात्राची लोव : ले विषयांचे ढीव : ते अवगती बरव : तोचि जाणे' – उगी ६०३. [सं.]

**अवगम–न** पु. ज्ञान; जाणीव; आकलन; जाणणे.

**अवगमणे** उक्रि. वाटणे; भासणे; जाणणे : 'मज अवगमलिया दोनी । मीमांसा श्रवणस्थानीं ।'– ज्ञा १.१६. [सं. अव+गम्]

**अवगळ** वि. अमंगल.

**अवगळणे** क्रि. १. टाळणे; गाळणे; काट्याकुट्यांनी भरून जाणे : 'जो मनें विकल्पें भरला । अडवींचा अवगळला । कुहा जैसा ।'–ज्ञा १३.६७७. पहा : **अवगळ**. २. चुकून राहणे; बचावणे; शिल्लक राहणे : 'आणि अभिचारा वेगळे । विपायें जें अवगळें ।' – ज्ञा १६.४०१. ३. झोंबणे; बिलगणे, गळ्यात पडणे : 'मागत दधिगोळे । न देतां अवगळें । दापितां चोळी डोळे ।'– अमृत ४४. [सं. अव + गत् = गळणे]

**अवगळा** पु. १. शेताच्या कोपऱ्यावर असलेली थोडी खोलगट पडीक जमीन. येथे शेतीची अवजारे ठेवतात. २. (ल.) मायेच्या स्वरूपात असे स्थान आहे की त्या ठिकाणी सुखदु:खरहित जीवास ठेवतात.

**अवगळा** स्त्री. हीनता. [सं. अवकळा]

**अवगामी कर** पु. (अर्थ.) टप्प्याटप्प्याने कमी होणारा कर.

**अवगाहणे** अक्रि. अवगाहन करणे; डुंबणे. [स. अव + गाह्]

**अवगाहन** न. १. डुंबणे; बुडी मारणे; स्नान करणे : ' का तीर्थे जियें त्रिभुवनीं । तियें घडती समुद्रावगाहनी ।' – ज्ञा १.२६. २. (शास्त्र, विषय) प्रवेश; शिरकाव; संचार; अध्ययन; सखोल अभ्यास. [सं.]

**अवगाळ, अवगाळा** पु. गाळ; चिखल; दलदल; खड्डा : 'भ्रांतीचेनि खडुळें । रेवले आश्येचे अवगाळे ।' – ज्ञा ७.७८. [सं. अव + गल्]

**अवगाळणे** क्रि. दुर्लक्ष करणे; टाकून देणे : 'आवडतियेही फळीं । असीरें सालिं आंठोळी । तेयासाठी अवगाळी । फळातें कोण्हीं ।' – ज्ञा १८.२०४. (व.)

**अवगी** स्त्री. १. घोड्याची ऐटीने, थाटाने चालण्याची ढब. (क्रि. धरणे): 'ज्या ठिकाणी घोडा हुकूम अमान्य करील त्या ठिकाणीं अवगीनें इशारा करावा.' – अश्वप १६९. २. नाचणे; थयथय करणे (घोडा). (वा.) **अवगीवर धरणे** – घोडा ऐटीत, थाटदार चालीवर चालवणे.

**अवगुण** पु. १. दुर्गुण; वाईट गुण; खोडी; वाईट सवय; दोष : 'सकळ अवगुणामधें अवगुण । आपले अवगुण वाटती गुण ।' – दास ८.८. २. वाईट परिणाम; अपायकारक प्रयोग; अनिष्ट किंवा इजा करणारी क्रिया (औषध, उपाय इत्यादिकांची). [सं.]

**अवगुणी** वि. १. दुर्गुणी; दुराचारी : 'मी अवगुणी अन्यायी । किती म्हणोन सांगो काई । आतां मज पायीं । ठाव देई विठ्ठले ।।' – तुगा ५१८. २. अनिष्ट; अपायकारक; वाईट गुणधर्माचा. ३. स्वैर. ४. अवलक्षणी; अपशकुनी. ५. खोडकर; व्रात्य. [सं.]

**अवगुंठन** न. १. लपेटणे; आच्छादणे. २.वेष्टन; बुरखा; घुंगट; ओढणी; कवच. [सं.]

**अवगुंठित** वि. वेष्टिलेले; लपेटलेले; आच्छादलेले; बुरखा घातलेली (स्त्री). [सं.]

**अवगू** पु. कलंक; दोष.

**अवग्र** वि. सर्व; सगळे; एकूण एक; एकंदर (रास, गोळा, संघ) : 'पर्ण अवग्र लिहिवले ।' – दावि १८२. [सं. अव्यग्र]

**अवग्रह – ग्राह** पु. १. थांबणे; विराम. २. पाऊस पडावयाचा थांबणे; अनावृष्टी; अवर्षण. ३. परिच्छेद. ४. संधी झाला असता व पुढच्या शब्दाच्या आरंभी 'अ' असता त्याचा लोप करून त्याऐवजी लिहावयाचे चिन्ह (ऽ). [सं.]

**अवग्रहण** (अवग्रहण) पहा : **अवघ्राण**

**अवघड** वि. १. कष्टप्रद (करण्याला, जाणण्याला, पोहोचण्याला, सोसण्याला किंवा घडण्याला); दुर्घट; जबर; दुष्कर; श्रमसाध्य; दुर्ज्ञेय; दुर्गम; दुर्लंघ्य; दुष्प्राप्य : 'मिळाला तो अवघड वर । तो ऐकावा जी विचार ।' – कथा १.३.१३. २. अडचणीचे; अप्रशस्त; अरुंद (स्थळ, जागा). ३. विलक्षण; लोकोत्तर; लोकबाह्य; वाईट; तऱ्हेवाईक (कृत्य). ४. गैर; भलतेच; चमत्कारिक; गैरसोईचे; घोटाळ्याचे; संकटावह (स्थिती, परिस्थिती, अवस्था). ५. कठीण (बहुतेक सर्व लाक्षणिक अर्थाने ) जसे : – विलक्षण, चमत्कारिक, अनियमित; बेशिस्त (करणी); दुःखप्रद; त्रास देणारी; पीडा करणारी (गोष्ट). बुद्धीला न पटणारे; बळजबरीचे; अयोग्य; सक्तीने; ओढून ताणून आणलेला : 'हे असो दीपाचिये सिद्धी । अवघड धू आधीं ।' – ज्ञा १८.७८०. ६. वेडेवाकडे; चमत्कारिक; भिन्न भिन्न आकाराचे : 'होतु कां उजूं वांकुडें । परि बोरीचें हे न मोडे । तैसीं भूतें अवघडें । परि वस्तु उजूं ।' – ज्ञा १३.१०६. ७. दुःसाध्य; कठीण (दुखणे). न. अडचण; लचांड; संकट; त्रास : 'समर्थाचेनि नामेचि अवघडे निस्तरीजति ।' – पंच ३.९. (वा.) **अवघड वाटणे, होणे** – १. अस्वाथ्य, असमाधान वाटणे; संकोच वाटणे; कसेसे वाटणे. २. गोंधळणे; भांबावणे; घोटाळ्यात पडणे. ३. असह्य वाटणे; दुःख होणे. **अवघड जागा** – जांघ वगैरे जागा; अडसंधी. [सं. अव + घट्]

**अवघडणे** अक्रि. १. अडचणीत, संकटात सापडणे, पडणे. २. पेचात सापडणे; गोंधळणे; भांबावणे; घाबरणे; मती गुंग होणे. ३. अडकून राहणे; खोड्यात पडणे; गोत्यात येणे; अटकेत पडणे; पंचाईत, तारांबळ होणे. ४. एखाद्याची निकड लागणे; गैरसोय होणे; नेट लागणे; तगादा लावणे. ५. अडचणणे; अडणे; अतिशय ताण बसणे; अडथळा होणे; कोंडमारा होणे; कुचंबणे : 'स्वभाव त्यायोगें अवघडला ।' – विक ३. ६. (शरीराचे गात्र) भारावणे; मुंग्या येणे (रक्तप्रवाह बंद झाल्यामुळे); ताठणे. ७. गरोदरपणामुळे भारावणे : 'शिवनेरीवर सडा शिंपला अवघडल्या तो हातीं ' – शिवमाय (स्वाशा) ८. अंग चोरणे.

**अवघडनाथ** पु. १. आडव्या अंगाचा; स्थूल; गलेलठ्ठ; ढेरपोट्या माणूस. २.(ल.) ढोल्या; लठ्ठ्या; ३. अवघड्या.

**अवघडपंथ – थी** बैराग्यांचा एक पंथ पहा : **अघोर पंथ**

**अवघडलेली** वि. गरोदरपणामुळे भारावलेली : 'पोटची पोर तू! अवघडलेली.' – श्रीयो १.७.

**अवघडा** पु. अडचण; संकट.

**अवघड्या** वि. अडचणी उत्पन्न करणारा; शंका उपस्थित करणारा; कुरकुरणारा; अळंटळं करणारा.

**अवघंडणे** सक्रि. अडचणीत आणणे; कोंडणे; त्रास देणे. पहा : **अवघडणे** : 'की अविद्यादुर्गीं अवघंडी । अविचिती मोक्षाची धाडी । भणौनि विषयाचिया नाइकुवाडी । पळतां दीसती ।' – शिव ३४.

**अवघा** वि. १. सगळा; सर्व. २. प्रत्येक जण : 'अवघाचि काळ जरी सजे । तरी अवघेचि होती राजे ।' – दास १८.१०.४. [सं. अग्रक्त]

**अवघात** स्त्री. गैरहंगाम; गैरमोसम. (ना.) [सं.]

**अवघात** क्रिवि. अकस्मात्; एकाएकी (कोसळणे, उडी घेणे, पडणे इ.). [सं. अप. अव + घात ]

**अवघ्राण** न. १. वास घेणे; हुंगणे. २. टाळू हुंगून शुभचिंतन करणे. [सं.]

**अवघ्रात** वि. वास घेतलेला; हुंगलेला. [सं.]

**अवचक** वि. अवाच्य; अगणित; अमूप : 'आवचक धनाचा ठेवा । ओपुनि पाठविलें पार्थवा ।' – मुआदि २०.१५५. [सं. अ + वच्]

**अवचट–टे** वि. १. आकस्मिक; दैववशात प्राप्त : 'अशामध्ये तुझा अवचट मला लाभ घडला ।' – सारुह ५.७२.

न. अनपेक्षित, अनिष्ट गोष्ट; अतर्कित अरिष्ट (वा.) **अवचटाचे कवचट होणे.** – विलक्षण अनर्थ गुजरणे.

क्रिवि. १. अकस्मात; एकदम; एकाएकी; अकल्पितपणे; अवचित; सतत; सहजगत्या : 'तैसें पुरुषांचे दुर्लभ दर्शन । अवचटें कृपाकर लागतां पूर्ण ।' – पांप्र ५.८०.

**अवचटणे** अक्रि. बेभान होणे; चित्त ठिकाणावर नसणे; अनवधानी होणे : 'राजा म्हणे कटकटा । कैसेनि ही अवचटली वरवंटा ।' – भारा ४.९७. [सं. अवचित्त]

**अवचर्म** वि. (प्राणि.) त्वचेखालील. [सं.]

**अवचित–ता–तां–तीं** क्रिवि. १. अकस्मात; एकाएकी; अकल्पितपणे; सहजगत्या; अवचट : 'वरपडा जाहला अवचिता ।' – ज्ञा ६.१६८. २. क्वचित.(व.) [सं. अवचित्त]

**अवचितच्या कवचित** क्वचित; केंव्हातरी.

**अवचितपर्व** न. एकाएकी उद्भवलेला प्रसंग : 'नारद बरोबर आहे, अग हे अवचित पर्व ।' – चित्रना २८.

**अवचितफळ** न. मूल होण्यासाठी स्त्रियांनी करावयाचे एक व्रत.

मकर संक्रांतीच्या दिवशी ब्राह्मणाच्या घरातील पाण्याच्या भांड्यात कोणालाही नकळत टाकलेला नारळ.

**अवचितराव** पु. १. मोठेपणाला चढलेला किंवा ज्याचे प्रस्थ वाढले आहे असा माणूस. २. निबाप्या किंवा अज्ञातपितृक मनुष्य. ३. पालक बापाच्या जिंदगीला वारसदार आलेला किंवा तिचा उपभोग घेणारा मनुष्य. ४. (ल.) उपटसुंभ. [सं. अयाचित]

**अवचितिया–ता** वि. अकस्मात; एकाएकी आलेला; अज्ञात : 'अवचितिया वृक्षाचीं अंगें ।' – ज्ञा १८.१५. [सं. अवचित्त]

**अवचिते, अवचित, अवचिता भात** एका जातीचे हळवे भात. हे फार कमी दिवसात तयार होते.

**अवचित्त** न. दुर्लक्ष; चित्त नसणे. (गो.) [सं. अवचित्त]

**अवचित्या** वि. १. उनाड; खोडसाळ. २. अवचित आलेला; अनोळखी; पूर्वी माहीत नसलेला : 'अवचितयावरी सर्वस्व सांडिजे। मग चोख तरी तोचि भांडारी कीजे।' – ज्ञा १०.५२.

**अवचिन्ह** न. दुश्चिन्ह; अशुभ गोष्ट; अपशकुनी, वाईट किंवा दुष्ट लक्षण. वि. अशुभ; कुलक्षणी. [सं.]

**अवचिंद, अवचिन्न** न. अपशकुन; दुश्चिन्ह; अवलक्षण; उत्पात; अद्भुत.(कों.) [सं. अवचिह्न]

**अवचिंद्या** वि. १. अवलक्षणी, अपशकुनसूचक. २. उनाड; खोडकर (मूल); कमनशिबी; दुर्भागी; दुर्दैवी (माणूस).

**अवचीन** वि. अवचिन्ह. (गों.)

**अवचुकून** क्रिवि. १. गफलतीने; इच्छा नसताना; गैरसावधपणे; दुर्लक्षामुळे; चुकून. २. अकस्मात; एकाएकी.

**अवचेतक** पु. (वै.) चेतकाच्या खालच्या मेंदूचा भाग. [सं.]

**अवच्छिन्न** वि. १. तोडलेला; विभागलेला; वेगळा केलेला; अलग केलेला; परिच्छेद केलेला. २. वर्जित; विवक्षित; विशिष्ट. [सं.]

**अवच्छेद** पु. १. तुकडा; विभाग; विभाजन; भिन्नीकरण; वेगळे करणे; भिन्न करणे. २. वियुक्तावस्था, परिच्छेद–पृथकावस्था; (रेषा, चिन्हे, फटी वगैरेंनी किंवा निरनिराळी सदरे पाडून) : 'तैसीं सिनानीं चारीं पदें । श्लोक श्लोकावच्छेदें ।' – ज्ञा १८.५४ . ३. विभागणारी, वेगळे करणारी खूण, चिन्ह, जागा, फाड; चीर; छेद; खाप; खाच; खांड; फट; सांध; अवग्रह (ऽ); चरणरेघ (।।) इत्यादी सामासिक शब्दांची पदे किंवा कवितेचे चरण दाखविणारी चिन्हे. ४. उद्धृत करणे; उतारा देणे. ५. व्यतिरेक; वर्जन; व्यवच्छेद; निष्कासन; अवकर्षण. ६. आक्रमण; व्याप्ती; वस्ती (उदा. पृथ्वीमध्ये गंध, अग्नीत उष्णता, विश्वात ब्रह्म यांची); स्वभावसिद्ध किंवा अविनाशभूत अधिष्ठान (उदा. आधिभौतिक पदार्थांच्या ठायी घटकावयांचे, सजीव प्राण्याच्या ठायी मृत्यूचे). ७. विशेष गुणधर्म; व्यावर्तक लक्षण; वैशिष्ट्य. ८. सीमा; मर्यादा; अवरोधक पदार्थ किंवा वस्तू. [सं.]

**अवच्छेदक** वि. १. तोडणारा; विभागणारा; कापणारा; अवरोधक. २. व्यापक; संबद्ध; अधिष्ठित. [सं.]

**अवच्छेदकावच्छेद** पु. अपवाद, मर्यादा, परिच्छेद नाहीसे करणे; वैशिष्ट्ये; समतेत, साधारणपणात आणणे. [सं.]

**अवच्छेदकावच्छेदेकरून** क्रिवि. सर्वांना (व्यक्ती, जाती, वर्ग,पंथ वगैरे) घेऊन किंवा त्या सर्वांचा समावेश करून, सर्वांचा (माणसे, प्रकरणे, गोष्टी वगैरेंचा) स्वीकार करून किंवा त्यांची गणना करून; कोणतेही वर्ज्य केले असता किंवा कसेही व्यक्त केले असता.

**अवच्छेदणे** क्रि. वेगळे करणे; तोडणे : 'जर ब्रह्म अवच्छेदवे ।'– उगी ५००. [सं. अव + छिद्]

**अवज** पु. १. ऐवज; द्रव्य. २. बदल. [फा. ऐवज]

**अवजड–जाड–झड** वि. १. फार मोठे; अचाट; अवाढव्य; अफाट; दांडगा; भारी; जड वजनाचा; स्थूल; बोजड. २. अवघड; कष्टप्रद. [सं.]

**अवजड उद्योग** पु. (भू.) मोठमोठी, भारी यंत्रसामग्री तयार करण्याचा उद्योग, कारखाना.

**अवजडपाणी** न. अणुनिर्मितीसाठी लागणारे एक घटक द्रव्य. (युरेनियम) : 'अणुऊर्जा निर्मितीसाठी अवजडपाणी हाही एक महत्त्वाचा घटक आहे.' – भाअशि ९८.

**अवजणे** अक्रि.उपयुक्त होणे; बनणे; चालणे; उपयोगी पडणे. (व.)

**अवजतन** न. १. आबाळ; दुर्लक्षपणाची, निष्काळजीपणाची वागणूक; हेळसांड; कळकळीचा अभाव; हयगय. २. अडचण.

**अवजस** न. अपयश : 'अवजसाचेया न लातां बोटा रोगनिग्रही लाठा' – रकौ २८७.

**अवजंभ** वि. (प्राणि.) जबड्याखालील. [सं.]

**अवजा** पु. वेळ; उशीर; अवधी : 'दासा मनीं तजविजा अवजा न लागे ।' – दावि २२८. [सं. अवधि]

**अवजार** न. १. हत्यार (कारागिराचे). २. उपकरण; साधन; वस्तू. [फा. औजार]

**अवजाळी** वि. दांडगा; आडदांड; उनाड. (को.)

**अवज्या, अवजता** वि. ज्याच्या हातचे पाणी वगैरे चालते व जो घरात वावरू शकतो असा (माणूस). पहा : **अवजणे** (व.)

**अवझरता–झडता** पहा : **ओझरता**

**अवझा** स्त्री. रांड; रांडरू; घाण, अमंगळ.
वि. खराब; टाकाऊ; जड : 'असे झाला माझा म्हणून मजला जीव अवझा ।'– सारुह ६.१६०.

**अवट** पु. १. इमारती लाकडांचा–जळाऊ ओंडक्यांचा ढीग–रास. [वैदिक सं. अवत]

**अवट–अवटाण** पहा : **ओहोटी**

**अवटकी** क्रि. स्त्री. १. अवटीची कचेरी, नोकरी मालमत्ता. २. पहा : **अवटी–औटकी**

**अवटणे** क्रि. १ ओहटणे; ओहोटी लागणे. (कों.) २. शेतातील पीक गोळा करून देणे.

**अवटणे** न. वीट; तिटकारा: 'कालिदासाच्या काव्यरूप पक्वान्नांनी अवटणे आलेल्या वाचकांच्या जिभेला फिरून रुची उत्पन्न करण्याकरिता कै. अण्णा किर्लोस्कर यांनी संगीत सौभद्राचे तिखट करून वाढले.' – आगर ३.१४५.

**अवटरणे, अवटारणे, अवटळणे, अवठरणे, आवटाळणे** उक्रि. १. आक्रसणे. २. संकोच पावणे; आटणे; आखूड होणे (कमावलले कातडे, दोरा). ३. ताठरणे; ताठणे; अवघडणे (कंबर, मान इत्यादी लचक-उसण भरल्यामुळे). ४. (ल.) उदासीनपणे गप्प होणे; आखडून बसणे; रुसणे; अंग काढून घेणे.

**अवटळा** पु. ताठा; ताठरपणा; लचक. पहा : **अवटळणे, अवटरणे** (क्रि. भरणे, येणे, काढणे, निघणे).

**अवटा** पु. १. कुढेपणा; कुरठेपणा; घुमेपणे; ताठरपणा; खुंटुन असणे; खळ घेणे (क्रि. धरणे, घेणे). २. रुसवा; घुस्सा. [सं.]

**अवटाण** न. अयोग्य वेळ; गैर हंगाम. पहा : **अवताण** [सं. अव + तन्]

**अवटाळणे** उक्रि. १. कवटाळणे; मिठी मारणे; धरणे; पकडणे; वेंगाटणे; कवळून धरणे. २. (ल.) समावेश करणे; आकळणे; अंतर्भूत करणे. ३. जमवणे; साठवणे (वाईट प्रकारांनी किंवा फसवणुकीने पैसा वगैरे).४. आक्रसणे; लचक भरणे.

**अवटाळणे** उक्रि. लांबणीवर टाकणे; पुढे ढकलणे; टाळणे; दूर ढकलणे; (कपटाने) थोपविणे.

**अवटी** स्त्री. १. (सोनारी.) दागिन्याच्या भागावर नक्षी अगर ठसा उमटवण्याचा एक छाप; हत्यार. २. (तोडावयाच्या किंवा तासावयाच्या) लाकडावर घेतलेली कोरणीसारखी खाच. (क्रि. घालणे, घेणे, पाडणे). [सं. अवट]

**अवटी** पु. १. (कारखान्यातून धान्यादिकांचे) मोठ्या प्रमाणावर माप करणारा; मापारी. २. वजन-मापावर देखरेख ठेवणारा; ज्याच्या स्वाधीन सरकारी वजनमापे असतात असा अधिकारी; बाजारात आलेले धान्य, माल मापणारा अधिकारी. ३. सर्व शेतातील उत्पन्न मोजून त्यानुसार सरकारसारा ठरवणारा अधिकारी. मोगली अमलात हा वतनदार असे पण मराठी राजवटीत त्याचे वतन काढून घेतले.

**अवटी** खोल खड्डे असलेला, उंचसखल असा लांबट रस्ता. (व.)

**अवटी** स्त्री. ओहोटी. (कों.)

**अवटीकाम** न. अवटीचा उपयोग करून करावयाचे छापकाम. [सं. अ = खाच]

**अवटी जमीन** स्त्री. सुपीक, सकस जमीन. [सं. अवट = खाच]

**अवटु ग्रंथी** स्त्री. (वै.) मानेत, श्वासनलिकेच्या समोरच्या बाजूस असणारी इंग्रजी 'एच्' (H) च्या आकाराची ग्रंथी. (थायरॉइड)

**अवटुवृद्धि-द्धी** स्त्री. (वै.) अवटु (थायरॉईड) ग्रंथींच्या प्रमाणाबाहेरील वाढीमुळे झालेला विकार. (गॉयटर.) [सं.]

**अवठा** पु. अवठण; रुसवेपणा; रुसण्याची लहर; घुमा राग. (क्रि. धरणे, सोडणे, येणे).

**अवठा** न. घोड्याला होणारा एक रोग. यात घोड्याच्या अंगावर गाठी उठतात. पहा : **अवठाणू**

**अवठाण** न. १. शक्यता. २. जोर, शक्ती. [सं. अवस्थान]

**अवठाणू** न. उठाणू; गळू; अवाळू; केसतूड; खांडूक.

**अवडक चवडक, अंवडक चंवडक** स्त्री. १. मुलांचा खेळ, पहा : **औडक चौडक**. २. पसारा, गोंधळ, अव्यवस्था (घरातील वस्तूंची वगैरे.) (क्रि. करणे, मांडणे, चालवणे). ३. अव्यवस्थित, गोंधळाची स्थिती, अवस्था.

**अवडचिवड** स्त्री. १. अव्यवस्थितपणे कालविणे, कोळणे, चेंदामेंदा करणे, दाबणे, पिळणे, कुसकरणे. २. चिवडलेली, विस्कटलेली अवस्था; चिवडाचिवडी; विस्कटाविस्कट; लादालगदा. [चिवडचे द्विं.]

**अवडणणे** अक्रि. कंटाळा, किळस येणे. पहा : **अवढणणे**

**अवडंबर-अवडांबर** न. १. भपका; डौल; देखावा : 'मोठे अवडंबर रचले असता त्याचा शेवटीं एका क्षणात... विध्वंस होऊन जातो' - निमा ६६९. २. आवेश; गर्व; तोरा; ताठा. ३. हूल दाखविणे. पहा : **आडंबर**. ४. मेघांची किंवा हत्तीची गर्जना. [सं. आडंबर] (वा.) **अवडंबर माजवणे, रचणे-** प्रमाणाबाहेर महत्त्व देणे.

**अवडाण** न. उठाणू; अवधाण; गळू; पहा : **अवठाणू** (कु.)

**अवढणणे** अक्रि. १. वीट, किळस, शिसारी येणे. २. अवटणे पडणे. ३. कंटाळा येणे; तिटकारा येणे.

**अवढणा** पु. वीट; शिसारी; तिटकारा; नकोसे होणे.

**अवढंगी** वि. वाईट चालीचा; बेढंगी : 'ही अगदीच अवढंगी कारटी निघाली'- मी ३५९.

**अवढा-अवढाय-अवढया** पु. अरुची; नावड; अभक्ती; किळस; वीट; कंटाळा. (क्रि. पडणे, येणे, काढणे). (को.)

**अवढाण** वि. द्वाड; ओढाळ; हट्टी; अनावर; मोकाट; मस्त (गुरु, ढोर) : 'ते मज नाटोपे अवढाण ।' - दावि ७६७. (कों.)

**अवणापावणा** पहा : **अउणापाउणा**

**अवतरण** न. १. उतरणे; खाली येणे; देवादिकांचे पृथ्वीवर मृत्युलोकी जन्मास येणे; अवतार; अवतरण्याची क्रिया, व्यापार : 'पार्वती म्हणे माग वरदान । तव अदिति विनवी वचन । कीं त्वा करावे अवतरण । माझे ठाई ।।' - कथा २.११.३७. २. अध:पात; अधोगती; अवपतन. ३. विवरणात्मक भाषण किंवा विधान; (श्लोक, वाक्य इ. वर) टीका; स्पष्टीकरण; भाष्य; टिप्पणी. ४. उतारा; उद्धृतवचन. ५. आवेश; वारे; संचार : 'जेणें चैतन्यासी भरे अवतरण ।'- विसिंपू ५.३९. ६. मूर्ती; प्रत्यक्षपण; प्रत्यक्ष अवतार : 'तो सहजेंचि स्नेहाचें अवतरण ।'-ज्ञा ११.४२. ७. तीर्थस्थान. [सं.]

**अवतरण चिन्ह** न. ग्रंथातील किंवा भाषणातील शब्द, उतारा दाखवताना वरच्या बाजूला प्रारंभी व शेवटी उलट्या व सुलट्या स्वल्पविरामाच्या आकाराची चिन्हे (' ') देतात ती. एकेरी (' '), दुहेरी (" ") [सं.]

**अवतरणिका** स्त्री. १. अवतरण; भाष्य; टीका. २. प्रस्तावना; सूचना. ३. अनुक्रमणिका; विषयसूची; सारांश : 'ऐसे नामधारक विनवीत । सिद्धाचे चरणी लागत । म्हणे श्रीगुरुचरितामृत । अवतरणिका मज सांग ।।' - गुच ५३.१३. ४. ग्रंथाच्या प्रारंभीची देवतेची स्तुती. [सं.]

**अवतरणे** अक्रि. १. अवतार घेणे; देहधारी होणे; आकारास येणे; प्रगट

होणे (देवदेवता, देवलोकवासी) : 'तेथ रुद्रगणांचे संघाट । अवतरत देखे ।।' -ज्ञा ११.१४२. २. खाली येणे; उतरणे, अधोगमन करणे; अध:पतन होणे. ३. (ल.) बडबडणे; असंबद्ध बोलणे; आचरटपणा करू लागणे; अव्यवस्थितपणे वागणे. ४. आवेश येणे; संचार होणे; वारे शिरणे : 'जें प्रकृति डंका अनुकरे । तें प्रकृति डंके अवतरे ।' -अमृ ५.३६. ५. सरसावणे; पुढे होणे : 'तेथ सुगरणी आणि उदारे । रसज्ञ आणि जेवणारे । मिळती मग अवतरे । हातु जैसा ।।' - ज्ञा १३.११४९. [सं.]

**अवतरविणे** सक्रि. प्रगट करणे : 'आत्मा अवतरविते मंत्र । अक्षरें इयें ।' - ज्ञा १५.५७७. [सं. अव+ तॄ]

**अवतलित** वि. (अभि.) टांगलेल्या तारांना स्वत:च्याच वजनांमुळे मध्यभागी असलेला (बाक); ढील पडलेली (तार). [सं.]

**अवतंतुक** वि. (वै.) तंतुकाच्या खालचे. [सं.]

**अवतंस** न. १. पुष्पे, रत्ने इत्यादिकांचा केलेला (शिरोभूषण, कुंडले) इ. दागिना. २. कीर्ती वाढवणारा; भूषवणारा उदा. कुलावतंस.

**अवताण** न. अयोग्य किंवा भलती वेळ, काळ; अकाल; अवठाण; योग्य हंगामापूर्वीचा काळ. पहा : **ताण**

**अवताभवता** क्रिवि. सभोवती; भोवताली; सभोवार; इकडेतिकडे. [भवताचे द्वि.]

**अवतार** पु. १. एखाद्या देवतेने मनुष्याच्या किंवा पशूच्या रूपाने किंवा इतर कोणत्याही रूपाने पृथ्वीवर अवतीर्ण होणे; अवतरण. २. (ल.) पवित्र किंवा असाधारण सुप्रसिद्ध माणूस; दैवी अंशाचा माणूस-देवावतार. ३. अघोर कर्म करणारा; महापापी-राक्षस-अवतार. ४. उनाड, उपद्व्यापी, शिरजोर, व्रात्य माणूस, मुलगा; उत्पातीपणा. ५. अवतरण; उतरणे; खाली येणे. ६. प्रस्ताव; उतारा वगैरे अवतरणाचे अर्थ. पहा : **अवतरण.** ७. (दशावतारावरून) दहा संख्या. दहा आकड्यांबद्दल योजण्यात येणारा सांकेतिक शब्द : 'अवतार पावेतों.' - मइसा १२.१२४. ८. आयुष्य; जीवन : 'अवतार जरी संपेल ।'- संग्रा. ४८. ९. (उप.) स्वरूप; वेश. १०. नदीचा घाट. ११. तीर्थ. १२. भाषांतर. १३. प्रस्तावना. १४. प्रादुर्भाव. [सं.] (वा.) **अवतार घेणे, धरणे, धारण करणे**-विशिष्ट काम अतिशय जोराने करू लागणे; उच्छृंखलपणे, अव्यवस्थितपणे, दुष्टपणाने, वेडगळपणाने वागणे; उपद्रवकारक वर्तन करणे. **अवतार आटोपणे, संपणे** - १. उत्कर्षदशा जाऊन निकृष्टावस्थेस पोहचणे; शून्यत्व पावणे. २. मरणे : 'पति गेल्यावर आटपला श्वशुराचाही अवतार' - विक १५. ३. कर्तृत्वशक्ती संपुष्टात येणे; सद्दी संपणे; पराक्रमाचा अंत होणे. **अवतार आणणे**- उग्र रूप धारण करणे : 'हिवाळ्याचे दिवस होते. थंडीने कसा अवतार आणला होता.'- स्मया १४८. **अवतार संपूर्ण होणे** - मरणे : 'राजा शाहूचा अवतार संपूर्ण जाहल्यास कोणी खावंद नाही, ऐसे जालें.' - मइसा ८.२२२

**अवतारकार्य-कृत्य** न. १. अवतार घेण्याचे कारण, उद्देश. २. अलौकिक, लोकोत्तर कार्य. [सं.]

**अवतारणा** स्त्री. आश्रय; अवलंबन; अवतार : 'वस्तुस्थितीचे वर्णन संपल्यावर कल्पनेची अवतारणा करून प्रश्न करी'- पप्रे ४३.[सं.]

**अवतारणे** अक्रि. वेड-चळ लागणे; चळणे; स्वच्छंदी बनणे; पिसाटणे; अव्यवस्थितपणे, बेशिस्तपणे वागणे.

**अवतारी** वि. (अवतारीकही रूढ.) १. पृथ्वीवर मनुष्यरूप किंवा प्राणीरूप धारण केलेली (देवता). २. अत्यंत पवित्र किंवा बुद्धिमान; सुप्रसिद्ध; असामान्य; दैवी अंशाची; लोकोत्तर (व्यक्ती) अतिदुष्ट; उनाड; आडदांड; उग्र; घोरकर्मी (माणूस). [सं.]

**अवतीभवती** अ. बाजूबाजूला; सभोवती.

**अवतीर्ण** वि. १. मानवी स्वरूप धारण केलेली, अवतार घेतलेली (देवता). २. प्रकट झालेला; पुढे आलेला; जाहीर, ज्ञात झालेला. ३. खाली आलेला; उतरलेला; अध:पात झालेला. [सं.]

**अवतेभवते** वि. सभोवतालचे : 'अवत्याभवत्यांनी पैशाच्या लालचीने या गरीब ब्राह्मणाला अगदी गळ घातली.'- बहुरूपी ११.

**अवत्रण** न. संचार; आवेश : 'तयासि आले क्रोधाचे अवत्रण' - उह १६६३.

**अवत्वरक** वि. (भौ.) वेग कमी करणारा, थांबवणारा. [सं.]

**अवत्वरणी इलेक्ट्रोड** पु. विद्युतप्रवाहाची गती कमी करणारा वाहक.

**अवथ** पु. अवाई; धाक; भीती : 'सदाशिव रड्डी जमियतसुद्धा शहरावर येणार याच्या अवथामुळे रात्रंदिवस हुषारी व ताकीद ज्यारी आहे.'- मइसा ५.११५.

**अवथंडणे** न. (आयु.) मुडदूस: 'लहान मुलांना होणारा एक रोग.' - आयुसिद्ध १.७३.

**अवथाणणे, अवथ(था)नणे** अक्रि. १. अंगावर घ्यावयाचे बंद केल्याने (विशेषत: गरोदरपणी) मुलाची प्रकृती खालावणे; अंगावर पिण्याचे तुटणे. [सं. अव + स्तन]

**अवथान** न. अंगावर पिण्याचे बंद केल्याने लहान मुलाची झालेली स्थिती. (विशेषत: आईच्या गरोदरपणी); आयनेरे. [सं. अव + स्तन]

**अवथिणे** सक्रि. १. इच्छिणे; योजणे : 'प्रतिज्ञेतें भीष्में मनि अवथिलें या दृढतरे ।।'- वामन (भीष्म प्रतिज्ञा). [सं. अव + स्था]

**अवद-ध** पु. अवकाश; मध्यंतरीचा काळ. [सं. अवधि]

**अवदशा-सा** स्त्री. १. दुर्दैव; दुर्भाग्य; कमनशीब : 'आतुडलो होतों मरणगावीं ।ते अवदसाचि अवघी ।' - ज्ञा १६.२४. २. विपत्ती; विपन्नावस्था; दारिद्र्य; निकृष्ट स्थिती : 'श्रीमूर्ती देखोनि राउळिची । फिटली अवदशा डोळेआंची ।।' - ऋ ६६. ३. (ल.) कर्कशा; भांडकुदळ स्त्री; जगभांड (शिवी). [सं.] (वा.) **अवदसा आठवणे** - १. वाईट, निकृष्ट स्थिती प्राप्त होईल असे भलतेसलते घातक विचार मनात येणे; वाईट वर्तन करणे. २. दुर्बुद्धी होणे; दारिद्र्य येणे.

**अवदसचिन्ह** न. ओढवणाऱ्या दुर्दैवाचे किंवा दारिद्र्याचे चिन्ह, लक्षण, खूण; भावी संकटाची, दारिद्र्याची खूण. (वा.) **अवदसेची फेरी**- दुर्दैवाची फेरी; अवदशेचा फेरा. **अवदसेचे बाळ** - दुर्दैवी, अभागी माणूस.

**अवदात** वि. १. शुद्ध; सुंदर; शुभ्र. २. पुण्यदायक. ३. पांढरा. ४. उजळ, तेजस्वी. [सं.]

**अवदान** न. १. अग्नीत टाकावयाच्या एका आहुतीस पुरण्याजोगे होमद्रव्य.

(सामान्यत:) आहुती : 'तेथ पूर्णाहुतीस कारण । घालितां जीवभावाचें अवदान ।' - एभा १९.७७; 'टाकोनी हातीचें अवदान ।' - रावि २८.६. २. (ल.) लाच, बक्षिस-खाणे-घेणे; अपहार; लबाडीने केलेला अभिलाष; खाद; खादगी; हरामखोरी. (क्रि. देणे, मारणे) : 'आजपर्यंत किती अवदानं तू घशाखालीं घातलीस बोल ' - तोबं १६४. (वा.) **अवदान सोडणे** - लाभ सोडणे : 'एवढे थोरले अवदान सोडून जावें असें त्याला वाटेना.' - मस्थि ३७७. ३. बळी : 'सेंदरीं हेंदरीं दैवतें । कोण तीं पूजी भूतेखेतें ।आपुल्या पोटा जीं रडतें । मागतीं शितें अवदान ।'- तुगा ७००. [सं.]

**अवदान** न. समुद्राला येणारी फार मोठी भरती. पहा : **उधान**

**अवदान** न. १. शौर्य; शौर्याचे, मर्दुमकीचे कृत्य. २. प्रशस्त धंदा. [सं.]

**अवदार** न. (नाविक.) शीड. पहा : **अवजार**

**अवदांडा** पु. भुर्दंड.

वि. दांड; दांडगा; मस्त.

**अवदांडो** वि. मोठा जोराचा पाऊस व वारा. ( चि.कु.)

**अवदिवस-अवदिस** पु. १. वाईट दिवस; अनिष्ट दिवस; साधारण दिवस. २. आड दिवस; सण नसणारा दिवस.

**अवदीप्ति-प्ती** स्त्री. तेज; प्रकाश; ज्ञान : 'जे श्रीकृष्णाचि आंजवलिका, अवदीप्ती कृमी कीटकां ।' - वछा १२२. [सं.]

**अवदोलन** न. (व्यापार.) व्यापारचक्रात तेजीकडून मंदीकडे जाण्याची प्रक्रिया. [सं.]

**अवध** स्त्री. १. शेवट; अखेर; अंत (मुदतीचा); निघून जाण्याची वेळ. २. अवधी; वेळ; अवकाश; मधला काळ. ३. मधले अंतर; ओलांडावयाची, चालून जाण्याची, शिल्लक राहिलेली जागा - जमीन. [सं. अवधि]

**अवधणा, अवधाण, अवधान** पु. न. गळू; दुखापत झाली असता बगलेत किंवा सांध्यात येणारी गाठ; वाधणा. [सं. अवध्यान, अवदहन.] (वा.) **खाजवून अवधणा आणणे** - भांडण उपस्थित करणे, काढणे. स्वत:वर त्रास किंवा संकट मुद्दाम ओढून आणणे.

**अवधमन** न. (यंअ.) १. मंद करणे. २. आघात करून सामर्थ्य कमी करणे. [सं.]

**अवधंडा-धोंडा** पु. मोठे संकट; फार मोठा अनर्थ, उत्पात. जसे :- वादळ; भूकंप; टोळधाड इ.

वि. भांडखोर; निर्लज्ज; गैरवर्तनी; मारकट; मुसंडी देणारे (जनावर).

**अवधा** स्त्री.शिरोकोनापासून पडलेल्या लंबाच्या योगाने त्रिकोणाच्या पायाचे जे दोन भाग पडतात, त्यांतील प्रत्येक. [सं. अवाधा]

**अवधात** वि. उनाड; खोडकर; खोडसाळ; हट्टी; शिरजोर; अवखळ; त्रासदायक (मूल.) [सं. अव +धा]

**अवधातु-तू** वि. ज्यामध्ये कोणताही धातू नाही असे; अधातू; निकृष्ट धातुयुक्त : 'अष्ट धातु सायासें । जेथि वेधिजेति स्पर्शे । तरि नोहें ऋद्धिपुर ऐसें । तें अवधातुते वेधी ।।' - ऋ २०. [सं. अव +धातु]

**अवधान** न. १. लक्ष; मनाच्या ज्या अवस्थेत सर्व शक्ती एखाद्या वस्तूकडे केंद्रीभूत होतात अशी अवस्था; एकाग्रता; ध्यान; भान; सावधगिरी; हुशारी; जागृती : 'यापरी जे निजसज्जन । तिहीं व्हावे सावधान । द्यावें मज अवधान ।।' - एभा १.५५. २. मनाचा कल, ओढा; अनुसंधान; उद्देश; हेतू; नजर; रोख; चित्त.

वि. खट्याळ; खोडकर (मूल). [सं.]

**अवधान कक्ष-क्षा** पु. स्त्री. (मानस.) एकाच वेळी माणूस किती गोष्टींकडे लक्ष देऊ शकतो याचा विस्तार, पल्ला किंवा कक्षा. [सं.]

**अवधान केंद्र** न. ज्यावर लक्ष केंद्रित केलेले असते ते (गोष्ट, वस्तू.)

**अवधान दिशा** स्त्री. (मानस.) ज्या दिशेकडे लक्ष जाते ती.

**अवधानविकरणक्षमता** स्त्री. एकाच वेळी अनेक गोष्टींकडे लक्ष ठेवण्याची पात्रता; क्षमता.

**अवधान विकीरण** न. (मानस.) अवधान विचलित, द्विधा होणे.

**अवधानी** वि. पुष्कळ गोष्टींकडे एकाच वेळी लक्ष पुरविणारा; एकाच वेळी अनेक मोठ्या व गुंतागुंतीच्या मानसिक क्रिया, व्यापार करणारा. [सं. अवधानिन्]

**अवधारण-णा** न. स्त्री. १. दृढ निश्चय; खात्रीने, निश्चयाने ठरवणे; स्पष्टपणे निवेदन करणे; मांडणे; धरणे. २. (व्यापक) प्रसंगावधान; आत्मसंयमन; सावधगिरी; हुषारी; देहभान. ३. लक्षात ठेवणे; स्मरणात ठेवणे; स्मृती; स्मरण; धारणा. [सं.]

**अवधारणे** उक्रि. १. स्पष्टपणे खात्रीचा निश्चय करणे; निश्चित मत धोरण ठेवणे; ठाम मत असणे. २. मनात, लक्षात, ध्यानात, स्मरणात ठेवणे. ३. ऐकून घेणे; लक्ष देणे; ध्यानात आणणे; लक्ष लावून श्रवण करणे : 'आता माझें विणविलें । अवधारिजे ।' - शिव १४६. [सं. अव + धृ]

**अवधारा** स्त्री. १. निश्चय; चित्ताची स्थिरता. (विअ.) २. कमी भार असलेला विद्युतप्रवाह. ३. पृष्ठभागाच्या खालून जाणारा विद्युतप्रवाह. ४. गुप्त विद्युतप्रवाह. [सं.]

**अवधारित** वि. १. निश्चित; ठरावीक; खात्री केलेले; निर्धारित. २. स्मरणात, आठवणीत असलेले. [सं.]

**अवधाव** पु. (भूशा.) १. अकस्मात खाली घरंगळणारा. २. डोंगराच्या उतारावरून अकस्मात घसरणारा बर्फाचा लोट; हिमानी. [सं.]

**अवधि-धी** पु. १. मर्यादा; सीमा; कार्याच्या आरंभाची व समाप्तीची वेळ, घटका; पर्यवसान; शेवट; एखाद्या वस्तूचा अथवा गोष्टीचा परिच्छेद करावयाचा असता जी रेषा काढतात ती,: 'तैसी दुर्लभ जे सद्‌बुद्धि । जिये परमात्माचि अवधि ।' - ज्ञा २.२४१. २. मधला काळ; अवकाश; मुदत; ठरावीक अंतर : 'तुकयाबंधु म्हणे थोडे । अवधि उरली आहे पुढें ।' -तुगा २७३. ३. उपमा देण्याचे प्रमाण; तुलना करण्याचे मोजमाप-इयत्ता; अमुक गोष्टीहून लहान-मोठे, चांगले-वाईट ठरवितात ती गोष्ट. ४. सुरुवातीची जागा, स्थळ, काळ; अवलंबिलेला मार्ग; आरंभाची किंवा अखेरची गोष्ट. ५. मूळस्थान; उगमस्थान; उत्पत्तिस्थान; आरंभस्थान (एखाद्या कामाचे, व्यवहाराचे); उत्पादक; जनक. ६. (समासात) शब्दयोगी अव्ययाप्रमाणे - पर्यंत, पावेतो याअर्थी उपयोग जसे :- रात्र्यवधी, कालावधी, देशावधी; दिन-मास-वर्ष-अवधी. कालात; अंतरात

भर असताना या अर्थी. ७. आश्रयस्थान; अंतिमस्थान : 'तुचि अवधि करून । ठेविले असती प्राण ।'- रासपं २.५८. ८. पहा : **अवधारणा** ९. भाषिक ध्वनीच्या उच्चारणाला लागणारा एकंदर वेळ : 'कमीतकमी अवधीत उच्चारल्या जाणाऱ्या स्वराला ऱ्हस्व स्वर म्हणतात.'

**अवधिअरवार** न. मुदत गहाण; व्याजाकरिता ठरलेल्या मुदतीपर्यंत जमिनीचा उपभोग घेण्याच्या कराराने ठेवलेले गहाण. भोगवट्यास दिलेले ताबेगहाण.

**अवधिक्रय** पु. ठरलेल्या मुदतीत रक्कम परत केली नाही तर गहाण जमीन खरेदी समजावयाची असा गहाणाचा प्रकार. [सं.]

**अवधी** स्त्री. अयोध्या प्रांताची भाषा; हिंदीची एक बोली.

**अवधीरण, अवधीरणा** स्त्री. न. अपमान; तिरस्कार; धिक्कार.[सं.]

**अवधीरित** वि. अवमानलेला; धिक्कारलेला; अपमान केलेला. [सं.]

**अवधीशेष** वि. उर्वरित.
न. ब्रह्म. [सं.]

**अवधी साकांक्ष, अवधी सापेक्ष** वि. अवधीची आकांक्षा किंवा अपेक्षा असणारे; तुलनात्मक; संबंधी; काही तुलनात्मक मापाशी किंवा इयत्तेशी संबंध असणारे.

**अवधुत (शीर्ष)** न. (नृत्य.) डोळे एकदाच वाकडे करून खाली करणे, निरोप पोचविणे, ओळख पटलेली दाखविणे इत्यादींबद्दल हा अभिनय करितात. [सं. अव+धू = हलविणे]

**अवधूत** वि. १. टाकलेले, सोडलेले. २. विरक्त; विरागी; वैषयिक विकारालिप्त. ३. नग्न; दिगंबर.
पु. १. दत्तात्रेयाचा अवतार. २. विरक्तावस्थेत फिरणारा गोसावी; गोसावी पंथातील; नग्न गोसावी.

**अवधूत गीता** स्त्री. भागवतातील एक प्रकरण. अवधूतपंथी ही तोंडाने म्हणत फिरतात.

**अवधूतपंथ-मार्ग-संप्रदाय-दीक्षा-चरित्र** पु. स्त्री. न. १. अवधूत गोसाव्यांचा संप्रदाय, त्यांची रीतभात, राहणी. २. (ल.) जात गोत न पाळणे; वर्णसंकर; भ्रष्टाचार; दुराचरण.

**अवधूतमूर्ति-र्ती** वि. दत्तात्रेय.

**अवध्य** वि. १. वध करण्यास अयोग्य; ज्यास ठार मारावयाचे नाही असा. २. ज्याला मारणे शक्य नाही असा; न मारला जाणारा : 'अनादि मी, अनंत मी, अवध्य मी भला' - साक. ३. ज्याला ठार मारणे पाप किंवा गुन्हा आहे असा. [सं.]

**अवध्यास** पु. हव्यास; सतत विचार; मनात एकसारखी बाळगलेली इच्छा, विचार. [सं.]

**अवन** वि. निर्जल. [सं. अ + वन = पाणी]

**अवन** न. रक्षण; संरक्षण : 'दीनावनाविणे क्षण देईल दयिता दया कशी वर्तु ।'- मोसंरत्न २४. [सं. अव् = संरक्षण करणे]

**अवनत** वि. १. लवलेला; वाकलेला; ओणवा. २. नम्र; शरण; वश; निरहंकार; विनयशील. [सं.]

**अवनति-ती** स्त्री. १. खाली जाणे. २. अपकर्ष; दु:स्थिती; दुर्दशा; खालावलेली स्थिती; निकृष्ट अवस्था. [सं.]

**अवनमन** न. (भूशा.) १. वाक; बाक; लवणे. २. दाबणे; दडपणे; पतन. ३. खळगा; खाच. [सं.]

**अवनयन** न. (ग.) गृहीताच्या आधारे दुसरी गोष्ट काढणे.

**अवन(ना)स** पहा : **अननस** (कों.)

**अवनि-नी** स्त्री. पृथ्वी; धरित्री; धरणी : 'येरें वायव्यास्त्र लाविलें गुणीं । झंझामारुत सुटला रणीं । वाऱ्यानें जाऊं पाहे अवनी ।'- एरुस्व १२.१०५. [सं.]

**अवनिगा-घा** स्त्री. निगा न राखणे, ठेवणे; हयगय; निष्काळजीपणाची वागणूक;काळजीचा अभाव; उपेक्षा; हेळसांड; अवजतन.

**अवनितल** न. पृथ्वीतल, पृथ्वीवरचा प्रदेश. [सं.]

**अवनीति-ती** स्त्री. अन्याय : 'अवनीतीनें वर्तो नये । आंगबळें ।'- दास २.२.२२. [सं. अवनीति]

**अवनु** क्रिवि. चालू साली.(कु.)पहा : **अवंदा** [फा.आयंदा = पुढे]

**अवपथ्य** वि. कुपथ्य; पथ्यास अहितकारक, विरोधक. [सं.]

**अवपंक** पु. (भूशा.) चिखल; मळी; पाण्याच्या खाली तयार झालेला गाळ; गाळासारखे बसलेले अनेक पदार्थ. [सं.]

**अवपात** पु. १. (भूशा.) एकदम कोसळणे; खचणे; एकदम विभक्त होणे; तुकडे होणे (खडक इ.). २. (ज्यो.) एखादा आकाशाचा गोल आपल्या कक्षेत फिरताना ज्या बिंदूत आयनिक वृत्ताचे संदर्भप्रतल भेदून उत्तरेकडून दक्षिणेकडे जातो तो बिंदू. [सं.]

**अवपात विवर** न. (भूशा.) खडक किंवा भूपृष्ठ एकदम खचण्याच्या क्रियेतून तयार झालेली खाच. [सं.]

**अवपात संरचना** स्त्री. (भूशा.) एकदम खचण्याच्या किंवा तुकडे होण्याच्या क्रियेतून तयार झालेली (खडकांची) मांडणी. [सं.]

**अवपीड** पु. १. स्त्रियांचा, केसांत घालण्याचा एक दागिना. २. शिंक आणणारा पदार्थ, औषध. ३. दाबणे; आवळणे; चेपणे. [सं.]

**अवप्रणोद** (भौ.) आघात किंवा स्थिर दाबाखाली एखाद्या वस्तूची होणारी हालचाल. [सं.]

**अवप्रलंब** पु. (ग.) प्रलंब अक्षास ज्या बिंदूत मिळतो तेथपासून रेखाकृतीपर्यंतच्या प्रलंबाच्या खंडाचा अक्षावरील लंबप्रक्षेप म्हणजे रेखाकृतीवरील बिंदूचा अवप्रलंब. [सं.]

**अवप्रवाह** पहा : **अध:प्रवाह**

**अवबंध** पु. (ग.) खालची सीमा. [सं.]

**अवबाधा** स्त्री. १. दु:ख; पीडा. २. (ग.) पहा : **अवधा** [सं.]

**अवबोध** पु. ज्ञान; जागृती; जाणीव. पहा : **बोध** : 'हे स्वप्नावबोधु ठेले ।'- ज्ञा २.५७. [सं.]

**अवबोधक** पहा : **बोधक**; जाणीव करून देणारे; ज्ञान देणारे.

**अवभंग** पु. पराभव; हार. [सं.]

**अवभार** पु. (विअ.)१. पूर्ण क्षमतेपेक्षा कमी असलेला विद्युतभार. २. अपूर्ण विद्युतभार. [सं.]

**अवभाष** स्त्री. दुरुत्तर; दुष्ट बोल; निंदा. [सं. अव + भाष्]

**अवभास** पु. १. भास; भ्रम; भ्रांती : 'माया अविद्येचिया अवभासा ।' - विसिंधू ७.२६. २. प्रकाश; ज्ञान; साक्षात्कार. ३. आटोका; आवाका.

**अवभिताड** न. कुंभाराच्या भट्टीच्या पुढची भिंत.

**अवभृत(थ)स्नान** न. यज्ञसमाप्तीच्या वेळी करावयाचे स्नान : 'अवभृथ स्नान केलें । तैसे सकळ लोक सुस्नात जाहले ।' – हरि २५.१४०. [सं.]

**अवमत** वि. अपमान केलेला; तिरस्कृत; अवमानित. [सं.]

**अवमर्द–न** पु. न. १. तुडविणे; चेचणे; कुबलणे; कुसकरणे; दाबणे; मळणी करणे; पिळणे; मर्दन करणे. २. (ल.) नासधूस; पायमल्ली. [सं.]

**अवमर्यादा** स्त्री. अमर्यादा; अपमान; हेटाळणी; मर्यादेचा अतिक्रम; उल्लंघन. [सं.]

**अवमल** पु. (यंअ) १.तेलाचा खाली असलेला गाळ. २. बाष्पपात्रात खाली असलेला गाळ, साका. २. (भूशा.) चिकणमाती.[सं.]

**अवमंदक** वि. (भौ.) प्रतिबंधक (पट्ट); विजेचा प्रवाह, उष्णता यांना प्रतिबंध करणारा (पदार्थ). [सं.]

**अवमंदन** न. (भूशा.) गति मंद करणे; घर्षणामुळे गती रोखली जाणे; (विअ.) मंदावण्यास मदत करणे.

**अवमान** पु. अपमान; अवहेलना; तुच्छता; अनादर; उपेक्षा; दुर्लक्ष. [सं.]

**अवमानणे** उक्रि. अपमान करणे; अनादर करणे; तिरस्कार करणे; वाईट रीतीने वागविणे. [सं. अव + मान्]

**अवमानवीय** वि. (समाज.) सर्वसामान्य मानवी पातळीपेक्षाही कमी पातळीचा.

**अवमानित** पहा : **अवमत**

**अवमास** वि. १. ढिला; अव्यवस्थित; विस्कळीत; गैदीपणाने चालविलेला (उद्योग, धंदा). २. उद्धट; बेपर्वा; धाडसी; हट्टी; आडदांड (इसम, जनावर).
क्रिवि. स्वैरपणाने; मोकळेपणाने; स्वेच्छाचाराने; बदफैलीपणाने (क्रि. असणे, फिरणे, हिंडणे, राहणे).

**अवमिति–ती** (ग.) पहा : **अवबंध**

**अवमूल्य** न. दर्शनी किंमतीहून कमी किंमत. [सं.]

**अवमूल्यन** न. मूल्य, किंमत कमी करणे. (अर्थ.) नाण्याची किंमत कमी होणे; शासनाने इतर चलनांच्या किंवा सोन्याच्या तुलनेत आपल्या चलनाच्या विनिमयमूल्यात केलेली घट. [सं.]

**अवयव** पु. १. शरीराचा भाग; गात्र; इंद्रिय. २. परस्पर जोडलेल्या वस्तूतील सुटा भाग; एखाद्या गोष्टीचा भाग, तुकडा; जोडावयाचा भाग (पंचमहाभूतांपैकी प्रत्येक भाग; सामान, कपडे यापैकी प्रत्येक) : 'मग दोन घटिका स्वस्तिक्षेम । सेविती ते विश्राम । उपरी अवयव परिधानून । मार्ग क्रमूं म्हणताती ।।' – नव २३.६९. ३. (अनेकवचनी प्रयोग) स्त्रीचे स्तन. (क्रि. येणे) ४. (ग.) गुणक; बीजगणितातील एखाद्या संख्येचे भाग. ५.-(संगीत.) चिजेचे निरनिराळे भाग. ६. (भाषा.) शब्दातील एकत्र उच्चारल्या जाणाऱ्या ध्वनींचा समूह. श्वासोच्छ्वासाच्या एका सपाट्यामध्ये उच्चारला गेलेला ध्वनिसमूह. या ध्वनिसमूहामध्ये एक ध्वनी सर्वात जास्त मुखर (स्पष्टपणे ऐकू येणारा) असतो. पहा : **अक्षर** (वा.) **अवयव पाडणे** –(ग.) अवयव शोधून काढणे.**अवयव काढणे** – दिलेली राशी वा अंक त्याच्या अवयवांच्या गुणाकाराच्या स्वरूपात मांडणे.

**अवयवउच्छेदन** न. (वै.) एखाद्या रोगामुळे खराब झालेला शरीराचा एखादा अवयव, त्याचा संपूर्ण शरीरावर परिणाम होऊ नये म्हणून पूर्णपणे कापून टाकणे. [सं.]

**अवयवच्छेद** पु. १. शरीराचा अवयव -हात, पाय, कान इ. शस्त्राने कापणे. २. शब्दाचे अवयव वेगळे करणे. [सं. अवयव+छेद]

**अवयव प्रमेय** न. (ग.) पदावलीतील अव्यक्त राशीस विशिष्ट किंमत दिल्याने जर पदावलीची किंमत शून्य होत असेल, तर अव्यक्त उणे ती किंमत ही राशी त्या पदावलीचा अवयव असते हा सिद्धांत. [सं.]

**अवयवशः** क्रिवि. प्रत्येक भाग घेऊन; पृथक्पणे प्रत्येक वेगवेगळे करून; भिन्न करून; एकेक (संस्कार करणे). [सं.]

**अवयवक्षम** वि. (भाषा.) ज्यामुळे अवयव सिद्ध होतो असा (ध्वनी). [सं. अवयव + क्षम]

**अवयवार्थ** पु. १. समासादी शब्दांतील प्रत्येक अवयवाचा, पदाचा अर्थ. २. सरळ वाच्यार्थ. [सं.]

**अवयवावयवी भाव** पु. अवयव आणि अवयवी यांचा जो परस्पर संबंध तो; पदार्थ व त्याचे भाग यांमधील संबंध. उदा. पट व तंतू यांमधील संबंध. [सं.]

**अवयवी** पु. निरनिराळे भाग, इंद्रिये, उपांगे असलेला, जोड भाग असलेला पदार्थ, शरीर; शरीरी; देहधारी : 'सांग पां धनंजया । अवयवी अवयविया । आच्छादिजे की तया । तेचि रूप ।।' – ज्ञा १४.१२५.

**अवयवीकरण** न. (ग.) दिलेली राशी अवयवांच्या गुणाकाराच्या स्वरूपात मांडण्याची क्रिया. [सं.]

**अवयस्क** वि. अज्ञान; कायदेशीरदृष्ट्या वयात न आलेला.

**अवयाल** न. ओल्या खोबऱ्याचे कढवून काढलेले तेल.(हेट.) पहा : **अरडेल** (गो. अवल = पूर्ण तयार झालेला नारळ)

**अवयोग** पु. कुयोग; अशुभ वेळ : 'अवयोग बारा घटकांपर्यंत होता. त्याजमुळे त्रितीये प्रहरीं दरबारास गेलों.' – पेद २५.१०७.[सं.]

**अवर** क्रिवि. अलीकडचा; ह्या बाजूचा (कधी 'तवर'शी जोडून उपयोग) :'म्हणोनि पुरुषु क्षराक्षर । दोन्ही देखोनि अवर ।।' – ज्ञा १५.५३८.
वि. १. धाकटा; वयाने लहान. २. पाठीमागचा; नंतरचा. ३. कनिष्ठ; हाताखालचा; नीच. ४. पश्चिमेकडील. [सं.]

**अवरक्त** वि. (भौ.) दृश्य वर्णपटाच्या लाल रंगापलीकडे असणारा. (दृश्य प्रकाशापलीकडे असणाऱ्या औष्णिक प्रारणाच्या तरंगलांबीसाठी वापरतात. ) [सं.]

**अवरक्त प्रारण** न. (भौ.) अवरक्त किरण बाहेर फेकण्याची क्रिया. [सं.]

**अवरज** पु. धाकटा भाऊ. [सं.]

**अवरज** न. मोठे, अपार नुकसान; सर्वप्रकारे नाश; समूळ, निःशेष नासधूस; नुकसान. [सं. अ + वर्ज]

**अवरजा** स्त्री. धाकटी बहीण. [सं.]

**अवरजा** पु. १. हिशोबाची वही, डायरी, रोजनिशी, खतावणी यांतील

एक सदर; उतारा; खतावणीतील एक स्वतंत्र खाते; रोजकीर्दीतील एखाद्या विशिष्ट बाबीच्या जमाखर्चाचा उतारा. २. (सामान्यतः) हजेरीपत्रक. पहा : **आवर्जा** [फा. आवर्जा]

**अवरजून** अ. (विरू. आवरजून) १. स्पष्टपणे; हडसून खडसून. २. प्रत्यक्ष; मुद्दाम; एकदम; तडक; बुद्ध्या : 'अवरजून पंचप्राण झड घालिती खगेंद्र सुधारसा ।' – होला १०७.

**अवरठा–डा** वि. विवाहाची योग्य वेळ गेल्यानंतरही विवाह न होता राहिलेला; अविवाहित; ब्रह्मचारी. पहा : **आठवर**

**अवरठेपणा** पु. ब्रह्मचर्य; कौमार्य.

**अवरतमाना** स्त्री. बायका; स्त्रिया : 'अवरतमाना चार जखमी केलिया आहेती.'–मइसा १६.१५. [फा. औरत + माना]

**अवरपर** वि. परोक्षापरोक्ष; दृष्टश्रुत; पाहिलेले, ऐकीव. [सं.]

**अवरंगजेबी** स्त्री. कापडाचा एक प्रकार : 'मागे तीन अवरंगजेब्या लिहिल्या होत्या ते आम्ही राजांचे भेटीस येऊं तेव्हां देऊं.' – ब्रच २९१.

**अवरा** पु. कडवेवाल; कडवा; पावटा; अळसुंद्यासारखा एक धान्याचा प्रकार. (कों.) [का. अवरि]

**अव(वा)रा** वि. भलताच; वाटेल तसा : 'येथे मलकापुरीस (मलकापुरच्या टांकसाळीच्या रुपयास) रुपयेस अवरा वट्टा पडतो.'– ऐलेसं ३९७८.

**अवरात्र** स्त्री. रात्रीचा शेवटचा प्रहर. [सं. अपरात्र अप.]

**अवरी** वि. अविवाहित; कुमारी : 'त्याची कन्या चंपकमालिनी । ते अवरीच असे आजुनी ।' – जै ५५.८४. [सं. अ + वृ]

**अवरीखणे** स्त्री. १. दुर्वर्तन; विरुद्ध वर्तन; आचरण. २. अप्रीती; खप्पा मर्जी. पहा : **आवरी** [सं. अव + रीति]

**अवरुद्ध** वि. १. अडथळा केलेले; रोधलेले; कुंठित; अटकाव केलेले; हरकत घेतलेले; थांबविलेले; बंद पाडलेले. २. व्याप्त ३. राखलेली; ठेवलेली; बाळगलेली (राख, रांड). [सं. अव + रुध्]

**अवरुद्ध कंठ** पु. भावनेने दाटून आलेला कंठ, गळा – आवाज.

**अवरुद्ध भांडवल** न. (अर्थ.) अडकलेले, गुंतून पडलेले भांडवल.

**अवरुद्ध मत्ता** स्त्री. (अर्थ.) ज्या मालमत्तेचा विनियोग कोणत्याही व्यवहारासाठी करता येणार नाही अशी बंद करून ठेवलेली मालमत्ता.

**अवरुद्ध लेखा** पु. (अर्थ.) ज्या खात्यातून पैसे काढणे कायद्यान्वये बंद केले आहे असे खाते; गोठवलेले खाते.

**अवरूप** वि. विरूप; कुरूप. [सं.]

**अवरूला** पु. आरोळी; आवाज : 'अवरूला ऐकिला राम भरतारान । घेतीला रंग्या बाणू रे ।' – एहोरा ५.५६.

**अवरेखित** वि. (ग.) अधोरेखित; खाली रेष मारलेले. [सं.]

**अवरोध** पु. १. अडथळा; हरकत; अटकाव; आडकाठी; प्रतिबंध; कुंठितावस्था : 'कृष्ण प्राप्तीशी अवरोधु । सबळ क्रोधु उपजेल ।।' – एरुस्व २.४८. २. नातलगाच्या मृत्यूच्या श्रवणाने येणारी अशुद्धता; सुतक; मृताशौच. ३. अंतःपुर; जनानखाना; राणीवसा : 'तदुपरि अवरोधद्वार किंचिद्विलंबे । यदुपति मग पावे पार्थ हस्तावलंबे ।।' – सारुह ५.४३. ४. (भाषा.) श्वासनलिकेतून बाहेर पडणाऱ्या हवेला उच्चारण अवयवामुळे होणारा संपूर्ण अडथळा. (वा.) **अवरोध पडणे**– अडथळा होणे; विलंब लागणे : 'कासीराव रास्ते यांचा काळ रोज मजकुरी जाला. त्याची स्त्री सती निघाली याजकरिता गंगाधरराव रास्ते यांस अवरोध पडला.' – पुअभा ३.१२२. [सं.]

**अवरोधक** वि. (शाप.) अडथळा करणारा; अडवणारा; रोखणारा.[सं.]

**अवरोधकरक्षी** वि. (यंत्र.) अडथळ्यापासून रक्षण करणारे (उपकरण).

**अवरोधणे** उक्रि. अडथळा करणे; हरकत करणे; आडकाठी करणे; थांबविणे; खोळंबविणे. [सं. अव + रुध्]

**अवरोधन** न. प्रतिबंध करणे; बाजूस सारणे; निवारण करणे.

**अवरोधित** वि. दाबलेले, रोखलेले, प्रतिबंध केलेले.

**अवरोह** पु. १. उतार; उतरणे; खाली येणे. २. उंच स्वरापासून नीच स्वरात जाणे. [सं.]

**अवरोह–हण** पु. न. १. खाली उतरणे; अवतरण; अधोगमन; पासून, खाली, वरून, बाजूने जाणे. २. वर चढणे, जाणे. ३. (संगीत.) निषादापासून खाली षड्जाकडे स्वर म्हणत येणे. याच्या उलट आरोह. ४. स्वरनलिकांचा कंप हळूहळू कमी प्रमाणात होणे; आवाज खाली येणे. ५. वृक्षास वरपर्यंत वेढणारा वेल. [सं.]

**अवरोही** वि. उतरता. [सं.]

**अवरोहीक्रम** पु. उतरता क्रम; क्रमशः कमी होणारी रचना; (ग.) मूल्य कमी कमी होत जाईल अशा तऱ्हेने लावलेला राशींचा क्रम.[सं.]

**अवरोही फल** न. (ग.) स्वचलाची (स्वतंत्रपणे ज्याचे मूल्य बदलता येते अशी चल राशी) किंमत वाढवीत गेल्यास फलाची किंमत जर कमी कमी होत असेल, तर ते फल अवरोही होय. [सं.]

**अवरोही वर्ण** पु. (संगीत.) निषादापासून खाली षड्जाकडे येताना लागणारे वर्ण. [सं.]

**अवरोही वारा** पु. (भू.) विशेषतः रात्रीच्या वेळी डोंगर उतारावरून खाली वाहणारा थंड हवेचा प्रवाह.

**अवर्गीकृत** वि. वर्गवारीप्रमाणे न विभागलेले, वर्गवारी न केलेले.

**अवर्जित** वि. सूट सवलत नसलेले; न सोडलेले; न टाकलेले.

**अवर्गीय** वि. वर्गीकरण न केलेले; वर्गवारी न करता येणारे; संकीर्ण; किरकोळ; ज्यात निरनिराळे प्रकार आहेत असा. व्याकरणात हा प्रयोग येतो. [सं.]

**अवर्ण** वि. १. विजातीय; आपल्या जाति – वर्णाबाहेरील. २. (ल.) निंद्य; दूषणीय; चातुवर्ण्याबाहेरील : 'जो खादाड आणि स्थूलोदर । जो अवर्णस्त्रियेचा करी स्वीकार । जो श्वशुरगृही राहे निरंतर । तयाचा विचार नायकावा ।।' – जै २.९१. [सं. अ + वर्ण]

**अवर्ण आवर्ण** न. चौकी पहारा, बंदोबस्त : 'बादशहा व अबदल अहदखान याजभवते अवर्ण आपले केले आणि बाबास लिहून पाठविले की, आम्ही बादशहास आगऱ्यास घेऊन जातो.' – मशियाका ४०८.

**अवर्ण, अवर्णनीय, अवर्ण्य** वि. वर्णन करण्यास कठीण असे; शब्दातीत; अनिरूपणीय : 'अवर्ण अंबाऱ्या शोभल्या ।।' – नव १३.७५. [सं. अ + वर्ण]

**अवर्णपूजा** स्त्री. उपदेवतांची पूजा; मुख्य देवतांखेरीज इतर देवतांची

पूजा : 'भक्तजनाचिया काजा । जेवीं करिती अवर्णपूजा । तेवीं सैन्य रचिलें वोजा ।।' – एरुस्व ६.५४. [सं. आवरण]

**अवर्णिता** स्त्री. (यंत्र.) रंगहीनत्व; रंग नसणे. [सं.]

**अवर्णी भिंग** न. (शाप.) निरनिराळ्या पदार्थांच्या मिश्रणातून बनविलेले व वेगवेगळ्या केंद्रशक्ती असलेले भिंग. यातून बाहेर पडणारा प्रकाश हा लोलकातून बाहेर पडणाऱ्या रंगापासून मुक्त असतो. [सं.]

**अवर्णोदक** न. ब्रह्मांडाभोवती व्यापून असलेले पाणी : 'की श्रीकृष्णा अवर्णोदक आले भेटी' – रुस्व ९१. [सं.]

**अवर्तणूक** स्त्री. गैरवर्तणूक; दांडगाई : 'कर्ज घेऊन न द्यावे ही रीत कोठील ? असे अवर्तणुकेने परिणाम लागेल की काय?'–वे १७४२.५.

**अवर्षण** न. पावसाचा अभाव; वृष्टीचा अभाव; अनावृष्टी; दुष्काळ : 'आणि सुखाचें अवर्षण पडिलें ।'– ज्ञा ११.३८१. [सं. अ + वृष्]

**अवल** वि. १. पहिला; उत्तम; प्रमुख. २. (ल.) अतिशय मोठा; उच्च. ३. पहिल्या प्रतीचा, दर्जाचा (जमीन, रेशीम वगैरे) वर्गवारीत पहिला. क्रिवि. प्रथमतः; पहिल्यांदा; प्रारंभी; आदी.
स्त्री. पहिला किंवा आरंभीचा भाग. [फा. अव्वल]

**अवल** वि. पूर्णपणे तयार झालेला (नारळ). (गो.)

**अवल–ले** न. वल्हे.

**अवलअखेर–आखर** क्रिवि. आरंभापासून अखेरपर्यंत; अथपासून इतिपर्यंत (नकारार्थी प्रयोगात) पूर्णपणे; एकंदर; समूळ; बिलकुल; अगदी; सर्वस्वी. [फा. अव्वल् + आखिर = शेवट]

**अवल अखेर इस्तावा** पु. नवीन जमिनीवर दरवर्षी वाढत जाणाऱ्या करांपैकी पहिला.

**अवल अर्जी** वि. (कायदा) मूळ फिर्याद; तक्रार. [फा.]

**अवल आढावा** पु. वर्षारंभी मागचे येणे – देणे समजण्यासाठी मांडलेला जमाखर्च.

**अवलकार्कून** पु. मुख्य कारकून; फडणीस. [फा.]

**अवलकी** स्त्री. पोहे. [का. अवलक्की]

**अवल कोर्ट** न. मूळ दावा किंवा फिर्यादीबद्दल ज्या न्यायालयात संपूर्ण चौकशीचे काम चालून निकाल मिळतो ते न्यायालय.

**अवलगामी** अ. वर्मी; नाजूक जागी : 'अवलगामी लागून पटकन् जीव जाईल माझा.' – आभाळ १२७.

**अवलजप्ती** स्त्री. दाव्याचा निर्णय होण्यापूर्वी मिळकत न्यायालयाने आपल्या ताब्यात घेणे.

**अवलणे** उक्रि. वल्हविणे; हाकारणे. [सं. आ + वल् = वल्हविणे]

**अवलदोड–द्वाड** वि. वाईटपणात, द्वाडपणात अग्रगण्य; बिलंदर; अट्टल; पक्का.

**अवलपुरावा** पु. प्राथमिक पुरावा; न्यायालयाने प्रथमावस्थेत पाहावा म्हणून हजर केलेला दस्तऐवजासारखा पुरावा.

**अवल रजिस्टर** न. आजमितीस दर एक गावातील जमिनी कोणाकोणाकडे कोणत्या हक्काने वहिवाटीस आहेत त्याचे तपशीलवार नोंदपत्रक.

**अव(व्व)लसाल** न. १. वर्षाचा आरंभीचा भाग. २. विवक्षित संख्येतील मालिकेतील पहिले वर्ष. ३. हिशोबाच्या सालांतील पहिले साल. ४. सुहूर एका वर्षाच्या काळात ज्येष्ठातील (वैशाखातील सुद्धा) काही तिथी दोनदा येतात यामुळे त्यांच्या निर्देशातील संदिग्धता घालविण्यास 'अवलसाल', 'अखेरसाल' हे शब्द योजतात : 'ज्येष्ठ शुद्ध ४ घटी ५ अवलसालीं राजश्रींची मुंज जाहली.' – शिचप्र २७. [फा.]

**अवलक्षण** न. १. अशुभ, अनिष्टसूचक चिन्ह, खूण, देखावा, चेष्टा, कृत्य; दुश्चिन्ह. २. अपशकुन; अरिष्ट; उत्पात. ३. वाईट सवय; खोड : 'बहुतांसी न मने तें अवलक्षण । सहजच जालें ।।' – दास १९.३.२७. [सं. अव + लक्षण]

**अवलक्षणी** वि. १. दुर्गुणी; खोडसाळ. २. अरिष्टकारक; दुश्चिन्हाचे; अवकृपेचे; औत्पातिक. ३. शारीरिक व्यंग असलेला; कुरूप; विद्रूप. [सं.]

**अवलक्ष्मी** स्त्री. कमनशीब; दुर्दैव; दुर्भाग्य; आपदा. [सं.]

**अवलंब** पु. १. आसरा; आश्रय; संरक्षण; थारा; आधार. २. (ग.) लंबक ज्या रेषेवर स्थिर राहतो ती रेषा (त्या ठिकाणच्या गुरुत्वाकर्षणाची दिशा दर्शवणारी रेषा). ३. (ज्यो.) एखाद्या स्थळाचे स्वस्तिकापासून खस्थ ज्योतीपर्यंत दृङ्मंडलावरील अंशात्मक अंतर; कोट्यंश; नतांश. [सं. अव + लंब]

**अवलंबणे** उक्रि. १. आश्रय करणे; आधार धरून राहणे. २. पकडणे; लोंबकळणे; धरणे; चिकटणे; कवटाळणे. ३. धारण करणे; उचलणे; स्वीकारणे; पत्करणे; अंगीकारणे.

**अवलंबन** न. ग्रहण; स्वीकार; धारण : 'चित्त अवलंबने वीण ।' – विसिंपू २.९३. [सं.]

**अवलंबित** वि. १. आश्रय दिलेला; संरक्षिलेला; हाती धरलेला; पोसलेला; बाळगलेला; कैवार घेतलेला. २. घेतलेला; धरलेला; कवटाळलेला; पकडलेला (संरक्षणासाठी). ३. लोंबता; लटकता; हलता. ४. परतंत्र. ५. विश्वास ठेवून असलेला. [सं.]

**अवला** पु. १. अवले. पहा : **वल्हे**. २. वल्हेकरी. ३. (प्रा.) नवरा : 'कांतेचिया भिडा । आवला होये जगायेवढा ।' – अमृ १.३४.

**अवलात** स्त्री. मुळातच; अव्वलात; सुरुवातीसच.

**अवलाद** स्त्री. १. पुत्रपौत्रादी संतती; वंश; कुळी; प्रजा : 'राम अवलाद कुशपत्नी धामा । अवलाद देह असे हा ।।' – नव ८.८९. विशेषतः मुलाचा वंश. २. व्रात्य; खोडसाळ. [फा. औलाद]

**अवलाद, अफ्लाद** स्त्री. वंशपरंपरा; पुस्तदरपुस्त : 'लेकराचे लेकरी अवलाद अफ्लाद तुवां खाणें' – मइसा ८.२८.

**अवलाव, अवल्हाव** पु. १. अनिष्ट प्राप्ती; अपलाभ : 'तैसा कर्माकारा दूजेया । तो करितेपणांचा आत्मेया । अवल्हाओ येतो गेलेयां । काहिं उरे ।।' – राज्ञा १८.४०९. २. आळ. [सं. अव + लाभ]

**अवलिप्त** वि. १. माखलेला; चोपडलेला. २. (ल.) दुष्कृत्यात संबंध असलेला; अनिष्ट कृत्यांत भाग घेणारा; एखाद्या दुष्कर्माचा वाटेकरी. ३. कलंकित; दोषयुक्त. [सं.]

**अवलिया** पु. १. साधू; संत; पुण्यात्मा; ईश्वराच्या चिंतनात मग्न असणारा; विदेही. २. (ल.) लहरी. ३. स्वच्छंदी; मौला; छांदिष्ट

मनुष्य. ४. चमत्कार करून दाखवणारा. [फा. वलीचे अव.]

**अवली** स्त्री. आघाडी; प्राधान्य; गुणाधिक्य; वरचष्मा; उत्कर्ष; प्रकर्ष. (क्रि साधणे.) [फा. अव्वल्]

**अवलीला, अवलीळा** क्रिवि. सहज; सुलभपणे.
स्त्री. क्रीडा; खेळ; लीला; कसरत; उड्या इ.

**अवलीद** पु. घोड्याच्या अंगावरील केसांचा भोवरा.

**अवलुंठन** न. १. लोळण; लोळण्याची क्रिया; लुंठन. २. लुटणे याअर्थी चुकीने वापरतात. [सं.]

**अवले** न. वल्हे : 'स्वयें अवलें घेउनि करीं वेगें । नाव हळु हळु लोटीत जळासंगे ।' – अकक १.१४२.

**अवलेकरी, अवल्या** पु. १. वल्हेकरी; वल्हे मारणारा : 'गंगा म्हणता गीता गंगा सरी न पावे । अवले पोहतां बुडती म्हणवुनि सरी न सामावे ।'– बगाथा ६२८. २. (ल.) सत्ता गाजविणारा; सत्ताधीश; दिशा दाखविणारा; कर्णधार; नायक.

**अवलेप –अवलेपन** पु. न. १. माखणे; सारवण; चोपडणे. २. ज्याने माखावयाचे तो पदार्थ. ३. माखण्याची क्रिया.

**अवलेह** पु. चाटण; पाक; रसक्रिया; लेह. [सं.]

**अवलोक** पु. १. नजर; दृष्टी : 'करूनि आपुलिये दिठी चोखु । मग धापें अवलोकु । तयावरि ।' – ज्ञा १७.१४७. २. प्रकाश : 'कां घरा आंतुल एकु । दीपाचा तो अवलोकु ।' – ज्ञा १८.३२८. ३. दर्शन; निरीक्षण; अवलोकन; पाहणे : 'येथें मी वांचून अवलोकीं । आन हेतु असे ।' – ज्ञा १५.४२४. [सं. अव + लोक्]

**अवलोकणे** उक्रि. पाहणे; बघणे; प्रेक्षणे; विलोकणे; न्याहाळणे; निरखणे; निरखून पाहणे : 'कामें नेलें चित्त नेदी अवलोकू मुख ।' – तुगा ४५६. [सं. अव + लोक्]

**अवलोकन** न. १. निरीक्षण; चिंतन; विलोकन; पाहणे; एखादा विषय डोळ्याने किंवा विचारात्मक बुद्धीने जाणण्याचा व्यापार. २. तपास किंवा चौकशी करणे. ३. दृष्टी. ४. डोळा. [सं.]

**अवलोकन दंड** पु. (स्था.) दर्शनी कठडा. [सं.]

**अवलोकित** वि. १. निरीक्षलेले; पाहिलेले. २. चिंतिलेले; ध्यान केलेले. २. बुद्धधर्मीय.
न. दृष्टी; कटाक्ष [सं.]

**अवलोकित दर्शन** न. (नृत्य.) नृत्य करताना खालील वस्तू पाहण्याचा अभिनय करणे. [सं.]

**अवलोकितेश्वर** पु. गौतमबुद्ध. [सं.]

**अवलोडन** न. पाण्यात डुंबणे; डुबकणे; बुचकळ्या मारणे. [सं.]

**अवलोभन** न. कामवासना. [सं.]

**अवलोम** वि. १. अनुकूल असलेला. २. योग्य; लायक. [सं.]

**अवश** वि. १. स्वतंत्र; दुसऱ्याच्या ताब्यात नसलेला; वश न झालेला; न माणसाळलेला. २. पराधीन; परतंत्र; स्वाधीन नसलेला. ३. उच्छृंखल; स्वच्छंदी; स्वैर; अनियंत्रित. [सं.]

**अवशक्ति–क्ती** स्त्री. अशक्तता; निर्बलता; असमर्थता; कमकुवतपणा; दौर्बल्य; शक्तिक्षीणता. [सं. अशक्तिचा अप.]

**अवशभाव** पु. पराधीनतेची जाणीव.

**अवशात** क्रिवि. अकस्मात; एकाएकी : 'अवशात निजामशहासही यदिलशाहसाठी युद्धप्रसंग पडले.' – मऐशि ५.१४.

**अवशिष्ट** वि. बाकी उरलेले; शेष; शिल्लक राहिलेले; उर्वरित.
न. उरलेला भाग. [सं.]

**अवशिष्ट बेकारी** स्त्री. (अर्थ.) शारीरिक किंवा मानसिक दुर्बलतेमुळे येणारी बेकारीची परिस्थिती.

**अवशी** स्त्री. पूर्वरात्र; प्रदोष समय; तिन्हीसांज. पहा : **अवस** : 'मग अवशींची प्रहररात्र गुदरलियावर गुप्तपणें हत्तीच्या घांटा काढून डेरेदांडे पाडून झाडून निघालें' – भाब ११९.

**अवशीतन** न. (भूशा.) द्रवस्थितीतून कोणताही पदार्थ घन स्थितीत येण्यासाठी आवश्यक असलेल्या तापमानापेक्षाही कमी तापमान होणे. [सं.]

**अवशीतन करणे** क्रि. (भौ.) काही ठरावीक उद्देश डोळ्यासमोर ठेवून वस्तू हवी त्यापेक्षाही कमी थंड करणे.

**अवशेष** पु. १. बाकी; शिल्लक; शेष; अवशिष्ट भाग : '५५० मिटरवर मृत प्रवाळ प्राण्यांचे अवशेष आढळून आले.' – महा ६०; (पुरा.) प्राचीन मानवी जीवनात कालपरत्वे वापरलेल्या विविध वस्तूंचे भाग. यात दगडी हत्यारे, भांडीकुंडी, अलंकार, मूर्ती, खेळणी, आयुधे वगैरेंचा समावेश होतो. तसेच यात त्यांच्या वस्तीच्या व आहारपद्धतीच्या खुणाही येतात. २. राहिलेली रक्कम किंवा संख्या. [सं.]

**अवशेष खनिज** न. (भूशा.) रूपांतरण किंवा विघटन झाल्यावर मूळच्या स्वरूपात राहिलेले खनिज. [सं.]

**अवशेषित** वि. ज्यांचे फक्त अवशेष राहिले आहेत असे : 'पडलेल्या, अवशेषित घरांची संख्या मोठी.'– अगावि ४५. [सं.]

**अवशोषक** पु. (भौ.) शोषणारी वस्तू; शोषून घेणारा पदार्थ. [सं.]

**अवश्य** वि. अनिवार्य; दु : साध्य; वश न होणारे; न टळणारे.

**अवश्य, अवश्मक** क्रिवि. १. आवश्यक बद्दल उपयोग; जरूर; खचित; खात्रीने; खास; अलबत; निःसंशय; अगत्य; निखालस. २. एखाद्याने सांगितलेल्या गोष्टीच्या अंगीकाराचे द्योतक; संमतिदर्शक होय, बरे या अर्थी अव्यय. [सं.]

**अवश्यता** स्त्री. निःसंशयत्व; निःसंदिग्धता; अनिवार्यता.

**अवश्यबुद्धि–द्धी** स्त्री. आस्था; अगत्य; कळकळ; आसक्ती; अपेक्षाबुद्धी; आवड; अमुक गोष्ट अमुक कार्यार्थ आवश्यक आहे अशी समजूत. [सं.]

**अवश्यभाविता** स्त्री. अपरिहार्यता; अनिवार्यता; टाळता येणार नाही अशी, अटळ अशी स्थिती. [सं.]

**अवश्यभावी** वि. १. खचित – खास होणारे; खात्रीचे; निश्चित; अचूक. २. अपरिहार्य.

**अवश्यमेव** क्रिवि. खात्रीने; जरूर; अगदी खचित – खास; अवश्यच; निःसंशय; निखालस. [सं.]

**अवश्रब्ध** वि. सेकंदाला १६ आवर्तापेक्षाही कमी कंपनसंख्या असलेल्या व म्हणून मानवी श्रवणक्षमतेपेक्षा खालच्या पातळीवर असणाऱ्या (ध्वनिलहरी). [सं.]

**अवश्रेणिक** वि. सामान्य श्रेणीचा; खालच्या श्रेणीचा. [सं.]

**अवष्टब्ध** वि. १. बांधलेला; गुंडाळलेला; प्रतिबद्ध; अडवलेला; थांबवलेला; थोपवलेला; अडथळा केलेला. २.(शब्दशः व ल.) आधार दिलेला; तोललेला. पहा : **अवष्टंभ** ३. जवळचा; जवळ आलेला. ४. नेट धरणारा; स्थिर. ५. गर्विष्ठ. ६. पक्षाघात झालेला. [सं.]

**अवष्टंभ** पु. १. अडथळा; अटकाव; अवरोध; खोळंबा; हरकत. २. टेका; आधार; आश्रय; आसरा. ३. (ल.) कृपादृष्टी; दया; मदत; पाठिंबा. ४. अहंकार; गर्व; आढ्यता : 'येर अवष्टंभु जो आघवा । तो आरूढोनि मद्भावा ।' – ज्ञा ९.४१४. ५. अष्टसात्त्विक भावांच्या ऊर्मी , फुंज : 'आपण पां करूनि स्वयंभु । बुझविला अवष्टंभु । संजयें तेणें ।।' – ज्ञा १८.१६२२. ६. मलावरोध ७. (ज्यो.) आपल्या वार्षिक भासमान गतीत सूर्य ज्यावेळी आकाशीय विषुववृत्तापासून दक्षिणेला जास्तीत जास्त अंतरावर असतो ती वेळ. [सं.]

**अवस–औस** स्त्री. अमावास्या. [सं. अमावास्या] (वा.) **अवसेस पुनवेस येणे, घडणे** – केव्हातरी प्रसंगवशात येणे; एखाद्या वेळी, अधूनमधून येणे.

**अवस, औस** स्त्री. १. रात्रीचा – मध्यरात्रीच्या पूर्वीचा भाग : 'न म्हणे अवसीं पाहाटी । – ज्ञा १३.२९. २. पहाट; उषःकाल, अरुणोदय. (नेहमी सप्तमीत प्रयोग) अवसपहाट असा सामासिक शब्दही रूढ आहे. पहा : **अवशी** [सं. उषसि]

**अवसणे** अक्रि. अवतरणे; प्रवेश करणे; अंगात येणे : 'तेथे अवसली गिरिजा । सिद्धी पावेचि काजा । म्हणोनि तपे दुजा । केला तपोवनीं ।।' – कालिका ५.४२. [सं. आ + विश्]

**अवसति** क्रिवि. अकस्मात; एकाएकी.

**अवसन्न** वि. १. संपलेले. २. अयोग्य. ३. नष्ट; मृत. [सं.]

**अवसर** पु. १. रिकामा वेळ; अवकाश; फुरसत. २. योग; संधी; प्रसंग : 'अवसर मदनाला तोच अत्यंत फावे ।' – सारुह २.६४. २. योग्य काळ; योग्य वेळ, समय; सोईस्कर वेळ (कोणत्याही कार्याची); हंगाम. ३. जागा; स्थान. ४. संचार; वारे; घुमारा : 'दुसऱ्या दिवशीं श्री वेताळाचा अवसर येत असे' – भारत मित्र फेब्रु. १९२५.३०. [सं.]

**अवसर** पु. स्त्री. घाई; तातडी. [ता. अवसरम]

**अवसरणी** स्त्री. १. आकाशवाणी : 'अवसरणी वाचा झाली ।' – वसा ६३. २. एखादा विचार किंवा बेत करीत असतां दुसऱ्याचे साहजिकच बोलणे ऐकून, ते आपल्या मनातील विचारास लागू करून घेऊन व आपल्या मनातील कार्यास जोडून शंकानिवारण किंवा अनुमान किंवा तदनुरूप वर्तन करतात, असे त्या बोलण्यातील शब्द. ३. लौकिक वार्ता; भाकित; होरा (क्रि. काढणे, निघणे). ४. अफवा; बातमी; वदंता. [सं. अवसरवाणी; अशरीरिणी]

**अवसरणे** अक्रि.१. झुरणीस लागणे; खंत घेणे. २. कमी होणे; ऱ्हास पावणे. (ना.) [सं. अव + सृ]

**अवसरमाता** स्त्री. अंगात येणारी जागृत देवता : 'अवसरमाता चोपडाई करी धावणें ।' – ऐपो ३३४.

**अवसरिणी** स्त्री. गर्भितार्थ काढून दाखवणारी; वेळ सांगणारी : 'चंद्रहंसा अवसरिणी.' – रुस्व १४. [सं.]

**अवसरी** स्त्री. १. अडचण; अडथळा; हरकत; शंका : 'माझी अवसरी ते फेडी । विजयाची सांग गुढी ।।' – ज्ञा १४.४१०. २. अभाव; उणीव : 'पै मानसीचि जरी । अहिंसेची अवसरी । तरी कैंची बाहेरी । ओसंडेल ।।' – ज्ञा १३.२९७. ३. अवकाश; जागा; अवस्थिती; स्थान : 'अनुभव हा ठाव वरी । आपुलीची अवसरी ।।' – अमृ ५.६२. [सं. अव + सृ]

**अवसरी** पु. वेळ दाखविणारा; घड्याळजी : 'इशानु अवसरी । कुबेरू भांडारी । इंदु हडप धरी । आंगाजवळी ।।'– शिव ४९.[सं. अवसर]

**अवसरी** स्त्री. भूतबाधा : 'अवसरीं घेतलें'– ६.५.

**अवसरोक्ति–क्ती** स्त्री. समयस्फूर्तीचे भाषण. [सं.]

**अवसरोचित** वि. समयोचित; यथाकाळ : 'मग अवसरोचित भोगावे । भोग सकळ ।' – ज्ञा २.१८८. [सं.]

**अवसर्पिणी** स्त्री. खाली येणे; एक प्रदीर्घ कालावधी (जैन) : 'बारा भाग अवसर्पिणी अवस्थेचे धरतात.' – युगान्त २००. [सं.]

**अवसऱ्या** वि. ज्याच्या अंगात संचार झाला आहे असा; अंगात आणणारा –देवऋषी, भगत. [सं. अवसर]

**अवसात** क्रिवि. एकदम; एकाएकी; अकस्मात : 'पाठीं अवसात ये चेवो । तै ते अवघेचि होय वावो ।' – ज्ञा ६.६९.

**अवसाद** पु. १. श्रम; थकवा; ग्लानी; कळमळ. २. औदासिन्य; विषाद; खिन्नता. २. खाली बसणे; (शाप.) साका; एखाद्या द्रव्याच्या तळाशी साचलेला गाळ, गदळ इ. ३. कमी होणे; ऱ्हास; अपकर्ष. ४. नाश. ५. अखेर; समाप्ती. [सं.]

**अवसादन** न. (भूशा.) गाळ खाली बसणे; एखाद्या द्रव्यातील अविद्राव्य पदार्थ खाली साचणे. [सं.]

**अवसादनचक्र** न. (भूशा.) गाळ साचण्याचे चक्र; नदी आपल्या पाणलोटाच्या क्षेत्रातून खालील प्रदेशात खूपसा गाळ (माती) वाहून नेते, त्या मातीचे दर वर्षी एकमेकांवर स्तर साचतात, त्यांचे चक्र. [सं.]

**अवसादन प्रवृत्ति** स्त्री. हीन, वाईट प्रवृत्ती.

**अवसादशास्त्र** न. (भूशा.) गाळापासून तयार झालेल्या स्तरित खडकांचा अभ्यास. [सं.]

**अवसादी खडक** पु. (भूशा.) गाळापासून बनलेला खडक.

**अवसान** न. १. अंत; शेवट; समाप्ती; अखेरी : 'त्या ध्यानाचे परिस अवसान । चैतन्य धन पावावें ।।' – एभा १३.९७. २. (ल.) मृत्यु; मरण; नाश : 'वैद्याचे कार्य काय अवसानी ।' – मोभीष्म ११.१४९. ३. खंड; विराम; तहकुबी; विश्रांती; खाडा; अवसाय. ४. (संगीत.) विराम; विश्रांतिस्थान; विरामचिन्हे खुणा (पदांवर). ५. धैर्य; हिंमत; धाडस; मनोधैर्य; प्रसंगावधान; आवेश; दम; धमक; उत्साह; हिय्या : 'परि हे अनावर आवरिता आवडि । अवसान तें घडी पुरों एकीं देत नाहीं ।।' – तुगा ४५८. (क्रि. धरणे, खचणे, सुटणे, गळणे, फुटणे).

६. जोर; शक्ती; सामर्थ्य; प्रयत्न; परिश्रम; ताण; ओढ; नेट; कष्ट; भर; शक्तिप्रयोग; दम : 'या मतावर श्रीधरपंत वारंवार फार अवसान देतील' – आगर ३.१४३. ७. ऐनवेळ; ऐनप्रसंग; आणीबाणीची वेळ; अडचणीचा प्रसंग. (क्रि. साधणे, सांभाळणे). ८. संधी; प्रसंग; योग. ९. आवेश; उत्साहाची घटका; विकाराची उत्कटता; मनोवृत्तींचा क्षोभ; माज; मस्ती. १०. खोटा डौल, आव. ११. (चित्र) बैठक; अवस्थान; स्थिती; आसन : 'नाना प्रकारचीं अवसानें माणसास काय, जनावरांस काय, देण्याची त्यांची मोठी खुबी असे.'– प्रति आत्म ३३६. [सं.] (वा.) **अवसानात येणे, असणे** – आटोक्यात, आवाक्यात असणे. **अवसानातून जाणे** – सामर्थ्याबाहेर, आटोक्यातून जाणे; हातातून निसटणे. **अवसान तुटणे** – धीर खचणे : ' ही बातमी ऐकून सर्व मराठ्यांचे अर्धे अवसान तुटले.' – स्वप २७. **अवसान देणे** – धीर देणे : 'आपण मातुःश्री यास अवसान देऊन यत्न करणें तो करावा' – ऐलेसं २७०३.

**अवसानघात** पु. मनोधैर्य नाहीसे करणे, नाहीसे होणे; उत्साह कमी करणे. [सं.]

**अवसानघातकी** वि. आणीबाणीच्या वेळी निराश करणारा; पाहिजे त्यावेळी काम न करून घात करणारा; गरजेच्या वेळी उपयोगी न पडणारा. [सं.]

**अवसानी** वि. प्रसंगावधानी; प्रसंगी उपयोगी पडणारा; आणीबाणीच्या वेळी तत्पर, सिद्ध असणारा; धारिष्ट्यवान. [सं.]

**अवसाफ** स्त्री. १. स्तुती; प्रशंसा; देणग्या. २. अब्रू किंवा लौकिक. [फा. असफ्चे अव.]

**अवसाव** पु. दरारा; धाक; ख्याती. (व.) [फा. अवसाफ्]

**अवसामान्य** वि. (मानस.) सामान्यांहून वेगळा; सामान्यांहून कमी; मानसिक विकृती असलेला; मानसिकदृष्ट्या अपंग; मनोदुर्बल. [सं.]

**अवसाय** पु. १. बंद होणे; उपरम; विराम; थांबणे. २. अंत; शेवट; अखेरी; समाप्ती. [सं.]

**अवसायक** पु. निस्तारक; समापक.

**अवसार** वेळ; प्रसंग; योग. पहा : **अवसर**

**अवसांद्र** वि. (रसा.) विरल, संहत नसलेले. [सं.]

**अवसित** वि. १. संपवलेले; पुरे केलेले; पूर्ण झालेले. २. समजलेले; नक्की जाणलेले; अवगत. ३. चांगले शिजविलेले; पक्व झालेले. ४. निश्चित; ठाम केलेले; ठरविलेले. ५. बांधलेले. ६. साठविलेले (धान्य वगैरे). ७. गत; गेलेले. [सं.]

**अवसिंचन** न. पाटाचे किंवा कालव्याचे पाणी देणे. [सं.]

**अवसी** पहा : **अवशी**

**अवसुती** वि. १. गैर; भलतेच; अव्यवस्थित; विस्कळित; सैल; गोंधळलेले; घोटाळ्याचे (काम, कारागिरी). २. ओबडधोबड किंवा आडमुठे काम करणारा; अडाणी; अजागळ. [सं. अव + सूत्र]

**अवसुत्या** पु. अवसुती माणूस; अडाणी माणूस; अडाणी इसम; अव्यवस्थितपणे काम करणारा (माणूस).

**अवसूद–त** वि. नेमस्त; प्रमाणशीर; बेताचा; मर्यादित. [फा. औसत]

**अवसेक** पु. १. शिंपडणे. २. तुषार. ३. (वै.) फासणी टाकून रक्त काढणे. [सं.]

**अवस्ता–अवस्तू–अवस्तूक–अवस्थ–अवस्था** क्रिवि. १. एकदम; एकाएकी; अकस्मात; गैरसावध असता. २. एकंदरीने; पूर्णपणे; अगदी; कधीही; चुकून देखील; बिलकूल.

**अवस्तु, अवस्तू** न. १. नास्तित्व; वस्तूचा अभाव . २. अवास्तवत्व; खोटेपणा; भ्रामकपणा; शुष्कपणा; पोकळपणा. ३. कुचकामाची वस्तू किंवा गोष्ट. [सं.]

**अवस्थ** पु. (ग.) विशिष्ट संदर्भातील स्थान दर्शविण्यासाठी मूळ राशीच्या पुढे जोडावयाचा अंक किंवा अक्षर. [सं.]

**अवस्था** स्त्री. १. स्थिती; दशा; टप्पा; प्रसंग; प्राप्तकाल; हवाल. २. उत्कंठा; आवड; घटका; चिंता; काळजी; हुरहुर; आशा; छंद; वेध; नाद; तन्मयता : 'येरीकडे राजकुमारी । अवस्था लागलीसे भारी ।'– एरुस्व ५.४२. [सं.]

**अवस्था चतुष्टय** न. मानवी आयुष्याच्या चार अवस्था, पर्याय, काल. (बाल्य, पौगंड, तारुण्य, वार्धक्य किंवा बाल्य, तारुण्य, मध्य, वृद्ध.) [सं.]

**अवस्थातीत** वि. मानवी जीवितातील अवस्थांच्या पलीकडे गेलेला; मुक्त; ब्रह्मामध्ये विलीन झालेला. [सं.]

**अवस्थात्रय** न. १. जागृती, स्वप्न, सुषुप्ती : 'अवस्थात्रय तिन्ही लोक' –ज्ञा १८.१३०. २. बाल्य, तारुण्य, वृद्धत्व. ३. सात्त्विक, तामस व राजस अशा अवस्था : 'किंबहुना अवस्थात्रया । हें अधिष्ठान धनंजया ।'– ज्ञा १८.३२०.

**अवस्थाद्वय** न. मानवी जीविताच्या दोन अवस्था – १. पूर्वावस्था (बाल्य, यौवन) व उत्तरावस्था (प्रौढत्व, वार्धक्य). २. जागृतावस्था व सुप्तावस्था; जागृती–निद्रा. ३. आयुष्याच्या दोन स्थिती – सुख, दुःख. [सं.]

**अवस्थान** न. १. राहण्याची जागा, ठिकाण; वसतिस्थान; वास. २. राहण्याची, असण्याची रीत. ३. पदार्थाची स्थिती, पद. ४. अस्तित्व; वसती; गुप्तवास : ' न करिता मंथन । काष्ठीं अवस्थान । जैसें कां हुताशन सामर्थ्याचें ।' – अमृ ७.५९. ५. एक, सहा, दहा महिने मुक्काम. (महा.अवस्थान– एक ते बारा वर्षे मुक्काम.) : 'द्वारावतिए पाताळ गुंफे अवस्थान.' – स्थापो १. [सं.]

**अवस्थापणे** सक्रि. ठेवणे : 'लीलेने द्विडिभांचा न मदअवस्थापिता महात रणीं ।'– मोभीष्म २. २. [सं. अवस्थापन]

**अवस्थापन** १. घट्ट बसविणे. २. निवासस्थान. [सं.]

**अवस्थाभेद** पु. जीवात्म्याच्या निरनिराळ्या अवस्था; जागृती, स्वप्न, सुषुप्ती या तीन अवस्था; पहिली विष्णूची व सत्त्वगुणाची, दुसरी ब्रह्मदेवाची व रजोगुणाची, तिसरी शिवाची व तमोगुणी. ह्यांना अनुक्रमे विश्व, तेजस व प्राज्ञ अशाही संज्ञा आहेत. या खेरीज तुरिया व उन्मनी अशाही दोन अवस्था आहेत. [सं.]

**अवस्थावेच** पु. विरहावस्थेमुळे होणारी देहावस्था : 'जऱ्ही अवस्थावेचु जाला अंगा' – नरुस्व ६५३.

**अवस्थित** वि. १. स्थल-काल व्यापक; वास केलेला; राहिलेला; थांबलेला; बसवलेला. २. स्थिर; बळकट; मजबूत; पक्का. [सं.]

**अवस्थिति-ती** स्त्री. १. राहणे; वास करणे; मुक्काम करणे; नांदणे. २. वसतिस्थान; राहण्याचे ठिकाण; स्थान; स्थळ; स्थिती; अवस्था.

**अवस्पर्शिका** स्त्री. (ग.) स्पर्शिका रेखाकृतीस (वर्तुळ, विवृत्त, अन्वस्त, अपास्त) ज्या बिंदूत स्पर्श करते, तेथपासून ती अक्षास ज्या बिंदूत मिळते त्या बिंदूपर्यंतच्या तिच्या खंडाचा अक्षावरील लंबप्रक्षेप म्हणजे स्पर्शित बिंदूची अवस्पर्शिका. [सं.]

**अवस्वर** पु. १. वेळ; प्रसंग; क्षण. पहा : **अवसर** : 'ऐसे विवरौनियां श्रीहरी । म्हणितलें तेया अवस्वरीं ।'-ज्ञा ६.१५२. २. संपादणी प्रयोग : 'अवस्वरू आईकिला'-गोप्र १५४.३.पूजेचा सोहळा : 'श्रीप्रभूचा ठाई अवस्वरू करावा'- लीचपू १५५. ४ अध्याय; प्रकरण. ५. संभोग सुख : 'रंभा आपुला अवस्वरू मागावेया आली'- श्रीच ५५.

**अवस्वरी** पु. जासूद : 'तव अवस्वरीए जुहारिले'- रुस्व १२७.

**अवहार** पु. १. एकत्र जमवणे; गोळा करणे; गुंडाळणे. २. उपसंहार; समारोप. ३. तहकुबी; खंड. ( युद्धादिकांचा) मुदतीचा-तात्पुरता तह; सावधिक संधी. ४. मोठ्या सैन्याचा आळा, पसारा. [सं.]

**अवहित** वि. १. हजर; तत्पर; सावधान; सादर; अवधानी; लक्ष दिलेला. २. ठेवलेला; जोडलेला. ३. प्रख्यात. [सं.]

**अवहित्था** स्त्री. १. शरीरावर हर्षक्रोधादी विकार-भाव दृग्गोचर होत असता ते बळेच लपवून ठेवणे; खरे रूप झाकून ठेवणे; लपवणे; झाकणे. २. (ल.) कपटी व्यवहार; ढोंग. [सं.]

**अवहिम** वि. हिमनदीच्या तळाशी असणारा गाळ. [सं.]

**अवहेलणे, अवहेळणे** उक्रि. हेटाळणी करणे : 'द्विजाची मर्यादा तदपि अवहेळूंच न शके' - सारुह ५.७०. [सं. अवहेलन]

**अवहेलन-ना** न. स्त्री. (विप्र. अवहेळणा) हेटाळणी; अव्हेर; तिरस्काराची, अपमानाची वागणूक; अनादर; अप्रतिष्ठा; तुच्छता; टर. [सं.]

**अवळका** पु. अपयश : 'अवळका करुनि शेवटी ।'- भाए ३६५. [सं. अ + बल]

**अवळचवळ** क्रिवि. १. अर्धवट, अपूर्ण-अव्यवस्थितपणे. २. अर्धवट चावून.

**अवळबंधा** स्त्री. निवारण; मनाई; आकलन; नियमन; नियंत्रण; दाब; गवसणी. (क्रि. करणे, लावणे, मांडणे, होणे.)

**अवळसर** वि. १. किंचित, काहीसे घट्ट; मजबूत. २. किंचित बारीक; अरुंद; चिंचोळे; किडकिडीत. ३. जरासे आखूड.

**अवळाअवळी** स्त्री. बांधाबांधी; आवराआवरी; सैन्याची कूच करण्याच्या वेळची तयारी; प्रवासाची तयारी. [सं. आ + वल्चे द्वि.]

**अवळ्याबंब** वि. अगडबम्ब; गलेलठ्ठ; ठोंब्या.

**अवक्षयण** न. मूल्य; ऱ्हास; घसारा.

**अवक्षारण** न. १. उपनयनातील एक विधी; गुरूने आपल्या ओंजळीतील पाणी बटूच्या ओंजळीत घालणे, ओंजळ धुणे. २. (स्था.) क्षार नाहीसा करणे; क्षार काढून टाकणे. [सं.]

**अवक्षिप्त** वि. १. खाली टाकलेला; फेकलेला. २. उपरोधाने झोंबेल असे बोललेला. २. निंदित; तिरस्कृत. [सं.]

**अवक्षेप, क्षेपण** पु. १. (रसा.) एखाद्या विक्रियाकारकामुळे एखादा घन किंवा द्रव पदार्थ अविद्राव्य झाल्याने विद्रवातून बाहेर पडून, तळाशी साचणे. अशा रीतीने एखाद्या द्रावणात मिसळलेली वस्तू घनीभूत कणाच्या स्वरूपात वेगळी करण्याची प्रक्रिया करणे. २. खाली टाकणे; फेकणे. ३. टोमणा; उपरोधी भाषण; उलट बोलणे. [सं.]

**अवक्षेपक** पु. (भौ.) अवक्षेप तयार करण्यास मदत करणारा मध्यस्थ. उदा. कापराच्या अल्कलीयुक्त द्रावणापासून कापूर वेगळा करणारा पदार्थ, पाणी. [सं.]

**अवज्ञा** स्त्री. आज्ञा न मानणे; आज्ञाभंग; अनादर; अवमान; तिरस्कार; अपमान; हेलना. (क्रि. करणे) : 'जे सामान्यत्वें लेखिती । अवज्ञा करूनि देखिती ।'- ज्ञा ३.१९५. [सं.]

**अवज्ञात** वि. अनादराने, तुच्छतेने वागविलेला; ज्याची अवज्ञा केली आहे असा. [सं.]

**अवंकण, अवंकणी** स्त्री. दुसऱ्या मळणीच्या वेळचे धान्य; अशा धान्याची रास; फोल धान्य : 'अवंकणाचा राशि'- ज्ञा ९.४५.

**अवंकणी** स्त्री. अटकळ; आकलन : 'तऱ्ही उन्मेखाचिये पेठे । गुणा अवंकणी भरीन बुद्धीची सार्टे ।।' - ज्ञा १४. पहा : **अवाका**

**अवंगणी** स्त्री. खोळंबा; थांबणे. पहा : **अवंगणे**

**अवंगणे** वि. अक्रि. थांबणे; खोळंबणे; तिष्ठत राहणे; वाट पाहणे; मार्गप्रतीक्षा करीत राहणे. [सं.]

**अवंचक** प्रामाणिक; न फसवणारा : ' ऐसा अवंचक वदोनी नृपाल आला '- नल ४४. [सं.]

**अवंचकपण-णा** न. पु. फसवणुकीचा अभाव; कपटीपणाचा अभाव; चोख व्यवहार : 'धान्य ठेविले त्वां सांठवून । ते देवालयाचे कामा लावून । अवंचकपणें सर्वार्थें ।।'-मो को. [सं.]

**अवंजा-औजा** पु. भात लावण्याचा हंगाम. (को.)

**अवंतण-णे-अवंता** न. १. आमंत्रण; बोलावणे. (क्रि. देणे, सांगणे, करणे) : 'जन्ममरणासी अवतणें । दीधलें तेणें सर्वथा ।' -एरुस्व १२.३८. २. अक्षता टाकून आवाहन करणे; विधिपूर्वक बोलावणे; अभिमंत्रण करणे.पहा : **आवतन** [सं. आमंत्रण]

**अवंतणे** क्रि. आमंत्रण देणे; बोलावणे; पाचारणे : 'भुजंगगृही जो करी वास । त्याणें अवंतिले मृत्यूस ।।'- जै ४१.३. [सं. आमंत्रण]

**अवंदा** क्रिवि. १. यंदा; चालू साली; औंदा. (ग्रा.) २. सध्या; सांप्रतकाळी : 'अवंदाचा काळीं । मोटकी राणीव सांसीनिली ।'- शिव ४८१. ३. (हेट.) पहा : **अवगु** [फा. आयन्दा]

**अवंध्य** वि. वन्ध्य नसलेला; लाभदायक; फलदायक; फायदेशीर; नफ्याचा; मिळकतीचा; हिताचा; उपयोगी. [सं.]

**अवा** पु. (विप्र.) पहा : **आवा**

**अवाई** स्त्री. १. आवई; कंडी; भुमका; खबर; गप्प : 'जनिं वनिं पसरे, राक्षसीची अवाई'-आपू ४३. २. प्रसिद्धी; प्रख्याती : 'धर्मराज श्रीमंत धन्याची त्रैलोक्यामध्ये अवाई'- ऐपो २०२. (वा.) **अवाई पडणे** - बातमी पसरणे.

**अवाईतवाई** स्त्री. संकट : 'अवाई तवाई शिपाई लोकांवरी येऊन पडतच आहे' - खास ७.३२४६. [सं. आपद]

**अवाक** क्रिवि. १. खाली; अध:प्रदेशाकडे. २. खाली तोंड असलेला. (वा.) **अवाक होणे**–चकित, स्तब्ध होणे. [सं.]

**अवाकणे** अक्रि. १. विचार करणे; मनन करणे; मनात आणणे; चिंतन करणे. २. कांकू करणे; डगमगणे; आशंकणे. ३. योजणे; बेत करणे; हेतू असणे : 'मनांमाजि अवांकिलें सर्व कांहीं ।'- राक ४.३. ४. अंदाज करणे; अटकळ करणे; कल्पना होणे; तर्क बांधणे.

**अवाकणे** अक्रि. अतिपिकणे; अविकणे. (कु.)

**अवागणे** अक्रि. वाईट मार्गाला लागणे. (कु.)

**अवागमे** क्रिवि. समजेल अशा रीतीने : 'हे वाच्य म्हणौनि बोलिजे । कां अवागमे आइकिजे ।'- ज्ञा १८.१३४२.

**अवाङ्मुख** वि. लाजेने, शरमेने मान खाली घातलेला; निराश; खाली पाहणारा. [सं.]

**अवाची** स्त्री.दक्षिण दिशा. [सं.]

**अवाचीन** वि. दक्षिणेकडील, दक्षिणेसंबंधी. [सं.]

**अवाचे–च्या–सवा** क्रिवि. अतिशय; लांबलचक; प्रमाणाबाहेर; वाटेल तितके; भलते; अवाढव्य (क्रि. बोलणे, खाणे, वाढणे, खर्च करणे.)

**अवाच्य** वि. १. उच्चारण्यास - सांगण्यास कठीण,अयोग्य; बोलण्यास अयोग्य : 'अवाच्य ते टाळी । जीभ चि गा ।' -ज्ञा १४.२०९. २. अवर्णनीय; वर्णन करण्यास कठीण; अकथनीय. ३. विरुद्ध बोलता न येण्यासारखे; अनिंद्य. [सं.]

**अवाजवी** वि. गैरवाजवी; अयोग्य. [फा. वाजिब]

**अवाजी** स्त्री. अवा; शूद्र स्त्रीला सन्मानार्थी बोलावण्याचे संबोधन (बाई, आजी याप्रमाणे). [का. अव्वा +जी ]

**अवाट** स्त्री. आडवाट.
वि. आडमार्गाने जाणारा. [सं. अ+वर्त्मन्= वाट]

**अवाटा** पु. मर्यादित केलेली जागा; ओटा. (बे.)

**अवाठा, अवाड** न. घराभोवतालची बंदिस्त जागा; आवार; अंगण; पटांगण; परसू. [सं. आवार]

**अवाडाव** स्त्री. १. अमार्गी, कुमार्गी वर्तन; सैन्याचा, लुटारूंचा हल्ला; त्यांनी केलेली नासधूस, जुलूम, जबरदस्ती, जाळपोळ. २. खोडसाळपणाचे कृत्य; लहान मुलांच्या खोड्या. ३. आटोका; पकड; मिठी (सप्तमी विभक्तीत प्रयोग).

**अवाडु** वि. वाव, रीघ नाही असे : 'त्यागा भोगा होय अवाडु ।' - भाए १४१.

**अवाढवी** पहा : **अवाडाव** : 'मुलखांत अवाढवी सर्वथा होऊं न द्यावी'- मराआ ३७.

**अवाढव्य** वि. फार मोठे; विशाल; अचाट; विस्ताराचे; राक्षसी; भयंकर; विपुल. (इमारत, शरीर, जंगल, ओबडधोबड मोठा पदार्थ, वस्तू.) [सं. अव +वृध्]

**अवात** वि. निर्वात; निवांत.
न. शांतता; निवांतपणा. [सं. अ+वात]

**अवात** न. १. मोठे वादळ; जोराचा वारा; तुफान. २. एकाएकी प्राप्त झालेले मोठे संकट, अरिष्ट, आपत्ती. [सं. अव+ वात]

**अवापन** न. संपादन करणे; मिळवणे; प्राप्ती; मिळकत.

**अवाप्त** वि. १. मिळविलेला; संपादन केलेला; ज्याने मिळविले आहे असा. [सं]

**अवाप्तकाम** वि. ज्याची इच्छा तृप्त झाली आहे असा : 'श्रीकृष्ण अवाप्तसकळकाम ।' -एभा १.२९६. [सं.]

**अवाप्ति–प्ती** स्त्री. १. मिळकत; लाभ; संपादणूक. २. नव्याने सामील करणे; नोंद करणे. [सं.]

**अवाप्ति** अनवाप्ती; अवर्षण : 'पर्जन्याच्या अवाप्तीने महालची बाकी राहिली नाही'- ऐलेसं ४७१८.

**अवाप्तिक्रमांक** पु. (ग्रं.) ग्रंथालयात नव्याने दाखल झालेल्या पुस्तकास दिलेला नोंदणी क्रमांक. [सं.]

**अवाम** पु. अव. जनता; सर्वसामान्य लोक. [फा.]

**अवार** क्रिवि. अलीकडील किंवा जवळच्या बाजूला. 'तवार' या शब्दाशी योजना. (ग्रा.)[सं.अवार = अलीकडील किनारा, बाजू.]

**अवार** वि. मोठे; अफाट; अपार. [सं. अपार ]

**अवारित** वि. प्रतिकार, अडथळा न केलेले; हरकत न केलेले; अप्रतिबद्ध. [सं. अ+ वृ = प्रतिबंध करणे.].

**अवारू, आवारू** वि. दुसरा; येरू : 'ऐसा न लागे त्याचा पार । मग आवारू जोडूनिया कर ।' - भावि १८.९३. [सं. अवर = दुसरा]

**अवार्थ** वि. ज्याचे निवारण करता येत नाही असे; ज्याला प्रतिबंध करता यावयाचा नाही असे; अनावर. [सं. अव+वृ]

**अवासवा** पहा : **अवाचेसवा**

**अवास्तव** वि. भरमसाट; वस्तुस्थितीला सोडून असलेला; न पटणारा; खोटा; भलताच. [सं.]

**अवाहक** वि. (भौ.) विद्युत, उष्णता यांचे वाहक नसलेले (पदार्थ). उदा. लाकूड, लोकर इ. [सं.]

**अवाही** वि. मशागत न करता लागवड केलेले. पहा : **अढाऊ** ३.(व.)

**अवाळू–ळे** न. गळू; चामखीळ. पहा : **आवाळू** : 'काया सुंदर गौरवर्ण भाळी अवाळें असे ।'- सप्र २.१८७. ३१.

**अवाक्षर** न. १. वाचण्यात, बोलण्यात, लिहिण्यात निघालेले भलते अक्षर; बोलण्यात, लिहिण्यात चुकी-प्रमाद; अशुद्ध उच्चार. २. एकही अक्षर; शब्द; आवाज; ध्वनी; उद्गार; चकारशब्द : 'तू दुसऱ्या कोणाजवळ अवाक्षर बोललास तर ठार मेलास म्हणून समज'- उषःकाल. ३. अपशब्द; निंदायुक्त, अभद्र, शिवराळ भाषा; दुर्भाषण. शेवटच्या दोन अर्थी नकारात्मक उपयोग. [सं.]

**अवांग** न. (शरीराचा) नाजूक भाग; मर्मस्थान. (क्रि. अवांगी लागणे, पडणे, मारणे). [सं. अव+अंग]

**अवांच्छित** वि. नको असलेला; इच्छा न केलेला : 'आणि एका अवांच्छित सामाजिक प्रक्रियेला सुरुवात झाली.'- चंद १२७.

**अवांछनीय** वि. नको असलेला; अनिच्छित; इच्छा करू नये असा; लोभ न करण्याजोगा. [सं.]

**अवांझ वाण** न. अनेक मुले असलेल्या बाईला मूल नसलेल्या बाईने

द्यावयाचे वाण : 'एका बाईने मुद्दाम येऊन बायाला अवांझ वाण अर्पण केले.' -माजी ८.

**अवांतर** न. दंगा किंवा स्वारी : 'त्या उपरी ताम्राचे (मुसलमानांचे) अवांतराकरिता भोगवटा तुटला आहे.'-मासपमा १६८.

**अवांतर** वि. १. इतर; दुसरा; बाकीचा; उरलेला (भाग, संख्या).२. मुख्य विषयाला सोडून; किरकोळ. ३. गौण; अनिश्चयात्मक; विवक्षित सदरात, प्रकारात न येणारा; किरकोळ. [सं.]

**अवांतर कार्य** न. निराळे काम; किरकोळ काम. [सं.]

**अवांतर खर्च** पु. आडखर्च; इतर खर्च.

**अवांतर प्रलय** पु. (तत्त्व.) गौणप्रलय; न्याय वैशेषिक दर्शनानुसार महाप्रलयाव्यतिरिक्त प्रलय; खंडप्रलय. [सं.]

**अवांतर प्राप्ति–प्ती** स्त्री. किरकोळ मिळकत; आड मिळकत. [सं.]

**अवांतर भोजन** न. पाहुण्यांना, अतिथींना भोजन; कुटुंबातील माणसांशिवाय इतरांना भोजन घालणे. [सं.]

**अवांतरवाचन** न. (शिक्षण.) पाठ्यपुस्तकांव्यतिरिक्त वाचन; नेमलेल्या ग्रंथाव्यतिरिक्त इतर साहित्याचे वाचन. [सं.]

**अवि** पु. १. मेंढा. २. कुंपण.

**अविकणे** अक्रि. उतरणे; अतिशय पिकणे; पिकून बिघडणे; नासणे (फळ). [सं. अति + पच्]

**अविकल्प** वि. विकल्परहित; निश्चित; अपरिवर्तनशील; पर्याय नसलेले. [सं.]

**अविकसित** वि. मागासलेला; विकास न झालेला; अप्रगत. [सं.]

**अविकळ** वि. १. अखंड; संबंध; संपूर्ण : 'तेथें भागवत धर्म हे सकळ शिकावे अविकळ अनन्यश्रद्धा ।'-एभा ३.६१४. २. व्यवस्थित; निर्दोष : 'त्रिषवण त्रिकाळ । पूजा करितां अविकळ । भजोनि जिंकिला कळिकाळ ।' - एभा ६.१२१. ३. विकाररिहत; स्थिर; दृढ : 'तैसी कर्मे करितां सकळ । सदां अविकळ योगिया ।' - एभा ८.४३. ४. अव्यंग; ज्यांची गात्रे सुदृढ आहेत असा. [सं. अ + विकल]

**अविकार** वि. विकाररहित; निर्दोष : 'बोलणें जें अविकार । तें सत्य येथें ।।'- ज्ञा १६.१२४. [सं.]

**अविकारक** वि. (ग.) चलांच्या कोणत्याही किमतीसाठी सत्यच असणारे समीकरण. उदा. $(क्ष + य)^2 = क्ष^2 + २ क्षय + य^2$. 'क्ष' व 'य' यांच्या कोणत्याही किमती असल्यातरी वरील समीकरण सत्य आहे, म्हणून ते 'अविकारक' होय. [सं.]

**अविकारी, अविकार्य** वि. १. विकृती न पावणारे; फरक, बदल न होणारे; निर्विकल्प; नित्यसम. २. नाश, ऱ्हास न पावणारे. ३. (व्या.) अव्यय; ज्यास लिंग, वचन, विभक्ती लागत नाही असा. [सं.]

**अविकासी पांडुरोग** पु. (वै.) अस्थिमज्जेसारख्या (बोनमॅरो) रक्तोत्पादक इंद्रियाच्या सदोष कार्यामुळे निर्माण होणारी रक्ताची कमतरता. हा दोष उत्तेजक पेयांच्या सेवनाने निर्माण होतो असा समज आहे.

**अविकृत** वि. १. रूपांतररहित. २. विकार न पावणारा; न बदलणारा : 'व्यक्तीसी अतीतु । अनादि अविकृतु । सर्व रूप ।।'- ज्ञा २.१५०. ३. विकृत नसलेला; नैसर्गिक; स्वाभाविक; सहज. [सं.]

**अविक्रिय** वि. १. विकाररहित : 'म्हणोनि कैंचे अंश अविक्रिया । एका मज ।'- ज्ञा १५.३३७. २. अक्रिय; क्रियाशून्य. [सं. अ + वि + कृ]

**अविक्रिया, अविक्री** स्त्री. १. विकार; विकृती; बिघाड; दुखणे; असमाधान. २. किळस; वीट; ओकारी; कंटाळा; शिसारी. [सं.]

**अविक्रेय** वि. विक्री न करता येण्याजोगा; विक्रीस अयोग्य. [सं.]

**अविघात** वि. अविरोधी; अडथळ्याविना; मुक्त; बाधारहित.[सं.]

**अविघ्नकलश** पु. एक मृत्तिका पात्र. पांढरा रंग देऊन यात अक्षता सुपाऱ्या, हळकुंड घालतात. वर झाकण ठेवून त्यावर दोरा गुंडाळतात. हे पात्र देवकाच्या सुपाऱ्यांत ठेवतात. यास अविघ्नकलश असे म्हणतात. यात अविघ्नक संज्ञक गणपतीचे अधिष्ठान असते.[सं.]

**अविचल** वि. स्थिर. [सं.]

**अविचलित** वि. स्थिर; न डगमगलेला. [सं.]

**अविचार** पु. अविवेक, विचाराभाव; दुर्लक्ष; अज्ञान; वेडेपणा. वि. पहा : **अविचारी** [सं.]

**अविचारणीय** वि. १. विचार न करण्याजोगे; अचिन्त्य; विचाराच्या आवाक्याबाहेरचे : 'मग अविचारणीय तें आंगा । घडोनि जाय ।' - ज्ञा ६.४६७. २. अशंकनीय; शुद्ध. [सं.]

**अविचारणे** अक्रि. अविचार करणे : 'मग सुमती बोले प्रधान । राया बरवें पुशिलें वर्तमान । अश्व धरिला अविचारून । यासी परिहार एक आहे ।।' - जै २२.४१. [सं.]

**अविचारशील** पहा : **अविचारी**

**अविचारित** वि. ज्या बद्दल मनन, विचार केलेला नाही असे; अविचाराच्या लहरीतले; पूर्णपणे आकलन न झालेले : 'हे एकलौतें चराचर । अविचारित सुंदर ।' - ज्ञा १४.११०. [सं.]

**अविचारी** वि. १. विचार न करणारा; लक्ष न घालणारा, देणारा; अविवेकी; गाफील; असंयमी; तापट. २. गैर कृत्ये करणारा.[सं.]

**अविच्छिन्न** क्रिवि. १. निरंतर; अव्याहत; एकसारखे; अखंड; सतत. २. तंतोतंत; बरोबर; निव्वळ; यथास्थित; व्यवस्थितपणे; सुंदर रीतीने. वि. अविभक्त; अत्रुटित; अखा; सबंध; सगळा : 'सरकारी सभासदांचे अविच्छिन्न बहुमत सदैव कायम राहील.'- लोटिकेले २.२१६.[सं.]

**अविट** वि. (विप्र. अवीट) १. अविकार्य; उत्कृष्ट; न विटलेले : 'अविट ज्याची करणी ऐकतां देहप्राण होतो थंडा ।'- होला १४. २. सतत कार्य करणारा; न कंटाळता काम करणारा; दमदार; शूर : 'बापू गोखले केवढे अविट । म्हणे शत्रूची लागली विट ।'- गापो १०४. पहा : **अवीट** ३.ज्याचा वीट येत नाही असे; चिरमधुर.

**अविदग्ध** वि. मूर्ख; अडाणी; अकुशल. [सं.]

**अविद्ध योनि** वि. अक्षतयोनी; जिला पुरुषाचा संग झाला नाही किंवा जिचा कौमार्यभंग झाला नाही अशी; अनुपभुक्त. [सं.]

**अविद्य** वि. अविद्वान; मूर्ख; अडाणी : 'अविद्य सुविद्य न म्हणतां जाण । धरातळीं ब्रह्म ब्राह्मण, त्याचें करूं जातां छळण । कुळ निर्दळण आवश्यक ।।'- एभा १.३ ६४. [सं.]

**अविद्यक** वि. अविद्येमुळे, अज्ञानामुळे निर्माण झालेला : 'जिवासी

अविद्यक उत्पत्ती ।'- एभा ७.७१.

**अविद्यमान** वि. हजर नसणारा; अनुपस्थित; नाहीसा झालेला; निर्गत; विनष्ट; मयत; अवर्तमान. [सं.]

**अविद्या** स्त्री. १. अज्ञान; अजाणपणा : 'हे चिदंश अविद्येमुळे आत्मस्वरूप विसरून आपण जीव असे मानून संसारात पडले.' - शास्त्री को. २. माया; वेदान्त तत्त्वज्ञानात जीवाला यथार्थ ज्ञान होऊ न देणारे एक मूलतत्त्व , अवास्तविक गोष्टी खऱ्या मानणे : 'तेथे मायेच्या प्रपंचातच अविद्या ही संज्ञा आहे.'- गीर २०८. ३. कपट : 'त्यावरून बहिरजीने अविद्या मनात आणून पोष्या दिलेला लेक आपले घरी मायणीस नेऊन ठेविला'- राखं ३. ११६. [सं.]

**अविधवा** स्त्री. नवरा जिवंत असलेली स्त्री; सुवासिनी; सवाष्ण. [सं.]

**अविधवा नवमी** स्त्री. भाद्रपद शुद्ध नवमी; पिता जिवंत असून माता मृत असेल अशा गृहस्थाने या दिवशी करावयाचे श्राद्ध.

**अविधी** पु. नियमाचा, विधीचा अभाव; शास्त्रविरुद्ध वर्तन: 'रुक्मिया म्हणे लग्न लावूंनियां । मग कन्या नेऊं अंबालया । राजा म्हणे कुलधर्म टाकोनियां अविधी केविं करावा ।'- हरि २३.२३८.

वि. अव्यवस्थित; विधिपूर्वक न केलेले; अशास्त्र.

क्रिवि. अशास्त्ररीतीने; अव्यवस्थिपणे. [सं.]

**अविनय** पु. उद्धटपणा; दांडगेपणा; मस्तवालपणा; विनयाभाव.

वि. उद्धट; मस्त; उर्मट; हट्टी; गर्विष्ठ. [सं.]

**अविनाभाव** पु. अद्वैत; एकमत; आपपरभावाचा अभाव: 'उभयपक्षी अविनाभावे घरोबा चालत आहे यास्तव हें पत्रलेखन केलें.' - पेद २४.४.

**अविनाश** पु. नित्यत्व; शाश्वतता; नाशाचा अभाव; अनश्वरत्व.

वि. नाशरहित असा; शाश्वत; नित्य; अनश्वर : 'पाहती मज अविनाशातें । तरि कैंचा दिसे ।' -ज्ञा ९.१५२. [सं.]

**अविनाशपद** न. मोक्ष; कैवल्य : 'या देहाचेनि साधनें । अविनाशपद पावणें ।'- एभा ९.२८१. [सं.]

**अविनाशभाव** पु. नित्यत्वबुद्धी; अविनाशी आहे असा समज : 'तो देखतसे अविनाशभावें । आत्मबुद्धी ।।'- ज्ञा ४.१२०.

**अविनाशित्व** न. सातत्य; नित्यत्व. [सं.]

**अविनाशी** वि. १. नाश न पावणारे. २. चिरस्थायी; शाश्वत; नित्य.

**अविनिमयक्षम** वि. जिची देवघेव होऊ शकत नाही (वस्तू.)

**अविनीत** वि. उद्धट; विनयशील नसलेला; गर्विष्ठ. [सं.]

**अविपथी भिंग** न. (भौ.) किरणांच्या अकेंद्रीभवनापासून मुक्त असलेले भिंग. [सं.]

**अविभक्त** वि. १. सामायिक; एकत्र. २. न विभागलेला; अखंड; सलग; सबंध. [सं.]

**अविभक्त कुटुंब** न. वेगळे न झालेले कुटुंब; ज्यांचे सर्व स्थावर जंगम एकत्र आहे व व्यवहारही एकत्र आहेत असे आई, वडील, मुले, त्यांची मुले इ. मिळून होणारे कुटुंब.

**अविभाग** वि. अखंड; अविभक्त. [सं.]

**अविभाज्य** वि. १. भाग, वाटा, वाटप न करता येणारे; विभाग न होणारे; अखंड, अभिन्न. २. भाग करण्यास योग्य नाही असा. ३. (ग.) ज्या संख्येला १ किंवा स्वत: ती संख्या याशिवाय इतर कोणत्याही संख्येने पूर्ण भाग जाऊ शकत नाही अशी (संख्या) : ७, १७, २३ इ. संख्या अविभाज्य आहेत. [सं.]

**अविभाज्य अवयव** पु. ज्याचे अवयव पुन्हा पडत नाहीत असे अंक. उदा. ११, ७, ३.

**अविभाज्य अंक** पु. (ग.) ज्या पूर्णांकाचे त्याच्यापेक्षा लहान पूर्णांकामध्ये (१ हा अंक वगळून) अवयव पाडता येत नाहीत असा पूर्णांक. [सं.]

**अविभाज्य मिळकत** स्त्री. १. जिची वाटणी करू नये असे कायद्याने ठरले आहे अशी मिळकत, राज्य वगैरे. २. कुटुंबातील इतर इसमांत वाटून न देता एकाकडे चालणारी मालमत्ता.

**अविभाज्यता** स्त्री. भाग पाडता न येण्यासारखी स्थिती. [सं.]

**अविमुक्त क्षेत्र** न. काशी क्षेत्र : 'अविमुक्त महास्मशान । वाराणशी आनंदवन । एकासीचि नांवें जाण ।'- एभा २१.५२६.

**अविमोचित** वि. न सोडवलेला; भरपाई न केलेला. [सं.]

**अवियोज्य** वि. निराळा, वेगळा करता न येण्यासारखा; अविभाजनीय; अभेद्य. [सं.]

**अविरजी** वि. न विरजलेले : 'अविरजी दुधाचे भांडें ।' -ज्ञा १८.१४७६.

**अविरत** वि. निरंतर; अखंड.

क्रिवि. न थांबता.

**अविरल** वि. १. पातळ नव्हे तो; दाट; घट्ट. २. एकसारखा; निरंतर : 'जगदुन्मीलनाविरल । केलिप्रिय ।।' - ज्ञा १८.६. [सं.]

**अविरेचन** न. मलावरोध. [सं.]

**अविरोध** वि. विरोध नसलेला; स्पर्धा न होता, निवडणूक न होता (निवडून आलेला). [सं.]

**अविलंब** पु. शीघ्रता; तातडी; घाई : 'सकळाभीष्टें साधती । अविलंबेंसी ।' - गुच १.६.

क्रिवि. जलद; लवकर. [सं. अ + विलंब]

**अविलंबनीय** वि. (शासन.) तातडीचा; निकडीचा

**अविलोखण** न. अवलोकन : 'करोनि सेपुत्काचे अविलोखण । काये बोले ।।'- क्रिपु भा २.५०.१८९. [सं. अवलोकन]

**अविवक्षित** वि. १. विवक्षित, विशिष्ट, निराळा नसलेला; विशेष करून उद्देशिलेला किंवा इच्छिलेला नव्हे तो. २. ज्याचा विचार किंवा मनन केलेले नाही असा. ३. अनिश्चित; कोणताही.

**अविवाहित** वि. लग्न न झालेला. [सं.]

**अविवाह्य स्त्रीसंबंध** पु. ज्या स्त्रीशी लग्न करणे कायद्याने अगर परंपरेने विहित, योग्य नाही अशा स्त्रीशी समागम; अगम्यागमन. [सं.]

**अविवेक** पु. अविचार; विचाराचा अभाव; तारतम्य नसणे; मूर्खपणा : 'जरी जाहला अविवेकु । तरी संतकृपादीपकु । सोज्वळु असे ।' - ज्ञा १.७६. [सं.]

**अविवेकी** वि. अविचारी; सदसद्विवेक बुद्धीचा उपयोग न करणारा; ज्याला तारतम्यज्ञान नाही असा; मूर्ख; असमंजस : 'जैसी रांधवणी रससोय निकी । करूनियां मोलें विकी । तैसा भोगासाठीं अविवेकी ।

धाडिती धर्मु ।।'- ज्ञा २.२५४. [सं.]

**अविवेच्य** वि. अतिसूक्ष्म; ओळखून काढता न येणारा. [सं.]

**अविश्रम** क्रिवि. एकसारखे; विसावा न घेता : 'त्या भोगाचें फळ गहन । अविश्रम जन्ममरण ।'- एभा २८.१५७. [सं. अ + विश्राम]

**अविश्रांत** क्रिवि. न दमता, थकता; विश्रांती घेतल्याशिवाय; सतत; अखंड; निरंतर. [सं.]

**अविश्वसनीय** वि. विश्वास बसू नये असा; विश्वास ठेवण्यास अयोग्य; गैरभरवशाचा. [सं.]

**अविश्वास** पु. १. बेभरवसा; विश्वासाचा अभाव. २. एखाद्याच्या पात्रतेबद्दल किंवा कार्यक्षमतेबद्दल खात्री नसणे.

**अविश्वासणे** अक्रि. विश्वास न ठेवणे; विश्वास नसणे : 'भगवद्वचनें अविश्वासे । ऐसा कोण पतित असे ।'- दास १.१.२१. [सं. अ+वि+श्वस]

**अविश्वास प्रस्ताव** पु. संसदेत, विधिमंडळात किंवा इतर लोकनियुक्त संस्थांत विरोधी पक्षांनी सत्ताधारी पक्षांविरुद्ध मांडलेला आव्हानात्मक ठराव. हा संमत झाल्यास सत्ताधारी पक्षास राजीनामा द्यावा लागतो.

**अविश्वासार्ह** वि.विश्वास न ठेवण्याजोगा; बेभरवशाचा.

**अविश्वासी-सू-सूक** वि. १. बेभरवशाचा; साशंक; विश्वास, श्रद्धा न ठेवणारा. २. विश्वास, भरवसा ठेवण्याला अयोग्य. [सं.]

**अविषय** वि. १. इंद्रियांना अगोचर. २. विषयवासनारहित. पु. १. अभाव. २. आटोक्याबाहेरचा पदार्थ. [सं.]

**अविष्यंदी** वि. चिकट नसलेला (द्रव, इंधन इ.). [सं.]

**अविसाळ** न. पक्ष्याचे घरटे; कोट; कोठार : 'कां महावृक्षीं अविसाळें । पक्षीजातीचीं ।' - ज्ञा ११.२५८.[सं. अविस् + आलय]

**अविस्मर, आविस्मर** वि. विस्मरण न होता; स्मरणयुक्त; अविसर : 'आम्हांवरी ममता धरून वडिलपणे सांभाळ करावयासी अविस्मर असावे'- पेद २७.२०७. [सं. अ+वि+स्मृ]

**अविस्रा** क्रिवि. एकाएकी; न समजता; अकस्मात.

**अविहित** वि. १. शास्त्रामध्ये न सांगितलेले; न आज्ञापिलेले; शास्त्रविरुद्ध : 'अविहित कामस्थिती । ह्या स्वभाव ज्याचे वृत्ती । ते अंत्यजादि प्रकृती । जाण निश्चितीं ।।'- एभा १७.२२३. २. अयोग्य. [सं.]

**अविंद, अविंध** वि. छिद्र,भोक न पाडलेला (मोती,कान इ.) पु. मुसलमान; यवन; म्लेंछ; मुसलमानांच्या कानास हिंदूप्रमाणे भोके पाडलेली नसतात म्हणून. (सामा.) [सं. विद्ध]

**अवि** पु. १. मेंढा : 'मृतिदायक सापाची छाया भेका, अवींसहि कसापाची ।'- मोकृष्णवि २८.४८. २. कुंपण; वई. [सं. अवि]

**अवीक** वि. जास्त; फाजील; अधिक. (गो.)[सं. अधिक]

**अवीट** वि. १. न विटणारा; पक्का (रंग); चवदार; न बिघडणारे (अन्न) : 'अवीट न विटे परमान्न ।' - भज ४२; निस्तेज न होणारा (रत्न, मणी, धातू); कंटाळा, किळस, शिसारी नसणारा; लवकर जीर्ण न होणारे, न झिजणारे,खराब न होणारे, सुदृढ (दागिने, कपडे, भांडी, शरीर, इमारत); विपुल; समृद्ध (पीक, धान्य); याखेरीज इतर पुष्कळ निरनिराळ्या अर्थांने हा शब्द योजतात, पण बहुतेक अक्षय, टिकाऊ याअर्थीच वापरतात. २. अढळ; अच्युत; अक्षय, अनश्वर (ईश्वराबद्दल योजतात) : 'धीटपणेचि अवीट पदाप्रति नीट करुनि मन सत्वर पावा ।'- रत्न ८. ३. ऐटदार; आकर्षक : 'धीट सभांतरिं नीट रिघोनि, अवीट वसे कवणास न साहे ।'-आसी २९. ४. ज्याचा वीट येत नाही, कंटाळा येत नाही असे; सदाबहार.

**अवीट आवडी** स्त्री. अढळ, अक्षय श्रद्धा, प्रेम.

**अवील-अवीलचूल** पहा : **अवेल, अवेलचूल**

**अवीस** न. मांस. [सं. आमिष]

**अवृत्ताकार** वि. (भाषा.) ओठ गोलाकार न करता पसरट ठेवूनच उच्चारलेला स्वर. उदा. इ, ए. [सं.]

**अवृत्तिधारी** पु. निश्चित किंवा नियमित मुशाहिरा, मिळकत नसणारा.

**अवृष्टि-ष्टी** स्त्री. पावसाचा अभाव; दुष्काळ; अवर्षण : 'जे अवृष्टीचेनि उपद्रवें ।' -ज्ञा १३.२२१. [सं.]

**अवृंत** पु. (वन.) वनस्पतींचे देठ नसलेले अवयव. उदा. पाने, फुले, फळे. [सं.]

**अवेच** वि. खर्च वाचवणारा; बचत करणारा; काटकसरी; कृपण; कंजूष; हाताचा जड. [सं.अ+वि+ची]

**अवेदक** वि. बधिर; सुन्न.

**अवेधी** वि. (वै.) आत न शिरू शकणारे; न विंधणारे; न विंधले जाणारे. [सं.]

**अवेध्य** वि.(आयु.) टोचले न जाणारे; न विंधणारे. [सं.]

**अवेर-रा** क्रिवि. एरवा; पुढे येणाऱ्या किंवा गेल्या चौथ्या दिवशी. (काल किंवा उद्या, परवा, तेरवा, अवेरा (एरवा) असा अनुक्रम). (गो.) [सं. अपर, अवर]

**अवेल-ला** पु. चुलीच्या बाजूला, लहान सहान भांडे ठेवण्याकरता केलेला एक भाग (यास स्वतंत्र तोंड नसून चुलीतून जाळ जावयास जागा असते, असे एक, दोन, क्वचित तीन अवेल एका चुलीस जोडलेले असतात.) पहा : **वेल, वईल**

**अवेल केश** वि. ज्याची आयाळ खुरापर्यंत पोहोचते असा (घोडा).

**अवेल चूल** स्त्री. जिला अवेल-वईल आहे अशी चूल.

**अवेली** क्रिवि. पहा : **अव्वल.** प्रारंभी; अगोदर; पुढे : 'सन १८१६च्या अवेलीस एक लेख आला आहे.'- एलच १.१९७.

**अवेव** पु. अवयव् (अप.). शरीराचा भाग : 'कां कूर्म जियापरी । उवाइला अवेव पसरी ।'- ज्ञा २.३०१. [सं. अवयव]

**अवेवधान** न. अव्यवधान; दुर्लक्ष; असावधपणा : 'देशकालवर्तमान । सर्वहि अवेवधान । कोणते विधिविधान ।' - रामदास.[सं. अव्यवधान]

**अवेश** पु. अवकाश.

**अवेश्वरी** क्रिवि. योग्य किंवा या, त्या, वेळी, काळी, समयी-प्रसंगी : 'ह्या अवेश्वरी त्या अवेश्वरी ।' - शर (शुभा उद्यो ५.१)

**अवेळ** स्त्री. १. योग्य वेळ निघून गेल्यानंतरची वेळ; उशीर; विलंब. २. अयोग्य वेळ,काळ,समय; अनवसर. [सं. अ + वेला]

**अवेळ सवेळ** क्रिवि. योग्य-अयोग्य, अनुकूल प्रतिकूल वेळ-समय; वेळ-अवेळ. [सं. अ + वेला,सुवेला]

**अवेक्षक** पु. (स्था.) बांधकामावर देखरेख करणारा. [इं.]

**अवेक्षण** न. १. शोध; तपास; चौकशी; पाहणे. २. लक्ष; देखरेख; अवलोकन; रक्षण. ३. कृपा; लोभ. ४. काळजी. [सं.]

**अवैतनिक** वि. बिनपगारी; वेतनाशिवाय; मोबदला न घेता केलेले.

**अवैध** वि. बेकायदेशीर.
क्रिवि. बेकायदेशीरपणे.

**अवैधता** स्त्री. (कायदा.) बेकायदेशीरपणा; गैरकायदेशीरपणा. [सं.]

**अवैयक्तिक** वि. व्यक्तिनिरपेक्ष; व्यक्तींशी संबंध नसणारी.

**अवो** उद्गा. अहो! अगो! एक संबोधन : 'अवो तूं देवाची प्रिय परम अर्धांग हरिचें ।' - सारुह ७.९९.

**अवोज** पु. १. आबाळ; उपेक्षा; वज नसणे; ओज नसणे : 'नातरी होता कृषीचा अवोज । पेरितां नासे बीज पाहा ।' - जै ६३.२०. २. दुर्लक्ष. [सं. अव + ओजस्]

**अवोक्षण** न. औक्षण; ओवाळणे; अभिषेचन; पाणी शिंपडणे (विशेषत: विधी, संस्कार, यांमध्ये). [सं.]

**अव्यक्त** वि. १. व्यक्त नव्हे तो; उघड-प्रकट नाही तो; अस्पष्ट; अदृश्य; दृग्गोचर नसलेले; मानवी दृष्टीला अगम्य (देवता, परमेश्वर, आत्मा) : 'वडिला अव्यक्ताचिया वंशा । उद्योतकारु सूर्य जैसा ।' - अमृ ६.३. २. (ग.) अस्पष्ट; अज्ञात; माहीत नसलेली (बीजगणितातील राशी, संख्या). ३. अस्पष्टोच्चारित; ककारादी वर्णरहित शुद्ध ध्वन्यात्मक (शब्द). ४. (ल.) गुळगुळीत (आवाज, ध्वनी). ५. निराकार : 'आद्य मी व्यक्तु । अव्यक्तु ही मी ।'- ज्ञा १८.११९४. ६. अतिसूक्ष्म.
न. १. माया; ब्रह्म; प्रकृती; कारण : 'विराटाचा विराज पुरुष । तो अव्यक्तीं करी प्रवेशु ।'- एभा ३.१७५. २. जगाची सूक्ष्म अवस्था; मूल स्वभाव. ३. अज्ञान. [सं.]

**अव्यक्तक्रिया** स्त्री. अज्ञात संख्यांची बेरीज, वजाबाकी.

**अव्यक्तगणित** न. बीजगणित; यातील काही राशी अव्यक्त असतात.

**अव्यक्त गुणन** न. (ग.) अव्यक्त राशींचा गुणाकार. [सं.]

**अव्यक्तता** स्त्री. (संगीत.) वर्णोच्चार स्पष्ट नसणे. [सं.]

**अव्यक्तपक्ष** पु. पिसवांच्या वर्गातील प्राणी, कीटक. यांचे पंख दिसत नाहीत. यांच्या अनेक जाती आहेत. [सं.]

**अव्यक्तरस** वि. ज्याची नेमकी चव सांगता येत नाही असा.[सं.]

**अव्यक्तराशी** पु. (ग.)जिची किंमत दिली नाही किंवा माहीत नाही अशी संख्या. भारतीय बीजगणितात इंग्रजी एक्स, वाय, झेड याप्रमाणे अव्यक्त संख्यादर्शक काही संज्ञा योजिल्या आहेत उदा. कालक, पोतक, लोहितक इ. [सं.]

**अव्यक्तसंख्या** स्त्री. (ग.) माहीत नसलेली व त्यामुळे अक्षराने दर्शविलेली संख्या. [सं.]

**अव्यक्त साम्य** न. (ग.) अव्यक्त राशीचे समीकरण.

**अव्यग** वि. अस्वस्थ नसलेला; न क्षोभविलेला; अनुद्विग्न; शांत; संथ; स्वस्थ; एकाग्रचित्त; पूर्ण लक्ष असलेला; ज्याचे चित्त दुसरीकडे गुंतले नाही असा : ' गुंफेद्वारे लक्ष्मण । बैसला रक्षण अव्यग्र ।'- रावि [सं.]

**अव्यग्रता** स्त्री. शांतपणा; मनाची एकाग्रता; शांतता.

**अव्यत्यय** वि. उपद्रवरहित; एकसारखा; अखंडित : 'मग समाधि अव्यत्यया ।'- ज्ञा १८.१७५४. [सं.]

**अव्यभिचार** पु. १. एकनिष्ठता; अनन्यता; एकाग्रता : 'घणावली आवडी । अव्यभिचारें चोखडी ।' - ज्ञा १५.५. २. नित्य साहचर्य. ३. चिकाटी. [सं.]

**अव्यभिचारित** वि. सदोदित; अखंडित.

**अव्यभिचारी** वि. १. सर्वसाधारण; सामान्य नव्हे असा; योग्य; बरोबर; आवश्यक; विवक्षित. २. न बदलणारा; एकनिष्ठ. [सं.]

**अव्यय** न. १. (व्या.) अविभक्तिक किंवा अविकारी शब्द; ज्यास लिंग, वचन, विभक्ती प्रत्यय लागत नाही किंवा ज्याचे रूप बदलत नाही असा शब्द. उदा. क्रियाविशेषण, उभयान्वयी. २. ब्रह्म.
वि. १. अविनाशी; नष्ट न होणारे; न बिघडणारे; फरक किंवा बदल न होणारे; शाश्वत; व्ययरहित; अनश्वर; विकार न होणारे; व्यर्थ न जाणारा : 'व्ययामाजीं मी अव्ययो'- एभा २.३९४. २. अमोघ; व्यर्थ न जाणारा : 'बाण अव्यय काढिला । गुणीं अवगुणांचे जोडिला । अक्रूरें कानाडीं वोढिला । उडविला विदूरथ ।'- एरुस्व ९.३०. ३. व्ययरहित (ब्रह्म, स्वर्गलोक); अक्षय : 'अन्य पुरुषाची जों वरी सुशिला । नसे, गेली जों न ती अव्ययाला ।।- टिक ७३. [सं.]

**अव्ययीभाव** पु. (व्या.) ज्या समासात पहिले प्रधानपद अव्यय असून सबंध समासाचा उपयोग अव्ययासारखा होतो तो समास. उदा. यथाशक्ती, हरघडी, दर दिवस, प्रतिवर्ष. [सं.]

**अव्यवधान** वि. १. जवळचे. २. उघडे. ३. गैरसावध. [सं.]

**अव्यवस्थ-स्थित** वि. १. शिस्तीत नसलेले; जेथल्या तेथे न लावलेले- रचलेले - मांडलेले- ठेवलेले; विस्कटलेले (गोष्ट, काम); गुंतागुंतीचे (काम). २. बेशिस्त; अनियमित; टापटीप नसलेला; अजागळ (माणूस). [सं.]

**अव्यवस्था** स्त्री. व्यवस्थेचा अभाव; बेशिस्तपणा; घोटाळा; घालमेल; गोंधळ; अनियमितपणा; (भूशा.) (नदीच्या काठच्या गाळाची, खडकांची, भूस्तरांची) उलथापालथ. [सं.]

**अव्यवहार** वि. व्यवहाररहित. पहा : **अव्यवहारी**
पु. खोटा व्यवहार; चोरी; निंद्यकर्म : ' का राजाज्ञा अव्यवहारु । कुंठवी जेवीं ।'-ज्ञा १८.७३३. [सं.]

**अव्यवहारित** वि. उपयोगात न आणलेला; व्यवहारातून गेलेला; रद्द; अनुपलब्ध. पहा : **अव्यवहारी-र्य**

**अव्यवहारी-अव्यवहार्य** वि. १. व्यवहारातील नाही असे; असामान्य; ज्या संबंधाने कोणताही व्यवहार होऊ शकत नाही असे; व्यवहारात, प्रत्यक्षात आणता येणार नाही असे : 'आणि संवादाचेनि मिषें । जे अव्यवहारी वस्तु असे ।'-ज्ञा १८.८१. २. बहिष्कृत. ३. ज्याला व्यवहार माहीत नाही असा. [सं.]

**अव्यवहित** वि. १. अव्याहत; अप्रतिबद्ध; अखंड; अडथळा न केलेले, झालेले; सतत चाललेले. २. जुळलेले; जोडलेले; चिकटून असलेले,

लगतचे. ३. एकनिष्ठ, व्यवहारित, व्यवधान न पावलेला : 'ते अव्यवहिता भक्ती ।'- यथादी १८.२४३८. ४. न झाकलेलें.[सं.]

**अव्यवहितत्व** न. (मानस.) एखादी क्रिया आणि तिचा परिणाम यामध्ये काहीही कालावधी नसणे. [सं.]

**अव्यंग** वि. १. उणेपणा नसलेला; सर्व अवयवांनी, घटकांनी परिपूर्ण; सगळा; संपूर्ण; सांग : ' जितिला जन्ममरणाचा पांग । सुख अव्यंग पावलें ।।' - एरुस्व १०.८६. २. व्यंग नसलेला; दोषहीन; निर्दोष : 'आदरि जो अव्यंगु । संन्यासु तो ।'- ज्ञा १८.६९. [सं.]

**अव्यंगवाणे** वि. १. व्यंगरहित; दोषरहित; पूर्ण : 'तया अव्यंगवाणेया ब्रह्मातें ।... जाणोनि स्मरे ।' - ज्ञा ८.९१. २. यथासांग.

**अव्या** पु. १. अडथळा; आडकाठी; हरकत. २. खंड; भंग (चालीरीतीचा). ३. दुःखप्रद प्रसंग; अरिष्ट; अनर्थ. (कों.)

**अव्याकुळ** वि. अनुद्विग्न; अव्यग्र; एकाग्र; स्थिरचित्त : 'सदामद्रूपें मननशील । अव्याकुळ श्रवणार्थी ।'- एभा १३.७३९.[सं. अव्याकुल]

**अव्याकृत** वि. १. विवरण, स्पष्टीकरण, टीका न केलेले. २. अस्पष्ट; अव्यक्त; गूढ. ३. विकाररहित; अविकृत : 'कारणदेह अव्याकृत । प्रलय अवस्था वर्ते तेथे ।'- विसिंउ ५.२५. ४. चांगले अगर वाईट असे कोणतेच फल न देणारे (कर्म). कर्माचे तीन विभाग करतात- कुशल, अकुशल आणि अव्याकृत. [सं]

न.१. ब्रह्म. २. (सांख्य) प्रधान. ३. मायोपाधिक ईश्वर.

**अव्याकृति-ती** वि. सुंदर; सुरूप : 'शेषशयना अव्याकृति ।'- मक ३२.१६२.

**अव्याख्यात** वि. लक्षण न सांगितलेला; व्याख्या न केलेला. [सं.]

**अव्याज** वि. निष्कपट; साधा; सरळ; पाचपेच नसलेला : 'गोड निळ्या वातावरणात । अव्याज मनें होती डोलत ।।'- बालकवी.

**अव्यापक, अव्याप्त** (अव्व्यापक्, अव्याप्त) वि. व्यक्तिविशिष्ट; व्यापक नसलेला. [सं.]

**अव्यापार** पु. १. भलतेच, अयोग्य काम. २. आपले नसलेले काम. ३. न येणारा धंदा. [सं.]

**अव्यापारेषु व्यापार** पु. नसता उद्योग; भलतीच गोष्ट; विकत श्राद्ध; ओढवून आणलेली अडचण.

**अव्यापी** वि. न व्यापणारे; व्यापक नसणारे. [सं.]

**अव्याप्तपद** वि. (तर्क.) अव्याप्त हेतूचा हा एक तर्कदोष आहे.[सं.]

**अव्याप्ति-प्ती** स्त्री. अपुरी व्याख्या; लक्ष्यार्थाचा एकदेश (काही भाग) लक्षणाने व्याप्त न होता (शिल्लक) राहतो असा दोष. व्याख्येय जातीमध्ये ज्या ज्या व्यक्तीचा समावेश व्हावा अशी इच्छा असते, त्यापैकी एखाद्या व्यक्तीचा समावेश तीमध्ये होत नाही असे व्याख्येवरून दिसते तो दोष.

**अव्याप्यवृत्ति-त्ती** स्त्री. (तर्क) कालासंबंधी, स्थितीसंबंधी वगैरे अपूर्ण अस्तित्व; जसे दुःखावस्थेत सुखाभाव, सुखावस्थेत दुःखाभाव पूर्णपणे होत नाही. सावधिकत्व, मर्यादशीलता. वि. (तर्क). १. विश्वव्यापक किंवा सर्वव्यापक नसणारा. २. अकथनीय, अवाच्य. [सं.]

**अव्यावस्त-अव्यावेस्त** पहा : **अव्यवस्थित** : 'बहुधा बोलणें अव्यावेस्त । बोलोचि नये ।'- दास ४.२.१८.

क्रिवि. सदोदित; अखंड; खंड न पडता; सतत.[अव्यवस्थितचा अप.]

**अव्युत्क्रम** वि. (ग.) जे उलट क्रमाने घडत नाही असे.

**अव्युत्पन्न** वि. १. ज्याची व्युत्पत्ती लावलेली नाही असा, मूळ न शोधलेला (शब्द, नियम); असाधित (शब्द). २. अविद्वान; अडाणी; ज्याने शास्त्रांचा नीट अभ्यास केलेला नाही असा. [सं.]

**अव्रण** वि. १. दुःख, जखम, रोग, वगैरेंतून मुक्त (इसम, जनावर, फळ). २. निर्दोष; उणेपणा नसलेले; भंग, तडा, चीर नसलेला (कलश,पात्र वगैरे). [सं.]

**अव्वडचव्वड** क्रिवि. भरमसाट, फोल : 'जातिनिर्णयाचा भंग करण्याची अव्वडचव्वड वचनें दिलीं'- त्रिकाळ १५.१०.१९३९.[चवडचे द्वि.]

**अव्वल** पहा : **अवल** [फा.]

**अव्वा** स्त्री. स्त्री; बाई; वृद्ध स्त्री. पहा : **अवा** (स्त्री)

**अव्हळव** पु. आळ : 'अनंतदेवो ब्राह्मणू ते ओपगावीचे, तेयासि पुश्चळीकेचा अव्हळाओ आला.'-लीच ४.२८.

**अव्हा** वि.१.उजवा. २. उगाच; भलतेच.

क्रिवि. भलतीकडेच. [सं. सव्यच्या उलट]

**अव्हाट-टा** स्त्री. आडवाट; वाममार्ग : 'नीट वाट सांडूनि अव्हाटें जाती'- दावि ४०९.

**अव्हाटणे** अक्रि. १. आडमार्गाने जाणे : 'अव्हांटलिया आस्थाबुद्धि । विषय सुखचि परमावधि ।'- ज्ञा ४.२१. २. मागील गाडी पुढे काढण्यासाठी चकारी सोडून बैल हाकणे. रस्ता सोडून बाजूला जाणे; बाजू देणे.( व.) ३. निघणे : 'म्हणौनि तेउते अव्हाटले । आणि न चलवे ।' - लीचउ ४५.

**अव्हारणे** सक्रि. विस्तारणे; पसारा घालून ठेवणे. (व.)

**अव्हावणे** सक्रि बोलावणे. [सं. आ+व्हे]

**अव्हाशंख** पु. १. दक्षिणवर्ती, उजव्या मुखाचा शंख, हा फार मंगलदायक असतो असे म्हणतात : 'अव्हाशंख अव्हावेल । गुप्त वनस्पती अमोल ।'- दास ६.९.१२. २. भलता; नियमरहित, अनियमित.

**अव्हासणे** अक्रि. आवेश चढणे : 'तो ढवडु असे आव्हासला'- शिव ४८८.

**अव्हासव्हा** क्रिवि. उजवा डावा; इकडे तिकडे; हवे तसे. अव्वाच्यासवा : ' जो इंद्रियें अव्हासव्हां । चारी येथ ।'- राज्ञा १३.७६९.

**अव्हाळा** स्त्री. आडवाट : 'भेदाचिया अव्हाळा पडणे'- अमृ ५२४.

**अव्हांटाधर्म** पु. आडवाटा धर्म : 'काम्य कर्मे करून घेऊन मजुरी न देणें व तीहि भरपूर न देणें हा अव्हांटा धर्म होय.'- महावा इ.४४८.

**अव्हांत्रिक** वि. अवांतर; इतर.

**अव्हेर** पु. १. हेटाळणी; अनादर; अवज्ञा; हेळसांड; अवहेलना; धिक्कार; तिरस्कार : 'तू करिसी माझा अव्हेर । तरी त्यागीन शरीर ।'- कथा १.५.१०५. २. अस्वीकार; त्याग : 'जे परदेशीय आचार विचार आपल्या रीतींस जुळत नाहींत त्यांचा या पुस्तकात अव्हेर केला आहे'- निमा ५४२. [सं.]

**अव्हेरणे** उक्रि. १.अपमान करणे; तिरस्काराने, तुच्छतेने वागविणे; अनादर करणे; त्याग करणे : 'ते देखिलेयां दुर्योधनें । अव्हेरिलें कवणे मानें ।'-

ज्ञा २.९२. २. हेळसांड, उपेक्षा, दुर्लक्ष, हयगय करणे; अव्यवस्थित, धूळ खात पडणे; दुर्दशा होणे (भांडीकुंडी, पुस्तके, खोल्या, जागा वगैरे). [सं. अव+ धीर]

**अशकरा, अशकारा** पु. कीर्ती; नावलौकिक; प्रसिद्धी; अस्कारा. पहा : **अस्करा, आश्कारा** [फा. आश्कारा]

**अशक्त** वि. १. असमर्थ; दुर्बल; दुबळा; शक्तिहीन २. नालायक; अयोग्य इ. अस्थिपंजर; हाडाचा सापळा; काडी पेहलवान [सं.]

**अशक्तता** स्त्री. दुबळेपणा; कमजोरी.

**अशक्य** वि. शक्य नसणारे; असंभवनीय; न घडण्यासारखे; न करता येणारे. [सं.]

**अशक्य सनद** स्त्री. अव्यवहार्य वचन; कधी अमलात न येणारी सनद : 'राणीचा जाहीरनामा अशक्य सनद म्हणून बाजूस ठेवण्यास खुद्द लॉर्ड कर्झन तयार आहेत.'- लोटिकेले २.५७४. [सं.]

**अशन** न. खाणे; भोजन; भक्षण:'अशनाचेनि पावके । हारपतां प्राणु पोखे ।'- ज्ञा १८.१०२६. [सं.]

**अशन–नी** पु. १. वीज, विद्युत : 'एकोन योजनें शत टाकी मथुरापुरींत अशनीची । शक्ति किती ।'- मोसभा १.८५. २. शस्त्रविशेष; वज्र. ३. उल्का पृथ्वीवर घनस्वरूप अवस्थेत येतात तेव्हा त्यांना अशनी म्हणतात. - आसूचि १८. [सं.]

**अशना** स्त्री. भूक, क्षुधा. [सं.]

**अशनिपात** पु. वीज कोसळणे; अकस्मात मोठे संकट येणे. [सं.]

**अशब्द** वि. शब्दरहित, मूक : 'अर्थ नुमजतां ज्या लिहिती । अशब्द काव्यें रोज किती ।'- ललितलहरी [सं.]

न. ब्रह्म; (सांख्य) प्रधान. [सं.]

**अशम** पु. इंद्रियांवर ताबा न ठेवणे.

वि. ज्याच्या चित्तास शांती नाही असा. [सं.]

**अशर** वि. दहा संख्या. अरबी सनाबद्दल वापरतात. [फा. अशर्]

**अशरक** प. अल्कारस नावाचे झाड; मरूमाला, पिशुना. [गुज.][सं.]

**अशरणशरण** न. निराश्रितांचे आश्रयस्थान; निराधारांचा आधार.[सं.]

**अशरफी** पहा : **अश्रफी**

**अशरीन** वि. वीस संख्या. अरबी सनाबद्दल वापरतात. [फा. इश्रीन्]

**अशरीर, अशरीरी** वि. शरीर नसलेला; देह धारण न करणारा; दैवी.

पु. मदन, ब्रह्म. [सं.]

**अशरीर, अशरीरिणी वाक्–वाणी** स्त्री. आकाशवाणी; देववाणी : 'अशरीरिणीं अंबरीं । वदती झाली ।' - कथा. 'तों अशरीरिणी वदली उत्तर । धर्मयुद्ध नव्हे हें ।'- पांप्र ४५.३९.[सं.]

**अशंकडी** स्त्री. अडचण : 'शब्दाचिया अशंकडी भेदनदीचां दोहीं थडी ।'- ज्ञा १६.५.

**अशंकणे** अक्रि. दचकणे : 'हातिचिया अंगुलिया । अशंकली'- नरुस्व ५८०.

**अशाखमाला** स्त्री. (रसा.) ज्यामध्ये कार्बन अणू केवळ एकापुढे एक असे जोडलेले असतात, अशी साखळी. [सं.]

**अशात** क्रिवि. इतक्यात : 'ये अशात सदनात हरी तो ।'- वामन नव ९९.

**अशाश्वत** वि. कायम न टिकणारे; क्षणभंगुर; अनित्य; क्षणिक; नश्वर; विनाशी; मर्त्य; नाशवंत. [सं.]

**अशासकीय** वि. सरकारी नसलेला; खाजगी. [सं.]

**अशासकीय विधेयक** न. विधिमंडळात सरकारतर्फे न मांडण्यात आलेले विधेयक.

**अशासित भूमी** स्त्री. न. (राज्य.)दोन परस्परविरोधी लष्करी आघाड्यांच्यामध्ये असलेला प्रदेश.

**अशास्त्र** वि. १. शास्त्रविरुद्ध केलेले; शास्त्राला अमान्य; शास्त्रविरहीत; आचाराकडे नियमाकडे दुर्लक्ष करून किंवा त्याचा भंग करून केलेले; शास्त्र निषिद्ध. २. अशुद्ध; अयोग्य. [सं.]

**अशास्त्रसिद्ध** वि. शास्त्राप्रमाणे सिद्ध न झालेले. [सं.]

**अशास्त्रीय** वि. शास्त्राला धरून नसलेला; अज्ञानयुक्त; चुकीचा. [सं.]

**अशांत** वि. क्वचित; विरळा. (गो.)

**अशांत** वि. १. क्षुब्ध; अस्वस्थ; खवळलेला (समुद्र, मन, वारा इ.); दमन न केलेला, न जिंकलेला (विषय, विकार). २. षड्विकार ज्याने जिंकले नाहीत असा. (विषयी, क्रोधी, लोभी इं.) [सं.]

**अशांतता** स्त्री. १. लोकांचे असमाधान, असंतोष. २. गडबड; दंगा; नित्यक्रमात बिघाड; शांतताभंग; कायदा व सुव्यवस्था नसणे. [सं.]

**अशिजा** वि. अर्धवट शिजलेला; पूर्ण न शिजलेला.

**अशित** वि. खाल्लेला. [सं.]

**अशिव** न. अकल्याण; दुर्दैव; दुःख; पीडा.

वि. अशुभ; अमंगल; अकल्याणकारक. [सं.]

**अशिष्ट** वि. १. असभ्य; न शोभणारे; लज्जास्पद; लाजिरवाणे; विचकट; बीभत्स; कुत्सित; अव्यवस्थित; गैरशिस्त; अनर्गल (मनुष्य, व्यवहार, चालरीत, मार्ग वगैरे); २. शिष्ट; थोर लोकांना संमत नसणारे; रूढ नसणारे; सर्वसामान्य नसणारे. [सं.]

**अशिष्टता** स्त्री. शिष्टसंमत नसलेले वर्तन; असभ्यता; अविनय. [सं.]

**अशिष्ट व्यवहार** पु. अनुचित, असभ्य चाल, व्यवहार (दासीगमन, लावण्या म्हणणे वगैरे). शिष्टसंमत नसलेला व्यवहार.

**अशिक्षित** वि. १. न शिकलेला; शिक्षण न घेतलेला. २. कवाईत न दिलेला; तयार न केलेला, झालेला; वळण, शिस्त न लावलेला.[सं.]

**अशी** वि. असा याचे स्त्रीलिंग.

क्रिवि. या स्थितीस, या प्रमाणे.[सं. ईदृशी ] (वा.) **अशी राहणे** - वैधव्य आल्यावर सकेशा स्थितीत राहणे : 'ही चांडाळीण अशी राहिली आहे म्हणून मला घरांतलीं कितीतरी कामें करावीं लागतात.' सदानंद. **अशी होणे**- विधवा होणे; वैधव्य येणे : 'तिकडच्या मरणानें मी अशी झालें ना ?'- अस्तंभा १५८.

**अशी** पु. (असू चे अनेकवचन) आसवे : 'रडतीयाची अशीं तुम्ही पुसोन परिणाम त्याचा करावा, तो कराल.'- ब्रच ४१. पहा : **अश्रू**

**अशीतशी** वि. लहानसहान; किरकोळ; क्षुल्लक; महत्त्व नसलेले.

**अशील** पु. १. वकिलाचे कूळ, पक्षकार. २. खासा; खानदानीचा; अभिजात; असल. [फा. असील]

**अशील** वि. जखमी (लढाईतील कैदी), बंदी. [फा. असीर]

**अशीलबे तशीलबे** मुलींचा एक खेळ.

**अशुचि –ची, अशुचिर्भूत** वि. अशुद्ध; अस्वच्छ; अपवित्र; (शब्दशः व लक्षणेने) : 'तया तोंडीं कांटिवडें । आंतु नुसतीं हाडे । अशुचि तेणें पाडें । सबाह्य जो ।' – ज्ञा १३.६७८. [सं.]

**अशुढाळ, अशुद्धाळ** वि. घाणेरडा; अव्यवस्थित; झोपाळू; अजागळ (माणूस); गिचमिड लिहिणारा; अजागळपणाचे (भाषण, काम); चेंगट; अडाणी; गबाळ्या; भोंगळ; अव्यवस्थित : 'कोण अशुद्धाळ माणसें बुवा ही ? '– सूर्यग्रहण ७७.

**अशुद्ध** वि. १. शुद्ध नसलेले; शुद्ध न केलेले; चुकीचे; सदोष; भेसळ असलेले. २. घाणेरडे; अस्वच्छ; बिघडलेले; अपवित्र; अमंगळ; विटाळलेले. [सं.]

**अशुद्ध** न. १. रक्त : 'परि ते अव्हेरूनि गोचिड ।अशुद्ध काय नेघती ।'– ज्ञा ९.५७. २. हीण; मिश्रण; हीन प्रतीचा भाग काढून न टाकलेले (सोने, लोखंड वगैरे). ३. चूक; चुकी; प्रमाद; दोष (बोलण्यात, लिहिण्यात). [सं.]

**अशुद्धया** वि. नेहमी चुका करणारा; गोंधळ्या; प्रमादी.

न. चूक; चुकी; प्रमाद; दोष (बोलण्यात, लिहिण्यात). [सं.]

**अशुभ** न. १. अमांगल्य; अनिष्ट; दुर्भाग्य; दुर्दैव; अकल्याण. २. अनिष्ट कार्य; अमंगल कार्य. ३. पातक : 'आमुच्या अशुभाशयाचा धातु । करिता चरण धूमकेतू ।'– एभा ६.१११ .

वि. १. अमंगल; अभद्र; अनिष्ट; प्रतिकूल (देखावा, सूचना, मतलब, अर्थ, योग, क्रिया, शब्द, चिन्हे, लक्षणे वगैरे). २. धर्माला किंवा आचाराला सोडून असलेला. ३. दुःखदायक; वाईट. [सं.]

**अशुभ आचार** पु. ज्यात उत्सव, सुख सोहळा नाही अशा तऱ्हेचे कार्य किंवा समारंभ; विशेषतः और्ध्वदेहिक क्रिया – उत्तरक्रिया. २. पापाचरण; अनाचार; दुष्कर्म. [सं.]

**अशुभ कर्म, कार्य** न. अमंगल किंवा तिरस्करणीय विधी. [सं.]

**अशुभचिन्ह, लक्षण** न. १. अमंगल, अनिष्ट, चिन्ह, लक्षण, छाया, व्यंजन, दुश्चिन्ह; अनिष्टसूचक गोष्ट . [सं.]

**अशुभ वर्तमान** न. वाईट बातमी; अमंगल, अनिष्ट बातमी. [सं.]

**अशुरा** पु. मोहरमचे दहा दिवस. [फा. अशर=दहा]

**अशुश्रुषु** वि. सेवा न करणारा : 'शठ नास्तिक दंभयुक्त । अशुश्रुषु आणि अभक्त ।'– एभा २९.५०९. [सं. अ+शुश्रूषा]

**अशून्य** वि. पूर्ण भरलेला; पोकळ नसलेला. [सं.]

**अशेष, अशेख** वि. ज्याची बाकी शिल्लक उरत नाही असा; निःशेष; संपूर्ण; सगळा; सर्व; अवघा. [सं.]

**अशेषभाजक** पु. (ग.) लहानात लहान भाग. [सं.]

**अशोक** पु. १. एका वृक्षाचे नाव, ह्याची पाने आंब्याच्या पानांपेक्षा लांब व कुरळी असून शोभिवंत असतात. २. आनंद.

वि. ज्याला दुःख नाही असा. [सं.]

**अशोक पौर्णिमा** स्त्री. फाल्गुन पौर्णिमा. [सं.]

**अशोक वनिका न्याय** एखादी गोष्ट करण्याचे अनेक तुल्य मार्ग असताना त्यापैकी अमुकच का स्वीकारला याचे कारण सांगता न येणे. जसे – रावणाने सीतेला अशोक वनात का ठेवली तर कोठेतरी ठेवायची ती अशोक वनात ठेवली.

**अशोकाष्टमी** स्त्री. चैत्र शु. ८. या दिवशी अशोकाच्या कळ्या पाण्यात टाकून ते पाणी पिण्याचा विधी. ही तिथी विष्णुदेवतेप्रीत्यर्थ आहे. [सं.]

**अशोधित** वि. १. अशुद्ध; शुद्ध न केलेला; खाणीतून काढलेला व त्यावर कोणतीही क्रिया न केलेला (धातू). २. शोधून न काढलेला; अज्ञात. [सं.]

**अशोधित तेल** न. (भू.) शुद्ध न केलेले खनिज तेल.

**अशोधित मृत्युअर्थ** मृत्यूचे ढोबळ प्रमाण.

**अशोभ** वि. १. न शोभणारा. २. कुरूप. [सं. अ + शुभ]

**अशोभन** वि. अमंगल; अपवित्र.

न. अपकार; अपराध. [सं.]

**अशोभनीय** वि. १. न शोभणारा; अयोग्य; अनुचित. २. लाजिरवाणा; लज्जास्पद. [सं.]

**अशौच** न. १. सुतक; अपवित्र स्थिती; मरणाशौच. २. मलिनपणाः 'अशौच तो बाधी आणिकां अक्षरां । नाम निदसुरा घेतां तरे ।।' – तुगा २५१३. [सं.]

वि. अपवित्र; पतितः 'जालों मी अति अशौच ।' – विसिंपू १.९०. [सं.]

**अशौचक** वि. अपवित्र : 'तोंडाळ, वोढाळ, पतिनिंदक : 'ते स्त्रियेच्या ऐसे देख । अशौचक सबाह्य ।' – एभा १७.२०३. [सं.]

**अशौच्य** वि. अशौच; अशुद्धः 'कां अशौच्या मंत्रें । बीजें कथिलीं ।' – ज्ञा ९.१७७. [सं. अ + शुचि]

**अश्म** पु. दगड. पहाः **अश्मा**

**अश्मक** पु. खानदेश, विदर्भ आणि मराठवाडा मिळून होणाऱ्या महाराष्ट्रातील प्रदेशाचे जुने नाव.

**अश्मगर्भी फळ** न. (वन.) अष्ठीला; आठळी फळ; बाठी फळ; फलावरणाचा सर्वात आतला भाग कठीण कवचासारखा असलेले (बाठ असलेले) फळ. आंबा वगैरे.

**अश्मन** न. (भौ.) दगड तयार होण्याची क्रिया; सेंद्रिय पदार्थाचे दगडामध्ये किंवा दगडासारख्या घट्ट पदार्थामध्ये रूपांतर होणे. [सं.]

**अश्मपरशु– शू** पु. (पुरा.) आद्य अश्मयुगात सापडणारे दगडाचे परशूसारखे हत्यार. [सं.]

**अश्मयुग** न. (पुरा.) पाषाणयुग; मानवाच्या संस्कृतीची पहिली अवस्था; रानटी अवस्थेतील मानव ज्या प्रागैतिहासिक काळात नद्यांच्या काठाकाठाने हिंडून दगडांच्या हत्याराने जनावरांची शिकार करी, तो प्रदीर्घ कालखंड. या काळात मानवाने मुख्यत्वेकरून दगडाचीच हत्यारे वापरली म्हणून अश्मयुग म्हणतात. [सं.]

**अश्मयुगीन गुहा** स्त्री. (पुरा.) प्राचीन अश्मयुगातील मानव ज्या नैसर्गिक गुहेत वास्तव्य करीत असे अशा डोंगर कपारींच्या गुहा. या गुहेत त्यांची हत्यारे, मारलेल्या प्राण्यांचे तसेच त्यांचे अवशेष वगैरे सापडतात. [सं.]

**अश्मरी** स्त्री. मुतखडा; मूत्ररोग; मूत्रकृच्छ. [सं.]

**अश्मवर्तुल दफन** न. (पुरा.) मृताचे दफन केल्यानंतर त्याभोवती वर्तुळाकार दगड लावणे. अशी प्रथा लोहयुगात होती.

**अश्मसार** पु. १. लोखंड; लोह. २. हिरा. [सं.]

**अश्महृदय** वि. पाषाणहृदयी; कठोर; निर्दय; निष्ठुर. [सं.]

**अश्मंतक** पु. आपट्याचे झाड. [सं.]

**अश्मा** पु. १. दगड; पाषाणः 'लिळा पदें देउनि अश्मा । उद्धरिला ।' – ऋ ६०. २. मरणोत्तर धार्मिक क्रियेच्या वेळी सवर्णहिंदू ज्या दगडावर तिलांजली देतात तो दगड; जीवधोंडा. [सं. अश्मन्]

**अश्मास्थी** पु. (वन.) अश्मस्वरूपात रूपांतरित झालेले भूपृष्ठाच्या वेगवेगळ्या थरांत आढळणारे वनस्पतींचे अवशेष. [सं.]

**अश्मित** वि. (भूशा.) (सजीव अवशेष) खडकात रूपांतरित झालेले; अश्मीभूत झालेले. [सं.]

**अश्मी उल्का** (अश्मी उल्का) स्त्री. (भूशा.) पाषाणमय उल्का; बाह्यावकाशातून पडलेला उल्कापाषाण; बाह्यावकाशातून पृथ्वीवर येऊन पडलेला सिलिकेटी खनिजे असणारा अशनिपाषाण. [सं.]

**अश्मीभवन** न. (वन.) गाळात मुरणाऱ्या पाण्यामुळे हजारो वर्षांपूर्वी गाडल्या गेलेल्या वृक्षांच्या खोडांचे कायान्तरण होण्याची क्रिया.[सं.]

**अश्मीभूत** वि. (पुरा.) खडकांच्या थरांमध्ये प्राचीन प्राण्यांचे किंवा वनस्पतींचे नैसर्गिक रासायनिक प्रक्रियेमुळे दगडासारखे झालेले (अवशेष); दगडाचे रूप पावलेला; दगडासारखे कठीण झालेले; प्रस्तररूप पावणारी (वनस्पती वगैरे). [सं.]

**अश्मीभूत अरण्य,वन** न. ज्या क्षेत्रात वृक्षांची अश्मीभूत खोडे गाळांच्या उघड्या पडलेल्या खडकात आढळतात अशी ठिकाणे.

**अश्युलियन** वि. (पुरा.) अश्मयुगीन दगडाची (हत्यारे): हात कुऱ्हाडी, अश्मपरशू इ. प्रकार. फ्रान्समधील सोम नदीच्या काठी या प्रकारच्या हत्यारांचा प्रथम शोध लागला. त्या अश्युलियन नावाच्या गावावरून हे नाव पडले. [इं.]

**अश्रणी** स्त्री. आकाशवाणी; देववाणी.

**अश्रफी** स्त्री. जुन्याकाळचे एक सोन्याचे नाणे; मोहोर.

**अश्रद्ध** वि. श्रद्धा नसणारा; भाव, भक्ती नसलेला. [सं.]

**अश्रद्धा** वि. १.श्रद्धेचा अभाव; भरवसा, भक्ती यांचा अभाव (ईश्वराच्या ठिकाणी). २. अप्रीती; नावड; कंटाळा; तिटकारा. ३. गैरविश्वास; अविश्वास. [सं.]

**अश्रद्धेय** वि. श्रद्धा ठेवण्यास अयोग्य, नालायक. [सं.]

**अश्राप–फ** वि.१.अभिजात; सभ्य; थोर; खानदानी घराण्यातील (माणूस); उच्च दर्जाचा. २. गरीब, निरुपद्रवी (जनावर).[फा. शरीफचे अव.]

**अश्रापगाय** स्त्री. निरुपद्रवी मनुष्य.

**अश्रायिणे** सक्रि. आश्रय करणे. [आश्रयणे अप.]

**अश्राव्य** वि. १. ऐकू न येणारे. २. ऐकण्यास अयोग्य (ईश्वरनिंदा, साधुनिंदा इ.) ३. बीभत्स; अश्लील. ४. निःशब्द. [सं.]

**अश्राव्यता** स्त्री. १. ऐकू न येणे; दुःश्राव्यता; बहिरेपणा. २. निःशब्दता. [सं.]

**अश्री** स्त्री. १. कोपरा; कोन; पैलू. २. शस्त्राची धार.

**अश्रीक** वि. अभागी; दुर्दैवी; निःस्तेज.

**अश्रु–श्रू** पु. असू; आसू; आत्यंतिक दुःखाच्या किंवा आनंदाच्या क्षणी डोळ्यात येणारे पाणी. [सं.]

**अश्रुग्रंथी** पु. (वै.) डोळ्यातील अश्रू निर्माण करणारी ग्रंथी. [सं.]

**अश्रुढाळ** वि. सारखे अश्रू गाळणारा; घोड्याचे एक कुलक्षण.

**अश्रुत** वि. १. न ऐकलेले; ठाऊक नसलेले; अज्ञातः 'अश्रुत फळें या वेगळीं । श्रवणीं पडतां त्याहीं फळीं' – यथादी २.१२४२. २. ज्याने ऐकले नाही किंवा ज्याला ठाऊक नाही असा; अशिक्षित. ३. वेद न जाणणारा. ४. वेदविरुद्ध; वेदाने विहित न केलेला; वेदास असंमत असा; अशास्त्र; वेदबाह्य. ५. कराराने, शपथेने, प्रतिज्ञेने, स्वतःला बांधून न घेणारा. [सं.]

**अश्रुतपूर्व** वि. पूर्वी ऐकिवात नसलेला; अगदी नवीन; नवलपूर्ण; आश्चर्यकारक. [सं.]

**अश्रुधारा** स्त्री. अश्रू वाहणे; एकसारखे रडणे; अश्रूंचा प्रवाह. [सं.]

**अश्रुधूर** पु. प्रक्षुब्ध जमाव पांगवण्यासाठी किंवा ताब्यात ठेवण्यासाठी पोलिसांकडून वापरला जाणारा वायू, यामुळे डोळ्यातून सारखे पाणी येते व डोळे चुरचुरतात.

**अश्रुनलिका** स्त्री. (प्राणि.) डोळ्याच्या आतील कोपऱ्यात असलेली, नाकाच्या पोकळीत उघडणारी नलिका. [सं.]

**अश्रुनाली** स्त्री. व्रण; भगंदर; नासूर.

**अश्रुपात** पु. १. अश्रूंचा प्रवाह; सारखे रडणे (क्रि. चालणे, वाहणे). २. घोड्याच्या डोळ्यातील भोवरा; घोड्याचे एक अशुभ लक्षण.

**अश्रुपात्र** न. काच किंवा भाजलेली तांबडी माती (टेराकोटा) यापासून केलेले एक प्रकारचे भांडे. ही भांडी ग्रीक व रोमन थडग्यांमधून सापडली असून शोक करणारी माणसे आपले अश्रू त्यांत गाळत असत असे म्हणतात. [सं.]

**अश्रुपिंड** पु. अश्रू निर्माण करणारी मांसग्रंथी. पहाः **अश्रुग्रंथी**

**अश्रुपूर्ण** वि. १. अश्रूंनी भरलेला; डबडबेला. २. शोककारक; उदासवाणा. [सं.]

**अश्रुप्रपिंड** पु. (प्राणि.) डोळ्याच्या बाह्य कोनात असलेली अश्रू निर्माण करणारी ग्रंथी. [सं.]

**अश्रुवायू** पहाः **अश्रुधूर**

**अश्रेय** वि. अकल्याण. [सं.]

**अश्लाघनीय, अश्लाघ्य** वि. स्तुती करण्याला अयोग्य; प्रशंसा करण्याला अयोग्य; अप्रशंसनीय; निंद्य. [सं.]

**अश्लील** वि. १. असभ्य; अयोग्य; लज्जास्पद; शरम वाटण्याजोगा; अनीतिसूचक; अनीति – मूलक. २. असभ्य भाषा असलेले (वाङ्मय); शिवराळ; गावंढळ. ३. अचकट विचकट; उत्तान, भडक, कामुक वर्णन असलेली (कृती). [सं.]

**अश्व** पु. १. घोडा; एक चतुष्पाद प्राणी; हा मनुष्यास बसण्यासाठी किंवा गाडी, टांगा वगैरे ओढण्यासाठी वाहक म्हणून उपयोगास येतो. २ ( सांकेतिक ) सात ही संख्या. [सं.]

**अश्व अक्षांश** पु. (भू.) कर्कवृत्त व मकरवृत्त यांच्या दोन्ही बाजूंच्या अक्षांशांच्या पट्ट्यातील सागरी प्रदेश (या प्रदेशात वारे शांत असतात). [सं.]

**अश्वक** पु. १. घोडा; क्षुद्र घोडा; भाडोत्री घोडा; चुकलेला घोडा. २. काकाकुवा पक्षी. [सं.]

**अश्वकुटी** स्त्री. पागा.

**अश्वकुंत** पु. भाल्याचा एक प्रकार. [सं.]

**अश्वक्रांत स्थान** न. (नृत्य.) एक पाय समस्थित ठेवणे, दुसरा पाय अग्रतलसंचर करून पाय अंगठ्यावर टेकून दुसऱ्या पायांजवळ ठेवणे. अडखळणे, वस्त्र उचलणे, झाडाच्या फांद्या ओढणे वगैरे दर्शक हे स्थान आहे. [सं.]

**अश्वखाद्य** न. हरभरा; घोडखाद्य. [सं.]

**अश्वगति–ती** स्त्री. घोड्याची चाल,गती. [सं.]

**अश्वगंधा** स्त्री. एक पौष्टिक औषधी वनस्पती. यास आस्कंद, अजगंध, ढोरगुंज अशी निरनिराळी नावे आहेत. [सं.]

**अश्वगुटिका, अश्वघुट(टि)का** स्त्री. एक विवक्षित वाजीकरण (औषध, मंत्रसिद्धी, ताईत याद्वारे). [सं.]

**अश्वचर्या** स्त्री. घोडा फिरविण्याची विद्याः 'कुस्ती व्यतिरिक्त खेळ व कसरतीचे प्रकार म्हणजे रथचर्या, अश्वचर्या, तलवारीचे युद्ध व गदायुद्ध हे होत.' – व्याज्ञा १.३६. [सं.]

**अश्वचिकित्सक** पु. शालिहोत्रज्ञ; अश्ववैद्य; घोड्यांचा वैद्य. [सं.]

**अश्वचिकित्सा** स्त्री. घोड्याचे औषधी उपचार. [सं.]

**अश्वतर** पु. खेचर.

**अश्वत्थ** पु. एक झाड; पिंपळ. हे अतिशय मोठे, फार वर्षे जगणारे व अनेक औषधी गुणांनी युक्त असल्यामुळे हिंदू लोक यास पवित्र मानतात. धार्मिक संस्कार–विधीत यांच्या समिधा वापरतातः 'कल्पद्रुम हन पारिजातु । गुणें चंदनुहि वाड विख्यातु । तरि ययां वृक्षजातांआंतु । अश्वत्थु तो मी ।।' – ज्ञा १०.२३५.
वि. उद्यापर्यंत न टिकणारा; (तत्त्व) प्रपंचः 'आणि अश्वत्थु ऐसें ययातें । म्हणती जे जाणते ।' – ज्ञा १५.११०. [सं.]

**अश्वत्थनारायण** पु. देवतारूप मानलेला अश्वत्थ. तमिळ – कानडी लोकांत हे नाव असतेः 'अश्वत्थनारायण सूर्य नारायण' –दास ४.५.१३. [सं.]

**अश्वत्थोद्यापन** न. पिंपळास पार बांधून मंत्रांनी जो संस्कारविशेष करतात तो. [सं.]

**अश्वधाटी** स्त्री. एक मात्रावृत्त. याला मंदारमाला असेही म्हणतात. उदा. 'वाचाळ मी नीट पाचारितों धीट याचा नयो वीट साचा हरी ।' – वृत्तदर्पण ३२. या दोहोत फरक म्हणजे अश्वधाटीत बाराव्या अक्षरावर पदसमाप्ती तर मंदारमालेत अकराव्या अक्षरावर.

**अश्वधाटी यमक** न. यमक शब्दालंकाराचा एक प्रकार. हे मागे व पुढे निराळे व्यंजन असल्यामुळे घोड्याप्रमाणे उड्या मारीत चालले आहे असा भास होतो. उदा. 'गाजत वाजत साजत आज तया जतन करुनि आणाहो.' – मोविराट ६.७५.

**अश्वपथ** पु. घोड्यांच्या रपेटीसाठी तयार केलेला खास मार्ग. [सं.]

**अश्वपरीक्षा** स्त्री. १. घोड्यासंबंधाने ज्ञान. २. घोड्याच्या मांसाचे ज्ञान. (अश्वमांसज्ञान.) [सं.]

**अश्वपात** पु. अश्रू येणे, अश्रुपात.

**अश्वपाल** पु. मोतद्दार. [सं.]

**अश्वभार** पु. १. अश्वसेना; घोडदळ; घोडेस्वारांचे सैन्य. २. घोड्यांचा जमाव, समूह. [सं.]

**अश्वमुख** पु. किन्नर.
न. (स्था.) भिंतीत बसविलेले लाकडी किंवा दगडी घोडे. (असे घोडे भिंत, छत यांना टेकू म्हणून लावतात). [सं.]

**अश्वमूत्राम्ल** न. हिप्युरिक ॲसिड. (इं.) हे अम्ल वनस्पती खाणाऱ्या जनावरांच्या मूत्रात सापडते. [सं.]

**अश्वमेध** पु. सार्वभौम राजाने करावयाचा यज्ञ. हा यज्ञ केल्याने पृथ्वीचे सार्वभौमत्व मिळते व असे शंभर यज्ञ केल्याने इंद्रपद मिळते, अशी समजूत आहे. [सं.]

**अश्वरस** वि. रुंद छातीचा.

**अश्वरक्षक** पु. मौतद्दार. [सं.]

**अश्वराती** स्त्री. एक वनस्पती; हरितालिका पूजेतील पत्रींपैकी एक.

**अश्वरोह** पु. घोडेस्वार.

**अश्ववाहक** पु. सारथी; घोडे हाकणारा; चाबुकस्वार.

**अश्ववैद्य** पु. घोड्यांचा आजाराची माहिती असणारा व त्यावर उपचार करणारा माणूस.

**अश्वशक्ति–क्ती** स्त्री. (भौ.) यंत्राची शक्ती मोजण्याचे एक परिमाण; ७४६ वॅटस् इतक्या शक्तीचे एकक (युनिट); तेहतीस हजार पौंड वजन, एका मिनिटात, एक फूट उंच उचलण्यास, किंवा १ पौंड वजन एका सेकंदात ५५० फूट ओढून नेण्यास लागणारी शक्ती. [सं.]

**अश्वशाणी** पु. चाबुकस्वार; घोड्यांची परीक्षा करणारा; अश्ववैद्य; परीक्षकः 'बोलावोनिया अश्वशाणी । म्हणती घोडे निवडी गा ये क्षणीं ।' – कथा ४.९.१५.

**अश्वशाला** स्त्री. १. घोड्यांची पागा; तबेला. २. घोड्यावर बसण्यास शिकवितात ती शाळा. [सं.]

**अश्वशिक्षक** पु. घोड्यांना निरनिराळ्या चाली शिकवणारा; चाबुकस्वार; घोडे हाकणारा. [सं.]

**अश्वशिक्षा** स्त्री. घोड्यांना शिकवणे, शिक्षा लावणे. (गती, चाल वगैरे). [सं.]

**अश्वसारथी** पहाः **अश्वशिक्षक**

**अश्वसारथ्य** न. रथ किंवा त्याला जुंपलेले घोडे चालवणे, हाकणे; रथाची व्यवस्था. [सं.]

**अश्वसाहणी** पु. घोड्याची परीक्षा करणाराः 'जैसा वारु उपलाणी । वश्य करी अश्वसाहणी ।' – एभा २०.२१६.

**अश्वस्थ** वि. अस्वस्थ (अप.)ः 'अश्वस्थ संसार हा स्वस्थ नाहीं जाणा' – सप्र ५.२१. अश्वथ्य असेही रूप आहे.

**अश्वहृदय** न. १. घोड्यासंबंधी रहस्य किंवा गुप्त गोष्टींचे ज्ञान; अश्वशास्त्र; अश्वविद्या; घोड्यावर बसण्याची विद्या. २. घोड्यांच्या प्रकृतीचे निदान किंवा त्या संबंधीचे शास्त्र. [सं.]

**अश्वादन** न. गोडी; आस्वादन : 'मकरंद अश्वादन मीसे ।' वह १६१.३४.

**अश्वायुर्वेद** पु. गुरांचे वैद्यक, शालिहोत्र. [सं.]

**अश्वारी – नी** स्त्री. घोडेस्वारांची पलटण.(गो.)

**अश्वारोह** पु. घोडेस्वार. [सं.]

**अश्वारोहण** न. घोड्यावर बसणे; स्वार होणे. [सं.]

**अश्वि(श्वी)न** पु. चंद्रमासाप्रमाणे चैत्रापासून सातवा महिना. [सं.]

**अश्विनी** स्त्री. १. सत्तावीस नक्षत्रांपैकी पहिले. या दोन किंवा तीन तारका समजतात. २. घोडी: 'म्हणे अश्व करितां जळपान । अश्विनी केवी जाहली ।' – जै २१.८५.

वि. जिच्याजवळ घोडे आहेत अशी, सूर्यपत्नी. [सं.]

**अश्विनीकुमार–पुत्र, अश्विनौ, अश्विनौदेव** पु. १. देवांचे वैद्य; अश्विनी अप्सरेचे जुळे मुलगे. २. (ल.) कुशल वैद्य: 'पै सौम्यतेचा बोलवा । मिती नेणिजे अश्विनौदेवा ।' – ज्ञा ११.१४४. ३. एक औषधी मात्रा.

**अश्वील, अश्वल** पहा: **अस्वल**

**अश्वोरस** वि. घोड्यासारख्या रुंद उराचा; रुंद छातीचा. [सं.]

**अषद्ढाळ** वि. (बोलणे, करणे इ. मध्ये) ताळतंत्र नसलेला.

**अष्ट** वि. आठ ही संख्या. [सं. अष्टन्]

**अष्टक** न. १. आठ पदार्थांचा समुदाय. २. पाणिनीच्या सूत्रपाठाचे आठ विभाग, त्यातील प्रत्येक. ३. ऋग्वेदसंहितेचे पठणाच्या सोईकरिता आठ भाग, त्यातील प्रत्येक. ४. आठ श्लोकांचा समूह; एक काव्यरचनापद्धती. उदा. मंगलाष्टके, करुणाष्टके.

वि. आठ किंवा आठवा. [सं.]

**अष्टकपाळ्या** वि. १. अष्टांगे – दोन हात, दोन पाय, दोन गुडघे, वक्षःस्थळ आणि कपाळ. दैवयोगाने लाभलेल्या या सुंदर अवयवांचा उपयोग करूनही ज्यास काही लाभ मिळत नाही तो. कोणत्याही कामाला उपयोगी नाही असा माणूस. २. (ल.) पूर्णपणे दुर्दैवी; आपद्ग्रस्त; भद्र्या; कपाळकरंटा.

**अष्टकर्ण** पु. ब्रह्मदेव.

**अष्टकर्णिका** स्त्री. आठ पाकळ्या: 'माझें हृदय दिव्य कमळ । जे तेजोमय परम निर्मळ । अष्टकर्णिका अतिकोमळ । मध्यें घननीळ विराजे ।' – हरि ३५.१. [सं.]

**अष्टकुलाचल** पु. मेरूच्या चारी दिशांस असणारे (नील, निषध, विंध्य, माल्यवान, मलय, गंधमादन, हेमकूट, हिमालय इ.) आठ पर्वत. [सं.]

**अष्टकोन–नी–ण–णी** वि. आठ कोन व आठ बाजू असलेली (वस्तू, आकृती). [सं. अष्टकोण]

**अष्टगंध** न. आठ सुगंधी द्रव्ये (चंदन, अगरु, देवदार, कोष्टकोलिंजन, कुसुम, शैलज, जटामांसी, सुरगोरोचन) एकत्र करून केलेले गंध; (सामान्यतः) उटणे. [सं.]

**अष्टगुण** वि. आठपट.

**अष्टगोल – गोली** वि. काठापदरांवर वेलबुट्टी काढलेला (चौपदरी शेला): 'कोणासी पागोटें परकाळा । कोणी मागती अष्टगोली शेला ।' – भक्तवि ३०.४१.

**अष्टगोळी** क्रिवि. सर्वतऱ्हेने; एकंदर.

**अष्टग्रही** स्त्री. (ज्यो.) रवि, चंद्र, मंगळ, बुध, गुरू, शुक्र, शनी, राहू किंवा केतू हे आठ ग्रह एकाच राशीत येणे: 'काही वर्षामागं अष्टग्रहीनं जग बुडणार असं शास्त्री पंडितांनी भविष्य वर्तविलं होतं.' – अचावा २४२. [सं.]

**अष्टघाण** स्त्री. अतिशय दुर्गंधी, घाण. [सं. अष्ट + घ्राण]

**अष्टताल** पहा: **झंपाताल**

**अष्टदल–ळ** वि.आठ पाकळ्यांचे; आठ पानांचे; अष्टभुज; अष्टकोनी. न. १. कमळाच्या आकाराची काढलेली आठ पाकळ्यांची किंवा भागांची आकृती: 'गर्भें रचिलीं उदंडें । अष्टदळें ।' – ऋ ७१. २. एक प्रकारची रांगोळी. ३. आठ पाकळ्यांचे ताम्हण, संध्यापात्र. [सं.]

**अष्टदाने** न. अव. और्ध्वदेहिकात द्यायची आठ प्रकारची दाने: आमान्न, उदकुंभ, भूमी, गोदान, शय्या, वस्त्र, छत्र, आसन. [सं.]

**अष्टदिक्पाल** पु. अंतरिक्षाच्या आठ दिशांचे रक्षण करणाऱ्या देवता – पूर्वेचा इंद्र, आग्नेयेचा अग्नी, दक्षिणेचा यम, नैर्ऋत्येचा नैर्ऋत, पश्चिमेचा वरुण, वायव्येचा मारुत, उत्तरेचा कुबेर (सोम) आणि ईशान्येचा ईश : 'इयेवरी सप्तसागर । मध्यें मेरू महाथोर । अष्ट दिग्पाल तो परिवार । अंतरें वेष्टित राहिले ।।' – दास ४.१०.४. [सं.]

**अष्टदिग्गज** पु. ऐरावत, पुंडरिक, वामन, कुमुद, अंजन, पुष्पदंत, सार्वभौम, सुमतीक असे आठ दिशांना पृथ्वीला आधारभूत असे आठ हत्ती आहेत, अशी पौराणिक कल्पना आहे. [सं.]

**अष्टदिशा** स्त्री. आठ दिशा; दिक्चक्राचे आठ भाग – पूर्व, आग्नेय, दक्षिण, नैर्ऋत्य, पश्चिम, वायव्य, उत्तर, ईशान्य. [सं.]

**अष्टदेह** पु. देहाचे आठ प्रकार – पहिले चार पिंडी व पुढील चार ब्रम्हांडी: 'स्थूल, सूक्ष्म, कारण । महाकारण, विराट, हिरण्य । अव्याकृत, मूलप्रकृति जाण । ऐसे अष्ट देह ।' – दास ८.७.४०. [सं.]

**अष्टधा** वि. आठ प्रकारचे. [सं.]

**अष्टधामूर्ति–र्ती** स्त्री. आठ प्रकारच्या मूर्ती: 'शैली, दारूमयी, लेप्या, लेख्या, सैकती अथवा सूर्यमंडळीं, जळीं, स्थळीं, अष्टमूर्तिस्वरूप श्रीहरीसी पूजावें ।' – अमृतधृव ६.

**अष्टधार** वि. आठ धारा असलेले: 'तव तेणें साधकें एक अष्टधार आड धरिलें ।' – कृमुरा २२.९६.

**अष्टनाग** पु. आठ जातींचे सर्प – अनंत, वासुकी, तक्षक, कर्कोटक, शंख, कुलिक, पद्म, महापद्म. [सं.]

**अष्टनायिका** स्त्री. १. अव. श्रीकृष्णाच्या प्रमुख बायका आठ – रुक्मिणी, सत्यभामा, जांबवंती, कालिंदी (सूर्यकन्या), मित्रवृंदा (अवंतिराजसुता), याज्ञजिती (यज्ञजितकन्या), भद्रा (कैकयनृपकन्या), लक्ष्मणा (महेन्द्रनाथ कन्या). २. इंद्राच्या आठ नायिका – उर्वशी, मेनका, रंभा, पूर्वचिती, स्वयंप्रभा, भिन्नकेशी, जनवल्लभा, घृताची (तिलोत्तमा): 'अष्ट नायिका येऊनि । सर्वा घरीं नृत्य करिती ।' – हरि २६.२२८. ३. (साहित्य) वासकसज्जा, विरहोत्कंठिता, स्वाधीन

भर्तृका, कलहांतरिता, खंडिता, विप्रलब्धा, प्रोषितभर्तृका, अभिसारिका. [सं.]

**अष्टपत्री** वि. १. कोणत्याही विशिष्ट आकाराच्या (क्राऊन, डेमी) छापावयाच्या कागदाची आठ पृष्ठे होतील अशा तऱ्हेने घडी पडणारे छापलेले (पुस्तक). [सं. अष्टपत्र]

**अष्टपद, अष्टपाद** पु. १. कोळी वर्गातील प्राणी – गोचीड, सूतकिडे, विंचू, कातीण वगैरे २. आठ पायांचा काल्पनिक प्राणी. [सं.]

**अष्टपदरी** वि. आठ पदरांचा (शेला); आठ सरांची (माळ); आठ पेडांची, धाग्यांची (दोरी). [सं. अष्टपल्लव]

**अष्टपदी** स्त्री. १. आठ पदांचा समुदाय. २. आठ चरणांचे एक कथन; कविताप्रकार.

**अष्टपाकुळ** न. आठ पाकळ्यांचे फूल.

**अष्टपुत्रा** वि. जिला आठ मुलगे आहेत अशी (स्त्री); सौभाग्यवती स्त्रीला असा आशीर्वाद देतात. [सं.]

**अष्टपुत्री** स्त्री. विवाहाचे वेळी काठाला हळद लावून वधूला नेसावयास द्यायवयाचे शुभ्र वस्त्र. तिला पुष्कळ अपत्ये व्हावीत या इच्छेचे द्योतकः 'फेडिलें मायेचें वधूवस्त्र । अष्टपुत्र्या पितांबर । नेसली कृष्णमय स्वतंत्र । तेणें सुंदर शोभली ।' – एरुस्व १६.१५.

**अष्टपैलू** वि. १. ज्याला आठ पैलू (बाजू) आहेत असा (हिरा, रत्न). २. (ल.) हुशार; कलाभिज्ञ; व्यवहारचतुर; निरनिराळ्या विषयात गती असलेला; पुष्कळ विषयांचे ज्ञान असलेला.

**अष्टफली–ळी, अष्टफळ–फल** पहाः **अटोफळी**

**अष्टबंध** पु. अष्टकुलाचल पर्वतः 'अष्टबंध पृथ्वीस, अष्टकुलाचळे पर्वतें मेरूमेखला बंध.'– प्रमेय. [सं.]

**अष्टभार** पु. ८००० तोळ्यांचा एक भार. असे आठ भारः ' नित्य प्रसवे अष्टभार सुवर्ण । सूर्यासम प्रभा परिपूर्ण ।' – हरि २५.१५.

**अष्टभाव** पु. (साहित्य.) शरीराच्या सत्त्वगुणाचे आठ भाव, प्रकार– स्तंभ, स्वेद, रोमांच, स्वरभंग किंवा वैस्वर्य, कंप किंवा वेपथु, वैवर्ण्य, अश्रुपात, प्रलय. पर्याय – कंप, रोमांच, स्फुरण, प्रेमाश्रू, स्वेद, हास्य, लास्य, गायनः 'आठवीया दिवशीं नाश अष्टभावा । अद्वयानुभावा सुखें राहे ।।' – ब गाथा११०. [सं.]

**अष्टभुज** वि. आठ भुजा असलेली; आठ बाजू असलेली. [सं.]

**अष्टभैरव** पु. शिवगणातील अष्टरूपातील भैरव देवता.

**अष्टभोग** पु. आठ प्रकारचे भोग – अन्न, उदक, तांबूल, पुष्प, चंदन, वसन, शय्या, अलंकार. [सं.]

**अष्टम** वि. आठवा. [सं.]

**अष्टमभाव** पु. (ज्यो.) कुंडलीतील आठवे स्थान. [सं.]

**अष्टमर्यादागिरी** पु. आठ मोठे पर्वत. हिमालय, हेमकूट, निषध, गंधमादन, नील,श्वेत, शृंगवान व माल्यवान. हे जंबुद्वीपात असून ते त्यातील नऊ भागांच्या मर्यादा आहेत. [सं.]

**अष्टमहारोग** पु. आठ मोठे रोग – वातव्याधी, अश्मरी, कुष्ठ, मेह, उदर, भगंदर, अर्श (मूळव्याध), संग्रहणी. [सं.]

**अष्टमहासिद्धि–द्धी** १. अणिमा = शरीर अत्यंत सूक्ष्म होणे. २. महिमा = शरीर मोठे होणे. ३. लघिमा = शरीर वजनात हलके होणे. ४. प्राप्ती = सर्व प्राण्यांच्या इंद्रियांशी त्या त्या इंद्रियांच्या अधिष्ठात्री देवतांच्या रूपाने संबंध घडणे. ५. प्राकाश्य = ऐकून ठाऊक असलेल्या व स्वर्गादी पारलौकिक स्थानी व दिसण्याजोग्या इहलोकातील स्थानी भोग व दर्शनाचे सामर्थ्य येणे. ६. ईशिता = शक्तीची, मायेची व तिच्या अंशाची ईशाच्या ठिकाणी व इतरांच्या ठिकाणी असणारी प्रेरणा. ७. वशिता = विषय भोगीत असूनही त्यांच्या ठिकाणी आसक्त न होणे. ८. प्राकाम्य = ज्या ज्या सुखाची इच्छा करावी ते ते सुख अमर्याद प्राप्त होणे. [सं.]

**अष्टमंगल** वि. (विप्र. अष्टमंगळ). १. ज्याचे तोंड, शेपूट, आयाळ, छाती व चार खूर शुभ्र आहेत असा; कित्येकांच्या मते ज्याचे पाय, शेपूट, छाती व वृषण शुभ्र आहेत व जो कटिप्रदेशी भोवऱ्यांनी युक्त असून ज्याच्या कपाळावर कमलाकृती केंसाचे वेटोळे असते असा (घोडा). २. (सामान्यतः) आठ शुभलक्षणांनी युक्त असा (घोडा).

न. पुढील आठ मंगल वस्तूंचा समुदाय – ब्राह्मण, अग्नी, गाय, सुवर्ण, घृत, सूर्य, जल व राजा. काहींच्या मते सिंह, वृषभ, गज, पूर्णोदककुंभ, व्यजन, निशाण, वाद्ये व दीप. (राज्याभिषेकाच्या समयी या अष्ट मंगलकारक वस्तू लागतात.) [सं.]

**अष्टमंगलघृत** न. वेखंड, कोष्ट, ब्राह्मी, मोहऱ्या, उपळसरी, सेंधेलोण, पिंपळी व तूप या औषधांच्या मिश्रणाने विधियुक्त बनविलेले तूप. हे बुद्धिवर्धक आहे. [सं.]

**अष्टमांगल्य** न. त्रैवर्णिकांचा एक संस्कार. पहाः **अठांगुळे** [सं.]

**अष्टमांश** पु. १. आठवा अंश; भाग. २. (वै.) ज्वर नाहीसा होण्यासाठी आठ भाग पाण्यापैकी सात भाग आटवून एक अंश उरवितात असा काढा. [सं.]

**अष्टमी** स्त्री. चांद्रमासातील प्रतिपदेपासून आठवी तिथी. या महिन्यातून दोनदा येतात – शुद्ध व वद्य. [सं.]

**अष्टवर्ग** पु. १. आठ औषधींचा समुदाय – ऋषभ, जीवक, मेद, महामेद, ऋद्धी, वृद्धी, काकोली, क्षीरकाकोली. २. मौजीबंधनात वेळी आठ मुंज्या मुलांना भोजनास बोलवितात ते कर्म. [सं.]

**अष्टवर्ग्य–वर्ग्या** पु. अष्टवर्गात जेवणारा बटू; उपनयनाच्या दिवशी, मातृभोजनाच्या वेळी आठ बटू जेवायला बोलावतात त्यातील प्रत्येक. [सं.]

**अष्टवर्षा** वि. आठ वर्षे वयाची (कुमारिका); (त्यावरून पुरातन प्रथेप्रमाणे लग्नास योग्य झालेली) उपवर. [सं.]

**अष्टविवाह** पु. विवाहाचे आठ प्रकार १. ब्राम्ह = सालंकृत कन्यादान. २. गांधर्व = उभयतांच्या अनुमतीने. ३. राक्षस = जबरदस्तीने कन्या हरण करून. ४. दैव = यज्ञप्रसंगी ऋत्विजास कन्यादान करून. ५. आर्ष = गाय, बैल घेऊन कन्यार्पण. ७. असुर = शुल्क घेऊन. ८. पैशाच – कन्या चोरून आणून पत्नी करणे. [सं.]

**अष्टसावध** वि. पुष्कळ गोष्टींकडे एकदम लक्ष पुरविणारा – देणारा; अष्टावधानी. [सं.]

**अष्टसृष्ट–ष्टी** स्त्री. काल्पनिक, शाब्दिक, प्रत्यक्षा, चित्रलेपा, स्वाप्नी (स्वप्न सृष्टी), गंधर्वा, ज्वरिका, दृष्टिबंधना अशा आठ सृष्टी. [सं.]

**अष्टक्षार** पु. पळस, निवडुंग, सज्जी, अघाडा, रुई, तीळ, जव व टाकणखार. [सं.]

**अष्टाकपाल** पु.ज्यात आठ खापरीच्या तुकड्यांवर भाजलेल्या पुरोडाशाचा हवी देतात तो याग, पुरोडाश. [सं.]

**अष्टादश** वि. अठरा. [सं.]

**अष्टादशपदे** न. गयाक्षेत्री विष्णुपदाजवळ – कश्यप, अगस्ती, क्रौंच, मतंग, कण्व, दधीच, गणेश, कार्तिकेय, ब्रह्मा, रुद्र, इंद्र, सूर्य, चंद्र व आहवनीय, दक्षिण, गार्हपत्य, सभ्य, आवसथ्य, (हे अग्नी). या अठरा पदांवर पिंडप्रदान करावे लागते. ही अठरा पदे म्हणजे खडकावर पावलाच्या आकृतीचे काळे डाग उमटलेले आहेत. ही पावले अतिसूक्ष्म दृष्टीने पाहिल्यासच दिसतात. [सं.]

**अष्टाध्यायी** स्त्री. आठ अध्याय असलेला, पाणिनी या संस्कृत वैयाकरणाचा व्याकरणावरील ग्रंथ. [सं.]

**अष्टावक्र – अष्टवक्र** वि. १. या नावाचा कहोड ऋषींचा मुलगा (गर्भात असता बापास अध्ययनातील चुकीबद्दल याने हिणविले म्हणून त्याच्या शापाने हा आठ ठिकाणी वाकडा झाला. यावरून) आठ ठिकाणी वाकडा. २. (ल.) कुरूप; विद्रूप; विलक्षण दिसणारा (माणूस, बेढब वस्तू). [सं.]

**अष्टावधानी** वि. अनेक गोष्टींकडे एकदम लक्ष पुरविणारा किंवा अवधान देणारा. पहाः **अष्टसावध** [सं. अष्ट + अवधान]

**अष्टाग्र** न. अष्टकोनाची आकृती.
वि. अष्टकोनी. [सं. अष्ट + अग्र]

**अष्टाक्षरी** स्त्री. १. एका छंदाचे नाव. काही अभंग व ओव्या अष्टाक्षरी असतात. गायत्री छंद हाही अष्टाक्षरी आहे. औट चरणी, त्रिचरणी, असे अष्टाक्षरीचे काही प्रकार आहेतः 'विरोन जो मुरेल रे । भल्यांत तो सरेल रे । विरेचिना मुरेचिना । भल्यांत तो सरेचिना ।।' – दावि ७७६. २. (मद्रासमधील) तामीळनाडूतील (सातानींची) एक जात. 'ॐ नमो नारायणाय' या अष्टाक्षरी मंत्राच्या प्रभावावर त्यांचा विश्वास असतो. [सं.]

**अष्टाक्षरी मंत्र** पु. १. आठ अक्षरे ज्यात आहेत असा मंत्रः 'ॐ नमो नारायणाय.' २. (ल.) 'कसे करू काय करू' हा आठ अक्षरांचा मंत्र; अतिशय दारिद्य, मोठे संकट किंवा अडचण प्राप्त झाली असता असे शब्द तोंडून निघतात. [सं.]

**अष्टांगनमन – पात – प्रणाम** न. पु. हात, पाय, गुडघे, वक्षःस्थल, मस्तक, दृष्टी, मन व वाणी ही आठ अंगे जमिनीवर टेकून नमस्कार करणे. अतिशय आदरार्थी नम्रतापूर्वक नमस्कार.

**अष्टांगयोग** पहा : **अष्टविध समाधीः** 'येक सांगती अष्टांगयोग । नाना चक्रें ।।' – ज्ञा ५.४.२४.

**अष्टांगलवण** न. पादेलोण, ओवा, आमसुले, आम्लवेतस ही एक एक भाग, दालचिनी, वेलदोडे व मिऱ्या ही अर्धा भाग व साखर सर्वांच्या बरोबर घालून केलेले चूर्ण. हे अग्निदीपक आहे. [सं.]

**अष्टांगशुद्धि –द्धी** स्त्री. भूमी, आसन, देह, प्राणायाम, वाक्, मन, आत्म, ब्रह्म यांची शुद्धी. [सं.]

**अष्टांगसाधन** पहाः **अष्टविध समाधी**

**अष्टीला** पु. (आयु.) गाठीचा एक विकार; कोष्ठगत ग्रंथीः 'गुल्म, अष्टीला या विकारात गाठीचे क्षरण होण्याकरिता ताम्रभस्माचा उपयोग होतो.' – आयुसिद्धभा १.३८.

**अष्टोदरशे, अष्टोदशे** वि. (पाढ्यात) १०८ संख्या.[सं. अष्टोत्तर शत]

**अष्टोप्रहर, अष्टौप्रहर** क्रिवि. रात्रंदिवस; अखंड; सतत; निरंतर (दिवसाचे आठ प्रहर यावरून). [सं.]

**अष्ठी** स्त्री. गाठ; अठळी; गठोळीः 'जैं मागुती होय गर्भइच्छा । गर्भकोश वाढे मासांमासा । तैं अष्ठी पडे शुद्धांशा । स्तनक्षीरासी ।।' – कथा ५.७.१२२. [सं. अष्ठि = बी, अठळी]

**असकट** वि. १. वारंवार. २. (ल.) बारीकः 'कणिक चाळावी असकट । पाखडूनि सांडावें कसपट । होईल परिपाक चोखट । पूर्णपुरिया सिद्धलाडू ।।' – एरुस्व १८.५०. [सं. असकृत्]

**असकर** वि. अशक्यप्रायः 'ऐसा सरिपाड धरू असकरु' – ज्ञा ११.५४१.

**असक(का)रणे** सक्रि. धिक्कारून बोलणे.

**असका** वि. एकटाः 'कृस्णु असकाचि सापडे ।' – उषा २९.
[सं. अ + सखिन् – सखा]

**असका–के** वि. १. सर्व; सगळे; एकूणएक; एकंदरः 'त्रिलोकीचें पाप असकें ।' – एभा २७.३९८. २. सर्वांतील प्रत्येक किंवा सर्व एकदमः 'तो तूं परब्रह्मचि असकें । मज दैवें दिधलासि हस्तोदकें ।' – ज्ञा १०.३२२. [सं. आसाग्र]

**असकाट** न. माजलेले रान; झुडपांची गर्दीः 'असकाट रानांत जांव नको.' – मसाप ४.४.२७९. (ग्रा.)

**असकृत** क्रिवि. वारंवार; पुनःपुन्हा; अनेकवार. [सं.]

**असक्त** वि. १. विरक्त; उदासीन. २. व्यसन, छंद नसलेला. ३. अशक्त.[सं.](वा.)**असक्ति उपनणे** – आजारी पडणेः 'नृसींही भांडारेकारासि असक्ति उपनली ।' –लीचपू १.२५.

**असगंध** पु. अश्वगंधा; आस्कंद; चारपाच फूट उंचीची. पिवळसर किंवा हिरवट फुले असणारी एक औषधी वनस्पती. [सं. अश्वगंधा]

**असगोत्र** वि. भिन्न गोत्राचा; स्वगोत्रातील,समान गोत्रातील नसलेला. [सं.]

**असट** वि.आसक्त; गुरफटलेलेः 'धरितां इच्छा दुरी पळे । पाठी सोहळे उदासा । म्हणऊनि असट मन । नका खूण सांगतो ।' – तुगा ३२९३.
[सं. आ + सक्त]

**असटभाजी** स्त्री. पिठाबरोबर शिजवलेली भाजी; गोळाभाजी.

**असडणे–आसडणे** उक्रि. १. हिसका देऊन ओढणे; हिसकणे; खेचणे (इंद्रिय, अवयव इ): 'कीं हृदयीं भावि खद्योत । असडोनि आदित्य खाली पाडूं ।' – नव २२.५०. २. सुपाने विशिष्ट प्रकारे पाखडून गदळ काढणे; कणी वगैरे काढणे; नीट करणे; स्वच्छ करणे. ३. असडा, हिसडा देऊन जोराने आपटणे; (खाली, वर) आदळणे. पहाः **हासडणे** ४. एकदम, खाडकन फटकावणे (चाबूक वगैर). ५. धुतारणे; मुंडणे; भोंदणे; लबाडीने – ठकवून, उपटून नेणे (पैसे, माल वगैरे).

६. (शाप किंवा अपशब्द यांचा) भडिमार करणे. ७. खाली पडणे. [सं. आ + सूद]

**असडा, आसडा** पु. १. एकदम-चटकन दिलेला जोराचा हिसका, हिसडा (अवयव-गात्राला); असा हिसका बसल्यामुळे होणारे दुःख (क्रि. देणे, बसणे). एकदम हिसकणे, फटकावणे, उडविणे (चाबूक, दोरी वगैरे); एकदम धरणे, पकडणे. २. पिळवटणारा कंप; तिडीक; वेणा; आचका (बुडणारा, फाशी जाणारा, गुदमरणारा किंवा मरावयास टेकलेला जसे करतो तसा). (क्रि. देणे, येणे). ३. धक्का; तडाखा. (व्यापारात, पिकासंबंधी) सोसावे लागणारे नुकसान-तोटा (क्रि. बसणे); असडणे.

**असडा-डी-डीक** वि. १. न सडलेला; न कांडलेला; उखळात न कुटलेला; स्वच्छ, पांढरा न केलेला (तांदूळ, धान्य वगैरे). २. (ल.) अशिक्षित; बेशिस्त; वळण नसलेला; असभ्य; असंस्कृत; अशिष्ट; अडाणी; गावंढळ; अज्ञानी. [अ + सडणे]

**असडी** स्त्री. १. जखमेवर बसणाऱ्या माश्यांनी केलेली विष्ठा; क्षतादिकांवर माशा बसल्यामुळे त्यात होणारी कृमींची उत्पत्ती; सडण्याची - कुजण्याची क्रिया. (क्रि. पडणे, घालणे). २. (काहींच्या मते) जखमेतील कृमी किंवा त्या उत्पन्न करणारी माशी.

**असद्ढाळ** पहा: **अशुढाळ**

**असण-णा, असणी** पु. स्त्री. असाण्याचे झाड. याच्या फांद्या मोठ्या व लांबट असून लाकूड इमारतीस उपयोगी पडते. [सं. आसन]

**असणे** अक्रि. १. वर्तणे; अस्तित्वात असणे; जिवंत असणे; जगणे. २. राहणे; वास्तव्य करणे; मुक्काम, वस्ती करणे. [सं. अस् = राहणे]

**असत्** वि. १. खरे नव्हे ते; खोटे; असत्य; मिथ्या; अवास्तव; विनाशी; ज्याला अस्तित्व नाही ते; काल्पनिक; अस्सल नव्हे असे. २. वाईट; दुष्ट; असाधू; खट्याळ. ३. अन्याय्य; अयोग्य.

न. १. जिला अस्तित्व नाही अशी गोष्ट. २. असत्य : 'तरी सच्छब्दें येणें । आटुनि असताचें नाणें । दाविजे अव्यंग वाणें ।' - ज्ञा १७.३८०.३. वाईट गोष्ट. [सं. अ + सत्]

**असत् अंक** पु. (ग.) मूलभूत बैजिक क्रियांशी विसंगत असल्याने ज्यास काल्पनिक म्हटले जाते असा अंक. धन अथवा ऋण अशा कोणत्याही संख्येचा वर्ग नेहमी धनच असतो. त्यामुळे ऋण संख्येचे वर्गमूळ अस्तित्वात असू शकत नाही. म्हणून अशा संख्येस असत् अंक म्हणतात. कोणताही असत् अंक (अ + य ब) अशा स्वरूपात मांडता येतो. ज्यात अ व ब या दोन सत् संख्या असून य, म्हणजे (-) १चे वर्गमूळ, ही असत् संख्या असते. [सं.]

**असता** वि. १. असणारा; असलेला: 'कीं असते आपुले डोळे । आपण झाकीं ।' - ज्ञा ७.७३. ज्याच्याजवळ काही अर्थ आहे असा; संपत्तिमान; गब्बर; ऐपतदार; ऐवजदार. २. समर्थ, क्षम; योग्य; लायक; उपयोगी; कामाचा.

क्रिवि. त्याअर्थी; ज्यापक्षी: 'नानानी लोभ धरला, असता (त्याअर्थी) संकट पडणार नाही.' - ऐलेसं ५१९६.

**असतिये** क्रिवि. यथाशक्ती.

**असती** स्त्री. १. साध्वी किंवा पतिव्रता नसलेली स्त्री; कुलटा; जारिणी: 'हरणार असु हरूनि वसु तदभिलषित न गणिका तसी असती ।' - मोसभा १.६१.

वि. दुष्ट; नीच; वाईट: 'ज्यांची मति सोडीना दुराग्रहा असती ।' - मोकर्ण १.२५. [सं.]

**असतेनी** क्रिवि. असूनसुद्धा.

**असतेपण** न. अस्तित्व; असलेपणा; जगणे; असणे: 'तैसें असतेपण आहाच । नाहीं होईजे हें साच ।' - ज्ञा ८.३१. [सं. अस्]

**असत्कार** पु. अनादर; अवज्ञा; अपमान; असन्मान; अवहेलना.

**असत्काळ** पु. अनिष्ट, दुष्ट अन्यायाचा काळ; दुर्गुणी पुरुषांची प्रतिष्ठा व सद्गुणी पुरुषांची दैन्यावस्था असा विपरीत काळ; दशा. भ्रष्टाचार, मचमच, दैन्यावस्था यांचे प्राबल्य माजल्यामुळे दुःख करताना हा शब्द योजितात. (कों.)[सं. असत् + काल]

**असत्य** वि. खरे नव्हे ते; मिथ्या; खोटे; अवास्तविक; अवास्तव; काल्पनिक; अनिश्चित.

न. खोटेपणा; खोटी गोष्ट.

**असत्यता** स्त्री. १. मिथ्यत्व; असत्य. २. भ्रामकता. [सं.]

**असत्यशोधक** असत्य शोधून काढणारा.

**असत्यज्ञान** न. जो पदार्थ जसा नसेल तसा तो आहे असे भासणे यास असत्यज्ञान असे म्हणतात. [सं.]

**असद्भाव** पु. दुष्ट वृत्ती; वाईट भाव; दुष्प्रवृत्ती. [सं.]

**असद्वाद** पु. १. प्रस्थापित सत्ता व संस्था यांचा संपूर्ण अस्वीकार करणारे मत. २. सर्व मूल्ये, जीवनावरील श्रद्धा व संवादाची शक्यता पद्धतशीरपणे नाकारणारा संशयवादाचा एक प्रकार. [सं.]

**असन्मति-ती** स्त्री. मिथ्या मानणे; खोटा ग्रह.

वि. दुष्टविचाराचा, कुबुद्धि.

**असपक्ष** वि. (तर्क.) जेथे साध्य नाही असे निश्चयाने म्हणता येते त्याला विपक्ष (असपक्ष) म्हणतात. [सं.]

**असबस्ट, असबस्टास** पु. तंतुमय खनिज द्रव्य; यावर विस्तवाचा परिणाम होत नसल्याकारणाने बॉयलर व वाफ नेणाऱ्या नळ्यांभोवती हे लावतात. तसेच जेथे आगीचे भय त्याठिकाणीही वापरतात. [इं. ॲस्बेस्टॉस]

**असबाब** स्त्री. १. चीजवस्तू; मालमत्ता; सामानसुमान; साधनसामग्री; साहित्य; वस्तू. २. युद्धसामग्री; युद्धोपयोगी सामान. पहा : **अजबाब** [फा.]

**असबाबी** पु. घोड्याच्या गुडघ्यावर फोड येऊन जो रोग होतो तो. - अश्वप २.२२८.

**असभ्य** वि. १ (मूळ अर्थ) सभेत बसण्यासवरण्यास अयोग्य, अयुक्त. २. (ल.) शिष्टाचाराविरुद्ध; अशिष्ट; वाईट, भलत्या रीतीचा, वर्तनाचा; जंगली; क्षुद्र; अडाणी; गावंढळ; हलकट; ग्राम्य. ३. सभेत न शोभेल असे (वागणे, बोलणे इ.). [सं.]

**असभ्यपणा** पु. चांगल्या माणसाला न शोभणारे वागणे; शिष्टसंमत नसलेले वर्तन; शिष्टाचाराला सोडून वागणे; गावंढळपणा; रानटीपणा.

**असम** पु. (साहित्य) एक अलंकार. जेथे उपमाच नाही असे वर्णन असते तेथे हा अलंकार होतो. उदा. 'वन्यगुणें काय घडे मारुतिसीं इतर वानरा जन्य ।' – मोभीष्म १.६५.
वि. सदृश, सारखा नाही असा; विषम. [सं.]

**असमगट गुणन** वि. (वन.) दोन वेगळ्या जातींच्या संकरातून निर्माण होणारा, रंगसूत्रांचे २ गट असणारा (जीव.). [सं.]

**असमज** पु. समजुतींचा अभाव; अज्ञान; गैरसमज.
वि. समजूत नसणारा; समजूत न पडणारा.

**असमजूत** स्त्री. गैरसमजूत; विपरीत ग्रह; मतभेद; बेबनाव.

**असमजुती – त्या** वि. विनवणी करून किंवा स्पष्टीकरणाने समजूत पटत नाही असा; समजूत होण्याला अशक्य; मनधरणी करण्यास, मन वळविण्यास अशक्य – कठीण; शांत करण्याला कठीण; हेकट.

**असमता** स्त्री. (समाज.) विजोडपणा; सारखेपणा नसणे. [सं.]

**असमतोल** पु. (अर्थ.) अर्थव्यवस्थेचा बिघडलेला तोल. [सं.]

**असमन्वय** पु. सुसंगतीचा, सुसंवादाचा अभाव; समतोलपणाचा, समन्वयाचा अभाव. [सं.]

**असमन्वित** वि. दर्जा, क्रम किंवा महत्त्व यात सारखेपणा नसलेला; समन्वय साधलेला नाही असा. [सं.]

**असमपेशिता** स्त्री. (वै.) पेशींचा आकार बदलणे. विशेषतः असाध्य पांडुरोगामध्ये लाल रक्तपेशींचा आकार बदलणे. [सं.]

**असमबीजुक** वि. (वन.) नर व स्त्री गंतुकधारी निर्माण करणारी; दोन (लघु व गुरू) प्रकारची बीजुके प्रसवणारी (वनस्पती). [सं.]

**असममित** वि. (भूशा.) प्रमाणबद्ध किंवा समप्रमाणात नसलेली; दोन्ही बाजूंचा कल सारखा नसलेली (वली).

**असमर्थ** वि. १. सामर्थ्यहीन; अशक्त; दुर्बळ; अक्षम; नामर्द; नालायक. २. एखादी गोष्ट करायला ज्याच्याजवळ योग्य साधन नाही असा. [सं.]

**असमर्थता** स्त्री. एखादे काम करण्याची शक्ती, कुवत नसणे. [सं.]

**असमर्थनीय** वि. न्यायाच्या किंवा तर्काच्या दृष्टीने जे बरोबर आहे असे पटवून देता येत नाही, ज्याचे समर्थन करता येत नाही असा. [सं.]

**असमर्पक** वि. न पटणारा; अयोग्य; असंयुक्तिक. [सं.]

**असमवली** वि. (भूशा.) आकारात व वक्रीभवनात सदृश नसलेली घडी (खडकांची, पर्वतांची). [सं.]

**असमवाय** वि. आवश्यक किंवा नित्य नव्हे असे कारण; कार्याशी निकट संबद्ध नव्हे असे कारण. [सं.]

**असमवायी** वि. एकसमयावच्छेदे करून नसणारा; संबद्ध नसणारा; अंगभूत नसणारा; आकस्मिक; नैमित्तिक; प्रासंगिक; यदृच्छाभूत. [सं.]

**असमवायी कारण** न. (न्याय.) नित्य संबंध नसलेले कारण. उदा. तंतुयोग हे पटाचे कारण. [सं.]

**असमसहास, असमसाहस, असमसास** वि. १. फार, अमर्याद साहसी; ज्याच्या साहसकृत्यास तुलना नाही असा. २. असंख्य; पुष्कळ; अतिशय; अपार; अमर्याद : 'मग तया ब्रह्मगोळकांचे अंशांश । प्रसवती आदि संकल्प असमसहास ।।' – ज्ञा ८.२४. ३. अनिवार. [सं. अ + सम + साहस]

**असमंजस** न.१ असादृश्य; असाम्य; अननुरूपता; फरक.
वि. १. असदृश्य; असमान; असम. २. मठ्ठ; मूर्ख; हेकट; ज्याला ग्रहणशक्ती नाही असा. ३. काळ-वेळ न समजणारा. [सं.]

**असमा** स्त्री. (ग.) दोन राशींची मूल्ये समान नाहीत असे दर्शविणारे गणिती चिन्हांच्या भाषेत लिहिलेले विधान. क्ष>य, अ ब.[सं.]

**असमाई** वि. १. न मावणारी; मनात न राहणारीः 'आपुलिया मना बरवी । असमाई गोठी जीवीं ।' – ज्ञा ६.११८. २. असह्यः 'मायबाप निमाल्यावरी । घातलें भावाचे आभारीं । तोहि परि हरि । तुज जाला असमाई ।' – तुगा ४०९०.

**असमाजीकृत जीव** पु. समाजाशी जुळते घेण्याची सवय ज्याला नाही असा प्राणी.

**असमाधान** न. १. नाखुषी; असंतोष; अशांतता; अस्वास्थ्य; मनस्ताप. २. दुखणे; आजारः 'विप्र पडला असमाधानीं । देववशें करूनि । पंचत्व पावला परियेसा ।' – गुच ८.२६. [सं.]

**असमान** वि. असदृश; विषम; अधिकउणा; एका पातळीत नसलेला; भिन्नः 'की जगजुग पडिलें असमानु । एके वेळें ।' – शिव ६३.[सं.]

**असमानगत–ती** स्त्री. १. नागमोडी, वाकडी गती, वळण, मार्ग, ओघ. २. अनियमित; अव्यवस्थित; विषम प्रगती; सुधारणा.

**असमानदेश** पु. १. चढउताराची, उंच-सखल जमीन. २. अनेक भेद, प्रकार असलेला प्रदेश. [सं.]

**असमायोजित** वि. तडजोड न केलेला; मेळ न घातलेला (हिशेब). [सं.]

**असमास** वि. १. मर्यादित, संकुचित नसलेला; पसरलेला; फैलावलेला. २. अमर्याद; असंख्यात. पहाः **असमसहास**
[सं. अ + समास = जूट, संकोच]

**असमांतरभुज चौकोन** पु. ज्या चौकोनाच्या कोणत्याही दोन बाजू परस्परांशी समांतर नसतात असा चौकोन. [सं.]

**असर** पु. १. अंत; शेवटः 'कृष्णरावजी यांचे प्राणानें असर केला असें वाटलें.' –मइसा ५.८३. २. परिणाम; ठसा; प्रभाव; कार्यः 'असरकारक भाषण' – मौज २.६.३०. ३. (व्यापक) छटा; अंश; चिन्ह; खूण; वास; लज्जत; लकेर. [फा. असर् = चिन्ह, परिणाम]

**असल** वि. १. मूळचे; अवल; आद्यकालिक; पहिले. २. मुख्य; प्रथम; उत्कृष्ट; श्रेष्ठ; पहिल्या प्रतीचा. ३. नकली नव्हे तो; खरा; अकृत्रिम. ४. थोर; कुलीन; उच्च घराण्यातील, वंशातील, जातीतील. ५. मुळाबरहुकूम, हुबेहुब (चित्र, तसबीर, खेळ). ६. औरस; धर्मपत्नीपासून झालेला. [फा. अस्ल]

**असल अर्जी** स्त्री. (कायदा.) मूळ तक्रार; दाखल फिर्याद.
[फा. अवल + अर्जी]

**असल(ळ)का** स्त्री. आश्लेषा नक्षत्र. (ग्रा.)

**असलग** वि. १. संलग्न; जवळचाः 'असलगु ऐसा आवडे । सिओसिओ न ए कव्हणीं कडें ।' – शिव ६८४. २. सोपे; सुगमः 'एकें घूर्णितें

सावधें । असलगे एकें अगाधें ।' - ज्ञा- ११.१२६.

**असलगपण** न. सुगमपणा; सुलभताः 'कैसा झकविलों असलगपणें अक्षरांचेनि ।' - ज्ञा ७.१९४. [सं. आ + संलग्न]

**असल(ळ)णे** अक्रि. उसळणेः 'कीं गंगापय असललें ।' - ज्ञा १३.२६९.

**असलनसल** वि. मूळ वंशाचा; औरस. (प्रजा.)[फा. अस्ल् + नस्ल्]

**असलफूल** न. १. शुद्ध ऊदफूल. २. शुद्ध अर्क.

**असलबाब** स्त्री. १.पहिला करपट्टा; मूळची बाब, कलम. २. किल्ल्याच्या बंदोबस्ताकरिता ठेवलेल्या सैन्यास कमी दराने पदार्थ पुरवण्याची सरकारी रयतेवर असलेली सक्ती. [फा. अस्ल + बाब]

**असलंग** क्रिवि. जवळ; संगतीतः 'अशाच्या बसू नये असलंगी ।' - राला ४४. [सं. आ+ संलग्न]

**असला** वि. अशा प्रकारचा. [सं. ईदृश]

**असलाई** स्त्री. १. अस्सलपणा; खरेपणा; उत्कृष्टपणा. २. मोठेपणा, सभ्यता; कुलीनपणा; घराण्याचा उच्चपणाः 'प्राणहि वेंचुनि करणीं करील तो असलाई ।' - राला ११. [फा. अस्ल]

**असली** वि. शुद्ध; अस्सल; खरा; सच्चा; मूळ.[फा. अस्ली]

**असवर - र्य** वि. न सावरणारे; अमर्यादः 'तेथ असवरे आनंदें ।' - ज्ञा १८.१६२१. [सं. अ + सं + वृ]

**असवर्ण** वि.भिन्नवर्णाचा; भिन्न जातीचा,रूपाचा; विजातीय. [सं.]

**असवाऱ्या** स्त्री. अव. स्वाऱ्याः 'असवाऱ्या सरकारच्या गेल्या नसतील.' - ऐसंसा १४.२४.

**असविणे** क्रि. १. नवीन मृत्तिकापात्र, मडके राबवणे, रापवणे (तापवून व दुधाने भरून). २. (ल.) कौमार्यभंग करणे; एखाद्या कुमारिकेशी संभोग करणे. ३. (सामान्यतः) एखाद्या स्त्रीशी बेकायदेशीर समागम, संग करणे; जारकर्म, व्यभिचार करणे.

**असविणे** उक्रि. रिंगणामध्ये भोवरा टाकणे, मारणे.

**असहकार** प. १. सहकाराचा अभाव; तुटकपणा; अलगपणा; बरोबर काम न करणे; मदत न करणे. २. प्रस्थापित सरकारच्या कोणत्याही कार्यात सहभागी न होणेः ' असहकार - युगात प्रांतोप्रांती आश्रम, विद्यालये नि विद्यापीठे स्थापन झाली.' - भाप्र ४४०. ३. एखाद्या गोष्टीचा निषेध म्हणून सरकारी कर भरण्यास, कायद्याचे पालन करण्यास नकार देणे. [सं.]

**असहकारिता** स्त्री. एकत्र किंवा परस्पर सहकार्याने काम करण्याचे नाकारणे; बलिष्ठ सरकारशी दुर्बल व निःशस्त्र प्रजेने जुलमाने गांजून गेल्यामुळे कोणत्याही प्रकारची सहकारिता न करण्याचा उपक्रम.

**असहमत-ती** स्त्री. मत न जुळणे; एकमत न होणे. [सं.]

**असहानु** वि. सहन करण्यास कठीणः 'असहानु जगीं जगदळां चौहातु मल्लु ।' - शिव ५१२.

**असहाय** वि.१. एकटा; जोडीदार नसलेला; मित्र, मदतनीस, अनुयायी नसलेला. २. अनाथ; निराश्रित. [सं.]

**असहिष्णुता** स्त्री. सहनशीलता नसणे; सोशिकपणा नसणे; असहनशीलता; अनादर; चीड. [सं.]

**असहिष्णू** वि. आपल्याहून वेगळ्या प्रकारचे इतरांचे वागणे ज्याला सहन होत नाही असा. परमताबद्दल सहिष्णुता, सोशिकपणा नाही असा.

**असह्य** वि.१. सहन करण्यास कठीण; अशक्य; दुःसह. २. वैर; वैषम्यः 'सर्वांस तुमचे असह्य धणीयाची व कार्यभागी यांची ममता तुमचे ठायीं, हें सर्वास असह्य.' - ऐलेसं ९००. [सं.]

**असह्यकारिता** स्त्री. सहन न करणे; प्रत्यक्ष प्रतिबंधः 'वरिष्ठांचा असहकारितेचा उपदेश कनिष्ठांना असह्यकारितेला म्हणजे प्रत्यक्ष अडथळा करण्याला सहजच प्रवृत्त करील.' - के २१.३.३९.[सं.]

**असळका-खा** पु. आलिंगन; मिठी; कवटाळणे. [सं. आश्लेषचा अप.]

**असळग** वि. सुगमः 'अग्नि नव्हे असळगु ।' - उगी ४४.

**असंकीर्ण** वि. ज्यात हिणकसपणा किंवा भेसळ नाही असा. [सं.]

**असंक्रमणीय** वि. दुसऱ्याच्या नावावर करून न देता येण्याजोगा. [सं.]

**असंक्रामक** वि. (वै.) संसर्गजन्य नसलेला (रोग). [सं.]

**असंक्रामी** वि. (वै.) संसर्ग न करणारा (रोग). [सं.]

**असंक्राम्य भोगवटा** पु. जो भोगवटा विशिष्ट व्यक्तीकडेच असतो व दुसऱ्याकडे जात नाही तो.

**असंख्य, असंख्याक -त, असंख्येय** वि. १. अगणित, अगण्यः 'आतां शब्दब्रम्हीं असंख्याकें ।' - ज्ञा १०३०. २. न मोजलेला; न गणलेला. [सं.]

**असंग** पु. १. संगतीचा अभाव. २. छंद, व्यसन, आवड नसणे. वि. १. सर्व संग परित्याग केलेला; संन्यासी; विरक्त; कशाचीही आसक्ती नसलेला. २. एकटा; एकलकोंडा; कोणाची जोड नसलेला; संगतीला कोणी नसलेलाः 'अक्रियु मी एकु असंगु मी अशोकु ।' - ज्ञा १८.११९२. ३. संगती न करण्याजोगा; संगतीस अयोग्य.[सं.]

**असंगत** वि. १. असंबद्ध; विसंगत; संदर्भ जुळत नाही असा (भाषण, विचार); परस्परांशी मेळ नसलेला. २. अयुक्त; अयोग्य; विपरीत (वर्तणूक, वर्तन).

**असंगत चुंबकन** न.(भौ.) एखादा पदार्थ चुंबकशक्तीने युक्त करताना एकाच वेळी मुख्य ध्रुवांच्या बरोबरीने दुसरे दोन ध्रुव त्यामध्ये अस्तित्वात येतात. हे चुंबकत्वाच्या नियमाच्या विरुद्ध होय.

**असंगतता** स्त्री. विजोडपणा; विपरीतता. [सं.]

**असंगत-ती** स्त्री. विसंगती; असंबद्धता; अयोग्यता (भाषण, विचार यांची); (साहित्य) एक अलंकार. कारण आणि कार्य ही दोन्ही एकाचवेळी भिन्नभिन्न ठिकाणी आहेत असे जेव्हा कवी उदाहरणाने दाखवून देतो तेव्हा असंगती हा अलंकार होतो.

**असंघटित** वि. संघटित, एकत्रित नसलेला; सुसंघटित, बांधीव नसलेला. [सं.]

**असंघड** वि. अयुक्त; अशक्य; विचित्र; चमत्कारिकः 'प्रकृति पुरुषांची कुलवाडी । सांघतां देखें असंघडी ।' - राज्ञा १३.९७२. [सं. अ + सम् + घट्]

**असंघडणे** क्रि. अयोग्य असणेः 'जें विचारताचि असंघडें ।' - ज्ञा ४.१७६.

**असंचयी अधिमान भाग** पु. (व्यापार.) ज्या भागावर (शेअरवर) अग्रहक्काने मिळणारा लाभांश कंपनीला तोटा होत असताना साठत

जात नाही असा भाग (शेअर).

**असंचळ** न. स्वैरबुद्धी. (गो) [सं. अ + सं + चल्]

**असंजाळ** पु. खोटा, मिथ्या आरोप – आळ.(कों.) [सं. असत् + जाल]

**असंत** वि.चंचल; असंथ; अस्थिरः 'जैसें वाहतें पाणी जाय वेगें। तैसेचि आणिक मिळे मागें। तेवीं असंतचि असिजे जगें। मानिजे संत।' – ज्ञा १५.१३३.

**असंत** वि.– १. अस्तित्वात नसलेला; अविद्यमान; नसलेला; अशाश्वत; खोटा. पहाः **असतः** 'म्हणोनि हें असंतचि सरें।' – परमा १०.२४. २. लबाड; नास्तिक; संत नव्हे तो. [सं.]

**असंतत फल** न. (न.) ज्या फलाचा आलेख अखंड नसतो असे फल. [सं.]

**असंतपण, असंतता** न. स्त्री. १. नास्तिकपणा; असाधुवृत्तीः 'ज्याचे नि वाक्यें असंतता। निःशेष मावळे तत्त्वता। त्यासीचि गा सद्गुरुता। वेदशास्त्रार्थी प्रतिपाद्य ।।' – एभा ३.२८७. २. असत्कर्म; मिथ्यात्व; खोटेपणा.

**असंतुलन** न. बरोबरी नसणे; समतोल नसणे. [सं.]

**असंतुलित** वि. संतुलन, समतोल नसलेला. [सं.]

**असंतुलित परिपथ** पु. (विअ.) समतोल नसलेले, संतुलन बिघडलेले विद्युतकुंडल (सर्किट).

**असंतुष्ट** वि. १. नाखूष; असमाधानी; अतृप्त. २. गैरमर्जी झालेला; रुष्ट. [सं.]

**असंतृप्त** वि. १. पूर्ण न भरलेले; पूर्ण न मुरलेले. २. तृप्त न झालेले.

**असंतोष** पु. १. नाखुषी; इतराजी; खेद. २. असमाधान; अतृप्तता. ३. (राजकीय) प्रजेच्या मनाची अस्वस्थता; अशांतता; चलबिचल, खळबळ होण्याची स्थितीः 'असंतोष हा सर्व भावी उत्कर्षाचे, प्रयत्नांचे, ऐश्वर्याचे व मोक्षाचे बीज आहे. हा जर आपण सर्वांनी नष्ट केला तर या जगात व परलोकांत देखील आपली धडगत लागणार नाही.' – टिसू १२. [सं.]

**असंतोषी** वि. नाखूष; अतृप्त; असमाधानी; समाधान पावण्याला कठीण; हावरा; लोभी. [सं.]

**असंदिग्ध** वि. संदिग्ध नसलेला; निःसंशय; निभ्रांत; निःशंक; निर्विवाद; सुस्पष्ट. [सं.]

**असंपन्न** वि. निर्धन; दरिद्री; कंगाल; गरीब. [सं.]

**असंपाती** वि. एकाच वेळी चालू नसलेले; समरूप नसलेले.

**असंपाती रेषा** स्त्री. जी वाढविली असता दुसऱ्या वक्ररेषेजवळ जाते पण अनंततेपर्यंत प्रत्यक्ष स्पर्श करीत नाही अशी रेषा. [सं.]

**असंपीड्यता** स्त्री. न दबणे; खाली न जाणे; दबले, चिणले न जाण्याची स्थिती. [सं.]

**असंपीड्य द्रायू** पु. (भौ.) न दाबला जाणारा, दाबाखाली न राहणारा द्रवपदार्थ. [सं.]

**असंपृक्त** वि. (रसा.) समरस, एकजीव न झालेले; पुरे न भरलेले; कणांत कण न विरघळलेले; पूर्णपणे न मुरलेले. [सं.]

**असंपृक्त द्रावण** न. (भौ.) संपृक्त नसलेले द्रावण; न विरघळलेले द्रावण.विरघळणारा पदार्थ द्रव पदार्थ जितका शोषून घेतो त्या क्षमतेपर्यंत द्रवपदार्थात विरघळणारा पदार्थ शोषला न जाणे. [सं.]

**असंप्रज्ञ** वि. निर्विकल्प. [सं.]

**असंप्रज्ञात समाधी** स्त्री. ज्या समाधीत सर्व वृत्तींचा लय होऊन आत्मा केवळ आपल्या स्वरूपाच्या ठिकाणी लीन असतो ती; निर्विकल्प समाधी. [सं.]

**असंबद्ध** वि. १. विसंगत; असंयुक्त; संबंध लक्षात न घेतलेले (भाषण, लेखन); विपरीत; बेढंगी; अनाचारी; अयोग्य; अयुक्त (कृत्य, आचरण)ः 'जरी भिन्नचि अनादि सिद्ध। तरी न येती हे असंबद्ध।' – ज्ञा १५.३२३. २. अलग; वेगळा; तुटक; निराळा; संबंध तोडलेला. ३. चमत्कारिक; असंभाव्य; असमंजसपणाचे; असमर्पक; बुद्धीला न पटणारे; अयुक्त. [सं.]

**असंबंध** पु. संबंधाचा अभाव; मेळ किंवा समन्वय यांचा अभाव.
वि. निराळा; वेगळा.

**असंभड** वि. बेसुमार; अतिशय; कल्पनातीत; फार; अमर्याद; विपुलः 'तरी तयाचि सारिखें। असंभड पाप पिके।' – ज्ञा १३.३१.

**असंभव** पु. १. संभवाचा – होण्याचा अभाव. २. (ल.) अशक्यता; असंभाव्यता; दुर्घटता; नसणेपणा; न घडलेली गोष्ट. ३. असंबद्धता; असमर्पकता; अयुक्तता; वैपरीत्य; विजोडपणा. ४. (साहित्य) एक अलंकार – अशक्य गोष्टीचे वर्णन केल्याने, अशक्य विधान केल्याने हा अलंकार होतो. याला असंभावना अलंकारही म्हणतातः ' मुंग्यानी मेरू पर्वत तर गिळला नाही ना?' ५. व्याख्येय जातीमध्ये ज्या ज्या व्यक्तींचा समावेश व्हावा अशी इच्छा असते त्यापैकी एकाचाही समावेश तिच्यामध्ये होत नाही असे जर व्याख्येवरून दिसले तर तीमध्ये असंभव हा दोष आहे असे म्हणावे. [सं.]

**असंभवदुक्तिक** वि. ज्या उक्तीचा संभवच नाही असा (अर्थ); अशक्यप्राय. [सं.]

**असंभवनीय** पहाः **असंभावनीय**

**असंभवी** वि. दरिद्रीः 'जेवी असंभवियांचें लेंकरुं : घे पयो– पानी हावरू।' – ऋ ६२.

**असंभवी – विक – वित – व्य** वि. १. विपरीत; विचित्र; विजोड. २. (ल.) संभव नसलेले, नसणारे; असंभाव्य; अशक्यः 'साहित्य भरतें अपार। असंभाव्य दाटलें।'– रावि. [सं.]

**असंभाड** (क्व.) असंभड; असंभाव्य.
वि. अनन्वित; फार; बेसुमारः 'तरी तयाचिसारिखें। असंभाड पाप पिकें।' – ऋ १३.३१. [सं. असंभाव्य]

**असंभावना** स्त्री. १. संभव किंवा मिलाफ यांचा अभाव. २. (ल.) अशक्यता; असाध्यता; असंभाव्यता; दुर्घटता. ३. (वेदान्त) जीव व ब्रह्म यांचा भेद प्रतिपादन केला आहे कीं अभेद प्रतिपादन केला आहे हा प्रमाणगत संशय; आणि जीव व ब्रह्म यांचा भेद सत्य आहे हा प्रमेयगत संशय या दोन्ही संशयांना असंभावना म्हणतातः 'असंभावना विपरीत भावना। निःशेष तुटलिया वासना। निजस्वरूपीं तेव्हां जाणा।

जागेपणा तो आला ।।' – एभा ११.४३२. [सं.]

**असंभावनीय** वि. १. असंभाव्य; असंभूत; अगदी विरुद्ध; विजोड; विपरीत. २. अशक्य; दुर्घट. [सं.]

**असंभावित** वि. १. असंबद्ध; विसंगत; न जुळणारा; संदर्भशून्य; असमर्पक. २. (ल.) असंभवनीय; अशक्य; असाध्य. ३. संभावित, सभ्य नाही असा; हलकट; नीच; बेअब्रूचा. [सं.]

**असंभाव्य** वि. १. घडण्यास, होण्यास असमर्थ (अयुक्तता, विपरीतता या कारणांनी); अक्षम; अशक्य; अघटित; असाध्यः 'हे बहु न सांगोंचि जे कथा । असंभाव्य हें ।।' – ज्ञा १८.८०९. २. अतर्क्य; अघटितः 'असंभाव्य श्रीरामचरित्र ।' – रावि १.५. ३. पुष्कळ; अतिशय; अमापः 'जें जें मनीं इच्छिलें । तेंतें हरीनें पुरविलें । सकळ राजे भृत्य जाहले । द्रव्य संचलें असंभाव्य ।' – हरि ३३.१३३.[सं.]

**असंभूत** वि. १. बुद्धीला न पटणारे, न जुळणारे; असमर्पक; अयुक्त. २. (ल.) अस्तित्व नसलेले; न घडलेले, होणारे; असंभवनीय; अशक्य किंवा असाध्य. [सं.]

**असंभूत-ती** स्त्री. अस्तित्व नसणे; नाशः 'विद्येस संभूति म्हणजे जगाचे आदिकारण आणि त्याहून भिन्न जी अविद्या तिला असंभूती किंवा विनाश अशी दुसरी नावे देऊन याच्या पुढल्या तीन मंत्रात पुनः (तोच अर्थ) वर्णिला आहे.' – गीर ३५७. [सं.]

**असंमत** वि. १. अमान्य; संमत, मान्य नसलेले. २. (ल.) नामंजूर; त्याज्य; निषिद्ध. [सं.]

**असंमितता-ति-ती** स्त्री. (ग.) विसादृश्य; भिन्नता; दोन बाजूस सारखेपणाचा अभाव. [सं.]

**असंमितिय** वि. असदृश; विषम.

**असंयम** पु. अतिरेक; अमर्यादा; निग्रहाचा अभाव. [सं.]

**असंयुक्त** वि. (शाप.) संयोग न पावलेले; वेगळे; निराळे (परमाणू). [सं.]

**असंयुक्तावस्था** स्त्री. (शाप.) स्वतंत्र, वियुक्त स्थिती. [सं.]

**असंलग्न** वि. न जोडलेले, विलग.

**असंवादी** वि. संवादी नसणारा; मिळताजुळता नसणारा; अनुरूप नसलेला. [सं.]

**असंसक्ति-क्ती** स्त्री. (वेदान्त) अनासक्ती; प्रेम, लोभ यांचा अभाव; ज्ञानी जीवाची सप्त भूमिकांतील पाचवी स्थिती.[सं.]

**असंसदीय** वि. संसदेत, विधिमंडळात किंवा इतर लोकनियुक्त संस्थेत, बोलताना किंवा वागताना पाळावयाचे संकेत मोडून केलेले (वर्तन); संसदेशी संबंधित नसलेले. [सं.]

**असंसृष्ट** वि. १. न मिसळलेला. २. निराळा; वेगळा; पृथक (इसम, मालमत्ता). [सं.]

**असंस्कृत** वि. १.गावंढळ; हीन संस्कृतीचा. २. कोणताही संस्कार (लग्न, मुंज वगैरे) न झालेला; संस्कारविरहित. [सं.]

**असंहत** वि. (रसा.) संहत नसलेले; विरल. [सं.]

**असंज्ञिसमापत्ति-त्ती** स्त्री. (तत्त्व.) ब्रह्मानंदमग्नता; तन्मयावस्था; उन्मनीअवस्था; परमानंदअवस्था; चित्ताच्या सर्व वृत्तींचा निरोध केल्यावर जी अवस्था असते ती. [सं.]

**असंज्ञेय** वि. अदखली; कार्यवाही करता येत नाही असा.

**असा** वि. असला; अशा प्रकारचा; अशासारखा; विशिष्ट; इतका.
क्रिवि. १. अशा रीतीने; ह्या प्रकारे; म्हणून. २. सारखा शब्दातील अ गाळून तो शब्दाच्या शेवटी जोडून वापरतात. उदा. भीष्म ग्रीष्म तरणिसा अर्जुन हेमंत तरणिसा गमला ।' – मोभी १०.९१. [सं. ईदृश]

**असाकिर** पु. सैन्य. [फा. अस्कर]

**असाच** वि. १. निष्कृष्ट प्रतीचा; सामान्य प्रतीचा. २. बिनलग्नाचा; आहे तसाच; जसाच्या तसा (उदा. ठोंब्या इत्यादी): 'त्याला तुम्ही असाच किती दिवस ठेवणार?'
क्रिवि. माघाऱ्या पावली; इतक्यात.

**असाजे, ऐसाजे** क्रिवि. (पत्रादिकांच्या आरंभी) पुढे दिल्याप्रमाणे; येणेप्रमाणे.

**असाडी, अंसाडी** स्त्री. १. पहाः **असडी-अंसडी** २. (गुप्तपणे) वाईट, अपकृत्य विषयक; दुष्कृत्यासंबंधी घातलेले वजन, भीड; अनुचित वजन; अनिष्ट पगडा. ३. दृष्ट लागणे.

**असाणा** पहाः **असणा**

**असातसा** वि. कोणीतरी; साधारण; हलका; सामान्य प्रतीचा; क्षुल्लक; कमी प्रतीचा, दर्जाचा; नालायक. पहाः **असाच**
क्रिवि. कोणत्या तरी उपायाने, रीतीने, युक्तिप्रयुक्तीने; अडपझडप. [सं. ईदृश +तादृश]

**असात्म्य** न. (आयु.) एकरूप न होणे; सवय नसणे. [सं.]

**असाधारण** वि. १. सामान्य; साधारण नव्हे असा; एकाकी; विशिष्ट; विवक्षित प्रकारचा; विशेष; अगदी निराळा. २. विलक्षण; असामान्य; लोकोत्तरः 'आणीक ही असाधारण । जे शस्त्रास्त्रीं प्रवीण । ' – ज्ञा १.९६. ३. सन्माननीय; मान्यता असलेला; विख्यात; पूज्य. ४. सुलभ नव्हे असे; कठीणः 'सांगितले तुम्ही आधार दोनी । कष्ट बहु विधवापणीं । अशक्य आम्हां न ठाके स्वामी । असाधारण असे दातारा ।' – गुच ३२.६८. [सं.]

**असाधारण सभा** स्त्री. जरुरीच्या कामाकरिता बोलवलेली तातडीची सभा; सर्वसाधारण सभेहून वेगळी सभा. [सं.]

**असाधु-धू** वि. वाईट; साधू नव्हे तो; दुष्ट; अधमः 'पै असाधुकर्मा तैसा ।' – ज्ञा १७.३९९. [सं. अ + साधु]

**असाध्य, असाधनीय** वि. १. साधण्याला, साध्य करून घेण्याला कठीण; संपादण्यास, प्राप्त होण्यास अशक्यः 'असाध्य ते साध्य करिता सायास । कारण अभ्यास तुका म्हणे ।' – तुगा. २. बरा न होण्यासारखा; न सुधारण्यासारखा; उपाय लागू न पडणारा (रोग). [सं.]

**असाध्वस** वि. निर्भय. [सं.]

**असान** न. अवसान; धैर्यः 'भणओनि असानेयां होइजे । पुढा भाटुं धाडिजे ।' – शिव ४७४. [अवसान चा अप.]

**असामदार, असामीदार** पु. सरकारातून नेमणूक, असामी असलेला; वेतन घेणारा (सरदार, इनामदार, कामदार इत्यादी): 'असामदाराचें घोडें परिच्छिन्न लहान जमेस धरूं नये.' – ऐलेसं ११.५७०७.[फा.]

**असामधणी** वि. थोर, मातबरः 'निम्मेच्या अजमासास राहतां राहतां लोक कमी राहिले. परंतु असामधणी फार करून राहिले आहेत.' - ऐलेसं १८६८. [फा. इरूस्म]

**असामर्थ्य** न. (संवि.) असमर्थता; अक्षमता.

**असामाजिक** वि. लोकांत न मिसळणारा; लोकांचा, समाजाचा संपर्क टाळणारा; समाजविषयक नसलेला, समाजेतर. [सं.]

**असामाजीकृत** वि. सामाजीकरण झालेले नाही असा.

**असामान्य** वि. सर्वसामान्यांपेक्षा गुणांनी अतिशय वरच्या दर्जाचा.[सं.]

**असामी** पु. १. इसम; व्यक्ती; माणूसः 'तुकोजी शिंदे यांनी मौजे मुत्खेंडे येथें बटकी देखील पोरें असामी तीन येकूण रुपये दीडशांस विकत घेतली.' - वाबारो २.१९१. २. देणेकरी; कर्जदार; ऋणको; भाडेकरी; प्रतिवादी. ३. धारेकरी; कूळ; खंडकरी. ४. हजेरीपटावर असलेले नाव; नोंद; सभासद. ५. वाटेकरी; रयत.

**असामी** पु. १. सरकारी नोकरी; चाकरी; नेमणूक; उपजीविकेचे साधनः 'राबर्ट आर्म हा ईस्ट इंडिया कंपनीच्या पदरी कारकुनाची एक लहान असामी पत्करून ... हिंदुस्थानात आला.' - निमा ६१२. २. मोठा, मातबर माणूस; स्वारीः 'दक्षिणेत केवळ असामी नाहीं दुसरा ।' - ऐपो २३६. [फा. इस्म = नावचे अव.]

**असामीवार** क्रिवि. १. नेमणुकीप्रमाणे; हुद्द्याप्रमाणेः 'वरकड पाच इसम यांस असामीवार शिरपेंच, पानदान देऊन वाटेस लाविलें.' - मइसा ५.१४१. २. प्रत्येकी; वेगवेगळे; मनुष्यागणिक; नावनिशीवार. ३. कुळाप्रमाणे; रयतवार. [फा.]

**असामीवार पत्रक** न. नावांची यादी.

**असायलम** न. १. धर्मशाळा; अनाथगृह; आश्रयस्थान. २. अनाथ मंडळीकरिता दवाखाना आणि राहावयाचे ठिकाणः 'तिला आता असायलममध्ये ठेवून ट्रीटमेंट देणं आवश्यक आहे.' - अगतिका १०८. [इं.]

**असार** वि. १. निःसत्त्व; सारहीन; शुष्क. २. खोटे; मिथ्या; निकामी; पोकळः 'असार म्हणिजे नाशिवंत । सार म्हणिजे ते शाश्वत ।' - दास १४.९.५. [सं.]

**असार** न. १. (सामान्यतः) अंतर; दोन वस्तूंमधील क्षेत्र. २. (गवंडी काम) भिंतीची रुंदी. ३. दार किंवा खिडकी यांच्या दोन बाजूंमधील अंतर; चौकटीचे क्षेत्रफळ. [फा. अर्सा]

**असार** परिणाम; अंश. पहाः **असर**

**असार** (वस्त्रोद्योग) पहाः **असारा–री** [सं.]

**असारणे** उक्रि. पसरणेः 'का समुद्राचेनि पैसारें । वरी तरंगता असारे ।' - ज्ञा १५.१०७. [सं. आ + सृः]

**असारा** पु. (वस्त्रोद्योग) मैदानात पाजण करण्याकरिता पसरलेला सुताचा ताणा. [सं. आ + सृ]

**असारा – री** पु. स्त्री. (वस्त्रोद्योग) १. परता किंवा फाळका यावरून सूत उकलून ज्या कामटीच्या केलेल्या हंडीच्या आकाराच्या चक्रावर घेतात तो. यावर सुमारे एक धोक सूत उकलतात; सूत गुंडाळण्याचे चाक; त्यावर गुंडाळलेले सूत किंवा रेशीम; वळीव रेशीम.

**असारा, असारी परती** स्त्री. पतंगाचा मांजा गुंडाळतात ते चाक.

**असाल** पु. मध. [अर.असल]

**असालतन** वि. सुलतानी; शाही; पादशाही; सुलतानाच्या हातचेः 'मागून असालतन फर्मान पाठवितो म्हणून पातशहानी बहुत कृपायुक्त लिहिले.' - पेद २५.१२७. [फा. सुलतान]

**असावणे** क्रि. अश्रुयुक्त होणे. [सं. अश्रू]

**असावध** वि. १. बेसावध; लक्ष नसलेला; गाफील; अनवधानी; दुर्लक्ष असणारा. २. गफलत्या; चुका करणारा. [सं. असावधान]

**असावरी (ली) काठ** पु. १. शेला वगैरे वस्त्रांत विणलेला काठ; एका वनस्पतीच्या पानासारखी नक्षी असलेला काठ. पहाः **अस्वलीकाठ**

**असासह** पु. पाया. [फा. असास]

**असासा, असासाउसासा** पु. उसासा, धापा टाकणे; नाकातोंडातून उच्छ्वास जोराने सोडणे; सुस्कारा; मोठा दुःखाचा निःश्वास. (क्रि. टाकणे, देणे, सोडणे). [सं. अस् = श्वास घेणे]

**असासित** क्रिवि. एकदम; अकस्मातः 'सिंहासना वरौनि उठिला । तंवंकें असासितु निगाला ।' - शिव ९८९.

**असाहाणुपणे** क्रिवि. सहन न करता; असूयेने; मत्सरानेः 'तरि तेहीं खिळ्नी केली इअेसीं । असाहाणुपणें ।।' - शिव ८०४. [सं. असहन]

**असाह्य** वि. १. एकटा; एकाकी, मदत नसलेला. २. असह्यः 'ते प्रांतीचा मनसबा स्वार्मीचे पदरी पडला हें गोष्टीचे त्यास तो असाह्य आहे. परंतु फतेसिंग बावास मात्र समाधान आहे.' - पेद १०.१२१.[सं. असहाय]

**असाळ –ळी** स्त्री. १. राक्षसिणीचा एक प्रकार; पिशाची; हडळ. २. (ल.) कर्कशा स्त्री; अवदसा; राक्षसीण; कृत्याः 'परम विरस वाक्यें बोलते जों असाळी ।' - सारुह ४.७१. [सं. ईर्षालु]

**असाक्षक, असाक्षिक** वि. न पाहिलेला; न देखलेला; ज्यास साक्षी नाही असा; अतिथीस न देता सेवन केलेलेः 'असाक्ष भक्षिलें मिष्टान्न ।' - मकसा १४.८८. [सं.]

**असाक्ष भोजन** न. पंक्तीस कोणी नसताना केलेले भोजन.

**असांकेतिक** वि. पारंपरिक चिन्हानुसार किंवा लक्षणानुसार नसलेले.

**असांग(घ)डे** वि. निरुपम; ज्याला संगत, सोबत, बरोबरचा कोणी नाही असा; ज्याला सांगड नाही असाः 'हें किती बोलूं असांगडें ।' - ज्ञा १५.३०४. [सं. अ + सं + गम्]

**असांप्रत** वि. अकालिक; अप्रस्तुत; हाती घेतलेल्या चालू गोष्टीशी विसंगत; अप्रासंगिक; अनुचित; अयुक्त. [सं.]

**असांविधानिक** वि. (राज्य.) देशाच्या घटनेशी, संविधानाशी सुसंगत नसलेले; घटनेने अधिकृत न केलेले. [सं.]

**असांविधिक** वि. (कायदा.) देशातील कायद्यानुसार नसलेला; कायद्यान्वये न केलेला. [सं.]

**असि, असी आऊं** पुः बाजारात मांडलेल्या मालावरील करः 'इयां पाटणीं जे केणें उघटे तेहाचा असि आऊं .... मठा दीन्हला ।' - पाटण शिलालेख, शके ११२८.

**असि** स्त्री. तलवार : 'जेथ असिपत्र तरुवर ।' - ज्ञा १६.३७३.

**असिक** वि. सर्व; पूर्ण.

**असिका** स्त्री. राहण्याची, अधिष्ठानाची जागा.
वि. असणारा: 'एऱ्हवी स्वामी दुऱ्हा असिका । मीं केवि उरे ।' – ऋ ५३. [सं. अस् = असणे, राहणे]

**असिका–के** वि. संपूर्ण; सर्व; समग्र: 'जियेचेनिं स्नेहमयंके । दुःखतम निरसे असिके । तिये प्रभुशक्ति शंके । अविद्या जात ।' – ज्ञाप्र २२. [सं. आसाग्र]

**असिटेट** न. (भू.) काचेसारखा पारदर्शक प्लॅस्टिक तक्ता. [इं.]

**असित** वि. पांढरे नव्हे ते; काळे. [सं. अ + सित = पांढरे]

**असितपथ** पु. (ज्याचा मार्ग काळा असतो तो) अग्नी. [सं.]

**असितपक्ष** पु.वद्य पक्ष: 'असितपक्ष माघमासीं ।' – गुच ७.११२.[सं.]

**असिद्ध** वि. १. सिद्ध न केलेले; पुरावा नसलेले. २. अस्तित्वात नसलेले; अविद्यमान. [सं.]

**असिधारा** स्त्री. तलवारीची धार.

**असिधारा व्रत** न. १. स्त्री– पुरुषांनी मीलन प्रतिबंधार्थ उभयतांच्यामध्ये नागवी तलवार ठेवून एका शय्येवर निजणे. २. (ल.) मनोविकारांचे संयमन करणे; यावरून अत्यंत कठीण, दुर्घट व्रत – नियम. [सं.]

**असिपत्र** न. तलवारीचे पाते, धार. [सं.]

**असिपत्रतरु** पु. ज्याला तलवारीसारखी धारदार पाने आहेत असे झाड: 'जेथ असिपत्रतरुवर । खदिरांगाराचे डोंगर ।' – ज्ञा १६.३७३. [सं.]

**असिपत्रमत्स्य** पु. माशाची एक जात. [सं.]

**असिपत्रवन** न. ज्यांना तलवारीसारखी धारदार पाने आहेत अशा झाडांचे वन. पापी लोकांना तीक्ष्ण तलवारीसारख्या पानांनी या (नरक लोकांतील) अरण्यात मोठे क्लेश देण्यात येतात. [सं.]

**असिपत्रव्रत** न. ब्रह्मचर्य . पहा: **असिधाराव्रत**: 'चैत्री पौर्णिमेसीं सोडावा । वर्षपर्यंत तो रक्षावा । स्वयें असिपत्रव्रत नेम धरावा । आणि वर्जावे भोगमात्र ।।'– जै १.९३. [सं.]

**असिपद** न.(तत्त्व.) तत्त्वमसि यातील असि = आहे हे पद. तत्पद आणि त्वंपद या दोहींचे निरुपाधिक ऐक्य जेथे होते ते पद: 'असिपदीं तदात्मा अलिप्त ।' – परमा १.१७. [सं.]

**असियुद्ध** न. तलवारींची लढाई: 'त्यांत नियुद्धें, गदायुद्धें व असियुद्धेंहि वर्णिली आहेत.'– व्याज्ञा १.३८. [सं.]

**असिरणी** पहा: **अशरीरिणी**: 'असिरणि वाचा जालि ।' – पंचतंत्र ३.१९.

**असिल** न. (रसा.) पांढरा स्फटिकाकार व नत्रप्रचुर असा स्नायूचा घटक.

**असिलता, असिल्लता** स्त्री. १. तलवार २. तलवार परजणे; पट्टे फिरविणे. ३. विजेची वक्रगती लकाकी; चमक. [सं.]

**असिलेपण** न. अस्तित्व: 'नाहीं अज्ञानावांचूनि मूळ । ययाचें असिलेंपण टवाळ ।' – ज्ञा १५.१४०. [सं. अस्]

**असिवाद** पु. तलवारीचे युद्ध: 'असिवादा असिवार तो ठाई.' – ऐपो २६९.

**असिवार** पु. खड्गधारी; घोडेस्वार; राऊत: 'धरोनि घोडाचां गोटीं निवटिती असिवारा तें ।' – शिव ९६९.

**असी** वि. ऐंशी: 'असी सहस्रा राया खाल काढुनी । उफराटे टांगिले ।' – कालिका २०.१०. [सं. अशीति]

**असीग** वि. गौण.

**असीम** वि. निःसीम, अमर्याद: 'मूर्ति असे अत्युग्रा दीनजनी करिसी परि असीम दया ।' – कुअक. [सं.]

**असीर** वि. अरुंद: 'जे अखंड जिवित्वासि नेत । ते असिर द्वार खडतरु पंथु ।' – क्रिपु २.२८.१०८.

**असी(शी)र** वि. बंदीवान: 'इंग्रजाकडील हमीष्टवान असीर जाहले आहेत त्यास सोडून द्यावे.' – मइसा १०.१८२. [फा.]

**असील** स्त्री. स्वतंत्र असलेली दासी. याविरुद्ध लवंडी म्हणजे गुलाम स्त्री: 'दोन प्रहर दोन घटकांपर्यंत तीन वेळा नबाबाकडून शुके मिर्ध्ये व असीलाबरोबर आले.' – मइसा १०.३७१. [फा.]

**असील** पु. घोड्याच्या डोळ्याजवळचा भोवरा. हा डोळ्यावर असल्यास चांगला व डोळ्याखाली असल्यास वाईट. – अश्वप १०२.

**असीवसीचा** वि. अंशाचा; वंशाचा; वंशज; वारस: 'यासी आपण नौदिगर होऊ अगर आपले असीवसीचा भाउबंद नवदिगर करील तरी आपनास कुलस्वामीची व पूर्वजाची अनेगा (मनाई, शपथ) असे.'– शिचसा २.२६०.

**असु–सू** पु. प्राण; जीव; श्वासोच्छ्वास: 'असु जाता तनु विकळा, कीं जाता वत्स जेवि धेनु सती ।' – मोसभा ७.४०.

**असुआर** पु. घोडेस्वार. पहा: **असिवार**: 'तंवं पुढिलां असुआरां भिडी सरतें ।' – शिव ८७४. [सं. अश्ववार–कार]

**असुक** न. असुख: 'मुखीं देता घास पळविती तोंडें । अंगीचिया भांडे असुकाने । ' – तुगा २५९९.

**असुख** न. सुखाचा अभाव; दुःख; त्रास; अस्वस्थता; पीडा; असमाधान: 'देखोनिया असुख घे स्वकुलाधिमानें ।' – आकृ १२. [सं.]

**असुख** न.१. स्त्रियांस अवेळी विटाळ येणे; अकाली, अनियमित ऋतुप्राप्ती. (क्रि. सुटणे). २. देवीचा रोग. [सं. असृक्]

**असुखी** वि. अस्वस्थ; बैचेन; दुःखी; असमाधानी. [सं.]

**असुखोदर्क** वि. शोकपरिणामी; शोकात्मक; शोकपर्यवसायी. [सं.]

**असुजणे** अक्रि. सूज नाहीशी होणे, थांबणे, ओसरणे, बसणे, जिरणे, मावळणे. (कों.)

**असुडणे** क्रि. हिसकणे; फेकणे: 'कृष्णें तेव्हां काय केलें । गोपीचें वस्त्र वेगें असुडलें । तत्काळ धरेवरि पडिलें । उघडें जाहलें सर्वांग ।' – हरि १३२. [सं. आ + सूद]

**असुढाळ** वि. १. रडवा; रड्या. २. चिपड्या किंवा पिचक्या डोळ्याचा.

**असुणी** न. अश्रू: 'नितंबातें कुंभस्थळ निरखितां मत्तकरिचे । महालज्जेनें ते श्रवति असुणी साचपरिचे ।' – निमा ३.६९.[सं. असुचे अव.]

**असुद–ध,असूद–ध** न. रक्त : 'वाहाती असुधाचिया सरिता ।'– उषा : ८.३२. [सं. अशुद्ध]

**असुदगी** स्त्री. १. शांतता; भरभराट: 'तिनी सर्काराची नजर रयतीचे व मुल्काचे व शहरचे असुदगीवर सादर आहे.' – पेअ ६२. २. विश्रांती; सवड: 'आमची चाकरी करावयाची उमेद किती राहिली ती तुम्हांस ठाऊकच आहे, ज्यांनी मेहनत करून आम्हांस असुदगी करावी ते घरीच राहू लागले ।' – ऐलेसं १५९३. [फा. आसूदगी]

**असुदा–य** वि. १. आनंदी; उल्हासी; हुशार; विशेषतः पुष्कळ दिवस तबेल्यात बांधून ठेवलेला (घोडा). २. ताजातवाना (काम केल्यानंतर, श्रमल्यानंतर); दमदार; चिवट; जोरदार; जो लवकर दमत नाही असा; चपळ; उत्साही; थकवा न येणारा; ताकदवान. ३. (व्यापक.) रिकामा; मोकळा; स्वतंत्र; निर्वेध; न गुंतलेला; न अडकलेला (कामात, कामधंद्यात); सुटा; मागे (संसार, बायकोपोरे यांचा) पाश नसलेला; लोढणे नसलेला; कोणी राहत नाही, वापरत नाही अशी (जागा, भांडी इ.): 'तुम्ही अटक पावेतों मुलूक काबीज केला; आतां मोहिमेस राज्य असुदें कोणतें?' – भाव ३७. ४. अननुभवी; ज्याला पहिले, पूर्वीचे माहीत नाही असा; ज्याने पूर्वी काही केलेले नाही असा. ५. पहाः **अनसूट** अर्थ ४ व ५. ६. आयते, तयार.(गो.) ७. मनसोक्त; स्वैर. [फा. आसूदा]

**असुदा, असुधा** वि. क्रिवि. विश्रांती मिळाल्यामुळे ताजेतवाने, हुषार पुष्टः 'लष्कर श्रमी यामुळे मुक्काम केले, ही उत्तम गोष्ट केली. आता लोकही असुधे झाले.' – ऐलेसं ३८३.

**असुदादम** पु. नवीन दम; विश्रांती नंतर येणारी टवटवी; उल्हास.

**असुमाई** वि. १. अतिशय; बेसुमार. २.(ल.) आश्चर्यकारक. पहा : **असमाई** :'बाणती असुमाई आंगी योगकळा ।' – निगा ३०९.

**असुर** पु. १. दैत्य; राक्षस; दानव; देवशत्रूः 'सुरांअसुरातें ठकवुनी । महादेव मोहिला ।।' – एरुस्व २.१९. २. असिरिया देश व त्या देशातील लोक. ३. बिहारमधील एक अनार्य जात. [सं.]
वि. भीतीदायक.

**असुरवाड** न. दुःख; क्लेश; त्रास; कष्टः 'एऱ्हवीं विहितत्वें मांडी । परी घालितां असुरवाडीं ।' – ज्ञा १८.१८९.

**असुरवेळ–ळा** स्त्री. संध्याकाळः 'दश मास झालिया प्राप्त । मेधावती झाली प्रसूत । असूर वेळायोगे सूत । तिचे तामस जाहले ।' – जै ७८.६२.

**असुरक्षित** वि. धोका असलेला; बिनभरवशाचा; जोखीम असलेला; सुरक्षित नसलेला. [सं.]

**असुरक्षितता** स्त्री. धोका असणे, वाटणे; निर्धास्तपणा नसणे; जोखीम वाटणे. [सं.]

**असुरा** पु. मोहरमची १० वी तारीख; मोहरमचे १० दिवस. [फा. अशूरा, अशरा]

**असुराधिप** पु. असुरांचा, राक्षसांचा राजा.

**असुरी** स्त्री. राक्षसीण; असुर स्त्री.
वि. १. असुराविषयी, असुरासंबंधी; दैत्यविषयक. २. राक्षसी; धाडसी; क्रूर; कठोर; तामसी. [सं.]

**असुरी अन्न** १. उडीद, बाजरी व दुसरी काही धान्ये. पहा : **माषान्न** २. ज्यात केस आढळतो असे अन्न.

**असुरी उपाय** पु. फारच कठोर व जालीम उपाय; जसे – अंगच्छेदन, डाग इत्यादी; क्रूरपणाने रोगावर केलेले उपाय; तापदायक औषधे इत्यादी.

**असुरी कर्म** न. अंगावर शहारे आणणारे क्रूर कृत्य; दुष्टपणाचे कृत्य.[सं.]

**असुरी खाणे** न. मांस, दारू इत्यादी तीव्र, तामसी पदार्थांचे सेवन.

**असुरी विद्या** स्त्री. मंत्रतंत्र, जारणमारण, संमोहन, स्तंभन, विध्वंसन यांचा जिच्यामध्ये समावेश होतो अशी कुविद्या; अभिचार कर्म.[सं.]

**असुळविसुळ** वि. अस्ताव्यस्त; विस्कळीत; अस्वस्थः 'असुळविसुळ न होती । ब्रम्हसंविती स्फुरे म्हणोनी ।' – विसिंपू १.४४.

**असुज्ञ** वि. १. अजाण; अकुशल; निष्णात नसलेला; माहीतगार नसलेला. २. सुज्ञ नव्हे तो; अज्ञानी; मूर्ख. [सं.]

**असूक्त** वि. चांगले, योग्य नसलेले; अनुचित; अयोग्य (कृत्य इ.).[सं.]

**असूख** न. देवीचा रोग. पहा : **असुख** (गो.) [सं. असुख]

**असूचिभेद्य** वि. सुईच्या टोकाएवढेसुद्धा भोक ज्याला पाडता येणार नाही असा; बिनतोडः 'बोला आता! या असूचिभेद्य कोटिक्रमावर तुम्हांस काय बोलावयाचे असेल ते!' – आलेख २१८.

**असूड गाठ** स्त्री. एक पदर धरून आसडा दिला असता सुटण्याजोगी गाठ; सुरगाठ.

**असूत–द** न. खातापिताना अन्नाचा अंश श्वासनलिकेत गेल्यामुळे ठसका लागून जीव घाबरा होणे. (क्रि. जाणे). (वा.) **असूद–दा–जाणे** – भलत्याच मार्गाने जाणे; आड मार्गाने जाणे.

**असूत–द** न. रक्त. [सं. अशुद्धचा अप.]

**असूदी** स्त्री. पारिपत्य; तजवीजः 'स्वामीचे संग्रहीं तुम्हांसारखे शूर आहेत, कार्य प्रसंगी त्याणी (नवाबानी) अडविल्यास नवाबाची असूदी केली जाईल.' – मकुई ८२.

**असूदी आबादी** स्त्री. शेताची लागवड, गावाची वसाहत इत्यादी शांततेच्या काळात करायच्या गोष्टी. [फा.]

**असूया** स्त्री. मत्सर; द्वेष; हेवा. [सं.]

**असूर** न. रक्त (गो.) [सं. असृज]

**असूरखाना** पु. ताबूत करण्याची जागा. [फा.]

**असूरगाठ** पहा : **असूडगाठ**

**असूर्यस्पर्शी** वि. ज्या ठिकाणी कधीही सूर्यकिरण येत नाहीत अशी अंधारी (खोली, जागा). [सं.]

**असृक, असृज** रक्त; रुधिर; शोणितः 'हो असृक स्रोतःशत वाहे समराजिरीं खळखळाते ।' – मोद्रोण २.२३.

**असृकपीटिका** स्त्री. रक्ताचे गोलक. [सं.]

**असे** क्रिवि. याप्रमाणे; अशा रीतीने. (वा.) **असे (अस्से) होणे** – वैधव्य येणेः 'माझें हें अस्सें झालें तेव्हांच सारा ग्रंथ आटोपला.' – सुदर्शन २८.

**असेख–खा** वि. संपूर्ण; सर्व; अशेषः 'असेख ऋद्धिपुर वसो । भणौनि चरणांकीतें ।' – ऋ १३. [सं. अशेष]

**असेटिलीन** न. (रसा.) एक रंगहीन, विषारी, चटकन पेट घेणारा वायू, एक विक्रियाशील हैड्रोकार्बन. [इं.]

**असेरा** पु. सापः 'हिंडवुनि पोट भरी दारोदारी । कोंडुनि पेटारी असेरया ।' – तुगा १.१०९३.

**असेंद्रिय खत** (कृषी.) रासायनिक खत.

**असो** क्रि. असूदे; राहो; पुरे; असेनाः 'असो वरि कसा तरी विमल भाव ज्याचा करा ।' – केका ६७.

अ. विषयांतर झाल्यास मूळ मुद्याकडे येताना किंवा नव्या मुद्याला प्रारंभ करताना वापरायचा शब्द. [सं. अस्तु - अस्सु - असो]

**असोड** पहा : **आसूड**

**असोल – ला – ल्या** वि.न सोललेला (नारळ, रोठा वगैरे): 'त्याचें काव्य असोल्या नारळासारखे कठीण असून ते उकलायास मोठा प्रयास पडतो.' – निमा ७६६.

**असोशी – सी** स्त्री. १. सोस; हव्यास; हाव; अतृप्तता; फाजील लोभ. २. आतुरता; उत्कट इच्छाः 'कृपा करोनिया पुरवी असोसी । आपुल्या ब्रीदासी राखावया ॥' – तुगा ४४९५. [सं. आ + शोष = सोस] वि. अतृप्त, लोभी; आतुर; (अधिकाराची वगैरे) हाव धरणारा.

**असोशीक** वि. सहन न करणारा; चिडखोर; अविचारी; रागीट; उच्छृंखल. [अ + सोशीक]

**असोस** वि. सहन न होणारे; अतिशय; फार मोठे; अमर्याद; पुष्कळ; शिवाय पहा : **सोस**: 'किंबहुना माया असोस । ज्ञान तुझेनि डोळस ।' – ज्ञा १४.१०.
क्रिवि. हावरेपणानेः 'त्रिविधविकारीं बहुवस । वाढवी असोस संसारू ।' – एभा २४.१२२.

**असोसपण** न. हावरेपणा.

**असोसा** पु. उत्कट प्रेम; हाव.

**असोळी** न. अव. पक्ष्यांची घरटी. पहा : **अविसाळ**

**असौरभ्य** वि. सुवास घेता येणार नाही असा; सुवास न घेता येण्याजोगाः 'जो नाइकिजतां नादु । तो असौरभ्य मकरंदु ।' – ज्ञा १५.७४.[सं.]

**अस्क** पहा : **असका**: 'लेखिका हातीं श्रद्धापूर्वक । उतार करविलें कवन अस्क ।' – दावि १८२.

**अस्कट–ड** न. १. अडचणीची जागा. २. जेथे गवत, झुडपे वगैरे दाटीने एकत्र वाढतात ती जागा; रान; दरड.(गो.)

**अस्कटविस्कट** न. स्त्री. अस्ताव्यस्तपणा; अव्यवस्थित स्थिती; विस्कटणे; पसारा.
वि. गबाळ; अस्ताव्यस्त : 'कितीयेक तीं अस्कटें विस्कटेंसी ' – दावि २८४. [अस्कट + विस्कट– विस्कटणे]

**अस्कध** स्त्री. (आयु.) एक पुटाची वनस्पती; दूधकाडी.

**अस्करणे** अक्रि. धिकार करून बोलणे; हुर्यो करणे. पहा : **अस्कारणे निस्कारणे**: 'सारी खेळतां अस्कारूं । निकरेही भांडी । ' – ज्ञा ११.५४८.

**अस्करणे** अकि. लौकिक मिळवणे, नाणावणे.

**अस्करा, अस्कारा** पु. कीर्ती; नावलौकिक; ख्याती; आख्या; लौकिकः 'सकळ सुरूप मंडळींत माझ्या स्वरूपाचा अस्करा ।' – प्रला ५८. [फा. आश्कारा – प्रसिद्धी]

**अस्कवळ** वि. एका घासात गट्ट केलेला. [सं.आ + कवल]

**अस्कळविस्कळ** स्त्री. घुसळाघुसळ; उलटापालट. वि. अस्ताव्यस्त; विस्कटलेले.

**अस्कंद** अश्वगंधा.

**अस्कारणे, अस्करणे** अक्रि. कीर्ती मिळविणे; नाणावणे; प्रसिद्ध असणे. [फा. आश्कारा]

**अस्कारणे निस्कारणे** उक्रि. तिरस्कारणे; धिक्कारणे; हिडीसफिडिस करणे; हेटाळणे. पहा : **अस्करणे**

**अस्कारी** स्त्री. (प्रसिद्ध अशी) काळ्या द्राक्षांची जात.[फा. आश्कारा]

**अस्खलित** वि. १. न अडखळता; अप्रतिबद्ध; एकसारखे; अचूक; खंबीर; अढळ. २. निरंतर; सतत; अखंड. [सं.]

**अस्खलित गति –ती** स्त्री. १. अनिरुद्ध गती; एकगती. २. (ल.) सदाचाराचा मार्ग; निर्दोष वर्तणूक. [सं.]

**अस्खलित बुद्धि (द्धी)** स्त्री. तर्कशुद्ध, अचूक विचारसरणी; कधी न चुकणारा तर्क, ज्ञान.

**अस्खलित ब्रह्मचारी** पु. कुमार्गाला न जाणारा ब्रह्मचारी; न चळणारा, अढळ ब्रह्मचारी. [सं.]

**अस्खलित वीर्य** वि. आजीव ब्रह्मचारी.

**अस्टर** न. एक विलायती फुलझाड. [इं.]

**अस्त** पु. १. मावळणे; अदृश्यत्व; लोप. २. (ज्यो.) मंगळ, शुक्र, गुरू, शनी इत्यादी ग्रह हे सूर्याजवळ असले म्हणजे अदृश्य होतात, दिसत नाहीत ती स्थिती. (गुरू, शुक्र यांच्या अस्तात मुंज, लग्न इत्यादी नैमित्तिक कर्मे करीत नाहीत.) ३. नाश; शेवट (मरण, दुर्लौकिक वगैरेमुळे). ४. (ल.) सांदीकोंदीला पडणे; मागे पडणे. ५. संपणे; फन्ना; अभाव; उणीव. [सं.]

**अस्तगिरी** पु. अस्ताचल; पश्चिमेकडील काल्पनिक पर्वत. याच्या पाठीमागे सूर्य विश्रांती घेण्यास जातो अशी कल्पना आहे. पश्चिम दिशाः 'तरि अस्तुगिरीचिया उपकंठी ।' – ज्ञा १२.३५. [सं.]

**अस्तन, अस्थान** न. घर, राहण्याची जागा. मुलाखत घेण्याची राजकचेरी; मुसलमान फकीर राहतात ते स्थळ. एखाद्या मुसलमान संताचा दर्गा.

**अस्तनी** स्त्री. बाही; बाहीचा कोपरापासून पुढील भाग. [फा. आस्तीन] (वा.) **अस्तनीतील अग्नी,आग,निखारा** – गुप्त शत्रू; आतील, स्वपक्षातील शत्रू; घरचा दावेदार, वैरी; गृहकलह करणारा; विश्वासघातकी; घरभेद्या; दगलबाजः 'उघड शत्रू परवडतो; पण हे अस्तनीतले निखारे फार धोकादायक '– राऊ १७५. **अस्तन्या वर सारणे** – युद्धास, मारामारीस सज्ज होणे; लढाईची तयारी करणेः ' आमचे दोघेही वीर आपापल्या अस्तन्या वर सारण्याच्या विचारात होते.' – स्वप ६१.

**अस्तनी नर** पु. (शिवणकाम) बाहीची वरची बाजू (दर्शनी बाजू).

**अस्तनी मादी** स्त्री. बाहीचा आतला भाग. [फा. आस्तीन]

**अस्तने** न. कबरीवर घालावयाचे वस्त्र किंवा गलेफः 'कुडचीच्या पीरास अस्तने पेठमालीचे करवून वैशाख वद्य १३ मुहूर्ते करून जाणार' – इचसंइ ३०.

**अस्तबाल** पु. तबेला; पागाः 'पीलखाना व अस्तबालास व उंटांस दाणा नाही, फाके गुजरतात.' – मइसा १.५४.

**अस्तभावणे** अकि. उसकवणे; प्रवृत्त करणेः 'गांगाइसे दादोसीं अस्त भाविली' – लीचउ ३१.

**अस्तमन–मान** न. १. (नाविक) गलबताच्या तळास मध्यभागी चारसहा

बाकांवर एक-दोन हात रुंदीचे व वीत दोन वीत जाडीचे लाकूड बसवितात. त्याल वच्य अंगास काठी उभी केलेली असते. यात डोलकाठीचा बुंधा बसवितात ही अस्तमने दोन-तीन असतात. २. अस्तमन असलेला तळमजला (गलबताचा).(हेट.) [सं. आ + स्तंभन]

**अस्तमय, अस्तमान** पु. अस्त; अस्ताची वेळ (ग्रह तारका यांची): 'कां अस्तमानीं निशीं.' – ज्ञा २.३२४. [सं.]

**अस्तमान, अस्तमित** वि.मावळलेला; अस्तास गेलेला. [सं.]

**अस्तर** न. १. अंगात घालण्याच्या कपड्याला आतून लावलेले पातळ (मऊ) कापड; (सामान्यतः) कोणत्याही वस्त्राला आतल्या अंगास लावतात ते कापड. २. जोड्यास आतील बाजूस जोडलेले मऊ कातडे. ३. आवरणत्वचा; आंतरत्वचा: 'तोंडापासून सर्व नळीस आतल्या बाजूस एक तांबड्या रंगाचे फार पातळ व नाजूक असे अस्तर आहे.' – आरोशा १.६. [फा.]

**अस्तरगिरी** स्त्री. गिलाव्याचे काम; चुन्याचे लिंपण. [फा. आस्तर]

**अस्तरण** न. (यंअ.) एखाद्या यंत्राच्या विशिष्ट भागातील मोकळ्या जागेत आत ठोकून किंवा स्क्रूने बसविलेले काढता-घालता येण्याजोगे धातूचे अस्तर. (यामुळे त्या भागाची फूट तूट कमी होते.)

**अस्तरि-री** स्त्री. बायको. पहा : **अस्तुरी**: 'बोलाविले अस्तरीला ।' – ऐपो ११६. [सं. स्त्री]

**अस्तलग्न** न. १. क्रांतिवृत्ताचा पश्चिम क्षितिजावरील भागबिंदू. याच्या उलट अंगलग्न. २. मावळती राशी. [सं.]

**अस्तवणे** १. अंतर्धान पावणे; अदृश्य होणे; लोप होणे; निकाल लागणे; खलास होणे. २. अस्तास जाणे; मावळणे: 'आवो दुसरी झुळूक येईल । तरि जीवनकळा अस्तवेल ।' – शिव ८३०. [सं. अस्त]

**अस्तंगत** वि. मावळलेला; अदृश्य झालेला. [सं.]

**अस्ताई, अस्तायी** स्त्री. (संगीत) धृपदाच्या तीन भागांपैकी पहिला; दुसरे दोन अंतरा व अभोग. [सं. आ + स्था]

**अस्ताचल** पु. पश्चिमेकडील पर्वत. (सूर्यास्ताची जागा); पश्चिम दिशा. [सं.]

**अस्तापदार्थ** पु. जवळ असलेले साहित्य; जे सामान उपलब्ध असेल ते: 'या प्रांतीं धारण अस्तापदार्थे बरीच आहे.' – पेद ३७.२१९.

**अस्तावा** पु. पाण्याची झारी; तोटीचे भांडे. [फा. आस्तावा]

**अस्ताव्यस्त – अस्तेवेस्त** वि. १. अव्यवस्थित; घोटाळ्याचा; घालमेलीचा; बेशिस्त: 'आतां जापाणीं जापाणीं आपुलें । अस्ताव्यस्त हें । – ज्ञा ११.३८९. २. विपरीत; वाईट.

क्रिवि. उलटापालट करून; अव्यवस्थित रीतीने. [सं. अस्त + वि + अस्त] (वा.) **अस्ताव्यस्त होणे** – नाश होणे; मृत्यू होणे: 'टिपूचे अस्ताव्यस्त जाहलेवर धोंडजी वाघ तेथोन पळोन आला.' – ऐलेसं ६०७३.

**अस्ति** स्त्री. आहे; असण्याचा भाव: 'स्वामी बोलिलें मुख्य भक्ति । इतर जे साधलें सांगती । त्यासि प्राप्तीची अस्तिनास्ति । देवें मजप्रति सांगावी ।' – एभा १४.३४. [सं.]

**अस्तित्व** न. १. असण्याचा धर्म, भाव, स्थिती. २. असणे. ३. राहणे; वास्तव्य. [सं.]

**अस्तित्ववाद** पु. मनुष्याचा व्यक्तिगत अनुभव व दायित्व यांचे महत्त्व प्रतिपादन करणारे एक आधुनिक तत्त्वज्ञान. यात अस्तित्वाच्या (सकृत्दर्शनी निरर्थक वाटणाऱ्या) संदर्भात माणसाच्या स्वातंत्र्याचा, निर्णयशक्तीचा व बांधिलकीचा विचार अभिप्रेत असतो. [सं.]

**अस्तित्वहीन** वि. अस्तित्वात नसणारा; विद्यमान नसणारा. [सं.]

**अस्तिनास्ति-स्ती** न. काय आहे, काय नाही ते: 'म्हणे घरात अस्तिनास्ति सर्व ठाऊकें असे ।' – कचेसुच ४.

क्रिवि. १.होय किंवा नाही; संमतीने अगर नकाराने (क्रि. म्हणणे). २. काकू करून; नानू करून. (क्रि. करणे).

**अस्तिपर** पहा : **अस्तिवाची**

**अस्तिपक्ष** पु. १. एखादे मत मान्य करणारी बाजू; होकाराची बाजू. २. अनुकूल पक्ष. [सं. अस्ति + पक्ष]

**अस्तिभावदर्शक** वि. जेथे गुणांचे अस्तित्व आहे असा; भावरूप; गुणविशिष्ट. [सं.]

**अस्तिवाची** वि. अस्तिपक्ष मांडणारा; होकारार्थी. [सं.]

**अस्तु** अ. असो; तसे असू दे; बरे; काही एक गोष्टीचा विस्तार न करता अंगीकार करून दुसरी गोष्ट बोलण्यासाठी किंवा एखादीचा जेव्हा उपसंहार करायचा आहे तेव्हा या शब्दाचा उपयोग करतात. तथास्तु. [सं.]

**अस्तुटेपणा** पु. अतिलोभ; कधी तृप्ती न होण्याचा स्वभाव.

**अस्तुरी** स्त्री. लग्नाची बायको; स्त्री : 'डोळाभर नाहीं पाहिले अस्तुरीला ।' – ऐपो १५९. (ग्रा.) [सं. स्त्री]

**अस्तू** क्रिवि. अचानक; अकस्मात : 'पावस अस्तूच पडला.' –अउआ ८७.

**अस्तूद-त** क्रिवि. पहा : **अवस्तूक, अकस्मात्, एकाएकी, अचानक** [सं. अवस्तु]

**अस्तेकरी** वि. १. ज्याच्याजवळ द्रव्य, मालमत्ता आहे असा; गब्बर; डबोले असलेला. २. लौकिकवान; अब्रूदार, जिम्मेदार; जबाबदार.

**अस्तेनस्ते** वि. अप्रस्तुत; अप्रासंगिक; ज्याची गरज नाही असे; उकरून काढलेले. पहा : **नसता**

**अस्तेय** न. चोरी न करणे; चोरी न करण्याचा धर्म.[सं.] वि. जे चोरता येत नाही असे.

**अस्तोव्यस्त** वि. अव्यवस्थित; पसरलेला; अफाट.

**अस्त्युत्तर** न. १. कोणत्याही गोष्टीवर प्रत्युत्तर; हजरजबाब (वाईट अर्थी). २. एखाद्या गोष्टीच्या सत्यत्वाबद्दल अमान्यता दर्शविणे; ज्या योगाने लोकांचे उपकार-देणग्या कस्पटासमान भासतात. ज्या योगे आपल्यावर अन्याय होतो, मान मिळत नाही, बुद्धी आहे त्यापेक्षा लोक कमी लेखतात असे वाटावयास लागणारा मनाचा कमकुवतपणा, असंतुष्टता कृतघ्नता या संबंधाने प्रयोग करतात.

वि. कृतघ्न. [सं. अस्ति + उत्तर]

**अस्त्र** न. १. फेकून मारण्याचे शस्त्र. २. अभिमंत्रित शस्त्र किंवा मंत्र. सामा. शब्द–अग्न्यस्त्र, वारुणास्त्र, नारायणास्त्र इ. [सं.]

**अस्त्रवचन** न. आशीर्वाद : 'जैत्यवादी होवावेया । अस्त्रवचन देती तेया ।' –क्रिपु २५०.

**अस्त्रशस्त्र** न.१. शस्त्रास्त्रे. २. सामानसुमान; मालमत्ता. [सं.]
**अस्थान** न. वृत्ती; पूजा इत्यादिकांसंबंधी हक्क, तद्रूप वृत्ती. (ठाणे) [सं.अर्चा + स्थान]
**अस्थानांतरणीय** वि. १.ज्याचे स्थान बदलता येणार नाही असा; अस्थलांतरणीय २. ज्याची बदली करता येणार नाही असा. [सं.]
**अस्थानी** स्त्री. सभा : 'अस्थानी गोष्टी होत.' - अली ३५.
**अस्थानी** अ. अयोग्य ठिकाणी किंवा प्रसंगी : 'काही उदाहरणे सांगितल्यास ती अस्थानी होणार नाहीत.' -एवाका २९.
**अस्थायी** वि. १. अनित्य; तात्पुरते; क्षणिक; लवकर नाहीसे होणारे; वितळणारे; अदृश्य होणारे. २. हंगामी. [सं.]
**अस्थायी असमर्थता** स्त्री. तात्पुरते अपंगत्व.
**अस्थायी दोलन** न. (विश.) अस्थिर-चंचल आंदोलने-हेलकावे. (जे विवक्षित अंतराने किंवा सातत्याने बसत नाही).
**अस्थायी निवास** पु. तात्पुरती राहण्याची जागा.
**अस्थायी मत्ता** स्त्री. (अर्थ.) रोकड पैसा; वर्षभरात रोखीत रूपांतरित होऊ शकेल अशी मालमत्ता; जिंदगी. [सं.]
**अस्थायी मंडळ** न. (समाज.) एखाद्या विशिष्ट उद्दिष्टासाठी अस्थायी निर्माण झालेले व उद्दिष्ट पूर्ण होताच बरखास्त होणारे मंडळ.
**अस्थायी विकलांगता** पहा : **अस्थायी असमर्थता**
**अस्थायी समिती** स्त्री. थोडा काळपर्यंत करावयाच्या एखाद्या विशिष्ट कामासाठी नेमलेली समिती. [सं.]
**अस्थावर** वि. दुसरीकडे नेता येईल असे (पेटी, खुर्ची इ. स्थावर न हालविता येईल असे; शेत, बाग, विहीर इ.); जंगम. [सं.]
**अस्थि** स्त्री. हाडे; प्रेत, शरीर जळल्यानंतर राहिलेली शरीरातील हाडे.
**अस्थिआवरण** न. (वै.) एकमेकांशी जोडलेल्या ऊतींचे (टिशूंचे) सांधे सोडून इतर सर्व अस्थींभोवती असलेले आवरण. [सं.]
**अस्थिकठिणता** स्त्री. (वै.) लांब हाडे अपवादात्मकरीत्या घट्ट आणि कठीण होणे. [सं.]
**अस्थिका** स्त्री. (वै.) लहान हाड. [सं.]
**अस्थिकातर** स्त्री. (वै.) हाडे कापायची कात्री. [सं.]
**अस्थिगत** वि. हाडात गेलेला, मुरलेला (ज्वर) : 'आतली मज्जा काढीं । अस्थिगत ।'- ज्ञा ६.२१८. [सं.]
**अस्थिगतप्राण** वि. मरणाच्या द्वारी पडलेला. [सं.]
**अस्थिचूर्ण** न. खतासाठी वापरली जाणारी जनावरांच्या हाडांची पूड.
**अस्थित** वि. अस्तित्वात, हयात नसलेली; लुप्त; अनुपलब्ध; धुळीस मिळालेली; नाहीशी झालेली. [सं.]
**अस्थितिक** वि. (यंअ.) एकाच स्थितीत अगर एकाच दिशेत राहण्याकडे प्रवृत्ती नसणारा; चंचल; अस्थिर. [सं.]
**अस्थिति-ती** स्त्री. १. अनास्तित्व; अनुपलभ्यता; लुप्तता; अदृश्यता. २. टिकाऊपणाचा, निभावणीचा अभाव; कायमपणा नसणे. [सं.]
**अस्थित्वचा** स्त्री. फक्त हाडे आणि कातडे (रोगी, अशक्त माणसाबद्दल). [सं.]
**अस्थिदोषचिकित्सा** स्त्री. (वै.) शरीरातील हाडात असलेल्या विकृतीचे निदान करणारी चिकित्सापद्धती. [सं.]
**अस्थिपंजर** पु. हाडांचा सापळा : 'तिचा केवळ अस्थिपंजर राहिला होता.' - पाव्ह २३. [सं.]
**अस्थिबंधन** न. 'सांध्यातील हाडे एकमेकांशी पांढरट व बळकट बंधनांनी बांधली जातात. त्यास अस्थिबंधन म्हणतात.'- आआआ २४६. [सं.]
**अस्थिभवन** न. (प्राणि.) हाड तयार होण्याची क्रिया. [सं.]
**अस्थिभक्षक** वि. (प्राणि.) हाडाचे विघटन घडवून आणणाऱ्या (पेशी).
**अस्थिभंग- भेद** पु. हाडांचा भंग; हाड मोडणे, पिचणे. [सं.]
**अस्थिभंजन** न. (वै.) विरूपता नाहीशी करण्यासाठी केलेल्या शस्त्रक्रियेमध्ये एखादी अस्थी तोडणे; मोडून काढणे. [सं.]
**अस्थिभार** पु. घराचा पाया. (तंजा.)
**अस्थिमज्जा** स्त्री. हाडांच्या आत असणारा द्रव पदार्थ, मऊ भागः 'रक्त, स्नायू, चरबी व अस्थिमज्जा नावाचा पदार्थ यांची झीज भरून काढणे हे प्रथिन या घटकाचे मुख्य कार्य होय.'- पाकसिद्धी १०. [सं.]
**अस्थिमाला** स्त्री. हाडांचा सापळा. [सं.]
**अस्थिमृदुता** स्त्री. (वै.) कॅलशियम आणि फॉस्फरसच्या कमतरतेमुळे हाडे मऊ होण्याचा रोग. [सं.]
**अस्थिमेद** पु. हाडांतला मेद; चरबी. [सं.]
**अस्थिर** वि. १. स्थिर नव्हे तो; अनित्य; क्षणिक. २. एका जागी न टिकणारा; डळमळित. ३. चंचल; उतावळा. ४. परिवर्तनशील; ज्यामध्ये रासायनिक, भौतिक किंवा जीवशास्त्रीय बदल सतत होत असतो असा. [सं.]
**अस्थिरता** स्त्री. डळमळीतपणा; स्थिरता नसणे. [सं.]
**अस्थिर तेले** न. उडून जाणारी, वायुपरिणामी तेले. [सं. अस्थिर + तैल]
**अस्थिरप्राय** वि. १. न राहणारा; न टिकणारा; अशाश्वत. २. सहनशीलता नसलेला; उतावळा. [सं.]
**अस्थिविद्या** (वै.) अस्थींची घटना, उत्पत्ती व व्यवस्था यांची माहिती देणारी विद्या. [सं.]
**अस्थिविज्ञान, अस्थिशास्त्र** न. (प्राणि.) अस्थिविषयक प्रश्नांचा अभ्यास करणारे शास्त्र. [सं.]
**अस्थिव्यंगोपचार** पु. (वै.) पाठीचा कणा व अस्थिजोड या संबंधीच्या व्यंगावर उपचार करणारे शल्यशास्त्र. [सं.]
**अस्थिव्रण** पु. हाडास क्षत किंवा जखम होणे. [सं.]
**अस्थिशोथ** पु. (वै.) हाडांमध्ये दाह, आग उत्पन्न होणे. [सं.]
**अस्थिशोष** पु. हाडे वाळणे, क्षीण होणे. [सं.]
**अस्थिसमर्पण** न. मृत मनुष्याच्या अस्थी तीर्थक्षेत्री नदीत टाकणे. [सं.]
**अस्थिसंचय** पु. प्रेतदहन झाल्यानंतर विशिष्ट संस्कारासाठी अस्थी गोळा करणे; राख सावडणे. [सं.]
**अस्थिसंधि-धी - सांधा** पु. १. हाडांचा सांधा, जोड, दुवा. २. हाडे जोडण्याची क्रिया. [सं.]
**अस्थिसिंचन** न. मृत्यूच्या तिसऱ्या दिवशी रक्षाविसर्जनासाठी मृताच्या अस्थींवर जलसिंचन करण्याचा विधी. [सं.]

**अस्थिक्षय** पु. हाडाची झीज होणारा एक प्रकारचा क्षय (रोग): 'ते म्यूनिच येथे अस्थिक्षयाने आजारी पडले.' – महासागर ७५. [सं.]

**अस्थैर्य** न. चंचलवृत्ती; उतावळेपणा; अनित्यता. [सं.]

**अस्नात** वि. (अप.) अस्नाती. १. अंग न धुतलेला; स्नान न केलेला. २. (ल.) अशुद्ध; अमंगळ. [सं.]

**अस्नातक** वि. पदवीधर नसलेला; स्नातकपूर्व.

**अस्नेव** पु. स्नेह; मैत्री; परिचय. (ग्रा.) [सं. स्नेह]

**अस्प** पु. घोडा. पहा : **अश्व** [फा.]

**अस्पखुंग** पु. घोड्याचा एक प्रकार. याचे सर्व शरीर पांढरे, गुडघ्यावर काळा रंग किंवा शरीराचा अर्धाभाग काळा, डोळे हरणासारखे काळे, पाठीवर सैली दूमपर्यंत, कानाची टोके काळी. हा घोडा शुभलक्षणी व धन्यास संतोष देणारा असतो. – अश्वप ६१.

**अस्पर्श** वि. १. स्पर्श करण्यास, शिवण्यास अयोग्य; घाणेरडा; अशुद्ध; अपवित्र. २. सुतकी. ३. रजस्वला. [सं.]

**अस्पष्ट** वि. उघड न केलेले, बोललेले, सांगितलेले; अंधुक; गूढ; अव्यक्त; पुसट; अस्फुट; दुर्बोध. [सं.]

**अस्पष्ट फल** न. स्पष्ट नसलेले फल; (ग.) परचल राशी ज्या स्वचल राशीवर अवलंबून असते तिचा स्पष्ट उल्लेख नसलेले फल. उदा. य = फ (क्ष), क्ष = ग (ट) असतील, तर य हे ट चे अस्पष्ट फल आहे.

**अस्पी** वि. घोड्यावरील; घोड्यासंबंधी. [फा. अस्प]

**अस्पीनगारा** पु. घोड्यावरील नगारा: 'स्वामींनी अस्पीनगारियाविसी आज्ञा केली होती त्यावरून नगारे नवे सजून जोडी येक पाठविली आहे.' – पेद ९.६१.

**अस्पृश्य** वि. स्पर्श करण्यास अयोग्य, अशक्य.
पु. ज्यास शिवले असता पूर्वी विटाळ मानत असत असा हिंदू समाजातील एक वर्ग. [सं. अ + स्पृश्य]

**अस्पृश्यता** स्त्री. विटाळ मानला जातो ती स्थिती; अस्पृश्य जातींचा विटाळ मानणे; अस्पृश्य जातींशी संबंध न ठेवणे: 'अस्पृश्यता ही वैदिक धर्मास संमत नाही.' – टिसू १३.

**अस्पृश्यतानिवारण** न. अस्पृश्य जातींचा विटाळ काढून टाकणे; त्यास अस्पृश्य मानण्याची कल्पना नाहीशी करणे : 'अस्पृश्यता निवारण हे राष्ट्राचे पहिले बीजतत्त्व.' – के १६.४.३०.

**अस्पृश्योद्धार** पु. अस्पृश्यांचे सामाजिक परिवर्तन; अस्पृश्यांची उन्नती; अस्पृश्यता निवारण. [सं. अस्पृश्य + उद्धार]

**अस्पृष्ट** वि. अस्पर्शित; ज्याला स्पर्श केला जात नाही, केला नाही असा. [सं.]

**अस्फटिक –की** वि. (भूशा.) स्फटिकरचना नसणारे. (घन पदार्थ). [सं.]

**अस्फुट** वि.पुसट; पूर्णतः व्यक्त न होणारे.

**अस्फुटनशील** वि. (वन.) आपोआप न तडकणारे (झाडांचे अवयव). [सं.]

**अस्फुटोच्चार** पु. शब्दांचा न समजणारा उच्चार; अव्यक्त अस्पष्ट उच्चार; अडखळत बोलणे. [सं.]

**अस्फुर** वि. अस्फुट; अस्पष्ट (वाणी): 'तैसे याचे या अस्फुरा । वेगी धांवे सारंगधरा ।' – उषा १७४४. [सं. अस्फुट]

**अस्फूर्ति–र्ती** स्त्री. १. प्रेरणा, उत्साह यांचा अभाव; स्फूर्तीचा अभाव. २. विस्मरण; विस्मृती; व्यामोह. ३. लक्षात न राहणे; मनात–ध्यानात न येणे. [सं.]

**अस्बाब** न. सामान: 'बायकापोरे आणि अस्बाब कोठे ठेवावा.' मइसा ७.१५३. [फा. सबबचे अप.]

**अस्मत** सना. आम्ही. सामा. शब्द – अस्मद्गृह, अस्मत्पत्नी, अस्मत्कुल इ. [सं.]

**अस्मतपन्हा, अस्मतपना** वि. पावित्र्यरक्षक; पातिव्रत्यशील; सन्मान्य; कुलीन; पत्रातून स्त्रियांना लिहावयाचा मायना. (सामान्यतः) शुद्ध; पवित्र. [फा. इस्मत]

**अस्मदीय** सना. वि. आमचा; माझे; मम. [सं.]

**अस्मद्भावना** स्त्री. एकत्वाची, सर्वांना बरोबर घेऊन जाण्याची वृत्ती. [सं.]

**अस्मद्वाच्य** पु. (व्याक.) प्रथमपुरुष; मी–वाचक.

**अस्मद्समूह** पु. (समाज.) ऐक्यभाव असणारा गट. [सं.]

**अस्मसास** वि. अमर्याद. पहा : **असमसहास**: 'गदायुद्ध अस्मसास । ऐसे प्रवर्तता ।' – गीता १.३५४.

**अस्माकं** सना. आम्ही; आमचे (विनोदाने प्रयोग) : 'अरे अस्माकंबरी कर्म प्रगटे ।' – दावि २६. [सं.]

**अस्मादिक** सना. आम्ही; खुद्द; आम्ही स्वतः (आपला विशेषपणा वर्णन करावयाचा असता 'आम्ही' या ठिकाणी उपयोग. शिवाय, बढाई, विनोद यावेळी):'तुमच्या अलीकडच्या नाटकातील अद्भुत प्रसंग वस्तुस्थितीस अनुसरून नसल्यामुळें ते अस्मादिकांना पसंत नाहींत.' – नपुक ८९. [सं.]

**अस्मान** न. आकाश; अंतराळ; स्वर्ग: 'अस्मानीं फत्तेची ध्वजा लागली.' – चित्रगुप्त ३३. [फा. आस्मान् = आकाश] (वा.) **अस्मान ठेंगणे होणे** – स्वर्ग दोन बोटे उरणे; ताठ्याचा, गर्वाचा कळस होणे: 'नवऱ्याच्या पगारामुळे तर तिला अगदी अस्मान ठेंगणें झालें होतें.' – पकोधे. **अस्मान तारा तुटणे** – १. उल्कापात होणे; तारे निखळून पडणे. २. निरर्थक बडबड करणे. **अस्मान दाखवणे** – पराभव करणे. **अस्मानास थिगळ (ठिगळ) देणे** – वाटेल तेवढे मोठे संकटही थोपवून धरणे; निवारण करणे. **अस्मानास लागणे** – चढून जाणे; गर्विष्ठ होणे: 'त्याचा प्रकार बुनियाद कशी आहे तें कळतच आहे आणि त्याजशीं हलके बोलल्यास ते अस्मानास लागणार.' – ऐलेसं १०७४.

**अस्मानगिरी** पु. चांदवा; छत; चांदणी, मांडवाचे आच्छादन; मांडव; छप्पर; वळचण.

**अस्मानचपेटा** पु. १. परमेश्वरी कोप; मोठा प्रलय; संकट; दैवी आपत्ती; अरिष्ट. २. (व्याजोक्ती) आकाशात उड्डाण करणारा घोडा. (एखाद्या रद्दी, टाकाऊ, निकामी घोड्यास म्हणतात).

**अस्मान जमिनीची तफावत** स्त्री. जमीन-अस्मानाचा फरक; महदंतर; फार मोठे अंतरः 'त्या सुमारास व या लिहिण्यास पाहता अस्मान-जमिनीची तफावत.' - ऐलेखं १२१५.

**अस्मानतारा** पु. १. आकाशात चमकणारा तारा; चांदणी. २. धूमकेतू; उल्का. (क्रि. तुटणे) ३. सुंदर, चपळ घोड्याबद्दल अगर खंद्या घोडेस्वाराविषयी, तसेच उत्तम गवई, उत्तम लेखक, उत्तम बजवय्या इत्यादिकांची प्रशंसा करतानाही म्हणतात. [फा.]

**अस्मानतारा** पु. १. पुदिन्याचे फूल. २. पेपरमिंटस्फटिक; विड्यात घालायची थंडाई.

**अस्मानपरी** स्त्री. अप्सरा; सुंदरी; सुंदर स्त्रीः 'तबियत खानचे सर्व लक्ष हातीं लागलेल्या अस्मानपरीकडे होतें.' - स्वप ४२९. [फा.]

**अस्मानिया** पु. (वन.) रुक्ष ठिकाणी वाढणारे लहान झुडूप. हे हिमालय, काश्मीर ते सिक्कीमपर्यंत आढळते. वेदकालीन वाङ्मयात याचा रस (सोमरस) काढीत असत असा उल्लेख आहे. [सं.]

**अस्मानी** स्त्री. ईश्वरीकोपामुळे आलेले संकट (अतिवृष्टी, साथ वगैरे). वि. आकाशातील; स्वर्गातील; दैवीः 'शिकंदर ताले! अस्मानी फत्ते (दिग्विजय) होत चालली आहे.' - ऐलेखं ७.३२३६. [फा. अस्मान] (वा.) **अस्मानी सुलतानी** – १. दैवी व राजकीय आपत्ती; ईश्वरी व मानवी क्रांती; ईश्वराचा व राजाचा कोप झाल्यामुळे ओढवणारी संकटे; ज्यावर काही उपाय चालत नाही अशी आपत्ती. २. (ल.) जुलूम जबरदस्ती. ३. आकस्मिक हानी; दैवी आपत्तीमुळे नुकसानः 'आमच्याकडे विक्रीस आलेल्या मालाची अस्मानी सुलतानी झाल्यास त्याची जबाबदारी आमचेकडे नाही.' - मुंव्या ७१.

वि. आकाशी; आकाशाच्या रंगासारखा निळा; निळसर; मेघवर्ण

**अस्मानी यश** न. आशा नसताना केवळ ईश्वरी कृपेने मिळालेले यशः 'सखाराम-बापू राक्षसभुवनच्या युद्धाचा पराक्रम स्तुती आणीत नाहीं. अस्मानी यश आले. शत्रूने बेतरतुदीने लढाई केली म्हणून यास यश प्राप्त जाहले अशा भावें बोलले.' - ऐलेसं ५८५.

**अस्मानी रंग** पु. आकाशी रंग; निळसर रंग.

**अस्मार्त** वि. १. आठवणीच्या पलीकडचे; स्मृतीस अगम्य; अतिप्राचीन. २. स्मृतिविरुद्ध, अशास्त्र; धर्मशास्त्रास सोडून; धर्मशास्त्रविरुद्ध; धर्मशास्त्रबाह्य; बेकायदेशीर; बेकायदा. ३. पहा : **अस्मार्तकालिक** [सं.]

**अस्मार्तकाल** पु. आठवणीच्या पलीकडचा - अतिप्राचीन काल; (कायदा) शंभर वर्षापूर्वीचा काल. [सं.]

**अस्मार्तकालिक** वि. (कायदा) शंभर वर्षापूर्वीपासून उपभोग घेतलेली (मालमत्ता). [सं.]

**अस्मिता** स्त्री. १. व्यक्तिमत्त्व; व्यक्तित्व; अहंता; अहंभावः 'नुसता पांढरपेशा समाज जरी घेतला तरी अस्मिता आणि त्यांच्या आकांक्षा यांचा अविष्कार हरिभाऊंच्या कादंबऱ्यांतून दृष्टीस पडतो.' - के ७.२.३१. २. एखाद्या विशिष्ट समाजाचे, वर्गाचे व्यवच्छेदक मीपण. ३. (तत्त्व.) द्रष्टा आणि दर्शनशक्ती यांना एकच मानणे अथवा पुरुष (आत्मा) आणि बुद्धी यांच्यात अभेद मानणे. सांख्यात याला 'मोह' आणि वेदान्तात याला 'हृदयग्रंथी' असे म्हणतात. [सं.]

**अस्य** न. तोंड, मुखः 'अस्यामध्ये ढिसाळा प्रचुर गिरिशिळा भूतळा ब्रम्हगोळा.' - गस्तो [सं. आस्य]

**अस्राप** वि. निष्पाप; निरागस; भोळा.

**अस्राभिनोदन** न. (आयु.) रक्तदाब वाढणे. [सं.]

**अस्लूब** पु. पद्धती; व्यवस्थाः 'तेव्हां करारीं कोणें प्रकारच्या व कशा, याचा अस्लूब काय तऱ्हेचा?' - मइसा ७.८२. [फा.]

**अस्वडी** क्रिवि. मागे; परोक्ष; सवड नसता; अयोग्य वेळी. (गो.)

**अस्वत्व** न. १. मालकीचा, धनीपणाचा, स्वामित्वाचा अभाव; (कायदा) जिनगी, मालमत्ता वगैरेवरील वारसाचा, मालकीचा अभाव. २. स्वत्त्व, स्वाभिमान यांचा अभाव. [सं.]

**अस्वपात** पु. आसवे ढाळणे; अश्रुपातः ' अस्वपात पडती नयनी ।' - उषा ४८.४८. [सं. अश्रुपात]

**अस्वयंवेद्य** वि. स्वतःस न कळणारा; अज्ञेयः 'अस्वयंवेद्य म्हणजे आपल्या स्वतःस न कळणारा.' - गीर १७१. [सं.]

**अस्वरस** पु. नापसंती; इतराजी; नावड; मनाची किंवा प्रीतीची अनासक्ती; अनिष्ठा. [सं. अ + स्वारस्य]

**अस्वर्ग्य** वि. स्वर्ग मिळवून न देणारे; ज्यामुळे स्वर्गप्राप्ती होणार नाही असे. [सं.]

**अस्वल** पु. १. पुष्कळ केस असणारा एक चतुष्पाद प्राणी; रीस; २. मोठाले केस असलेला सुरवंट. [सं. ऋक्षभल्ल]

**अस्वल गुदगुल्या** स्त्री. (अस्वल एखाद्या प्राण्यास मारण्यापूर्वी गुदगुल्या करते अशी समजूत आहे. यावरून) वरपांगी गोड पण परिणामी घातक प्रेम.

**अस्वली** स्त्री. १. अस्वलाची मादी. २. एक वनस्पती; शतावरी.

**अस्वलीकाठ** पु. असावरी - ली काठ; अस्वली वनस्पतीच्या पानासारखी नक्षी असलेले काठ.

**अस्वली पायपुसणे** पायाची माती, चिखल पुसण्याकरिता दरवाजाजवळ ठेवलेले काथ्याचे अस्वलीच्या केसासारखे केसाळ खरखरीत तरट.

**अस्वस्थ** वि. अस्थिर; अशांत; स्वस्थपणा नसलेला; मन स्थिर नसलेला; प्रकृतीस समाधान नसलेला. [सं.]

**अस्वस्थता** स्त्री. १. असमाधान; असंतोष. २. राजकीय असंतोषामुळे उद्‌भवणारी चळवळ. ३. प्रकृतीस स्वास्थ्य किंवा आराम नसणे; रुग्णावस्था. [सं.]

**अस्वाधीन** वि. (शब्दशः पराधीन पण प्रचारात) स्वतंत्र; दुसऱ्यावर अवलंबून नसलेला. [सं. अ + स्वाधीन]

**अस्वाभाविक** वि. असामान्य.

**अस्वाभाविकता** स्त्री. (समाज.) निसर्गतः किंवा सामान्यतः जसे असावयास हवे तसे नसणे; अनैसर्गिकता. [सं.]

**अस्वामि, अस्वामिक** वि. ज्याला राजा-धनी-पुढारी-अधिपती-पालक-मालक-वारसदार नाही असा; बेवारशी. [सं.]

**अस्वामिकविक्रय** पु. (कायदा) मालकी हक्क किंवा अधिकार असल्याशिवाय केलेली मालाची, जिंदगीची, मालमत्तेची विक्री;

बेकायदेशीरपणे केलेली विक्री. [सं. अ + स्वामिक]

**अस्वाम्य** न. (कायदा) जिंदगीवर, मालमत्तेवर कायदेशीर हक्काचा अभाव; स्वामित्व नसणे. [सं.]

**अस्वार** वि. घोडा, हत्ती, उंट इत्यादिकांवर आरूढ झालेला; वर बसलेला. पु. स्वार; शिलेदार; राऊत. [फा. सवार्]

**अस्वारस्य** न. नापसंती; अरुची; नावड; स्वारस्य, लोभ, प्रीती नसणे. [सं.]

**अस्वास्थ्य** न. १. स्वास्थ्याचा अभाव; असमाधान; असंतोष; असुख. २. शारीरिक व्याधी किंवा विकृती; प्रकृती बरी नसणे. [सं.]

**अस्वीकार,अस्वीकृति–ती** पु. स्वीकार न करणे; अमान्यता; आपल्याकडे आलेली एखादी वस्तू नापसंत असल्याने परत पाठवणे. [सं.]

**अस्वीकार्य** वि. स्वीकार न करण्यासारखे; अग्राह्य; मान्य न करण्याजोगे. [सं.]

**अस्सल** वि. मूळचे; खरे; अकृत्रिम; गैरनकली. [फा. अस्ल्]

**अस्सलबरहुकूम** वि. मुळाप्रमाणे; मूळ वस्तूप्रमाणेः 'तारेची नक्कल अस्सलबरहुकूम आहे की नाही?' – काढा २०८.

**अस्सँ** उदगा. अस्साँ; खरे की काय? खरं? (ग्रा.)

**अस्साॅ** वि १. चिकार; गच्च. २. अस्सा. पहा : **अस्सँ** (गो.)

**अह** पु. दिवस. (स्वतंत्रपणे सहसा वापरला जात नाही. अहोरात्र, अहर्निश अशा सामासिक शब्दात वापरला जातो.)

**अहकाम** पु. हुकूम; सत्ता; हुकूमत; परवानगीः 'या प्रमाणे मुख्तारीचे अहकाम आणून दिले.' – चिरा २४. [फा.]

**अहटणे** पहा : **अहाटणे**

**अहडणी** स्त्री. (तांबटाचा धंदा) नवीन घडविलेल्या भांड्यावरील ठोके साफ, गुळगुळीत करण्याचे हत्यार.

**अहडणे** अक्रि. पोहोचणे; दाखल होणेः 'तुम्हांस रोखा अडताच (अहडताच) तुम्ही आपले तपियात गावाचा गाव ताकीद करून.' – मइसा १५.२७६.

**अहद** स्त्री. १. सत्ता; राज्य. २.स्थान; ठाणे. [फा.]

**अहद** पु. करारः 'कृष्णराव बल्लाळ याणी पुण्यात जो अहद व वचनप्रमाण करून तुलसी व बेलमंडार दिला त्याची फरामोसी रावजीस झाली.' – पुअभा १.१०८.

**अहततहत अहदतहद** क्रिवि. १. या टोकापासून त्या टोकापर्यंत; या हद्दीपासून त्या हद्दीपर्यंत. २. पासून-पर्यंत. [फा.]

**अहदनामा** पु. वचनपत्र; करारनामा. [फा.]

**अहदपैमान** पु. करार; करारमदारः 'अहद-पैमान व्हावे ते सर्व स्वामीपाशी आल्यावर अर्ज करितो.' – मइसा १.१५९. [फा.]

**अहदशर्त** स्त्री. तह; करार; अटः 'यांस अहदशर्तीचे कागदपत्र देऊन रवाना केले.' – मइसा १९.८. [फा.]

**अहफाद** स्त्री. मुलींची संतती; कन्यावंश.

**अहम** सना. १. मी; स्वतः; प्रथमपुरुष. २. माणसाचा स्व; स्वात्मभाव; (ल.) गर्व; ताठा; अहंकार; मीपणा. ३. (मानस.) परिस्थितीचे भान असलेले प्रगट मन. [सं.]

**अहमदी** स्त्री. टिपू सुलतानाने चालू केलेले एक सोन्याचे नाणे. त्याची किंमत पॅगोडा इतकी म्हणजे होनाइतकी असे.

**अहमहमिका** स्त्री. (मी पुढे, मी समर्थ असे वागणे). स्पर्धा; चढाओढ; ईर्षा; अहंकारः 'युरोपातील राष्ट्रामध्ये समुद्रापलीकडे मुलूख मिळविण्याची अहमहमिका सुरू झाली.' –वस्व ३. [सं.]

**अहमादर्श** पु. वैयक्तिक गुणोत्कर्षासाठी पुढे ठेवलेला नमुना, आदर्श. [सं.]

**अहर्गण (अहर्गण्)** पु. १. (ज्यो.) दिवसांचा समुदाय; इष्टकालिक ग्रहादींचे गणित वर्तविण्यासाठी विवक्षित अवधीपासून मोजलेले दिवस. ज्योतिषशास्त्रामध्ये अहर्गणाचा उपयोग मध्यमग्रह साधन करण्याकरिता होतो. २. पुष्कळ दिवसांचा काळ; बरेच दिवस. [सं. अहन्- अहस्+गण]

**अहर्निश–शी** क्रिवि. रात्रंदिवस : 'जे यजनशील अहर्निशी'- ज्ञा ४.१२२. [सं.]

**अहर्बिंब** न. सूर्यबिंब; सूर्योदय : 'तेथें प्रात:काळिं अहर्बिंब समई सहपरिवारिं ।'– पंच ५.१०. [सं.]

**अहल** न. १. लोक. २. कुटुंबातील माणसे. ३. अधिकारी; स्वामी. [फा. अहल्]

**अहल** पु. त्रास; उपसर्ग : 'नवाबांनी बहुत अहल सोसून यात्रा उत्तम प्रकारें आमची केली.'– पेद २.२. [फा. हाल]

**अहलतमगा** स्त्री. राजाने दिलेली बक्षीस–जमिनीची सनद : 'वरसना येथील सनदा अहलतमगा करून द्याव्या.'– मशिंका ८२७.

**अहल्कार** पु. कारकून : 'साहेबाने फैज–बक्षीकरून लष्कर जाब पाठवावयाविशी अहल्कारास आज्ञा सादर जाली पाहिजे ।' – पदमव ११२. [फा.]

**अहल्या** स्त्री. १. गौतमस्त्री; पाच पतिव्रतांपैकी एक. २. (ल.) पतिव्रता स्त्री.
वि.निष्पाप; पवित्र. [सं.]

**अहल्याबाई** स्त्री. १. मल्हारराव होळकरांची सून. ही मोठी साध्वी, सत्त्वशील व दानशूर होती. २. (ल.) दानशूर, सत्त्वशील स्त्री.

**अहल्लक** पु. भिक्षा मागताना गोसावी लोक जो शब्द म्हणतात तो. अल्लख. पहा : **अलख** [सं. अलक्ष्य]

**अहवाल** पु. विशिष्ट काळात झालेल्या एखाद्या संस्थेच्या कामाची अधिकृत माहिती; कामाची केलेली नोंद, वृत्तान्त, हकीकत. [फा.]

**अहसन** वि. उत्कृष्ट; सुंदर. [फा. अह्सन]

**अहस्तांतरणीय** वि. दुसऱ्याच्या नावे करता येणार नाही, दुसऱ्यास देता येणार नाही अशी (मालमत्ता इ.). [सं.]

**अहह** उद्गा. अरेरे; शोकाचा, खेदाचा उद्गार : 'मुनीच्या शापानें अहह सतिचा त्या प्रिय पती ।' – विवि १.२०.

**अहळण** पहा : **अहाळणी** : 'प्रपंची अहळण त्या सुटेना ।'– दावि २३३.

**अहळणे** पहा : **अहाळणे** : 'तेवि अहाळती कोमलांगी ।'– दावि २६२.

**अहळबहळ** पहा : **अहाळबाहाळ**

**अहळी** स्त्री. अग्नीची ज्वाळा; आग; तेज; उष्णवारा; झळा.(सामान्यतः )

अनेकवचनी प्रयोग. (वा.) **अहळीत असणे**- भिऊन चालणे, वागणे, धाकात चालणे; अहाळणी.

**अहळीव** न. एका वनस्पतीचे पौष्टिक बी. याची झाडे बागाईत जमिनीत होतात. रंग तांबूस, बी बारीक.

**अहंकर्ता** पु. मी सर्व करणारा आहे असा गर्व; मी पणा; अहंकार; ताठा; स्वतःच्या कृत्याबद्दल प्रौढी. [सं.]

**अहंकार** पु. १. आपली, स्वतःची जाणीव; आत्मज्ञान. २. अभिमान; गर्व; मीपणा; ताठा. ३. परमात्म्यापासून किंवा बाह्य विश्वापासून आपण वेगळे आहोत अशी भावना : 'बुद्धीपासून पुढें उत्पन्न होणाऱ्या पृथक्पणाच्या या गुणासच अहंकार असें म्हणतात.'- गीर १७१. ४.(मानस.) बाह्य जगाशी वागताना पूर्वानुभवाच्या आधारे प्रतिक्रिया व्यक्त करणारे जागृत मन. भौतिक व सामाजिक गरजा यांच्याशी तडजोड करणारे मन. [सं.]

**अहंकारणे** अक्रि. गर्वाने फुगणे; ताठणे: ' अहंकारला रावणू । कोटी गुणे ।' - राक १.१४.

**अहंकारभेद** पु. अहंकाराचे तीन प्रकार- सात्त्विक, राजस आणि तामस; अहंकारात्रय किंवा त्रिविध अहंकार. [सं.]

**अहंकाराशय** अहंकाराचे किंवा आत्म्याचे स्थान; शरीर.

**अहंकारास्पद** वि. ज्याबद्दल अहंकार वाटावयाचा तो (देह). [सं.]

**अहंकारी** वि. अहंकार असलेला; गर्विष्ठ; ताठर. [सं.]

**अहंकृति-ती** स्त्री. अहंकार; गर्विष्ठपणा; ताठा; स्वतःची प्रौढी : 'ऐसेनि अहंकृतिभावो । जयाचा बोधीं जाहला वावो ।' -ज्ञा १८.४२२.

**अहंकेंद्रिता** स्त्री. (मानस.) प्रत्येक गोष्टीचा, स्वतःच्या संदर्भात, विचार करण्याची वृत्ती, अवस्था; आत्मकेंद्रितता. [सं.]

**अहंकेंद्री** वि. (मानस.) प्रत्येक गोष्ट स्वतःच्या संदर्भात पाहणारा; आत्मकेंद्री; स्वयंकेंद्री. [सं.]

**अहंगड** पु. (मानस.) स्वतःविषयी अतिशय श्रेष्ठत्वाची भावना; अहंमन्यतेची भावना; आत्मश्रेष्ठत्वाची विकृतीच्या पातळीपर्यंत जाणारी भावना. [सं.]

**अहंचत्वंच** स्त्री. अरेतुरे, मी तू करणे; बाचाबाची. [सं.]

**अहंतत्त्व** पहा : **अहंकार**

**अहंता** स्त्री. १. अहंकार; मीपणा; अभिमान; गर्व : 'थोर ते गळाली पाहिजे अहंता । उपदेश घेतां सुख वाटे ।' - तुगा ३६३६. २. स्वाभिमान. (अभिमान शब्दाखाली दिलेले वाक्प्रचार पहा.) [सं.]

**अहंदेहबुद्धि-द्धी** स्त्री. १. स्वतःच्या अस्तित्वाची कल्पना, जाणीव, भावना. २. (तत्त्व) मी पणा; अहंकार; पोकळ गर्व; ताठा; आढ्यता. वि. ज्याला आढ्यता, मीपणा आहे असा; अहंदेही. [सं.]

**अहंदेही** वि. ज्याला आढ्यता, मीपणा आहे असा. [सं.]

**अहंनिष्ठा** स्त्री. आत्मनिष्ठा; मीपणा. [सं.]

**अहंपण-णा** पहा : **अहंता** : 'उगाळूनि अहंपण । सो हं काढिलें शुद्ध चंदन ।'- एरुस्व १.६२. [सं. अहम्]

**अहंपदार्थ** पु. (तत्त्व.) अहंपणाची भावना; मीपणाचे निश्चयात्मक कथन; आपल्या स्वतंत्रपणाची भावना. [सं.]

**अहंपूर्विका, अहंप्रथमिका** स्त्री. १. प्रत्येक कार्यात मी पुढे आहे अशी भावना ठेवून वागणे; आपले घोडे पुढे दामटणे. २. लढाईत योद्ध्यांचे एकमेकांना अहंतापूर्वक आव्हान; हा मी पुढे झालो असे ईर्षेने सांगणे. अहमहमिका (युद्धात). [सं.]

**अहंप्रत्यय** पु. (तत्त्व.) अहंभाव; देहाभिमानी आत्म्याची कल्पना ज्ञानाची सर्व अंगे बीजरूपाने आत्म्यामध्ये असतात असे मत. [सं.]

**अहंप्रवृत्ती** स्त्री. आत्मप्रौढी; स्वतःचा मोठेपणा मिरवण्याकडे कल असणे.

**अहंबळ** न. अभिमान; अहंकार : 'उदकीं रिघालें जे समैळ । तें स्वभावें करी निर्मळ । परी न धरी अहंबळ । जे म्या हेमळ क्षाळिलें ।' -एभा ७.४६२. [सं. अहं+बल]

**अहंबुद्धि-द्धी** स्त्री. अहंता; अभिमान; मीपणाची जाणीव. [सं.]

**अहं ब्रह्मास्मि** (मी ब्रह्म आहे हा मूळ अर्थ. यावरून ल.) मी काय तो श्रेष्ठ; सर्वांत मी मोठा असा अभिमान : 'अहं ब्रह्मास्मि ब्रह्माहमस्मि । येथींचा अर्थ ब्रह्मचि मी ।'- विसिंउ ७.७८.

**अहंभाव, अहंमति-ती, अहंमान** पु. पहा : **अहंकार** १. अहंपणा; मानीपणा; मीपणा; दर्प; ताठा; गर्व : 'अहंभाव ज्या मानसींचा विरेना'- राम १५९. २. (चुकीने उपयोग) भाव; अभाव; कल्पना; तर्क; अनुमान; अटकळ.

**अहंमन्य** वि. गर्विष्ठ; आढ्यताखोर; स्वतः बद्दल वाजवीपेक्षा जास्त अभिमान बाळगणारा. [सं.]

**अहंमन्यता** स्त्री. गर्व; आढ्यता; स्वतः बद्दल वाजवीपेक्षा जास्त अभिमान असणे. [सं.]

**अहंममता** स्त्री. १. मी व माझे अशी कल्पना; अहंभाव. पहा : **अहंकार** २. स्वतःबद्दल, स्वतःच्या माणसाबद्दल, गोष्टीबद्दल ममता, लोभ : 'तैसी अहंममता किरीटी । नुरेचि तया ।'- ज्ञा १८.४०८. [सं.]

**अहंमानी** वि. अहंकारी; अभिमानी. [सं.]

**अहंवाद** पु. आपल्या स्वार्थासाठी अविरत प्रयत्न करणे हेच सर्वोत्कृष्ट ध्येय आहे असे प्रतिपादन करणारा वाद, मत; स्वतःच्या हिताची काळजी वाहणारी विचारसरणी. [सं.]

**अहंविशेष** क्रिवि. अधिक चांगले; अधिक बरे : 'त्या संभाषणात स्वतःचे प्रेम दुसऱ्यावर जडल्याची बतावणी यशस्वी रीतीने करितां आली तर अहंविशेष.'- श्रमसाफल्य २.२१. [सं. अयं विशेष]

**अहंस्पती** क्षयमासानंतर येणारा पहिला महिना. [सं.]

**अहा-अहाहा** उद्गा. आनंद, आश्चर्य, शोक, निंदा इत्यादींचा वाचक उद्गार : 'नृपति बहु विलाप करी सूतासि म्हणे, अहा । कसें घडलें ।'- मोकर्ण ६.३.

**अहाई** पहा : **अही**

**अहाकट** पु. शोक. [सं. अहह+कृत]

**अहाच** वि. १. वरवर; सरासरी; दिखाऊ. २. सत्याचा आभास असणारा; मिथ्या; मायिक; व्यर्थ; सामान्य; साधारण : 'नामरूपात्मक प्रपंच । मिथ्या मायिकत्वें अहाच ।'- एभा २८.५८३.

**अहाचवहाच** क्रिवि. वरवर; बाह्यात्कारी; उगीचच्या उगीच : 'माझा

भाव नाही जिव्हारी । अहाचवाहाच भक्ति करी ।' – एभा १७.११८.

**अहाटणे** उक्रि. १.(शिजलेली डाळ वगैरे) पळी किंवा तत्सम साधनांनी घाटणे. २. (ल.) त्रास देणे; छळणे; पिच्छा पुरवणे.(लाटणे, लोटणे, रगडणे याशी सदृश अर्थाने ) एकत्र गणणे; आत ढकलणे एक करणे; सारखे समजणे; बरोबरीने वागवणे. (अविचाराने व बेलाशक.) [सं.आ+घट्ट=घाटणे]

**अहाटीव** वि. १. अहाटलेली= घोटलेली, घाटलेली. (डाळ.) २. छळ केलेला; त्रास दिलेला.

**अहाड** पु. स्थळ; ठिकाण : 'आतां हा प्रकारु अथवा । सोमवंशीचा अहाडु बरवा । तो श्रोते जनीं परिसवा । ऐक आतां ।।'– कालिका ११.७२.

**अहाडून–पहाडून** क्रिवि. आडूनपाडून; घालून पाडून; टोचून; टोमणा देऊन; वर्मी लागण्यासारखे; औपचारिकपणे.

**अहाणा** पहा : **आहणा**

**अहाणा** वि. आत्मघातकी; हानी करणारा.

**अहादी** पु. १. माणूस; एकांडा शिपाई : 'अहादीवर अहादी रवाना केले.'– मराचि थोशा ६४. २. शिपायापेक्षा वरच्या दर्जाचा लढाऊ स्वतंत्र स्वार. [फा. अहदी=एक]

**अहाय बहाय** उद्‌गा. अरे अरे; हाय हाय (क्रि. करणे).[ध्व. हाय]

**अहार** पु. अजगर; आर.

**अहार** पु. १. विस्तव; निखारा; फुफाटा. २. इस्त्री. (वा.) **अहार देणे**– इस्त्री करणे.

**अहारणे** अक्रि. अति अन्न खाल्ल्यामुळे सुस्त पडणे; जेवण अंगावर येणे; सुस्ती येणे. [सं.आहार]

**अहारणे** अक्रि. १. निसटणे; बाहेर येणे; ओघळणे (रहाटाची माळ). २. खचणे; खाली पडणे; आधार सुटणे (इमारत, जमीन). [सं. आ+हृ]

**अहा रे** उद्‌गा. तुच्छतादर्शक : 'अहा रे शूर वीर ।'

**अहारोळी** स्त्री. आरोळी; निखाऱ्यावर भाजलेली पोळी.

**अहालकर** पहा : **अहल्कार**

**अहालीमवाली** वि. उच्चनीच, सर्व दर्जाचे (लोक) : 'यावरी तमाम अहाली व मवाली पर्गणे मजकूर व गिर्दनूवाही जमीनदार हर कोणी लहान थोर सांगताती जे' – वाड सनदा १४०. [फा. अहल्=लोक]

**अहाळणी** स्त्री. १.उष्ण वाऱ्याने भाजणे, पोळणे. २. धाप; दम; उसासा. ३. (ल.) उत्कंठा; लालसा; हाव; वासना.(क्रि. देणे). (वा.) **अहाळणी,अहाळण्या कहाळण्या टाकणे,देणे** – द्वेष, राग इ. मनोविकारांना वाव देणे; दुःखोद्गार, शोकोद्गार काढणे.

**अहाळणे** अक्रि. १. सूर्याच्या, अग्नीच्या झळीने भाजणे, पोळणे, होरपळणे. २. नाश पावणे : 'सेजार अहाळ अहाळलें दिव्य भोगांचे ।'– भाए ८९. ३. अतिशय दुःखित होणे– पीडणे : 'अहाळिली अवनी क्षत्रियांची ।'–एभा ४.२४३.

**अहाळबाहाळ** वि. फार; बहुत, अत्यंत : 'तो मी येथे अहाळबाहळी कांपें ।'– ज्ञा ११.३५१. [सं.बहुत]

**अहाळीव** पहा : **अहळीव**

**अहाकार** पु. १. हाहाकार; अहा, हाय असा शोक करणे; मोठ्याने रडणे. २. आक्रंदन; आक्रोश; आकांत. [सं. अहह+कृ]

**अहि** पु. साप : 'पाहुनि अजातरिपुची तादृक गुरुचरणभक्ति, महिवरले । अहिवरलेखवरांहूनि बहु कठिनहि यवन वीर गहिवरले' – मोभीष्म १.११४.

**अहिक** न. ऐहिक; या जगातला : 'तो अहिका ही परी मूकला । सुखासि गा ।'– राज्ञा ४.१९७. [सं. इह]

**अहिकोश** पु. सापाची कात. [सं.]

**अहिजिव्ह गण** (वन.) नेचे वर्गातील स्थूलबीजुककोशी उपवर्गातील (युस्पोरंजिएटी) एक गण. [सं.]

**अहित** न. १. तोटा; नुकसान; हानी; अपाय; अकल्याण.

पु. शत्रू; वैरी; द्वेष करणारा : 'करितां सारथि मस्तक' – कोदंडच्छेद पौरवें अहितें ।' – मोभीष्म.

वि. १. अकल्याणकारक; नुकसानीचे. २. शत्रुत्वाचे; वैराचे. [सं.]

**अहितकारक** वि. कल्याण न करणारा; अहितावह; हानिकारक. [सं.]

**अहितुंडिक** पु. गारोडी; साप खेळविणारा.

**अहिनकुलन्याय** पु. १. साप आणि मुंगूस यांच्यामधील जन्मजात असलेल्या वैराप्रमाणे वैर. २. (ल.) जन्मद्वेष; हाडवैर. [सं.]

**अहिनी** वि. लोखंडी : 'अहिनी, दगडी जिन्नस दारूचे अंतरीं ठेवावे ।' – मराआ ३५. [फा. आहनीन्]

**अहिफेणा** स्त्री. अफू : 'जेपाळ सोमल अहिफेणा । राजविखे मारकें नाना । येकमेळें सूदलीं ।।'– मुआदि २९.६२.६३३.

**अहिफेन** पु. न. १. अफू; गुंगी आणणारा एक मादक पदार्थ : 'खसखशीच्या ह्या बोंडास चिरा पाडल्यास त्यातून जो चीक निघतो तीच अहिफेन म्हणजे अफू होय.'– फचि ७९. २. सर्पाची गरळ. [सं.]

**अहिम** वि. उष्ण. [सं.]

**अहिमही** पु. पाताळातील हे दोन राक्षस अत्यंत पराक्रमी व बलाढ्य होते. रामाने त्यांना ठार मारले. यावरून (ल.) दोन जुळे वीर; जोडीचे पराक्रमी पुरुष : 'पण मराठेशाहीची मदार या दोघां अहीमहींवर आहे.' – स्वप २१०. [सं.]

**अहिरकुंभार** पु. खानदेशात थोरचाके आणि लहानचाके अशा दोन कुंभारजाती आढळतात : 'लहानचाक्यांना अहीरकुंभार असे दुसरे नाव आहे.'– हिंस २९.

**अहिरण** स्त्री. पहा : **ऐरण** : 'कीं अहिरणीं गुंततां हिरा । हिरकणी काढी तया सत्त्वरा ।'– नव १८.१३४.

**अहिरण–णी** स्त्री. गुराखीण; गवळण.

वि. पहा : **अहिराणी** [सं. आभीर]

**अहिरा, अहेरा** पु. १. डोळ्यांचा एक रोग; बुबुळावर रक्ताप्रमाणे एक लाल ठिपका दिसतो. यास अर्जुन असेही म्हणतात. २. एक तांबडा कठीण दगड; डोळ्यातील रोग बरा करण्यास याचा खडा अंगठीत बसवून डोळ्याच्या बुबुळावरून फिरवितात. याला अहिऱ्याचा खडा म्हणतात. अंगठीस अहिऱ्याची मुदी असे म्हणतात.

**अहिराणी** स्त्री. खानदेशातील एक बोली. ही मराठीची पोटभाषा

म्हणून मानण्यात येते. हिच्यावर गुजरातीचा बराच परिणाम झालेला दिसतो. [सं. आभीर]

**अहिरी** स्त्री. लग्न-मुंजीत बोहल्याभोवती उतरंडी रचण्याकरिता उपयोगात आणतात, ती रंगीत मडकी; वही. : 'सोन्याची अहिरी । मोत्यांचे कळस त्यावरी । रंगाचे परोपरी चारी शोभा दिसतसे अहिरी ।' - स्त्रीगीत २२.

**अहिरी** स्त्री. अहेर करण्यास योग्य वस्त्र.

**अहिवा** वि. अविधवा; सुवासिनी; सवाष्ण स्त्री : 'अहिवा नारी कुरवंड्या करती ।'- वसा ३०. [सं. अविधवा]

**अहिवात** पु. अहेवपणा. [सं. अविधवा]

**अहिस्ता** पु. सांघिक व्यायामामधील एक (हिंदी) हुकूम : 'जोश कदमने जात असता लांबवर अडथळा होईल असे काही असेल तर त्यातून सावकाश जाता यावे म्हणून हा हुकूम देतात; सावकाश चालावयाचे असेल तरीही हा हुकूम देतात.'- संव्या २२. सावकाश; हळू; आस्ते. [फा. आहिस्ता]

**अहिंसक** वि. हिंसा न करणारा; हत्या न करणारा; कोणास न मारणारा; हिंसाचार, घातपात न करणारी. [सं.]

**अहिंसक प्रतिकार** पु. (राज्य.) हिंसक मार्गाचा अवलंब न करता, उपोषणाद्वारे निदर्शन करून किंवा असहकाराने एखाद्या राजवटीस किंवा कायद्यास केलेला विरोध.

**अहिंसा** स्त्री. १. हिंसेचा अभाव; केवळ मांसाकरिता जीवाची हत्या न करणे. शाकाहार व्रत. २. कोणत्याही प्राण्याला इजा, दुखापत न करणे; रक्तपात न करणे. ३. (राज्य.) उद्दिष्टे साध्य करण्यासाठी बळाचा वापर वर्ज्य समजणे; बलप्रयोग न करणे. [सं.]

**अहिंसाधर्म** पु. प्राणिहत्या न करण्याचा धर्म. [सं.]

**अहिंस्र** पहा : **अहिंस**

**अही** स्त्री. विस्तवाची- अग्नीची धग; आग : 'जठराग्नीची अही थोर ।' - मुरंशु ४२२. २. उष्ण वारा; झळ; मृगजळ. [सं. अहि=सूर्य]

**अहीता** पु. धिरडे : 'याला गंगातीरावर धिरडे म्हणतात. तुम्ही वऱ्हाडात अहीता म्हणता.'- मसं ९२.

**अहीमुखी** वि. सापासारखे तोंड असलेला (घोडा). [सं.]

**अहीर** पु. १. गवळी; गवळ्याची जात : 'शिरे विषयवासना जशि शुका अहीरास भी ।' -केका १४. २. आभिर- गवळी जात. ही खानदेशात व मराठवाड्यात आढळते. यातील निरनिराळे धंदे करणाऱ्या लोकांच्या जातींना पूर्वी हे नाम लावलेले आढळते. जसे- अहीर सोनार, अहीर हलवाई. [सं.अहीर]

**अहीर** पु. १. अजगर; आर; अहार. २. गोड्या पाण्यातील सापासारखा एक मासा, हा काळा असून याच्या अंगास चिकट बळस असतो. [सं. अहि]

**अहीरभैरव** पु. (संगीत) भैरव प्रकारातील एक राग. गान समय प्रात:काळ. [सं.]

**अहुळी** वि. अहेव; सौभाग्यवती : 'अहुळी नार मेली । घरी शिंक्यावर दही । टाकून राजा बाई । जाते कशी दूर सई ।' - वलो ८३.(व.)

**अहूर** पु. नदीचा पूर; अऊर. पहा : **और** (को.)

**अहेतुक, अहेतु-तू** वि. १. ज्याला हेतू-कारण नाही असे; विनाकारण; अकारण. २. निष्काम. [सं.]

**अहेदी** पहा : **ऐदी**

**अहेनवमी** पहा : **अविधवानवमी**

**अहेरण** स्त्री. १. सोनामुखीची एक जात. २. आयरण. ३. ऐरण.

**अहेरा** पहा : **अहिरा**

**अहेराऊ, अहेरी** वि.१. अहेरासाठी योग्य. २. कामचलाऊ, दिखाऊ.

**अहेरावा** स्त्री. अहिरा (रोग). (व.)

**अहेव** स्त्री. १. सौभाग्यवती - सुवासिनी स्त्री : 'भतरिंवीण अहेव । जाण पांतो सर्व विटंबू ।' - एभा १४.२५०. २. सौभाग्य; भाग्य : 'परंतु हे मम सुखसार्थकता हेंच मदीय अहेव ।'- टिक ४०.[सं. अविधवा]

**अहेवतंतु-तू** पु. मंगळसूत्र; सौभाग्यसूत्र : 'कृष्णमणी अहेवतंतू । कंठी धरिला न तुटतु ।'-एरुस्व ७.३६.

**अहेवदोरा** पु. १. मंगळसूत्र. २. नेहमी पाठीस लागलेली नोकरी, उद्योग-धंदा; नेहमी टिकणारा, कायमचा दर्जा, मान, पदवी.

**अहेवनवमी** पहा : **अविधवानवमी**

**अहेवपण** न. पती जिवंत असणे; सौभाग्य : 'अहेवपणें हळद कुंकु ममण्डित मरावें हीच इच्छा सर्व स्त्रियांची.' - भाव ९३.

**अहेवमणि-णी** पु. मंगळसूत्र : 'कीं अजय झाले रणीं । अहेवमणीं ।' -पला ४०.१०१.

**अहेवमरण** न. सौभाग्यवती असता, पती जिवंत असता, सवाष्णपणी आलेले मरण. असे मरण चांगले असते असे मानतात.

**अहेवसुयेव** वि. पती जिवंत असताना मरण आले आहे अशी.

**अहो** उद्गा. १. कोणाला मोठ्या गौरवाने किंवा बहुवचनी संबोधून हाक मारण्यासाठी केला जाणारा शब्दप्रयोग. (अरे चे अव.) काही शब्दांपुढे यातील अ चा लोप होतो. जसे: काय हो, काहो. (ल.) पतीला हाक मारण्यासाठी स्त्रियांनी वापरावयाचे संबोधन. २. आकस्मिक आनंद, आश्चर्य व्यक्त करणारा उद्गार.

**अहोजाहो** अ. आदरपूर्वक बोलणे, हाक मारणे.

**अहोदिवस** क्रिवि. सर्व दिवसभर; रात्रंदिवस. अहोरात्र शब्दावरून (सं. अहस्=दिवस हा अर्थ न समजून) केलेला चुकीचा प्रयोग : 'अहोदिवस अहोरात्र शास्त्राचे अध्ययन केले तरी ते जास्त जास्त गूढ वाटणार' - निमा ४६०.

**अहोनिरंतर** अ. अहोरात्र : 'तुम्ही पत्र न पाठवले, आम्हांस अहोनिरंतर काळजी तुम्हांकडील.' -ऐलेसं १२७.

**अहोपी** वि. लोभी; आशाळभूत; अधाशी. [सं. अह : + पा]

**अहोराती** क्रिवि. रात्रंदिवस : 'राखे अहोरातीं निज भक्तां ।'- एभा २०.१३९. [सं. अहस् + रात्रि]

**अहोरात्र** पु. दिवस आणि रात्र; चोवीस तासांचा, तीस मुहूर्तांचा किंवा साठ घटकांचा दिवस. सूर्योदयापासून दुसऱ्या सूर्योदयापर्यंतचा काल : 'कां अहोरात्रींची गोंवी । आंधळे नेणें । - ज्ञा १८.७१८. क्रिवि. रात्रंदिवस. [सं. अहस् +रात्रि]

**अहोरात्रवृत्त** न. सूर्याच्या दैनंदिन गतीचे वर्तुळ,वृत्त; क्रांतिवृत्त; ज्या वृत्ताची पातळी विषुववृत्ताशी समांतर असून आकाशातील ताऱ्यांतून जाते ते वृत्त. [सं.]

**अहोय** उद्गा. वारे वा! (खा.)

**अळ,अळई** स्त्री. कीड; पहा : **अळी**

**अळई** स्त्री. एक झाड. हे डोंगराळ प्रदेशात आढळते; उंची सुमारे पुरुषभर असून पाने, टाकळ्यासारखी असतात. यास 'ओवी' असे म्हणतात.

**अळका,अळंका** वि. १. पाठीमागे लागलेला; वखवखलेला; ध्यास व छंद घेतलेला. २. (ल.) अडक्या; पैशाचा दास : 'परि अळंकिया आंगवणे होऊनि ठेला ।'- भाए ७१९. ३. हट्टी; हावरा. [का. अळिपु]

**अळकुटी** वि. (चर्मकार) जोड्याचा एक प्रकार.

**अळकुडी** स्त्री. अळवाचा गड्डा, कांदा किंवा मूळ.

**अळकुवा** वि. आसक्त; गुंग झालेला; अतिशय प्रेम करणारा; लंपट; पाठीमागे लागणारा. पहा : **अळका** (कों.)

**अळकेपण** न. आसक्ती; आवड. पहा : **अळकुवा**

**अळखूळे** वि. मोडकळीस आलेले : 'देऊळ अळखुळे जाले' - लीचउ ५५०.

**अळगावणे** अक्रि. १. विण्याच्या, प्रसूतीच्या अवस्थेला येणे (गाय, म्हैस वगैरे). २. पहा : **अलगणे** [सं. अलग्न]

**अळगु** क्रिवि. अलग; अळग; एकीकडे : 'मी उखेंडी जाय अळगु ।' - भाए १४०. [सं. अलग्न]

**अळगौनि** क्रिवि. न शिवता; दुरून : 'उमाइसें स्पर्शे होती । म्हणौनि आळगौनि गोसावियांचेया श्रीचरणा लागली ।'- लीचउ २०९.

**अळण** न. १. हरभऱ्याचे पीठ पाण्यात कालवून, मसाला घालून तयार केलेले कालवण; पिठले; ताक व हरभऱ्याचे पीठ लावून केलेली पातळ भाजी. २. पातळ भाजी दाट होण्याकरिता तिच्यात घातलेले पीठ, बेसन. पहा : **आळण**

**अळणट** वि. थोडा अळणी. [सं. अलवण]

**अळणी** वि. १. मीठ कमी असलेला; मीठ न घातलेला; मिळमिळीत. २. कमी प्रतीचे; ज्यात सत्त्व, तेज, जीव, पाणी, रस, खोंच नाही असे (भाषण, सौंदर्य, लेख, शरीराची ठेवण, मुद्रा, चेहरा वगैरे). खरमरीत किंवा कडक नव्हे असे (भाषण). ३. (सामान्यत : ) बेचव. ४. परिणाम करू न शकणारा; मुळमुळीत. [सं. अ+लवण]

**अळता** पु. १. लाखेपासून तयार केलेला तांबडा रंग; त्यात भिजवलेला कापूस. [सं. अलक्तक]

**अळती** स्त्री. माप. (बे.)[का.]

**अळप, अळपणी** स्त्री. रड; किरकिर; अशक्त, रोगग्रस्त माणसाचे विव्हळणे; रोगग्रस्त कुत्रे मांजर यांचे रडणे, ओरडणे.[सं.आलाप]

**अळपण–णे** न. १. बांधण्यासाठी, गुंडाळण्यासाठी घेतलेली कोणतीही वस्तू; बंद. २. (ल.) निर्बंध; नियमन; अडचण; मोडता. ३. ढोराच्या शेपटास गुंडाळलेली चिंधी. (व.)[सं. आवलन]

**अळपणे** अक्रि. जोराने आवळून बांधणे; घट्ट करणे; भोवताली वेष्टून बांधणे.

**अळपणे** अक्रि. किरकिर करणे; रडणे; ओरडणे; हाय हाय करीत राहणे; लळा असलेल्या माणसाच्या भेटीसाठी रडणे. [सं. आ + लप]

**अळपा** पु. १. बांधण्याकरिता घातलेला वेढा. (क्रि. घालणे-घेणे-देणे). २. बांधण्याचे-वेष्टण्याचे साधन. ३. घट्ट बांधणे-वेष्टणे (क्रि. देणे-घेणे).

**अळबळीत गळबळीत** वि. १. साधा; मनमिळाऊ; घळघळित; जुळते मिळते घ्यावे अशा स्वभावाचा. २. निष्कपट; अनुकूल; प्रिय भाषण बोलणारा. [गळबळचे द्वि.]

**अळमळीत, अळमळीतगुळम(मु)ळीत**- वि. १. मोघम; अनिश्चित. २. मिळमिळीत; कडक, स्पष्ट नसणारे. ३. हयगयीचे; बिन कळकळीचे; टाळाटाळीचे; सुस्तपणाचे (काम,).[गुळमुळीतचे द्वि.]

**अळमी** स्त्री. अळंबी; भुईछत्र्या : 'दंतकळ्यांसारखी अळमी उगवलेली असायची.' - किरि २०. [सं.अलिंब]

**अळमोजी** पु. गबाळ्या मनुष्य; गचाळ मनुष्य. (कों.)

**अळय, अळवट** स्त्री. (कृषी.) नांगरलेली जमीन साफ करण्याचे हत्यार, साधन. [सं. हल + वर्ती.]

**अळवडी,अळूवडी** स्त्री. अळवाची वडी; अळूच्या पानास पीठ लावून, गुंडाळून, उकडून, तळून केलेली वडी.

**अळवण** न. १. पातळ पदार्थ, भाजी दाट होण्याकरिता लावलेले पीठ. पहा : **अळण** २. दाट होणे; जमणे. ३. (ल.) उपासामुळे वाळणे; सुकून जाणे (क्रि. काढणे, घालणे, निघणे).

**अळवण** स्त्री. बाळंतपणात मृत झाल्यामुळे पिशाच्च झालेली स्त्री. बाळंत स्त्रीचे भूत; हडळ; जखीण. पहा : **आळवातीण**

**अळवाची देठी** स्त्री. अळवाच्या देठांचे दह्यातील रायते.

**अळविणे** पहा : **आळणे**

**अळविणे** अक्रि. १. समजूत घालणे; प्रार्थना करणे; प्रेमाने,लाडक्या शब्दाने वश करणे,मन वळविणे (देव, राजा, वल्लभा यांचे); अंजारून गोंजारून लाडीगोडीने समजावणे (तान्ह्या मुलास वगैरे); शांत करणे; सांत्वन करणे : २. विनवणी करणे; मिनतवारी करणे. ३. आलापिणे; गायन करणे; मंजूळ स्वरांनी, तालासुरावर गाणे (राग, गीत, रागिणी, तान). ४. हाक मारणे; बोलावणे. पहा : **आळविणे**[सं. आलापन]

**अळवी** क्रिवि. सन्मुख : 'बीजे करितां चुकवी । तऱ्हाये दृष्टीचिए अळवी ।'-ऋ५०.

**अळवी** स्त्री.धान्यरूपी कर्ज. (बे.)[का.]

**अळवीण** पहा : **आळू**

**अळव्यान** वि. करारबंद; करार केलेले.(गो.) [का. अळवी]

**अळशिकावणे** क्रि. लज्जा उत्पन्न करणे. (गो.)

**अळशी, अळसी** स्त्री. जवस. [सं. अतसी]

**अळशी, अळाशी** स्त्री. एक पेंढी, जुडी बांधता येईल इतके शेतात कापून वाळत ठेवलेले पीक; मूठभर रास. (सामान्यत : ) कापून वाळत ठेवलेले पीक.

**अळशीक** स्त्री. १. लज्जा. २. घाण; अस्वच्छ जागा. ३. आळशीपणा (गो.)[सं. आलस्य]

**अळशीकणो** वि. घाणेरडा. [सं. आलस्य]

**अळसंदा, अळसंदी, अळसुंदा** एक प्रकारचे कडधान्य; मोठी चवळी. [का. अळसंदी]

**अळसिणी** स्त्री. आळशी स्त्री : 'तेथे येकी अळसिणी असे ।' -पंच ४.१६.

**अळसूर** पु. अडसर.

**अळंगे** न. गोणीच्या प्रत्येक बाजूच्या तोंडाला असणारा फासा, कडी; यातून गोणी आवळण्यासाठी तडकणी ओवून घेतलेली असते. [का. अळ = जोडणे]

**अळंगे विळंगे** न.आळोखे पिळोखे; अळेपिळे (क्रि देणे). [सं. अलग्न+विलग्न]

**अळंच** पु. कुजबुज : 'भक्तिजने अळंचु केला' - अली ४८.

**अळंचुपाळंचू** न. अघळपघळ बोलणे : 'अळंचुपाळंचु न कीजे । बोठांतरे नीगैल ते देशांतरा जाईल ।' - लीचउ २.

**अळंटळं** न. १. चेंगटपणा; चुकारपणा; ढिलाई; दिरंगाई; हेळसांड; हयगय; सुस्ती; सावकाशी; आळस; दुर्लक्ष (क्रि. मांडणे-लावणे-करणे). २. टाळाटाळ; चुकवाचुकव; टंगळमंगळ; लांबणीवर टाकणे. ३. अनिश्चितता; शंकास्पद स्थिती; मोघमपणा.
क्रिवि. दिरंगाईने; हयगयीने. [सं. अलं+तत्+अलं]

**अळंदेभळंदे** न. पोळ्याच्या सणात वापरण्यात येणारा रांजण, घागर.

**अळंदी, अळंदे** स्त्री.१. मातीचे रूंद तोंडाचे भांडे.

**अळंबळं** क्रिवि. अळेबळे; मर्जीविरुद्ध : 'तिनं नाम्याला अळंबळं ओढीत त्याचं तोंड आपल्या बाजूला वळवलन्' - जैजै १०३.

**अळंबी, अळंबे -भे** स्त्री. भूछत्र; अपुष्प वनस्पतींचा एक प्रकार; कुत्र्याची छत्री; मश्रुम.

**अळंबे, ओळंबे** पु. वाळवी; वाळिंबे. (गो.)

**अळंक्षा** वि. शून्य. [सं. अलक्ष]

**अळाण्यावळाण्या** स्त्री. समजुतीच्या गोष्टी : 'अशा अळाण्यावळाण्या दाखवून त्या तिला समजावीत.'-बत १६. [वळाण्याचे द्वि.]

**अळाशी** पहा : **अळशी**

**अळिउळ** पु. भ्रमरांचा समुदाय : 'भक्त अळिउळ आलापवी स्वयें ' - एभा ५.५५५. [सं. अलिकुल]

**अळिक** स्त्री पहा : **अळुकी**

**अळिका** स्त्री. अळी; कीड : 'कीं अळिकेवरी द्विजराज ।' - राम २७.८१.

**अळिता** स्त्री. पहा : **अळता** : 'रंग पिळुनि अळिता जणु देति फेंकुनि' - मृच्छ ४२.

**अळिंबा, अळिंबी** पहा : **अळंबी**

**अळी** स्त्री. १. धान्य वगैरेत उत्पन्न होणारा लहानसा लांबट किडा; कीड. २. झाडाच्या पानावर राहणारा व उपजीविका करणारा एक किडा.

**अळीनिळी** स्त्री. अडचण; अडनड : 'कोणाचीही अळीनिळी भागोते' - मेइस १३.

**अळीपिळी** स्त्री. (दोरीचा, वस्त्राचा) वळसा; वेढा. पहा : **अळापिळा** (क्रि. देणे, घालणे, खाणे, येणे, पडणे). [पिळाचे द्वि.]

**अळीबळी** पु. नागपूर भागात कार्तिक शुद्ध प्रतिपदेस बळी व त्याची पत्नी विंध्यावली यांची चित्रे काढून पूजा करतात. यासाठी शेणाच्या दोन उलटसुलट बाहुल्या अंगणात तयार करतात. त्या अळीबळी.

**अळीमिळी गुपचिळी** स्त्री. काही न बोलणे; गप्प बसणे. (वा.) (लहान मुलांच्या खेळातील शपथ) **आळी घालणे** -शपथ घालणे (न बोलण्याची) : 'यावेळीं अळीमिळी गुपचिळी हें वेदसूत्र आठवतें नां ? यावेळीं आधीं बोलेल त्यानें भांडीं घासावी'- हामुबा.

**अळीव** वि. १. आटवलेला; दाट केलेला (रस, पातळ पदार्थ). २. प्रौढ झालेला; वयात आलेला (मनुष्य, देह.).

**अळीव** पहा : **अहळीव**

**अळु** वि. किंचित; थोडे : 'नसे अळुहि प्रपंच लालची ' - दावि ११८.

**अळुकी, अळुकेले** स्त्री. आवड; भूक; प्रीती.
वि. भुकेलेला. [का. अळुगु=प्रेम करणे]

**अळुमळु, अळुमाळ, अळुमाळु** वि. क्रिवि. १. थोडेथोडे; अल्प; किंचित : 'मजहि दर्शन दिधलें अळुमाळ । घातला कवळ मुखामाजी'- बगाथा ३०; (विशेषत : कृत्याविषयी) क्षणभर; लहानसे; कमी. २. परिपूर्ण; ओतप्रोत; विस्ताराने : 'अंगी तारुण्य प्रबळ । शृंगार केला अळुमाळ ।' - कथा १.६.५३. ३. हळूहळू. ४. किंचित देखील; अणूमात्र : 'जैसें तीर्थ आणि जळ ।। भिन्न नसेचि अळुमाळ ।' - भवि १२.११६. ५. चहूकडे.

**अळुवार** वि. नाजूक; हळव्या मनाचा; अरूवार.

**अळू** पु. एक फळझाड. याचे फळ तपकिरी रंगाचे असते.[सं. आलु]

**अळू** न. एक शाक भाजी; याच्या निरनिराळ्या जाती-राजाळु, घावअळू, पान अळू, रुखअळू, मुंडले अळू, रान अळू (तेरी). काळे अळू उत्तम असून अग्निदीपक असते. (वा.) **अळवावर अंचवणे-** उपकाराची जाणीव नसलेल्या माणसावर उपकार करणे. (अळवाच्या पानावर पाणी टिकत नाही यावरून). **अळवावरचे पाणी** (अळवाच्या पानावर पाणी ठरत नाही यावरून) क्षणभंगूर; अशाश्वत; चंचल; अस्थिर.

**अळूवडी** पहा : **अळवडी**

**अळे** न. जुन्या हिशेबलेखनात किंमत, वजन, मापदर्शक दुय्यम परिमाणाच्या मागे घातले जाणारे चिन्ह. उदा २ʻ३= दोन रुपये तीन आणे; ५ʻ३ʻ८ = पाच खंडी; तीनमण; आठशेर.

**अळेण, आळेण** न. आळण; तांदळाचे पीठ.

**अळेदांडी** स्त्री. गाडीचा अगडा (जू आणि दांडीची दोरी) नीट पिरगळून घट्ट आवळण्याकरिता ज्या लाकडाच्या दांडक्याचा उपयोग करतात ते.

**अळेपिळणे** पहा : **अळेदांडी**

**अळेबळे** क्रिवि. कसेतरी; संकटाने; प्रयासाने; जबरीने; जुलमाने; जेमतेम; होय नाही करता; रडतकुढत.

**अळोअळी** क्रिवि. रस्तोरस्ती; गल्लोगल्ली.

**अळोचणे** क्रि. हळूच सांगणे.

**अळोंचो मळोंचो, अळोंचो पाळोंचो** पु. लहान मुलांचा एक खेळ. दोन मुले एका मुलाला दोन्ही काखांत धरून झोके देतात. तेव्हा हे गाणे म्हणतात. [का. अळुचु = हालणे]

**अळ्य** स्त्री. १. अळे (गणितातले). २. शेत साफ करावयाची फळी. (गो.) [अळे]

**अळ्याण** न. अळण; आमटी घट्ट करण्यासाठी तांदळाचे पीठ कालवून लावतात. असे केलेले कालवण. (कु.)

**अक्ष** पु. १. फासा (सोंगट्या खेळण्याचा). उदा. अक्षक्रीडा; अक्षकुशल. २. (ल.)द्युत : 'हे दुर्दशा बरी की पूर्ति असे कीं न अक्षतृष्णेची'– मोसभा ५.३२. ३. माळेत घालण्याचा मणी; रुद्राक्ष. ४. बिब्बा. ५. बेहडा. [सं.]

**अक्ष** पु. कपाळावर एकावर एक असे दोन भोवरे असणारा घोडा.

**अक्ष** पु. १. आस; ज्याच्याभोवती चाक फिरते त्या चाकाच्या नाभीत बसवलेली दांडी किंवा कणा; जिच्याभोवती फिरल्यामुळे एखादा द्विमित पदार्थ त्रिमित दिसतो ती सरळ रेषा; सहनिर्देशक भूमितीमध्ये तसेच स्फटिकविज्ञानात धरण्यात येणारी संदर्भ रेषा. २. विशिष्ट स्थलाचे विषुववृत्तापासून अंतर; अक्षांश. ३. (ग.) ज्या काटकोन त्रिकोणाच्या फिरण्याने शंकू तयार होतो, त्याच्या स्थिर राहिलेल्या बाजूला त्या शंकूचा अक्ष म्हणतात. ४. (जीव.) प्रमुख आधारभूत अवयव; शरीराची, अवयवाची मध्यरेषा; खोड, मूळ यासारखा वनस्पतींचा आधारभूत भाग. ५. (ज्यो.) दीर्घ वर्तुळाचा व्यास. [सं.]

**अक्ष** न. आरोप; जबाबदारी; खापर. पहा : **आकस** [अर. अकस]

**अक्ष** पु. नेत्र; डोळा. [सं. अक्षि ]

**अक्षआवलि** स्त्री. जपमाळ.

**अक्षई** क्रिवि. सर्वकाळ; नेहमी; वारंवार : 'अक्षई पदाचें अधिष्ठान ।'– वेसीस्व १.९. [सं. अक्षय]

**अक्षक** न. १. (वै.) गळसरीचे हाड. २. (प्राणी). पक्ष्यांच्या पंखातील हाडांतील कांब; मणिबंधास्थी. [सं.]

**अक्षकर्ण** पु. (ज्यो.) अक्षक्षेत्राची कर्णरेषा; पलकर्ण. [सं.]

**अक्षकूट** पु. बुबूळ.

**अक्षकेंद्रण न.** (भूशा.) परस्परांशी संबंध जोडण्याची क्रिया. [सं.]

**अक्षक्रीडा** स्त्री. फाशांनी सोंगट्या खेळणे; पण लावून फाशांनी सोंगट्या खेळणे; द्यूत. [सं.]

**अक्षगोल, अक्षगोलक** पु. डोळ्यांचे बुबुळ.

**अक्षजवलन** पहा : **अक्षवलन**

**अक्षज्या** स्त्री. (ज्यो.) अक्षांशाची ज्या; पलज्या. [सं.]

**अक्षणा** न. औक्षण. (तंजा)

**अक्षत** स्त्री. १. तांदळाचा न मोडलेला दाणा. २. अभिमंत्रित केलेले किंवा अभिमंत्रित करण्यासाठी घेतलेले तांदूळ; लग्न, मुंज इ. समारंभात उत्सवमूर्ती व्यक्तींच्या डोक्यावर टाकण्याकरिता, देवतांच्या कपाळी लावण्याकरिता किंवा लग्न, मुंज इत्यादीचे आमंत्रण देण्याकरिता घेतलेले तांदूळ. ३. लग्न-मुंज प्रसंगीच्या आमंत्रणाकरिता निघणारी मिरवणूक (देवास आणि शिष्ट लोकांस अक्षत देण्यासाठी). ४.कपाळावर लावलेल्या गंधात काळ्या रंगाचा जो टिकला लावतात तो किंवा ते गंध. ५. (सामान्यत: ) तांदूळ.[सं.] (वा.) **अक्षत काढणे, फिरविणे, निघणे–** समारंभाचे निमंत्रण करण्याकरिता मिरवणूक निघणे. **अक्षत घेणे** – निमंत्रणाचा स्वीकार करणे. **अक्षत टाकणे–** १. एखाद्या घरावर अक्षत टाकून आतील बोलणे ऐकणे. हा शकून पाहण्याचा एक प्रकार आहे. २. (देवावर)पूजेसाठी आवाहन केलेल्या देवतेचे विसर्जन करणे. ३. एखाद्या गोष्टीवरील हक्क सोडून देणे. ४. लग्नात वधूवरांवर तांदूळ टाकणे; लग्न लावणे : 'अक्षत टाकिली जैसी । मांदिये वरी ।' –ज्ञा १८.७२३. **अक्षत देणे–** विवाहादी समारंभास निमंत्रण करणे. **(डोक्यावर) अक्षत (ता) पडणे** – विवाह होणे. **(तोंडावर) अक्षत पडणे** – मनसोक्त वाटेल तसे बोलणे. **अक्षत भरणे** – शेस भरणे; भांगात कुंकू वा अक्षत भरणे : 'अक्षत भरिली भाणा । दुजा ब्राह्मण मेहुणा । आला होता पाहुणा । स्त्रियेस मूळ ।' – दास ३.३.१०. **(चुलीस) अक्षत लावणे** – १. घरातील सर्व माणसांस, कुटुंबास भोजनास बोलावणे केल्यामुळे चूल न पेटवणे. २. (वेशीस) गावभर, सर्व लोकास आमंत्रण करणे. ३. भाकीत करणे. ४. गुंतवून घेणे; प्रयुक्त होणे. **अक्षत वाहणे** – (मूर्तीवर) अभिमंत्रित तांदूळ देवावर टाकणे,वाहणे. **वाटाण्याच्या अक्षता लावणे–** साफ नाकारणे. (वाटाणे वाटोळे असल्यामुळे कपाळास चिकटून राहत नाहीत म्हणून).

वि. अभंग; इजा न झालेला; शाबूत; धडधाकट; सबंध : 'अक्षतधनु तोंवरि हें वीरशिरोरत्न नावरायाचें– मोद्रोण ३.१२१. २. पतिसमागम न झालेली (स्त्री); अनुपभुक्त (स्त्री)

**अक्षतमरिष्ट** क्रिवि. अडथळा न येता; अप्रहित; अव्याहत; संकट, विघ्न न येता; बिनहरकत. [सं.अक्षतं +अरिष्ट]

**अक्षतय** स्त्री. अक्षयतृतीया. (गो.)

**अक्षतयोनी** वि. पुरुषांशी संग न घडलेली, अनुपभुक्त (स्त्री); बालविधवा; कुमारी; अविद्धयोनी. [सं.]

**अक्षतंतू** पु. (वै.) लांबलचक एकचएक चेतापेशीचा तंतू.

**अक्षतारोपण** न. कंकणे बांधली गेल्यावर वधूवरांचे आयुष्य वाढविण्याच्या उद्देशाने वधूवरांनी एकमेकांच्या डोक्यांवर अक्षता टाकण्याचा विधी. [सं.]

**अक्षतिज, तृतीया** स्त्री. अक्षयतृतीया : 'नवशिके ठाउके बेसुर । चाल बदलून गाती टौर । घरोघरी वाजविती डौर । जशी अक्षतिजेची गौर ।' – पला १५.

**अक्षतेचे खोड** न. काळे गंध लावण्याकरिता उगाळावयाचे लाकूड; काळ्या टाकळीचे मूळ.

**अक्षदंड** पु. (शाप.) १. पृथ्वीचा अक्ष. २. ज्याच्या भोवती एक अथवा दोन चाके चक्राकार गतीने फिरतात असा यंत्रातील मधला आडवा आस. [सं.]

**अक्षद्यूत** पहा : **अक्षक्रीडा**

**अक्षम** वि. १. क्षमता नसलेला; पात्रता,अधिकार नसलेला. २. पंगू; दुर्बळ; असमर्थ; व्यंग असणारा. (आंधळा, लुळा इ.) : 'अक्षमें आणि संन्यासिलें । कां निरिंधन आणि विझालें ।' – ज्ञा १३.२७९. [सं.]

**अक्षम** वि. १. उतावीळ; असहनशील. २. मत्सरी. ३. खुनशी; दया

न करणारा. [सं. अ+क्षमा ]

**अक्षमता** स्त्री. दुर्बलता; आवश्यक तेवढे सामर्थ्य वा शक्ती नसणे; आवश्यक तेवढे अधिकार नसणे. [सं.]

**अक्षमा** स्त्री. १. क्षमेचा अभाव. २. उतावीळपणा; असहनशीलता; अविवेक; अधीरता. ३. मत्सर; हेवा. [सं.]

**अक्षमाला–ळा** स्त्री. रुद्राक्षांची माळ; मण्याची माळ; जपमाळ. [सं.]

**अक्षमी** वि. १. क्षमेस अयोग्य. २. असमर्थ : 'केविगति लाहिजे अक्षमी ।'– ऋ ७. [सं.]

**अक्षम्य** वि. क्षमा करण्यास अपात्र; ज्या बद्दल क्षमा करू नये असा (अपराध, गुन्हा).

**अक्षय, अक्षय्य** वि. १. अविनाशी; नाश न पावणारा; ऱ्हास न पावणारा; नित्य; शाश्वत : 'क्षय पावती इंद्रचंद्र । कृष्ण नरेंद्र अक्षयी ।' – एरूस्व १.७८. २. कधी न सरणारा; कमी न होणारा; निरंतर असणारा. ३. (व्याप.) नित्य; नेहमीचे; निरंतर.

पु. क्षयाचा अभाव. [सं.]

**अक्षयतृतीया** पहा : **अक्षय्यतृतीया**

**अक्षयत्व** न. अविनाशीत्व; अमरत्व : 'जेणे जोडे जीविता । अक्षयत्व ।' – ज्ञा १८.९४६. [सं.]

**अक्षयवट** पु. प्रयाग (अलाहाबाद) येथे गंगा व यमुना यांच्या संगमाजवळ असलेला एक वटवृक्ष. हा फार प्राचीन असून कधी मरत (वठत) नाही असे सांगतात. अशा नावाचे वृक्ष इतर क्षेत्रांतूनही दाखवतात. [सं.]

**अक्षयवाण** दीर्घायुष्य व समृद्धी प्राप्त होण्याकरिता सुवासिनी स्त्रिया ब्राह्मणांना जे वायन (नारळ, वस्त्र, तांदूळ इ.) देतात ते : 'अक्षय वाणें घेऊनि । धांवती नगरीच्या गौळणी ।'– हरि ४.३१. [सं. अक्षय+उपायन–वायन]

**अक्षयवीट** स्त्री. विठोबाच्या पायाखालची वीट : 'अक्षयवीट चरणतळवटी ।' – विठ्ठलाची भूपाळी २४.

**अक्षय सवाशीण, सवाष्ण** स्त्री. १. जिचा पती परागंदा होऊन बराच काळ लोटला आहे व परत येण्याचा संभव नाही अशी स्त्री. २. (ल.) वेश्या; कलावंतीण; नायकीण.[सं.अक्षय + सुवासिनी]

**अक्षयसुख** न. चिरकाल सुख; ब्रह्मानंद; ब्रह्मसुख. [सं.]

**अक्षयी** क्रिवि. १. नेहमी; सतत; सदासर्वकाळ; कधी न चुकता; कधी न टळता. २. अशेषत: ; संबंधच्या सबंध; यच्चयावत. ३. (निषेधार्थी) मुळीच; अगदी. [सं. अक्षय]

**अक्षय्यता** स्त्री. ऱ्हास न पावण्याचा धर्म; टिकून राहण्याचा गुण.

**अक्षय्यतृतीया** स्त्री. वैशाख शुद्ध तृतीया; कृतयुगाचा आरंभ दिवस. या दिवशी केलेल्या जप, होम, तर्पण, दान वगैरेचे फल अक्षय टिकणारे असते, अशी परंपरागत समजूत आहे. [सं.]

**अक्षर** न. १. वर्णमालेतील वर्ण किंवा मातृका. २. श्वासोच्छ्वासाच्या एका सपाट्यात उच्चारला जाणारा ध्वनिसमूह; ज्या एका चिन्हाने भाषेतील दोन किंवा अधिक ध्वनी एकत्र दर्शविले जातात असे चिन्ह; शब्दांचे अवयव. ३. (ल.) विद्या; विद्वत्ता; अध्ययनसंपत्ती. ४. ब्रह्म : ' मग वेदांतें परापर । प्रसवतसे अक्षर ।' – ज्ञा ३.१३६. ५. अव्यक्त प्रकृती. ६. लेख (पत्र, दस्तऐवज).

वि. अविनाशी; नाशरहित; शाश्वत; अव्यय; कूटस्थ; अव्यक्त : ' अक्षयो मी अक्षरु ।' – ज्ञा १८.११९३. [सं.]

**अक्षरओळख** स्त्री. १.अक्षरांची, मूळाक्षरांची ओळख; ज्ञान. २. (ल.) लिहिता वाचता येणे.

**अक्षरक्रमरचना** स्त्री. (ग.) भाषेत असलेल्या वर्णाच्या स्थानानुसार चढत्या क्रमाने केलेली सूचीची अनुक्रमरचना; वर्णानुक्रमरचना.[सं.]

**अक्षरगण** पु. काव्यातील लयबद्धतेसाठी योजलेला लघुगुरू अक्षरांचा ठराविक क्रम. [सं.]

**अक्षरगणवृत्त** न. पद्यरचनेच्या प्रत्येक चरणात अक्षराची संख्या सारखी असणे व त्या अक्षरांचा लघुगुरूक्रम (गण) सारखा असणे.

**अक्षरगुणक** पु. (ग.) स्थिर अथवा चल अव्यक्त मूल्य दर्शविण्यासाठी वापरलेले लिपीतील अक्षरात्मक चिन्ह [सं.]

**अक्षरग्रंथ** पु. (ग्रं.) चिरकालीन महत्त्व असलेला व ज्याच्या अनुषंगाने सातत्याने साहित्यनिर्मिती होते असा ग्रंथ. अभिजात वाङ्मय उदा. रामायण, महाभारत इ. [सं.]

**अक्षरग्रंथयुक्ति–क्ती** स्त्री. (ग्रं.) वर्गीकरण करताना एकाच विषयातील, एका ग्रंथाच्या सर्व आवृत्त्या जवळ आणण्यासाठी योजलेली युक्ती [सं.]

**अक्षरचंचुगण** वि. लेखक; अक्षरजीवी.

**अक्षरजननी** स्त्री. तुलिका; लेखणी.

**अक्षरजीवी, अक्षरोपजीवी** वि. १. विद्येवर उपजीविका करणारा. २. लेखक, पत्रकार, कारकून. [सं.]

**अक्षरन्यास** पु. अक्षरांची मांडणी; शुद्धलेखन; शब्दातील प्रत्येक अक्षर स्पष्ट मांडणे. [सं.]

**अक्षरपद्धति–ती** स्त्री. शब्दांतील अक्षरांची रचना; अक्षरन्यास.

**अक्षरपरिभाषा** स्त्री. १. लिहिण्याची धाटणी. २. विशिष्ट अक्षरांना विशिष्ट किंमत, मूल्य देऊन लिहिण्याची पद्धती. [सं.]

**अक्षरमाला** स्त्री. वर्णमाला; एखाद्या भाषेत वापरण्यात येणाऱ्या एकंदर ध्वनिदर्शक लेखनचिन्हांची परंपरागत यादी. [सं.]

**अक्षरमुद्रण** न. खिळे जुळवून किंवा तप्त धातूवर अक्षरे उठवून व त्यावर शाई लावून केलेली छपाई. या प्रकारे छापलेला मजकूर. [सं.]

**अक्षरमुष्टिकाकथन** न. मनातील अक्षरे सांगणे; मुठीमध्ये कोणता पदार्थ आहे हे सांगणे. [सं.]

**अक्षरलेखनकला** स्त्री. १. सुंदर हस्ताक्षर काढण्याची कला; सुलेखनकला. २. (ग्रं.) ग्रंथ हाताने लिहिण्याची कला.[सं.]

**अक्षरलोप** पु. (सास.) शब्दाच्या सुरुवातीच्या किंवा शेवटच्या स्वराचा, पदाचा लोप. [सं.]

**अक्षरवटिका** स्त्री. १. स्पष्ट वर्णोच्चार; शब्दांचा शुद्ध व स्पष्ट उच्चार करण्याची पद्धत. २. अक्षरांचे वळण; मुद्राक्षरे; मुद्राक्षरांचे वळण. [सं. अक्षर+वर्तिक]

**अक्षरवर्जित** वि. अशिक्षित; अक्षरओळख नसलेला.

**अक्षरवळण** न. अक्षरे लिहिण्याचे किंवा कोरण्याचे तंत्र किंवा कला. [सं.]

**अक्षर वाङ्मय** न. शाश्वत वाङ्मय; काळावर मात करणारे साहित्य; श्रेष्ठ कलागुणांनी युक्त असलेले साहित्य; अभिजात वाङ्मय.[सं.]

**अक्षरव्यूह** पु. (मानस.) इंग्रजी मुळाक्षरांपैकी काही एकदा, काही दोनदा तर काही तीन, पाच किंवा सहा वेळा अनिर्बंध क्रमाने, रांगेने लिहिण्याने तयार झालेला अक्षरगट. (मानसशास्त्रीय प्रयोगात याचा उपयोग करतात.). [सं.]

**अक्षरशत्रु–त्रू, अक्षरशून्य** वि. अशिक्षित; निरक्षर; अज्ञ; मूर्ख : 'एखादा अक्षरशत्रू हमाल असो किंवा कवींचा कवि असो दोघांचाही श्रीगणेशा एकच'– एकच प्याला. [सं.]

**अक्षरशः, अक्षरागणिक** क्रिवि. प्रत्येक अक्षर घेऊन; प्रत्येक अक्षराचा उपयोग करून; खरोखर; पूर्णपणे. [सं.]

**अक्षरात्मक गुणक** पु. (ग.) लिपीतील अक्षराने दर्शविलेला गुणक. उदा. अक्ष–यात 'अ' हा अक्षरात्मक गुणक .

**अक्षरारंभ** पु. सुमुहूर्तावर लहान मुलांना मुळाक्षरे शिकवण्याचा आरंभ; विद्यारंभ. [सं.]

**अक्षरांकनी** स्त्री. (यंअ.) यंत्रावर किंवा त्याच्या एखाद्या भागावर, अक्षरांचे व आकड्यांचे ठसे उठविण्यासाठी वापरले जाणारे, कांबीच्या आकाराचे कठीण पोलादी हत्यार. [सं.]

**अक्षरी** वि. १. अक्षरासंबंधी २. अक्षरांनी लिहिलेली (संख्या). ३. वार, नक्षत्र इत्यादिकांचे ज्ञापक अंक न घालता त्यांची आद्याक्षरे घालून केलेले (पंचांग). [सं. अक्षर]

**अक्षरेषा** स्त्री. (ग.) समीकरण– लेखनातील मूळ रेषा; निर्णयरेषा; मापनरेषा.

**अक्षलग्न** वि. (वन.) अक्षाला (आसाला) चिकटून वाढलेले. [सं.]

**अक्षवण–वाण, अक्षवाणी** न. १. मंगल प्रसंगी पुष्कळ वाती लावलेला दीप. याने घरचा यजमान किंवा देवता यांना ओवाळतात. संकटे, अरिष्टे नाहीशी करण्याचा हा विधी आहे. 'कौसल्यात्मजा रघुवीरा। अक्षवाणें केली'– वेसीस्व ८.६. २. मुलास न्हाऊ घालताना अखेरीस पाणी ओवाळतात ते; औक्षण; अरिष्टे टाळण्याचा, दीर्घायुष्य चिंतण्याचा यात हेतू असतो. [सं. आयुष्यवान्]

**अक्षवलन** न. (ज्यो.) क्रांतिवृत्तीय स्थानावरून ध्रुव व समबिंदू यांवर जाणाऱ्या चापामधील कोन. [सं.]

**अक्षविचलन** न. (ज्यो.) अंडाकृती पृथ्वीवरील चंद्रसूर्याच्या विषम आकर्षणामुळे खगोलीय ध्रुवाचे त्याच्या मध्यमस्थितीभोवती होणारे भ्रमण. [सं.]

**अक्षविमुख** वि. (वन.) मध्यकण्यापासून दूर असणारे (अवयव किंवा भाग). [सं.]

**अक्षविक्षेप** पु. फासे टाकणे; द्यूत खेळणे; अक्षक्रीडा. [सं.]

**अक्षवृत्त** न. विषुववृत्ताशी दक्षिणेस व उत्तरेस समांतर वृत्त. ह्यावरून एखाद्या स्थलाचे अक्षांश समजतात. अक्षांशवृत्त. [सं.]

**अक्षसंमुख** वि. (वन.) खोडासमोरचे; खोडाजवळचे; अक्षालगत असलेले. [सं.]

**अक्षसूत्र** न. रुद्राक्षांची माळ.

**अक्षहृदय** न. द्यूत क्रीडाज्ञान; फाशांचे अंतरंगज्ञान; जुगाराचे रहस्य; जुगारात कसे जिंकावे याचे ज्ञान. [सं.]

**अक्षक्षेत्र** न. (ज्यो.) ज्यातील एक कोन अक्षांशतुल्य आहे असा काटकोनत्रिकोण. [सं.]

**अक्षा, आक्षा** स्त्री. भीती; संशय : 'भोसले यासी कर्ज मागीत होते ते हुजरे जाऊन बसले! त्या आक्षेने जाणोजी भोसले यास सनद दिल्ही की आपण नवाबासी पयेगाम बांधून की ते आपण होऊन पेशव्यासी लढाई घेऊन पुणे लुटू'– सब २९.

**अक्षारलवण** न. १. सुतकात किंवा व्रतस्थ असताना खावयाचे अन्न (मीठ वगैरे न घालता–अळणी); जसे :– गाईचे दूध, तूप, तांदूळ इ. २. असे (अळणी) अन्न खाण्याचे एक व्रत. [सं.]

**अक्षावली** स्त्री. जपमाळ. पहा : **अक्षमाला** [सं.]

**अक्षांति–ती** स्त्री. १. उतावीळपणा; असहनशीलता; असहिष्णुता; अक्षमा. २. दुसऱ्याच्या विजयाचा, वर्चस्वाचा मत्सर, हेवा, असूया. [सं.]

**अक्षांश** पु. (भू.) पृथ्वीच्या दोन्ही ध्रुवांपासून ९० अंश अंतरावर काढलेले जे भूविषुववृत्त,त्यापासून खस्थळापर्यंत जे गोलीय लंबरूप अंशात्मक अंतर ते; विशेषस्थळी ओळंब्याचा (किंवा भूत्रिज्येचा) विषुववृत्ताशी जो कोन होतो त्याचा अंश. [सं.]

**अक्षांशपूरक** पु. (भू.) कोणत्याही अक्षांशात ९० अंश मिळवून अथवा उणे करून येणारा अक्षांश. [सं.]

**अक्षांशवृत्ते** न. विषुववृत्ताशी समांतर अशी, त्याच्या दक्षिणेस व उत्तरेस काढलेली काल्पनिक वर्तुळे. पहा : **अक्षवृत्त** [सं.]

**अक्षि–क्षी** नेत्र; डोळा. [सं.]

**अक्षिका** स्त्री. १. हूक अडकविण्याचे भोक; सुईचे नेढे; वेज; नाक. २. भिंतीत किंवा दारात बसवलेला चोर डोळा. ३. भरतकाम करताना विणलेला डोळ्याचा कलात्मक आकार. ४. (यंत्र.) यंत्रावर काम करताना, एखादी वस्तू बारकाईने पाहण्याकरिता उपयोगात आणावयाचे, डोळ्याला बसवायचे उपकरण. ५. (प्राणी.) कीटकाच्या डोळ्याचा एक घटक. [सं.]

**अक्षिकाकी** स्त्री. वस्तूला केलेले लहान छिद्र.

**अक्षिकूटक, गोलक** पु. डोळ्याचे बुबुळ. [सं.]

**अक्षिकोश** पु. डोळे ज्यात बसविले आहेत तो खोल भाग; डोळ्यांची खाच. [सं.]

**अक्षिगत** वि. दृष्टीला दिसणारे. [सं.]

**अक्षिचालन केंद्र** न. (प्राणि.) बुबुळाच्या हालचालीवर नियंत्रण ठेवणारे केंद्र.

**अक्षिचालनी चेतनी** स्त्री. (प्राणि.) बुबुळाच्या स्नायूंवर नियंत्रण ठेवणारी एक चेतनी (नर्व्ह).

**अक्षिच्छिद्र** न. १. दोरा किंवा फीत ओवण्यासाठी केलेले छिद्र, भोक. २. चोरडोळा. [सं.]

**अक्षितारा** स्त्री. डोळ्यातली बाहुली. [सं.]

**अक्षिपटल** न. डोळ्यावरील पडदा, आवरण. [सं.]

**अक्षिपाक** पु. (आयु.) एक नेत्ररोग. यात डोळ्यांना सूज येते. [सं.]

**अक्षिमूर्धन्य अस्थि–स्थी** न. (प्राणि.) कवटीचे एक हाड. [सं.]

**अक्षिव** न. समुद्राच्या पाण्यापासून झालेले मीठ. [सं.]

**अक्षिविवर** न. (प्राणि.) कवटीवरील डोळ्याच्या खोबणीचा भाग. [सं.]

**अक्षिस्पंदन** न. डोळा लवणे. [सं.]

**अक्षी** वि. (ग्रा.) समूळ; सर्वांशी; अगदी; पूर्णपणे : 'अक्षी झिंझ्या धरूनश्यानी समद्या गावांत धिंड काढीन.' – बाय ३.२. (ग्रा.)

**अक्षीतमरीठ** पहा : **अक्षतमरिष्ट**

**अक्षीय** वि. कण्याच्या दिशेने जाणारा; कण्याविषयीचा; अक्षावरचा; अक्षासंबंधीचा. [सं.]

**अक्षीय अवनमन** न. (भूशा.) भूपृष्ठाच्या पातळीच्या खाली असलेला खळगा. [सं.]

**अक्षीय अस्थि** स्त्री. (प्राणि.) हातातील किंवा चतुष्पाद प्राण्याच्या पुढच्या पायातील एक हाड.

**अक्षीय कंकाल** पु. (प्राणि.) कवटीपासून निघालेला व मणक्यांनी बनलेला, पाठीच्या कण्याचा सांगडा. [सं.]

**अक्षीय सदिश** (भौ.) अक्षाच्या ठरावीक क्षेत्रातून आणि ठरावीक दिशेने जाणारे बल. [सं.]

**अक्षीर–अशीर** वि. अरुंद. (गो.)

**अक्षीवक्षीच्या वाती** स्त्री. अव. एक व्रत. ज्या स्त्रीला भावंडे असतात ती तुलसीविवाहाच्या दिवशी वाती करून देवाला दिवे लावते. [कर्ना.]

**अक्षुण्ण** वि. १. इजा न झालेला; अखंड; न झिजलेला; न वापरलेला. २. (ल.) अस्पृष्ट; अक्षत; अमुक्त; बिनवहिवाटीचा. [सं.]

**अक्षुण्ण मार्ग** पु. १. न वापरलेला रस्ता. २. थोडासा केलेला अभ्यास; थोडीशी आत्मसात केलेली एखादी विद्या. [सं.]

**अक्षेवणे** अक्रि. आक्षेप घेणे : 'अनोबास अक्षेविती'– इप्र १५२२.

**अक्षै** क्रिवि. पहा : **अक्षयी** : 'ऐसा जो विरळा संत । अवघ्या वेगळें मत । अक्षै ज्याचें ।'– दास २.३८. [अक्षयीचा अप.]

**अक्षोट–ड** अक्रोट. [सं.अक्षोट]

**अक्षोणी** स्त्री. जमीन; प्रदेश : 'साहित्य सोनेयाचिया खाणी । उघडविं देशीचिया अक्षोणी ।।' – राज्ञा १२.१२.

**अक्षोणी** स्त्री. मेळावा. [सं अक्षोहिणी]

**अक्षोभ** वि. १. अगाध; अथांग: 'जरी उदकासी नाहीं अंतपार । अक्षोभ सागर भरलासे ।।'– तुगा ६१. २. स्थिर; शांत; खळबळ नसणारे : 'तेचि निर्झर कां अक्षोभ जळ ।'– एभा २३.११९. [सं.]

**अक्षोभनरक** पु. या नावाचा एक नरक : 'अक्षोभनर्की उदंड जीव । या नाव आदिदैविक ।'– दास ३.८.१९. [सं.]

**अक्षोभ्य** वि. क्षुब्ध न करता येण्यासारखा; न खवळणारा; शांत; सौम्य; गंभीर; न रागावणारा (स्वभाव, खोल पाणी). [सं.]

**अक्षौणी, अक्षौहिणी** स्त्री. १. गज २१८७०; रथ २१८७०; घोडे ६५६१०; पायदळ १०९३५० इतके मिळून होणारे सैन्य : 'आंगवणा करावेआं खोंचणी ।वेठिलिआं बत्तीस अक्षौणी ।' – शिव १०३५. २. एकावर एकवीस शून्ये दिली असता होणारी संख्या. [सं.]

**अक्ष्वण** न. ओवाळणे; औक्षण.

**अज्ञ** वि. अजाण; विद्या नसलेला; मूर्ख. [सं.]

**अज्ञात** वि. १. माहीत नसलेला; न समजलेला; अनोळखी. २. (क्र.) अजाण; अज्ञ. ३. जो कोणाला आकलन झाला नाही असा (परमेश्वर) : 'अज्ञाताने घालुनि दिधली चक्रें ती चुकविणें ।'– विवि डिसेंबर १९२२. [सं.]

**अज्ञातता** स्त्री. अज्ञान; अविकल्प भाव; माहीत नसण्याची स्थिती. [सं.]

**अज्ञातपातक, अज्ञातपाप** न. अज्ञानामुळे किंवा नकळत घडलेले पाप. [सं.]

**अज्ञातपूर्व** वि. १. पूर्वी माहीत नसलेला; पूर्वी न घडलेला. २. अगदी नवीन; विलक्षण; अपूर्व. [सं.]

**अज्ञातयौवन–ना** स्त्री. अजाण, अल्लड, वयात न आलेली कुमारी; बालिका; तारुण्य प्राप्त न झालेली स्त्री. [सं.]

**अज्ञातवास** पु. गुप्तपणाने, एकांतात राहणे; कोणाला उमगू न देता राहणे; दूर राहणे. [सं.]

**अज्ञातहत्या** स्त्री. न कळत, अजाणतेपणी झालेला खून, हत्या. [सं.]

**अज्ञान** न. १. ज्ञानाचा अभाव; अजाणतेपण : 'नेणे जीव तो अज्ञान ।'– दास ११.१.३४. २. निरक्षरता; अशिक्षितपणा. ३. भ्रमात्मक ज्ञान; मोह. ४. तारतम्यबुद्धीचा अभाव; असमंजसपणा. ५. मूर्खपणा; अप्रबुद्धता. ६. जीवाच्या सात अवस्थांतील पहिली अवस्था.
वि. १. अडाणी; ज्ञान नसलेला; न शिकलेला; अजाण; जड; मंद. २. (कायदा) सज्ञान नसलेला; अल्पवयस्क. [सं]

**अज्ञानगत** स्त्री. भांबावलेली स्थिती; मोहाची, चित्तवैकल्याची अवस्था. [सं.अज्ञानगति]

**अज्ञानजन** पु. निरक्षर मनुष्य; अविचारी, अडाणी जड मनुष्य. [सं.]

**अज्ञानतिमिर** पु. अज्ञानरूपी अंधकार; गाढ अज्ञान. [सं.]

**अज्ञानधन** न. (कायदा) वयात न आलेल्या मनुष्याची किंवा वेड्या मनुष्याची संपत्ती, मालमत्ता. [सं]

**अज्ञानपटल–पडळ** न. अज्ञानाचा पडदा; आध्यात्मिक अज्ञान; आध्यात्मिक ज्ञानाचा अभाव; ब्रह्म, माया इत्यादिकांच्या संबंधी वास्तविक ज्ञान नसणे. [सं]

**अज्ञानपालक** पु. (कायदा) वयात न आलेल्या मनुष्याच्या मालमत्तेची व्यवस्था पाहणारी किंवा त्यांची काळजी वाहणारी व्यक्ती. [सं]

**अज्ञानप्राणी** पु. बुद्धिहीन प्राणी; विचार, विवेक नसलेला प्राणी; पशू. [सं.]

**अज्ञानबुद्धि–द्धी** स्त्री. १. विवेकहीन किंवा मूर्खपणाची समजूत, कल्पना, ग्रह. २. मूर्खपणा; बुद्धिहीनता.
वि. मूर्ख; बुद्धिहीन; भोळा; बालक. [सं.]

**अज्ञानभुररे –भुरळ** अज्ञानाचा मोह; भ्रम.

**अज्ञानवय** न. १. ज्या वयापर्यंत मनुष्य कायदेशीररीत्या सज्ञान समजला

जात नाही असे वय. २. मनुष्याच्या जन्मापासून वयाच्या अठराव्या वर्षांपर्यंतचा काळ. [सं.]

**अज्ञानवयता** स्त्री. कायद्याने सज्ञान म्हणून ठरवलेल्या वयापेक्षा कमी वय असणे. [सं.]

**अज्ञानसिद्ध** वि. १. अज्ञानामुळे निश्चित झालेले, बनलेले (मत, कल्पना). २. अज्ञानामुळे निश्चित प्राप्त होणारे; मूर्खपणापासून अवश्य मिळणारे (फल, शिक्षा). ३. अडाणी लोकांसही निश्चित माहीत असलेला. [सं.]

**अज्ञानी** ( वि. अडाणी; अजाण; न शिकलेला; ज्ञानी नसलेला.

**अज्ञाव** स्त्री. अवज्ञा. (गो.) [सं. अवज्ञाचा वर्णविपर्यास]

**अज्ञेय** वि. विचारशक्तीच्या पलीकडील; बुद्धीस अग्राह्य; अलक्ष्य. [सं.]

**अज्ञेयवाद** पु. (तत्त्व) आपणास जे वास्तविक ज्ञान होते ते इंद्रियांस गोचर होणाऱ्या वस्तूंचेच होते. ईश्वर, अमरत्व या गोष्टी इंद्रियांच्या म्हणजे प्रत्यक्षाच्या कक्षेपलीकडील असल्याने त्यासंबंधी निश्चित असे काही मत स्थापणे अशक्य आहे असा वाद, मत. [सं.]

**अज्ञेयवादी** पु. (तत्त्व.) जड वस्तूंपलीकडील ईश्वरादी सर्व समजण्यापलीकडचे आहे, अज्ञेय आहे असे मानणारे; अज्ञेयमताचे अनुयायी : 'ती नास्तिक नाही आहे, ती स्पेनरप्रमाणे आणि माझ्याप्रमाणे अज्ञेयवादी आहे.'– सुदे १०८. [सं.]

**अज्ञ्नी** (चुकीचे रूप) अग्नी : 'करोनि थारोळी अज्ञ्नी । आहरसिद्ध '– दावि ३४७.

अं याचा अंतर्भाव स्वरमालेत करण्यात येत असला तरी तो स्वतंत्र स्वर नसून ते एक ध्वनिचिन्ह आहे. हे (ं) या प्रकारे दाखवले जाते. त्याचा उच्चार (अ+शीर्षबिंदूला) वेगवेगळ्या संदर्भात असणारे वेगवेगळे ध्वनिमूल्य असा आहे. शीर्षबिंदूचे हे ध्वनिमूल्य अऐवजी इतर कोणता स्वर आल्यासही लागू पडते. मराठी शब्दांच्या शेवटी मात्र शीर्षबिंदू अ वर असल्यास तो अ चे दीर्घत्व दाखवतो. बिंदुयुक्त केवळ अ उद्गारवाचक असल्यास तो अ हा अनुनासिक स्वर आहे असे दाखवतो. बिंदूचे स्थानपरत्वे ध्वनिमूल्य याप्रमाणे : १. क वर्गीय स्फोटकापूर्वी ङ् : अंक, शंख इ. २. च वर्गीय (तालव्य किंवा दंत्यमूलीय) स्फोटकापूर्वी न् : चंचल, चिंच इ. ३. ट वर्गिय स्फोटकापूर्वी ण् : कंटाळा, सुंठ इ. ४. त वर्गीय व्यंजनापूर्वी न् : अंतर, अंथरूण इ. ५. प वर्गीय व्यंजनापूर्वी म् : शंभर, संमती इ. ६. य पूर्वी सानुनासिक य् : संयम. ७. ल पूर्वी सानुनासिक ल् किंवा व : संलग्न. ८. र, व, श, स, ह या व्यंजनांपूर्वी अनुनासिक व् : संरक्षण, संवाद, संशय, अंश, कंस इ. ९. ज्ञ पूर्वी सानुनासिक व् किंवा न् : संज्ञा.

अं उद्गा. १. नाखुषीचा उद्गार. २. प्रश्नवाचक उद्गार. ३. विचार करून सांगण्यापूर्वीची अवस्था दाखणारा उद्गार.

अंः उद्गा. उं; तिरस्कार, बेपर्वाई, अविश्वास दाखवणारे उद्गारवाचक अव्यय; तुच्छतादर्शक उद्गार.

**अंक** पु. १. संख्या, आकडा (१, २, ३ इ.); आख (अंकगणितातील): 'अंकें जैसीं शून्यें सद्य:कार्यक्षमें, न तीं अन्यें ।'– मोवन ६.३५. २. खूण; चिन्ह; छाप; शिक्का : 'अंक तो पडिला हरिचा मी दास ।'– तुगा १३३८. ३. नाटकाचा एक भाग. ४. नियतकालिकाचा (वर्तमानपत्र, मासिक इ.) एक भाग, अनुक्रम, संख्या. ५. डाग, कलंक : 'सुत हो ! शुद्धांस कसे आतळलें व्यसन अंक हा रविला ।' – मोसभा ७.४२. (तंजा)

**अंक** पु. मांडी : 'आधार शक्तीचिया अंकीं । वाढविसी कौतुकीं ।' – ज्ञा १२.५. [सं.]

**अंकगणित** न. अंक किंवा व्यक्त संख्या यांचा विचार ज्यात केलेला असतो ते शास्त्र. आकड्यांचा उपयोग करणारे शास्त्र. भास्कराचार्यांनी याला 'पाटीगणित' असे म्हटले आहे.

**अंकगति–ती** स्त्री. (हिशेबाचे) आकडे मांडण्याची किंवा मोजण्याची पद्धत. [सं.]

**अंकचक्र** न. (ज्यो.) कालगणना चक्र. हे चक्र ५९ वर्षांचे असते. या कालगणनेत वर्षारंभ भाद्रपद शु. १२ला समजतात. ६ किंवा ० (शून्य) शेवटी असलेले वर्ष गणनेत धरत नाहीत. [सं.]

**अंकचालन** न. (ज्यो.) अंकांची किंवा गणिती कोष्टके, सारण्या; निरनिराळ्या काळांना जुळेल असा अंकांचा फरक. [सं.]

**अंकजाल** न. (पंचांगाचे गणित सोपे करण्यासाठी तयार केलेले) आकड्याचे कोष्टक, सारणी [सं.]

**अंकण** न. पहा : **आकण** : 'अंकणा तुझी सात कणसं'– भोंडला.

**अंकण–णा–णे** न. १. पायात बांधावयाचे पराक्रमसूचक ब्रीद (तोडा). एखाद्यास जिंकले असता, जिंकणारा त्याची प्रतिमा किंवा नावं आपल्या पायातील तोड्यावर कोरीत असे : 'पण स्वामी निमालेया क्रुसावरि । तेहि अपोस्तोली केली कीर्ति थोरी । संसारु बांधला तोडरी । अंकण करूनि'– क्रिपु २.४.११८. २. ब्रीद, विरुद्ध. पहा : **आकंण–णा–णे** [सं. अंकन]

**अंकणकडवे** न. गाण्याचे पालुपद; ध्रुपद.

**अंकणा** पु. १. पहा : **आंकणा** २. पायातील पैंजण.
वि. अंकित : 'तेथ मुखाचा अंकणा चंद्र ।'– रुस्व ८७९.

**अंकणे** उक्रि. १. (सामान्यत : ) खूण करणे; मोजणे; छाप मारणे; आखणे; चितरणे : 'मी अनंगव्रतें असे अंकिली... । ती काय जाणाल स्वामिया ।।' – जै १७.११७. २. रेखाटणे; नकाशा काढणे; बेतणे; आराखडा काढणे; वर्णन करणे; पहा : **आंकणे**. ३. योजणे; संकल्प करणे. ४. अंकित होणे; वश होणे : ' कामाचे विकिले क्रोधाचे जिंकिले । लोभाचे अंकिले सर्वभावे ।।' – बगाथा १९.१.५. अंकित, स्वाधीन करणे. [सं. अंकन]

**अंकणे** न. धाबे, माळवद इत्यादींवर पडलेले पाणी वाहून जाण्यासाठी केलेला उतार. [का. अंकण]

**अंकदानपद्धति–ती** स्त्री. (शिक्षण.) शिक्षणात किंवा उद्योगात प्रत्यक्ष काय मिळवले, संपादन केले याची अंक देऊन मूल्यमापन करण्याची पद्धती. [सं.]

**अंकदार** पु. गावातील काही जमिनींचा मालक; खातेदार; सारा भरणारा.

**अंकन** न. १. खूण करणे; मोजणे; आकडे घालणे. २. ग्रंथवर्गीकरणासाठी

योजलेली आकडे, अक्षरे व अन्य संयोगचिन्हे यांनी युक्त असलेली सांकेतिक चिन्हलिपी. ३. (ग.) सोयीस्कर परिमाण घेऊन रेषेचे भाग करून भागदर्शक खुणांवर भागनिर्देशक अंक प्रस्थापित करणे. उदा. लांबी मोजण्यासाठी सरळपट्टी अंकित केली जाते, तर कोन मोजण्यासाठी वर्तुळाकार पट्टीवर कोनदर्शक खुणा केल्या जातात. ४. अंगावर देवता चिन्ह किंवा नाव डागणे, गोंदणे. [सं.]

**अंकनयंत्र** न. पोस्टाच्या तिकिटाऐवजी तेवढ्याच किंमतीचा शिक्का पत्रांवर उमटवणारे यंत्र. सरकारी कार्यालये, मोठ्या कंपन्या वगैरे ठिकाणी या पद्धतीने पोस्टाचा खर्च भरला जातो. [सं.]

**अंकनीय** वि. चिन्ह करण्याजोगे; गणना करण्याजोगे. [सं.]

**अंकपट्टी** स्त्री. (कापडाच्या गाठींमधील) कापडाच्या अनुक्रमाची, किंमतीची किंवा इतर माहितीची चिठ्ठी; बीजक. पहा : **आंकपट्टी**

**अंकपाश** पु. संख्यारचनेसंबंधी प्रकार : 'त्याने गणितातील अंकपाश व एकीकरण ह्यांच्या मदतीने सर्व जातींची उत्पत्ति कशी झाली असावी त्याचा गणिती हिशेब केला आहे.'– हिंस ७५. [सं.]

**अंकमुख** न. (सा.) नाटकातील संविधानकाचें सूचन केलेला अंकाचा एक भाग. [सं.]

**अंकमोडणी** स्त्री. १. आकडेमोड; हिशेब. २. अंक मांडण्याची पद्धत. (डावीकडून उजवीकडे किंवा उजवीकडून डावीकडे). ३. बोटे मोडून अंक मोजणे.

**अंकराशि–शी** स्त्री. संख्येची मालिका, ओळ; बेरजेसाठी ओळीने मांडलेल्या रकमा. [सं.]

**अंकरी** स्त्री. कुळीथ; हुलगा.

**अंकरीब** क्रिवि. जवळ; लौकरच : 'खर्चाचा मजकूर तर खर्चासही येथून अंकरीब पाठवीत असो.' –सासंइ ७५. [फा.]

**अंकलिपि–पी** स्त्री. १. आकडे लिहिण्याची पद्धत; संख्या-लेखन पद्धती; अठरा लिपींपैकी एक. २. आकडे, पाढे, मुळाक्षरे वाचन यांची मुलांना ओळख करून देणारे अगदी पहिले पाठ्यपुस्तक, उजळणीचे पुस्तक. [सं.]

**अंकशास्त्र** न. (ग.) अंकांच्या प्रकारांचा, गुणधर्मांचा अभ्यास करण्याचे शास्त्र. [सं.]

**अंकसळ, अंकशाळ** पु. १. सोनार. पहा : **अंकसाळी** २. सोने कसोटीस लावण्याचा दगड : 'कां भंवरेंचि केला मळा । वरकलुचि जाला अंकसाळा ।'– ज्ञा १८.४९२.

**अंकसंकल्पना** स्त्री. अंक, आकडे याविषयीची निश्चित कल्पना; अंकांची समज. [सं.]

**अंकसाळ** स्त्री. टांकसाळ; चलनी नाणी तयार करण्याचे ठिकाण.

**अंकस्थल–स्थान** न. (ग.) आकड्यांची जागा. [सं.]

**अंकात्मक गुणक** पु. (ग.) पदातील चल वा अचल अव्यक्त संख्येस ज्या अंकाने गुणलेले असते तो अंक. [सं.]

**अंकात्मक स्थळ** न. (ग.) जेथील अंक मूल्य निश्चितीसाठी महत्त्वाचा असल्याने लिहिणे आवश्यकच असते असे संख्येतील स्थळ. उदा. ३१०५ या संख्येतील दहं स्थान हे महत्त्वाचे आहे व तेथील '०' हा अंक गाळून चालणार नाही. परंतु २.५० या संख्येतील '०' गाळले तरी मूल्य बदलणार नाही. [सं.]

**अंकित** वि. १. चिन्हित; खुणा केलेले. २. मर्यादित; सांगितलेला, ज्याचा मार्ग किंवा वागण्याची रीत ठरवून दिली आहे असा. ३. सेवक; ताबेदार; गुलाम : 'तैसा मी संतांचा अंकित । –दास १.६.२०. ४.वश: 'केलीं नारायणें आपुली अंकित' – तुगा ११. [सं.]

**अंकित राज्य** न. दुसऱ्या राष्ट्रावर आधारलेले राज्य.

**अंकित रोखे** पु. (अर्थ.) नोंदणीकृत रोखे.

**अंकिला** वि. स्वाधीन असलेला, ताबेदार; सेवक; गुलाम : 'चारी मुक्ति ज्याच्या दासी होती । त्याचा अंकिला मी श्रीपती ।'– एभा २२.६९१.

**अंकी** वि. १. अंकाने लिहिलेला, आकड्यात लिहिलेला, मंडित केलेला; याच्या उलट अक्षरी. २. तिथिवाचक अक्षरांनी न लिहिता त्याऐवजी केवळ अंकांनीच लिहिलेले (पंचांग इ.)

**अंकीय संगणक** पु. आकड्यावर आधारलेला संगणक.

**अंकीय संगणित्र** न. (भौ.) दशांशपद्धतीतील, द्विविर्ण पद्धतीतील किंवा इतर पद्धतीतील अंकांची गणिते, कूटप्रश्न सोडवणारे यंत्र; गणनयंत्र; संगणक. [सं.]

**अंकु–कू** पु. शिष्य; सेवक : 'या बोला आना होये । तरी व्यासाचा अंकु न वाहें । ऐसें गाजोनि बाहे । उभिली तेणे ।' – ज्ञा १८.१६५९. [सं. अंक]

**अंकुडे** वि. आकडा असलेले; आकड्यासहित; वाकड्या अणीचे.

**अंकुर** पु. (वन.) १. खोडावरील कळी; बियातील गर्भ; कोंब, बीज अथवा बीजुक रुजल्यावर त्यातून आलेला वनस्पतीचा आरंभीचा खोड व पाने यांचा किंवा तत्सम शाकीय भाग. २. (ल.) मूल; वंशवृक्षाचा कोंब; वंशज : 'गंगाबाईच्या या एका अंकुराशिवाय कुणीच वंश नव्हता.' – इंप २८. ३. अणकुची; टोक. ४. भावी कर्तृत्वाचे चिन्ह. (असे लहान मुलाच्या अंगचे – चेष्टा, भाषण इ.) (क्रि. दिसणे.) [सं.]

**अंकुरक** पु. (शाप.) उंचवटा. [सं.]

**अंकुरण** न. उगवण; बीज किंवा बीजुक अनुकूल परिस्थितीत रुजण्याची प्रक्रिया. [सं.]

**अंकुरणक्षम** वि. मोड फुटण्यास योग्य.

**अंकुरणे** अक्रि. १. कोंब फुटणे; मोड येणे; उगवणे; प्रकट होणे: 'भाजलें तें बीज अंकुरेना कदा । न मिळेचि दुधामाजी लोणी ।' – बगाथा ३४५. २. (ल.)अंगावर रोमांच उभे राहणे : 'त्या महोत्सवेविशेषें अंकुरलें अंग ।'– रासपं २.२१२. ३. आशा पल्लवित होणे.

**अंकुरित** वि. १. अंकुर फुटलेला; उगवलेला. २. (ल.) स्पष्ट झालेला; दिसू लागलेला; प्रादुर्भूत; प्रकट झालेला; परिस्फुट झालेला (गुण, कला इ.). [सं.]

**अंकुश** पु. १. हत्तीला ताब्यात आणण्याचे, एका बाजूला आकडीसारखे वाकवलेले हत्यार; टोचणी : ' ध्वजवज्रांकुशरेखा । चरणींची सामुद्रिकें देखा ।'– एरुस्व १.२२. २. आकडी, आंकुशी. ३. जैन यतीच्या

हातातील एक उपकरण ज्याने तो देवपूजेकरता वृक्षाची पाने फुले काढतो. ४. दाब; निर्बंध; आकलन; मर्यादा. ५. तुरा, शिरपेच : 'इये सृष्टी । गंगेसमान माझिये दृष्टीं । जितेंद्रियत्व गुणाचे मुगुटीं । वरी अंकुश खोविला ॥'-मुआदि २३.७१. ५. अनिष्ट प्रवृत्ती वाढू नयेत म्हणून केलेली कडक योजना, ठेवलेले नियंत्रण. ६. (वन.)टोकाशी आकड्यासारखे मागे वळलेले उपांग. : उदा. हिरवा चाफा, वेत. [सं.] (वा.) **अंकुश लावणे–** जबरदस्तीने ताब्यात ठेवणे. **अंकुश मारणे–** टोचणी लावणे. (गो.)

**अंकुश कृमि–मी** पु. (वै.) आतड्याला चिकटून असणारे आकड्यासारखो चपटे रक्तशोषक कृमी. [सं.]

**अंकुशनदी** स्त्री. (भूशा.) अंकुशासारखी (आकडीसारखी) वाकण असलेली नदी.

**अंकुशी** स्त्री. १. आकडी; अंकुश. २. लहान अंकुर.

**अंकुशी, अंकुसी, अंकोसी रुपया** पु. अंकुशाचा छाप असलेला पेशवाईतील रुपया.

**अंकुसमुद्रा** स्त्री. इंद्राची विद्या : 'इंद्राची अंकुसमुद्रा वर्तती असे'– लीचपू ३९४.

**अंकेक्षक** पु. हिशेब तपासणारा.

**अंकोल –ळ** पु. स्त्री. डोंगरात वाढणारे एक झाड.
न. या झाडाचे फळ.

**अंख** पु. डोळ्याजवळचा.भाग; डोळा व कान यांच्यामधील भाग. [सं. अंक]

**अंख** पु. अंक; आकडा; संख्या; अंकगणितातील चिन्ह.

**अंखोअंख** क्रिवि. ऐन किमतीस, मूळ किमतीस(विकणे किंवा विकत घेणे).

**अंग** न. १. आंग; शरीर; देह : 'पै जयोचेनि अंगसंगे ।' – ज्ञा ९.२६९. २. शरीराचा अवयव, इंद्रिय, गात्र : 'अति क्षीणता पावली सर्व आंगे'– दावि २४२. मेद, मांस. ३. (ल.) कोणत्याही गोष्टीचा घटक विभाग.४. वेदांग–वैदिक वाङ्मयापैकी विशिष्ट भागास संज्ञा उदा. शिक्षा, ज्योतिष, निरुक्त इ. ५. बाजू; दिशा : 'आठै आंगें पोळती । वसुंधरेची ।' – शिव ७४८. ६. एखाद्या कामात असलेला हात, घेतलेला भाग, एखाद्या कामास आतून दिलेली फूस. ७. अधिष्ठान; ठिकाण; शरीर; देह (एखाद्या गुणदोषाचा कर्ता, पात्र). ८. एखाद्या वस्तूचा किंवा कार्याचा गौण अप्रधान भाग. ९. आतड्याचा गुदद्वाराबाहेर येणारा भाग किंवा प्रसूतीनंतर योनीच्या बाहेर येणारा भाग. १०.विशिष्ट काम करण्याची पात्रता, ताकद, क्षमता, बुद्धी, कौशल्य, चातुर्य. ११. आपल्या बाजूचा मोठ्या अधिकारावरील माणूस; तरफदारी करणारा, वशिला लावणारा माणूस. १२. (ज्यो.) पूर्व क्षितिजावरील क्रांतिवृत्तावरचा बिंदू, अंश. १३. खूण : 'अनुभवांची आंगें जाणें । योगियांचे खुणे बाणे ।' – दास ५.९.२२. १४. मगधाच्या पूर्वेचा जुना बंगाल देश. १५. आचारांग सूत्रांपैकी एक जैन आगम ग्रंथ. १६. स्वतः ; खुद्द. आंगे असाही प्रयोग आढळतो : 'राहोनि गुप्त धृष्टद्युम्नें तच्छोध लाविला आंगें ।'– मोआदि ३४.१८२०. १७. प्रकार : ' कारभाराचे सांगावे अंग कैसें ।' – दास ११.५.२३. [सं.](वा.) **अंग ओढवणे** – एखादे कार्य आपल्या अंगावर येणे, स्वत:पुढे होणे. **अंग काढणे, काढून घेणे** – स्वत: एखाद्या कामातून माघार घेणे, संबंध तोडणे. २. बाजूला होणे; भाग घेण्याचे किंवा लक्ष देण्याचे थांबवणे. **अंग घालणे** – १. हात घालणे; मदत करणे; मन घालणे. २. दु:खामुळे जमिनीवर पडणे : 'ऐकोनिया आंग घाली पृथ्वीवरी' – दास ३.५.३०. ३. भाग घेणे; लक्ष देणे. **अंग घासणे** – झीज सोसणे : ' परांजप्यांनी प्रामाणिकपणाने अंग घासून... स्वत:ची स्कीम करून कार्यास लागावे.'– केले १.२६३. **अंग घेणे** – १. लठ्ठ होणे. २. कामात भाग घेणे. **अंग भारणे** – पहा : **अंग घेणे. अंगचटी जाणे,येणे**– लगट करणे : मनीच्या अंगचटीला जाऊ नको...– सीपो ४. **अंग चढणे** – विभागात पडणे; सदरात पडणे; वर्गात येणे : ' जे विधीसी नातुडे । तें निषेधाचें अंग चढे ।' –एभा ७.२९. **अंग चढून येणे** – ताप भरणे, चढणे. (व.) **अंग चोरणे**– १. अंग राखून काम करणे, टंगळमंगळ करणे, चुकारपणा करणे. २. शरीराचा भाग आकुंचित करणे (मार चुकवण्यासाठी.) **अंग जड करणे** – एखाद्या कामात भाग घेण्याचे टाळू पाहणे. **अंग जड होणे** – अंगावर काटा उभा राहणे. **अंग जोगावणे**– पहा : **अंग चोरणे. अंग झटकणे** अजिबात संबंध नाही असे सांगणे : ' गोखल्यांनी आपले अंग झटकले.'– उकथा ११६–१७. **अंग झटकून कामाला लागणे**– तयार, तत्पर होऊन, आळस न करता कामाला सुरुवात करणे : 'सारी मुंबई अंग झटकून कामाला लागली होती.' – मुंदि ३५. **अंगझटीला येणे**– अंगाशी भिडणे, झोंबणे, चिकटणे : 'अंगझटीला येतो मेला,'– सबा ११. गुप्त ठेवणे; संबंध नाही असे बाहेरून दाखवणे. **अंग झाडणे** – १. साफ नाही म्हणून सांगणे; नाकबूल करणे : 'आंग झाडिती न ममें । येणे बोलें ।' – ज्ञा १७.३७२. २. अव्हेरणे. **अंग टाकणे**– १. अशक्त होणे; वाळणे २. जोराने देह जमिनीवर टाकणे. ३. विश्रांतीसाठी आडवे होणे. ४. कसेतरी अस्ताव्यस्त पसरणे. **अंग टेकणे**– १.आश्रय करणे : 'योगें आंग टेकिलें योगी'– अमृ ९.२६. २. बसणे; विश्रांती घेणे. **अंग दर्शवणे**– एखाद्या गोष्टीत किंवा व्यवहारात हात किवा संबंध आहे असे भासवणे. **अंग दाखवणे**– एखाद्या कामात कौशल्य दाखवणे, फड जिंकणे. **अंग न दाखवणे** – अंग असल्याचे लपवणे; मागे राहणे; जबाबदारी टाळणे. **अंग देणे** – १. मदत करणे; हातभार लावणे. २. प्रवृत्त होणे, वळणे, **अंग दुमडणे, दुडपणे, दोडपणे**– अंग चोरणे. **अंग धरणे**– १. ताठरणे; संधिवाताने शरीर आखडणे. २. लठ्ठ होणे; ताकद येणे. ३. अवयवांची हालचाल करता न येणे. ४. एखादे काम नीट होणे : ' त्याने बत्ती पेटवण्याचा प्रयत्न केला पण बत्ती अंग धरीना...' – शेलूक ७. **अंग मरणे** – अर्धांगवायूने शरीर अथवा एखादा अवयव बधीर होणे. **अंग मारणे**– १. पहा : **अंग चोरणे**. २. जोराने अंग आत घुसवणे : ' मी अंग मारून स्वत:चा बचाव केला.' – वासिमाससो ४८. **अंग मुरडणे**– मुरडणे; मागे पाहात दिमाखाने जाणे; ठमक्याने

जाणे. **अंग मोडून काम करणे**- खपणे; श्रम करणे; अतिशय मेहनत करणे; जिवाकडे न पाहता काम करणे; जीव पाखडून काम करणे. **अंग मोडून येणे**- तापाने अंगावर काटा येणे; कणकणणे; कसकसणे : 'तदुपरि अविलंबें अंग मोडून आलें ।' - सारुह ३.५७. **अंग येणे**- १. लठ्ठ होणे. २. प्रसूतिसमयी गुह्यांग बाहेर येणे. **अंग रक्षण करणे, राखणे, वाचवणे**- अंग चोरणे, आपला बचाव करणे : ' यश रक्षावें न आंग लोकांही ।' - मोउद्योग १०.६१. **अंग लपवणे**- पहा : **अंग झाकणे. अंग वाचवणे**- पहा : **अंग रक्षण करणे. अंग सावरणे**- १. तोल सावरणे. २. गेलेली ताकद पुन्हा मिळवणे, पूर्व स्थितीवर येणे. **अंग सुटणे**- लठ्ठ होणे. **अंग सोडणे**- खंगत जाणे. **अंग हलके होणे**- हायसे वाटणे; जबाबदारीतून मोकळे झाल्याबद्दल समाधान वाटणे. **अंगहीन करणे**- डोळे काढणे : 'गुलाम कादर दिल्लीत येऊन पातशहास अंगहीन करून अमर्यादा केल्या. त्याचे पारिपत्य केले असतां चांगलें, असें जाणून फौज रवाना केली.' - मदरु २.६०. **अंगाखालची बायको** - राख; उपस्त्री. **अंगाखाली घालणे**- स्वतःच्या चैनीसाठी अथवा उपभोगासाठी बाई राखणे. **अंगाखाली पडणे**- १. सवयीचे होणे. २. भोग देणे, रतिसुख देणे, घेणे. **अंगाखांद्याकडे पाहणे** - श्रमाचा विचार करणे. **अंगाखांद्यावरचे**- (बायकी) (ल.) दागिने. **अंगाचा आकडा होणे**- आकडीने पेटके येणे; अंग वाकडे होणे. **अंगाचा आळापिळा करणे**- १. अंग पिळवटणे, आळेपिळे देणे. २. अतिशय श्रम करणे. **अंगाचा इस्तू करून घेणे**- अंगाची आग करून घेणे; संतापणे; फार रागावणे : 'जरा दिरंग लागला तर इस्तू करून घेतात अंगाचा'-पाचोळा ६८. **अंगाचा खकाणा करणे**- संताप करून घेणे. (व.) **अंगाचा खुर्दा होणे**- अतिशय श्रमाने अंग ठणकणे, गलितगात्र होणे; मणके ढिले होणे. **अंगाचा तिळपापड उडणे**- संतापाने शरीर तापणे, भयंकर संताप येणे : 'सखू हे तुझं ऐश्वर्य पाहून तुझ्या भिमावन्संच्या अंगाचा तिळपापड उडायचा.'- संतस ५९. **अंगाचा भडका होणे**- पहा : **अंगाचा हुरपळा होणे. अंगाचा हावळा होणे**- पहा : **अंगाचा तिळपापड होणे** : संतापानं तिच्या साऱ्या अंगाचा हावळा व्हायचा - वळीव १४१. **अंगाचा हुरपळा होणे** - अंग अतिशय तापणे; तापाने, संतापाने अंगाची लाही होणे, आग होणे. **अंगाची आग होणे**- रागाने, संतापाने अंगाची आग होणे. **अंगाची चौघडी करणे**- १. शरीराच्या चार घड्या करणे (डोंबाऱ्याच्या कसरतीत). २. सर्व अंग पोटाशी घेऊन निजणे. (थंडी, ताप इ. मुळे). **अंगाची लाहकी होणे**- पहा : **अंगाची आग होणे. अंगाची लाही करणे**- संतापवणे; खिजवणे; भाजणे; जाचणे. **अंगाची लाही-हुरपळा होणे**- १. उन्हाने अतिशय अंग तापणे; काहिली होणे; भडका होणे. २. अतिशय संताप येणे (जोंधळा इ. धान्याची भाजून लाही होते त्याप्रमाणे) : 'ते तिजला खपलें नाहीं । अंगाची झाली लाही ।' - विक १७. **अंगाची होळी होणे**- पहा : **अंगाची आग होणे. अंगाचे आंथरूण करणे**- स्वतःबद्दलची काळजी सोडून दुसऱ्यासाठी सर्व प्रकारच्या संकटांना तोंड देणे; एखाद्याचे काम करण्यासाठी स्वतःच्या जीविताची पर्वा न करणे. **अंगाचे अंथरूण होणे**- आजारपणामुळे अशक्तता येणे; उठवणीस येणे; मरगळीस येणे. **अंगाचे कातडे काढून जोडा शिवणे**- (एखाद्याविषयी)अतिशय कृतज्ञता, आदरबुद्धी दाखवणे. **अंगाचे चकदे काढणे**- अंगाचे मांस बाहेर येईल इतक्या जोराने, बेदम मारणे; अंगाची सालटी काढणे. **अंगाचे -चा तिळपापड होणे**- १. रागाने शरीराची लाही होणे : 'मी दहांच्या तोंडून ऐकलं आणि माझ्या अंगाचा असा तिळपापड झाला की सांगता पुरवत नाही.' - मोप्र १५. २. रागाने बेफाम होणे. **अंगाचे धुडके उडवणे**- शरीराच्या लक्तऱ्या काढणे; चेंदामेंदा करणे; फार झोडपणे. **अंगाचे पाणी करणे**- अतिशय श्रम करणे (त्यामुळे अंगास पाणी, घाम येणे.) : 'अंगाचे पाणी करूनच या हतभाग्या आयुष्याचे दिवस मला लोटले पाहिजेत.' - पाव्ह ९९. **अंगाचे पाणी होणे**- घाबरणे; भीती वाटून घाम येणे. **अंगाच्या चिंध्या करणे** - १. अंग ओरखडणे (व.) २. त्रास देणे. **अंगा जाणे** - स्वाधीन होणे, बळी पडणे. **अंगात बसणे** - पहा : **अंगाबरोबर होणे. अंगात येणे**- १. भूतसंचार होणे, २. अतिउत्कंठेने काम करणे. **अंगात वारे शिरणे**- पहा : **अंगात येणे;** कमालीचा उत्साह उत्पन्न होणे. **अंगात शीळकळा येणे** - अंगात देव येणे, वारे येणे. (माण.) **अंगानिराळा (बाहेर) टाकणे, झिडकारणे, झोकणे, सोडणे**- (कामधंदा, जबाबदारी) सोडून देणे; अंगावर न घेणे. **अंगानिराळे करणे**- पहा : **अंगाबाहेर टाकणे. अंगाबरोबर होणे, अंगात बसणे**- एखादा कपडा अंगास बरोबर बसणे, ठीक होणे, बेताचा होणे. **अंगाला खार लावून घेणे**- १. श्रम करणे; मेहनत करणे. २. स्वतःचे नुकसान करून घेणे, स्वतःवर दोष ओढवून घेणे. **अंगाला लावणे**- अंगाला तेल हळद वगैरे चोपडणे : 'नवी नवरी म्हणून अंगाला लावीन म्हटले, नाहीं.' - झांमू. २. बाळंतिणीचे अंग रगडणे, चोळणे. **अंगावर असणे**- १.बाकी असणे; शिल्लक असणे, राहणे.२. लळा असणे. **अंगावर असणे, होणे**- कुशीवर निजणे; पडून राहणे. **अंगावर काटा उभा राहणे**- भीतीने किंवा आनंदाने अंग रोमांचित होणे : 'वृत्तश्रवणें आला सर्वांगी आमुच्या पहा काटा ।' - मोकर्ण १८.१ **अंगावर काढणे**- (आजार वगैरे) सोसणे; सहन करणे. **अंगावर ओघळणे, कोसळणे,कोसळून पडणे**- १. रागाने एखाद्याच्या अंगावर चालून जाणे, पडणे. २. संकट, आपत्ती वगैरे गुदरणे, जबाबदारी येणे; आपत्तीत सापडणे. **अंगावर खाणे**- पहा : **अंगावर पिणे. अंगावर गोण किंवा गोणी येणे** - अंगावर जोखीम किंवा जबाबदारी येणे.(व.) **अंगावर घेऊन**- स्वतःवर जबाबदारी घेऊन; आपले म्हणून; कैवार घेऊन (क्रि. करणे, बोलणे, सांगणे, पुसणे, विचारणे) **अंगावर घेणे**- १. मुलाला प्यावयास देणे, घेणे; थान देणे, स्तनपान देणे. २. स्वतःवर जबाबदारी घेणे. ३. आपला म्हणणे, अतिशय प्रीती दाखवणे. **अंगावर तुटणे-तुटून पडणे**- हल्ला करणे; धावून जाणे; एकदम

चालून जाणे. **अंगावर देणे**– जामिनकी किंवा गहाण न घेता वैयक्तिक जबाबदारीवर कर्ज वगैरे देणे. **अंगावर देणे–बांधणे–भरणे–पोसणे–करणे**– स्वतःच्या जबाबदारी–साधन–संचय यावर देणे, बांधणे वगैरे. **अंगावर पडणे**– १. शिरावर पडणे; विक्रीस नफा होईल म्हणून जो माल खरेदी केला तो अडीअडचणीमुळे, भाव उतरल्यामुळे आपल्याजवळ पडून राहणे; तोटा भरून देण्याची जोखीमदारी अंगावर घेणे. २. गळ्यात येणे, एखादा धंदा अगर काम करण्यास भाग पडणे. ३. रागाने चालून जाणे, वसकन अंगावर येणे. ४. हल्ला करणे, चालून येणे. ५. अप्रिय नापसंत वस्तू पत्करावी लागणे. **अंगावर पिणे**– मुलाने स्तनप्राशन करणे; मूल स्तनप्राशन करण्याइतके लहान असणे. **अंगावर येणे**– चिडून एकदम ओरडणे : 'मेला कुत्र्यासारखा अंगावर आला.'– लव्हाळी १८५. **अंगावर शेकणे**– १. व्यापारात, व्यवहारात तूट येणे, बूड येणे; कुभांड येणे; मोठे अपयश येणे. २. थट्टेचा वाईट परिणाम होणे. **अंगावर (चे) जाणे**– (बायकी) महिन्याच्या महिन्यास तरुण स्त्रीच्या शरीरातून जसे दूषित रक्त बाहेर जाते तसे अवेळी जाऊ लागणे; धुपणी रोग होणे. **अंगावरचे तोडणे**– तान्ह्या मुलाचे अंगावर पिणे बंद करणे. **अंगावरून जाणे**– शेजारून जाणे : 'अनोळखी माणसासारखं तिच्या अंगावरून जायचं'– लव्हाळी २०९; अगदी जवळून जाणे. **अंगावरून वारा जाणे**– अर्धांगवायू होणे : 'भूतपिशाच्च लागले । अंगावरून वारे गेले ।'– दास ३.७.५५. **अंगाशी येणे**– पहा : **अंगावर शेकणे** : ' हिटलरनं मास्कोवर केलेला हल्ला साफ अंगाशी आला.' –लव्हाळी १३६. **अंगास कुयला लागणे**– मत्सराने किंवा संतापाने हिरवानिळा होणे, मिरच्या लागणे, अतिशय राग येणे. **अंगास झोंबणे**– (व.) अंगास स्पर्श करणे, धरणे. **अंगास बसते येणे**– अंगाला बरोबर बसेल असे होणे (कपडा इ.) 'नोकर लोकांच्या अंगास बसते येतील असे पोशाख करण्यात यावेत'– रवानगीतील नोकरांचे पोषाख (बडोदे). **अंगास मुंग्या येणे**– वातादी विकारामुळे अंगाला एक प्रकारची बधीरता येणे. **अंगास, अंगी येणे**– १. व्यापारात तूट, बूड येणे; नुकसान होणे; ठोकर बसणे. २. अंगात बाणणे : 'मराठीच्या अंगी आलेली क्षीणता क्षणमात्रही झाकली जाणार नाही.'– निमा. **अंगास, अंगी लागणे**– १. पुष्टिकारक होणे, लठ्ठ होणे. २. एखादा दोष किंवा गुन्हा अंगावर शाबीत होणे, लागू होणे : 'तेथे न करिता चोरी । आंगी लागे ।' – दास ६.१.७२ ३. तोटा सोसावा लागणे, ठोकर बसणे, अंगावर शेकणे. **अंगास लावणे**– पहा : **अंगाला लावणे**. **अंगास लावणे, लादणे**–चिकटवणे, शाबीत करणे (गुन्हा, अपराध). **अंगी असणे**– जवळ, पदरी असणे; ठायी असणे; स्वाधीन असणे. **अंगी आणणे**– १. आपल्यावर घेणे; ताबा घेणे. २. आपल्या ठिकाणी असू देणे; स्वाधीन राखणे. ३. सवय लावून घेणे. **अंगी आदळणे**– अंगास चिकटणे, कोसळणे : 'अंगी आदळतो शोक.' – दावि ४२३. **अंगी खिळणे**– रोग, सवय इ. शरीरात भिनणे. **अंगी घुमारणे**– भूत लागणे, अवसर येणे : 'आणि आंगी घुमारिले'– दावि १५६. **अंगीची सावली करणे** – (स्वतःचा) आश्रय देणे. **अंगी जिरणे** – सरावाचे होणे, मुरणे. **अंगी डसवून बोलणे** – मुद्दा अंगी लावून निरुत्तर करणेः 'मी मुलाजां धरीत नाही. यथार्थ व अंगी डसवून बोलतो म्हणून विषम मानितात.' – मशिका ५६५. **अंगी ताठा भरणे** – गर्विष्ठ होणे. **अंगी तुटणे** – लहान मूल अशक्त होणे, वाळणे, रोड होणे. **अंगी नसणे** – १. स्वतःला अनुभव, माहिती नसणे; स्वभावात नसणे. २. स्वतःचा नसणे; मूळचा नसणे. **अंगी पडणे** – १. पक्षपात करणेः 'हा अविद्येचा अंगी पडे' – अमृ ६.६. २. सवय होणे. पहा : **अंगी मुरणे**. **अंगी फुटणे** – १. लठ्ठ होणे; गुबगुबीत होणे. २. एखादा रोग अंगावर स्पष्ट दिसणे, वाहणे (रक्तपिती इ.) **अंगी बसणे** – सुगम असणे; सवय होणे. **अंगी बिऱ्हाड देणे – करणे** – शरीरात थारा देणे; हृदयात अंतःकरणात बाळगणे; आसरा देणे (दुर्गुण, पापवासना इ. ना). **अंगी भूत वाढणे** – अंगात येणेः 'तेथे कोणाच्या अंगीं भूतें ग्रह वाढत असतात. त्यांनी काही बाधा आहे म्हणून सांगितले.'– ऐलेसं १९०४. **अंगी (माशी) भरणे** – लठ्ठ होणे. **अंगी भिनणे** – सवयीचे होणे. **अंगी माशा मारणे** – आळशी बनणे. **अंगी मिरच्या झोंबणे – लागणे** – (एखाद्याने मर्म काढले असता) रागाने जळफळणे. **अंगी मुरणे** – १. सवयीची होणे. २. हाडी शिरणे; शरीरात (ताप) भिनणे. ३. जिरणे; बाहेर न येणे (देवी, गोवर). **अंगी येणे** – पहा : **अंगात येणे**; भूतबाधा होणेः 'शुद्र येक त्याचे आंगी आला बोले ।' – रामदासी २.११. **अंगी लागणे** – १. अन्न पचणे; लठ्ठ होणे; प्रकृतीला अनुकूल होणे. २. फायदा होणे. ३. एखादा आरोप लागू होणे. **अंगी लावणे** – आरोप करणेः 'तुम्हीच तो कोणाला तरी दिला असे मी अंगी लावण्याचा प्रयत्न करी.' – स्मृति १०२. **अंगी वाजणे** – (बाजणे) अंगात शिरणे; शोभणेः 'थोरपण अंगी वाजे नाना.' – दावि ६५.

**अंगअंग** क्रिवि. पृथक् पृथक्; अलग अलग; इसमवार; प्रत्येकी.

**अंगउद्धार** (अङ्गउद्धार्) पु. (प्र.) अंगोद्धार. १. शरीराची, देहाची मुक्तता. २. तीर्थात स्नान करणे; देहशुद्धी. ३. (योग) पोटातील आतडी तोंडातून बाहेर काढून स्वच्छ करणे; धौती; धुतीपुती.

**अंगउधार** (अङ्गउधार्) वि. अंगावर दिलेले, केलेले (कर्ज, उधारी); स्वतःच्या पतीवर केलेली उधारी.

**अंगओलाचे** न. ज्याच्यात पाणी साठवण्याची शक्ती आहे असे शेत, जमीन. उन्हाळ्यात पाणी न देता हिच्यातून पीक काढतात. (कों.)

**अंगक** (अङ्गक्) पु. १. विभाग; भाग. २. (प्राणि.) बाह्य शरीराचा एक घटक. २. बहुपेशीय प्राण्यांच्या शरीरातील अवयव जे काम करतात ते काम करणारी एकपेशीय प्राण्यातील पेशी. [सं.]

**अंगकर्तन** न. निरुपयोगी अवयव काढून टाकणे.

**अंगकल** पु. शरीराचा तोल. [सं.]

**अंगकवळी** स्त्री. आलिंगन; मिठी; पकडः 'परस्परें अंगकवळी होता । आनंदिलीं उभयतां ।' – मोल

**अंगकष्ट** पु. शारीरिक श्रम. [सं.]

**अंगकळा** स्त्री. १. निरोगी शरीराचे तेज; कांती. २. भुसभुशीतपणा.

**अंगकंप** पु. शरीरास कंप सुटणे; थरकाप होणे. [सं.]

**अंगकाठी** स्त्री. अंगबांधा; अंगयष्टी; शरीराचा बांधा; ठेवण.

**अंगकाडू–डू–ड्या** वि. (संकट, अडचणी असताना) अंग काढणारा; पळपुट्या; जबाबदारी टाळून निसटू पाहणारा; कामचुकार; माघार घेणारा.

**अंगकार्श्य** न. शरीराचा लुकडेपणा; सडपातळपणा; कृशता. [सं.]

**अंगगडी** पु. पोटातील भिडू, पित्त्या; (सोंगट्या, पत्ते इ. खेळात) भिडूंचा तोटा असता आपणच त्यांच्या वाटचे खेळणे, म्हणजे आपणच एक कल्पित भिडू आहो असे मानणे.

**अंगग्रह** पु. आचके, पेटका, गोळा येणे. [सं.]

**अंगघर्षण** न. शरीराचे घासणे किंवा शरीराचे मर्दन. [सं.]

**अंगघात** पु. (वै.) एखादा अवयव, भाग लुळा पडणे. [सं.]

**अंगचपळाई** स्त्री. अंगातील चपळपणा; स्वतःसिद्ध चापल्य.

**अंगचा** वि. १. शरीराचा; बाहेरचा नसलेला; स्वाभाविक. २. स्वतःचे; जन्मजात; जातीचे; उसने न घेतलेले; अंगभूत. ३. स्वतःच्या डोक्यातील, कर्तबगारीचा, करणीचा, शोधाचा; दुसऱ्याने शिकवलेला नव्हे असा. ४. स्वतःच्या योजनेचा; कल्पनेचा. ५. (ल.) थोतांडाचा; कवटाळपणाचा; बनावट; खोडसाळ. ६. व्यक्तिविशेषाचा; खासगत; पडद्याचा; एकांतीचा. ७. शरीरात स्वभावतः असलेला; नैसर्गिक. ८. एखादी गोष्ट स्वतःच करणारा.

**अंगचा कल्पक** वि. स्वभावतः नवीन गोष्टी शोधून काढणारा; जात्याच शोधक, तीव्र बुद्धीचा.

**अंगचा कसबी** वि. स्वतःच निरनिराळ्या वस्तू मेहनतीने व स्वतःच्या चतुराईने नीट करणारा; नेहमी लागणाऱ्या वस्तू तयार करणारा; स्वतःच्या कष्टाने, श्रमाने, कौशल्याने काम करणारा.

**अंगचा कारागीर** वि. जन्मतःच कुशल,कलावान गवई,चितारी इ.

**अंगचा खांब** पु. ज्या साहित्यातून (लाकूड, दगड इ.) इमला केला असेल त्याच साहित्यातून काढलेला, तयार केलेला खांब.

**अंगचा जोड** पु. मुख्य इमारतीपासून अथवा वस्तूपासून झालेली वाढ; जास्ती वाढवण्यासाठी घातलेली भर.

**अंगचा झरा** पु. पावसाळ्यातच नव्हे तर इतर ऋतूतही ज्यातून पाणी वाहत असते असा, जिवंत झरा.

**अंगचा धणी** पु. १. स्वतःचा मालक; कोणाचाही चाकर नसलेला. २. मालकाच्या आज्ञा, दाब यापासून मुक्त असलेली व्यक्ती.

**अंगचा मळ** पु. स्वतःच्या शरीराची घाण; एखाद्यास अगदी निरुपयोगी असलेली वस्तू.

**अंगचा लिहिणार** वि. १. लेखनिक वगैरे न ठेवता स्वतःचे लेखन स्वतःच करणारा. २. उपजत लेखक असलेला.

**अंगचा वक्ता** वि. उपजत वक्ता; स्वतःच्या हुशारीवर, बुद्धीच्या जोरावर बोलणारा वक्ता, वाक्पटू.

**अंगचा शहाणा** वि. स्वभावसिद्ध शहाणा; चतुर.

**अंगची कळा** स्त्री. १. स्वतःच्या अंगचे नैसर्गिक तेज. २. मूळचे कौशल्य; उपजत कला. ३. वंशपरंपरागत आलेली, अंगभूत स्वाभाविक हुशारी, चाणाक्षपणा, तैलबुद्धी, चातुर्य.

**अंगची गोष्ट** स्त्री. वैयक्तिक किंवा स्वतःचे काम, धंदा; स्वतः काढलेली कल्पना (क्रि. सांगणे.)

**अंगची बुद्धि–द्धी** स्त्री. उपजत शहाणपण.

**अंगचुकार** वि. पहा : **अंगचोर**

**अंगचे देऊळ** न. खडकात, डोंगरात कोरून काढलेले देऊळ.

**अंगचोर** वि. कामात कुचराई करणारा; मनापासून, नेटाने काम न करणारा: 'अंगचोर वाग्वीर–पटूंचें पेव कसें फुटलें ।' – सन्मित्र समाजमेळा १३.१९२९.

**अंगच्छाया** स्त्री. १. अंगाची सावली. २. (ल.) आश्रयः 'तंव वैकुंठपिठीचें लिंग । जो निगमपणाचा पराग । जिये जयाचेनि हें जग । अंगच्छाया ।' – ज्ञा १७.४६.

**अंगच्छेद** पु. शरीराचा एखादा अवयव कापणे. [सं.]

**अंगच्छेदन** पु. न. (वै.) शरीराचा अवयव निरुपयोगी झाल्यामुळे, खराब झाल्यामुळे छाटणे; कापून काढणे. (क्रि. करणे)

**अंगछा** पु. १. उपरणे. २. हातरुमाल. (को. मुंबई) ३. कोपरी; जाकीट. (माण.) [गु. अंगूछी]

**अंगज** वि. अंगापासून झालेला (पुत्र).
पु. स्वतःचा पुत्र, मुलगा. औरस. [सं.]

**अंगजड** वि. १. जड शरीराचा; लठ्ठ; फोपसा; अगडबंब. २. मंद; आळशी. [सं.]

**अंगजा** स्त्री. स्वपुत्री, मुलगी. [सं.]

**अंगजूठ** स्त्री. मल्लयुद्ध; कुस्ती; झटापट.

**अंगजोर** पु. अंगवळ; शरीराची ताकद; शक्ती.

**अंगझाप** स्त्री. १. पेंढारी लोकांपैकी कोणी झटापटीत मारला गेल्यास त्याला तात्पुरती मूठमाती देण्याची त्यांची पद्धत. २. ठग लोकांतील, त्यांनी मारलेल्याला तात्पुरती मूठमाती देण्याची पद्धत. पुढे हे प्रेत न दिसेल असे पुरून टाकतात.

**अंगझोक** पु. शरीराचा तोल, कल.

**अंगझोल** पु. छातीवरील बंदांचा लांब अंगरखा.

**अंगठसा** पु. अंगाची ठेवण; अंगकाठी: 'भीमा ऐसा अंगठसा । माझिये दृष्टी दिसतसे ।' – मुसभा ५.१५३. २. (ल.) बळ; सैन्य. – होकै १.

**अंगठा – अंगोठा** पु. १. हाताचे किंवा पायाचे पहिले जाड बोट. २. कळाशीचा एक प्रकार; चाळा; दांता. ३. हाड, काठी, ध्वज इ. शब्दांप्रमाणे या शब्दाचाही बांधा, ठेवण या अर्थी उपयोग करतात. [सं. अंगुष्ठ] (वा.) **अंगठा दाखवणे** – नाकबूल असणे; नाकारणे; फसवणे; ठकवणे (तर्पण करताना पितरांना प्रत्यक्ष वस्तू देण्याऐवजी अंगठ्यावरून पाणी सोडतात त्यावरून किंवा नाही या अर्थी अंगठा हलवितात त्यावरून): 'तेंवी पुत्रापासोन सुखप्राप्ती । माता पिता होईल म्हणती । शेखीं पुत्र अंगोठा दाविती । केवळ भ्रांती पुत्रमोहो ।' – एभा ११.८२. **अंगठा धरणे** – (पायाचे) **अंगठे मुखात धरणे** – अंगठे धरणे; ओणवे होऊन, हाताने पायाचे आंगठे धरणे (शाळेतील शिक्षेचा एक प्रकार): 'अंगठे धरून ह्या म्हाताऱ्याला उभा करा.' – बाय २.१; 'हरि हरि दाहापूर्वी कळलें तरि आंगठे मुखी धरितो ।

अपराध कोटि पोटीं घालाया मुकुट पाय ते करितो ।।' – मोस्त्री ६.३६. **अंगठ्यास आग लागणे –** संकटांस प्रारंभ होणे (आगामी संकटाला प्रथमपासून घाबरण्याच्या वेळी म्हणतात): 'अजून तर तुझ्या अंगठ्यास देखील आग लागली नाही.' – धर्माजी ९१. **अंगठ्याची आग मस्तकास जाणे** – रागाने नखशिखांत लाल होणे. **अंगठ्यावर दिवस मोजणे** – आतुरतेने वाट पाहणे; एखादी इष्ट गोष्ट साधण्यापूर्वीचे दिवस मोजणे. **अंगठ्याची खूण–छाप करणे–** निरक्षराकडून, लिहिता न येणाऱ्याकडून पावतीवर सहीच्याऐवजी डाव्या हाताच्या अंगठ्याचा ठसा शाईने उठविणे.

**अंगठाछाप** वि. पु. स्त्री. निरक्षर, सही न करता येणारी (व्यक्ती). (हेटाळणी करण्यासाठीही हा शब्दप्रयोग केला जातो.).

**अंगठाण** न. आवाका; शक्ती: 'आपले जातीचे अंगठाण पाहतां जमेतीचा अजमास पाहतां एकोण, पन्नास हजाराची जड.'– इसं होकै २.

**अंगठी** स्त्री. १. हाताच्या बोटात घालावयाचा एक अलंकार; मुदी; वेढे; मुद्रिका. २. हाताची करंगळी. ३. पायाचे बोट. ४. अंगुस्तान. [सं. अंगुष्ठ]

**अंगठेदाबणी–दाम** स्त्री.पु. लग्नात सप्तपदीच्यावेळी नवरीची बहीण नवरीच्या पायाचा अंगठा दाबून धरून बसते, तेव्हा तो सोडवण्यासाठी नवऱ्यामुलाने तिला द्यावयाचा मानपान, पैका इ.

**अंगठेधरी** स्त्री. अंगठे धरण्याची शिक्षा.

**अंगठेवण** स्त्री. अंगठसा; अंगाची ठेवण; अंगकाठी; शरीराचा बांधा.

**अंगठोळा – ळी** पु. स्त्री. हाताच्या किंवा पायाच्या बोटात घालावयाचे एक वेढे; वेढणे.

**अंगठ्याचा मान** पहा : **अंगठेदाम**

**अंगडी** स्त्री. तंगडी व कमर यामधील शरीराचा भाग: 'माझ्या ज्वराचा मजकूर सखारामपंती सांगितला असावा परंतु तो लटका. यात संदेह अंगडीतला आहे, अजून किंचित अंगडीतील दुःख जाणवते.' – पुरंदरे द. ३. १७१.

**अंगडी–डे** स्त्री. १. (सामा.) अंगरखा: 'आंगडे झाडुनि घोंगडे करी ।' – तुगा ६२०. २. लहान मुलांचा अंगरखा; अंगा.

**अंगडी** स्त्री. बाजार; दुकान. (बे.) [का. अंगडी]

**अंगडे टोपडे–टोपी** न. स्त्री. अंगरखा आणि टोपी; लहान मुलांचा पोशाख.

**अंगण** न. १. घरापुढील अथवा मागील मोकळी जागा; आवार. घरापुढील झाडून सारवून तयार केलेली जागा. २. (ल.) रंगण; पटांगण; मैदान. ३. (ल.) टप्पा: 'उभा नयनाचे आंगणा.' –देप १९०. (वा.) **अंगणी जाणे –** (बायकी) मोरीवर जाणे; लघ्वीला जाणे. (व.)

**अंगत** वि. स्वतःचा; अंगचा: 'महाराजांनी समक्ष बोलावून अंगत स्वभावानुसार शिव्यागाळी करून.' – विक्षिप्त ३.११३.[सं. अंग + गत]

**अंगत पंगत** स्त्री. आपापल्या घरून भोजनसाहित्य आणून एकत्र जेवण्याची पद्धत.

**अंगतुक** न. अंगाचे वजन: 'तरी लोहाचे आंगतुक न तोडिताचि कनक । केले जैसे देख । परिसें तेणे ।' – ज्ञा १७.२१६. २. (नृत्यातील) अंगाचे चलनवलन: 'तेरा अंगतुकाचेया चळवळा: झाडणी करीतसे विवेकदळा' – उगी ४५२.

**अंगतोल** पु. शरीराचा झोक– कल.

**अंगत्राण** न. शरीरसंरक्षक साधन; चिलखत; बख्तर; कवच: 'गोधांगुळे घालिती हस्तीं । अंगत्राणे बांधिलीं ।' – पांप्र ३२.६५. [सं.]

**अंगत्वाने–त्वे** क्रिवि. प्रतिनिधी म्हणून; एखाद्याकरता; एखाद्याच्या नावाने, तर्फे, आश्रयाने, मार्गदर्शकत्वाखाली; वतीने.

**अंगद** न. दंडात घालायचे बाहुभूषण, वाकी, बाजूबंद इ.: 'करकंकणे बाहुअंगदे'–एभा १४.४८५.
पु. वालीचा मुलगा; रामाचा दूत. [सं.]

**अंगदट** वि. १. अंगास घट्ट बसणारे, दाटणारे. २. दृढ; बळकट: 'आत्मविषयी आंतुवट । साधन जे आंगदट ।।' –ज्ञा १६.४५.
(पु.) अंगरख्याच्या आत घालायची कोपरी. (बे.)[सं. अंग+दृढ]

**अंगदनीति–ती** स्त्री. (रामदूत अंगदाने रावणास सांगितलेले नीतिशास्त्र त्यावरून) सुनीती; सन्मार्गाचे नियम.

**अंगदशिष्टाई** स्त्री. सीतेला परत द्यावे म्हणून अंगदाने रावणाशी केलेली वाटाघाट, सामोपचाराचे बोलणे. त्यावरून (ल.उप.) दोन्ही पक्षांचा समेट करण्यासाठी आपण होऊन केलेली मध्यस्थी; लुडबूड.

**अंगदेणे** न. मुंबईत पोर्तुगीजांनी कोळ्यांवर बसवलेला एक कर; डोईपट्टी.

**अंगदेण्या** वि. प्रत्यक्ष शेत करणारा शेतकरी; शारीरिक श्रम करणारा वर्ग.

**अंगदेवता** स्त्री. १. उपदेवता (कर्मातील जी मुख्य देवता तिच्या अंगभूत असणारी). २. (ल.) सेवक; चाकर; भोवतालची मंडळी. [सं.]

**अंगधट** वि. उद्धट; असभ्य; शिरजोर.

**अंगधिटाई** स्त्री. १. केवळ शारीरिक बळ; पाशवी बळ, शक्ती (चातुर्य, युक्ती यांच्या विरुद्ध). २. रानटी जुलूम.

**अंगधुणे** न. १.(बायकी) स्नान; अंघोळ: 'सर्वांची अंगधुणी झाली असतील.' – रथ २६७. २. न्हाणीघर. (व.)

**अंगना** स्त्री. १. स्त्री: 'ऐक नरवीरपंचानना । प्राप्तकाळीं पाणिग्रहणा । तुज कोण वरीना अंगना । मनमोहना श्रीकृष्णा ।।' – एरुस्व ४.११. २. पत्नी; स्वतःची बायको. [सं.]

**अंगन्यास** पु. देवतास्थापनेच्या वेळी, धर्मविधी करताना निरनिराळे मंत्र म्हणून देवतेच्या प्रतिमेला ६ किंवा १६ स्थानी स्पर्श करावयाचा विधी; संध्या वगैरे करताना स्वतःच्या शरीराच्या निरनिराळ्या स्थानी स्पर्श करावयाचे कर्म. [सं.]

**अंगपत्र** न. तरवार. [सं.]

**अंगपरिवर्तन** न. उलटे करणे (शरीर इ.); एका बाजूवरून दुसऱ्या बाजूला वळणे. [सं.]

**अंगपात** पु. १. शरीराचा ऱ्हास; लुकडेपणा; क्षीणता. २. (कड्यावरून) स्वतःस खाली लोटून देणे. ३. शरीरास किंवा एखाद्या अवयवास पक्षघात होणे. ४. अंग बाहेर येणे. (गुह्येंद्रियाचा भाग). [सं.]

**अंगपांथी** स्त्री. खासगत वाटा; सरकतीच्या व्यवहारातील पाती.

२. अंगमेहनतीचा वाटा. [सं. अंग+पंक्ति]

**अंगपिळा** पु. आळस आला असता किंवा भूतसंचारामुळे अंगास दिले जाणारे आळोखेपिळोखे; तापाने अंग कसकसणे.

**अंगपीडा** स्त्री. नैसर्गिक विकार; शरीरास जडलेली व्याधी किंवा रोग (भूतपीडेच्या उलट). [सं.]

**अंगपुसणे** न. ओले अंग कोरडे करण्याचे वस्त्र:' दोन अडीच हात लांबीचे अंगपुसणे पाठीमागून गुडघ्यावर बांधले.' – काभि १६.

**अंगप्रत्यंग** न. अवयवांसकट शरीर; पूर्ण शरीर; शरीराचा प्रत्येक अवयव. [सं.]

**अंगप्रसाद** पु. देवास लावलेला कौलः'कमिटीवर खोत यांनी यांबद्दल काय करावे म्हणून श्रीमहाकालीला अंगप्रसादीं विचारले' – आडिमहा १७. [सं.]

**अंगप्रस्थान** न. प्रत्यक्ष प्रवासास निघण्यापूर्वी एखादा शुभमुहूर्त साधण्यासाठी आपले घर सोडून जवळपास दुसऱ्याच्या घरी स्वतः राहावयास जाणे : 'माघ सुद ५ सोमवारी प्राथकालींच खासगत अंगप्रस्थानेंकरून बाहेर निघावे दुसरा विचार नाही.' – पेदभा २८.१५५. [सं.]

**अंगबल** न. शारीरिक शक्ती; ताकद; अंगधिटाई : 'अवनीतीने वर्तो नये । आंगबळें ।' – दास २.२.२२. [सं.]

**अंगबांधा** पु. शरीराची ठेवण.

**अंगभर–भार** क्रिवि. शरीर झाकण्यापुरते (वस्त्र) (वा.) **अंगभर होणे** –१. फजिती उडणे. २. भार होणे.(ना.)

**अंगभंग** पु. १. अंगाचे सांधे धरणे; अशक्तपणा, थकवा वाटणे. २. अंगविक्षेप; शरीराचे निरनिराळे चाळे, हावभाव, चेष्टा.

**अंगभंगवात** पु. अंगभंग रोग; ज्यामुळे हा रोग होतो तो वातदोष.

**अंगभा** स्त्री. अंगकांती : 'अंगभा विलोकिता तटस्थ जाहली सभा ।' – (अनंत) सीस्व ८९.

**अंगभार** पु. स्वतःचे वजन.

**अंगभित्तिका** स्त्री. (प्राणि.) शरीराच्या पृष्ठभागावरील, पेशींमुळे बनलेले आवरण. [सं.]

**अंगभूत** वि. १. अंगचाच असलेला; एखाद्या वस्तूचा भाग, अंश असलेला; समाविष्ट; तदंतर्गत; संबंधी; आश्रयी; अवलंबून असलेला; दुय्यम : 'मंदी व बेकारी तिच्या अंगभूत राहिली नाहीत.' –मार्क्स ३३. २. निकटवर्ती : 'काय तुमचा नामा अंगभूत' –नाम ९३५. [सं.]

**अंगभूत आर्द्रता** स्त्री. (भूशा.) अंतर्गत ओलावा अथवा दमसरपणा.

**अंगभूतिक** न. संबंधी; नातलग; आप्तविषय.

**अंगभोग** पु. शारीरिक उपचार, नितणे. २. उपभोग; भोजन : 'मनाचा प्रसाद तुजलागी केला । अंगभोग अपुला घेउनि राहे' – नाम १४८२.

**अंगमर्द** न. (आयु.) अंग ठेचल्यासारखी पीडा. [सं.]

**अंगमर्दन** न. अंग रगडणे; चंपी; मालिश. [सं.]

**अंगमर्दाई–मर्दी** स्त्री. पौरुष; शक्ती; केवळ शारीरिक बळ; अंगधटाई.

**अंगमस्ती** स्त्री. १. पाशवी शक्ती; दांडगाई; उद्धटपणा. २. अंगातील रग, मस्ती.

**अंगमार्दव** न. शरीराचा नाजुकपणा. [सं.]

**अंगमास** न. (व्यापकपणे) शरीर या अर्थी.

**अंगमेहनत** स्त्री. शारीरिक श्रम; कष्ट.

**अंगमेहनती –त्या** वि. १. शारीरिक कष्ट करून पोट भरणारा; कष्टाळू. २. स्वतः शेत कसणारा; शेतकरी.

**अंगमोड** स्त्री. अतिशय मेहनत करणे; सक्त मेहनत.

**अंगमोडा** पु. १. आळस घालविण्यासाठी दिलेले आळेपिळे : 'निद्रेने व्यापिली काया । आळस आंगमोडे जांभया ।' – दास १८.९.२. २.अंग कसकसणे; अंग मोडून येणे.

**अंगयष्टी** स्त्री. शरीराचा बांधा, ठेवण. [सं.]

**अंगमेळ** अंगसंग; संबंध : 'तियेचेनि अंगमेळें'– विपूक्षि १.१०३. २. स्त्री पुरुषांचा शरीरसंबंध

**अंगरखा** पहा : **आंगरखा**

**अंगरचना** शरीराची ठेवण.

**अंगरस** पु. फळांचा किंवा वनस्पतीच्या पानांचा, पाणी न घालता काढलेला रस; ओली वनस्पती कुटून निघणारा रस. [सं.]

**अंगरक्षक** पु. विशेष मान्यवर, अति महत्त्वाच्या व्यक्ती यांच्या संरक्षणासाठी ठेवलेले शिपाई; शरीररक्षक.

**अंगराख्या** वि. अंग राखून काम करणारा (आळसामुळे, अप्रामाणिकपणाने); अंगचोर; चुकार.

**अंगराग** पु. १. सुगंधी उटणे; उटी; लेप; चोपडण. २. (अरगजा, केशर इ.)उटीचे द्रव्य. [सं.]

**अंगरी** स्त्री. गंजी : 'वैरणी तर काही शामलांनी अंगरी दग्ध केल्या. उरल्या होत्या त्या आमच्या सैन्यांनी जालिल्या.' – पेद ३.११३.

**अंगरेज –अंग्रेज** इंग्रज माणूस.

**अंगरेटा** पु. अंगाने दिलेला, शरीराने दिलेला धक्का, ठोसा.

**अंगरेटाई** स्त्री. अंगाची धक्काबुक्की; मस्ती; ठोसेठोशी; अंगधिटाई.

**अंगरोग** पु. शरीरास होणारा स्वाभाविक रोग. (पिशाच बाधेने किंवा देवतापराधाने न होणारा.)

**अंगलग** पु. १. नातेवाईक; स्नेही : 'तुझा पिता तरी विरोचन । तो आमुचा अंगलग जाण ।' – कथा २.६.८८.

२. समागम : 'संताचेनि अंगलगे । पापाते जिणणे गंगे ।' – ज्ञा १२.१७७. ३. आश्रय; साहाय्य : 'परब्रह्मीचेनि अंगलगे । सृष्ट्यादि कार्या माया करूं लागे ।' – विसिं ११.१६.

वि. लगतचे; निकटचे; विश्वासू; जिव्हाळ्याचे; संबंधी : 'मग राजानें सासष्ट सरदार व अंगलग व प्रधान पुरोहित गुरु उपाध्ये समस्तांशी बोलाविले.' –बिंब ३.

**अंगलट** स्त्री. १. शरीराची ठेवण, कांती, तेज. पहा : **अंगकाठी** : 'माझी अंगलट त्यावेळी काहीशी पातळ होती.' – विवि ११.८.२०४. २. शरीराची घडण, घाट. (वा.) **अंगलट घेणे** – स्वतः होऊन जबाबदारी पत्करणे. **अंगलट येणे** – १. अंगास चिकटणे; तोट्यात येणे. २. अंगाला चिकटणे; धक्काबुक्की करणे; खोडी काढणे. (अंगलट जाणे असाही प्रयोग आढळतो.) ३. स्वतःलाच त्रासदायक होणे : 'मात्र

त्याची ती थट्टा अंगलट येणारी होती.' -वामास २५५. ४. हानिकारक होणे; नुकसानकारक होणे.

**अंगलणे** अक्रि. स्वाधीन होणे, करून घेणे.

**अंगलीन** वि. अंगात मुरलेले; शरीरात गुप्त असलेले : 'सद्वैद्ये जैसें दोषा । अंगलीना ।' – ज्ञा १६.४२.

**अंगलेणे** न. अंगावरचा दागिना, शरीराला शोभा देणाऱ्या वस्तू, पदार्थ. उदा. काजळ, कुंकू, अलंकार : 'नाना अलंकार अंगलेणीं ।' – सप्र २.५.

**अंगलोट** न. १.पहा: **अंगलट** २. अंगभार; अंगाचे वजन, पतन : 'मस्तकीं वाहती करूनि मोट । भूमीं टाकिती जैसा घट । तळी पाषाण होती पिष्ट । आंगलोटें दोघांच्या ।।' – मुसभा ७.३२.

**अंगवख** पु. शरीर; अंगप्रदेश : 'जलतेया गिरिचेया आंगवखां ।' – राज्ञा ११.४२०.

**अंगवट** स्त्री. शरीर, अंग. (वा.) **अंगवटीस जाणे** – अंगावर हात टाकणे; चोप देणे : 'आता या पाजी माणसाच्या अंगवटीस गेल्याखेरीज दुसरा उपाय नाहीं.' – माबा १७०.

**अंगवटा** क्रिवि. स्वाधीन.

पु. १. कपड्यांचे प्रदर्शन करण्यासाठी, ते ज्याला घालतात तो लाकडी पुतळा; कलभूत. २. शरीर; मूर्ती : 'जे आसेचा आंगवटा ।' – ज्ञा ८.१४४.

**अंगव(वा)टा** पु. शेतात उत्पन्न झालेल्या मालाच्या तीन (शेतमालक, बैल-नांगर मालक व शेत कसणारा) वाट्यापैकी शेत कसणाऱ्याचा वाटा. (वा.) **अंगवट्यास पडणे** – अंगवळणी पडणे; श्रम, त्रास इ. न होणे:'मग एकदा सवय पडली म्हणजे अंगवट्यास पडते.' – शत २८७.

**अंगवठा** पहा : **अंगलट**

**अंगवण** स्त्री. १. सरावाच्या योगाने आलेली योग्यता; संपादन केलेली कार्यक्षमता; वाक्बगारी : 'ऐसी अंगवण नाहीं मज देवा ।' – तुगा ४४९५. २. पराक्रम; शौर्य; जोर; उत्साह. ३. खटपट; प्रयत्न; (व.).आंगवन असाही प्रयोग : 'जळो तुमचे दादुलेपण । नपूंसकाहूनि हीन । वृथा गेली आंगवण । काय वदन दावितां ।।' -एरुस्व ८.६. ४. देवीचा वण; तीळ; चट्टा. (क्रि. पडणे, उठणे, येणे, जाणे). ५. उपासना; भक्ती; (देवाला केलेला) नवस.(गो.) : 'कीं वीरश्रीची धरिता अंगवण । प्रताप विशेष वाढे पै ।' – रावि ११.६. ६. सराव; नित्यक्रम; वहिवाट : 'ऐसे करितां पापाचरण । तयासी आलें वृद्धपण । पुत्र जाहाले अति दारूण । तरी आंगवण न सांडी ।।' – रावि १.१११. ७. (ल.) साहाय्य; मदत : 'या परी चतुरंगसेना । मिसळली रणकंदना । आपुलालिया अंगवणा । गज रथ रणा आणिती ।' – एभा ३०.११७. ८. द्वंद्व युद्ध; झुंज : 'तेआं भीड भीमसेना । जुंझतां बहुती आंगवणा । परतिजे ऐसी हांव कव्हणा । उपजेचिना ।।' – शिव ८७८.

**अंगवणा** वि. शूर : 'तो अक्रूर आंगवणा पुढां चाले ।' – शिव ५४५.

**अंगवणी, अंगवणे** स्त्री. न. सामर्थ्य; शक्ती : 'वृद्धपणीं काइसी अंगवणी' – नागा ८८३.

**अंगवणे–विणे** उक्रि. १.मिळणे; होणे; प्राप्त होणे : 'तेणेंचि परब्रह्म आंगविले । जेणें जिंकिलें मनातें ।' – एभा २३.७०५. २. अनुकूल असणे. ३. स्वाधीन होणे, करून घेणे : 'तें आपुलेनीचि बळें । आंगविलें जिहीं ।।' – ज्ञा १२.४५. ४. गृहस्थाश्रमी होणे; स्त्रीपरिणय करणे; आपलीशी करणे. ५.मुकणे ; गमावून बसणे.

**अंगवत** न. सामर्थ्य; अभिमान : 'आतां हा जळता वारा कें वेंटाळे । कोणाही विषा भरलें गगन गिळे । महाकालेसिकें खेळे । आंगवत असें ।' – ज्ञा ११.४०५.

**अंगवनशील** वि. स्त्रियांचा सहवास असणारा; स्त्री भोक्ता.

**अंगवला** वि. १. स्वांगाने, स्वतः, शरीराने : 'कांतेचिया भिडा । आवरला होय जगायेवढा । आंगवला उघडा । जियेवीण ।' – अमृ १.३४. २. जवळचा; अनुकूल; स्वाधीन.

**अंगवसा** पु. (झाडाचे) अग्रभाग, पाला, शेंडा : 'अशोकाचे अंगवसे । चघळिले कन्हेनि जैसे ।' – ज्ञा ११.४१४.

**अंगवस्त्र** न. १. उपरणे; उत्तरीय; उपवस्त्र. २.(ल.) प्रेमपात्र; ठेवलेली स्त्री; रखेली; उपस्त्री. [सं.]

**अंगवळ** पु. आगूळ; अगवळ; केसांना बांधावयाचा दोरा.

**अंगवळण** पु. अंगलट; अंगाची, शरीराची ठेवण. (वा.) **अंगवळणी पडणे** – सरावाचे होणे : 'जी भाषा आम्ही... बोलतो त्यातील शब्दाचे उच्चार आमच्या आंगवळणी पडले असल्यामुळे...' – लोटिकेले ४.४०१.

**अंगवळा** पु. १. अंगाचे आळेपिळे; आळसामुळे येणारी जांभई; पहा : **आळोखा– पिळोखा.** २. मुलांची चळवळ. ३. सांगाती, सोबती; संबंधी; सहवासी : 'नित्य त्या सेवकाजवळा । अंगे अंगवळा तू होशी ।' – एभा ६३९४. ४. अंगकाठी.

**अंगवळेकार** वि. भारी; शक्तिमान : 'सेजवळ सहवासी । आंगवळेकारु विश्वासी ।' – शिव ५०५.

**अंगवाटा** पु. १. पहा : **अंगवटा.** २. (व्यापार) भांडवल न गुंतवता प्रत्यक्ष काम करणाऱ्याचा वाटा. ३. अंगमेहनतीचा वाटा.

**अंगवाटेकरी** पु. अंगवाटा घेणारा.

**अंगवाण** पु. नवस.

**अंगवात** पु. वेगाने चालताना उत्पन्न होणारा वारा; अंगवारा; गतिमान वस्तूपासून उत्पन्न होणारा वारा. [सं.]

**अंगवाला** वि. अंगात घालण्याचा; आंगाचे. (गो.)

**अंगविकार** पु. शारीरिक रोग. [सं.]

**अंगविकृति–ती** स्त्री. शारीरिक दोष, व्यंग. [सं.]

**अंगविच्छेद** पु. शरीराचा एखादा अवयव कापणे

**अंगविला** वि. उपाधिरहित.

**अंगविक्षेप** पु. हावभाव; अभिनय; चाळा; अंगचेष्टा; हातवारे.[सं.]

**अंगवृद्धि–द्धी** स्त्री. शरीराची वाढ (रोगामुळे झालेली अंतर्गळ, अंडवृद्धी इ.). [सं.]

**अंगवे** न. सामर्थ्य. (ग्रा.)

क्रिवि. अंगापासून : 'ऐशी हीं पंचवीस तत्त्वें । रचिली लिंग देहा अंगवे ।' – कथा ६.११.७९.

**अंगवेग** पु. १. शरीराचा वेग; चालण्याचा जोर; अंगवात. २. शरीर वाढत असताना त्याला आतून मिळणारा जोर. [सं.]

**अंगवैकल्य** न. १. शरीराचा अधूपणा; लुळेपणा; व्यंग. २. (ल.) (धार्मिक विधीतील महत्त्वाचा भाग गाळल्यामुळे येणारी) न्यूनता; अपूर्णता; दोष; वैगुण्य. [सं.]

**अंगशः** क्रिवि. एकेक भाग घेऊन, भागशः; खंडशः. [सं.]

**अंगशैथिल्य** न. शरीराचा ढिलेपणा, थलथलीतपणा; मांद्य. [सं.]

**अंगसफा अढी** स्त्री. (मल्लखांब) हातांच्या गोफणीत मल्लखांब धरून त्यातून दोन्ही पाय वर करून उलटे ताठ होऊन पुन्हा अढी बांधण्याचा प्रकार – व्याज्ञा ३.९२.

**अंगसफाई** स्त्री. शरीराची अथवा कामाची चपळाई; अंगचापल्य.

**अंगसरकती** पहा : **अंगवाटेकरी**

**अंगसंकोच** पु. १. अंग आखडून घेणे; शरीराचे आकुंचन; अंग चोरणे : 'किं अंगसंकोंचे पारधी । टपोनि तत्काळ मृग साधी ।' २. शरीर आकसणे; आकुंचनाची स्थिती; आकुंचन; संकुचितपणा. [सं.]

**अंगसंग** पु. १. शरीराचा संयोग; मीलन; अंगस्पर्श : 'दीपाचिया अंगसंगा । कोण सुख आहे पतंगा ।' – एभा ८.७४. २. संभोग; मैथुन; रतिसुख. ३. हातघाई; अंगलट; लठ्ठालठ्ठी; कुस्ती. [सं.]

**अंगसंगति** स्त्री. सहवास : 'तुझिया संतांची अंगसंगति । ते शिणलिया विश्रांति संसारिया ।' – नाम १४५५.

**अंगसंवाहन** न. कोमल, नरम, हलक्या हाताने शरीराला किंवा हातापायाला केलेले मालिश; अंगमर्दन. [सं.]

**अंगसंस्कार** पु. १. अभ्यंगस्नान वगैरेसारखे शरीरावर होणारे संस्कार. २. अंगस्पर्श; शरीरसंयोग. [सं.]

**अंगसामर्थ्य** न. शारीरिक बळ; अंगजोर. [सं.]

**अंगसाळ्या** वि. नाणे पाडण्याचे काम न करता इतर कामे करणारा (सोनार); दागिने वगैरे घडवणारा (सोनार).

**अंगसिक –अंगसीक** न. अंगावरील वस्त्र : 'आंगसीकें दीन्हली उदारे । भणे कवी भास्करू ।।' – शिव २२२.

**अंगसुख** न. रतिसुख; संभोगसुख. [सं.]

**अंगसुटका** स्त्री. एखाद्या संकटातून किंवा अडचणीतून काही नुकसान किंवा इजा न होता सुटणे, मुक्तता.

**अंगसुस्ती** स्त्री. १. शरीरमांद्य; जाड्य. २. शरीरगंध.

**अंगसूट** वि. चपळ; हलक्या अंगाचा; सुटसुटीत; मोकळा.

**अंगसौकुमार्य** न. शरीराचा नाजूकपणा, सुकुमारता, सौंदर्य. [सं.]

**अंगसौष्ठव** न.शरीराचा बांधेसूदपणा; सौंदर्य. [सं.]

**अगस्ताळ–ळा–ळ्या** वि. दांडगेश्वर; उच्छृंखल.

**अंगस्थौल्य** न. शरीराची अवाढव्यता; गलेलठ्ठपणा; स्थूलपणा; लठ्ठपणा. [सं.]

**अंगस्वभाव** पु. जन्मजात अथवा उपजत स्वभाव; नैसर्गिक वृत्ती.[सं.]

**अंगहार** पु. (नृत्य.) सहा किंवा सहापेक्षा जास्त करणांचा समुदाय. हे अंगहार ३२ आहेत. [सं.]

**अंगहीन** वि. व्यंग; न्यून; अपूर्ण; अवयवरहित (शरीर) : 'कां अंगहीन भांडावें । रथाची गति ।।' – ज्ञा १७.३८९.
पु. मदन.
स्त्री. वेश्या: 'अंगहीन पडपें । जियापरी ।' – ज्ञा १७.२५६.

**अंगळ** न. बोट : 'चांगली पोरं दोन अंगळ चामडीसाठी कशी फुकट जातात ते बघा.' – वासू १३४.

**अंगळी** स्त्री. हाताचे किंवा पायाचे बोट. पहा : **अंगुली**

**अंगळी** स्त्री. अधिकारबाह्य वर्तन.

**अंगक्षय** पु. (कृषी.) हा कोवळ्या हिरव्या पानांचा रोग आहे. हा रोग कवकांमुळे व सूक्ष्मजीवांमुळे होतो. या रोगामुळे पाने करपतात.[सं.]

**अंगा** पहा : **अंगरखा.**

**अंगाई** स्त्री. १. मुलाला झोपवताना म्हणावयाचे गाणे. २. (मुलांच्या भाषेत) झोप (क्रि. करणे). (वा.) **अंगाई करणे** – (उप. थट्टा) झोप घेणे; निजणे; गाई करणे.

**अंगाकडा** पु. पानगा; निखाऱ्यावर भाजलेली आरोळी.

**अंगानीटस** वि. अंगाला व्यवस्थित बसणारा (कपडा) : 'तिच्या अंगानीटस झंपरकड वासू पाहात राहिला.' – शिदोरी ११६.

**अंगार** पु. १. जिवंत विस्तव; पेटलेला निखारा; इंगळ. २. (ल.) रागीट माणूस ३. आग; (ल.) दारूगोळ्याचा वर्षाव. (वा.) **अंगार होणे–** १. आग होणे. २. राग येणे.

**अंगारक** पु. १. मंगळ ग्रह. २. (संकेत) आंग्रे (मराठी राज्याचे आरमाराधिकारी). यांच्या नावाचे आंगारक असेही एक रूप बखरीत आढळते. – भाअ १८३५. २०९, ३०९. ३. म्लेंच्छ; ताम्रलोक. ४. (शाप.) कोळसा ५. (ल.) मंगळवार. [सं.]

**अंगारकी–अंगारी** स्त्री. मंगळवारी येणारी वद्य पक्षातील(संकष्टी) चतुर्थी : 'श्वेतमांदारी गजानन । अंगारकचतुर्थीसी साधिल्या जाण ।' – एभा १५.२०४.

**अंगारडब्बी–पेटी** स्त्री. काड्यांची पेटी ; आगपेटी : 'कौतिकनं महादेवाची अंगारडब्बी घेतली.' – धग २३. (व.)

**अंगार शंकू** पु. (भूशा.) ज्वालामुखीच्या तोंडातून खडकांचे लहान आकाराचे कण बाहेर फेकले गेल्याने त्याच्या मुखाभोवती ते साचून तयार होणारा शंकूच्या आकाराचा ढिगारा. [सं.]

**अंगारा** पु. १. देवापुढे जाळलेल्या धूपाची राख; ही भक्तलोक आपल्या कपाळास अरिष्टनाशक म्हणून लावतात; रक्षा; धूपारतीतील अवशेष. २. (वैष्णव वगैरे पंथात) धूपाच्या राखेची कपाळास लावलेली भुकटी; विभूती; भस्म. ३. एखाद्या साधूने किंवा मांत्रिकाने अरिष्ट किंवा पिशाच्च वगैरेचा उपद्रव होऊ नये म्हणून मंत्रून दिलेली राख; रामरक्षा, शिवकवच इ. स्तोत्रे म्हणून मंतरलेली राख, भस्म. ४. विस्तव, निखारा. ५. (ल.) रागीट माणूस. ७. राख : 'तुका म्हणे पाहता घडी । जगा जोडी अंगारा ।।' – तुगा ३९७६.[सं.] (वा.) **अंगारा करणे** – १. भुताखेतांची पीडा नाहीशी करण्यासाठी, विषार उतरण्यासाठी किंवा एखादे लोकोत्तर कार्य हातून घडण्यासाठी मंतरलेले भस्म अंगास चोळणे. २. (ल.) अंकित करणे; कबजात आणणे. **अंगारा लावणे** – (ल.) एखाद्यास आशा दाखवून शेवटी निराश करणे. **डाव्या**

**पायाचा अंगारा** – दृष्ट लागू नये म्हणून आई आपल्या डाव्या पायाच्या तळव्याची माती मुलाच्या कपाळास लावते ती.

**अंगारा** पु. जोंधळ्यावर पडणारा काजळीचा रोग.

**अंगाराधुपारा** पु. १. अंगारा; विभूती; रक्षा; मंत्रतंत्र (क्रि. करणे) : '(यशोदेने) अंगारेधुपारे केले, तरीही कृष्णाचे 'पिसेपण' उतरण्याचा रंग दिसेना.' – लोक्षि ११; पहा : **अंगारा करणे.** २. (ल.) अपुरी सामग्री, बेगमी; चिक्कूपणाने केलेला खर्च; तुटवडा येणे.

**अंगारिक** स्त्री. (गव्हाची) पोळी : 'गुळमिरियांचिया अंगारिका' – लीचपू ३२९.

**अंगान्हण** न. अंगविक्षेप : 'तियेचे अंगअंगान्हणः पहावया आली लक्ष्मी आपण'– मूप्र ५७०.

**अंगावरचे** वि. आईचे दूध पिणारे (मूल).

**अंगावर्त** न. घोड्याच्या पुढच्या पायांच्या फऱ्यावर उजवीकडे किंवा डावीकडे असलेला भोवरा. [सं.]

**अंगावणे, अंगाविणे** उक्रि. १.कवटाळणे; मिठी मारणे; आलिंगणे. २. आपला करणे; स्वतःवर जबाबदारी घेणे; अंगावर घेणे. स्वीकारणे.

**अंगांगीभाव** पु. अवयव आणि अवयवांनी युक्त जो देह यांचा परस्परसंबंध; गौण भागाचा प्रधान भागाशी संबंध; गौणमुख्य भाव; उपकार्योपकारक भाव. [सं.]

**अंगिक** वि. १. अंगासंबंधी; शारीरिक. २. अंगचे; स्वाभाविक; अंगभूत : 'जयाचेनि आंगिके तेजें ।' – ज्ञा ६.११०.

न. १. शरीरावयव; अंगुली : 'कीं अंगिका अंगुष्ठद्वया जवळें । गर्भिचेया लावण्या आठांगुळे ।' – ॠ ८७. २. सामर्थ्य; बल : 'जे आपुलेनि आंगिकें । त्रिविधपणाचेनि अंकें ।' – ज्ञा १८.५२४. ३. अंगचा स्वभाव : 'हिंवलीं जैसी आंगिकें । हिंवो नेदी ।' – ज्ञा १७.२२९.

**अंगिकपण** न. १. स्वभावधर्म : 'क्षणे लपे क्षणे प्रगटे साईचेपरी ।आंगींच्या आंगिकपणे ।।'– स्वानुदिन १३.१.५६.

**अंगिकभाव** पु. शरीराची आकृती, ढब; आकार; ठेवण; विभ्रम : 'स्मृति तेचि अवयव । देखा अंगीकभाव ।' – ज्ञा १.४.

**अंगिसुनी** वि. निश्चल; स्थिर.

**अंगी** स्त्री. १. अंगडे; सुरके; झग्याप्रमाणे वर खणाची चोळी व खाली जोडून परकर असे कशिदा काढलेले लहान मुलाचे आंगडे : 'हल्लीचा फ्रॉक हा अंगीचा सुधारलेला नमुना आहे.' – शिकशि ३.४१. २. अंगरखा; कोट; पोषाख : 'चंद्रतारा आंगि टोपरें । केलेसें शार्ङ्गधरे ।' – शिव ५१०. ३. अंगाची आग करणारी एक वनस्पती : 'अंग्या आणि काचकुहिरी' – दास ३.७.५.[सं. अंगिक]

पु. अनेक अवयव मिळून झालेला विशिष्ट पदार्थ.

वि. अनेक अंगाचा, अवयवांचा, भागांचा.

**अंगी(गे) उणा** वि. १. आईबाप नसलेला, पोरका; विधुर. २. व्यंगी; लुळा; कमतरता असलेला; एका पायाने लंगडा. ३. (ल.) सरळ, ताठ नसलेला; उणेपणा असलेला; कमजोर बाजू असलेला; लुच्चा; जाणूनबुजून अपराधी.

**अंगीकरण, अंगीकार** न. पु. १. हक्क सांगणे; स्वीकारणे; स्वतःचे म्हणून मान्य करणे; मानणे. २. रुकार भरणे; संमती देणे. ३. हाती घेणे; अंगावर घेणे. ४. स्वीकार; मान्यता. ५. (कायदा) कोर्टात चाललेल्या कामातील पक्षकाराने स्वतः किंवा अधिकार दिलेल्या इसमाने, कळविलेल्या तोंडी किंवा दस्तऐवजी हकीकतीवरून निघणारे मुद्याच्या किंवा लागू गोष्टी विषयी अनुमान. ६. देणे मान्य असल्याबद्दल लेखी कबुली. [सं. अंगीकृ]

**अंगीकारणे** उक्रि. १. अंगीकार करणे, आपला म्हणणे; हक्क सांगणे; स्वीकारणे इ. २. कबूल करणे; रुकार भरणे; मान्यता देणे. ३. हाती घेणे; अंगावर घेणे. ५. स्वीकारणे; घेणे : 'जरी मी अंगीकारीं राज्यासन ।' – रावि ११.१६४. [सं. अंगीकार]

**अंगीकृत** वि. १.कैवार घेतलेले; आदरलेले; अंगिकारलेले; आपलेसे केलेले. २. कबुली, परवानगी दिलेले; मान्य केलेले. ३. हाती घेतलेले. ४. घेतलेले; स्वीकारलेले. [सं.]

**अंगीचा उतारा** वि. अंगावरून ओवाळून दिलेला, उतरलेला, काढून टाकलेला जिन्नस (वस्त्र, अलंकार इ.) : 'तुझे अंगीचा उतारा । तो मज देई गा दातारा ।'– भबोप ४२.

**अंगीज** स्त्री. उरक; उठावणी; एखादे काम नेटाने पार पाडणे : 'त्यांच्याने कोणा एका कार्याची स्वतां, अंगीज करवत नाहीं.' –मराआ १३. [फा. अंगेझ]

**अंगीन** वि. क्रिवि. स्वाधीन, हवाली; दिमतीस.

**अंगीपाळ** न. अग्निकुंड : 'चरयांवरी कारली कैसी । अंगीपाळें रचिलीं बहुवसें' –उह १०७२.

**अंगीय बधिरीकरण** न. शरीराचा विशिष्ट भाग बधीर करणे.

**अंगीसणे** अक्रि. एकरूप होणे : 'एकाकी असे आंगु । आंगीसूनी ।' – ज्ञा १२.२०६.

**अंगुपती** वि. स्वतःच, कोणाला न विचारता केलेला : '...ती असा अंगुपती कारभार करायला कचवचायची.' – रैत १४२.

**अंगु(गू)र** न. द्राक्ष. [हिं.]

**अंगुल–ळ** न. १. हाताच्या बोटांच्या रुंदीचे माप. उदा.१२ अंगुळे = १ वीत, २४ अंगुळे = एक हात. २. आठ यव एकास एक रुंदीत जोडून केलेले माप. ३. बोट; अंगठा. [सं. अंगुल]

**अंगुलवेढे** न. १. आंगठ्याचा एक रोग; कांडरू; बोटाच्या सांध्याचा एक विकार : 'अंगुळवेडे(ढे) गालफुगी ।' – दास ३.६.१८. २. अंगठी.

**अंगुलिपर्व** न. (वै.) हाताच्या बोटांच्या संधिस्थानी मूठ मिटल्यानंतर दिसणारे उंचवटे; बोटांची पेरे. [सं.]

**अंगुलिमुद्रा** स्त्री. बोटांचा ठसा; अंगठ्यासह हाताच्या पाचही बोटांचा ओळखचिन्ह म्हणून घेतलेला ठसा. [सं.]

**अंगुलिमुद्रा केंद्र** न. बोटांचे ठसे (विशेषतः गुन्हेगारांच्या) जिथे एकत्र करून ठेवलेले आहेत असे कार्यालय. [सं.]

**अंगुलिसंधि–धी** पु. हाताचे किंवा पायाचे बोट हाताशी किंवा पायाशी जोडणारा सांधा. [सं.]

**अंगुली–ळी** स्त्री. हाताचे किंवा पायाचे बोट : 'द्वुतीं, दुजी अंगुळी न पडे । श्लोक अध्याय तेणें पाडें ।' – ज्ञा १८.५७.

**अंगुलीतोरण** न. कपाळावरील गंधाचे किंवा भस्माचे त्रिपुंड्र.

**अंगुलीत्राण** न. १. बाण मारताना बोटांस इजा होऊ नये म्हणून हाताच्या पंजात घालण्याचा कातड्याचा हातमोजा. २. पहा : **अंगुस्तान**[सं.]

**अंगुलीनर्तन** न. विचारांच्या तंद्रीत असताना हाताच्या बोटांची होणारी हालचाल, चाळा. [सं.]

**अंगुलीनिर्देश** पु. हाताच्या बोटाने दाखवणे; उल्लेख, दिग्दर्शन करणे. [सं.]

**अंगुलीभंग** पु. १. बोटांचे सांधे मोडणे; बोटे मोडणे; शाप देताना किंवा अलायबलाय करताना कानशिलावर बोटे मोडणे. २. (ल.) कार्यनाश. [सं.]

**अंगुलीयक** न. अंगठी, मुदी. [सं.]

**अंगुली सरोवर** न. (भूशा.) लांबीच्या तुलनेने रुंदी खूप कमी असलेले सरोवर.

**अंगुलीसंदेश** पु. हाताच्या बोटांच्या खुणांनी भाषण करणे; खुणा करणे. [सं.]

**अंगुलीसूत्र** न. (प्राणि.) प्राण्यांच्या हाताच्या व पायाच्या बोटांची रचना थोडक्यात स्पष्ट करणारे निर्देशक तत्त्व. [सं.]

**अंगुले–ळे** न. हातातली आंगठी : 'जायाचे अंगुलें लेतां नाहीं मान । शोभा नेदी जन हांसविले. ।।' – तुगा ३२१८.

**अंगुले** न. लहान मुलांचा अंगरखा (अंगडे) : 'नवां ठाई तडुकलें । हें पांच पुडें आंगुलें ।' – ऋ ५४.

**अंगुष्ठ** पु. १. अंगठा : 'रत्ने भरोनि पृथ्वी दीजे । एकांगुष्ठीही तपिजे ।' – ज्ञा १७.४१५.[सं.] (वा.) **अंगुष्ठाची आग मस्तकात जाणे** – अंगाची लाही होणे; फार संतापणे, रागावणे. **अंगुष्ठावरून दशशिर (रावण) करणे** – आंगठ्याचा रावण करणे. (ल.) अंशमात्र पाहून सर्व प्रकार अतिशय युक्तीने सांगणे; फुगवून, अतिशयोक्तीने सांगणे.

**अंगुष्ठपर्व** न. अंगठ्याचे पेर. [सं.]

**अंगुष्ठमात्र पुरुष शरीर** न. मनुष्याचे सूक्ष्म शरीर; प्राण गेल्यानंतर यमदूत हे शरीर स्थूल शरीरातून ओढून नेतात व हेच शरीर पापपुण्य भोगते असा समज आहे; लिंग देह : 'अंगुष्ठमात्र पुरुषाप्रति यम पाशेंकरूनि आकर्षी ।' – मोवन १२.५८.

**अंगुष्ठमुद्रा** स्त्री. अंगठ्याचा छाप, ठसा; कागदपत्रावर वगैरे अंगठा उमटविणे.

**अंगुष्ठाण, अंगुस्तन, अंगुस्तान, अंगुस्थान** (अङ्गुष्ठाण्-स्तन्-स्तान्-स्थान्) न. १. बोटाला सुई टोचू नये म्हणून व सुईला मागून नेट मिळावा म्हणून तर्जनीत घालावयाचे एक धातूचे (लोखंडी, पितळी) टोपण. ३. अंगठी. [फा. अंगुश्तान]

**अंगुष्ठासन** न. (मल्लखांब) मल्लखांबाच्या बोंडावर पायाचा अंगठा ठेवून उभे राहणे – व्याज्ञा ३.२३८. [सं.]

**अंगुसा** पु.फडके; चिंधी; अंगवस्त्र; अंगोछा. पहा : **अंगछा** (माण.)

**अंगुस्ती** स्त्री. दुःख; चिंता; काळजी : 'तू देवाची अंगुस्ती साचारू।' – क्रिपु १.१.१४.(गो.) [पोर्तु. अंगुस्तिआ]

**अंगुस्ती** स्त्री. १. किळस, भीती वगैरेमुळे किंवा ताप येण्यापूर्वी अंगावर आलेला शहारा; कसकस; अंगावरील काटा; शिरशिरी (क्रि. येणे, वाटणे). २. खांदे उडवणे; शरीरावयवांची एकदम हालचाल. (क्रि. देणे.)

**अंगुस्ती** स्त्री. रखेली, राख. [सं. अंग+स्त्री]

**अंगुळवेढे** न. अंगठी. २. बोटांच्या सांध्याचा एक रोग.

**अंगुळी** स्त्री. बोट.

**अंगुळु–ळू** वि. (नंदभाषा) दहा संख्या (बोटे दहा असतात यावरून संकेत) : 'मुळु उदानु अंगुळु ऐसी । नंदभाषा सांगितली त्यासी ।' – भवि ४२.४५. [सं. अंगुलि]

**अंगून** ( शअ. १. (रस्ता, भिंत इ.च्या) बाजूने; च्यावर अथवा खाली; वरून अथवा खालून : 'वर जी टेकडी ती वरचे अंगून चिरेबंदी दगडांनी बांधून काढली आहे.' – विवि ८.१.१०. २. एखाद्यापासून, करिता, कडून, तर्फे (निरोप, विनंती).

**अंगूळ** न. १. लांबी मोजण्याचे एक माप (बोटांच्या रुंदीएवढे माप. हे अंदाजे आठ जव किंवा पाऊण इंच एवढे असते.) २. हाताचे किंवा पायाचे बोट. [सं. अंगुल]

**अंगे** क्रिवि. स्वतः आपण होऊन : 'अंगें करिताती आपण ।' –एभा ७.५७८.

**अंगे – आंगे** शअ. जवळ; बाजूस : 'पाण्याचा तांब्या बापूचे आंगे होता.' – बाळमित्र २.६८.

**अंगे** न. अस्थी; अवशेष : 'मी बायकोची अंगे घेऊन कराडवरून जावयासी निघालो.' – आठइ ९७. [सं. अंग]

**अंगेज–जणी–अंगेजी** पु. शौर्य; धाडस; उठावणी; पराक्रम : 'जनरलांनी अंगेज केला आहे.' – (मइसा) १२.९७: 'स्वामी हिंदुराज्यकार्यधुरंधर राज्याभिवृद्धिकर्ते, तुम्हा लोकांचे अंगेजणीने सिद्धीस पावले.' – मराआ ७.

**अंगेजणे** उक्रि. पहा : **अंगीकारणे**

**अंगेष्टी** स्त्री. शरीरयष्टी; अंगकाठी. २. दंडप्राय नमस्कार; साष्टांग नमस्कार : 'लिंग का प्रतिमा दिठीं । देखतखेवो अंगेष्टी ।' – ज्ञा १७.२०४. [सं. अंग+यष्टि]

**अंगोगडी–ड्या** क्रिवि. पहा : **आंगोगडी–ड्या**

**अंगोछा–च्छा** पु. अंग पुसण्याचा पंचा; अंगवस्त्र. पहा : **अंगछा** [गु. अंगूछा]

**अंगोठा** पु. १. अंगठा. २. अंगठ्याचा छाप, शिक्का.

**अंगोठा** पु. अंगकाठी; शरीरयष्टी; शरीराची ठेवण; अंगलट.(ना.)

**अंगोत्तवर्त्तन** न. अंगाला लावण्याचे उटणे : 'निर्मळा अंगोत्तवर्त्तनें । कळाकौसल्यें रसायेनें । सर्वज्ञ नाथ तोखे जेणे ते काइ वाणुं ।' – ऋव ४७१.

**अंगोन** वि. अंगावरला.

**अंगोपचार** पु. देवाच्या मूर्तीचे स्नानादी उपचार. [सं.]

**अंगोपांगे** न. मुख्यभाग व पोटभाग : 'जीवनातील सर्व अंगोपांगांचा उहापोह करावा लागतो.' –समाज ४५. [सं. अंग+उपांग]

**अंगोवांगी** क्रिवि. १. स्वतःच, जातीने : 'येथोनि निघावें वेगीं । एकलाचि आंगोवांगी । – एभा ७.२९. २.(ल.) सहज; अनायासे : 'ऐसें योगबळें योगी । माया जिणती अंगोवांगी ।' – एभा ६.३८५. [अंगचे द्वि. सांगोवांगीप्रमाणे]

**अंगोशा-शी** पु. स्त्री. पंचा; धोतर; अंगवस्त्र; अंगोछा; उपरणे; कोपरी; उपवस्त्र.

**अंगोस्तर -अंगोस्त्र** न. अंगवस्त्र; उपरणे : 'मग स्नान करूनि अंगोस्त्र बरवे ।' - दावि १६४. [सं. अंग+वस्त्र]

**अंगोस्ती,अंगोस्त्री** स्त्री. पहा : **अंगोस्तर, अंगोस्त्र** : 'सुचवोनि अंगोस्त्री बांधविले ।' - दावि २५३.

**अंगोस्ती** स्त्री. अंगावरील शहारे; काटा. पहा : **अंगुस्ती** (क्रि. येणे, वाटणे).

**अंगोळिका, अंगोळी** स्त्री. हाताचे किंवा पायाचे बोट; करंगळी. 'सुरेख सरळ अंगोळिका । नखे जैसी चंद्ररेखा ।' - व्यं ५५. [सं. अंगुली]

**अंगौन, आंगौन** वि. अंगासंबंधी; अंगावरला.
न. धोतर : 'आंगौनि एकुगा झोलु । फेडितांचि तो बाहिरलु ।' -अमृ २.४८.

**अंग्या** पु. पहा : **अंगी, अंगरखा**

**अंग्रेज-जी** पु. पहा : **अंगरेज-जी**

**अंघ्र, अंघ्रि-घ्री** पु. पाय : 'अर्पिली अंघ्रियुगुर्ली । विश्वरूपाच्या ।' - ज्ञा ११.७०८.

**अंचल, अंचळ** पु. स्त्री. १. पहा : **अचळ**. वस्त्राचा शेवट, टोक; पदर. : 'मुखकमल तियेचे अंचलें माय झांकी ।' - सारुह २.९१. २. पडदा. ३. दशी; मागावरील कापड विणून झाल्यानंतर शेवटास उरलेले उभे दोरे. ४. योगी जे वस्त्र वापरतात ते. ५. पंचा : 'भटोबास : मेळला ऐसा आंचळा नेसले असेतिः' - लीचउ १०५. ६. जनावरांचे थान, स्तन, अंचूळ. [सं. अंचल] (वा.) **अंचल-ळ फेडणे** - लुगड्याच्या पदराने दृष्ट काढणे. (व.)

**अंचवण** न. १. जेवणानंतरचे तोंड हात धुणे (क्रिया. करणे). २. आचमन.(गो.) ३.(ल.) त्याग. [सं. आचमन]

**अंचवणे** अक्रि. १. जेवणानंतरचे तोंड हात धुणे. २. अंतरणे; मुकणे; सोडणे. (अंचवणे हे भोजनोत्तर करावयाचे असते. त्यापुढे भोजन करणे शक्य नसते यावरून) प्राणास, धनास अंचवणे = जीवास, धनास मुकणे : 'संसारसुखास अहल्या आंचवली पोरवयात ।' - विक १६.३. आचमन करणे. (गो.)उक्रि. दुसऱ्याचे तोंड हात धुणे. [सं. आचमन]

**अंचळा** पु. पंचासारखे थोटके वस्त्र : 'भटोबास अंचळा नेसले असति' - लीचउ ११५.

**अंचळी** दशा; वस्त्राच्या शेवटास असणारी दोऱ्यांची टोके.

**अंचाड** न. शिखर; उंच भाग; उंचवटा : 'कदाचित टेकडीचे एखादे अंचाड तासून हा पुतळा घडविण्यात आला असावा.' - मसाप ६३.२६६.

**अंचित** वि. पूजलेला; मान दिलेला; आदरलेला. [सं.]

**अंचित बाहु-हू** पु. (नृत्य) छातीवरील हात थोडा छातीच्या पुढे धरणे. [सं.]

**अंचितशीर्ष** न. (नृत्य) डोके किंचित एका बाजूला खांद्यावर वाकवणे (रोग, मूर्च्छा इ. गोष्टी दर्शविण्याचा अभिनय).

**अंची** स्त्री. १. डाक, टपाल; पेणे (टपालाचा घोडा बदलण्याची जागा व मुक्काम). (म्हैसूरच्या राज्यातील डाकेस अंची म्हणत.) २. हरकारा. [का. अंचि]

**अंचीवाला** पु. टपालखात्याचा अधिकारी.

**अंचेलिया** पु. गुरांचा एक रोग.

**अंज, अंजन** पु. (शाप.) एक धातू. याचा उपयोग छापखान्यातले खिळे तयार करावयाच्या शिशामध्ये मिसळण्यासाठी करतात. तसेच सुरम्याकडेही करतात. म्हणून याला सुरम्याचा धातू असेही नाव आहे. [सं. अंज्]

**अंजणे** सक्रि. डोळ्यात अंजन घालणे : 'मधुकर्पुरे चकोरी अंजिजे : तेहीं आसुइं कुमोदकंदु उगाळिजे' - रुस्व ५४७.

**अंजन** न. १. डोळ्यात घालावयाचे काजळ, सुरमा : 'न लेति जे लोचन अंजनाला ।' -सारुह २.९६. २. एक औषधी द्रव्य. याने नेत्रविकार, शैत्य इ. रोग बरे होतात. ३. विशिष्ट प्रकारचे काजळ, हे डोळ्यात घातले असता भूमिगत द्रव्य दिसते. याने इच्छित वस्तू दिसणे इ. अतींद्रियज्ञान होते : 'जैसे नेत्रीं घालिता अंजन । पडे दृष्टीस निधान ।' - दास ५.१.३८. ४. (ल.) गुरुकृपा; प्रसाद; ज्ञानदृष्टी प्राप्त होण्याचे साधन; ईश्वरी प्रसाद : 'गुरुअंजनेवीण ते (ब्रह्म) आकळेना ।' - राम १४१. ५.(ल.) भ्रमातून वगैरे शुद्धीवर आणणारी गोष्ट.

**अंजन -नी** न. स्त्री. एक इमारती लाकूड देणारे झाड; हे दहा बारा हात उंचीचे असून त्यास डहाळ्याच्या अंगास लागून जांभळी फुले व फळे येतात.

**अंजनवेल** स्त्री. एक वनस्पतिविशेष.

**अंजनहारी** पु. (नकळत दुसऱ्याच्या डोळ्यातील अंजन काढून घेणारा) अट्टलचोर, सोदा, भामटा. [सं.]

**अंजनी** वि. एकरंगी अंगावर काळे, निळे, तांबडे किंवा पिवळे ठिपके असणारा (घोडा). उदा. काळांजनी, रक्तांजनी - अश्वप ९४.

**अंज-जु-मान** स्त्री. १. सभा; संस्था; समिती. २. पारशी लोकात धर्माचाराच्या संबंधी निर्माण झालेल्या वादांचा निर्णय देणारी संस्था. [फा. अंजुमन]

**अंजलि-ली** स्त्री. १. ओंजळ; अंजळी; दोन्ही हातांचे तळवे एकत्र जोडल्याने तयार होणारा खोलगट भाग (नमस्कारासाठी किंवा काही पदार्थ घेण्या-देण्यासाठी). २. नमस्काराची एक पद्धत; अभिवादन. ३. ओंजळभर पदार्थ (फुले, धान्य). ४. धान्य मोजण्याचे माप. (ओंजळीत मावेल एवढे धान्य); कुडव. [सं.] (वा.) **अंजली जोडणे-बांधणे** - दोन्ही तळहात एकमेकांस जोडणे; (नमस्कार-प्रार्थनेसाठी) हात जोडणे; प्रार्थना करणे : 'अंजलि बांधोनि म्हणे जरि अभय असे तरि निवेदीन ।' - मोवन ११.११३.

**अंजलिपुट** पहा : **अंजली**

**अंजान** वि. अज्ञानी; माहिती नसलेला; नेणता; अडाणी. [हिं.][सं. अज्ञान]

**अंजाम** पु. परिणाम; शेवट. [फा. अंजाम ]

**अंजारणे-गोंजारणे** उक्रि १. कुरवाळून सांत्वन करणे; समजूत घालणे; लाडीगोडीने बोलणे. २. माया लावणे; ममता करणे.[गोंजारणेचे द्वि.]

**अंजारून गोंजारून** क्रिवि. १. पोटाशी धरून; कुरवाळून. २. आर्जवून, समजूत घालून.

**अंजिनी** पु. वृक्षविशेष; इमारतीचे लाकूड. पहा : **अंजन**

**अंजि–जीर** न. पु. उंबरासारखे एक फळ व त्याचे झाड. याची पाने रुंद असतात. पांढरी व जांभळी अशा दोन जाती आहेत. [सं. फा.]

**अंजिरदोडी** स्त्री. भाजीसाठी वापरण्यात येणारा कच्चा अंजीर.

**अंजिरी** वि. अंजिराच्या रंगाचे (कापड, वस्त्र इ.).
स्त्री. अंजिरी रंगाचे वस्त्र; पैठणी : 'मग दोन्ही नागकुमरी । मदालसा देखिली सामोरी । तव येरीनें सरसाविली अंजिरी । लाजलेपणे ।'– कथा ५.६.१३८.

**अंजीर** स्त्री. गुरांच्या घशात औषध वगैरे ओतताना हातास इजा होऊ नये म्हणून त्यांच्या तोंडात दिली जाणारी लाकडी नळी.

**अंजुमान** स्त्री. पारशी लोकांतील धर्माचा निर्णय करणारी सभा. २. सभा; संस्था; समिती. [फा. अंजुमान]

**अंजुळ–ळी** स्त्री. पहा : **ओंजळ**. 'ऐक्यभावाची अंजुळी ।' – ज्ञा १५.२.

**अंजूत** पु. गजकर्णासारखा एक त्वचारोग; चट्टा. (व.)

**अंटकल** पु. (उचले) केस.

**अंटसंट** वि. ताळतंत्ररहित; बेअंदाज : 'नागपूरच्या लोकांना असंबद्धतेत अंटसंटपणा दिसतो.' – पेंगौ १०३. (माळवी.)

**अंटा(ठा)रणे** क्रि. अटारणे; पहा : **अवटरणे**

**अंट्या, अंठा** पु. स्त्री. कारभार; हालचाल. (व.)

**अंठी** स्त्री. अक्कल. (खा.)

**अंठी, आंठी** (अण्ठी, आण्ठी) स्त्री. ऐक्य; मिठी; आलिंगन; ४. : 'मग सुखेचि घे आंठी । गाढेपणें ।' – ज्ञा ५.१३२. [का. अंटु]

**अंड** न. १. अंडकली; वृषण. २. कस्तुरीमृगाची कस्तुरी असलेली नाभी. ३. कवठ; प्राणी– पक्ष्यांचा प्रजोत्पादक गोलक. ४. रुईचे, सरकी काढलेल्या कापसाचे आख. (वा.)[सं.] (वा.) **अंड काढणे, बडवणे** – खच्ची करणे (पशूस). **अंड गाळणे** – १. खचणे; लटपटणे; गळाठणे. २. भीतीने मागे घेणे, राहणे. **अंड ब्रम्हांडास, कपाळी जाणे** –तिरपीट उडणे; पाचावर धारण बसणे; धीर खचणे; अतिशय घाबरणे. **अंड म्हणजे उंबरफळ म्हणणे** – अतिशय मठ्ठड किंवा मूर्ख असणे; अडाणी दगड असणे. **अंडाखाली खाजवणे** – हांजी हांजी करणे; खुशामत करणे; लोणी लावणे. **अंडावर मूत गळणे, पडणे** – १. अतिशय अशक्त व असहाय होणे; निर्बल, कमकुवत असणे. (व.) २. (ल.) मेंग्या, भागुबाई, षंढ होणे, असणे. **अंडास लोणी लावणे** – हांजी हांजी करणे; मिनतवारी करणे; काही कार्य साधून घेण्यासाठी फार आर्जव करणे; खुशामत करणे. **(दुसऱ्याच्या) अंडाने विंचू मारणे** – दुसऱ्याच्या नफा–नुकसानीची पर्वा न करता त्याजकडून परभारे आपले काम करून घेणे; पाहुण्याच्या हाताने साप मारविणे. **अंडाचे निवणे करून बसणे, अंडावर अंड घालून बसणे, अंडावर बुक्क्या मारणे** – आळशीपणाने काम न करता बसून राहणे; स्वस्थ बसणे. अगदी आळशी माणसाबद्दल वापरतात. (व.) **अंडास येणे** – वार्धक्यामुळे कमजोर व मलूल, कमताकद होणे; लुळाखुळा होणे.

**अंडउबारा** पु. (ल.) माया; गर्भश्रीमंती.
वि. (नवीन घातलेल्या अंड्याच्या उबेप्रमाणे) उबट; किंचित गरम.

**अंडकटाह** पु. १. विश्व; ब्रह्मांड; खगोलांचा दृश्य गोलार्ध. २. ब्रम्हांडाभोवती असलेले अष्टधा प्रकृतीचे आवरण, कवच : 'दुज्या पदें अंडकटाह फोडी ।' – (वामन) नवनीत १११. [सं.]

**अंडकुली, अंडकुले, अंडकूल** (अण्डकुली – ले –ले) स्त्री. न. १.वृषण, अंड (लहान मुलांचे). २. दोन्ही वृषणे; सबंध आंड.

**अंडकोश–ष** पु. १. अंडावरचे आवरण आतील वृषणासह; वृषण; अंडाशय. २. ब्रह्मांडकोशाचा संक्षेप [सं.]

**अंडगडी** पु. १. (सोंगट्या इ. खेळ) हाताखालचा खेळगडी, पित्तू. २. पोटातला गडी, एखादा गडी कमी असता त्याच्याबद्दल आपणच खेळणे; मुका गडी. ३. मदतनीस; सोबती; अडगडी. ४. हस्तक; पहा : **अंगगडी**

**अंडगे** न. तंबाखू, मिरची, शेंग वगैरेंनी भरलेले ओझे. [फा.]

**अंडगोल–गोलक** पु. वृषण; अंड. [सं.]

**अंडज** वि. १. अंडापासून जन्मलेले. २. अंड्यातून जन्मणारा, उत्पन्न होणारा (पक्षी, सर्प इ. प्राणी). [सं.]
न. पक्ष्याचे पिल्लू : 'तूं माझी पक्षिणी, मीं तुझें अंडज ।' – नाम ६२.

**अंडजनन** न. अंड्यातून जन्म होण्याची क्रिया. [सं.]

**अंडत्रास** पु. (शब्दशः अंडकुल्या वर उचलण्याजोगी अवस्था) अतिशय भीती; तिरपीट, त्रेधा; पाचावर धारण : 'करी अंडत्रासें वरिकर दुजा, जो भय हरी ।' – (मृत्तिका भक्षण – वामन).

**अंडदोरी** स्त्री. खोगीर आवळताना जनावराच्या अंडावरून आवळला जाणारा व पाठीमागे बांधण्यात येणारा पट्टा, मुठीची दोरी.

**अंडद्वार** न. (वन.) बीजकातील लहान छिद्र. बीज रुजताना या छिद्रातून पाणी शोषले जाते व मोड प्रथम बाहेर येतो. [सं.]

**अंडधरणी** स्त्री. हांजी हांजी; मिन्नतवारी; खुशामत; शेपूट घोळणी.

**अंडपंचा** पु. अतिशय अरुंद पंचा.

**अंडबंध** पु. मंदिराच्या शिखरावरील अंडाकार कळस, घुमटी. [सं.]

**अंडबुली** स्त्री. लहान मुलांच्या करदोड्याच्या किंवा घागऱ्यांच्या मधोमध घालण्यासाठी (बुलीसारखा) केलेला सोन्याचा किंवा चांदीचा एक दागिना.

**अंडमळणी** स्त्री. चोटमळणी; हांजी हांजी; हलकी कामे करून किंवा फाजील स्तुती करून मर्जी संपादणे; खुशामत.(कुण.)

**अंडयुग्म** न. वृषण. [सं.]

**अंडविकार, विकृति(ती)** पु. स्त्री. अंडाला होणारा रोग. [सं.]

**अंडवृद्धि–द्धी** स्त्री. (वै.) अंतर्गळ; वाताच्या विकाराने अंड वाढणे; वृषणात होणारा द्रव संचय. [सं.]

**अंडस्थिति–ती** स्त्री. प्राणी अंड्यात असण्याची अवस्था. [सं.]

**अंडाकार–कृति–ती** अंड्याच्या आकाराचा; लंबगोल. [सं.]

**अंडाणू** पु. (जीव.) फलित न झालेले स्त्रीयुग्मक. [सं.]

**अंडावर्त** वि. वृषण ज्या जागी पोटास लागते त्याजागी किंवा वृषणावर भोवरा असणारा (घोडा). – अश्वप ९४.

**अंडाशय** पु. १. ज्या ठिकाणी मादीच्या पोटात अंडी उत्पन्न होतात ते

स्थान. गर्भाशय. २. (वन.) फुलातील स्त्री–केसराच्या तळाशी असलेला व बीजकांना समाविष्ट करणारा फुगीर भाग. [सं.]

**अंडाळवंडाळ** स्त्री. अव्यवस्था; गैरसोय.(व.) [बंडाळीचे द्वि.]

**अंडी** स्त्री. एरंडाचे बी; एरंडी.

**अंडीपिल्ली** न. १. अंडी आणि पिल्ली. २. (पक्षी आपली अंडी–पिल्ली खोल दडवून ठेवतात यावरून) अतिशय गुप्त व गहन गोष्टी; एकूण एक खुब्या; साद्यंत हकीगत. ३. (ल.) काळेबेरे कृत्य; दुष्कृत्य. (वा.) **अंडीपिल्ली बाहेर काढणे** – दुष्कृत्य, भानगडी इ. जाहीर करणे; चव्हाट्यावर आणणे : 'त्यांची अंडीपिल्ली बाहेर काढल्याशिवाय मी राहायचा नाही.' –दुर्दम्य २६.

**अंडील–डेल** वि. १.अंड शाबूत असलेला, खच्ची न केलेला, न बडवलेला (बैल इ.); सांड. २.(ल.) रगदार; तगडा. ३.(ल.) बगल्या; अत्यंत प्रीतीतील माणूस. ४. तारुण्याने मुसमुसलेला जवान. ५. बाहेरख्याली; कामासक्त. ६.अट्टल; पक्का. [सं. अंडीर]

**अंडे** न. कवट; पक्षी किंवा इतर कित्येक प्रकारच्या प्राण्यांच्या स्त्रीजातीपासून उत्पन्न होणारा प्रजोत्पादक गोलक. यात असलेल्या गर्भाची वाढ होऊन पिल्ले तयार होतात. इतर अर्थी पहा : **अंड** (वा.) **अंडी उबवणे** – रिकामटेकडे बसणे; एकाच जागी बसून राहणे. **अंडे गाळणे** – १. पक्ष्यांने अंडे गाळणे; विणे. २. (ल.) भीतीमुळे माघार घेणे; लेंड्या गाळणे; भेदरणे. **अंड्यास येणे** – १. अंडे टाकण्याच्या स्थितीस येणे. २. (ल.) जिकीरीस येणे; दमून जाणे; मेटाकुटीस येणे. शिवाय **अंडे घालणे, पडणे, करणे, होणे** असे वाक्प्रचार आहेत.

**अंडे न.** खो खोच्या किंवा इतर कोणत्याही खेळात झालेले नियमोल्लंघन. याबद्दल प्रतिपक्षाचा एक बाद झालेला गडी पुन्हा जिवंत म्हणजे खेळावयास पात्र होतो.– व्याज्ञा १.२०४. ३. खो खो मधील एक संज्ञा. या खेळातील कोणत्याही चुकीबद्दल (उदा. खो देण्यापूर्वी गडी उठल्यास) म्हणतात. (क्रि. गाळणे).

**अंडेर** स्त्री. अंडरी; मुलगी. (खा.)

**अंडोत्सर्ग** पु. (वै.) डिंबग्रंथीपासून (ओव्हरी) स्त्रीबीज बाहेर पडणे. [सं.]

**अंडोर** पु. मुलगा : 'तेथचि आंडोरां करवि सात खडे वोलांडवणे ।' – ऋ १०८. [सं. अंड]

**अंड्या** वि. १. अंड सुजलेला; अंड मोठे असलेला. २. (ल.)अंतर्गळ झालेला.

**अंड्या** पु. कोनफळाची एक जात.

**अंत** पु. १. शेवट; निकाल; परिणाम. २. मृत्यु; मरण: 'आता असे अंत समीप आला ।' – सारुह १.१८. ३. (वैद्यकीनिदान) रोगाची पाचवी अवस्था; प्रकार; निकाल (रोगातून उठणे किंवा मरणे). ४. (ग.) श्रेणीची शेवटची संख्या, पद. ५. (ल.) शेवट; ठाव; खोली; तळ. ६. अवसान; अंतिमस्वरूप; कठीण परीक्षा; कसोटी : 'इतका वेळ माझा का अंत बघायचे झाले?' – बाय २.४. ७. कर्तृत्वाची पराकाष्ठा; सीमा; दम; तथ्य. ८. समाप्ती; पूर्णपणा. ९. कड; तीर; टोक. (वा.) **अंत पाहणे** – कसाला लावणे; छळणे, गांजणे; निघेल तितके काम काढणे : 'धाव रे रामराया किती अंत पाहसी ।' – राम. **अंत पुरणे** – काल समीप येणे; मरण ओढवणे : 'माझा तो पुरलासे अंत ।' – हरि १.२२०. **अंत लागणे** – सर्व समजणे; अखेर सापडणे, शेवट दिसणे; ठाव लागणे. **अंताला लागणे** – व्यवस्थित पार पडणे; शेवटास जाणे.

**अंत, अंतः** शअ. आत; मध्ये; अंतर्गत; आंतर : 'उंबर जे अंत स्थापिला मारूती.' – राम २.१०. समासात किंवा स्वतंत्रपणे उपयोग होतो. [सं.]

**अंतक** पु. काळ; यम : 'जेणें नादे अंतकु । गजबजला ठाके ।' – ज्ञा १.१५०. २. (ल.) प्राण घेणारा; फाशी देणारा; संहारक पदार्थ; भयंकर शत्रू; जन्मजात वैरी.

वि. संहार करणारा; प्राणनाशक (रोग, जखम, वैरी). [सं.]

**अंतकाल–ळ** पु. मरणकाल; शेवटची घटका. २. (ल.) उपसंहाराची वेळ; समाप्तीची वेळ; अखेरीची वेळ. [सं.]

**अंततः** क्रिवि. सरतेशेवटी; अखेरीस; निर्णायक रीत्या. [सं.]

**अंतपार** पु. १. अखेरची व पलीकडची जागा; शेवट; सीमा; इयत्ता (नेहमी नकारार्थी प्रयोग) : 'गोकुळींच्या सुखा । अंतपार नाही लेखा ।' – तुगा १९४.२. २. ठावठिकाणा; पत्ता.

**अंतमाळ** स्त्री. आतडी. (गो.) [सं. अंत्र+माला]

**अंतर** न. १.विवक्षित गोष्टींमधील स्थलावकाश, कालावकाश; अवधी (सामा.) काळ; वेळ : 'मग तीही निगे अंतरें । गगना मिळे ।' – ज्ञा ६.३००. २. खंड. ३. फरक; भेद; असमानता : 'तेवीं आम्हां तयां परस्परें । बाहेरी नामाचींचि अंतरे । वांचूनि आंसुवट वस्तुविचारें । मी तेचि ते ।' – ज्ञा ९.४११. ४. विपरीतपणा; असंमती; विपरीत मत. ५. दुमत; भेदभाव; भांडण; वाकडेपणा : 'परि न वदावें बंधुप्रेमी जेणें पडेल अंतर तें ।।' – मोसभा ५.६१. ६. कसूर; कमतरता (काम, चाकरी, धंदा यात). ७. चूक; अशुद्ध; तफावत (क्रि. पडणे). ८. (समासात पदाच्या अंती) दुसरा; अन्य. : 'गुढी उभविली अनंगी । शास्त्रांतरी ।' – ज्ञा ६.५२. ९. (ग.) दोन स्थलांमधील भिन्नतेशी निगडित राशी. या मूळ कल्पनेची व्याप्ती वाढवून दोन क्षणांमधील फरकात्मक कालांतर या कल्पनेस अर्थ देता येतो किंवा ठराविक गुणधर्म अथवा संकल्पनेच्या आधारे दोन गोष्टींमधील फरक दर्शविण्यासाठीही हा शब्द वापरला जातो. विवक्षित न्यूनीकरण, वजा करणे. उदा. विसात पाचांचे अंतर करून पंधरा. १०. अंतरिक्ष; आकाश; अंतराळ : 'कीं अंतरींहून खाली पडली । गेली चूर होऊनिया ।' – मोल ११. आतली बाजू, स्थल, भाग : 'वायुतत्त्वाचें अंतर' –ज्ञा १३.११५. १२. वियोग; ताटातूट. [सं. अंतर] (वा.) **अंतर करणे** – (ग.) वजा करणे. **अंतर देणे** – सोडणे; त्यागणे; टाकून जाणे : 'तुका म्हणे आतां नको देऊं अंतर । न कळे पुढें काय बोलूं विचार ।।' – तुगा १८३७, ख – १२३३. **अंतर पडणे** – १. न्यूनता, कमतरता येणे (मित्रप्रेमात, भक्तिभावात इ.) २. दुरावा निर्माण होणे. ३. चुकणे; योग्य प्रकारे न होणे. पहा : **अंतर**. ५. **अंतर**

**शीतल होणे** – तळीराम गार होणे; आतून लाच खाणे. : 'नबाब मार्गे अंतर शीतल जाल्यावाचून माघारी कूच केले नसेल – मशियांका. ६४६. **अंतर होणे** – फरक पडणे

**अंतर** न. १. मन; हृदय; मनातील गोष्ट; अभिप्राय : 'तुका म्हणे देवा माझे अंतर बसवा ।' – तुगा ११६८.२. (ल.) रहस्य; मर्म : 'भक्तीचे अंतर अतिगूढ । न कळे उघड श्रुतिशास्त्र ।' – एभा १४.२४१. शअ. आतील; मधील; मध्यंतरीचा.

**अंतरक** पु. (उत्ख.) अश्मयुगामध्ये मानव ज्या शिलाखंडापासून छिलके काढून हत्यारे बनवीत असे तो शिलाखंड अथवा त्याचा अवशिष्ट भाग. [सं.]

**अंतरकळा** स्त्री. अंतःकरण; मनः'प्रीतीपात्र अंतर्कळा । घेऊन गेली ।' – दास ३.२.४२.

**अंतरखूण, अंतरीची खूण** स्त्री. गुप्त खूण; चिन्ह; बिंग, इंगित : 'म्हणें काहीं सांगे अंतरखूण । तो ताटिकांतक मखपाळण । जेणे करूनि संतोषे ।'

**अंतरगडू** वि. १. विशेष परिचयाचा (कुटुंबातल्या गुह्य गोष्टी, धंद्यातल्या खुब्या, एखाद्या गोष्टीची खाजगी हकीगत इ. इत्यंभूत माहिती असलेला); अंतर्भेद्या. २. लुडबुड्या; लांडा कारभार करणारा; मध्यस्थ. ३. त्रासदायक; निरुपयोगी (अंग, अवयव, भाग). ४. (ल.) खटपटी; खटपट्या लटपट्या; निष्णात.
पु. १. गुप्त हेतू; गुह्य गोष्ट; मनात ठरवलेला बेत (क्रि. राखणे, ठेवणे, बाळगणे.) २. अडथळा; आडकाठी; प्रतिबंध. [सं. अंतर्गडु ]

**अंतरगळ** पहा : **अंतर्गळ**

**अंतरगृह** न. १. माजघर; स्वयंपाकघर. २. अंतःपुर, जनानखाना : 'वस्त्रें भूषणें अंगावरूती । तीं सकळ ब्राह्मणासि वांटी भूपती । मग जावोनि अंतरगृहप्रती । पुत्रमुख प्रीती पहातसे । – संवि १७.१६९.

**अंतरणे** उक्रि. १. गाळणे; सोडणे; वगळणे; टाकणे; दुर्लक्ष करणे. २. पुढे जाणे; वर जाणे; मागे टाकणे; काही अंतरावर सोडणे; समय अतिक्रांत करणे : 'आतां धर्मातें पाचारी । विलंबें दुरीं अंतरती ।' – मुसभा १६.११. ३. चुकणे; आंचवणे; मुकणे : 'भावनेच्यामुळें अंतरला देव । शिरला संदेह भय पोटीं ।' – तुगा ४८. ४. नाहीसे होणे; हातचे जाणे; वियोग पावणे; दुरावणे (मृत्यू, देशांतर इ. मुळे) : 'आणि परलोक ही अंतरेल । ऐहिकेसी ।।' – ज्ञा २.२७. ५. मरणे : 'पूर्व दिनीं गोत्रज अंतरे । तैं स्वगोत्रीं सूतक भरे ।' – एभा २१.१२५.

**अंतरदृष्टि–ष्टी** स्त्री. आत वळलेली नजर; मनःश्चक्षू; ज्ञानचक्षू.[सं.]

**अंतरपकड** स्त्री. तालमीतील व्यायामाचे एक साधन; एक प्रकारचा टांगता मल्लखांब.

**अंतरपगडी–पकडी** स्त्री. (व्यायाम) १. टांगलेला मलखांब. २. छताला दोरीने लटकलेल्या दीड फूट लांबीच्या मलखांबावरील आढ्या, उड्या.

**अंतरपट–पाट** पु. पहा : **अंतःपट** : 'मंगळ हे नोहे कन्यापुत्रादिक । राहिला लौकिक अंतरपाट ।।' – तुगा ३६५३.

**अंतरपट्टी** स्त्री. (शिवणकाम) कपड्याच्या सुट्या बाजूला (पदराला) बळकटी यावी म्हणून कपड्याच्या आतील बाजूने लावलेली कापडाची पट्टी.

**अंतरप्रग्राही** पु. (विअ.) विजेच्या साधनसामुग्रीचे विद्युल्लतेपासून किंवा उच्च दाबापासून संरक्षण करणारे उपकरण. [सं.]

**अंतरमार्ग** पु. १. आतील रस्ता. २. (संगीत) प्रत्येक रागाच्या विशिष्ट नियमांनुसार वादीसंवादीच्या धोरणाने वैचित्र्य उत्पन्न करणारा स्वरसमुदाय राग विस्ताराच्या मध्ये मध्ये योजणे; रागाचे वैशिष्ट्य राखण्यासाठी व रंजकतेसाठी केलेली स्वर रचना. [सं.]

**अंतरमाळ–ळा** स्त्री. आतडे. (भीती, तहान, काळजी यापासून होणारे दुःख सांगण्यासाठी योजतात.) (क्रि. सोकणे, शोषणे, वाळणे, सुकणे) : 'चतुर्थ नरसिंह विशाळ । .. निवटुनि असुरासि समूळ । काढी अंतरमाळ ।' – पाळणे २२. (वा.) **अंतरमाळ गळ्यात घालणे** – १. ठार करणे; नाश करणे २. त्रास देणे. **अंतरमाळ गळ्यात येणे** – त्रास होणे; नाश होणे. **अंतरमाळा उडणे** – छातीत धडकी भरणे; अतिशय घाबरणे : 'तुला थट्टा वाटतेय ... पण.. अंतरमाळा उडाल्या आमच्या.' – त्रिशंकू १६३. **अंतरमाळा शोषणे–वाळणे–सुकणे** – भयंकर धक्का बसणे; भीती वाटणे.

**अंतरमिठी** स्त्री. अतिशय प्रेम : 'राम जावई विशेष । अंतरमिठी जनकाची ।' – वेसीस्व ७.१०.

**अंतरमृदा** स्त्री. भूपृष्ठाखालची माती. [सं.]

**अंतरवन** न. नागवेलीचे अंकुर; जुन्या नागवेलीचे कडे करून ते जमिनीत पुरले असता त्यापासून जे नवीन अंकुर किंवा धुमारे फुटतात ते, ती गुंडाळी व नवीन फुटलेली पाने (नवती).

**अंतरवही–ई** स्त्री. आतील कुंपण, बांध, वई; अनुक्रमाने वेगवेगळ्या मालकांचे ओळीने असलेले जमिनीचे तुकडे स्वतंत्रपणे दाखविण्यासाठी ओढण्याच्या रेघा. (वह्या).

**अंतरवास** पु. अंतर्वस्त्र; अंतर्वेष्टन. [सं. अंतर्वास]

**अंतरविचार** पु. अंतर्विचार; मनातला, हातचा ठेवलेला किंवा कपट : 'त्याचाही आम्हासी काही अंतरविचार नाही.' – ऐलेसं ५५६.

**अंतरविटाळ** पु. साक्षात् स्पर्श न होता गवत, काठी इ. मध्यस्थ वस्तूने झालेला विटाळ.

**अंतरवेधी** पु. अंतरज्ञानी पुरुष; मनकवडा : 'अंतरवेधी अंतर जाणें । बाहेरमुद्रा कांहींच नेणें ।' – दास १८.८.१५.

**अंतरवेल** पु. स्त्री. आकाशवेल; अमरवेल; सोनवेल.

**अंतरवेष्ठन** न. लंगोटी. [सं.]

**अंतरसाल** स्त्री. झाडाच्या वरील सालीच्या आतली पातळ साल, त्वचा; जनावराच्या कातड्याच्या आतली पातळ चामडी.

**अंतरसाळ** स्त्री. भाताचा एक प्रकार.

**अंतरसाक्ष–क्षी** वि. १. अंतर्ज्ञानी (ईश्वर, योगी). २. अंतर्याम जाणणारा. [सं. अंतःसाक्षी]

**अंतरसुख** न. आत्मसुख; आत्मतृप्ती; अंतर्यामीचा आनंद : 'जयास साधलें अंतरसुख । मग तो न मानी प्रपंच दुःख ।'

**अंतरसुती** वि. १. ज्याची अर्धी वीण सुती आहे असे कापड, सणंग. २.(ल.) आतून काम करणारा; गुप्तपणे खटपट करणारा. ३. प्रच्छन्न

भावाचा; गूढ अर्थाचा. [सं.]

**अंतरसूत** न. फेर फरक; विसंगती : 'त्यास मनास आणिता गाव वसाहत जाला. यास ५०-५५ वर्षे जाली आणि मुरडीचे आगरास नारायण जोसी यास दिल्हैयास वर्षे ३८ जाहली तेव्हा अंतरसूत.' - पेंडसेकुवृ ३५.

**अंतरस्थ** वि. १. अंतस्थ; आतील. २. अंगची; मूळची. ४. स्वाभाविक; नैसर्गिक. [सं.]

**अंतरहेत-तु-तू** पु. गुप्त हेतू : 'अंतरहेत चुकत गेला । समुदायाचा ।' - दास १९.९.७.

**अंतरज्ञ** वि. १. अंतर्ज्ञानी; जगातील सर्व गोष्टी मनाने जाणणारा. २. अंतरसाक्षी. [सं.]

**अंतरंग** न. १. मन; अंतःकरण : 'भक्ति निकट अंत(आत) रंगे । तो सत्वगुण ।' - दास २.७.३४. २. आतील भाग; अभ्यंतर; अंतर्भाग; गुह्य. बहिरंगाच्या उलट : 'ऐसा हा अंतरंगु । सच्छब्दाचा, विनियोगु ।' - ज्ञा १७.३८५. ३. ग्रंथाचा सारांश, मथितार्थ.
वि. जवळचा; अत्यंत प्रिय; जिवलग. [सं.]

**अंतरंगपरीक्षण** न. १. समग्र ग्रंथ अवलोकन करून त्यातील मर्म, रहस्य, मथितार्थ किंवा प्रमेय काढणे - टिसू ७७. २. ग्रंथाचे प्रस्तावनावजा सिंहावलोकन; ग्रंथसार. [सं.]

**अंतरंग-लक्ष्मी** स्त्री. जैन तत्त्वज्ञानात शुद्ध ज्ञान व शुद्ध भावना यास अंतरंग - लक्ष्मी व ऐहिक सामग्रीस बहिरंग लक्ष्मी म्हणतात-के. १३.१२.३५.

**अंतरंगीचा** वि. १. अंतरीचा; जवळचा शरीरसंबंधी; जिवलग; निकटवर्ती; कुटुंबातला (चाकर, नोकर, आप्त, मित्र इ.) : 'मी जरी सलगीचा चांगु । तरी काय अइसीहूनि अंतरंगु ।।' - ज्ञा ११.३२. २.आत्मीय; स्वतःचा; स्वकीय; वैयक्तिक; सार्वजनिक नव्हे असा.

**अंतरा** पु. १. मधील अंतर, काळ. २. एक दिवसाआड येणारा ताप. ३. (संगीत) चीजेचा दुसरा भाग - ह्यात तार सप्तकातील स्वर असावेच लागतात. (सामा.) गाणे; गाण्यातील धृपदाखेरीज इतर कडवी; पहा : **अंत्रा.** ४. आतील बाजू; स्थल; भाग. ५. मर्म. ६. अंतर; फासला : 'प्रसंग कोणते वेळेस कसा पडेल हे न कळे याजमुळे, अलिजाबहाद्दर याजकडील जमेत आहे, यांसि अंतरा पाडावा हे ध्यानी आणून कूच केले.' - ऐलेसं ६३६४.

**अंतरा** पु. तरवारीच्या मुठीवरील बोटांचा आसरा.

**अंतरा** पु. जंबिया मधील एक डाव; आपल्या हातातील जंबियाने जोडीदारासच त्याच्या उजव्या बाजूला शेवटच्या बरगडीजवळ मारणे. [सं. आंत्र]

**अंतरागमन** १. मधून जाणे. (मूळ अर्थ - यज्ञात ऋत्विज अनुष्ठानास बसले असता त्यांच्यामधून अथवा कर्मकर्ता, ऋत्विज व देवता यांच्यामधून इतरांनी जाणे, वादी-प्रतिवादी, गुरुशिष्य, नवराबायको इ. च्या मधून इतरांनी जाणे.). २. मध्यस्थी; मध्यस्थपणा. [सं.]

**अंतरा ट्रॅपी** पु. (भूशा.) दक्षिण भारतातील लाव्हा खडकांच्या दोन थरांमध्ये आढळणारा गाळांचा थर.

**अंतरात्मा** पु. १. जीवात्मा; मन. २. अंतर्विकार; भावना; हृदय; अंतःकरण. [सं.]

**अंतराय-व** पु. १. अडथळा; विघ्न; अडचण; हरकत : 'जैसा सिद्धांसि सिद्धलाभ होतां । उठी अवचिता अंतराय ।' - एरुस्व २.४१. २. वियोग; ताटातूट. ३. उणीव; कमतरता. ४. (प्राणि.) पडदा.

**अंतरायाम, अंतरायामवात** पु. (आयु.) एक प्रकारचा वातप्रकोप. शरीराच्या पुढील भागाचे स्नायू आखडून शरीर धनुष्याप्रमाणे वाकवणारा धनुर्वाताचा एक प्रकार (बहिरायामवाताच्या उलट). [सं.]

**अंतराल-ळ** पु. न. १. पृथ्वी आणि आकाश यांच्यामधील जागा; अंतरिक्ष; वातावरण; आकाश : 'हे असो स्वर्ग पाताळ । कीं भूमी दिशा अंतराळ ।' - ज्ञा ११.२७१. २. मधली जागा; अवकाश; अभ्यंतर. [सं. अंतराल]

**अंतराव** पु. मुख्याधिकारी : 'कीं तो लावण्यदुर्गीचा अंतराओ ।' - शिव २६२.

**अंतरास्थापन** न. मध्ये येणे.

**अंतरास्पर्श** पु. (अप.) अंतरस्पर्श; पहा : **अंतरविटाळ**

**अंतराळ** न. महानुभाव देवताचक्रातील अंतराळ या स्थानातील देवता : 'अष्टौ देवयोनी आणि अंतराळा किती जवळीक?' - लीचउ ३८४.

**अंतराळयान** न. ग्रह, तारे इ. कडे किंवा अवकाशात शास्त्रीय अभ्यासासाठी पृथ्वीवरून पाठवलेले विमानासारखे वाहनः 'आकाशात उंचावर लढाऊ अंतराळयानं झेपावत होती.' - स्वयु १३४.

**अंतराळ वाहन विद्या, अंतराळविद्या** स्त्री. अवकाशात उड्डाणाचे तंत्र व शास्त्र. [सं.]

**अंतराळवीर** पु. अवकाशयानातून अवकाशात भ्रमण करणारी व्यक्ती; अंतराळात प्रवास करणारा; वैमानिक.

**अंतराळी** वि. १. अधांतरी. २. अस्वस्थ : 'काही कळेना झालं. जीव अंतराळी झाला.' - ऊन १०९.

**अंतरिक विदरण** न. (भूशा.) जमिनीचे किंवा खडकांचे विवक्षित अंतराने खोलवर दुभंगणे. [सं.]

**अंतरित** वि. १. अंतरलेले; ओलांडलेले; गाळलेले; वगळलेले; अपुरे टाकलेले. २. विभागलेले; वेगळे केलेले; अंतरावर सोडलेले. ३. झाकलेला, आच्छादलेला : 'परंतु डोंगरी किल्ले म्हणून जितके आहेत तितक्या सगळ्यांच्या मुळारंभाचा इतिहास ढगांनी अंतरित अशा आकाशाप्रमाणे अंधुक आहे.' - केस्व ३१९. [सं.]

**अंतरित धारा** स्त्री. (विअ.) अनियमितपणे वाहणारा मधून मधून खंडित होणारा वीज प्रवाह. [सं.]

**अंतरित रोध** पु. (विअ.) १. अंतस्थ प्रतिबंध (विद्युतप्रतिबंध). २. अंतर्गत अडथळा. [सं.]

**अंतरिन्द्रिय** न. १. शरीराच्या आतील अवयव २.(तत्त्व.) मन.[सं.]

**अंतरिम** वि. मधल्या कालावधीपुरता; कामचलाऊ; तात्पुरता; हंगामी. [सं.]

**अंतरिम अधिलाभांश** पु. (अर्थ.) तात्पुरता किंवा मधल्या

कालावधीसाठी दिलेला बोनस. [सं.]

**अंतरिम अर्थसंकल्प** पु. (अर्थ.) हंगामी अर्थसंकल्प; तात्पुरते, थोड्या कालावधीसाठी केलेले अंदाजपत्रक.

**अंतरिम सरकार** न. (राज्य.) १. तात्पुरते शासन; अल्पकालिक सरकार. २. सत्तांतराच्या कालात असलेले केंद्रीय सरकार.

**अंतरिक्ष ,अंतरीक्ष** न. आकाश; वातावरण : 'अंतरिक्षी तारांगणे । धरी कवण ।।' – ज्ञा १३.५४. [सं.]

**अंतरीक** वि. १. पहा : **अंतरित**

**अंतरीकृत** वि. दूर ठेवलेले; अंतरावर ठेवलेले.

**अंतरीचा निरोप** पु. आतला (गुप्त) संदेश, आज्ञा.

**अंतरीची मात** स्त्री. गुह्य गोष्ट; गुप्त गोष्ट : 'सांगे अंतरींची मात । तो एक मूर्ख ।।' – दास २.१.९.

**अंतरीय वस्त्र** न. १. आतील वस्त्र; आतला कपडा (याच्या उलट उत्तरीय–पांघरावयाचे वस्त्र). २. नेसावयाचे धोतर (पूर्वी अंतरीय व उत्तरीय अशी दोनच वस्त्रे असत.). [सं.]

**अंतरुपाधि–धी** स्त्री. १. गुप्त रोग. २. घरातील तंटा, गुह्य, गुप्त पीडा, गृहछिद्र. ३. गुप्त शत्रू, आपसातील शत्रू.

**अंतर्कळा** स्त्री. १. चाणाक्षपणा; हुशारी; चातुर्य; कल्पकपणा.

**अंतर्गट** पु. (समाज.) एखादी व्यक्ती ज्या आतल्या गटाची सदस्य असते असा गट.

**अंतर्गडू** वि. अंतर्भेद्या; निष्णात. [सं.]

**अंतर्गत** वि. १.आतील; अंतःस्थित; मधील. २. समाविष्ट. पोटात आलेले. ३. मनातला; गुप्त.

न. मनातला हेतू; गुप्त मसलत. [सं.]

**अंतर्गत कोन** पु. (ग.) समाविष्ट केलेला कोन.

**अंतर्गत लेखापरीक्षक** पु. (व्यापार.) एखाद्या कंपनीच्या संस्थेच्या आर्थिक व्यवहारांची व जमाखर्चाची तेथेच तपासणी करण्यासाठी कंपनीने, संस्थेने नेमलेला अधिकारी. [सं.]

**अंतर्गर्भ** पु. १. आतला भाग; गाभा; गर; मगज; दळ; सार. २. (ल.) गर्भितार्थ; आतील हेतू; गूढार्थ. [सं.]

**अंतर्गल** पु. (वै.) कोणतेही इंद्रिय आपल्या वास्तविक ठिकाणापासून ढळणे; दुसरीकडे येणे, घुसणे. पहा : **अंतर्गळ** [सं.]

**अंतर्गळ** पु. आतड्याचा काही भाग वातप्रकोपाने अंडाशयात किंवा काहींच्या मते जांघेत उतरून अंड मोठे होणे; याने अंडसंधीमध्ये गाठीप्रमाणे सूज उत्पन्न होते. [सं. अंतर्गल]

**अंतर्गाभा** (भूशा.) पृथ्वीच्या पोटात अगदी मध्याशी असणारा भाग. [सं.]

**अंतर्गामी** वि. आत जाणारा. [सं.]

**अंतर्गेही वाहनळी** स्त्री. (विअ.) विजेच्या तारा नेण्याकरता भिंतीत बसवलेली नळी.

**अंतर्गोल** वि. ज्याचा आतील भाग गोल आहे असा. (बर्हिगोलाच्या विरुद्ध). [सं.]

**अंतर्गोल भिंग** न. आतील भाग गोल असलेली काच.

**अंतर्ग्रह** पु. पृथ्वी व सूर्य यांमधील बुध व शुक्र ग्रह. [सं.]

**अंतर्ग्रहण** न. (वै.) खाल्लेले अन्न पोटात पचनसंस्थेपर्यंत जाणे. [सं.]

**अंतर्ग्रहण क्षेत्र** न. (भूशा.) पाणी आत घेण्याचे (तलावाचे वगैरे) क्षेत्र. [सं.]

**अंतर्चक्षु–क्षू** वि. अंतर्ज्ञानी; दुसऱ्याचे अंतःकरण जाणणारा; दिव्यदृष्टी असलेला; मंत्रद्रष्टा.

पु. दुसऱ्याचे अंतःकरण जाणण्याची दृष्टी; ज्ञानदृष्टी; अंतर्दृष्टी. [सं.]

**अंतर्जकात** स्त्री. देशात तयार होऊन देशातच खपणाऱ्या मालावरील कर.

**अंतर्जठर** न. पोट; उदर. [सं.]

**अंतर्जनन** न. (समाज.) एखादा वंश, जमात, जात, राजघराणे यांमध्ये शुद्धतेच्या अत्याग्रहामुळे आपापसातच लग्ने करून होणारे प्रजोत्पादन. [सं.]

**अंतर्जन्य** वि. (वन.) विशिष्ट ठिकाणीच आढळणारी; स्थानमर्यादित. [सं.]

**अंतर्जात** वि. (शाप.) १. अन्तर्वर्धिष्णू, आतल्या आत वाढणारे (या वाढीत वस्तूतील पेशी गुणाकाराने वाढतात). २. आतील कोशिकाथरातून उद्भवलेले. ३. बाहेरून न आलेला; त्याच ठिकाणी निर्माण झालेला. [सं.]

**अंतर्जीवोपजीवी** वि. (जीव.) एखादी वनस्पती किंवा प्राणी याच्या शरीरात राहून त्यावरच उपजीविका करणारी (वनस्पती अथवा प्राणी). उदा. तांबेरा, काणी; जंतासारखे किंवा नारूसारखे प्राणी. [सं.]

**अंतर्ज्योति–ती** स्त्री. (वेदान्त) अंतरात्मा; आत्मा : 'की अंतर्ज्योतीचें लिंग । निर्वाळिलें ।' – ज्ञा ६.२५४.

वि. आत्मज्ञान झालेला. [सं.]

**अंतर्झूल–ली** स्त्री. हत्तीच्या अंगावरील चित्रविचित्र झूल, पाखरा.

**अंतर्त्याग** पु. खरोखरचा, मनापासूनचा, अंतःकरणपूर्वक केलेला त्याग. [सं.]

**अंतर्दर्शन** न. आत्मनिरीक्षण, आपले गुणावगुण वा विचार मनात विचार करून तपासणे.

**अंतर्दर्शी** वि. १. आत्मचिंतनात मग्न असणारा; आत्मज्ञानी; आत्मचिंतन करणारा.दुसऱ्याचे मन जाणणारा. [सं.]

**अंतर्दशा** स्त्री. (ज्यो.) १.जन्मकुंडली करताना असलेला उपग्रहाचा पगडा; ग्रहाचा फल देण्याचा काल; याच्या उलट महादशा, म्हणजे मुख्य ग्रहांची बाधा; स्वामित्व. २. स्वतःची अंतस्थ खरी स्थिती; वस्तुस्थिती. [सं.]

**अंतर्दाह** पु. १.बाहेरून हातास अंग गरम लागत नसून शरीरात (ताप, पित्त इ.मुळे) होणारी जळजळ, आग. २.(ल.) आतील दाह, दुःख, संताप (काम, क्रोध इ. मुळे होणारा). [सं.]

**अंतर्दुर्ग** पु. (स्था.) बालेकिल्ला; बाहेरील कोटामध्ये पुन्हा एक कोट बांधून केलेली बळकट जागा. [सं.]

**अंतर्दृष्टि–ष्टी** स्त्री. १. दृष्टी अंतर्मुख करून चित्त, मन पाहणे; अंतरावलोकन; अंतःचक्षू; ज्ञानचक्षू; आत्मप्रवणता. २. अंतर्ज्ञान; अंतर्ज्ञानाने जाणणे; प्रज्ञा. ३. मर्मदृष्टी; खुबी.
वि. १. मनाची वृत्ती आत्म्याकडे वळवून पाहणारा; अंतर्मुखी. २. अंतर्ज्ञानी; दूरदर्शी; सिद्ध (पुरुष). [सं.]

**अंतर्देशीय** वि. १.देशाच्या अंतर्गत भागाशी संबंधित असलेला. २. देशातल्या देशात वापरले जाणारे (टपालाचे पाकीट). [सं.]

**अंतर्देशीय जलपथ** पु. (व्यापार.) वाहतुकीसाठी वापरले जाणारे देशातील नद्या, कालवे इ. जलमार्ग. [सं.]

**अंतर्देशीय दळणवळण** न. देशातील अंतर्गत दळणवळण, वाहतूक इत्यादी.

**अंतर्देशीय पत्र** न. देशातल्या देशात पाठवले जाणारे, घडी घालून बंद करता येणारे पत्र.

**अंतर्देशीय महसूल** पु. एखाद्या देशाचे कर, उत्पादनशुल्क इ. मार्गांनी मिळणारे उत्पन्न.

**अंतर्देशीय विपणन** न. (व्यापार) देशात उत्पादित झालेल्या मालाचा देशातच होणारा व्यापार, अशा मालाला देशात उपलब्ध असलेली बाजारपेठ.

**अंतर्द्रव्य** न. (वै.) (सूक्ष्म पिंडातील) मुख्य जीवनदायी पदार्थ.[सं.]

**अंतर्द्वंद्व** न. मनात चाललेला विचारांचा झगडा; अंतरंगात चाललेला दोन प्रवृत्तींमधील संघर्ष. [सं.]

**अंतर्द्वार** न. १. आतले दार. २. जनानखान्याचे राणीवशाचे दार. ३. (ल.) गुप्तपणे मध्यस्थी करणारा, वशिला लावणारा माणूस; मध्यस्थ. [सं.]

**अंतर्धान** न. १. एकदम नाहीसे होणे; दिसेनासे होणे; गुप्तता; अदृश्यावस्था : 'आज्ञा मागोनि समर्थांप्रती । अंतर्धान पावे मारुती ।' – संवि ३.५८. (क्रि. पावणे). २. आच्छादन; एखादी वस्तू किंवा शरीर झाकावयाचे साधन. (पडदा, माया, डोळ्यावरील पटल.)

**अंतर्धायक** वि. अंतर्धान करणारे; गुप्त, आड ठेवणारे.

**अंतर्धारी** वि. (वन.) (पानाच्या) किनारीजवळ पण आतील बाजूस असलेली (शीर). [सं.]

**अंतर्ध्यान** न. ध्यानरूप समाधी; ध्यानस्थ असणे; भक्ताची परमेश्वराच्या ठिकाणी लागणारी तंद्री. [सं.]

**अंतर्निधान** न. अंतरंग, आतील ठेव : 'त्याचवेळी मूर्तीचे अंतर्निधान आत्मसात करू पाहणारी...' – अंधारयात्रा १९. [सं.]

**अंतर्निरीक्षण** न. (मानस.) स्वतःच्या मनोव्यापारांचे अंतर्मुख होऊन तटस्थपणे केलेले निरीक्षण. [सं.]

**अंतर्निरोध** पु. (वै.) शरीराच्या चालू क्रियेस प्रतिबंध करणे; (समाज.) इंद्रियांच्या मुक्त, अनिर्बंध व्यापारांना प्रतिबंध करणे. [सं.]

**अंतर्निष्ठ** वि. १. ध्यानस्थ; समाधिस्थ. २. निवृत्तिमार्गावर निष्ठा असलेला; पहा : **अंतर्मुख** [सं.]

**अंतर्निष्ठा** स्त्री. अंतर्ध्यानाने झालेली मनाची एकाग्रता; समाधी; ध्यान. [सं.]

**अंतर्पाट** पु. लग्नात नवरा व नवरी यांच्यामध्ये किंवा मुंजीत गुरू(वडील) व मुंज होणारा मुलगा यांच्यामध्ये जे वस्त्र पडद्याप्रमाणे ठराविक मुहूर्तघटकेपर्यंत धरतात ते. [सं. अंतःपाट]

**अंतर्बहिर्वक्र** वि. (भौ.) एका बाजूने आतल्या बाजूला वळलेले व दुसऱ्या बाजूने बाहेरच्या बाजूला वळलेले (भिंग). [सं.]

**अंतर्बंधन** न. एकमेकांत गुंतलेले असणे, परस्परांना पूरक होईल अशा प्रकारे एकत्र गुंतवलेले असणे.

**अंतर्बाह्य** न. १. आतील आणि बाहेरील बाजू. २. अंतरात्मा आणि बाह्यक्रिया अथवा चलनवलन; अंतःकरण आणि आचरण.
क्रिवि. आत आणि बाहेर सर्व बाजूंनी; चोहोकडून; हरएक प्रकारे.

**अंतर्भरण** न. (शाप.) एका वस्तूचे अंश किंवा गुणधर्म दुसऱ्या वस्तूत किंवा वस्तूच्या अंगी घालणे. [सं.]

**अंतर्भरित केबल** स्त्री. (विअ.) विशिष्ट द्रव्य जीत भरले आहे अशी पोलादाची किंवा तांब्याची तार.

**अंतर्भाव** पु. समावेश; समाविष्ट स्थिती : 'स्वातंत्र्यात स्वराज्याचा अंतर्भाव आहे.' – लोटिकेले ३.२४८. [सं.]

**अंतर्भाव** पु. मन; मनोभाव; अंतस्थ हेतू; अभिप्राय. [सं.]

**अंतर्भावन** न. (तत्त्व.) ध्यान; मनन; चिंतन. [सं.]

**अंतर्भाषण** न. संयतभाषण; मनातील भाषण; पश्यंतीवाणी.

**अंतर्भूत** वि. समाविष्ट; अंतर्गत; अंतस्थित : 'नाम धरियेले कंठी । असें अंतर्भूत पोटी ।' [सं.]

**अंतर्भेद** पु. १. आतील किंवा खाजगी गुह्य गोष्टी; गुपित; आतली बातमी. २. अशा गुह्य गोष्टींची फोड, परिस्फुटता (शत्रू, बाहेरचे लोक इ. मध्ये). ३. गुप्त गोष्टींची माहिती, ज्ञान. [सं.]

**अंतर्भेद, अंतर्भेदन** पु.न. जोराने आत घुसणे किंवा शिरणे. [सं.]

**अंतर्भेदी–द्या** वि. १. गुह्य बाहेर फोडणारा; घरभेद्या; गुप्त गोष्टींची परिस्फुटता करणारा. २. गुप्त गोष्टी माहीत असलेला; अंतःस्थितीचे ज्ञान असलेला. ३. आत शिरणारा; घुसणारा.

**अंतर्मन** न. आजूबाजूच्या घटनांचा ज्याच्यावर ठसा उमटतो, पण जे प्रत्यक्ष विचार करत नाही असे मन; ज्याच्या अस्तित्वाची जाणीव प्रत्यक्ष संबंधित व्यक्तीलाच नसते असा मनाचा भाग. [सं.]

**अंतर्मानसिक** वि. (मानस.) अंतर्मनाशी संबंधित असलेला; पूर्णपणे जागृत नसलेल्या, अर्धजागृत मनाशी संबंधित असलेला. [सं.]

**अंतर्माळ** आंतडे.

**अंतर्मुख** वि. १. आत वळलेली; विचारी; आत्मचिंतनपर (दृष्टी इ.). २. निवृत्तिमार्गी; विरक्त. ३. अंतर्निष्ठ; आत्मनिष्ठ; ध्यानस्थ. ४. (शाप.) आतील बाजूस उघडणारा.[सं.] (वा.) **अंतर्मुख होणे** – स्वतःकडे नीट पाहणे; आपल्या मनाची नीट छाननी करणे; स्वतःचे वर्तन

बारकाईने पाहणे; डोळस होणे; आपल्या मनात कोणते विचार आहेत किंवा येतात यांचे परीक्षण करणे.

**अंतर्मुखता** स्त्री. आत वळलेली दृष्टी; स्वतःतच गुंग होऊन राहण्याची वृत्ती; मनातील घडामोडीतच रममाण होण्याची सवय. [सं.]

**अंतर्मुख व्यक्ति–क्ती** स्त्री. बाह्य जगाशी किंवा समाजाशी संबंध न ठेवता आपल्या व्यक्तिगत विचार भावनात गुंग होऊन राहणारी व्यक्ती.

**अंतर्मुखी** वि. (मानस.) स्वयंकेंद्री; स्वतःच्या विचारात दंग असणारा; समाजात फारसा न मिसळणारा; चिंतनशील. [सं.]

**अंतर्मृदा** स्त्री. मातीच्या वरच्या थराखालची माती; भूपृष्ठाखालची जमीन. [सं.]

**अंतर्याग** पु. १.(महानु.) भोजन. २. देवताप्राप्तीचा संचारी विद्यामार्ग : 'जेंचि अंतर्यागे पाविजे तेंचि बहिर्यागें पाविजे' – लीचउ ४९१.[सं.]

**अंतर्याम** न. १. आत्मा; जीव. २. (ल.) मन; अंतःकरण; चित्त. ३. अंतरंग; आतील गोष्ट.[सं.] (वा.) **अंतर्याम कळवळणे** – आतडयाला पीळ पडणे; तळमळ होणे. **अंतर्यामी ताप बसणे** – हाडी ज्वर चिकटणे. **अंतर्यामी रडणे** – मनातल्या मनात दुःख करणे. **अंतर्यामी वास करणे** – हृदयात खोल जाऊन बसणे; अंतःकरणावर ठसून राहणे. **अंतर्यामास डाग बसणे – लागणे** – हृदयास दुःखामुळे धक्का बसणे. **अंतर्यामीचे दुःख अंतर्यामास ठाऊक, अंतर्यामीची खूण अंतर्यामास ठाऊक** – मनातले बेत किंवा खलबते, अनुभव ज्याचे त्याला माहीत; केलेले अपकार किंवा उपकार मनाचे मनास माहीत. **अंतर्यामीची खूण आईला ठाऊक** – १. आपल्या मनातल्या गोष्टी आईलाच माहीत असतात. २. मुलाचा जनक कोण हे आईलाच माहीत असते.

**अंतर्यामी** वि. १. जवळचा; जीवश्च कंठश्च; जिवलग. २. अंतर्यामाचा साक्षी (जीवात्मा, ईश्वर).

क्रिवि. मनात; बाहेर दिसणार नाही अशा प्रकारे.

**अंतर्युति–ती** स्त्री. (ज्यो.) ग्रहांची गौण युती. [सं.]

**अंतर्योग** पु. 'बुध, शुक्र हे ग्रह आपापल्या कक्षांतून परिभ्रमण करत असता जेव्हा सूर्य व पृथ्वी यांच्यामध्ये येतात, तेव्हा त्यास बुध-शुक्र यांचा अंतर्योग झाला असे म्हणतात. अर्थातच त्यावेळी ते आपल्याला जास्त जवळ असतात.' – सुजो ३१६. [सं.]

**अंतर्रोध** पु. (वै.) १. स्फोटक व्यंजने उच्चारताना श्वासमार्ग पूर्ण बंद होणे. २. चेतेने दुसरी प्रतिक्षिप्त क्रिया केल्यामुळे पहिला प्रतिक्षेपमार्ग बंद होणे. [सं.]

**अंतर्लापिका** स्त्री. श्लोकाचा अर्थ लावण्याचे मर्म गुप्त रूपाने त्याच श्लोकात ठेवलेले असते. अशा प्रकारचा श्लोक; गूढ श्लोक; गर्भितार्थ श्लोक : 'औषध न लगे मजला.' – नल ५१. [सं.]

**अंतर्लीन** वि. एकजीव झालेला; मिसळून गेलेला : 'आणि जरी ती त्या समाजाला अंतर्लीन झालेली असली...' गांगा १५. [सं.]

**अंतर्लेखन करणे** अक्रि. (ग.) एखाद्या आकृतीच्या आतील बाजूस त्या आकृतीस स्पर्श करणारी आकृती काढणे.

**अंतर्वक्र** वि. आतून कमानदार असलेला; अंतर्गोल; आतून वक्र असलेला. [सं.]

**अंतर्वक्र जाल्** न. (भौ.) अंतर्वक्र आरशाला बसवलेले परावर्तन जाल (जाळी). [सं.]

**अंतर्वक्र भिंग** न. (भौ.) ज्याचा मधला भाग आत वळलेला आहे असे भिंग. यापासून मिळणारी वस्तूची प्रतिमा वस्तूच्या मूळ आकारापेक्षा लहान असते.

**अंतर्वत्नी** स्त्री. गरोदर स्त्री : 'अंतर्वत्नी पत्नी झाल्या । व्याला सपुत्र फळ शकलें ।' – मोसभा १.७७.

**अंतर्वर्त** वि. अंतर्मुख.

**अंतर्वर्तन** न. (वै.) शरीरातील एखादे इंद्रिय जागेवरून सुटून त्याची थोडी किंवा संपूर्ण आतली बाजू बाहेरच्या बाजूला वळणे. [सं.]

**अंतर्वर्ती** वि. १. ज्ञात असलेला; मध्यस्थित; समाविष्ट; आकळित : 'परि महेशें सूर्याहातीं । दिधली तेजाची सूती । तया भासा अंतर्वर्ती । जगचि केलें ।'– अमृ १०२. २. गौण (ग्रह) याच्या उलट बहिर्वर्ती. बुध आणि शुक्र यांना अंतर्वर्ती ग्रह म्हणतात कारण ह्यांच्या कक्षा पृथ्वी आणि सूर्य यांच्यामध्ये असतात. [सं.]

**अंतर्वर्ती आवधान** न. तात्पुरती तरतूद.

**अंतर्वलन** न. (वै.) कोरकगोलाच्या भिंतीच्या वेष्टनात आद्यभ्रूणाची होणारी वाढ. [सं.]

**अंतर्वलित** वि. (जीव.) कळीमध्ये वरच्या बाजूस वळलेल्या (गुंडाळलेल्या) पाकळ्यांच्या किनारी (कडा). उदा. कमळ. [सं.]

**अंतर्वल्क** न. (वन.) झाडाच्या सालीच्या आतील साल; अंतर्साल. [सं.]

**अंतर्वसन** न. आतले वस्त्र. 'अंतर्वसन बाह्य वसन । कंचुकीवरून प्रावरण ।' – हरि २४.१६३. [सं.]

**अंतर्वाद करणे** ज्यात तिसऱ्याचा संबंध येतो अशा प्रकरणाबद्दल दोन्ही पक्षांनी युक्तिवाद करणे.

**अंतर्वादी** पु. असा युक्तीवाद करणारा. [सं.]

**अंतर्वास** पु. १. आतील वस्ती. २. आत्म्यात वास करणे.परमेश्वराशी तादात्म्य पावणे; आत्मनिष्ठ असणे : 'आवडीच्या करा ऐसे । अंतर्वासें जाणतसा ।' – तुगा १७६१.

**अंतर्वासित** वि. आत ठेवून घेतलेला.

**अंतर्वासी** वि. आत्मनिष्ठ (योगी); आत्म्यात विलीन झालेला (योग्याचा एक प्रकार). [सं.]

**अंतर्विभक्त** वि. आतील बाजूस भाग पाडलेले आहेत अशी. (रेषा).

**अंतर्विवाह** पु. (समाज.) एखाद्या व्यक्तीने स्वतःचा विशिष्ट असा गट, धर्म, जात, वंश यातील व्यक्तीशी केलेला विवाह. [सं.]

**अंतर्विष्ट** वि. १. आत असलेला. २. (भूशा.) एखाद्या खनिजाच्या शरीरात असणारे (इतर पदार्थांचे सूक्ष्म कण). [सं.]

**अंतर्विष्ट ऊर्जा** स्त्री. (भौ.) एखाद्या वस्तूत समाविष्ट असलेली शक्ती, प्रेरक शक्ती. [सं.]

**अंतर्वृत्त** न. (ग.) आतील वर्तुळ.
वि. दिलेल्या आकृतीस आतील बाजूने स्पर्श करणारे (वर्तुळ). [सं.]

**अंतर्वेदी** स्त्री. १. कोणत्याही दोन नद्यांमधील प्रदेश; दुआब. २. (विशेषत: ) गंगा व यमुना यांमधील प्रांत : 'अब्दाली कोळेहून यमुना उतरून अलीकडे येऊ लागले तरी, अंतर्वेदींत सर्वांनी उतरून पायबंद द्यावा.' –मइसा १.२. [सं.]

**अंतर्वेधन** न. (भौ.) (एका वस्तूचा अंश किंवा गुणधर्म) दुसऱ्या वस्तूत घालण्याची क्रिया. [सं.]

**अंतर्वेशन** न. (शाप.) आत शिरणे; आत भरणे; शिरकाव होणे.[सं.]

**अंतर्वैर** न. गुप्त शत्रुत्व; आतून द्वेष. [सं.]

**अंतर्वैरी** पु. १. गुप्त शत्रू. २. मृत्युसमयी ज्याचा ध्यास घेतला असेल तो (मुलगा, मुलगी) काही अडचणींमुळे भेटू शकत नाही व मृत्यूनंतर तेथे येऊन पोहोचतो तो : 'दुर्दैवी जिवांनो धावा ! अंतर्वैरी होऊ नका, धावा ! ' – एल्गार १४.३

**अंतर्व्यास** पु. (शाप.) एखाद्या पोकळ नळीचा, वर्तुळाकृती वस्तूचा आतला व्यास. [सं.]

**अंतर्शून्य** वि. १. विशिष्ट स्थान किंवा दर्जा नसलेला. २. ज्यात अत्यंत बारीक छिद्र आहे अशी (वस्तू वगैरे). [सं.]

**अंतर्हित** वि. १. अदृश्य; अंतर्धान पावलेला. २. लपवलेले; दडवलेले; आवरण घातलेले. [सं.]

**अंतर्ज्ञान** न. १. परमात्म्याविषयीचे ज्ञान; दिव्यज्ञान. २. योगसाधन; ईश्वरकृपा इ.मुळे दुसऱ्याच्या मनातील गुह्य गोष्टींची होणारी माहिती; गुप्त ज्ञान. ३. जगातील चाललेल्या व्यवहारांचे–ते व्यवहार प्रत्यक्ष न पाहताही मनाला झालेले ज्ञान; अप्रत्यक्षविषयदर्शन. ४. सहजोपलब्ध ज्ञान; तात्कालिक ज्ञान. [सं.]

**अंतर्ज्ञानी** वि. अंतर्ज्ञान असलेला; अप्रत्यक्ष विषयद्रष्टा; सहजज्ञानी. [सं.]

**अंतवंत** वि. नाशवंत; मर्त्य; जिला शेवट आहे अशी (वस्तू, देह) : 'अथवा ऐसा नेणसी । तूं अंतवंतचि हें मानिसी ।'– ज्ञा २.१५२.

**अंतश्चक्षु** पहा : **अंतर्चक्षु.** [सं.]

**अंतश्चेता** स्त्री. (वै.) ज्ञानतंतूंमधील संधायक तंतूंचे जाळे.

**अंतस्तापन** न. वैद्यकीय उपचाराची एक पद्धत. विजेच्या साहाय्याने शरीरातील विशिष्ट ठिकाणच्या पेशी तापवणे, गरम करणे. याचा उपयोग शल्यतंत्रातही करतात. [सं.]

**अंतस्त्रिज्या** स्त्री. (ग.) आतून मोजलेली अथवा आतल्या बाजूची त्रिज्या. [सं.]

**अंतस्त्रिभुज** वि. (भू.) समुद्रकिनाऱ्यापासून दूर जमिनीवर जेथे नदीला फाटे फुटतात असा भाग. [सं.]

**अंतस्त्वचा** स्त्री. १. बाहेरच्या त्वचेच्या आत असलेले शरीराच्या आतील भागावरचे त्वचेसारखे (श्लेष्मल) आवरण; त्वचेखालील ऊती.

**अंतस्थ** पहा : **अंत:स्थ**

**अंतस्थ राखीव निधी** पु. (व्यापार.) कंपनीच्या ताळेबंदात जेव्हा कंपनीच्या मालमत्तेची किंमत वाजवीपेक्षा कमी दाखवलेली असते तेव्हा मूळ किंमत आणि दाखवलेली किंमत यातील फरक.

**अंतस्थान** न. संख्याक्रमातील शेवटचे स्थान; शेवटची जागा. [सं.]

**अंत:करण** न. १. अंतर्याम; हृदय; विकार–विचाराचे स्थान; मन; आत्मा; जीव; अंत:करणचतुष्टयांपैकी प्रत्येक : 'निर्विकल्प जें स्फुरण । उगेंच असतां आठवण । तें जाणावें अतं : कर्ण । जाणती कळा ।' दास १७.८.४. २. (ल.) दया; माया. [सं.] (वा.) **अंत:करण कोंडणे**– अंत:करण भारावून जाणे; भावना अनावर झाल्याने ऊर भरून येणे, कंठ दाटणे : 'हजारो स्त्री–पुरुष एकाच आवाजात गाताना ऐकून अत:करण कोंडत असे.' – विराशिंरो ११४. **अंत:करण जळणे**– १. अतिशय तळमळ लागणे; आस्था असणे : 'अंत:करणेंच जेथें जळत आहेत तेथें असंतोषाग्नीच्या ज्वाला बाहेर पडणारच.' –टिसू १३. २. मत्सर वाटणे; द्वेषबुद्धी जागृत होणे : 'बाजीराव स्वयंसिद्ध होऊं पाहतात, हें पाहून बाळोबाचें अंत:करण जळू लागले.' –अस्तंभा १८. **अंत: करणात घर करून बसणे** १. अत्यंत विश्वासू होणे. २. सतत टोचणी लागणे. ' हा नानांचा काटा त्यांच्या अंत:करणांत घर करून बसला आहे.' – अस्तंभा ५५. **अंत:करणात–णास चटका लागणे, बसणे** – ध्यास लागणे; तळमळ होणे : 'तुमच्या अंत:करणांत देशाबद्दल चटका लागून राहिला असेल तर स्वदेशी कापड वापरा.' – लोटिकेले १.५११. **अंत:करणात चर्रर होणे**–मनाला धक्का बसणे; अतिशय दु : ख होणे.

**अंत:करणचतुष्टय** न. मन, बुद्धी, चित्त व अहंकार मिळून होणारे आंतरमन. चार प्रकारांनी भ्रमण करणारा, हालचाल करणारा आत्मा. [सं.]

**अंत:करणपंचक** न. अंत: करण, मन, चित्त, बुद्धी आणि अहंकार यांचा समूह. [सं.]

**अंत:करणपूर्वक** अ. मनापासून. [सं.]

**अंत:करणशुद्धि –द्धी** स्त्री. मनाची शुद्धी; पवित्रता; निष्कपटता; मनातून कामक्रोधादी विकार काढून टाकणे. [सं.]

**अंत:कर्ण** पु, (भाषा.) कानाचा आतील भाग; हा भाग म्हणजे वाटोळी पोकळी असून त्यामध्ये द्रव पदार्थाने भरलेल्या तीन नळ्या असतात. त्यापैकी मधल्या नळीमध्ये कोर्टी नावाचा अवयव असून त्याचा संबंध श्रवणेंद्रियातील मज्जातंतूंशी असतो. [सं.]

**अंत:कर्षण** न. (विअ.) आत ओढून घेणे. [सं.]

**अंत:कवच** न. (जीव.) फळाच्या तीन आच्छादनांपैकी सर्वात आतील भाग; अष्ठीलात हा कवचासारखा परंतु मृदुफळात पातळ असतो. [सं.]

**अंत:कक्ष** पु. १. विशेष मान्यवर व्यक्तींच्या कार्यालयाला जोडून असलेली, प्रसंगी गुप्त सल्लामसलत, वाटाघाटी करण्यासाठी राखलेली खोली. २. (ल.) खलबतखाना; कारस्थाने शिजवण्याची जागा.

**अंत:कंकाल** पु. (प्राणि.) शरीरातील हाडांचा सांगाडा. [सं.]

**अंत:केंद्रीय रचना** स्त्री. (भाषा.) शब्दांची संपूर्ण रचना ज्या संदर्भात येऊ शकते त्याच संदर्भात तिचा एखादा घटक येऊ शकेल अशी शब्दरचना. उदा. काळी आई. [सं.]

**अंत:कोन** पु, (ग.) आतील बाजूने मोजलेला कोन. [सं.]

**अंत:कोश** पु. (वन.) बीजुकाशयाच्या विकासातील प्राथमिक अवस्थेत आढळणारे ऊतक. उदा. शेवाळी. [सं.]

**अंत:क्रमण** न. १. आत शिरणे, घुसणे, जाणे. २. (भूशा.) खडकाच्या भेगेत लाव्हारस घुसण्याची क्रिया. [सं.]

**अंत:क्रय** पु. लिलावात ठेवलेली वस्तू मालकाने स्वत:च परत विकत घेणे. (क्रि. करणे).

**अंत:छेद** पु. (ग.) आतील बाजूने घेतलेला छेद. [सं.]

**अंत:पट–पाट** पु. उपनयन वा विवाहप्रसंगी बाप–मुलगा वा वधु–वर यांच्यामध्ये धरले जाणारे वस्त्र. 'काळ सावधान म्हणत । सूर्य लग्नघटिका पाहत । वियोग अंत:पट सोडित । भावार्थ म्हणत ओंपुण्या ।' –एरुस्व ७.६५. [सं.]

**अंत:पाती** वि. अंतर्गत; आश्रित; मधले; आत गुंडाळलेले; समाविष्ट; आत येणारे; एखाद्या मोठ्या वस्तूच्या पोटात येणारे : 'ज्ञानाज्ञानाचे विकार । अविद्यांत:पाती साचार ।'–एभा २८.५०९.

पु. भागीदार; मुख्याच्या पोटी असलेला पातीदार; पित्त्या; गुमास्ता. [सं.]

**अंत:पुर** न. १. राणीवसा; जनानखाना : 'सोळां सहस्र अंत:पुर । तेतुलेयां नानां उपचार ।' –शिव ७५३. २. आतले घर; बायकांची बसण्याउठण्याची जागा. [सं.]

**अंत:प्रकृति–ती** वि. आतल्या गाठीचा; कुढा; भिडस्त; संकोची; अबोल्या; खोल. [सं.]

**अंत:प्रजनन** न. (वै.) जवळच्या नात्यातील स्त्री–पुरुषांची संतती; काही गुणधर्म टिकवण्यासाठी मुद्दाम निवडलेली प्रजनन पद्धती (जनावरे किंवा पक्षी यांबाबत). [सं.]

**अंत:प्रवाह** पु. आतून वाहणारा प्रवाह; आतून वाहणारा द्रव, वायू इ. [सं.]

**अंत:प्रवेश** पु. आत शिरणे; घुसणे; दाखल होणे.

**अंत:प्राकल** पु. (वन.) कोशिकेतील बाह्यप्राकलाने वेढलेला आतील जीवद्रव्याचा भाग हा अधिक कणीदार व पातळ असतो.

**अंत:प्रारण** न. (विअ.) किरणविसर्जनशक्तीचे उत्सर्जन. २. किरणांचा वर्षाव करणे. [सं.]

**अंत:प्रेरणा** स्त्री. अंत:स्फूर्ती, एखादी गोष्ट करण्यामागील ऊर्जा.

**अंत:शरीररचना** स्त्री. (प्राणि.) १. शरीराची अंतर्गत रचना. २. शरीरातील अवयव. [सं.]

**अंत:शुद्धि–द्धी** स्त्री. १. मनाची पवित्रता; निष्कपटपणा. २. कोष्ठशुद्धी; कोठा साफ करणे. [सं.]

**अंत:शोषण** न. १. आतल्या आत जिरणे; शोषण होणे. २. (वै.) चरबी व शर्करा यासारख्या शरीरात साठवल्या जाणाऱ्या द्रव्यांचा शरीराने गरजेप्रमाणे केलेला वापर. [सं.]

**अंत:शौच** न. मनाची शुद्धता; अंत: करणाचे पावित्र्य; काम–क्रोधादिकांचा त्याग व शमदम, वैराग्य, भगवद्भक्ती इ.चा स्वीकार केल्यामुळें होणारी अंत : करणाची निर्मळता; अंत:शुद्धी.

**अंत:श्रोत्र** न.(प्राणि.) कानाचा आतील भाग. [सं.]

**अंत:श्वसन** न. (वै.) श्वास आत घेणे. [सं.]

**अंत:सत्त्व** न. मनुष्याची आंतरिक ताकद, सामर्थ्य. [सं.]

**अंत:समावेशन** न. (मानस.) इतरांची मूल्ये व निकष स्वत:चे समजण्याची प्रक्रिया; स्वत:च्याही नकळत दुसऱ्याचे विचार, मूल्ये स्वत:चीच आहेत अशी निर्माण होणारी भावना. [सं.]

**अंत:समूह** (समाज.) पहा : **अंतर्वट**

**अंत:सर्पी शिडी** स्त्री. (स्था.) गोल चक्राकार जिना.

**अंत:संमुख कोन** पु. (ग.) आतील बाजूचे समोरासमोरील कोन.

**अंत:संघर्ष** पु. अंतस्थ झगडा, अंत:कलह.

**अंत:संवेदी** वि. (वै.) संवेदनाग्रहणाचे कार्य करणारा.

**अंत:संज्ञा** स्त्री. आतून झालेली जागृती; आत्मज्ञान.

**अंत:सागर** वि. (भूशा.) समुद्राच्या पृष्ठाखालील (सागराच्या पोटातील) [सं.]

**अंत:साक्षी** वि. १. अंत:करण जाणणारा; अंतर्ज्ञानी. २. आतला साक्षीदार. [सं.]

**अंत:सूत्र** न. आचार विचार यांमधील एकवाक्यता; अंतर्गत विचारांतील एकसंघपणा; वेगवेगळ्या गोष्टींमधील असणारे एकच समान सूत्र : 'महर्षी शिंदे यांच्या साऱ्याच जीवनकार्यामध्ये एक अंत:सूत्र दिसते.' – विराशिंरो प्रस्ता ९. [सं.]

**अंत:सृष्टी** स्त्री. पिंडास किंवा ब्रह्मांडास चालवणारी तत्त्वे आणि त्यांचे व्यापार; बहि:सृष्टीच्या विरुद्ध, वरून न दिसणारे परंतु ज्यांचे कार्य चालू असते असे व्यापार. [सं.]

**अंत:स्थ** न. अप. अंतस्थ; अंतस्त. १. (व्यापक) गुप्त रीतीची लाच; दरबारखर्चाचा एक भाग; सरकारातून आपले काम करून घेण्यासाठी कारकून, मुत्सद्दी, मोठमोठे सरकारी अधिकारी यांना त्यांचा हक्क म्हणून (लाच नव्हे) ठोकळ, रोख रक्कम देण्याची पद्धती. ही मुसलमानी, मराठी व इंग्रज कंपनीच्याही रियासतीत त्या वेळी सरसहा प्रचलित होती. २ गुप्त मसलत किंवा तह ठरवणाऱ्या अधिकाऱ्यास शत्रूकडूनही रक्कम मिळे : 'गडवाल संस्थानापासून सरकार २०,००० खंडणी सालीना घेई. त्यात सखारामबापूला ५००० अंतस्थ मिळत.'– थोमारो २५४. ३. (सामा.) लाच.

वि. १. गुप्त; खासगत; एकांत स्थळी किंवा खासगत जागी केलेले. २. अंतस्थित; मधला; आत असलेला; आतील. [सं.]

**अंत:स्थ** पु. अर्धस्वर; य् र् ल् व् हे वर्ण. स्पर्शव्यंजने (क् ते म्) व ऊष्मे (श् ष स्) यांच्या मध्ये येणारी (अंत:+स्थ) व्यंजने. [सं.]

**अंत:स्थ पट्टी** स्त्री. सरकारास आवश्यक लागणारा खर्च निभावण्यासाठी प्रसंगी जमीनदारावर व क्वचित रयतेवर बसवण्यात येणारा कर.

**अंत:स्थ पत्र** न. हुंडीबरोबर पाठवलेले खुणेचे पत्र.

**अंत:स्थित संकवक** पु. (वन.) उच्च वनस्पतींच्या मुळात शिरकाव करून व तेथेच आपले तंतू वाढवून त्यांचे पोषण करणारी कवक वनस्पती; यापासून आश्रय वनस्पतीस कार्बनी द्रव्य मिळते.

**अंत:स्थिति-ती** स्त्री. १. (मन, आत्मा, प्रसंग, घरची इ.) आतली अवस्था. २. आतील अधिष्ठान, वास्तव. ३. अंतरात्मा. [सं.]

**अंत:स्फुरण** न. (मानस.) मनात आलेल्या समस्येची उकल होत असताना तिच्याशी संबधित नसलेले विचार हळूहळू नाहीसे होऊन व संबधित विचारांचे धागेदोरे जुळत जाऊन एकाएकी समस्या सुटणे; अंत:प्रेरणेने मिळणारे ज्ञान. [सं.]

**अंत:स्फूर्ति-र्ती** स्त्री. आतून येणारी प्रेरणा; अंत:करणापासून येणारी स्फूर्ती : 'कायद्यापेक्षा अंत:स्फूर्तीनेच सुधारणा घडवून आणणे इष्ट असे प्रतिपादन...' -संको २.८५६. [सं.]

**अंत:स्फोट** पु. आतल्या बाजूस झालेला स्फोट. [सं.]

**अंत:स्फोटक** पु. (भाषा.) बाहेरून येणारी हवा श्वासनलिकेत विविध प्रकारे आणि विविध ठिकाणी अडवली गेल्याने उच्चारली जाणारी व्यंजने. उदा. सिंधी ब = दोन या शब्दातील 'ब' चा उच्चार.

**अंत:स्राव** पु. १. आत होणारा स्राव. २. शरीरातील नलिकाविरहित ग्रंथींतून होणारा स्राव : 'हा (अंतस्राव) तेथील रक्तात लगेच मिसळून विशिष्ट इंद्रियाच्या कार्यावर परिणाम करतो. उदा. इन्स्युलिन.'- आआआ ४९१.

**अंत:स्त्रीस्रावग्रंथी** स्त्री. 'जिच्यातला स्राव बाहेर वाहून नेण्यास नलिका नसतात व जो तिच्यातल्या सूक्ष्म रक्तवाहिन्यांमध्येच शोषला जातो अशी ग्रंथी.' - आआआ ४९१.

**अंत:क्षेत्र** न. १. आतील जागा, क्षेत्र. २. (भू.) चोहोबाजूंनी वेष्टिलेली बंदिस्त जागा. [सं.]

**अंत:क्षेपण** न. (यंअ.) १. नलिकेतून द्रवपदार्थ आत फेकण्याची क्रिया. थंड पाणी बाहेरून आत सोडणे. २. दाबाने एखादा पदार्थ (इंधन, तेल, हवा, पाणी) आत भरणे, ठासणे (डिझेल सिलिंडरमध्ये, गॅस टरबाईनमध्ये इ.). [सं.]

**अंतापुर** न. पत्नी : 'म्हणौनि सोळा सहस्र अंतापुरा प्रणिलि'- शिव ७०१.

**अंतावन** न. शेवट : 'आतां स्तवकाचें अंतावनी । ब्रह्मप्रळय वर्णील मुनी ।'- कथा १.१४. १२८.

**अंताक्षरी** स्त्री. एका चरणाचे जे अंत्याक्षर तेच दुसऱ्या चरणाचे आद्याक्षर धरून, भेंड्या लावतात त्याप्रमाणे केलेली काव्यरचना : 'एक वेळ आजोबासी अंताक्षरी केली. अंती जें अक्षर तें पुढिला वाक्याचा आदी ऐसी बत्तीस वाक्यें केली.' - वृद्धाचार १५. [सं.]

**अंतिक** वि. जवळचा; निकटचा; समीपवर्ती.
पु. (ल.) सेवक; नोकर. [सं.]

**अंतिका** स्त्री. १. चूल. २. वडील बहीण. [सं.]

**अंतिम** वि. शेवटचा; अखेरचा; अंत्य; चरम; निर्वाणीचा. [सं.]

**अंतिम अंदाज** पु. (शाव्य.) वार्षिक अर्थसंकल्पाकरता तयार केलेले जमाखर्चाचे निर्णायक अंदाज.

**अंतिमता** स्त्री. निर्णायक-निश्चायक अवस्था. [सं.]

**अंतिम प्रविष्टी** स्त्री. (वा.ले.) संवरण प्रविष्टी

**अंतिम वर्ग** पु. (ग्रं.) एखाद्या विषयाचे वर्गीकरण करताना, ज्याचे अधिक विभाजन होऊ शकणार नाही असा उपविषय. [सं.]

**अंतिम स्थानक** न जेथून आगगाडी परत येते ते स्थानक.

**अंतिमांगुली** स्त्री. करंगळी. [सं.]

**अंतिमोत्तर** न. अखेरचे उत्तर; निर्वाणीचा खलिता. [सं.]

**अंती** शअ. १. शेवटी; नंतर; पश्चात; परिणामी; अखेरीस; मग. २. ज्यामुळे; साठी; करिता; स्तव.

**अंतीगुंती** स्त्री. अडचण; अडथळा : 'अवश्य म्हणून नृपनाथ । बोळवीतसे समस्त । ऐसें रायास गांवोगांवीं होत । अंतीगुंतीं चालावया ।' - नव १८.१४. [गुंता-ती चे द्वि.]

**अंतील** वि. अंतीचा; शेवटचा : 'हाचि श्लोकींचा अंतील चरण ।'- एभा २९.८८.

**अंतुता** क्रिवि. आत : 'आकाशा ठाव अंतुता । भूतभास बिंबला ।'- वेसीस्व ११.२९. [सं.]

**अंतुती** अ. शेवट; समाप्ती : 'नमस्कारासी वारी नाहीं अंतुती ।'-सप्र १.६६

**अंतुरी-तोर-तोरी** स्त्री. १. स्त्री; बायको; पत्नी; भार्या : 'आंतौरिया कुमरें । सांडोनिया भांडारें ।'-ज्ञा १.२२०. २. (सामान्यपणे) कोणतीही स्त्री : 'न कळे हो भाव मुनि मागें एकी अंतुरी । साठीं संवत्सरा जन्म तया उदरीं' ।।' -तुगा २७७.

**अंतुरनायक** पु.अतुल, बलिष्ठ वीर पुरुष : 'आंधारे अंतुरनायकें : सूर्याचिया धुरा धरिलिया तवंके '- रुस्व ४८४.

**अंतूर** न. दशमी, भाकर वगैरे बांधावयाचे फडके.

**अंतेवासी** पु. १. (शब्दश:) जवळ राहणारा; गुरुजवळ राहणारा; उमेदवार; शिष्य; विद्यार्थी; निकटवर्ती : २. चांडाळ (गावाबाहेर पण शेजारीच राहाणारा). [सं.अन्तेवासिन्]

**अंतेष्ट-ष्टी** स्त्री. और्ध्वदेहिक संस्कार; क्रिया; उत्तरक्रिया; प्रेतसंस्कार. [सं. अन्त्य+इष्टि]

**अंतोरिक** अंत:पुर; राणीवसा. पहा : **अंतुरी** [सं. अन्त:पुर]

**अंतौते** शअ. आत; मध्ये. पहा : **अतौत**

**अंतौर-री** न. पहा : **अंतुरी** : 'हिरोनियां देवांचीं अंतौरें ।' - एभा ४.२२७.

**अंत्य** वि. शेवटचा; अंतिम; चरम; अखेरचा.
पु. अस्पृश्य : 'अंत्यु राणिवे बैसविला ।' - ज्ञा १३.७२५.
न. संख्यास्थानसंज्ञातील 'जलधी'च्या पुढील व 'मध्य' च्या मागील एक संज्ञा; एक हजार महापद्म. [सं.]

**अंत्यकर्म -क्रिया** न. स्त्री. उत्तरक्रिया; और्ध्वदेहिक संस्कार; क्रियाकर्म. [सं.]

**अंत्यगोदान** न. १. पापक्षालनार्थ अनुष्ठान करताना त्यातील प्रधान कर्म आटोपल्यानंतर लागलीच करावयाचे गाईचे दान. २. मरणापूर्वी ब्राह्मणास केलेले गाईचे दान. [सं.]

**अंत्यचित्र** न. मजुकराच्या शेवटी शोभेसाठी घालावयाची आकृती. [सं.]

**अंत्यज-जन्मा-जाती** पु. १. शूद्र जातीच्या खालील महार, मांग, चांभार इ. अतिशूद्र; धोबी, चांभार, बुरुड, नट, कोळी, मेद, भिल्ल या सात जातींचा अंत्यजांत समावेश करीत असत. - मनु. ८.२७९. वि. शेवटचा; शेवटील. [सं.]

**अंत्यदशा** स्त्री. मरण.

**अंत्यदान** न. मृत्युपत्रात लिहून दिलेली मालमत्ता.

**अंत्यधन-पद** न. गणित किंवा भूमितीश्रेढीतील शेवटची संख्या.[सं.]

**अंत्यधमनी** स्त्री. (वै.) संपूर्ण शरीराला रक्ताचा पुरवठा करणारी शेवटची धमनी. [सं.]

**अंत्यनाडी** स्त्री. १.(ज्यो.) अश्विनी, भरणी, कृत्तिका इत्यादी २७ नक्षत्रांना आद्यनाडी, मध्यनाडी व अंत्यनाडी अशा अनुक्रमे संज्ञा आहेत, त्यांपैकी कृत्तिका वगैरे नक्षत्रांस लागणारी संज्ञा. पहा : **नाडी.** २. 'हाताच्या मधल्या तीन बोटांपैकी अनामिका, मध्यमा व तर्जनी या बोटांवर अनुक्रमे आद्यनाडी, मध्यनाडी व अंत्यनाडी असे कल्पितात.' -सुज्यो ३७१.

**अंत्ययमक** न. (सास.) कवितेमध्ये चरणाच्या शेवटी येणारे एकाच प्रकारचे ध्वनी; काव्यातील ओळींच्या शेवटी होणारी त्याच त्या अक्षरांची पुनरावृत्ती; एक काव्यालंकार. [सं.]

**अंत्ययात्रा** स्त्री. अंत्यसंस्कारासाठी प्रेत स्मशानात नेणे; प्रेतयात्रा : 'त्यांच्या प्रचंड अंत्ययात्रेत हजारोंनी सामील झालेल्या मराठी जनतेच्या...' -पपा १०५. [सं.]

**अंत्यलेख** पु. अखेरचा लेख; मृत्युलेख; मृत्युपत्र. [सं.]

**अंत्यवर्ण** पु. १. शब्दाच्या शेवटील अक्षर. २. चार वर्णांतील शेवटचा शूद्रवर्ण. [सं.]

**अंत्यविधि-धी** पु. प्रेत दहन करण्यापूर्वी किंवा पुरण्यापूर्वी करावयाचे धार्मिक विधी; उत्तरक्रिया; और्ध्वदेहिक संस्कार; क्रियाकर्म.

**अंत्यसंस्कार** पहा : **अंत्यविधि**

**अंत्यसारणी** स्त्री. अंतिम कोष्टके.

**अंत्यस्थित** वि. नेहमी जवळ राहणारी (स्त्री.) [सं. अंते+स्थिता]

**अंत्याधार** पु. (यंअ.) १. शेवटचा आधार. २. सीमा संयोग. ३. (स्था.) धरणाच्या भिंतींच्या दोन्ही टोकांना आधारभूत- टेकूसारखा असणारा भाग; ज्यावर कमान झुकती राहते असा भिंतीचा पुढे आलेला भाग. [सं.]

**अंत्यावस्थ** वि. मरणसमयीची व्यथा भोगीत असलेला; प्राणांतिक व्यथेने पीडित; आसन्न मरण. [सं.]

**अंत्यावस्था** स्त्री. १. म्हातारपण; वृद्धावस्था. २. मरणावस्था. (ल.) मरण; मृत्यू. [सं.]

**अंत्याक्षरी** स्त्री. मुलांचा आपसात श्लोकादिकांच्या भेंड्या लावण्याचा प्रकार. गाण्याच्या भेंड्या. [सं.]

**अंत्यांक** पु. शेवटचा आकडा; त्रैराशिकातील तिसरी संख्या, पद. [सं.]

**अंत्येष्टि-ष्टी** स्त्री. उत्तरक्रिया. मृतात्म्यासंबंधीचे क्रियाकर्म 'गर्भाधानापासून अंत्येष्टीपर्यंत शास्त्रीय संस्कार होणे आवश्यक आहे.'- लोटिकेले ४.३२. [सं.]

**अंत्र, अंत्रमाळ** न. आंत्र; आतडे : 'छार्यी मातले महावीर । वोढिती अंत्रमाळांचे भार ।' - एरुस्व ८.४७; 'रयतेला लागला वणवा जळती अंत्रीं ।' - ऐपो ४०४. [सं.अंत्र]

**अंत्र** न. सूत्र, संधान : 'खानदौराचे व आणिक अमिरांचे अंत्र उडवावे ते कांहींच होत नाही.' - पेद ३० १०५.

**अंत्रपुच्छदाह** पु. एक रोग; अंत्रपुच्छ (अपेंडिक्स) ही एक आतड्यापासून निघालेली लांबट व अरुंद अशी नळी असते, हिच्या पोकळीत दाह, सूज अगर पू होऊन होणारा रोग. [सं.]

**अंत्रमाळा** स्त्री काळीज, अंत:करण. पहा : **आंत** (गो.)

**अंत्रवृद्धि-द्धी** स्त्री. पहा : **अंतर्गळ** [सं.]

**अंत्रळ-त्रेळ** न. अंतराळ; वातावरण.(गो.) [सं. अंतराल]

**अंत्रा** पु. ध्रुपदाच्या अस्ताई, अंत्रा व अभोग या तीन भागांपैकी दुसरा भाग; अंतरा; पालुपदानंतरचे पदाचे भाग; कडवे 'भरी अर्थ यमक अंत्रामधीं रंग करारी ।' - प्रला ३०. [सं.]

**अंत्राटणे** अक्रि. आपटणे : 'भूमी अंत्राटीती रोषें' - उषा १७२१.

**अंत्रावरणदाह** पु. उदराच्या पोकळीत, अंत्रावरणात (पेरिटोनियम) दीर्घकाळ होणारा दाह. [सं.]

**अंत्राळी** क्रिवि. अधांत्री; वरच्यावर. (क्रि. ठेवणे).

**अंत्राक्ष** न. आकाश : 'गोसावीयाची पेंडीते अंत्राक्ष ए' - गोप्र ३.

**अंत्रिक** वि. १. सोडलेले; टाकलेले; ओलांडलेले; गाळलेले (अंतर). २. अंतरलेले; काही अडचणींमुळे वेळीच न होता करायचे राहिलेले (कर्म, श्राद्ध इ.) [सं. अंतर]

**अंत्रीबुक** न. नोंद वही; जंत्रीचे पुस्तक : 'धनीपणाचे किती नंबरचे बुकांत पत्र नोंदले ते अंत्रीबुकाचे किनाऱ्यावर लिहावे.'- न्यासे ७०.

**अंथ(थु)रणे** उक्रि. १. जमिनीवर निजण्यासाठी, बसण्यासाठी वगैरे सतरंजी, बिछाइत इ. पसरणे; पसरून घालणे : 'तो निजावया सावकाश । समाधि मी त्यास आंथुरी ।'- एभा १९.८८. २. पसरून झाकणे; वर टाकणे, घालणे. [सं. आस्तरण]

**अंथरी** स्त्री. अंथरण्याचे साधन. (गालिचा, रुजामा, जाजम, सतरंजी, चटई इ.)

**अंथरूण** न. १. निजण्यासाठी अंथरायचे वस्त्र; बिछाना : 'नाकळे विषय अंथुर्णी । आधी लहान होतें त्या दिसांत नवतें शहाणी ।' - प्रला १७६. २. (बायकी ल.) पतिसंग; विषयसुख (अप.) अंथ्रुण : 'अंथ्रुण पांग्रुण ना निजाया मंचक'- दावि १२९. [सं. आस्तरण] (वा.) **अंथरुणाचा घाणा करणे** - झोपेत लोळून अंथरुणाचा चोळामोळा करणे. **अंथरुणाप्रमाणे किंवा अंथरूण पाहून पाय पसरावे** - साधनाप्रमाणे साध्य ठरवावे, ऐपत पाहून खर्च करावा; सामर्थ्यानुरूप वागावे. **अंथरूण धरणे** - पुष्कळ किंवा कायमचे आजारी होणे : 'कादर सातवीत गेल्यापासून मियांनी अंथरूण धरलं.'- एल्गार ५६. **भुईचे अंथरूण आणि आकाशाचे**

**पांघरूण** - अतिशय दारिद्री असणे.

**अंथरूण कांबरूण-पांघरूण** न. बिछाना व पांघरण्याचे वस्त्र; बाड बिछाना; जवळचे सामान.

**अंदन, अंधण** आधण. (ना.)

**अंदर** शअ. आत. [हिं.]

**अंदरघुशी** स्त्री. चोरी करण्याकरता घरात गुपचूप घुसणे; आत शिरणे; प्रवेश करणे.

**अंदरबट्टा** पु. आतबट्टा; नुकसान; न्यून. (व.)

**अंदरसा** क्रिवि. अंतस्थ रीतीने, आतून : 'अंदरसा भाषण हास्य विनोदभावे सानंदप्रीती । अविकळ करवी जगत्कर्ता ।' - निमासुभद्राचंपू ५.६६.

**अंदरून** अ. आतून; आतल्या बाजूने. (व.)

**अंदाज-जा** पु. १. कयास; तर्क; हेतू; मनाची धाव. २. सुमार; अजमास. ३. (अंदाजा) मान; परिमाण; दर; प्रमाण. ४. ठरीव प्रमाण; नेमणूक; मक्ता. [फा. अंदाझ]

**अंदाजणे** सक्रि. आपल्या अनुभवाप्रमाणे तर्क, अनुमान, कल्पना करणे : 'पर्वतावर धूर पाहून विस्तव अंदाजता येतो.' - भातप्र ३५.

**अंदाजपट्टी** स्त्री. पीक उभे असताच वसूल किती होईल याचे केलेले अंदाजपत्रक.

**अंदाजपत्र** न. अनुमान केलेल्या बातम्या, भाव ज्यात असतात ते पत्र.

**अंदाजपत्रक** न. पुढील सालच्या जमाखर्चाचे अंदाजाने केलेले पत्रक. (आखणी, कोष्टक).

**अंदाजपंचे** अ. अंदाजे; नीट माहिती नसताना केलेल्या अनुमानाने.

**अंदाज समिती** स्त्री. (राज्य.) विधिमंडळाची एक समिती. अर्थसंकल्पात निरनिराळ्या विभागाकरिता मंजूर केलेल्या रकमांच्या विनियोगावर देखरेख ठेवणारी समिती.

**अंदाजा** स्त्री. धाडस (गो.)

**अंदाजे** अ. सुमारे; तर्क किंवा कल्पना करून ठरवल्यास.

**अंदाधुंद-दी** स्त्री. पहा : **अंधाधुंद**

**अंदाधुंदी** स्त्री. घर, समाज, संस्था किंवा राज्य यातील अव्यवस्थितपणा.

**अंदारी** स्त्री. खांडे आणि दांडे यांच्यामध्ये बसलेल्या लहान फळ्यांपैकी प्रत्येक किलची. पहा : **अंधारी** (माण.)

**अंदु, अंदुज** पु. हाड्याव्रण (पायाचा एक रोग); कधीही बरी न होणारी जखम; किडवळ : 'नायटे अंदु गजकर्ण ।'- दास ३.६.२०. [सं. अंदु]

**अंदुक** पु. बेडी; साखळी; पायहसळी. 'अंदुक झाला सुयोधना गर्व ।' - मोउद्योग ७.३० [सं.]

**अंदुक** न. (प्राणि.) फलन न झालेले अंडे.

**अंदुक जनन** न. (प्राणि.) मादीच्या शरीरातील अंड्यांची निर्मिती. [सं.]

**अंदुक मार्ग** पु. (प्राणि.) अंडी मादीच्या शरीराबाहेर वाहून नेणारी नलिका. [सं.]

**अंदुकाश्म** पु. (भूशा.) माशांच्या (मासे) अंड्यांच्या आकाराच्या गोळ्यासारखे दिसणारे कॅल्शियम कार्बोनेट किंवा सिलिकाचे गोळे एकत्र येऊन तयार झालेला खडक. [सं.]

**अंदुकी** स्त्री. (प्राणि.) अंडाशय; मादीच्या जननेंद्रियाचा एक भाग. [सं.]

**अंदुवाकी** स्त्री. साखळ्यांच्या वाकी, रुद्रगाठीच्या वाकी : 'कंठी किंकिणी क्षुद्र घंटा । किंकिणी कलिवरे पायवाटा । अंदुवाकीचिया बोभाटा । वरी दशांगुळी ।।' - कथा ५.१६.१८५.

**अंदू** पु. १. साखळी; निर्बंध; बेडी. २. लढाईच्या वेळी हत्ती पळून जाऊ नये म्हणून हत्तीच्या पायास बांधावयाची साखळी, दोर, साखळदंड; मागील पायांस साखळदंड बांधण्याकरता अडकवलेली लाकडी चौकट : 'जसा गज हस्ती अंदु लेऊन करी ठाणावर धुरी ।'- पला ४.३६. ३. दोन भिंतींना अथवा दगडांना जोडणारी लोखंडाची पट्टी, सळई. ४. पायातील वाळा : 'अंदु तोडराचा झणत्कार ।' - वेसी ३.७२. [सं. अंद] (वा.) **अंदू घालणे-जडविणे-** १. लढाईत हत्ती पळून जाऊ नये म्हणून त्याचे पुढील पाय साखळीने बांधणे : 'हत्तीस अंदु घालून मारतां मारतां मरावे.' - भांब ७३. २. (ल.) कोंडून ठेवणे; दाबात ठेवणे; कैदेत घालणे; अडथळा आणणे.

**अंदू** क्रिवि. यंदा यावर्षी; चालू वर्षी. (कों.)

**अंदेशा** पु. १. आदेश; आज्ञा : 'कीं उत्तर सत्वर हस्ति पाठवा ऐसा हा अंदेशा ।' - बस्वलिंग, गजगौरी ४१. [सं. आदेश]

**अंदेशा** पु. १. विचार; कल्पना. २. संशय; शंका; वहीम : 'अंदेशाचे गोवीं पडो नये ।'-दावि २४५. ३. भीती; काळजी : 'झुरझुर पांजर झालें किती करूं अंदेसा ।' - पला ४.१२. ४. मसलत; योजना : 'ऐशास आपण लिहिले अंदेशे येथे उभयतांनी घेतले तेव्हा त्यांची खातरजमा केली.' - ऐलेसं ४०४८. [फा. अंदेशा]

**अंध** वि. १. आंधळा; दृष्टिहीन. २. (ल.) बेगुमान; बेपर्वा; उन्मत्त. जसे : - मदांध, द्रव्यांध इ. ३. अडाणी; अज्ञ. [सं.]

**अंध** पु. आड, विहीर : 'अंध खाणितां खालतें जवं जवं खाणे तवं तवं त्यासि अधोगतिसि कारण होये.' - विद १३.

**अंधक** वि. १. अंधुक; कमी प्रकाशाचा. २. फिक्का, तकाकी नसलेला; निस्तेज; मंद (रंग, रंगीत वस्तू). [सं.]

**अंधक, अंधकअंधक** क्रिवि. १. तुरळकतुरळक; अस्पष्ट; अव्यक्त; मिणमिणीत (दिवा, वस्तू). (क्रि. दिसणे.) २. धुकट; धुंद (हवा, वातावरण.)

**अंधकणे** अक्रि. अंधुक होणे; आवरण पडणे; निस्तेज होणे; मावळणे; झाकोळणे : 'ततारा झमकत होता । अंधकळा ।'- ऐपो ९२. [सं. अंधक]

**अंधकार** पु. १. (अप.) अंध:कार; अंधार; काळोखी; काळोख; प्रकाशाभाव : 'सूर्य देऊनि घेतला अंधकार ।' - हरि ३.२०३. २. (ल.) बुद्धिमांद्य; अज्ञान. [सं. अन्धकार]

**अंधकूप** पु. १. गवतात किंवा झाडाझुंडपांमध्ये दिसेनाशी झालेली विहीर; अंधारी विहीर : 'मग अंधकूप आश्रावा ।' - ज्ञा १.२३९. २. एक नरक. [सं.]

**अंधगज(हस्ति)न्याय** पु. एखाद्या विषयाचा भलताच अर्थ करून

घेणे; एखाद दुसरा अंश पाहून त्यावरून संपूर्ण विषयाचे आकलन झाले असे समजून त्याबद्दल चुकीचे मत बनवणे. [सं.]

**अंधचष्मा** पु. (मानस.) जो लावला असता समोरील वस्तू दिसत नाही असा चष्मा. मानसशास्त्रीय प्रयोगात याचा उपयोग करतात.

**अंधतम** पु. १. जास्त दाट अंधार; आंधळे करण्याइतका काळोख. २. (ल.) आध्यात्मिक अज्ञान; अध्यात्मज्ञानाचा अभाव. ३. एक नरक : 'तेणे अकर्म कर्मवशें अंधतमीं तो प्रवेशे ।' – एभा १०.५९०. वि. अत्यंत आंधळा. [सं.]

**अंधतामिस्र** न. एक नरक. [सं.]

**अंधत्व** न. आंधळेपणा; दृष्टिहीनता; चक्षुरिंद्रियाचा अभाव.

**अंधदरी** स्त्री. (भूशा.) दोन डोंगरांच्या रांगेमधील सूर्यप्रकाश जिथे पोचू शकत नाही असा अति खोलगट भाग. [सं.]

**अंधदर्पण न्याय** पु. (आंधळ्याला आरशाचा काय उपयोग यावरून) एखाद्या गोष्टीचा सापेक्ष निरर्थकपणा दर्शवण्यासाठी या न्यायाचा उपयोग करतात; ज्याला ज्या गोष्टीचा उपयोग नाही ती त्याला देणे.

**अंधपरंपरा** स्त्री. १. आंधळ्याची ओळ, माळ. एका आंधळ्याकडून दुसऱ्या आंधळ्याकडे अशी चालत आलेली रीत वगैरे. २. एकाचे पाहून दुसऱ्याने, त्याचे पाहून तिसऱ्याने याप्रमाणे कोणतीही गोष्ट विचार न करता करण्याचा परिपाठ; गतानुगतिकत्व; खरेखोटे, फायदा-तोटा न पाहता वाडवडील किंवा समाज जसे करीत आला तसे करणे. [सं.]

**अंधपरंपरा न्याय** पु. जेव्हा माणसे एखादी गोष्ट करायला विचार न करता मेंढराप्रमाणे एकामागून एक अशी जातात आणि प्रसंगविशेषी नुकसान सोसतात तेव्हा या न्यायाचा प्रयोग.

**अंधबंध** पु. अंधपटल. [सं.]

**अंधबिंदु–दू** पु. (वै.) नेत्रगोलकांमध्ये दृष्टिचेता जेथे आतल्या आवरणात शिरते तेथील दृष्टिपटलातील प्रकाशसंवेदक नसणारा बिंदू. [सं.]

**अंधमार्ग** पु. (मानस.) व्यूहात ज्या ठिकाणी पुढे जाण्याचा मार्ग बंद होतो असा मार्ग, पुढे जाण्यास, प्रगतीस अटकाव करणारी गोष्ट. [सं.]

**अंधविलोकन** प. आंधळा माणूस काही पाहणे शक्य नसते, यावरून अशक्य गोष्टीचा निर्देश करताना हा शब्दप्रयोग करतात.

**अंधश्रद्ध–श्रद्धाळू** वि. (समाज) सारासार विचार न करता, आंधळेपणाने, भीतीने एखाद्या गोष्टीवर विश्वास ठेवणारा. [सं.]

**अंधश्रद्धा** स्त्री. सारासार विचार न करता आंधळेपणाने एखाद्या गोष्टीवर ठेवलेला विश्वास; अज्ञानातून, भीतीतून निर्माण झालेली पण बुद्धीला न पटणारी निष्ठा; वेडगळ समजूत; धर्मभोळेपणा. [सं.]

**अंधस्थान** न. (प्राणि.) डोळ्यातील पटलावर ज्या ठिकाणी प्रतिमा तयार होत नाही तो बिंदू. [सं.]

**अंधाई** स्त्री. १. अंधार; काळोख. २. (ल.) अंदाधुंदी; बखेडा. [हिं.]

**अंधाटी** स्त्री. १. एखाद्याच्या सरळ बोलण्यावर दुसऱ्याने घेतलेला आक्षेप; आडफाटा. २. असल्या आक्षेपांनी स्वतःचे मत सिद्ध करण्याचा धरलेला हट्ट. (क्रि घेणे, फोडणे, काढणे.)

**अंधाटीबंधाटी** स्त्री. जिने गड्डे आवळले जातात अशी दोरी किंवा झाडाची लवचिक फांदी.

**अंधाधुंद–ध, अंदाधुंदी–धी** (अन्धाधुन्द-दी) स्त्री. बंडाळी; अव्यवस्था; गोंधळ; अराजकता (राज्य, घर, कामकाज इ. मध्ये) वि. अव्यवस्थित; अनियमित; बेबंदी (कारभार, राज्यतंत्र).

**अंधानुकरण** न. (मानस.) आंधळेपणाने केलेले अनुकरण, नक्कल; दुसऱ्याच्या कोणत्या गोष्टीचे अनुकरण करायचे व ते का करायचे याचा विचार न करता केलेले अनुकरण; आपल्यापेक्षा वरच्या थरातील व्यक्तीची आंधळेपणाने केलेली नक्कल. [सं.]

**अंधानुवाद** पु. अंधानुकरणाने वागण्याची प्रवृत्ती.

**अंधार** पु. १. काळोख; अंधकार : 'खोलीत अंधार पडिला फार । खालीं न दिसे अणुमात्र ।' – संवि १.१३४. २. (ल.) अडाणीपणा; अज्ञान : 'जाणपणें घे अंधार । तो एक पढतमूर्ख ।' – दास २.१०.२७. ३. (ल.) अन्याय; उपद्रव; अंदाधुंदी; घोटाळा (वा.) **अंधारून येणे** – सूर्यासमोर काळे ढग आल्यामुळे उजेड कमी होणे; अंधारणे; अंधार पडल्यासारखी स्थिती होणे. [सं. अंधकार]

**अंधारकोठडी–कोंडी–खण– खणी** स्त्री. एकान्तवासाची शिक्षा भोगण्यासाठी तयार केलेले, चोहोकडून बंद परंतु हवा येण्यापुरता झरोका असलेले तळघर, खोली. १. कोंदट, अंधारी खोली. २. (ल.) एकान्तवासाची शिक्षा. (क्रि. ठरणे, ठरवणे, देणे, ठोठावणे).

**अंधारखोली** स्त्री. (भौ.) छायाचित्रे असलेली चित्रपट्टी धुण्यासाठी व त्यावर इतर प्रक्रिया करण्यासाठी खास तयार केलेली प्रकाशबंद खोली.

**अंधारगडत–द** न. अतिशय काळोख (क्रि. पडणे, येणे, चढणे, होणे.) अंधारगडप, अंधारगुडुप असेही शब्द वापरतात.

**अंधारणे** अक्रि. (ढग, पाऊस) दाटून, जमून येणे व काळोख होणे. [सं. अंधकार]

**अंधारी** स्त्री. १. काळ्याकुट्ट ढगांमुळे पडलेला अंधार. २. टांग्याचा घोडा किंवा रहाटाचा, घाण्याचा बैल यांच्या डोळ्यांस लावण्याची झापड. ३. पित्तक्षोभाने डोळ्यांपुढे एकाएकी भासणारा अंधार किंवा चक्कर; मूर्च्छा; तसेच उतारवयामुळे किंवा (ल.) आढ्यतेमुळे डोळ्यांवर येणारी झापड, धुंदी. ४. अंधार, काळोख (क्रि. येणे, पडणे). ५. (ल.) अज्ञान : 'तेथे अंधारी गेली । मग बुद्धी मावळली ।' – परभा १०.११.
वि. उजेड नसलेली; एकांत असलेली; निर्जन : 'ह्या वार्डास 'अंधारी' असेच नाव आहे.'– विराशिरो १६८.

**अंधारी** स्त्री. १. रहाटगाड्याच्या चाकाच्या दोन दात्यांमधील जागा; दातांतर; खाचा. २. कडीपाटाच्या दोन कड्यांमधील जागा झाकण्याकरता बसवलेली आडवी फळी. ३. लाकडी जिन्याच्या दोन पायऱ्यांमध्ये मागच्या बाजूस असलेली पोकळ जागा बंद करण्याकरता बसवण्याची फळी. ४. तुरुंग; अंधार कोठडी; तळघर : 'ज्या गाड्यानें श्रीमंतांवर हात टाकिला त्यास मोरोबा दादांनी तेथेंच मारूं न देता कैद करून आणून अंधारीत घातला आहे.' – ऐलेसं १४२०. ५. बळद; भिंतीत काढलेले कपाट.

**अंधारी उजेडी** क्रिवि. गुप्तपणे व उघड; सरळ, स्पष्ट शब्दात वा खुबीने सुचवून; खाजगी रीतीने व चारचौघात, अनेक मार्गांनी, रीतींनी. (क्रि. सांगणे, शिकवणे.)

**अंधारी कुंधारी–कोंधारी** क्रिवि. १. काळोखात; अंधारात; सांधीकोंदीत; कोन्याकोपऱ्यात. २. (ल.) गुप्तपणे; चोरून; आडून. [अंधारीचे द्वि.]

**अंधारी रात्र** स्त्री. वद्य पक्षातील रात्र; अंधारी, काळोखी रात्र.

**अंधारू** पु. पार्शी धर्मगुरू : 'भिकाजी रुस्तुमजी अंधारू.' – बाबारो २५.४०.

**अंधारे** न. १. अंधार, काळोख. २. रातांधळे : 'गिरी विरी आणि अंधारे'– दास ३.६.२६. २. झडप; छप्पर; झापड : 'खिडकीची नागफणीच्या आकाराचीं अंधारीं हीं आर्मेनियन लोकांनी इराणी लोकांपासून उचललीं.' – ज्ञाको २०.१८९. [सं. अंधकार]

**अंधी** स्त्री. १. काळोखी; आभाळ भरून येणे. २. तुफान, वादळ, जौळ (क्रि. होणे, उठणे, बसणे, जाणे). [हिं.]

**अंधु** पु. आड; विहीर. : 'सिंधु अगस्त्याऽचमना न पुरे, पुरतील काय मग अंधु ।' –मोद्रोण २.८५ [सं. अंधम्]

**अंधुक–धूक** वि. अस्पष्ट; मंद; पुसट; धूसर. [सं.]

**अंधुक काच** स्त्री. (स्था.) धूसर काच; उजेडाची तीव्रता कमी करणारी काच.

**अंधुकपणा** पु. पुसटपणा; धुसरता. [सं.]

**अंधुळी** स्त्री. सावली; छाया.

**अंधेर** पहा : **अंधार** [हिं.]

**अंधेरनगरी** स्त्री. अन्याय, जुलुम–जबरदस्ती जेथे नेहमी चालते असे स्थळ; अव्यवस्थितपणाचा कारभार; बेबंदशाही. [हिं.]

**अंधेरी** वि. १. पहा : **अंधार.** २. अंधेरनगरीतल्या सारखा; बेबंद : 'येथील कारभार मोठा अंधेरी. कोणास कोणी पुसत नाही.' – ऐलेसं ५२४४.

**अंधेरी** स्त्री. किलाव्यास बांधलेली असते. जरूर लागेल तेव्हा हत्तीच्या डोळ्यावर टाकतात.

**अंब** न. पाणी.

**अंब** उद्‌गा. राजपत्नी, गुरुपत्नी, मित्रपत्नी, साध्वी, सासू व आई या सर्वांस आदरार्थी संबोधन. [सं.]

**अंबक** न. डोळा : 'त्र्यंबकाने तिसरा 'अंबक' म्हणजे डोळा उघडला की त्यातून या ज्वाला निघतात.' – तीम ७९. [सं.]

**अंबक** न. बाप. [सं.]

**अंबक** न. तांबे. [सं.]

**अंबकटी–काठी** स्त्री. कच्या आंब्याची वाळलेली फोड; अंबोशी; हिचा उपयोग कालवणात चिंचेऐवजी करतात. पहा : **आंबकरी** [सं. आम्र+काष्ठ]

**अंबर** न. १. वस्त्र, कापड : 'पदबंध नागर । तेंचि रंगाथिलें अंबर ।'– ज्ञा १.६. २. (समासात) वस्त्र परिधान, पोशाख याअर्थी. उदा. पीतांबर= पिवळे असे वस्त्र; वस्त्राने युक्त असा; दिगंबर=दिक्‌–दिशा आहे वस्त्र ज्याचे; चर्मांबर इ. [सं.]

**अंबर** पु. १. धान्य ठेवण्यासाठी भिंतीत केलेली कोठडी; धान्यागार; कोठार; हळद. २. (ल.) खजिना : 'जें मागशील तें देईन भरला अंबर ।'– सला १.३०. [फा. अंबार](वा.) **अंबर लुटणे–** धान्याचा साठा उधळपट्टीने खर्चणे; लुटारूने धान्य लुटणे.

**अंबर** पु. एक सुगंधी तांबूस पदार्थ (उदबत्त्या करण्याच्या कामी उपयोगी). अंबर उदी. [फा.]

**अंबर** न. देवमाशाचे सुगंधी रेत किंवा विष्ठा; कापडी झापड–राव्यको.

**अंबर** पु. (वै.) एक प्रकारचे गवत.

**अंबर–री** पु. १. (लोहारी) खिळे उपसून काढावयाचा चिमटा, पकड. २. (सोनारी) अडकित्त्यासारखा दोन पायांस एका खिळ्याने सांधून वरच्या बाजूस वर्तुळाकार असलेला, धातूचे सूत, तार ओढण्याचा चिमटा.

**अंबर** पु. १. एक धातू; देशी औषधात याचा उपयोग करतात. २. अंबरचा केलेला जिन्नस. (मणी, सळई, दागिना.).

**अंबरउदी** पु. स्पर्म व्हेल नावाच्या माशाच्या आतड्यात होणारा एक पदार्थ. हा सुगंधी व औषधी आहे.

**अंबरखाना** पु. अठरा कारखान्यातील एक; धान्यागार; कोठार : 'अंबरखाना चांगला । वक्त गैरवक्त कामाला । तोचि राजा शोभला । जगतीं तळीं ।' – भाअ १८३४. [फा.]

**अंबर चरखा** पु. हाताने सूत काढण्याच्या चरख्याचा एक प्रकार.

**अंबरसा** पु. अंबर धातूचा लहान मुलाच्या गळ्यातील एक दागिना. (व.)[फा. अन्बरचा]

**अंबरी** स्त्री. जाळीदार सुशोभित केलेली मंडपी. वि. अंबराने सुगंधित केलेली (तंबाखू वगैरे). [अंबर]

**अंबरीष** न. १. खापर. २. पश्चात्ताप. पु. सूर्य; विष्णू; शिव; एक ऋषी. [सं.]

**अंबले** न. काकडीसारखे एक फळ. हे कडू असते.

**अंबले** न. मुलांच्या कानातील डूल.

**अंबवण** न. १. पहा : **अंबोण** : 'अधरपान आंबवणें । गाढालिंगनी मेळवणे ।'–मुआदि १५.११८. २. (पिठात, कोंड्यात, तंबाखूत – ताक, लिंबाचा रस इ.) आंबवण्याकरता घालण्यात येणारा पदार्थ; विरजण. पहा : **आंबोण** [सं. अम्ल+वन]

**अंबवण** न. आवण; आमण; बैलगाडीच्या चाकाच्या तुंब्याच्या तोंडात, आतील आखाने तुंबा झिजू नये म्हणून घातलेले लोखंडी वाटोळे कडे.

**अंबवण–णी** न. स्त्री. नाव वल्हवताना नावाडी गातात ते गाणे; चकवा. (कों.)

**अंबवणी** न. १. कैरी भाजून पाण्यात कालवून आत गूळ किंवा साखर घालून केलेले सार किंवा पन्हे.

**अंबवणी** न. उसाची किंवा हळदीची लागवड झाल्यावर तिसरे दिवशी जे पाणी देतात, ते पाणी.

**अंबवणी चिंबवणी** न. उसाची किंवा हळदीची लागवड झाल्यावर पाचसहा दिवसांनी देतात ते पाणी.

**अंबवशी** स्त्री. बारीक पानांची भुईसपाट पसरणारी वनस्पती; अंबटवेल.

**अंबवा-रंग** पु. १. आंब्याच्या रंगासारखा हिरवा रंग; नीळ व आंबेहळद यापासून केलेला रंग. २. अंबवा रंगाने रंगविलेले कापड.

**अंबशी** वि. मेघासारखा निळा; मेघवर्ण. [सं. अंभस्]

**अंबष्टाण, अंबसाण** स्त्री. आंबटघाण; आंबूस वास. (को.)

**अंबष्ठ-ष्ट** पु. १. ब्राह्मण बाप व वैश्य आई यांपासून झालेली संतती; अशांची जात : 'अंबष्ट आणि मूर्धावसिक्त ।' - एभा २०.३३.[सं.]

**अंबसाण** स्त्री. आमसाण; आमसूल. पहा : **अंबटाण**

**अंबसुका-खा** वि. अर्धवट सुकलेला; दमट; किंचित ओलसर; अंबट ओला. (कों)

**अंबसूल-सोल** न. रातांबीच्या फळाचे त्याच्याच रसांत भिजवून वाळवलेले साल; कोकंबसाल.

**अंबळी** पु. एक मासा; पिउश मासा. याच्या छातीवर दोन व पाठीवर एक असे तांबड्या रंगाचे पंख असून बाकीचे अंग पांढरे असते; लांबी दोन ते तीन इंच असते.

**अंबा** स्त्री. १. आई : 'म्हणोनि अंबे श्रीमंते ।' - ज्ञा १२.१०.२. राजपत्नी; साध्वी इत्यादींस आदरार्थी संबोधन. ३. दुर्गा; भवानी; पार्वती (देवी) पहा : **अंबाबाई** : 'साहस नव्हेचि गे अंबा । विन्मुख जाहली जगदंबा' - एरुस्व ५.७३. [सं.]

**अंबाटक्का, अंबीटक्का** पु. आंबरायाबाबत घ्यायचा कर.

**अंबाडा** पु. बायकांच्या केसांचा बुचडा. पहा : **आंबाडा**

**अंबाडा** पु. १. अंबाडीचे झाड व पाने; हे झाड चार पाच हात उंच वाढते. सुकल्यावर भिजत घालून त्यावरील वाख काढतात, त्याचे गोणपाट, दोर व कागद करतात. [हिं. अंबाडा]

**अंबाडी** स्त्री. १. अंबाडीचे झाड. पहा : **अंबाडा** (वनस्पती). २. या झाडाचे बी (यापासून तेल काढतात.) ३. याचे तंतुमय वेष्टन - त्वचा; यापासून दोर करतात. याची पाने भाजी म्हणून खातात. (गो.) (वा.) **केसांची अंबाडी होणे, दिसू लागणे-** केस पिकल्यामुळे अंबाडीच्या वाखासारखे दिसू लागणे.

**अंबाडी** स्त्री. अंबाडीचे पान; मोठ्या व तिखट पानाची नागवेलीची एक जात.

**अंबाडी** पु. बेदाण्यातील एक जात.

**अंबाडी** पु. एक मासा (वाळलेले, सुकट).

**अंबाडी पट्टी** स्त्री. अंबाडीच्या लागवडीवर किंवा तिच्यापासून दोर करण्याबद्दल बसवलेला कर.

**अंबाबाई** स्त्री. १. कोल्हापूरची देवी. (सामा.) कोणतीही (जोगेश्वरी, तुळजापूरची वगैरे) देवी. २. (ल.) हट्टी स्त्री. ३. (विनोदाने) आमटी.

**अंबाबाईचा उदो** उद्‌गा. पोत घेऊन 'उदो उदो गे' करीत नाचणे; देवीचा जयजयकार करणे.

**अंबाबाईचा पोत** अंबाबाईचा पुजारी जो भुत्या त्याच्या हातातील, चिंध्यांचा पीळ देऊन केलेला, पेटलेला मोठा काकडा.

**अंबार** न. १. अंबारखाना; भिंतीतील धान्य ठेवण्याची कोठडी; धान्यागार; कोठार : 'धान्याची अंबारे... केव्हा लुटली जातील...' - शसौ ५१. पहा : **अंबर.** (सामान्यत: ) कसलाही ढीग, रास. २. कापलेल्या गवताचा ढीग.(बे.) ३.पिकाचा सरकारी हिस्सा; अंबाराशी. (कर्ना.) [फा. अंबार]

**अंबारसरी** स्त्री. गावातील ब्राह्मण, गावकामगारांना वगळून, इतरांपासून जी घरपट्टी वसूल करतात ती.

**अंबारी** स्त्री. हत्तीवरील बसावयाची मेघडंबरी, आसन, बैठक. जेव्हा वर छताची योजना नसेल तेव्हा या बैठकीला हौदा म्हणतात : 'अवर्ण अंबाऱ्या शोभल्या वरी ।' - नव १३.७५. [अर. अमारी] (वा.) **उलटी अंबारी हातात येणे, उलट्या अंबारीत बसणे, उलट्या अंबारीने राज्य करणे -** भिक्षांदेही करणे; भीक मागणे (गाठ मारलेल्या भिक्षेच्या झोळीचा आकार उलट्या अंबारीसारखा असतो यावरून) : 'माझी कातड्याची पेटी व फराळाचे आणि चार धोतरें एवढें मात्र.... बचावलें. नाहींतर आजच उलट्या अंबारीच्या राज्याचा उपभोग घ्यावा लागला असता.' - रंगराव. **अंबारीत बसणे-** श्रेष्ठपणास चढणे; वैभव, अधिकार प्राप्त होणे. **अंबारीसकट हत्ती गिळणे -** सर्वस्व स्वाहा करणे; सगळेच हडप करणे : 'येथील मंडळी अंबारीसकट हत्ती गिळणार हे स्पष्ट आपणास विदित आहे.' - पुणे अखबार १.७७.

**अंबावाटी** स्त्री. विवाह समारंभातील अंबा शिंपण्याच्या विधीकरता वापरली जाणारी रंगाची वाटी : 'तुर्या अंबावाटी घेऊनि गोरटी.'- दावि ३७.

**अंबाळ, अंबाळी** स्त्री. क्लेश.

**अंबिका** स्त्री.१. आई : 'कां एकलोतिया बाळका । वरी पडौनि ठाके अंबिका ।'- ज्ञा १३.५०२. २. जगदंबा; पार्वती : 'चंद्र तेथे चंद्रिका । शंभु तेथे अंबिका ।'- ज्ञा १८.१६२२. [सं.]

**अंबिलगाडा** पु. चित्रविचित्र वेलींनी नटवलेली, सजवलेली गाडी. (बे.)

**अंबी, अंबेकरी** पु. नावाडी; भोई; धीवर : 'मासे मारणारे कोळी व नावा वलविणारे अंबी नदींत एके ठिकाणीं बुड्न बऱ्याच अंतरावर पाण्यावर येतांना पुष्कळांनी पाहिलें असेल.'- प्राणिमू १५. (कर्ना.) [का. अंबी]

**अंबीर** पु. अमीर; हंबीर; सरदार. राज या शब्दाला जोडून विशेषत: हा शब्द येतो : 'धन्य पुण्यामधिं आपुण राजअंबिरा ।'- पला ९८. पहा : **अमीर** [अर. अमीर]

**अंबु** न. पाणी. [सं.]

**अंबुखणे-खिणे, आंबुखणे** उक्रि. १. टाकणे; फेकणे; वर्षणे : 'प्रळयाग्नीचीं उजिती । आंबुखिलीं जैशीं ।'- ज्ञा ११.३४२. २. सिंचन करणे; शिंपडणे : 'घृतें आंबुखुनि आगियाळें ।' - ज्ञा १४.१६२. [सं. अभ्युक्षण]

**अंबुखा** पु. १. पाण्याचा वर्षाव, वृष्टी; शिंतोडा; हबका 'मोक्षमार्गाकडे.

जैं यांचा आंबुखा पडे ।'– ज्ञा १६.२६१.

**अंबुखा** पु. गवसणी.

**अंबुची, अंबु (बो)ची चिंबोची** (अम्बुची) स्त्री. एक आंबट वेल. हिच्या पानांची भाजी करतात. पहा : **अंबोशी**

**अंबुज** न. पाण्यात जन्मलेले; कमळ. नयनांबुज, पादांबुज इ. समास होतात. [सं.]

**अंबुजी** स्त्री. मांगाची व मांग गारुड्याची गुप्त लिपी; 'पारसी' या ऐवजी वापरला जाणारा शब्द; 'मांग' या ऐवजी या नावाने संबोधतात.

**अंबुट** न. अंबर; आकाश; पहा : **आबुट** : 'घडघडिले चक्रवाट । रजें अंबुट कोंदलें ।।'– एरुस्व ८.१४.

**अंबुटकी** स्त्री. अगदी कोवळा आंबा.

**अं(आं)बुथणे** उक्रि. १. वाढणे; जास्त होणे : 'वोखदाचेनि नांवें अमृतें । जैसा नवज्वरू आंबुथे ।'– ज्ञा १३.७२३. २. (ल.) प्रज्वलित होणे; प्रदीप्त होणे; पेटणे; पेटविणे; उजळणे : 'तैसा वैराग्याचा बोलावा । विचाराचा तो दिवा । आंबुथितां आत्मठेवा । काढीची तो ।।' –ज्ञा १८.१००८. [सं. अभ्युत्थान]

**अंबुद, अंबुधर** पु. ढग; अभ्र : 'चातक होतां तृषाकांत । आवडीनें लक्षित अंबुधरातें ।।'– सवि २५.२. [सं.]

**अंबुधि–धी, अंबुनिधि–धी** पु. समुद्र; महासागर. [सं.]

**अंबुरकी चिंच** स्त्री. बहुतेक पिकलेली, गाभुळलेली (चिंच.)

**अंबुरा** पु. अंबूर. पहा : **अंबर, अंबूर**

**अंबुला** पु. नवरा; पती : 'नंदनंदन हा आचोज अंबुला वो ।' – निगा ६५.

**अंबुला** पु. पाण्याचा थेंब.

**अंबुला, अंबुले** पु. आंब्याच्या आकाराचा कानातील डूल. पहा : **आंबला, आमला** : 'कुमारांचे आंबुले कडदोरी । मजपाशीं आणिजे ।।' – क्रिपु १.१९.३९. [सं. आम्र, आमलक]

**अंबुली** स्त्री. आबुली; पत्नी; नवरी : 'लांबलांबे कासोटें । मिरविती आं(आ)बुलिआं पुढें ।।'– शिव ८९१.

**अंबुलेपण** न. नवरेपण; मोठेपणा; श्रेष्ठत्व: 'यादवासी अंबुलेपणाची आस' – ज्ञागा २९. पहा : **आंबुलेपणा**

**अंबुवाची** स्त्री. आषाढ वद्य पक्षातील दशमीपासून त्रयोदशी अखेरचे चार दिवस. या काळात भूमी अशुद्ध होते अशी समजूत असून या अवधीत कोठलेही शेतकाम न करण्याची प्रथा आहे.

**अंबुशी** स्त्री. पहा : **अंबोशी**

**अंबुसणे** अक्रि. पहा : **आंबणे**

**अंबूदारखाना** पु. जलस्थान; पाणी साठविण्याची जागा.

**अंबूर** पु. पकड; चिमटा; सांडशी. पहा : **अंबर**

**अंबूस** वि. १. आंबलेले; आंबट वास येणारे. २. आंबट.(ना.)[सं. अम्ल]

**अंबे** न. वल्हे.

**अंबेकरी** पु. नावाडी, भोई; धीवर. [कर्ना.]

**अंबेमोहोर–हर, आंबेमोहर** पु. १. आंब्याच्या मोहोराइतका बारीक, गोल, पांढरा व सुवासिक तांदूळ. याच्या काडाच्या पातीलाही आंब्याच्या मोहोरासारखा वास येतो. २. नाचणीचा एक प्रकार.

**अंबेरी** स्त्री. एक झाड व त्याचा चीक. (राजा.)

**अंबेहळद, आंबेहळद** स्त्री. हळदीची एक जात. ही रानात उगवते. या हळदीच्या गाठी मोठ्या असून त्यांना फार दर्प असतो. बागायती हळदीप्रमाणे ही खाण्याच्या मसाल्याच्या उपयोगी पडत नाही. औषधात वापरतात.

**अंबोची–चिंबोची** स्त्री. भाजीच्या उपयोगाची एक वनस्पती.

**अंबोटी** स्त्री. १. एक वनस्पती. २. चुका; शतवेधी.

**अंबोण** न. १. गुरांना घालावयाचे पेंड, कोंडा, सरकी इ. चे भिजवून किंवा शिजवून केलेले मिश्रण. ह्याला आंबूस वास येतो. २. विवाह झाल्यावर वर व वधू या दोन्ही पक्षांकडील बायका परस्परांना जेवणाचे आमंत्रण देतेवेळी मुख्य विहिणीपुढे भाजीसह कोंडा, पेंडीचा खडा, भाजीच्या काड्या इ. शिध्याने भरलेले शिप्तर ठेवतात ते. (वा.)
**अंबोण दाखविणे–** (ल.) लाच देणे.

**अंबोण** न. गाडीच्या चाकाच्या तुंब्यातील लोखंडी कडे.

**अंबोणी** स्त्री. पहा : **अंबवणी**

**अंबोरा** पु. (धनगरी) लग्नात शिल्लक असलेले व एकत्र शिजवून सर्व नातेवाईकांना हक्काने वाटण्यात येणारे अन्न. (व.)

**अंबोली** स्त्री. पत्नी : 'अंबोल्या सांडोनि कोण मागे भीक' – जना ३३.

**अंबोशा–शी** स्त्री. कच्च्या आंब्याच्या वाळवलेल्या फोडी. यांचे लोणचे करतात. (कों.)

**अंबोशी** स्त्री. १. बारीक पानांची, भुईसरपट, आपोआप उगवणारी वनस्पती, अंबटवेल; अंबुशी. २. एक लहान झुडूप– याच्या पानांची चटणी करतात.

**अंबोसा** पु. आलुबुखार.

**अंबोळी** स्त्री. धिरडे; तांदूळ व त्याच्या निम्मी उडदाची डाळ भिजत घालून वाटून त्यात मीठ, मिरच्या, कढीलिंब वगैरे घालून व तव्यावर ओतून तयार होणारा पदार्थ.

**अंबोळीबांबोळी** पु. लहान मुलांचा एक खेळ. (कु.)

**अंब्या** पु. अंबेकरी; नावाडी.

**अंब्रुक–को** क्रिवि. आतल्या आत. (गो.)

**अंब्रुचे** अक्रि. फळ पिकणे (गो.)

**अंभ** न. पाणी : 'नातरी आटलिया अंभ ।' – ज्ञा १५.२७. [सं. अंभस्]

**अंभोज** न. कमळ; पद्म; अंबुज. [सं.]

**अंभोद, अंभोधर** पु. मेघ. [सं.]

**अंभोधि–धी, अंभोनिधि–धी** पु. समुद्र. पहा : **अंबुधि** [सं.]

**अंभोरुह** न. पहा : **कमल**

**अंमलरुह** पहा : **अमल** [सं.]

**अंमलपाणी करणे** क्रि. नशापाणी करणे; दारू पिणे : 'बौद्धधर्म स्वीकारला नाही. कारण रोज अंमलपाणी करावे लागते.' – एगाएपा १४८.

**अंमलबजावणी** स्त्री. (मान्य झालेला कायदा, नियम इ.) लागू करण्याची कृती; कार्यान्वयन; अंमलात आणणे. [फा.]

**अंमली औषधे, अंमली द्रव्ये** न. अव. गुंगी, कैफ निर्माण करणारी मादक द्रव्ये.

**अंमस** स्त्री. अमावास्या; आवस.(गो.) [सं. अमा]

**अंमळशाने** क्रिवि. थोड्या वेळाने.

**अंमा** अ. परंतु; पण. पहा : **अमा**

**अंवठा** पु. पहा : **अवठा.**

**अंवशी** क्रिवि. पूर्वरात्री; रात्र पडताच.

**अंवारे** अ. अंतराने; दूरवर; अंतरावर : 'येजमान पुढे चौदा कोसाच्या अंवारे आहेत.'– होइसापखं १२.१३३.

**अंश** पु. बकोट; खांदा. [सं. असं]

**अंश** पु. १. भाग; खंड; विभाग; तुकडा; हिस्सा; वाटा. हा शब्द विशेषत: समासात योजला जातो. : 'तरी ताकाचे अंश फेडणें ।'– ज्ञा १५.४६४. २. लेश; राहिलेला भाग; प्राप्तीचा वाटा; शेष. ३. वर्तुळाचा ३६० वा भाग; अक्षांश; रेखांश. ४. (ग.) अपूर्णांक; व्यवहारी अपूर्णांकातील रेषेवरील संख्या; याच्या उलट छेद. ५.(ल.) माया : 'अंश शेवटी एकीकडे । अनंतें हारपैली ब्रम्हांडें ।' – ज्ञा ८५. [सं.]

**अंश** पु. १. आदित्यांपैकी एक २.किरण : 'कमलवनीं विकाशु । करी रवीचा एक अंशु'– ज्ञा १८.१३६७.

**अंश** पु. (छाप.) (मजकुराच्या उठावाच्या मानाने) खिळ्याची जाडी.

**अंशअधिपत्र** न. भाग किंवा शेअरसंबंधीचे अधिपत्र.

**अंशक** पु. १. भाऊबंद, वाटेकरी. २. भाग.

**अंशक** पु. सौरमानाचा दिवस. [सं.]

**अंशकालिक, अंशकालीन** वि. १. अर्धवेळ; थोड्या वेळाची (नोकरी, धंदा इ.) २. पूर्ण वेळ काम न करणारा. [सं.]

**अंशतः** क्रिवि. भागाभागाने; पायरीपायरीने; थोडेथोडे; हळुहळू; किंचित; काही. [सं.]

**अंशतःभरणा** पु. भरणा करावयाची संपूर्ण रक्कम न भरता काही भाग जमा करणे.

**अंशदान** न. आपल्या वाट्याची रक्कम देणे; हिस्सा अदा करणे; वर्गणी देणे; अंशतः देणे. [सं.]

**अंशदानात्मक** वि. वर्गणीच्या रूपाने दिला जाणारा; अंशतः दिला जाणारा. [सं.]

**अंशधारी** पु. (अर्थ.) भागीदार.

**अंशध्रुवित** वि. (भौ.) काही प्रमाणात ध्रुवीभवन झालेला.

**अंशभक्ति–क्ती** स्त्री. एक नवा अर्थालंकार : अंशवाची शब्दाने पूर्णाचा अर्थ लक्षित करणे.

**अंशमात्र** क्रिवि. अंशत; थोडे; किंचित. [सं.]

**अंशराशीकरण** न. परिवर्तनाने कमी करणे.

**अंशराशीकृत निवृत्तिवेतन** न. निवृत्तिवेतनाचा काही भाग सरकारला देऊन त्याऐवजी विशिष्ट सूत्राप्रमाणे मिळालेली एकत्र रक्कम व त्याशिवाय दरमहा मिळणारे निवृत्तिवेतन.

**अंशवर्णांधता** स्त्री. (वै.) काही रंग डोळ्यांना न दिसणे. [सं.]

**अंशस्वर** पु. (संगीत) पहा : **वादीस्वर**

**अंशहारी, अंशाधिकारी** वि. भागीदार; वाटेकरी; पातीदार.

**अंशावतार** पु. ईश्वराचा काही अंश ज्यामध्ये आहे असा अवतार. त्याच्या उलट पूर्णावतार. [सं.]

**अंशांकन** न. (भौ.) अंशाच्या खुणा करण्याची क्रिया.

**अंशांश** पु. अंशाचा अंश; भागाचा भाग; पोटविभाग.

**अंशिक** वि. अंशात्मक; थोडेसे; किंचित; अल्प : 'जयाचें आंगिक अंशिकें ।' – ज्ञा १८.१७२५.

**अंशित** वि. वाटलेले; विभागलेले. [सं.]

**अंशी** पु. भागीदार. पहा : **अंशहारी** [सं.]

**अंशु–शू** पु. किरण; कर; रश्मी; प्रकाशशलाका. [सं.]

**अंशुक** न. वस्त्र : 'न आतळे जो द्विज अंशुकासी ।'– सारुह १.४४. [सं.]

**अंशुकळा** स्त्री. परमेश्वराच्या गुणरूपादी कळांचा, तेजाचा लहानसा भाग; परमेश्वराचा अंशावतार : 'अंशुकळा सखा दैव्यालागी.' – नरुस्व ३१३.

**अंशुमापक** पु. किरणांच्या अंगी असणारे गुणधर्म ओळखण्याचे यंत्र [सं.]

**अंशुमाळी** पु. सूर्य : 'जैसा वर्षोनि भूतळीं । आपुला रसु अंशुमाळी ।' – ज्ञा १५.२९७.

**अंशुल** वि. तेजस्वी. [सं.]

**अंस** पु. खांदा. पहा : **अंश :** 'वागवी निज सिदोरिस अंसीं ।' – सारुह ३.१२२. [सं.]

**अंसफलक** खांदा; बकोट.

**अंसुढाळ** वि. १. पहा : **अश्रुढाळ**. २. रडव्या; सदोदित रडका.

**अंसुपात** पहा : **अश्रुपात**

**अंसे, अंसेक** क्रिवि. अमावास्येच्या दिवशी. (कु.)[सं. अमावास्या]

**अंक्ष्व** न. १. पूज्य; शून्य. २. अभाव.

**अं:** उद्गा. एखाद्या गोष्टीविषयीचा तिटकारा; औदासीन्य; अविश्वास; संशय, असंभाव्यता व्यक्त करताना निघणारा उद्गार.

**अः** याचा अंतर्भाव स्वरमालेत करण्यात येत असला तरी तो स्वतंत्र स्वर नसून, ते एक ध्वनिचिन्ह आहे. हे ( : ) या प्रकारे दाखविले जाते. विसर्गाला ( : ) वेगवेगळ्या संदर्भात वेगवेगळे ध्वनिमूल्य आहे. ते त्याच्या आधी येणाऱ्या स्वरावर आणि पुढील व्यंजनावर आधारित असते.



[आ वर्णाखाली येणारे काही शब्द येथे न आढळल्यास 'अ' वर्णाखाली पाहावेत.]

**आ** १. देवनागरी लिपीतील आणि मराठी वर्णमालेतील दुसरा वर्ण; मराठी वर्णमालेतील दुसरा स्वर. स्थानपरत्वे ऱ्हस्व किंवा दीर्घ. 'गा' मधील 'आ' दीर्घ व 'गाडी' या शब्दातील 'आ' ऱ्हस्व.

**आ** उपसर्ग. व्यंजनादी शब्दापूर्वी सामान्यत: पुढील अर्थाने – (अ) लघुता; अल्पता; कमीपणा. उदा. ओष्णम् =कोंबट (उष्णम्=कढत, ओष्णम्=किंचित, उष्ण=कोंबट). (आ) व्याप्ती; प्रसार; वाढ. उदा. + आभोग=समृद्धी, पूर्णता. (भोग=सुख, आभोग=अधिक भोग, भोगाची वाढ). (इ) उपक्रमाची मर्यादा (अमुक पासून) उदा. आसमुद्रात्=समुद्रापासून, आजन्मत:=जन्मापासून. (ई) अवसान; मर्यादा; अंतीची मर्यादा. (अमुकपर्यंत, पावेतो). उदा. आजानु=गुडघ्यांपर्यंत, आमरण=मृत्यूपर्यंत, आकर्ण=कानांपर्यंत. (उ) अंतर्भूत व समाविष्ट मर्यादा. उदा. आक्रमण=व्यापून टाकणे. (क्रम=जाणे, चालणे, पाऊल टाकणे). आसकलात् ब्रह्म=ब्रह्म वस्तुमात्र व्यापून आहे. (आ+सकल=सर्व). (ऊ) अतिरिक्त; अकारण, वाजवीपेक्षा अधिक; निरर्थक; द्विरुक्ती. उदा. आभास, आप्राण, आल्हाद, आघात (भास, प्राण, ल्हाद, घात याप्रमाणेच अर्थ). (ए) आ लावल्याने शब्दाचा अर्थ वाढतो, मर्यादित होतो, बदलतो किंवा फिरविला जातो. उदा. आग्रह (ग्रह=देणे, घेतल्यानंतर त्यालाच चिकटून राहणे).= हेका; आचार (चर्=चालणे)= शास्त्राप्रमाणे वागणूक ठेवणे; आगमन (गमन=जाणे)=जवळ येणे; येणे; आमोद (मोद=आनंद)=सुवास; आकृति (कृति=कृत्य)=मूर्ती; स्वरूप; आकार.

**आ** आ अक्षर उच्चारताना होणारा ध्वनी व तोंडाचा होणारा आकार (स्थिती). वासलेले, उघडलेले तोंड : 'तव सुप्रसाद मुदिरा इच्छितसे घातकी करीत 'आ' हे।' – मोआ ४.८३. (वा.) **आ करणे** – तोंड जास्तीत जास्त उघडणे (घसा तपासण्यासाठी). **आ पसरणे** – १. तोंड उघडणे; पदार्थ खाण्यासाठी आ करणे. २. मदतीसाठी, दयेची याचना करणे. ३, भोकाड पसरणे. **आ वासणे** – १. चकित होऊन निर्बुद्धपणे तोंड पसरणे, आ करणे; जांभई देणे. २. खाऊन टाकण्यासाठी तोंड उघडणे. ३. अधीनता, अंकितपणा कबूल करणे.

**आ** आऽआऽ उद्‌गा. कबूतर, मोर इ. पक्ष्यांना बोलावण्याचा शब्द; घालावयाची साद.

**आ** उद्‌गा. आश्चर्य व दु:ख व्यक्त करणारे प्रश्नार्थक अव्यय.

**(साधारणपणे जुन्या मराठीतील 'आइ–ई ने सुरू होणारे शब्द 'ऐ' 'आय'वर्णांखाली पाहावेत.)**

**आइकट** पु. तह. (गो.) [का. आयकट्टु = व्यवस्था]

**आइकशी** सक्रि. ऐकशील : 'माजे आइकशी ता तू मुंबयच्या वाटे पडो नुकों.' – मसाप २.४.१११. (ग्रा.)

**आइगेनफल** न. (भौ.) भेददर्शक समीकरणातील विशिष्ट अटी पूर्ण करणारे उत्तर.

**आइगेन मूल्य** न. (ग.) योग्य मूल्य; दिलेले समीकरण सत्य करील असे अव्यक्त राशीचे मूल्य.

**आइणी** स्त्री. उत्कट इच्छा, आस : 'अज्ञानाहि कवतिकें रूप केलें विकें जव आइणी तुझी टिके । पुरे म्हणे।।' २. सामर्थ्य. ३. कौशल्य; नैपुण्य : 'कमळास्वतुरांची आइणी पुरे: याचा गाइवा' – रुस्व १५८.

**आइणीपाइणी** स्त्री. १. वासना; उत्कट इच्छा : 'स्वेच्छा आइणी पाइणी। अर्जुनेसी रणांगिणी। द्वंद्वयुद्ध करावयामनीं। आवडी वसे अपार।।' – मुआदि ७०२. ३१.१११. २. सामर्थ्य.

**आइत** स्त्री. रचना : 'सोळा खणांची आइत केली.' – रुस्व ५४.

**आइतवार** रविवार.

**आइता–ती–ते** वि. १. स्वतंत्र; स्वयंभू; आपोआप तयार झालेला; स्वत:सिद्ध; स्वयंपूर्ण : 'तो तुझा तू आइता.' – परमा ४.१६. २. श्रम, यत्न न करता प्राप्त झालेला, मिळालेला : 'देव घ्या कुणी देव घ्या, आइता आला घर पुसुनि।।' – तुगा.

**आइतिका** स्त्री. सिद्धता; तयारी; सामग्री. पहा : **आइती** : 'भोजनाची आइतिका करविणें। तेयां कारणें।।' – क्रिपु १४५.

**आइती** स्त्री. १. सिद्धता; तयारी; सामग्री : 'मग म्हाइंभटा ऋद्धिपुरा जावेयाचि आइती करुं आदरिली।' – ऋ १३३. २. विस्तार. [सं. आ+यत्=प्रयत्न करणे]

**आइतोजी** वि. १. कष्टाच्यावेळी गैरहजर असणारा व फलोपभोगाच्या वेळी मात्र हजर असणारा (आइता, आइतोबा). २. काम न करता फुकट उपभोग घेणारा.

**आइतोळा** पु. पाटाच्या (पुनर्विवाहित) स्त्रीला तिच्या पूर्वीच्या नवऱ्यापासून झालेला मुलगा. (तिच्या दुसऱ्या नवऱ्यास मात्र हा मुलगा आयता मिळालेला असतो.).

**आइनदान** पु. १. कायदेबाज; कायदेपंडित. २.कायद्याच्या ज्ञानाचा फायदा घेऊन दुसऱ्यास फसविणारा (मनुष्य). [फा.]

**आइनी** स्त्री. उत्सुकता; खुमखुमी; युक्ती : 'पुरैल भुजांची आइनी' – उह ९०९.

**आइसक्रीम** न. दूध, दही, रस किंवा यासारख्या पातळ पदार्थात साखर (तसेच बदाम, केशर) घालून गोठवून केलेला खाण्याचा पदार्थ : 'आइस्क्रीम तयार झाल्यावर प्रथम ते शीतकोठारात साठवीत असत.' – माआ १७२. [इं.]

**आइंद–दा–दे** ( क्रिवि. १. येणारा; पुढे; पुढील वर्षी; आगामी : 'सरकारचे वचनाची कायमी कशी तें आइन्दे जहुरात येईल.' – मईसा १०.१६६. २. यंदा; या सालीं. [फा. आयन्दा]

**आई** स्त्री. १. जननी; जन्म देणारी स्त्री; माता : 'आई वदे, बा न मानीं संकट' – दावि १६०. २. जगदंबा; देवी; देवीच्या नावापुढे लावावयाचे उपपद. उदा. तुकाई, तळजाई, म्हाळसाई, मरीआई, जनाई, बहिणाई. प्रेम व आदर दर्शविणारा शब्द. उदा. रखुमाई, विठाई, बहिणाई. ३. (सामान्यत:) देवी : 'आईचा नवसु नाहीं पुरविला – दावि ३४७. ४. जमीन (काळी आई, पांढरी आई). ५. देवी (रोग); फोड्या.

[सं. आर्ये]. (वा.) **आईवर नाडा सोडणे** - (शिवी, शपथ) मातृगमन करणे; मातेशी व्यभिचार करणे.

**आई** प्रत्यय. एक भावदर्शक प्रत्यय. हा विशेषणास लावला असता भाववाचक नाम तयार होते, उदा. भले-भलाई, कुचर-कुचराई, नरम-नरमाई, नवल-नवलाई, गोल-गोलाई, महाग-महागाई, स्वस्त-स्वस्ताई, निळा-निळाई. [फा.]

**आईआंग** न. आईपणा, मायपणा ज्या अंगापासून येतो ते अंग; स्त्रीचे किंवा प्राण्याच्या मादीचे जननेंद्रिय व आतील गर्भाशयाचा भाग; गुह्यांग.

**आई काळी** स्त्री. शेतजमीन. ही आईसारखी पोषण करणारी असते म्हणून आदरार्थी. [आई+काळी=शेतजमीन]

**आईत** पु. नाश; नासाडी; बिघाड; दुर्दशा; हैराणी : 'मुलकाचा आईत भारी जाला आहे.' - मइसा १०.६१.

**आईनइशराकत** स्त्री. भागीदारीच्या अटी; करार. [फा.]

**आईपांढर** स्त्री. गावठाण; गाव ज्या जमिनीवर वसतो ती जमीन. ही शेतीच्या निरुपयोगी, साधारण पांढऱ्या रंगाची असते.

**आईपोरका** वि. आईवाचून उघडा पडलेला; ज्यांची आई मेली आहे अशी मुले : 'आईपोरकी पोरे जाली व ती आजीने सांभाळलेली असली म्हणजे ती अतिशय लाडकी होऊन थोडीबहुत छांदिष्टही होतात.' - गणपतराव १२.

**आईबाई** स्त्री. १. आईसारखी, वयाने श्रेष्ठ, सुस्वभावी बाई; मातेसमान स्त्री. २. शेजारची बाई; शेजारपाजारची स्त्री; शेजारीण. ३.कोणीतरी बाई; स्त्री. (वा.) **आईबाई करणे** - खुशामत करणे; गोंजारणे.

**आईबाप** (आईबाप्) पु. अव. आई व बाप; वडील व मातोश्री; माता व पिता. अव. (वा.) **आईबाप उद्धरणे** - आईबापावरून वेड्यावाकड्या शिव्या देणे. **आईबापावरून पावणे** - आईबाप उद्धरणे; वेड्यावाकड्या शिव्या देणे; आईबापांबद्दल वाईट बोलणे.

**आईमा** एक हक्क, कर.

**आईमाई** स्त्री. व्यापक अर्थाने बाई; एखादी आईसारखी मानलेली स्त्री. माउली; आईबाई. (वा.) **आईमाई उद्धरणे** - आईवरून शिव्या देणे. **आईमाई करणे**- खुषमस्करी करणे; गयावया करणे; मनधरणी करणे; आर्जव करणे; विनविणे. **आई माई जेरु बेटी करणे** - आई माईवरून शिव्या देणे : 'वरातदार पाहून नाइकास राग आला. त्यांनी वरातदारास आईमाई जेरूबेटी करून वरात माघारी टाकली'. - मइसा१.४.

**आईस** स्त्री. आई; माता; देवी; लक्ष्मी : 'आईस लागे की बहिण लागे सांग शिवशक्तीचे नाव' - मसाप १.१.४. (कों. ग्रा.)

**आईसफ्रुट** न. दूध, फळांचा रस आणि साखर यांची बर्फाच्या साहाय्याने गोठवून केलेली कांडी.

**आईसमाईस** न. खुषामतखोरी; अजीजी. (वा.) **आईसमाईस करणे** - गोड गोड बोलून ठकविणे.

**आईसासरा-सासू** आजेसासरा - सासू. [तंजा.]

**आईंदे** क्रिवि. यापुढे.

**(आउ ने सुरू होणारे काही शब्द 'औ-आव' या वर्णाखाली पाहावेत.)**

**आउ** स्त्री. आई : 'वहिली गे धाये बोलवी आउवेते' - शिव ८२८. [क. अम्म,अव्व]

**आउक-ख-क्ष** न. आयुष्य; हयात; जीवित : 'नाहीं फिटली असोसी देवा आउक दिला थोडा।' - ऐपो ८९; 'हाता-पायाला आऊक मागनारे हायीत समदे.' - वाळवण ७५. [सं. आयुष्य]

**आउट** वि. खेळातून बाद : 'कोणी तरी आउट झालं.' - खर्डेघाशा ४५. (वा.) **आउट होणे** - १. बाद होणे. २. झिंग येणे; मद्यपानाने बेहोष होणे : 'आमच्यापैकी कोणीही नवटाक ठोकूनही आउट झाला नव्हता.' - वासू ६९. [इं.]

**आउट-ऊट-के** औट; साडेतीन.

**आउटपीठ** न. साडेतीन मात्रांचे ओंकार रूप : 'आउटपीठीची दुरगुळी' - ज्ञागा ४८८.

**आउट हाऊस** न. बंगल्याच्या आवारातच बांधलेले छोटे घर. [इं.]

**आउठ** वि. औट, साडेतीन : 'तैसी ते कुंडलिनी। मोटकी आउठ वळणी।' - ज्ञा ६.२२३. [सं. अर्धसप्त]

**आउठावे** वि. साडेतीन मात्रांच्या पलीकडील म्हणजे ब्रह्मपद : 'देवा तू अक्षर। आउठाविये मात्रेसि पर।।' - राज्ञा ११.३०२.

**आउताची पास** नांगराचा फाळ : 'शेतें कापून चारावी, आउताच्या पासा वगैरे न्यावें, याप्रमाणें करितात.' - पेदभा २० पत्र नं. २०३.

**आउत्या** पु. १. शेतात काम करणारा. २.शेतात काम करण्याच्या वयाचा मुलगा; औतावर काम करणारा पोरगा.

**आउर** न. पूर : 'सुखाचें आउर लोटले ।'

**आउर्ति** स्त्री. भोवरा : 'पडली संग्रामाची आउर्ति ।' - उह १८०२.

**आउले** वि. वेगळे; निराळे; वायले : 'चाऱ्हीं वेदयासीं आउलें ठेविलें। बळीसि दिधलें बलिदान।।' - ब १९८.

**आउवा** स्त्री. १. माता; आई; श्रेष्ठ स्त्री : 'सुकु म्हणें आइकें परिक्षिता। रुक्मिणी आउवेचे रूप पांतां। व्यक्तीसी आली।।' - रुस्व ६८.

**आउ(ऊ)स** स्त्री. आई; माता; आईस : 'तायें आउसें वारा घालिलें असति' - लीच १.१४.

**आउंज** : पहा : **आविंज**

**आऊ** स्त्री. माता; बाई; आई : 'आऊ सर्वज्ञाते विनवा ।' -उच २. वृद्ध स्त्री. [का. अव्वा]

**आऊ** प्रत्यय. १. स्त्रियांना उद्देशून आदरार्थी प्रत्यय. उदा. जिजाऊ. २. आवडी नावाचे संक्षिप्त रूप.

**आऊ** स्त्री. १. हलक्या शीलाची स्त्री; (ल.) आवा; अवाजी. २. (सामान्यत:) स्त्री. [सं. अंबा]

**आऊ** पु. स्तन; थान : 'आईचा आऊ तें पिऊं लागेल.' - नीप्र १००.

**आऊ** न. १. कण्हणे, विव्हळणे; मारताना काढलेला किंवा असाच दु:खाचा उद्गार. २. का कू करणे; नकार दर्शविणे.[ध्व. आँ+ऊँ]

**आऊटकी-के** पहा : **अवटकी, अवटी, औट**

**आऊड** साडेतीन हातांचा पुरुष (मोजण्याचे माप).

**आऊड** पु. १. टप्पा. २. बंदुकीच्या गोळीच्या टप्प्याइतके अंतर.

**आऊत** न. मासे धरण्याचे जाळे. (कु.) [सं. आयुध]

**आऊतकी** स्त्री. पाटलाचा हक्क म्हणून प्रत्येक नांगरामागे त्याला देण्यात येणारे ठराविक माप.

**आएतुटी** वि. निस्तेज : 'तेव्हळि कुचपर्वतांचा घाटी : वळघतां डोळे जाले आएतुटी।' - शिव ५५९. [क. आय=प्रमाण+सं. त्रुटि]

**आओ** पु. आकृती; रूप; आकार : 'जरि माजा सीं मोटकाचि आओ। तरि चराचरां कैसां भाओ।' - शिव ३९४. [सं. आकार]

**आक** पु. १. रथाचा, गाडीचा कणा; आख : 'सवारला रथ, रथाचा मोडला आक.' -जसा २२२. २. (घडकाम) लोखंडाचा लांब तुकडा, कांब; गज; वार. [सं.]

**आकट** न. धान्यातील खडा, माती इत्यादी कचरा.

**आकटे** न. मुलांना झोपवण्याची कापडी झोळी.

**आकड सासू** स्त्री. बायकोची वडील बहीण; वडील मेव्हणी. (व.)

**आकडा** पु. १. संख्या; अंक; गणितातील एक चिन्ह. २. रक्कम.

**आकडा.** पु. १. बाकदार, वाकडे टोक; आकडी; हूक. २. (ल.) विंचू किंवा खेकड्याची नांगी. ३. लांब मिरची किंवा चिंच. उदा. चिंचेचा आकडा. ४. टोक; शेंडा : 'तैसे आवाळुवांवरी आकडे; धगधगीत दाढांचे।' - ज्ञा ११.३६३. ५. घोडा (छत्रीची वरची पिन इ.). ६. (जरतार धंदा) फिरकीतून जाणाऱ्या तारेस एकाच दिशेने फिरण्यास लावणारे यंत्र. ७. अंगठा.(गो.) ८. केशरचना व्यवस्थित राहावी म्हणून वापरली जाणारी धातूची किंवा प्लॅस्टिकची इंग्रजी यू आकाराची पिन. ९. मिशांचा आकडा.[सं. अंक].(वा.) **आकडा मोडणे – बसणे** – विण्यापूर्वी गाय किंवा म्हैस या जनावरांच्या ढुंगणाच्या दोन्ही बाजू खोल जाणे. **आकडा लागणे** – मटक्याच्या जुगारात ज्या आकड्यावर पैसे लावले असतील तो आकडा येणे. **आकडा वळणे** – थंडीने किंवा भीतीने अंग आखडणे. **आकड्यावर पैसे लावणे** – मटक्याच्या आकड्यावर पैसे लावणे: 'बापूंना आकड्यावर पैसे लावायचा नाद लागलाय.' – लव्हाळी २४. **आकड्यास येणे** – वाकणे; पिकणे (शेत, पीक, धान्याची कणसे) : 'कित्येक भारें आकड्या लवती.' – सप्र १२.४३. **आकड्यास लवणे – लोंबणे** – पहा : **आकड्यात येणे.**

**आकडी** वि. पाणी न मिसळलेले, कोरे, निरसे (दूध). (कर.)

**आकडी** स्त्री. थंडी वाजून भरणारे कापरे.(गो.) २. लहान मुलांच्या पोटात होणारा व हातापायास आंचके बसणारा रोग.

**आकडी** स्त्री. १. उंचावरील फुले, फळे वगैरे तोडण्यासाठी एका उंच काठीला कोयती, विळा किंवा तशाच प्रकारचे वाकड्या आकाराचे पाते बांधून केलेले साधन : 'आकडी खांद्यावर टाकली..' – गोतावळा ४८. २. कमरेला कोयती ठेवण्यासाठी एका दोरीला गेळ केलेला लाकडाचा तुकडा बांधून केलेले साधन.(को.) ३. नांगराचे जू ज्याला बांधतात तो मुख्य दांडा. ४. दुबेळक्यासारखे चित्त्याचा गळपट्टा बांधण्याचे एक हत्यार; एस्की; इचकी. ५. समेळ (संबळ) (डूम व डंका) वाजविण्याची वेताची वाकविलेली लहान काठी. ६. (सोनारी धंदा) तारा काढण्याच्या गावी नावाच्या ठोकळ्यावर बसवलेली जाड पट्टीची कमान. (खा.)

**आकडी** स्त्री. भाताची कोवळी लोंब. (वा.) **आकडी वळणे** – भाताची लोंब दाणेदार झाली की ती वजनाने खाली लोंबते त्यास आकडी वळणे असे म्हणतात.

**आकडी पाना** पु. (यंअ.) नट-बोल्ट वगैरे घट्ट पिळण्याकरिता तयार केलेला आकड्यासारखा पाना.

**आकडी रोधी** वि. (वै.) आकडी थांबविणारे (औषध).

**आकडू, आखडू** वि. शिष्ट; गर्विष्ठ; फाजील ऐट असलेला; चारचौघात न मिसळणारा; जराशा यशाने फुशारून जाणारा : 'नयनने बी.ए.ला फर्स्टक्लास मिळविलान् पण आकडू दिसत नाही.' – लव्हाळी ३.

**आकडूबाजी** स्त्री. शिष्टपणा; फुशारकी; गर्विष्ठपणा : 'परांजप्यांनी एवढी आकडूबाजी करायला नको होती.' – लव्हाळी २५६.

**आकडेपत्रक** न. आकडेवारी असलेला तक्ता, कोष्टक.[सं. अंक+पत्रक]

**आकडेपंडित** पु. संख्याशास्त्रातील तज्ज्ञ. (उपरोधाने) आकडेवारीचे फाजील वेड असणारा मनुष्य. [सं. अंक+पंडित]

**आकडे बहाद्दर** वि. केवळ आकडेमोड करणारा : '.. अर्थशास्त्रज्ञ हे केवळ आकडेबहाद्दर ठरले.' – नौने २३१.

**आकडेबाजी** स्त्री.१. केवळ आकडे, आकडेवारी सांगून लोकांना गुंग करणे, गप्प बसवणे; आकड्यांच्या खेळात रमून जाणे; आकड्यांचे हिशोब मांडून आडाखे बसवणे; मूळ प्रश्नांकडे, फलनिष्पत्तीकडे दुर्लक्ष करून केवळ आकड्यांत रमणे. २. जुगारातील आकड्यांवर पैसे लावण्याचा नाद : 'बापू आकडेबाजी किती दिवस करीत आहेत?' – लव्हाळी २५.

**आकडेमोड** स्त्री. एखाद्या क्षेत्रातील आकड्यांची वर्गवार, तपशीलवार व पद्धतशीर अशी मांडणी व त्यासंबंधीची बेरीज, वजाबाकी इ.; हिशोब : '... अहवालातील आकडेमोड या संबंधी बोधप्रद ठरेल.' – धरागालेखं ३४१.

**आकडेवार** क्रिवि. आकड्यांच्या आधाराने; आकडे देऊन.

**आकडेवारी** स्त्री.१. आकड्यांच्या स्वरूपात दिलेली वस्तुस्थिती स्पष्ट करणारी माहिती. २. एखाद्या विषयाच्या अभ्यासाकरिता आकड्यांत गोळा केलेली माहिती, विश्लेषण, वर्गवारी इत्यादी.

**आकडेशास्त्र** न. कोणत्याही क्षेत्रातील ज्ञान किंवा माहिती परिमाणात्मक परिभाषेत गोळा करणे, तिची वर्गवारी करणे व चिकित्सा करणे. त्याचप्रमाणे या माहितीचे लोकसंख्येच्या संदर्भात संभाव्यतेच्या निकषावर विश्लेषण करणे; संख्याशास्त्र, सांख्यिकी.

**आकण** न. १. एकदा मळणी केलेली कणसे (जोंधळा, बाजरी इ. ची) २. (काही प्रांतांत) दुसरी मळणी झाल्यानंतरचे धान्य. पहा : **मदन.** ३. धान्याची मळणी झाल्यानंतर उरलेले; माती, खडे मिसळलेले धान्य; मातेरे.[सं. आकृष्ट+कण] (वा.) **आकण निघणे** – १.पिट्टा पडणे; अतिशय मेहनत पडणे; अतिशय दमून थकणे. २. खात्री होणे. (व.)

**आकण कडवे** न. १. गाण्यातील पालुपद, त्याच त्या गोष्टीची पुनरावृत्ती.

**आकण** न. १. बाफा : 'आकण पाडून आदीच उसाचं वावर तयार करून ठेवलं हुतं – रैत ५२. २. खण; खोली : 'न्हायासाठी एका

एका आकणाला तीन तीन रुपये रोज.' – खळाळ ५८.

२. (ल.) एकदा नाकारलेली गोष्ट पुन्हा पुन्हा काढणे; विनंती करणे; जपमाळ घेणे, तुणतुणे गाणे, घोकणे.

३. एखाद्याच्या भाषणात वारंवार येणारा शब्द; पादपूरण [गुज. आकडी, आखणी].

**आकण–णा** पु. बिरुद, पराक्रमाची खूण. पूर्वी एखाद्याला जिंकल्यावर त्याचे नाव तोड्यावर किंवा पैंजणावर खोदून तो पायात घालीत.

**आकणा** वि. अंकित, ताबेदार.

**आकणी** स्त्री. रस्सा. [का.]

**आकणी** स्त्री. १. आखणी; रेघा आखण्याची पट्टी. २. पेटीचा कप्पा. ३. योजना; रूपरेषा; चित्राकृती. ४. रोगी जनावरांना डागण्याची सळई.

**आकबंद** वि. संबंध; संपूर्ण; पूर्ण; पुरा (मालावर किंमतीचा आंकडा घालून व इतर सर्व गोष्टी पुऱ्या करून तयार केलेला माल). : 'आगदी आकबंद तावडीत गावली.' – रैत ९२. [सं. अंक+बद्ध]

**आकय** स्त्री. अक्का. (गो.)

**आकर** पु. खाण; ठेवा; साठा; संग्रह; आगर. उदा. कुसुमाकर : 'ऋतूंमाजीं कुसुमाकरु । वसंतु तो मी।।' – ज्ञा १०.२८३. [सं.]

**आकरग्रंथ** पु. मोठे, जाड पुस्तक; मूळग्रंथ; आधार ग्रंथ; प्रचंड ग्रंथ : 'विशेष अंगाचाच (अनुमान, प्रत्यक्ष इ.) विचार करणाऱ्या ग्रंथास प्रकरण ग्रंथ म्हणण्याची भारतीयांत चाल आहे. उलट सर्व बाजूंचा विचार करणाऱ्या ग्रंथास आकरग्रंथ (सर्वांगपरिपूर्ण) असे ते म्हणतात.' – भातप्र २८१.८२.

**आकरज** वि. खाणीतून निघालेला; सर्वोत्तम; सर्वोत्कृष्ट. [सं.]

**आकरणे** उक्रि. आकार देणे, येणे; उत्पन्न होणे, करणे : 'आकरलें जें जें मायिक तें खरें।' – ब गाथा २१२. [सं. आ+कृ]

**आकरताळ–ळी** पु. स्त्री. हट्टी; माथेफिरू; कजाग; खोडकर; दांडगा.

**आकरसणे** क्रि. १. जोराने ओढून, आवळून, करकचून, घट्ट बांधणे; आकसणे; संकोचणे; आखडणे; आटणे. २.ओढणे, ओढला जाणे; आकर्षणे. ३. शुष्क होणे; सुकणे (गळा, जीभ). ४. अंगाला ओढ लागणे. ५. आर्द्रता नाहीशी होणे. [सं. आ+कृष्]

**आकरज्ञान** न. खनिजज्ञान; खाणीसंबंधी शास्त्राचे ज्ञान, माहिती; जमिनीची परीक्षा करून जमिनीखाली असलेल्या खनिजाबद्दलचे ज्ञान करून देण्याची विद्या, शास्त्र. [सं.]

**आकरा** सं. स्त्री. कोंब.

**आकरीत** वि. १. अतिशय; फार; प्रमाणाबाहेरचा : 'नको करुं आग्रह आकरित।' –प्रला १२२. २. लबाड; धूर्त; फाजील : 'लई अंतरची खोल मोठी वर नट केवळ सात्त्विक दिससी। गरीब रीतीनें करून आकरितपणीं जनीं अससी।' –होला ८९. ३. वेडेवाकडे, अघटित : 'नाही मी वागले आकरीत.' – जसा २६९.

**आकरीत** न. खोटे; उलटेपालटे; लबाडी : 'त्यावरी निलोपंती विश्वनाथ भटाबरबर सांगोन पाठविले कीं, तुम्ही आकरित करीता आणि पाठ राखिता आणि सखोबावरी आकरीत होईल तेव्हां कैसी पाठी राखोना.' – पुरंद ३.१४०.

**आकरोट** आक्रोड : 'बदामें आकरोटें खिसमिस उतत्या आणवील्या सवंगा।' – सारुह ३.४८.

**आकर्खणे** सक्रि. आकर्षून घेणे; ओढून घेणे : 'तेही ते सक्ति आकर्खिली।' – लीचपू २०२.

**आकर्ण** क्रिवि. कानापर्यंत : 'धनुष्य आकर्ण ओढून बाण सोडला.' वि. कानापर्यंत लांब. उदा. आकर्णनयन–लोचन. [सं.]

**आकर्णणे** उक्रि. ऐकणे; श्रवण करणे; लक्ष देणे : 'हे आकर्णुनि पूर्ण तूर्ण विभवज्ञानार्णव, क्षमापती।' –आसीस्व ९. [सं.]

**आकर्णन** न. श्रवण; ऐकणे : 'परि आकर्णनीं नाहीं। चाड जरी।।' –ज्ञा १८.१४८९. [सं.]

**आकर्णित** वि. ऐकलेले. [सं.]

**आकर्म** न. आक्रमण : 'जडाचेतनाची आकर्मशक्ती' – मूप्र ६५०.

**आकर्षक** वि. ओढून घेणारा; ओढणारा; खेचणारा. (ल.) मनोवेधक, चित्त रमविणारे; सुंदर. [सं.]

**आकर्षक्रीडा** स्त्री. १. खेळ (सोंगट्या, बुद्धिबळ इ.) २. मल्लयुद्ध (६४ कलांपैकी एक). [सं.]

**आकर्षण** न. १. ओढून घेणे; खेचून घेणे. २. (ल.) वेधून घेणे (मन, चित्त वगैरे), ओढा, ओढ (मनाची). ३. आकुंचन; आकरसणे. ४. ओढून घेण्याची शक्ती. ५. (संगीत) वाद्यांची वाजती तार ताणून तिच्यावर नखीचा आघात करून उच्च स्वर काढणे. [सं.]

**आकर्षणे** उक्रि. १. ओढून घेणे; वेधून घेणे; आकर्षित करणे : 'तक्षक आकर्षूनि आम्ही । पाडीत असों इयें होमीं ।' –मुआदि ११.१३७. २. आकुंचन पावणे; घट्ट होणे; आकरसणे : 'अगा हिम जे आकर्षलें।' –ज्ञा १४.२७६. ३. प्रेम उत्पन्न करणे. [सं. आ+कृष्]

**आकर्षित** वि. १. वेधून घेतलेला; ओढून घेतलेला; ओढला गेलेला; खेचला गेलेला; मोहित झालेला. २. संकुचित; घट्ट केलेला; आकरसलेला. [सं.]

**आकलणे** समजणे, बोध होणे; लक्षात येणे. [सं. अकल्]

**आकलन** न. १. बोध; समज; ग्रहणशक्ती; ज्ञान. २. नीट समजणे; लक्षात येणे. ३. बंधन; आळा; ताबा; वर्चस्व; परावृत्त करणे; (कार्य) करू न देणे. ४. समावेश; व्यापणे; आत घेणे; साठवणे; ग्रहण करणे. [सं.]

**आकलनीय** वि. समजण्याजोगा; बुद्धिगम्य; ग्रहण करण्याजोगा. [सं.]

**आकलबंद** वि. संपूर्ण.

**आकलबंदी** स्त्री. हुशारी; शहाणपण; मुत्सद्देगिरी : 'मशारनिलेचे आकलबंदीने आमचे सरकारचा फायदा कमपेश चाळीस लक्षास येकसाला जाला (सबब त्यास) इनाम गाव सहा हजारांचा प्रांत सुरत अठाविसी, येथे द्यावयाचा मानस.' – शादवें ६.[फा. अक्लमन्द]

**आकला** वि. अंकित.

**आकलित** वि. १. आकलन केलेले; नीट समजलेले; नीट ग्रहण केलेले : 'तो अंशतः आकलित व अंशतःच विश्लेषित...' – अंधारयात्रा १६. २. आटोक्यात आलेला; बांधलेला. [सं.]

**आकली** न. (मासे पकडण्याचे) लहान जाळे. (कों.)

**आकल्प** अ. १. ब्रम्हदेवाच्या सबंध दिवसापर्यंत (म्हणजे ४३ कोटी २० लक्ष मानव-वर्षे इतका काळ होईपर्यंत). २. (ल.) फार अमर्याद काळपावेतो; जगाच्या अंतापर्यंत : 'आकल्प आयुष्य व्हावे तयां कुळां। माझिया सकळां हरिचिया दासां।' [सं.]

**आकवात** न. एक वेळ जेवून राहणे. (कु.)

**आकस** पु. द्वेष; मत्सर; दुष्टावा; वैर; द्रोह; अदावत : 'मणिमल्लाने त्या लोकांविषयी आकस धरला.' - वज्रा ६१. [अर.]

**आकसखोर** वि. खुनशी; मत्सरी; दुष्ट; मनात अढी बाळगणारा.

**आकसकोशी** स्त्री. द्वेष; आकस; उट्टे काढणे; वैर; वैमनस्य : 'रामचंद्रपंत आप्पांचा कारभार आकसकोशीचा. करितां प्रसंगीं मला रक्षावें.' - ऐलेसं ६४०३.

**आकसणे** अक्रि. १.आकुंचन पावणे; संकोच पावणे; आखूड होणे; आटणे; लहान होणे : 'सुख वाढत्या आयुष्याबरोबर आकसत जातं.' - पर ७१. २. लांबी रुंदी कमी होणे. [सं.]

**आकसर** वि. लग्नास योग्य असूनही लग्नावाचून राहिलेला पुरुष किंवा स्त्री; कुमार, कुमारी. [का. अक्क = मोठा]

**आकसाबोकशी** क्रिवि. मोठे लांबलचक सूर काढून (रडणे).

**आकसांवां** न. आकांडतांडव; नाटकी आविर्भाव अगर बोलणी. (गो.) [पोर्तु. आक्सांव]

**आकस्मिक** वि. अचानक; अनपेक्षित; अकस्मात; अवचित घडलेले, आलेले. [सं.]

**आकस्मिकता निधि(धी)** पु. पुढे उद्भवणाऱ्या प्रसंगांसाठी वेगळा राखून ठेवलेला पैसा.

**आकस्मिक रजा** स्त्री. किरकोळ रजा (सुट्टी).

**आकळ** न. १. आकलन : 'ब्रम्हादिकां न कळे खोळ। ते हे आकळ धरियेली.' - तुगा २२३. २. (ल.) परब्रह्म; अनाकलनीय : 'असे तो आकळ वेदशास्त्रा' -चोखा. [सं.]

**आकळण** न. समजण्याची शक्ती; विवेकबुद्धी : 'विवेक विसरला आकळण।' - एभा २३.९५८. [सं. आकलन]

**आकळणे** उक्रि. १. समजणे; बोध होणे; लक्षात येणे; आटोक्यात, आवाक्यात येणे : 'किती समुदाय आकळेना ।' - दास १९.१०.११. २. ओढून घेणे; वश करणे; स्वाधीन ठेवणे : 'तुझे कुशल नाम बा हळुहळू मना आकली ।' - केका ७४. ३. जवळ घेणे; ओढणे; कुरवाळणे; (ल.) चुंबणे. ४. (ल.) आवरणे; किंचित मर्यादित करणे (धंदा, प्रकरण वगैरे). ५. ओढणे; निग्रह करणे; ताब्यात ठेवणे; बांधणे : 'परी त्या गर्वे आकळिलीं' - रासपं २५९८. ६. सापडणे : 'अहं सोहं ब्रह्म आकळले' - तुगा ४०३६. झाकोळणे; व्यापला जाणे : 'तैसा तो धनुर्धरु महामोहें। आकळिला।' - ज्ञा १.१९०. ७. जाणणे; बांधणे; समाविष्ट करणे. [सं. आकलन]

**आकळती** वि. स्त्री. संक्षेप करणारी; थोडक्यात सांगणारी : 'न न्हाये नर्काची धावणी :तरि आकळतीया वाणी: भेदु दाउं' - ज्ञाप्र. ६५३.

**आकंठ** क्रिवि. १. कंठापर्यंत; गळ्यापर्यंत. (ल.) भरपेट, तृप्ती होईपर्यंत; मनसोक्त (भोजन, जल, संकट इ.किंवा त्यात बुडणे, निमग्न होणे) : 'हिमोदकें आकंठें।' -ज्ञा १७.२५८. २. सर्वतोपरी; मन:पूर्वक : 'दिग्विजय लिखाणात आकंठ बुडाला होता.' - हीवाअ २७. [सं.]

**आकंठणे** उक्रि. गाठणे; आटोपणे (पकडणे, धरणे) : 'देव भोळा भावे भक्ता पाठोपाठी । उचिता आकंठी माघोमाघ ।'

**आकंठमर्याद** क्रिवि कंठापर्यंत, गळ्यापर्यंत.

**आकंपित** न. नृत्यातील एक अभिनय, नृत्यामध्ये डोके खाली व वर हळूहळू हालवणे. या अभिनयाने ओळख पटणे, उपदेश करणे, प्रश्न विचारणे, स्वाभाविक भाषण इत्यादी गोष्टी व्यक्त केल्या जातात. [सं.]

**आका** स्त्री. पहा : **अक्का**. २. आत्या.(गो.)
अ. निरर्थक शब्द; आकाबाका (ओ ठो प्रमाणे) : 'आका म्हणतां बाका येत नाहीं = ओ म्हणता ठो येत नाहीं;' अडाणी; अक्षरशत्रू.

**आकाटाका** पु. आटोका; अंदाज. (व.)

**आकाड** पु. आषाढ : 'अकरावी माझी ओवी आकाडी एकादशी।' - जसा ३२.

**आकाडा** पु. कुंपण असलेल्या परसात जाण्याच्या वाटेतील बेडे; वाडग्याच्या वाटेत पुरलेल्या दुबेळक्यावरील आडवे लाकूड.(हेट.)

**आकातला** वि. हपापलेला. (व.)

**आकाबाई** स्त्री. १. पहा : **अक्काबाई**. २. दुर्दैव; : 'आकाबाईचा फेरा.' (वा.) **आकाबाई आठवणे** - दुर्दशेची, अवदशेची इच्छा करणे.

**आकाय** स्त्री. वडील बहीण; वयोवृद्ध स्त्री.

**आकार** पु. १.आकृती; ठेवण; रूप; घडण; मूर्ती : 'पैं ब्रह्मबीजा जाहला अंकुरु ।घोषध्वनि नादाकारु ।' - ज्ञा ९.२७५. २. बाह्यस्वरूप; देखावा. ३. (ल.) साम्य; सादृश्य. ४. मनावर ठसलेली आकृती, ठसा, मूर्ती; मनावर झालेला परिणाम, कल्पना, ग्रह. ५. (पूर्णतेस येणाऱ्या कामाच्या, धंद्याच्या किंवा योजलेल्या गोष्टींच्या मसलती इ.) स्वरूपाचा निश्चितपणा. ६. खर्च; नफा; उत्पन्न; वसूल इत्यादी गोष्टींचा अजमास, अंदाज; जमाबंदीचा अंदाज; ठरावणी. ७. खूण; चिन्ह; अंदाज; दिग्दर्शन. ८. (ग.) आकृती; चित्र. ९. (ग.) आकृतिमान; परिमाण. १०. पद्धत; वागणूक; राहणी; चाल; ढब; रीत; तऱ्हा : 'या रीतीं बहुत आकारें तिनें झाडितां।' - पंच २६. ११. पृथ्वीतील एकंदर वस्तुजात; विश्व : 'तरी ती हरीची ज्ञान कळा केवळ। हा आकार अवघा तुझा खेळ।' - हरि २४.८७. १२. जमिनीचा सारा. १३. किंमत. १४. (कर.) आव; आविर्भाव. १५. एखाद्या वस्तूचा विशिष्ट आकार. सामा.शब्द - मंडलाकार, चक्राकार, गोलाकार, वर्तुळाकार इ. १६. भाव : 'अंत:करणाचे आकार म्हणजे तरंग ....' - जोफु २८५. १७. गोळाबेरीज; हिशोब. [सं.] (वा.) **आकार दाखवणे** - १. मिष करणे; आव आणणे; ढोंग करणे; बहाणा करणे. २. एखाद्या गोष्टीचे स्वरूप, मान दाखवणे, व्यक्त करणे. **आकारात जाणे** - व्यर्थ जाणे; असफल होणे. (ना.) **आकारास येणे** - १. एखादी गोष्ट, धंदा, दुखणे, काम इ. विवक्षित

स्वरूपास येणे; रंगास येणे; मूर्त स्वरूपात येणे; दृग्गोचार होणे : 'कर्म आलें हो आकारा.' – विभूत २५. २. फळास येणे : 'त्यांची अवस्था तीच तुमची पुढें येईल आकारास.' – ऐपो ३०६. ३. कमी प्रमाणावर, संख्येवर येणे; खालावणे.

**आकारक** पु. (यंअ.) यंत्राच्या साह्याने वस्तूंना विशिष्ट आकार देणारा कारागीर. [सं.]

**आकारगज** पु. (जगाचा) आकार घेतलेला हत्ती : 'करितसे माजिवडा। आकारगजू' – ज्ञा १३.६५.

**आकारगोपन** १. खऱ्या स्वरूपाची, आकृतीची, मनोविकारांची छपवणूक; लपवणे; गुप्त ठेवणे; पडदा पाडणे. २. ढोंग; छद्मी व्यवहार. ३. मनातील विचार बाहेर पडू न देणे. [सं.]

**आकारचित्र** न. (जगाचा) आकार घेतलेले चित्र; आभास : 'म्हणौनु आहाचवाहाच न झकवे। एणें आकारचित्रें।' – ज्ञा ६.९९.

**आकारजमा** स्त्री. अंदाजाने ठरवलेला वसूल; वसुली जमेच्या उलट.

**आकारजात** न. वस्तुजात; उत्पन्न झालेल्या सर्व वस्तू; विश्व : 'जे आकारजाताचें दुस। घडी केलें।' – ज्ञा १५.८२.

**आकारण** न. आमंत्रण; बोलावणे; आवाहन; हाक : 'मुंबईकर जनरलाजवळचे मुनशी रा. रावसाहेब यांणी आकारण करून आणविले आहेत.' – ऐलेसं ६२१२.

**आकारणी** स्त्री. १. गणती; संख्या; माप; मोजणे; मोजणी; हिशोब (कर, सारा इ.चे). २. पाहणी; प्रतबंदी (जमिनीची); जमीन मोजणी. सामा.शब्द – आकारणी खर्डा, आकारणी ताळेबंद, आकारणी बाकी, आकारणी हिशोब इ. ३. ठोकळ अंदाजपत्रक; कच्चा खर्डा. ४. वर्गणी; दर. ५. जमीन; माल इ.ची पाहणी करून सारा, किंमत इ. ठरवणे.

**आकारणे** उक्रि. १. आकारास येणे. २. बोलावणे, आवाहन करणे; आमंत्रण करणे. ३. जमीन इ. ची आकारणी करणे. ४. रंगरूपास आणणे; आकार धारण करणे; विवक्षित स्वरूपास आणणे; आकारास येणे : 'आवयव आकारले सांग.' – मुआदि ४.३६. ५. निदान करणे (रोग इ.चे) ६. अंदाज, हिशेब, मसुदा करणे. ७. घेण्याची रक्कम ठरवणे. [सं. आकार]

**आकारणे** वि. लादणे, बसवणे. (कर, पट्टी इ.)

**आकारबंद** पु. १. वसूल, जमीन, पट्ट्या, वराती इत्यादींचा लिहून, तयार झालेला मसुदा. २. जमाबंदीचे सरकारी वार्षिक अंदाजपत्रक. ३. सामान्य अंदाजपत्रक, खर्डा.

**आकारमान** न. १. विस्तारमान; बाह्य स्वरूपावरून केलेला अंदाज. २. आकृतिमान; परिमाण. (प्र.) आकारमहत्त्व; पदार्थाच्या मोठेपणाचे परिमाण. [सं.]

**आकारवाद** पु. बाह्य व तांत्रिक गोष्टींवर अधिक भर देणारे मत; तंत्रप्रियता; थाट व बाह्याकार यांचा बडेजाव करणारा कलाक्षेत्रातील वाद. [सं.]

**आकारशुद्ध** वि. नीटनेटक्या, व्यवस्थित, पाहिजे तशा आकृतीचे; प्रमाणबद्ध (भांडे, घर, माणूस). [सं.]

**आकारशुद्धि–द्धी** स्त्री. आकृतीचा, स्वरूपाचा बांधेसूदपणा; अंगसौष्ठव; प्रमाणबद्धता.

**आकारसूचि–ची** स्त्री. (यं.) प्रत्येक ज्ञानसाहित्याची स्वतंत्र पत्रावर नोंद करून तयार केलेली सूची. [सं.]

**आकारिक** वि.१ (तत्त्व.) आकाराविषयक; आकारासंबंधी. २. आकार असलेले, साकार : 'अकारिक नाम जीवानें ठेविलें ।शिवानें तें केलें निर्विकार'– नाम ६८९. [सं.]

**आकारी** पु. गावात देवीची प्रथम स्थापना करणारा.

**आकारीव** पहा : **अकारीव**

**आकार्य** वि. ज्याला आकार देता येणे शक्य आहे असे; आकार देण्यासारखे. [सं.]

**आकार्यता** स्त्री. (यंअ.) १. आकारदायकता; आकारक्षमता. २. विविध आकार घेण्याची वस्तूची क्षमता. [सं.]

**आकाश** न. १. आभाळ; पृथ्वीभोवती असणारी निळसर घुमटाकृती पोकळी : 'आकाश म्हणजे अवकाश पसरला पैस–दास १३.७.१. २. वातावरण; अंतराळ. ३. पोकळी. ४. पंचमहाभूतांपैकी शेवटचे, पाचवे. ५. शून्य संख्या. ६. (तत्त्व) निर्गुण स्वरूप. [सं.] (वा.) **आकाश कोसळणे** – पहा : **आकाशाची कुऱ्हाड पडणे. आकाश ठेंगणे होणे**– अतिशय आनंद होणे. **आकाश दोन बोटे उरणे**– असामान्य कर्तृत्व गाजवल्याच्या, असामान्य गोष्ट मिळवल्याच्या भावनेने अभिमान वाटणे. **आकाशपातळ एक करणे**– १. आकांडतांडव करणे; हलकल्लोळ करणे. आरडाओरड करणे; प्रचंड ओरडा करून एखाद्या गोष्टींबद्दल आपला निषेध किंवा नापसंती व्यक्त करणे; धिंगाणा घालणे (रागाने, हट्टाने). २. एखादी गोष्ट साध्य करण्याकरता पराकाष्ठेचे प्रयत्न करणे. ३. भुकेने व्याकूळ होऊन अतोनात रडणे. **आकाश पाताळ एक होणे**– अतिशय जोराचा पाऊस पडणे. **आकाश फाटणे**– सर्व बाजूंनी एकदम संकटे येणे. **आकाशाची कुऱ्हाड पडणे** – दैवी आपत्ती येणे; अत्यंत मोठी हानी होणे. **आकाशाची चौघडी करणे**– आकाशाला घेरा घालणे; अचाट कृत्ये करणे; आवाक्याबाहेरचे काम शर्थीने करणे. **आकाशाची दोरी तुटणे**–मोठे संकट कोसळणे; आकाशाची कुऱ्हाड पडणे. **आकाशाची धाड पडणे** – पहा : **आकाशाची कुऱ्हाड पडणे; आकाशात नेणे**– स्तुती करून एखाद्याला देवपदाला नेणे : 'फक्त पंडितांनीं इतकेच लिहिले आहे कीं, जे जे राजे झाले, त्यांची खुशामत करून त्यांस आकाशांत नेले आहे.'– लोश ७५. **आकाशातून पडणे**– अघटित घटना दाखवणे. **आकाशाला गवसणी, घेरा घालणे–देणे**– अचाट कृत्ये करणे; मोठमोठे पराक्रम करणे; अशक्य गोष्टीस हात घालणे; महत्त्वाकांक्षी होणे. **आकाशाला ठिगळ लावणे**– पहा : **आकाशाची साल काढणे;** फार मोठे संकट आले असताना लहानसहान, अत्यंत अपुऱ्या प्रयत्नांनी त्यावर मात करण्याचा निष्फळ प्रयत्न करणे; निरर्थक प्रयत्न : 'हरि भय दीर्ण नभ करिल धड लावुनि कृष्णसार थिगळाला।'–मोभीष्म ६.४४. **आकाशाला शिड्या लावणे** – शक्तीबाहेरचे काम करणे;

अशक्यप्राय काम हाती घेणे. **आकाशाशी राहणे**– सर्वांत वरच्या मजल्यावर, आढ्याखाली राहणे.

**आकाशक** पु. संवेदनाग्र. अँटिना.
स्त्री. कीटकांच्या मिशा, शृंगिका. [सं.]

**आकाशकक्षा** स्त्री. दृश्य क्षितिज; क्षितिज रेषा, मर्यादा.

**आकाशकुसुम** न. असंभाव्य, अवास्तविक गोष्ट. [सं.]

**आकाशगमनविद्यासिद्धि–द्धी** स्त्री. यौगिक सिद्धींपैकी एक; आकाशात संचार करण्याची विद्या; अर्वाचीन विमानविद्या. [सं.]

**आकाशगंगा** स्त्री. आकाशातील तारकांचा विशिष्ट समुदाय. असंख्य ताऱ्यांच्या समुदायाचा काळोख्या रात्री दिसणारा नदीच्या प्रवाहासारखा पांढरा पट्टा. अतिसूक्ष्म अशा ताऱ्यांचे आकाशात दिसणारे हे दोन पट्टे दक्षिणोत्तर गेलेले दिसतात. पहिला पट्टा अगस्ती ताऱ्याच्या पूर्वेस मघाच्या रेखांशाजवळून निघून व्याधाच्या पूर्वेकडून आर्द्राच्या पश्चिमेस वळतो व तेथून तो ध्रुवाच्या पश्चिमेपर्यंत पसरलेलाआहे. दुसरा पट्टा श्रवणनक्षत्राजवळून ध्रुवाच्या पूर्वेकडे गेलेला आहे. पहिल्यापेक्षा दुसरा पट्टा लहान आसतो. दुर्बिणीने दिसणारे यांतील तारे सुमारे दोन कोटी आहेत. सूर्य या समुदायातीलच एक तारा आहे. २. मंदाकिनी; स्वर्गंगा. [सं.]

**आकाशतरंग** पु. (विअ.) पृथ्वीवरून पाठवलेले व अवकाशातून परत पृथ्वीकडे विशिष्ट क्षेत्रातून परावर्तित होणारे तरंग. [सं.]

**आकाशदर्शक** पु. (ज्यो.) बंद सभागृहाच्या किंवा तत्सम व्यवस्थेच्या शुभ्रवर्णी अंतर्गोल (घुमटाकार) छतावर प्रकाशाच्या निरुंद शलाका पाडून या प्रकाशित ठिपक्यांचे चलनवलन घडवून प्रेक्षकांना आकाशातील ग्रहताऱ्यांचे व त्यांच्या गतिस्थितीचे दर्शन (परिचय) घडवणारी यंत्रणा. [सं.]

**आकाशदिवा–दीप** पु. १. आश्विन शुद्ध पौर्णिमेपासून कार्तिक शुद्ध पौर्णिमेपर्यंत (पितरांना प्रकाश दिसण्यासाठी) भिंगाचा किंवा कागदाचा दिवा करून एखाद्या उंच काठीस, झाडास टांगून लावतात तो दिवा; रंगीत कागद, कामट्या; इ. चा बनवलेला, आत पणती, मेणबत्ती किंवा विजेचा दिवा लावण्याची व्यवस्था असलेला, दिवाळीत उंच ठिकाणी टांगायचा शोभेचा दिवा. २. खुणेसाठी एखाद्या उंच जागी लावलेला दिवा.

**आकाशनगर** न. १. (विप्र.) गंधर्वनगर; गंधर्वसृष्टी. २. ढगांच्या विचित्र आकृतींवरून वाटणारे ढगातील, आकाशातील काल्पनिक शहर. [सं.]

**आकाशनिंब** पु. (वन.) बुचाचे झाड; हा वृक्ष बागेत शोभादायक म्हणून किंवा रस्त्याच्या दुतर्फा लावतात; [सं.]

**आकाशपट** पु. अक्षांश, रेखांश, सर्व वृत्ते, नक्षत्रे, राशी इ. आकृतींनी परिपूर्ण असलेला नकाशा. यावरून सूर्य, चंद्र, ग्रह, उपग्रह यांचे मार्ग ठरवता येतात. [सं.]

**आकाशपथ** पु. १. यौगिक सिद्धींपैकी एक सिद्धी २. हवेतील रस्ता, वाट; आकाशातून जाणारा रस्ता.

**आकाशपाणी** न. (ल.) ताड, माड ह्या उंच झाडांच्या शेंड्याजवळच्या भागापासून म्हणजे आकाशातून काढण्यात येणारी ताडी, माडी इ. मादक पेये. [सं.]

**आकाशपाण्याचे दुर्निमित्य** न. दारु प्यायल्याचा आरोप : 'विसाजी आप्पाजी आठवले यांचे पुत्र मोरोपंत आठवले यांजवर आकाशपाण्याचे दुर्निमित्य कोतवालानें आणोनघरीं चौकी बसविली आहे.'– ऐलेसं ७०६०. [सं.]

**आकाशपाताळाचा भेद** पु. दोन वस्तूंमधील महदंतर.

**आकाशपाळणा** पु. प्रदर्शने, जत्रा इ. ठिकाणी उंचावर टांगलेले अनेक पाळणे असलेले गोल गोल फिरणारे अवाढव्य चक्र : 'जत्रेत आकाशपाळणा फिरावा तसं ते वाटू लागलं.' – माणूस १८४.

**आकाशपुष्प** न. अशक्य गोष्ट.

**आकाशभारती** स्त्री. १. आकाशवाणीला सुचविलेले दुसरे नाव (१९७८चा अहवाल). २.आकाशवाणीच्या स्वायत्ततेसाठी भारत सरकारला सादर केलेला अहवाल. [सं.]

**आकाशभाषण** १. स्वर्गीय देवतांशी संभाषण; (नाटकात इ.) आकाशाकडे पाहून, देवांना हाक मारून त्यांचे उत्तर आपण ऐकलेसे दाखवून नाटकातील व्यक्ती करते ते भाषण. २. (नाटकात) रंगभूमीवर नसलेल्या दुसऱ्या एखाद्या पात्राचे शब्द आपण ऐकत आहोत असे रंगभूमीवरील पात्र हावभाव करून सुचविते व त्यास उत्तर देते ते शब्द. [सं.]

**आकाशभाषित** न. आकाशवाणी केंद्रावरून ध्वनिक्षेपित केलेले भाषण. [सं.]

**आकाशमंडप** पु. आकाशाचे छत; आकाश हाच मांडव.

**आकाशमंडल–ळ** न. १. खगोल. २. तारांगण; आकाशातील तारामंडळाप्रमाणे दिसणारे दारूकाम. [सं.]

**आकाशमापक** पु. (शाप.) वातावरणातील शीतोष्णता मापणारे यंत्र; किरणविसर्जन दर्शक यंत्र.

**आकाशमांड** पु. आकाशरूपी मंडप : 'यऱ्हविं तऱ्हि आकाशमांडीं । जो गाजौनि ब्रह्मांड फोडि' –ज्ञा १७.२५०

**आकाशमुनि–नी** पु. उंट. (हा वाक्प्रचार उंटाची मान उंच असल्यामुळे पडला.).

**आकाशमूलि–ली** स्त्री. वनस्पतींचा एक वर्ग. उदा. कुंभिका, पुन्नाग. (यांचे मूळ जमिनीत अधांतरी असते.); पाणवनस्पती.

**आकाशयान** न. विमान. [सं.]

**आकाशवल्ली– वेल** स्त्री. १. बांडगूळ; वृक्षरुहा; वृक्षावर वाढणारी वेल; २. शेर वगैरे झाडांवर वाढणारी व बारीकबारीक पिवळे तंतू असणारी वेल; सोनवेल; अमरवेल; अंतरवेल. [सं.]

**आकाशवहन** न. विमान. [सं.]

**आकाशवाणी** स्त्री. १. आकाशापासून निघणारा शब्द; अशरीरिणी वाणी; देववाणी : 'तुझें हें गाणें म्हणजे आकाशवाणीच मी समजतों.'– स्वयंवर. २. भारतसरकारचा ध्वनिक्षेपणविभाग: प्रादेशिक, राष्ट्रीय व जागतिक घडामोडी, महत्त्वाच्या देशीविदेशी घटना, कला–क्रीडा–साहित्य, राजकीय–सामाजिक स्थित्यंतरे

इत्यादींची माहिती सर्व जनतेस करून देण्याकरिता शासनाने स्थापन केलेले ध्वनिक्षेपण केंद्र; नभोवाणी. [सं.]

**आकाशवाद्य** न. नौबत.

**आकाशवास** पु. वृक्षादिकांवर राहणे; उंच राहणे.

**आकाशातला बाप** पु. ख्रिस्तीधर्मकल्पनेतील ईश्वर : 'त्याला होय! त्याला त्याचा बाप - आणि बाप नसला तर आकाशातला बाप आहेच' : - सुदे ५९.

**आकाशी** वि. १. आकाशासारखा निळा (रंग).

**आकाशी** स्त्री. रेडिओची तार (एरियल).

**आकाशीय** वि. आकाशाशी संबंधित; आकाशाविषयी, आकाशात असणारे, पाहाणारे, होणारे, फिरणारे. [सं.]

**आकास** पु. आकस; तेढ : 'त्यावरून वाचा व त्याचा आकास वाढला.' - पेद २०.१३५.

**आकांडतांडव** न. थयथयाट; पहा : **अकांडतांडव**

**आकांत** पु. १. रडून केलेला गोंधळ : 'ही मुले आकांत करतील.' - देशमुखवाडी १८. २. तीव्र किंवा असह्य उपद्रव : 'घरोघरीं आकांत परोपरी...' - वाग्वै ११८. [सं. आ+क्रन्द]

**आकांतणे** १. कोलाहल माजणे; अनर्थ होणे :' त्याचिया पापरहाटी । आकांतली सर्व सृष्टी।'-मुसभा ५.१४१. २. घाबरणे; बावरणे. (गो.) [सं.आकान्त]

**आकांक्षणीय** वि. वांछनीय, अपेक्षणीय, स्पृहणीय, इष्ट.

**आकांक्षणे** सक्रि. ईर्षा करणे; इच्छा करणे; वांछा करणे; अपेक्षा करणे : 'जाहला यालागीं जो कांहीं । आकांक्षी ना।' - ज्ञा १२.१९३.

**आकांक्षा** स्त्री. १. इच्छा; आशा; वांछा. २. गरज; अपेक्षा; मागणी; ३. एखादी गोष्ट व्हावी अशी तीव्र इच्छा; ४. तर्क; शंका; संशय. ५. आक्षेप; हरकत; उत्तरपक्ष. ६. तपास; शोध. ७. (भाषा.) वाक्याचा अर्थ सुसंगतपणे लागण्यासाठी वाक्यातील शब्दांचे परस्परावलंबित्व. [सं.]

**आकांक्षापूरण** न. १. प्रतिपाद्य विषयाची किंवा अर्थाची पूर्ती करण्याकरिता लागणारे गौण वाक्य किंवा शब्द पुरविणे. २. (सामान्यत:) उणीव, गरज भरून काढणे, भागविणे. ३. जरूरीच्या वस्तू मिळवणे किंवा मिळवून देणे. [सं.]

**आकांक्षी** वि. गरजू; इच्छा करणारा; इच्छुक. [सं.]

**आकीर्ण** वि. गजबजलेला; गर्द; भरलेला; दाटलेला; व्यापलेला; परिपूर्ण; व्याप्त. सामा. शब्द-जलाकीर्ण, मेघाकीर्ण, वृक्षाकीर्ण. [सं.]

**आकु** उद्गा. १. जवळ बोलावण्याचा शब्द (उदा. कुत्र्याला). (ना.) २. (ल.) कुत्रा.

**आकुडी** स्त्री. पुढे वाकडी असलेली काठी : 'एका हातात चिव्याची आंकुडी व दुसऱ्या हातात रवळी असा तिचा नित्याचा वेष असे.' - माजीया १९.

**आकुडे** न. आकडे; बाकदार टोक : 'तैसे आवाळुवांवरि आंकुडे। दीसति दाढां।।'- राज्ञा ११.३५८.

**आकुत** न. कपाळावर लावण्याचे गंध; अक्षत. (कु.)

**आकुतमा** स्त्री. तुळशीचा एक प्रकार : 'आकुतमा तुळशी, किती पानं फुळशी?' - जसा ७१८. [सं.]

**आकुती** स्त्री. अफूसारखा अंमली पदार्थ; पहा : **याकुती** [फा. याकुती]

**आकुर** पु. पावसाळ्याच्या आरंभी खाऱ्या नदीच्या, खाडीच्या काठांवर होणारी भाजी; वेलीचे अंकूर. (गो.) [सं.]

**आकुल** वि. १. घेरलेला; त्रस्त झालेला; पूर्ण व्यापलेला; गच्च; व्याकूळ : 'शोकाकुल रुदनातें। करीतु असे'- ज्ञा २.१. २. गोंधळलेला. ३. क्षुब्ध. ४. गुंतलेला. (केस, दोरा इ.) [सं.]

**आकुलित** वि. ग्रस्त; व्याप्त; व्याकुल; पहा : **आकुल** : 'शोकाकुलित अर्जुन।' -एभा १६.११७. [सं.]

**आकुली** स्त्री. अफूसारखा अमली पदार्थ; याकुली : 'माझ्या प्रीतिवर बिजली पडली। खाउनि निजते आकुली।' - सला ७१. [फा. याकुती]

**आकुल्यादियोग** पु. (वै.) अंकोलाच्या कळ्या, आवळकाठी व हळद यांचे प्रमेहनाशक चूर्ण.

**आकुळा** वि. स्वाधीन; ताब्यातला. [सं. आकुल]

**आकुळी** वि. ताब्यात ठेवलेली; स्वाधीन; स्वस्थ : 'परी जिव्हा न राहे आकुळी। हे हरिवंशीची बोली। म्हणोनि ते वर्णिली। दैत्यकुमारी।'- कथा १.२.४७.

**आकुंचणे** उक्रि. आखडणे; संकुचित करणे; संकोचणे; आकार कमी होणे; आकरसणे : 'आकुंचूनि अध। देऊनि तिन्ही संध।' -ज्ञा १८.१०३७. [सं. आ+कुंच्]

**आकुंचन** न. १. आखडणे; संकोचणे; आटणे; आकरसणे; अर्धवट मिटणे; थोडी जागा व्यापेल असे होणे; संकोच. २. आवळणे; घट्ट करणे; ओढून घेणे; आकुंचित करणे. ३. वाकणे; बाक येणे. ४. संक्षिप्त करणे; कमी करणे; पसारा, व्याप आवरणे. ५. जमा करणे; गोळा करणे. ६. मुरगळणे, पिळणे. ७. सैन्याच्या हालचालीचा एक प्रकार. [सं.]

**आकुंचित** वि. १. संकुचित झालेला; आखडलेला; वाकलेला; गोळा झालेला; आकरसलेला; कमी झालेला; मर्यादित. २. अडचणीचा; अप्रशस्त; लहान (जागा वगैरे). ३. गोळा केलेला.

**आकूड** वि. कुजट; कुबटलेले. (व.)

**आकूत** पु. आशय; भावार्थ; हेतु; इच्छा; अभिप्राय. [सं.]

**आकृत** वि. आक्रीत; विलक्षण.

**आकृति-ती** स्त्री. १. आकार; रूप; घाट. २. प्रतिमा; मूर्ती; चित्र. ३. शरीर; देह : '-जैसा देह पंचभूतीं। मिळोनी होय आकृती।'- गुच २१.४.३ ४. (ल.) मूर्ती; व्यक्ती; मनुष्य. ५. (ग.) रेषाचित्र; गणितातील विवेचन करताना त्यामधील सिद्धांतातील विषयीभूत अंगे जीत स्पष्टपणे दाखवलेली असतात तिला आकृती म्हणतात. ६. सर्व बाजूंनी मर्यादिलेली पातळी किंवा अवकाश. ७. एक छंद (दंडक वृत्तातील). ८. कलेच्या क्षेत्रात शैली, रचना किंवा बाह्याकार. [सं.]

**आकृतिकेंद्र** न. (ग.) ज्या बिंदूभोवती आकृती विस्ताराच्या अथवा आकाराच्या दृष्टीने समतोल असते असा बिंदू. [सं.]

**आकृतिबंध** पु. १. एखादी गोष्ट कशी आहे, कशी होईल किंवा असावी हे दाखविणारा साचा. आराखडा किंवा निश्चित पद्धत: 'नाटकांची रूपांतरें करण्याचा एक आकृतिबंध बनला.' - भास्मृग्रं११. २. (मानस.) एखाद्या वस्तूच्या रंगरूपादी गुणांसह त्या वस्तूच्या संपूर्ण आकृतीची मनाने केलेली कल्पना. पूर्व अज्ञानामुळे मनावर उमटलेला एखाद्या वस्तूचा ठसा. ३. एखाद्या संकल्पनेची विशिष्ट रचना किंवा बांधणी स्पष्ट करणारी आकृती. [सं.]

**आकृतिबंध क्रमवीक्षण** न. (भौ.) वस्तूंची पाहणी करून आकारमानाप्रमाणे त्याची वर्गवारी करणे.

**आकृतिमयता** स्त्री. आकृतीने युक्त असण्याची स्थिती : '..... संहती ही संदर्भ चौकट असल्याने तिचे स्वरूप हेच आकृतिमयतेस एक आवाहन असते.' - संसौ ३१.

**आकृतिलेख-लेखन** पु. चित्राची रूपरेषा (पेन्सिलने काढलेली.).

**आकृतिलेखक** पु. एखाद्या समपृष्ठाकृतीची, तेवढ्याच आकाराची, लहान किंवा मोठी नक्कल करण्याचे यंत्र.

**आकृष्ट** वि. १. ओढलेला; आखडलेला; खेचलेला; आकर्षित. २. आवड किंवा उत्सुकता निर्माण झालेला. ३. एखाद्या विषयाकडे मन वेधलेले आहे असा; लुब्ध, मोहित झालेला.[सं.] (वा.) **आकृष्ट होणे** – आकर्षित होणे; प्रेमात पडणे.

**आके** न. मासे धरण्याचे धनुष्याकृती जाळे. यास आटा लावलेला असतो : 'मासे मारण्यासाठी आकेदेखील दुरुस्त करून ठेवले.'- शेलूक ९२. (कु.)

**आके** स्त्री. नणंद. (गो.)

**आके-कै** स्त्री. १. निःशक्त स्त्री. २. तरुण असून म्हातारी दिसणारी स्त्री. (गो.)

**आकेकर (दृष्टी)** स्त्री. (नृत्य) डोळे व पापण्या आकुंचित करणे; दृष्टी अर्धवट मिटणे; झोपेतून जागे होणे. डोळे दिपणे वगैरे गोष्टींचा द्योतक अभिनय. [सं.]

**आकेत** स्त्री. अक्षता.

**आकोचणे** क्रि. मिटणे; आकुंचणे : 'कमळ आकोचें कोंडे भ्रमर।'- हरि ७.२१.

**आकोचन-ना** पहा : **आकुंचन**

**आकोडा** पु. १. छत्रीचा घोडा. आकडा २. कंदिलाची काच वर खाली करण्याचा आकडा. (ना.)

**आकोर** पु. अंकुर. (व.) [सं. अंकुर]

**आकोल** न. सोललेल्या चिंचेचा आकडा; चिंचेचे पोकळ टरफल. स्त्री. तंबाखूचा एक प्रकार. (अकोला गावावरून.)

**आकोंत** न शस्त्राचे तीक्ष्ण टोक : 'कीं ते येवढ्या निरयाचे आकोंत : आंगविले जेणें ।'- ऋव ३६. [सं. आ+कुंत = शस्त्र]

**आकोंत** पु. कोंडाळे; कोचाळे; घेरा; वेढा (शस्त्रास्त्रांचा): ' की येवढ्या निरयचि आकोंत। आंगविले जेणे ।'- ऋ ८.[सं. आ+ कुंन = शस्त्र].

**आक्का** स्त्री. १. पहा : **अक्का** २. कानशिलावर अर्धवर्तुळाकार गोंदलेली आकृती : 'तिच्या कानशिलावर गोंदलेल्या आक्का उठून दिसत होत्या.'- वारी ८.

**आक्काडा** पु. (विणकाम) फण्या बांधण्यासाठी फणीबंदांना लागणारा लाकडी साचा.

**आक्टं** न. प्रेतयात्रेत विस्तव घालून नेतात ते मडके : 'अओ, पन आक्टं कोन धरन?'- धग २१६.

**आक्टोपस** पु. समुद्रात सर्वत्र आढळणारा एक शीर्षपादी वर्गातील प्राणी. [इं.]

**आक्टोबर** पु. इंग्रजी वर्षाचा दहावा महिना. [इ.]

**आक्टोबर क्रांति-ती** (राज्य.) ७ नोव्हेंबरची रशियातील झालेली बोल्शेविक क्रांती (नव्या रशियन पंचांगाप्रमाणे).

**आक्या** पु. देवाच्या नावाने सोडलेला गोऱ्हा, पोळ, सांड, खोंड, कठाळ्या. (व.)

**आक्रम** पु. १. चढणे; वर जाणे. २. चढ; मागे टाकणे; पादाक्रांत करणे; व्यापणे; वर्चस्व; आधिक्य; ओलांडून जाणे; वरचढ; वरचष्मा. संचार; वारे; गर्व : ' एकासि जाणिवेचा आक्रम। एकाचे पोटीं भ्रम। महासिद्धींचा।'- एभा ३.३२६. ३. पराक्रम हल्ला; छापा. [सं.]

**आक्रमक** वि. आक्रमण, स्वारी करणारा; हल्ला करणारा.

**आक्रमकता** स्त्री. (मानस.) आक्रमण करण्याची वृत्ती; चाल करून जाण्याची, हल्ला करण्याची वृत्ती.

**आक्रमण** न. १. आक्रमण करणे; हल्ला; व्यापणे; वेढणे; ग्रासणे; स्वाधीन करून घेणे (देश, शास्त्र, विषय); वरून किंवा मधून जाणे; ओलांडणे. २. वर्चस्व स्थापणे; वरचढपणा करणे; मागे टाकणे; वर जाणे. ३. दुसऱ्याच्या मालकीच्या जागेत अनधिकाराने प्रवेश करणे किंवा घुसणे. ४. हल्ला करणे; काही आगळीक नसताना एखाद्या देशाने दुसऱ्या देशावर केलेला हल्ला; स्वारी. ५. एखादी क्षोभकारक कृती किंवा व्यवहार. [सं.]

**आक्रमणे** अक्रि. पादाक्रांत करणे; आक्रमण करणे; आक्रांत करणे; व्यापणे; वर्चस्व स्थापन करणे; ताब्यात घेणे; ओलांडणे : 'तरी आक्रमिला देख दुःखें । सांसारिकें।'-ज्ञा २.३५०.[सं. आक्रमण]

**आक्रमशक्ती** स्त्री १. आवाका; आवरशक्ती; आटोप; पराक्रम; 'लबाडी पचविण्याची आक्रमशक्ति नाही.'-गांगा १५५. २. पोच; समज; आकलनशक्ती.

**आक्रसणे** क्रि. आकरसणे : 'समईची ज्योत मंद व्हावी तसा तिचा जीव आक्रसत होता.'- रथचक्र २६९.

**आक्रस्ताळा-ळी-ळे** वि. कहारी; अतिशय संतापी : 'अशा आक्रस्ताळी बापाला शरण आणणारा बेटा...' - एल्गार ४३.

**आक्रस्ताळी(ळे)पणा** पु. कहारीपणा; हटवादीपणा; त्रागा; चिडखोरपणा : 'असा काही त्यांचा आक्रस्ताळीपणा मोठा विलक्षण होता.'- पलकोघे १६.

**आक्रंदणे** अक्रि. मोठ्याने ओरडणे; रडणे; टाहो फोडणे; आकांत करणे : 'बहुत जाचलों संसारें। मोहमाया जाळाच्या विखारें। त्रिगुण येताती लहरें। तेणें दुःखें थोर आक्रंदलों।'- तुगा ७०४.

**आक्रंदन** न. मोठ्याने रडणे; ओरडणे; हंबरडा फोडणे; रडारड; आरडाओरड; विलाप; शोक. [सं.]

**आक्रा** वि. छाप पाडणारा.

**आक्राळ** पु. मोठ्याने रडणे, ओरडणे. [सं. आ + कराल]

**आक्रांत** वि. १. आक्रमण केलेला; दडपलेला; व्याकूळ झालेला. उदा. शोकाक्रांत; पादाक्रांत इ. २. ओलांडलेला. ३. तुडविलेला. ४. कब्ज्यात घेतलेला. ५. जिंकलेला. ६. व्याप्त. [सं. आक्रम]

**आक्रांत** पु. मोठ्याने रडणे; हंबरडा फोडणे; विलाप करणे; आकांत. [सं. आक्रंदन]

**आक्रांतणे** अक्रि. १. व्याप्त होणे; खाली दबणे; २. भुकेने व्याकूळ होणे; वखवखणे. [सं. आक्रांत]

**आक्रांत फळ** न. (वनं.) अनेक कप्पे असलेले, मांसल पुष्पासनाने आणि संवर्ताने वेढलेले फळ. [सं.]

**आक्रीत** वि. १. अघटित; आश्चर्यकारक : 'आपल्या घरालाही चौकट अन् दरवाजा लावल्याचं बघून मला व माझ्या बहिणींना केवढी आक्रीत गोष्ट वाटायची?' –तअं १२. २. विलक्षण; विपरीत; असंभवनीय, जगावेगळे कृत्य : 'भगतनी, आइकलास तुज्या पोराचा आक्रीत?'– जैजै ९२. [सं.अकृत्य]

**आक्रे** वि. उठावदार; लक्षात भरण्यासारखे; आक्रमण करणारे. (व)

**आक्रोश** पु. १. मोठ्याने रडणे; हंबरडा फोडणे; विलाप करणे; आक्रंदन; आकांत; कल्लोळ; चरफड : 'बोळख तूं निरुतें। आक्रोशेंवीण जेथें। क्षमा असे।।'– ज्ञा १३.३४०. २. निंदा; बडबड; ओरड. ३. आवेश; अट्टाहास : 'तेवींचि आक्रोशबळें। व्यापारें कोणे एके वेळें। निगालें तरी आंधळें। रोषें जैसें।।'– ज्ञा १४.१८९.[सं.] ४. त्रास; कष्ट : 'आक्रोशेंविण जेथें। क्षमा आथि'– ज्ञा १३.३३९.

**आक्सांव** न. ग्रामसंस्थेचा किंवा एखाद्या कंपनीचा भाग (शेअर). (गो.) [पोर्तु.]

**आख** पु. १. डोळा : 'आखीं ल्याहीलीं काजळ।'– स्त्रीगीत ३०. २. डोळा आणि कान यांच्यामधील भाग; मर्मस्थान; गंडस्थल; कानशील : 'त्याच्या मानेवर व दोन्ही आखांवर मोठे फोड दिसले.'– सांज ३२. (वा.) **आख मोडणे**– डोकेदुखी बरी होण्यासाठी आखावर बिब्याच्या फुल्या घालणे. [सं. अक्षि]

**आख** पु. गाडीच्या दोन्ही चाकांतून बसविलेला लोखंडी जाड दांडा; कणा; आस. [सं. अक्ष]

**आख** पु. आकडा; संख्या : 'सरलेयां लेख। जैसे आख हों एक।'–ज्ञा १३.९३८. [सं. अंक]

**आख** पु. शेताचा विभाग. (गो.)

**आख** न. वर्ण्याच्या शेंगा भाजण्याचे कुपट–आगटी.(कों.) [सं.अग्नि]

**आख** पु. गाय, म्हैस इ. जनावरांचा फरा; पुठ्ठा.

**आखजी** पहा : **अक्षयतृतीया** : 'अखजीचा अखजीचा : मोलाचा सन देखा जी ।।' – बगाणी ५१.

**आखटणे** अक्रि. १. धस, खोचाटा किंवा कोच लागून फाटणे. (कों) २. खिळ्याला, लाकडाच्या धसाला किंवा कोणत्याही अणकुचीदार पदार्थाला अडकून वस्त्र फाटणे. ३. रेषा ओढणे.

**आखटे** वि. वाईट; ओखटे; वोखटे. (गो.)

**आखडणे** क्रि. पाहा : **आखटणे**. १. आकसणे; आक्रसणे; कमी होणे; संकोच पावणे. २. ओढून धरणे; संकोचित करणे; आखूड करणे; आवरून धरणे. (दोर, वस्त्र, जनावर इ.). ३. थांबणे; बंद होणे. ४. गर्वाने ताठणे; रागाने रुसून फुरगटून बसणे. ५. थंडीमुळे स्नायू, शरीराचे अवयव इत्यादींना हालचाल करता न येणे; हातपाय मागे घेणे. [सं. आ +कृष्]

**आखडता हात** पु. कमी उत्साह; कमी प्रमाण; काटकसर.

**आखडवी** वि. स्त्री. आखूड : 'आखडवी वेणी' – इप्र.२१२.

**आखडा–खाडा** पु. १. बेड्याचे दुबळके; कुंपणातील अरुंद वाट. २. अडसर; बेडे; लहान कवाड. ३. पहा : **आकडी ५**. (कों. गो.)

**आखडी** क्रिवि. मागे. (गो.) [सं. आ + कृष्ट]

**आखडू** वि. गर्विष्ठ.

**आखण** पु. घराचे, वाड्याचे दालन : 'काही बेगमा, दासी त्या आखणात झोपल्या होत्या.' – श्रीयो ३४६.

**आखण–णी–णे** पहा : **आकण**

**आखणी** स्त्री. आखण्याची पट्टी; रेषा मारण्यासाठी वापरण्यात येणारा सरळ गोल दांडा; रूळ.

**आखणे** अक्रि. १. विहीर, तळे वगैरे खणण्याकरिता पाण्याची जागा ठरवणे; योजना करणे. २. रेखाटणे; आकृती काढणे. ३. तर्क करणे; अनुमान बांधणे. [सं. अंकन]

**आखणे** सक्रि. तयारी करणे; एखादी गोष्ट कशी करायची याची आखणी करणे, ठरविणे : 'मी माझा पहिला स्वदेशी दौराही आखला.' – माजीया १९१. [सं. अङ्क]

**आखणे** सक्रि. म्हणणे; सांगणे : 'एहंकी आखताहा ।'= 'असे म्हणतात.' – भिल्ली भाषेतील गोष्टी ३०. [सं. आ + ख्या]

**आखत** वि. पूर्ण; संबंध.

**आखत** स्त्री. दृष्टि; डोळे [सं. अक्षन्]

**आखत, आखता** स्त्री. १. अक्षता; तांदूळ : 'इअेते ओवाळोनि आखतां।'– शिव ८१७. २. अक्षतापूर्वक निमंत्रण : 'आणिखी उनीयांची आखत लाविली.' –लीचपू. ४१५. [सं. अक्षत]

**आखतकवडी** स्त्री. ओवाळून दिलेले द्रव्य : 'आखतकवडी घेऊनि असैन जी'– लीचउ ४०.

**आखतदाम** पु. पहा : **आखतवाडी** : 'एकादशी परडीएचे वाण... आखतदामु गुरवा दीजे'– पैठण शिला १.८

**आखतीज** स्त्री. अक्षयतृतीयेचा उत्सव : 'एहीं गोसावीयांचां ठाइं आखतीज केली'– लीचउ १५१.

**आखबंद** वि. सबंध; संपूर्ण. 'वतनाचे आखबंद उत्पन्न त्यांनाच मिळायचे.' – भुज ११२. [सं. अंक + बद्ध]

**आखबंद डोक्याचा** वि. हिकमती; तरबेज; हुशार; हिशेबी : आखबंद डोक्याचा मनुष्य.' – भावं ६.

**आखर** पु. १. आकर; दबाव; वजन; शह; सामर्थ्याची जाणीव : 'आखर पडल्यावर सर्वही प्रांत स्वामीचा आज्ञांकित आहे.'– पेद २४.११४.

**आखर** पु. स्त्री. १. गावाला लागून असलेले शेत; गुरे चरून निवान्त

बसतात ती शेतातली, रानातली सावलीची जागा; गोठण; गावाची सीमा, हद्द : 'वोढाळाच्या खुरीं। आखरू आतें बुरी।' - ज्ञा १३.५५९.९ २. तात्पुरती वसतीची जागा : 'गोसावीयाचा आखरी गोसावीयांसि नेभटता कैसी जाउं'- लीचपू १९१.

क्रिवि. समाप्त : 'स्वामींनीं सरदारास उत्तर लिहिले तो दिवस आखर आला.' - पेद ९.९. [फा.आखीर] (वा.) **आखर होणे**- मरणे : 'सखारामपंत बापू व चिंतोपंत ज्या किल्ल्यांत ठेविले होते तेथें ते आखर जाले.'- पुअभा २.११.

**आखर** न. अक्षर; अकारादी प्रत्येक वर्ण; लेखनचिन्ह : 'लिहुनि ऋद्धिपुरीचेणि आखरें। चरणु लिपी।'- ऋ १३.[सं. अक्षर]

**आखर चौघडा** पु. तळ सोडण्याची सूचना देणारा अखेरचा चौघडा : 'आमचे मरणाचे सोबती व्हावयाचे असल्यास चौघडा आखर झाल्यावर अमुक जागा घोडे न घेता पादचारी, ढालतलवारीनिशी त्या ठिकाणी हजर व्हावे.'- होकै १२.

**आखरनखर** क्रिवि. पहा : **अखरनखर, अखीरनखीर**

**आखरनखर पेटी** स्त्री. गाडीचा आसकणा बसवण्याची लाकडी खोबण. (खा.)

**आखरपख** पहा : **अखरपाख**

**आखरपाख** पु. पितृपक्ष. (खा.) [सं. अक्षर + पक्ष]

**आखरलवाजमा** पु. उत्तरक्रिया; उत्तरकार्य : 'हरिपंत फडक्याचा इंतकाल (मृत्यु) जाला. मशारनिलेचे पुत्रानी हरिपंत मुतवफाचा आखरलवाजमा सिधटेकी केला' - पुअभा ३.१९१.

**आखरी** पहा : **अखेरी**

**आखरी दूध** न. पाणी न घातलेले दूध; कोरे दूध.(माण.).

**आखरेख** स्त्री. देखरेख; राखण; बंदोबस्त.

**आखरेखणे** सक्रि. १. तरतूद करणे; सांभाळणे, २. बंदोबस्त करणे; गडगा, कुंपण वगैरे घालून आटोक्यात ठेवणे, आणणे; आटोपणे.

**आखला** पु. पोळ; सांड; न बडवलेला बैल; वळू. [गुज.]

**आखली** स्त्री. आंबे वगैरे झाडावरून काढण्याचा घळ; झेला; आखी; गांजिवा; आकडी. (कु.)

**आखश** पु. आकस, वैर, द्वैतभाव : 'अथवा आत्ताही बिगाडास जातो तर तुम्हास साफ सांगतो. भय काय आहे? आखश गोस्ट झाकत नाही. परंतु माझे चित्तांत हे गोस्टच नाही. मग चिंता काय? - पेद १०.२९.

**आखळ** पु. पाऊस नसलेला दिवस; खळ असलेला (पावसाचा) दिवस. [सं. आ + स्खलन]

**आखळणे** अक्रि. आकसणे, आटणे, आवळणे : 'कासेचा सुटलेला झोळ आखळून पूर्ववत झाला.'- काआ ७९.

**आखळी** स्त्री. दुष्टपणा.

**आखंडल** पु. इंद्र. [सं.]

**आखंडा** पु. जुवाच्या दोन्ही बाजूंना असलेल्या उभ्या दांडक्या : 'बैलाचे खूर नि आखंड्याला अडकून वाजणारी त्यांची शिंगे तिने ओळखली.' - गुंजा १३३.

**आखंदुळणे** सक्रि. हासडणे; हालवणे; ढवळणे; तांदूळ धुताना, भाजी फोडणीस घातल्यावर भांड्यात खालीवर करणे.

**आखा** पु, गोंधळ; पूर्ण फजिती : 'तिचा अगदी आखा उडाला.'- वसंत सेना २४.३.

**आखा** पु. नारळ, कलिंगडे इत्यादी ठेवण्यासाठी काथ्याची विणून केलेली जाळी; आखली; गांजवा.

**आखाड** पु. आषाढ : हें नेणवे जेविं उमळली। आखाडअभ्रें ।।' - ज्ञा १५.१२ [सं. आषाढ]

**आखाडखाना** पु. १. शस्त्रागार; हत्यारे ठेवण्याची जागा : 'गेला आखाडखान्यामधी । पायीं तुमानीं...वाघनखे चढविली ।' - ऐपो ५७. २. तालीमखाना.

**आखाडझड** स्त्री. १. आषाढ महिन्यातील एकसारखी लागून राहणारी पावसाची झड; संततधार. २. कंटाळवाणे भाषण.

**आखाडणे** अक्रि. ऐट करणे; अकडबाजी करणे.

**आखाडदवणा** पु. दवणा किडा (हा फक्त आषाढ महिन्यातच आढळतो).

**आखाड पागोळी** स्त्री. आषाढ महिन्यात घराच्या वळचणीतून पडणारे पाणी. हे पाणी नवीन लग्न झालेल्या मुलीने आपल्या सासरी पाहू नये. हे पाहिले असता ते सासूला वाईट असते असा समज आहे. म्हणून आषाढात नव्या नवरीला माहेरी धाडतात.

**आखाडपाटी** स्त्री. लग्न झाल्यानंतर येणाऱ्या पहिल्या आषाढ महिन्यातील वद्य पक्षात वधूकडून वराकडे फळफळावळ, मेवामिठाई व विटीदांडू, लगोरी, चेंडू, भोवरा, सोंगट्या, बुद्धिबळे, कलमदान, गंजिफा वगैरे खेळण्याचे सामान व पोशाख वगैरे पाठवत असत. या सर्व संचाला आखाडपाटी म्हणतात.

**आखाडपाळी** स्त्री. आषाढ महिन्यात शेतात द्यायची कुळवाची पाळी; औतपाळी.

**आखाडभूती** पु. १. सोदा, लुच्चा, लबाड मनुष्य : 'आखाडभूती ऐसा जाण। गुरुपाशील न्यावया धन। उपदेश घेउनि दीन। तो दांभिक जाण शठशिष्य।' - एभा २३.२३६. २. ठक; ढोंग. ३. लफंगेगिरी; लबाडी; लुच्चेगिरी. ४. खोटा सोवळेपणा.

**आखाडलाणी-लाहणी** स्त्री. आषाढ महिन्यातील मेंढ्यांच्या केसांची कापणी, कातरणी, भादरणी.

**आखाडसासरा** पु. १. आषाढातील सासरा. लग्न झाल्यावर प्रथम येणाऱ्या आषाढात नवरीने सासऱ्याचे किंवा सासूचे तोंड पाहायचे नसते. म्हणून तिला दुसरीकडे पाठवतात. तेथील कर्ता पुरुष तिच्यावर सासऱ्यासारखा अधिकार गाजवतो. २. (ल.) दुसऱ्यावर करडा अंमल चालवणारा मनुष्य; नसता मोठेपणा स्वतःकडे घेऊन दुसऱ्यावर हुकमत गाजवणारी व्यक्ती.

**आखाडसासू** स्त्री. १. आषाढ महिन्यात सासूचे तोंड पाहायचे नसल्याने नव्या नवरीला ज्यांच्याकडे राहायला पाठवतात तेथील वर्चस्व गाजवणारी स्त्री; आषाढातील सासू. २. (ल.) कडकपणे वागणारी स्त्री.

**आखाडा** पु. गुरे वगैरे आत शिरू नयेत म्हणून कुंपणाला खिंडीसारखी

केलेली अडचणीची वाट; आखाडो. (को.) (गो.)

**आखाडा** पु. १. तालीमखाना. (वा.) **आखाड्यात उतरणे–** १. कुस्तीस, लढाईस तयार होणे. २. (ल.) वादविवादास, प्रतिकारास सिद्ध होणे. ३. एखाद्या विशिष्ट कार्याकरिता किंवा अभ्यासाकरिता एकत्र येणाऱ्या लोकांची राहण्याची किंवा जमण्याची जागा. ४. गोसाव्याचे मठ, संप्रदाय. ५. अड्डा. ६. पालखीचा दांडा.

**आखाडी** वि. आखाड (आषाढ) महिन्यासंबंधी.
स्त्री. १. आषाढी पौर्णिमा. २. आषाढ महिन्यातील पावसाची एकसारखी झड (क्रि. बसणे, लागणे). ३. आषाढातील पावसाळा. ४. आषाढात पाऊस न पडल्यामुळे पिके न आल्यामुळे पडणारा दुष्काळ. ५. (ल.) कोणत्याही वस्तूची उणीव, टंचाई, चणचण; दुष्काळ; अभाव. ६. आषाढातील शुद्ध एकादशी. या दिवशी पंढरपूरची यात्रा भरते : 'आखाडी कार्तिकी भक्तजन येती।'– आरती विठोबाची. ७. या महिन्यात गुरांना होणारा रोग. [सं. आषाढ]

**आखात** न. १. जमिनीत घुसलेला समुद्राचा भाग. २. स्वाभाविक बनलेले तळे; सरोवर : 'असती बहु अखातही त्यांमाजी पूर्ण जीं जलें अमलें।'– कुअक ७७.

**आखान** पु. खणण्याचे हत्यार; कुदळ. [सं. खन्]

**आखामसाला** पु. मसाल्याच्या जिनसा न वाटता फडक्यात बांधून अथवा सबंध तसाच भाजी शिजताना टाकतात असा मसाला. खडामसाला.

**आखाळी** स्त्री. चहाडी : 'आखाळ्या लई करायची'– उपरा ७०.

**आखाळे** न. आख; डोळा आणि कान यांच्यामधील मर्मस्थान: 'कानांजवळ, आखाळ्यांना आणि पायाला घोट्याजवळ डाव दिले गेले.' – बलुतं ६६.

**आखांडो** पु. आंगठा. (गो.)

**आखिन** वि. आणखी.

**आखिर** क्रिवि. शेवटचा. [फा.]

**आखिरविखिर** वि. अस्ताव्यस्त विखुरलेला; इतस्ततः पडलेला; विस्कटलेला.

**आखिरी** पहा : **अखेरी**

**आखिवाणी** पु. औक्षण : 'भेदिपौचे आखिवाणिअत्रे सानुनुगु' – अंबेशिला १.४६.

**आखी** स्त्री. आंबे इत्यादी उतरून काढण्याकरिता काठीच्या शेवटास बांधावयाची जाळी वगैरे. झेला; घळ; पहा : **आखली**

**आखीरश** त्याच्या अंती, अखेर.

**आखीव** वि. रेघा मारलेला (कागद); नीट आखणी केलेला; रचलेला; रेखीव; व्यवस्थित : 'कामगार लोकांची आखीव वस्ती होती.' – व्यंमाक २७१.

**आखु** पु. आस; कणा : 'आखु छेदलिया पडिपाडें। रथ न चाले असताहि घोडे।'– एभा १२.२२६. [सं. अक्ष]

**आखु** पु. १. उंदीर २. कुत्रे. (बे.) [सं.]

**आखुकर्णी–पर्णी–पुष्पी** वि. उंदीरकानी – एक वनस्पती. हिचे फूल व पान उंदराच्या कानासारखे असते.

**आखुडणे** क्रि. १. लहान होणे, करणे; संकोच पावणे; खुरटणे; आकसणे. २. अक्रि. थांबणे; ओढणे; हात धरणे. ३. वर घेणे; सावरणे; आखडते घेणे : 'गोसावी श्रीकरू आखुडिला'– लीचपू ५. ४. मागे खेचणे. [सं. आ+कृष्]

**आखुडपासोळ्या** वि. कमी ऐपतीचा मनुष्य; दरिद्री.

**आखुडवटी** स्त्री. (रहाट) कनेकड (रहाटगाडग्याचा आस) विहिरीवर ज्या लाकडावर फिरत असते ते लाकूड. (कों.)

**आखुडवण** न. विहिरीच्या पाण्याची पातळी बदलेल तशी रहाटीची माळ, दोरी कमीजास्त लांब करता यावी म्हणून ती ज्या दोरीने दुमडून बांधून ठेवतात ती दोरी. (कों.)

**आखु (खू) डवत** न. केळफुलाच्या जवळचे लहानसे केळीचे पान.(कों.)

**आखुडी** क्रिवि. मागे : 'चुलीचा उबाळा आखुडी हो' –जिच ४.५४.

**आखुणे** सक्रि. म्हणणे; बोलणे. पहा : **आखणे** (भि. कात.).

**आखुपर्णी** पहा : **आखुकर्णी**

**आखूड** वि. कमी लांबीचे, आंकुचन पावलेले; तोटके.

**आखूड पासोडीचा** दरिद्री; कमी पैसे असलेला.

**आखूडमाळ** विहिरीचे पाणी जसजसे खाली जाईल तसतशी रहाटगाडग्याची माळ लांबवता यावी म्हणून मधूनमधून खापेकडांच्या तीन किंवा दोन जुळ्याइतकी आखडून बांधून ठेवतात ती माळ. रहाटासाठी दुमडलेली दोरी. (आखूडवण) (कों.)

**आखूडशिंगी** वि. लहान शिंगाची (गाय इ.).

**आखूत** पहा : **अक्रोड**

**आखूर** वि. अधिक. (खा.)

**आखे** १. पखाल, गोणी, पडशी इ.चा अर्धा भाग. २. तेल, तूप इ.साठविण्याचा कातड्याचा बुधला.

**आखेट** पु. १. शिकार. २. भीती.

**आखेती** पहा : **अक्षय्यतृतीया**

**आखेती** स्त्री. मंतरलेल्या किंवा ओवाळून टाकलेल्या अक्षता : 'पूर्णिविचे चांदिने । आखेतीवीण जाने' – शिव ८१७.

**आखेरतोपी** वि. अक्षरी; अक्षरात : 'रौक्य टाके १४ आखेरतोपी टांके चौदा'– मठ शिला १.५

**आखेलेखे** क्रिवि. आकडे मांडून, लिहून; स्पष्टपणे; अंकीलेखी : 'तो ज्ञानाचें तत्त्व न देखे। हें सांगावें आखेंलेखें। न लगे तुज।' –ज्ञा १३.८४७. [सं. अंक + लेख]

**आखेवाण** न. अक्षयवाण : 'त्याले देखोनि एरी घरिचीया। आखेवाणेंसी (अक्षयवाण) वोवाळीति।।' –लीच ४.२४.

**आखोआख** क्रिवि. चिठ्ठीवर लिहिलेल्या किंमतीच्या अनुक्रमाने; मूळ किंमतीने. [सं. अंक]

**आखोटा** पु. गलबताचे वार्षिक भाडे. (भाड्याने गलबत वाहावयास दिले म्हणजे त्याच्यापासून भाडे घेतात ते). याच्या उलट गलबतातून एखादा जिन्नस नेण्याबद्दल भाडे देतात त्यास नोर म्हणतात. (राजा.)

**आखोमाखो** पु. लहान मुलांचा एक खेळ. (गो.)

**आखोळ** पहा : **आखळ**

**आख्य** वि. नावाचा; नाव धारण करणारा. उदा. रामाख्य [सं.]

**आख्यवानी** स्त्री. आयुष्यवृद्ध्यर्थ, आयुष्य वाढण्यासाठी ओवाळणे : 'आख्यवानी करिती विद्याधरा नारी' -दृपा ६८.

**आख्या** स्त्री. १. कीर्ती; ख्याती; प्रसिद्धी : 'मोठ्या आख्येच्या रूपवती स्त्रियासुद्धां' -व्हेव्या ११. २. लोकापवाद; जनवार्ता; गप्प; खोटी बातमी; थाप; कंडी. ३. अभिधान; पदवी; नाव. ४. कथा; आख्यायिका; हकीकत; बोलबाला : 'त्यांच्या पंचांगाची सर्वत्र आख्या आहे.' - निअ ३०४. ५. नावाचे : 'सच्चिदानंद आख्या। पदत्रयाची कीजैल संख्या' - विवेक १७.१ [सं. आ+ख्या]

**आख्यात** वि. सांगितलेले, प्रसिद्धीस आलेले; बोलबाला झालेले; कळलेले.

न. (व्याक.) धातूला प्रत्यय लागून क्रियापदाची रूपे बनतात. जसे : बस-तो, बस-ला, बस+ईस, बस-ता वगैरे. ही रूपे म्हणजेच क्रियापदांची विविध काळ व अर्थ यांची रूपे. यांनाच 'आख्यात' असे म्हणतात. मराठी व्याकरणात 'आख्यात' या शब्दाऐवजी 'काळ व अर्थ' हे शब्द वापरले जातात.

**आख्याति-ती** पहा : **ख्याती** : 'आख्याति अन्यथा ख्याति। शून्यख्याति सत्ख्याति।' - एभा १६.२०७. [सं.]

**आख्यान** न. १. गोष्ट; चरित्रकथा; भारतादी पुराण-इतिहास-कथन; कहाणी; दृष्टांत : 'पुराणें अख्यानरूपें जगीं।भारता आलीं।' - ज्ञा १.४६. २. कीर्तनामध्ये पूर्वरंगातील तत्त्वज्ञानविषयक सिद्धांत, निरूपण इत्यादींवर मुद्दा स्पष्ट करण्यासाठी पुराणातल्या एखाद्या विशिष्ट गोष्टीचा आधार घेणे. ३. (ल.) एखाद्या विषयावर दुसऱ्याला कंटाळा येईल इतके बोलणे; रडगाणे गाणे; लांबलचक कंटाळवाणी गोष्ट सांगणे.

**आख्यानक** वि. १.आख्यानावर आधारलेली (मराठी कवीची रचना) : 'मराठी आख्यानक कवितेची परंपरा १३ व्या शतकापासून १८ व्या शतकापर्यंत आढळते. -हआप्रस्ता१. २. अद्भुत, वास्तवतेशी संबंध नसलेली मध्ययुगीन (कथा-काव्य). ३. अद्भुत, पौराणिक, कथावस्तू असलेले. [सं.]

**आख्यायिका** स्त्री. १. दंतकथा; कल्पित कथा; ऐकीव गोष्ट. २. इतिहास, पुराण वगैरेतून परंपरेने आलेली गोष्ट. ३. (सामान्यत:) गोष्ट; कथा; आख्यान. [सं.]

**आग** पु. अपराध; 'त्यजिले खळ सुत कविनीं पाहुनि सत्संग्रहांत अत्याग।' - मोसभा ४.१६. [सं. आगस्]

**आग** स्त्री. १. विस्तव; अग्नी; विस्तवाचा भडका; ज्वाला. २. भाजणे; पोळणे; काहील होणे; दाह होणे. ३. (ल.) राग; क्रोध; संताप. ४. ताप; ज्वर (येणे). ५. दारूगोळ्याचा-तोफेचा भडिमार; ६. आवेश; ताव; तडफ; फाजील उत्कंठा : 'सत्कारूनि म्हणें जी यावें सद्भाषणें न आग मनीं।' - मोवन ४.५४. ७. (ल.) तोफखाना; तोफ : 'मन्सूरअली याजपाशीं आग भारी म्हणून भडभुंजे अभिधान होतें' - भाब २७. ८. रक्षा; अस्थी : 'नारोपंताचा मुडदा घेऊन आळंदीस येऊन, आपण दहन केले. दुसरे दिवशी वडकीहून जाऊन आग गोला करून लोहोगडास आलो. तेथून राजगडाजवळ हस्तीस मंत्रआग्न दिल्हा.' - पुरंद ३.१३९. [सं. अग्नि] (वा.) **आग असणे** – एखाद्या गोष्टीची फार उत्कंठा असणे; तीव्र इच्छा असणे. **आग उठणे, पडणे** - अतिशय भूक लागणे. **आग ओतणे** – १. आग पाखडणे; संकट आणणे : 'अन्यायानें लोकांवर आग ओतली गेली आहे.' -विक्षिप्त १.२०. २. कडक शब्दात संताप व्यक्त करणे किंवा टीका करणे. **आग घालणे** – आग लावणे : 'निजामल्लीनें पुण्यास वेढा देऊन आग घातली.' - विवि (१८७६) ७.६.१०९. **आग झाडणे, पाखडणे** – एखाद्यावर अतिशय दोषारोप करणे. शिव्यांचा वर्षाव करणे; निंदा करणे; कठोरपणे बोलणे; रागे भरणे. **आग मारणे** – (यंअ.) कोळसा घालणे : 'बॉयलरांत आग मारतेवेळीं' - एंजिनिअरिंगची तोंडी परीक्षा (वावीकर) १२. **आग रिघणे** - सती जाणे : 'कानजी नाईकासारखा भाऊ जिवानसी गेला. बाइको त्याची आग रिघत होती. तीस रिघो देत नाही; यैसा अनर्थ घडला आहे.' - पेद २३.१२८. **आग लागणे** – १. धान्य, वस्त्र इ. महाग होणे. २. (लागो) नाश होवो! जळो! मरो! इ. उद्‌गार : 'आग लागो या राजकारणाला!' - तोबं १९. ३. घर, वस्तूंचा साठा इ. पेटू लागणे. **आग लावणे** – १. दुही माजवणे; भांडण उपस्थित करणे; कलागत लावणे : 'या कारटीनें आग लावून दिली असेल. ही मोठी चोमडी आहे असे आजोबांच्या तोंडचे शब्द माझ्या कानीं पडले.' - पकोघे. **आग वरसणे** – धान्यांची, फळांची, गुळाची, तुपाची, लाडवांची आग वरसणे म्हणजे ते ते जिन्नस पुरून उरण्याइतके भरपूर होणे. **आग होणे** – १. शरीराला भाजल्या सारख्या वेदना होणे. २. अतिशय संताप होणे. **आगीत उडी घेणे, घालणे, टाकणे** –धोक्याच्या धंद्यात, उद्योगात, कामात, धाडसाने शिरणे किंवा हात घालणे; अतिशय मोठे धाडसाचे कृत्य करणे. **आगीत तावून काढणे** – पक्क्या कसोटीस उतरविणे. **आगीत तेल ओतणे, घालणे** – भांडण चालले असता ते आणखी चिडीस नेणे : 'दीप्तालय विझवाया दाटुनि घालील कोण तेलातें'- मोउद्योग ४.९. **आगीतून निघून फोफाट्यात जाणे, पडणे** – एका संकटातून निघून दुसऱ्या संकटात पडणे. **आगीस पडणे** – धडपडणे; हावरेपणाने, अधाशीपणाने काम करणे. (व.) **आगीदुगीत नसणे** – (कोणाच्या) अध्यामध्यात नसणे; संबंध न ठेवणे. **तळव्याची आग मस्तकात जाणे** – अतिशय राग येणे : 'तळव्याची चढली आग। मस्तकास जाउनि भिडली।' - संगी ५८.

**आगकाडी** स्त्री. विस्तव पेटविण्याची काडी; हिच्या एका टोकास ज्वालाग्राही द्रव्य लावलेले असते व हे टोक विशिष्ट (ज्वालाग्राही) पदार्थ लावलेल्या पृष्ठभागावर घासले असता पेट घेते.

**आगखाडा** पु. अग्नी पेटवण्याकरता केलेला खाडा, खड्डा; शेकोटी; आगटी.

**आगगाडी** स्त्री. लोहमार्गावरून वाफेच्या इंजिनाच्या साहाय्याने चालणारी गाडी; हिंदुस्थानात आगगाडी १८५४ साली मुंबई ते ठाणे येथे प्रथम चालू झाली.

**आगजदिवा** पहा : **आकाशदिवा**

**आगज(स)पाळणा** पु. जत्रा, यात्रा वगैरे ठिकाणी असणारे फिरते पाळणे किंवा झाडास दोऱ्या बांधून केलेले झोपाळे. [आकाश+पाळणा]

**आगजाळ** वि. आगीसारखा; ज्वाळेसारखा; तापट; जहाल; कडक; तापदायक : 'पण अशी आगजाळ पोरगी....' – जैजै २१.

**आगजाळी–ळ्या** वि. १. आग लावणारा; खोडसाळ; उपद्व्यापी. २. रागीट; तामसी; जहाल. ३. दंश ठेवणारा; दुष्ट. ४. भांडखोर; त्रागा करणारा, खोडसाळ (पुरुष, स्त्री) : 'बाई येथें नाहीं माझ्या बऱ्यावर कोणी। आगजाळ्या रांडा जळती मला पाहुनि।' – होला ७९. ५. ओंगळ; वाईट; घाणेरडे (माणूस अथवा कृत्य).

**आगट** पु. चर; पाट; खोदलेला मार्ग : 'जुन्या आगटांतील गाळ वेळेवर न काढणे हे सध्याच्या टंचाईचे एक प्रमुख कारण विशद केले.' – ज्ञाप्र ७.४.४२.

**आगटा–टी–टे** पु. १. खळग्यात काटक्या, गवत इ. पेटवून तयार केलेला विस्तव; शेगडीत घातेलेले इंधन किंवा निखारे; शेकोटी; धुणी; परसा : 'पाहे पां कामिकांच्या पोटीं। सदा क्रोधाची आगटी।' – एभा १७.२२४. २. सोनाराची शेगडी, कुंडी; बागेसरी ३. होमकुंड. (गो.) ४. थोडीशी आग : 'त्यांनी पेटविलेल्या आगट्यांच्या लाल पिवळ्या ज्वाळा.' – सारा २२९. [क. अग्गिष्टिगे; सं. अग्निइष्टिका.] (वा.) **आगटा पेटविणे** – भांडण, तंटा, कलह, कलागत लावणे – कलह माजविणे. **आगटा विझवून टाकणे** – १. आग विझविणे. २. (ल.) एखाद्या कुटुंबाचा समूळ नाश, नायनाट करणे.

**आगटे** न. स्मशानात प्रेत नेताना ज्या मडक्यात विस्तव नेतात ते : 'कुणी तरी पुढं येऊन आगटं उचलायचा.' – अगतिका २२८. (व.) [सं. अग्नि]

**आगड** पु. १. आड; बांधीव विहीर. २. खंदक; खाच; लव. ३. तट. [सं. आगर्त]

**आगड** वि. अगाध; अतिशय : 'आगड उदाक' = अगाधजल. (गो.) [सं. अगाध]

**आगडणे** सक्रि. नाहीसे होणे; हरवणे. (गो.)

**आगडब्बी** स्त्री. काड्याची पेटी; आगपेटी. (ना.)

**आगडा** अ. बळजबरीने.

**आगडोंब** पु. १. आगीचा भडका. २. (ल.) मोठे संकट; अतिशय त्रास : 'पोटात भुकेनं आगडोंब उसळलेला असे.' – तूमांतूमो ३६.

**आगड्याचे बगडे** न. लहान मूल : 'आगड्याचें बगडें म्हणाल झणीं.' – दावि ४०९.

**आगणन** न. अंदाज करणे.

**आगत** वि. आलेला; प्राप्त झालेला; पोचलेला; दाखल झालेला.[सं.]

**आगत** क्रिवि. अगत्य : 'असल आगत तर येईल गागत' – एहोरा १०.

**आगतस्वागत** न. आलेल्या अतिथीचे आदरातिथ्य; पाहुणचार; पाहुणेर; आदरसत्कार. [सं.]

**आगती** स्त्री. १.येणे : 'भूतांची आगती निर्गती स्वयें जाणें।' एभा १५.८९. २. विवाहार्थ वराच्या घरी येणारी वधू; वधूने वराच्या गावी येण्याचा समारंभ.

**आगते निगते करणे** जुने नवे करणे. उदा. जुनी झाडे काढून नवी लावणे : 'सुपारीचें उत्पन्न आगतें निगतें करणें व खत देणें यावर अवलंबून असते.' – ज्ञाको ११.१९७. [सं. आ+गत]

**आगदा** स्त्री. दिवाळीत धान्यरूपाने व द्रव्यरूपाने द्यावयाची देणगी. (व.)

**आगदावणा** वि. आक्रस्ताळ्या. (व.)

**आगधाड** स्त्री. १. वणवा; आगीचा डोंबाळा. २. (ल.) अतिशय भूक लागणे. ३. जुलमी, त्रासदायक, खोडसाळ मनुष्य किंवा पोर, जनावर; तापदायक व्यक्ती. ४. अति दुःख, मोठे संकट, त्रास; आपत्ती.

**आगप – आगपे** वि. लवकर तयार होणारे पीक.

**आगपरमे** पु. गर्मी; परमा; मूत्रद्वारासंबंधीचा विकार; लघवी करताना आग होणे.

**आगपाई** स्त्री. १.आगपपणा; उतावळेपणा; धडपड; एखादी गोष्ट अगोदर करण्याची घाई. (को.). २. होरा वर्तवणे; भविष्य सांगणे; हेरणे. (वा.) **आगपाई करणे, साधणे** – अव्वल साधणे; आघाडी मारणे.

**आगपाखड** स्त्री. टीकेचा वर्षाव; कडक टीका; संतापून लिहिणे : 'विभाजनाचा कट रचला अशी आगपाखड या दैनिकांत करण्यात आली.' – अबिवा २०७.

**आगपाणी** न. १. नायट्रिक ॲसिड; नत्राम्ल. २. मद्य करण्याच्या उपयोगी पडणारा पदार्थ. ३. सल्फ्युरिक ॲसिड; गंधकाम्ल. (वा.) **आगपाणी एक करणे** – खवळणे; अतिशय संतापणे; रागाने चवताळणे; जोराने बोलणें; आदळआपट, शिवीगाळ, मारचोप वगैरे धिंगाणा करणे.

**आगपेटी** स्त्री. आगकाड्या असलेली पेटी; काडेपेटी.

**आगपेण–पैण** स्त्री. उष्णतेमुळे अंगावर येणारे देवीच्या फोडापेक्षा मोठे व फार आग होणारे फोड. [सं. अग्नि+पिटिका]

**आगबबुली होणे** अक्रि. अतिशय संतापणे; रागाने लाल होणे : 'त्यावर आधीच भडकलेली सलमा एकदम आगबबुली झाली आणि तिच्या डोळ्यातून अंगार बरसला.' – उअ ११५.

**आगबंद** वि. आखबंद; पूर्णपणे बंद; अखंड : 'चांगल्या लडीच्या दोऱ्याने पोट शिवून जसेच्या तसे आगबंद केले.' – संबा ४२.

**आगबंद वीट** स्त्री. (भू.) उच्च तापमानात टिकाव धरणारी वीट.

**आगबंब** पु. आग विझवण्याचा बंब. आग विझविण्याचे काम करणाऱ्या सेवकांना आवश्यक त्या साधनसामग्रीसह घेऊन जाणारे वाहन.

**आगबोट** स्त्री. वाफेच्या शक्तीने पाण्यावर चालणारे जहाज, बोट, तारू.

**आगम** पु. १. वेद, स्तुती : 'निगमागम द्रुमफळ।फलप्रद।' – ज्ञा १८.२. २. तत्त्वज्ञान. ३. धर्मशास्त्र. ४. मंत्रशास्त्र, तंत्रविद्येतील सिद्धी; तंत्रशास्त्र; मंत्रविद्येतील भैरवोपासना : 'प्रतिपादिती अभिचार। आगम जे परमार।' – ज्ञा १७.१६७. ५. (ल.) मूळ; सुरुवात; आरंभ; प्रारंभ; उत्पत्ती. ६.जन्म; कूळ; वंश. [सं.]

**आगम** १. प्राप्ती; फल; मिळकत; उत्पन्न; शेतसारा. २. मिळकतीचे कागद; दस्तैवज; पुरावा; प्रमाणपत्र. (न्याय) आप्तवाक्य. [सं.]

**आगम** पु. येणे; आगमन; प्रवेश : 'तिच्या धवल वर्णाच्या जोडीला सुस्वरूपाचाहि आगम झालेला होता.' – पवा ४४. [सं.]

**आगम** पु. (व्या.) अधिकचा वर्ण येणे; उपपद किंवा प्रत्यय; शब्दाच्या आरंभी, मध्ये किंवा शेवटी येणारा नवीन वर्ण. [सं.]

**आगम** वि. अजिंक्य : 'आगम कृष्णाचे राऊळ' – उह ३७५.

**आगमन** न. येणे; जवळ जाणे; उपस्थित होणे : 'नोवरीचें दुश्चित्त मन। कृष्ण आगमन पाहातसे ।' – एरुस्व ५.२०. [सं.]

**आगमन कोन** पु. (भौ.) आकाशवाणी लहरींची प्रसारण रेषा आणि पृथ्वीचा पृष्ठभाग यांचा ग्रहण बिंदूवर होणारा कोन.

**आगमन प्रणाली** (स्त्री.) उद्गामी तर्कपद्धती.

**आगम निरपेक्ष** वि. शंभर वर्षे ताब्यात असल्यामुळे जिचा ताबा शाबीत करण्याची (दस्तऐवजांनी) आवश्यकता नाही अशी (जमीन, इस्टेट); हक्क शाबीत करण्याची गरज नसणारी (मिळकत). [सं.]

**आगम–निर्गम** पु. १. येणे आणि जाणे; प्रारंभ आणि समाप्ती; उपक्रम आणि उपसंहार. २. (ल.) एकंदर व्यवहार, कारभार.

**आगम बांधणे** क्रि. मनोमन ठरवणे; मनात विचार पक्का योजणे : 'दाण्याचाऱ्याचे कोचणीने हबक खाऊन शिलेदार उठून जातील त्याकरिता लढाईच योग्य असा आपल्या मनात विचाराचा आगम बांधून भाऊसाहेबांनी लढाईस आरंभ केला.' – होकै ३१.

**आगमरहित–विरहित** वि. दस्तऐवज किंवा हक्क प्रस्थापित करणारा लेखी पुरवा नसलेला; विनाप्रमाण. [सं.]

**आगम लेखा** पु. १. महसूलाचे हिशेब. २. एकूण उत्पन्नाचे हिशेब.

**आगम शीर्षक** न. उत्पन्नाचे शीर्षक.

**आगम संपादक** वि. एखाद्या जमिनीचा किंवा जिंदगीचा हक्क (सनद) ज्याने प्रथम संपादन केला तो; संस्थापक; मूळपुरुष. [सं.]

**आगमसापेक्ष** वि. जिच्या संबंधी हक्क शाबीत करणारा दस्तऐवज नाही अशी (मत्ता); आगमरहित (जिंदगी). [सं.]

**आगमाग** पु. पत्ता; मागमूस; ठावठिकाण; सुगावा; थांगपत्ता. मागे–पुढे. [मागचे द्वि.]

**आगमाती** स्त्री. (भूशा.) उच्च तापमानातही न वितळता किंवा मऊ न पडता आपला आकार टिकविणारी माती.

**आगमापायी** वि. १. येणारा जाणारा : 'सुखदु:खादि नाना व्यथा। आगमापायी अविद्यकता।' – एभा ११.४६३. २. (ल.) अशाश्वत. [सं. आगम+अपायिन्]

**आगमिक** वि. आगम जाणणारा, वेदशास्त्र जाणणारा : 'तो आगमिक, पुजा करू निका जाणे.' – लीच १.१९
पु. तंत्रमार्गाचा अनुयायी.

**आगमी** वि. तंत्रमार्गानुयायी; शाक्तपंथी. [सं.]

**आगर** न. अग्र; टोक; अणकुची; शेवट; शेंडा : 'मिष्टान्नाची गोडी जिव्हेच्या आगरीं। मसक भरल्यावरी स्वाद नेणें।' [सं. अग्र]

**आगर** पु. न. १. नारळ, सुपारी इ. झाडांची बाग, मळा, शेत : 'बोल्हावतु कां मानसें। आगरांतळीं।' – अमृ ६.३५. (सामान्यत:) शेत; मळा : 'आगर बागा नाहीं मिती।' – वेसीस्व ३.५४. २. घराभोवतीच्या आवारात भाजीपाला लावण्याची जागा; परसू : 'झोपडीच्या बाहेर गवतावर केळीच्या झाडाखाली, आगरांत न्याहारी करीन.' – पाव्ह १७. ३. समुद्र किनाऱ्यावर किंवा खाडीजवळ मीठ तयार करण्याची जागा; मिठागर. ४. काही विशेष गुणांचे किंवा प्रचुरतेचे स्थान; साठा; संग्रह; खजिना. ५. संग्रहस्थान; जसे –विद्येचे आगर; गाण्याचा आगर : 'पाहेन श्रीमुखें साजिरें सुंदर। सकळ आगर लावण्याचें।' – तुगा २०२०. ६. उत्पत्तिस्थान; वसतिस्थान; घर; निवास; खाण : 'जो सकळ धर्मासि आगरु ।' – ज्ञा २.३७४. ७. शेत : 'निवृत्ति आगर, कृष्ण हा सागर' – निगा १२९. [सं. आकर]

**आगर** वि. श्रेष्ठ : 'त्याहुनि आगरु हरि माझा' – निगा १८७.

**आगर** पु. चंदन; पहा : **अगर, अगरू**

**आगर–री** न. नारळी, पोपळी इ. च्या विपुल बागा असणारे गाव.

**आगरडा** पहा : **अगरडा** : 'दिवसे दिवस गर्भ वाढे । फुटती हातापायांचे आगरडे ।' – स्वादि २.२.४.

**आगरडा–डे** पु. अग्र, टोक. 'कांहीं कांहीं आगर्डीं । दंष्ट्रांची माखलीं ।।' – ज्ञा ११.४१६.

**आगरडोंगर** पु. किनारा आणि डोंगर; (व्यापक) सरहद; आवार; प्राकार.

**आगरमाळ(ळि) का** स्त्री. नारळी, पोफळी यांच्या बागांच्या एकापुढे एक, एकसारख्या असलेल्या रांगा.

**आगरवाडी** स्त्री. राहत्या घराभोवती भातखाचरासह फळबाग व भाजीपाला करण्याचे आवार.

**आगरामेर** स्त्री. मळ्याच्या कुंपणाजवळची झाडांची रांग; कुंपणाजवळची जागा; शेताची कड; बांध : 'कां तणांचा बाहुला। जो आगरामेरें ठेविला ।' – ज्ञा १८.४२८.

**आगराळ** वि. भयंकर, अक्राळविक्राळ : 'तो (पांडू मांग) आगराळ कड्यावरनं झपापा चढायचा.' – पंवा १००.

**आगराळ** न. टोक; अग्र : 'लिंबाच्या शेंड्याला आगराळी जाऊन बसली.' – तअं १५४.

**आगरी** पु. १. कोकणपट्टीतील एक कुणबी जात; आगले कुणबी; बागाईतदार; आगर म्हणजे पोफळीच्या बागा मक्त्याने करणारा. २. कोळ्यांपैकी एक जात. हे मिठागरात राहतात व होड्या, मचवे हाकारतात. ३. मिठागरातील कामकरी. (गो.)
वि. १. आगरासंबंधी; आगरात उत्पन्न होणारा (पदार्थ). २. आगरात काम करून पोट भरणारा. ३. आगरी लोकांची (भाषा). ४. बागाईताचा एक प्रकार. ५.काळ्या मिऱ्यांची एक जात.

**आगल** वि. पहिला; पुढचा. [सं. अग्रल]
स्त्री. नांगराच्या बैल जोड्यांतील शेवटची बैलजोडी.

**आगला** पु. नांगराचा बैल हाकणारा मुलगा : 'नांगऱ्यापेक्षा आगल्यांचाच गलका मोठा होता.' – परेपा ८५.

**आगलावेपणा** पु. भांडण लावून देण्याची, चिथावण्याची, भडकवण्याची प्रवृत्ती.

**आगलाव्या** वि. भांडण, कळ, कलागत लावणारा; कज्जेदलाल; कळचेट्या; कळीचा नारद; कळलाव्या.

**आगली** स्त्री. १. नांगराच्या बैलजोड्यातील शेवटची बैलजोडी. पहिली धुरवी व दुसरी चाहुरी. जेव्हा तीनच जोड्या असतील तेव्हा तिसरी ती आगली. चार किंवा अधिक जोड्या असतील तेव्हा धुरवी व चाहुरी शिवाय बाकी सर्व जोड्यांस (शेवटाकडून पहिली-दुसरी-तिसरी) आगली म्हणतात. ३. नांगर हाकणाऱ्याची बसण्याची जागा. आठ बैलांनी ओढावयाच्या नांगरांच्या पुढच्या दोन जोड्यांच्या आणि मागच्या दोन जोड्यांच्या मध्ये ही बसण्याची जागा असते.

**आगवली** स्त्री. पुढार : 'तुम्ही आगवली काढा' – लीचपू २५७.

**आगवळ** न. वेणी किंवा अंबाडा घातल्यानंतर केसांची टोके बांधावयाचा दोरा. [सं. अग्र+वल्]

**आगवा** स्त्री. प्रगती; वाढ; वृद्धी : 'संत समागम धरावा। तेणें ब्रह्मानंदी होय आगवा गा।' – भज २०.

पु. पुढारी; म्होरक्‍या, मुखर.

वि. आगाऊ, लवकर होणारे; हळवे (नाचणी, पीक इ.)[सं. अग्रवत्]

**आगवाडा** पु. घराच्या पुढील बाजू. [सं. अग्र+वाडा]

**आगवादळ** न. आगीने निर्माण झालेला वणवा : 'जीवारण्याला ग्रासणारी आगवादळें होत.' – अंया ९९.

**आगवान** पु. १. पुढारी; मुख्य. २. वाटाड्या. [सं. अग्रवत्]

**आगवाला** पु. (यंत्र.) बॉयलरमध्ये कोळसा घालणारा : 'एकेक सामान घेऊन शेडमध्ये नेऊन ठेवणाऱ्या आगवाल्याजवळ त्यानं ती दिली.' – अंअ ५.

**आगविमा** पु. आगीपासून होणाऱ्या नुकसानीची हमी म्हणून उतरविलेला विमा.

**आगवीस** स्त्री. १.रानात वणवा लागला म्हणजे भोवतालची झाडेझुडपे तोडून वणवा विझवणे, थांबवणे (क्रि. काढणे). २. आलेले संकट निवारण करणे.

**आगशिडी** स्त्री. (भौ.) १. आगीच्या ठिकाणी इमारतीला बाहेरच्या बाजूने लावता येणारी सामान्यत: पोलादी शिडी. २. चाकाच्या सहाय्याने उंच वाढवता येणारी शिडी.

**आगशी** स्त्री. अग्नीची ज्वाळा; झोत; अही. (को.)

**आगष्ट** पु. इंग्रजी वर्षाचा आठवा महिना. हा श्रावण-भाद्रपद या मराठी महिन्यांच्या सुमारास येतो. [इं.]

**आगस** न. पातक; अपराध; गुन्हा. [सं.]

**आगस** वि. आगप; लवकर, अगोदर किंवा वेळेच्या पूर्वी पिकलेले, तयार झालेले (फळ, धान्य). (याच्या उलट मागस).

क्रिवि. अपेक्षित काळाच्या पूर्वी. [सं. अग्र+सृ]

**आगसणे** अक्रि. योग्य कालापूर्वी तयार होणे, पिकणे.

**आगसपाळणा** पु. अश्विनाच्या महिन्यात खुल्या जागेत लांब व उंच झोके घेण्याकरिता बांधण्यात येणारा पाळणा; झोका.

**आगसा** पु. डहाळीचा कोवळा शेंडा : 'अशोकाचे आगसे। चघळिले कन्हेनि जैसे।' – राज्ञा ११.४०९.

**आगस्कर** वि. अपराधी; गुन्हेगार : 'परि म्हणतों या समयीं येतां आगस्कारांहि अन्यां या।' – मोभीष्म १.१०९. [सं. आगस्+कृ]

**आगळ** स्त्री. अडसर, अडणा; दार उघडू नये म्हणून आतून लावलेले लाकूड. [सं. अर्गला]

**आगळ** पु. रातंब्याच्या फळांचा तांबडा रस. (कों.)

**आगळ** स्त्री. १. जमिनीत खोदलेली लांब चूल; ढोब चूल; चर. २. विटीदांडू, गोट्या इ. खेळण्याकरिता खोदलेली खळगी.

**आगळ** वि.१. अधिक, विशेष : 'पाणी बहुत झाले:नावेक तेयाहीहुनि आगळे जाले' – लीचउ ७७. २. तीव्र; उत्कट : 'गोपिकांसि आगळा विरहो प्रवर्तेला' – श्रीकृष्णच ३४. ३. पढीक; विद्वान : 'शब्दब्रह्मे होसि आगळा' – ज्ञागा ८६१.

**आगळणे** क्रि.रातंब्याच्या सालीस पुटे देणे.

**आगळसे** न. शेंडा; टोक : 'ते भृभंग धनुषाकार कैसे: वोहरते अनियाळे आगळसे' –सव २८८.

**आगळा** वि. १. अधिक; वरती; जास्त : 'चउ आगळे चाळीस गड।' – ऐपो १४. २. अधिक किंमतीचा; उंची; वरचढ; श्रेष्ठ; मोठा : 'सहाय दुसरा नसे तुजविणें बळें आगळा।'– केका ४६. ३. संख्येनें किंवा परिमाणाने मोठा; पुष्कळ : ४. अधिक वाईट, फाजील; खोड्याळ. ५. उद्धट; उद्दाम; मगरूर (भाषण, वर्तन इ.) : 'तों रुक्मिया असत्य स्वार्थ बोले। म्हणे येवेळें म्यां जिंकिलें। तो रेवतीवर म्हणें आगळें। असत्य न बोलें कपटिया।' – हरि ३२.६९. अपूर्व; अभिनव. ६. निराळा; भिन्न; वेगळा : 'उपमा देऊं अप्सरा। तरी त्या व्यभिचारी समग्रा। हे त्याहून आगळी सुंदरा। पतिव्रतारत्न।।' – कथा १.८.९२.

**आगळा** पु. गोळा : 'गोसावियालागौनि मोआचा आगळा केला' – लीचउ ३३१.

**आगळिक** स्त्री. १. आधिक्य, २. मर्यादेचे उल्लंघन, अपराध, ३. अपूर्णपण.

**आगळी, आगळीक, आगळीत** स्त्री. १. आधिक्य; वाढ : 'तैसीं मि आं केली थोरी आगळी।' – दाव ३९०. २. कुरापत; खोडी; अमर्यादा; औद्धत्य; मर्यादेपलीकडील कृत्य (क्रि. करणे). ३. (कायदा) दुसऱ्याच्या ताब्यातील वस्तूवर हद्दीवर आक्रमण करणे. ४. आडसर.

**आगळे** क्रिवि. अमर्याद : 'नाही भीडभाड, बोलसी आगळे' – नाम १७१८.

**आगळे करणे** चालून जाणे : 'विरामांचेनि सर्वदें बळें: देह इंद्रियांवरी करी आगळे' – मूप्र २४७३.

**आगंतुक** वि. (विप्र. अगांतुक) १. आकस्मिक; अनपेक्षित; अवचित प्राप्त. २. पाहुणा; नेहमीचा नसलेला; नवखा; उपरा; अनिमंत्रित; फिरस्ता; वाटसरू; पांथस्थ; परकी. ३. जेवणाच्या वेळी कोणी न बोलावता अवचित आलेला (मनुष्य); अगांतुक. ४. (शाप.) विजातीय; वेगळा; परकीय; आपातत: प्राप्त; शरीरात बाहेरून आलेला (जंतू वगैरे). ५. शाश्वत नसणारे (सुख; दु:ख, लाभ इ.). ६. आगामी पुढे येणारे कर्म : 'अनुसरलेयाचे आगंतुक कुंठे :अनारब्ध सुके' – लीचउ ३७२.

क्रिवि. (चुकीने) आकस्मिक; एकदम; एकाएकी. [सं.]

**आगंतुक अंतर्वेश** पु. (भूशा.) ऐनवेळी अंतर्भाव; आकस्मिक समावेश केलेला.

**आगंतुक खर्च** पु. अनपेक्षित, एकदम, एकाएकी उपस्थित झालेला खर्च.

**आगंतुक गुण** पु. अंगी नसलेले पण अभ्यासाने येणारे गुण : 'रूप लावण्य अभ्यासितां नये। सहज गुणास न चले उपाये। कांहीं तरी धरावी सोये। आगंतुक गुणाची।' - दास २.८.३१.

**आगंतुक मूळ** न. (वन.) अनपेक्षितपणे दुसऱ्या अवयवांवर उगम पावलेले मूळ.

**आगंतुक लाभ** पु. १. अकस्मात, अकल्पित घडलेला फायदा; घबाड. २. आडमिळकत.

**आगंतुक वृत्ति-त्ती** स्त्री. अगांतुकी; आगंतुकी; भोजनाच्या वेळी आमंत्रण नसता अवचित जाऊन जेवण्याची पद्धत.

**आगंतुक व्रण** (वै.) काही प्रसंगाने पडलेले, नैसर्गिक नसलेले क्षत; शरीरव्रणाच्या उलट.

**आगंतुकी** पहा : **आगंतुक वृत्ती**

**आगंद** न. आश्चर्य; अचंबा : 'त्या दिशी कसला नाग मारला। सगळी गाववंढरी आगंद करतीया.' - नागीण ३.

**आगा** पु. १. अंगरख्याचा, झब्ब्याचा पुढील भाग, बगलेतील तिरका भाग आणि पुढे लावलेल्या दोन्ही बाजूंच्या कळ्या यामधील पुढचा भाग. २. पुढचा भाग. [सं. अग्र]

**आगा** अजमास, कल्पना, अंदाज : 'दोघे चुलते पुतणे पडले. जातीचे खंबीर परंतु समयास फौज जवळ नव्हती व वाघ पाठीवर येईल ही आगा नव्हती.' - ऐलेसं ६६३५.

**आगा** वि. मुख्य; श्रेष्ठ.
पु. पंडित; धर्मशास्त्रज्ञ. [फा.]

**आगा** क्रिवि. पुढे; भविष्यकाळात : 'ऐसेनिही जरि सेविजैल। तरि ते अळुकीचि आगा उरैल.' - ज्ञा ३.२२२.

**आगा** पु. त्रास. (वा.) **आगा काढणे** - त्रास सोसणे; खस्ता खाणे.

**आगाऊ** वि. १. आधीचा, अगोदरचा, प्रथम, पूर्वीचा. २. (ल.) कारण नसताना शहाणपणा दाखविणारा; पुढे पुढे करणारा. क्रिवि. प्रथम; पहिल्याने; पूर्वी; अगोदर. [सं. अग्र]

**आगाखानी** पु. एक मुसलमानी धर्मपंथ; आगाखानाला गुरू समजणाऱ्या इस्मायली मुसलमानांचा पंथ.

**आगाज** पु. आवाज.

**आगाजणे** पहा : **अगाजणे**
अक्रि. गाजावाजा होणे. सर्वत्र प्रसिद्धी, कीर्ती, लौकिक होणे.

**आगाजा** (ल.) १. गाजावाजा, गवगवा, हूल, आवाई. (वा.) **आगाजा उठणे, होणे** - बोभाटा होणे. २. वाद्य : 'आगाजांचे धडधडाट।' -वेसीस्व ६.७६.

**आगाड** पु. खोल खड्डा, विहीर : 'चालता दोइर सपाट। पडती आगाडी।' - क्रिपु २.७.

**आगाडेबगाडे** न. एक नवस : 'अगाडेंबगाडें करिती नवस' - चोखा १२७.

**आगाड्याचे बगाडे** न.अवाच्या सवा सांगणे; अतिशयोक्ती. (गो.)

**आगादज्वारी** स्त्री. अगात ज्वारी; मृग नक्षत्राच्या वेळी पेरतात ती ज्वारी; लवकर येणारी ज्वारी. [सं. अग्रजात]

**आगापिछा** पु. मागचा पुढचा विचार; पूर्वापार संबंध; मागमूस; पुढील व मागील भाग. जवळचे आप्तसंबंधी, नातेवाईक.

**आगाबानी** वि. पहा : **अगाबानी** : 'अंगीं आगाबानी अंगरखा। चहूंकडून डौल सारखा।' - प्रला ११६.

**आगामी** वि. पुढील; येणारे; भविष्यकाळचे; भावी. [सं. आगामिन्]

**आगार** न. १.घर; मंदिर; वाडा; महाल. २. साठा; संचय; खाण. उदा. शस्त्रागार, धान्यागार इ. कोठार; भांडार; सामान इ. ठेवण्याची जागा. [सं.]

**आगार** पु. स्त्री. अंकुर; आगारे. पहा : **अगारी** : 'तें चोपासि घेऊनि आगारें। खोलावती॥' - ज्ञा १५.९२. [सं. अग्र]

**आगारा-री-रे** पु. स्त्री. न. शेंडा; अंकुर; शेंडी; डिरी. टोक;

**आगारी** स्त्री. आहुती : 'तो बुद्धीची घेऊनि आगारी। भेदाची वाढि करी। - राज्ञा १५.९५ : 'श्राद्धपक्षाच्या दिवशी स्वैंपाक झाल्यावर त्या चुलीतील अग्नीवरच अन्नाच्या आहुती देतात याला आगारी म्हणतात.' - अभासे ४२. (अहि.) [सं. अग्री]

**आगाव** क्रिवि. पहा : **आगाऊ**

**आगाश** न. पहा : **आगास** आकाश : 'आगाशी पिता गोंधळा ये.' - जसा ३२. [सं. आकाश]

**आगाशी-सी** पहा : **अगाशी-सी**

**आगाशी** स्त्री. गच्ची.

**आगास, अगास** न. आकाश. [सं. आकाश]

**आगास** न. लवकर येणारे पीक, हळवे पीक : 'तिकडल्या शेतात काय पेरलं व्हतंस? -आगास केल्तं.' - पेरणी १४६.

**आगासताळपणा** अक्रस्ताळपणा, थयथयाट.

**आगासदिवा** पहा : **आकाशदिवा** (व.)

**आगासुगा** स्त्री. बातमी; शोध; सुगावा; थांगपत्ता.

**आगाही** स्त्री. ज्ञान, माहिती, दक्षता, खबरदारी.

**आगाहु** पु. आगाऊ माहिती, पुढचा अंदाज.

**आगाळा, आगोळा** पु. मुडा; ज्यात धान्य अथवा पेरणीचे बी बांधून ठेवतात असा पेंढ्याचा अंडाकृती बोजा; मोटकुळे; गाठोडे; बिवळा; कोळे इ.

**आगिएल-येल** न. आग; विस्तव; आगीचा डोंब. : 'जे आगिएलाचां सरोवरीं। घालिजे पुढिला तें॥' - शिव ७५६. तापलेले तेल : 'आगिएलावरि उजिती। आबुथिली जैसी।' -ज्ञा ११.३३७.
वि. विस्तव किंवा अग्नी यासंबंधी.

**आगिओ** पु. जोंधळ्याच्या पिकात उगवणारे एक रोपटे. यामुळे जोंधळ्याचे ताट सुकते.

**आगिटा-ठा** पु. विस्तव; आगटी : 'कोणी एक सुभटा। विचाराचा आगिटां।' -ज्ञा १३.१०३७.

**आगिटे** न. आगटी; विस्तव; जाळ : 'मग तिहीं आणिलीं वांगीचीं काष्ठें। तापावया केलें आगिटें।' - कथा २.९.१९.

आकृती. २. चित्र; आराखडा : 'दैनंदिनी आंदोलनाचा आलेख मात्र दर्शविणारी आहे.' -के २.५.३९. ३. लिहिणे. ४. पत्र. [सं.]

**आलेखन** न. (ग.) (दिलेल्या समीकरणाचा) आलेख काढणे. [सं.]

**आलेखपत्र** न. (ग.) आलेख ज्याच्यावर काढायचा तो विशिष्ट कागद. [सं.]

**आलेख्य** न. चित्रे काढणे; चित्रकला; रेखाटणे; लिहिणे; चौसष्ट कलांपैकी एक कला. पहा : **चौसष्टकला** [सं.]

**आलेपण** (आलेपण) न. येण्याची स्थिती : 'कीं निद्रेचेनि आलेपणें । निदेलें तें जाय प्राणें ।' – अमृ ४.२९.

**आलेपाक** पु. आल्यापासून तयार केलेला एक औषधी पदार्थ; आल्या-साखरेची वडी. [सं.]

**आलेपात्र** न. आलागेला; आलेला गृहस्थ; येणारी व्यक्ती : 'जे राजे गर्वे जाती । आल्या पात्रातें नोळखती । तयांचीं सर्वस्वें जातीं । सागरामाजीं ।।' – कालिका ८.६.

**आलेभाऊ, आलेमाय, आलेभाव** पु. सोयरेधायरे; दूरचे नातेवाईक (वा.) **आलेभाऊ कोल्हेभाऊ** - येणारे जाणारे; मौज पाहणारे; तमासगीर; बघे; नुसती गंमत पहायला किंवा फायदा करून घ्यायला जमलेली, ज्यांचा काहीही संबंध नाही अशी माणसे. (गो.)

**आलेया** अ. अरे : 'आलेया मीं गंगातीरीहुनि येत असे.' – गोप्र ५८.

**आलेयापालया** अ. कोठूनतरी; अलीकडे पलीकडे : 'आलें असैल आलेया पालया भरूनि.' – दृपा १२.

**आलेवार तालेवार** वि. मानमरातब सुखचैन भोगणाऱ्या; प्रतिष्ठित; वैभवसंपन्न : 'आजपर्यंत आलेवार तालेवार होऊन जिने दिवस काढले.' – स्फुगोभा १.१७.

**आलोक–आलोकन** पु. न. १. पाहणे; बघणे; अवलोकणे. २. दृश्य; देखावा; रूप; आकार : 'पैल खांब कां पुरूखु । ऐसा निश्चयो नाहीं एकु। परी काय नेणों आलोकु। दिसत असे ।।' – ज्ञा १४.७६. ३. प्रकाश; तेज; दीप्ती. ४. विचार; विचार करणे. ५. जयजयकार. ६. खिडकी; गवाक्ष. [सं.]

**आलोकनशक्ति –क्ती** स्त्री. नजरेचा, दृष्टीचा पल्ला, आवाका. [सं.]

**आलोकशब्द** पु. राजाने चालताना, किंवा सभेत बसला असताना लोकांकडे पाहावे, रामराम घ्यावा इ. अर्थाचे, चोपदार बोलतात ते शब्द; ललकारी; पुकारा. [सं.]

**आलोकित** वि. पाहिलेला; अवलोकन केलेला; अवलोकित.
न. (नृत्य.) नृत्यामध्ये एखाद्या वस्तूकडे पाहणे. [सं.]

**आलोच** पु. १. विचार; मनोगत; आलोक; कुजबुज; देखावा : 'मग समुद्रापैलीकडील देखे । स्वर्गीचा आलोचु आइके मनोगत वोळखे । मुंगियेचें ।।' -ज्ञा ६.२६९. २. ध्वनी; विचार. [सं.]

**आलोचणे** सक्रि १. पाहणे; बघणे; विचार करणे : 'मायेपुढें बाळका । रिगतां न पडे शंका । तैसे मन देतां लोकां । नालोची जो ।।' – ज्ञा १३.३६१. २. सांगणे : 'धांवोनि मिठी घालावयासी । हितगुज आलोचासी ।' – एभा ११.११५७. [सं.]

**आलोचन–ना** न. स्त्री. १. परीक्षण; निरीक्षण; बारकाईने पाहणे; विचार करणे; चर्चा; विचार : 'तयाप्रती कुलिश पाणी । आलोचना करी विश्वासे ।' -मुआदि १७.२९. २. टीका; समीक्षा. [सं.]

**आलोट** वि. खरे; अनावर.

**आलोडणे, आलोढणे** उक्रि. १. हालचाल करणे; ढवळाढवळ करणे; इकडेतिकडे करणे; घुसळणे; मिसळणे. २. (ल.) मनात घोळणे; घोळवणे; पुन्हा पुन्हा विचार करणे. ३. अध्ययन करणे; अभ्यासणे : 'तैसे शब्दजात आलोडिलें ।' – ज्ञा १०.१७२.

**आलोडन** न. (अप.) आलोढन. १. कोणताही पदार्थ ढवळण्याची क्रिया. २. (ल.) विषयातील (मथितार्थ) तत्त्व समजण्यासाठी अनेक प्रकारे, पुन:पुन्हा ग्रंथाचा अभ्यास करून पाहण्याचा क्रम; दीर्घ अभ्यास; अध्ययन. [सं.]

**आलोडित** वि. आलोडन केलेले. [सं.]

**आलोड्य** वि. (विप्र.) आलोढ्य; (क्व.) आलोड. १. आलोडन करण्याजोगा; ज्याचे आलोडन करायचे आहे असा (ग्रंथ वगैरे). २. पुष्कळ आलोडन झाल्यामुळे चांगला परिचित झालेला (विषय) किंवा त्या विषयाचा तज्ज्ञ (माणूस).
न. प्रावीण्य; पढिकत्व; पांडित्य. [सं.]

**आलोढणे** प्रा. क्रि. पारंगत होणे, हस्तगत करणे, घुसळणे.

**आलोनी** वि. अळणी : 'हें आलोनी : हें खारट. ' – गोप्र ३९. [सं. अलवण]

**आलोमश शेवरा** पु. वैरण म्हणून उपयोगात येणारे एक प्रकारचे द्विदल गवत.

**आलोह** पु. कळवळा : 'मातेचा आलोही जाणौनि ।' – ऋम २७४.

**आलोहित** क्रिवि. तांबडे, लाल.

**आल्हाता** पु. नळा, धोटा, पिचकारी.

**आल्गप्ती** क्रिवि. अचानक. (व.)

**आल्पीय भूक्रांति–ती** स्त्री. (भूशा.) 'आल्प्स' पर्वतासारखे घडीचे पर्वत होण्याच्या क्रमवार प्रक्रिया व घडामोडी.

**आल्फा** पु. (भौ.) ग्रीक मुळाक्षरांतील पहिला वर्ण. त्याचा उपयोग अशा संक्षेपाने होतो. नवीन सूत्रांना, शोधांना द्यावयाच्या सांकेतिक नावासाठी त्याचा वापर केला जातो. [इं.]

**आल्फा** न. रेडिओ ॲक्टिव्ह द्रव्यापासून उद्भवणारे किरण : 'आल्फा कणांचा वर्षाव थांबला की.....' अअं २५६.

**आल्ब्युमिन** न. दुधात, अंड्यात, रक्तात, वनस्पतीत सापडणारा श्वेतकल्कबल्क; (रसा.) अंड्यातील पांढरा बलक; (वन.) गर्भपोषक द्रव्य; बीजसंवर्धक द्रव्य; मगज; (वै.) रक्तातील एक घटक. ओजस द्रव्य.

**आल्म** न. धैर्य; धाडस. (गो.) [पोर्तु. आनिम्]

**आल्माआवे** स्त्री. बेढब, कुरूप स्त्री. (वै.) [पोर्तु.]

**आल्याड** क्रिवि. अलीकडे. : 'सरस्वतीच्या आल्याड आली.' – बाय २.२.

**आल्यापावली** क्रिवि. एकदम; ताबडतोब; आलातसा : 'तू आल्यापावलीं परत जावेंस हे फार चांगले.' – नाकु २.१२.

**आल्हर** पु. अंगाई गीत : 'गाऊनिया आल्हर मुखें । निजीं निजवी त्या सुखें ।' – निगा १२५.

**आल्हात–ता** स्त्री. पिचकारी धोटा; नळा : 'आतुसोने– केतकीचे आल्हाते.' – रुस्व ५५.

**आल्हाद** पु. आनंद; संतोष; उल्हास; हर्ष. [सं.]

**आल्हादक** व. आल्हाद–आनंद देणारा; आनंददायक; उत्साहदायक; उत्साहकारक. [सं.]

**आल्हादणे** उक्रि. आनंदणे; संतोष पावणे : 'संफुल्लसारसमुखीसखीसंध नयन कल्हारीं आल्हादला ।' – आसी ६०. [सं. आल्हाद]

**आल्हादन** न. आनंदणे; उल्हास; आनंद; संतोष. [सं.]

**आल्हादित** वि. आनंदित; उल्हसित; हर्ष पावलेला.

**आव** पु. १. डौल; थाट; मोठा आविर्भाव; प्रतिष्ठा; महत्त्व : 'एथूनि रसां झाला आवो । रसाळपणाचा ।' –ज्ञा १.३३ (क्रि घालणे, आणणे). २. नीटनेटकेपणा; सुंदरता; बाह्य सौंदर्य; आकार मनोरमता; सुंदर घाट; (सामान्यत:) आकार; घाट; घडण : 'सप्तावरणेंसि प्रचंड । आवो साधूनि उदंड । निर्माण केलें ब्रह्मांड । मयूरांड आकारें ।' – एभा २४.१४२. ३. धैर्य; हिंमत; हिय्या; धमक; अवसान (क्रि धरणे, आणणे) : 'त्या धर्मसैनिकांचे झाले होतेचि सर्व आव रिते ।' – मोकर्ण १२.५. ४. दाब; आटोप; आब; दबदबा; शक्तिक्षेम; बल; सामर्थ्य : 'तुझिया लाठेपणाचा आवो । तिहीं लोकीं ।' –ज्ञा २.९. ५. नेम; पवित्रा : 'दृढ साधोनियां आवो । निजबळें घालिता घावो ।' – एभा १२.५८८. ६. घाट; घडण (भांडे वगैरेंची). ७. उद्रव; उद्गम. ८. ऐट; धीर. ९. अवडंबर. १०. उद्भवणे; पिकणे : 'पेरिजे नुसदी हिंसा । तेथ आवैल काय अहिंसा ।' –राज्ञा १३.२२३.

**आव** स्त्री. आतड्यासंबंधीचा रोग; आमांश; पोटातील अपक्वता, अपचन, अजीर्ण.

**आव** वि. निर्भेळ; ताजे; कोरे; (व.) [सं.]

**आव** पु. आवक; प्राप्ती; लाभ : 'केवढा माझा उपावो । करिता कोण प्रस्तावो । केलियाहि आवो । काय येथ ।।' – ज्ञा १८.६२२. [सं. आय]

**आव आणणे** क्रि. अंगात कर्तृत्व नसताना किंवा श्रीमंती, अधिकार नसताना ती असल्याचा देखावा करणे.

**आवई** स्त्री. १. आवई; कंडी; लोकवार्ता; भुमका; वार्ता; खबर; गप्प; बोलवा; बातमी. २. प्रसिद्धी; प्रख्याती : 'धर्मराज श्रीमंत धन्याची त्रैलोक्यामध्यें आवई' – ऐपो २०२. [सं. आ+ई] (वा.) **आवई उडविणे** – बातमी पिकविणे. **आवई पडणे** – बातमी पसरणे : 'मोठे बक्षीस मिळेल अशी आवई पडल्यावर बक्षिसाचे लालचीने जिकडून तिकडून तमाशेवाले आले.' – निमा १४८. **आवई खाणे** – भिणे : 'मुख्य शत्रु आवाई खाऊन व्यग्र जाहला आहे तो सांवर धरितो.' – मराआ ७. **आवई उठणे** क्रि. अफवा पसरणे.

**आवई तवई** स्त्री. संकट; हालअपेष्टा : 'आवया तवया भोगितला तो अकस्मात तिर्थरूप सिवापा निवर्तले.'– मइसा १२.३३७.

**आवक** वि. आलेला; प्राप्त झालेला; आयात; मिळालेला. स्त्री. १. जमा; उत्पन्न : 'जरी त्याची आवक मोठी असून काटकसरही मोठी असे तरी त्याला जबर कर्ज असे.' – इंरामू २९२. २. आलेली पत्रे, पुस्तके, कागद वगैरे; याच्या उलट जावक.

**आवक कारकून** पु. येणाऱ्या टपालाची नोंद ठेवणारा कारकून.

**आवकजावक** स्त्री. १. आयातनिर्यात; जमाखर्च. २. आवक जावक बारनिशी; आल्यागेल्या पत्रांची नोंद.

**आवकटा** पु. आश्चर्य; नवल.

**आवकणे, आवंकणे** अक्रि. अडखळणे; थांबणे; कचरणे; साशंक होणे. : 'पण यशवंत तूं करणार नां आज सारं? राधाबाईनीं जरा अवंकत विचारलें.' – हाच कां धर्म २३९.

**आवक बारनिशी** स्त्री. ज्या वहीत आलेल्या कागदपत्रांची नोंद करतात ती वही.

**आवक वाहनखर्च** पु. माल वाहून आणण्याकरिता होणारा खर्च.

**आवक्श चिंतणे** आयुष्य चिंतणे; भले पाहणे; कल्याण चिंतणे; आशीर्वाद देणे: 'ह्यो त्याला बरकत येऊ दे म्हनत आवक्श चिंतत म्होरं जायाचा.' – उपरा ९९.

**आवखादा** वि. अवघड, अडचणीचा : 'शत्रू रात्रीचा दगा करणार. गवत रानामध्यें बहुत. जागा आवखादा. राउताचा इलाज नाहीं.' – पेद ३३.२९०.

**आवखादणे** अक्रि. धास्ती घेणे; धीर सोडणे : 'विश्वासराव अंबारींत होते म्हणूनच टिपल्यासारखे मारले गेले आणि ते गेल्यावर फौजेनें आवखादला.' – सकाळ २८.१०.३५.

**आवग** न. माशाच्या पोटातील आतडे. शरीराचा नाजूक भाग. पु. १. अहंकार. २. काढणी, बंधन : 'जो माया चि पालाणवी । आंगा अवगु घालवी ।' – राज्ञा १८.१०५७.

**आवगी** स्त्री. स्वैरबुद्धी.

**आवगणी** स्त्री.वेष; सोंग : 'वराहाची घेऊन आवगणी । अंशें येके धरिली धरणी । तेथें कार्यी वानुं श्रीचक्रपाणी । उद्धरिला गोवर्धनूं ।।' – रुस्व ३१५. [सं.]

**आवगणे** अक्रि. वाईट मार्गाला लागणे; स्वेच्छाचारी, दुराचारी बनणे; बहकणे; बावचळणे. : 'चोरीजारी अनाचर । करूनि नाहीं म्हणती नर । तैसा नावेक राजेश्वर । असत्या जागीं आवगला ।' – मुआदि १६.११६१. [सं. अव+गम्]

**आवगणे** सक्रि. १. धारण करणे; अंगीकारणे; अंगी आणणे, घेणे; अवगणी घेणे : 'कीं मानुषपणा आवगला । भणऔनि सत्यलोकां एओ बिहाला ।' – दाव ३५२.

**आवगणे** अक्रि – स्वच्छंदपणे वागणे; माणसातून उठणे. [सं. अव+गम्]

**आवगणे** सक्रि. आटोपणे. [सं. आव = आटोप]

**आवगत** वि. धारण केलेले : 'आवगतें आंग निवीळें' – उगी ७६.६०१.

**आवगळा** वि. अधिक उत्कट.

**आवगुंडी** स्त्री. (शेती, चर्मकारी) मोटेच्या बैलांस मागे ओढण्याकरिता कासऱ्यास जोडलेली वादी.

**आवग्र** क्रिवि. १. आरंभापासून अखेरपर्यंत; सतत; एकसारखा; अखंड; न थांबता : 'तेथें तीन दिवस आवग्र रात्रंदिवस पाउस लागला.' – पेद २०.१९८. २. सर्व; एकूण एक : 'रमण्यात जाऊन स्वार व गाडदी

हरणांचे आसपास उभे राहून हरणे धरावी, इतकियात हरणे आवग्र पळून गेली.' - पुणेअभा ३.१०५. [सं. आ+अग्र]

**आवघ** वि. पूर्णपणे; संपूर्णता.

**आवघड** न. संकट.

**आवघडणे** अक्रि. जड होणे, अडखळणे.

**आव घालणे** क्रि. १. उत्साह; महत्त्वाकांक्षा, उभारी धरणे : 'कामकाजात चित्त घालून आव घालावा.' - चंचूद १०१. २. आळाबांधा करणे; व्यवस्था लावणे : 'चहुकडे माणसे बटकी चाकर विखरली होती ती जानरायानीं जमा करून आव घातला.' - ऐलेख ४.१३४. ३. देखावा करणे; खरे लपवून नाही ते दाखवण्याचा प्रयत्न करणे.

**आवजा** (आज्ञार्थी ) या. (भि.)

**आवजा- झा** वि. अवलंबन; भार; ओझे. : 'तया मोक्षाचा आवझा । आपण या कवणें लावीला ।' - भाए ७८३; 'जीवलगासि आवजा जाला ।' - दावि ७७४. [सं. अवह्]

**आवजाव** स्त्री. १. या आणि जा. ये, जा; पुन्हा ये असे सांगणे. २. (ल.) हेलपाटा (क्रि. करणे, मांडणे, लावणे).

**आवझे** न. ओझे.

**आवट** पु. लाकडाची रास.

**आवटचावट** क्रिवि. फाजीलपणाचे; भलतेसलते; अरबटचरबट. [चावटचे द्वि.]

**आवटणी** स्त्री. (भाताची) पुन्हा लावणी; आवटण्याची क्रिया; दाट झालेली रोपे उपटून दुसरीकडे लावणे.

**आवटणे** उक्रि. पेरलेले धान्य (बहुधा नागली व वरी, क्वचित एका जातीचे भात) उगवून आल्यावर उपटून नांगरलेल्या जमिनीत काडी काडी आडवी फेकणे (म्हणजे ती जीव धरते). [सं. आ+वट्]

**आवटणे** क्रि. उरणे.

**आवटळा** पु. गात्रसंकोच; उसण. : 'उठवणें ताठा करक । आवटले आणि लचक ।' - दास ३.६.४६.

**आवठ** पु. अस्पष्ट आकृती; अस्पष्ट चिन्ह, भाग. (क्रि. उठणे, वठणे). (व.)

**आवठरणे** अक्रि. संकोचणे; उदास होणे : 'माझे मन आवठरून गेले होते.' - सीपो १६.

**आवड** स्त्री. १. गोडी; संतोष; आनंद; इच्छा. २. प्रीती; चांगला भाव; रुची; पसंती (क्रि. ठेवणे, होणे, असणे) : 'आवडीची क्षुधा जयाप्रती । तयासि रुचे पाक निष्पत्ती ।' - मक २२.१५.

**आवड** पु. तीन पाटग्यांचे एक पाटगे व वीस पाटग्यांचा एक आवड; मोठा वाफा : 'मारी ललकारी । ढेलत्या बैला । चालरे आवड हा भरला ।।' - काके ६६.

**आवड** पु. मोठ्या शेताचा एक भाग. (व.)

**आवड** स्त्री. स्नेहाकर्षण; रासायनिक आकर्षण.

**आवडक** वि. दिसणारा; साकार.

**आवडक चवडक** पहा : **औंडकचौंडक**

**आवडकृत्य** न. आवडीचे, मनाजोगे, संमत असलेले, आवडणारे काम.

**आवडगोड** वि. १. आवडता म्हणून गोड (देणगी, बक्षीस, सेवा.) २. आवडत्या माणसाने केलेली म्हणून गोड (चाकरी, देणगी).

**आवडचतुर** आवडत्या गोष्टीत चातुर्य, हुषारी दाखवणारा; आवडत्या गोष्टी जाणणारा.

**आवडचतुराई** स्त्री. १. आवडत्या गोष्टीत दाखवलेले कौशल्य. २. आवडेल ते करणे; स्वेच्छाचार; स्वच्छंदी वर्तन; आवडीची चतुराई.

**आवडणे** (आवड्णे) सक्रि. १. पसंत असणे; रुचणे; आनंददायक किंवा मनाजोगे असणे. २. भासणे, वाटणे : 'आणि आवडेन काइ प्रेमला । गोकुलिचेयांहूनि ।।' - राज्ञा ११.३४. (वा.) **आवडून घेणे** - आपली प्रीती बळेच ठेवणे; आपल्याला प्रेमबद्ध करून घेणे.

**आवडणे** सक्रि. १.दिसणे; वाटणे; भासणे : 'तो मनुष्यासारिखा तरी आवडे । परी मनुष्यत्व तया न घडे ।' - ज्ञा ४.१००. २.प्रीतीस पात्र होणे.

**आवडणे, आवाडणे** सक्रि. शौचविधीनंतर ढुंगण धुणे; कुल्ले धुणे. (राजा. ग्रा.)

**आवडता** वि. १.पसंतीचा; आवडीचा; लाडका; आनंददायक; संतोषकारक. २.(ल.) वाटेल तो; पाहिजे तो; हवा तो; भलता : 'जें हें साधन तुम्ही निरूपिलें । तें आवडतयाहि अभ्यासिलें ।' - ज्ञा ६.३३७.

**आवडती बायको** स्त्री. १.आवडणारी, पसंत असलेली बायको. २.(ल.) बिजवराच्या किंवा दुसऱ्या लग्नाच्या बायकोबद्दल म्हणतात.

**आवडते शास्त्र** न. १.एखाद्या वाक्याचा (शास्त्रादी ग्रंथातील) सत्याला जरा सोडून आपल्या इच्छेप्रमाणे किंवा मताप्रमाणे अर्थ लावणे; अनुकूल शास्त्रार्थ काढणे. २.आपल्या इच्छेचा किंवा आपली इच्छा हाच कायदा, शास्त्र; स्वच्छंदीपणा; मनाला वाटेल तसे करणे.

**आवडनावड, निवड, तिटकारा** स्त्री. पु. १.प्रीती आणि अप्रीती; हवे - नको असणे; एक गोष्ट पाहिजे असणे, दुसरी नको असणे. २.(ल.) विषमबुद्धी; द्वैत; समतेचा अभाव.

**आवडनिवड** स्त्री. मकरसंक्रांतीच्या दिवशी सुवासिनी स्त्रियांनी करावयाचा एक विधी. या दिवशी एखाद्या सुवासिनीस बोलावून तिच्या आवडीप्रमाणे तिला चोळी शिवून देतात.

**आवडभूत** वि. आवडते झालेले; आवडलेले; प्रिय झालेले; संमत असलेले.

**आवडवणी** न. आरोग्यासाठी स्नानाकरिता लिंबाची पाने वगैरे टाकून तापवलेले पाणी.

**आवडसावड** स्त्री. १. माणसे, बैल, नांगर इ. एकमेकांच्या उपयोगासाठी एकमेकांस देण्याघेण्याची शेतकऱ्यांची पद्धती. २. एकमेकांस केलेली मदत; मदतीची अदलाबदल.

**आवडळ** वि. १. यत्किंचित; थोडा; अल्प. २. साकार; दृश्य.

**आवडा** वि. एवढा : 'आवडा निरोप मैना ग सांग जो बापाल मैना.' - एहोरा ५.७८.

**आवडा** वि. आवडता; लाडका.

**आवडा देवडा** वि. आडवातिडवा; वाकडातिकडा; अप्रिय; संतापदायक; अपमानकारक (मनुष्य, भाषण, कृत्य इ.).

**आवडी** स्त्री. आवड; प्रीती; पसंती. पहा : **आवड** : 'तुका म्हणें कुडी । जेवी प्राणाची आवडी ।' – तुका

**आवडी गोडी** आवडनावड.

**आवडून घेणे** वि. दुसऱ्याच्या प्रेमाला किंवा लोभाला पात्र होऊ अशा रीतीने वागणे.

**आवडे** वि. वाटेल ते; भलते; भलतेसलते : 'म्हणौनि आपुलालेया हिताचेनि लोभें । मज आवडे तोहि भक्त झोंबे ।' – ज्ञा ७.११९.

**आवढ–ढे** क्रिवि. इतका; एवढा; येवढा.(खा.)

**आवढा** वि. एवढा : 'आवढा गुन्हा माफ कर' – जसा १३४.

**आवण** न. १. गाडीच्या चाकाच्या भोकात घातलेले लोखंडी वर्तुळाकार वेढे किंवा मायणी. हिच्यामध्ये गाडीचा कणा फिरत असतो. २. (यंअ.) फिरणाऱ्या दांड्याच्या खाली–वर असणारा भाग, खोबण. घर्षणाने होणारी झीज कमी करणे हा उपयोग असतो. [सं. आ+वृत्]

**आवण** आवण् न. १. भाताचे उभे शेत; रोपे. (कों.) २. वांगी, नाचणी, वरी, मिरची यांचे दुसऱ्या ठिकाणी लावण्याकरिता तयार केलेले रोप; नारळ, पोफळी यांचे रोप. ३. प्रथम रोपे लावतात ती जमीन; बी पेरून रोपे तयार करतात ती जमीन. ४. भाताची रोपे पहिल्या ठिकाणाहून उपटून ज्या दुसऱ्या जमिनीत लावतात ती जमीन. ५. (सामान्यतः काही प्रांतात) धान्य, भाजीपाला यांची रोपे लावतात ती जमीन; आवणीची जमीन. (को.)[सं. आ+वप्]

**आवणा** वि. शिळा–ळी–ळे.(कु.)

**आवणी** स्त्री. १. लावणी; खाचरातील भाताचे रोप उपटून दुसरीकडे लावणे. २. भाताची रोपे तयार करतात ती जमीन. ३. भाताचे रोप उपटून ज्या जमिनीत लावतात अशी जमीन.

**आवणू** न. १. आवणीसाठी काढलेली रोपे लावण्याकरिता तयार केलेली जमीन; आवणी करावी लागते ती (जमीन, शेत). २. पुन्हा लावणी केलेली आवणातील भाताची रोपे वगैरे; आवणी करून झालेले भात. (को.)

**आवणे** उक्रि. आवण उपटून दुसरीकडे लावणे; भात, नागली, मिरची, वांगी वगैरेच्या रोपांची दुसऱ्या जागेत लावणी करणे; आवणातून काढलेली रोपे आवणूत लावणे. (को.)

**आवणे** क्रि. उगवणे, पिकणे.: 'पेरिजे नुसधी हिंसा । तेथ आवैल काय अहिंसा ।' – ज्ञा १३.२२३.

**आवणे** अक्रि. जेवण झाल्यावर हात व तोंड धुणे; आंचवणे. [सं. आचमन]

**आवणे** अक्रि. समाविष्ट होणे; सामावणे; मावणे : 'सकलकरतळांत क्षिती आवली ।' – प्रला ११७.

**आवणो** पु. पंखा. (कु.) [सं. व्यजन]

**आवतकरी** पु. औत चालवणारा शेतकरी : 'आवतकऱ्या दादा नको मारू बैलाला.' – एहोरा ३३.

**आवतण** न. निमंत्रण; बोलावणे. [सं. आमंत्रण]

**आवतणे** क्रि. १. बोलावणे; आमंत्रणे. 'गोमायुगृध्रपल- भुक्परिवारा मृत्यूलागिं आवतणें । दिधलीं कुरुसैन्यांनीं ...' – मोकर्ण ८.४. २. अभिमंत्रण करणे : 'मल्लविद्येचा अभ्यास । आंवतूनि चालिला चंडीश । हां हां म्हणतां नागपाश । घातिला त्यासि ।।' – कथा ३.१०.१६३. ३. भोजनास बोलावणे : 'भोजना आवंतिला सहपरिवारीं ।' – मुआदि ४०.७२.

**आवतऱ्या** पु. साथीच्या रोगांचे मूळ शोधून त्यावर उपाय सांगणारे एक प्रकारचे भगत : 'भगतांमध्ये 'मुखिया', 'पानफोड्या', ... 'आवतऱ्या' असे अनेक प्रकार आढळतात.' – आप्र ७.

**आवतासवदा** पु. (व्यापारी) वायद्याचा सट्टा; भविष्यकाळी होणाऱ्या देवघेवीचा करार.

**आवतिकाय** स्त्री. गती; स्थिती; विशेषेकरून वाईट गती, दुःस्थिती, दुर्दशा. (गो.)

**आवती, आवथी** स्त्री. १. आहुती. २. (ल.) नाश. [सं. आहुति]

**आवतीक** न.नाश; नुकसान. (गो.)

**आवतीक मारप** क्रि. नुकसान करणे.

**आवतीभोवती** क्रिवि. सभोवती; आसपास; आजूबाजूस; जवळपास : 'आवतीभोवतीं अशी किलबिल करूं लागलीं म्हणजे जिवाला गारवाऱ्यावर चांदण्यांत पडल्यासारखे वाटतें.' –भा १३. [सं. आवृत+भ्रमित]

**आवथणे** क्रि. वात पुढे करणे.

**आवदा** स्त्री. आयुष्यमर्यादा : 'मृत्युलोकीं मनुष्यमर्यादा । शतवर्षे जी गोविंदा । ते अतिक्रमोनि आवदा । अधिक मुकुंदा पंचवीस जाहलीं ।' – एभा ६.२५४. [सं. आयुर्दाय]

**आवदाना** पु. पहा : **अवधणा**

**आवदुध** न. १. बिन पाण्याचे दूध. २. न तापलेले–कच्चे निरसे दूध.(व.)

**आवध** पु. अवधी; मुदत; काल : 'आमचें पत्र तुम्हांस पोंहोचल्यावर चार दिवस आवध करून चार दिवसांमध्यें आमचे सरंजाम, गल्ला वगैरे .. करावे.' – मइसा ५.५८. [सं. अवधि]

**आवधातु** पु. हीन प्रतीचा धातु.

**आवधी** स्त्री. वेल; लता : 'चंदनाची आवधि कुवारी । बाणें कापिली राहे वरीच्यावरी । तैसी ते राजकुमरी । देवाचिया अवस्था ।' – रुस्व ३४४.

**आवनो** वि. न भाजलेला; कच्चा. (कु.)

**आवभाषी** स्त्री. (प्र.) दुरुत्तर; दुष्ट बोल : 'जमाना आला उफराटा । सुन सासूला लावी बट्टा । .. लेक बापाशीं लावी आवभाषी ।' – अफला ६८. [सं. अवभाषी]

**आवय** स्त्री. १. आई; माता. २. आवई; गप्प; भुमका. (गो.) [का. अव्वा]

**आवय बापुय** पु. आईबाप.

**आवयेळा** पु. आवळा : 'कुणी सांडिला आंवयेळा' – जसा ६४८.

**आवर** पु. स्त्री. १. आटोप; आटोका; आटोक्यात आणणे; आटोपते घेणे; थोडक्यात आणणे; गोळा करणे; बंद करणे; संपुष्टात आणणे. २. नियंत्रण; ताबा; वचक; निग्रह; अंमल. ३. व्यवस्था; कारभार; पाहणी; धंदा चालविण्याचे कौशल्य; उरक. [सं. आ+वृ] (वा.)

**आवर घालणे** –(वाटेल तसे वागणाऱ्याला) ताब्यात आणणे.

**आवरआटोप** पु. संकोच, व्यवहार बंद करणे.
स्त्री. उरक.

**आवरक** वि. आवरणारा; वेढणारा; बांधणारा; संयम करणारा; अटक करणारा; ताबा ठेवणारा; आळा घालणारा; आवरण घालणारा : 'आहो भक्तीचें बळ थोर आहे देवराया आवरक ।' – दावि २७९.
न. (जीव.) १. दुसऱ्या अवयवाभोवती वेढून राहणारा भाग. उदा. कर्दळ, केळ यांच्या देठाचा तळभाग. २. पानाच्या तळाशी पात्याचे अगर देठाचे अथवा पर्णतलाचे खोडाभोवती असलेले आवरण. उदा. गवत.

**आवरक्त** न. रक्ती आव; रक्ताची हगवण; आमांश. [सं. आम]

**आवरजा** पहा : **अवरजा**

**आवरण** न. १. आवरणे; आटोप; आवरण्याचा व्यापार. २. वेष्टन; आच्छादन; वेढा; झाकण; रक्षण साधन (कठडा, कुंपण, वई, झाकण, पुठ्ठा, पेटी, पडदा, झगा इ.) ३. वेढणारी, बांधलेली वस्तू. ४. आच्छादनावस्था; प्रावरणावस्था; संरक्षणावस्था : 'मज अनावरणा प्रावरण । भूषणातीतासि भूषण ।' – ज्ञा ९.१६२. ५. ताबा; नियमन; अंमल; व्यवस्था; अधिकार; आटोप; उरक. ६. भाद्रपद शुद्ध द्वितीयेच्या रात्री बायकांचे आकंठ भोजन– खाणे– फराळ (कारण दुसऱ्या दिवशी हरितालिकेचा उपवास काही न खाता करावयाचा असतो.) ७. (तत्त्व.) चुकीच्या कल्पनेच्या दोन कारणांपैकी (आवरण व विक्षेप) एक; आच्छादन; लपविणे. ८. कपडे : 'आपुलें आवरण केलें... नगरामध्यें भिक्षा करू लागले.' – लीच ४.४२. ९. (यंअ.) आतील (वस्तूला) बंद करणारा संरक्षणात्मक सांगाडा. १०. (कृषी.) जमिनीतील ओलावा कमी होऊ नये म्हणून पिकाच्या दोन ओळींमध्ये पाला पाचोळा किंवा उसाची वाळलेली पाने पसरणे. [सं.]

**आवरण देवता** स्त्री. १. मुख्य देवतेच्या भोवतालच्या अवांतर देवता. जसे:– अनंताच्या भोवती असणारे अष्टदिक्पाल. २. (ल.) राजाच्या भोवतालचे मंत्री, खुषमस्करे; मोठ्या माणसाच्या भोवतालचा परिवार. [सं.]

**आवरणनिक्षेप** पु. (भूशा.) खालच्या खडकांना झाकणारा, आच्छादणारा थर.

**आवरणपीक** न. (भू.) कडक हिवाळ्यात फळबागांचे संरक्षण व्हावे म्हणून जमीन झाकणारे व हवेतील नायट्रोजन वायू मुळ्यांच्या गाठीत बंधित करणारे दुय्यम पीक.

**आवरणपूजा** स्त्री. मुख्य देवतेच्या भोवती असलेल्या देवतांची पूजा; अनंतचतुर्दशीस अनंताच्या अष्टदिक्पालांची पूजा : 'कृष्ण परमात्मा मध्यमूर्ती । आवरणपूजा यादवपंक्ती ।' –एरुस्व १४.१००. [सं.]

**आवरणवाळू** स्त्री. (भूशा.) खालच्या स्तरावर आवरणासारखी पसरलेली वाळू (तिचा थर).

**आवरणशक्ति–क्ती** स्त्री. १. आटोपण्याची, नियमन करण्याची, ताब्यात ठेवण्याची शक्ती. पहा : **आवर शक्ती.** २. माया; वस्तूच्या खऱ्या गुणांचे आच्छादन करण्याची शक्ती; मोह; अविद्या. [सं.]

**आवरणे** उक्रि. १. एकत्र करणे; गुंडाळणे; आटोपणे; थोडक्या जागेत आणणे; गोळा करणे; संपविणे (वस्तू, कामे, इतर गोष्टी इ.) . आटपते घेणे : 'जी ताईसाब! पण आपुन जरा आवरतं घ्या.' – चंद्रग्रहण ४१. २. (ल.) माघार घेणे; परत घेणे : 'प्रसाद करणें मनीं जरि नसेल हें आवरा ।' – केका १४. ३. वहिवाटणे; व्यवस्था पाहणे; देखरेख करणे; अंमलबजावणी करणे. ४. झाकणे; वेढणे; आच्छादणे; गुंडाळणे; व्यापणे; व्यापून असणे : 'म्हणौनि आम्ही तयातें । म्हणो सर्वत्र आईकतें । एवं जे सर्वातें । आवरूनि असे ।।' –ज्ञा १३.८८२. ५. ताबा चालविणे; नियमन करणे; अटकाव करणे; हुकमतीत ठेवणे : 'तेणें तें आवरिजे । भीष्मातळिं राहिजे ।' – राज्ञा १.१२३. ६. आपल्याकडे घेणे; सांभाळ करणे; वाढविणे (अनाथ मुलांचा वगैरे). ७. रक्षण करणे; मदत करणे; आश्रय देणे; आच्छादन घालणे. [सं. आ+वृ]

**आवरणे** न. हरितालिका पूजेच्या आदल्या रात्री (भाद्र शु. २) करावयाचा फराळ.

**आवरणे** न. (सोनारी काम) भांड्यास पसरट आकार देण्यासाठी उपयोगात आणावयाची हातोडी.

**आवरत** वि. आटोक्यात येणे : 'उडिदाची खळी आवरत आली आहेत.' – गावरहाटी ९९.

**आवरता** वि. अवास्तव; निष्कारण.

**आवरदा** वि. १. आयात माल. २. (कधी कधी) आवक. [फा.]
स्त्री. आयुर्दाय.

**आवरदा जमा** स्त्री. आयात जकातीचे उत्पन्न.

**आवरदेखाना** पु. आयातनिर्यात; त्यावरील जकात. [फा.]

**आवरशक्ति–क्ती** कामाचा उरक.

**आवरसावर, आवराअवर** स्त्री. बांधाबांध; गोळा करणे; आटोपणे; झाकापाक.

**आवराबावरा** काबराबावरा.

**आवरिंव** न. भक्षणाकरिता पुरवठा; मेजवानी : 'तै तुआं आवरिंव केली । दैत्युमांसाची ।' – शिव ४४५.

**आवरी** वि. आवरणारा; देखरेख करणारा; कारभारी; व्यवस्थापक : 'जया प्राणाचे घरीं । अंगें राबती भाऊ चारी । आणि मना ऐसा आवरी । कुळवाडींकरु ।' – ज्ञा १३.२८.

**आवरीत** स्त्री. (विरु.) पहा : **अवरीत** : 'आधीं मसी लावलीस प्रीत । पुढें त्वा केलीस आवरीत' – होला १४४.

**आवरॉ** पु आळसुद्यासारखे एक धान्य; चवळी; कडवे वाल. पहा : **अवरा** (गो.) [का. अवरी]

**आवर्जणे** सक्रि. टाकणे; त्याग करणे; सोडणे : 'गडी म्हणती जगज्जीवना । कां आवर्जिली यमुना । कोण्या विचारें मधुसूदना । कोप धरिला तिजवरी ।' – हरि १०.८२. [आ+वृज्]

**आवर्जा** पु. हिशेब वही. अवरजा : 'कीर्दी नावनिशीवार पत्रकें आवर्जे पहावें.' – ऐलेसं ४.१४३३.

**आवर्जून** क्रिवि. अगत्यपूर्वक.

**आवर्जून सांगणे** क्रि. आग्रहाने सांगणे; मुद्दाम सांगणे; बजावणे.

**आवर्ण** पु. समुद्र : 'तिघा आधार आवर्णोदकाचा' – दास १३.४.१८.

**आवर्त** पु. १. चक्राकार भ्रमणगती; फेरा; वळण. २. पाण्याचा भोवरा : 'जे द्वेषाच्या आवर्ती दाटत । मत्सराचे वळसे पडत । माजिं प्रमदादि तळपत । महामीन ।' – ज्ञा ७.७२. ३. चक्रवात; वावटळ; तुफान : 'समर्थे सज्जनदुर्गी पर्वत आवर्त पाहणें ।' – सप्र ९.१५. 'सूर्य विषुववृत्ताच्या उत्तरेस असता शांत प्रदेश उत्तरेस येऊन तेथें व्यापारी वारे समोरासमोर येतात, लंबकिरणांनी जमीन फार तापते म्हणून त्यांस जोर येतो, त्यांचें चक्र बनून तें गरगर फिरूं लागतें, हे चक्र वर आकाशात जाऊन प्रतिव्यापारी वाऱ्याबरोबर ध्रुवाकडे जाते यास आवर्त असे म्हणतात.' –सृष्टिज्ञान ७३. ४. पाण्यातील भोवऱ्याच्या आकृतीप्रमाणे अंगावरील केसाची रचना, आकृती (विशेषत: घोड्याच्या अंगावरील). उदा. जंघावर्त; जानुवर्त. ५. मनात एक सारखे घोळणे; विचार. ६. वेढा (सेनेचा) : 'सभोवता सैन्याचा आवर्त पाहून मध्यें कोंडला असतां, त्यास सोडून निघालें.' – ऐलेसं ८४३. ७. अनर्थ : 'आंग्र्याने ऐसा आवर्त मांडिला आहे.' – पेद ३०.१४७. ८. हालचाल; प्रसर: 'मिंश्रीकोटे व कलघटगी येथील संधानें आलीं आहेत परंतु शत्रूचा आवर्त आहे म्हणोन अवमान आहे.' – ऐलेसं ४१०३. ९. गर्दीची किंवा दाटीची जागा. १०. (वै.) सुवर्णमक्षिका. ११. वितळणे. १२. संसार. १३. रत्नविशेष. १४. निदिध्यास. १५. संशय. १६. चिंतन.
न. (आयु.) भिवईवरील एक मर्मस्थान.
वि. पुन्हा पुन्हा येणारा. [सं.]

**आवर्त (करण)** न. (नृत्य) उजवा पाय कुंचित करून पुढे पसरणे, असे अनेकवार करणे, उजवा हात आकुंचित करून पुढे पसरणे व पुन्हा आकुंचित करणे, डावा हात वक्षस्थळावर ठेवणे. [सं.]

**आवर्तकी** स्त्री. (आयु.) मोतीबिंदूतील एक दृष्टिदोष. त्यात दृष्टी (बाहुली) भोवऱ्यासारखी चंचल, तांबूस व काळी होते. [सं.]

**आवर्तचिन्ह** न. (सास.) एखाद्या कलाकृतीत वारंवार येणारा शब्द, वाक्य प्रयोग, प्रतिमा किंवा कथासूत्र. [सं.]

**आवर्तणे** सक्रि. १. आवर्तन करणे; घोकणे : 'येरां स्तोत्र की नाममंत्र । आवर्तवर्णे पवित्र ।' –ज्ञा १६.१०४. २. फिरून येणे. ३. वरचेवर म्हणणे. ४. परत परत करणे. [सं. आवर्तन]

**आवर्त दशांश** (ग.) व्यवहारी अपूर्णांकास दशांशाचे रूप देताना कधी कधी भाग बरोबर सुटत नाही व भागाकारात तेच तेच अंक पुन्हा पुन्हा येतात. उदा. ९५÷९० = १.०५५५५ इ. अशा जातीच्या दशांशास आवर्तदशांश म्हणतात. फिरून फिरून येणारा जो भाग त्यास आवर्त प्रदेश म्हणतात.

**आवर्तधक्के** पुन्हा पुन्हा बसणारे धक्के. 'जरा वेगळ्या कारणामुळे आवर्तधक्के व आवर्तलहरी निर्माण होतात.' – निभा पृष्ठ ८

**आवर्तलहरी** पुन्हा पुन्हा उठणाऱ्या लाटा. 'त्या ठिकाणी भूकंपाच्या आवर्तलहरी निर्माण होतात.' – निभा पृष्ठ ८

**आवर्तन** न. १. फिरणे; भोवताली फिरणे, फिरवणे; ढवळणे. २. पुन्हा पुन्हा म्हणणे; आवृत्ती; संथा; पाठ; पारायण (धार्मिक ग्रंथ, स्तोत्र, रुद्राध्याय इ.काचे) : 'नित्य दहा सहस्र आवर्तनें पूर्ण । क्षोणी पाळा करी सप्तदिन ।' –शिवलीलामृत ११.११९. ३. अभ्यास करणे; सवय करणे; पठण करणे. ४. एखाद्याकडे वळणे, फिरणे, येणे. ५. (संगीत.) कोणत्याही एका तालाचा संपूर्ण मात्रा समूह. ६. घुसळणे. ७. धान्य चाळणे. ८. अनेक धातू एकत्र कढविणे. ९. वस्त्रगाळ करणे. १०. मध्यान्हानंतर छायेने उलटणे. [सं.]

**आवर्तना** स्त्री. (मानस.) अशिक्षित वर्तनप्रकारातील एक प्रकार; खालच्या पातळीचे प्राणी विशिष्ट क्रिया करतात. उदा. पतंग दिव्यावर झडप घालतो. [सं.]

**आवर्तनी** स्त्री.१. सोने इ. धातू आटविण्याचे भांडे, मूस. २.पळी.[सं.]

**आवर्तप्रतिध्वनि–नी** पु. (संगीत.) पुन्हा पुन्हा ऐकू येणारा प्रतिध्वनी : 'निरनिराळ्या अंतरावरील समांतर अडथळ्यावर ध्वनि आवर्तप्रतिध्वनि उत्पन्न होतो.' – स्वरशास्त्र ३५. [सं.]

**आवर्तप्रदेश** पु. आवर्तदशांशातील पुन्हा पुन्हा येणारा भाग.

**आवर्त सारणी** पहा : **आवर्ती कोष्टक** [सं.]

**आवर्तिक** वि. विशिष्ट कालावधीने पुन: पुन्हा येणारा.

**आवर्तित (जंघा)** स्त्री. (नृत्य) डावा पाय उजव्या पायावरून उजव्या बाजूस व उजवा पाय डाव्या पायावरून डाव्या बाजूस नेऊन ठेवला म्हणजे जंघांचे एक स्वस्तिक बनते, ती स्थिती. विदूषकाचे चालणे दाखवण्याचे वेळी हा अभिनय करतात. [सं.]

**आवर्तिता** स्त्री. (भौ.) एखादी गोष्ट नियमाने पुन्हा पुन्हा घडण्याची स्थिती, अवस्था. [सं.]

**आवर्ती** वि. ठरावीक कालानंतर पुन:पुन्हा येणारा. उदा. आवर्ती खर्च, वारे इ.; (वै.) विषमज्वर, मलेरिया यासारखे पुन्हा उलटणारे दुखणे.

**आवर्ती कोष्टक** (रसा.) रासायनिक मूलद्रव्यांची कोष्टकरूपात केलेली मांडणी. [सं.]

**आवर्ती ठेव** स्त्री. ठरावीक रक्कम दरमहा किंवा ठरावीक मुदतीने बँकेत ठेवणे. ही रक्कम विशिष्ट कालावधीनंतर सव्याज परत मिळते.

**आवर्दा** पु. जीवित; आयुष्य. [सं. आयुर्दायचा अप.]

**आवर्धक** वि. वाढवणारा; भर घालणारा. [सं.]

**आवर्धन** न. वाढ; वृद्धी; भर. [सं.]

**आवर्धित करणे** सक्रि. भर घालणे; वृद्धी करणे; वाढवणे.

**आवर्षण** न. वर्षाव : 'सत्कथेच्या आवर्षणीं । भरूनि अमृतसिंधुचें पाणी' – मुआदि १.१०४.

**आवर्षांत** क्रिवि. संबंध वर्षात; उभ्या वर्षात; वर्षभर; सालभर. [सं. आ+वर्ष+अंत]

**आवल** वि. प्रथम दर्जाचा; पहिला; पहा : **अवल** : 'कोणे महाली गद्दी जमीन । त्याच्याहि तीन प्रती निवडून । पहिली आवल म्हणून । चांगली याहून इतर' – पमार्षेदु.

**आवल** पु. वैल, चुलीच्या मुख्य भागातून जो जाळ चुलीच्या बाजूच्या भागात जातो तो भाग : 'आवलावर दुधाचे खरकटे मडके घोंगत पडले आहे.' – फुसवा ८.२५१.

**आवलणे** उक्रि. १. वल्हविणे; वल्हे मारणे; नाव चालविणे : 'जें आवलितां भावबळें । तोडी कर्माकर्मक्रूरजळें ।' – एभा २.३१५. २. आवळणे;

घट्ट धरणे : 'वायां चि मान पीली । आठूंइ हियें आवली ।' - राज्ञा ६.७७. [सं. आ+वल्]

**आवला–आवलकरी** पु. १. वल्हे मारणारा; नाव वल्हविणारा; वल्हेकरी; आवल्या : 'मग डोहीं महाविशाळीं । बाळ लोटिलासे जळीं । परि धरिला वरुण आवली । विष्णुचेनि धाकें ।' -कथा ७.७.२०. २. (ल.) कर्णधार; सूत्रधार; मार्गदर्शक : 'उसती पुसती नेत्र युक्तीनें समजाविती राज्याचे आवले नाना ।' - गापो ८३. ३. पुरुष. [सं. आ+वल्]

**आवली** स्त्री. १. पंक्ती; ओळ; रांग; पंगत. सामा. शब्द - रोमावली, रत्नावली, पद्मावली इ. २. एकावली; एका सराची माळ; हार : 'एकावलिएची काढिली । दोरी जैसी ।।' -राज्ञा १३.५२९. [सं.] (वा.) **आवलीस होणे** - प्रारंभ होणे : 'येक सारकर कडू यास पालवण न चालवे म्हणून नातवास दिधले तैंपासून वृत्त (वृत्ति) आवलीस जाली.' - पाक्षज्ञाइखं १.१९. ३. आवळा.

**आवली पोवली** वि. अवती भोवती : 'माहिंभट .. श्री प्रभुचे सेवादास्य करितीः तेथ आवली पोवली असती' - इप्र ७.२.

**आवले** न. वल्हे : 'लावूनि विवेकाचें आवलें । तोडिती कर्माकर्मांची जळें ।' -एभा २०.१७८.

**आवलेकरी** पु. वल्हे मारणारा.

**आवल्या** पु. १. पहा : **आवला** २. शेतीवाडीच्या सर्व कामाची देवघेव ठेवून ते काम व्यवस्थित चालविणारा मनुष्य; कर्णधार.

**आवशी** स्त्री. पूर्वरात्र : 'काळ न म्हणे हाट घाट । न म्हणे आवशी पहांट ।' - एभा १०.४२४.

**आवशी** स्त्री. आई; आईस : 'म्हेनत करून हेच धर्तरि आवशीची चाकरी कर.' - मसाप २.३६९. (गो. कों.)

**आवशीचो घव** पु. (अपशब्द) आईचा नवरा.(हेट.)

**आवशुद्ध** वि. नीट; बांधेसूद; प्रमाणशीर; आकारशुद्ध.

**आवश्यक खनिजे** न. (भू.) अग्निज खडकाचे नाव व प्रकार निश्चित करण्याच्या दृष्टीने ज्या खनिजांचा विचार आवश्यक ठरतो ती खनिजे.

**आवश्यकता** स्त्री. जरुरी. (अर्थ.) गरजा.

**आवस** स्त्री. आई.

**आवस** न. १. वाघ, सिंह इत्यादी हिंस्र पशू गाय, हरीण वगैरेंना मारून त्यांचे थोडे मांस खाऊन दुसऱ्या दिवसासाठी काही राखून ठेवतात ते. २. आमिष; गळ वगैरेस पीठ लावतात ते. [सं. आमिष]

**आवसथ्य** पु. १. अग्निहोत्र्याच्या पंचाग्नीपैकी एक. पहा : **पंचाग्नी** २. गृह्याग्नी : 'आवसथ्याग्निहवन । गुरुवासरीं अवंतिये जन्मदिन ।' - स्वादि १०.३.२०. [सं.]

**आवसरिया** पु. वेळ सांगणारा सेवक.

**आवसवाकडे** वि. वेडेवाकडे.

**आवसा** पु. तात्पुरते बांधलेले घर; झोपडी; खोप; खोपडी; मांडव; प्लेग इ. साथीचे रोग गावात बळावल्यास गावाबाहेर तात्पुरती बांधलेली झोपडी : 'पांढरपेशी ब्राह्मण, गुजर, सोनार, कासार वगैरे मंडळी गांवाबाहेर आवशांत किंवा शेतातल्या पडळीत वगैरे राहण्यास गेली.' -सुदे २०१. २. अमावास्या. [सं. आ+वास]

**आवसावरचा वाघ** पु. १. आवस (पूर्वदिवशी राखून ठेवलेले मांस) खाण्यास आवेशाने जाणारा वाघ. २. (ल.) चिरकाल इच्छित वस्तूचा उपभोग घेण्यास प्रवृत्त झालेला; तापट; अधिरा; रागीट; जहाल.

**आवसिक** वि. अगत्य; अगत्याचे; आवश्यक : 'परि आवसिक पांडवा । ऐसा ठाओ जोडावा ।' -ज्ञा ६.१७९.

**आवस्ता** वि. अवास्तव; विनाकारण : 'आम्ही आवस्ता भुललों तुझ्या योगें ।' - दावि ७७६. [सं. अवास्तव]

**आवस्वर** पु. वेळ; अवसर : 'विश्वामित्राचा अंतरीं । क्रोध तत्काळ प्रवेश करी । मग उठतां ते आवस्वरीं । वशिष्ठें बैसविला ।' - वेसीस्व १.४९. [अवसरचा अप.]

**आवह** वि. आणता; नेता; घडविता; वाहून आणणारा; संपादन करणारा. सामा. शब्द - गुणावह, सुखावह, दुःखावह, संकटावह, हितावह, शोकावह, भयावह, हर्षावह, कल्याणावह इ. [सं.]

**आवळ** वि. १. घट्ट; करकचलेले; दाबलेले; अडचलेला (भात इ.).

**आवळकटी–ठी,** आवळकाठी स्त्री. वाळलेले आवळे; सुकवून ठेवलेले आवळ्याचे तुकडे. [सं. आमलक+काष्ठ]

**आवळणे** अक्रि. १. आकसणे; आकुंचित होणे; आखूड होणे. २. दृढ होणे; घट्ट होणे; खाली बसणे (चिखलात बांधलेली इमारत, चित्रा नक्षत्रातील पावसाने भिजलेली जमीन). ३. गच्च बसणे; आवळणे (दात, हिरड्या). ४. भरून येणे; दाटणे; रसरशीत, भरदार होणे (वेळेवर पडलेल्या पावसामुळे येणारे पीक). ५. लठ्ठ होणे; अंग भरून येणे; गुबगुबीत होणे. (रोड जनावरांस चांगले खाद्य मिळाल्यामुळे जनावर, गरिबीची स्थिती सुधारल्यामुळे माणूस). वरील काही ठिकाणी सकर्मकही उपयोग करतात. [सं. अव+आ+वलन]

**आवळणे** उक्रि. १. घट्ट बांधणे–करणे; आवळणे; मजबूत बसवणे; ताठ ओढणे. २. गच्च दाबणे; जोराने पकडणे. ३. रगडणे; दाबणे; चुरणे (अवयव); धुणे : 'जळीं आवळी वस्त्रमोळी' - गंर ५८. ४. आवळून धरणे; घट्ट मिटणे (मूठ). ५. लुबाडणे; बळकावणे; जबरदस्तीने ताबा घेणे; हिसकावून घेणे; काबीज करणे. ६. फौजेचा व्यूह रचून तयार होणे : 'तिकडे मोगल आपले तळावर तयार होऊन जमावसुद्धा आवळून उभा राहिला.' - भाब १४४. ७. आलिंगणे; मिठी मारणे : 'त्वां हृदयीं स्वभुजीं धरूनि आवळिला ।' - भक्तमयूरकेका २८. [सं. आ+वल्]

**आवळसर** किंचित बारीक; किडकिडीत; अरुंद; चिंचोळे.

**आवळसरा** वि. आवळ्यासारखा; खडे असलेला.
पु. गंधकाचा एक प्रकार; खड्यागंधक.

**आवळा** पु. फलविशेष; एक आंबट तुरट फळ. (वा.) **आवळा देऊन कोहळा काढणे** - क्षुद्र वस्तूच्या मोबदल्यात पुष्कळ घेणे.

**आवळाजावळा** वि. जुळे. [सं. युगुल]

**आवळी** स्त्री. आवळ्याचे झाड; याचे दोन प्रकार आहेत - एक रायआवळी व दुसरी कृष्णआवळी. [सं. आमलकी]

**आवळी** ओळ; पंक्ती : 'प्रश्नावळीची कथा । आइकों धावला ।'- ज्ञा १५.४२७.

**आवळी भोजन** न. कार्तिक शुद्ध चतुर्दशीस कृष्णअवळीच्या झाडाखाली देवता समाराधनेनिमित्त केलेले जेवण.

**आवळे जावळे, आवळीजावळी** पु. स्त्री. न. जुळी भावंडे.

**आवळ्याची समई** स्त्री. जिच्या मधल्या दांड्याचे वेढे आवळ्याप्रमाणे वाटोळे गेंदेदार असतात, अशी समई.

**आवंजणे, आवंजे** पहा : **आवणे, आवणी** : 'माझें आवंजें (भाताची लावणी) उद्या होणार आहे.'

**आवंटन** न. वाटप, वितरण.

**आवंढा** पु. मुखातील क्षणोक्षणी गिळावा लागणारा द्रव (रस).

**आवंढेकरी** पु. गावंढेकऱ्याच्या उलट. राहणे एका गावात, परंतु शेत करतो दुसऱ्या गावात असा माणूस.

**आवंतणे** क्रि. १. पहा : **अवंतणे** : 'तें सवंसारदु:खासि अवंतणें । ओगरिलें गा ।।' – राज्ञा ९.४३६. २. भोजनासाठी केलेले आमंत्रण. ३. बोलावणे; निमंत्रणे.

**आवंतर** वि. पहा : **अवांतर** : 'आर्धीच पुणे गुलजार, तशामंधिं अपूर्व बसला आदितवार । त्यांत कृष्ण श्रीमंत आवंतर समस्त यादव परिवार ।' – ऐपो २००.

**आवंती** वि. अवंती नगरासंबंधी.

स्त्री. एक भाषा. ही महाराष्ट्री व शौरसेनी यांचे मिश्रण आहे. [सं.]

**आवंदा** क्रिवि. यंदा; यावर्षी; 'तुम्ही आवंदाची मस्लत बुडविली तरी पुरवेल.' –भाब ४४.

**आवा** पु. १. कुंभाराची भट्टी. २. भाजायच्या किंवा भाजलेल्या मडक्याची रास : 'आवा भाजलियावर । घेऊनि जाई सत्वर ।' – भावि ९.१७०. [का. आवि=भट्टी] (वा.) **आवा लुटणे** – भाजलेल्या मडक्यांची रास करून तिचे पंचोपचारे पूजन करून सुवासिनींकडून लुटविणे. **आवा उतरणे** – १. मडक्याची भट्टी नीट भाजून निघणे. २. स्वत:ची सर्व मुले जगून प्रौढ दशेस येणे. ३. उपाय सफल होणे.

**आवा** पु. ओल्या भाताची मूठ.

**आवा** स्त्री. १. बाई : 'असली तरवार बहादुर आवा आमासनी साफ बायकू नको.' – बाय २.३. २. राख; रक्षा; ३. ठेवलेली स्त्री; रंडी; वेश्या; व्यभिचारी स्त्री. [सं. अंबा, का. अव्वा]

**आवा** पु. १. आयणातून काढून आवणूत लावण्यासाठी उपटलेली मूठभर भाताची रोपे, रोपांचा पुंजका; पुन्हा लावलेली अशी रोपे. २. वांगी, मिरच्या वगैरेंची नवीन वाफ्यातून लावलेली रोपांची जोडी. (कों) [सं. आ + वप् =पेरणे]

**आवाई** पहा : **अवाई** : 'टिपूची बाजारआवाई येत होती ती लटकी; तो आहे ...' – ऐलेसं ७.३६१६. (वा.) **आवाई खाणे** – धास्ती घेणे, जरब, भीती वाटणे.

**आवाईतवाई** स्त्री. संकट : 'राजे, आई, वर असून गडास मोंर्चेत आवाईतवाई. हजार दोन हजार फौज गमाजीनें जथली.' – पुदभा १.२३७.

**आवाका** पु. १. शक्ती; सामर्थ्य; आकारमान; अवसान; धैर्य; उमेद : 'बहुतीं मांडिले आवांके । वीरश्री म्लानमुखें । म्हणती पातलों कौतुकें । महोत्साह पहावया ।' – मुआदि ४१.४८. २. विचार; सारासार विचार; मर्यादा; रीत : 'अहो जी आइका । तुमतें नाहीं कृपेचा आवांका । तरि येथें बीजे करोनि कां । मातें चुकविलें. ।' – ऋ ३२. ३. अभिमान : 'मी एक चतुर बोलका । हाही नुठी त्या आवांका । बोल बोलूं नेणें फिका । बोलोनीं नेटका अबोलपणा ।' – एभा २८.४४९. ४. सार; अभिप्राय; गोळाबेरीज : 'तया अर्थजातां अशेषां । केला तात्पर्याचा आवांका । तो हा आठरावा देखा । कलशाध्यायो ।' – ज्ञा १८.१४५५. ५. आटोका; कबजा : 'तेथ एरादळांचा आवांका । कवणुकरी ।' – शिव ९०७. ६. अंदाज; तर्क : 'तैसा धरूनि आवांका । म्हणे स्वर्गु जोडेल असिका ।' –ज्ञा १७.१८७. ७. सवड; फुरसत : 'काल कांहीं त्यास आवाका जाहला नाहीं.' – ऐलेसं ६९. ८. (ग.) चलाचे मूल्य ज्या मर्यादेत कोणतेही असते, ते मर्यादित अंतर.

**आवाचा (माणूस)** वि. इभ्रतीचा; वजनदार; जबरदस्त : 'गाइकवाड गंगा उतरून गेला मागे बापू वगैरे फौज आहे. येकूण पुर्ता आवाचा माणूस कोणी नाही.' – पुदभा १.२४७.

**आवाज** पु. नग; ऐवज; संख्या; तोफाच्या मोजदादीत येणारा जुना संख्यादर्शक शब्द : जसे – तोफा आवाज २५ म्हणजे तोफा संख्या २५ : 'जेजाला सुतरनाले व थोरलीं भांडीं येकूण आवाज, दीड हजार या प्रमाणे आराबा पसरून उभे राहिले.' – पाणिब २४. [फा. इवज़् =द्रव्य]

**आवाज, आवाजी** पु. स्त्री. १. ध्वनी; सूर; शब्द; नाद. २. बातमी; गडबड. ३. कटकट; गलबला. ४. कानावर संवेदना घडवणारे हवेतील विशिष्ट तरंग. ५. एखाद्या व्यक्तीच्या उच्चारातील वैशिष्ट्य. [फा.] (वा.) **आवाज उठवणे** – १. आरडाओरड करणे. २. तक्रार करणे : 'घटस्फोटांच्या विरुद्धही आवाज उठविण्यात आला.' – स्त्रिकावा १०३. **आवाज काढणे** –१. बोलणे; शब्द करणे; कुरकुर करणे. २. ऐपतीबाहेर आव दाखविणे (कु.) ३. (कानाखाली) थोबाडीत मारणे. **आवाज देणे** – हाक मारणे; 'त्या वेळीं जमादार त्यास आवाज देऊन आपलेकडे बोलावून घेतो.' –चित्त्याची माहिती १७. **आवाज टिपेत लागणे** – १. वरचढ होणे. २. मोठा होणे : 'आन्शीचा आवाज नेहमीप्रमाणे टिपेत लागला होता.' – भूज ४६.

**आवाजचाचणी** स्त्री. आकाशवाणी; दूरदर्शनवरील कार्यक्रमात सहभागी होण्यासाठी होतकरू कलावंताला द्यावी लागणारी आवाजाची कसोटी.

**आवाजदार** वि. चांगल्या आवाजाचा; चांगल्या नादाचा, ध्वनीचा.

**आवाजदारकाम** न. (बडोदे) सोन्याच्या, चांदीच्या, अल्युमिनियमच्या वगैरे जाळीदार घाटात नखामध्ये रत्न खुले बसविण्यात येते ते काम.

**आवाजदारी** स्त्री. आवाजी; सुरेलपणा; आवाजाचा झोकदारपणा, खणखणीतपणा.

**आवाजा** पु. १. शब्द; आवाज. २. कीर्ती; बोलबाला. [फा. आवाझ़]

**आवाजावा** स्त्री. येजा; येणेजाणे; दळणवळण; वहिवाट; वहिवाटीचा हक्क.

**आवाजी** स्त्री, चांगला, सुरेल आवाज.

**आवाजी मतदान** प्रत्यक्ष मते न मोजता अनुकूल व प्रतिकूल सभासदांच्या आवाजावरून कोणत्या बाजूस अधिक पाठिंबा आहे ते ठरवणे.

**आवाट** पु. १. परीघ; घेर. २. आसमंतातील प्रदेश. [सं. आवृत्त]

**आवाठ** पु. वाडी; वाडा; आवाड : 'तॉ सुताराचा आवाठाक आसा' =

तो सुतारवाड्याला आहे. (कु.) [सं. आ+वाट]

**आवाठ** पु. १. मोठेपणा; व्यापकता. पहा : **आवाट** २. ताकद; शक्ती. (गो.) [सं. आ+वृद्धि]

**आवाड** व. आवार; अंगण; पटांगण; दाराभोवतीची बंदिस्त जागा.

**आवाडी** स्त्री. (नाविक) सुकाणू फिरवण्यासाठी लावलेला दांडा, काठी. (कों.) [सं. आवृत्त = फिरणे]

**आवाण** न. नागली, मिरची वगैरेचे कोवळे रोप. पहा : **आवण**

**आवातण– न** न. आमंत्रण; अवंतण.

**आवान** पु. वेळ. [फा.]

**आवाप** पु. पेरणे; सामा. शब्द – धान्यावाप, बीजावाप, क्षेत्रावाप. [सं. आ+वप्=पेरणे]

**आवापन** न. कोष्टयाचा माग; सूत कातण्याचे यंत्र. [सं.]

**आवाय** पु. शौचविधी. : 'तेयाचा धनी आवायासि निगाला ।' –लीचउ ५१२.

**आवार** पु. १. कुंपणाच्या आतील जागा; परसू; वाडगे; वाडा; अंगण : 'उत्तरद्वारीं यादवेश्वर । पैंल मदनाचा आवार ।' – कथा १.६.१५५. २. कुंपण; हद्द; ज्याने वेढतात, मर्यादित करतात असे वई, वडांग, कठडा, भिंत, तट, गडगा, गावकूस : 'कीं गंधर्वनगरीचें आवार ।' –ज्ञा ९.१७३. ३. वेढा; आवरण; बंदिस्तपणा.

न. 'गोसावीयासि आवारीसि घेउनि गेले' – लीच १.२१. [सं. आ+वृ]

**आवारखाना** पु. आवारातील पायखाना; शेतखाना.

**आवारा** पु. १. आब; मोठी तयारी; बडेजाव; काही मोठ्या योजनेचा घाट, डौल. (क्रि. घालणे). २. (ल.) फुटल्यानंतर पुन्हा फुगणे, तयार होणे (गळू वगैरे). (क्रि. धरणे, घालणे.)

**आवारा** वि. उगीच भटकत फिरणारा; रिकामटेकडा. [फा. आउर्दन् = भटकणे; आवारा =भटक्या] (वा.) **आवारा होणे** – बहकणे; भकणे; उनाडासारखे फुटून पळून जाणे; भडकणे : 'यलगंदलचे सफरेंत रघुनाथराव दादा त्या जिल्ह्यांत आवारा जाहले.' – पुअभा १.१०४. [माळवी.]

**आवारा** पु. नासाडी; नुकसान : 'गयाळाचें काम हिताचा आवारा । लाज फजितखोरा असत नाहीं ।' –तुगा ३१२८. [फा. आवारा करना = नासाडी करणे] (वा.) **आवारा करणे** – १. उधळणे; खर्च करणे. २. गमावणे : 'तीनचार करोड रुपयाची जिंदगी व मुलूख व दौलतेसह पेशवे यांचे दोस्तीत (दोस्तीसाठीं) आवारा करून नवाबसाहेब पुणेस गेले.' – दसकैया २३७.

**आवारिव** न. १. भक्षण; भोजन; मेजवानी : 'भूतावळी आवारीव केलें । दैत्य मांसाचें ।' – शिव १०५९. २. ताव मारणे.

**आवारी** पु. १. शेतावरचा मुकादम. २. पाटलाच्या घरचा कारभारी.(व.)

**आवारु–रुं** सार्वजनिक भोजन; 'एकसरें आनंदाचें आवारु । होत जगा ।।' –ज्ञा ९.२०१.

**आवारू** वि. दोन : 'सेलु पोकू आणि ढकार । आवारू खूण सांगती सत्वर ।' – भवि ४.२.४६. (नंद)

**आवारूकाटी** वि. चाळीस. (नंद)

**आवारूबिट्टी** वि. दोनशे. (नंद)

**आवाऱ्याचा वेल** पु. वालाचा वेल; एक प्रकारचा भाजीचा वेल : 'उंट अनेक प्रकारचे पाले खातो... आवाऱ्याचा वेल ....' – आंप ३४.

**आवास** पु. निवासस्थान; वसतिस्थान; ठिकाण; वस्ती. [सं.]

**आवासक्षेत्र** न. (भू.) मानवी वसतीच्या परिसरातील प्राकृतिक, भौतिक, जैविक इ. प्रकारची परिस्थिती मानवाच्या जीवनक्रमावर परिणाम करते. त्या सर्व परिस्थितीचा विचार ज्यात आहे असा परिसर. [सं.]

**आवासी** पु. काही काळ परदेशातून राहण्यास आलेला.

**आवासी मानव** पु. (भू.) मानवाच्या उत्क्रांती मालिकेतील एक टप्पा; एक अवस्था.

**आवासी रुग्ण** पु. दवाखान्यात भरती झालेला.

**आवाहणे** उक्रि. बोलावणे; आमंत्रण करणे. [सं. आवाहन]

**आवाहन** न. १. आमंत्रण; बोलावणे : 'ज्ञानाचे आवाहनमंत्र । जें ज्ञान पिकतें सुक्षेत्र ।' –ज्ञा १८.७१. २. आर्जवपूर्वक विनंती; आग्रहपूर्वक, मन:पूर्वक आळवणी. ३. नवीन केलेली मूर्ती किंवा एखादी वस्तू यामध्ये देवतेला प्रवेश करण्यासाठी बोलावणे. [सं.]

**आवाहनपत्र** न. १. एखाद्या सनदी उपदेशकास मंडळीचे पालकपण स्वीकारण्यासंबंधाने पाठविलेले पत्र. २. पाचारणपत्र; निमंत्रणपत्र. [सं.]

**आवाहन – विसर्जन** न. १. बोलावणे व निरोप देणे : 'आवाहन–विसर्जनेवीण । शालीग्रामीं माझें अधिष्ठान ।' –एभा ११.१३५४. २.देवतेची प्राणप्रतिष्ठा करणे व तिला निरोप देणे.

**आवाहित** वि. १. आवाहन केलेली (देवता). २. आमंत्रित; बोलावलेला. [सं.]

**आवाळबोय** वाळविलेले आवळे.

**आवाळा–ळी** स्त्री. राक्षसी (मुक्ते. रामा. ४.६५) २. पहा : **आवळा**

**आवाळू** न. १. ओठाचा भाग; ओठ : 'जें अनर्थाचे कानवेरी । आवाळुवें चाटीत निघे बाहेरी ।' –ज्ञा ९.१८२. २. जबडा : 'मग परसूनियां आवाळें । ग्रासूं धावला गोपाळें ।' – कथा ४.६.१८. ३. गंडस्थळ : 'मुर्डीव शुंडादंड सरळे । शोभें अभिनव आवाळें ।' – दास १.२.१२. ४. डोके : 'आकाशीं लागलें आवाळें ।' – वेसीस्व १.६५.[सं. आ+वल्]

**आवाळू** गळू; मासार्बुद; चामखीळ; वाळुक. हे जन्मत: किंवा नंतर रक्तदोषामुळे उत्पन्न होते : 'शोभें जयास निटिलीं लघुसें अवाळें । – रामदासवर्णन.

न. मांसपिंड; मांसवृद्धी; चामखीळ. [सं. अर्बुद]

**आवाळे** न. डोके.

**आवांकणे** क्रि. १. विश्लेषण करणे : 'जें एकबेळ आवांकुनिया सांगावें ज्ञान ।' – ज्ञा १८.१३३७. विचार करणे; अंदाज घेणे : 'गोसावी नीरूपीलें तें आवांकीत होता.' –लीच ४.६०.

**आविन्यास** पु. (विअ.) आंतररचना; बाह्याकृती. [सं.]

**आविर्भवणे** अक्रि. १. प्रकट होणे; उत्पन्न होणे; उदयास येणे; व्यक्त होणे : 'कृष्णस्वरूपाची प्राप्ती । भीमकी सादर श्रवणार्थी । हृदयीं आविर्भवली मूर्ती । बाह्यस्फूर्ती मावळली ।।' – एरुस्व १.८७. २. दिसणे; दृग्गोचर होणे; स्पष्ट, उघड दिसणे : 'कीं संध्याराग पश्चिमें आविर्भवला ।' [सं. आविर्भू]

**आविर्भवन** न. प्रकटीकरण; दृग्गोचरता; उघडपणा; प्रसिद्धी. [सं.]

**आविर्भाव** पु. १. प्रगट स्वरूप; अवतार; उघडपणा; मोकळेपणा; स्पष्टदर्शन; प्रसिद्धपणा. २. हावभाव; अंगविक्षेप; चेष्टा; मनातील विकारांचे दिग्दर्शन; हातवारे. ३. आब; डौल : 'शूरत्वावांचूनि शूरामाजी ठाव । नाहीं आविर्भाव आणितिया ।' -तुगा ३१३८. ४. (संगीत) एखाद्या रागाचे आलाप घेत असता अन्य रागाची छाया सामान्य स्वरसमुदायामुळे उत्पन्न होऊ लागल्यास प्रस्तुत रागाचे रागवाचक स्वरसमुदाय पुढे आणून ती छाया दूर करणे व प्रस्तुत रागाचे स्वरूप प्रकट करणे. [सं.]

**आविर्भूत** वि. अवतरलेला; प्रकट झालेला; प्रकाशलेला; उघड झालेला; दिसलेला; मुळीच गुप्त न राहिलेला; स्पष्ट; उदय पावलेला; उगवलेला. [सं. आविर्भू]

**आविष्करण** न. प्रसिद्धीकरण; प्रकटीकरण; उघड करणे; फोडणे (गुप्त गोष्ट); स्पष्ट करून दाखवणे; उघडकीस आणणे; जाहीर करणे. [सं.]

**आविष्करणे** उक्रि. १. प्रकट होणे; प्रतिबिंबित होणे; स्फुरणे : 'नाना कथारूपें भारती । प्रकटली असे त्रिजगती । आविष्करौनि महामती । व्यासाचिये ।' – राज्ञा १.३२. २. अभिमान धरणे; गर्व वाहणे; आवेश चढणे : 'जो कांसे लागोनि तरे । तया पोहती उर्मी नुरे । पुरोहितु नाविष्करे । दातेपणें ।' – ज्ञा १८.१६९. [सं. आविष्करण]

**आविष्कार** पु. १. (सास.) विचार, अनुभव इत्यादींचे शब्दात किंवा इतर माध्यमाद्वारे केलेले प्रकटीकरण; अभिव्यक्ती. २. गोचर रूप देणे; व्यक्त करणे. [सं.]

**आविष्कृत** वि. १. आविष्कार केलेले; व्यक्त, प्रकट केलेले, झालेले. [सं.]

**आविष्ट** वि. स्वाधीन झालेला; ग्रासलेला; पछाडलेला; व्याप्त झालेला (विकार वगैरेंनी). सामा. शब्द – कामाविष्ट, क्रोधाविष्ट, शोकाविष्ट, कोपाविष्ट, लोभाविष्ट, हर्षाविष्ट, आवेश. [सं. आ+विश्]

**आवि(वी)स** न. १. आमिष; लालूच : 'न धावे अर्थ कामाचिया आविसा ।' – भाए २५९. २. मांस : 'आंवींस आरोगिलें, उडाला ।' –उषा ८५४. [सं. आमिष]

**आविसाळे** न. पक्ष्याचे घरटे; आश्रयस्थान : 'सत्संग सूर्याचे मेळीं । देहाचीं आविसाळीं । सांडिती जीव ।' –एभा २६.४३७. [सं. आविस्+आलय]

**आविंज–झ** स्त्री. आवणी; भाताची पुन्हा लावणी; आवाणातून काढून आवणूत रोपे लावणे; आवणे. (कों.) [सं. आ+विन्द्]

**आविंजणे** क्रि आविंज करणे; आवणूत रोपांची लागण करणे. पहा : **आवणे** [सं. आ+विन्द्=अलग करणे; आवणे]

**आवीज** पु. सूचना; नोटीस. (गो.) [पोर्तु. आव्हीजु]

**आवुत्त** पु. बहिणीचा नवरा. [सं.]

**आवृत** वि. १. (भूशा.) झाकलेला; स्मृति नष्ट झालेला; भूपृष्ठाखाली खोल पुरलेला. २. व्याप्त; वेष्टिलेला; गुरफटलेला : 'तिन्हीं गुणीं आवृत । हे वेद जाणें निभ्रांत ।' – ज्ञा २.२५६. [सं.]

**आवृतकंद** पु. (वन.) आवरण असलेला कंद; यात रसाळ खवले एकमध्य मांडलेले असून त्या सर्वाभोवती पातळ खवल्यांचे वेष्टन असते. उदा. कांदा, लसूण. लसणातील कुड्या अन्न साठविलेल्या कळ्या असतात व कांद्याच्या बाबतीत रसाळ खवले हिरव्या पानांचे तळभाग असतात. [सं.]

**आवृत प्लेसर** स्त्री. (भूशा.) नदीचा गाळ, तलाव, समुद्र किंवा हिमनदीच्या खाली असणारी मौल्यवान खजिनयुक्त वाळू.

**आवृत्त** वि. फिरलेला; वेढे घेतलेला; गुंडाळलेला; गरगर फिरलेला; घोळलेला; ज्याची आवृत्ती झाली आहे असा. [सं. आवृत्त]

**आवृत्तणे** सक्रि. पुनरावृत्ती करणे.

**आवृत्तता** स्त्री. (ग.) एकच गोष्ट पुन्हा पुन्हा येणे. [सं.]

**आवृत्ति–त्ती** स्त्री. १. उजळणी; एखाद्या गोष्टीचे आरंभापासून शेवटपर्यंत पुन्हा एकवार अनुष्ठान. २. परतणे; परत येणे; ये जा करणे; परत करणे; परत तेच करणे; पुन्हा पुन्हा उजळणी; अभ्यास : 'इतिहासाची आवृत्ति तशी पुनःपुन्हा दावी ।' –विक ५. ३. मनात घोळणे; चिंतन करणे : 'वृत्ती तिये आवृत्तीसीं । बुडोनि जाय ।।' –ज्ञा १८.११३५. ४.(तत्त्व.) पुनर्जन्म; जन्ममरणाचा फेरा. ५. एखाद्या पुस्तकाचे पुन्हा मुद्रण, प्रकाशन : 'काव्याची पुनरावृत्ती काढतेवेळी जास्त टीपा द्याव्या.' –विवि (१८७६) ८.७.१२६. [सं.]

**आवृत्ति–त्ती (काल)** स्त्री. (ग.) पुन्हा पुन्हा येणाऱ्या घटनांमधील ठरावीक कालांतर. [सं.]

**आवे** वि. कच्चे; निरसे (दूध). (व.)

**आवेग** पु. १. जोर; वेग; जोराची गती. २. मन : क्षोभ; संताप; आवेश. ३. तीव्रता (दुखण्याची); ठणका; तिडीक; अस्वस्थता. ४. एक गौण मनोभाव; व्यभिचारी भावाचा एक प्रकार. ५. घाई; लगबग; धांदल. सामा. शब्द– दुःखावेग, शोकावेग. [सं.]

**आवेगशील** वि. (एकदम उत्पन्न झालेल्या) प्रेरणेप्रमाणे वागणारा; मनस्वी; मनसोक्त वागणारा. [सं.]

**आवेगी प्रेरक** पु. (यंशा.) गती देणारी शक्ती.

**आवेच** वि. वेचरहित; अव्यय : 'आवेचु अमोघ सांधी । तू प्रकट कृष्णनिधी ।' – ऋव ३०५.

**आवेट** वि. १. अवीट. २. साधे. ३. रुचिपालट करणारा : 'पालटाकारणें आवेट अन्नें । तैसींच माझीं वचनें । पराकृतें । –दास १.६.१२.

**आवेदक** पु. फिर्यादी; अर्जदार; निवेदन करणारा. [सं.]

**आवेदन** न. नम्रतापूर्वक विनंती; अर्ज; निवेदन; गाऱ्हाणे; फिर्याद. [सं.]

**आवेदनपत्र** न. काही मागणी, विनंती करणारे पत्र; विनंती अर्ज. [सं.]

**आवेधक** पु. यंत्राने भोके पाडणारा. [सं.]

**आवेल** न. नारळ खवून त्याचा चव पाण्यात उकळून त्याचे काढलेले किंवा चवाचा दाट रस कढवून काढलेले तेल. हे थंडीने अंग फुटले असता त्यावर किंवा जखमेवर लावतात; आव्याळ; गुठेल. (गो. कों.) [गो. अवल = कोवळा नारळ]

**आवेल** पु. वैल; चुलीचा बाजूचा भाग : 'अवश्य म्हणोनि पंचचुली चेतविले आवेला ।' – सप्र १५.४.

**आवेव** पु. अवयव : 'अघटघटी हरीची माया । अलक्ष लक्षेना ब्रह्माया । आवेव अंडामार्जी तया । देवमाया रचियेले ।' – एभा ७.५७४.

**आवेवस्त** वि. फजीत. 'स्वामी कार्तिकु आवेवस्तु । कला ।।' –उह १६४३.

**आवेश** पु. लक्ष्य; अवकाश : 'निगणेया आणि प्रवेशा । चित्त नेदीतु आवेशा ।' –ज्ञा १६.२८२.

**आवेश** पु. १. एका मनोभावाचे किंवा विकाराचे मनावर वर्चस्व; एका विकाराधीन सर्व मनोव्यापार असणे; क्षोभ; आवेग; संचार; विकारवशता; विकाराचा जोर. सामा. शब्द – कामावेश, क्रोधावेश, पिशाचावेश, लोभावेश, मोहावेश, शौर्यविश. २. उत्कंठा; उत्सुकता; तल्लखपणा; त्वरा; घाई. ३. संताप; राग : 'देवे एव्हढा आवेशु कीजे । कवणांवरी' – शिव ६७२. ४. पछाडणूक. ५. भूतपिशाचबाधा. ६. मूर्च्छा (अपस्मार). ७. वसतिस्थान. [सं.]

**आवेशहत्त्या** स्त्री. (विधी) मनःक्षोभाच्या भरात केलेला वध.

**आवशणे** अक्रि. १. आवेशयुक्त होणे; स्फुरण पावणे; उद्युक्त होणे. २. रागावणे; संतापणे; क्षुब्ध होणे : 'तव वातात्मजा आवेशला । म्हणे धरूनी आणीन दुदुंभीला । मग तो आकाशीं उडाला । नाहीं देखिला कोणीही ।' – जै ६७.३९. ३. प्रवेश करणे; शिरणे; व्यापणे : 'मनीं आवेशलें अद्‌भुत.' [सं. आ+विश्]

**आवेशी** वि. १. आवेशयुक्त; उत्साही; जोरदार; तापट; तल्लख. २. आवेशाने आक्रान्त; क्षोभ पावलेला. ३. धमक असलेला.

**आवेष्टक** पु. पुस्तकांना वगैरे पुठ्ठा चढवणारा; सामानाची बांधाबांध करणारा; पुडकी तयार करणारा. [सं.]

**आवेष्टन** न. एखाद्या वस्तूभोवती गुंडाळलेले वस्त्र. कागद वगैरे आवरण; आच्छादन; पुष्टिपत्र. [सं.]

**आवेष्टन खर्च** पु. (अर्थ.) खोकी, पोती, पुडकी इत्यादींमध्ये माल बांधण्यासाठी येणारा खर्च.

**आवेष्टित (अंगुली)** स्त्री. (नृत्य) एका हाताने दुसऱ्या हाताच्या तर्जनीपासून आरंभ करून त्या हाताच्या तळहाताच्या बाजूने वेढा घालणे. [सं.]

**आवेस** पु. १. शरीरयष्टी; ठेवण; शरीराचा बांधा. (गो.) २. आविर्भाव; उत्साह; क्षोभ, पसारा, आवेश : 'मग तया उदकाचेनि आवेशें ।' – ज्ञा ७.५८.

**आवेंगवाणा, आवेंगवाणे** व्यंग नसलेला; दोषरहित; अव्यंगमान : 'तेया आवेंगवाणेया ब्रह्मातें । प्रयाणकाळें प्रार्पे ।' – राज्ञा ८.९०; 'तें एकु वेळु अवेंगवाणें । कीजो कां मज सांधणें ।' – राज्ञा १५.४१४.

**आवै** स्त्री. आई. 'आवै सोसीत, बापूस पोशीत = आई शुश्रूषा करणार व बाप पैसा खर्च करणार (तिऱ्हाईताचे काय जाते?).' (गो.) [का. अव्वा]

**आवो** उद्‌गा. अ. अहो; अगे : 'तंव सावासिनी भाणितलें । आवो आवो गोसावी आले ।' – शिव १७४.

**आवोस** स्त्री. रात्रीचा सुरुवातीचा समय.

**आव्त, आव्त्** पु. खटला. (गो.) [पोर्तु. आवतु]

**आव्ती** स्त्री. आहुती; आवती. (गो.)

**आव्ती मारप** खर्चात पाडणे; खोट आणणे. (गो.)

**आव्ह** वि. नावाचे : 'भसुरे प्रमाण सावळे अनंत । आव्हाकार गणिती तयामाजी ।।' – ज्ञागा ६४१.

**आव्हा** वि. १. उजवा. २. नाव.

**आव्हाट** पु. प्रतिबंध; आखाडा; आडमार्ग : 'कीं आव्हाटीं म्हैसवा धरू। नव्हतां दृष्टीगोचरू।' – ऋ ४८.

**आव्हाटचक्र** न. उल्हाटचक्र – शक्ती, भूलभुलावणी; मायाजाळ : 'जे अंतरींच भ्रमलें । मायासंभ्रमें संभ्रमलें । तयासह कैसे उकलें । आव्हाटचक्र।' – दास १४.९.२३.

**आव्हाटणे** पहा : **अव्हाटणे** : 'आव्हांटलिया तरी जोडे । स्वर्गसुख ।' – ज्ञा ६.१५८.

**आव्हाटा** पु. १. प्रतिबंध. २. आखाडा. पहा : **अव्हाट**

**आव्हाड–ढ** न. आवार. आव्हाढ : 'मागल्या दाराकडे जंगली झाडपानाचे विस्तीर्ण आव्हाड असायचे.' – माजीगा ५५.

**आव्हाता** वि. बोलावणारा; हाक मारणारा : 'माझा सज्जनीं मातें । पैशून्याचेनि अव्हातें ।' – राज्ञा १८.१४८९. [सं. आ+व्हे =बोलाविणे]

**आव्हान** न. १. आमंत्रण; बोलावणे; पाचारणे. २. सामन्यास, वादविवादास, युद्धास निमंत्रण : 'मी त्यांस आव्हान करून सांगतों की जी काय माझी निंदा करावयाची असेल ती घारपुरे यांनीं खुशाल करून घ्यावी.' – लोटिकेले १.३६३. २. नाव; संज्ञा; नाव देणे. (वा.) **आव्हान देणे** – एखादी गोष्ट (मुद्दा, हुशारी, सामर्थ्य) सिद्ध करून दाखवण्यासाठी वादविवाद किंवा स्पर्धा करायला विरोधकाला बोलावणे; सामन्यास बोलावणे. [सं. आ+व्हे]

**आव्हानणे** उक्रि. १. बोलावणे; हाक मारणे; पाचारण करणे : 'इंद्रादि अष्टौ लोकपाळ । आव्हानूनियां सकळ ।'– एभा २७.२६७. २. युद्धास, सामन्यास वगैरे आमंत्रण देणे. ३. नाव देणे; नाव ठेवणे; संज्ञा देणे.

**आव्हान विसर्जन** न. आमंत्रण आणि निरोप देणे : 'गोसावी तयांसि आव्हान विसर्जन केले ।'– लीचउ ४८. [सं. आवाहन+विसर्जन]

**आव्हाशंख** पु. १. दक्षिणावर्ती शंख. २. (ल.) गरीब; दरिद्री; कंगाल.

**आव्हास** पु. आभास : 'जेयासि अमृतपणाचा आव्हासु ।' राज्ञा १०.१७७. [सं. आभास]

**आश** पु. लापशीसारखा पातळ पदार्थ. [सं.अशन]

**आश** स्त्री. आस; आशा; इच्छा : 'लोकांचा सारविला उंबरा देखती । तरी एका शिताची आश करिती ।'– शिव १५०. [सं. आश]

**आशक** वि. १. खूष, फिदा; अनुरक्त. २. प्रणयी; प्रियकर. [फा. आशिक्]

**आशकड** पहा : **आसकड**

**आशकमाशूक** न. प्रणयी जोडपे; प्रियकर व प्रेयसी.

**आशकी** स्त्री. प्रणयानुनय; प्रियाराधन. [फा. आशिकी]

**आशन** न. खाणे : 'आत्मयाचें समाधान । घडे तैसें चि आशन । – दास १७.५१६. [सं. अशन]

**आशन** धनुष्य : 'राऊताचे शीर तुटे । गाढे आशन न लोटे ।'– उह १४०८.

**आशनाई** स्त्री. मैत्री; नाते; परिचय. [फा.]

**आशय** पु. १. उद्देश; हेतू; अभिप्राय; मनीषा. २. ठिकाण; स्थान; आगर; साठा. सामा. शब्द- अन्नाशय, जलाशय, मूत्राशय इ. 'अमुच्या अशुभाशयाचा धातु । करिता चरणधूमकेतू ।' -एभा ६.१११. ३. सार; तात्पर्य; गाभा. ४. शयनस्थान. ५. उदर; पोट; कोठा. ६. आतील भाग, पोकळी. ७. संस्कार; वासना. ८. (भाषा.) मानवी अनुभव, आचारविचार, संस्कृती, भौतिक जग इत्यादींबद्दलचा भाषिक घटकांतून व्यक्त झालेला अर्थ. ९. एखाद्या कलाकृतीची शैली व बाह्यरूप वगळून असलेला भाग; कलाकृतीची अन्वर्थकता; कलाकृतीची विषयवस्तू; गाभा. [सं.]

**आशयगर्भ** वि. ज्यात अर्थ, सूचना, संकेत इ. काही तरी आहे असा : 'भाषा म्हणजे आशयगर्भ ध्वनिप्रवाह होय.' [सं.]

**आशयसूत्र** न. (सास.) लेखनाचा किंवा भाषणाचा विषय; कथानकाचा विषय. [सं.]

**आशरफी** स्त्री. सोन्याचे नाणे. [फा.]

**आशरिन** वि. मोहरमचा नववा दिवस.

**आशंकणे** अक्रि. १. शंकित होणे; साशंक होणे; कचरणे; भिणे; भय वाटणे. २. शंका येऊन प्रश्न करणे. [सं. आ+शंक्]

**आशंका** स्त्री. १. भीती; अंदेशा; शंका ; संदेह; खात्रीचा किंवा समाधानाचा अभाव; संकोच. २. (तर्क.) आक्षेप; शंका; विधानाला हरकत : 'आतां प्रश्न शर घेऊन । विदारीत आशंकाते ।' -पांप्र २७.४२. [सं.]

**आशंका निवृत्ति-त्ती** स्त्री. शंकेचे, आक्षेपाचे निरसन; स्पष्टीकरण; फोड. [सं.]

**आशंकित** वि. १. भ्यालेला; साशंक असलेला, झालेला; विश्वास ढळलेला; बुझलेला. २. शंका घेणारा; भीती बाळगणारा; अंदेशा असलेला. [सं.]

**आशंसणे** अक्रि. आशा, इच्छा, अपेक्षा करणे : 'मायाबहिनी आशंसिति आमचा दांडिये डोळिये कै जाईल.'-चक्रसूत्र २१. [सं. आशंक]

**आशा** स्त्री. १. अपेक्षा; आकांक्षा; आसक्ती. २. इच्छा; वासना; मन. ३. आवड; प्रेम; लोभ. ४. दिशा : 'धेनु कुरूनीं वळिल्या येवूनि उत्तराशेला.' - मोविराट ६.३३ (वा.) **आशेची निराशा होणे-** अपेक्षा, आशा, हेतू फलद्रूप न होणे; हिरमोड होणे. [सं.]

**आशाकार** वि. आशा करणारा; आशावादी.

**आशादायक** वि. आपल्याला हवे ते घडणार आहे असे वाटायला लावणारा; उमेद वाढवणारा. [सं.]

**आशादुराशा** स्त्री. बरीवाईट इच्छा; अपेक्षा; माया; लोभ; आशा आणि भीती : 'आशा दुराशा त्यजा । आधिं तो उमजा । स्वहित समजा । दुर्भाव टाका दुजा । मुक्तीस लावा ध्वजा ।'

**आशाधोशी** वि. हावरा. (गो.)

**आशानिराशा** स्त्री. आशा आणि निराशा; आशेची निराशा.

**आशापाश** पु. १. संसारातील अपेक्षा, इच्छा, हेतू यांचे जाळे; मोहजाल; विषयजाल. २. (व्यापक) जगराहाटी; जग. [सं.]

**आशाबद्ध** वि. १. आशापाशात सापडलेला; सांसारिक, आशा, अपेक्षा यांनी जखडलेला; लोभी; हावरा : 'आशाबद्ध बोलो नये । विवेकेवीण चालो नये ।'- दास १४.१.७७. २. आशावादी; आशायुक्त. [सं.]

**आशाभंग** पु. निराशा; हिरमोडा.

**आशाभूत** वि. (प्र.) आशाळभूत; हावरा; लोभी.

**आशावणे-आशवणे** अक्रि. आशा करणे; इच्छा करणे; आस धरणे; लोभ धरणे. [सं. आशा]

**आशावाद** पु. जगात दु:खापेक्षा सुख अधिक आहे आणि जगात अखेर सत्याचा किंवा सत्पक्षाचाच विजय होणार आहे असे प्रतिपादन करणारे मत; भविष्याबद्दल, भवितव्याबद्दल विश्वास, उमेद बाळगणारे तत्त्वज्ञान. [सं.]

**आशावान-वादी** वि. (विरू) आशावंत; आशाविष्ट; आशायुक्त; आशा ठेवणारा; विश्वास, उमेद असलेला. [सं.]

**आशाविणे** उक्रि. आशा करावयास लावणे; आशा उत्पन्न करणे; लोभविणे. [सं. आशा]

**आशाहामतपन्हा** राज्याचा रक्षणकर्ता. [अर.]

**आशाळ-ळू** वि. १. लोभी; हावरट; आधाशी. २. आशावादी. [सं. आशालु]

**आशाळभूत** वि. १. अतिशय आधाशी. २. आशावादी. ३. हावरट; लोचट. ४. खोटी किंवा प्रमाणाबाहेर आशा धरणारा.

**आशिक** पु. स्त्री. १.आशीर्वाद : 'सकळिक आशिका देती ।' -वसा ७०. [सं. आशालु]

**आशिक** क्रिवि. १. जरा वेळ : 'न्हा आशिक. जेवणवेळ हाये ही.'- मिरास १७६. २. सावकाश.

**आशिलपणा** पु, कुलवंतपणा.

**आशिल्लो** वि. खाऊन पिऊन सुखी असा (मनुष्य). (गो.) [सं. अश्]

**आशिष** पु. आशीर्वाद, आशिर्वचन. [सं. आशिस्]

**आशी** वि. खाणारा; सेवन करणारा. सामा. शब्द-अमृताशी, विषाशी, अन्नाशी, अल्पाशी, मिताशी, पथ्याशी. [सं.]

**आशी** पु. आशीर्वाद : 'त्यासी आशी देतो, देतो पुत्रां जशी पिता ठेव ।'- मोआदि २.२३. [सं.]

**आशीक** वि. प्रणयी; लुब्ध; (विशिष्ट गोष्टींची) आवड असणारा. पहा : **आशक** [फा. आशिक्]

**आशीपाशी** क्रिवि. सभोवताली; चौफेर; जवळपास; आसपास.

**आशीर्वचन** न.१. एखाद्याचे कल्याण चिंतिणे; आयुरारोग्य; पुत्रपौत्र, संपत्ती इ. प्राप्त होवो असे इच्छिणे; स्वस्तिवाचन; शुभचिंतन; दुवा. (क्रि. देणे, घेणे, करणे). २. इच्छा; वर. [सं.]

**आशीर्वादणे** अक्रि. आशीर्वाद देणे; अभीष्ट चिंतणे : 'आशीर्वादुनि साधु साधु वचनें आले तदा गोपुरा ।'- आता ४.

**आशीर्वाद पत्र** न. मान्यवर व्यक्तीकडून, वडील माणसांकडून लहानास, सर्वसामान्य माणसास पाठविण्यात येणारे, अभीष्टचिंतनपर पत्र. [सं.]

**आशीर्वादार्थ, आशीर्वादार्थक** वि. शुभेच्छाप्रदर्शक; अभीष्ट चिंतणारे; ईश्वराचे स्वरूप वर्णन करून- 'असा जो ईश्वर तो तुमचे रक्षण करो' अशा अर्थाचा (श्लोक, वाक्य इ.) ; आशीर्वादपर. [सं.]

**आशीविष** पु. साप; सर्प. [सं.]

**आशीष** पु. आशीर्वाद : 'चंद्र इंद्र प्रजापति सकळिक आशीष देती ।' – वसा ५०. [सं. आशिस्]

**आशु** क्रिवि. लवकर; त्वरित.

**आशुकमाशुक** पहा : **आशकमाशुक**

**आशुकारी** वि. झटकन परिणाम करणारा; शीघ्र परिणामी; तीव्र. [सं.]

**आशुग** पु. शर; बाण; इषु : 'गुरु सात्यकिमुक्ताशुगपटल न दे लेश मार्ग वातातें ।' – मोद्रोण ११.४४. [सं.]

**आशुतोष** पु. लवकर प्रसन्न होणारा, सहजपणे समाधान पावणारा; शंकर. [सं.]

**आशुरा, आशूरा, आशोरा** मोहरमचा नववा अथवा दहावा दिवस; मोहरमचे पहिले दहा दिवस. : 'सांप्रत मोहरमचे आशुऱ्याचे दिवस.' – भइसा ५.९३. [फा. अशूरा]

**आशुलिपिक** पु. लघुलेखक.

**आशूब** पु. तुफान; दुर्दैव. [फा.]

**आशेखोर** वि. आशाळभूत. : 'थोड्याशा भांडवलावर व्याजबट्टा करणारे अडाणी बहुधा आशेखोर असतात.' – गांगा १११.

**आशेभाण** न. कमालीचा हावरा, आधाशी. [गो.]

**आशोधन** न. (यंअ.) यंत्राचे भाग सुटे करून तपासून पुन्हा जोडणी करणे. [सं.]

**आशौच** न. १. कोणी सपिंडादी जन्मला किंवा मेला असता किंवा प्रेत वाहून नेले असता (खांदा दिला असता), त्याचे दहनादिक केले असता धर्मशास्त्राप्रमाणे श्रौतस्मार्तादी कर्माविषयी अनर्हता आणि अस्पृश्यत्व अशी होणारी स्थिती. २. ग्रहण लागले असता ते सुटेपर्यंत व त्यानंतर स्नान करीपर्यंत येणारे अशुचित्व. ३. (सामान्यत:) सुतक (मेल्याचे); विटाळ. सामा. शब्द – जननाशौच, ग्रहणाशौच, शवाशौच, पाताशौच, अनुगमनाशौच, दर्शनाशौच, स्पर्शाशौच इ. ४. (ल.) अशुद्धत्व; घाणेरडेपणा; गबाळेपणा; अजागळपणा. [सं.]

**आशौची** वि. आशौच असलेला; सुतक असलेला.

**आश्कारा, आस्कारा** पु. १. थाटमाट; भपका; ऐट. २. कीर्ती; प्रसिद्धी; लौकिक : 'भवानीपंताचा आश्कारा मात्र, सोंगें कांहीं चमत्कारिक नव्हती.' – ऐटि १.५८. [फा. आश्कारा]

**आश्चर्य** न. १. विस्मय; कौतुक; नवल; अचंबा : 'आश्चर्या अति पावली बघुनियां तूणीर पाठीवरी ।' – शबरी आख्यान. २. अद्‌भुत गोष्ट; चमत्कार; आश्चर्य वाटणारी गोष्ट : 'कांहीं आश्चर्य पहावें असें मनांत आहे.' – कर्म १.३८. अशुद्ध रूपे – आश्चिर्य : 'ब्रम्हानंद ते समईं । कोण आश्चिर्य होतसें ।' – वेसीस्व ३.२२. आश्चिर. (गो) [सं.]

**आश्चर्यणे** अक्रि. आश्चर्यचकित होणे; विस्मय वाटणे : 'आश्चर्ये शिवकार्य ऐकुनि शहा यद्‌वृत्ति हो गोजिऱ्या' – जयजयकार (स्वातंत्र्यशार्दूल). [सं. आश्चर्य]

**आश्चर्यमूढ** वि. विस्मयचकित; आश्चर्यचकित; थक्क. [सं.]

**आश्चोतन** न. डोळ्यात औषधाचे थेंब टाकणे. [सं.]

**आश्नाई** स्त्री. स्नेह; सख्य; परिचय. : 'तेथें रंगोजी पटवारी यासी आश्नाई होती त्या आसरियानें राहिलो.' – भाअ १८३४.१४१. [फा. आश्नाइ]

**आश्नाव, आशनाव** पु. स्नेह; सख्य : 'हिंदुस्थानचे पठाणाचाहि तो आशनाव नाही' – पेद २.७१. [फा. आश्नाई = सख्य]

**आश्रणी** वि. अशारीरिक, दैवी : 'तंव आश्रणी वाचा जाली ।' – लीचपू ३५३.

**आश्रम** पु. १. ब्राह्मण क्षत्रियादी त्रैवर्णिकांना धर्माने घालून दिलेले ब्रह्मचर्य, गृहस्थ, वानप्रस्थ व संन्यास हे चार मार्ग किंवा अवस्था. यांस वर्णाश्रम असेही म्हणतात : 'नित्यानित्य होमद्वारें । ब्रह्माग्नि प्रज्वळला एकसरें। जाळूनि आश्रमांची चारीं घरें । केलें खरें निराश्रमी ।।' – एभा ७.२६६. २. पर्णकुटी; पर्णशाला; निवासस्थान; मठ, पाठशाला; ऋषींच्या वस्तीचे ठिकाण : 'आणि वयसा वित्तकामु । ययांचा वाढवी संभ्रमु । म्हणोनि मदें आश्रमु । तोचि केला ।' – ज्ञा १८.७५८; 'साहोनि काम क्रोध अहंकार । आश्रमीं अविनाश साधी रे ।' – तुगा २४८३. ३. संन्यास; चतुर्थाश्रम. ४. गोसाव्यातील एक पंथ. ५. निवाऱ्याचे, राहण्याचे ठिकाण, आश्रयस्थान–विधवाश्रम, कुष्ठाश्रम. ६. तप, साधना करण्यासाठी निवांत जागा. [सं.]

**आश्रमचतुष्टय** पु. ब्रह्मचर्य, गृहस्थ, वानप्रस्थ, संन्यास हे चार आश्रम.

**आश्रमधर्म** पु. ब्रम्हचर्य, गृहस्थाश्रम, वानप्रस्थाश्रम, व संन्यास हे चार आश्रम व त्यांत अनुक्रमे स्वाध्याय, यज्ञकर्मे, ज्ञानप्राप्ती, सर्वसंगपरित्याग इत्यादी कर्मे आचरणे हा धर्म. [सं.]

**आश्रमवासी** पु. आश्रमात राहणारा; तपस्वी; ऋषी. [सं.]

**आश्रमशाळा** स्त्री. आदिवासींच्या शैक्षणिक प्रगतीसाठी शासनाने सुरू केलेली निवासी शाळा : 'हल्ली शासनाने आदिवासींच्या शैक्षणिक प्रगतीसाठी अनेक आश्रमशाळा... काढलेल्या आहेत.' – आप्र १४.

**आश्रमा** पु. आश्रय; आधार : 'याचा थोर आश्रमा घेऊन सुरतेचे वारियावर आरमार ठेऊन दंगेदारास तंगी पोहचवून आमदरप्ती सुरळीत केली ऐसी तूर्त होऊन येईल.' – पेद २४.१९३. [सं. आश्रय]

**आश्रमांतर** न. एका आश्रमातून दुसऱ्या आश्रमात (ब्रह्मचर्यातून गृहस्थाश्रमात) जाणे; दुसऱ्या आश्रमाचा स्वीकार करणे. [सं.]

**आश्रमी** वि. १. चार आश्रमांपैकी एका आश्रमाचा. २. आश्रमवासी; तपस्वी; ऋषी वगैरे. [सं.]

**आश्रय** पु. १. आश्रयाचे स्थान; आधारस्थान; निवाऱ्याची जागा. २. संरक्षण; छत्र; आधार; आसरा; धारा; (राज्य) राजकीय अपराध्यांना दुसऱ्या देशाने दिलेला आसरा. ३. (ल. व अक्षरश:) दुजोरा; मंजुरी; पसंती; आधार; प्रमाण; कैवार; आधारभूत; प्रमाणभूत. ४. आश्रय असणे; आवलंबन करणे; स्वीकारणे; उपयोग करणे; पाळणे; वागणे; अनुसरणे; अभ्यासणे. ५. शेजार; सान्निध्य. सामा. शब्द – जलाश्रय, ग्रामाश्रय, वृक्षाश्रय इ. [सं.]

**आश्रयगृह** न. शरणार्थींना आसरा देण्यासाठी बांधलेले स्थान. [सं.]

**आश्रयण** न. आश्रय पाहणे; आधार देणे; आश्रयार्थ अवलंब करणे; धरून बसणे; चिकटून राहणे (मत, सिद्धान्त इत्यादिकांस). [सं.]

**आश्रयणे** उक्रि. १. आश्रय घेणे; निवाऱ्याकरिता अवलंब करणे; मदत देणे : 'सांडुनि आपुला आडळ । लवण आश्रयी जळ ।' – ज्ञा १८.१२५०. २. अनुसरणे; ग्राह्य मानणे; चिकटून बसणे (मत, सिद्धान्त यांस). ३. अवलंब करणे; स्वीकारणे; पाळणे (उपाय,

योजना). [सं. आश्रयण]

**आश्रयदाता** पु. मदत करणारा; आश्रय, आधार देणारा : 'डॉ. बाबासाहेब माझेही आश्रयदाते असल्यामुळे माझा तेथे प्रवेश झाला.' – थोसं १३९.

**आश्रयराग** पु. (संगीत.) स्वरांच्या थाटास ज्या एखाद्या प्रसिद्ध रागाचे नाव दिलेले असते तो.

**आश्रयस्थान** न. अनाथ लोकांना आसरा देण्यासाठी बांधलेले ठिकाण.

**आश्रयार्थी** पु. (राज्य.) राजकीय उत्पात, युद्ध यांसारख्या कारणांमुळे आश्रय घेण्यासाठी (विशेषत: परदेशात) जाणारी व्यक्ती; आश्रय मागणारी व्यक्ती; निर्वासित. [सं.]

**आश्रयी** वि. आश्रय करणारा; आश्रय घेतलेला; ज्याने आश्रय घेतला आहे तो; शरणार्थी; शरणागत. [सं.]

**आश्रव** वि. (प्राणि.) अश्रूसंबंधी. [सं.]

**आश्रा** पु. पहा : **आश्रय** : 'आपला सरकारचा आश्रा गेला असें त्यास वाटलें.' –लोटिकेले ४.४४. [सं. आश्रय]

**आश्रायणी** वाणी; आकाशवाणी; देववाणी : 'तंव आश्रायणी सूचनावचन' – दावि ४२.

**आश्रित** वि. १. आश्रय दिलेला; सांभाळलेला; पोसलेला. २. अनुसरलेला; पाळलेला; अभ्यासिलेला. ३. उपयोग केलेला; कामी लावलेला; आसरा घेतलेला; अवलंब केलेला. ४. आश्रयास असलेला; ज्यास काही कामगिरी नसून केवळ योगक्षेमासाठी ज्यास श्रीमंत लोकांनी नेमणूक करून दिली आहे असा भिक्षुक वगैरे. सामा. शब्द – राजाश्रित, भिक्षाश्रित इ. [सं.]

**आश्रित देश** देशाला लागून नसलेला पण देशाच्या आधीन असलेला प्रदेश. [सं.]

**आश्रित वर्ग** पु. आश्रय घेऊन राहणाऱ्या लोकांचा समूह. [सं.]

**आश्रुढाळ** वि. अश्रू गाळणारा; घोड्याचे एक लक्षण. (व.)

**आश्लिष्ट** वि. १. आलिंगलेला; कवटाळलेला. २. स्पर्शिलेला; चिकटलेला; वेष्टिलेला. [सं.]

**आश्लेष** पु. आलिंगन; भेट. [सं.]

**आश्लेषणे** अक्रि. आलिंगणे; आलिंगन देणे : 'सर्व इंद्रियें हिं आश्लेषावें । स्त्रियांतें चि ।' – राज्ञा १६.३३२.

**आश्लेषा** स्त्री. सत्तावीस नक्षत्रांपैकी नववे नक्षत्र. [सं.]

**आश्वलायन** पु. १. या नावाचा एक ऋषी; आश्वलायन श्रौत व गृह्य सूत्राचा कर्ता. [सं.]

**आश्वलायन सूत्र** ऋग्वेदाच्या शाकल शाखेचे सूत्र, याचे १६ अध्याय असून १२ अध्यायांस श्रौतसूत्र व चार अध्यायास गृह्यसूत्र म्हणतात. श्रौतसूत्रात हौत्र विषय असून गृह्यसूत्रात संस्कार व इतर स्मार्त विषय आहेत. [सं.]

**आश्वस्त** वि. हमी दिलेला. [सं.]

**आश्वास** पु. धीर; आश्वासन : 'आश्वास दिधला दयाघनें ।' – दावि २६०. [सं.]

**आश्वासक** वि. भरवसा देणारा, खात्री देणारा, हमी देणारा.

**आश्वासणे** सक्रि. १. धीर देणे; आशा दाखवून उद्युक्त करणे; उत्तेजन देणे : 'आश्वासावे दास । तरी घडतो विश्वास ।' –तुगा १६८५. २. बोलावणे; हाक मारणे : 'ऋषी करू गेला अनुष्ठान । मागें आले त्रयमूर्ति आपण । अनुसयेसी आश्वासून । अतिथि आलो म्हणती ।' – गुच ४.२७. [सं. आश्वासन]

**आश्वासन** न. १. धीर; उत्साह; उत्तेजन : 'तिसी द्यावें आश्वासन । उदईक आहे तुझे लग्न । तुवां असावे सावधान । पाणिग्रहण मी करीन ।' – एरुस्व ५.७८. २. वचन देणे; ग्वाही देणे; खात्री देणे.

**आश्वासन एजंट** पु. (व्यापार.) मागणी नोंदवणारा व शिवाय खरेदीवर मालाची रक्कम अदा करील याची हमी घेणारा एजंट. (मध्यस्थ).

**आश्वासन समिती** स्त्री. (राज्य.) शासनाच्या वतीने विधानसभेत दिलेल्या आश्वासनांचा पाठपुरावा करणारी विधानमंडळ सदस्यांची समिती.

**आश्वासित** वि. आश्वासन दिलेला; प्रोत्साहन, धीर दिलेला. [सं.]

**आश्विन** पु. मराठी बारा महिन्यांतील सातवा महिना. [सं.]

**आश्विनगौरी** वि. आश्विनातील गौरींच्या सुमारास तयार होणाऱ्या नाचणीच्या एका प्रकाराचे नाव. [सं. आश्विन+गौर]

**आश्विना–नी** वि. आश्विन महिन्यासंबंधी (आदितवार, पौर्णिमा तिथी इ.) स्त्री. आश्विनी पौर्णिमेस ज्येष्ठ अपत्यास ओवाळणे. [सं. आश्विन]

**आश्वील** पु. अस्वल. [सं.]

**आषक** पहा : **आशक**

**आषा** आस्था : 'त्याने हिम्मत धरून किल्यावर मात्र आहे. मुलकाची आषा मोडली. –' पेद भा २७.११८.

**आषाढ** पु. चैत्रादी बारा महिन्यांपैकी चौथा महिना. [सं.]

**आषाढ झड, आषाढ दवणा, आषाढखाना, आषाढ पागोळी, आषाढ पाटी, आषाढभूती** पहा : **आखाड**

**आषाढा–ढी** वि. आषाढासंबंधी.

**आषाढी** स्त्री. आषाढ महिन्यातील शुद्ध एकादशी. पहा : **आखाडी**

**आषेत** स्त्री. अक्षत, तांदूळाचा दाणा. 'श्री. विठ्ठल देवारायासि... आषेता ।'– पंढर शिला (पे) ३.२४

**आष्ट** एक झाड.

**आष्टपाट** आठ पट्टराण्या.

**आष्टा** स्त्री. रानतुळस.(व.)

**आष्णी** स्त्री. घुसळखांबाची दोरी. (गो).

**आस** स्त्री. आशा; इच्छा; अपेक्षा; हाव; उत्कंठा : 'परी कर्म फळीं आस न करावी । आणि कुकर्मी संगति न व्हावी ।' –ज्ञा २.२६६. (क्रि. धरणे, देणे, लागणे).

**आस** पु. स्त्री. १. (भोवऱ्याचा खेळ) रंगणात नेमका भोवरा टाकणे; रंगणातील भोवऱ्यास दुसरा भोवरा मारणे; रंगणटोला. २. एक बैदूल दुसऱ्या बैदूलास नेम धरून मारणे. [सं. अस् =फेकण.]

**आस** पु. १. गाडीचा कणा, हा लोखंडी किंवा लाकडी असतो. २. (ज्यो.) दोन ध्रुवांना जोडणारी जी कल्पित रेषा व जी पृथ्वीगोलाच्या अगदी मध्यातून जाते तिला आस म्हणतात. (सामान्यत:) ज्या कल्पित रेषेभोवती कोणताही गोल फिरतो ती रेषा. [सं. अक्ष]

**आस** न. धनुष्य : 'गणेश घे रत्नजडित आसा ।' – सारुह ५.३०. [सं.]

**आसक, आसुक** न. (बायकी) वाखा; पूर्ण दिवस भरण्यापूर्वी प्रसूती. [सं. सू – प्रसवणे]

**आसकड** न. अडचणीची जागा; खबदाड; दुर्गम स्थान : 'शब्दाचिया आसकडीं । भेदनदीच्या दोहीं थडीं । आरडाते विरहवेडीं । बुद्धिबोधु ।' – ज्ञा १६.५.

**आसका–के,आसखा** क्रिवि. सगळा; संपूर्ण : 'राया तूं पाहे पां विवेकें । जगचि आसकें गुरु दिसे ।' – एभा ७.३४१.

**आसका** वि. आश्रित : 'कंगाल तरी मी तुमचाच आसका ।' – दावि ६०. [सं. अस्=असणे]

**आसकी** वि. सगळी : 'संचित क्रियमाणें आसकीं । जाळोनियां एकाएकीं ।' – एभा ७.५०२.

**आसकूड** पु. गाडीचा आस, कणा. पहा : **आस** (व.)

**आसक्त** वि. १. अनुरक्त; परायण; निरत; लंपट; लोभी : 'तुका म्हणे जीव आसक्त सर्वभावें । तरतील नांवें विठोबाच्या ।' – तुगा २४९१. २. तत्पर. ३. तल्लीन; रत. [सं.]

**आसक्तता** स्त्री. शक्ती किंवा सामर्थ्य : 'स्वामींनी बहुतां दिवशी आशीर्वादपत्र पाठविलें तें पावोन आनंद जाहला तो लिहून कळविण्यास आसक्तता नाही.' – पेसा २८०.

**आसक्ति–क्ती** स्त्री. १. लोभ; तत्परता; तल्लीनपणा; लंपटता; भक्ती; व्यासंग; हव्यास : 'परी कर्मफळीं आसक्ती । धरूनियां ।' – ज्ञा २.२४५. २. मन जडणे; अनुरती; प्रेम; गोडी. ३. अतिशय आवड; मिळण्याची तीव्र इच्छा; व्यसन. [सं.]

**आसखा** वि. सर्व; प्रत्येक; किंवा सर्व समुदाय : 'कवणु कवणा न देखे । होते तेथें राहिले आसखे । येरीकडा जाऊ न सके । अंधारें करोनी ।' – क्रिपु १.१६.

**आसट** वि. १. पाहिजे त्याहून अधिक पातळ; सरबरीत. २. आशाळभूत.

**आसड** पु. गाय, म्हैस इ. कांचे थान, सड, अचळ.

**आसडणे** सक्रि. धान्य कांडणे; सडणे.

**आसडपासड** स्त्री. झांबडा झांबड, लुटालूट : 'बाहेर जे लोक सापडले त्याची आसडपासड केली.' – पेद.

**आसडा** पु. हिसडा; जोराचा हिसका : 'रंगलें तें अंगीं दावी । विष देववी आसडे ।' –तुगा ३१६४.

**आसडी** स्त्री. गाय, बैल, म्हैस इ. कांनी मारलेली लाथ. (क्रि. मारणे). (कों.) [सं. अस्=फेकणे]

**आसणी** स्त्री. घुसळखांबास बांधावयाची रवीची दोरी. [सं. अस्=फेकणे]

**आसताई** स्त्री. आस्था, ममता : 'आमचे आसताई पहिलेपासून होती. याजकरिता आम्हापासी आले.' – पेद १७.१२३.

**आसतुटी** वि. निराशा करणारे; आशा तोडणारे : 'तेवींचि कठिण बोलें आसतुटी । अर्जुन होईल हिंपुटी ।' – ज्ञा ११.४५३. [सं. आशा+त्रुट् =तुटणे]

**आसत्ति–त्ती** स्त्री. (तत्त्व.) १. सन्निधान. २. निकटता. ३. सान्निध्य. ४. (न्यायशास्त्रात) संबंध; सन्निकर्ष. [सं.]

**आसन** न. १. बैठक; बसकर; आंगठाण; बसण्याच्या उपयोगी पाट, खुर्ची, कोच, सतरंजी वगैरे वस्तू. सामा. शब्द. – कुशासन, दर्भासन, तृणासन : 'होईन गुरूंचें आसन । अळंकार परिधान । चंदनादि होईन । उपचार ते ।।' – ज्ञा १३.४२१. (वा.) **आसन गुंडाळणे** – बोचकी बांधून निघून जाणे; बिऱ्हाड उचलणे; निघून जाणे. **आसन जड होणे** – १. घट्ट बसणे; बसून राहणे. २. चढून जाणे; गर्वाने फुगून जाणे. **आसन जमणे** – १. चांगला जम बसणे. २. गच्च भरून येणे; दाटणे (ढग वगैरे). **आसन जमविणे** – जम बसविणे; आपला बस बसविणे; आपले स्थान स्थिर करणे. **आसन डळमळणे**– १. आपली जागा, बैठक अस्थिर होणे. २. (ल.) अस्वस्थ चंचल होणे; घडी विस्कटणे; बसलेला जम बिघडणे. ३. सत्तास्थान डळमळित होणे. **आसन ढळणे** – आपला बस, जम योग्यता–दर्जा वगैरे गमावणे. **आसन पडणे** – जागा मिळणे; जम बसणे वगैरे. **आसन रुंदावणे – वाढणे**– १. रुंद होणे; लठ्ठ होणे (शरीर). २. (ल.) मोठेपणा मिळविणे; लवाजमा वाढणे. **आसन सोडणे** – नेहमीची जागा, दर्जा, प्रांत सोडणे. **आसनी खेळणे** – १. (भुताटकी) आपल्या झाडामध्ये (पछाडलेल्या व्यक्तीच्या शरीरात) स्वच्छंदाने वावरणे, खेळणे; अंगात येणे. २. आपल्या जागेत आपल्या साधनांनी खोड्या, चेष्टा करणे. **आसनी येणे** – १. मूळपदावर, मूळ स्थितीला येणे. २. बसण्याचे वाहन– पक्षी, उंदीर वगैरे. जसे :– विष्णूचे वाहन गरुड, गणपतीचे वाहन उंदीर, शंकराचे वाहन बैल. ३. हातपाय वगैरे अवयवांची योगाभ्यासात किंवा सुरतप्रसंगी जी विशिष्ट प्रकारची रचना ती. जसे :– कुक्कटासन, मयुरासन इ. ही आसने ८४ आहेत : 'येकीचे हातीं विचित्र पट । चौऱ्यांयशी आसनांचे प्रगट ।' – मुरंशु ३. (वा.) **आसन घालणे, ठोकणे** – आसनमांडीप्रमाणे एखाद्या विशिष्ट पद्धतीने बसणे; स्थिर होणे; हटून बसणे. **आसन जोडणे** – उकिडवे बसणे. ४. बसण्याचा विशिष्ट प्रकार. जसे :– वीरासन, पद्मासन. ५. घोड्यावरील बैठक; घोड्याची पाठ; घोड्याच्या पाठीवर बसण्याची जागा. **आसन ओळखणे** – आपला स्वार कोण आहे हे (घोड्याने) जाणणे. **आसन ठरणे** – घोड्याच्या पाठीवर बसणे; स्थिर होणे. **आसन ठेवणे** – (घोड्यावर ) चढणे. **आसन बसणे** – स्थिर होणे. ६. पुस्तकाच्या पानावरील पानावरील रकाना; कॉलम; खाते; कोठा. ७. चार घटका बसणे. ८. न ढळता बंदोबस्ताच्या स्थानी राहणे, तळ देऊन राहणे. [सं.]

**आसनकुहा– वा** पु. घोड्याच्या ७२ खोड्यांपैकी एक खोड; घोड्याच्या पाठीवरील अशुभ चिन्ह.

**आसनकैद** स्त्री. बसण्याची सक्ती; बसून राहण्याची शिक्षा : 'ठराविक साच्यांचीं भाषणें ऐकण्याची आसनकैद सभासदांना कां म्हणून असावी?' – के १४.४.३९.

**आसनखोड–य** स्त्री. पहा : **आसनकुहा**

**आसनचलन** न. चंचलता; अस्थिरता; धरसोड; (अक्षरशः व लक्षणेने).

**आसनपेडी** स्त्री. बाक (बसावयाचे). (गो.)

**आसनबंध** पु. आसन बसविणे, नक्की करणे, घालणे (विशेषतः योगात).

**आसनमांडी** स्त्री. पहा : **आसनवटा**

**आसनरचना** स्त्री. पहा : **आसनबंध**

**आसनवटा** पु. दोन्ही पावले दुणून एक पाऊल दुसऱ्या गुडघ्याशी आणि दुसरे पाऊल पहिल्या गुडघ्याशी लावून बसण्याचा प्रकार.

**आसनविधि-धी** पु. १. योगातील आसने कशी करावी, ठेवावी वगैरे ज्यात सांगितले आहे असा विधी. २. एखादे धर्मकृत्य (जप, पूजा इ.) करण्यासाठी बसावयाच्या वेळी, ते कर्म संपेपर्यंत उठावयाचे नाही अशा नियमाने बसणे व त्यावेळी करावयाचे न्यास वगैरे विशिष्ट कर्म. [सं.]

**आसनवेदी** स्त्री. बैठकीचा ओटा : 'भविष्य काळांत हिंदु स्वातंत्र्य देवीच्या आसनवेदीवर हिंदु वीरांची नांवे कोरली जातील.' -के २.९.३१.

**आसनशुद्धि-द्धी** स्त्री. आसनाची ठेवण व रीत निश्चित करणे, अनुष्ठानापूर्वी तंत्रशास्त्रात आसनाचे अनेक प्रकार सांगितले आहेत त्याप्रमाणे आसन करणे.

**आसनाई** स्त्री. स्नेह; मैत्री : 'आमचे आसनाई पाहिले पासून होती याजकरितां आम्हापासी आले.' - पेद १७.१७०. [फा.]

**आसनी** स्त्री. पूजेस वगैरे बसण्यासाठी केलेले लोकरीचे लहान आसन, बस्कर. [सं. आसन]

**आसनी** स्त्री. आश्विनी पौर्णिमेस सर्वात वडील अपत्यास ओवाळण्याचा विधी.(व.) [सं. आश्विनी]

**आसनीवान** वि. यथेच्छ; आस निवेपर्यंत; तृप्त होईपर्यंत.(व.)

**आसन्न** वि. १. जवळचा; समीप असणारा; जवळ येऊन ठेपलेला; निकटवर्ती. २. (ग.) सत्य किंमतीच्या अगदी जवळचा. [सं.]

**आसन्नकार्य** वि. जे लगेच करावयाचे आहे असे. [सं.]

**आसन्नकाल, मरण, मृत्यू अवधी** वि. मरणोन्मुख; मरणास टेकलेला. [सं.]

**आसन्न क्रिया** स्त्री. (ग.) सत्य किंमतीच्या अगदी जवळ जाण्याची क्रिया. [सं.]

**आसन्नता** स्त्री. (यंअ.) जवळ जवळ येणे; सान्निध्य. [सं.]

**आसन्ननिद्र** वि. झोपेस आलेला.

**आसन्नप्रसव, प्रसूति -ती** वि. बाळंत होण्यास टेकलेले; प्रसूतिकाल जवळ आलेली (स्त्री, गाय, म्हैस इ.)

**आसन्नसमाधि** वि. समाधी घेण्याच्या बेतात आलेला (संन्यासी). [सं.]

**आसन्या ऐतवार** पु. अश्विनाचा शेवटचा रविवार : 'आश्विनाचे शेवटच्या रविवारी म्हणजे आसन्या ऐतवारी जत्रा झाली.' - गावरहाटी ७६.

**आसपाव** पु. दोरी, पट्टे, कासरा इत्यादी जोत जुंपण्याचे सामान.

**आसपास** क्रिवि. भोवताली; आजूबाजूस.

पु. (पुस्तक बांधणी) पुस्तकाची बांधणी करते वेळी त्यांच्या दोन्ही बाजूस चिकटवायचे कोरे कागद.

**आसपासचा, आसपासील** वि. आसपास असणारा; जवळपासचा; आजूबाजूचा.

**आसफरची जागा** स्त्री. अत्यंत अभिजात, महत्त्वाची जागा.

**आसफळ** न. आस नावाच्या झाडाचे फळ.

**आसबाब** पु. सामानसुमान; लवाजमा : 'यशवंतरावानें खुशालगडासही घेरा घातला तेव्हां फिरंग्यानीं ओझेंपाझें आसबाब होता तो तेथील तेथें टाकून सडे होऊन रात्रीस निघाले.' - होके १६२. [फा.]

**आसभास** पु. पुढे होणाऱ्या गोष्टीचा भास, चिन्ह, स्वरूप; लक्षण; तर्काला किंवा कल्पनेला वाव. [आसचे द्वि.]

**आसमसाहास** वि. अपूर्व : 'पाहता आसमसाहासः जेथ कुंठले निर्देश ।' - ऋव २४७.

**आसमंत** पु. शेजारचा, आजूबाजूचा भूभाग, प्रदेश.

**आसमंतचा** वि. शेजारचा; जवळचा; आसपासचा.

**आसमंतात** क्रिवि. सर्व बाजूंनी; सभोवताली; चोहोकडून; शेजारी; आसपास.

**आसमंतात (वर्तन)** वि. (ग.) विशिष्ट किमतीच्या पुढेमागे अगदी लहानशा फरकाने येणाऱ्या किमतीचा (गट).

**आसमान** वि. अथांग; अपार.

**आसमानी** वि. ईश्वरी; दैवी; मनुष्याधीन नसलेले (संकट वगैरे). [फा.आसमान्]

**आसमाप्ति-प्ती** क्रिवि. समाप्तीपर्यंत; शेवटपर्यंत; पूर्ण होईपर्यंत. [सं.]

**आसमाय** वि. न मावणारा; फार.

**आसमास** क्रिवि. सर्वत्र; सभोवती; आसपास; पुष्कळ; अतिशय; सतत; सहसा; कधीही; केव्हाही : 'मुखीं घालितां एक ग्रास । स्वर्गीं घणघणीं घंटाघोष । कदा न राहे आसमास । गजर विशेष जाहला ।' - हरि ३४.९५.

**आसमास** स्त्री. रीतिरिवाज; रीतभात. (गो.)

**आसर** पु. आश्रय; आसरा; मदत. [सं. आश्रय] (गो.)

**आसर, आसोर** पु. पावसाळ्यात पाऊस थांबून उघाडी पडते ती; उघडीप. (कों. गो.)

**आसरण** न. पावसापासून रक्षणाचे साधन, छत्री, रेनकोट. इ. (कु.) [सं. आश्रयण]

**आसरा** स्त्री. १. जलदेवता; तळी, विहिरी वगैरे ठिकाणी वास करणाऱ्या सात देवता; शेतातील देवता; प्रसूतिदेवता : 'वनदेवता गंधर्व यक्षिणी । गोंधळ घालिती महावनीं । आसरा जाज्वल्य रूप दाऊनी । तेच क्षणीं गुप्त होती ।' - हरि ११.१९१. [सं. अप्सरा]

**आसरा** पु. १. आश्रयस्थान; आश्रयाची, निवाऱ्याची जागा; आडोसा : 'तुझिया कृपेवीण ईश्वरा । आसरा आम्हा नाहीं दुसरा ।' २. बचाव; रक्षण; आच्छादन; छत्र. ३. आधार; प्रमाण. ४. (ल.) संमती; अनुमती; अधिकार; परवानगी. ५. थारा. [सं. आश्रय]

**आसराई** स्त्री. प्रसूतिदेवता; आसरा : 'आसराई सादर केला । रामचंद्र कौसल्ये ।' - स्त्रीगीत १२.

**आसल** न. तटाची भिंत; तट : 'गढीचा आसल उंच जाणोन सिड्याही तयार करविल्या.' - पेद.

वि. हासल; प्राप्त : 'याउपरी पुढें या प्रांती नवल अपूर्व वर्तमान आसल होईल ते लिहोन पाठवीन.' - पेद १०.३६. [फा. हासिल]

**आसलग-ळग** वि. १. सोपे; सुगम : 'अपाय इहीं आसलग ।' - ज्ञा १६.४२९. २. वरवर.

**आसलणे** अक्रि. १. मंदगतीने वाहणे. २. उसळणे : 'कीं गंगापय आसललें ।' - राज्ञा १३.२६९.

**आसलुंगी** क्रिवि. आसपास; जवळ : 'ती .. बसत नव्हती की बिघडलेल्या

बायाचे आसलुंगी उभी राहात नव्हती.' – बाय ३३.

**आसलूब** पु. तऱ्हा; पद्धत; व्यवस्था : 'त्याची चाल, कशी ते समजत नाहीं. तेव्हा तकरारी कोणे प्रकारच्या व कशा याचा आसलूब काय तऱ्हेचा हे दूरदेशीनें मनांत यावें.' – मइसा ७.८२. [फा.]

**आसव** न. १. एखाद्या वस्तूचे औषधीप्रयोजनासाठी काढलेले सत्त्व, अर्क. याकरिता त्या वस्तूचे बाष्पीकरण करून त्या वाफेचे द्रवात रूपांतर करण्यात येते. ती वस्तू एखाद्या द्रवात उकळून तिचे सत्त्व काढण्यात येते. किंवा थेंबाथेंबाने पाझरण करून ते गोळा करण्यात येते. २. ऊस, काकवी वगैरेपासून काढलेली दारू. ३. (सामान्यत:) मद्य. ४. अर्क. [सं.]

**आसवणे** अक्रि. आशाबद्ध होणे.पहा: **आसवणे** [सं. आशा]

**आसवद** न. सणादिकाच्या दिवशी बलुत्यास द्यावयाचा ठरावीक हक्क किंवा देकार : 'वैशाखमासी कुंभारानें मृत्तिकेचे कलश घरोघर द्यावे त्यास आसवद द्यावे दाणे.' – ऐसंसाखं ३.१२८.

**आसवन** न. (शाप.) प्रवाही पदार्थ त्याच्या उत्कलनबिंदूपर्यंत तापवून त्याची वाफ गार करून आपल्याला हवा असलेला पदार्थ त्यातून बाजूला काढणे; अर्क काढणे. [सं.]

**आसवनिक, आसवणिक** पु. मद्य तयार करणारा व विकणारा.

**आसवनी–णी** स्त्री. दारूची भट्टी; दारू तयार करण्याचा कारखाना. [सं.]

**आसवेल** स्त्री. एक वनस्पती; शितागौड; दिसमावळी. पहा : **शतावरी**

**आससणे** सक्रि. उपभोगणे : 'सकळ सुखें सांडुनि : मग स्तीतिसुख आससीति.' – लीचउ २००.

**आसळगै** स्त्री. अतिपरिचय; मैत्री.

**आसळणे** अक्रि. मंदगतीने वाहणे; उसळणे : 'गंगापय आसळलें।' – राज्ञा १३.२६८.

**आसळसा** स्त्री. आश्लेषा नक्षत्र. [सं. आश्लेषा]

**आसं** क्रि. आहे. (चि.)[सं. अस् = असणे]

**आसंग** वि. (भूशा.) चिकटून राहणारा. [सं.]

**आसंजन** न. चिकटून असणे; चिकटणे. [सं.]

**आसंजित** वि. (यंअ.) १. चिकटणारा. २. आसक्त. ३. अवलंबित. [सं.]

**आसंडणे** सक्रि. हिसकणे; हिसका देऊन ओढणे.

**आसंद** पु. एक औषधी वनस्पती; आस्कंद. [सं. अश्वगंधा]

**आसंदत** वि. खोडकर : 'तुझा बाळु कैसा आसंदत।' – नागा २६५.

**आसंदी** स्त्री. १. (श्रौतकर्म) लाकडी चार पायांची घडवंची. ही मोळाच्या दोरीने विणलेली असते. हिच्या विणलेल्या भागाच्या वर सुमारे हातभर पायांची उंची असते. सोमयज्ञातील सोमवल्ली हिच्यावर ठेवतात. २. खुर्ची; आसन; खाट. (हिं.) [सं.]

**आसंभवनु** स्त्री. अनुपमस्थिती : 'या समस्तांची आसंभवनु। तेथ तमोगुण कैचा।' – विसिं ६.५८.

**आसंसणे** अक्रि. १. प्रशंसा करणे, वर्णन करणे : 'तैसें जेयातें लोक। आसंसीति ।।' – राज्ञा १२.२०४. २. इच्छा करणे; अपेक्षिणे : 'एथचें गोमटें आसंसीते असा।' – लीचउ ६०४.

**आसंसा** स्त्री. इच्छा.

**आसा** क्रि. आहे; जिवंत आहे : 'तोचि आसा कीं काय आजून हें न कळे कोणाला। नाहीं त्याचा विश्वास जाईल अवचित घालुन घाला।' – होला १२.(कों.) [सं. अस्=असणे]

**आसा, आसाणी, आसवल्ली** पु. एक वृक्ष विशेष. संग्रहणी, कुष्ट किंवा मूत्र विकारात उपयुक्त औषधी वनस्पती.

**आसाडी** स्त्री. जखमेवर बसणाऱ्या माशांनी केलेली विष्टा.

**आसाडी** स्त्री. आळी, कीड. (व.)

**आसाद** पु. नांगराचा दांडा, ज्यास बैल जोडतात तो; इसाड.

**आसादन** न. १. ठेवणे; रचणे; मांडणे; लावणे (यज्ञातील पात्रे, सामग्री किंवा जेवणाची ताटे, इतर साहित्य). २. मिळविणे; संपादणे; प्राप्त करून घेणे. [सं.]

**आसादित** वि. प्राप्त केलेला. [सं.]

**आसान** वि. सरळ; सोपे : 'जनरल मशारनिले यांचे खातरेत कीं पैकीयावर मदत जाली तरी याकूतखानासारिखा गनीम तेथे येऊन जीवपेणें आसान नव्हे.' – पेद ३.५६. [फा.]

**आसान** न. कृपा; उपकार : 'या भावीं दोष त्याचे पदरीं घालून त्यास रामपुऱ्यास रवाना करून, त्याचे माथां आसान केलें.' – होकै १५०. [फा. एहसान]

**आसापतित** वि. आशाळभूत.

**आसानमंद** वि. कृतज्ञ : 'सलाबतजंगास आसानमंद करून आम्ही आपलें कार्य करून घेऊ.' – हिंदखं २.१७. [फा. एहसानमंद]

**आसानी** स्त्री. साहजिकपणा; सुलभता; सौकर्य. [फा.]

**आसार** स्त्री. संततधार; निरंतर वृष्टी : 'वर्षाकालीं आसारीं राहे। हेमंतीं जळाशयें।' – एभा २४.२८४. [सं.]

**आसार** पु. १. चिन्ह; खूण; निशाणी. [फा. आसार]

**आसारणे** अक्रि. पसरणे : 'कां समुद्राचेनि पैसारें। वरि तरंगता आसारे।' – राज्ञा १५.१०६.

**आसारी** स्त्री. १. रेशीम गुंडाळण्याचे साधन. २. पंतगाचा दोरा, मांजा गुंडाळण्याचे रिळासारखे, चकारीसारखे साधन.

**आसावणे** क्रि. आशा करणे; उत्कंठित होणे : 'आसावलें मन जीवनाचे ओढी। नामीं रूपीं गोडी लावियेली।' – तुगा १५२३. [सं. आशा]

**आसावरी** स्त्री. (संगीत.) गायनशास्त्रातील एक रागिणी. या रागात षड्ज, तीव्र ऋषभ, कोमल गांधार, कोमल मध्यम, पंचम, कोमल धैवत, कोमल निषाद हे स्वर लागतात. आरोहात गांधार व निषाद वर्ज्य. जाती औडुव संपूर्ण, वादी धैवत व संवादी गांधार. गानसमय दिवसाचा दुसरा प्रहर. [सं.]

**आसावरी थाट** पु. ज्यातून आसावरी वगैरे राग उत्पन्न होतात त्या थाटाचे नाव. याचे सात स्वर पुढीलप्रमाणे– शुद्ध षड्ज, शुद्ध ऋषभ, कोमल गांधार, शुद्ध मध्यम, शुद्ध पंचम, कोमल धैवत, कोमल निषाद.

**आसाहान** वि. सहन न करणारा.

**आसाहेब** पु. अधिकाऱ्यास उद्देशून योजावयाचे संबोधन; आपण (तुम्ही या अर्थी) : 'आसाहेबांनी या इलाख्यांतील ज्यूरी संबंधानें सरकारकडे जो

आपला अभिप्राय पाठविला' – लोटिकेले १.१५२. [फा.]

**आसाळी** स्त्री. पिशाची; हडळ. : 'आसाळी घोरकाळी सुरदळ विदळी कृष्ण व्याळी विशाळी ।' – मुरामा ६.६५.

**आसिक** वि. असणारा.

**आसिका–की** वि. संपूर्ण; सर्व : 'न फुटतां बीजकणिका । माजि विस्तरे वटु आसिका ।' – अमृ ७.१४९.

**आसिद** न. अम्ल; ॲसिड : 'त्या पाण्याचे ठायी कांहीं आसिदपणा येतो.' – मराठी पु. ६. आवृत्ती २.१६६.

**आसिनी** स्त्री. अश्विनी.

**आसिलमासील** वि. १. कुलीन : 'एक चोपदाराचा मिर्धा व एक आसिलमासलातली आहे.' – पेद १०.१०६. २. दासीवर्गातील मानकरीण. [फा.]

**आसी** पु. आशीर्वाद : 'भेटीसवे आसी पढिनला.' – रुस्व १८.१३६. [सं. आशिष्]

**आसीमांत** क्रिवि. सीमेपर्यंत; हद्दीपर्यंत; अगदी पैलतीरापर्यंत; कडेपर्यंत. [सं.]

**आसु** स्त्री. विशिष्ट मूल्याचे सोन्याचे नाणे.

**आसुक** न. वस्त्र; चिरगूट. [सं. अंशुक]

**आसुक्त** वि. अयोग्य : 'हे गुणपणा थोर आसुक्त कीं । याची लाज तूं तरी धरी जरा ।' – होला ३७. [सं. अ+सु+उक्त]

**आसुडणे** उक्रि. १. पाखडणे; कोंडा काढण्याकरिता सुपात घालून झटकणे : 'आकाश असे आसुडत ।' – ज्ञा १.१५६. २. ओढणे; हसडणे; हिसका देणे; हिसकणे; झटका देणे; आपटणे. असडणे : 'तंव गळ आसुडी । जळपारधी ।' – ज्ञा १४.१४७. ३. लुबाडणे; गडप करणे : 'क्षणेक अर्थाची अतिगोडी । क्षणेक आसुडी परद्रव्य ।' – एभा २५.१४७.

**आसुडपाखूड** स्त्री. १. धान्य निवडणे, आसडणे, पाखडणे वगैरे निरनिराळ्या क्रियांना हा शब्द लावतात. २. (ल.) कसून तपासणी; उलटसुलट तपासणी.

**आसुडा** पु. हिसका : 'मालविद्येच्या आसुडीं । धडक हाणोनियां गाढी ।' – एभा २९.२६६.

**आसुढाळ** पु. ज्याच्या डोळ्यातून पाणी गळत आहे असा अस्वच्छ दृष्टीचा घोडा.

स्त्री. पिचका डोळा.

**आसुत** न. (आयु.) एक प्रकारचा शिरका; कंद; मूळ; फळ ह्यांचे किंवा गूळ, मद्य, आध्याम्ल, दह्याची निवळ व उसाचा रस यांचे मिश्रण तीन दिवस धान्यात पुरून ठेविले म्हणजे जे सिद्ध होते त्यास 'शुक्ल' असे म्हणतात. यालाच शिर्का असेही म्हणतात. अशा निरनिराळ्या शिर्क्यामध्ये कंदमूलादिक भिजत घालून जे पदार्थ तयार करतात त्यांना आसुते म्हणतात. [सं.]

**आसुति–ती** स्त्री. अर्क काढणे; मद्य गाळणे. [सं.]

**आसुदा, आसोदा** वि. तयार; ताजातवाना : 'घोडी आसोदी करावयाबद्दल जीन लोकांनी उतरले होते.' – पेद २०.८६. [फा.]

**आसुदे, आसुदाय** वि. १. आयता; तयार. पहा : **असुदा, असुदाय :** 'आसुदें अन्न सेऊं नये । वडिलांचें ही ।' – दास २.२.२६. २. कष्टरहित. ३. मनसोक्त; स्वैर. (गो.)

**आसुदे** वि. मोकळे 'तुम्हीं अटकेपावेतों मुलूख काबीज केला. आतां आम्हांस मोहिमेस रान आसुदें कोणतें?' – भाब ४०.

**आसुपाठी** पु. घोडेस्वार. [सं. अश्वपृष्ठी]

**आसुमाई** वि. आश्चर्यकारक : 'आसुमाई चिन्ह पडे दृष्टी । वाटे पोटीं नवल तेव्हां ।' – निगा १८८.

**आसुमाय** वि. न मावणारा; न सामावणारा : 'तू डोळ्यां आसुमाय जालासी ।' – ज्ञागा २३७.

**आसुर–री** वि. १. असुरासंबंधी. २. (ल.) असुरी; जलाल; दुष्ट; दारुण; भयंकर; अघोर; अक्राळविक्राळ. [सं.]

**आसुरी** स्त्री. वैद्यकशास्त्राची एक शाखा; शल्यचिकित्सा. [सं.]

**आसुरी उपाय, उपचार** पु. शेवटचा, धाडसाचा उपाय; आततायीपणाचा, भयंकर उपाय.

**आसुरी कर्म** न. एखादे विलक्षण, भयंकर राक्षसी काम, कृत्य, क्रिया.

**आसुरी चिकित्सा** स्त्री. भयंकर, राक्षसी उपाय, शस्त्रक्रिया. जसे :- हातपाय तोडणे, डाग देणे वगैरे. [सं.]

**आसुरी निद्रा** स्त्री. गाढ झोप; वेडी झोप; कुंभकर्णी झोप. [सं.]

**आसुरी बुद्धि–द्धी** स्त्री. प्रकृतीचा एक भेद. प्राकृतिक बुद्धी. [सं.]

**आसुरी भोजन** न. अधाशीपणाचे जेवण; बेसुमार जेवण. [सं.]

**आसुरी माया** स्त्री. चेटूक; जादू; जुन्या काळातील राक्षसांची अजब कृत्ये, चेष्टा.

**आसुरी विद्या** स्त्री. जारण मारण, मंत्र तंत्र इ. संबंधी विद्या.

**आसुरी विवाह** पु. (प्र.) आसुर विवाह. कन्या विकत घेऊन करावयाचा विवाह; मुलीच्या वडलांना किंवा नातलगांना द्रव्य देऊन केलेला विवाह: 'विवाह तंव बहुता परी । पिशाच गांधर्व आसुरी ।' – एरुस्व ४.४२. [सं.]

**आसुरी संपत्ति–त्ती** स्त्री. १. जुलूम जबरदस्तीने अथवा अन्य मार्गाने जमविलेली अपार संपत्ती. २. बेसुमार फाजील चैन. ३. कामक्रोधलोभादी विकारांचे मूळ अशी ऐहिक संपत्ती. [सं.]

**आसुर्टी, आसुर्ट्टी** स्त्री. चाबकाची, कोरड्याची लाकडी दांडी; दांडके.

**आसुसणे** अक्रि. हपापणे : 'सहानुभूति आणि प्रोत्साहन यांच्यासाठीं आसुसलेले साहित्यिक.' – माघो [सं. आशा]

**आसू** न. चांदीचे एक जुने (देवगिरीकर यादवांच्या वेळचे) नाणे : 'दक्षिणेसि साठी आसु दिलें.' – पाटण शिलालेख, भाअ १८३५.६३.

**आसू** न. अश्रू; डोळ्यातील पाणी, पहा : **अश्रू** : 'उरु कुहिजैल जळें । आंसुवांचेनि ।।' –राज्ञा १३.५५९. 'नितंबु आलिंगनीं सुखानलें । बांधितां आंसुवें गाळौ लागलें ।' – शिव ७२१.(वा.) **आसवे उगळणे** – (अंत:करण सद्गदित होऊन) अश्रू ढाळणे.

**आसूड** पु. चाबूक; गाडीवाल्याचा, शेतकऱ्याचा लांब चाबूक, कोरडा.

**आसूडगाठ** पहा : **असूडगाठ**

**आसे** न. किंकरे; अरुंद पटाशी; लाकडास चौरस भोक, खाच पाडण्याचे

साधन. (को.) [सं. आसि = सुरी]

**आसेतुहिमाचल** क्रिवि. सेतूबंधापासून ते हिमालयापर्यंत. (भारताच्या दक्षिण टोकापासून उत्तरेस हिमाचलापर्यंत सर्वत्र) : 'आसेतुहिमाचल साऱ्या भारतात भक्तीच्या संप्रदायाचा जोर एकसारखा चढता-वाढता राहिला.' – मजीस्थि ४८. [सं.]

**आसेवित** वि. सेवा केलेला; सहवासित; परिवेष्टिलेला.

**आसो-सॉ** पु. १. तांदूळ निवडताना सापडणारा भातगोटा. (गो.) २. पंचाक्षरी प्रश्न पाहताना जे तांदळाचे दाणे किंवा साळ उपयोगात आणतो ते. पहा : **आंशी** [सं. अंश]

**आसोडा** पु. हिसका; झटका. (ना.)

**आसोड्या धुऊ का पासोड्या धुऊ** मुलींचा एक खेळ.

**आसोल** न. अस्वल. (कों.)

**आसोस** वि. पहा : **असोस**

स्त्री. इच्छा.

**आसोळे** न. घरटे; कोठा.

**आस्कटी** स्त्री. पापणीचा केस. (गो.)

**आस्करा** पु. कीर्ती; लौकिक; ख्याती; थाटमाट : 'दुंदुभी राजाचा फार आस्करा' – ऐहोरा ४.४१.

**आस्कळविस्कळ** वि. ऐसपैस.

**आस्कारहुस्कार** पु. १. श्वासोच्छ्‌वास २. हुंदके देऊन रडणे.(गो.) [ध्व. हुश्श]

**आस्तरण** न. १. पसरणे; अंथरणे. २. हातरी; पसरण्याचे वस्त्र (सतरंजी, गालिचा, चटई, अंथरूण इ.) : 'किंवा वस्त्रें सांडूनी आस्तरणें नेसल्या त्या।' – रास १.२२३. **३.** छत्र : 'आर्थिक जीवनाचे आस्तरण सर्वांच्याच डोक्यावर होते.' – विचारशलाका ७५. [सं.]

**आस्तरणे** उक्रि. आंथरणे; पसरणे.

**आस्ता** स्त्री. १. पहा : **आस्था** : 'त्या पाटीलबोवाची आस्ता नाहीं पुरली।' – ऐपो २८७. २. आशा; हावरेपणा. ३. स्वार्थ.(गो.) [सं. आस्था]

**आस्तावा** पु. तोटीचे भांडे : 'त्यास त्याचे तोटीतून पाणी पडते त्याप्रमाणे रुप्याचा आस्तावा करून पाठवून द्यावा म्हणून आज्ञा झाली आहे.' – पेद ३२.१३०. [फा.]

**आस्तिक** वि. १. ईश्वराच्या ठिकाणी श्रद्धा ठेवणारा; ईश्वर, परलोक, पापपुण्य मानणारा; श्रद्धावान. : 'तया आस्तिकांचा आश्रमु। पांडवा गा।' – ज्ञा ८.१९३. २. खाऊनपिऊन सुखी असा (मनुष्य); सुखवस्तू; ऐपतदार; मातबर. (गो.)

पु. एक ऋषी. याने जनमेजयाच्या सर्पसत्रातून तक्षकाला वाचविले. निजतेसमयी साप वगैरेची बाधा होऊ नये म्हणून या ऋषीचे नाव दोन वेळा (आस्तिक-आस्तिक असे म्हणून) घेतात. [सं.]

**आस्तिकाय** पु. श्रीमंती; ऐपत. (गो.) [सं. आस्तिक्य]

**आस्तिक्य** न. आस्तिकपणा; परमेश्वराबद्दल विश्वास, श्रद्धा : 'आणि आस्तिक्य जाणावें। नववा गुण।' – ज्ञा १८.८४८. [सं.]

**आस्तिक्यबुद्धि-द्धी** स्त्री. आस्तिक्य : 'म्हणौनि अनित्याच्या ठायीं। तयां आस्तिक्यबुद्धि नाहीं।' – ज्ञा २.१३२. [सं.]

**आस्तिक्यवाद** पु. विश्वाचा निर्माता व नियंत्रक म्हणून ईश्वर आहे असे प्रतिपादन करणारे तत्त्वज्ञान; परमेश्वराच्या अस्तित्वाविषयीचे समर्थन; आस्तिकपणाचे समर्थन; ईश्वरवाद, याच्या उलट नास्तिकवाद. [सं.]

**आस्तिक्यवादी** वि. ईश्वर आहे असे मानणारा; आस्तिकवादाचा पुरस्कर्ता; आस्तिकवाद मानणारा. [सं.]

**आस्तीर्ण** वि. १. पसरलेले; आंथरलेले (वस्त्र वगैरे). २. आच्छादिलेले; झाकलेले (जमीन वगैरे). [सं. आ+स्तृ]

**आस्ते** क्रिवि. हळूहळू; सावकाश. [फा. आहिस्ता]

**आस्तेकदम** क्रिवि. १. सावकाश; संथ; हळू पाऊल टाकणे. २. थांबणे या अर्थी. तेथेच थांबा अशा हेतूनेही योजतात. कवायतीतील एक हुकूम. [फा. आहिस्ता+कदम = पाऊल]

**आस्त्रक** न. दारूगोळा.

**आस्थ** न. (ग.) जोडणे. [सं.]

**आस्थगन** न. एखादी बाब तेवढ्यापुरती, तात्पुरती बाजूला ठेवण्याची, तहकूब करण्याची स्थिती; तहकुबी.

**आस्थगित** वि. रोखलेले; थांबविलेले; लांबणीवर टाकलेले.

**आस्थलांतरण** न. मूळ ठिकाणाहून दुसरीकडे जाणे.

**आस्थलांतरी** पु. (भू.) दुसरीकडून आलेला अथवा जाणारा.

**आस्था** स्त्री. १. कळकळ; काळजी : 'परि ते आस्थाही न धरीं मानसीं ।।' – ज्ञा ४.१९५. २. उत्सुकता; रस; इच्छा; उत्कंठा. याच्या उलट अनास्था. ३. आसक्ती; प्रेम; आपुलकी : 'घरावरी तेतुली। आस्था नाही।' – ज्ञा १३.५९५. ४. आशा; आस; अपेक्षा (क्रि. करणे) : 'ओवाळणीचिया आस्था। बहुरूपी सोंग संपादितां।' – एभा १३.६६७. ५. विश्वास; श्रद्धा : 'पाखांडियाहि आस्था। समूळ होय।' – ज्ञा ६.१६७. ६. आदर. [सं. आ+स्था]

**आस्थान** न. स्थान; स्थल; सभास्थान; पीठ : 'कां बहिरियांच्या आस्थानीं। कवण गीतातें मानी।' – ज्ञा ४.२३. [सं.]

**आस्थानी** स्त्री. सभा : 'ऐसी देखौनि आस्थानी।' – शिव ५३.

**आस्थापन** न. (आयु.) मलहरण करणारी पिचकारी; निरुहबस्ती. [सं.]

**आस्थापना** स्त्री. व्यापारी संस्था, कचेऱ्या, बँका इत्यादीमधील कर्मचारीवर्ग, साधनसामग्री इत्यादींचे व्यवस्थापन; व्यवस्थापन विभाग.

**आस्थापना अधिकारी** पु. एखाद्या कंपनीतील कर्मचाऱ्यांच्या नेमणुका, सेवाशर्ती, वेतन, प्रशिक्षण, आरोग्य, कल्याण इत्यादींबाबत योग्य ती व्यवस्था करणारा अधिकारी.

**आस्थापना खर्च** पु. एखादी संस्था सुरळीत चालण्यासाठी होणारा कर्मचारी वर्ग, साधनसामुग्री, भाडे, मजुरी, कर, वीज, पाणी वगैरेवरील सर्वसाधारण खर्च.

**आस्थापना विसर्जन** न. स्थापन केलेली संस्था संपुष्टात आणणे; आस्थापन मोडून टाकणे.

**आस्थाळू** वि. कळकळ असणारा.

**आस्थीक** पु. १. गृहस्थ. २. धनिक. (गो.)

**आस्थीक, आस्थेकरी, आस्थेवाईक** वि. आस्था बाळगणारा; काळजीचा; कळकळीचा; उत्सुक; उत्कंठित. [सं. आ+स्था]

**आस्पत** स्त्री. ऐपत; शक्ती; सामर्थ्य. (गो.) [सं. आस्पद]

**आस्पद** न. स्थान; स्थल. सामा. शब्द – अहंकारास्पद – अहंकाराचे स्थान, शरीर; गुणास्पद– विद्वान, सात्त्विक मनुष्य; मोहास्पद – कनक, कांता इ. वस्तू. दु:खास्पद, हास्यास्पद, शोकास्पद इ.: 'जगस्पृहे आस्पद। एक सार्वभौम पद।' –ज्ञा १६.२३१. [सं.]

**आस्फारणे** अक्रि. वाजणे; कंप पावणे.

**आस्फालणे** अक्रि. १. जोराने आदळणे; आपटणे : 'आस्फालितांही स्वकरें न राहे। चेंडू जसा तो उसळेचि पाहे।' २. जोराने फुंकणे. [सं. आ+स्फालन]

**आस्फालणे** न. ताडन : थापटणे; थोपटणे. [सं.]

**आस्फुरणे** सक्रि. १. कंप पावणे. २. फुंकणे; वाजविणे : 'दिव्य शंख भीष्मदेवें। आस्फुरिला।' –ज्ञा १.१२७. [सं. आ+स्फुर्=कंप पावणे]

**आस्फोट** पु. ठोसा; तडाखा; धपका; दणका; मारण्याचा आवाज. पहा : **स्फोट** [सं.]

**आस्मा** पु. दगड : 'लीळां पदें ठेउनि आस्मा उधरीला।' – ऋव. ३७१.

**आस्मानगिरी** स्त्री. छत.

**आस्य** न. मुख; तोंड : 'आस्य सरोरुह हास्यलवें अतिरम्य उपास्य मनोभ्रमरी।' – ध्यानमाला. [सं.]

**आस्यापाक** न. (आयु.) तोंड येणे; मुखपाक. [सं.]

**आस्रव** पु. धर्मनिषिद्ध कृत्यांनी जीवाला जे अशुद्ध कर्मपुद्गल (कर्माची पुटे) चिकटतात किंवा त्यात प्रवेश करतात त्या क्रियेला आस्रव म्हणतात.

**आस्राव** पु. (आयु.) नेत्रविकार. [सं.]

**आस्रोणी** स्त्री. आश्रायणी; आकाशवाणी; देववाणी : 'वाचा जाहली आस्रोणी। परमेश्वराची।।' – क्रिपु ५०.

**आस्वली** वि. पागोटे, लुगडे किंवा पातळ यांच्या पदराचा, किनाराचा प्रकार : 'पातळ महताबी। किनारा आस्वली.' – पेद २६.१५४.

**आस्वाद** पु. १. रुची; चव; स्वाद; गोडी. २. इच्छा; लालसा : 'तैसा कर्तृत्वाचा मदु । आणि कर्मफळाचा आस्वादु ।' –ज्ञा १८.२०५. ३. गंध; परिमल. [सं.]

**आस्वादणे** उक्रि. १. रुची घेणे; चाखणे; हुंगणे; स्वाद घेणे; खाणे. २. अनुभव घेणे : 'देखिलेपण एकलेयां। आस्वादिजे जेवि ।।' – राज्ञा १८.११३५. [सं. आस्वादन]

**आस्वादन** न. सेवन; स्वाद घेणे; रुची घेणे : 'ना तरि अमृतरसास्वादनीं । रस सकळ।।' –राज्ञा १.२६. [सं.]

**आस्वादित** वि. चाखलेले; स्वाद, चव घेतलेले. [सं.]

**आह** पु. १. उष्णता, दाह : २. गाजावाजा; कीर्ती; प्रतिष्ठा : 'एथोनि जाला आहो ।' – ज्ञा १.३३.

**आहकाम** पु. हुकूम.

**आहट, आहाट** पु. १. आवाज; चाहूल. २. हाक; हाक मारणे. (क्रि. देणे). (व.)

**आहणा, आहाणा–ना** पु. १. उखाणा; उक्ती; म्हण; वचन; न्याय; दृष्टांत : 'एक अनी चुकी तो बारा बरसका हयात, ऐसा आहणा प्रसिद्ध आहे.' – भाब ११८. २. लग्नात वधूवरांनी परस्परांची नावे घेणे किंवा लग्नात बायका व शिमग्यात पुरुष विनोदी किंवा अश्लील पद्यमय वाक्ये बोलतात तो उखाणा : 'तो आहनी रुचिर गोवुनि नाम खासें। बोले मधूर वचना रद–कांति भासे।' – विवि ५९.३४. ३. कोडे; उखाणा. [सं. आख्यान]

**आहत** वि. मारलेला; ताडलेला; ठोकलेला; आघात केलेला : 'चंडवातें ज्योति आहत जैसी ।।' – ज्ञा २.३२३. [सं. आ+हन्]

**आहत्य, आहत्यमेव** क्रिवि. अवश्यमेव; खरोखर; खात्रीने; अगत्यपूर्वक. [सं.]

**आहद** पु. प्रतिज्ञा; करारमदार; दारमदार : 'खरें अंत:करणातून आहद व पैनाम आनाची व कुरान मजीदची मजबुती इनामधर्माची करून करार केले जात कीं.' – हिंदखं १.६१. [फा.]

**आहदिया** पु. करार; वचनप्रमाण; ठराव : 'कलकत्त्याहून पत्रें येत गेलीं. त्यांतहिं हाच भाव कीं, राव पंतप्रधान यांसीं करार व आहदिया जाला तोच मंजूर.' – मइसा १०.१९७. [फा.]

**आहमिकिक** हुकमानुसार.

**आहरण** न. १. आणणे; बोलावणे; नेणे; आनयन. २. धरणे; देणे. ३. बाहेर काढणे. ४. अधिमूल्य रोख्यांवरील व्याज एकत्र करून भाग्यवान क्रमांक काढणे व त्यांना बक्षिसे देणे. ५. जमाखर्चाच्या वहीतील एक संज्ञा. – भागीदारांचे पेढीतील आहरण. ६. आंतरराष्ट्रीय नाणेनिधीतून कर्ज घेणे.

**आहरा, आहारा** पु. मडके, भांडे डळमळू नये म्हणून त्याखाली ठेवावयाचे गवताचे निवणे, चुंबळ. पहा : **आरा** [सं. हार]

**आहर्ता** वि. आणणारा; आहरण करणारा. [सं.]

**आहव** पु. १. युद्ध; लढाई : 'मग मथिले द्रौणीचे द्रुपदसुतें करूनि आहवा वाजी।' – मोभीष्म ३.४३. २. सर्वनाश, आम्ही : 'निक्षेपिलो आहवी।' – गरा १०६. [सं.]

**आहवन** न. १. यजन; होम; हवन. २. वचन. [सं. आ+हवन]

**आहवनीय** वि. अग्निहोत्र्याने धारण करावयाच्या (गार्हपत्य, दक्षिणाग्नी, आहवनीय या) तीन किंवा पाच अग्नींपैकी पूर्व बाजूचा अग्नी; इष्टीत व नित्यहोमात मुख्य याग या अग्नीत करावयाचा असतो.: 'आहवनीयादि वन्ही। निक्षेपरूपीं हवनीं ।' – ज्ञा १७.३६१. [सं.]

**आहसी, आहास, आहासी** क्रि. आहेस; आहात : 'अर्जुना तूं कवण आहसी। काय हा करिताशि।' – गीताचंद्रिका ६५; 'गवसोन पुसिलें आहास सुखी।' – दावि १८८. [सं. अस्]

**आहळ, आहळी** स्त्री. १. अग्नीची ज्वाळा. पहा : '**अहळी**. हा शब्द आहळी किंवा आहळ्या अशा अनेकवचनात उपयोगिला जातो. २. वाऱ्याची उष्ण झुळूक किंवा झळई. ३. तिरीप. (वा.) **आहळीत असणे** – धाकात, जरबेत असणे.

**आहळ, आहाळ** पु. पहा : **ओहळ**. जनावरांकरीता गुरांकरिता पाणी साठविण्याची जागा; (खानदेशी – हाळ) पावसाळ्यातील पाण्याचा खड्डा. (व.)

**आहळणे** अक्रि. जळणे : 'त्या संतापें चराचर। आहळो लागे।' – निगमसार ६.२७.

**आहंग** पु. इरादा; हेतू. [फा.]

**आहा–हे** स्त्री. ज्वाला; आंच; उपद्रव; उपसर्ग; पीडा : 'लागे शोकाग्निची न या आहे ।' – मोशल्य १.२८. पहा : **आही**

**आहाकटा** पु. हाकाटी; ओरड; आक्रोश; हायहाय : 'आहाकटा मग करिती गेलिया । आधीं ठावा तयां नाहीं कोणा ।' – तुगा ५४.

**आहाकार** पु. ओरड, हाकाटी : 'गोफणीसी गुंडा घाली पागोऱ्याच्या नेटें । पळती आहाकारे अवघीं पाखरांचीं थाटें ।' – तुगा ३५९. [सं. अहह+कृ; हा:+कार]

**आहाकाष्या जाणे** क्रि. गर्भगळित होणे; घाबरणे; धीर सुटणे. (व.)

**आहाच, आहाचवाहाच, आहाचवाणा** क्रिवि. १. वरवर; सरासरी : 'अग्नि ऐसें आहाच । तेजा नामाचें आहे कवच ।' – ज्ञा ७.३६; 'तेथ अचेत चित्ताचा सांगातु । आहाचवाणा दिसे मांडतु ।' –ज्ञा ८.९५. २. सहज; सहजगत्या; उगीच : 'पाहिलेचि आहाचवाहाच उठलिया ।' रंयोवा १०.१७६. ३. खोटे; नकली; कृत्रिम; व्यर्थ : 'तैसें असतेपण आहाच ।' – ज्ञा ८.३१.

**आहाचपण** न. वरवरची कृती; कुरकुर; उतावीळपणा.

**आहाट** पु. चाहूल; पायरव.

**आहाटणे, आहाठणे** क्रि. १. घाटणे; ढवळणे. २. त्रास देणे; छळणे; पिच्छा पुरवणे.

**आहाटीव, आहटीव** पहा : **अहाटीव**

**आटाडबाहाड** पु. गोंधळ; घोटाळा : 'जें भेटलियां आहाडबाहाड । पडों नेंदी ।।' – ज्ञा १३.११३५.

**आहाडून पाहाडून** क्रिवि. आडूनपाडून : 'आहाडे पाहाडेगे वावुगेचि झगडे ।' – निगा ७६. पहा : **अहाडूनपहाडून**

**आहाण** वि. १. उक्त; उचित : 'यन्हविं यागादिकीं क्रिया । आहाण ते चि धनंजया ।' – राज्ञा १६.३७४.

**आहाणा** पु. १. म्हण; उक्ती; उखाणा : 'म्हणोनि खाण तैसी माती । आहाणा लोकीं प्रसिद्ध ।' – मुआदि १६.१७४.

**आहाणा** वि. आत्मघातकी; हानी करणारा : 'आतां हा ऐसा अव्हेरिजे । मग नाथिलें शोधूं बैसिजे । तरी आपण आहाणा होईजे । आपणपेयीं – ज्ञा २.१९६. [सं. आ+हन्]

**आहाति** क्रि. आहेत : 'ऐसें बहुतीं परी अनेग । जें सांगितलें तुज कां याग । ते विस्तारूनि वेदेंचि चांग । म्हणितले आहाती ।।' – ज्ञा ४.१५५. [सं. अस्]

**आहादेशर्त** स्त्री. तह; करार; कायम मिजाजी; वचनाची प्रामाणिकता : 'आणि ज्या दौलतीत आहादेशर्त व वचनाची मजबुती तेच दौलत कायम आहे.' – मशिंका १६६. [फा.]

**आहार** पु. १. अन्न; शरीरपोषक द्रव्य; खाद्यपदार्थ : 'आहार तरी सेविजे' – ज्ञा ६.३४९. २. खाणे; जेवणे; भोजन करणे. सामा. शब्द – फलाहार, दुग्धाहार, धान्याहार इ. ३. नेहमी खाण्याचे प्रमाण. उदा. 'त्याचा दोन शेराचा आहार आहे.' ४. अन्न खाण्याची विशिष्ट शक्ती. सुखाने जेवढे अन्न पचते ते : 'जसा आहार वाढवावा तसा वाढतो.' [सं.] (वा.) **आहारी असणे** – ताब्यात, आटोक्यात असणे : **आहारी पडणे, जाणे** – ताब्यात, वर्चस्वाखाली जाणे : 'बरवें झालें आजीवरी । नाहीं पडलों भृत्याचे आहारीं ।' – तुगा ७१७. **आहाराखाली, आहारीं आणणें** – माऱ्याच्या टप्प्यात आणणे; ताब्यात आणणे; कह्यात आणणे.

**आहार** पु. १. निखारा; विस्तव; फोपाटा : 'चुलींतून आहार काढ व हातपाय शेक.' (व.) २. इस्त्री; कपडे कडक करणे. (क्रि. देणे)

**आहार** अजगर. पहा : **आर**

**आहारगृह** न. फराळाचे पदार्थ मिळण्याचे ठिकाण; खानपानगृह.

**आहारणे** अक्रि. १. आरणे. २. खाऊन, गिळून टाकणे : 'मासाचे लचके तोडून या पिशाचानें आहारून टाकले आहेत.' – एकच प्याला. (नाटक)

**आहारतज्ज्ञ** पु. अन्न व आहार या विषयातील जाणकार, सल्लागार. [सं.]

**आहारपानगा** पु. निखाऱ्यावर भाजलेली लहान भाकरी; पानगा; आहारोळी; रोट; खाकरा; गाखर.(आहार = निखारा + पानगा = पोळी)

**आहारभत्ता** पु. क्षयासारख्या आजारामुळे किंवा कुपोषणामुळे अशक्त झालेल्या कर्मचाऱ्यांना, त्यांनी पोषक आहार घ्यावा म्हणून देण्यात येणारी ठरावीक रक्कम, भत्ता.

**आहारमूल्य** न. (कृषी) अन्नातील घटकांच्या उष्मांकावर (कॅलरीज्) अवलंबून असलेली अन्नाची किंमत. [सं.]

**आहारशास्त्र** न. अन्न व अन्नाचे घटक, आहाराचे प्रमाण, निरनिराळे पदार्थ तयार करणे इत्यादींचा पद्धतशीर अभ्यास करणारे शास्त्र. [सं.]

**आहारी** वि. उपजीविका करणारा; खाणारा; खाऊन राहणारा. सामा. शब्द–मत्स्याहारी, शाकाहारी इ.

**आहारोळी** स्त्री. निखाऱ्यावर भाजलेली पोळी, पानगा.

**आहार्य** वि. १. बळेच, जाणूनबुजून, मुद्दाम अंगीकारलेले. अनुमानित; कल्पित; आरोपिलेले; कृत्रिम. २. खाण्यास योग्य. [सं.]

**आहार्यनिश्चय** पु. भलता ग्रह; चुकीची, खोटी समजूत, कल्पना.

**आहार्यारोप** पु. चुकीचा ग्रह धरून चालणे; बुद्ध्या वेगळी समजूत करून घेऊन व्यवहार करणे. जसे :– एखाद्या मनुष्याने राक्षसाचे सोंग घेतले आहे असे समजले असताही आहार्यारोपाने त्यास राक्षस समजून त्या भावनेने त्याच्याशी वागणे. [सं.]

**आहार्यी** पु. ज्याच्यासाठी पैसे काढतो तो. [सं. आहार्य]

**आहाव** पु. (श्रौतकर्म) यज्ञात होता शंसन (शास्त्रपठण) करतो त्यामध्ये 'शोंसवो' असा मंत्र म्हणतो त्यास आहाव म्हणतात. [सं.]

**आहाळ** पु. १. खळगा; कुंडी. पहा : **आहळ** २. (चर्मकार) टांगण्याचे कातडी कुंड, खळगा.

**आहाळ** पु. १. आहार; विस्तव; आग; निखारा. पहा : **आहार** : 'गुंफिवा ज्वाळांचिया माळा । लेयिलियाही अवळा । भेदाचिया आहाळां । काय पडणें आहे ।' – अमृ ७.१३६. २. (ल.) दुःख.

**आहाळणी** स्त्री. ताप; दुःख; त्रास : 'आहाळण्या किती सोसूं या च्यारी ।' – पला ८२.

**आहाळणे** क्रि. भाजणे; पोळणे : 'जेविं तीव्र अग्नींत शिरतां तेथें । आहाळेना कैसें म्हणावें ।' – नव १५.६६.

**आहाळणे** क्रि. १. अटणे, अळणे: 'दूध आहाळलें आहे.' (व.)

**आहाळणे** अक्रि. हालणे : 'पाठीं निवृत्ति कर्णताळें । आहाळती तें पूजा विधुळें ।' – ज्ञा १७.७.

**आहाळबाहाळ** वि. १. पहा : **अहाळबाहाळ** २. विपुलतेने; यथेच्छ; भरपूर; संपूर्ण; विस्तीर्ण; पुरेपूर : 'जेहीं आपुला संभोगकाळीं । परब्रह्म भोगिलें आहाळबाहाळीं ।' – शिव ७४५.

**आहाळीव** पहा : **अहळीव**

**आहाळून जाणे** क्रि. होरपळणे; भाजणे; पोळणे; ताप, दुःख, त्रास होणे : 'अतींद्रियाच्या आचेने आहाळून जाण्याची भाषा बोलावी ..' – अं.यात्रा २१५.

**आहिक** न. ऐक्य : 'आहिकीं द्वैतपणाचा छेद जाला । तन्मय तदाकार ।' – योसं ९.४१. [सं. ऐक्य अप.]

**आहिक्य** न. इहलोक; ऐहिकता : 'तुका म्हणे आम्हा आहिक्य परत्रीं । नाहीं कुळगोत्री तुजवीण ।' – तुगा ५००. [सं. ऐहिक अप.]

**आहित** वि. ठेवलेले; स्थापित केलेले; बसविलेले; आधान केलेले. [सं. अ+चा–हित]

**आहिता** पु. धिरडे. : 'वराडी आहिता ऐसे म्हणिजे ।' – लीचपू ५८५.

**आहिताग्नि–ग्नी** पु. ज्याने आग्न्याधान केले आहे तो; अग्निहोत्री. वि. अग्निहोत्र्यास लावावयाची पदवी. [सं.]

**आहितुंडिक** पु. गारोडी.

**आहिर मासा** पु. अंगाला चिकट बळस असणारा मासा. (माण.)

**आहिर्णी** स्त्री. ऐरणी, वंशपात्र; लग्नातील झाल : 'तंव ते आहिर्णीचा समय ।' – वेसीस्व १३.६. [सं. ऐरिणी अप.]

**आही** स्त्री. उन्हांची झळ; तिरीप.

**आही–हे** स्त्री १.ज्वाला; आग : 'येती उष्णाच्या आह्या । पायीं लाह्या भाजती ।' – अमृत ध्रुवच ५; 'वियोगाची कोण भोगील आहे ।' – नरहरि दानव्रत ९८. २. कांती; शोभा : 'रूपाचेनि आहे । ऐरावतु पाणि वाहे ।' – शिव ५०८. [सं. अहि=सूर्य; आभा]

**आहुति–ती** स्त्री. १. देवतेप्रीत्यर्थ अग्नीत हवन करावयाचे किंवा जळात, भूमीवर टाकावयाचे द्रव्य (चरू, घृत, तीळ इ.); अवदान. २. बळी; भक्ष्य : 'ज्या कोणावर माझी नजर जाई त्याची आहूती मी स्वतः घेत असे.' – विवि (१८७६) ८.१५५. ३. (ल.) समूळ नाश; नायनाट; सप्पा; धुव्वा : 'प्लेग, दुष्काळ वगैरेंनी त्याच्या सर्व घरादाराची आहुती घेतली.' [सं. आ+हू] (वा.) **आहुती घेऊन उभा असणे, राहणे –** नाश करण्यासाठी टपणे; नाश करण्याची वाट पाहणे. **आहुती देणे –** १. बळी देणे; बलिदान करणे. २. अग्निकुंडात अवदान टाकणे; यज्ञ करणे. ३. (ल.) नाश करणे; बुडविणे; संकटात टाकणे; नुकसान करणे.

**आहुर** पु. पूर.

**आहूत** वि. बोलाविलेला; आरंभिलेला; आवाहन केलेला. [सं. आ+व्हे]

**आहृत** वि. आणलेला; हरण केलेला. [सं.]

**आहे** क्रि. (अस्तित्व दर्शविणारे) असणे या क्रियापदाचे वर्तमानकाळाचे रूप. [सं. अस्ति] (वा.) **आहे आहे नाही नाही –** एखाद्या गोष्टीचे अस्तित्व किंवा व्यवहार ज्या वेळी क्वचितच असतो किंवा असून नसल्यासारखा असतो त्या वेळी हा वाक्यप्रचार योजतात : 'तो आहे आहे नाही नाही.' = त्याचे अस्तित्वच भासत नाही, त्याला कोण विचारतो? (आहेत, आहेति – तृ. पु. अ.व.)

**आहेपण – णा** न. १. अस्तित्व. २. तथ्य; सत्य : 'वस्त्रालंकार दोनी । नसोनि भासती आहेपणीं ।' – निमा ९७.

**आहेर** पु. १. कुणबी लोकात श्राद्धपक्षाच्या दिवशी देवस्थानी ज्या ब्राह्मणास बसवितात त्यास म्हणतात. या ब्राह्मणाचा बाप जिवंत असावा लागतो. (व.) २. पहा : **अहेर**

**आहेवतंतु–तू+दोरा+मणि–णी** पु. सौभाग्यलंकार; मंगळसूत्र : 'कीं अजय झालें रणीं । सखे साजणी । आहेवमणी तुटून पडला ।' – पला ४९.

**आळ** पु. स्त्री. १. आरोप; कुभांड; दोषारोप; अपवाद. (क्रि. देणे, घालणे, येणे) : 'तो आळु नोहे अनुरोधी । बोलतें या ।' – ज्ञा १५.२३०. २. (ल.) केवळ बाह्य स्वरूप; सोंग; छाया; सादृश्य; निमित्त; नाव : 'नेवैद्याचा आळ । वेचे ठाकणीं सकळ ।' – तुगा १३९९. ३. आभास, जसे –पुरुषाचा आळ मात्र, ब्राह्मणाचा आळ, शिपायाचा किंवा शिपाईगिरीचा आळ इ. [सं. आल]

**आळ** पु, स्त्री. हाव; इच्छा; आवड; छंद; हट्ट : 'बालकें अघटित घेतां आळ । माता पुरवी तत्काळ ।' – भावि १.१३. (क्रि. घेणे, पाळणे, पुरविणे).

स्त्री. विनवणी; प्रार्थना. [का. अलु =रडणे]

**आळ** पु. बांधण्याची वस्तू; दोर, बंद इ.

**आळ** स्त्री. गल्ली; रांग; ओळ; आळी.

**आळ** स्त्री. रोपटे (फणसाचे वगैरे). (गो.)

**आळ** पु. १. मजूर; गडी. २. मजुरी. [का.]

**आळ** न. किंमत, वजन, मापदर्शक चिन्ह. पहा : **अळे** [का. आळि=वर्तुळ]

**आळई** स्त्री. अळी; कीड : 'लहान पराई उंबर कवळी वर्षे बारा तेराची । प्रत्यक्ष आळई बोराची ।' –पला ४.४१. पावसाळ्यात येणारे एक गवत.

**आळकवसा** पु. तरवटा : 'म्हाइंभटो : आळकवसा भणीजें काइ । म्हाइंभटी म्हणितलें :नां तरवंटेयातें म्हणीजे.' – गोप्र ७४.

**आळका** वि. हपापलेला; हळवा : 'राम भुकेचा आळका आहे.' – जसा २५३. पहा : अळका.

**आळकेपण** पहा : **अळकेपण** : 'गोड ग्रासीं आळकेपण । अत्यादरें पिंडपोषण ।' – दास २.५.३१.

**आळजाळ** – मिथ्यारोप, खोटी समजूत : 'तैसे नाहीं ते आळजाळ । तुज पडीले ।' – विसिं ७.४५.

**आळण,आळणी,आळणे** पहा : **अळण** : 'वडपापड आळणें । वर वाढिलीं सुवर्णे वरणें ।' – वसा २७.

**आळणा** पु. पंखा. (कु.)

**आळणी** स्त्री. वाळणे; सुकणे (अन्न पाण्यावाचून) : 'अन्नवस्त्रेवीण आळणी । या नांव आदिभूतिक ।' – दास ३.७.२४.

**आळणी** वि. बेचव; नीरस (भाषण, मत) : 'लोकमताचा आळणीपणा कसा

घालवावा हा महत्त्वाचा प्रश्न आहे.' – लोटिकेले ३.४.

**आळणे** अक्रि. घट्ट, दाट होणे; आटणे : 'ऊंस गाळिलिया रस होये । तो ठेवितां बहुकाळ न राहे । त्याचा आळूनिया पाहे । गूळ होये सपिंडा' – एभा १६.१८.

**आळणे** सक्रि. १. आळा घालणे; ताब्यात ठेवणे; समजणे; आकलन करणे : 'मनुष्यें सकळांस आळिलें । त्या मनुष्यास देवे पाळिलें ।' – दास २०.५.९४. २. आळवणे. (गाणे म्हणून प्रार्थना करणे). ३. वयात येणे. ४. कालवणे.

**आळत** क्रिवि. रडत, ओरडत : 'आई झऱ्याच्या वाटेनं चटापटा चालत आळत आली.' – तअं १७१.

**आळता–ती** वि. आळविणारा; आलाप घेणारा (गाणे म्हणून वगैरे) : 'आळती गानी सरस्वती । गंधर्वराऊॅ ।' – शिव ५१. [सं. आलापन]

**आळतीकर** पु. एक प्रकारचा खेळ करून दाखवणारा : 'मादळीत : काहाळिया: वस करूं: चाकीकरूं: आळती करूं: जें जेयाचें अंग ये: तें तो दाखवी.' – लीच २.१३.

**आळप** स्त्री. कुरकुर; रड; पिरपिर.

**आळपणे** सक्रि. आवळणे : 'दुर्मोच्य मोहपाशें आळपिली घट्ट कंधरा ज्याची ।' – मोवन ३.८२.

अक्रि. किरकिर करणे; रडत राहणे; दुःखात ओरडत राहणे.

**आळपे** पु. १. अंतर; फट. २. (अव.) अन्नाचे गडबडीने घेतलेले मोठमोठे घास. (व.) [सं. आ+लप्]

**आळबाळ घेणे** क्रि. कौतुकाने, मायेने कुरवाळणे : 'आईनं आळबाळ घेतलं.' – उपरा ७९.

**आळमळीत** वि. गुळमुळीत : 'आळमळीत भाषणे मर्सी कसिं करितां सांगा.' – मला १७४.

**आळमाळ** वि. १. अल्प; थोडा; अलुमाळ : 'एकादिया आळमाळा । श्रीगुरूचिया खेळा ।' – ज्ञा १३.४४२.

**आळमेळे** न. अपशकुन. पहा : **आडमेळ** (गो.)

**आळव** पु. टप्पा; आटोका.

**आळवण, आळवणी** स्त्री. १. हाक; बोलावणे. २. विनवणी; प्रार्थना : 'मागतिया भांडवल आळवण । नामासी जतन दातियासि ।' – तुगा १०९३.

न. आळविण्याचे गाणे; स्तोत्र.

**आळवण** न. पदार्थ घट्ट होण्यासाठी लावलेले पीठ.

**आळवणे, आळविणे** सक्रि. पहा : अळविणे : 'जयातें आळविजे स्वभावें ।' – ज्ञा ८.३६.

**आळवणे** क्रि. १.आळविणे; घट्ट करणे; आढवणे : 'सुंदर आळविल्या खिरी ।' – वसा २७. २. कंठणे; घालविणे : 'कांहीं दिवस दुःखात आळविले ।' – ऐपो २०९.

**आळवनीं** स्त्री. वीणा.

**आळवा** वि. लहान; कोवळे; लाड करण्याजोगे; आळविण्या–आळ पुरविण्याजोगे (मूल). (राजा.)

**आळवातीण** स्त्री. जखीण; हडळ. (गो.)

**आळवार** पु. दक्षिण हिंदुस्थानातील प्राचीन वैष्णव संतकवी. हे १२ असून त्यांच्यात नम्माळवार हा प्रमुख होय. [का. आळवर]

**आळवा वेठ** वि. गलितगात्र; निस्त्राण; अशक्त. (गो.) [अळवा = अळू+वेंठ = देठ]

**आळवाळ** न. अळे. पहा : **आलवाल** : 'अर्थविनाशाचें फळ । दुसरे एक नाशाचें मूळ । विशेषनाशाचें आळवाळ । स्त्री केवळ ओळख पा ।।' – एभा ८.११८.

**आळवी** स्त्री. एक प्रकारची कीड : 'ज्वारीचे धान्यालाहि चैत्राचे ऊन द्यावे लागते, नाहीतर त्यात आळवी व सोंडेचे किडे होतात.' – गावरहाटी १५१.

**आळशी** स्त्री. जवस.

**आळशी–सी** वि. सुस्त; निरुद्योगी; मैंद; मठ्ठ; आलस्ययुक्त; कामचुकार; ऐदी. [सं. अलस] (वा.) **आळशावर गंगा येणे** – (शब्दशः) गंगास्नानाने प्राप्त होणाऱ्या पुण्यप्राप्तीसाठी लोक गंगास्नानास दूरवर जातात, परंतु एखाद्या आळशाच्या जवळ गंगेचे पात्र येणे आणि त्यास स्नान घडणे. (ल.) एखाद्या नालायक मनुष्यास त्याच्या (नालायकाच्या) कल्याण्यासाठी त्याच्याजवळ जावे लागणे किंवा ज्याची लायकी नाही अशास अनायासे चांगली संधी येणे या अर्थी : 'गंगा आली आळशावरी । आळशी देखोनि पळे दुरि ।' – तुगा. **आळशांचा मायबाप, राजा** – अत्यंत आळशी मनुष्यास म्हणतात. (स्त्री. रूप) आळसिणी : 'एकीं ओंगळा आळसिणी । एकी त्या महा डाकिनी ।' – एभा ७.६५.

**आळस** पु. १. केवळ सुख असले म्हणजे झाले, त्याबद्दल वेळेचा विचार नसणे, दुःख द्वेषासंबंधी विशेष आतुरता नसणे व काम करण्याची अंगात धमक असून ते करण्याविषयी मन प्रसन्न नसणे. या अवस्थेस आळस म्हणतात; सुस्तपणा; उद्योगाविषयी कंटाळा, नावड; मंदपणा ; मठ्ठपणा : 'आळसें काम नासतें । हें तो प्रत्ययास येतें ।' – दास १८.७.४. २. हयगय; दुर्लक्ष; अळंटळं; टंगळमंगळ. [सं. आलस्य]

**आळसट** वि. आळशी; मंद; सुस्त; मठ्ठ.

**आळसटपणा** पु. आळस; सुस्तपणा.

**आळसडा** पु. आळसावलेला; आळशी : 'नऊ नऊ वाजता उठायचं नी आळसड्यासारखं चुलाशी शेकत बसायचं.' – गाबा २३.

वि. आळशी; आळसट; निरुद्योगी.

**आळसणे** अक्रि. १. आळशी होणे; आळसावणे; आळसाने युक्त होणे. २. खिन्न होणे; मलूल होणे. (व.)

**आळसभोंडारा** वि. आळशी; मंद; मठ्ठ; जड; विशेषेकरून हा शब्द वयामुळे आळशी झालेल्या माणसास लावतात.

**आळसमळस** क्रिवि. ऐसपैस. (गो.)

**आळसाई** स्त्री. आळशीपणा; आळस; हयगय; ढिलेपणा; निरुत्साह. (गो. रूप आळसाय). कसर येणे; ताप येण्यापूर्वीची अवस्था. (डोके जड होणे इ.)

**आळसावणे** अक्रि. आळसणे; आळशी, मंद, सुस्त होणे, बनणे : 'गोदी आळसावून खांबाजवळ उभी होती.' – मोप्र २३.

**आळसुंदा** स्त्री. मोठी चवळी.

**आळंगणे** सक्रि. आलिंगन देणे; मिठी मारणे : 'घेतां स्पर्शसुखाची गोडी। तेवें श्रीकृष्ण आळंगिला भुजदंडी।' – शिव ६०. [सं. आलिंगन]

**आळंच** पु. आळस; अळंटळं : 'आळंच न करावा.' – सूत्रपाठ आचार उत्तरार्ध १६६. [सं. अलं+च]

**आळंच** मसलत; खल; विचारविनिमय : 'मेळउनि सकळाप्रती। राजा करी आलंचु।' –क्रिपु १.१५.४.

**आळंद** न. दूध तापवण्याचे छोटे भांडे; दुधाची खोबरी, तावणी : 'आळंदां दुध नीववीते असेति.' – गोप्र १३.

**आळा** पु. १. बंधन; बांधण्याची, आवळण्याची वस्तू. नियंत्रण करणारी गोष्ट; दोर; बंद. जसे :- केळीच्या पानांस बांधण्याचा सोपटाचा बंद, गवताचा भारा बांधण्याची दोरी : 'हेंडग्याच्या आळां अवघीं चिपाडें। काय तेथें गोडें निवडावीं।' – तुगा २८०२. २. (ल.) नियंत्रण; बंधन; संयमन; दाब; मर्यादा; आडकाठी; घरबंध. (क्रि. घालणे, तुटणे) : 'एकीचा धंदा दुसरी जात करणार नाहीं असा आळा पडला.' – गांगा २६. ३. एकी; जूट : 'कुणब्यांचा आळा.' (व.) [सं. आलान = साखळी, बंधन] (वा.) **आळा घालणे** – आवर घालणे; मर्यादा, नियम, बंधन घालणे; आटोक्यात ठेवणे; व्यवस्था लावणे : 'घालील महाराष्ट्राला निरभिलाष आळा कोण यापुढें।' – विक ९. **आळा पिळणे** – गाडीची आखरी आणि साटा यांना बांधणाऱ्या आळ्याला आळेदांडीने पीळ घालणे. **आळ्यात असणे, वागणे, राहणे, चालणे** – धाकात, कह्यात, ताब्यात असणे : 'ती भाषा व्याकरणाच्या आळ्यांत राहण्यास विशेष योग्य असते.' – मराठी व्याकरणावरील निबंध (चिपळूणकरकृत) १०. **आळ्यात आणणे** – ताब्यात, कह्यात ठेवणे; नियमन करणे; नियम व्यवस्था लावणे : 'जॉन्सन याने कोशरचना करून तीस (इंग्रजी भाषेस) आळ्यांत आणण्याचा प्रचंड उद्योग आरंभून तो एकट्यानें शेवटास नेला.' – निमा ५५६.

**आळागोळा** क्रिवि. गोल; वाटोळा : 'लाल कुसुंबी पागोटी बांधली आळागोळा। खुले मामाजीची निला वाण सावळा शोभला.' – वलो १०८. [गोळाचे द्वि.]

**आळाटाळी** स्त्री. ढिलाई; चेंगटपणा; बेफिकिरी; अळंटळं.

**आळाटोळा** पु. आटोका; अंदाज; पकड; आवाका.

**आळाप** पु. ओरडणे, गळा काढून मोठ्याने (रडणे) : 'मग आळाप पांगुळाचेया ऐसा करिति.' – लीचउ २२.

**आळाबंदा, आळाबांधा आळेबंध** पु. आटोका; अधिकार ताबा; मर्यादा; नियंत्रण; शासन; अंमल; व्यवस्था. (क्रि. येणे, आणणे, घालणे).

**आळास** पु. मोठ्याने रडताना कोंडून धरलेला श्वास. (गो.)

**आळिक** वि. क्षुल्लक : 'हें अवघेच विचारतां आळिक.' – भाए ७०. [सं. अलीक = थोडे]

**आळिकर** वि. हट्टी; छांदिष्ट; हेकेखोर (लहान मूल) : 'आळिकर त्याचें करिसी समाधान। अभयाचें दान देवोनिया।' – तुगा ५२१. [का. आळ=हट्ट]

**आळिका** वि. हट्टी; हावरा : 'अधीर आळिका अनाचारी। अंध पंगु खोंकलेकरी।' – दास २.३.३३.

**आळिका** स्त्री. (अव) अळी; कृमी; कीटक : 'आळिका म्हणती आमुचें घर। काष्ठामधें।' – दास १.१०.३८. [सं. अलीक=क्षुद्र]

**आळिता** पु. लाखेपासून तयार केलेला तांबडा रंग.

**आळिय** स्त्री. आळी.

**आळियाडे** न. हट्ट; छंद; अळका : 'पाहां पां माते तुम्हांसांगडें। माहेर तेणें सुरवाडें। ग्रंथाचें आळियाडें। सिद्धी गेलें।' – ज्ञा १८.१७७५.

**आळि–ळी–व** स्त्री. १. हट्ट; छंद; रळी; (लहान मुलांची) तीव्र इच्छा, हेतू, मनीषा, लाडू : 'तें आळि करौनि मागे जेवण।' – दाव २९६. 'आळी घेऊन जन्मा आले। कित्येक प्राणी।' – दास ९.८.२२. २. लडिवाळपणाचे, हट्टाचे भाषण : 'आळि बोलैति धाकुटें विदावंतीसी।' – शिव ३५३. [का. अळु=रडणे]

**आळिंबन** न. प्रेम; आसक्ती : 'धाडुनि विवेकाचें उपलाणें : उठवावे आळिंबनाचे ठाणें:' – उगी २०.१९१.

**आळी** स्त्री. गल्ली, ओळ.

**आळीकर** वि. छांदिष्ट, हट्टी.

**आळीके** वि. हट्ट किंवा छंद देणारे.

**आळीनळीचा** वि. शेजारचा किंवा अळीतला; जवळचा; संबंधातला.

**आळीपाळीने** क्रिवि. एकामागून एक; आलटून पालटून; आदलून बदलून. [आळी = रांग किंवा पाळीचे द्वि.]

**आळीव** वनस्पतीचे पौष्टिक बी.

**आळीव** स्त्री. नाद, प्रेम.

**आळुक** वि.१.भुकेला. २. आसक्त. ३. लाडका.

**आळुकणे** क्रि. तीव्र इच्छा असणे; हपापणे : 'जिहीं आपणपें नाहीं देखिलें। ते चि इहीं इंद्रियार्थी रंजले। जैसें रंकु कां आळुकैलें। तुषांतें सेवी।' – ज्ञा ५.११०.

**आळुका–की** वि. पहा : **अळका** : 'कैसी स्वसुखाची आळुकी। जे दोनीपणें भिडोनि एकीं। – अमृ १.५; 'म्हणे पती भुकेचा आळुका फार। यासि न होय निराहार।' – महिकथा ३३.१५३.

**आळुकेपण** न. आसक्ती; हाव; हावरेपणा; छंद; लोभ : 'ते आळुकेपणें जडली। अति सत्वर श्रीकृष्णि।' – रासपं ४.७२.

**आळुकैले** वि. भुकेले; क्षुधित.

**आळुबाय** पु. लाडिकपणा. (गो.)

**आळुमाळू पातरट** वि. अर्थ– अर्थांतर न जाणणारा; केवळ मुखपाठी; वाहत्या पाण्याला पान, काडी, कचरा किंचित आडवितात त्याप्रमाणे शास्त्रार्थात आळमाळ अडवितो तो.

**आळुवा** वि. अत्यंत लाडका : 'मातापितेया आळुवा नंदनु।' –क्रिपु २.१४.३.

**आळू** न. एक प्रकारची भाजी.

**आळू** स्त्री. उसावरील कीड : 'उसास मुख्य उपद्रव वाळवी, आळू आणि हुमनी या सूक्ष्म प्राण्यांपासून फार होतो.' – कृषी ४६३.

**आळू** न. एक काटेरी जंगली झाड व त्याचे फळ. हे तांबड्या मातीत होते. फळ सुमारे पेरूएवढे असून पिकल्यावर तपकिरी रंगाचे होते. त्यास

एक विशिष्ट वास येतो.

**आळे** न. झाडाच्या बुंध्याशी पाण्यासाठी केलेला खळगा, उंचवटा. 'शरीर विटाळाचें आळें। मायामोहपाश जाळें।' – तुगा ७३९.

**आळेण** न. कालवण घट्ट होण्यासाठी लावावयाचे पीठ, बेसन.

**आळेपिळे** पु. मुरडा; अळखा विळखा, पिरगळा : 'अभिमानाचे आळेपिळे। महत्त्व उमासे येती बळे।' – एभा ८.२१२.

**आळेबंद** वि. शिस्तबद्ध : 'कुणब्यासारखा विखरलेला समाज आळेबंद राहत नाही.' – गांगा १७४.

**आळेवणे** अक्रि. (आळणामुळे आमटी) दाट होणे. (गो.)

**आळेवाफे** पु. अव. १. भोपळा, दोडका, पडवळ इत्यादी वेल लावण्याकरता केलेले आळे वगैरे. २. वांगी, मिरच्या इत्यादिकांच्या खळीत लावलेले एकेक रोप. ३. एक कुळव.

**आळे सिंचन पद्धति–ती** स्त्री. (कृषी.) फळझाडांना व फुलझाडांना पाणी देताना त्यांच्या बुंध्यास पाणी लागू नये म्हणून एक वाटोळा वरंबा व त्याच्याबाहेर दुसरा वरंबा करून त्या बाहेरच्या वरंब्यात पाणी देण्याची पद्धत.

**आळोआळी, आळीयां** गल्लोगल्ली.

**आळोकेपिळोके –खे** पहा : आळेविळे

**आळोखा** पु. आळस देणे; अंगास आळेपिळे देणे.

**आळोंच** स्त्री. कानगोष्ट; कानमात : 'बहिऱ्यांच्या घरी कवणकवणा आळोंचु सांगे।' – भाए ५५४.

**आळोंचणे** अक्रि. हळूच कानात सांगणे, बोलणे; कानगोष्टी करणे : 'हितगुज आळोंचासी। हृदयींचें गोड सांगावयासी।' –एभा २४.३०१.

**आळोस** पु. आळस.

**आक्षरिक** वि. (भाषा.) श्वासोच्छ्वासाच्या एका सपाट्यात उच्चारल्या गेलेल्या ध्वनिसमूहातील सर्वांत मुखर (स्पष्ट ऐकू येणारा) ध्वनी–विशेषतः स्वर. तुलना : अनाक्षरिक. [सं.]

**आक्षवानी** स्त्री. औक्षण; ओवाळून टाकण्याची क्रिया.

**आक्षादणे** उक्रि. आच्छादणे; झाकणे : 'जैसा घनपटळीं भानु। आक्षादिजे।।' – राज्ञा २.७५.

**आक्षिप्त** वि. १. आक्षेप केलेला, घेतलेला; नामंजूर केलेला; अडथळा, हरकत आणलेला (वादविवादात अडवलेला). २. अमान्य. [सं.]

**आक्षिप्त(करण)** न. (नृत्य) हात व पाय भराभर पुढच्या बाजूस फेकणे. [सं.]

**आक्षिप्तिका** स्त्री. (संगीत) स्वरात, तालात लिहिलेली चीज. [सं.]

**आक्षेप** पु. १. हरकत; आडकाठी; विरोध (वादात प्रतिपक्षाचा मुद्दा किंवा बाजू) : 'त्यांनीं घेतलेले आक्षेप धडधडीत खोटे आहेत.' – केले १.३६१. २. शंका; संशय; शंकाप्रश्न : 'श्रोतयांनीं आक्षेप केला।' – रावि ३. ३. आग्रह; हट्ट; सूचना : 'नाहीं ग्रंथारंभसंकल्प। नव्हता श्रोतयांचा आक्षेप। ग्रंथीं उजळला कृष्णदीप। सुखरूप हरिकथा।।' – एरुस्व १८.६९. ४. ओढणे; खेचणे; आकर्षणे. ५. ओढून धरणे; मागे घेणे; आढेवेढे घेणे; शंकाकुशंका काढणे; आवश्यक म्हणून वाट पाहणे; खोळंबून राहणे (एखादा माणूस किंवा वस्तू नाही म्हणून); अडून बसणे. (क्रि. घेणे, धरणे). : ६. (ल.) अनुमान निघणे; सोबत, बरोबर येणे; बरोबरच बोध होणे; ध्वनित, गर्भित असणे; गर्भितावस्था : 'माझे ऋण घेतलेस ते दे – या वाक्यात ऋणाने व्याजाचा आक्षेप होतो.' ७. निंदा; कुटाळी; दूषण; ठपका. ८. एक अलंकार (व्याजोक्ती–व्यंगोक्ती प्रमाणे); एखादा आक्षेप घेऊन तो खोडून टाकण्याचे वर्णन असते तेथे आक्षेप अलंकार होतो. बोलावयाचे ते अर्धवट बोलून एखादा विशेष अभिप्राय व्यक्त केलेला असतो तेथेही हा अलंकार होतो. जसे :– 'नसेन दिसलो कसा नयनसर्वसाक्षी रवी। विषाद धरिला म्हणो न सुरभी विषक्षीर वी।' – केका ४. ९. निश्चय : 'तवं सुप्रभातें आक्षेपें आलीं.' – लीचउ ३८. [सं. आ+क्षिप् = फेकणे]

**आक्षेपक** वि. आक्षेप घेणारा, काढणारा.
पु. १. हरकत घेणारी व्यक्ती. २. वातरोग; मज्जातंतूचा रोग; आचके; आकडी. [सं.]

**आक्षेपणी** स्त्री. आक्षेप; क्षोभ; राग.

**आक्षेपणे** उक्रि. १.ओढून घेणे; आकर्षणे; चटक लावणे. २. हरकत घेणे; नामंजूर करणे; अमान्य करणे. ३. शंका काढणे : 'मागां श्रोतीं आक्षेपिलें। जी ये ग्रंथीं काय बोलिलें। ते सकळही निरोपिलें। संकलित मार्गे।।' – दास १.१.२७. [सं. आक्षेप]

**आक्षेपता** स्त्री. अपेक्षा : 'यासि कव्हणाची आयाबंधनी आक्षेपता नाही.' – लीचउ १५४.

**आक्षेपार्ह** वि. दोषार्ह; हरकत घेण्याजोगा; तक्रार करण्याजोगा. [सं.]

**आक्षेपित** वि. ज्याच्यावर आक्षेप घेतला आहे असा : 'आक्षेपित भाग न वगळलेली कादंबरी तुम्ही वाचली आहे काय?' – स्मृचापाने १५६.

**आक्षेपून** क्रिवि. निक्षून; प्रत्यक्ष बजावून; मुद्दाम; जाणूनबुजून; आवर्जून.

**आज्ञप्त** वि. आज्ञापिलेला; हुकूम केलेला; सांगितलेला. [सं.]

**आज्ञप्ति–प्ती** हुकूम, आदेश, ताकीद, आज्ञा, 'आमात्यराज, ही विज्ञपि कां ? आज्ञप्तीच मी समजेन. – चंद्रगुप्त २०१.

**आज्ञा** स्त्री. १. हुकूम; आदेश, ताकीद, सामा. शब्द – राजाज्ञा, शास्त्राज्ञा, वेदाज्ञा इ. २. वेद; शास्त्र इत्यादिकांस म्हणतात. ३. होय, बरे, इच्छेप्रमाणे करतो या अर्थी. वरिष्ठांनी आज्ञा केली असता सेवकवर्ग 'आज्ञा' या शब्दाने उत्तर देतात. ४. तंत्रशास्त्रातील षट्चक्रांपैकी एक. योगशास्त्रातील एक भ्रुकुटीस्थ चक्र : 'आधारादि भेदूनि । आज्ञावरी ।।' – ज्ञा १८.१०३८. (वा.) **आज्ञा देणे** (वा.) –१. कामावरून दूर करणे; बडतर्फ करणे. २. निरोप देणे. **आज्ञा मागणे–** (जाण्यास) परवानगी देणे; निरोप देणे. **आज्ञा वंदणे, नमस्कारणे, पाळणे–** आज्ञा शिरसामान्य करणे : 'तयातें वोळखावया हेचि संज्ञा । जें जगें नमस्कारिजे आज्ञा ।।' ज्ञा. १०.३३१

**आज्ञाकर–कर्ता–कारी–आज्ञांकित, आज्ञाधारक–धारी, आज्ञाधीन, आज्ञानुसारी–वर्ती** वि. आज्ञा पाळणारा; आज्ञेप्रमाणे वागणारा; अंकित; आश्रित; आज्ञाधारक. हा शब्द पत्राच्या शेवटी आपली आज्ञा पाळणारा सेवक या अर्थी लिहितात. [सं.]

**आज्ञाचक्र** न. भ्रूमध्यस्थानी असणारे चक्र. पहा : **आज्ञा** ४ : 'नाकाचें अग्र सांडूनि दूरी । दृष्टी ठेवावी नासाग्रीं । तें ठायी बैसें आज्ञाचक्रीं ।

योगगंभीरीं योग्यता ।। – एभा १४.४१२.

**आज्ञातिक्रम–आज्ञातिक्रमण** पु. न. आज्ञा मोडणे; आज्ञेचे उल्लंघन; हुकमाच्या विरुद्ध जाणे. [सं.आज्ञा +अतिक्रम.]

**आज्ञात्मक** वि. आदेश, हुकूम असलेला.

**आज्ञादशक** न. (ख्रिस्ती) दशाज्ञा; परमेश्वराने मोशाला सीनापर्वतावर ज्या दोन दगडी पेट्या दिल्या होत्या त्यावरील लेखाचे नाव. (पहिल्या चार आज्ञांमध्ये मनुष्याची देवाशी आणि बाकीच्या आज्ञांत मनुष्याची मनुष्यांशी कर्तव्ये सांगितली आहेत.) : 'आणि पाट्यांवर त्यानें (मोश्यानें) कराराचीं वचनें म्हणजे दहा आज्ञा लिहून काढिल्या' – निर्ग ३४.२८. [सं.]

**आज्ञाधर** वि. आज्ञाधारक : ' तीएं आज्ञाधरें की ' – लीचपू ४६.२

**आज्ञापक** वि. १. (राज्य.) आदेशात्मक; आज्ञार्थक २. आज्ञा करणारा; हुकूम करणारा (धनी इ.) : 'वाचासिद्धि पावाल । आज्ञापक होआल ।' – ज्ञा ३.९९. [सं.]

**आज्ञापणे–पिणे** उक्रि. १. आज्ञा करणे; हुकूम करणे; ताकीद करणे; सूचना करणे : 'आज्ञापिला निजपिता वसुदेव देवें ।' २. सोपवणे; स्वाधीन करणे; ताब्यात देणे.

**आज्ञापत्र** न. १. सरकारच्या हुकमाचे पत्र; सरकारी हुकूम; मराठी राज्यात छत्रपतींच्या स्वत:च्या पत्रांस आज्ञापत्र म्हणत. २. (सामान्यत:) मोठ्यांकडून लहानास गेलेले पत्र. ३.लेखी हुकूम; शासनपत्र. ४. (ख्रि.) राजा, बिशप वगैरे अधिकारी वर्गाकडून एक्लेसियेला अथवा मंडळीला आलेला हुकूम 'त्याच वेळेस... आज्ञापत्रें, आवाहनपत्रें असल्यास वाचावीं.' – साप्रा ७० [सं.]

**आज्ञापत्रिका** स्त्री. (बडोदे) सरकारी हुकूमांचे प्रसिद्धीपत्रक; सरकारी वार्तापत्रक; सरकारी गॅझेट. [सं.]

**आज्ञापन** न. हुकूम करणे; आज्ञा करणे; सूचना करणे; समजावून सांगणे; ताकीद; आदेश. [सं.]

**आज्ञापनीय** वि. आज्ञा करण्यायोग्य. [सं.]

**आज्ञापालक** वि. आज्ञांकित; आज्ञाधारक; आज्ञा पालन करणारा; अंकित; सेवक; अनुचर; प्रजा. [सं.]

**आज्ञापालन** न. आज्ञा पाळणे; हुकूम मानणे; आज्ञांकितता. [सं.]

**आज्ञापित** वि. हुकूम केलेला, सांगितलेला.

**आज्ञाभंग, आज्ञोल्लंघ, आज्ञोल्लंघन** न. आज्ञा मोडणे; हुकूम तोडणे, आज्ञेविरुद्ध वागणे. [सं.]

**आज्ञार्थ** पु. (व्या.) क्रियापदाच्या रूपावरून जेव्हा आज्ञा, विनंती, आशीर्वाद किंवा उपदेश यांचा बोध होतो, तेव्हा त्यास 'आज्ञार्थ' असे म्हणतात. [सं.]

**आज्ञार्थी** वि. (व्या.) क्रियापदाच्या ज्या रूपावरून आज्ञा, उपदेश किंवा प्रार्थना या गोष्टींचा बोध होतो ते क्रियापदाचे रूप.

**आज्ञासिद्ध** वि. ज्याची आज्ञा सिद्ध झाली आहे असा; ज्याची आज्ञा सर्वत्र पाळली जाते असा (ईश्वर) : 'मीं मनें वाचा देहें । करीं तें कैसें नोहे । कें मजवांचूनि आहे । आज्ञासिद्ध आन ।' – ज्ञा १६.३५५. [सं.]

**['आं' ने सुरू होणारे काही शब्द 'अं' मध्ये पाहावेत.]**

**आं** उद्गा १. सांगितलेली गोष्ट चांगली ऐकली नसता पुन्हा बोल असे म्हणण्याच्या अर्थाने केलेला उच्चार. २. आश्चर्यदर्शक शब्द : 'आं! तुम्ही केव्हा आलात?' ३. प्रश्नार्थी : 'काय? आं?' ४. षष्ठीचा विभक्तिप्रत्यय : 'तंव तो धारासिंपे तिखटें । डोळेआं उजूं ।'– शिव ७११.

**आंक** पहा : **आंख** डोळ्याजवळचा भाग; भुवई व कान यामधील जागा : 'आंका बैसला भाला । सयाजी गायवाड पडला ।' – ऐपो ८७. [सं. अक्षि; अक्षन् = डोळा] (वा.) आंक मोडणे – डोकेदुखी बरी होण्यासाठी आंकावर बिब्याच्या फुल्या घालणे.

**आंक** – छाप, ठसा. 'कर्मी या नावें पाटाचे : आंक जैसे' –ज्ञा १८.६००.

**आंकडकडवे** गाण्याचे पालुपद.

**आंकण–णा–णे** पु. न. १. पायात घालायचा तोडा; (पूर्वी शत्रूला जिंकल्यानंतर त्याचे नाव एका तोड्यावर खोदून तो पायात घालायची चाल होती त्यावरून) पराक्रमसूचक पादभूषण : 'तो रणीं जितिला करूनिं नेम । तेणें संतोषेनि परम । आपलें नाम आंकणा घालीं ।' एभा १९.१४३. २. (सामा.) ब्रीद; बिरुद; ब्रीदावळी; अलंकार; भूषणें : 'हें आंकणें अनंता तुजचि साजे ।' – भाए ६५०; 'आंगाचेनि गोरेपणें हे पण्हेरेयांवरी पढवी आंकणें'– शिव ८०७. भा.ए. [सं. अंकन]

**आंकण–णा–णे** वि. वश; स्वाधीन; ताबेदार; आज्ञांकित : 'जयाचा काळु आंकणा' – रूस्व २८२. [सं. अंकन]

**आंकणकडवे** न. १. गाण्यातले पालुपद; ध्रुवपद; पेडाबंद २. (ल.) एकदा नाकारलेली गोष्ट पुन्हा पुन्हा काढणे; विनंती करणे; ठरलेली गोष्ट पुन्हा उपस्थित करणे. ३. जपमाळ घेणे; घोळणे; तुणतुणे गाणे; घोकणे. ४. एखाद्याच्या भाषणात वारंवार येणारा शब्द; पादपूरण; वाक्यपूरण.

**आंकणभर** वि. खणभर.

**आंकणी** स्त्री. १.आखणी; रेघा वगैरे आखण्याची पट्टी, रूळ. २. रेघा मारणे; आखणे; खुणा करणे. ३. पेटीतील खण, कप्पा. ४. योजना; बेत; रूपरेषा; चित्राकृती. ५. जनावरांना रोग झाला असता त्यांना डागण्यासाठी वापरण्यात येणारी सळई. [सं.अंकन]

**आंकणे** न. १. ब्रीद, ज्यावर विजयचिन्हे कोरली आहेत असा तोडर, 'हे आंकणे अनंता । एका तुजचि साजे ।'– उगी ६५०. २. स्तुतिस्तोत्र – 'पूर्वजी जोडिजे : मग आंकणे पदविजे ।' – शिव ५१८.

**आंकणे** सक्रि. १. आखणे; चित्रित करणे; क्रमांक घालणे; सरळ रेषा ओढणे; मोजमाप करणे. २. (सोनारी धंदा) कैवाराने माप घेणे. पहा : **अंकणे** [सं.अंकन.]

**आंकणे** क्रि. स्वाधीन होणे; ताबेदार असणे; अंकित असणे : 'तो देवाचा आंकला म्हणोनि । आपुलेया रचणारा मानु देऊनि । देव संतोसु करावा ।।' –क्रिपु १.६.४५. [सं. अंकन.]

**आंकपट्टी –आंखपट्टी** स्त्री. १. कापडाचा तागा किंवा सणंग वगैरेवर मालाची किंमत व क्रमांक दाखविण्यासाठी अडकविलेली चिठ्ठी. पहा : **अंकपट्टी** २. कापडाच्या गाठीतील निरनिराळ्या वस्तूंच्या किंमतीची मोठी यादी. ३. पहा : **आंकणी** १

**आंकबंदी** स्त्री. कुळाने खोतास, इजारदारास द्यायचा सारा. [सं. अंक+बन्ध]

**आंकर** पु. अंकुर; मोड, कोंब. (गो.) [सं.अंकुर]

**आंकरी** स्त्री. १. झाडाची कोवळी फांदी. २. अंकुर; कोवळा शेंडा, डिरी. ३. कोवळे कणीस. [सं. अंकुर]

**आंकवर** कुमार; अविवाहित. (गो.) [सं.]

**आंकवार – बारीण** स्त्री. कुमारी; कुवारीण. [सं. कुमारी]

**आंकसाळा** पु. १. कसाचा दगड. २.टांकसाळ : 'वोरकळू चि जाला आंकसाळा।' –राज्ञा १८.४८९

**आंकुडा** पु. बाकदार टोक : ' तैसे आवाळुवांवरि आंकुडे ' । – ज्ञा ११.३५८.

**आंकुडी** – स्त्री. आकडी : 'आकुडीया करूनि काढा।'– लीचपू. १४५

**आंकुरणे** क्रि. उद्‌भवणे; प्रकट होणे. [सं.अंकुर]

**आंकुशमुद्रा** स्त्री. इंद्राची विद्या.

**आंकूल** स्त्री. एक वनस्पती; अंकोली; सर्पदंशांवर हिच्या मुळीचा उपयोग होतो. (गो.)[हिं.अंकोल]

**आंकोल** पहा : **आकोल**

**आंक्री** अंकुर. (गो.)

**आंख** पु. १. संख्या; आकडा; गणितातील अंक; चिन्ह. 'तेथे स्वानंदाचा ग्राहकु । तत्काळ भेटला नेटकु । त्यासि जीवेंसहित विवेकु । घालूनि आंखु संवसाटी केली ।' –एभा ११.१०००. २. किंमतीचा आकडा वर घातलेले कापड. ३. (ल.) कापड : 'पोटास (रोख) व आख (वस्त्र) पावत नाही.' थोमारो ५.५४. ४. (सामा.) रक्कम; आकडा: ' जैसें सरलियां लेख । आंख होती एक। ' –ज्ञा १३.९३८. [सं. अंक] (वा.) **आंख ओढणे** – १. खूण करणे. २. अनुमान करणे, भविष्य सांगणे. **आंख घालणे** – निश्चित अंदाज करणे.

**आंख** पु. शेंडा; आकडा; 'आख्याचे पान'. (व.)

**आंखाचे घोडे, उंट, बैल** पागेतील जनावरांची चुकभूल होऊ नये म्हणून त्यांच्या मागील भागावर आकडे घातलेली जनावरे.

**आंखिला** वि. अंकित : 'जो सद्‌गुरुवचनें निवाला । तो सायोज्यतेचा आंखिला ।' – दास ५.३.३९.

**आंखिली** वि. नेमकी.

**आंग** पहा : **अंग आंगपासून साधणारे काही शब्द 'अं'मध्ये पहा.**

**आंगउब** स्त्री. अंगाची उष्णता : ' जेयाचीया आंगउबा विटे श्रींधारू : कामिनीज्ञनाचा।'– उगी ३९३.

**आंगकीर्तीचा** वि. शारीरिक. (गो.)

**आंगचुकवे** वि. काम टाळणारे : 'त्यामुळे हें लोक मोठे तिखट, चौकस, हजरजबाबी, आंगचुकवे व गुलाम झाले आहेत.' – गांगा ४३.

**आंगचे** न. १. अंगात एखाद्या देवतेचा किंवा पिशाचाचा संचार होणे. २. गुदद्वारातून बाहेर येणारे आतडे. ३. देवी (फोड्या) ( क्रि. उतरणे, येणे). [सं.अंग]

**आंगच्या** स्त्री. देवी; गोवर, उष्णविकार. (राजा.)

**आंगजोऱ्याने वर्तणे** बळ प्रदर्शन करणे; मूठमर्दाई करणे.

**आंगटी** स्त्री. जुन्या वस्त्राचा तुकडा, फडके, चिंधी. (गो.)

**आंगठवण** स्त्री. अंगाची ठेवण; शरीराचा बांधा. (गो.)

**आंगठाछाप** वि. अशिक्षित; लिहिता येत नसल्याने सहीऐवजी अंगठा उठवणारा : 'तुम्ही शिकलेसवरलेले आहात, आम्ही आंगठाछाप.' – बाविबु १२९.

**आंगड** स्त्री. बाजार. (गो.)[का. अंगडी.]

**आंगडकार** वि. सोबती; सोबत करणारा. (गो.)

**आंगडणे** क्रि. अंगास आळेपिळे देणे : 'चालें वेढ्यातें उकलिती । कवतिकें होय आंगडिती ।' – स्वादि ९.५.११

**आंगडा** आंगरखा, सदरा.

**आंगडी, आंगडे** लहान मुलांचा अंगरखा, झबले.

**आंगडेटोपडे – टोपी** पहा : **अंगडेटोपडे – टोपी**

**आंगतपंगत** स्त्री. मुलांनी एकत्र बसून केलेले जेवण. प्रत्येकाने आपापल्या घरचे अन्न आणून एकमेकांना देऊन एकत्र जेवणे. [सं. पंक्तिचे द्वि.]

**आंगती** स्त्री. दंतकथा.

**आंगतुक** न. १. अंग वाकविणे. 'अंगतुकाचेयां चळवळा ।' – उगी ४५२.२. २. स्वत:चा तुकडा वजन: 'तरि लोहे आंगतुक । न तोडितांचि कनक ।' –ज्ञा १७.२१५.

**आंगदट** वि. अंगाने बळकट; सुदृढ [ सं. अंग + दृढ]

**आंगदाटणा** पु. अंग पुसण्याचे वस्त्र : ' आंगदाटणा ओळगविला ।'– लीचउ ६०१.

**आंगधार** स्त्री. दुभत्या जनावराची जोराने पिळून काढलेली धार. (अंबोण पुढे ठेऊन अगर वासरू सडास लावून जो पान्हा सुटतो त्याच्या उलट). [सं. अंगधारा]

**आंगपतन** न. नम्रता : 'दाऊनिया आंगपतन । पाषाण फोडिल लोहघन ।'– हनव २२१. [सं.अंगपतन]

**आंगप्रत** क्रिवि. पृथकपृथक; अलग अलग; इसमवार; प्रत्येकी.

**आंगभर** पु. नेट, जोर.

क्रिवि. १. पूर्ण अंगात; २. सहनशक्तीच्या पलीकडे.

**आंगभार** पु. शरीराचा भार, वजन : 'जैसी तेया शुकाचेनि आंगभारें । नळिका भविनली एरीं मोहरे।' – ज्ञा ६.७६.

**आंगभोग** पु. १. देहाचे उपचार. २. शरीराचा भोग.

**आंगमास** न. सर्व अंग : 'तिनं मग आंगूल घातलान्, आंगमास धवलान् आनि मग झोपवलान्.' – अउआ १०७.

**अंगमेळ** पु. आलिंगन. ' जवं परिसु आंगमेळें । एकवटीनां ।' –ज्ञा १८.१२४८.

**आंगमोडामोडी** स्त्री. आळोखेपिळोखे देणे 'आंगमोडामोडी । कार्य जातां अनावडी ।'– ज्ञा१४.१७.

**आंगरखा – राखा** पु. (प्र.) अंगरखा; अंगात बंडीच्या वर घालायचा बंदांचा, घेरदार, जास्त लांब असलेला कपडा; सदरा.

**आंगरुखा** स्त्री. एका अखंड लाकडाची केलेली होडी. (कों.) [सं. अंग + रुख = वृक्ष ]

**आंगलग** वि. अंगासंबंधी.

**आंगला** पहा : **आंगरखा** (कु.)

**आंगलीन** वि. अंगते; अंगात मुरलेले : 'सद्वैद्यें जैसें दोषां । आंगलीनां' - ज्ञा १६.४२.

**आंगले** न. बोटे. (भिल्ली) [सं. अंगुली]

**आंगले** न. आंगडे; झबले. (गो.)

**आंगवख** बाजू : 'जळतेया गिरिचेया आंगवखा ।' - ज्ञा ११.४२०.

**आंगवटा** पु. आधार.

**आंगवण** स्त्री. इच्छा; छंद; प्रतिज्ञा; मेहनत.

**आंगवणे** सक्रि. १. अंग देणे; स्वीकारणे; अभिमान धरणे; स्वाधीन होणे. २. त्याग करणे.

**आंगवणे** क्रि. १.अंगवण, नवस करणे: 'बायकोनं सत्यनारायण आंगवला होता.' - पक्षिणी ४४. २. मानवणे; हाती येणे; स्वाधीन होणे : 'जे विश्वासु आंगवला संवचोराचा ।' - राज्ञा ८.१४५.

**आंगवणेकार** वि. समर्थ; शूर.

**आंगवने** न. आधार, आश्रय. २. निग्रह

**आंगवाण** पु. नवस. (कु.)

**आंगवाले** न. अंगात घालण्याचा कोणताही शिवलेला कपडा; आगले. (गो.)

**आंगसा** पु. वस्त्राचा तुकडा; रुमाल; फडका. (गो.)

**आंगसीक** अंगावरील वस्त्र.

**आंगसूट** वि. सुटसुटीत अंगाचा.

**आंगसूत्र** फितूर, कारस्थानी.

**आंगा** येथे; इथे. (गो.)

**आंगा** पु. अंगरखा; कुडते.

**आंगागणिक, आंगागवडी** क्रिवि. पृथक पृथक; निरनिराळे; प्रत्येकी; वेगवेगळे; प्रत्येक माणसाला निराळे. (को.)

**आंगाथिणे** क्रि. १. पुष्ट होणें : 'भणऔनि आंगाथिलें ठीकलग ।' दाव १७८. २. अंगीकारणे; पहा : **अंगाविणे** [सं. अंग +स्था]

**आंगारइचे** क्रि. रागावणे; चिडणे. (गो.)[सं.अंगार.]

**आंगारडबी** स्त्री. आगकाड्यांची पेटी; आगपेटी. (व.)

**आंगावो** पु. मोठेपणा. (गो.)

**आंगिक** पहा : **अंगिक.** वस्त्राचा एक प्रकार [ शिवभारत- राजकोश]

**आंगिका** स्त्री. अंगुली; बोट.

**आंगी** पहा : **अंगी**

**आंगुठ – ठा** पु. अंगठा : 'देवा, धोत्राची नीरी आंगुठेन चेपते पुढां ।' - उषा १८४६.

**आंगुलें** आंगडे; लहान मुलांची आंगी.

**आंगुस्टी** स्त्री. मुद्रिका; मुदी; अंगठी : 'तू देवाची आंगुस्टी साचारू ।' - क्रिपु १.१४.

**आंगुस्ती** स्त्री. आंगमोड : 'तोचि जेव्हळि होये विरमला। तेव्हळीं आंगुस्तीय दे ।' -ज्ञाप्र ७२२.

**आंगुळ** न. आठ यव रुंदीचे माप; (आठ यव म्हणजे साधारण एक बोट रुंदी होते यावरून) बोटाच्या रुंदीचे माप. [सं. अंगुलि]

**आंगूछा** पु. पंचा; टॉवेल: 'माझा आंग पुसण्याचा सुताळ आंगूछा होता.' -असा २.

**आंगे** क्रिवि. खुद्द; स्वत:; जातिनिशी : 'तेचि वस्तु होये आंगें । या नांव साधक ।' - दास ५.९.२१. [सं.अंग]

**आंगोघडी** क्रिवि. क्षणोक्षणी; वारंवार; पुन:पुन:.

**आंगोपती** क्रिवि. अंगप्रती; वेगळाले; प्रत्येकजणाने आपल्यापुरते; स्वतंत्रपणे.

**आंगोवांगी** वि. स्वत:; जातीने : 'उद्धवा तूं यालागीं। येथोनि निघावें वेगीं। एकलाचि आंगोवांगी ।' - एभा ७.२९ [सं. अङ्गोपाङ्ग]

**आंगोळी** पहा : **अंगुळी** : 'जैसा आपुल्या आंगोळिया गणितां दिसती वेगळालिया ।' - एभा २.५.८६

**आंग्ल** वि. इंग्रज किंवा इंग्रजी यासंबंधी.

**आंग्ल भारतीय** पहा : **आंग्लो इंडियन**

**आंग्लो इंडियन** वि. १.युरेशियन; हिंदुस्थानात जन्मलेले व हिंदुस्थानात राहाणारे इंग्रज. २. इंग्लिश आणि भारतीय यांच्या संकरातून निर्माण झालेली प्रजा.

**आंग्ळ** न. सद्रा. (व.)

**आंघूळ,आंघोळ** स्त्री. स्नान; अंग धुणे. (वा.) **आंघोळ करणे** - एखाद्या व्यक्तीशी असणारे सर्व संबंध तोडून टाकणे. **आंघोळ घालणे** - दुसऱ्याचे अंग धुणे.

**आंघोळी–घंगाळी गायन** न. गाण्याचे अर्धवट शिक्षण घेतले असताना केलेले गायन.

**आंचणी** स्त्री. घुसळखांबाची दोरी.

**आंचणे** क्रि. जमीन तयार करणे; जमिनीचा पोकळपणा घालवणे.(गो.) [सं. अंच]

**आंचवणे** क्रि. पहा : **अंचवणे** (वा.) **पंचपक्वान्नाचे जेवण आणि गोमूत्राचे आंचवण–** चैनीचे, विलासाचे सुख नाहीसे करणारा त्या गोष्टीचा शेवट.

**आंचळ** न. वस्त्र.

**आंचळ** पु. गाय, म्हैस, इ.चा स्तन; सड.

**आंचळे** वि. कच्छहीन, कासोटा न घातलेले: 'आंचळे बहिर्वासु न नेसिजे' - लीचपू ५०७.

**आंची** डाक, टपाल : 'नबाब बहादूर यासी अर्जी आनंदराव यांची, आंचीवरून रवाना केली ती पाऊन समाचार कळेल.' - राजच १९.८२.

**आंचूळ** पहा : **आंचूळ.** स्तन; आचूळ.

**आंज** पु. देवदूत : 'जैसें अंबरी आंजांचे गायेन । तैसें स्वामिणिचें वचन'- क्रिपु २.१०.१११. [इं. एंजल्स]

**आंजणवाडी, आंजणी, आंजिणी** स्त्री. रांजणवाडी; डोळ्याच्या पापणीस होणारा फोड- पुळी. (कों.)

**आंजरली, आंजुर्ली** पहा : **रांजणवाडी**

**आंजारणे, आंजारणे गोंजारणे** क्रि. कुरवाळणे, जवळ घेऊन प्रेमाने अंगावरून हात फिरविणे.

**आंजीमांजी** पु. लपंडाव; एक खेळ. (कु.)

**आंजुम्लह** वि. हे सर्व; वट्ट; एकूण. [फा. आं+जुम्लह]

**आंटी** स्त्री. १. मिठी; आलिंगन: 'प्रियोत्तमाचां कंठिं । प्रमदा घे आंटी ।' – राज्ञा १३.७८४. २. गाठ.

**आंटू** पु. शरीराचा संकोच; आटुळणे.

**आंठल** स्त्री. फणसातील बी; आठोळी. [सं. अष्टि, प्रा. अट्ठि]

**आंठी** स्त्री. मिठी. 'मग सुखेंसी घे आंठी । गाढेपणें ।'– ज्ञा ५.१३२. [का. अड्ड]

**आंठुळणे** क्रि. बांधणे; घट्ट होणे : 'तो ऊर्ध्वी आठुलैजे कंदु ।'– ज्ञा १५.८८.

**आंठुळी** स्त्री. फळाच्या आतील टणक बी. पहा : **अटोळी** : 'आंठुळी ते टाकणें की वरील साली काढणें ।' – शिगीता ५९.

**आंठूड** कष्टाने : 'वायां चि मान पीळी । आंठूड हियें आवळी ।'– राज्ञा ६.७७.

**आंडगी** न.(व्यापार) गठ्ठा: 'काल इरकलहून चार आंडगी लुगडीं आलीं.' [का. अडिंगे=अखे, बैलाचे अर्धे ओझे]

**आंडगोळी** स्त्री. अंडुकल्या; वृषण. पहा : **अंड** : 'दुसरा पर्याय होता, मधुकर व परबत या उन्मत्त तरुणांच्या आंडगोळ्या काढून त्या त्यांच्या हाती देण्याचा.'– हीबांमा ७९.

**आंडी** स्त्री. अंडेर. मुलगी. (खा.) [सं. अंडीर]

**आंडूगांडू** वि. षंढ; बुळा; कुचकामाचा; मुर्दाड (माणूस).

**आंडे** अ. अथवा : 'चित्तासि परमपुरुषाची मोहोर । लावि, मग शरीर । असो आंडें जाओ'– राज्ञा ८.८१.

**आंडेल** पु. ताडाएवढा वाढलेला पण ठोंब्या माणूस. (गो.) [सं. अंडीर]

**आंडोर** पहा : **अंडोर**; मुलगा : 'केसव-नाएकु आंडोरासि नीरोपु देति.'– गोप्र १२.

**आंडोरी** स्त्री. लहान मुलगी : 'माहाराची आंडोरी'– लीचउ ५१३.

**आंडोरें** न. लहान मूल : 'तेथ एक आंडोरें राखन ठेविले होते.'– गोप्र. २०.

**आंत** न. आतडे : 'एकासि लोंबती आंताचे पेंदळे : हुळ लागली जेथे'– रुस्व २१९३. [सं. आंत्र]

**आंत** पु. स्त्री. १. अंत:करण; मन: 'दांभिकाचा आंत न कळे'– पंचो २९.१. २. कृपा; दया : 'या निवृत्तीची आंत न कळे' – ज्ञागा ४०२.[सं. अन्त]

**आंतर** न.मन; आतला भाग : 'जो विगुंतला असे आंतरीं । महासुखें ।'– ज्ञा २.३६२.

वि. १. भिन्न व्यक्ती, संख्या, राष्ट्रे इ. मधला : 'आंतरराष्ट्रीय व्यवहार'; 'आंतरजातीय लग्न'.२. अंतर्गत; आतला; आतल्या बाजूचा: 'आंतरदेशीय पत्र.' ३. अंतस्थ; गूढ; गहन. [सं.]

**आंतर आटा** पु. (यंअ.) ज्याच्यात स्क्रू फिरू शकतो असा अंतर्गत पेच.

**आंतरकोन** पु. (ग.) आतील कोन; आतील बाजूने मोजलेला कोन.

**आंतरक्रिया अंक** पु. (विअ.) परस्परावलंबी अथवा अन्योन्यक्रिया गुणांक.

**आंतरगांधार** पु. गाण्यातील एक श्रुती : 'मध्यमग्रामात आंतरगांधार ह्या श्रुति...'– मागोवा १७.

**आंतरग्रंथिल** वि. (वै.) ग्रंथींमध्ये; ग्रंथींसंबंधी. [सं.]

**आंतरछेद** पु. (ग.) आतील बाजूचा तुकडा. [सं.]

**आंतरजमातीय** वि. दोन किंवा अधिक जमातींमधील, जमातींचा किंवा जमातीसंबंधी.

**आंतरजातीय** वि. जाती, पोटजाती यांच्यातील, यांच्याविषयीचा, यांच्या संबंधीचा; जातीजातीमधील, जातीजातींचे, विषयीचे (प्रश्न).[सं.]

**आंतरतारकीय** वि. (भौ.) आकाशगंगेतील किंवा तारामंडळाच्या तारकांमध्ये असलेले (अवकाश). [सं.]

**आंतरत्व** न. दोन गोष्टींच्या मध्ये असणे. [सं.]

**आंतरत्वचा** स्त्री. झाडाची आतली साल; शरीराच्या बाह्य त्वचेच्या आत असलेली नाजूक मृदू त्वचा : 'या आंतरत्वचा भवद्रुमा । वल्कलें म्हणावया महिमा ।'– एभा १२.४२९.

**आंतरदृश्यता** स्त्री. (भू.) परस्परांपासून लांब अंतरावर असलेल्या दोन बिंदूंमध्यें कसलाही अडथळा नसल्याने ते दोन्हीही स्थानांवरून दिसू शकणे.

**आंतरधातवीय, आंतरधात्विक** वि. (रसा.) एकापेक्षा अधिक धातू अंतर्भूत असलेला. [सं.]

**आंतरप्रांतीय** वि. प्रांताप्रांतांमधील, दोन प्रांतांदरम्यान. [सं.]

**आंतरबँकीय** वि. दोन किंवा अधिक बँकांशी संबंधित; दोन बँकांमधील.

**आंतरभाष** पु. (विअ.) एखाद्या ठिकाणी दूरध्वनी द्वारा अंतर्गत दळणवळण ठेवण्याची यंत्रणा. [सं.]

**आंतरमहाविद्यालयीन** वि. निरनिराळ्या महाविद्यालयांमधील; महाविद्यालयांतर्गत (स्पर्धा). [सं.]

**आंतरयोग** पु. (ज्यो.) बुध, शुक्र हे सूर्याच्या दिशेस व पृथ्वी आणि सूर्य यांच्यामध्ये असण्याची स्थिती. [सं.]

**आंतरराज्यीय** वि. दोन किंवा अधिक राज्यांमधील. [सं.]

**आंतरराष्ट्रवाद** पु. राष्ट्राराष्ट्रांमध्ये परस्परसामंजस्य व सहकार्य असावे हे ध्येय डोळ्यापुढे ठेवून त्यानुसार आचरण करावे असे प्रतिपादन करणारे मत. [सं.]

**आंतरराष्ट्रवादी** पु. आंतरराष्ट्रवादाचा पुरस्कर्ता; तदनुसार आचरण करणारा.

**आंतरराष्ट्रीय** वि. १. दोन किंवा अधिक राष्ट्रांमधील, राष्ट्रांचा किंवा राष्ट्रासंबंधीचा. २. विविध राष्ट्रांनी एकत्र येऊन स्थापन केलेले. उदा. आंतरराष्ट्रीय नाणेनिधी; आंतरराष्ट्रीय न्यायालय इ. [सं.]

**आंतरराष्ट्रीय अर्थशास्त्र** न.(अर्थ.) आंतरराष्ट्रीय आर्थिक व्यवहारांशी संबंधित प्रश्नांचा अभ्यास करणारी अर्थशास्त्राची एक शाखा.

**आंतरराष्ट्रीय कायदा** पु. बहुतेक सर्व राष्ट्रांना लागू असलेला कायदा.[सं.]

**आंतरराष्ट्रीय तापमापनश्रेणी** (भौ.) (१८२° सें. च्या वरील) काही वस्तूंचे ठरावीक वातावरणात व ठरावीक दाबाखाली घेतलेले उत्कलनबिंदू. हे आंतरराष्ट्रीय प्रमाण म्हणून मानलेले आहेत. उदा. प्राणवायूचा उत्कलनबिंदू – १८२.९७°C; पाण्याचा गोठणबिंदू ०°C वगैरे.

**आंतरराष्ट्रीय ध्वनिकंपन नोंदणी संख्या** स्त्री. (आकाश.) जगातील नभोवाणी केंद्रांच्या ध्वनिक्षेपकांच्या ध्वनिकंपन संख्येच्या वारंवारतेची नोंद करणारी, त्याबाबत सल्ला व माहिती देणारी संस्था.

**आंतरराष्ट्रीय ध्वनिलिपी** स्त्री. (भाषा.) जगातील निरनिराळ्या भाषांमधील ध्वनींचा शास्त्रशुद्ध अभ्यास करता यावा या हेतूने

भाषाशास्त्रज्ञांनी रूढ केलेली, रोमन लिपीतील अक्षरे व काही विशिष्ट खुणांनी बनलेली लिपी. आंतरराष्ट्रीय उपयोग लक्षात घेऊन ठरवलेले ध्वनीचे मूल्य व एका ध्वनीसाठी एकच चिन्ह ही प्रामुख्याने या लिपीची वैशिष्ट्ये आहेत.

**आंतरराष्ट्रीय नाणेनिधी** पहा : **आंतरराष्ट्रीय मुद्रानिधी**

**आंतरराष्ट्रीय न्यायालय** न. राष्ट्राराष्ट्रांमधील तंट्याचा निवाडा करणारे संयुक्त राष्ट्रसंघाने (युनो) हेग येथे स्थापन केलेले न्यायालय. [सं.]

**आंतरराष्ट्रीय मुद्रानिधी** पु. आंतरराष्ट्रीय व्यापार वाढविण्यासाठी १९४५ मध्ये स्थापन झालेली आंतरराष्ट्रीय वित्तसंस्था.

**आंतरराष्ट्रीय रोखे** पु. (अर्थ.) अनेक देशांमध्ये एकाच वेळी विक्रीस काढलेले रोखे.

**आंतरराष्ट्रीय लवाद** पु. (समाज.) दोन देशांमधील तंटा समजून घेऊन त्याचा निर्णय करणारे, दोन्ही देशांना मान्य असलेल्या व्यक्तींचे मंडळ; आंतरराष्ट्रीय पंच मंडळ.

**आंतर-रेणवीय** वि. (रसा.) ज्यामध्ये एकापेक्षा अधिक रेणू अंतर्भूत आहेत असा; दोन अथवा अधिक रेणूंशी संबंधित. [सं.]

**आंतरवृत्ते** क्रिवि. आतल्या आत : 'ते सते आंतरवृत्ते विद्या देति' – लीचउ ४५८. [सं. आंतर-वृत्ति]

**आंतरव्यवहार** पु. आपसांतील व्यवहार : 'मौखिक प्रतीकांचा सामाजिक आंतरव्यवहाराकरितां उपयोग होतो.' –भामाप २०.

**आंतरशालेय** वि. दोन किंवा अधिक शाळांमधील.

**आंतरशास्त्रीय** वि. (ग्रं.) दोन विषयांतील विशिष्ट तत्त्वांवर आधारित; नवीन विषय शास्त्रासंबंधी. [सं.]

**आंतरश्रोत्र** न. (वै.) कानाचा आतील भाग. [सं.]

**आंतरसंचारण पद्धति-ती** स्त्री. (भौ.) मर्यादित जागेतील दूरध्वनीचे होणारे दुहेरी दळणवळण व त्याची पद्धती. [सं.]

**आंतर संसदीय** वि. (राज्य.) दोन भिन्न संसदांच्या दरम्यान; निरनिराळ्या संसदांशी संबंधित. [सं.]

**आंतरहिमानीकाल** पु. (भूशा.) दोन हिमयुगांमधील कालखंड. [सं.]

**आंतरा** वि. निराळा; वेगळा; वाकडा.

**आंतराभिमुख कोन** पु. (ग.) आतील बाजूचे समोरासमोरील कोन.

**आंतराश्मयुग** न. ख्रिस्तपूर्व बारा हजार वर्षांपासून तीन हजार वर्षांपर्यंतचा काळ. २. आदिमानव युग व निओलिथिक युग या दरम्यानचा काळ. आंतराश्मयुगात प्रामुख्याने लघुपाषाणास्त्रे सापडतात. [सं.]

**आंतरास्तर** पु. (वै.) गर्भपिंडाचे एक आतील आवरण, अस्तर.

**आंतरिक** वि. १. आत किंवा मध्ये असलेले, सामावलेले; आतील वस्तू किंवा विषयासंबंधीचे; अंतर्गत. २. मनातला; व्यक्त न केलेला. [सं.]

**आंतरिक धन** न. अंतरंगात असलेले गुणरूपी धन.

**आंतरिंद्रिय** न. आतील इंद्रिय.

**आंतर्भाव** पु. प्रीती; प्रेम; लक्ष: 'आंतर्भाव ते सासुरवाडीं । मायबापें राहिली बापुडीं ।' – दास ३.२.३८.

**आंतर्वक्रपृष्ठ** न. गोलाची आतील बाजू; आतल्या बाजूने गोलाकार असलेला पृष्ठभाग. [सं.]

**आंता** पु. शेताची कड, मर्यादा, बांध. (कों.) [सं. अंत]

**आंतापुर** न. राणीवसा: 'तूं कोण गा... आंतापुरा आंतु?' – पंचो ६२.१३.

**आंतिमधारण** न. (वास्तु.) अखेरचा जोर; दाब.

**आंतुट** वि. अंतर्वर्ती; निकटवर्ती : 'आंतुटें सीख्यें तियें रात्रीं गव्हाचिया घुगरियांकरि पावो सेकीति ।' – लीचउ १८२.

**आंतुवट** वि. आतील; अंतरंगातील : 'देव तो भक्तशुद्ध। हा बाहेरी नावाचाचि भेद । आंतुवट पाहता बोध । सच्चितानंद जनि ऐक्यें ।' – एभा २१.४७१.

**आंतेर** स्त्री. सिताफळीचे झाड. (गो.)

**आंतेरा** क्रिवि. गुप्तसंकेताप्रमाणे.

**आंतोड** पु. १. डोंगराच्या पायथ्यापासून थोड्या उंचीवर असलेला साधारण सपाट भाग, पठार. २. आड्यांच्या किंवा कुंपणाच्या आतील जागा : 'आड्यांच्या किंवा कुंपणाच्या आतील जागेला 'आंतोड' असे नाव मिळाले.' – प्रिस्मृग्रं ६.

**आंतौर, आंतौरी** स्त्री. स्त्री; बायको : 'आंतौरिया कुमरें । सांडौनिया भांडारें ।' – ज्ञा १.२२०. [सं. स्त्री]

**आंत्र** पहा : **अंतर**

**आंत्र** न. आतडे; पहा : **आंत**

**आंत्र अपिस्तर** पु. (वै.) आतड्याच्या आतील पृष्ठभागाची त्वचा.

**आंत्रकलाधमनी** स्त्री. लहान आतड्याला आवरणासारखी असणारी धमनी.

**आंत्रज्वर** पु. या तापात आतड्यांना क्षते पडतात व अंगावर उगवण येते. [सं.]

**आंत्रदाह** पु. (वै.) ज्यात आतड्यांची आग होते असा आजार. [सं.]

**आंत्रनलिका** स्त्री. (वै.) अन्ननलिका. [सं.]

**आंत्रपुच्छ** न. १. (वै.) मोठ्या आंतड्याच्या खालच्या भागाशी चिकटलेली शेपटीवजा नळी. हिचा शरीरक्रियाव्यवहारात फारसा उपयोग नसतो. २. (ल.) निरुपयोगी, अनावश्यक भाग; लचांड : 'आशिया खंड त्यांना अमेरिकेचे आंत्रपुच्छ वाटते.' – क्रेबु ७३.

**आंत्रपुच्छदाह** पु. (वै.) आंत्रपुच्छाला सूज आल्यामुळे होणारी आग व त्यामुळे होणारा आजार.

**आंत्रपुच्छ धमनी** (वै.) आंत्रपुच्छाकडे जाणारी, रक्तवाहिनी.

**आंत्रपुच्छ शोथ** पु. (वै.) आंत्रपुच्छ सुजणे. [सं.]

**आंत्रप्रकांड** न. आंतड्याचा मुख्य भाग. [सं.]

**आंत्रवेष्टण** न. पोटाला अस्तरासारखे असलेले आवरण; उदरान्तर्वेष्टन; पर्यंत्रक. [सं.]

**आंत्रशूळ** पु. आतड्यात होणारी वेदना; पोटशूळ.

**आंत्रशोथ** पु. (आयु.) आतड्यांना सूज आल्यामुळे होणारा एक प्रकारचा अतिसार. [सं.]

**आंत्रावरोध** पु. यात आतड्यातील मल नेहमीप्रमाणे ढकलला जात नाही; आतड्यांत मलोत्सर्जनात उत्पन्न झालेला अडथळा. [सं.]

**आंत्रिक** वि. आतड्यासंबंधी. [सं.]

**आंत्रिक** वि. गाळलेले; वगळलेले; ओलांडलेले.

**आंथर-री** पु. कामट्याची, गवताची चटई; आंथरी; हातरी; तट्ट्या. [सं. आस्तरण]

**आंथरणे** क्रि. बसण्यासाठी किंवा झोपण्यासाठी सतरंजी इ. पसरणे.

**आंथरूण पांघरूण** न. बिछाना व अंगावर घ्यायचे, पांघरावयाचे (चादर, रजई यासारखे) वस्त्र.

**आंद** स्त्री. अव. मागासलेल्या जाती. (व.) [सं. अंध]

**आंदकणे** नाउमेद होणे. (माण.)

**आंदण** न. १. मुलीच्या बापाने मुलीस किंवा जावयास लग्नात ठरावीक हुंडा किंवा देणगी याखेरीज जे विशेष बक्षीस द्यावयाचे ते : 'शुद्धमती म्हणे रायासी । मज आंदण द्या भीमकीसी । होईन कृष्णाची निजदासी । चरणसेवेसी निरंतर ।' –एरुस्व १८.१०. २. करणी; मानपान ३. बक्षीस; नजराणा : 'एकहि पदार्थ न्यून नाहीं । सिद्धी सर्वही आंदण पां ।' – संवि १३.१०५.

**आंदणा–णी** वि. १. आंदणामध्ये मिळालेले; आंदणासंबंधीचे (दासदासी इ.) : 'झालो पांगिला जनासी । संसाराची आंदणी दासी ।' – तुगा ६९५. २. स्वाधीन असलेला; बंदा: 'त्याचा आंदणा मी श्रीरंगु । ज्यासि विषयभोगू नावडे ।'–एभा २२.१६४.

पु. देणगी; आंदण : 'सत्य करीन रुद्रवचना । तयाच्या राखीन हो प्राणा। मग हा तुज आंदणा देईन अंबे ।।' – कथा १.७.१७०.

**आंदरणे** क्रि. पावसाचे ढग जमा होणे; अंधारणे. (गो.)

**आंदाळी–गुंडाळी** स्त्री. फिरवाफिरव. (गो.)[सं. आंदोलन]

**आंदिशा, आंदेशा** स्त्री. संशय; शंका : 'मनातली आंदिशा काढून टाकावी.'– बाब ३४. [फा. अंदेशा]

**आंदु–दू** पहा : **अंदू** : 'आंदुचा घवघवाट'– लीचउ १२६.

**आंदुर्ली–ल्ही** स्त्री. रांजणवाडी. (गो.) [सं. अन्ध]

**आंदुळणी** स्त्री. रांजणवाडी. (राजा.)

**आंदुळणे, आंदोळण** उक्रि. झोके घेणे, देणे; हेलकावे खाणे; हलविणे; हलणे; कंप पावणे; इकडेतिकडे नाचणे; खालीवर होणे (जहाज इ.) : 'आंदोळला सत्यलोकु ।' – उषा १६८७. २. लहान मुलाला पाळण्यात घालून हलवणे. [सं. आंदोलन]

**आंदुळी** पु. झोपाळा.

**आंदुळो** पु. झोपाळा. (कों.)[सं. आंदोलक]

**आंदोरी** पहा : **अंतुरी**

**आंदोल** पु. झोपाळा; पाळणा; पालखी. [सं. आंदोलक]

**आंदोलक** पु. घड्याळाचा लंबक; लोलक; ठरावीक गतीने हेलकावणारी वस्तु. [सं.]

**आंदोलणे, आंदोळणे** क्रि. डोलणे. झोके घेणे–देणे, हेलकावे खाण; हलणे; पहा : **आंदुळणे** : 'जळावरी कमळकळिका । जेवीं आंदोळे ।'– ज्ञा ११.२४९.

**आंदोलन** न. १. झोका; विशिष्ट जागेत एखादी वस्तू हेलकावत, डोलत राहणे; हेलकावा. २. विशिष्ट हेतू साध्य करण्यासाठी सुरू केलेली चळवळ. राजकीय, सामाजिक किंवा औद्योगिक परिवर्तन घडवून आणण्यासाठी उभारलेला लढा. ३. (संगीत.) स्वरांचे अधोर्ध्व कंपन; स्वर काही वेळ वर खाली करीत राहणे. [सं.]

**आंदोलन लेखक** पु. विद्युतप्रवाहाच्या शक्तीत होणारी कमीजास्त तीव्रता दाखविणारे यंत्र. [सं.]

**आंदोलन सिद्धांत** पु. सूर्य किंवा दुसरा तेजस्वी पदार्थ याची वायूवर (ईथरवर) प्रतिक्रिया घडून लाटा उत्पन्न होतात व त्या डोळ्यांस लागून प्रकाशाचे ज्ञान होते हे मत. [सं.]

**आंदोला, आंदोलिका** पु. स्त्री. १. झोपाळा; पाळणा. २. पालखी.[सं.]

**आंदोलिपाली** वि. (वन.) दोन एकबीजधारी किंजदलांनी बनलेले बियाप्रमाणे दिसणारे (शुष्कफल); फलांशामध्ये पक्व होऊन मग वेगळे होणारे (फळ.). [सं.]

**आंदोळणे** पहा : **आंदुळणे**

**आंदोळविंदोळ** वि. हलणारा; लहरीने युक्त : 'तेथ घट जो होय चंचळू । ते प्रतिबिंब होय आंदोळविंदोळू ।'– एभा ११.१५०.

**आंदोळी** स्त्री. विळी. (गो.)

**आंदोळी** स्त्री. हेलकावा; झोका, झेप. पहा : **आंदोलन** : 'आसोडितां विचारा आंदोळी जालो ।'– भाए ४३७.

**आंदौळणे** क्रि. आंदोलणे; हलणे, हेलकावे खाणे : 'कीं रावणचेनि भुजांबळें । कैलासतेजू आंदौळलें ।'– शिव २३९. [सं. आंदोलन]

**आंध** स्त्री. एक आदिवासी जमात. धुळे, ठाणे, नाशिक, चंद्रपूर, अहमदनगर, पुणे, यवतमाळ, अमरावती, जळगाव व नांदेड या जिल्ह्यांतून ही जमात आढळते.

**आंधळा** वि. १. पहा : **अंधळा** : 'जे आंधळेयाचा गावीं । जऱ्हीं आपणपें प्रकटलें रवी ।'– राज्ञा १०.१४०. २. (ल.) आजूबाजूला काय घडत आहे हे ज्याच्या लक्षात येत नाही असा, विचार न करणारा. आंधळा ३. (ल.) ज्याला ज्ञानचक्षू नाहीत असा; अज्ञानी; अजाणता; चुकणारा; विवेकशून्य; अविचारी; गोंधळ्या; अव्यवस्थित (व्यवहार), बेकायदेशीर (राज्य). [सं. अंध]

**आंधळ्याचा कारभार** पु. अंदाधुंदीने चालवलेले राज्य; बेबंदशाही; अव्यवस्थित काम.

**आंधळ्याचा रस्ता, मार्ग** पु. सरळ; रुंद व मोकळा रस्ता; आंधळ्याला अडचणीशिवाय जाता येईल असा हमरस्ता.

**आंधळ्याची काठी** स्त्री. १. आंधळा, अशक्त, निराश्रित, म्हातारा यांचा आधार, पुढारी अथवा आश्रयदाता; आंधळ्याला आधारभूत गोष्ट : 'या अंधावृद्धाची राहों देतास एक जरि यष्टी । भीमा, मी मानस तरि होऊ देत्यें कशास बहु कष्टी ।'– मोस्त्री ३.४६. २. म्हाताऱ्या आईबापांचा एकुलता एक मुलगा.

**आंधळ्याची माळ – माळका** स्त्री. १. आंधळ्या लोकांची रांग, माळ. २. (ल.) अज्ञानी मूर्ख लोकांची परंपरा.

**आंधळ्याची मिठी** स्त्री. घट्ट मिठी; चिकटणे.

**आंधळा–तिरळा** पु. एक विलायती खेळ. आंधळी कोशिंबीर: 'जेवल्यानंतर कारेलैनदान हिच्यासी आंधळे तिरळे खेळलो.' – रापु ८१.

**आंधळा तिंधळा–तिरळा** वि. १. अंडगडी; पोटगडी; पित्त्या. (कों.) २. (इटीदांडूच्या खेळातील) दुश्या; दोन्ही बाजूंनी खेळणारा; रहाट्या. ३. (ल.) दोन्ही दरडींवर हात टेकणारा; दुरोखी.

**आंधळा नारळ** पु. कोवळा नारळ; शहाळे; ज्यात नुसते पाणीच

असल्यामुळे वाजत नाही असा नारळ.

**आंधळा पहारेकरी** पु. स्काउटमधील मुलांचा एक खेळ.

**आंधळी कोशिंबीर** स्त्री. एकाने डोळे बांधून इतराना धरण्याचा एक खेळ. (वा.) **आंधळी कोशिंबीर खेळणे–** न्यायनीती सोडून वागणे; व्यवहाराकडे दुर्लक्ष करणे; आंधळयाचे सोंग घेऊन वागणे: 'इकडे अशी अंधळी कोशिंबीर खेळताना पाहिले की अंगाची अशी आग होते.'– प्रेसं ३१.

**आंधळी गाय** स्त्री. गरीब, निरुपद्रवी माणूस.

**आंधळी वेळ** स्त्री. (ज्यो.) ज्यावेळी हरवलेली वस्तू सापडत नाही ती वाईट वेळ. पहा : **आंधळे नक्षत्र**

**आंधळे गारुड** न. १. लबाडी; लुच्चेगिरी; जंतरमंतर. २. गुप्त मसलत; छक्केपंजे; कट. ३. जादूटोणा; भूल : 'दुसरें कांहीं आंधळेंगारूड असलें तरी त्याचा थांग लावूं देणारा नाहीं.'– कफा ६. ४. नजरबंदी; कपट; कारस्थान.

**आंधळे घोडे** न. स्काउटमधील मुलांचा एक खेळ.

**आंधळतिरळे** न. आंधळा, तिरळा घेऊन खेळ खेळणे. पहा : **आंधळा तिंधळा – तिरळा**

**आंधळे नक्षत्र** ज्या नक्षत्रावर हरवलेली वस्तू पुष्कळ खटपट करूनही सापडत नाही ते नक्षत्र. पहा : **अंध** ४ (क्रि . लागणे)

**आंधळे वरण** न. ज्या वरणात मुळीच डोळ शिल्लक राहिले नाहीत असे वरण.

**आंधळे वासरू** न. मुलाचा एक खेळ. आंधळी वासरे असा प्रयोग.

**आंधळ्या** स्त्री. सूर्य चित्रा नक्षत्राजवळ असताना पडणारा पाऊस.

**आंधारी** स्त्री. १. काळोखी. २. अंधुक पटल. ३. धुंदी. ४. भोवळ, चक्कर. ५. घाणीभोवती फिरणाऱ्या बैलास लावलेली ढापणी.

**आंधिवास** पु. (आयु.) शरीरात बरेच दिवस मुरलेला, राहिलेला ( रोग, औषधाचा परिणाम.)

**आंधी** स्त्री. वावटळ; तुफान. [हिं]

**आंध्य** न. १. आंधळेपणा. २. काळोख; अंधार : 'कां जगाचें आंध्य फेडितु ।' – ज्ञा १६. २००. ३. बुद्धीचा मंदपणा; अज्ञान [सं.]

**आंब** स्त्री. १. हरभऱ्याला घाटा येण्यापूर्वी त्या रोपांवर संध्याकाळच्या वेळी एक फडके पसरून ठेवतात. सकाळी दवाने ते भिजते व त्यामध्ये हरभऱ्याचे आम्ल शोषून घेतले जाते. हे फडके पिळून जो द्रव मिळतो तीच आंब होय. ही पोटदुखी, मोडशी आणि पटकी यावर देतात. २. लांबट फळे येणारी आंब्याची एक जात. ३. आंबण्याचा धर्म, शक्ती. ४. आंबटपणा; आंबट पदार्थ (चिंच इ.)(गो.) ; आंबोण; आम्लरस : 'जाणपणे न पिएति आंब ।'– शिव ८४. ५. साधे आंबट वरण; सार; चिंचवणी; कढी. [सं. अम्ल] (वा.) **आंब ओरपणे–** १. दळ, मगज, गीर, काढून घेणे. २. (ल.) एखाद्या पदार्थातील सत्त्वांश काढून घेणे; चांगले तेवढे घेणे. (गो.) **आंब रंगात घालणे–** (चर्मकारी) बाभळीची साल व हिरडा यांचा रंग रापून थोडा हिणकस झाल्यानंतर त्यात चामडे ठेवणे. **आंब पिणे–** मूग गिळून बसणे; मौन धरणे : 'जाणिवा आंब न पिया : तरि हे (चक्रधरस्वामी) काइ होए ऐसें तुम्हीचि विचारा पां' – लीचउ ५३६.

**आंब** न. पाणी : 'आगम.. दांडुरब : जाणपणें न पीएतिं आंब'– शिव ८४.

**आंब** पु. आंबरस : 'आंबु जव सांघावें तव पुरु आला'– लीचपू ६७.

**आंबकट** वि. आंबट; आंबटसर. (गो.)

**आंबकटी–काठी** त्री. कैऱ्यांच्या वाळवलेल्या फोडी.याचा उपयोग चिंचेऐवजी कालवणात घालण्याकडे करतात. लागेल तेव्हा लोणचे करतात.

**आंबखळा** पु. एक खाद्यपदार्थ : 'आंबखळेनि न धाए खाताः आनिक वाढुं मागत होता'– उह २१९७.

**आंबट** वि. १. खट्टा; आम्ल; चवीला व वासाला कच्चा आंबा, चिंच, लिंबू यांच्यासारखा. २. (ल.) निरुत्साही; खिन्न; वाईट; उदास. (वा.) **आंबट करणे**–निराशा करणे. **आंबट मागणे–** दुसऱ्याचे भांडण स्वतःवर ओढवून घेणे. **आंबट होणे, होऊन येणे, घडणे–** निराशा होणे, हताश होणे. **वईवरून आंबट होणे–** थोडक्यासाठी रागावून मनुष्यास तोडणे; क्षुल्लक कारणासाठी एखाद्यावर रागावणे.

**आंबटओला** वि.अर्धवट ओलसर; दमट; किंचित ओले.

**आंबट कण्या** स्त्री. आंबील; तांदळाच्या अथवा गहू, नाचणी वगैरे धान्याच्या कण्या शिजवून ताक घालून केलेली कांजी.

**आंबटचिंबट** वि. आंबट, तेलकट इ. अपथ्यकारक; विवक्षित मधुरपणा नसलेला. [आंबट चे द्वि.]

**आंबटचुका** पु. १. एक प्रकारची वनस्पती, ही पोटावर घातली असता गर्भ उमळून पडतो. २. एक पालेभाजी; ही भाजी बारा महिने मिळते.

**आंबटढाण–ढस** वि. अतिशय आंबट (ताक, दही इ.) ठसका लागण्याइतके, दातातून कळा येण्याइतके आंबट.

**आंबटणे** उक्रि. आंबणे (ताक, कणिक, अन्न इत्यादी); आंबट होणे. (कों)

**आंबट तोंड** न. निराश; खिन्न मुद्रा (क्रि. करणे, होणे): 'महात्मा गांधींच्या स्वातंत्र्यकूचाच्या बातम्या ... नोकरशाहीला आंबट तोंड करून वाचाव्या लागतात.'– केसरी २५.३.३.

**आंबटपण** न. चिंच, आमसूल वगैरे आंबट पदार्थ. (व.)

**आंबटवाणा** वि. १. अतिशय आंबट. २. (ल.) निराश केलेला; खट्टू; रुसलेला; खिजलेला.

**आंबटवेल** स्त्री. अंबोशीची वेल; हिचा रस आंबट असतो; वेलीचा रंग पांढरा, पाने जाड असतात; कडमडवेल.

**आंबटवणी** न. (उप.) आंबट पाणी; आमटी.

**आंबट वरण** न. चिंच, गूळ घालून केलेले फोडणीचे पातळ वरण.

**आंबट शोक–षोक** पु. १. आंबट पदार्थांची आवड. २. भलत्या गोष्टींची आवड; चैनीच्या मौजमजेच्या गोष्टींचा नाद. ३. मूर्खपणाची चैन.

**आंबट शौकी** वि. आंबटशोक करणारा; चैनीच्या, विलासी गोष्टींची, रंगेलपणाची आवड असलेला.

**आंबट शौकी, शौकीन** वि. मूर्खपणाने चैन करणारा : 'काही आंबटशौकी मंडळी लोडाला टेकून अजून चिवटपणे बसून होती.'– अक्षर ११६. [अर. शौक.]

**आंबटसर** वि. थोडेसे आंबट असलेले (ताक वगैरे).
**आंबटा** वि. अतिशय आंबट (फळ इ.).
**आंबटाई** स्त्री. आंबटपणा.
**आंबटाण** न. १. आंबूस वास. २. टरफले काढलेली चिंचेची फळे; चिंच. गो. ३. पदार्थांमधील आंबट रस ४. आंबटपणा (कु.)
**आंबटावणे – विणे** अक्रि. आंबट पदार्थ खाल्ल्यामुळे (दात, ओठ वगैरे) आंबणे.
उक्रि (पाणी घातलेले पीठ वगैरे) हवेत उघडे ठेवून आंबविणे.
**आंबटी** स्त्री. १. एक झाड; हे ओलसर मळई जमिनीत उन्हाळ्यात रुजते. यास अंबोशीही म्हणतात. याची पाने चिंचेप्रमाणे आंबट, फळे भाल्यासारखी टोकदार व लांबट असतात. २. एक वनस्पती. ३. आमटी; डाळ, पीठ, चिंच, मसाला वगैरे लावून किंवा बटाटे वगैरेच्या फोडी घालून केलेले पातळ तोंडी लावणे; कालवण, आंबट वरण.
**आंबट्या** वि. १. जे फळ नेहमी आंबट असते ते. (चिंच, एक प्रकारचा आंबा इ.); आंबट असणारा (पदार्थ). २. ज्याला आंबट पदार्थ आवडतो तो (माणूस).
**आंबड** वि. द्वाड; खाष्ट; आडदांड (कर.)
**आंबडणी** स्त्री. नांगरणी.
**आंबडणे** उक्रि. १. झटून, सपाटून काम करणे. (कों.) २. माणसाळण्यासाठी जनावरास बडवणे. ३. गुरे (गावाबाहेर नेण्यासाठी किंवा गावात आणण्यासाठी) एके ठिकाणी जमा करणे. (कु.)
**आंबण** स्त्री. एक जंगली झाड; आमण. याच्या पानास आंबट वास येतो.
**आंबणे** अक्रि. १. (उघडे राहिल्यामुळे, शिळे झाल्यामुळे अन्न वगैरे) आंबट होणे. २. आंबट पदार्थ खाल्ल्याने दात, ओठ आंबट होणे; दातातून कळा येणे. ३. अतिशय श्रमाने, कष्टाने किंवा मार लागल्याने अंग ठणकणे, हल्लक होणे; अधू होणे. ४. अतिशय सेवनामुळे कंटाळा येणे, वीट येणे. ५. उदास होणे. कोणत्याच गोष्टीत उत्साह नसणे (वा.) [सं. अम्ल]. **आंबत टाकणे** – आरंभलेले काम किंवा धंदा, उद्योग अर्धवट किंवा दिरंगाईवर टाकणे. **आंबत पडणे** – पुष्कळ काळ अधांत्री लोंबकळत राहणे; भिजत घोंगडे पडणे; रेंगाळणे; दिरंगाईवर टाकलेले असणे (आरंभलेले काम, धंदा इ.) (वा.)
**आंबणेपांबणे** क्रि. शिळी होणे; जुनीपानी होणे: 'परंतु बाहेरची बातमीही आंबल्यापांबल्याखेरीज आमच्या वाट्यास येणे कठीण.' – संबा १७५.
**आंबते** न. १. आंबण्यासाठी ठेवलेली कणिक इ. पदार्थ. २. अशा रीतीने आंबलेली कणिक, पीठ. (कों.)
**आंबथणे** क्रि. (वात) पुढे सारणे : 'वाति आंबथीली'–स्थापो ५५.
**आंबरणे** क्रि. फळ वगैरे पिकायला लागणे.
**आंबरस** पु. पिकलेल्या आंब्यांचा काढलेला रस; आमरस.
**आंबराई** स्त्री. आंब्याच्या झाडांची रांग किंवा बाग : 'छाया तरूंची बहु तोषदायी । आहे तशी ही घन आंबराई।' [सं. आम्र+राजी]
**आंबला** पु. कर्णलोलक; डूल. (गो.)
**आंबली** स्त्री. १. आंब्याचे लहान झाड. २. खारातील कैरी.
**आंबली** स्त्री. चिंचेचे झाड व चिंच. (गो.)[सं. अम्ल; हिं इमली]
**आंबवडा** पु. एक खाद्यपदार्थ: 'सीतळ मीनला चंद्र आंबवडा'–ज्ञागा ६८८.
**आंबवण** न. पदार्थ कुजवून तयार केलेली मद्यार्कयुक्त द्रव्ये : 'विषापासून सुरेख किण्वे म्हणजेच आंबवणे काढता येतात.' भासर्प ८.
**आंबवणी** – स्त्री. आंब्याच्या रोपाची लागवड.
**आंबवणे** सक्रि. १. (भिजविलेले पीठ वगैरे) आंबण्यासाठी ठेवणे. २. (ल.) बडवणे, धोपटणे. ३. आशा लावून ठेवणे.
**आंबवती** स्त्री. आम्लरस; आंब: 'आंबवती दीजे आन झळक जाए :' – दृपा ५३.
**आंबवा** पु. मिठाचे पाणी किंवा ताक शिंपून, दाबून एकदीड दिवस ठेवलेला, गुरांना घालायचा पाला.
**आंबवा रंग** पु. आंब्यासारखा हिरवा रंग.
**आंबवी** वि. आंब्याच्या रंगाचे (कापड, इ.) 'तिवट आंबवी' समोरा ४.१२०. [सं. आम्र]
**आंबवे** न. आंब्याच्या रंगाचे कापड : 'आंबवे, साटिन इत्यादी अनेक प्रकारचे रंगीत उंची कापड' मंजु ६.
**आंबसोल** न. कच्च्या आंब्याचा, कैरीचा वाळवलेला गीर व सालपट.
**आंबा** पु. उष्ण कटिबंधात होणारे एक मोठे फळझाड व त्याचे फळ; आंबा, आम्र हे फळ पिकल्यावर अतिशय मधुर व रसाळ होते. हे शक्तिवर्धकही आहे. (वा.) **आंबा उतरणे** – १. आंबे झाडावरून खाली न पाडता काढणे. २. फार पिकणे. **आंबा बांधणे** – झाडास फळ लागणे. **आंबा शिंपणे** – वरात घरी जाण्याच्यापूर्वी गौरीहारातील देवी घेण्याकरिता वर जातो तेथे गौरीहराच्या जागी भिंतीवर आंब्याचे झाड काढलेले असते, तेथे आंबा शिंपताना वधू आपला डावा पाय वराच्या उजव्या मांडीवर आणि डावा हात त्याच्या पागोट्यावर ठेवून त्याच्याजवळ उभी राहून उजव्या हाताने नागवेलीच्या किंवा आंब्याच्या पानाने आंबा शिंपते, त्या वेळी बायका आंबा शिंपण्याबद्दलचे गाणे म्हणतातः 'आंबा शिंपवाया गोरटी। कडे घेऊनि कृष्ण उठी। आइती केलीस गोमटी । कुंकुमें वाटी परिपूर्ण ।' – एरुस्व १५.१४२. [सं. आम्र.]
**आंबा गद्रा, गजरा** पु. पाडाचा आंबा : 'अतिरति एक दोरींत ओविलें फळझाडें आंबागद्रा।' –पला ६६.
**आंबाटक्का, आंबीटक्का** पु. आंबरायाबाबत घ्यायचा कर.
**आंबाडा** पु. स्त्रियांच्या केसांच्या बुचडा; केसांची मानेवरील आंब्याच्या आकाराची गाठ.
**आंबाडी** स्त्री. १. कैरी. २.आंब्याचे रोप. ३. कैऱ्यांचे नुसते मीठ घालून केलेले तोंडी लावणे.
**आंबाडो** पु. एक आंबट फळ, त्याचे झाड. आंबा. (गो.)
**आंबिलभात** पु. १.दहीभात २. आंबील आणि भात यांचे मिश्रण. 'आंबिलभातु घालूं आदरिला' – लीच ४.१२.
**आंबिला–ली** स्त्री. नाचण्याचे पीठ आंबवून ताकात घालून शिजवून केलेले पेय : 'हे हरिनामाची आंबिली जगा पोटभरी केली।' – तुगा १४५१.

**आंबी** आंब : 'डोई आंबिचेया वडे यांचे मडके' – लीचपू ५१४.

**आंबीण** स्त्री. इतरांपेक्षा अधिक लांबट फळ येणारे आंब्याचे झाड.

**आंबील** १. नाचणीचे पीठ आंबवून किंवा ताकात शिजवून केलेला पदार्थ; (ल.) वऱ्हाडात ज्वारीचे पीठ भिजवून त्यात खोबरे, खसखस, साखर टाकतात. २. (ल.) घाणेरडे गढूळ पाणी. [सं.अम्बि.]

**आंबीलपीत** न. पहा **अंबील** : नैवेद्य नारळ तयार ठेवला, आंबीलपीत केलें. दहिभात झाला.' – बाब ६१.

**आंबील भुरक्या** वि. १. आंबील खाणारा २. (ल.) अशक्त, नेभळट, भोळा, (माणूस).

**आंबुट** न. ढग. पहा : **आबुट** : 'देखुनी स्वातीचीं आंबुटें। उल्हासती शुक्तिसंपुटें ।' – कालिका १५.३.

**आंबुथणे** अक्रि. १. पेटणे; पेटवणे; भडकणे : आंबुथिला दीपु घे थोरी।' – राज्ञा १३.११४३. २. (वात) पुढे सारून काजळी झाडणे : 'सर्वज्ञे म्हणितले; बाई । वाति आंबूथा' –लीच ४.४१.

**आंबुला** पु. पती.

**आंबुले** पु. डूल; आंबले; आमले; पहा : **आमला** : 'कुमारांचे आंबुले कडदोरी । मजपाशीं आणिजे' – क्रिपु १.१९.३९.

**आंबुलेपण** न. नवरेपण. 'निंदेलेनि भ्रतारें । जे वियें चराचरें। जियेचा विसांवला नुरे । आंबुलेपणही ।।' – अमृ १.३७.

**आंबुवा** वि. आंबुव्या रंगाचा : 'शेले आंबुवे' – समारो ४.१०६.

**आंबुळी, आंबोळी** स्त्री. आंबलेल्या पिठाचे धिरड्यासारखे खाद्य: 'आम्हीबी आंबुळी भाजीवर हात हाणला.' – रैत १२.

**आंबूळपणा** पु. आंबटपणा : 'ह्या आंबूळपणामध्ये काय मजा आहे.' – वासू १७७.

**आंबेबार – बहार** फाल्गुन महिन्यात म्हणजे आंब्याला मोहोर येण्याच्या दिवसात फळांचे जे तिसरे पीक येते ते, म्हणजे तिसरा बार (मृगबार, हत्तीबार असे आणखी दोन बार आहेत.)

**आंबेभोजन** न. आंबरसाचे जेवण : 'तवं तेथ संन्यासियासि परीक्षा निमंत्रण आंबेभोजन मांडले असे' – लीच ३.६२.

**आंबेमोहोर** पु. तांदळाची एक जात.

**आंबेल** स्त्री. दिवसातून फक्त एक वेळ, शिजवलेले अन्न खाण्याची जैन लोकांनी घेतलेली शपथ, व्रत.

**आंबेवर्णी** वि. १.आंब्याच्या वर्णाचे; गोधूमवर्णी. २. (ल.) दहाजर्णींसारखे : 'कोठे पुरुषपार्टी चांगले तर स्त्रीपार्टी नाटकात रंगले तरी आंबेवर्णी. ' – खेस्व १२८.

**आंबेहळद** स्त्री. पहा : **अंबेहळद**

**आंबेळ** स्त्री. एका जातीची केळ.

**आंबेळे** न. आंबेळीचे फळ; केळे.

**आंबोडा** पु. दह्यात अथवा चिंचेच्या सारात भिजवलेला वडा.

**आंबोण** गुरांसाठी पेंड, सरकी, चुणी इ. एकत्र करून, भिजवून दिले जाणारे खाद्य.

**आंबोती** स्त्री. पिवळट तांबूस रंगाचे लाकूड.

**आंबोशी, आंबोळी** स्त्री. कच्च्या आंब्याची, कैरीची वाळलेली फोड.

**आंबोसा** आम्बोसा पु. आलुबुखार.

**आंब्याचा टाहाळा – डाहळा – ढाळा** पु. १. आंब्याची लहानशी फांदी. २. (हा शुभ व अशुभ दोन्ही प्रसंगी असतो यावरून.) (ल.) शुभ अशुभ प्रसंगी किंवा सुखदु:खाच्या प्रसंगी दुसऱ्याच्या घरी सारखेपणाने वागणारा माणूस; लग्न वगैरे समारंभात दोन्ही पक्षाकडील माणूस.

**आंब्याचा भात** पु. केशरी भाताप्रमाणे याची कृती आहे. भात शिजत आला म्हणजे त्यात हापूसचे आंबे चिरून त्याच्या फोडी घालतात व तो पूर्ण शिजू देतात.

**आंब्याचा मोहोर** पु. दुधात शीजवलेल्या रव्याचे गवले करून मध्ये चिमटून थोडे वळले म्हणजे होणारे त्रिदळ, यांचे बनविलेले पक्वान्न.

**आंब्याचा शेकडा** पु. ६ आंब्याचा १ पाडा(फाळा), ५२ पाड्यांचा (३१० आंबे) १ शेकडा. सबंध शेकडा घेतला तर ३२० आंबे मिळतात. निरनिराळ्या ठिकाणी आंब्याचा शेकडा निराळा आहे. काही ठिकाणी २२ पाड्यांचा शेकडा असतो.

**आंब्याचे पन्हे** आंबे (कैऱ्या)कच्चे भाजून, उकडून, नंतर पाण्यात कोळून तयार केले जाणारे पेय.

**आंब्याचे साठ** न. कल्हईच्या ताटाला तूप लावून त्यात आंबरस ओततात व तो सुकवून त्यावर दुसऱ्या आंबरसाचा थर ओततात व पुन्हा सुकू देतात. गोडीसाठी यात साखर घालतात. सुकल्यावर तो पोळीप्रमाणे होतो.

**आंभ** न. पाणी : 'तयावरी अवचिते वरिखे आंभ' – ज्ञाप्र ९०८. [सं. अंभस्.]

**आंभस द्रव (नेत्र)** न. (प्राणि.) बुबुळामधील द्रव पदार्थ.

**आंशिक** वि. काही थोड्या भागासंबंधी; अल्प प्रमाणात. [सं.]

**आंशिक देयक** (आंव्शिक देयक्) न. (अर्थ.) वस्तूच्या किंमतीच्या काही भागाचे बिल; अंशत: बिल; अपूर्ण बिल.

**आंशिक समतोल** पु. (अर्थ.) एखाद्या वस्तूच्या किमतीचा स्वतंत्रपणे अभ्यास करताना, मागणी इतकाच पुरवठा असल्याने किंमतीत असणारा समतोल.

**आंशी** न. पोहे पाखडताना निघणारे बारीक कण. (कों.)

**आंशी** स्त्री. १. सुकलेले गवत. २. एक रोपटे. (गो.)

**(टीप – 'ऑ' पासून सुरू होणारे शब्द 'ओ'च्या नंतर पहावेत.)**



**['इ-ई' ने प्रारंभ होणारे काही शब्द येथे न आढळल्यास 'वि-वी', 'यु', 'ए-ये'खाली पाहावेत.]**

इ. १. मराठी वर्णमालेतील तिसरा वर्ण व स्वरमालेतील तिसरा स्वर. स्थानपरत्वे ऱ्हस्व किंवा दीर्घ : उशिरा, विजा, तिला इ. मध्ये ऱ्हस्व; उशीर, वीज, ती - यात दीर्घ.

**इ - ई** पु. (तत्त्व.) कामदेवाचे नाव. [सं.]

**इ** उपसर्ग. स्थानाचा नजिकपणा दाखवण्याकडे उपयोग. उदा. इ-कडे, इ-थे, इ- तका इ.

**इ** प्र. चा, ची, चे षष्ठीचा फारसी प्रत्यय: 'श्री कारवे व कोडिवले व वडिगाऊं राजमुद्रा मुख्य समस्त इ असिर्वादु'- शके १४२९ मधील एक पत्र. यातील समस्त इ = चे समस्त' - भाद्विसंवृ १५.[फा.]

**इउती** वि. क्रिवि. या बाजूला 'यासि एकु सेवटु इउती'- लीचपू ३०८.

**इउलाला-ली-ले** वि. एवढासा; लहान : 'भगतुजनीं इउलालीं तोंडें केलीं असेति.'- गोप्र ५८.

**इकटीक करणे** सक्रि. (जिन्नस वगैरे) विकणे : 'मी काही इकटीक करीन. पैसे ठेवणार नाही.'- गांधारी ८२.

**इकडचा-ला, इकडील** वि. या ठिकाणचा, बाजूचा, दिशेचा, रस्त्याचा, इकडे असणारा. (वा.) **इकडचा डोंगर तिकडे करणे, इकडला गड तिकडे नेऊन ठेवणे**- मोठे अचाट, अवघड काम करणे. **इकडला लुच्चा तिकडला चोर** - दोन्हींकडून थपडा खाणारा. (व.)

**इकडचातिकडचा** वि. या बाजूचा आणि त्या बाजूचा; विषयांचा; कोठला तरी; चार (अनेक) ठिकाणचा.

**इकडून** क्रिवि. येथून; या दिशेहून-ठिकाणाहून-बाजूकडून (ग्रा. रूप) इकडने. पहा: **इकडे**

**इकडूनतिकडून** क्रिवि. येथूनतेथून; आजूबाजूंनी; कोठूनतरी; कसेतरी.

**इकडे** पु. (स्त्रियांचा शब्द) पती; नवरा; जुन्या काळात नवऱ्याचे नाव न घेण्याच्या पद्धतीमुळे वापरात सर्वनामासारखा शब्द : 'काय मेल्यांची छाती लागली आहे इकडच्या पुढें उभें राहण्याची'- पृच १३७.

**इकडे-स** क्रिवि. १. या बाजूस, दिशेस. २. येथे; या जागी. ३. स्थानी, कडे या अर्थी. पहा : **एथे** [हा + कडे; का. ईकडे; ते. इक्कड.]

**इकडेतिकडे** क्रिवि. येथे तेथे; या बाजूस त्या बाजूस; आसपास; सगळीकडे.

स्त्री. (ल.) टंगळमंगळ; कुचराई; लपंडाव (क्रि. करणे, मांडणे).

**इकरम** पु. देणगी; दया; कृपा. [अर. अक्रम]

**इकरा** वि. अकरा. अकरा चा अप. (गो.)

**इकराम** पु. कृपा; मेहरबानी; मानसन्मान: 'पथकी पण हकदक मानपान इक्राम कानू कायदेसुद्धां सुदामत चालत आल्याप्रमाणे.'- बाबारो २.६४. [फा. इक्राम]

**इकरार** पु. १. कबुली; करार; ठराव. २. लेखी किंवा तोंडी जबानी : 'पर जिल्ह्यांतील साक्षीचा इकरार घेऊन पाठविणेंविषयीं जडजानें जडजास लिहावें'- न्यासे ३४. [अर. इक्रार]

**इकरारनामा** पु. लेखी ठराव; कबुली, कबुलायत. [फा.]

**इकलजमकी** स्त्री. पाठपुरावा: 'तुझे कितेक मशाकती व इकलजमकी व मसालती केली...'- शिवप्र ८४. [अर.]

**इकला** वि. अकरा. भाजीपाल्याचा सौदा करताना व्यापारी असे सांकेतिक शब्द वापरतात.

**इकळणे** क्रि. किळस येणे; शिसारी येणे : 'मास्तर, त्याची दारू अशी नाही सुटणार. तुम्ही घोड्याचे मूत कशातून तरी पाजा. चांगल्या उलट्या व्हतील; दारूला इकळूनच जाईल तो.' - हीवांमा ४७. (कुण.)

**इकळत** स्त्री. काकुळत; दया. [सं. विकल]

**इकळी** स्त्री. कुर्ली; खेकड्याच्या जातीचा एक प्राणी; हिच्या आकड्याचा वरचा भाग बराच मोठा व लांब असतो.

**इकळी-ळूत** स्त्री. किळस; कळमळ; ओकारी; शिसारी (क्रि. येणे). (कुण.)

**इकामत** स्त्री. राहणे; थांबणे. [फा.]

**इकून तिकून** पहा : **इकडून तिकडून**

**इक्तिरान** जवळ

**इक्तीदार** पु. १. अनुयायी; अनुकरण करणारा. २.(ल.) विश्वासू. [फा. इक्तिदा]

**इक्बाल** पु. अभ्युदय; भरभराट; सुख; नशीब; सुदैव. [फा.]

**इक्राम** पु. मेहरबानी; पारितोषिक; इनाम; इज्जत; आदर. [फा.]

**इख** न. विष; जहर; विख: 'संभा पाटील म्हणजे गावातलं इख होतं.'- पंवा १०२. (ग्रा.)[सं. विष]

**इखण** न. हत्यार; अवजार; साधन; उपकरण.

**इखरा** पु. एक काटेरी झाड. याला बारीक निळी फुले येतात : 'पाणथळीतून लव्हाळी व इखरा... गर्दी करत होते.'- आआशे २७१.

**इखलास** पु. मैत्री; विश्वास; स्नेह; प्रीती; अंत:शुद्धी; मनाचा निर्मळपणा; निष्कपटीपणा. [फा. इख्लास]

**इखलासनामा** पु. स्नेहाचे पत्र; मैत्रीचे पत्र; स्नेह्यासोबत्यांनी एकमेकांस पाठविलेले पत्र. [फा.]

**इखलासी** वि. स्नेहपूर्ण; प्रेमळ; चाहता; प्रेमाचा. [फा.]

**इखळा** पु. (सुतारी व्यवसाय) खिळे वगैरे उपटण्याचा चिमटा.

**इखंनूपाखंनू** न. शेतकीचे हत्यार वगैरे : 'शेत वाहतो म्हणतोस कांही इखंनपाखंन् आहे का?' [इखणचे द्वि.]

**इखीत** वि. ईषत; किंचित; थोडेसे : 'गोसावी इखीत हास्य केलें.'- लीचउ ३.१६. [सं. ईषत]

**इखीति** क्रिवि. यत्किंचित. (ग्रा.) [सं. इयत्तक]

**इख्तियार** पु. १. स्वीकार. २. सामर्थ्य; अधिकार.[फा.]

**इख्तियारनामा** पु. मुखत्यार पत्र; वकीलपत्र.

**इगडी** वि. विद्रूप; कुरूप: 'इगडी तिची सासू मग उठली जेवाया.'- जसा २७९.

**इगत, इगुत, इगूत** स्त्री. युक्ती; उपाय. [युक्ति अप.]

**इगरणे** क्रि. (कपडा झिजल्यामुळे) विरणे; विरविरीत होणे : 'आताच तर इगराया लागलेत आन् सक्राती पसवर कसं तग धरतेल गं ?'– वाळवण ८८.

**इगर्ज, इग्रज** स्त्री. ख्रिस्ती कॅथॉलिक पंथीयांचे देऊळ.(गो.) [पोर्तु.]

**इगीन** न. संकट; विघ्न; अडचण : 'लक्ष्मण दिरा, सांग मनीचं रे इगीन'– जसा २९२.

**इगुड** क्रिवि. बिघड; बिघाड :'धडाचा इगुड करशील । आन् सगळं बिघडवून टाकशील.'– आपा ७०.

**इगूत** स्त्री. युक्ती : 'हंबा हंबा करूनी धराव तिजला । ये इगूत नामी मजला ।'– घुले गुराखी. (ग्रा.)[सं. युक्ति]

**इग्यारावी** वि. अकरावी : 'गोठ इग्यारावी.' (भिल्ली)

**इग्लाई** स्त्री. अधाशीपणा : 'खाऊली वीखत । इग्लाई केवों नेञ.' – भिल्ली भाषा २५. (भिल्ली.)

**इग्लू** स्त्री. (समाज.) ध्रुव-प्रदेशात राहणाऱ्या एस्किमोची बर्फापासून बनवलेली झोपडी; हिमकुटी.

**इग्वा** फूस.

**इघड** पु. बिघाड. (कु.)

**इघीन** न. विघ्न; संकट : 'रामाची आणली सीता इघीन आलं घरा.'– जसा ३१०.

**इचकणी पिचकणी करणे** क्रि. चेष्टा करणे : 'बायकोला मारणारा घोव म्हणून आमची इचकणी पिचकणी करीत.' – तोरण १५४.

**इचकणे** क्रि. बिघडणे; मोडणे : 'काबा (मिसन) इचकली का ?'– धग १९.

**इचका** पु. १. तृण धान्यातील एक प्रकारचे गवत व त्याचे बी. २. एक झुडूप. याची पाने खाण्यायोग्य असतात. पहा: **विचका**

**इचका** पु. एक प्रकारची गोफण.

**इचकाइंधन** वि. अव्यवस्थित; मोडतोड झालेले. (व.)

**इचकी** स्त्री. महामारी. (व.) [सं. विषूचिका]

**इचना** पु. फक्त पावसाळी दिवसांत सापडणारा लहान मासा. याला पुण्याकडे इचका किंवा इचकी म्हणतात. याच्या छातीपोटावर दोन व पाठीवर एक असे पंख असून अंगावर अनेक रंगी ठिपके असतात.

**इचर** वि. विरळ. (व.)[सं. विचर]

**इचरकुंधा** विरळ झालेला कुंधा (एक प्रकारचे गवत).

**इचंगना** स्त्री. परीक्षा; विचक्षणा :'त्येकरता तुजी इचंगना नगं.'– पडरे ३६९.

**इचीभन** उद्गा. मूळ वापर शिवीसारखा; आश्चर्य किंवा हेटाळणी दाखवण्यासाठी उपयोग करतात : 'इचीभन, हाथं समदा मान आबांनाच !'– बाय २.२.

**इच्चक, इच्चकदागो** वि. खोडकर; खट्याळ, इब्लिस. (व.)

**इच्चकपना** पु. खोडसाळपणा : 'तुनं काइ इच्चकपना केला अस्सीन.'– धग १४६. (व.)

**इच्छा** स्त्री. १. वासना; वांछा; आशा; आकांक्षा; मनोगत; मनीषा; आवड. सामा. शब्द – इच्छापूर्वक; इच्छापुरःसर इ. २. (ग.) इच्छांक; त्रैराशिकातील प्रमाणसजातीय राशी. आद्यांक, मध्यांक व अंत्यांक किंवा इच्छांक ही तीन पदे असतातच. चवथे इच्छाफल (उत्तर) काढावयाचे असते. उदा. पाच रुपयांस दोन मण, तेव्हा चार रुपयास किती ? येथे पाच हे 'प्रमाण' व चार ही 'इच्छा' [सं. इष्]

**इच्छातीत स्नायू** पु. (प्राणि.) अनैच्छिक स्नायू. पहा : **इच्छानधीन**

**इच्छातृप्त** क्रिवि. इच्छेची तृप्ती होईपर्यंत.

वि. ज्याच्या इच्छेची पूर्ती झाली आहे असा.

**इच्छातृप्ति–प्ती** मनीषा सिद्धीस जाणे; हेतू सफल होणे.

**इच्छादान** न. इच्छिलेले दान देणे; इच्छा पुरी करणे.

**इच्छादानी** वि. इच्छादान करणारा; ज्याची जी इच्छा असेल ती पुरवणारा : 'तुका म्हणे इच्छादानी । पुरवी आवडीची धनी ।'

**इच्छाधीन** वि. इच्छेप्रमाणे चालणारा; इच्छेस येईल तसे करणारा : 'इच्छाधीन जे स्नायू आहेत म्हणजे जे स्नायू मनात आल्याबरोबर आपल्या शरीराचे अवयवांचे ठिकाणीं ... गति उत्पन्न करितात.' –मराठी ६ वे पुस्तक (१८७५) २६०. [सं. इच्छा+अनधीन]

**इच्छानधीन** वि. इच्छेबाहेरचा; इच्छेच्या ताब्यात नसलेला. स्वतंत्र 'रक्ताक्षय हा एक इच्छानधीन स्नायूच आहे.'–मराठी ६ वे पुस्तक (१८७५) – २६०. [सं. इच्छा+अधीन]

**इच्छापुरचे तालुकदार** श्रीमंतीत आळसात वेळ घालविणारे व स्वेच्छेप्रमाणे वागणारे ऐदी लोक : 'गंगामाइची कृपा व सपाट सुपीक भूमी आमचेकडे असती तर कदाचित आम्ही इच्छापुरचे तालुकदार बनून फुलांचे गजरे घालून हिंडलों असतो.'

**इच्छापूर्ति–र्ती न.** इच्छेची फलद्रूपता, पूर्तता; इच्छातृप्ती.

**इच्छाफल** स्त्री. त्रैराशिकातील चौथे पद (उत्तर) मध्यपद आणि इच्छांक यांचा गुणाकार करून त्यास आदिपदाने भागले असता इच्छाफल येते. [सं.]

**इच्छाभंग** पु. इच्छा पूर्ण न होणे; आशा निष्फळ होणे; निराशा पदरी येणे. [सं.]

**इच्छाभोजन** न. १. तृप्ती होईपर्यंत जेवणे. २. भरपूर जेवण. ३. आवडीचे, इच्छित पदार्थ खाऊ घालणे. [सं.]

**इच्छामरण** न. इच्छेस येईल तेव्हा मरण येणे, मरणे; स्वतःला हवे तेव्हा नैसर्गिकपणे मरण्याचे सामर्थ्य, शक्ती. [सं.]

**इच्छामरणी–मृत्यू** वि. मरण स्वतःच्या स्वाधीन असलेला; इच्छा होईल तेव्हा मृत्यूस निमंत्रण करणारा; इच्छामरणाचा ईश्वरी प्रसाद असणारा: 'ख्यातयशस्वी इच्छामृत्यू तुम्ही कुरुकुळांत वासवसे ।'– मोउद्योग ११.८७.

**इच्छार्थक** वि. इच्छा दाखवणारे, इच्छादर्शक. [सं.]

**इच्छालाभ** पु. इच्छित वस्तू मिळणे, प्राप्त होणे. [सं.]

**इच्छावसें** क्रिवि. इच्छेप्रमाणे.

**इच्छावान्** वि. इच्छा असणारा; इच्छायुक्त . [सं.]

**इच्छाविनाश** पु. १. कामनाक्षय; इच्छाभंग. २. इच्छादमन; आत्मसंयम. [सं.]

**इच्छाविलास–विहार** पु. मन मानेल तेव्हा, मन मानेल तसे खेळणे; मनसोक्त विलास, चैन करणे. [सं.]

**इच्छाशक्ति–क्ती** स्त्री. इच्छेचे सामर्थ्य; संकल्पशक्ती; इच्छा कृतीत उतरविण्याची मनाची शक्ती. पहा : **ईहा** [सं.]

**इच्छासिद्ध** वि. आपल्या इच्छेप्रमाणे सिद्ध किंवा असिद्ध ठरवता येण्यासारखा. [सं.]

**इच्छास्वातंत्र्य** न. (राज्य.) अनुचित बंधनापासून मुक्त असलेली इच्छा; कोणत्याही मर्यादा न ठेवता इच्छा किंवा निवड करण्याचे स्वातंत्र्य; प्रवृत्तिस्वातंत्र्य. [सं.]

**इच्छाक्षय** पहा : **इच्छाविनाश**

**इच्छांक** पु. (ग.) पहा : **इच्छा** २

**इच्छिक, इच्छुक, इच्छु–च्छू** वि. इच्छा असणारा; आकांक्षी : 'पूर्वील सोयरा लग्नाचा इच्छिक ।' – व ५. [सं. इच्छक]

**इच्छिणे** सक्रि. इच्छा करणे, धरणे; आकांक्षा असणे; चिंतणे; वांच्छिणे; हेतू, मनीषा असणे; लोभ धरणे. [सं. इष्]

**इच्छित** वि. इच्छिलेले, चिंतिलेले; वांच्छिलेले. [सं.]

**इच्छुक** वि. १. इच्छा असणारा; अपेक्षा बाळगणारा; हेतू असणारा. २. निवडणुकीतील उमेदवार किंवा उमेदवारी मिळवू इच्छिणारा.

**इच्छुक बोलीदार** पु. लिलावात बोली बोलण्याची आकांक्षा असलेला.

**इजगो** स्त्री. चिकित्सा; विचका. हा शब्द द्विरुक्तीने वापरतात : 'याला दाखीव त्याला दाखीव असी इजगो इजगो चाली.' (व.)

**इजट** न. ऊद मांजर; कांडेचोर; गूळ खाणारे मांजर. (माण. इजाट.)[का.]

**इजन** पु. सैनिक.

**इजबळ** स्त्री. पालीची एक जात. (व.)

**इजमायली** वि. तकलुपी, बळकट नसलेला:'... मागे मेढा घातला होता तो इजमाइलीच होता.'– पेद २२.१६७.२. कच्चा, जुजबी (हिशेब, गावचा ताळेबंद). ३. कामचलाऊ; हंगामी; कच्चे; तात्पुरते. (इमारत, काम वगैरे.) (कों.)[फा.]

**इजलास** स्त्री. बैठक; सभा; अधिवेशन; (न्याय) सत्र. [अर. इज्लास.]

**इजहार** क्रिवि. परिस्फुट; उघड; जाहीर; प्रसिद्ध : 'किले याचा मजकूर सविस्तर आज्ञापत्राप्रमाणे खलबतामध्ये नवाबाचे खजमतेस इजहार केला.'– पेद २८.२२. [फा.]

**इजा** स्त्री. १. अपाय; पीडा; त्रास; उपद्रव; दुःख : 'तालुकियास इजा न लागे ऐसा वंदागस्त होऊन तेजवंतास पत्रें यावीं.'– मइसा ७.११७. २. आघात; जखम. [फा.]

**इजाजत** स्त्री. अनुमती; परवानगी : 'त्यांना आपल्याला भेटायची इजाजत दिली आहे.'– श्रीयोभा १.४९०. [फा.]

**इजाट** न. ऊद मांजर : 'एक विचित्र, काळे, केसाळ जनावर गावात आल्याची बोलवा होती. कुणी ते इजाट असल्याचे म्हणे.'– सोपिं ५६.

**इजाफत** स्त्री. (इनामदारास) वतनास कायम जोडून दिलेले गाव; इजाफत इनाम. २. इतर राजांकडून किंवा परराष्ट्रांकडून येणाऱ्या देणग्या किंवा नजराणे यांचा हिशेब ठेवणारे खाते; इजाफतखाना; हा जो खर्च होतो त्यास इजाफत खर्च म्हणतात. ३. वाढ; बढती.
वि. अधिक; जादा; जास्त. [फा. इझाफा]

**इजाफत जमा** स्त्री. १. रयतेवरील कराव्यतिरिक्त इतर साधनांनी (कर्ज, नजराणे, नाणेचढाव इ.) सरकारने गोळा केलेला जादा पैसा. २. एका महालात किंवा सुभ्यात दुसऱ्या महालाचा जमा झालेला जादा वसूल. ३. जप्त केलेल्या एखाद्या गावचा वसूल.

**इजाफती** वि. कर, वसुली संबंधी.

**इजाफह, इजाफा** पु. १. गावइनाम; नेमणूक; तनखा; नजराणा. २. वाढ; बढती; आधिक्य : 'इजाफा पंचहजारीचा देणार.'– मइसा १.१७९.

**इजाबिजा** क्रिवि. लागोपाठ दोन वेळा.

**इजा बिजा तिजा** अ. १.एका मागून एक असे तीन वेळा; दोनदा झाले की तिसऱ्यांदा होतेच अशा कल्पनेने तिसऱ्या वेळी वापरतात. (क्रि. होणे, सांगणे).२. (ल.) वारंवार; कैक वेळा.

**इजायली, इंजायली** वि. १. अगदी सामान्य, जंगली, रायवळ इमारती लाकूड; सागाखेरीज इतर लाकडाला म्हणतात. २. अशा लाकडाचे बांधकाम. [फा. अजाल= हलके]

**इजार** स्त्री. विजार; पायजमा, सुर्वार; चोळणा; पाटलोण : 'इजारा पैजारा मुक्तलग सकळा ।' – सप्र ७.११.

**इजारत, इजारा** स्त्री. पु. १. खंड; मक्तेदारी; विशिष्ट करार; भाडेपट्टा; चढलावणी (एखादे खेडे किंवा ओसाड जमीन ३०–४० वर्षांत वसाहत करण्याच्या किंवा लागवडीस आणण्याच्या कराराने देणे); धारा : 'शेरीफाकडे शायरचा इजारा असे, आणि त्यांस दरवर्षी त्याजबद्दल ठरावीक रक्कम सरकारात भरावी लागत असे.' – इंमू ५४. २: (ल.) जबाबदारी :'सर्व इजारत मन्सब्याची तुझ्यावर आहे.'– चित्रगुप्त ९२. [फा.]

**इजारदार** पु. इजारा देणारा; मक्तेदार; ठेकेदार; कंत्राटदार : 'त्या वेळेस इतर इजारदारांप्रमाणे त्यांच्याकडेस कांहीं सरकारी बाकी होती.'– विक्षिप्त १.५०. [फा.]

**इजारदारी** स्त्री. मक्तेदारी.

**इजारपट–पट्टा** पु. १. इजारदाराची सनद. २. गावातील किंवा विशिष्ट हद्दीतील शेतांची जंत्री, फेरिस्त. ३. गावच्या मुख्य पाटलाला सरकारतर्फे दिलेला वार्षिक वसुलाचा हिशेब, जमाखर्च. यात गावावर बसवलेला वसूल व त्याची फेड कशी करावी यासंबंधी माहिती असे. ४. गावचा ठराव होऊन पाटलास दिलेला कागद. [फा. इजारा + पट्टा]

**इजारी** वि. गुडघ्यापर्यंत पाय पांढरे असणारी (मेंढी वगैरे). [फा. इझार]

**इजितखत** न. अजितपत्र पहा: **यजितखत** : 'त्यांनीं आपलें खुषरजावंदीने तुम्हांस इजितखत लिहून दिले.'– शारो १.१५७.

**इजूक लागणे** क्रि. दुखणे लागणे.

**इज्आन** पालन.

**इज्जत, इजत** स्त्री. १. अब्रू; प्रतिष्ठा; मान; थोरवी; कीर्ती. २. पत्राच्या आरंभीचा बहुमानार्थी मायना.[फा. इज्जत्] [वा.] **इज़्ज़त खाणे** - पहा : **इज्जत घेणे, इज्जत खोवणे** - अब्रू, प्रतिष्ठा किंवा थोरवी सांभाळण्याची ईर्षा धरणे : '.... आपल्याहातें सरदारीची इजत खोविली.' - पेद २७.१२६. **इज्जत घेणे** -बेअब्रू करणे; विनयभंग करणे; अतिप्रसंग करणे. २. दुर्लौकिक करणे.

**इज्जत आसार** वि. सुप्रतिष्ठित; सन्मान्य; नामदार. फारशी पत्रातून नावाच्यापूर्वी हा बहुमानवाचक शब्द किंवा पदवी.

**इज्जत खाऊ, घेणा** वि. १. एखाद्याची अब्रू किंवा मान कमी करणारा; बुडविणारा; आश्रयदात्याची बेअब्रू करणारा. (नोकर, वस्त्र, घोडा इ.) २. घोटाळा माजविणारा; कार्यनाश करणारा; मूर्खपणा पदरी बांधणारा; अब्रू घालवण्यासारखा.

**इज्जतदार** वि. प्रतिष्ठित; मातब्बर; अब्रू असणारा. [फा.]

**इज्जतपन्हा-म्हा** वि. सुप्रतिष्ठित; श्रेष्ठ; नामदार (एक पदवी) [फा.]

**इज्जतलायक** क्रिवि. प्रतिष्ठेप्रमाणे; मानमरातबाप्रमाणे : 'सिरुपाऊ इनामत देतात ते अवघ्या सर्दारांसहि इज्जत लायख घेणें. -मइसा ६.२१०.

**इज्जत हुर्मती** स्त्री. मानपान : 'पेशजी यांच्या वडिलांची इज्जत हुर्मती चालली आहे तैसी चालविणे.' - वाडसनदा १६.

**इज्जती, इज्जती, इज्जतीचा** वि. अब्रूदार; प्रतिष्ठित; सन्मान्य.

**इज्जती दस्तगाह** वि. प्रतिष्ठा-निधी; श्रेष्ठ; सन्मान्य. [फा.इझात्+दस्तगाह]

**इज्ना** पु. ताबा; सत्ता : 'जो कोणी सवाईसिंगाचे इज्न्यांत येईल त्यास राज्य द्यावें' - जोरा १०७. [फा. इझ्न = परवानगी ]

**इज्नात** क्रिवि. आधीन; लगामी.

**इज्हार** पु. जाहीरनामा; प्रसिद्धीकरण; ताकीदपत्र; नोटीस; समन्स. [फा. इझ्हार]

**इट** स्त्री.वीट. [क. इ ट्टिगे सं. इष्टिका]

**इटकुली-मिटकुली** वि. लहानशी; एवढीशी : 'इटकुली मिटकुली गोष्ट सरो तुमचें आमचें पोट भरो.' [सं. इयत्कल]

**इटकोर** वि. अटकर; हट्टी; अडेल. (व.) [अटकरचा अप.]

**इटा** पु. भाल्यासारखे एक शस्त्र; वीट; सांग. या भाल्याची लांबी सहा फूट असून पुन्हा त्याच्या शेवटास सहा फूट लांबीची दोरी बांधलेली असते. ती मनगटाला बांधून इटा फेकतात. म्हणजे याचा मारा बारा फुटांपर्यंत चालतो. पट्ट्यापेक्षाही हा मारा जास्त असल्यामुळे 'दहा पट्टेकरी तर एक इटेकरी' अशी म्हण पडली आहे. [सं.यष्टि]

**इटावप्रत** पु. रुपयाचा एक प्रकार : 'उदमी येतील जिन्नस विकतील त्याचा रुपया घेणे देणे तो इटावप्रत दौलताबादप्रत घ्यावा द्यावा.' - पुदभा ३.१०३

**इटाल-णे-सी** पु. १. पहा. **विटाळ** २. धोंडमार : ' जें निंदेचें इटाळवें-हीं ।' - राज्ञा १८.५४७.

**इटाळा** पु. विटेचा तुकडा : 'वरि पडताति इटाळे' - उषा ६०२.

**इटाळी** स्त्री. आळ; आरोप; किटाळ: 'ऐकें गे यशोदे जननी अवघी लटकीच याची करणी । आम्हांवरी इटाळी घेऊनी । नसतीच उठतो गे ।' - हरि ७.२५७. [किटाळ, विटाळ चा अप.]

**इटाळे** न. मातीच्या विटा पाडण्याचा लाकडी साचा : 'मग भुईचें इटाळ घेऊनि कोपें भूमीसीं आफळिलें' - लीच २.१८.

**इटिजन वात** पु. (भू.) पूर्व भूमध्य सागरी प्रदेशात उन्हाळ्यात उत्तरेकडून वायव्य दिशेकडे वाहाणारे तीव्र वेगवान वारे.

**इटीमिटी-ठी** स्त्री. १. धार्मिक नित्यकर्म : 'आपुली इटीमिटी सारूनि या' -लीचपू ५७१. २. दृष्ट लागू नये म्हणून ओवाळून टाकतात ती वस्तू. (पायाची माती ओवाळतात किंवा ती कपाळाला लावतात, किंवा मीठ मिरच्या ओवाळून टाकतात.); अलायबलाय; इडापिडा; निंबलोण : 'झणीं लागेल बाह्यदृष्टी म्हणोनी घेतली इटिमिठी । निंबलोण उठाउठी । करीं गोरटी निजभावें ।। - एरुस्व १४.९१.

**इटेकरी, इटेबरदार** पु. इटा हत्यार धारण करणारा, बाळगणारा शिपाई.

**इटोला** पु. तीन विटांची चूल. [सं. इष्टक]

**इठाळ** स्त्री. १. फोडणी देताना ती स्वादिष्ट व्हावी म्हणून वापरायची एक दगडी बाटी, २. चपटा दगड किंवा विटेचा तुकडा.

**इड** स्त्री. १. एक भूषण; अलंकार; तोरण: 'कीं आकाशीं इड बांधली; कापूर केळीची ।' -शिव ३३३. २. शिडी[का. एणि, सं. ऋद्धि ]

**इडकणे, इडकावणे** अक्रि. १. नखरे करणे; चेष्टा करणे: 'असा इडकाऊं नकोस.' २. नटणे मुरडणे ३. लाडात येणे.

**इडगळला** वि. घाणेरडा, ओंगळ; ओबडधोबड (व.)

**इडगंड** न. गुप्त धन. (बे.) [का. इडुगंट]

**इडनिंबू-लिंबू** पहा : **ईडनिंबू**

**इडपाड** पु. नेट; आवेश; जोर; श्रम : 'भाले त्रिशूळ इडपाडें । घे घे म्हणोनिं टाकिती ।।' - मुआदि १२२. [सं.ईर्षा.]

**इडरी, इडली** स्त्री. तांदूळ व उडीद डाळ विशिष्ट प्रमाणात घेऊन १२ तास भिजवून वाटतात. पुन्हा १२ तास भिजवून (आंबवून) इडलीपात्रात उकडतात तो पदार्थ . [का. इड्डली]

**इडळणे** अक्रि. फळ पिकून नासू लागणे; उतरणे.

**इडा** स्त्री. नाभिचक्रापासून निघून डाव्या नाकपुडीतून वाहणारी एक नाडी. ही योग व स्वरशास्त्र यांत प्रसिद्ध आहे. हिला चंद्रनाडी म्हणतात. पिंगला व सुषुम्ना ह्यांच्याबरोबर इडेचा उल्लेख येतो : 'इडोनि करावा प्राण पूर्ण.' - एभा १४.४२०. [सं.]

**इडापिडा** स्त्री. (बायकी) सर्व त्रास; संकटे; अरिष्टे; दुःखे. (ओवाळताना किंवा दृष्ट काढताना बायका म्हणतात.) (क्रि. जाणे, टळणे, नाहीशी होणे, दूर होणे. ) [पीडाचे द्वि.]

**इडाळणे** क्रि. १. अधिक पिकणे; उतरणे; 'त्यातच विटलेली, इडाळलेली पेरू केळी मांडले होते.' - हात १४. २. सुकणे; डागाळणे : 'उन्हांत पडलेला ऊस तापून आतील रस इडाळतो' - गार १३२.

**इडूरी** स्त्री. एक पक्वान्न : 'पूर्ण परिपूर्ण पुरिया । सबाह्य गोड गुळवरिया ।

क्षीरसागरींच्या क्षीरधारिया । इडूरिया सकुमारा ।' – एरुस्व १४.११९.

**इडेपाडे** क्रिवि. १. आवेशाने; ईर्षेने. २. श्रमाने; कष्टाने : 'भाले त्रिशुळ इडें पाडें । घे घे म्हणोनि टाकिती ।' – मुआदि ६.३९. [सं.ईर्षा]

**इणंग** फार काटे असलेला एक लहान मासा. (गो.)

**इत** अ. युक्तार्थक प्रत्यय : आनंद–आनंदित, संपादित, सुधारित इ.

**इतउत्तर** क्रिवि. यानंतर; इतःपर.

**इतउपर** यापुढे; आतापासून, येथून पुढे. [सं. इतः + उपरि]

**इतकाला** वि. १. एवढा; एवढा मोठा (परिणाम, संख्या, माप इ. दाखवणारा शब्द). 'दर एका जिनसाला इतकाली किंमत द्यावी लागली.' – मराठी सहावे पुस्तक (१८७४) १९२. [सं. इयत्]

**इतकावा** वि. एखाद्या मालिकेतील किंवा आवृत्तीतील अमुकएवढ्या प्रमाणाचा, मर्यादेचा, पायरीचा, अवस्थेचा.

**इतपत** वि. एवढे; या प्रमाणात; इतके. [ सं. इयत्परिमित]

**इतफाक** पु. सहविचार; एकविचार; सल्लामसलत : 'याचा बंदोबस्त कळेल तसा आम्ही राजश्री पंतप्रधान याचे इतफाकानें करूं.' – मइसा १.२६१.

**इतबार, इदबार** पु. १. विश्वास; इमान; श्रद्धा : 'भरवसा आतां इतबार कोणाचा येत नाहीं.' – सभासद २९. २. प्रतिष्ठा; पत; मानपान : 'कोणा इतबार याचा घरीं'–सला११. [अर. एअतिबार]

**इतबारपण** श्रद्धाळूपणा; विश्वास; भरवसा; खात्री.

**इतबारी** वि. विश्वासू; प्रामाणिक; भरवशाचा : 'म्हणें तुम्ही धन्याच्या बऱ्यावरी पहिल्यापासूनि आहांत इतबारी ।' – अफला १५.

**इतमाम** पु. १. लवाजमा; थाटमाट; खटला; (दासदासी, पालखी, घोडा इ.) सरंजाम. २. दर्जाप्रमाणे खाजगी किंवा सरकारी तैनात : 'इतमाम ज्याचा त्याला । मराठे मुसलमानांला ।' – ऐपो २३२. [फा. इह्‌तिमाम्=व्यवस्था, बंदोबस्त]

**इतमामी** वि. इतमाम ठेवणारा, असणारा; सरंजामी; लवाजमेवाला.

**इतमाम्या** पु. व्यवस्थापक; रखवालदार; नोकर; 'बाणकरी व इतमामे पुण्यास रखवालीस पाठविले.' – ऐलेख १.४३३.[फा. इह्‌तिमाम्]

**इतर** वि. सना. १. अन्य; निराळा; येर; दुसरा वेगळा. २. उरलेला; याशिवायचा; बाकीचा.[सं.] (वा.) **इतर पितर काढणे**– नातलगांवरून शिव्या देणे; मायबहीण उद्धरणे (व.)[पितरचे द्वि.]

**इतरणे** अक्रि. १. खोड्या, चेष्टा, चाळे, नखरे करणे; उनाडणे 'अरे! असा इतरतोस काय?' २. अवांतर गोष्टी करणे; सांगणे; विषयांतर करणें. (व.)[सं. इतर]

**इतरत्र** क्रिवि. अन्यत्र; इतर ठिकाणी; दुसरीकडे. [सं.]

**इतरथा** क्रिवि. १. दुसऱ्या प्रकारे; निराळ्या रीतीने; अन्यथा : 'नसता दासजित प्रभु, करितां सारथ्य कां इतरथा तें ।' – मोभीष्म ४.२०. २. उलटपक्षी : 'कांची शोभे वदुं इतरथा भूषणें दूषणें हीं ।' – कमं २.२९ [सं.]

**इतर विशेष** वि. उरलेले; राहिलेले; अवशिष्ट; किरकोळ. (बाबी गोष्टी).

**इतराज** वि. अप्रसन्न; रुष्ट; नाराज: 'न जावें तरी खावंद इतराज होतात.' – पात्रप १३८. [फा. इअतिराझ]

**इतराजी** स्त्री. अप्रसन्नता; गैरमर्जी; अवकृपा; नाराजी. [फा. इअतिराजी]

**इतरायेल** वि. वात्रट; चावट. (खा.)

**इतरेजन** पु. काही नात्याचा संबंध नसलेले; परके; काही हितसंबंध नसलेले : 'म्हणून इतरेजन काहीं तरी त्यांत दोष काढीत राह्यचेच' – विवि २७०. [सं. इतरे+जनाः]

**इतरेतर** सना. वि. परस्पर; अन्योन्य; एकमेक.

पु. (व्या.) द्वंद्व समासातील एक भेद – ज्या समासाचा विग्रह 'आणि' किंवा 'व' या उभयान्वयी अव्ययांनी केला जातो असा समास. उदा. हरिहर, आईबाप इ. [सं.]

**इतरेतरशून्यता** स्त्री. (तत्त्व) अन्योन्यशून्यता; परस्परशून्यता. [सं.]

**इतरेतराश्रयत्व** (तत्त्व) १. परस्परावलंबित्व २. अन्योन्याश्रयत्व. [सं.]

**इतलतितल** वि. चंचल; धरसोड वृत्तीचा; लहरी

क्रिवि. लहरीपणाने; धरसोडीने; चंचलपणे. (क्रि. करणे, बोलणे, चालणे, लावणे, मांडणे). (गो.)

**इतलसार** पु. घोड्याच्या अंगावरील एक वाईट भोवरा; हा कुल्ल्यावर असतो. ही एक घोड्याची खोड मानतात.

**इतलाक–की** १. स्वतंत्र; निराळा; मोकळा. २. पगारी (कायमची नेमणूक नसलेला तात्पुरता नोकर किंवा फौजेतील शिपाई या संबंधाने वापरतात. इतलाखी फौज. नोकर वगैरे) : 'सात हजार फौज इत्लाख रोजमऱ्यावर ठेवावी.' –ऐलेख ८.४३२२. [फा. इतलाक]

**इतलाक फौज** स्त्री. कारणपरत्वे भरती केलेली अधिक फौज : 'या खेरीज इतलाक फौज दाहा हजारापासून पंचवीस हजारापर्यंत वाढविली जात असे.' – विंचूह ९१.

**इतलाख** वि. रोख : 'श्रीमंतांनीं गंगातीरास राहून इतलाख खर्चास द्यावें. येणें प्रमाणें ठराव झाला तरी उत्तम.' – ऐलेसं २६५८.

**इतलाख, इतलाख नेमणूक** स्त्री. सरकारी तिजोरीतून किंवा कोठारातून मिळालेली ठरावीक नेमणूक; इनाम : 'पांचशे रुपयांचा गांव व पांचशे रुपये इत्लाख.' – वाडसमा १.३६.

**इतलाखी** स्त्री. स्वातंत्र्य : 'रियासतींत मोठी गोष्ट कीं वचनाची कायमी, त्यांत तलवून मिजाजी (लहरीपणा) झाल्यास व इतलाखी बातल होऊं लागल्यास लाचार.' **ऐलेसं** ७.५७४. [फा. इत्लाक्]

**इतल्ला** पु. स्त्री. १. संबंध; हित; मतलब; लक्ष; गुंता; लोभ : 'हरतऱ्हा करोन त्याचे (शिंद्याचें) परिघांतून आपले पेठेंत येऊन राहिलों, त्यांचा इतल्ला आम्हांकडे नाहीं.' – ऐलेसं १०.५६०६. २. वार्ता; खबर; बातमी (विशेषतः सरकारास दिलेली). (क्रि. करणे, देणे, सांगणे, लिहिणे) : 'त्याचा इतल्ला पाटीलबावास केलाच असेल.'– मदरू ३.६५. [फा. इत्तिला.]

**इतल्लेपत्रक** न. सरकारी बातमीदाराचा लेखी अहवाल; वार्तापत्र. (सामा.) बातमीपत्र; अहवाल.

**इतवा** वि. पहा : **इतका, इतकावा**

**इतवार** पु. आदितवार; रविवार. [हिं.]

**इतस्ततः**क्रिवि. इकडेतिकडे; इकडून तिकडून; अस्ताव्यस्त; अनिश्चितपणे. [सं.]

**इतःपर** क्रिवि. यापुढे; यानंतर; इतउत्तर; अतःपर. [सं.]

**इताअत** स्त्री. बक्षीस. [फा.]

**इति** अ. १. (या)प्रमाणे, असे, – अशा तऱ्हेने इत्यादी शब्दांप्रमाणे सारखेपणा किंवा एक रीत दाखवणारे अव्यय. २. अखेर; शेवट; समाप्ती. पहा : **इतिश्री** [सं.]

**इति** अ. राष्ट्रीय आपत्ती : अनावृष्टी, अतिवृष्टी, टोळधाड, घुशींचा उपद्रव, पोपटांचा – पाखरांचा उपद्रव, सरकारी जुलूम, परचक्र या सात राष्ट्रीय आपत्तींचा उल्लेख 'इति' या शब्दाने करीत.

**इतिकर्तव्यता, क्रिया** स्त्री १. एखादी गोष्ट करण्याची पद्धत, मार्ग, रीत. २. कार्यक्रम; मुळापासून शेवटपर्यंत क्रमाने अनुष्ठान असलेले कार्य. ३. कर्तव्य; पार पाडायची कामगिरी. ४. कर्तव्याची समाप्ती; अखेरी. [सं.]

**इतिकृति–ती** स्त्री. शिष्टसंमत आचार; वागण्याची पद्धत. [सं.]

**इतिफाक** पु. मैत्री, एकोपा : 'बाबुराव फडणीस व त्रिंबकराव मामा यांचा इतिफाक व सखारामपंतासी व उभयता मशारनुलेसी निफाक.' – पुणे अख १.१०३.

**इतिवृत्त** न. अहवाल; हकीकत; इतिहास. [सं.]

**इतिश्री** स्त्री. १.इतिश्री असे शब्द पुराणातील अध्यायांच्या शेवटी ('इतिश्री स्कंदपुराणे.) येतात त्यावरून शेवट; समाप्ती: 'तगटी इतिश्रया कराव्या ।' – दास १९.१.१९ (क्रि. करणे, होणे). २. (ल.) अखेर; मृत्यू : 'तूं आज कबूल झाला असतास म्हणजे बारभाईंची इतिश्रीच होती.' – इंप ४३.

**इतिहास** पु. भूतकाळात एखाद्या देशात झालेल्या घडामोडींची संगतवार माहिती; एखादी संस्था, शास्त्र इ.ची सुरुवात झाल्यापासून अखेरपर्यंतची किंवा विशिष्ट मुदतीपर्यंतची संगतवार हकीगत; (सामान्यतः) एखाद्या गोष्टीची साग्र माहिती; इत्थंभूत हकीगत; वृत्तान्त; कथा. [सं. इति+ह+आस= असे घडले.] (वा.) **इतिहासाची पुनरावृत्ती होणे** – तीच घटना स्थूल रूपाने पुन्हा घडून येणे.

**इतिहासकार** जुन्या कागदपत्रांचे संशोधन करून इतिहास लिहिणारा माणूस.

**इतिहासजमा** वि. गतकालीन; स्मृतिशेष; नामशेष; मागे पडलेला : 'पॅरीस शहराचें वैभव आतां इतिहासजमा झालें आहे.' – के ६.१०.३५.

**इतिहासणे** सक्रि. (अर्वाचीन काव्य) – इतिहासात समाविष्ट करणे: 'मराठकर्तृत्वा दे संधि इतिहासाया नांव ।'– जननीजनकज.

**इतिहासपूर्वकाल** (पुरा.) कोणत्याही देशाचा, लिखित पुराव्यासह सुसंगतवार इतिहास सुरू होतो, त्यापूर्वीचा काल. यात पाषाणयुग, ताम्रपाषाणयुग, ताम्रयुग आणि कांस्ययुग यांचा समावेश होतो. भारतात अलेक्झांडरच्या स्वारीपूर्वीचा सर्व काल साधारपणे यात मोडतो.

**इतिहासलेखनशास्त्र** न. (राज्य.) ऐतिहासिक संशोधन, ऐतिहासिक पद्धती व इतिहासलेखन यांच्या विकासाचा अभ्यास. [सं.]

**इतिहासवाद** पु. (राज्य) सर्व सामाजिक, सांस्कृतिक घटिते ऐतिहासिक नियमानुसार होत असतात सर्व तथ्ये सापेक्ष असतात व स्वतःसिद्ध अशी कुठलीही मूल्ये मानदंड वगैरे नसतात असे मानणारे, प्रतिपादन करणारे मत.

**इतिहासशास्त्र** न. अर्वाचीन पद्धतीने संशोधन करून ऐतिहासिक घटनांचा शोध घेणारे व चिकित्सकपणे त्याची सत्यासत्यता पडताळून पांडित्यपूर्वक मांडणी करणारे शास्त्र.

**इतुकाला, इतुलाला** वि. इतका; एवढा : 'दान इतुलें द्या मज दीना ।'– तुगा ३४४; 'मजकरवि वळवित : तेंथचीं इतुकाली ठेविली :' – लीचउ ५९.

**इत्तिफाक** पु. १. संमती; कबुली. २. मैत्री; स्नेह; जूट : 'आपले सरकारचे दस्तुरप्रमाणें शपथपूर्वक इत्तिफाकनें राहून करारमदारास अंतर न करतां' – समारो १.३२८. ३. दैव; योग; सहजप्रसंग. [फा. इत्तिफाक]

**इत्तिलाअ** पु. माहिती; अनुमती. पहा : **इतला**

**इत्तिहाद, इतेहाद** पु. ऐक्य, मैत्री, दोस्ती : 'असें श्रीमंतांचे मनांत येणें हें इत्तिहादास चांगलें नाहीं' –मइसा ५.३०; 'आमची दोस्ती आणि इतेहाद पूर्वीपासून जो आहे त्यांत खलश न यावा.' –मइसा ५.३०. [फा. इत्तिहाद्]

**इत्थंभूत** वि. जशी घडली तशी; सविस्तर; तपशीलवार (गोष्ट हकीगत, वर्णन, निवेदन, प्रतिपादन वगैरे). [सं.]

**इत्य** पु. इत्यर्थ; निश्चय; निर्णय : 'येविसीचा इत्य ठैरल्यावर सेवेसी लेखण केले जाईल.' – पुणे अख ३.१०३.

**इत्यफाक** पु. पहा : **इतफाक** : 'त्या गोष्टीचा इत्यफाक या शादीचे खुशीचे समारंभात घडावा हें फार चांगलें.' –मइसा ७.५१.

**इत्यर्थ** पु. सारांश; तात्पर्य; सिद्धांतरूप अर्थ : 'तरीं तूं इत्यर्थांचें सार । इतुलें जाण ।' – ज्ञा १८.१४६. [सं.]

**इत्यलम्** उद्गा. शेवट; अखेर; समाप्ती. [सं.]

**इत्यादि–दी, दिक** वि. वगैरे; हे व इतर : 'तत्त्वांची अभिवृद्धी कशी झाली इत्यादिक गोष्टींचा विचार वास्तविक पाहतां आमचा आम्हीच करावयास पाहिजे होता.'–लोटिकेले ४.१२६. [सं.]

**इत्रावणे** क्रि. खोड्या करणे. पहा : **इतरणे** १ (व.)

**इत्सा** स्त्री. इच्छा : 'ते देत इत्साभोजन । दीप तरी चिंतामणिरत्न । छाये करिती चिंतितभोजन । कल्पतरूचे ।' – कथा २.१२.५७.

**इथपर्यंत, इथपावेतो** पहा : **एथपर्यंत, एथपावेतो**

**इथरणे** अक्रि. बेशिस्त, गैरसुधे वागणे; खवळणे; बिथरणे. [बिथरणेचा अप.]

**इथलातिथला** वि. कुठलाही; वेगवेगळ्या ठिकाणचा.

**इथलूक, इथलोक** येथपर्यंत. (खा.)

**इथिलीन** पु. (रसा.) दगडी कोळशात सापडणारा एक वायू; हा तैलयुक्त, रंगहीन आणि पारदर्शक असून याला मधुर पण लसणीसारखा वास येतो. [इं.]

**इथिसा** क्रिवि. इथे : 'इथिसा काई दुखते कायजी ' – अगतिका २२.(व.)

**इथून** क्रिवि. या ठिकाणाहून; या जागेपासून.

**इथूनतिथून** क्रिवि. १. सगळीकडून; वाटेल तिथून. २. एकूणएक, सर्वच्या सर्व.

**इथे** क्रिवि. १. या ठिकाणी; या जागी; या प्रदेशात. पहा : **येथे** २. एखाद्याच्या घरी; राहण्याच्या जागेत; 'त्याच्या इथे' 'माझ्या इथे'.

**इथेतिथे** क्रिवि. कुठे कुठे; काही ठिकाणी; या ठिकाणी त्या ठिकाणी; इकडेतिकडे.

**इथेशी तिथेशी** क्रिवि. इकडे तिकडे; या त्या ठिकाणी ; 'आम्ही मुलें आपली सारी भेदरून इथेशी तिथेशी उभी होतो.' – पलकोपे १४९.

**इथ्र** पु. (शाप.) इंधक, तेजोवाहक पदार्थ; सूक्ष्मवायू. [इं. ईथर]

**इदगा** पु. ईदच्या प्रार्थनेसाठी तयार केलेली जागा. [फा. ईदगाह]

**इदबारात** स्त्री. मानपान : ' ....शिवाय स्वारीखर्च व इदबारात पावत होती.'–इसंपेदस पमा ११०.

**इदमपि** सना. वि. हे देखील; हेही; हेसुद्धा : 'इदमपि धनं जितं ते शकुनि म्हणे दीप्तपावक पटानें ।' – मोसभा ४.५५. [सं.]

**इदमित्थ** न. सर्व कारभार; एकंदर सर्व गोष्ट; जाणावयाचे, सांगावयाचे; करावयाचे ते सगळे. [सं.]

**इदरकल्याणी–नी** दि. १. वात्रट; खोड्याळ : 'जातच इदरकल्याणी काय काय करेल ?' – गुशि. २. अपशकुनी; कमनशिबी; अशुभ करणारा : 'बाजिराव तसा इदरकल्याणी होता.' – भेटी ३.

**इदवळा** क्रिवि. या वेळी; एव्हा; एवढ्या वेळी. (गो.)[सं. इयत्+वेला]

**इदळ** नं. १.पावसाळ्यानंतर पेरण्यात येणारी धान्ये; रब्बीचे पीक; पाणथळ जमिनीत घ्यावयाचे पीक. २. पाणथळ जमीन.(गो.)

**इदळणे** क्रि. थरकाप होणे; बैचेन होणे; विदीर्ण होणे; हालणे : 'येवढ्यात शेंडांतनं पिंगळा बोलला आणि काळीज इदळलं'– ऊन ३७.

**इदंता** स्त्री. हे –पणा; हे अमुक असा निर्देश : 'मग इदंतेसि वाळलें ।' – ज्ञा १५.२६७. [सं.]

**इदंन्याय** क्रिवि. याप्रमाणे : त्यांपैकींआम्हांकडील जाब साल इदंन्याय झाला.' – पेद ३.१३. [सं.]

**इदाळणे** क्रि. हादरणे; उन्मळणे; पहा; **इदळणे :** 'हा निरोप ऐकून तारा पार इदाळली.' – भेटी ९.

**इदी** स्त्री. सणावारी दिलेली भेट. [फा. ईद]

**इदीम** लौकिक; अब्रू; प्रतिष्ठा.

**इदूर** वि. वाह्यात, आगाऊ : ' चाल् इदुरा !' कौतिक झटक्यासरशी म्हणाली.' – धग ३३

**इद्दत** स्त्री. (इस्लामी कायदा) एखाद्या स्त्रीचा नवरा मेल्यानंतर किंवा तिला नवऱ्याने घटस्फोट दिल्यानंतर तिने पुन्हा ज्या मुदतीत लग्न करायचे नसते ती तीन महिन्यांची मुदत.

**इद्र** पु. इत्यर्थ; सारांश: 'बाल पाटिलें कागद लिहून दिधला त्या कागदाचा इद्र .' –मइसा १८.१०.

**इद्रा–द्री–द्रे** वि. कुरूप; आकाराने वेडेवाकडे; विद्रूप : 'ते इद्रे जनावर थेट आमच्या अंगावर आले.' – वावटळ ४१.

**इद्वाटो** वि. नाश करणारा; दुष्ट. (गो.)

**इद्वांस** पु. नाश; विध्वंस. (व.) [सं. विध्वंस]

**इधरतिथर** क्रिवि. चुकवाचुकवीचे; उडवाउडवीचे; ताळतंत्र नसलेले (भाषण).(क्रि. करणे, मांडणे, लावणे.) [इथरचे द्वि.]

**इध्मा** पु. विवक्षित संख्या असलेली समिधांची जुडी; श्रौतस्मार्त यागात उंबर, पळस इत्यादी वृक्षांच्या सामान्यतः पंधरा समिधांचा इध्मा उपयोगात आणतात.

**इनइन** स्त्री. किरकिर; घासाघासी (क्रि. करणे.)(व.) [ध्व.]

**इनई** स्त्री एक रोग. यात हाताला ठणका लागून सुया बोचल्यासारख्या वेदना होतात. (व.)

**इनमीन** अ. अवघे, सगळे मिळून : 'इनमीन दहा लोकसुद्धा सभेला नव्हते.'

**इनापगम** न. (ज्यो.) कोणत्याही ग्रहाचे सूर्यापासून असलेले अंतर; सूर्य व ग्रह यामधील अंतर. (व.) [सं.]

**इनाम** न. १.कोणत्याही अटीशिवाय दिलेली, शाश्वत, वंशपरंपरेने उपभोगावयास मिळणारी स्थावर अशी देणगी. काही विशिष्ट कामगिरीबद्दल किंवा काही विशिष्ट संस्थांना अशा देणग्या देण्याची पूर्वी पद्धत होती. स्त्रियांना चोळी–बांगडी म्हणूनही असे इनाम मिळत असे. २. देवस्थान, त्यांची व्यवस्था पाहणारे लोक यांना दिलेली जमीन वगैरे. ३. मालकी हक्क न देता उपभोगावयास देणे; घेणे; खाणे : 'हा माड याने इनाम खाल्ला.' ४. (सामा.) कोणतेही बक्षीस; नजर; देणगी. [फा.]

**इनामइकराम–इक्राम** पु. भेट; देणगी, बक्षीस; मानमरातब. [फा.]

**इनाम इजाफत** न. देणगी वाढवून देणे; देणगीची वाढ; इनामात घातलेली भर; काही विशेष कामगिरी केल्याचा मोबदला म्हणून वाढवून दिलेले इनाम.

**इनाम चिटणावळ** स्त्री. इनामावरील सरकारी बाब किंवा कर.

**इनामचिठ्ठी** स्त्री. १.जिल्ह्यातील किंवा तालुक्यातील वेगवेगळ्या इनामांची यादी, तपशील. २. इनामपत्र; इनामपट्टा, इनामखत.

**इनामचौकशी – पाहणी** स्त्री. दिलेल्या इनामजमिनीची तपासणी.

**इनामचौथाई** स्त्री. सरकारात भरणा करावयाचा इनामाचा चौथा हिस्सा.

**इनामजमीन** स्त्री. एखाद्या मोठ्या कामगिरीबद्दल सरकारातून बक्षीस मिळालेली सारा माफ असलेली जमीन.

**इनामत** स्त्री.देणगी; बक्षीस; इनाम:'कित्येकांस इनामत अजरामर गांवें भूमि करून दिधली.' – चित्रगुप्त १०६. [फा.]

**इनामताजम** पहा : **इनामपट्टी**

**इनामतिजाई** स्त्री. १. इनाम जमिनीच्या उत्पन्नाचा तिसरा हिस्सा. हा कर सरकार सहा किंवा दहा वर्षांनी वसूल करी. २. पूर्ण अथवा सर्वस्वी इनाम नसलेल्या इनामी जमिनीवरील साऱ्याचा तिसरा भाग : 'इदलशाही दिवाणांत हक्क चौथाई व इनामतिजाईच नव्हती.' – मइसा ३.११७. [फा.]

**इनामती, इनामी** वि. इनामतसंबंधी; इनामासंबंधी; इनाम मिळालेला.

**इनामदार** पु. इनाम धारण करणारा; इनामी जमिनीचा मालक; वतनदार. [फा.]

**इनाम नोकरी** स्त्री. गाव, महाल, परगणा यांची महसुली, फौजदारीसंबंधाने गावकीची कामे करणाऱ्या गावकामगारांना व परगणे अंमलदारांना देण्यात आलेले इनाम; काळीचे उत्पन्न (स्वामित्व नव्हे) म्हणजे महसूल घेण्याचा अधिकार किंवा इनामजमीनधारकांना महसूलाची पूर्ण किंवा अंशतः देण्यात आलेली सूट. इनाम मिळकती दोन प्रकारच्या असतात. प्रत्यक्ष (दुमाला) आणि अप्रत्यक्ष (परभारा).

**इनामपट्टी** स्त्री. १. सारामाफ जमिनीवर बसवलेला कर. आणीबाणीच्या काळात रोखीने वसूल करत असत. २. स्मशान : 'बाबा गडद इनामपट्टीत जाऊन बसलाय.' - ऊन ४१.

**इनामपत्र** न. इनाम दिल्यासंबंधीचे खत, पत्र, सनद; इनाम दिल्याचे राजपत्र.

**इनाम परभारा** पु. सरकारातून न घेता परस्पर गावाकडून वसूल करण्यात येणारे इनाम.

**इनाम पासोडी** स्त्री. गावकामगारांना जी किरकोळ जमीन इनाम देतात त्याबद्दल व्यापकतेने वापरायचा शब्द. जसे पाटलास पासोडीसाठी.

**इनाम पाहणी** स्त्री. दिलेल्या इनामजमिनींची पाहणी, तपासणी.

**इनामफैजावी** स्त्री. इनामी जमिनीवरील सरकार साऱ्याच्या एक तृतीयांशाइतका दरसाल सरकारात करायचा भरणा. [फा.]

**इनामी** वि. इनाम म्हणून मिळालेला.

**इनाय(ये)त** स्त्री. कृपा; बक्षीस; मेहेरबानी; वरिष्ठांकडून मिळालेली देणगी; वरिष्ठांची कृपा, दया. [अर. इनायत] (वा.) **इनायत करणे** - बक्षीस देणे. **इनायत होणे** - बक्षीस मिळणे.

**इनायतनामा** पु. कृपापत्र; शिफारसपत्र; आज्ञापत्र; (वरिष्ठांकडून येणाऱ्या पत्राला लावतात.) 'यांस अर्ज करितां इनायतनामा द्यावयासी विलंब करणार नाहींत.' - मइसा ८.२०२. [फा.]

**इनारथी** क्रिवि. काही अर्थ नसताना; विनाकारण : 'इनारथी भाऊबंधात वाकडेपणा कां?' - रैत १६.

**इनांतर** न. ग्रहाचे सूर्यापासूनचे अंतर.

**इन्कार** पु. निषेध; प्रत्याहार; नाकबुली (क्रि. करणे). [फा.]

**इन्किलाब** पु. क्रांती; आमूलाग्र परिवर्तन. [फा.]

**इन्किलाब झिंदाबाद** एक घोषणा; क्रांती चिरायू होवो ! [फा.]

**इन्तिकाल** पु. मृत्यु; मरण. [फा.]

**इन्फंटी** स्त्री. प्राथमिक शाळेतील अगदी पहिला, उजळणीचा वर्ग; बालवर्ग; बिगरी : 'ती आता पांचएक वर्षाची झाली होती, आणि हातांत पाटी पुस्तक घेऊन इन्फंटीच्या वर्गाला जात होती.'- सुदे २९. [इं. इन्फंट =मूल, बालक]

**इन्फंट्री** पायदळ. [इं.]

**इन्फिसाल** पु. निकाल; फैसला: 'त्याचा हिसाबाचे रूईनें इन्फिसाल करावा.'- मइसा ७.६८. [फा.]

**इन्फ्ल्यूएन्झा** पु. (आयु.) वातकफप्रधान संसर्गजन्य ज्वर, ताप : 'कांहीकांनी इन्फ्ल्यूएन्झा विकारात अभ्रकभस्माचा अशा रीतीने उपयोग केल्याचे सांगितले आहे.' [इं.]

**इन्शुअरन्स** न. विमा : 'कंपनीनें फक्त आपल्या नोकरांसाठी प्रॉव्हिडंट किंवा इन्शुअरन्स फंड काढावा.'- आगर ३.७३. [इं.]

**इन्सान** पु. मनुष्य; माणूस. [फा.]

**इन्सानियत** स्त्री. माणुसकी. [फा.]

**इन्साफ** पु. १. सत्याला धरून दिलेला न्याय; निर्णय; निवाडा. २. न्याय देण्याचे काम. [फा. इन्साफ]

**इन्साफगुजी** वि. इन्साफी; न्यायी. न्यायाने वागणारा.

**इन्साफी** वि. १. न्यायी; 'इंग्रजी इन्साफी त्यांचे येखत्यारी हेही मुन्सफ (न्यायी) असतील.'- ऐलेसं ७.३५७०. २. इन्साफ करण्यात चतुर.

**इन्सुलीन** न. (वै.) स्वादुग्रंथीमध्ये असलेल्या काही पेशींपासून तयार झालेले, साखरेच्या चयापचयाशी संबंधित संप्रेरक. [इं.]

**इन्सोल** पु. (चर्मकार व्यवसाय) जोड्याच्या आतल्या बाजूस शिवण्याचे तळ (सोल.) [इं.]

**इन्स्पेक्टर** पु. तपासनीस; देखरेख, तपासणी करणारा; अंमलदार. उदा. पोलीस इन्स्पेक्टर, सर्कल इन्स्पेक्टर. [इं.]

**इपीतरपना** पु. विचित्रपणा: 'आसा का इपीतरपना कराया लागलास?'- पाचोळा ६३. (ग्रा.)

**इफळ** न. समुद्राकाठच्या खाऱ्या व भरतीच्या पाण्याने बुडणाऱ्या जमिनीत वाढणारे झाड. हे सहा सात हात उंच असते. याचा विस्तार मोठा असून, डहाळ्या समुद्रात बुडालेल्या असतात. याचा पाला गुरे खातात. लाकूड चिवट व कठीण असते. याचे लाकूड जाळून त्यापासून जो क्षार होतो त्याचा उपयोग परीट कपडे धुण्यासाठी करतात. (गो.) [सं. विफल]

**इफाजत** स्त्री. संरक्षण; आश्रय : 'रघुनाथराऊ पेशवे ईजानबाचे इफाजतेत आहेत.' -मइसा १०.१०८. [हिफाजतचा अप.]

**इफ्तदाय** वि. सुरुवात; प्रारंभ : 'त्यांवरून इफ्तदाये नामाजी लांडा गुमास्ता हकीकत बंदगीस जाहीर केली.'- पेद ३१.१७२.

**इबत्ती** स्त्री. लिंगायत लोक कपाळास लावतात ते भस्म. [सं. विभूति]

**इबरत** स्त्री. १. प्रतिष्ठा. पहा : **इभ्रत** २. दहशत; धाक; हाय खाणे; दरारा : 'भुजंगराऊ घोरपडे लढाईत वारलियावर लष्करानें इबरत खादली.'- पेद २८.१००.

**इबाक** क्रिवि. या बाजूस; इकडे. (खा.)

**इबाड** पु. खराबी; नासधूस; नास; बिघाड. (गो.) [सं. विघात]

**इबादत** स्त्री. पूजा; भक्ती; ईश्वरनिष्ठा. [फा.]

**इबादती** वि. धार्मिक; सश्रद्ध : 'हे बातेचा तरस मोहीबासारखे इबादती लोकांस कांहींच नये हें अज्याईब आहे.'- मइसा ३.९०.[फा.]

**इबारत** स्त्री. भाषापद्धती; वाक्यप्रचार; शब्दप्रयोग : 'ह्या ग्रंथाच्या बैता तीस हजार आहेत, तो पार्सी भाषेचे इबारतींत आहे.'- ऐस्फुले ४५. [फा. इबारत]

**इबारत** स्त्री. इभ्रत; प्रतिष्ठा : 'तुमची इबारत गाईकवाडां वरी चढली.'- मइसा ३२१. [अर. इब्रत]

**इबीन, इब्न** पु. पुत्र; बिन (अमक्याचा मुलगा): 'येलोजी बिन मावजी इबीन चांदजी.' - पेदस १११. [फा. इब्न्]

**इबूत** स्त्री. विभूती; अंगारा; राख : 'ही इबूत घेताय, ती न्ह्या आनि तिनसान्या झाल्या की घराभोवती टाका.'- अउआ ८७.

**इब्बी** स्त्री. विटी; गिल्ली. (विटीदांडूच्या खेळातील). (व.)

**इब्लाग** स्त्री. पाठवणूक; पाठवणी : 'हमेशा मोहबतनामा इब्लाग करोन मसूर करीत जाणें.' -मइसा १०.१६४. [फा. इब्लाघ्]

**इब्लिस** पु. दानव; सैतान : 'कुराणांत असें सांगितलें आहे कीं इब्लिसनें अल्लाविरुद्ध बंड केलें म्हणून त्याला स्वर्गातून हांकून लावण्यांत आलें.' -ज्ञाको (इ) १७१.
वि. (ल.) खोडकर; खोडसाळ; उनाड; उपद्व्यापी; बदमाष (मूल, कृत्य, भाषण इ.); दिसण्यास साधा पण आतल्या गाठीचा.(व.) [अर. इब्लीस्]

**इब्लिसपणा** पु. बदमाषी; व्रात्यपणा.

**इभ** पु. हत्ती : 'सरिसेपणें एकवटत इभ । मस्तकावरि ।'- ज्ञा १.१७.[सं.]

**इभ्रत** स्त्री. थोरवी; प्रतिष्ठा; अब्रू; वचक; दरारा; दबाव; बळ; दहशत; धाक: 'तें ठाणें इभ्रतीनें घेतलें.' - मइसा ६.२७२५. [फा. इब्रत] (वा.) **इभ्रत पडणे**- दरारा किंवा बचक बसणे : 'त्याची फौज आणवावी म्हणजे सहजच इकडे आपली इभ्रत पडेल.' - होकै. ८४.

**इमदाद** साह्य, मदत.

**इमला** पु. एक किंवा त्यापेक्षा अधिक मजले असलेले घर; इमारत; बांधकाम; वाडा; घर; मंदिर :'वैकुंठीं यशाचे इमले । बांधुन मग सुरवंशीं जन्मले ।' - ऐपो २६६. [फा.] (वा.) **इमला ढासळणे** - मसलत अंगावर येणे; काम नासणे, मोडणे, बिघडणे : '(मनोविकारांचा) लवकर नाश करावयाचा असेल तर त्यांना सुशिक्षणाचा किडा लावावा म्हणजे थोड्या वर्षांत त्यांचें पीठ होऊन त्यांचा इमला ढांसळतो.' - लोटिकेले ४.३७. **इमले रचणे** - तर्क करणे; मनोराज्य करणे : 'तिनं लग्न मोडलं एवढ्या आधारावर सगळे इमले रचायचे.'- ल्व्हाळी १९९.

**इमलाफैला** पहा : **अमलाफैला**

**इमली** स्त्री. चिंच; अम्ली. [हिं.]

**इमाद** पु. खांब; आधार. [अर. इमाद]

**इमान** न. १. वचन; एकनिष्ठा; सचोटी. २. श्रद्धा; विश्वास: 'त्या पंज्यापासी तुमचा इमान असावा.'- मदरू १.११३. ३. इमानपत्र, इमानाची खूण; शपथपत्र : 'इमान पाठविलें.'- ९६ कलमी. ७. ४. सदसद्विवेकबुद्धी; मनोदेवता; अंतर्याम. [फा.] (वा.) **इमान करणे, देणे** - वचन देणे; शपथ देणे; शपथेवर सांगणे : 'द्यावी शेजेची बाईल पण इमान देऊं नये.' - इपुस्त्रीपो ४२. **इमान गुंतणे**- शपथेत अडकणे; शपथ घेऊन चुकणे. **इमान घेणे**- सुरक्षित निघून जाण्याबद्दल वचन घेणे: 'सुरुंग लावून अर्धा बुरुज पाडला मग ठाणेदार व लोक घाबरले. इमान घेऊन बाहेर निघाले.'- नाग २.२०६. **इमान धरणे, इमानास जागणे**- इमान नष्ट न होऊ देणे; सचोटी न सोडणे; निष्ठा शाबूत ठेवणे.

**इमानइतबार** पु. एकनिष्ठा; सचोटी; प्रामाणिकपणा. [फा.]

**इमानक्रिया** स्त्री. इमान राखण्याबद्दल शपथ घेणे.

**इमानदार, इनामतदार** वि. पहा : **इमानी**

**इमानदारी** स्त्री. निष्ठा; सचोटी; विश्वासकता.

**इमानप्रमाण** न. १. प्रामाणिकपणा; विश्वासूपणा; सचोटी. २. करारमदार; आणभाक; शपथक्रिया.

**इमानभाक** स्त्री. आणभाक; करार.

**इमानी** वि. विश्वासू; प्रामाणिक; खरा; सत्यशील. [फा. इमान]

**इमाने इतबारे** क्रिवि. एकनिष्ठेने; प्रामाणिकपणाने.

**इमाम** पु. १. मुसलमानी धर्माध्यक्ष, गुरू, उपाध्याय (अलीच्या वंशजांपैकी). २. बहुमानार्थी पदवी; नायक; पुढारी, श्रेष्ठ [अर.]

**इमामगड्डा** पु. मुसलमान लोक हनुवटीवर राखत असलेला दाढीचा भाग, दाढी.

**इमामदांडगा** वि. दांडगेश्वर; उर्मट; मस्तवाल; पशुतुल्य.

**इमामबाळी** स्त्री. १. हत्तीच्या कानातील एक मोठी बाळी (पूर्वी ही हत्तीच्या कानात घालण्याची चाल होती.) २. एकाच कानात घालण्याची (मोती, लोलक वगैरे असलेली) बाळी.

**इमामवाडा** पु. १. इमामांच्या, धर्मगुरूंच्या सभा भरण्याची जागा. २. लखनौमधील एक प्रसिद्ध इमारत : 'इमामवाड्यांत तबारा गायल्याबद्दल दोन शियांना अटक झाली.'- के १२.४.४०.

**इमायत** स्त्री. संरक्षण; आश्रय; वशिला; वग: 'इमायतीच्या बळें गरिबगुरिबाला तूं गुरकाऊं नको.' - अनंतफंदी. [फा. हिमायत्]

**इमारत** स्त्री. १. दगड, चुना, विटा, माती, लाकूड इ. साहित्याने करावयाचे काम; बांधकाम; पायाच्या वरचे बांधकाम : 'गडाची इमारत मुस्तेद करावी.'- मराआ ३३. २. वाडा; हवेली; मंदिर; घर; इमला. ३. अंगकाठी; शरीरयष्टी; बांधा : 'घोडी पांच हजार रुपये किंमतीची होती, इमारतीनेंही थोर होती.'- ऐलेख ११.५७०६. [फा.] (वा.) **इमारत फळा येणे**- १. इमारत पूर्ण होणे; बांधकाम पुरे होणे. २. (ल.) कार्य सिद्धीस जाणे : 'संतकृपा झाली । इमारत फळा आली।'- बगाथा २२९.

**इमारत** स्त्री. १. अधिकार; वैभव; महानुभावित्व. २. भरवसा, मदार, विश्वास : 'आमची इमारत सर्व तुम्हावरच आहे.' - धापइसाखं ३.४.[फा.] (वा.) **इमारत असणे**- एखाद्याच्या साहाय्यावर मदार असणे; अवलंबून असणे; उभारणी असणे.

**इमारतखाना** पु. सरकारी इमारती व इतर सार्वजनिक बांधकामे यांची व्यवस्था पाहणारे खाते.

**इमारती** वि. इमारत बांधण्याला योग्य व उपयोगी; उदा. इमारती लाकूड, इमारती सामान इ. [फा. इमारत]

**इम्तिनान** स्त्री. उपकार. [फा.]

**इम्तियाझ** पु. फरक. [फा.]

**इम्तिहान** स्त्री. परीक्षा. [फा.]

**इयत्** सना. इतके, एवढे; उदा. इयत्परिणाम. [सं.]

**इयत्ता** स्त्री. १. इतकेपणा; ठरावीक नेमून दिलेली मर्यादा, प्रमाण, दर्जा; प्रमाणाचे मापन (गुण, काल, दर्जा इ. चे); पल्ला; टप्पा; मर्यादा नेमून देणे. उदा.– उष्णतेची इयत्ता : 'स्फूर्तीची ज्वाला अमुकच इयत्तेपर्यंत वाढली पाहिजे...' – लोटिकेले ३.२६२. २. शाळेतील अभ्यासाप्रमाणे निश्चित केलेला दर्जा; वर्ग. [सं. इयत]

**इयत्तीकरण** न. (ग.) संदर्भ रेषेवर अथवा वर्तुळावर ठरावीक परिमाणाएवढ्या अंतरावर खुणा करणे. [सं.]

**इया–यी** पु. स्त्री. विळा. विळी. (खा.)

**इयाभर** क्रिवि. दिवसभर, इळभर :'इयाभऱ्यांतून कितीक जात असतीन....' – धग ११.

**इरकल–ली** वि. विजापूर जिल्ह्यातील इलकल या गावी तयार होणारी पातळे. ही दोन रंगांच्या धाग्यांत विणल्यामुळे त्यात धुपछाव निर्माण होते.

**इरगीमिरगी** स्त्री. मुलांचा एक खेळ.

**इरजा** पु. इरजिकीच्या कामावर येणारा मनुष्य, बैल इ.

**इरजिक–जीक** स्त्री. जमिनीस द्यावयाची कुळवाची पाळी, पेरणी, पिकाची काढणी, मळणी वगैरे शेताचे काम करण्यासाठी जे एकाच वेळी अनेक गडी लावतात त्यांना सकाळी न्याहारी, दुपारी साधारण जेवण व संध्याकाळी मोठे जेवण घालतात ते : अशा कामाला– अन्नमय मोबदल्याला – इरजिक म्हणतात. (सामान्यतः) शेतीच्या कामास लागणारे बैल इ.ची एकमेकांनी एकमेकांस करावयाची मदत (क्रि. घेणे.) [सं. विरच]

**इरड** स्त्री. दिवसाचा अर्धा भाग (विशेषतः सकाळचा). (कु.)

**इरड–इरवड–वाड** स्त्री. १. सकाळी गावदरीस पडलेले उष्टेपाष्टे, विष्ठा इ. खाण्यासाठी गुरांचे भटकणे,हिंडणे (क्रि. करणे) २. विष्ठा वगैरे खाणे. ३. (ल.) शेजारी पाजारी आधाशीपणाने तोंड घालणे; परद्वार करणे. [का. एरू]

**इरड–इरवड–वाड** स्त्री. जंगलातून आणलेली लाकडाची मोळी किंवा गवताचा डोईभर भारा; डोई ओझे; भाऱ्या करिता जंगलात घातलेली फेरी.

**इरड** न. (विरू.) विरड. मुख्य धान्याबरोबर पेरलेले धान्य; मोगण. (क्रि. टाकणे.) [का. एरडु=दोन].

**इरडणे** अक्रि. रोप वगैरे उगवणे. (कर.) [का. इरडा=रोप].

**इरडपाळी** स्त्री. मृगाचा पाऊस पडताच कुळवाने शेतात घातलेली पाळी.

**इरडा–इरडो** पु. झाडाचे रोप; डांबो. (गो.) [का.]

**इरण** न. एक वेल. पहा : **अरणी**

**इरबात, इर्तिबात** स्नेह.

**इरमार** पु. अभिमान; गर्व; ताठा. (कु.)

**इरय** पु. १. एक वृक्ष; देवदार. (कु.) २. गाडीचा आस. (गो.)

**इरय** स्त्री. १. ईर्षा; चेव; स्फुरण. २. रुचीची पूर्तता, तीव्रता; लज्जत.

**इरली** स्त्री. लहान इरले. (कों.)

**इरले** न. १. पावसापासून संरक्षण व्हावे म्हणून डोक्यावर घेण्यासाठी कामट्यांचा (कुंचीच्या आकाराचा) केलेला सांगाडा. यावर पळस, कुंभा, साग, केतकी यांची पाने शिवून हा तयार करतात. नारळीच्या पातींचेही इरले करतात. पानांची गावठी छत्री. २. धान्याच्या कणगीवर ठेवण्यासाठी गवताचे केलेले झाकण. (व.)

**इरव(वा)ड** न. पहाः **इरड;** मुख्य पिकाबरोबर पेरलेले दुसरे पीक : 'जोंधळ्याच्या पिकात इरवाड टाकावं तशी मध्येच एखादी टोपी दिसू लागली.'– पेरणी १२२.

**इरवा** पु. मुख्य पिकाबरोबरचे दुसरे पीक : 'बयराम मराठ्याच्या वावरात इरवा खुडाचा आये कानं'– धग ४३. (व.)

**इरशा(षा)द** पु. आज्ञा; आदेश; उपदेश; इच्छा : 'हुजुरीहून जो इरशाद होईल त्याप्रमाण आम्हांस मान्य आहे.'– पुणे अख १.९४. [फा.]

**इरस** पु. गाडीचा आस. (कु.)

**इरसरी** स्त्री. वीरश्री; ईर्ष्या; त्वेष : 'लढाईच्या त्या वाजपानं तर आंगात इरसरी आल्यावानी झाली.'– रैत ७३.

**इरसाल** वि. १. अस्सल; वेचक : 'मवाळपक्षात प्रामाणिकपणाचे इरसाल कांदे कसे कसे आहेत तें पहा.'– केळ.१.१३९. २. पहाः **इर्साल** ३. बनेल; फाजील; अर्क; चावटः 'खोऱ्यातील इरसाल टगे सरकारला मदत करण्यासाठी जिवाचं रान करत होते.'– फकीरा १०३.

**इरसाल करणे** क्रि. रवाना करणे; पाठवणे; दाखल करणे : 'अर्जदास्त इरसाल केली आहे.'– शिचसाखं ५.२१.

**इरळ–ळा** पु. न. पहाः **इरड;** एका धान्यात पेरलेले दुसरे धान्य. उदा. – ज्वारी पेरताना मध्ये तूर पेरणे. [का. इरडु=दोन]

**इरळणे, इरळण काढणे** क्रि. (दाट.) दाट उगवलेल्या पिकातून काही मोड उपटून ते पीक विरळ करणे. (माण.) [सं. विरल]

**इरं** न. किंमत; महत्त्व; चव; लज्जत : 'ते मला चोऱ्या करूनबी मिळालं असतं, पर त्येला इरं न्हाई'– खळाळ २२.

**इरा** पु. पाण्याचा झरा; पऱ्हा. (ग्रा.)

**इरा** पु. विळा.

**इराकत–गत–खत** स्त्री. विराकत. (व., को) १. लघवी; लघवी करणे; लघवीस बसणे (क्रि. करणे). २. (ल.) तुच्छ मानणे; झिडकारणे : 'मी त्या पैशावर इराकत करतो.' [फा.]

**इराडा काढणे** क्रि. खोड मोडणे; पहाः **अरड काढणे** (माण.)

**इराडे** न. पहाः **इरले**

**इराणी–नी** वि. इराणमधील (घोडा, गाढव).

पु. इराणचा रहिवासीः 'मी बाहेर इराण्याच्या दुकानात चहा प्यायला गेलों होतों'– नाकु ३.३९. [फा.]

**इरादत** इच्छा असण्याचा भाव.

**इरादा** पु. १.विचार; हेतू; बेत; संकल्प; उद्देश; इच्छा. २. योग्यता; अधिकार : 'पुरंधऱ्यांची कदीम इरादा । तत्पर पेठे मोंगल वादा ।'- ऐपो २१९. [फा.]

**इराप** स्त्री. (सुतारकाम) फळीच्या कोपऱ्यास करायची गोलची.

**इराब** वि. पहा: **इरेफ**

**इरिडयम** न. (शाप.) प्लॅटिनम वर्गातील एक मूलद्रव्य. हे फाऊंटन पेनच्या टोकास लावतात. पहा: **ऐंद्र** [इं.]

**इरिय** न. वीर्य: 'सूर्यनारायणाचे इरिये वाहुटात पडले.'- जसा ७९७.

**इरी** स्त्री. विडी. (कों.)

**इरी** स्त्री. ईर्षा; खिजवणूक : 'आम्हांस इऱ्या देऊन लिहितात.'- लेखरत्न ९९.

**इरीरी, इरिइरि करणे** क्रि. १. बैलांना हाकणे, चुचकारणे: 'इरिरि पोपो. (तेलगु-चल चल) दादा, झाझा.' २. (ल.) शेती करणे; शेतकरी बनणे: 'तूं शिकतलय कीं इरीइरी करतलय.' (कु.)

**इरुद** क्रिवि. विरुद्ध : 'कुणी तुज्या इरुद गेला आसल तर आपुन गोत भरवू.'- जैजै ४१.

**इरे** स्त्री. ईर्षा. पहा: **ईर**

**इरेफ** वि. क्रिवि. (शिंपी) तिरपे; वाकडे; तिरकसपणे; वाकड्या रीतीने (कापणे). रास किंवा कास (सरळ) याच्या उलट. [सं. विरेफ]

**इरेब्** स्त्री. वाकडी रेघ; वक्र लेखन.

**इरेसरी** स्त्री. शौर्य; धाडस. [सं. वीरश्री]

**इरोळी** स्त्री. गुरांच्या पाबास होणारा एक रोग.

**इर्जिक** पहा : **इरजिक** : 'नांगरणीसाठी इर्जिकी करतात.'- पया १५३.

**इर्तिबात** स्त्री. स्नेह; मैत्री : 'पंत साहेबांसी व आम्हांसी दोस्ती व इर्तिबात कदीम आहे.'- दिमरा १.४५. [फा. इर्तिबात]

**इर्मित** स्त्री. ख्रिस्ती धर्मप्रचारकांचा मठ. (गो.)[पोर्तु. इर्मिडा]

**इर्शाद** पु. हुकूम; आज्ञा; उपदेश : 'रामाजी महादेव यास इर्शाद फर्मावून.'- ऐलेख ७.३५६५. [फा.]

**इर्साल** पु. १. पाठवणूक; रवानगी : 'चित्तांत आल्यास माझें विनंतीपत्र व जिन्नस इर्साल करावे.'- मइसा १.१४७. २. सरकारी खजिन्यात भरावयाचा, पाठवण्याचा पैसा : 'यावर तमाम लष्करास व वाणियांस ताकीद करून इर्साल पोहोंचवून दिल्हा.' - इमं १९५.

वि. १. अगदी उत्तम दर्जाचा; गुणाने अत्युत्कृष्ट. (आंबा, इतर फळे व त्यांची झाडे यांबाबत म्हणतात. तसेच बाहेर पाठविण्याजोगी, अत्युत्कृष्ट फळे, फुले, झाडे, बिया यांनाही हे विशेषण लावतात.) निवडक, वेचक, अस्सल, अव्वल. २. अट्टल; बेरकी; वस्ताद; पक्का (लबाड, चोर, भामटा, खोटारडा माणूस वगैरे). [फा.]

**इर्सालनामा-पट्टी** पु. स्त्री. खजिन्यात भरावयाच्या पैशांचा तपशील अथवा सरकारात भरावयाच्या किंवा भरणा केलेल्या रकमेची यादी.

**इर्सालभरणा** पु. महालाकडून खजिन्यात पाठवलेला वसूल, पैसा.

**इलगार** पु. हल्ला. पहा: **एल्गार** [फा. इल्घार= लुटालूट]

**इल(ला)जाम** पु. आरोप; दोष; ठपका: 'न दिल्यावर आम्हावर इलजाम आहे. तुम्हावर नाही.'- नाग २.९१. [फा.]

**इलतम(मा)स** स्त्री. अर्ज; निवेदन; विज्ञप्ति; विनंती. पहा : **इल्तिमास** : 'मग आपले बाहे देशमुख व देसकुलकर्णी यांनीं इलतमस केली कीं...' -पेद १७.१४. [फा.]

**इलतवा** पु. थांबून राहणे; स्थगिती; बाजूस घेणे. [फा.]

**इलतिजा** स्त्री. विनंती : 'सखाराम पंतांनी हुजुरात इलतिजा करून....' पुणे अख १.१०३.

**इलम, ईलम** पु. १. शास्त्र; विद्या; कला; हुन्नर. २. उपाय; इलाज; साधन; प्रयत्न; युक्ती. ३. जादूटोणा; मंत्रतंत्र; इंद्रजाल. वि. इलमी; इलमबाज. [फा. इल्म]

**इलमती** स्त्री. १. होड; पैज : 'माझा गुरु थोर तुझा लहान । ऐसे भांडती इल्मति लाउन.'- योसं १३.६५. २. बुद्धी.

**इलमबाज, इलमी** वि. १. इलम जाणणारा; जादूगार; मांत्रिक. २. बुद्धिवान; हुशार; हुन्नरी. [फा. इल्म]

**इलहाम** पु. ईश्वरी आदेश; अंतःस्फुरण. [फा.]

**इला** स्त्री. पृथ्वी.

**इलाईत-यत** स्त्री. परमुलुख; विलायत; परदेश: 'देश इलाईत । काबीज केलें तळकोंकण ।' - इपुस्त्रिपो [फा. विलायत]

**इलाखा-का** पु. १. हक्क; ताबा; सत्ता अवलंबन : 'रघुनाथराव इलाखा राखणार नाही.'- ऐलेख ७.३५७३. २. परिवार; बायकामाणसे; खटला : 'सर्व रायगडावरी संभाजीराजे यांचा इलाखा (परिवार) राहिला.'- मराचिथोशा २५. ३. संबंध : 'तुम्हांसी त्याचा इलाखा नाहीं'- सभासद ४२. ४. परगणा; प्रांत; शहरहद्द; राज्यकारभाराची विशिष्ट भौगोलिक मर्यादा : 'या देशांत इंग्रजांची प्राबल्यता जाहलिया अगोदरी नवाब मुहम्मद अली खानाचें इलाकेंत आम्हीं होतों.'- तंरा १००. ५. पालखीच्या दांडीस लावायचे लहान गोंडे. ६. वसुलीवर बरात; तनखा; वतन. [फा.]

**इलागत** क्रिवि. क्वचित; एखाद्या वेळी. (व.)

**इलाचा** पु. एक प्रकारचे गभरेशमी कापड; उंची कापड. [हिं.]

**इलाची, इलायची** स्त्री. वेलदोडा; वेलची; वेलची दाणा. [सं. एला]

**इलाज** पु. उपाय; उपचार; युक्ती. [अर. इलाज] (वा.) **इलाज नसणे**- निरुपाय होणे.

**इलामत** स्त्री. अबदागीर, छत्री, सूर्यपान वगैरे इतमाम. (गो.)

**इलायची दाणा** पु. आत वेलची घालून केलेला साखरफुटाणा.

**इलायती केळे** न. लहान व चांगल्या जातीचे केळे.

**इलावृत्त** न. जंबुद्वीपाच्या नऊ खंडांतील एक खंड. प्राचीन जगाचा एक भाग. हा मेरूपर्वताच्या सभोवताली समचतुर्भुजाकृतीप्रमाणे वसलेला असून भोवतीने नील, निषध, माल्यवान व गंधमादन हे पर्वत आहेत.

**इलाही** वि. ईश्वरी; ईश्वरासंबंधी; दैवी. [अर.]

**इलाही-ई-बिघा** पु. अकबरी बिघा; इलाही गजाने मोजलेला बिघा.

**इलाही गज** अकबराच्या कारकिर्दीत राजा तोडरमल याने राज्यातील जमीन मोजण्याकरिता उपयोगात आणलेली साखळी, पट्टी. हा गज ४१ अंगुळाचा असे. इंग्रजी अंमलात इलाही गजाची लांबी ३३ इंच

ठरवण्यात आली.

**इलाही सन** पु. अकबर बादशहाने सुरू केलेला एक शक. हा अकबर व जहांगीर या दोनच बादशहांच्या कारकिर्दीत चालू होता. पुढे शहाजहानने हा शक बंद केला म्हणून वरील दोन बादशहांच्या कारकीर्दीतील कागदपत्रे, नाणी यांवर हा शक आढळतो. इलाही शकात १५५५-५६ मिळवले असता इसवी सनाचे वर्ष निघते.

**इलिसा, इलु-लू, इलुसा** वि. थोडा; थोडासा; अल्प; अगदी लहान. पहा : **इवलासा** : 'व्यंग इलुहि त्यांत जाण.'- दावि १९४; 'बोले ऐसें लावूं न शके कोणीही दोष धीरा ज्या । राजासि विशल्य करी देउनि इलुसीच औषधी राजा ।।'- मोभीष्म ८.८. [सं. अल्पीयस्]

**इलेक्ट्रागंड** पु. (मानस.) मुलीचे बापाबद्दलचे सुप्त लैंगिक आकर्षण; पितृभाव गंड. (इलेक्ट्रा : ग्रीक पुराणकथेतील एक स्त्री.)

**इलेक्ट्रॉड** पु. (विअ.) विद्युतप्रवाहवाहक. [इं.]

**इलेक्ट्रॉन** पु. (भौ.) ऋणविद्युतभारित अणूचा घटकांश [इं.]

**इलेक्शन** न. १. निवडणूक; पसंती, २. सभासदांची निवडणूक: 'नेहमीं नेहमीं टिळक नि गोखले, आणि धर्म नि इलेक्शन, संसार नाहीं होत कांहीं.'- सुदे ४८. [इं.]

**इल्काब** पु. पदव्यांची मालिका. 'दसपटीचे मोकाशी, खोत, 'इनामदार हा मोठा इल्काब मात्र कधीं कधीं ...'- लशिआ ५०२. [फा.]

**इल्जाम** पु. आळ; दोष; दोषाची शाबिती. [फा. इल्झाम]

**इल्तिमास** स्त्री. विनंती; विनवणी; अर्जी : 'ये बाबें तुम्ही इलतिमास लिहिली.'- इमं ७५. [फा.]

**इल्लत** वि. व्यसनी ; खोडकर; द्वाड; उपद्व्यापी. (व.)
स्त्री. व्यसन; खोड; दोष; रोग. (व.) [फा.]

**इल्लत-थ** स्त्री. हत्यार; उपकरण; आउत; भोके पाडण्याचे अणकुचीदार हत्यार. [फा. आलात]

**इल्ला** पु. समाप्ती; अभाव; नकार; नसणे : 'सामानसुमान सारे इल्ला ।' - माजी ८५.[का.] (वा.) **इल्ला बिल्ला करणे-दाखवणे-** नकार देणे; नन्नाचा पाढा वाचणे; आढेवेढे घेणे; काकू करणे : 'वळखून ठेवलें तुला फाकडे, किती करशी इल्लेबिल्ले.'- पला १०९.

**इल्लां** वि. थोडे. पहा : **इवले**. इतर रूपे- इल्ले, इदले, इल्लो. (कु.)

**इल्लातिल्ला** वि. लहानसहान. (गो.)

**इल्लु** न. (शिंपी व्यवसाय) गुंडीचे, बटणाचे भोक; काज : 'हुकाचीं बटणें आहेत त्यांचे इल्लू सदरहूप्रमाणें करून ठेवावेत.'- शिकशि १.१३. [इं. होल]

**इल्हण** वि. जाळ्यासारखे विरविरीत; विरळ; पातळ (व.)

**इल्हाक** पु. १. जोडणी. २. सही : 'अजमतखान यांचा इल्हाक. सर्बुलंदजंग यांचे दस्खत.'- मइसा ७.४५. [फा.]

**इल्हाळी** स्त्री. सुंदर स्त्री. पहा : **वेल्हाळी** : 'इल्हाळीला दुःख झालं चोळू चोळू लाल केलं.'- एहोराभा ६.१७.

**इवइव करणे** क्रि. कोंबड्यास बोलावणे. (कु.)

**इवला, इवलासा, इवलिसा** वि. थोडा; एवढासा; एवढा; उलिसा; किंचित; मूठभर; चिमटीभर; नखभर : 'समर्थी आलिया याचक। इवली भीक न घालिती ।'- एभा ७.२८५. [सं. अल्प -अल्पीयस्]

**इवलाले** वि. छोटेसे; लहान आकाराचे : 'डझनभर इवलाली राजपूत राज्ये अस्तित्वात होती.'- चंद १.

**इवशी** स्त्री. अवदसा. पहा : **विवशी** : 'धाड पडो रे त्या मुलखाशीं । कुणिकुन आली इवशी ।'- ऐपो १२४.

**इवाइन** न. संकट. (व.)

**इवाई-य-ही** पु. व्याही. (ग्रा.)

**इवूळ** स्त्री. तीव्रता: 'वाऱ्याची झुळूक सुरू झाली त्याने थंडीची इवूळ वाढली.'- परेपा २६०.

**इशक** आवड; हौस. पहा: **इश्क** : 'श्रीमंत राजेश्री बाजीरावसाहेब व चिमाजीआप्पा यांसी घोड्यावर बसावयाचा इशक बहुत आहे.'- ऐलेसं ९.४८३३. [फा. इश्क]

**इशर, इशरीन** पहा: **अशर, इशरीन**

**इशाड** न. नांगराचा एक भाग; इसाड; नांगराचा दांडा; नांगराच्या जोखडास बांधायचे लांब लाकूड; नांगर ओढला जाण्यासाठी ज्याची एक बाजू नांगरखुंटाच्या भोकात बसवलेली असून दुसरी बाजू बैलांच्या मानेवरील जुवाच्या मधोमध बांधलेली असते असे लाकूड. दोरीतून निसटू नये म्हणून याला दाते पाडलेले असतात.(कु.) [सं. ईषा]

**इशाड-साड** न. खुंटीचे कलम; कलम बांधलेले खोड. (गो.) [सं. ईषा]

**इशाड्याचा आंबा** पु. ज्या आंब्याच्या झाडावर कलम केले आहे असा आंबा; कलमी आंब्याचे झाड.

**इशारत** स्त्री. १. खूण : 'तेज्या इशारती । तट्टा फोकावरी घेती।'- तुगा ३७४८. २. सूचना; ताकीद; खबर. [फा.]

**इशारा-इषारा** पु. चेतावणी. पहा: **इशारत** [फा.]

**इशी** स्त्री. १. उद्गा. (बाल) शी; घाण; मलमूत्रोत्सर्ग; घाणेरडा पदार्थ. २. नकारदर्शक, तिरस्कारदर्शक उद्गार. पहा: **इश्श**

**इशीम** स्त्री. १. अभिमान; अब्रूची चाड; आपल्या नावाची, लौकिकाची, मोठेपणाची जाणीव. २. धमक : 'असलं अंगांत इशीम, त आनतील त्यांना पैठन्या !'- परेपा १०५. [फा. हशम्]

**इश्क** पु. १. प्रणय; शृंगार; विलास: 'आम्ही तर दर्दी, इश्काचे भुकेले प्राणी.'- प्रला २. नाद; छंद; आवड; शौक; ओढा. [फा.]

**इश्कपेच** न. जाईची वेल व फूल : 'इश्कपेंच गुल्छबू सदोदित भर शेवती सांवरी'- प्रला १५४.

**इश्कबाज** वि. चैनी; विलासी; स्त्रीलंपट. [फा.]

**इश्कबाजी** स्त्री. १. प्रेमलीला; प्रणयविलास; आशकबाजी. २. रांडबाजी; बाहेरचा नाद. ३. चैन. [फा.]

**इश्की** वि. प्रेमाचा.

**इश्ति-हार-स्ति-स्ते** पु. प्रसिद्धिपत्रक; जाहिरात; प्रसिद्ध करण्याचा मजकूर; जाहीरनामा. [फा. इश्तिहार]

**इश्श, इश्शरे, इश्शो, इश्श्यो** उद्गा. (बायकी.) लाज, नापसंती, तिरस्कार, आग्रह इ. व्यक्त करताना निघणारा उद्गार. छी; छे:

**इष** पु. (ज्यो.) सौरमासांपैकी एक मास. याचे दिवस तीस असतात.

**इषतिबाह** पु. शंका; संशय; अस्पष्टता. [फा. इश्तिबाह्]

**इषारत** (इषारत्) स्त्री. पहा : **इशारत** : 'भिम्या आचाऱ्याला इषारत द्यायची फुरसत.' -समक १.११७.

**इषिका** स्त्री. काडी : 'मग दर्भइषिका धरूनि करीं । मंत्रुनि सोडिल्या कूपोदरीं ।' - मुआदि ३०.११०.

**इष्क** पु. पहा : **इश्क**

**इष्क खिलवणा** वि. इष्काच्या विविध प्रकारांतील दर्दी.

**इष्कल, इष्कील** स्त्री. अडचण; घोटाळा; व्यत्यय; हरकत; तंटा. (क्रि. करणे, घालणे, पडणे, पाडणे). [फा. इश्काल]

**इष्की** स्त्री ऐट; रुबाब : 'यापुढं इष्कींत राह्यचं ठवलं आहे.' - कलंदर १५३.

**इष्कीबाजी** स्त्री. चैन; मौजमजा. पहा : **इश्कबाजी** : 'पैसा फार फार होत चालला म्हणजे .. इष्कीबाजी वाढते.' - निमा ५३.

**इष्ट** वि. १. इच्छिलेले; आवडते; पसंत केलेले; हवे असलेले; मानलेले; योग्य. २. शुभ; हितप्रद; कल्याणप्रद : 'सहज इष्टानिष्ट करणी । दोघीचि इया कवतुकिणी ।' - ज्ञा १६.६१. ३. (ग.) इच्छेने धरलेली किंवा मानलेली; गृहीत (काल, घटी, वेळ) जसे - इष्टघटी, इष्टकाळ. पु. मित्र; स्नेही; हितचिंतक; जसे - इष्टदर्शन; इष्टमंडळी, इष्टी; यज्ञयागादी कर्म; स्नान, दीक्षा इ. आवश्यक कर्म : 'जे इष्ट यज्ञ यजावे । तें हविर्मंत्रादी आघवें ।' - ज्ञा ४.१२०.

**इष्टआप्त** पु. आप्तेष्ट; स्नेहीसोबती; नात्याची माणसे. [सं.]

**इष्टकर्म** न. (ग.) त्रैराशिक; त्रैराशिकाच्या रीतीने उदाहरण सोडविण्याची पद्धत; क्रिया. [सं.]

**इष्ट कल्पना** स्त्री. (तर्क.ग.) गृहीत कल्पना; प्रथम खरी मानलेली गोष्ट; गृहीत कृत्य; सिद्धवत गोष्ट; कल्पित पक्ष.

**इष्टका** स्त्री. १. वीट. २. (यंअ.) एखाद्या घन पदार्थाचा चौकोनी त्रिमितीय तुकडा; एखाद्या घन पदार्थाची, धातूची वीट. [सं.]

**इष्टकाल** पु. १. शुभ वेळ; कोणत्याही कार्यास पाहिजे तशी वेळ; शुभ काळ (क्रि. येणे). २. लग्न साधनासाठी सूर्योदयापासून जन्मकालापर्यंतचे जे अंतर ते म्हणजेच इष्टकाल.

**इष्टकी** स्त्री. मैत्री. (कु.)[सं. इष्टक]

**इष्टतम** वि. अधिकात अधिक फळ देणारा; फलप्रद; अनुकूल. [सं.]

**इष्टतम वारंवारता** स्त्री. (विअ.) अनुकूल परिस्थिती पुन्हापुन्हा येणे.

**इष्टती** क्रिवि. समजुतीने; स्नेहभावाने : 'त्वां जावोनि वैरियांसी ।इष्टतीं सांगा वादीयांसी ।' - गुच ३५.२५६. [सं. इष्टत्व]

**इष्टत्व** न. १. मैत्री; स्नेहभाव; समजूतदारपणा : 'इष्टत्वें मागती कितीएक।' - गुच ८.६९. २. मांगल्य; शुभदायकता. [सं.]

**इष्टदा** वि. इच्छित वस्तू देणारी : 'इष्टदा परी अनिष्ठा । हेतु होती ।' - ज्ञा १६.२१९

**इष्टदेवता - दैवत** स्त्री. न. आपली भक्ती जीवर आहे अशी देवता; आराध्यदैवत; पालनकर्ता देव, साधू इ. [सं.]

**इष्टदेवतावाद** पु. आपल्या कुळाचे, कुटुंबाचे किंवा जमातीचे दैवत म्हणून एकाच दैवताची उपासना, पूजा. [सं.]

**इष्टपंगत- भोजन** स्त्री. न. श्राद्धाच्या दिवशी श्राद्धीय ब्राह्मणांचे जेवण झाल्यावर यजमानाने आपल्या इष्टमित्रांसह करावयाचे भोजन.

**इष्टमित्र** पु. स्नेही सोबती; सोयरेधायरे; ओळखीपाळखीचे लोक; हितचिंतकः 'इष्ट मित्र आपुले । कुमरजन देखिलें ।' - ज्ञा १.१८१.[सं.]

**इष्टराशि-शी, इष्टराशिक** स्त्री. न. (ग.) १. त्रिराशिक, पहा : **इष्टकर्म** : 'इष्टराशींमध्ये एकेरी व दुहेरी असे दोन प्रकार आहेत.' २. गृहीतसंख्या; धरलेली संख्या; इष्टसंख्या.

**इष्टसंख्या** स्त्री. गृहीतसंख्या. पहा : **इष्टराशी** २. [सं.]

**इष्टागत** स्त्री. मैत्री. (गो.) [सं.]

**इष्टानिष्ट** वि. आवडते नावडते; आवडीचे नावडीचे; शुभाशुभ; मंगलअमंगल : 'इष्टानिष्ट तैसें । जगाच्या ठायीं ।' - ज्ञा १३.६०१.[सं.]

**इष्टापत्ति-त्ती** स्त्री. ज्या संकटाचा किंवा बाहेरून वाईट दिसणाऱ्या गोष्टीचा परिणाम हितकारक ठरतो अशी गोष्ट; आपल्याला हवी असणारी, अनुकूल गोष्ट आयती घडणे; मिळणे : 'पाकिस्तान व चीन यांच्याशी झालेली युद्धे इष्टापत्तीच ठरली.' - युद्ध ३. [सं.]

**इष्टापूर्त** न. एखादे धार्मिक, दानधर्माचे मोठे कृत्य; इष्ट म्हणजे यज्ञयागादी श्रौतस्मार्त कर्मे व पूर्त म्हणजे तलाव, धर्मशाळा, विहीरी वगैरे बांधून त्यांचा उत्सर्ग करणे वगैरे धार्मिक कृत्य : 'आणि सचाडाचिये परी । इष्टापूर्तें करी ।' - ज्ञा १३.५२४. [सं.]

**इष्टार्थ** पु. (शाप.) १. इप्सितार्थ. २. मनःकल्पना. ३. स्पृहा. ४. अभिलाष. ५. तृष्णा. ६. पुण्यवासना. ७. इष्टवस्तुलाभ. ८. वांछित. ९. अभिलषित. [सं.]

**इष्टांक** पु. (ग.) इष्ट संख्या; इष्टराशी; अंदाजलेली, गृहीत धरलेली रक्कम : 'जी किंमत इष्टांकरूपाने संकल्पिली.' - के २.८.३०.[सं.]

**इ(ष्ट)ष्टिका** स्त्री. १. वीट. २.(ग.) जिचे सहाही पृष्ठभाग आयताकृती आहेत, अशी सहा पृष्ठभागांनी सीमित असलेली त्रिमित आकृती. [सं.]

**इष्टि-ष्टी** स्त्री. अग्निहोत्र्याने दर महिन्याच्या शुक्ल आणि कृष्ण पक्षाच्या प्रतिपदेस करावयाचा याग. अग्निहोत्र घेतल्यापासून ते नष्ट होईपर्यंत अग्निहोत्र्याने हा याग करावयाचा असतो. इष्टीत नित्य (दर्शपूर्णमास), नैमित्तिक (आग्रयणेष्टी, वर्धापनेष्टी इ.) व काही काम्य (वर्षकामेष्टी, पवित्रेष्टी इ.) आहेत. [सं. इष्]

**इष्टीण** स्त्री. मैत्रीण. (कु.)[सं. इष्ट]

**इसकणे** क्रि. थोडेसे खणणे. पहा : **विसकणे** (कु.)

**इसकाड** न. (कृषी) नांगराचा दांडा.

**इसकी** न. (कृषी) कोळपे जमिनीत दाबण्याकरिता कोळप्याच्या दिंडात बसवलेला दांडा, लाकूड.

**इसकील** स्त्री. खोड; उणे; सबब : 'इकडे काहीही इसकील न काढता .....' - ओंकार २१.

**इसन, इसान** न. पहा : **विसण**

**इसन्ने-ने** वि. दोन ही संख्या; अरबी वर्ष मोजताना योजतात. [फा.]

**इसन्ने अशर** वि. बारा इमाम; बारा संख्या; याचा वर्षगणनेत उपयोग

करतात. [फा. इस्ना+अशर]

**इसप–ब** पु. १. विसर्प; हातापायावर होणारा गजकर्णासारखा एक चर्मरोग. यात खूप खाज सुटते, पुरळ येते, कातडी कडक व गाठाड होते. हा फार चिवट व दुर्धर रोग समजला जातो. २. जनावराच्या अंगावरील लालसर काळा, गोचिडासारखा किडा. [सं. विसर्प]

**इसबगोल** पु. सफेदजिरे; एक औषधी बी. हे बी आकाराने मोहरी एवढे असते. याच्या पांढरे, तांबडे व काळे अशा जाती आहेत.

**इसबंद** पु. मेंदीचे बी. भुताखेतांची किंवा दृष्टीची बाधा होऊ नये म्हणून विवाह, प्रसूती वगैरे प्रसंगी हे जाळतात. [फा. इस्पंद]

**इसम, इसीम** पु. १. विशेषनाम, नाव. २. मनुष्य; असामी.
न. (हिशोबात) नग; सदर; नगाचे वर्णन; खात्याचे वर्णन; वर्गाचे नाव; बाब; जात. [अर. इस्म=नाव].

**इसमनविशी** स्त्री. नावनिशी; नामावली : 'इसमनविशीची फर्द लिहून नबाबांस अर्ज केली.' – मइसा ५.१२७. [फा. इस्मन्विसी]

**इसममजकूर** वि. (सरकारी कागदपत्रातून) वर, मागे उल्लेखिलेला; उपरोल्लेखित; उपरनिर्दिष्ट (मनुष्य). [फा.]

**इसममुबादला** पु. १. (हजेरीपत्रकात) बदलून घातलेले नाव; बदली नाव. २. बदली माणूस; दुसऱ्याबद्दल काम करणारा इसम. [फा.]

**इसमवार** क्रिवि. १. नावांच्या अनुक्रमाने; नावापुढे नाव असे; नावनिशीवार. २. हिशेबाच्या सविस्तर बाबीप्रमाणे. [फा.]

**इसमवार कमजास्ती** स्त्री. पगार नोंदीसह नावाचा तक्ता. सामा. शब्द – इसमवार– अर्जी. नावनिशी, पट्टा, पत्रक, पाहणी, पावती, फाजील, वसुलीबाकी, सूट, हाजरी, रुजवात इ.

**इसमवारी** स्त्री. नावाचा तक्ता; नावांची यादी; हजेरी; उपस्थितीपत्रक.

**इसमा** पु. विसावा; विश्रांती : 'माहेराची जोत बाई । बसीन पित्याच्यापाशीं । गोष्ट ऐकोन हिताची । देईल इसमा काशी ।' – वलो ९४. (व.)[सं. विश्राम]

**इसमारी** स्त्री. पाल; एक प्राणी. (खा.)

**इसरा** पु. स्त्री. मालमत्ता; चीजवस्तू. [फा. आसार = परंपरा ]

**इसरावाडी** स्त्री. मालमत्ता; इसरा. (व.)

**इसवी** वि. ख्रिस्ती.
स्त्री. ख्रिस्ती शक. [फा. ईसवी]

**इसवी सन** पु. ख्रिस्ती शक. हा येशू ख्रिस्ताच्या जन्मापासून धरला आहे.

**इसळणे** क्रि. उसळणे; संतापणे ; रागावणे : 'नवरा तिच्यावर इसळतही असे.' –बलुतं १२०.

**इसा** स्त्री. घराच्या छपराला धूर लागून जमलेले धुराचे किटण. (व.)

**इसा** स्त्री. वीस; वीस या संख्येचे (पदार्थाचे) गट : 'म्हणून श्यानी एक दोन इसा वाघासनी मारूनशानी सरस्वतीच्या आल्याड आलों.' – बाय २.२. [सं. विशंति.]

**इसाड, इसाप** (इसाड्) न. नांगराचा एक भाग; नांगराच्या खुंटात रोवलेली धुरी. [सं. ईषा+दंड]

**इसाडा** पु. तोडलेल्या झाडाचा काही बुंधा शिल्लक ठेवून त्याच्यावर त्याच झाडाची कलमे लावून केलेले नवे झाड.

**इसापत–फत** पहा : **इजाफत**

**इसारकी** स्त्री. नांगराच्या इसाडाला मागील शेवटास (नांगरात बसवलेल्या) असलेली खीळ.

**इसारा** पु. (अर्थ.) खरेदी पक्की झाल्याचे चिन्ह म्हणून खरेदीदाराने विक्रेत्याला आगाऊ दिलेली रक्कम; करार करण्याच्या वेळी तारण म्हणून दिलेली रक्कम, बयाणा.

**इसाळ–ळा** पु. १. स्पर्धा; स्पर्धेचे-चढाओढीचे वारे; चुरस; चढाओढ; अहमहमिका; हेवा; खुमखुमी. (क्रि. धरणे, येणे) : 'पद्मदळेंसीं साळें । भांडताति जे हे डोळे ।' – ज्ञा १३.५६०. २. चीड; तिटकारा : 'वाचे सत्याचा विटाळ । इंद्रियनियमांचा इसाळ ।।' – मुआदि १.६७. ३. संशय : 'तो आपुलिए स्त्रीएचा इसाळु करी.' – दृपा ८२. [सं. ईर्षा]

**इसाळा** पु. ऐन जिन्नसी मोबदला; शंभर पेंढ्यास अमुक पेंढ्या देण्याचे ठरवून काम करणे. (माण.)

**इसाळा–ला, इसोळा** पु. ज्वारीवरील रोग.

**इसाळाइसळी, इसळाइसळी, इसलाइसला** क्रिवि. स्पर्धेने; ईर्षेने; चढाओढीने.

**इसाळू, इसाळ्या, इसाळा** वि. स्पर्धाळू; चढाओढ करण्यास उत्सुक.
पु. आसक्त; लंपट; मत्सरी : 'आणि इसाळु जैसा घरा । कां दंदिया हतियेरा । न विसंबे भांडारा । बद्धकु जैसा ।।' –ज्ञा १३.५०२.[सं. ईर्षालु]

**इसिम** पु. त्वेष. [फा.]

**इसूप–ब** पु. पहा : **इसप–ब**

**इस्कलबाज** वि. हिकमती; कावेबाज; रंगेल : 'तात्या इनामदार हा महा इस्कलबाज माणूस असला पाहिजे.' –मिरास १७४.

**इस्काद** स्त्री. जिना. (गो.)[पोर्तु. इस्काड].

**इस्काल, इस्कील, इस्कीलकी** स्त्री. हरकत; अडचण; तंटा : 'चांदजीराव इस्कील करील तर त्यासही माकूल करून सांगणे.' – मइसा ८.९७. [फा. इश्काल् = अडचण.]

**इस्कीदार** वि. ऐटबाज; शानदार : 'डोकीवर इश्कीदार जरीची टोपी अगर शेमला सोडलेला फेटा असावयाचा.' –नाता ६५.

**इस्कू(स्को)ट** पु. नाश; विसकट : 'केला का समदा इस्कूट पानाचा.' – मिरास ३१९.

**इस्टिक** स्त्री. इस्टेट; मालमत्ता; संपत्ती : 'समदी इस्टिक त्येला देनार होता.' – परेपा ८०.

**इस्टिकालेख** पु. (उत्खननात मिळणारे) विटांवर कोरलेले लेख : 'इजिप्तमधील जुन्या इस्टिकालेखाचे स्वरूप ...' – काढ १९८.

**इस्टुर फाकडा** पु. बाजीराव; ऐटीचा माणूस : 'एवडा इस्टुर फाकडा आहेस तर आलास कशाला?' – मिरास २०२. (एल्फिन्स्टन साहेबाला पेशवाईत या अपभ्रष्ट नावाने संबोधण्यात येत असे.)

**इस्टेट** स्त्री. स्थावर मालमत्ता, संपदा; (सामान्यतः) मालमत्ता :

'अज्ञानासंबंधानें ही इस्टेट कोर्टाच्या ताब्यात जाऊन तिच्या व्यवस्थेकरितां रोल्ट साहेबांची नेमणूक झालेली होती.' – लोटिकेले २.५७७.[इं.]

**इस्त** स्त्री. १. इज्जत; इभ्रत. (गो.) २. बेअब्रू.

**इस्तक्बाल** पु. सामोरे जाणे; सन्मान, आगतस्वागत : '... यास इस्तकबाल करावयासी स्वामी समर्थ आहेत.' – इएमपी ९४. वि. भविष्यकालीन; भावी : 'कार्कुनानी हाल व इस्तक्बाल ...' (हल्लीचे व भावी कार्कुन). [फा. इस्तिक्बाल]

**इस्तक्बील** शअ. पासून (मागील विशिष्ट गोष्टीपासून किंवा तारखेपासून तो दिवस धरून) पुढे; सुरुवातीची मिती; एखाद्या व्यवहाराचा आरंभकाल; हा शब्द तागायत शब्दाला जोडून येतो : 'इस्तक्बील चैत्र तागायत फाल्गुन.' [फा. इस्तिक्बाल]

**इस्तक्लाल** पु. जोर; धीर; धर. : 'या फौजेचा इस्तक्लाल राहिला नाहीं तेव्हा सुलूक आरंभिला.' – मइसा ६.४४०.[फा. इस्तिक्लाल]

**इस्तमरारी** स्त्री. कायमधारा पद्धती. [फा. इस्तिमरार]

**इस्तमाल** पु. उपयोग. [फा.]

**इस्तमालत, इस्तमाली** स्त्री. १. दिल–दिलासा; मनाला बरे वाटेल असे बोलणे; समजावणी. २. लावणी, संचणी; कीर्द, महामुरी : 'आबादीस व इस्तमालतीस कोसीस करून.' –मइसा १५.१२३. [फा. इस्तिमालत]

**इस्तमाली** स्त्री. १. वहिवाट; परिपाठ; अभ्यास. २. पहा : **इस्तिमालत** वि. मामुली; जुनापुराणा; वापरण्यायोग्य.

**इस्तमेल** स्त्री. १. (हिशोब) जमाखर्चाची एक बाब; जमेच्या रकमा खर्ची व खर्चाच्या रकमा जमा टाकणे, मांडणे. उदा. धान्य वगैरे प्रथम खर्ची टाकून त्याचे पीठ, कोंडा वगैरे नंतर जमा करणे. २. घालमेल; वर्गावर्गी; उलाढाली; घडामोड.

**इस्तरी, इस्त्री** स्त्री. १. धुतलेल्या कपड्यांच्या सुरकुत्या काढून त्यास कडकपणा येण्यासाठी त्यावर फिरवण्याचे उपकरण. २. कुंदी करण्याचे यंत्र; एक विद्युत उपकरण. (क्रि. करणे, मारणे).

**इस्तरी, इस्त्री** स्त्री. बाई; बायको. पहा : **अस्तुरी** : 'मी बी पुरुसराज्यांतून इस्तरीराज्यावर एकदम हापटलों.' – बाय २.

**इस्तस्बाब** पु. पसंती; सल्ला : 'त्यांचे इस्तस्बाबाने काम करावे' – मइसा ७.५८. [फा. इस्तिस्बाव]

**इस्ताद** स्त्री. १. चुन्याचे पक्के बांधकाम : 'इस्तादेंचीं घरें.' – मराआ. २. चीजवस्तू; सामानसुमान; जंगल मालमत्ता. ३. तयारीसाठी पैसा; साहित्य; सिद्धता : 'आंग्र्यांचे अडीचशे माणूस त्यांनी सांगितले त्यासहि इस्ताद मिलत नाहीं.' – पेद १६.१०९. [फा.]

**इस्ताफ–फा, इस्तिफा** पु. सोडचिठ्ठी;नोकरी सोडण्यासंबंधी वरिष्ठांना सादर केलेले पत्र; त्यागपत्र; राजीनामा : 'आम्हास दौलत नलगे; मकेस जावें किंवा घरीं बसून राहावें या मार्गे आम्ही नवाबास इस्ताफाही लिहून पाठविला.' – मइसा. [फा. इस्तिफा]

**इस्तारी** स्त्री. पत्रावळ; विस्तारी. (व.) [सं. विस्तरण.]

**इस्तावा** पु. १. नवीन जमीन कीर्दमामुरीस येतेवेळी काही वर्षेपर्यंत भर साऱ्यापेक्षा कमी; परंतु दरसाल वाढत्या साऱ्याने देण्याची पद्धत. २. अशा तऱ्हेने दरसाल वाढणारा सारा. ३. (थट्टेने) नास्ति; अभाव; टाळा. ४. बरोबरी; लढाईची तहकुबी करून बरोबरीच्या नात्याने तहाचे बोलणे करणे. [फा. इस्तिवा]

**इस्तियाक मुस्ताकी** स्त्री. प्रेम; लोभ : 'ज्या ज्या प्रसंगोचित इस्तियाक–मुस्ताकीच्या गोष्टी बोलावयाच्या त्या नबाब निजामुदोला बहादुर यांनी बयाण केल्या.' – मइसा१.१८७. [फा. इस्तियाक् मुश्ताकी]

**इस्तू, इस्तव, इस्तो** पु. विस्तव : 'शेंदारानं इस्त्याच्या खांडागत रंग झालेला.' – गोतावळा ३. 'गांज्याच्या डोक्यावर इस्तूव कुठं हाय.' बाय ४.२. (ग्रा.)

**इस्तेरेत** न. कमी उंचीची साधी खाट. (गो.)

**इस्त्री** स्त्री. कोळपे दाबून धरण्याची काठी.

**इस्दार** न. बाहेर काढणे; प्रसिद्धीकरण : 'दस्तक इस्दार करून पाठविलें आहे.' – मइसा ३.९१. [फा.]

**इस्ना, इस्ने** वि. दोन. पहा : **इसन्ने** [अर.]

**इस्पिक** पु. १. पत्त्याच्या खेळातील काळा बदाम. २.पत्ते : 'ही इस्पिकाची पिसणी झाली, पण तिच्यात एक्यांचे प्रमाण तसेच राहिले.' – माजी ५५४.

**इस्पिट** न. खेळावयाचे पत्ते; पत्त्यांचा डाव. पहा : **इस्पिक**

**इस्पितळ** न. रुग्णालय; रोग्यांची राहण्याची व औषधपाण्याची सोय जेथे असते असे स्थान; (उपरोधाने) वेड्याचे इस्पितळ : 'एखादे राजेश्री जर घरातील सर्व इस्टेट समुद्रात टाकावयास निघाले तर त्याचे आप्तवर्ग त्यांस इस्पितळाचा मार्ग दाखवतील.' –लोटिकेले ४.२२ [इं. हॉस्पिटल]

**इस्पिंजर** पु. (स्था.) दोन कमानींमधील त्रिकोणाकृती दगड. ज्या दगडापासून कमानीच्या बांधकामास सुरुवात होते. [इं. स्प्रिंजर]

**इस्फळ** वि. व्रात्य; त्रासदायक; खोडकर. (कु.) [अचपलचा अप]

**इस्म** पु. नाव. [फा.]

**इस्मत** स्त्री. शील; पातिव्रत्य; पावित्र्य. [फा.]

**इस्माळी बसणे, इस्मून बसणे** क्रि. विस्मरणात असणे; विसरून जाणे, बसणे. (माण.) [विस्मरणाचा अप.]

**इस्राएल, इस्रायल** पु. १. देवाशी झगडून जय मिळविणारा; याकोबाला देवाने दिलेले नाव. २. याकोबाचे वंशज; ज्यू लोक व त्यांचा धर्म; हे इस्रायल लोक याहवे देवतेचे उपासक आहेत. या धर्माचे मूळ उत्पत्ती स्थान पॅलेस्टाईन होय.

**इस्राव** स्त्री. (चर्म. व्यव.) चपलेच्या वरच्या भागाचे नाव; चपलेच्या आंगठ्यास लावलेली पट्टी. (क्रि. ओवणे)

**इस्लाम** पु. महंमद पैगंबराने स्थापिलेला धर्म; मुसलमानी धर्म; मुसलमान. [फा.]

**इस्वण–न** पु. कोकण किनाऱ्यावर सापडणारा एक पिवळा मासा.

**इस्वाट** न. परडे; परसू. [कर.]

**इस्वाटा** पु. विश्रांती; विसावा; 'म्हंजे बैलांस्नी भरपूर इस्वाटा मिळणार

म्हणा ?' - गोतावळा ४.

**इस्वाटी** पु.परड्याची रखवाली, राखण करणारा देव. (कर.)

**इस्वाळ** पु. पहा : **इस्वण**

**इह** वि. क्रिवि. येथे ; या लोकी; मृत्युलोकी : 'इह भोगिसी कीं पुढतीं.' - गुच ९.३७. [सं.]

**इहदे - इहिदे** वि. एक; वाहेद. [फा. अहद् = एक]

**इह ना पर** क्रिवि. इकडे नाही आणि तिकडे नाही.

**इहपरलोक** पु. मृत्युलोक आणि स्वर्गलोक. [सं.]

**इहभोग** पु. मृत्युलोकी, पृथ्वीवर भोगावी लागणारी सुखदुःखे : 'अर्थु कामु पसरे । अग्रवणें घेती थोरें । तेथ क्षणिकें पदांतरें । इहभोगांचीं । - ज्ञा १५.१५८. [सं.]

**इहलोक** पु. मृत्युलोक; पृथ्वी. [सं.]

**इहलौकिक** वि. या लोकातील; पृथ्वीवरील. [सं.]

**इहवाद** पु. शासन व शासकीय धोरण धर्म व धार्मिक विचार यांवर आधारलेले नसावे असे प्रतिपादन करणारी तत्त्वप्रणाली; धर्मनिरपेक्षतेचे तत्त्व व आचरण; सामाजिक नीतिमूल्ये धर्माधिष्ठित न ठेवता ऐहिक जीवनाशी संबंधित असावी असे मानणारे तत्त्वज्ञान. [सं.]

**इहवृत्त** न. (वर्तमानपत्री) स्थानिक वृत्त, बातम्या. [सं.]

**इहसान** न. कृपा; प्रसाद; मेहेरबानगी; उपकार :'दौलताबादेचें यश आम्हांस यावें म्हणूनच स्वामींनीं रुपये जहागीर दिली, सर्कारकिफायतीकरिता न दिलें हेंही मोठे इहसान सेवकावर.' - ऐलेख १.३९. [फा.]

**इहा** स्त्री. इच्छा. [सं. ईहा]

**इहामुत्र** वि. ऐहिक आणि पारलौकिक : 'इहामुत्रफळापासौनि उपरमें' - ज्ञाप्र ६८९.

**इळ** पु. वेळ; दिवस. (ग्रा.)[वेळचा अप.]

**इळत-द** स्त्री. नांगराचा फाळ किंवा फावडे यावरील माती खरडण्याचे साधन; खणते; कंडारण्याच्या शेवटास बसवलेली लोखंडी शिंप - हिने फाळास लागणारी माती खरडून काढतात. (व). वखर किंवा डवर यांच्या फासावरील माती साफ करण्याचे हत्यार. (व.) लाकडी कुदळ्याच्या शेवटास असलेली लोखंडी अणी. (को.)

**इळवरी** क्रिवि. या वेळपर्यंत; आतापर्यंत; इतका वेळ.

**इळंसाट** क्रिवि. दिवसभर. (व.)

**इळाखिळा** पु. १. घरातील हलकी भारी चीजवस्तू; लहान मोठ्या वस्तू; सर्व जंगम मालमत्ता. २. किरकोळ वस्तू; सटरफटर माल. (वा.) **(अंगाचा, शरीराचा) इळाखिळा करणे** - अतिशय श्रम घेणे; फार मेहनत करणे; श्रमणे.

**इळानइळ** क्रिवि. सारा दिवस; दिवसभर. (नाग.)

**इळानिंदा** अ. रात्रंदिवस; कोणत्याही क्षणी; केव्हाही; नेहमीः 'इळानिंदा पोटापाय त्यांच्या दारात जावं लागतं.' - तअं १६९.

**इळीमिळी गुपचिळी** उद्गा. आता चुप, गप बसा; (मुलांनी गप्प बसावे म्हणून घालावयाची शपथ.) पहा : **अळीमिळी गुपचिळी**

**इळ्ळ्याचे पात्र** न. इडली करण्याचे, उकडण्याचे पात्र, भांडे. (तंजा.)

**इक्षु** पु. ऊस. [सं.]

**इक्षुकांड** पु. उसाचे पेर; कांडे; (सामान्यतः) ऊस.

**इक्षुजा** स्त्री. (रसा.) ऊस आणि बीट यांपासून तयार होणारी साखर. [सं.]

**इक्षुदंड-दांडा** पु. पहा : **इक्षुकांड** [सं.]

**इक्षुयंत्र** न. चरक; उसाचा रस काढण्याचे यंत्र. [सं.]

**इक्षुरस** पु. उसाचा रस : 'नाना प्रभा व्यापें प्रकाशु । गोडिया इक्षुरसु ।' - ज्ञा १८.५०९. [सं.]

**इक्षुशर्करा** स्त्री. उसापासून तयार केलेली साखर. [सं.]

**इंगणे** अक्रि. काळजीने, श्रमाने, आजाराने किंवा इतर कारणाने भारावून जाणे; गळून जाणे; दमणे; टेकीला येणे.

**इंगरेज** पु. इंग्रज; इंग्लिश; ब्रिटिश माणूस; साहेब; गोरा.

**इंगरेजी** स्त्री. १. इंग्रजी भाषा. २. इंग्रजांचा अम्मल; ब्रिटिश अमदानी. वि. इंग्लिश; इंग्रजांचा; इंग्रजी भाषेसंबंधी; इंग्रजी; ब्रिटिश.

**इंगरेजी दारू** स्त्री. (इंग्रजी दारू लवकर पेट घेते यावरून) (ल.) १. तापट, चिडका, संतापी माणूस. २. हुषार, चलाख माणूस; तडफदार माणूस.

**इंगळ-ळा** पु. जिवंत निखारा; विस्तव; अंगार (व.गो.) : 'कैंची सुखनिद्रा आंथरुणीं । इंगळांच्या ।'-ज्ञा ९.५०१.[सं. अंगार ](वा.) **इंगळास वळंबे लागणे** - असलेल्या संकटात अधिक भर पडणे; एकादशीच्या घरी शिवरात्र. **इंगळासारखा लाल होणे** - रागाने चेहरा तांबडा होणे; अतिशय संतापणे; **इंगळासारखे डोळे होणे**- अतिशय रागाने डोळे लालबुंद व उग्र होणे.

**इंगळा** पु. एका जातीचा तांबडा मुंगळा.

**इंगळी -ईंगळी** स्त्री. १. विंचवाची एक जात; ही आकाराने विंचवापेक्षा मोठी असून काळी व अतिशय विषारी असते. २. ठिणगी; निखारा; विस्तव : 'घालावी ईंगळी ब्रह्मशापाची'- उगी १४.६१. पहा : **इंगळ** : 'जेवीं वेलु वाढवी वेलुजाळी । वेळुवेळवां कांचणीमेळीं । स्वयें पाडूनि इंगळी । समूळ जाळी आपण्यातें ।'- एभा २३.६८९. पहा: **इंगळ** ३. (सोनारी धंदा) तापलेल्या मुशीतील रस ओतण्याकरता वापरावयाचा इंग्रजी साताच्या आकड्यासारखा असलेल चिमटा; सांडशी. (इंगळीच्या नांगीच्या आकारावरून).

**इंगा** पु. १. (चर्मकार व्यव.) चामडे ओढून घोटून ताणण्याचे व मऊ करण्याचे (उलथण्यासारखे) हत्यार. २. नांगरलेल्या जमिनीतील ढेकळे फोडण्याचे लाकूड. ३. (ल.) हाल. [सं. इंगु] (वा.) **इंगा दाखविणे**- खोड मोडणे; आपले सामर्थ्य दाखविणे. **इंगा फिरणे**- गर्वपरिहार होण्याजोग्या अडचणीत सापडणे; संकटामुळे नरम येणे; जर्जर होणे; त्यामुळे शुद्धीवर येणे; डोळे उघडणे.

**इंगाळ** पु. पहा : **इंगळ** : 'काशी माझी काळूबाई । तुझं इंगाळ चालायचं ।' - जसा ८२.

**इंगित** न. १. खूण; सूचक मुद्रा. २. अभिप्राय. ३. अंतस्थ हेतू; रहस्य. ४. (व्यंगितचा अप.) औपरोधिक भाषण; व्यंगोक्ती. [सं.]

**इंगित सिद्धांत** पु. (भाषा.) मनातील आशय, भावना इ. हावभावांनी

व्यक्त केल्या जातात असे मानणारा सिद्धांत.

**इंगितज्ञ** वि. इंगित जाणणारा; हावभावावरून अभिप्राय, उद्देश जाणणारा. [सं.]

**इंगिताग्र** न. इंगितज्ञ : 'पंतप्रधान इंगिताग्र आहेत.'– ऐलेसं ११८३.

**इंगुदी** स्त्री. (आयु.) हिंगणबेट. [सं.]

**इंगुळ** पु. निखारा. पहा : **इंगळ** : 'रुसले भरतारा । नाहीं म्हणावा आपला । शेजीच्या लावणीनं । लाल इंगुळ तापला ।'– वलो ९१. (व.)

**इंगूळ** पु. पारा व गंधक यांचे मिश्रण. पहा : **हिंगुल** : 'इंगुळ व कापूर जाळून त्याजपासून धरलेले काजळ...'–ननाना १६.

**इंग्रज, इंग्रेज** पु. १. पहा : **इंगरेज** : 'जाबी जंगी फिरंगी । इंग्रेज बहुधा रक्त रंगी । मलेबार नौका मार्गी । विघ्नकर्ते दंडिले ।'– मुसभा ८.१२७. २. दोन फाशांनी व चार रंगांच्या सोंगट्यांनी खेळण्याचा एक डाव. यात पेशवे (पिवळ्या) आपल्या शिंदे (हिरव्या), होळकर (काळ्या) साथीदारांसह एका बाजूला व इंग्रज (तांबड्या) दुसऱ्या बाजूला असून इंग्रजांना इतरांनी हरविले म्हणजे 'इंग्रजांची टिमकी बजावली' असा टोमणा मारून डाव संपतो. (कों.)
न. १. इंग्लिश माणूस; इंग्लंडमध्ये राहणारे गोरे लोक. २. पोलाद; लोखंडाचा एक प्रकार.

**इंग्रजी, इंग्रेजी** वि. पहा : **इंगरेजी.**

**इंग्रजी गहाण** न. (कायदा) जेथे धनकोला मिळकत गहाण करून देऊन ऋणको ठरावीक मुदतीत कर्ज फेडण्याचा करार करतो, व स्वतः कर्ज फेडल्यास मिळकत धनकोने परत करावी असे लिहून देतो अशा व्यवहारास इंग्रजी गहाण म्हणतात.

**इंग्लिश** वि. १. पहा : **इंगरेज, इंगरेजी.** २. परदेशी; विलायती; इंग्लडदेशीचा.
न. इंग्रजी भाषा. [इं.]

**इंग्लिश बॉडी** स्त्री. (छाप.) एक प्रकारचा छापण्याचा, चौदा पॉईंटचा टाईप. हा पायका टाईपपेक्षा जरा मोठा व ग्रेट प्रायमरपेक्षा जरा लहान अक्षरांचा असतो. [इं.]

**इंच** पु. फुटाचा बारावा भाग; अडीच सेंटीमीटर; अंगुळ; तसू. [इं.]

**इंजनवारा** पु. पंखा; पंख्याचा वारा. (व.)

**इंजाई** वि. दिसण्यात सुरेख; चकाकणारे; भपकेदार; दिखाऊ पण पोकळ.

**इंजाईत** वि. नुकसान, लुसकान; दिखाऊ (कापड) ; कमजोर, निःसत्त्व, ठिसूळ (लाकूड, इमारत इ.); चांगले न बनवलेले, तयार न केलेले (काम इ.)

**इंजानिब** पुं. मी; आम्ही : 'इंजानिबास कौन्सिलातून फर्माविलें.'– विंचूइ.

**इंजिन** शक्ती उत्पन्न करणारे यंत्र; गतियंत्र. [इ.]

**इंजिन दंड** (यंअ.) पुलीला (कप्पीला) आधारभूत असलेला व स्वतःभोवती फिरून शक्ती किंवा गती प्रक्षेपित करणारा इंजिनाचा मोठा दांडा.

**इंजिनियर, इंजिनेर** पु. यंत्रकाम किंवा बांधकाम जाणणारा; स्थापत्यशास्त्रज्ञ; यंत्रशास्त्रवेत्ता; अभियंता. [इं.]

**इंजिनियरिंग** न. वास्तुशिल्प; स्थापत्यशास्त्र; यंत्रशास्त्र; अभियंत्याचे काम. [इं.]

**इंजेक्शन** न. १. लस, औषधीद्रव्य इ. पिचकारीने शरीरात घालणे, सोडणे. (क्रि. देणे, करणे); अंतःक्षेपण; सूचिभेदन; सुईटोचणी. २. बस्तिविधी.

**इंझणा** पु. पहा : **विंझणा** (व.)

**इंझाळ** पु. १. पाटाच्या खालच्या बाजूस लावलेला आडवा दांडा; पाय. (व.) पहा : **अडात.** २. कवाडाला लावलेला आडवा दांडा. पहा : **इंडाळे**

**इंटाळ, इंठाळ** पु. पहा : **विटाळ** : 'आमाचा इंटाळ झाला.'– के १.७.३०. (व.)

**इंड** स्त्री. मासे पकडण्याचे लांबट चौकोनी जाळे. (कु.)

**इंडाळे** न. कवाडाच्या चौकटीमधील आडवे लाकूड. (व.)

**इंडिकेट** स्त्री. राष्ट्रीय काँग्रेसमधील, इंदिरा गांधींना पाठिंबा देणारा गट : 'सिंडिकेटशी सामना देण्यासाठी 'इंडिकेट'तयार झाली होती.'– अंदिल्ली ७९.

**इंडियन** वि. हिंदुस्थानासंबधी.
पु. १. हिंदी माणूस; हिंदुस्थानचा रहिवासी. २. अमेरिकेतील मूळचे रहिवासी; रेड इंडियन. [इं.]

**इंतकाल** पु. मृत्यु; अंतकाल : 'महमदअलीखान वालाजाह यांचा इंतकाल छ. २७ माहे रबिलावली जाल्याचें वर्तमान आहे.'– मइसा ५.२०३. [फा.]

**इंतजाम** पु. बंदोबस्त; व्यवस्था : 'सर्कारचे कामाचा पक्का इंतजाम.'– जोरा १२९. [फा]

**इंतजारी** स्त्री. मार्गप्रतीक्षा; वाट पाहणे; उत्सुकता : 'त्याचा जबाब केव्हा येईल याची इंतजारी आहे.'– मइसा ५.१२८.
वि. मार्गप्रतीक्षक; उत्सुक : 'उत्तराविषयीं लवकर आज्ञा जाली पाहिजे; नबाब फार इंतजारी आहेत.' भमइसा ५.१२४. [फा.]

**इंताजी** वि. मिजासखोर; फार नाजूक; चवंढाळ; चोखंदळ. (व.)

**इंतिजार** पु. वाट पाहणे; प्रतीक्षा : 'हुजुरच्या सालजाबाकरिता इंतिजार होते.' – हिंदख१.४७. [फा.]

**इंत्रुज** न. खिस्ती लोकांचा शिमगा. (गो.) [पोर्तु.]

**इंदळस, इंदळसकुटा** वि. भोळसट. (कु.)

**इंदिरा** स्त्री. लक्ष्मी; विष्णुपत्नी; कमला : 'जे होय मंदिरहि सुंदर इंदिरेचें ।'– नल ९. [सं.]

**इंदी(दि)वर** न. कमळ; नीलकमल; निळ्या कमळाचे फूल : 'फांकलिया इंदीवरा । परिवारु नाहीं धनुर्धरा ।'– ज्ञा १३.३६२. [सं.]

**इंदुरी** वि. इंदूर (शहरा) मध्ये तयार होणारी (साडी, वस्त्रे इ.).

**इंदुवदना** वि. १. चंद्राप्रमाणे जिचे मुख आहे अशी (स्त्री). २. (ल.) सुंदर, रूपवती स्त्री; तरुणी; कुमारी. ३. एक समवृत्त. यात १४ अक्षरे येतात. उदा. 'कायकरि काळकलि नीलगल चित्तीं ।' [सं.]

**इंदुवार–वासर** पु. सोमवार. [सं.]

**इंदु–दू** पु. चंद्र : 'जो मम नयनचकोरा इंदू.'– राराव‍ि ५७. सामा. शब्द– मुखेंदू, पूर्णेंदू इ. [सं.]

**इंद्र** पु. १. देवांचा राजा; स्वर्गलोकाचा व पूर्व दिशेचा अधिपती. ही मेघ, पाऊस यांची अधिष्ठात्री देवता म्हणून फार प्राचीन काळापासून मानतात : ' श्रिया वाखाणिजे अमरेंद्र । कृष्ण इंद्राचाहि इंद्र ।'–एरुस्व १.७८. २. (समुदायामध्ये) राजा; श्रेष्ठ, वरिष्ठ व्यक्ती; नायक; मुख्य; पुढारी; सामा. शब्द– नरेंद्र, नृपेंद्र, खगेंद्र, फणींद्र. ३. गोसावी, संन्यासी यांच्यातील एक पंथ; या पंथातील व्यक्ती. [सं.]

**इंद्रकट** न. आढ्यापासून पाख्यापर्यंतचे खाली आलेले वासे टेकून राहण्यासाठी तुळयांच्या टोकांवर बसवलेले आडवे लाकूड; भिंतीत बसवलेले बहालाच्या खालचे आडवे लाकूड. (कों.) [सं.]

**इंद्रकल्याणी** वि. विद्रूप; कुरूप. (माण.)

**इंद्रकापशी** स्त्री. कापसाच्या झाडाची एक जात. देवकापूस. [सं.]

**इंद्रकीट** पु. एक प्रकारचा पावसाळी तांबडा (कधी पांढरा) किडा; कुंकवाचा किडा; सोमकिडा; हा मृगनक्षत्रात उत्पन्न होतो, याच्या पाठीवर सहा ठिपके असतात.

**इंद्रकील** १. मंदराचल. २. घोट्याचा सांधा; घोट्याची खीळ.[सं.]

**इंद्रगेळ** न. १. पायाच्या घोट्याचा भाग. २. गुराच्या टाचेवर (खुरावर) मागील बाजूस वाढलेला मांसल भाग; पायाचा एक भाग.

**इंद्रगोप** पु. पहा : **इंद्रकीट** : 'इंद्रगोप धुतले पाउसें । पद्मरागीं जडत्व असे ।'– ऋ ८६.

**इंद्रचाप** पु. इंद्रधनुष्य; पावसाच्या तुषारांवर पडणाऱ्या सूर्यकिरणांच्या योगाने आकाशात दिसणारी धनुष्याकृती. याचा आकार अर्धवर्तुळाकार असून वर्तुळाचा मध्यबिंदू पाहणारा आणि सूर्य यांस जोडणाऱ्या रेषेवर असतो. यात तांबडा, नारिंगी, पिवळा, हिरवा, निळा, पारवा व जांभळा असे सात रंग असतात. पावसाच्या पाण्याच्या थेंबामध्ये होणारे प्रकाशकिरणांचे वक्रीभवन व परावर्तन यामुळे इंद्रधनुष्य पडते. [सं.]

**इंद्रजव** पु. इंद्रबीज; कुड्याचे बी. [सं. इंद्र+यव]

**इंद्रजाल** न. नजरबंदी; मंत्रविद्या, जादूगिरी; जादूटोणा; गौडबंगाल; भानामती; हातचलाखी; माया : 'हें सर्व इंद्रजालच माझ्या दृष्टीस पडत आहे.'– कमं ३. [सं.]

**इंद्रज्योत** स्त्री. पहा : **इंद्रजव**

**इंद्रधना** पु. इंद्रधनुष्य : 'तिला आपला सावूट पाण्यात दिसला. जणू इंद्रधनाच.'– आपा ४३.

**इंद्रधनुख–धनु** न. पहा : **इंद्रचाप** : 'नाना रंगीं गजबजे । जैसें इंद्रधनुष्य देखिजे ।'– ज्ञा १५.२४०. [सं.]

**इंद्रध्वज** पु. पाडव्याच्या दिवशी उभारतात ती गुढी. पहा : **गुढी**[सं.]

**इंद्रनील–ळ** पु. एक रत्न; उंची मौल्यवान नीळ : 'पिळून इंद्रनील किळी । वोतली कृष्णतनु सांवळी । पाउलें सुकुमार कोंवळी । घोटीं निळीं दोहीं भागीं ।'– एरुस्व ६.२३. [सं.]

**इंद्रफणी** पु. १. इंद्रजाल विद्येने दोरीचा दिसणारा साप. २. इंद्र व शेष. ३. मांजर व सर्प : 'दोघां ऐसीं तीन चालती । अवगुणी अष्टधा प्रकृती । अधोर्ध सांडून वर्तती । इंद्रफणी एसीं ।'– दास १५.५.१. [सं.]

**इंद्रबस्ती** स्त्री. (आयु.) पोटरीत घोट्यापासून १२ बोटावर असणारे मर्म.

**इंद्रबाही** स्त्री. दरवाज्याच्या फळीचे दोन बाजूचे दोन व मधला एक असे उभे तुकडे. [सं. इंद्र+बाहु]

**इंद्रभुवन** न. १. इंद्राचा राजवाडा; इंद्रलोक. २. (ल.) अतिशय सुंदर, वैभवशाली व टोलेजंग राजवाडा. [सं.]

**इंद्रमडे–ढे** न. अगदी कृश, अशक्त, रोड, मढ्यासारखा मनुष्य.

**इंद्रलोक** पु. स्वर्गातील इंद्राची निवासभूमी; स्वर्गाच्या ज्या भागात इंद्र राहतो तो प्रदेश. [सं.]

**इंद्रवज्रा** स्त्री. एक समवृत्त; याच्या प्रत्येक चरणात ११ अक्षरे येतात. उदा. 'कां टाकिलें शस्त्र रणांत तेणें ।'– वेसं. [सं.]

**इंद्रवणी** न. पाणी : 'बाइ भोजेयालागि इंद्रवणी ठेवा.'– लीचउ ८.

**इंद्रवशा** स्त्री. एक समवृत्त. प्रत्येक चरणात १२ अक्षरे. उदा. 'गोपी हरीच्या भजनात रंगल्या.' [सं.]

**इंद्रवारुण–णी–वरुण** न. कडूकवंडळ; इंद्रवारुणीचे फळ; कडूवृंदावन. : 'अंतर कडू वरी वरी दावी सुंदर । इंद्रवारुणफळ जैसें ।' [सं.]

**इंद्रश्री** स्त्री. स्वर्गीय थाट; इंद्रलोकातले वैभव : 'तैसीं खवळें चाड । होय दुःखासकट गोड । इंद्रश्रीहि सांकड । गमो लागे ।।'–ज्ञा १४.१६३.

**इंद्रसभा** स्त्री. १. इंद्राची सभा; इंद्राचा दरबार. २. (ल. विशेषतः रात्रीच्या) जेवणाला टाळा : 'तुम्ही पडला पक्के कोकणस्थ, परान्नं पुष्टिवर्धनं, लागलीच रात्रीची इंद्रसभा.'– खरादे १२२.

**इंद्राची रंभा** स्त्री. इंद्राच्या सभेतील अप्सरांमध्ये रंभा सर्वात सुंदर, यावरून (ल.) सुंदर स्त्री. : 'पैसा मिळाला की इंद्राची रंभा देखील आणून देईन.'– मोर २२.

**इंद्राठी** पहा : **इंद्रकट** (कों.)

**इंद्राणी** स्त्री. १. इंद्राची स्त्री, पत्नी; शची. इंद्रपदावर कोणीही आला तरी इंद्राणी बदलत नाही. ती तीच राहाते यावरून बदलणाऱ्या गोष्टींमध्ये एखादी कायम राहत असेल तर त्याबद्दल म्हणतात. २. निर्गुडी. ३. इंद्रवल्ली किंवा कडू कवंडली (इंद्रवारुणी). ४. वेलदोड्याचे झुडूप.[सं.]

**इंद्रायण** न. कडू वृंदावन; कवंडल–ळ. [सं.]

**इंद्रायणी** स्त्री. इंद्राची स्त्री. पहा : **इंद्राणी** : 'इंद्रास इंद्रायणी, कृष्णास हो रुक्मिणी ।'– वसा १५. २. पुणे जिल्ह्यातील एका नदीचे नाव. प्रसिद्ध आळंदी क्षेत्र हिच्या काठावर आहे.

**इंद्रायुध** न. पहा : **इंद्रचाप**

**इंद्रायेण** न. पहा : **इंद्रावण–न** (वा.) **इंद्रायेण फलवत् स्नेह**–वरून दिसावयास मैत्री पण आतून वैर; कपटमैत्री; भोंदूपणाचा स्नेह: 'तेहि देवहत बुद्धिहत जाले आहेत. सिंद्यासी इंद्रायेण फलवत स्नेह होता. अलिकडे बहुतच विटले आहे.'– पेद ३६.३८५.

**इंद्रावण–न** न. वृंदावन; कडू कवंडळ. हे फळ दिसण्यास सुंदर पण चवीला कडू असते. यावरून सुंदर पण निरुपयोगी, बाहेरून शांत पण आतून क्रूर अशा माणसाला म्हणतात : 'तें इंद्रावण कोणी न सेवी ।

अंतरस्वभावीं अति मळिण ।'- एभा २.३९०. [सं.]

**इंद्रावणी** स्त्री. एक वेल; कडू वृंदावन; हिची पाने कलिंगडाच्या वेलीसारखी पण त्यापेक्षा थोडी बारीक असतात. पिकलेले फळ पिवळे दिसते. यापैकी एका जातीचें फळ मोठ्या आंब्याएवढे असते. त्याला घोडइंद्रावण म्हणतात. दुसऱ्या जातीचे फळ लिंबाएवढे असते : 'मग राजसा जिया क्रिया । तया इंद्रावणी पिकलिया जे सुखें चिताऊनियां । फळती दुःखें ।।'- ज्ञा १४.२६२. (वा.) **इंद्रावणीचे फळ**- सुंदर पण निरुपयोगी माणूस, पदार्थ. [सं. इंद्रवारुणी]

**इंद्राक्ष** पु. १. घोड्याचे एक लक्षण. ज्याच्या दोन्ही गंडस्थळी भोवरे आहेत असा घोडा; ज्यास कर्णमूळाच्या ठिकाणी एक व उरावर एक असे दोन भोवरे असतात त्यासही इंद्राक्ष म्हणतात.- अश्वप.[सं.]

**इंद्रिय** न. १. शरीराचे विशिष्ट कार्य करणाऱ्या किंवा बाह्य जगाचा वेगवेगळ्या प्रकारे अनुभव घेणाऱ्या शरीराच्या भागांपैकी प्रत्येक. अवयव; गात्र; ज्ञानाचे, कर्माचे साधन असलेला शरीराचा भाग. एकूण इंद्रिये अकरा. पाच ज्ञानेंद्रियें, पाच कर्मेंद्रिये व मन : 'अकराही इंद्रियवृत्ती । कैशा लागती भगवद्भक्ती ।'- एभा २.२९३. २. पुरुषांचे जननेंद्रिय.[सं.] (वा.) **इंद्रिय हाती धरणे**- जार कर्माचे अतिशय व्यसन असणे; अति विषयासक्त असणे; उन्मत्त होणे.

**इंद्रियकदंब** पु. इंद्रियांचा समुदाय असा देह : 'मग तो इंद्रियकदंबु । करविजे तंव राबू ।'-ज्ञा १८.५०२.

**इंद्रियगम्य-गोचर- ग्राह्य** वि. इंद्रियांना आकलन होणारे, कळणारे, जाणवणारे; इंद्रियांना ग्रहण करता येण्याजोगा. 'वास्तवाचाच कल्पनाजन्य व इंद्रियगोच असा अवतार आहे.'- अँका २७.[सं.]

**इंद्रियग्राम** पु. १. इंद्रियसमूह; सर्व इंद्रिये. २. इंद्रियांचे स्थान. [सं.]

**इंद्रियजन्य** वि. इंद्रियोद्भव : इंद्रियापासून झालेले. [सं.]

**इंद्रियजुलाब** पु. १. मूत्ररेच; मूत्रढाळ; मूत्राधिक्य होण्याचे औषध. २. बहुमूत्र; मूत्रवृद्धी.

**इंद्रियदमन** न. १. इंद्रियांना कह्यात, स्वाधीन ठेवणे; मनोविकार दाबणे, दडपणे. २. विषयाकडे असलेला इंद्रियांचा ओढा नाहीसा करण्याचे योगसाधनादी उपाय. [सं.]

**इंद्रियद्रव्य** न. इंद्रियरूप द्रव्य (कोणी आत्मसंयमरूप अग्नीमध्ये ते कायिक, वाचिक व मानसिक या तीन युक्तिमंत्रांनी पवित्र अशा या इंद्रियरूप द्रव्याचे हवन करतात.) : 'एक संयमाग्नि होत्री । ते युक्तित्रयाच्या मंत्रीं । यजन करिती पवित्रीं । इंद्रियद्रव्यीं ।।' - ज्ञा ४.१२६.[सं.]

**इंद्रियनिग्रह** पु. विषयवासनेवर ताबा ठेवणे; कामविकार कह्यात ठेवणे; संयम; ब्रह्मचर्य. [सं.]

**इंद्रियपीठ** न. इंद्रियांचे स्थान, ठिकाण : 'म्हणौनि चक्षुरादिकिं दाहें । इंद्रियपीठीं सानुग्रहें ।'- राज्ञा १८.३४८. [सं.]

**इंद्रियप्रौढी** स्त्री. इंद्रियांचे सामर्थ्य : 'तैसी सर्ववृत्तिवैभवीं ।' बुद्धिचि एकली बरवी । बुद्धीही बरव नवी । इंद्रियप्रौढी ।।'- राज्ञा १८.३४६.

**इंद्रियमद** पु. इंद्रियांचे स्वैर वर्तन; उन्मत्तपणा : 'कां जालिया सकळ संपदा । जो अनुसरैल इंद्रियमदा ।'- ज्ञा ३.१०३. [सं.]

**इंद्रियवर्ग** पु. विविध इंद्रिये : 'इंद्रियवर्गीं दाखविलिया । विरुद्धा अथवा भलीया ।- ज्ञा १६.७८. [सं.]

**इंद्रियविज्ञानशास्त्र** शास्त्र न. इंद्रियांच्या रचनेची, व्यापारांची माहिती देणारे शास्त्र. [सं.]

**इंद्रियषट्पदाचारी** वि. पाच ज्ञानेंद्रिये व मन अशा सहा इंद्रियरूपी पायांचा (जीवभ्रमर) : 'वेद्योदकाच्या सरोवरीं । फाकता विषयकल्हारीं । इंद्रियषट्पदाचारी । जीवभ्रमरातें ।।'-ज्ञा १८.१३०१ [सं.]

**इंद्रियागम्य** वि. इंद्रियांना आकलन न होणारे; इंद्रियागोचर; इंद्रियातीत; न जाणवणारे; आकलनाच्या पलीकडचे. [सं.]

**इंद्रियार्थ** पु. इंद्रियाचा विषय (रूप, रस, गंध स्पर्श, शब्द यांपैकी प्रत्येक विषय : 'जो या इंद्रियार्थां । नागवेचि ।'- ज्ञा २.१२४. [सं.]

**इंद्रियीकरण** न. (जीव.) इंद्रियरचना; इंद्रियविशिष्टता. [सं.]

**इंद्रुसयारी** स्त्री. (नाविक.) गलबतावरील डोलकाठी व शीड उभारण्याची दोरी; यारी.

**इंधक** पु. (भौ.) इध्र.

**इंधन** न. १. सर्पण; जळण; जाळावयाची लाकडे; बेतण : 'जरि अमृत घालुं आंधणा । कापुर मेळउ इंधना :'- ऋ ५१. (ग्रा.) [सं.]

**इंधन पंप** (यंत्र) पु. १. द्रव इंधन कार्ब्युरेटरकडे ढकलणारा, मोटारगाडीमध्ये बसविलेला पंप. २. इंधन फेकणारा पंप.

**इंधनबदल** पु. (विअ.) इंधनातील स्थित्यंतर, चढउतार, अंशात्मक बदल.

**इंधनभरण** न. (स्था.) पेटवण. [सं.]

**इंधा** पु. प्रसूतीनंतर पुन्हा मासिकपाळी सुरू होण्यापूर्वीच गर्भधारणा होऊन झालेला मुलगा. (व.)

**इंधा** पु. चुलीसाठी मांडावयाच्या तीन धोंड्यांपैकी प्रत्येक. (व.)



**['ई' ने सुरू होणारे काही शब्द येथे न आढळल्यास 'इ', 'वी', 'यी' मध्ये पाहावेत.]**

**ई.** मराठी वर्णमालेतील चौथा वर्ण व स्वरमालेतील चौथा स्वर. स्थानपरत्वे ऱ्हस्व किंवा दीर्घ : 'सीता, भीरू इ. मध्ये ऱ्हस्व; शीत, मती इ.मध्ये दीर्घ.

**ई** सना. ही 'निंदा सकळ पापांचे माथा । ई परता असेना ।'- एभा ९.५०३.

**ई** (ई ऽऽऽ) उद्गा. किळस, भीती, उपहास, थट्टा इ. दर्शवणारा शब्द. साधारणतः कंठावरोधयुक्त व अतिदीर्घ. विशेषतः बायकी उद्गार.

**ई** संक्षेप. बहुमानार्थक ( शब्दाच्या शेवटी, आई या शब्दाचा संक्षेप. उदा. ताराई, जिजाई, मंगळाई इ.)

**ई** (व्या.) भावदर्शक प्रत्यय. (हा नामास, विशेषणास लावला असता तद्भावदर्शक भाववाचक नामे होतात. उदा. खूष-खुषी, गरीब-गरिबी, एक-एकी.) [फा.]

**ई** सना. हा, ही, हे (पूर्वीच्या काळी दरबारी पत्रात लेखक स्वतःबद्दल हे

संबोधन योजीत असे : 'ई जनाब') [फा. ईन्.]

**ईकुणाणोव** वि. एकुणनव्वद : 'आणी सारा तेयाची अंतउरी । ईकुणाणोविची - क्रिपु ९.१.

**ईचा** पु. संशय. [सं. वीचि= चंचलता.]

**ईट** न. भाल्यासारखे एक हत्यार. पहा : **इटा** [ते. ईटे]

**ईटबंदी** वि. विटांनी बांधलेले-ली (घर,भिंत).

**ईड** अ. बरोबर; समान; बद्दल; ऐवजी : 'वरकडास अर्धा मुलुकाचा महसूल ईड करून दिले.' - मएेशि १०२.४ [तंजा] [त. ईडु]

**ईडनिंबू-लिंबू** न. गधड लिंबू.

**ईडनिंबू-लिंबू** न. गधड लिंबू; लिंबाच्या जातीतले परंतु थोडे मोठे, आंबट फळ; याचा रंग पिवळा असून साल खडबडीत असते. याचे लोणचे घालतात. रसाचे लेमोनेड करतात. [का. ईळे]

**ईडपीड** पहा : **इडापिडा**

**ईड येणे** क्रि. पुरवणे; रेलचेल होणे.[का. इडिकू = दाटणे, घट्ट बसणे]

**ईडा** पहा **: इडा** : 'मेरू शिखर केवि न फोडी । ईडा पींगळाते' - उगी १७ (९) १.

**ईडेपाडे** क्रिवि. नेटाने; चढाओढीने; ईर्षेने. पहा : **इडेपाडे** : 'दोही दळीचे ईडेपाडें । द्याकर मांडिला चढेंचढें ।' - वेसीस्व ११.७२[ईड चे द्वि.]

**ईडेपिडे घेणे** क्रि. (बोटे मोडून) दृष्ट काढणे. पहा : **इडापिडा** : 'किती घेती ईडपिडे.'- वेसीस्व २.१४.

**ईड्य** वि. स्तुत्य; स्तुती करण्याजोगा : 'सद्‌गुणमंडित पंडित दंडि तपस्वीड्य । सद्विवेकपिता ।' - मोसभा ४.५७. [सं. ईड्]

**ईण-न** स्त्री. विहीण. (कर.) [विहीण अप.]

**ईत, ईती** स्त्री. अतिवृष्टी, अनावृष्टी, उंदीर, टोळ, पोपट, स्वचक्र, परचक्र या सात प्रकारांनी होणारा उपद्रव. [सं. ईति =उपद्रव]

**ईतवार** पु.आदितवार; रविवार. (खा.)

**ईथर** पु. १. पृथ्वीभोवती असलेले वायुरूप पदार्थांचे सर्वव्यापी वेष्टन; इंधक; आकाशतत्त्व; आकाशातील सर्व रिक्त स्थळास व्यापून टाकणारा तेजोवाहक पदार्थ. सूक्ष्म वायू. २. (रसा.) अल्कोहोलमधील हैड्रॉक्सिल गणातील हैड्रोजनच्या जागी अल्किल किंवा ॲरिल गण समाविष्ट झाल्याने बनलेले संयुग.

**ईद** स्त्री. मुसलमानी सण. ईदीचे दोन मुख्य सण आहेत. बकर ईद आणि रमजान ईद. रोजे-उपवास सोडण्याचा सण : 'नबाबास ईदेबद्दल वस्त्रे पावली नव्हती.'- दिमरा १.१६१. [फा.]

**ईदगा** पु. मुसलमान धर्मीयांचे प्रार्थनास्थान : 'मुसलमान... ईदग्यात नमाज पढण्यासाठी मिरवणुकीने जात.'- जीसे ३५२.

**ईदृश** वि. अशा प्रकारचा; असला. [सं.]

**ईन मीन तीन, ईन मीन सवा-साडे तीन** संख्येने अगदी कमी (माणसे); अगदी अल्प; थोडी संख्या (वस्तू, माणसे इ.) : 'या संस्थेच्या इन मीन तीन सभासदांपैकी दोघे बाहेर जाणार...' -सुदे २६२.

**ईप्सा** स्त्री. इच्छा. [सं.]

**ईप्सिणे** सक्रि. इच्छिणे : 'तैसें शतक्रतु यजिलें मातें । कीं ईप्सितातिस्वर्गसुखांतें ।'- ज्ञा ९.३१२. [सं. ईप्सा]

**ईप्सित** वि. इच्छिलेले; हवे असलेले : 'भोजाचे पुरवून ईप्सित मुनी तो होय अंतर्हित ।' - विक (भोज) १९.

**ई-फल** न. (ग.) $(१ + \frac{१}{क्ष})^{क्ष}$ या राशीची किंमत; क्षची किंमत (१, २, ३... अशा क्रमाने) अनंतापर्यंत वाढवत नेल्यास, ज्या अंतिम किंमतीच्या जवळ जाते ती किंमत.

**ईर** वि. जिच्या अंगात आले आहे अशी व्यक्ती : 'ईर तो टोणा फिरवीत चौफेर नाचू लागला.' -बारी १२१.[सं. वीर] (वा.) (अंगात) **ईर शिरणे-** बेभान होणे; स्वतःवरचा ताबा सुटणे : 'अंगात एक ईर शिरावा तसं त्यांनी भिमाचं कचाऽचा कुडकंच केलं.'- चिताक ८३.

**ईर** स्त्री. १. शक्ती, उत्साह; सामर्थ्य; तरतरी. २. सत्त्व; उत्कृष्टपणा; पक्केपणा व गुणक्षमता यांचा समावेश ज्यात आहेत असे (चुना, पीठ इ.) तत्त्व. पहा : **विरी** [सं. वीर्य]

**ईर** स्त्री. १. चढाओढ; स्पर्धा; चुरस. २. हरकत; अडथळा; तंटा (क्रि. धरणे, येणे). ३. बुद्धिबळात आपल्या राजास दुसऱ्याच्या मोहऱ्याचा बसणारा शह लागू पडू नये म्हणून आपले मोहरे/प्यादे मध्ये घालणे. (वा.) **ईर येणे-** अडथळा करणे; अडवणूक करणे. **ईरेस घालणे-** स्वतःच्या बचावास दुसऱ्यास पुढे करणे, धोक्यात घालणे. किल्ल्याचा दरवाजा फोडताना त्याला असलेले लांब लांब खिळे हत्तीच्या धडकेबरोबर त्याच्या कपाळात शिरू नयेत म्हणून मध्ये रोडकासा उंट घालणे. **ईरेस पडणे, चढणे-**चुरशीने, अभिमानाने पुढे सरसावणे; कंबर कसून कार्यास, लढण्यास उद्युक्त होणे : 'मोहरे मोहरे इरेसी पडती.'- सप्र २१.५१. **ईरेस पडणे, सापडणे-** धोक्यात, गोत्यात सापडणे; कठीण प्रसंगात सापडणे.

**ईरकामणे** क्रि. रकम लिहिणे : 'खुशनुदी ईरकाम करीत गेले पाहिजे.'- आंपव्य ५७. [फा. रकम]

**ईरतवान** हिंमतवान; ईर्षावान. (माण.) [सं. ईर]

**ईरतीने वागणे** क्रि. हिंमतीने वागणे. (माण.)

**ईरपीर** वि. अफाट, उद्योगी, धाडसी मनुष्य : 'हें पहा मिस् विलायत, मोठेमोठे ईरपीर हा गुंतागुंतीचा प्रश्न सोडवितां सोडवितां थकले.'- सुदर्शन ६५. [सं. वीरचा अप.]

**ईरेसरी** स्त्री. १. जिद्द; ईर्षा. २. वीरश्री. २. वरचढपणा.

**ईर्षा, ईर्ष्या** स्त्री. १. हेवा; मत्सर. २. चुरस; स्पर्धा; चढाओढ. ३. संकल्पित कार्य तडीस नेण्याविषयी अंगी असणारा अभिनिवेश, उत्साह, अभिमान; पहा : **ईर** (क्रि. धरणे, येणे) (वा.) **ईर्षा देणे-** एखाद्यास उत्तेजन देणे; उचलून धरणे; चढविणे. [सं. ईर्ष्या]

**ईर्षाद** स्त्री. इच्छा; अनुमती; आज्ञा; इरादा; संमती; हेतू : 'रावजीकडून राव पंतप्रधान यांस व मदारूल महाम यांस पत्रें लिहावावी व आमचेतर्फेनहि ल्याहावें म्हणोन ईर्षाद केली.'- मइसा ७.१९४. [फा.]

**ईर्ष्यालु-लू** वि. (विरू.) ईर्ष्यालू. १. ईर्ष्या बाळगणारा; उत्साही; वीरश्रीने युक्त. २. हेवेखोर; मत्सरी. [सं.]

**ईव** पु. पाठीच्या कण्याच्या दोन्ही बाजूचे मानेपासून कमरेपर्यंतचे फुगवटे; पाठीच्या सरांपैकी प्रत्येक. (व.)

**ईश** पु. १. ईश्वर २. राजा; मालक; धनी; सम्राट; अधिपती. सामा. शब्द- जगदीश, महेश, दिनेश इ. : 'जो प्रकाश्येवीण प्रकाशु । जो ईशितव्येवीण ईशु ।' - ज्ञा १५.५४६. [सं.]

**ईशान** पु. १.मालक; धनी; राजा. २. शंकर : 'राज्य त्यजिलें ईशानें । गुंति जाणोनि स्मशानें । वासु केला ।'-ज्ञा१३.२४. [सं.]

**ईशानी–न्य** स्त्री. उत्तर व पूर्व या दिशांच्या मधली उपदिशा; ईशान्य दिशा. [सं. ईश्, ऐशानी]

**ईशितव्य** न. ज्यावर स्वामित्व गाजवायचे आहे अशी वस्तू: 'जो ईशितव्येविण ईशु ।'- ज्ञा १५.५४६.

**ईशिता** स्त्री. १. प्रभुत्व; वर्चस्व. २. शंकराच्या आठ स्वरूपांपैकी एक; अष्टमहासिद्धींपैकी एक.

**ईश्वर** पु. १. परमेश्वर; जगाचा नियंता; देव. २. शंकर किंवा विष्णू; शंकराचे स्थान - रामेश्वर, ब्रह्मेश्वर. ३. स्वामी; राजा; सत्ताधीश; अधिराज. ४. अवाढव्यपणा, विशालता दर्शविण्यासाठी हा शब्द सामासिक शब्दात सढळपणे उपयोजतात. जसे- डोंगरेश्वर, धोंडेश्वर, खांबेश्वर, वाडेश्वर, पाटेश्वर, नदीश्वर, फुलेश्वर. ५. सर्वश्रेष्ठ या अर्थी शब्दाच्या शेवटी लावतात. जसे- कवीश्वर, योगीश्वर : 'तोचि भरंवसेनिसी । योगीश्वरु' - ज्ञा ६.४७. [सं.]

**ईश्वरकर्तृत्व, कृति** न. स्त्री. दैवी कृती; ईश्वराची करणी.[सं.]

**ईश्वरकृपा** स्त्री. परमेश्वराची कृपा; ईश्वरी कृपा; ईश्वरीप्रसाद.

**ईश्वरतनुचतुष्टय** ब्रह्मांडाची चार अंगे - महामाया, अव्याकृती, हिरण्यगर्भ व विराट.

**ईश्वरदत्त** वि. ईश्वराने दिलेले; दैवी. (ल.) उपजत; निसर्गदत्त. [सं.]

**ईश्वरदत्तभूमि–मी** स्त्री. परमेश्वराने दिलेला देश; परमेश्वरप्राप्त प्रदेश : 'यहुद्यांना पॅलेस्टाईन ही ईश्वरदत्तभूमि वाटते.'- ज्ञाको ३६०.

**ईश्वरनियमित** वि. ईश्वराने योजलेले, ठरवलेले.

**ईश्वरप्रणिधान** न. ईश्वराची आराधना. [सं.]

**ईश्वरप्रणीतता** स्त्री. अपौरुषेयत्व; मनुष्यनिर्मित नसलेली; ज्यांचे कर्तृत्व मनुष्याकडे देता येत नाही अशा बाबी ईश्वरप्रणीत आहेत असे मानतात.

**ईश्वरप्रसाद** पु. देवाची कृपा; ईश्वरकृपा. [सं.]

**ईश्वरप्रीति–ती** स्त्री. १. ईश्वराची मर्जी, प्रसन्नता. २. देवाची कृपा; ईश्वरीकृपा. ३. ईश्वराबद्दलचा जिव्हाळा, भावभक्ती. [सं.]

**ईश्वरप्रीत्यर्थ** क्रिवि. देवास आवडीचे म्हणून; देवास प्रसन्न करण्यासाठी; देवासाठी (दिलेले).

**ईश्वरभक्ति–क्ती** स्त्री. ईश्वराची पूजा, उपासना, आराधना इ. [सं.]

**ईश्वरभाव** पु. ईश्वरावर निष्ठा; आस्तिक्यबुद्धी; याच्या उलट अनीश्वरभाव. [सं.]

**ईश्वरमाया–माव** स्त्री. देवाने केलेला चमत्कार; देवाची लीला, कृत्य; देवाची करणी : 'आपण करूं जातां एक । प्रारब्ध घडवी अनेक । ईश्वरमायेचें कौतुक । ब्रह्मादिकां न कळेचि (अथवा नेणवेचि) ।'

**ईश्वरवाद** पु. (समाज.) जगात ईश्वराचे अस्तित्व आहे व सर्व घटना त्याच्याच इच्छेने, प्रेरणेने घडतात असे मानणारे तत्त्वज्ञान. [सं.]

**ईश्वरविद्या** स्त्री. (तत्त्व.) साक्षात्कारी मार्गाने ईश्वराचे, दैवी शक्तीचे अस्तित्व जाणून घेता येते असे प्रतिपादन करणारी तत्त्वप्रणाली.[सं.]

**ईश्वरशास्त्र** न. (तत्त्व.) १. 'थिऑलॉजिया' या मूळ ग्रीक शब्दाचा अर्थ ईश्वराविषयी (थिऑस) प्रवचन (लॉजिया) असा आहे. २. ईश्वराचे अस्तित्व व स्वरूप यांचा अभ्यास करणारे शास्त्र; धर्मशास्त्र. [सं.]

**ईश्वरशास्त्रवेत्ता** पु. ईश्वराचे अस्तित्व व त्या संबंधीचे शास्त्र जाणणारा.

**ईश्वरसत्ता** स्त्री. कोणत्याही बऱ्यावाईट घटनांमागे असणारी देवाची नियामक सत्ता; ईश्वरी सामर्थ्य. [सं.]

**ईश्वरसाक्षात्कार** पु. परमेश्वराचे दर्शन; देवाच्या अस्तित्वासंबंधी दृष्टांत.

**ईश्वरसूत्र** न. १. ईश्वरी योजना; ईश्वरी घटना; योगायोग; प्रारब्ध; दैव; नशीब. २. वधूवरांचा परस्पर विवाहसंबंध होण्यास कारणीभूत असलेला ईश्वरी संकल्प. [सं.]

**ईश्वराचा (घरचा) प्राणी** पु. देवानेच सांभाळलेला प्राणी; जिवंत प्राणी; असहाय मनुष्य; ज्यास कोणी आप्त मित्र नाही असा मनुष्य. (एखाद्याविषयी दया किंवा कीव दाखवताना वापरतात.).

**ईश्वराचा लाल** पु. देवाच्या मर्जीतला माणूस. ज्याची अतिशय भरभराट होत आहे असा माणूस; हरीचा लाल.

**ईश्वरार्पण** न. परमेश्वराला अर्पण करणे; देवाला वाहिलेली वस्तू.

**ईश्वरावतार** पु. १. देवाचा अवतार; मानवदेहधारी ईश्वर. २. (ल.) ज्यामध्ये दैवी गुण आहेत असा मनुष्य; पुण्यशील, उदार पुरुष.[सं.]

**ईश्वरी** स्त्री. शक्ती; दुर्गा; लक्ष्मी; सरस्वती; आदिमाया इ. देवता. वि. १. ईश्वरासंबंधीचा; ईश्वराने दिलेला. २. अतिशय भव्य, उदात्त, विपुल, अद्वितीय वगैरे अर्थीही वापरतात. जसे- ईश्वरी कोप, ईश्वरी आनंद, ईश्वरी प्रसाद, ईश्वरी बल, लाभ, सोहळा, संकेत इ. [सं.]

**ईश्वरी आनंद** पु. १. परमेश्वरस्वरूपात मानलेला आनंद, सुख. ईश्वराच्या ठिकाणी वाटणारा आनंद. २. परमेश्वरापासून मिळणारे सुख. ३. अत्यंत सुख; दैवी सुख; ब्रह्मानंद.

**ईश्वरी उत्पात** पु. दैवी आपत्ती, चमत्कार; भयंकर स्वरूपाचा सृष्ट चमत्कार (वीज, धूमकेतू, भूकंप इ.). [सं.]

**ईश्वरी ऋणानुबंध** पु. परमेश्वरी, दैवी घटना; ईश्वरी नेमानेम; विधिघटना; यदृच्छेने जुळलेले स्नेहसंबंध. [सं.]

**ईश्वरी करणी–कृत्य** स्त्री. न. परमेश्वरी लीला; ईश्वरकृत गोष्टी.

**ईश्वरी कळा** स्त्री. ईश्वरी लीला; परमेश्वरी कृत्य; देवाचे कौशल्य.

**ईश्वरी कौतुक** न. ईश्वरी लीला; ईश्वराने घडवून आणलेला चमत्कार; परमेश्वराची सृष्टिरचना, नियमन व प्रारब्धाधीन गोष्टी यांना हा शब्द योजतात.

**ईश्वरी गादी** स्त्री. न्यायासन; धर्मासन.

**ईश्वरी चेष्टा** स्त्री. परमेश्वरी कृत्य, खेळ; ईश्वरी लीला, कला.

**ईश्वरी जीव–प्राणी** पु. १. सृष्टीतील प्राणी. २. योगी; तापसी.

**ईश्वरी तंत्र** न. ईश्वरी घटना, योजना, कार्य, पद्धती; सृष्टिव्यापार चालण्यासाठी ईश्वराने करून ठेवलेली योजना.

**ईश्वरी तेज** सत्यशील माणसाचे तेज; सात्त्विक माणसाच्या ठिकाणी दिसून येणारी कांती, प्रभा.

**ईश्वरी देणे– देणगी** न. १. ईश्वराने दिलेली देणगी; प्रसाद. २. जन्मजात गुण; दैवी गोष्ट, देन.

**ईश्वरी नाश** पु. १. महाप्रलय; जगाच्या शेवटी होणारा मोठा प्रलय. २. (ल.) महासंकट; अरिष्ट; अनर्थ; दैवी आपत्ती.

**ईश्वरी नियम– नेम– नेमानेम** पु. दैवी घटना; ब्रह्मलिखित; सृष्टिनियम.

**ईश्वरी न्याय** पु. देवाच्या घरचा न्याय; खरा, वास्तविक न्याय.

**ईश्वरी पसारा** पु. ईश्वरनिर्मित सृष्टी, जग; जगदुत्पत्ती.

**ईश्वरी पुरुष** पु. १. साधू; वैराग्याशील, पुण्यपुरुष. २. भोळा, सरळ वृत्तीचा माणूस.

**ईश्वरी प्रसाद** पु. ईश्वराचा प्रसाद; देवाची कृपा.

**ईश्वरी फळ** १. देवाने दिलेली वस्तू; देवाची देणगी. २. पुत्र.

**ईश्वरी बल, बळ** न. अचाट शक्ती; असाधारण बळ; ईश्वरी पराक्रम; अलौकिक, अतिमानवी सामर्थ्य.

**ईश्वरी भावना** स्त्री. सत्प्रवृत्ती; पुण्यशीलता; साधुवृत्ती; परमार्थनिष्ठा.

**ईश्वरी महिमा** पु. ईश्वराचे सामर्थ्य, श्रेष्ठत्व, थोरवी; लीला, माहात्म्य.

**ईश्वरी माया** स्त्री. पहा : **ईश्वरमाया**

**ईश्वरी मुद्रा** स्त्री. दैवी मुद्रा, अत्यंत सतेज; तेज:पुंज अशी चर्या.

**ईश्वरी यंत्र** न. १. सर्व सृष्टी. पहा : **ईश्वरी तंत्र.** २. प्राणी, जीव, वनस्पती वगैरे ईश्वरनिर्मित वस्तुजात.

**ईश्वरी लाभ** पु. अकल्पितपणे झालेली अत्यंत मोठी प्राप्ती.

**ईश्वरी लाल** पु. पहा : **ईश्वराचा लाल**

**ईश्वरी लीला** स्त्री. ईश्वरी कृती, खेळ; परमेश्वरी कृत्य.

**ईश्वरी वाचा** स्त्री. देववाणी; आकाशवाणी, साक्षात्कार वगैरे स्वरूपाने किंवा एखाद्या महात्म्याच्या मुखातून प्रकट होणारी वाणी; ज्ञान.

**ईश्वरी संकल्प, संकेत** पु. विधिघटना; नेमानेम; प्रारब्ध.

**ईश्वरी साक्षात्कार** पु. देवाचे प्रत्यक्ष दर्शन; देवाने दाखविलेला चमत्कार; दृष्टांत. पहा : **ईश्वर साक्षात्कार**

**ईश्वरी सूत्र** पहा : **ईश्वरसूत्र**

**ईश्वरी सोहळा** पु. १. अत्यंत थाटाचा, शोभायुक्त उत्सव, आनंददायी प्रसंग (समाराधना, खेळ, मिरवणूक वगैरे). २. देवाप्रीत्यर्थ केलेला उत्सव, समारंभ ३. परमेश्वराच्या या सृष्टीतील घडामोडी, माणसाच्या आयुष्यातील घटना वगैरेंच्या चिंतनाने वाटणारा आनंद.

**ईश्वरी क्षोभ** पु. १. दैवी आपत्ती, अरिष्ट. २. दैवी कोप.

**ईश्वरेच्छा, ईश्वरी इच्छा** स्त्री. ईश्वरसत्ता; देवाची मर्जी.

**ईषण** न. इच्छा; अभिलाषा : 'ईषणत्रयाचा त्यागु:'– उगी १११.[सं. इष्]

**ईषणा** स्त्री. इच्छा; प्रेम; उत्सुकता; काळजी; आस्था; आसक्ती. सामा. शब्द–लोकेषणा; पुत्रेषणा; वित्तेषणा; दारेषणा. [सं. इष्]

**ईषत** क्रिवि. अंशत; थोडेसे; किंचित : 'तरी अधिक नोहे ईषत् । मर्यादा न संडी ।' – ज्ञा २.३५८. सामा. शब्द– ईषदुष्ण, ईषदारुण, ईषद्दर्शन, ईषन्मात्र; ईषत्कर. [सं.]

**ईषा** स्त्री. दांडा (गाडीचा, नांगराचा); इशाड; धुरा : 'चढला होता धांवुनि ईषेवरि नग्न करुनि तरवारी ।'– मोद्रोण ११.५०. [सं.]

**ईषिका** स्त्री. कुंचली; ब्रश : 'चित्रकाराची जशी ईषिका तशी वार्णिका कवीची ।।'– टिक १२२. [सं.]

**ईस** उद्गा. इश्श! ; छी.!; शी :! ; पहा : **इश्श**
स्त्री. न. तिरस्कार; विषाद; नापसंती. (वा.) **ईस म्हणणे**– १. तिटकारा, कंटाळा, नापसंती दाखवणे : 'ईस देखील म्हटली नाही.' २. एकदम दु:ख वाटून 'हाय' असे विव्हळणे.

**ईसा** पु. येशू ख्रिस्त.

**ईसा** स्त्री. ईर्षा : 'मारीन आपुलिया ईसा ।'– उषा १०.८०.[सं. ईर्ष्या]

**ईसायन** वि. ईशान्य दिशेतील : 'त्यांसि ईसायन कोणी मेलिकारु'– उषा १०.२१.

**ईस्टर** पु. गुडफ्रायडेनंतर पहिल्याच रविवारी ख्रिस्तपुनरुत्थापने निमित्त होणारा वार्षिकोत्सव; एक ख्रिस्ती सण. [इं.]

**ईहा** स्त्री. १. तीव्र इच्छा. २. हाती घेतलेले काम; उद्योग; व्यापार : 'या नांव काम जाण । कामक्रिया ते ईहा पूर्ण ।'–एभा २५.७. २. (मानस.) जाणीवपूर्वक व सहेतुक कृती करण्याची शक्ती; नियंत्रण ठेवण्याची, निवड करण्याची मनाची शक्ती; इच्छाशक्ती. [सं.]

**ईहित** वि. इच्छिलेले. [सं.]

**ईळभर** क्रिवि. दिवसभर; दीर्घकाल; पुष्कळ वेळ : 'ईळभराच्या कामानं ती मेटाकुटीला आली होती.'– ऊन ७३. (व.)

**ईक्षण** न. १. अवलोकन; पाहणे. २. डोळा; नयन : 'देवो उन्मेषसूक्ष्मेक्षणु । विघ्नराजु ।।'– ज्ञा १.१५. [सं. ईक्ष्]

**ईक्षणयंत्र** न. एक प्रकारचा आरसा. यात काचेऐवजी धातूचा पत्रा असून त्यावरून किरणांचे योग्य तऱ्हेने पृथक्करण होण्याकरिता तो घासून चांगला चकचकीत केलेला असतो. याचा उपयोग शस्त्रक्रियेच्या वेळी आंतरेंद्रिये पाहण्यास तसेच परावर्तक दुर्बिणीत करतात. [सं.]

**ईक्षणे** सक्रि. पाहणे; बघणे : 'ईक्षोनि शिष्यांचा मेळा दयाळु ।' – दावि २२२. [सं. ईक्ष्]

**ईक्षित** वि. पाहिलेले; अवलोकन केलेले.



उ मराठी वर्णमालेतील पाचवा वर्ण व स्वरमालेतील पाचवा स्वर. स्थानपरत्वे ऱ्हस्व किंवा दीर्घ जसे -मुळा, शुल्क इ. मध्ये ऱ्हस्व; किंतु, परंतु इ. मध्ये दीर्घ.

उ उपसर्ग उलट क्रिया, विरोध, अभाव, अपकर्ष इ. अर्थी क्रियापदांना लागणारा एक उपसर्ग. उदा. उसवणे, उवळणे, उलगडणे इ.

उ पु. शिव; विष्णू (ओम्‌मधील दुसरा घटक उ म्हणजे विष्णू) : 'उकार विष्णुरव्यक्त.' - गुच २.१३०.

उं उद्गा. अँ :; 'काय' या अर्थी आश्चर्यार्थक किंवा प्रश्नार्थक उद्गार; बेपर्वाई, नाखुषी इ. व्यक्त करणारा शब्द. उच्चार अतिऱ्हस्व आणि अनुनासिक.

**उइला** वि. उवांनी भरलेला.

**उक** स्त्री. १. झळ : 'माझिया विरहाग्नीची उक तूं कैसेनि साहसी.' - भाए ७०. २. उकळी; उठावा. [का. उक्कु = ऊत येणे, कढ येणे.]

**उकट** पहा : **उकड**

**उकटणे** उक्रि. १. जात्याला टाका देणे. २. (ल.) तोंडावर देवीचे वण उठणे-पडणे. [सं. उत् + कृत् = फाडणे, तुकडे करणे.]

**उकटणे** उक्रि.१. उलथणे (तव्यावरील पोळी वगैरे.) २. पहा : **उचकटणे** (राजा) [सं. उत्कथन]

**उकटाई** स्त्री. १. जात्याला टाकी देण्याची मजुरी. २. टाकी देण्याचे काम.

**उकटी** स्त्री. १. जात्याला टाकी दिल्यावर (जात्याची रेव जावी म्हणून) दळण्यात येणारे मूठभर धान्य २. टाकी देण्याचे हत्यार; टाकी. ३. नवीन टाकी दिलेल्या जात्यावर दळलेल्या धान्याच्या रस्त्यावर घातलेल्या फुल्या, वर्तुळे : 'कल्पतरू तळवटीं असें सूर्यकरांची उकटी.' - उगी ६१३. ४. टाकी दिल्यावर दळलेल्या रेवेच्या पिठाच्या फुल्या ओलांडल्यामुळे टाचेस अगर तळव्यास येणारे फोड, गळवे.

**उकटी** पु. दाह, उष्णता : 'कल्पतरू तळवटीं । असें सूर्यकरांची उकटी'- उगी ६१३.

**उकटीव** वि. टाकी दिलेले; नवे केलेले; दुरुस्त केलेले (जाते).

**उकड** स्त्री. १. मोदक वगैरे करण्याकरिता शिजवून केलेले तांदूळ वगैरेचे पीठ. (क्रि. तिंबणे.)
वि. उकडलेला; शिजवलेला. [सं. उत्क्वथ्]

**उकड** क्रिवि. उकिडवा; चवड्यावर, मांडी न घालता (बसणे.) : 'म्हणोनि उकड बैसोनि.' - पंच १.११.

**उकडआंबा, उकडांबा** पु. पाडाचा आंबा उकडून तोंडी लावण्यासाठी करतात तो. तो बरेच दिवस टिकावा म्हणून पाणखारात घालून ठेवतात.

**उकडगरे** पु. गरे शिजवून उकडून केलेली भाजी. फणस जून असला म्हणजे त्याची अशी भाजी करतात.

**उकडणे** उक्रि. १. शिजवणे; उष्णता लावून पदार्थ मऊ करणे : 'तेणें सर्वही उकडती । अस्तिमांस ।।' - दास ३.१.३०. २. हवेत उष्णता भासणे; गुदमरणे. ३. (सोनारी.) (कढवलेल्या तेलाने) मळ किंवा घाण काढून टाकणे. [सं. उत्+क्वथ्]

**उकडपीठ** न. तांदळाचे वगैरे उकडलेले पीठ.

**उकडपेंडी** स्त्री. रव्याला फोडणी देऊन तयार केलेले एक रुचकर खाद्य.

**उकडपोळी** स्त्री. उकडीत गव्हाच्या सांजाचे पुरण घालून केलेली पोळी.

**उकडरस्सा** पु. मांस, हाडे यांपासून केलेला रस्ता.

**उकडलोणचे** न. उकडलेल्या लिंबांचे किंवा मिरच्यांचे लोणचे.

**उकडवा, उकडा** क्रिवि. उकिडवा; चवड्यावर बसलेला. (गो.)

**उकडहंडी** स्त्री १. मडक्यात वाल, भुईमूग व इतर काही फळभाज्या घालून, ते बंद करून, भुईवर पालथे ठेवून आणि वर विस्तव ठेवून त्यातील पदार्थ शिजवण्याची पद्धत. २. अतिशय उकाड्याची जागा.

**उकडा** वि. मीठ, मिरची, मसाला न घालता केवळ उकडून काढलेला (भाजी इ. पदार्थ).
पु. पहा : **उकाडा**

**उकडातांदूळ** पु. भात (साळी) प्रथम उकडून मग कांडून तयार केलेले तांदूळ.

**उकडीचे मोदक** नारळाचे सारण तांदळाच्या उकडीत घालून वाफेवर उकडलेले मोदक.

**उकडीव** वि. १. उकडलेले; शिजवलेले. २. पाण्यात घालून थोडी आच दिलेले (तांदूळ).

**उकढणे** क्रि. शिजणे, त्रस्त होणे : 'गाभिणी उकढली पुटांमाझि ।'- ज्ञा १३.२२७.

**उकणे** क्रि. ओकणे : 'काळीया विष उकुनि दवडिला ।' - गरा ७३.

**उकर, उकरी** पु. उकरून काढलेली माती. पहा : **उकीर**[सं. उत् + कृ]

**उकरड** स्त्री. नासाडी; खराबी; उकरडा. (कु.) [सं. उत् +कृ]

**उकरडा** पु. कचऱ्याची रास; घाण, गदळ वगैरे टाकण्याची जागा : 'जें क्लेशगांवींचा उकरडा ।' -ज्ञा १६.४०५. पहा : **उकिरडा** (वा.)
**उकरडा फुंकणे** - उनाडक्या करीत फिरणे; निरुद्योगी असणे; अत्यंत दारिद्र्यावस्था प्राप्त होणे. **उकरड्याची दैना फिटणे** - क्षुल्लक वस्तूचाही केव्हाना केव्हा तरी उत्कर्ष होणे. **उकरड्याची धन करणे**-चांगल्या वस्तूंचाही नाश, दुरुपयोग करणे. **उकरड्यासारखा वाढणे** - बेसुमार वाढ होणे (संकटे, कर्ज, मूल, दु:ख, रोपटे वगैरेंची.)

**उकरणे** उक्रि. १. खरवडणे; कोरणे; खणणे; पोखरणे; खवणे (उंदीर, घुशी वगैरे जमीन कोरून काढतात त्याप्रमाणे.). २. जमीन किंवा एखाद्या वस्तूवर खोदणे, कोरणे; (नख, दात, शस्त्र इ. च्या टोकाने) कोरून काढणे; खाचा पाडणे. ३. एखादी गोष्ट मुद्दाम पुन्हा उपस्थित करणे; कलह उपस्थित करणे; भांडणाचे मूळ पुन्हा वर काढणे. ४. खुबीदार प्रश्नाने खरी हकीगत एखाद्याच्या तोंडून वदविणे. अक्रि. भिंतीचा गिलावा, भांड्याचे कीट वगैरे सुटून येणे; भांड्यांना लागलेले अन्न भिजून निघण्याजोगे सैल होणे. [सं. उत्+कृ]
**उकरमणे** अक्रि. तवा वगैरेवरील खरवड, जळका अंश, खपल्या वगैरे दूर होणे; भांडे, वस्त्र वगैरेचे पापुद्रे, मळ, वगैरे सुटून येणे.

**उकराई** स्त्री. खोदकाम करण्यास लागलेला खर्च; खोदकाम.

**उकरी, उकरीड** पहा : **उकरडा, उकिरडा**

**उकरीव** वि. उकरून काढलेला; ओरखडलेला; कोरलेला; पोखरलेला; खवलेला.

**उकल, उकला** स्त्री. पु. १. उलगडा, गुंतागुंत सोडवणे; एकमेकांत अडकलेले धागे वेगळे करणे; गूढ गोष्टींचे स्पष्टीकरण : 'या सोपिया योगस्थिती । उकलु देखिला गा बहुतीं ।' – ज्ञा ६.३८७. २. उमज; खुलासा; बोध; संदिग्ध असे सर्व मुद्दे स्पष्ट करणे : 'कर्माचा उकल । होय ऐसें बोलों पाहतो बोल ।' – यथा ४.४१६. [सं. उत्कल्]

**उकलणे** न. (विणकाम.) रेशीम वगैरे उकलण्याची आटणी.

**उकलणे** उक्रि. १. सैल करणे; उलगडा करणे; गुंतागुंत काढणे; मोकळा करणे: 'देव्हूडियां वेणिआं उकलैलियां । उधवटां गांठीं सूटलियां ।' – शिव ७१६. २. फोडून निराळे करणे; दुफळी करणे; फोडणे; चिरणे; निराळा करणे.(गो.) पहा : **उकलास** ३. (ल.) विवरण करणे; स्पष्ट करणे; फोड करून सांगणे : 'उकलूं जाणे अंतर । प्राणीमात्राचें ।'–दास १४.७.१२. ४. सुटका करणें; मुक्त करणे : 'संसारी गुंतोन काये । उकलवीं ऐसें हृदयें । तो सत्त्वगुण ।'–दास २.७.४३.

अक्रि. १. स्पष्ट होणे; उघडणे; मोकळी होणे; सुटणे: 'अंगीं उटी दिसे सुढाळ । कीं इंदुबिंब उकललें निर्मळ ।'– हरि ७.११. २. उलणे; विकास पावणे; उमलणें (जमीन, फूल, कळी, दात वगैरे) : 'उकळतेनि उन्मेखें । प्रज्ञाकुशलतेचीं तिखें ।' – ज्ञा १५.१८५. [सं. उत्+कल]

**उकलाउकल** स्त्री. १.पुन:पुन्हा सोडबांध. २. घडामोड; विचार न करता करणे व पुन्हा मोडणे. [उकलचे द्वि.]

**उकलास** पु. देवाच्या नावे निराळा राखून ठेवलेला भाग; संकल्प.(गो.) [उकलणे]

**उकलीव** वि. १. सुटलेला; उलगडलेला; सोडवलेला; मोकळा केलेला. २. उमललेला; विकास पावलेला. ३. तडकलेला; उलटलेला; उललेला. ४. स्पष्ट, साफ केलेला. ५. घडी मोडलेले (कापड वगैरे.)

**उकवण, उकवीण** न. १. जखमेतील कीड (किवण) नाहीशी करणारा मंत्र. (को.) २. तो मंत्र म्हणण्याचा विधी, प्रयोग.(उ+किवण) [सं. कृमि+व्रण]

**उकवणे** पहा : **उकावणे**

**उकशी** एक लहान रानझुडूप.

**उकसणे** क्रि. १. अस्ताव्यस्त करणे. (राजा.) पहा : **उसकटणे** २.खरचटणे. (ना.) [सं. उत्+कृष]

**उकसवाकस** स्त्री. विस्कटणे; उसकाउसक : 'कोठ्यातल्या कुटारात भीमा उकसवाकस करीत होता.' – बाविबु २५०.

**उकळ** स्त्री. १. कढ. पहा : **उकळी** २. काढा. पहा : **उकाळा**

**उकळ बिंदु** पु. उष्णतामानाच्या ज्या अंशावर एखादा द्रव पदार्थ उकळू लागतो तो अंश.

**उकळणी** स्त्री. १.वसुली. २. लुबाडणूक : 'म्हणून त्यांनी ही उकळणी चालविली आहे.' – स्मृचि ७४.

**उकळणे** अक्रि. द्रवपदार्थ वाफ येईपर्यंत, उकळी फुटेपर्यंत तापवणे; रटरटा शिजणे; आधण येणे; बुडबुडे उत्पन्न होणे; खदखदणे; उसळणे; सळसळणे; कढणे; कढ येणे.

उक्रि. शिजवणे; कढवणे; काढा करणे; अर्क काढणे; उकाळा काढणे.

**उकळणे** उक्रि. इच्छा नसताना देणे भाग पाडणे; (पैसा, अन्न, भिक्षा वगैरे) वसूल करणे; जबरदस्तीने घेणे; गोळा करणे; लुबाडणे; उपटणे; 'कवडें उकळीं भूतळीं ।' – शिव १६२.

**उकळा** पु. १.लोकांकडून हक्कदाराने किंवा कुळांकडून सावकाराने गोळा केलेली बाकी, वसुली; उगरण. २. भीक मागून जमा केलेला संग्रह. ३. दुसऱ्याकडून उपटलेला जिन्नस; वस्तू.

**उकळी** स्त्री. १. उकळण्याची क्रिया; कढ; आधण. (क्रि. फुटणे, येणे.). २. उमाळा; उत्कट इच्छा; उत्कंठा; आचः 'ब्रह्मा उपजला नाभिकमळीं । त्याच्या मनीं सृष्टीची उकळी ।' – यथादी १०.१५७. ३. प्रेम, दु:ख, राग इ. मनोविकारांचा उद्रेक किंवा भरते येणे; उमाळा (क्रि. फुटणे, येणे.) : 'रामकृष्णरंगीं रसना रंगली । अमृत उकळीं नाम तुझें ।' –तुगा २५०२. ४. वाहणारे पाणी अडले असता होणारी अवस्था; लाटा; पाण्याची खळबळ : 'वळणें वांकणे भोंवरे । उकळ्या तरंग झरे ।' – दास ११.७.३.[सं. उत् + कल्] (वा.) **उकळी फुटणे** – १. आधण येणे. २. अनावर हसू येणे.

**उकळीत** स्त्री. १. येणे असलेल्या पैशांची वसुली; उकळणी. २. भीक मागून मिळवलेला जिन्नस. ३. विकण्याकरिता आणलेल्या बागाईत किंवा किराणा मालावर ऐनमालाच्या रूपाने वसूल केलेली (शेखदाराने) रक्कम; करवसुली. ४. पाटलाने रयतेकडून वसूल केलेला सरकारी सारा. ५. प्रत्येक हप्त्याची जी येणे रक्कम असेल त्या बाबतीत धारेकऱ्यांना पाठवलेला फिरता हुकूम, याद, हिशेबाचा कागद अगर स्मरणपत्र. [सं. उत्कल्.]

**उकळेगिरी** स्त्री. लुटालूट; लुबाडणे; दरोडा.

**उकळ्या** वि. धान्य, पैसा वगैरे बिगरहक्काने घेणारा; लुबाडणारा.

**उकंडा** पु. उकिरडा. [सं. उत्+कृ]

**उका** स्त्री. १. उल्का; तुटणारा तारा. २. ठिणगी : 'नीगती अग्नीचिया उका.' – उषा ११२५. [सं. उल्का]

**उकाइती** स्त्री. उकळीत; लुटालूट : 'ह्या मुलखांत आपली उकाइती किफायतशीर होईल असें त्यास वाटलें.' – कोकि १३४.

**उकाडा** पु. १. रतीब; (दूध, भाजी, पाव, अंडी असे) पदार्थ रोज नियमितपणे घेण्यादेण्याची पद्धत, रीत. २. नियमित वेळी रकमा देणे, हप्ते देणे.

**उकाडा** पु. १. अतिशय उष्मा, गर्मी. २. (सोनारी धंदा) भांड्यांना, अलंकारांना उजळा देण्याकरिता चिंच, लिंबाचा रस, ॲसिड (तेजाब) किंवा इतर अम्ल पदार्थ आणि मीठ वगैरे कढवून तयार केलेले मिश्रण. (क्रि. देणे, करणे.)

**उकाड्याचे तेल** (सोनारी.) सल्फ्युरिक ॲसिड उकाड्यासाठी वापरतात म्हणून त्याचा पर्यायवाचक शब्द.

**उकार** पु. वर्णमालेतील 'उ' हे अक्षर; ॐकाराची (अ, उ, म, यांपैकी) दुसरी मात्रा : 'उकार उदर विशाल ।' – ज्ञा १.१९.

**उकाल** पु. १. निवाडा. २. सुटका; वेगळे होणे; निसटणे; मुक्तता. ३. स्पष्टपणे दिसून येणे; बाहेर पडणे. ४. (प्र.) उकाला. आजारातून

उठणे; आराम वाटणे.(क्रि. पडणे, होणे.)

**उकाल** पु. हट्ट; नाद: 'परंतु यांनीं उकालच घेतला. शेवट आम्हास येऊन बाजीरावांनीं पुसिलें.' – पेद ६.८६.

**उकाल** स्त्री. ओकारी; उबळ; पोटातील मळमळ.

**उकाल** वि. क्रिवि. अवचित; अनपेक्षित; आकस्मिक; बेअंदाजी; निशाणावर न बसता पलीकडे गेलेला (तोफेचा गोळा) : 'तेथें खंडोजी निंबाळकर यांस दूर उभे होतो तेथें उकाल गोळी येऊन गुढघ्यावर लागली.' – पेद २८.१६२. [सं. अव+काल]

**उकालगोळा** पु. डोक्यावरून जाणारा गोळा : 'साही तोफा मिळून ३२ वार केले. वरून उकाल व दोही बाजूने चार पाच हाताचे अंतराने गोळे जात....' – नाग २.१७२.

**उकावणे** क्रि. १. वर येणे; चढणे; उंच होणे : 'मग मनीं उगलाचि उकावसी ।' – दावि १३२. २. इरेस पेटणे; भरीस पडणे : 'वदे भट नृपापुढें उकावला चढोवढें ।'– बसवकृत महाबळचरित्र ६. [सं. उत्+क्रम् = वर चढणे.]

**उकाशी** वि. १. उपरी (कूळ); स्थायिक नसलेला. २. काही शिल्लक न टाकणारा; उधळ्या. (गो.)

**उकासु** प्रवासी. [सं.उत्क्रम]

**उकाळ** पु. काढा.

**उकाळ** पु. नेम चुकून फुकट गेलेला तोफेचा गोळा.

**उकाळ** पु. १. निवाडा; निकाल. २. पहा : **उखाळ**

**उकाळा** पु. १. उकळी. २.काढा. ३. काही अम्ल पदार्थ, क्षार किंवा मीठ, तांब्याचा तुकडा वगैरे घालून उकळलेले पाणी. विष खाल्लेल्या माणसाला हे मिश्रण उलटी होण्यासाठी देतात.

**उकाळा** पु. १. गावातील हक्कदाराचा हक्क वसूल करणे; खेड्यातील बाजारात येणाऱ्या जिनसांवर हक्कदारांचा (बचकभर घेण्याचा) हक्क. २.येणे असलेल्या पैशांची वसुली.

**उकिडवा** वि. गुडघे पोटाशी येतील अशाप्रकारे जमिनीवर पावले टेकून बसलेला (माणूस). [सं. उत्कटक]

**उकिरडा** पु. १. केर टाकण्याची जागा; केराचा ढीग. २. उकिरड्यावरची राख (बागेच्या खतासाठी).[सं. उत्+ कृ. उत्किर] (वा.) **उकिरडा फुंकणे–** १. दारिद्र्यामुळे, बेकारीमुळे, निरुद्योगीपणामुळे, आळसामुळे भटकणे; क्षुद्र लाभासाठी भटकणे; नको तेथे रिकामे हिंडत राहणे. २. वेश्यागमन करणे; बाहेरख्यालीपणा करणे; व्यसनी लोकांच्या अड्ड्यात जाणे. : 'बाहेर जाऊन दहा उकिरडे फुंकून येतील.' – बाय २.१.

**उकिरड्यावरचा शेणगोटा** कुचकामाचा; निरुपयोगी : 'आम्ही काय उकिरड्यावरचा शेणगोटा !' – इंप ६१.

**उकिरड्यावरचे रत्न** १. हीन कुळात जन्मलेले गुणी मूल. २. गलिच्छ, घाणेरड्या ठिकाणी मिळालेली मौल्यवान वस्तू.

**उकिरडी भाजी** हलक्या प्रतीची (उकिरड्यावर उगवणारी) माठाच्या जातीची भाजी.

**उकिरवळी** स्त्री. पोपडा. पहा : **उकीर** : 'जमिनीच्या उकिरवळ्या...' – सूर्योदय १८४. पहा : **उखरवळी**

**उकीर** पु. १. उकरून काढलेली माती (घूस, उंदीर इ.नी); उकरलेल्या मातीचा ढीग : 'घुसी उंदरांसी ठेउनी मंचकीं । काय उकीर शेखी काढितीना ।' – बगाथा ५३८. २. ओल्या जमिनीवर शेण वगैरे पडून त्याचे निघणारे पोपडे; उखळलेली जमीन : 'उकीर तर जागोजाग दिसत होते.' – माचु २७. ३. डोळ्यांतील चिकट स्राव. ४. (सामा.) उकिरडा; कचरा : 'उत्पात विविध होती मणिकांचनमय सभेंतही उकीर ।' – मोमौसल १.२६. [सं.उत्+कृ ; उत्किर]

**उकुडवा, उक्कड** वि. उकिडवा. (तंजा.)

**उक्त** वि. १.बोललेले; म्हटलेले; सांगितलेले. सामा. शब्द – तदुक्त, मदुक्त, ईश्वरोक्त : 'तरीं आतां जाणें म्यांचि उक्त दोन्हीं ।।'– ज्ञा ३.३४. २. प्रकट; व्यक्त. [सं.]

**उक्तनिर्वाह** पु. बोललेले करणे; वचन पाळणे; आपले शब्द कायम ठेवणे. [सं.]

**उक्तनिर्वाही** वि. बोललेले करणारा; वचन पाळणारा; आपले बोलणे खरे करून दाखवणारा.

**उक्ता** वि. तयार. उदा. 'उक्ता कपडा.'

**उक्ता, उक्ती, उक्ते** क्रिवि. वि. १. वजन, माप न करता राशीवारी (केलेली खरेदी किंवा विक्री); घाऊक ठोकळ; मोघम (आकार). २. मक्त्याने अगर खेपेवारी अगर केलेल्या कामाप्रमाणे (दिलेली मजुरी); खंडाने (दिलेली जमीन). ३. सरसकट; सगळे; मोजके; एकंदर कामाची किंवा वस्तूची किंमत ठरवून करायचा (व्यवहार) : 'उक्तं कांम घेतलंय् मी हे नंबर छापण्याचं.' – व्यंमाक ६९.

**उक्ता दर** (अर्थ.) अंगावर दिलेल्या कामाचे स्वरूप पाहून दिला जाणारा ठरावीक दर.

**उक्ति–क्ती** स्त्री. १. भाषण; वचन; वाक्य; बोलणे : 'तैसें व्यासोक्तितेजें धवळत ।' –ज्ञा १.४१ २. वचनरूप प्रमाण; म्हण; सुभाषित.[सं.]

**उक्ती** स्त्री. युक्ती : 'आपण होता तेथें । नेऊनि त्या प्रेमळांते । उक्ति प्रयुक्ति त्यांतें । प्रेमसंलुप्त करोनी ।' – रास १.३७.[युक्ति अप.]

**उक्ती, ओक्ती** स्त्री. एका लांब काठीस एका बाजूस जड दगड व दुसऱ्या बाजूस भांडे लावून विहिरीतून पाणी काढण्यासाठी केलेले साधन. (को.) [सं. उत्क्षिप्त]

**उक्ते** वि. १. उघडे; रिकामे. २.कापलेले. (गो.) [सं. उत्कृत्त]

**उक्ते भाडे** न. उक्ता खंड.

**उक्ते माप** ठोकळ, अंदाजी माप.

**उक्थ, उक्थ्य** न.१. ईश्वरस्तुतिपर सूक्त. यज्ञाच्या वेळी आहुती देताना जे मंत्र म्हणतात त्यांत परमेश्वराची स्तुती असते. ते ॐसहित म्हटले म्हणजे मननपर होतात.२. सोमयागाचा एक प्रकार; एक सोमसंस्था. [सं.]

**उक्रंडा** पहा : **उकिरडा** (व.)

**उक्साबुक्शी, उक्शाबोक्शी** पहा : **ओक्साबोक्सी**

**उखई** स्त्री. १. फजिती; उपहास; थट्टा; चेष्टा झालेली स्थिती. २. उघडकीस येणे; बाहेर येणे. [सं. उत्त+खिद्]

**उखका** पु. भावार्थ; कर्तव्यार्थ.

**उखटणे** सक्रि. ढलपे काढणे; उखडणे.(माण)[सं. उत्+कृत् = कापणे]

**उखड** स्त्री. हिसका : 'पठाणाने मला दिलेल्या उखडीमुळे मी जो उडालो...' -गुमा ६३.

**उखडणे** उक्रि. १. उखणणे; खणून काढणे; उस्कटणे; उखळणे; मुळासकट उपटून काढणे: 'नटाचा एक हातच उखडला.' - सासं १०५. २. जमिनीचे सारवण, लाकडाचे पॉलिश, वर्ख इ. निघून येणे, काढून टाकणे किंवा खराब करणे. ३. (ल.) काढून देणे; घालवून देणे; उच्चाटन करणे (कामावरून, जागेवरून). ४. रागावणे; एकदम संतापणे; भडकणे. [सं. उत् + खन्]

**उखडंपट्टी** स्त्री. १. उचलबांगडी; हकालपट्टी. २. ताशेरा; भोसडपट्टी; हजेरी; रागावून बोलणे; निर्भर्त्सना. (व.)

**उखड्या** पु. माशाची एक जात. याचे शरीर लहान व डोके मोठे असते. हा मासा नदी, ओढ्यात सापडतो. (जुन्नरी)

**उखणणे** सक्रि. पोपडे निघणे; खळगे पडणे: 'तिथल्या उखणून गेलेल्या खळग्याच्या जमिनीवर...'- डोह १९७.; (तक्तपोशी, गच्ची, इ.) खणून काढणे; उखळणे. [सं. उत् + खन् ]

**उखणी** स्त्री.भाषा: 'तेथें नाही उखणी । एकला एकपणी ।'-ज्ञागा ५००.

**उखता, उखते** वि. सर्व. पहा : **उक्ता** : 'भक्तीची जोडी ते उखत्याचिसाठी । उणें पुरें तुटी तेथें नाहीं ।' -तुगा २०९८.

**उखर** वि. लागवड होत नाही अशी माळवट नापीक जमीन; रेताड, डोंगराळ जमीन; बरड : 'कृषीवल पेरणी करीं । भूमीपाडें पिकती घुमरी । अंकुरेना क्षितितळीं उखरीं । तें बीज निर्धारी अतिशुद्ध।' - एभा ११.१०३१. [सं. ऊषर]

**उखर** वि. फटकळ, कठोर : 'असतां आहाच उखर । अन्यथा होए आणिकांचे आंतर ।'-मूप्र २४५.

**उखरड** स्त्री. खडबडीत जागा :'पाळणां लेकरूं उखरडीं निजविलें ।' - स्मृस्थ ११२.

**उखरडणे** सक्रि. खरवडणे; घासून काढणे : 'सूतारु चुना उखरडीत असति ।'- लीच १.३९.

**उखरडा** पु. १. स्वार : 'मळ्यानिळाचे उखरडे । आसुडीति वैराग्याचीं दींडें ।'-उगी ४३६. २. शत्रूची बातमी आणणारा आघाडीचा सैनिक : 'उखरडां धागाईले : मंडळीक निगाले ।'- शिव ५०३.

**उखरडे** न. १. समुदाय; सैन्य : 'तें देखौनि पातलें उखरडें यादवांचें ।' - शिव ९६५. [सं. उत्कर]

**उखरवळी** पापुद्रा; ढलपा; पोपडा; खपली. पहा : **उकीर** [सं. उत्+कृ]

**उखरवाखर, उखरापाखर, उखरपाखर, उखरवखर** वि. १. खालवर; खडबडीत; उंचसखल; खोल खड्डे असलेली (जमीन, पृष्ठभाग वगैरे). २. अस्ताव्यस्त; न लावलेले; चिवडलेले (कागद, अन्न इ.).

**उखरी** स्त्री. १. पहा : **उखरवळी** २. निखाऱ्यावर भाजलेली पोळी.

**उखरे** न. लेणें; गुहा : 'वनें तपोवनें जें जें उखरें ।।' - भारा बाल ७.२५. [सं. उत् + कृ]

**उखरेव** स्त्री. गुंताडा :'परि आधीनु कां नांगवे । हेंचि कैसेनि जाणावें। गुणाचिये उखरेवे । माजि असता ।'-ज्ञा १४.३२५.

**उखलणी** पहा : **वखरणी** : 'सेताचें उखलणीस नांगर.' -मसाप २.६६.

**उखलणे** सक्रि. वर उचलणे. (खा.)

अक्रि. उठणे : 'ज़ाधवरायास उखलू दिले नवतेच.' - पेद १.१.

**उखलाड** स्त्री. उचलणे आणि ठेवणे; हलवाहलव; काढघाल; हलवणे आणि ठेवणे; अस्ताव्यस्त करणे. (को.)

**उखलाशी** वि. हंगामी; कायम न टिकणारा; काढून टाकता येण्याजोगा. तात्पुरता. (कर.)

**उखळ** न. १. कांडण्या-सडण्यासाठी दगड खोदून अगर लाकडाचा ओंडका पोखरून केलेला खोलगट भाग : 'उखळांत घालून करी कांडण । आपुल्या करें मज देखतां ।' - मुरंशु ४१३. २. दारू उडविण्यासाठी टोकाला वाकडी असलेली धातूची नळी. (वा.) **उखळ काढणे** – दोषांचा पाढा वाचणे; मागील सर्व गुन्हे, चुका वगैरे उकरून काढून पुढे मांडणे; फटफजिती करणे. **उखळ पांढरे होणे** – वैभव प्राप्त होणे; नशीब उघडणे; अमाप द्रव्य मिळणे (गरिबाच्या घरी उखळाला काही काम नसते तेव्हा ते पांढरे असत नाही यावरून.) **(एखाद्याच्या) बेंबीचे उखळ होणें** – चमचमीत खाद्यपेये मिळाल्यामुळे दोंद सुटणे. (बेंबी उखळासारखी खोल होणे); शरीर पुष्ट होणे. **उखळामुसळाशी गाठ पडणे** – भांडणाऱ्या व झगडणाऱ्या माणसाचा सहवास घडणे. **उखळात घातला असता सतरा घाव चुकविणारा** – घालमेल, अफरातफर करणारा; कोणाच्या तावडीत न सापडणारा अर्थात द्वाड माणूस. **उखळात डोके घालणे** – जीव अतिशय धोक्यात घालणे; संकट, अनर्थ गुदरण्याच्या स्थितीत असणे, जाणे.

**उखळ** न. मुलींचा एक खेळ.

**उखळ, उखळणी** स्त्री. जमिनीची पहिली नांगरणी; फाळणी : 'उखळ, दूड नि तास अशा तीन नांगरटी झाल्याशिवाय...' तोरण १८. [सं. उत्खनन, उत्स्खलन]

**उखळण** स्त्री. १. फार वापरल्यामुळे खडबडीत झालेला जमिनीचा किंवा इतर कोणत्याही वस्तूचा पृष्ठभाग. २. पहिली नांगरणी : 'पावसाळ्यात आपण जी उखळण काढतो...' -आआशे २८७. [सं. उत्स्खलनी]

**उखळणी** स्त्री. (जमीन) उकरणे; उखळणे; खणून काढणे; मोडणे; तोडणे; तुकडे करणे : 'ही खननयष्टी शेतजमिनीच्या उखळणीसाठी वापरात असे.' - पुराको ३९.

**उखळणे** उक्रि. १. पहिल्याने शेत नांगरणे; (जमीन) फाळणे; उकरणे; खणणे : 'जमीन उखळून ठेवावी लागेल.'- शेलूक १११. २. उलगडणे; काढणे; मोडणे; निखळून टाकणे; (स्क्रू, खिळे, अडसर, पाय, हात, यंत्राचे भाग इ.) उपटून काढणे : 'तों रावणाचा उखळला हस्त । शस्त्र पडिलें धरणीवरि ।।' - मोउद्योग ११.११७. ३. (ल.) स्थान, नोकरी यावरून उच्चाटण करणे; निर्मूलन करणे; हाकलणे; ढळणे; नाहीसे करणे : 'उखळा धर्मासि म्हणसि तरि म्हणसिल बालिशा नभा उखळा ।' - मोभीष्म ७.४३. ४. (ल.) उधळणे; पराभव करणे. ५. फोडणे; फाडणे; सुटणे; विलग करणे : 'तयानें लाखोटा

उखळुनि असें जें उकलिलें ।' – सारुह ५.८३.

अक्रि. सैल होणे; तुकडे पडणे. (यंत्र वगैरेचा भाग) वेगळे होणे. [सं. उत् + स्खलन]

**उखळधुणी** स्त्री. उखळबेऱ्या किंवा शिवीगाळ करणे : 'माझा दाद्या तोही बोलला की तुझा दादला माझी उखळधुणी करतो.'– पेद १०९.

**उखळबेर, उखळाबेर, उखळबेरी, उखळाबेरी** स्त्री. १. पहिली व दुसरी नांगरणी; एकदा आडवे व एकदा उभे नांगरणे. २. उखाळ्यापाखाळ्या; उखळबेरीज : 'या उखळबेऱ्या काढीत बसण्यात काही अर्थ नाही.' – लोटिकेले १.४१५.

**उखळबेरीज** स्त्री. एखाद्याचे दुष्कृत्य उजेडात आणणे; एखाद्याचे दोषाविष्करण; टवाळकी करणे; टोमणे मारणे; उखाळी.(क्रि. काढणे.)

**उखळाउखळ** स्त्री. (एखाद्या यंत्राचे अवयव) विस्कटणे; उलगडून टाकणे; मोकळे करणे; काढघाल करणे; मोडतोड, तुकडे करणे. [उखळचे द्वि.]

**उखळापाखळ** पहा : **उखळबेरीज**

**उखळी** स्त्री. १. धान्य कांडावयाचे पात्र; डमरूच्या आकाराचे लाकडी, दगडी उखळ. २. भोवरा; आवर्त; गरगर फिरणारे पाणी. ३. उसाच्या चरकाच्या खुंटाचे आख ज्यात फिरतात ती पोकळी; (ओतकाम) चरकातील नराच्या डोक्यावरील खोबळा बसविण्याचे साधन. ४. दाराची कुसू फिरविण्यासाठी केलेली खोबण. (व.) ५. दारू गजाने ठोसून बार उडविण्यासाठी बनविलेला ठोकळा किंवा नळी.

**उखळीतोफ** स्त्री. मोठ्या कोनातून गोळे फेकणारी एक आखूड तोफ : 'बाजूला शत्रूनें उखळीतोफा व बंदुका सज्ज केलेल्या आहेत.' – माक्रांचि ३०७.

**उखळीबार** पु. धातूच्या नळीत ठेवलेल्या कोरड्या दारूवर लोखंडी सळई मारून केलेला बार : 'डुकरांना भीति दाखविण्याकरिता शेतातून उखळीबार होत होते.' – सराई.

**उखळी व लाटसांधा** खोबण व आत फिरणारी लाट, अशा तऱ्हेचा सांधा. उदा. खांद्याचे पोकळ हाड व त्यात दंडाचे हाड यांचा सांधा.

**उखळी सांधा** पु. (वै.) उखळामध्ये मुसळ ठेवल्याप्रमाणे रचना आणि आकार असलेला सांधा. हा सांध्याचा प्रकार खांद्याच्या व जांघेच्या सांध्यामध्ये आढळून येतो.

**उखळ्या** वि. (मधला टवका निघून उखळाप्रमाणे) खडबडीत झालेला, खाचा पडलेला (नाणे, पैसा, रुपया).

**उखंडा** वि. उघडा; अनाच्छादित. (व.)

**उखा** स्त्री. १.प्रातः काळ; पहाट; सकाळ; उषःकाल : 'करीं साधुहृदय-राऊळीं । मंगळउखा ।।' – ज्ञा ५.१४२. २. उषा; बाणासुरकन्या : 'उखाहरण पुण्यपावना ऐकावें चित्त देऊन ।' – गाणे.[सं. उषस्]

**उखाडपछाड** स्त्री. पराकाष्ठेचे श्रम; अति कष्ट; मेहनत; उपद्व्याप; यातायात; दगदग.

**उखाडे चारणे** सक्रि. बडवणे; ठोकणे : 'पोतदारानें आपल्या मंडळींस त्यांना धरण्यास सांगितलें, दोघादोघांनी एकेकास धरून उखाडे चारलें.' – व्यामा १५.१.२३. [हिं.]

**उखाणा** पु. पहा : **आहणा** १. कोडे; कूटप्रश्न. उदा. परडीभर फुले तुझ्याने मोजवेनात माझ्याने मोजवेनात. उत्तर– तारे. २. गुप्त, गूढ अर्थाचे वचन. ३. बायकोचे किंवा नवऱ्याचे नाव घेताना योजण्याचा काव्यमय प्रकार; पद्यात्मक नाव घेणे : 'सोन्याच्या ताटात चांदीची वाटी, चंद्रभागा झुरते गणपतरावासाठी.' – असामी १४. ४. लग्नात वधूवरांकडील बायकांनी परस्परांना उपरोधाने गमतीदार यमकात्मक वाक्ये रचून म्हणण्याचा एक प्रकार; (सामा.) यमकयुक्त टोमणे मारणे. (वा.) **उखाणा घालणे** – कूट प्रश्न टाकणे; कोडे सांगणे. **उखाणा घेणे** – पतीचे नाव घेताना त्या नावाभोवती काव्यमय शब्दांची सजावट करणे. **उखाणा सांगणे** – उखाणा ओळखणे; जिंकणे.

**उखाणा पोटरा, उखाण्या पोटऱ्यात येणे** कणसाची पोटे फुगून कणसे बाहेर पडण्याच्या पूर्वीची स्थिती; कणसे येण्याची वेळ.

**उखाणी** वि. कूट; कल्पित.

**उखार** वि. उथळ; माळवट (जमीन). पहा : **उखर**; बिनपाण्याचे थापडवट (शेत); वरकस (जमीन).

**उखार** पु. कच्च्या, कोऱ्या रेशमाच्या अंगची खळ.

**उखार काढणे** (जरतारी धंदा) कच्च्या रेशमाचा कडकपणा (ते पापडखारात भिजवून) काढून टाकणे.

**उखारणे** अक्रि. खळ किंवा खार निघून जाणे; खरबरीतपणा नाहीसा होणे; स्वच्छ निघणे : 'नातरी सादनिये भीतरी । वस्त्र चूरिजे पायावरी । उखारेना तया बाहेरी । या हेतू ।।' – ज्ञाप्र ८४९.

**उखारी** स्त्री. १. उसाचा मळा. २. दुकान.

**उखाळ** न. ओकारी, वांतीचे औषध; काढा : 'ढाळ आणि उखाळ देती ।' –दास ३.७.३३. (कों.)[सं. उत्स्खलन]

**उखाळी, उखाळीपावाखाळी,** स्त्री. वर्म; वैगुण्य; दोष; व्यंग; कमीपणा बाहेर काढणे; वैगुण्य काढून केलेले भांडण. (क्रि. काढणे) : 'कडमड्याचे जोशी एकमेकांच्या उखाळ्यापाखाळ्या काढीत.' – असामी १०. [उखळणेचे द्वि.]

**उखि, उखी** वि. मिथ्या; खोटा; वृथा : 'अरिसा आणि मुखीं । मी दिसें हें उखी ।।' –अमृ २.६५.

पु. स्त्री. मिथ्याभास : 'जो भवरुख जाणे । उखि ऐसा ।।' –ज्ञा १५.१४३.

**उखित, उखिता** वि. १. आगंतुक; उपरा; परका : अहो जीक एथ उखिता । वस्ती करूं वाटें जातां ।' – ज्ञा १३.३४.

२. उदासीन. : 'हेतू ठेवूनि परमार्था । देहीं वस्ती करूं जेवीं उखितां ।' – एभा ९.२५५. [सं. उषित]

**उखिता, उखिते** क्रिवि. (प्र.) उक्ता. १. एकंदर; सगळे; पूर्णपणे; अवघे; सर्व : 'तेणें मज आपुलें पोसणें केलें । कीं विकत घेतलें उखितेंचि ।' – एभा २३.७०८. २. उचित : 'दासीचा पाहुणेर उखीतें। धणी देईल आपुल्या हातें ।'– तुगा ७००. [सं. उक्त]

**उखितिक्रिया** स्त्री. उदासीनपणे (ब्रह्मार्पण बुद्धीने) केलेली क्रिया.

**उखिरवाखिर, उखीरवाखीर** पहा : **उखरवाखर**

**उखिविखी** स्त्री. चर्चा; वादविवाद; घडामोड; आस्था; तर्कवितर्क; वाटाघाट; ऊहापोह : 'नाग वायु राहोनि मस्तकीं । अनाहतध्वनीची करी उखिविखी । कूर्म वायु श्रोत्रीं राहोनि सम्यकीं । करी

शब्दाधिकरण।' – स्वादि ९.३.४३. [सं. ऊह् = चर्चा करणे]

**उखी** स्त्री. १. उठवणी; मरगळ; निर्जीवपणा. २. (ल.) हकालपट्टी; लोप; नाश; अनित्य : 'जेथ अहंकारा उखीं जाहली ।' – ज्ञा १३.५३१. [सं. उत् + खिद्] (वा.) **उखी होणे** – थकणे; मरगळणे. **उखी करणे** –निंदा करणे; बोजवारा उडविणे. (व.)

**उखी** वि. खोटे; मिथ्या. पहा : **उखि** : 'जैं भवरुखु हा जाणें । उखी ऐसी ।'– ज्ञा १५.१४२.

**उखी** स्त्री. भाषा; बोलणे : 'येणेहिं बोले जाणावी । अज्ञान उखी ।'– अमृ ४४२.

**उखीर** वि. बरड; नापीक. पहा : **उखर** : 'जिकडील अत्यंत सुपीक देश सरासरी इकडच्या उखीर जमिनीबरोबर ....आहे !'– निमा ५८६.

**उखेकाळ** पु. उषःकाल : 'की उखेकाळीं बाळार्क बिंब एकी कोडी । उगवली दीसती थोब' – रुस्व ९३४.

**उखेड** पु. (कुस्ती.) जोडीवाल्याच्या चड्डीत जांघाड्याजवळ किंवा मांडीवर धरून आपल्या दुसऱ्या हाताने जोडीदाराची मुंडी वर धरून आपल्या छातीच्या झोकाने जोडीदाराला वर उचलून खाली चीत पाडणे. (कुस्तीतला एक डाव.)

**उखेडी** स्त्री. कमीपणा : 'आपणेया उखेंडी न पडें । जीतु शिशुपाळु हातां चढें ।' – शिव ४८९. [सं. उत्+खिद्]

**उखेडी** क्रिवि. सहज; थोड्यावेळ्यात : 'मी उखेडीं जाए अळग । तरि मागां नहीं शृंगार वोगळा ।' –उगी १४०.
पु. श्रम (शिव ४०९ उखेंडी) [सं. उत्+खिद्]

**उखेविखी** स्त्री. ऊहापोह; चर्चा : 'हे बहु उखेविखी । रिखी केलीं नैमिषीं । ' –ज्ञा १३.६७.

**उख्खड** स्त्री. कुस्तीगिराने प्रतिस्पर्ध्यास वर अलगद उचलून खाली पाडणे. वि. १. चटकन रागावणारा; कोपिष्ट. २. बेपर्वा; कोणाचा मुलाहिजा न ठेवणारा.

**उख्त** न. भाईपण.

**उख्ता, उख्ते** पहा : **उक्ता, उक्ते**

**उख्तीपाख्ती** स्त्री. सबंध खेड्यावर आकारलेली एकूण वसुलाची रक्कम. हा वसूल शेतकऱ्यांकडून मान्य करून घेऊन त्यांना काही वर्षांच्या मुदतीपुरती जमीन लागवडीस देण्यात येत असे : '... उख्तीपाख्ती लावून, उगवणींकरितां गावाची तुटी येऊं लागली.' – मदरु ३.३४.

**उगऊन देणे** सक्रि. स्पष्ट करून सांगणे : 'घ्यां, काय, मातें उगउन द्यावें ।' –सारुह ७.१७२. [सं. उद्गम्]

**उगटिले** वि. नीट उघडलेले; (साल जाऊन) स्वच्छ झालेले (धान्य इ.) : 'सुपीं तोचिं पाहें धड उगटिलें । नव्हता नासिलें जग झोडी ।' – तुगा २६१. [सं. उद् + घट्]

**उगटिले** वि. वाईट.

**उगड, उगंड, उगंडा** पु. उद्धार; विसावा; सुटका : 'जयाचेनि संगे जन्मशतें उगंडुचिं नव्हे गा ।' – रास ३.४६०; 'तदपि अझुणि तूझा होत नाहीं उगंडा ।'– सारुह ४.८४ [सं. उद्गम्]

**उगडणे** उक्रि. विसरणे.

**उगडपे** क्रिवि. प्रसिद्धपणे; उघडपणे : 'आपण क्रिस्तु तारकु म्हणऊन उगडपें सांगितलें.' – ख्रि २.३६ चा मथळा.

**उगडास** स्त्री. आठवण : 'तुवें काम सांगितल्याचो उगडास ना.'(= तुला काम सांगितल्याची आठवण नाही.) (गो.) [सं. उद् + ग्रह]

**उगण** स्त्री. उगवण; फुटणे; देवी, गोवर इ. बाहेर निघणे, पडणे.

**उगणणे** सक्रि. हिशेब देणे; झाडा देणे; अर्पण करणे : 'तें उगणिलें मज कर्म ।' – ज्ञा ९.४००.

**उगणे** अक्रि. उगी राहणे : 'तेथें कांत नसे म्हणोनि उगली पावोनिया विस्मया ।' – विठ्ठलकृत २. (रसमंजरी ५४.)

**उगणे** अक्रि. उगवणे; उमलणें : 'दिनमणिकिरणस्पर्शित, पंकज उगतीं स्वयेंच हों जैशीं ।' – माअक १७२. [सं. उद्गम]

**उगतभान्या** पु. कानबाई देवीच्या रोटाचा एक प्रकार. (खा.)

**उगम** पु. १. एखादी गोष्ट सुरू होते ते ठिकाण; उत्पत्तिस्थान; जन्म; उत्पत्ती; बीज; मूळ. २.(शब्दशः व लक्षणेने) ब्रह्म; आदितत्त्व : 'येक बळाचे निवडलें । ते पोहतचि उगमास गेले ।' – मइसा ११.७.१०. ३. नदी निघते ते ठिकाण; झरा. [सं. उद्गम]
क्रिवि. उगा, शांत; स्तब्ध; स्वस्थ; हालचाल न करता : 'उद्वास दोन महिने उगमच ठेवाल आणि पुढे साहित्य कराल तरी परिणाम लागेल.' –पेद २६.७५.

**उगमगणे, उगमणे** अक्रि. उगम पावणे : 'तेजापासून आप आपापून वर पृथ्वी उगमगी ।' –पला ८.

**उगमभाषा** स्त्री. (भाषा.) १. मूळ भाषा; ज्यापासून इतर भाषा निर्माण होतात ती भाषा. उदा. इण्डोयुरोपियन या भाषेपासून युरोप व आशियात बोलल्या जाणाऱ्या अनेक भाषा निर्माण झाल्या. २. लक्ष्य भाषा शिकणाऱ्याची मूळ भाषा. द्विभाषिक कोशात शब्दाची नोंद ज्या भाषेतील असते ती लक्ष्य भाषा व तिचे स्पष्टीकरण ज्या भाषेत असते ती उगमभाषा.

**उगमस्थान** न. एखादी गोष्ट सुरू होण्याचे मूळ कारण, ठिकाण स्थान.

**उगमक्षेत्र** न. नदीचे पाणी डोंगरातून बाहेर पडून वाहते होते ते ठिकाण.

**उगमा** क्रिवि. उगा; स्वस्थपणाने; गुपचूप; शांतपणे; काही एक न बोलता : 'पुढें चाले मागे उगमा । नाथ जातसे सवें सवें ।' – नव ९.६९.

**उगरण, उगरणी, उग्राणी** स्त्री. उगवणी; पैसे वसुली; उधारी गोळा करणे. [सं. उद् + ग्रहण]

**उगराबागरा** वि. उग्र; क्रूर; रानटी; भयानक; अक्राळविक्राळ; खवळलेला; आवेशलेला; भयंकर. [सं. उग्रचे द्वि.]

**उगरावणे, उगराविणे** सक्रि. (विरू.) उगारणे (काठी, छडी) पुढे करणे, दाखवणे. पहा : **उगारणे** (राजा.)

**उगरीने** क्रिवि. जारीने; कडकपणे : 'अंमलबजावणीला अगदी उगरीने सुरुवात झाली.' – रूरा १९३.

**उगर्मुणे** अक्रि. फूल अर्धवट फुलणे, उमलणे, उघडणे, मिटणे. (गो.) [सं. उद्+गम्]

**उगलणे** सक्रि. बाहेर टाकणे; ओकणे : 'उधविचें तोंड । उगलीत धूमाचे उभड ।' – ज्ञा १६.२९२.

**उगलमगल** क्रिवि. अत्यंत उग्र : 'अलोटां देवां अति उग्रु : उगलमुगला।'- मूप्र. २५८६.

**उगला** वि. क्रिवि. १. स्तब्ध; मुकाट्याने; उगीच; निमूट; गप्प; गुपचूप; निवांत; निमुटपणे; तटस्थपणे : 'आनंदें फुगला नसेचि उगला; गाधेय गर्जे सभे ।' - आसी ५५. २. व्यर्थ; विनाकारण; निरर्थक : 'जन्मुनी उगले कां मरती?' - आप ३८.

पु. नेट, निकड; तसदी; ससेमिरा; सूत्र : हे इकडे आले तरी तुमचा उगला तिकडे असावा म्हणजे सुजाउतदौला तुम्हासीं नीट बोलतील.' - मइसा. १.२००. [उद् + गृ]

**उगलेच** क्रिवि. उगेच : 'माहीमचा मोर्चा उठलीयावर तुम्ही सिरगांवास उगलेच बसावें यैसे आमच्या मतें नाहीं.' - पेद ३४.१११

**उगव** पु. १. मूळ; आरंभ; उगम : 'वृथाचि झाला जीव । तयासी त्याचा उगव ।' विपू ७.१४३. २. उलगडा; निकाल; फडशा : 'मुख्य बिंब तो मी शिवू । विशद उगवू हा जाण ।' - एभा ११.१३८.[सं. उद्गमन]

**उगवण** स्त्री. १. पेरलेले धान्य रुजून वर येणे; अंकुरणे; उगण; जोराने (देवी, गोवर वगैरे) बाहेर निघणे; उफणणे; उतणे. २. ग्रहादिकांचा उदय; उगवणे. ३.नवरात्रात देवापुढे रुजत घातलेले धान्य. [सं. उद् + गम् ; उद्गमन.]

**उगवण** स्त्री. गुंतागुंत सोडवणे; उलगडा; फोड.

**उगवण, उगवणी, उगवणूक** स्त्री. १. दिलेले पैसे गोळा करणे; वसुली; उगराणी. २. वसूल; गोळा केलेले पैसे.[सं. उद् + ग्रहण]

**उगवणे** उक्रि. १.ग्रह, नक्षत्रे, वगैरे क्षितिजावर येणे; उदय होणे. २. बीजापासून रोप वर येणे; अंकुर फुटणे; प्रादुर्भूत होणे. ३. गोवर, देवी वगैरे दिसू लागणे; उफणणे; उतणे. ४. नजरेस येणे; प्रकाशणे (बुद्धी, सद्गुण); कला, विद्या, व्यवहार इत्यादीमध्ये निष्णात होणे. ५. उमटणे; दृष्टीस पडणे. ६.प्रकट होणे; उत्पन्न होणे : 'नाना सर्पे उगवले काळ कर्कोट चालिलें ।' -दावि ५०१. (उप.) वाट पहायला लावणारास, उशीरा येणारास म्हणतात. जसे - उगवलात शेवटी. पहा : **उगविणे** [सं. उदगमन]

**उगवणे** उक्रि. १. उलगडणे; सुटणे; फोड होणे; (गुंतावळ, गुंतलेला दोरा) उकलणे; समजाविणे; ओळखणे : 'एकाच्या कैवाडें उगवे बहुतांचें कोडें ।' -तुगा २७४. २. अडचणीतून मोकळे करणे; संकटातून सोडविणे : 'वाचे मंत्रजप कां अध्ययन करणें । अथवा गुंतलियासी शब्दें उगवणें ।'- स्वादि ४.३.९५. ३. (ल.) हिशेबात जमेच्या व खर्चाच्या रकमांची बरोबरी होणे; तोंडमिळवणी होणे.

**उगवणे** उक्रि. उपयोग करून घेणे :'कित्तेक खलक उगवावें । राजकारणामध्ये ।' - दास १९.९.१८.

**उगवणे** सक्रि. गंध उगाळणे : 'केशर कस्तुरी चंदन उगवा ।' - पला १०७.

**उगवणे** अक्रि. स्तब्ध होणे. 'परी बोलोनि पार्थ उगवला तेथें ।'- गीताचंद्रिका ९.

**उगवणे** अक्रि. स्पष्ट होणे; स्पष्ट उल्लेख असणे; प्रकट होणे : 'याउपर जैसी मर्जी आसल तैसी आज्ञा उगऊन आल्यास आज्ञेप्रमाणे होईल म्हणोन विनंती लिहिली होती...' -पेद ३९.७३. [सं. उद्+गम]

**उगवणे** अक्रि. १. (केस) विंचरणे; सोडवणे; मोकळे करणे : 'कव्हणि मनुष्य उगवीं तेव्हळी (केस उगवति)' - लीच १.५. २. राग काढणे; रागावणे; शिवीगाळ करणे, मारणे, कुदलणे. ३. डोंगर चढणे.

**उगवणे** अक्रि. सुटणे; मोकळे होणे : 'तें (केस) वारेनि उगवति' - लीच १.५.

**उगवणे** सक्रि. करून घेणे, मिळवणे : 'राजेश्री पंत मशारनिलेकडे पाठवितील तेणेप्रमाणे सनदपत्र उगवणे ते राजश्री शंकराजीपंत उगऊन देतील.' - शिचसाखं ५.१०१.

**उगवणे** उक्रि. १. आदा होणे; वसूल होणे; वसूल करणे : 'मासअखेर रकम जवाहीरखान्यातून उगवून घ्यावी ।' - गोप्रदाननियम (बडोदे) ४. २. वसूल करणे : 'कर्ज उगवण्यासाठी सावकाराला ती (मिरास जमीन) विक्रीस काढता येत नाही.' - गांगा ८.

**उगवत, उगवती** स्त्री. पूर्व दिशा; प्राची; पूर्व: 'उगवत लाल झाली होती.' - रथ २५७; 'त्याच्या आणि उगवतीच्या डोंगराच्या दरम्यान...' - डाली ३.

क्रिवि. पूर्वेकडे.

**उगवतामावळता** पु. (उगवणारा आणि मावळणारा) सूर्य.

क्रिवि. सकाळपासून संध्याकाळपर्यंत; दिवसभर.

**उगवला** क्रिवि. उगला; उगी; स्तब्ध : 'मग देव म्हणे राहा उगवले । या बाळें प्राण वांचविले ।' - जै ८२.७९.

**उगवा, उगवील** स्त्री. १. दिलेले पैसे गोळा करणे; उगराणी. २. वसूल केलेले पैसे; वसूल.

**उगवान** स्त्री.(नाविक.) पूर्वदिशा; उगवत.

**उगविणे** सक्रि. १. गुंत्यातून मोकळे करणे; स्पष्ट करणे; फोड करणे. 'सांगितलें संतीं तुम्हां उगवुनी । गर्भासी येऊनी यमदंडा ।'-तुगा १५. २. उल्लेखून दाखवणे. ३. संकट निवारणे : 'उगवावया हंसगीत । सुनिश्चित सांगितलें ।' -एभा १६.४२. ४. केस विंचरणे; गुंता काढणे. (गो.) [सं. उद् + गम्]

**उगविणे** सक्रि. (सूड) घेणे. (को. गो.)

**उगविणे** सक्रि. वसूल करणे.

**उगविणे** अक्रि. (ल.) चढून वर येणे. [सं. उद् + गम्]

**उगवितपागवीत** क्रिवि. थोड्या थोड्या प्रमाणात; बेताबेताने; सोईसोईने, थोडेथोडे (दिलेले पैसे हप्त्याने गोळा करणे.).

**उगवी** स्त्री. उगी करणे; समजूत : 'येक सांगतां एकचि भावी । उगीच करी गथागोवी । तया वेड्याची उगवी । कोणें करावी ।' - दास ९.६.२९.

**उगवील** पहा : **उगवणी**

**उगळ** पु. पुरळ; उगवण. [सं. उद् + गृ]

**उगळ** स्त्री. १. तोंडातून टाकलेला पदार्थ; वमन; ओक. (क्रि. टाकणे): 'म्हणतां यमासि गिळिल्या उगळ प्रभु तो कपीश्वर करी सुगळ ।' - मोवरदरामायण ३२. २. रवंथ करण्याकरिता गुरे पुन्हा बाहेर काढतात तो चारा; पायाखाली मळलेला, खराब झालेला चारा, वैरण. ३. उसाच्या अथवा धांड्याच्या गंडेऱ्यातील रस चोखून घेतल्यानंतर शिल्लक राहिलेला (तोंडातील थुंकून टाकला जाणारा) चोथा, चोयटी. (व.) [सं. उद् + गृ; का, उगि]

**उगळ** वि. मोठा; ढगळ. (कर.) [सं. उद् + गल्]

**उगळणे** सक्रि. १. शिस्तीत, ताब्यात ठेवणे. २. शिस्तीने मऊ करणे, नम्र करणे; ताळ्यावर आणणे. ३. चांगल्या रीतीने प्रवृत्त होणे; सचोटीच्या मार्गावर येणे; सुधारणे; ताळ्यावर येणे; मार्गावर येणे; वाईट नाद सुटणे : 'उगळला तर परमेश्वर खटला तर शनैश्वर.' ४. मूळची शक्ती परत येणे (नवीन बडविलेल्या बैलाच्या वृषणाच्या शिरा पुरतेपणी न मळल्या गेल्यामुळे); पूर्वावस्था प्राप्त होणे. ५. अनुकूल होणे; वश होणे; दया येणे : 'बहु दासी दासशतें देताहि न विप्र तो वचे नुगळे ।' -मोकर्ण २९.२९. [सं. उद्+गल्]

**उगळणे** उक्रि. १. उगाळणे; घोटणे. २. (ल.) झिजणे : 'ते मार्गी देह जरी उगळे ।' - पला २४. ३. चारा पायाखाली तुडवणे (जनावराने); (घासण्याने, उगाळण्याने) नरम होणे; फुटून जाणे. ४. चुरा होणे. [सं. उद् + गल्]

**उगळणे** उक्रि. १. थुंकणे; ओकणे; बाहेर टाकणे; ओकून टाकणे : 'कीं मी तोंड करून कानवडे । उगळौनि घाली ।।'- ज्ञाप्र ९६४. २. टाकणे; त्यागणे; सोडणे : 'उगळिसील अरुणानुजा । तरीच देह परतेल माझा ।' - मुआदि ५.८५. ३. (ल.) चोरलेली, दाबलेली, अपहार केलेली, मालमत्ता परत करणे. ४. गुप्त गोष्ट फोडणे; प्रकट करणे : 'दोन्ही विशेष गिळी । ना निर्विशेषातें उगळीं ।।'- अमृ ७. १८३. ५. रवंथ करणे; चर्वण करणे. [सं. उद् + गृ]

**उगळणे** अक्रि. रडू कोसळणे; द्रवणे. [सं. उद्+ गल्]

**उगळणे** अक्रि. १. पीळ निघून पदर सुटणे; उलगडणे (दोर, वेणी इ.) २. शिवणीतून कापड सुटणे, उसवणे. ३. उडवणे; उधळणे. [सं. उद् + गल्]

**उगळलेला गडी** ब्रह्मचर्यव्रतापासून ढळलेला मनुष्य. (माण.)

**उगळवणी** न. पाझरून निघालेले पाणी : ' चांदिणे याच्या पाण्हावनी । चंद्रकांत दुभती अदुभणी । तैसे भूमी निगे उगळवणी । तें आणिती सखियां ।।'- रुस्व ५६९. [सं. उद्+गल्]

**उगळसैल** वि. मोठा; सैल (अंगरखा).

**उगळा** पु. १. त्रास; चुराडा; नाश; नासधूस : 'गनिमी तऱ्हेनें उगळा लावावा ।'- मइसा १.३६५७. २. नेट; निकड; ससेमिरा; सूत्र.

**उगळा** पहा : **उगला**

**उगळीक** स्त्री. गौप्यस्फोट; चवचव; बभ्रा; बोभाटा.

**उगंडणे** अक्रि. सुटणे; मुक्त होणे : 'ऐसा आडकलों त्रिशुद्धी । जनार्दनू उगंडू नेदी ।'- एभा ९.४५६.

**उगंत** स्त्री. उत्पत्ती. [ सं. उद्गम]

**उगा** क्रिवि. १. न बोलता, हालता, काम करता; स्वस्थ; शांत; गप्प; उगीच; मुकाट्याने : 'आतां नाइकें न पाहें । म्हणोनि मी उगा राहे ।' -एभा ९.४५५. २. खटपट न करता; विना धंदा किंवा उद्योग. ३. अकारण; अनिमित्त; निष्कारण; जरुरी नसता : 'उगा लोळसा घोळ मोठा करीतो.' - राक ३६. ४. व्यर्थ; निरर्थक; बेकायदा : 'उगा भ्रमसि वाउगा कशाला युगांत खळ हा कली.'- राला १०६.

**उगी** पहा : **उगला** [ह. का. उगि=भिणे, उके = गप्प.]

**उगा** पु. समजूत; समाधान : 'तिसा लाखांचे माल जयेद आहेत ते आम्हांस सनद करून द्या. येथे तनखादारांचा उगा करून.'- हिंदखं १.७२.

**उगाई** पहा : **उगराणी** : 'जीवराव व्यंकटेश व सरकारी घेणें असलेमुळें त्या दुकानची उगाई सक्तीनें वसूल होईल.'- विक्षिप्त ३.९३.

**उगाउगी** क्रिवि. निष्कारण : 'गरिबावर उगाउगी बला आली.'- हात ३.

**उगाच, उगीचचे उगीच, उगीचे उगीच** क्रिवि. १. निष्कारण; जरूर नसता; विनाकारण; व्यर्थ; निरर्थक : 'सत्य धनंजय कर्मे रूपें दिसतो उगाचि वरि नरसा ।' - मोभीष्म ११.७२. २. निमूटपणे : 'घेणार तो न समजोनि उगाच घेतो ।' - नल ८७.

**उगाण** पु. स्पष्टीकरण; अनुभव; खुलासा; उलगडा. [सं. उद्गमन]

**उगाणणे** सक्रि. फोड करून सांगणे; स्पष्ट करणे; उपदेश करणे : 'शास्त्रसिद्धांतु आघवा उगाणिला ।'- ज्ञा१६.४१. [सं. उद्गमन]

**उगाणणे** सक्रि. १. हिशेब देणे; झाडा देणे : 'परी परमात्मया चक्रवर्ती उगाणिती जंव हातीं ।'-ज्ञा १८.७४३. २. अर्पण करणे; आणून देणे; हवाली करणे : 'ती गोपवत्सें उगाणलीं । गोपनाथासीं ।' - कथा ४.३.२६५. ३. मुक्त करणे; सोडविणे (पाप इत्यादिकांपासून) : 'उगाणिलीं जन्ममरणें' [सं. उद्+ ग्रहण]

**उगाणणे** सक्रि. उपटून नेणे; लुटणे; अर्पण करणे; लांबविणे; नागविणे; प्रकट होणे : 'सभेसि राजा उगाणवी । तै मृत्यूची पदवी मस्तका आली ।'- एभा १. २११. [सं. उद्+ ग्रहण]

**उगाणणे** अक्रि. शून्य होणे; नाहीसा होणे; नष्ट होणे : 'तेथ उगाणले क्रियाकर्म । लाजा विराले धर्माधर्म ।' - एभा २३.७००. [सं. उद् + ग्रहण]

**उगाणवा** पु. लूट; नागवण. [सं. उद्ग्रहण]

**उगाणा, उगाना** पु. १. दातव्य; बयाणा; विसार : 'आचाराचा उगाणा जी कवणासि दिधला ।' -उगी १०९. २. गणना; झाडा; परीक्षा; हिशोब : 'तेथे फलहेतूचा उगाणा ।' - ज्ञा ७.१२९. ३. मुक्तता; सोडवणूक : 'तुवावीण योगिया उगानावेढा कवण करील ।' - उगी १०५. ४. कर्जाऊ रकमेची फेड; तोंडमिळवणी : 'बहिणी म्हणे मना हेतूंचा उगाणा । करूनि निर्वाण पहातसे ।'- बगाथा १२९. ५. समृद्धी (या काम)(वा.) **उगाणा काढणे**-(बायकी) धान्य कांडताना अगर कुटताना उखळात खाली राहिलेला जिन्नस वरचेवर खालचा वर व वरचा खाली करणे. [सं. उद्+ ग्रहण]

**उगाणा, उगाना** पु. चव; रुची; अनुभव : 'रसवृत्तीसी उगाणे । घेऊनि जिव्हाग्र शहाणें ।' - अमृ ६.९०. [सं. उद्+ ग्रहण]

**उगाणा** पु. नाश; निराकरण; नागवण : 'क्रोप येतांच जाणा । करी उगाणा तपाचा ।'- एभा ४.७८. [सं. उद्+ ग्रहण]

**उगाणा** पु. उपदेशपर भाषण; उलगडा; स्पष्टीकरण : 'नाना प्रमेयांचे उगाणे । काय श्रवणाचेनि आंगणें । बोलों लाहाती ।।'-ज्ञा ७.१९८.

**उगाणा** पु. परिवार : 'रिधीसिधीचा उगाणा : सवें चाले' - साप्र ८३७.

**उगाणा** पु. कारकून; हिशेबनीस; उग्राणी करणारा : 'सरिसा उगाणा कोठी, चाटे बडुवे तैसे निगाले ।'- ऋ १३२. [सं. उद्ग्रहण]

**उगाणा** पु. सामान : '(सहकुटुंबी नीगाला) सवें उगाणयाचा बैलु'- गोप्र ९६.

**उगाणी** स्त्री. ओवाळून टाकलेली वस्तू : 'देह उगाणी केली ।' -ज्ञागा ३०५.

**उगानिगा** स्त्री. निरवानिरव.

**उगामुगा** क्रिवि. स्वस्थ; बोलल्यावाचून; हालचाल केल्यावाचून; गुपचूप; न

बोलता : 'बोंबलू नोको कमिनावानाच्या ! चाल उगामुगा !'– धग ८.

**उगारणी, उग्राणी** पहा : **उगराणी**

**उगारणे** उक्रि. १. एखाद्यास मारण्याकरिता शस्त्र, काठी, हात वगैरे उचलणे; मारण्याचे भय दाखविणे; धमकावणे. २. पैसे वसूल करणे. ३. फेकणे; झोकणे; मारणे. ४. चाल करून जाणे : 'त्या पौरवासि सोडून सौभद्र जयद्रथावरि उगारे ।' – मोद्रोण १.८५. [सं. उद्+ ग्रहण]

**उगालदान, उगाळदान** तस्त किंवा पिकदाणी.

**उगालदान बार्दार** पु. तस्त किंवा पिकदाणी धरणारा नोकर; कलाचीधारक.

**उगावगा** पु. उगवणी; वसूल : 'तरी गोपाळ संभाजी यासी तुम्ही लिहून तेथील उगावगा जेथवर होईल तेथवर करून घेणे म्हणोन स्वामीजी आज्ञा जाली.'– ऐलेपाम्युप्र १६६.

**उगावगा** गयावया : 'रयत उगावगा करून पळावयास सिद्ध राहिली.'– पेद.

**उगावा, उगावो** पु. १. पूर्तता; समाप्ती (कामाची) होणे, पडणे. २. वसूल (योग्यादेण्याचा). पहा : **उगवणी**

**उगावागा** पु. १. स्पष्टीकरण; सोडवणूक; निकाल; तंटा सोडवणे; मोकळीक; तड. २. वसूल : 'एक म्हणती व्यवहारिलें धन । त्याचा उगावागा करून येईन ।'– मक ३१.५४.

**उगाळ** पु. १. तोंडातून टाकलेला पदार्थ; वमन; थुंकी; पिंक : 'हडप मी वोळगेन । मीचि उगाळु घेईन ।' – ज्ञा १३.४२०. २. (ल.) सरभेसळ; काला; चिवडा; खिचडी (कागद, पैसे, कपडे वगैरेंची). ३. अव्यवस्थित स्थिती; पसारा. ४. (अलंकारिक) जाळे. [का. उगुळु][सं. उद्+ गृ]

**उगाळ** स्त्री. खडी; दगडाचे बारीक तुकडे (रस्ता करण्याकरिता, गच्ची करण्याकरिता, घराच्या पायात भरण्याकरिता).

**उगाळणे** सक्रि. १. (चंदन वगैरे) घोटणे; घासणे; बारीक पूड करणे; वाटणे : 'परम सुवास जो मनशीळ । तो स्वकरें उगाळोनि तात्काळ । निढळीं टिळक रेखिला ।' २.(ल.) देह झिजवणे (सेवेत, नोकरीत); कष्ट सोसणे. ३. फिरून फिरून करणे (ठराव वगैरे); पुनरुच्चार करणे; तेच तेच करीत, घोकत राहणे. ४. बिंबविणे; भरविणे; मनावर ठसवणे. ५. परत परत तेच बोलणे; एकाच गोष्टीचा सारखा विचार करीत राहणे : 'आत्तापर्यंत मी तुला वेडं वाकडं बोलल्यें तेच जन्मभर उगाळीत बसू नकोस.' – रथ १५१. [सं. उद्+ गल्]

**उगाळणे** सक्रि. शिक्षेत धरणे; शिस्तीत, शिकवणीत ठेवणे; काचात ठेवणे. [सं. उद्+गल्]

**उगाळणे** अक्रि. वांती होणे; ओकणे; थुंकणे : 'तो पुन्हां उगाळी सावकाश । जैसा होता तैसाचि ।' –शनि ३६२. [सं. उद्गीरण]

**उगाळदान** न. पिकदाणी. [फा.]

**उगाळा, उगाळू** पु. थुंकी; पिंक; चावून टाकलेला विडा : 'तांबुळांचे उगाळु पडिलें । मलपावरी ।'– शिव ७१७; 'उगाळा हातीं झेली ।'– गीता २.२१६२. [सं. उद्गीरण]

**उगाळा** पु. घोटलेला, वाटलेला, उगाळलेला पदार्थ किंवा त्याचे कण : 'तो उगाळा सरूकडून चोळवला.'– पधौ १३४.

**उगाळी** स्त्री. फोडलेली खडी.

**उगिया** वि. व्यर्थ; रिकामा; फुकटचा; उगा. पहा : **उगीच**

**उगिली** वि. निरपेक्ष 'उगिली निष्ठा धरितां बरी ।'– ज्ञागा १५५.

**उगी** क्रिवि. शांत; गुपचूप; उगला. पहा : **उगा** : 'वयनीसाहेब, असें उगी बसून आम्ही सोडणार नाहीं.'–रत्नकांता ५.४. (गाणे) : 'उगीउगी, चोळी शिवीन मुगी, लुगडं घेईन लाल, सासुऱ्या जाल.' (रडत असलेल्या मुलीस थट्टेने म्हणतात). (वा.) **उगी करणे, उगी होणे –** रडायचे थांबविणे; शांत करणे; गप्प करणे; होणे : 'काय झालें सुशिलेला ? असें म्हणून तिला त्यांनी युक्तीनें क्षणार्धांत उगी केलें.' –सुदे ७. **उगी राहणे–** शांत होणे : 'उगी राहें आतां बहुत वदता ओष्ठ सुकले ।'– सारुह ७.९९. **उगी बसणे** – काही न बोलणे, गप्प राहणे. [का. उके = गप्प]

**उगीच** क्रिवि. १. गुपचूप; गप्प; मुकाट्याने : 'गुरुजींनी याप्रमाणे सांगितल्यावर चंद्र उगीच बसला.' – कालकूट १६. २. विनाकारण; प्रयोजनाशिवाय; व्यर्थ.

**उगीदुगी** स्त्री. पहा : **आगीदगी** (वा.) **उगीदुगीला येणे–** चिरडीला येणे. (कर.) **उगीदुगी करणे–** १. (बायकी) दुसऱ्याच्या बोलण्यात मध्ये तोंड घालणे; रिकाम्या गप्पा मारणे; बाता मारणे. २. चहाडी, चुगली करणे.

**उगीर** वि.१. उद्धट; रागीट; उग्र; गर्विष्ठ; मग्रूर; दिमाखाचा. पहा : **उगरा–बागरा**. २. उग्र वासाचा; दु:सह; कडक. [सं. उग्र]

**उगुमुगू** क्रिवि. गुपचूप रीतीने; न बोलताच; निमुटपणे : 'इंद्रेया आपुली उडी : उगुमुगु कां सारानां.'– लीच ४.४३.

**उगुला** वि. शांत; गुपचूप : 'तरि सहजें मन कोंडलें । हृदयींचि असेल उगलें ।'– ज्ञा ८.११३.

**उगूम** पु. उत्पत्ती; बीज; मूळ; उद्‌भवस्थान. [सं. उद्‌गम]

**उगे, उगेच** क्रिवि. १. निमूटपणे; मुकाटपणाने; गप्प : 'फुन तुमचेनि रागें । जरी असोचि उगें । तरी आमुचें पोटु फुगें । न बोलतां ।'– शिव १२८. २. व्यर्थ; विनाकारण : 'उगेचि खावें उगेचि असावें ।'– दास २.६.२७.

**उगेपण** न. स्तब्धता : 'म्हणौनि करूं लाहे खंती । उगेपणाची ।' – ज्ञा १८.८०.

**उगेयां** क्रिवि. काहीं न बोलता. 'गोसावीं उगयांचि आइकिलें ।' – लीचउ २२६; 'उगेयाचि माथा ठेविजे चरणीं । हेचि भलें ।' – ज्ञा १०.१५.

**उगेले** क्रिवि. १. निवांत; शांतपणे; आवाज, गडबड न करता. २. आपोआप; सहज; अनायासे : 'जैसें उंचीं उदक पडिलें । ते तळवटवरी ये उगेलें ।' – ज्ञा ९.२२४.

**उग्र** पु. १. शिव; रुद्र : 'अतिदु:सह उग्राचें तेज सकल दु:सहीहि मदनीं कीं ।' – मोभीष्म ३.२. २. मिश्र जात; मिश्र जातीतील व्यक्ती; क्षत्रिय बाप व शूद्र आईपासून झालेली प्रजा; संकर जात.

वि. १. भयानक; भीतीदायक (मनुष्य, वस्तू, स्थिती); अक्राळविक्राळ (चेहरा); भेसूर; भयंकर; कर्कश; कठोर (आवाज, बोलणे); घोर; राक्षसी; क्रूर; अतिदुष्ट (कृत्य); तामसी; रागीट (स्वभाव).

२. प्रखर : 'उग्र सोडिले बाण ।'– मोकर्ण ८.२५. ३. उग्रट; तीव्र; अतिशय दु:सह (वास); डोक्यात भरून त्रास होतो असा (वास). [सं. उग्र]

**उग्रगंध** वि. ज्याचा वास उग्रट आहे असे.

**उग्रट** वि. तीव्र. त्रास होईल असा (वास).

**उग्रटाण–न, उग्रष्ठाण** स्त्री. दुर्गंधी; दु:सह वास; घाण.

**उग्रदंड** पु. कडक शिक्षा. [सं.]

**उग्रम** पु. आरंभ; सुरुवात; उत्पत्ती; बीज [सं. उद्गम]

**उग्रम** पु. जोर; उठाव; झपाटा; वेग; तडाखा; (रोग, पाऊस, वारे वगैरे संबंधाचा); आवेश. [सं. उग्र]

**उग्रमणे** अक्रि. दिसू लागणे; प्रादुर्भुत होणे; सुचणे; मनात येणे. [सं. उद्+ गम्]

**उग्रवासा** वि. भयंकर; क्रूर; तापट.

**उग्रस** पहा : **उग्रट**

**उग्रा** स्त्री. (संगीत.) एकविसाव्या श्रुतीचे नाव. [सं.]

**उग्राणी** पु. खेडेगावातील एक विशिष्ट सरकारी नोकर; पाटील. [का . उग्राण= सरकारी कोठार]

**उग्रादित्य** न. सूर्याचे देऊळ; सूर्यप्रतिमा : 'उग्रादित्यी अवस्थान.'– श्रीकृच.

**उग्रासणी** पहा : **उगराणी**

**उग्रासन** न. योगाशास्त्रातील एक आसन; पश्चिमोत्तानासना प्रमाणे डोके ढोपरावर न टेकता ढोपरात भरून शक्य तितके जमिनीजवळ लावणे, अशा प्रकारचे आसन. [सं.]

**उघ** पु. ओघ, प्रवाह.

**उघटणे** उक्रि. प्रत्यक्ष मांडले जाणे; उघड्यावर येणे. पहा : **उघडणे** : 'इयां पाटणीं जें केणें उघटें ।'– प्रामकोले. [सं. उद्+ घट्]

**उघटा** वि.पहा : **उघडा**. उक्तास माल घेऊन किरकोळीने विकणारा : 'भवर परिमळाचे उघटे ।'–रुस्व ८३९. (गो.)

**उघड** वि. १. स्पष्ट; व्यक्त; उकलेला : 'मनीं आहे तें उघड । बोल पां सुखें ।' – ज्ञा ११.४४२. २. स्वच्छ; ढळढळीत; जाहीर; प्रकट; सार्वजनिक; महशूर; गुप्तवेषरहित. ३. दुर्लौकिक झालेले.

स्त्री. १. निरभ्र आकाश; हवा स्वच्छ असणे; उघाडी; उघडीक; पाऊस थांबणे.

क्रिवि. प्रसिद्धपणाने; जाहीर रीतीने (फिरणे, सांगणे, बोलणे.) [सं. उद्+घट्]

**उघड** स्त्री. फूट; बेबनाव : 'कसेंही झालें तरी उघड पडली नाही...'– ऐलेसं ३००८.

**उघडउघड** वि. स्पष्टपणे दिसणारा.

**उघडगांड, उघडगांड्या** वि. नेहमी शेपटी हालविणारा; घोड्याचे एक अशुभ लक्षण.

**उघड जमाबंदी** स्त्री. कायमधाऱ्याची पद्धती.

**उघडझाक, उघडझाप** स्त्री. वारंवार उघडणे- झाकणे (दार, पेटी, डोळे, पंख वगैरे); उघडण्या-झाकण्याची क्रिया; आकाशात ढग येणे- नाहीसे होणे; काढणे, घालणे (पडदा वगैरे).

**उघडणे** उक्रि.१. आच्छादन काढणे; खुले, मोकळे करणे (पेटी, दार); उकलणे. २. उघडकीला आणणे; गुप्त गोष्ट फोडणे; प्रगट करणे; प्रसिद्ध करणे : 'ते म्हणती उघडली खाणी । रूपाची हे ।।'– ज्ञा ६.१८.

अक्रि. १. मोकळे-खुले होणे. २. (पाऊस) थांबणे; ढग नाहीसे होणे; आकाश निरभ्र होणे; (हवा, पाऊस) स्वच्छ होणे. ३. उत्कर्ष होणे; उदयाला येणे (दैव); ऊर्जितदशा येणे. [सं. उद्घाटन]

**उघडदोरा** पु. बटवा, कसा इ. उघडण्यासाठी व बंद करण्यासाठी दोन्ही बाजूंना लावलेल्या दोऱ्यांपैकी प्रत्येक; ओढदोरा.

**उघडपणा** पु. मोकळेपणा; काही लपवून न ठेवण्याची वृत्ती : 'दादाच्या स्वभावाचा तो मूळचा उघडपणा....' – पलको २१२.

**उघडभावई** स्त्री. १. उघडपणा; काही प्रतिबंध, आडोसा नाही अशी स्थिती. (व.) २. (ल.) स्वैर स्त्री; वेश्या; निर्लज्ज स्त्री.

**उघडमराठी** पहा : **उघडीमराठी**

**उघडमाथा** क्रिवि. १. उघडपणे; प्रसिद्धपणे; उघडउघड; नि:शंकपणे; राजरोस. २.(उप.) निर्लज्जपणे (फसविणे, उघडकीला आणणे इत्यादी.).

**उघडमाथ्याने** क्रिवि. न कचरता; न लाजता; धीटपणाने; प्रकटपणे.

**उघडमीट** स्त्री. पुन:पुन्हा उघडणे, मिटणे (डोळे, ओठ, फुले इ. ) पहा : **उघडझाक**

**उघडवाघड** क्रिवि. उघडपणे; प्रसिद्धपणे; स्पष्टपणे. [उघडचे द्वि.]

**उघडवासरा** पु. उघडी, मोकळी जागा; निष्प्रतिबंध जागा किंवा स्थिती.

**उघडवासऱ्यात** क्रिवि. उघड्या-मोकळ्या जागेत (मैदानात, पटांगणात); चवाठ्यावर; खुल्या हवेत; हमरस्त्यावर.

**उघडा** वि. १. मोकळा; खुला; न झाकलेला; अनाच्छादित. २. स्पष्ट; प्रगट; व्यक्त; विशद; आविर्भूत; स्वत:सिद्ध; ढळढळीत;गूढ, गुप्त नव्हे असा. ३. लोकविख्यात; प्रसिद्ध; महशूर; जगजाहीर; सर्व लोकांना माहीत असणारा. ४. ज्याला सांभाळ करणारा कोणी नाही असा (पोर, राज्य इ.); अरक्षित; निराश्रित (स्थळ, प्रदेश, माणूस). (क्रि पडणे.). ५. मोकळी; स्वच्छ (हवा.) ६. अंगात कपडा न घातलेला; नग्न (कमरेच्या वर); पोशाख नसलेला; फक्त धोतर नेसलेला; केवळ मध्यवेष्टित. ७. सबंध नग्न; नागवा; अगदी वस्त्रहीन : 'बा ! ढळतां तिळहि पदर भावी व्यजनासि सांग रामाजी । ती खळसभेंत उघडी पडत्ये न पडोनि सागरामाजीं ।' – मोसभा ५.७७. ८. अनाच्छादित; बोडका; बुच्चा; ओका. ९. निर्भीड; स्वैर; दाही दिशा मोकळ्या असलेला. (वा.) **उघडा करणे**– १. निराश्रित करणे. २. पहा : **उघडा पाडणे. उघडा पडणे**– निराश्रित, अनाथ होणे : 'अर्थातच हरणाबाई आपल्या दोन मुलींसह उघडी पडली.'– स्वप ६५. **उघडा पाडणे, उघड्यावर आणणे**– निंदेस, उपहासास पात्र करणे, एखाद्याला चव्हाट्यावर आणणे; गुप्त गोष्ट फोडणे; जाहीर करणे; बोभाटा करणे. **उघड्या डोळ्यांनी** – जाणूनबुजून; कळूनसवरून; मुकाट्याने; प्रतिकार न करता.

**उघडाउघडी** क्रिवि.उघडउघड; स्पष्टपणे : 'तिला अतोनात वाईट वाटले हे उघडाउघडी दिसत होतें.' – मी ४०२.

**उघडानागडा, उघडाधोत, उघडाबंब, उघडाबागडा, उघडाबापडा, उघडाबागड, उघडाबाघड, उघडासोट** वि. १. विवस्त्र; वस्त्रहीन; नग्न; अंगावर मुळीच काही नसलेला. २. आडोसा नसलेली (जागा). ३. आच्छादनरहित; न झाकलेला (पदार्थ, अन्न).

**उघडा बाळसंतोष** सडा; फटिंग.

**उघडाबोडका** वि. १. अंगात व डोक्याला काही न घातलेला. २. निराश्रित; निराधार. ३. कुटुंब, काळजी, धंदा नसलेला, घरदार नसलेला; ना घर ना दार असा.

**उघडा माथा** १. धाक, लाज नाही असा मनुष्य; नि:शंक, निर्भय, निर्भीड माणूस (चांगल्या व वाईट अर्थी). २. (ल.) दोषविमोचन, निरसन; उजळमाथा-तोंड असणे; निरपराधित्व; आरोपनिराकरण (होणे). ३. बोल, निंदा, दोष, ठपका यापासून अलिप्तता, मुक्तता (असणे).

**उघडा हिशोब** सरळ, स्वच्छ, हिशेब, लवकर समजणारा हिशेब; पाहिल्याबरोबर डोळ्यांत भरणारा, पटणारा जमाखर्च.

**उघडी** स्त्री. फांजास लावलेले दार; कालव्यातून पाणी बाहेर सोडण्यासाठी ठेवलेले झापड : 'आम्हांस अकरा उघड्या ओलांडाव्या लागल्या.' - राणीचे पुस्तक ५९. बांधाच्या दाराकरिता ठेवण्यात येणारे उघडझापीचे दरवाजे; पाणी घेण्या-सोडण्यासाठी केलेला दरवाजा. (कों.)

**उघडीक, उघडीप** स्त्री. १. प्रसिद्धी; जाहीर माहिती; परिस्फुटता : 'आपलीं शास्त्रें लोकांस ठाऊक व्हावीं, कारण तेणेंकरून आपली उघडीक होते.'- नि १०१६. २. उघाड; उघाडी; पाऊस थांबून आकाश स्वच्छ होणे; उघडावा : 'श्रावण महिन्यात आमच्याकडे बरीच उघडीप असे.' - माआ ९०. (वा.) **उघडीक पाडणे –** अब्रू बाहेर काढणे : 'स्नेह्याची अशी उघडीक पाडण्याचं आमचं ब्रीद नाही.'- भदि ४९.**उघडीक होणे–** उजेडात येणे : 'परंतु आजचा काळ असा आहे की संस्कृताची उघडीक होऊन पंडितांचे सर्व ज्ञान बाहेर पडले आहे.'- लोश ७३. **उघडकीस आणणे** - जगजाहीर करणे. **उघडकीस येणे** - जाहीर होणे.

**उघडीनागवी** वि. अर्धवस्त्राच्छादित : 'ऐसीं उघडींनागवीं असति ।' - लीचउ ९.

**उघडीमराठी, उघडीमऱ्हाटी** स्त्री. सरळ मोकळ्या मनाने केलेले भाषण; प्रामाणिक व्यवहार; सरळ वागणूक; स्पष्टपणा; स्पष्टवक्तेपणा.

**उघडी मांडी करणे** (मांडी उघडी ठेवणे हे शिष्टाचारास सोडून आहे यावरून)(ल.) निर्लज्जपणाचे आचरण करणे; बेशरमपणाने वागणे; अश्लील प्रकार करणे; अनुचित, असभ्य आचरण करणे.

**उघडे परब्रह्म** अगदी स्पष्ट, उघडउघड दिसणारी गोष्ट, बाब, वस्तू. (अशा उघडपणाबद्दल जेव्हा आश्चर्य वाटते त्या वेळी हा शब्द वापरतात.)

**उघडेयां** क्रिवि. उघड्या अंगाने; असंरक्षित : 'कैसेनि उघडेया असावें । शस्त्रवर्षी ।'- ज्ञा ९.४८६.

**उघड्यावर** क्रिवि. १. मोकळ्या जागी; सर्वांना दिसेल अशा बेताने; उघड्या जागेत; अंगणात; चव्हाट्यावर; राबत्याच्या जागी. २. जाहीरपणे; प्रसिद्धपणे.

**उघराणी** पहा : **उगराणी** : 'उघराण्या वगैरे करून रक्कम वसूल करविण्याची योग्य ती तजवीज करतील.'-स्वारी नियम ३८.

**उघल** स्त्री. पहिली नांगरट; उखळ : 'जमीन उघल घ्यावयास नागर सुमार २।। येकूण.' - मसाप २.१८०. (कों.)

**उघळ** स्त्री. १. उगळ; जात्यात दाणे दळून झाल्यावर दळले न गेल्यामुळे खुंट्याच्या मुळाशी राहिलेले धान्य, घास. २. नवीन जात्यामध्ये प्रथम दळलेले मूठभर धान्य. [सं. उद् + ग्रह]

**उघळणे** उक्रि. १. जात्यात राहिलेला घास, उघळ काढणे. २. नवीन जात्यात मूठभर धान्य दळणे. [सं. उद्+ ग्रह]

**उघळणे** उक्रि. उगावणे; अतिशय बारीक पूड करणे. पहा : **उगळणे**

**उघाइणे** सक्रि. १. गाणे; उघडणे : 'कोणी गे. नि:परंवसा । उघाइली वसंताची दिशा ।'- शिव ८३६. [सं. उद्+ घट्]

**उघाड, उघाडी** स्त्री. १. पर्जन्यकाळात काही काळ पर्जन्य पडून थोडा वेळ तो थांबला आहे अशी स्थिती; उघडीक. २. उघडी जागा : 'परातीसारखें उथळ भांडें घेऊन त्यांत चुन्याचें पाणी घालून उघाडीवर ठेवावें.'- मराठी ६ वे पुस्तक १६६. ३. परिस्फुटता; प्रगटपणा : 'मुलीला... कांहीं खोड होती आणि ती मग उघाडीस आली.'- मोर २०.

**उघाडणे** सक्रि. शृंगारणे; सजविणे.

अक्रि. उडी घेणे : 'आपण अंगे उघाडी' - नाम १३५८.

**उघाणी** स्त्री. चर्चा; वादविवाद : 'गावीं एकी संन्यासी दोघीं उघाणी करूं आदरीती.'-लीच १.३६.

**उघारणी, उघ्राणी** पहा : **उगराणी** : 'जीं पत्रें येत नसतील त्याजविषयीं उघ्राणी करावी.'- राजमहाल कारकून नियम ३.

**उघाळणे** स्त्री. चर्वितचर्वण करणे.

**उघ्राण** स्त्री. कोठी; सामानसुमान ठेवण्याची जागा. (तंजा.)

**उच** वि. उंच (शेव.) पहा : **उंच** : 'असं झालंया, कैलासावानी उच पहाडाच्या डोक्यावर पुरूस बसत्याती व्हयना ?'- बाय २.२.

**उचक** वि. तपशीलवार नसलेला; ठोक; उक्ती; ठरावीक; उचलून दिलेली (रक्कम) : 'जमादारास दरमहा योग्य ती उचक रक्कम बांधून देण्याचें करावें.'- चित्त्याची माहिती २७. (बडोदे)

**उचकटणे** उक्रि. १. जोराने बाहेर काढणे; उपटून काढणे; ओढणे; उसकटणे (खिळा, झाकण इ.) २. नखाने वगैरे उकरणे; कुरतडणे; सोडवणे. ३. बरी झालेली जखम पुन्हा उघडी करणे; जखमेची खपली काढणे. ४. सारखी बसलेली (जमीन, केस, वस्त्राच्या चुण्या, तृणसमुदाय) उखळणे, विस्कटणे, अस्ताव्यस्त करणे; जमीन, छप्पर उसकटणे.५. (ल.) मिटलेला व्यवहार पुन्हा उपस्थित करणे; विसरलेली गोष्ट पुन्हा उकरून काढणे. [सं. उच्चाटन]

**उचकटाउचकट** स्त्री. घाईघाईने ओढणे; ओरबडणे; उलगडणे; विसकटणे.

**उचकणे** उक्रि. १. उपटणे; चोरणे; उचलेगिरी करणे; फसवून घेणे : 'स्त्रीसुत बंधु पैका उचकी।'– अमृत ११२. पहा : **उचकटणे.** २. उचलणे : 'नाहीं म्हणौनि उचकीन करें फुलाला.'– आक २५.

**उचकणे** सक्रि. १. उपटून काढणे; समूळ वर काढणे. २. (ल.) उच्चाटन करणे; हाकून, फेकून देणे. [सं. उत्खनन]

**उचकणे** अक्रि. बुडवण्याच्या उद्देशाने दुसऱ्याजवळून कर्ज अथवा उधार माल घेणे; वाईट उद्देशाने उधारी करणे.

**उचकणे** अक्रि. दचकणे : 'गोपाळाला पाहून ती उचकली.'– झाकोळ १०३.

**उचकणे** अक्रि. रागाने ओरडणे.

**उचकणे, उचकने** न. १. दाखला; उदाहरण. (व.) २. टोमणा; छद्मी भाषण; हिणवणे. (क्रि. देणे).

**उचकवाचक करणे** पहा : **उचकटणे**

**उचकळ्याबुचकळ्या** क्रिवि. बुडत्या माणसाच्या पाण्यातल्या गटंगळ्या. (क्रि. देणे).

स्त्री. (ल.) उपजीविकेसाठी धडपड; संसारातील अडीअडचणी; नशिबाचा बरावाईट फेरा. (क्रि. देणे). . [बुचकळ्याचे द्वि.]

**उचका** पु. १. काळजी, ध्यास, वेध यामुळे होणारा भास; स्वप्न; हुसका : 'दुखणाइताशेजारी झोपच येत नाही. उचका असतो.'– माजी १४६. (क्रि. येणे, असणे, लागणे, पडणे). २. एखाद्या गोष्टीचे औत्सुक्य, कुतूहल; मनात पक्के बसलेले भय किंवा धाक; चिंता; घोर; धोसरा. (क्रि . धरणे, लागणे, बसणे).

**उचका** स्त्री. पैसे वगैरे लाटण्याचा उद्योग; फसवेगिरी; खिसेकातरूपणा; उचलेगिरी; भामटेगिरी; दुकानचोरपणा; उचापत; उधारी; उसना, उधार माल. (क्रि. घेणे, काढणे, करणे.) उचका या शब्दाने नेहमी लबाडी ध्वनित होते.

**उचकाउचक** स्त्री. १. घाईने, उतावीळपणाने ओढणे, हिसकणे. २. फसवणूक; द्रव्यादिक उपटणे; उचलेगिरी; लपवालपव. पहा : **उचका** (क्रि. करणे, काढणे).

**उचकाना** वि. उंच कान असलेला : 'उचकाना फणेंद्र ।'– उगी ९.

**उचकी** स्त्री. कंठामध्ये सशब्द असा आचका बसणे; श्वासोच्छ्वासातील अडथळ्यामुळे निर्माण होणारा ध्वनी; गुचकी; आचकी; उंडकी; हिक्का. (क्रि. लागणे, येणे) : 'उचकी उदानलिंगापासून येतसे जाणा ।' [ध्व.] (वा.) ***उचकी लागणे***– १. (आजारी मनुष्य) अत्यवस्थ होणे; शेवटच्या स्थितीत येणे; मरणोन्मुख होणे : 'उचकी लागली उसित गेला । पीत उसळलें उलाट आला ।' – दास ३.६.३३. २. आठवण काढणे.

**उचक्या** वि. १. उचल्या; चोरट्या; भामटा; खिसेकापू; उपट्या; दुकानचोर. २. आपले बळ, शक्ती, ऐपत न पाहता हवे तसे, पाहिजे त्या अटीवर पैसे काढणारा; माल उधार खरेदी करणारा.

**उचगा** पु. गटांगळी : 'नबाब मशारनुलेची अवस्ता पाहता नदीमध्ये उचगे खात माणूस कैसे श्रम पावते तेणेपरी विचार.'– ईएमपी १६४.

**उचट** पहा : **उचाट**

**उचटणे** उक्रि. चिकटलेला, जोडलेला पदार्थ वर उचलून काढणे (तव्यावरील भाकरी, खिळे मारलेले झाकण). पहा : **उचकटणे** : 'पत्र उचटिलें प्रयत्नें । ग्वाही करायाकारणें ।।' – तुगा ४१०४. [सं. उच्चाटन]

**उचटणे** सक्रि . १. पहा : **उचाटणे**. २. उपटणे : 'जन्ममरणाचिया उचटूनि पेडी । मग तये बिंवडी ज्ञान पिके ।' – ज्ञागा २१३.

**उचटणे** न. उलथणे; कलथा; उचटण्याचे साधन. [सं. उच्चाटन]

**उचडणे** पहा : **उचटणे** : 'धीडरें घातलें तें उचडुं बैसलीं । तवं मोडलें.'– लीच ४.४८.

**उचपण** न. मोठेपणा : 'सांडूनि कुळाचें उचपण ।' –एभा १२.२३७.

**उचमपचम** न. १. विनाकारण दुसऱ्याच्या भानगडीत पडणे; लुडबूड करणे; उठाठेव; उपद्व्याप; उचापत. (क्रि करणे, उरकणे, पाहणे). २. रिकामे दोष काढणे; दुसऱ्याला नावे ठेवणे; कुटाळी; कुचेष्टा. ३. खोट्या सबबी; टाळाटाळ; उडवाउडव.(ध्व.)

क्रिवि. उठाठेव, उपद्व्याप करून; टाळाटाळीने; आढेवेढे घेऊन.

**उचल** स्त्री. १. चाल; हल्ला; उठाव; उत्थान; घाला. (क्रि करणे). २. पुन्हा वर डोके काढणे; पुन्हा जोरावणे; बळावणे (आजार, शत्रू, गोंधळ इ.) (क्रि. खाणे). ३. उत्तेजन देणे; प्रवृत्त करणे; प्रोत्साहन देणे; मागे लागणे (क्रि. देणे). ४. पुन्हा उभे राहणे; जोडणे; स्थापना करणे; (कर्जबाजारी किंवा नादार इसम) स्थिरस्थावर होणे (क्रि. घेणे). ५. (प्रयत्नपूर्वक) एखाद्याला वर उचलणे, आणणे. ६. जागृती; चळवळ; उठावणी : 'सर्व प्रांतात एकदम उचल झाली.'– टिळकचरित्र ३.६.३. [सं. उत् + चल्]

**उचल** स्त्री. (वाटपामध्ये) एखाद्याच्या हिश्शाला आलेल्या (विहीर किंवा एखादा हक्क) मालमत्तेचा मोबदला म्हणून दिलेला जमिनीचा विशिष्ट तुकडा. [सं. उत् + चल्]

**उचल** स्त्री. १. आपल्या सावकाराकडून –पेढीकडून किंवा इतर कोणाकडून वेळोवेळी काढलेल्या, उचललेल्या रकमा. (क्रि. उचलणे, फेडणे). २. अशा रकमा उसन्या घेणे; उधारी. (क्रि. करणे). ३. पैशाबद्दल तगादा लावणे, करणे; छळणे; नड लावणे. ४. पगाराचा, मजुरीचा आगाऊ मिळणारा भाग : 'फारच अडचण असेल तर त्यांना उचल मिळत असे.' – अशीही.

**उचलचावडा, उचलचावरा** वि. बेछूट, बेलगाम; उच्छृंखल; अविचारी; धंद्यात मन नसलेला; लहरी; हुक्कीबाज; अस्थिर; चंचल; तऱ्हेवाईक; छांदिष्ट.

**उचलजागता** ताजेतवाने होण्या–करण्यासाठी तयार; हुशारी आणणारा : 'उभीं झोंपतीं झाडें, त्यांचा उचलजागता चाळा ।' – कृष्णाकाठीं कुंडल (गोविंदाग्रज).

**उचलटप्पू** वि. १. उडाणटप्पू; भटकणारा; कोठेही स्थिर नसणारा. २. वाटसरू; उपऱ्या; कायम वस्ती न करणारा (फिरस्ता); खुंटावरचा कावळा.

**उचलणी** स्त्री. उठाव; उचल; वर करणे; उचलणे. [सं. उत्+चलन]

**उचलणी** स्त्री. उचला; कौल घेण्याचा दगड (कौल इष्ट असल्यास हलका व अनिष्ट असल्यास जड जाणवतो, असे म्हणतात).

**उचलणे** सक्रि. खालची किंवा खाली पडलेली वस्तू वर घेणे : 'हें असो पावो उचलिला ।' – ज्ञा १८.७३६.

**उचलणे** अक्रि. १. वर येणे; वर येण्याचे प्रकार – (अ) पित्त, पुरळ, फोड, गळवे वगैरे शरीरावर उठणे, उत्पन्न होणे. (आ) पाण्यावर लाटा, बुडबुडे उत्पन्न होणे : 'जैशा उचलती लहरीवरी लहरी ।'– दास ११.९.१७. (इ) जमिनीवर वारुळे, भौमे, उंचवटे तयार होणे. (ई) सारवलेल्या जागेवर खरपुड्या, पोपडे येणे. (उ) आकाशात ढग येणे : 'तेथें प्रळये मेघ उचलले । कठिण घोषें गर्जिन्नले ।'– दास १३.४.१४. २. वाढणे; लठ्ठ होणे; मोठे होणे. ३. उठावणी करणे : 'म्हणे पांडवसैन्य उचललें ।'– ज्ञा १.८८. ४. उंच होणे; वाढणे; अंकुर फुटून वर येणे. ५. उचलून येणे; पोटात अस्वस्थता वाटणे; ढवळणे; पित्त वर येणे; ओकारी येणे; मळमळणे. [सं. उच्चलन] (वा.) **उचलून जाणे, येणे** – वादविषयी, युद्धसंबंधी आव्हान देणे; वाद उत्पन्न करणे, ओढून आणणे, सुरुवात करणे; चढाई करणे : 'जे जुंझावया उचलोनि आले असती.'– गीताचंद्रिका १.२२. **उचलून जाणे**– १. लग्नाला, विवाहाला वरपक्षाच्या ठिकाणी वधूपक्षाने इष्टमित्र आणि सामान यांसह जाणे. २. टेकीला येणे; हैराण होणे : 'घरच्या गरिबीमुळे तो उचलून गेला आहे.'– गार १७१. **उचलून बोलणे, उचलून गोष्ट सांगणे** – १. बढाई बाता झोकणे, मारणे. २. ताठ्याने उठून बोलणे. ३. आपला दर्जा न ओळखता बोलणे. ४. विरोध दर्शविणे; उर्मटपणा करणे : 'रायदुर्ग, चित्रदुर्ग वगैरे लहानमोठी संस्थानें आपोआप येऊन भेटोन खंडण्या दिल्या. कोणी उचलून गोष्ट सांगितली नाही.'– पेद २८.१७६.

**उचलणे** सक्रि. १. वर करणे, धरणे; उठावणे; अंगीकारणे; स्वीकारणे; पत्करणे (काम, भाग, भूमिका, प्रांत). २. हाती घेणे : 'पुढें मूर्तिपूजा हळुहळु आर्यांनीहि उचलली असें दिसतें.' – मसाप २.२.११६. ३. उत्तेजन देणे; उभा करणे; मनात भरवणे; चेतविणे; चेव आणणे; इरेस पेटवणे (वाद, मूल इ. विषयी). ४. लांबविणे; चोरणे. ५. उचल करणे; रक्कम घेणे. ६. सोलून निघणे : 'उपचारें आंगिची त्वचा उचलली ।' – रुस्व ५६१. (वा.) **उचलून आपटणे**– वर उचलून खाली टाकणे; मोठ्या जोराने आपटणे; आदळणे. **उचलून देणे**– १. (तुळशी, बेलपत्रे वगैरे वस्तू हातात घेऊन) शपथ घेणे; (कोणाच्या नावाने) संकल्प करणे. २. स्वसंतोषाने उक्ती रक्कम कोणा एकास देणे. ३. वेगळे काढून देणे. ४. आपणहून देणे; स्वखुषीने देणे. **उचलून धरणे**– १. पाठिंबा देणे; मनःपूर्वक स्वीकारणे. २. सतावून सोडणे; धरणे घेऊन बसणे; खनपटीस बसणे; तगादा लावणे; ओढून धरणे (भिक्षेकरी वगैरेंनी). ३. भारी अटी लादणे; जबर किंमत, व्याज मागणे (सावकार वगैरेंनी). ४. एखाद्याचा विशिष्ट पक्ष स्वीकारणे; जबाबदारी पत्करणे; अभिमान बाळगणे; समर्थन करणे; आधार देणे. ५. एखाद्याचा मुद्दा, म्हणणे इ. बरोबर आहे असे म्हणणे; पाठिंबा देणे.

**उचलता पाई, उचलत्या पाई** अति त्वरेने : 'तैसियां उचलतां पायीं धावती ।' – शिव ६८२; 'जावया निघाला । लवलाही । तंव शकुन जाहले दोही बाही । म्हणौनि आला उचलत्या पाई । द्वारकेसी ।।' – कथा ४.१६.२२.

**उचलते दार** न. (स्था.) वर उचलून घेता येण्यासारखे दार.

**उचलदडप** स्त्री. धावपळ : 'दिवसभराच्या उचलदडपेने वामन खूप थकला होता.'– बाविबु १५९.

**उचलद्वार** न. (स्था.) द्वाररक्षणार्थ दरवाजाला अडकवलेली व खालीवर करता येणारी लोखंडी सुळक्यांची चौकट.

**उचलनी** स्त्री. विकास; उत्थान : 'करी कमलांची उचलनी'– दाव १७९.

**उचलपाखल** क्रिवि. वरखाली; ढवळाढवळ.

**उचलपाचल** स्त्री. हालवाहालव : 'आपल्या सामानाची उचलपाचलसुद्धा तेच करीत....'– बहुरूपी २५.

**उचलपांगडी, उचलबांगडी** स्त्री. १. अर्धचंद्र देणे; डिच्चू देणे; हातपाय धरून उचलणे; जबरदस्तीने नेणे. २. जबदरस्तीने घालवून देणे; हकालपट्टी करणे; उच्चाटन : 'मुधोजीची उचलबांगडी होण्याचा वेळ आला होता.' – विवि ८.६.१११. ३. (ल.) पदच्युती.

**उचलपीक** न. (कृषि.) १. भातशेतीमध्ये पेरणी व पुनर्रोपणी यामधील सहा आठवड्यांच्या कालावधीमध्ये बरीचशी शेतजमीन मोकळी असते. ह्या कालावधीत लवकर येणारे एखादे भाजीपाल्यासारखे पीक. अशा पिकांना खते व पाणी भरपूर प्रमाणात लागतात. २. उसामध्ये अथवा हळदीच्या पिकामध्ये प्रथमावस्थेत दुसरे लवकर येणारे पीक. उदा. उसाच्या दोन ओळीत लावलेला उपट्या भुईमूग, हळदीच्या पिकात लावलेला मका इ.

**उचलपुची** वि. एक शिवी. ज्याची बृहती उचललेली आहे असा : 'येसूचे छंद कशी उचलपुच्चाला ठुशी.' – पला ८०.

**उचलमावंदे** न. उच्चाट; हकालपट्टी. (व.)

**उचलला** वि. १. वर आलेला; निघालेला; सोडून चाललेला : 'उचललेया प्राणासरिसीं । इंद्रियेंही निगती जैसीं ।'–ज्ञा १२.१०१. २. मर्जीनुरूप, इच्छेप्रमाणे मंजूर केलेला; नेमून दिलेला.

**उचलला संसार** तुटपुंज्या प्राप्तीवर चाललेला संसार, कामधंदा, व्यापार.

**उचलला हात** स्वेच्छेने देण्यासाठी पुढे केलेला हात; स्वसंतोषाने देणे.

**उचललेले काम** स्वखुषीने पत्करलेले, झेपेलसे पाहून घेतलेले काम.

**उचलवाखल** क्रिवि. ढवळाढवळ.

**उचलसाचल** पहा : **उचलाउचल**

**उचला** पु. देवीच्या किंवा इतर ग्रामदेवतेच्या देवळात देवाजवळ ठेवलेला एक दगड. काही गोष्टीविषयी देवाला प्रश्न करून तो उचलला असता केव्हा जड वाटतो तर केव्हा हलका वाटतो. त्यावरून त्या प्रश्नाचे उत्तर समजते. देवळातील कौल लावण्याचा दगड. (कों.)

**उचलाउचल** स्त्री. १. प्रापंचिक बिऱ्हाड वगैरेंचे स्थलांतर २. अस्ताव्यस्त फेकाफेक; घाईने जिनसा शोधणे, उलगडणे वगैरे; कोणी काही उचलण्याचा व्यापार.

**उचलाडेवर** स्त्री. काढणे-घालणे; उचलणे व ठेवणे; पुन्हा पुन्हा उचलणे; उचलाउचल. (कों.)

**उचलाव** पु. उठाव. पहा : **उचल**

**उचलून पाणी** उसाला किंवा एखाद्या पिकाला दुसऱ्या ठिकाणाहून वरून पाणी देण्याचा प्रकार.

**उचले** वि. उचलल्यासारखे; साहित्याशिवाय; सडे : 'येथून समुद्रासह वर्तमान स्वार होऊन येथून उचले तेथे येऊं....' – पेद ३४.११३.

**उचलेगिरी** स्त्री. १. भामटेगिरी; कोणाचे लक्ष नसताना बारीकसारीक वस्तू पटकन पळवणे, खिशात घालणे : ' उचलेगिरीतले प्राथमिक शिक्षण मिळवण्याला आडवळणी गावातल्या यात्रेसारखी शाळा क्वचितच आढळेल.'– गांगा १०६. २. दुसऱ्याच्या वाङ्मयातील काही भाग स्वत:च्या नावावर खपविणे; वाङ्मयचौर्य : 'मराठी वाङ्मयात उचलेगिरी वाढीस लागली आहे.'– न्यूनगंड १७०.

**उचल्या** पु. भामटा; खिसेकापू; चोरांचा एक प्रकार; किरकोळ चोरी करणारा : 'मैंद उचले खाणोरी । सुवर्णपंथी भुरेकरी ।'–दास ३.७.४९.

**उचल्या** वि. थोडा काळ एके ठिकाणी राहणारा; उपरा. पहा : **उचलटप्पू**

**उचल्या हाते** वाटेल तसा उचलून : 'ते उचल्या हातें याजकडे पैका देतात म्हणून विदित झाले.' – ऐसंसाखं ४.१००.

**उचलौनि** क्रिवि. आपणहून होऊन : हे उचलौनि तुमचेया ठायासि आले.' – लीचपू ५.

**उचवटणे** अक्रि. उंच होणे; उंच होत जाणे : 'जैसी जैसी भूमि उचवटे । तेणेंचि आधारें तो कळसोत्तर कामवटा कीं ।'– विद.

**उचवड,उंच** वि. उच्च प्रतीचा : 'ते वारू उचवडे । काइ वानूं ।'– शिव ९३३.

**उचंगणे** अक्रि.झपाट्याने, जोराने वाढणे; फोफावणे; लवकर वाढणे; पुष्ट होणे (मूल, रोगी, जनावर). (को.)[सं. उच्च+ अंग]

**उचंडळणे** उक्रि. हिसळणे; सांडणे; पातळ प्रवाही पदार्थ हलण्याने ढवळून बाहेर पडणे, सांडणे. [सं. उच्च+ आंदोलन]

**उचंबळ** स्त्री. १. आतील चलनवलनामुळे काठोकाठ भरून वाहणे, भरून येणे; नवी, तळी इत्यादी काठोकाठ भरून येण्याची स्थिती; भांड्याबाहेर सांडेल इतकी भर, वाढ, फूग, आवेग : 'कवित्वाची उचंबळ अनेक ठिकाणी...' – श्रीए ५६. २. तारांबळ.(गो.) (वा.) **उचंबळ खाणे** – उठून चळचळ करणे; पुन:पुन्हा उठून गडबड करणे; एखादे काम अस्थिर वृत्तीने चालू ठेवणे; विशेषत : पराभूत प्रतिपक्षाने पुन्हा वर डोके काढणे या अर्थी योजतात. याच्या विरुद्ध पड खाणे.

**उचंबळणे, उचमळणे, उचमणे** अक्रि. १. वर येणे; भरून वाहण्याच्या स्थितीला येणे (नद्या वगैरे); डळमळणे; हेलकावणे : 'घडघडीत अंबर । उचंबळत सागर ।'– ज्ञा १.१२९. (सामा.) वाढणे; माजणे : 'रिता कुंभ समुद्रीं रिगे । तो उचंबळत भरोनि निगे ।'– ज्ञा १७.१९. २. आनंद वगैरे विकार मनात न मावता बाहेर पडणे : 'मीही तैसेंचि म्हणें । उचंबळला सांता ।।'–ज्ञा ७.११७. ३. जोर करणे; उसळून वर येणे; पित्ताने मळमळणे; ओकारी वाटणे.

**उचंबळा** पु. १. उचंबळ; भरती; उकळी (हर्ष, आनंद यांची). २. (ल.) हर्ष; आनंद.

**उचाट** पु. कंटाळा; उद्वेग; नाखुषी; नाराजी; तिटकारा (क्रि. घेणे, खाणे). [सं. उच्चाटन]

**उचाट** पु. ध्यास; नाद; उत्कंठा; घाई; अधिरेपणा; अत्यौत्सुक्य; एखादी गोष्ट करण्याच्या कामी भर. (क्रि. भरणे, खाणे).

**उचाट** पु. खाजगी लिलावाने विक्री. [सं. उच्चाटन]

**उचाटणे** सक्रि. तिरस्कार, वीट येणे; कंटाळा येणे; तिटकारा येणे; मन उडणे. [सं. उच्चाटन]

**उचाटा** पु. १. (नाट्य) मुखवटे तयार करण्याकरिता केलेला ठसा, आकृती; पौराणिक नाटकातील गणपती आदींकरून मुखवट्यांसाठी मातीची आकृती प्रथम करून तिच्यावर कागदाचे थर चिकटवून तयार करण्यात येणारी आकृती. जसे : – गणपतीचा, नरसिंहाचा उचाटा. २. (मुद्रण) ज्यातून ठसे (टाईप) गाळले जातात तो साचा. [सं. उच्चट]

**उचाटी** स्त्री. एखाद्या वस्तूचा किंवा कामाचा आलेला कंटाळा.

**उचाडपछाड** स्त्री. उलथापालथ; भानगड; घोटाळा : 'विलायत सरकारचे सपाट्यांत आमचे सरंजाम बहाल होऊन माघारे आले तस्मात् आता आमचे उचाडपछाड होणार नाही.'– इना ४४.

**उचापत** स्त्री. १. माल उधार विकत घेणे; उधारी; उसणवट : 'वाण्याची उचापत देऊं कशानें मी आतां ।'– पला ८०. २. उधार माल; पतीवर आणलेला माल : 'उसिणें उचापत कां देतील'– दावि ३०१. ३. कोणाकडून वेळोवेळी काढलेली रक्कम. ४. (सामा.) कर्ज : 'झाली शुद्ध उचापत प्रभुवरें केली बिदागी दहा ।'– राला १४. ५. उठाठेव; नसती उलाढाल; भानगड; विकत भांडण : 'त्या उचापतीत स्वत:जवळ असलेली सारी पुंजी संपवून टाकली.'– उद्र १५.[सं. उद्+ आपत्](वा.) **उचापत खाणे**– १. चांगली गोष्ट घडून येईल– पुढे काहीतरी मिळेल या आशेवर चैन करणे. २. दुसऱ्याचे भांडण विकत घेणे; भांडण ओढून घेणे; विकत श्राद्ध घेणे; लष्कराच्या भाकरी भाजणे.

**उचापत** स्त्री. एखाद्या कामासाठी वेळोवेळी कराव्या लागणाऱ्या खर्चाची जबाबदारी : 'नाशकांत श्रीसुंदरनारायणाच्या देवालयास काम लाविलें आहे. त्यास श्रीमंतास विनंति करून कारखान्याचे उचापत आपल्याकडे लाविली आहे.'– चंचूद ४२.

**उचापतखाऊ** वि. उधारीवर, आडमार्गाने जाऊन उठाठेवीने उपजीविका करणारा.

**उचापतखोर** वि. नसत्या उठाठेवी करणारा : 'नाना हा निरुद्योगी असल्यामुळे उचापतखोर होता.'– मिरास ११२.

**उचापतविचापत** पहा : **उचापत**

**उचापती, उचापत्या** वि. १. उठाठेवी करणारा; नसते उद्योग करणारा. २. उधार घेणारा व देणारा. ३. भानगडी करणारा : 'माझी बेफिकीरी, आळस आणि उचापती स्वभाव यामुळे...'– वाघसिंह ५.

**उचापतीचा रोजगार, उचापतीचा व्यवहार** पु. उधारीचा, उसनवटीचा, केवळ पतीवर उठाठेवीचा व्यवहार. याच्या उलट रोकडीचा व्यवहार.

**उचारापाचार** पु. दृष्ट लागून येणारे, नवीन किंवा उलटणारे दुखणे. (क्रि. करणे, होणे).

**उचारापाचार** पु. दुसऱ्याच्या खाजगी गोष्टी लोकांत सांगणे; बकणे; मुखरस पाघळणे (क्रि. करणे). [सं. उच्चारणे द्वि.]

**उचाल, उचाल जाणे** पहा : **उच्छाल, उच्छाल जाणे**
**उचावणे** अक्रि. उंच होणे : 'उचावले दोंद दीसे।' – सव ९२.
**उचासीरी** क्रिवि. वरपर्यंत : खांब उभितातिं, उचासीरी। सोल वोढिताती – रुस्व. १७१५.
**उचित** वि. १. देशकाल, लोक, शास्त्र, रीती इत्यादिकांना अनुसरून केलेले; योग्य; लायक; जुळणारे; साजणारे; बरोबर; चांगले : 'प्रमाण न म्हणों जरी उचित माझिया नीचते।'– केका ३. २. सवयीचे; अभ्यासातले.
न. १. योग्यपणा; योग्यता : 'देवाचें जें मनोगत। तेंचि आपलें उचित।'– दास ४.८.२२. [सं. वच्] (वा.) **उचितास येणे**– योग्यतेनुरूप उचित वाटणे; पसंत पडणे; योग्य दिसणे; बरोबर वाटणे; मानवणे; आवडते.
**उचित** पु. पारितोषिक; देणगी :' विजयादशमीस पंतप्रधान यांणीं पदरचे मंडळीस उचित द्यावयाचा करून वस्त्रें दिलीं...' – ऐलेसं ६७९३.
**उचित अपूर्णांक** पु. (ग.) छेदापेक्षा अंश लहान असणारा अपूर्णांक.
**उचितज्ञ** वि. उचित किंवा अनुचित ज्यास समजते तो; व्यवहारज्ञ; शहाणा; चतुर; माहीतगार.
**उचित्त** न. सन्मान. पहा **: उचित** : 'मग राजा याणी (राजानें) आपले हातीं सर्वांस भूषणें वस्त्रें वाहिलीं (दिली, अर्पण केलीं) मग भोजने झालीं. मग उचित्तें व वृत्ति दिधली ऐसी वाणीं दिधली.'– बिंब ३.
**उचिष्ट** पहा : **उच्छिष्ट** : 'बहुतांचें उचिष्ट अंगीकारी।'– दास २.१.६०.
**उचीसीर** पु. सर्वांत उंच डोके असलेला : 'भूतळिचिया देवा भूपाळ उचींसिरू।'– मूप्र २५.७५.
**उचेट** स्त्री. कोंदणातून खडा काढल्यानंतर उचकटून काढलेले सोने, रूपे इ. [सं. उच्चाटन]
**उचोटा** पहा : **उंचवटा**
**उच्च** न. १. केंद्रस्थ सूर्यापासून अति दूर असणारा ग्रहकक्षेतील बिंदू; सूर्योच्च. २. ज्या राशीमध्ये विशिष्ट ग्रह बलवान असतो ती रास. जसे : – सूर्य मेष राशीत, चंद्र वृषभ राशीत, बुध कन्या राशीत, शुक्र तूळ राशीत असल्यास त्यास उच्च मानतात.
वि. उंच; भव्य; श्रेष्ठ; उच्च प्रदेशावरील; उच्च जातीय; उच्चासनास्थित इ. : 'उच्चा तेआं खर्जुरी पोफळी।'– वछा १३५.
**उच्चतर आरंभिक वेतन** (शाव्य.) सेवेच्या सुरुवातीलाच वेतनश्रेणीतील वरच्या टप्प्यावरचा पगार देणे.
**उच्चतागंड** पु. (मानस.) आपण इतरांपेक्षा श्रेष्ठ आहोत ही भावना; स्वतःच्या तथाकथित मोठेपणाची फाजील अथवा अतिशयोक्त जाणीव. [सं.]
**उच्चतामापी** न. (भूशा.) समुद्राच्या पृष्ठभागापासून वरची एकंदर उंची मोजण्याचे यंत्र; उंचीमापी.
**उच्चदिवाण** वि. (ल.) खुळा; मूर्ख; दीड शहाणा. (गो.)
**उच्चनीचभाव** पु. एक मोठा व एक लहान अशी भावना; द्वैतभाव.
**उच्च न्यायालय** राज्यस्तरावरील सर्वात वरिष्ठ न्यायालय. जिल्हा न्यायालयातील खटले अपिलात या न्यायालयात जातात.
**उच्चपदस्थ** वि. मोठ्या अधिकाराच्या, सन्मानाच्या जागी असलेला : 'उच्च पदस्थांचे संदेश...'– वावारु २५८. [सं.]
**उच्चभ्रू** वि. स्वतःला इतरांपेक्षा सुसंस्कृत व बुद्धिमान समजणारा किंवा इतर ज्याला असा मानतात तो : 'बरेच उच्चभ्रू लोक जुनं मराठी वाङ्मय जुनं म्हणून वाचीत नाहीत.'– पासंग १२०.
**उच्चभ्रूसमाज** पु. १. समाजात वरचे स्थान असणारा वर्ग. २. (उप.) विद्वतेची व व्यासंगाची ऐट व प्रतिष्ठा असणारा समाज; पोकळ व दिखाऊ पांडित्य असलेला समाज. [सं.]
**उच्च माध्यमिक शाळा** स्त्री. (शिक्षण.) इयत्ता आठवीपासून शालान्त परीक्षेपर्यंतचे शिक्षण देणारी संस्था.
**उच्चलन, उच्चालन** न. १. उंच करणे, धरणे; उचलणे. २. उच्चाटन; हकालपट्टी. ३. यंत्राच्या साहाय्याने वर उचलणे; उंच उचलणे. ४. सामान वर उचलण्याचे यंत्र. [सं.]
**उच्चवर्णीय** वि. ब्राह्मण, मराठा इ. वरच्या समजल्या जाणाऱ्या जातीचा.
**उच्च वेतनाची आर्थिक लाभप्रदता** (अर्थ.) ठरलेल्या दराहून अधिक वेतन दिले तर कामगारांचा उत्साह, त्यांची कामाविषयी आस्था, कामाची प्रेरणा यात वाढ होऊन उत्पादनात प्रमाणतः अधिक वाढ होते. एकूण उद्योग आर्थिकदृष्ट्या लाभप्रद होतो–हे उद्योगधंद्यातील एक तत्त्व.
**उच्च शिक्षण** न. शालान्त परीक्षेनंतर विद्यापीठीय स्तरावरचे शिक्षण.
**उच्चस्वर** पु. चढा आवाज; मोठा, स्पष्ट आवाज; तीव्र स्वर; वरचा सूर; तार सप्तकातील आवाज. [सं.]
**उच्चलन, उच्चार्तन** न. उंच करणे; हकालपट्टी.
**उच्च व्यवसाय संघटना** स्त्री. वाणिज्य– मोठ्या उद्योजकांची संघटना.
**उच्चाट** पु. ध्यास; आतुरता; उत्कंठा. पहा : **उचाट** २ : 'माझिया हा मनें घेतला उच्चाट। पहावें वैकुंठ पंढरी हे॥'– बगाथा ३४६.
**उच्चाट** पु. उचल्या; भामटा. [सं. उच्चाटन]
**उच्चाटण, उच्चाटन** न. १. हकालपट्टी; उचलबांगडी; उखडणे; घालवून देणे; उलथून पाडणे; दूर करणे. २. मंत्राच्या साहाय्याने मनुष्याला स्वतःचे घरदार, नोकरी, उद्योग याविषयी तिटकारा उत्पन्न करून त्याला ते सोडायला लावणे; जादूटोणा करून वेडापिसा करणे. ३. जादूटोणा; मंत्रप्रयोग. [सं. उच्चाटन]
**उच्चाटणे** सक्रि. उच्चाटन करणे.
**उच्चातिउच्च** वि. सर्वश्रेष्ठ; श्रेष्ठांत श्रेष्ठ : 'तुमच्या मतें तुमची अनन्योपभोग्य सुधारणेचीं उच्चातिउच्च जी तत्त्वें' – लोटिकेले ४.७९. [सं.]
**उच्चाधिकार** पु. वरच्या दर्जाचा अधिकार.
वि. वरिष्ठ प्रतीचे अधिकार दिलेले; वरच्या दर्जाचे अधिकार असलेले (आयोग, समिती वगैरे).
**उच्चार, उच्चारण** पु. न. वाणीपासून वर्णात्मक शब्दाची होणारी स्पष्टता किंवा त्याला अनुकूल असा व्यापार; बोलण्याची क्रिया, पद्धती; बोलणे; बोलून दाखवणे; भाषा; बोल : 'उच्चारेंही व्यक्ती। आणिती पुढती।'– ज्ञा १७.३७०. [सं. उत्+चर्]
**उच्चारचिन्ह** पहा : **उच्चारभेददर्शक**
**उच्चारण** न. १. स्पष्ट बोलणे; स्पष्ट शब्दोच्चार. २. मुखातून होणारी

उच्चारप्रक्रिया. [सं.]

**उच्चारणकेंद्र** न. (भाषा.) एखाद्या स्वनाचा उच्चार करताना जीभ ज्या ठिकाणी स्पर्श करते तो बिंदू; उच्चारणअवयवाच्या वर असलेला तोंडामधील भाग. [सं.]

**उच्चारणीय** वि. सांगण्याजोगा; बोलून दाखवण्याजोगा.

**उच्चारणे** उक्रि. उच्चार करणे; तोंडातून ध्वनी काढणे; बोलणे; बोलून दाखवणे; स्पष्ट सांगणे. [सं. उत्+चर्]

**उच्चारणेंद्रिय** न. (भाषा.) स्वनाचा उच्चार करण्यासाठी आवश्यक असणारे तोंडातील ओठ, जीभ, तालू, स्वरनलिका इत्यादी अवयव.

**उच्चारदर्शक** (भाषा.) ध्वनिउच्चारातील फरक दाखवणाऱ्या (खुणा).

**उच्चारदोष** पु. मध्यवर्ती चेतासंस्थेच्या विशिष्ट दोषांमुळे शब्दाच्या उच्चारणात दोष निर्माण होणे; शब्दोच्चारण न होणे. [सं.]

**उच्चारपूरक स्वर** (भाषा.) स्पष्ट उच्चार येण्यासाठी मदत करणारा स्वर. उदा. 'क' या अक्षराचा पूर्ण उच्चार करताना 'क्' या व्यंजनाला 'अ' या स्वराची मदत घ्यावी लागते.

**उच्चारभेददर्शक** पु. (भाषा.) अक्षराच्या खाली किंवा वर त्या अक्षराचा भिन्न ध्वनी, आघात इ. दर्शवण्यासाठी वापरली जाणारी (चिन्हे.).[सं.]

**उच्चारसर्पण** न. (संगीत.) आवाज किंवा स्वर किंवा वाद्य न बदलता पाठोपाठ येणारे सूर. [सं.]

**उच्चारसंसर्पण** न. (भाषा.) उच्चारातील बदल. [सं.]

**उच्चारित** वि. उच्चारलेले; बोललेले; सांगितलेले; उद्गारलेले.

**उच्चार्य** वि. उच्चारता येण्यासारखा; बोलण्यालायक; सांगण्याजोगे.[सं.]

**उच्चार्यमाण** वि. उच्चार होत असलेला. [सं.]

**उच्चालक** पु. (यंत्र.) तरफ; जड पदार्थ उचलण्याकरिता योजलेला लांब दांडा. [सं. उत्+चल्]

**उच्चालन** उंच करणे; उंच धरणे.

**उच्चावच** वि. लहानमोठा; श्रेष्ठकनिष्ठ; उच्चनीच : 'ये लोकीं उच्चावचें जाण । देवासि समान निजभावें ।'- एभा २७.३४०. [सं.]

**उच्चावचन** न. तेजी-मंदी; अधिक-उणा होणे. (वा)

**उच्चावणे** अक्रि. मोठा होणे. पहा : **उंचावणे** : 'तपस्तेजें बहू तोचि उच्चावला ।'- उचिशु ४. [सं. उच्च]

**उच्चासन** न. इतरांच्या मानाने अधिक उंचावर ठेवलेली मानाची बैठक. [सं.]

**उच्चांक** पु. इतरांपेक्षा वरचढ गुण; पूर्वीच्या सर्वांत उत्तम कामापेक्षा अधिक चांगले काम. [सं.]

**उच्ची** स्त्री. एखाद्याला वर चढवून त्याची केलेली फजिती. (ना.) (वा.) **उच्चीत येणे**– (स्तुती केल्यामुळे) चढून जाणे; बनणे. [का. हुच्चु = मूर्खपणा]

**उच्चीपट्टी** स्त्री. फजिती.

**उच्चीत येणे** अक्रि.चढून जाणे.

**उच्चैर्घोष** पु. मोठ्याने जयघोष; आकांडतांडव; उदोउदो : 'स्त्रीसुधारणा व स्त्रीशिक्षण यांच्या महातत्त्वांचा उच्चैर्घोष करणारांनीं ही गोष्ट अवश्य ध्यानांत ठेविली पाहिजे...'-लोटिकेले ४.८१.

**उच्चैःश्रवा** पु.१. कमी ऐकू येणारा,२.समुद्रमंथनातून निघालेल्या चौदा रत्नांपैकी एक- इंद्राला मिळालेला घोडा : 'तुरंगजातां प्रसिद्धां । आंत उच्चैःश्रवा मी ।।'- ज्ञा १०.२३७. [सं.]

**उच्छलन** न. १. पहा : **उच्चलन;** २. उसळी. [सं.]

**उच्छ्वास** पु. (वै.) अशुद्ध रक्तातील कर्बद्विप्राणिल (कर्बाम्ल) वायू आणि पाण्याची वाफ नाकातून बाहेर सोडण्याची क्रिया; श्वास बाहेर टाकणे.

**उच्छलिंध्र** न. भूमिछत्र. पहा : **अळंबे** : 'उच्छलिंध्र आणि पूर्णचंद्र । वत्सपदके समुद्र ।'- ऋ ४७. [सं. उच्छिलींध्र]

**उच्छाई** उत्साही : 'सांगतो सत्कारूनियां मन उच्छाई ।'- होला ४०.

**उच्छाद** पु. १. उपद्रव; त्रास; पीडा; सतावणूक; गांजणूक; पुरेपुरेसे करणे. (क्रि. देणे.). २. लुटालूट; जुलूम (चोर, दरोडेखोरांचा); खोड्या (मुलांच्या). (क्रि. आणणे, देणे, मांडणे). ३. उपद्रव झालेली स्थिती; त्रस्तता.[सं. उत्सादन] (वा.) **उच्छाद काढणे**– त्रास सोसणे. **उच्छाद येणे**–त्रासणे; कंटाळणे; पीडित होणे. **उच्छाद मांडणे**–सतावून सोडणे.

**उच्छाप** पु. शापाचे निवारण; शापावर तोड, उपाय, इलाज याकरिता असणारा वर. [सं. उत्+शाप]

**उच्छाल** पु. वाढ; चढ; बढती; उत्कर्ष. (वा.) **उच्छाल जाणे**– १. संतापणे; एखाद्यावर रागावून उठणे. २. उडी मारणे (घोडा वगैरेंनी). [सं. उत्+चल्]

**उच्छाव** पहा : **उत्सव** : 'मंगळोच्छाव वाग्देवते । तां वदावें रसाल कथे । श्रोतया वक्तयाचे माथे । आनंदें डोलवी ।'- वेसीस्व १.६.

**उच्छास्त्र** वि. शास्त्रविरुद्ध; शास्त्र सोडून (भाषण, वर्तन). [सं. उत्+शास्त्र]

**उच्छिन्न** वि. पूर्णपणे नाश पावलेले; नष्ट झालेले. [सं. उत्+छिद्]

**उच्छिष्ट** वि. १. अवशेष राहिलेले; उरलेले (पदार्थ); उष्टे : 'पडिलिये ठायीं उच्छिष्ट सेवावें ।'- तुगा ६३२. २. (ल.) उपभुक्त; वापरलेले (वस्त्र, पुष्प, स्त्री इ.). ३. उष्टे; शिळे; नवीन नसणारे; उसने घेतलेले. न. उष्टी पात्रे; उच्छिष्टान्न : 'उच्छिष्टें काढी धर्माघरीं । ब्राह्मणाची भीड थोरी ।'- एरुस्व २.२६. [सं. उत्+शिष्ट]

**उच्छिष्ट कल्पना** दुसऱ्याने अगोदर व्यक्त केलेली कल्पना; शिळा, नावीन्य नसलेला विचार.

**उच्छिष्ट चांडाळी** एक क्षुद्र देवता. हिला प्रसन्न करण्याकरिता दोन जेवणाच्या मधील काळात भाकरीचा तुकडा दाढेत ठेवण्याचा एक विधी : 'कर्णपिशाच भगलिनी । उच्छिष्टचांडाळी रानसटवी जखणी । वेताळ मुंज्या काळरजनी । भजिजें जनीं अतिप्रीती ।' – हरि १३.६८.

**उच्छिष्टणे** उक्रि. उष्टे करणे; अर्धवट- काही काळ- भोगून टाकून देणे; जुने-शिळे करून टाकणे : 'येरू म्हणे गा उच्छिष्टलें । होमद्रव्य नेणती ।।'

**उच्छिष्ट भाषण, उच्छिष्ट श्लोक, उच्छिष्ट वाक्य** पूर्वी दुसऱ्याने म्हटलेले कवन अगर भाषण; वाङ्मयचौर्य.

**उच्छृंखल** वि. १. ताबा, दाब नसलेला; उतावळा; अविचारी; अविवेकी; अनियमित; गैरशिस्त : 'हे उच्छृंखल बोलणें कायसें ।'- ज्ञा ६.१६२. २. शास्त्र, राजा, वडील इत्यादिकांस न मानता वागणारा; उद्दाम;

स्वच्छंद; स्वैर; स्वेच्छाचारी : 'राहाटे उच्छृंखळु । तयापरी ।।'- ज्ञा १८.६६९. [सं.]

**उच्छृंखल चलनफुगवटा** पहा : **उत्प्लवी चलनफुगवटा**

**उच्छेद** पु. १. समूळ नाश; पूर्ण नाश; नायनाट; विध्वंस; खंड : 'कुरुवंशाचा उच्छेद होऊ नये म्हणून...'- युगान्त ३८. २. त्रासदायक कृत्य (शैथिल्याने उच्छाद बद्दल) : 'उच्छेद तो असे हा गे आरंभला । रोकडें विठ्ठला परचक्र ।'- तुगा ६४७. सामा. शब्द- धर्मोच्छेद, वंशोच्छेद, वृत्युच्छेद, वनोच्छेद, कुलोच्छेद, [सं. उत्+छिद्] (वा.) **उच्छेद आणणे, उच्छेद मांडणे**- त्रास देणे.

**उच्छेदक** वि. नाहीसे करणारा; नायनाट करणारा; त्रास देणारा; बुडविणारा; निर्दालन करणारा.

**उच्छेदणे** उक्रि. नाश करणे; नाहीसे करणे; उद्ध्वस्त करणे; फडशा, सप्पा, नायनाट करणे.

**उच्छेदन** पु. १. (वै.) शरीराच्या कोणत्याही भागाचा अभ्यास करण्याकरिता तो भाग पूर्ण किंवा अंशत: काढून घेणे. २. शरीरातील अवयव किंवा त्यांचे भाग, टोके वगैरे कापून काढणे. [सं.]

**उच्छेदित** वि. नाश केलेला; उध्वस्त केलेला. [सं.]

**उच्छ्य** पु. उंची : 'त्या तबकडीवर उच्छ्यदर्शक आकडे घातलेले असतात.'- ज्ञाको २१.२७२. [सं.]

**उच्छ्वास** पु. १. नाकातून आत घेतलेली हवा पुन्हा बाहेर सोडणे; बाहेर सोडलेला श्वास; (विशेषत:) जोराने श्वास टाकणे; सुस्कारा. २. हवा जाण्याकरिता ठेवलेले भोक; वायुमार्ग; श्वासरंध्र.३ पाण्याचा नहर; नळ; उश्वास. ४. (विरू.) उस्वास. उंचावरून आणलेल्या पाण्याची उंची कायम राहावी व पाणी दूर अंतरावर नेता यावे व आतील दूषित पाणी बाहेर जावे म्हणून बांधलेला हौद : 'नाना फडणिसांनी बांधलेले पुष्कळ उच्छ्वास आहेत.'- अस्तंभा [सं.]

**उच्छ्वासन** न. श्वास सोडणे; श्वासोच्छ्वास करण्याची क्रिया. पहा : **उच्छ्वास १** [सं.]

**उछक** वि. स्वैर : 'उछक आणि सहिष्ण । तोचि आत्मा ।'- दास १३.१.१७ पहा : **उच्छृंखल**

**उछह** उत्सव; सण : 'समर्थे रामनौमी उछह केले ।' – सप्र ४.९

**उछळिंद्र** भुईछत्री : 'उछळिंद्र कें पूर्णचंद्र'- ऋव २८८.

**उछंखळ** वि. पहा : **उच्छृंखल**

**उछाडपछाड** पहा : **उखाडपछाड**

**उछाय** पु. उत्साह : 'सभा देखोनिया बहु उछावे मनी'- मध.

**उछाव, उछाह** पहा : **उत्साह** : 'वेणीस्वामी रघुनंदन । ताटिका मारिती उछाहे ।'- वेसीस्व ११९.

**उछिष्ट** पहा : **उच्छिष्ट** : 'पुढे न शिवावें म्हणोनि उछिष्टा ।।' – दावि २०.

**उछेदणे** पहा : **उच्छेदणे** : 'मत्सरें यासी मिथ्या म्हणती । तरी अवघेचि ग्रंथ उछेदती । नाना ग्रंथांच्या संमती । भगवद्वाक्यें ।।'- दास १.१.१७.

**उजकरणी** स्त्री. उपक्रम; उठाव; उठावणी : 'आवघी काम करावयाची व घ्यावयाची उजकरणी वेदमूर्तींनी केली असे.'-पेद २२.३७८.

**उजखुरा, उजखोरा** वि. उजव्या हाताने काम करणारा. [सं. ऋजु]

**उजगर** पु. फुरसत : 'घरच्या माणसांनाही भेटायला त्याला उजगर मिळाला नाही.'- माजी ११५.

**उजगरा, उजगारा, उजगिरा** पु. १. (प्र.) उजागरा; जागरण; निजावयास उशीर : 'आझ्ळई उजगरा किती । कराल तुम्हीं ।।'- शिव २२२. २. (ल.) दु:ख; श्रम; त्रास; कंटाळा : 'आपुला घेवोनिया चारा । मग पेटती महामारा । तेणें होतसे उजगरा । ऋषीश्वरासी ।।'- कथा ४.१४.१२५. सामान्यत: पहा : **उजागरा** ३. जागृती आठवण. (क्रि. करणे, देणे.) [सं. उत्+ जागृ] (वा.) **उजगऱ्यास येणे**- १. प्रसिद्ध होणे. २. शुद्धीवर येणे : '.. मग आपणच उजगऱ्यास येईल.'- ऐलेसं ६६२०.

**उजगार, उजगारी** स्त्री. उत्कर्ष; प्रसिद्धी; लौकिक; भरभराट; वाढ. पहा : **उजागरी** : 'तितक्या उजगारीस ती (आमची भाषा) कधीतरी पोचेल की नाही याचा संशय आहे.' – निमा २०१. [सं. उत्+जागृ]

**उजड, उजडणी, उजडणे, उजडता** पहा : **उजेड**

**उजडा** वि. तुळतुळीत : 'गोसावीयाचा श्रीमुगुट उजडा होता.'- लीचउ १८३.

**उजदार** न. प्रवेशद्वार; पुढचे दार; पुढचा दरवाजा : 'निरविल तैं मग निजात्म स्वसुखे येशिल उजदारा ।' – देप ६५.[सं. ऋजु+द्वार]

**उजदार** वि. चकाकित, प्रकाशमान : 'उजदार दिसत अशें कर ।' (गो.) [सं. उद्योत]

**उजनिर्मळ** वि. लखलखीत : 'तियें जाली उजनिर्मळें ।'- ऋव ८९.

**उजम, उज्म** पु. थोरवी; गर्व; अभिमान; श्रेष्ठता : 'हे आपले सर्कारच्या गोष्टी उजमाच्या सांगतात.'- दिमरा १.१७. [फा. अजमत]

**उजर** पु. उत्कर्ष. [सं. ऊर्ज्]

**उजर** पु. शोभा.

**उजर्, उजरा** पु. तक्रार; हरकत;आक्षेप; बचाव : 'त्यांची स्थावर जंगम इस्टेट इन्साफावांचून त्यांचा उजरा ऐकल्यावांचून, महाराजांच्या हुकमानें सरकारांत घेतली.'- विक्षिप्त ३.१०२. [फा.]

**उजरणी** स्त्री. शुद्धी : 'उजरणी सहज गरती जाली ।' – ज्ञागा ५१७.

**उजरणे** उक्रि. १. दुरुस्त, डागडुजी करणे. २. मारलेले खिळे नीट करणे, सरळ बसविणे, करणे; पोचे आलेले भांडे नीट करणे; गोलाकार घडणे (लोखंडी काम) : 'मी भक्तिवश न चुकलों त्या कुब्जेच्याहि वपुसि उजराया ।'- मोशांति ७.४७. [सं. ऋजु+कृ]

**उजरणे** अक्रि. १. उत्कर्ष होणे. २. शक्ती परत येणे, सुधारणे; मूळच्या स्थितीवर परत येणे; हुषारी, तजेला येणे; टवटवीत होणे : (प्रकृती सुधारून) 'तेंहीं तैसा पाननायकु उजरिला : ' – लीच ३.८०. ३. मंद बुद्धीच्या मनुष्याची प्रगती होणे; बुद्धीचा विकास होणे; जास्त कळू लागणे : 'सांग हित सुज्ञ गुरू तूं आहेशि समर्थ याशि उजराया ।'- मोवन १.५२. [सं. उर्ज्]

**उजरणे** उक्रि. १. चकाकित करणे; स्पष्ट, प्रकाशित करणे; उठावदार करणे; स्वच्छ करणे; ठळक करणे (रेषा, आकृती, खूण, छाप) : 'तावी : पीटी : उजरी : तेणेकरूनी एक खते झाडी : '- दृपा १८.१९. २. पुन्हा उच्चारून पक्के करणे; उजळणी करणे; दृढ

करणे. [सं. उज्ज्वलन]

**उजरा** पु. १. प्रकट मार्ग; रीत : 'अनादि सिद्ध उजरा ।'– ज्ञा १६.२७१. २. प्रसिद्धी; उत्कर्ष. पहा : **उजगरा** [सं. उत्+जागृ]

**उजरावणे** उक्रि. स्वच्छ करणे (मासळी). पहा : **उजरणे** (गो.)

**उजरावा** पु. प्रसिद्धी; लौकिक; कीर्ती; बोलबाला : 'येणेकरून सरकारची किफायेत असे व दिगांतर कीर्त उजरावा प्रांती होऊन येईल.' – पेद २४.१८३. [सं. उत्+जागृ]

**उजरिसी** स्त्री. व्यवस्था; बंदोबस्त; लौकिक : '... माहादजी गदाधर यांणी दरखाची उजरिसी राखिली नाही, याजमुले पायमली आहे...'– पेद ४०.२५.

**उजरी** स्त्री. १. तेज; प्रकाश; प्रभा : 'प्रभेची जैसी उजरी । ते सोहंवृत्ती अवधारीं ।'– ज्ञा १४.३९१. २. स्पष्टपणा; स्वच्छता; निर्मळता; उपपत्ती विवरण : 'परी प्रमेयाची उजरी ।'– ज्ञा १८.५५. ३. उत्कर्ष; उजळा : 'तुका म्हणे कई भाग्याची उजरी । होईल पंढरी देखावया ।'– तुगा ५५८. ४. व्यवस्थितपणा : 'तैसी आहारनिद्रेची उजरी ।'–ज्ञा १३.७६८.

वि. स्पष्ट; उघड : 'जालया कामा नाहीं चोरी । तें कळसें होय उजरी ।'– ज्ञा १८.४३. [सं. उज्ज्वलन]

**उजरी** वि. सरळ : 'परि ते भजती उजरी नव्हे । विषम पडे ।।'– ज्ञा ९.३४५. [सं. ऋजु]

**उजरी** स्त्री. साहाय्य; सामर्थ्य; आश्रय : 'वल्लभाचिया उजरिया । आपणयाप्रति कुस्त्रिया । जोडोनि तोषिती जैसिया । अहेवपणें ।।'– ज्ञा १६.३७७. [सं. उर्ज]

**उजरून** क्रिवि. उघडून, उलगडून : '...त्यास कोणकोणते हिशोब देऊन पाठवावें ऐसें उजरून लिहिलें नाही.'– ऐलेसं ८४८.

**उजरे** क्रिवि. प्रकटपणे; उजळमाथ्याने; उघडपणे : '...आम्ही तेथे जाऊन उजरें रहावे, बरे–वाईट म्हणावे ते सारे जन आम्हांस हासेल.'– पेद २३.

**उजवट** वि. उजळ; गोरा. [सं. उज्ज्वल]

**उजवट, उजवड, उजवाड** पु. उजेड; प्रकाश : 'करतेल्याच्या तोंडाक उजवाड पडलो'=करणाऱ्याच्या तोंडाचा प्रकाश पडला. (गो.) [सं. उज्ज्वल]

**उजवण** स्त्री. १. समाप्ती; शेवट; अखेर; सार्थक; बोळवण : 'जेथे कृष्णकीर्तिकीर्तन । तेथें कर्माकर्मांची उजवण । होय संसाराची बोळवण । जन्ममरण समवेत ।'– एभा ३०.४०. २. साफल्य : 'आजि आयुष्या उजवण जाहली ।'– ज्ञा १०.१४७. ३. लग्न, मुंज इत्यादी संस्कार, अवश्य ते धार्मिक विधी; (विशेषत:) विवाह : 'पुत्रांस नोवऱ्या आल्या । आतां उजवणा केल्या । पाहिजेत कीं ।' – दास ३.४.७. [सं. उद्यापन]

**उजवण, उजवणी, उजवणूक** स्त्री. ऊर्जित दशा (भूमी, शस्त्र, मनुष्य इत्यादिकांना); उत्कर्ष. [सं. ऊर्ज्]

**उजवणे** अक्रि. १. विहित क्रमाप्रमाणे समाप्त होणे; पार पडणे; यथासांग तडीस जाणे (नेम, विधी, धर्मकृत्य); सफल होणे; सुपरिणाम होणे : 'मग म्हणे गा प्रज्ञाकांता । उजवली आजि वक्तृत्वता ।'– ज्ञा १४.६३. २. विवाह होणे : 'नुजवेचि कव्हणें बोलें । आंगा आठुवर पण आलें ।'– शिव २०८. [सं. उद्यापन]

**उजवणे** अक्रि. १. आपत्ती, रोग इत्यादींतून निभावून जाणे, पार पडणे. २. चांगला निघणे; निवळणे. [सं. ऊर्ज्]

**उजवणे** सक्रि. तेजस्वी करणे; प्रकाशित करणे; तेवणे : 'शेणवी मोगरकर तीन साली त्रिपुर ऊजवूं देत नाहीं.'– आडिमहा १४४.

**उजवरा** पु. स्पष्टार्थ. पहा : **उजरी** : 'तये नामाचा उजवरा । धुंडूनि भक्षी चराचरा । म्हणोनिया गा नरेंद्रा । ढुंढानामा ।'– कथा ६.१९.१३.

**उजवा** वि. १. दक्षिण दिशेचा; उजवीकडचा; डावा याच्या उलट; दक्षिण; सव्य. २. सरस; गुणात वरचढ. ३. सरळ. (वा.) **उजवी गुढी देणे–** संमती देणे; कबूल करणे; होकार देणे; परवानगी देणे. **गुढी उजवी घालणे–** उजवीकडे राहील अशा तऱ्हेने भोवती फिरणे प्रदक्षिणा करणे : 'विनये पुसोनि उजवें घालुनि तें त्या सुरापगातनया ।'– मोशांति ७.८१. **उजवी डावी देणे–** होय नाही स्पष्ट म्हणणे; होकार किंवा नकार देणे. **उजवी देणे–** १. उजव्या बाजूकडे जाऊ देणे. २. मूर्तीच्या अंगाला लावलेले तांदूळ, फुले वगैरेंपैकी उजव्या बाजूकडील खाली पडणे; अनुकूल कौल देणे. ३. संमती, होकार देणे. **उजवा जाणे, उजवी जाणे, उजवे जाणे** – उजवीकडून जाणे.

**उजवाडणे** अक्रि. सूर्योदय होणे : 'उजवाडले आतां गोरांक पसरीक सोड.' (कों. गो.) [सं. उज्ज्वलन]

**उजवात** स्त्री. उदबत्ती. (गो.)

**उजवा पक्ष** १. सरळ पक्ष; शुक्ल पक्ष. २. सामान्यत: अधिकारातील पक्ष; परंपरावादी पक्ष; सनदशीर पक्ष, विधिमंडळात अधिकारारूढ पक्ष अध्यक्षाच्या उजव्या हातास बसतो, यावरून अधिकारारूढ अथवा सरकारी पक्ष.

**उजवारणे** अक्रि. रोगातून बरे होणे; पहा : **उजवण** (राजा.) [सं. उर्जन]

**उजवा हात** ज्याच्यापासून काम अडते असा, पूर्ण विश्वासातला मनुष्य; अव्वल मदतनीस; निकट सहकारी : 'इतके झाल्यावर सोकरजी ऑलवॉश साहेबांचा अगदी उजवा हात बनला.'– भदि.

**उजविणे** सक्रि. १. समाप्त करणे; उद्यापन करणे; पार पाडणे; पुरे करणे; संपविणे : 'अविनय रुचिप्रतिज्ञा उजवुनि गुरुभक्तीचा रस त्यजुनि ।'– मोकर्ण १.१७. २. सुपरिणामी करणे : 'धन्य इहीं उजविला धनुर्वेद ।'– मोकर्ण १०.१२. ३. विवाहादी संस्कार करणे : 'उजवूं किती होतील पोरें ।'– तुगा २९४९.[सं. उद्यापन] (वा.) **उजवून घेणे–** लग्न लावून घेणे : 'कन्या नृपाची उजवून घ्यावी ।'– सारुह ७.९१. **दोहो अंगी उजविणे–** लग्नामध्ये दोन्ही पक्षाकडील खर्च करून लग्नकार्य पार पाडणे.

**उजविणे** सक्रि. १. व्यवस्थितपणे करणे; उत्कर्ष, प्रगती करणे : 'ती आपला संसार उजवीत नाही हे तर ठरले.'– निचं ९.५६. २. सजविणे; विभूषित करणे : 'चित्रे काढून चौक उजविले.'–ऐपो २११. [सं. ऊर्ज्]

**उजवी बाजू** १. राजसभेत उजव्या बाजूला बसलेली मंडळी; मोठे मानकरी लोक. २. (ल.) विश्वासू व अतिशय उपयुक्त राजेलोकांचा उजवा हात असलेला माणूस. ३. सरस, वरचढ बाजू.

**उजवे पृष्ठ** पुस्तक, ग्रंथ, वही उघडल्यानंतर दिसणारे उजव्या बाजूचे पृष्ठ. ह्या पृष्ठाचा क्रमांक नेहमी विषम असतो. उदा.१,३,५,७ इत्यादी.

**उजळ** वि. १. चकचकीत; सतेज; जिल्हई दिलेला (धातू); स्वच्छ; पांढरा; निर्मळ. २. गोरा; सुंदर; सतेज (चेहरा). ३. फळ पिकताना रंग बदलून जी सतेजता येते तशा प्रकारचे (पेरू, केळे इ. फळ). ४. शुद्ध वर्तनाचे; राबत्यात येण्याजोगे : 'उजळ लोकांपैकी निवडण्याचे धोरण असावें.'- जव्हेरखानानियम ९. [सं. उज्ज्वल] (वा.) **उजळतोंड होणे,उजळमाथा होणे**– आरोपातून मुक्त होणे; दोषमुक्त होणे; कालिमा जाणे. **उजळमाथ्याने हिंडणे** – राजरोसपणे वावरणे, वागणे; न लाजता वागणे; अपराधीपणाचा लवलेश न बाळगता वावरणे.

**उजळटिक्या** वि. फासोळीवर पांढरे ठिपके असणारा (घोडा).

**उजळठक** पु. १. संभावित भामटा; राजरोस भामटेगिरी करणारा. २. बाहेरून भपकेदार परंतु कवडीमोल वस्तू; आतून सरळपणा नाही असा माणूस.

**उजळण** स्त्री. झगझगाट; प्रकाश : 'मग मला हवाना बंदरातील उजळण दिसेल.'- एको १३८.

**उजळणी, उजळणूक** स्त्री. १. चकचकीत करणे ; स्वच्छ करणे; उजळा, जिल्हई देणे; पाणी देणे. २. (ल.) खूप शिव्या देणे. (क्रि. करणे.). [सं. उज्ज्वलन]

**उजळणी** स्त्री. १. आवृत्ती; धुळाक्षरांचे लेखन व पाठांतर. २. (गणित) पाढे, सवायकी, दिडकी, अडीचकी, औटकी वगैरे हिशेबाचा भाग. [सं. उज्ज्वलन]

**उजळणे** सक्रि. १. चकचकीत करणे; जिल्हई देणे; घासणे; निर्मळ, स्वच्छ करणे. २. दिवे लावणे; मशाल पेटवणे; प्रकाश करणे; पेटविणे; पेट देणे : 'जैसा मालवलिया दिवा । प्रभेसिं जाय पांडवा । मग उजळिजे तेथ तेधवां । तैसाचि फांके ।।'- ज्ञा १५.३६९. ३. प्रकाशित करणे : 'दंततेजें उजळोनि दिशा । हांसोनि म्हणे ।'- मुआदि २२.८८. ४. स्पष्ट करणे : सुलभ करणे; 'विरक्तें परमार्थ उजळावा ।'-दास २.९.१२. ५. उजळणी; आवृत्ती करणे : 'पाठ उदंडचि असावें । सर्वकाळ उजळीत जावें ।'- दास १८.३.१९.

अक्रि १. गोरे होणे; सतेज होणे; सुंदर होणे : 'क्रमेंच तीचीं उजळेच अंगे'- सारुह २.५३. २. (पाडाला आलेले आंबे इ.) सुंदर रंगयुक्त होणें, उजळ होणे : 'कापुरवेलीची चोखडी । उजळिली परीवडी ।'-ऋ ८४. ३. (उष्णादि विकाराने लाल झालेला डोळा, अंधारी रात्र) निवळणे. ४. प्रकाशित होणे : 'जैसे त्रैलोक्य दिसे उजळिलें ।'- ज्ञा १.३९. [सं. उज्ज्वलन]

**उजळता** स्त्री. उजळपणा; हुषारी.

**उजळपाजळ** वि. स्वच्छ; सतेज; चकचकीत; लखलखीत; तेजदार; तजेलदार (वस्त्र, पात्र इ.). [उजळचे द्वि.]

**उजळा** पु. १. तकाकी; चकाकी; लकाकी (घासून, पुसून येणारी). २. जिल्हई; मुलामा (सोन्याचांदीचा). (क्रि. देणे) : 'तैसीं चंपककुसुमें उजळा दिधलें तसेंचि गे स्वर्ण ।'- कमं ९२. ३. जिल्हई देण्याचा पदार्थ. उदा. वाळू, तुरटी, सोरा इ. ४. (सोनारी.) सोरमीठ, नवसागर, मोरचूद, पोटॅशियम सायनाईड यांचे मिश्रण. (हे मिश्रण डाग लावलेल्या जिनसास तो डाग सोन्यासारखा पिवळा दिसावा म्हणून उजळा देण्यासाठी तयार करतात.).

वि. चकचकीत; शुद्ध पांढरा. पहा : **उजळ** [सं. उज्ज्वल]

**उजळाई** स्त्री. जिल्हई देण्याची अगर घासण्याची क्रिया किंवा तिची मजुरी, मोबदला.

**उजंग** पु. सुस्थिती; सुखाचा काळ. [सं. ऋजु+अंग]

**उजा** वि. पांढरा. (खा.)[सं. उज्ज्वल]

**उजाई** स्त्री. हठयोगातील एक क्रिया : 'देव उजाई करीत असति ।'- लीचपू ३०२.

**उजागर, उजागरा** क्रिवि. उघडपणे; सर्व समाजासमोर; जगासमोर; अगदी प्रसिद्धपणे : 'त्यांना असला माल उजागरा विकण्याची पंचाईत असते.'-भागा ९०.

वि. १. निर्भय; धीट. २. (उप.) संभावित; एखादे काम करून न केले असे दाखविणारा. (व.)

पु. १. जागरण; जागेपणा; जागृतावस्था (क्रि. घडणे, पडणे.) : 'ती रात्र उजागऱ्यातच गेली.'- स्फुगो १.४३. २. उजळमाथा; निर्भयता; धीटपणा; शूरपणा; धिटाई; धडाडी. ३. आठवण. ४. सावधपणा. सावधानता. [सं. उत्+जागृ; उज्जागर]

**उजागरी, उजागिरी** स्त्री. निर्भयता; मोकळीक; उघडीक; उघडपणे एखादी गोष्ट करण्यास मोकळीक; उघड व्यवहार : 'तो तुमचा दबेल होऊन तुम्हास पाहील तेव्हा त्याला मेल्याचा पाड चढेल आणि तुम्हाला उजागरी होईल.'- बाळ २.१८९. [सं. ऊर्ज्]

**उजागरी** स्त्री. १. निर्लज्जपणा; धीटपणा; धृष्टता (तृतीया विभक्तीत प्रयोग) : 'नित्य पतिदेखता, भोगिता उजागरीने मजा ।' - प्रला २२५. २. प्रसिद्धी; षट्कर्णी होणे. ३. दुर्लौकिक; बोभाटा. ४. उत्कर्ष [सं. उज्जागर]

**उजागरीस आणणे** सक्रि. परिस्फुटता करणे; उघडकीला आणणे; प्रसिद्धीला आणणे.

**उजागरीस येणे** अक्रि. उघड होणे; उघडकीला येणे.

**उजागीर** वि. १. निर्लज्ज; बेशरम; जनलज्जा नसलेला. २. धीट, निर्भय. ३. ज्यास विवक्षित कर्म प्रसिद्धपणे करण्यास मोकळीक झाली आहे असा; उजळमाथ्याचा. ४. उघड; जाहीर. [सं. उत्+जागृ]

**उजाड** वि. भकास; निर्जन; ओसाड; वस्तीविरहित; निर्मनुष्य; उध्वस्त; वैराण (गाव, मुलूख इ.) : 'व्यापाराच्या उत्कर्षामुळे कित्येक शहरात लोकसंख्या अतिशय वाढली होती, तर उलट कित्येक गावांतून वस्ती अजिबात उठल्यासारखी होऊन ते गाव उजाड झाले होते.' - पार्लमेंट ३४.

**उजाडणे** अक्रि. रात्रीचा काळोख संपून दिसायला लागणे. पहा : **उजेडणे**

**उजाडताक्षणी, उजेडताक्षणी** क्रिवि. अगदी पहाटे; दिसू लागताच.

**उजाडी** स्त्री. ओसाडपणा; उध्वस्तता; निर्जनस्थिती; उजाडपणा.

**उजान** क्रिवि. पुन्हा; आणखी. (व.)

**उजाऱ्याला येणे** अक्रि. वर डोके काढणे; सांपत्तिक स्थिती सुधारणे : 'पांडू चिल्यापिल्याच्या संसारातून उजाऱ्याला येईना.'- बाव १०८.

**उजाला** पु. चकचकाट; प्रकाश; दिवा : 'चवतर्फा लाविले गलासे जिकडे तिकडे उजाले ।'- पला २७. (हिं)[सं. उज्ज्वल]

**उजाळ, उजाळे** पु. न. १. तेज; प्रकाश; उजेड : 'उजाळु चंद्रादित्यमंडळा ॥'- ज्ञा ११.२१२; 'बालसूर्याचेनि उजाळें । तैसी कवळें टाचांची ॥'- एरुस्व १.३१. २. पांढरेपणा; स्वच्छपणा; उजळपणा. ३. शुद्धता; कीर्ती; नावलौकिक : 'माझिया कुळाचा उजाळु ।'- ज्ञा १६.३५८. [सं. उज्ज्वल]

वि. पांढरे; स्वच्छ; पहा : **उजळ** : 'उजाळ द्रुति मार्दव ।'-अमृ ५.३

**उजाळा** पहा : **उजळा**

**उजाळी** स्त्री. विद्युत विलेपनाचे किंवा पृष्ठभागास चकाकी आणण्याचे खास तंत्र.

**उजिगरा** पु. कष्ट; श्रम : 'येउनि संसारा वायाचि उजिगरा ।'- ज्ञागा ८७५.

**उजिडणे** अक्रि. वेगळे होणे : 'जीवु प्रकृतीपासोनि उजिडें । जेणे भवबंध बिघडे ।'- वछा ३३८. [सं. उज्झ्=टाकून देणे]

**उजिते** न. आगीचा भडका; ज्वलन; पेट; पेटण्याची क्रिया : 'तैं विझोनि जाय उजितें । अग्नीचे तें ॥' - ज्ञा ८.२१३. [सं. उद्योत]

**उजियड, उजियेडा** पहा : **उजेड** 'परी श्रीनिवृत्तिकृपादीपउजियेडें । देखैन मी ॥'- ज्ञा ६.३२.

**उजियेरी** स्त्री. साम्य; सादृश्य : 'जरि पाहतां उजियेरी न जोडे । तेव्हेळि मांडिएली ।'- ऋ ३९. [सं. ऋजु]

**उजिरा** पु. प्रकाश; तेज; उदय. पहा : **उजरा** [सं. उत्+ज्वल्]

**उजिरी** स्त्री. भरपूर असणे; वैपुल्य : 'तैसी आहारनिंद्रेची उजिरी । रोग निवांत जवंवेन्ही ।'- राज्ञा १३.७६६.

**उजिवड, उजिवडे** पहा : **उजेड** : 'ऐसेनि येणे निवाडें । जयाच्या जीवी उजिवडे ।'- ज्ञा १३.१०८३.

**उजिवडणे** अक्रि. १. उजाडणे; प्रकाशमान होणे. २. (ल.) भासणे : 'तैसे लटिकें येणें रूढे । जड येणें उजिवडे ।'- अमृ२.३५.

**उजिवण** स्त्री. साफल्य; सार्थक. पहा : **उजवण**

**उजीयाळी** योगशास्त्रातील एक चक्र : 'आगीयाळी ना उजीयाळी ।'- विसिं ८.६१.

**उजीर** वि. सरळ. पहा : **उजू** [सं. ऋजु]

**उजीरपण** न, सरलत्व; सरळपणा.

**उजु, उजू** वि. १. सरळ; वाकडे नव्हे असे; समसूत्रानुवर्ती (रेषा, मार्ग इ.) : 'तो उजु हातिएरू । धरों नेणें ॥'- शिव ८९५. २. नीट; योग्य; अनुकूल; सीधा (स्वभावाचा) : 'किंवा जैसें ते चातक । मेघा उजु करितां द्योक ।'- स्वादि १.२.८२. ३. सरळ; चांगले; सन्मार्गवर्ती : 'ऋषीश्वरासिं पडलें सांकडें । कीं उजू करितां जाहले वांकडें ।'- कथा ६.५.६९. ४. बरोबर; प्रमाणशीर; सरळ येणारे; योग्य; यथान्याय्य : 'उजु हिशेबाचे जे पैसे ते आम्ही देऊं.'- कोरकि २८०. ५. छक्केपंजे, ध्वन्यर्थ, वक्रोक्ती वगैरे नसलेले; सहज; सोपे; सुबोध; सहज समजण्यासारखे (भाषण, वाक्य, कविता इ.). ६. प्रामाणिक; न्याय; निःपक्षपाती.[सं. ऋजु] (वा.) **उजू करणे**- बडवून कामाला योग्य करणे; पेटवणे (बैल).

शअ. समोर; कडे : 'मग आवेशें पसरी मुख । उर्ध्वा उजू ।।'- ज्ञा ६.२२८; 'वीर पाहाती आकाश उजु । तों येतां देखिला तेजःपुंजु । जो ब्रह्मयाचा आत्मजु । नामें विख्यात नारद ॥'- जै ५१.१५.

क्रिवि. १. सरळपणे; बरोबर; नीट रीतीने. २. योग्य बाजूला, दिशेला.

**उजु, उजू, उजूक** क्रिवि. अजून; पुन्हा; आणखी. पहा : **उजान** (कु.)

**उजुकार** पु. सरळ रीत, मार्ग; सीधा मार्ग; सरळपणा : 'एकु षट्चक्राचेनि उजुकारें ।'- वछा १५१. [सं. ऋजु+ कृ]

**उजुवाट** स्त्री. सरळ, लांब रस्ता; उजुकार : 'घाटु टेंकुळिआं तेंचि दशन । उजुवाट तेंचि रसना ॥'- वछा ९७.[सं. ऋजु+वर्ति]

**उजुवाड** पु. उजेड; प्रकाश : 'सरैल उपरा प्रतिरात्री दिनु । सकलै दिशा उजुवाडु होउनु ।'- क्रिपु २.४४.१९४. [सं. उज्ज्वल]

**उजू** न. (नमाजापूर्वी) हात, पाय व तोंड धुणे. हस्तपादप्रक्षालन (क्रि. करणे.). [फा. वुजू]

**उजू, उजूबुजू** स्त्री. आदर; मान; मर्यादा; सन्मान. (क्रि. ठेवणे, राहणे, उडणे.). [फा. वुझू]

**उजूतवाजू** स्त्री. नमाज; प्रार्थना : 'तों अब्दुल अल्ली दुराणी जुमा मशिदीस येऊन आपला स्वधर्म उजू-तवाजू करीत होता.'- भाब २७.५२. [फा.]

**उजूतवाजू करणे, ठेवणे** - १. प्रार्थना; २. समाचार, मानमर्यादा, बडदास्त ठेवणे : '.... फत्तेसिंगानें घोरपड्यांची उजू-तवाजू उत्तम प्रकारची ठेवून जखमांचा जावता (निगा) करून वस्त्रे देऊन रवाना केले.'- होकै १५८.

**उजून** क्रिवि. परत, पुन्हा.

**उजूनमाज** पु. प्रार्थना : 'याजबद्दल पाच वख्त उजूनमाज करून इलाही नजीक रावसाहेबांचे हकामध्यें दुवा याद करीत आहों.'- मइसा १.६३.

**उजूबाईगजू** मुलींचा एक खेळ.

**उजूम** पु. प्रतिष्ठा; थोरवी; अब्रू : 'आपल्या मक्तलाचा उजूम ठेविला पाहिजे...'- हिंदख २.२४.

**उजूर** पु. पहा : **अरुता, आक्षेप.** १. सबब; सबब सांगण्याचा हक्क; विरोध : 'देव मजूर देव मजूर । नाहीं उजूर सेवेपुढें ॥'-तुगा ३७००. २. तक्रार; आक्षेप : 'उजूर असेल तरी हुजूर एणें.'-मइसा १५.१५९. ३. अडथळा; उपसर्ग; हरकत; विलंब : 'सेवकास आज्ञा होईल त्या आज्ञेस उजूर नाहीं.'- मइसा १०.२२६. ४. हक्क; अधिकार; वाजवी काम. ५. खोळंबून राहणे; विचार करणे; वर पाहणे. ६. अपेक्षा : 'परंतु पट्टणाहून दुसरे परवाना यावयाचे उजूर करून ठेविले आहे' - ऐलेसं ३९८१.

**उजूर ठेवणे** निमित्ताची सोय करून ठेवणे : '...पुढां आणखी पुरंदरास उजूर ठेविला आहे.'- ऐलेसं २३६०. [फा. उजर्]

**उजूरुजू** क्रिवि. रुजवात करून; बजावून : 'त्येकां पैशे उजुरुजु करून दिले.' (गो.)[उजूचे द्वि.]

**उजूहात** वजा करावयास योग्य अशा गोष्टी.

**उजूहाती** क्रिवि. सरळपणाने; भानगड न करता; ऐनजिनसी.

**उजेड** पु. १. ज्यामुळे बाह्य जगातील वस्तू दिसतात असे निसर्गतत्त्व; प्रकाश : 'दाही दिशा उजेड ।'– मुआदि १९.१९४.२. प्रकाश देणारी, पाडणारी वस्तू; दिवा. [सं. उद्योत] (वा.) **उजेड करणे, उजेड पाडणे, उजेड लावणे–**१. (उप.) अपयशी होणे; काहीच कर्तृत्व न दाखविणे; दिवे लावणे; अपकीर्तिरूप कृत्ये करणे : 'म्हणती भावाने उजेड केला । कीर्तिध्वज उभारिला ।'– नव १८.३९. २. शतकृत्य करणे. काही समानार्थी वाक्प्रचार **–मशाल पाजळणे, लावणे; टेंभा पाजळणे; नगाऱ्यावर टिपरू टाकणे, वाजवणे, दिवसा मशाल लावणे; बेचाळीस पिढ्या अथवा कुळे उद्धरणे; वडिलांचे नाव गाजवणे. उजेड पडणे, उजेड होणे.** १. प्रकाश पडणे; स्पष्ट होणे.२. (उप.) अपकीर्ती होणे; छीः थू होणे.

**उजेडणी** स्त्री. चूड; ताड, माड वगैरेंच्या झावळ्या एकत्र करून सैलशा बांधून उजेडासाठी पेटवतात ती; टेंभा. (को.)

**उजेडणे, उजाडणे** अक्रि. १. प्रभात होणे; सूर्योदय होणे. २. कार्यारंभ होणे. ३. अनुकूल काळ प्राप्त होणे; वेळ येणे; सुयोग येणे. ४. स्पष्ट होणे : 'म्हणोनि हें उजेडे ।'– दास ६.६.२२. [सं. उद्योतन]

**उजेडता काळ** पु.१. उजाडायची वेळ; संधिप्रकाशाचा समय. २. (ल.) भावी भाग्याची प्रभात; चांगले दिवस येण्याचा समय.

**उजेडाचा माणूस** (उप.) चलाख, पराक्रमी माणूस हा शब्दशः अर्थ. परंतु ध्वनी उलट होतो.

**उजेरणे** उक्रि. १. साफ करणे; गाळ, घाण वगैरे काढणे (पाटातील). २. एखाद्याच्या विद्येत प्रवेश करून देणे; शिक्षित करणे. ३. चकचकीत करणे; उठावदार करणे. ४. (सामा.) पहा **: उजरणे** (राजा.)

**उजो** पु. विस्तव; आग. (गो.) [सं. उद्योत]

**उज्ज, उज्जन** पु. (शाप.) उज्जन वायू; वातावरणातील एक वायू. हा अतिशय हलका व त्वरित पेट घेणारा आहे. हा वायू पाण्यातील मुख्य घटक आहे. (इं. हायड्रोजन.) [सं.]

**उज्जगंधकिद** पु. एक दुर्गंधीयुक्त वायू.

**उज्जनचलनी** वि. उज्जैन येथे चालणारे; शिंदेशाही (नाणे).

**उज्जीवन** न. १. जागृती; प्रगटता; प्रगट होणे : 'जे उज्जीवन जाहले ज्ञानाग्नीचें ।।'– ज्ञा ४.१३२. २. नवचैतन्य; चेतना; उत्तेजन : 'तैसे राज्यभोगसमृद्धी । उज्जीवन नोहे जीवबुद्धी ।'– ज्ञा २.६८. ३. भोगसाधन. [सं.]

**उज्वल, उज्वल** वि. १. सतेज; चकचकीत; प्रकाशमान. २. स्वच्छ; शुद्ध; पवित्र. पहा **: उजळ** [सं. उत्+ज्वल्]

**उज्ज्वलन** न. १. जळण्याची, प्रकाशित होण्याची क्रिया; पेटवणे; २. तजेला, जिल्हई देण्याची, स्वच्छ करण्याची क्रिया; चकचकीत करणे. [सं.]

**उज्ज्वलित** वि. १. पेटवलेला. २. प्रकाशित केलेला; जिल्हई दिलेला. ३. प्रकाशमान; तेजःपुंज. [सं.]

**उज्झड** वि. उद्धट; दांडगेश्वर; उर्मट. [सं. उत्+झट्]

**उज्झित** वि. टाकलेले; सोडलेले; त्यक्त. [सं. उज्झ्]

**उज्म** पहा **: उजम** : 'इंद्रसेनाने सरकारांत येऊन श्रीमंताशी भेटून जाण्यांत उज्म राहतो.'– मशियांका ५३४.

**उज्मा** वि. भव्य.

**उज्र** पु. अडथळा. पहा **: उजूर** [फा.]

**उज्रंभ** पु. प्रकटन; विकसन : 'रजिं उज्रंभु सत्वाचा ।'– ऋव ४६०.

**उज्रंभणे** अक्रि. प्रोत्साहन देणे : 'भक्तिभावातें उज्रंभिति श्रवणमात्रें ।' मूप्र ९६.

**उज्लत** स्त्री. घाई. [फा.]

**उज्वड** पहा **: उजवाड**

**उज्वाड्यार** क्रिवि. पहाटेस. (गो.)

**उज्वाड** पु. उजेड; प्रकाश : 'उज्वाडाक हडप'= प्रकाशात आणणे; प्रसिद्ध करणे. (गो.)

**उझड** वि. वेडगळ; अक्षरशत्रू; विदूषक : '... इस्माइलखान अक्षरशत्रू व उझड यैसा प्रकार झाला आहे.'– हिंदेभा २.९६.

**उझहलज** स्त्री.बाहेरील दरवाजाला लागून आतील दोन बाजूंना असलेली बैठक; देवडी. (चंद्रपुरी)

**उझ्म** पु. १. इरादा; हेतू. २. थोरवी. [फा.]

**उट** स्त्री. हुटहुट; कटकट : 'माझी पाठ करा कवी । उट लावी दारोदार ।'– तुगा १.२१. [ध्व.]

**उट** स्त्री. चाकाला प्रतिबंध करण्यासाठी लावलेली उटी; टेकू; दगड.

**उट** पहा **: ऊत** (वा.) **उट उतरणे–** रंग जिरवणे; नक्षा उतरणे.

**उटउट** स्त्री. १. रुखरुख. २. किंतू : 'त्यास राव शिंदे तर गेले; परंतु माझ्या मनांतील उटउट गेली नाही.'– मइसा ७.१९७. [ध्व.]

**उटक** वि. उथळ, उंचवट्याची, खडकाळ.

न. उंच खडक.

**उटकटारी, उंटकटारी** स्त्री. एक बनस्पती; उताटी; काटे चुबुक. हिची पाने कोपरे कातरल्यासारखी असून पृष्ठभागी सफेत रंगाचे काटे असतात. डांग्या खोकल्यावर हिची मुळी लहान मुलांच्या गळ्यात बांधतात. सर्प, विंचू यांच्या विषावर हिचे मूळ उगाळून लेप देतात. मुळाला ब्रह्मदंडी म्हणतात. ही उंटाला प्रिय असते. [सं. उत्कट]

**उटकण** न. १. दूर होणे. २. अवर्षण.

**उटकणे** उक्रि. उच्चाटन होणे; वेगळे पाडणे, होणे; दूर करणे : 'सर्वारंभा उटकलें ।'–ज्ञा १४.३६६. [सं. उत्+टंक्]

**उटकर, उटकळ** स्त्री. पहा **: उठकळ**

वि. हलणारा; डळमळणारा; सैल; खिळखिळीत झालेला (दगड). [सं. उत्थ+कृ]

**उटकळी** स्त्री. तोंड येणे; तोंडात खरे, पुटकळ्या येणे. (राजा.)

**उटक्कर** वि. उर्मट; मग्रूर; उद्धट. (क्रि. येणे.) [सं.उद् = पाडणे]

**उटज** न. पर्णकुटी; झोपडी; पर्णशाळा. [सं.]

**उटणी** स्त्री. पायरी, आधार.

**उटणे** न. १. अंगाला लावण्यासाठी सुंगधी द्रव्ये घालून तयार केलेली पूड; उटी; लेप लावणे : 'सूर्याचिया आंगा उटणे । लागत असे ।।' – ज्ञा १०.१०. २. उटणे अंगाला लावणे, माखणे; मर्दन. [का.ऊटणे] [सं.उद्वर्तन]

**उटणे** उक्रि. १. माखणे; चोपडणे; लावणे; चर्चिणे : 'श्रीमहादेवो कापुरें उटिला ।'–ज्ञा ११.२२२. २. (राख, माती इत्यादींनी भांडे वगैरे) पुसून साफ करणे : 'हां हो उटोनियां आरिसा ।'–ज्ञा ११.१५७. ३. धुणे : 'वृद्धपरंपरा ऐसी आहे । वरचरण उटी वोहमाये ।'– एरुस्व १४.८९. [का. उटणी]

**उटन** न. घासण्याची क्रिया.

**उटपटांग** वि. बेजबाबदार; टारगट : 'पण त्यांनाहि आमच्या उटपटांग गटाविषयी...'–खर्डे १४.

**उटंक** वि. उतरणीची; उंचवट्याची; खडकाळ (जमीन) : 'स्थिर होय सखोल भूमिके । थेंबु न राहे उटंके ।' – विसिंपू १.८२. [सं. उत्+टंक]

**उटंगणी** स्त्री. एक वनस्पती.

**उटंगर, उटंबर, उटंबरा, उटंगळ** न. १. उंचवटा; लहान टेकडी; टेंब. २. शरीरावर असलेले आवाळू; गलंड; टेंगूळ. ३. एखादी जड वस्तू लोटून नेताना खाली जो दगड लावतात तो.

वि. १. वरखाली झालेला; उंच सखल; उच्चनीच; खडबडीत; डळमळीत. २. उटंगळे असणारा (प्राणी, जमीन). [सं. उत्+स्था+गल्]

**उटा** पु. चाकाची गती खुंटवण्यासाठी चाकाखाली ठेवलेला दगड; अटकण. (क्रि. देणे.) पहा : **ऊट**

**उटाउटी** क्रिवि. (प्र.) उठाउठी; तत्काल : 'गौरजानु पयोधरकटी । अवलोकितां उटाउटीं । धैर्य पळालें बारा वाटीं । नाहींच झाला विचारू ।।'– मुआदि १५.१४३. [सं. उत्+स्था द्वि.]

**उटाड, उटांड** वि. कुरूप वाटण्याइतपत उंच; उंटासारखा (उंच).

**उटाणटेंगळा** पहा : **उटंगळ**

**उटारेट** पहा **उटारेटा** : 'उटारेटीतून फावल्या क्षणी' – अंधार २०२.

**उटारेटा, उटारेठा, उटारेटी, उटारेठी** पु. स्त्री. (प्र.) उठारेटा. १. उठाठेव; ढवळाढवळ; उपद्व्याप; नसता उद्योग, भानगडी, लुडबूड. २. (लहान मुलांची) चुळबूळ; चळवळ; वळवळ; नाचरेपणा. ३. उडवाउडव; चिवड (अन्नाची भूक नसता केलेली.). ४. थापेबाजी; गप्पा. (क्रि. करणे).

**उटारेटी, उठारेठा, उठारेठी** क्रिवि. १. नसत्या उठाठेवीत; आळसात; टिवल्याबावल्या करण्यात (कालाचा अपव्यय करणे). २. चिवडीत, उडवीत (जेवणे).

**उटारेटीस येणे** उटारेटा करणे.

**उटाळणी** स्त्री. १. उठावणी; प्रोत्साहन; उत्तेजन; प्रवर्तन; भरीला घालणे; चेव आणणे. २. उटाळण्याची क्रिया.

**उटाळणे** उक्रि. १. स्पष्ट उच्चारला जाणे; लिहिलेले अक्षर स्पष्ट उमगले जाणे. (व.) २. अर्थ, हेतू, भाव स्पष्ट होणे, करणे. ३. उठवणे; उत्पन्न करणे; उच्चारणे : 'इला कसें नाम तुझे उटाळे ।।' – सारुह १.२८. [सं. उत्+ताल्]

**उटाळा** पु. उथळे; इमारतीच्या खांबाला तळात दिलेला दगड; तळखडा. (व.) [सं. उत्+तल]

**उटाळा** पु. १. (वागिंद्रियापासून होणारा अक्षरांचा) स्पष्टोच्चार. २. स्पष्टीकरण; विशदीकरण; फोड; किल्ली (लिहिलेले गूढ, श्लोक इत्यादिकांची), : 'माझे या स्मरणाचे उटाळे वांचूनि आन नाहीं.' – उगी ६८३. ३. चेतना देणे; प्रवृत्त करणे. [सं. उत्+तल]

**उटाळा, उटाळी** पु. स्त्री. १. तरफ; जड पदार्थ उचलून फेकण्यासाठी त्याखाली पहार वगैरे घालतात ती. (क्रि. देणे). २. अशी उचलण्याची, तरफेची क्रिया (क्रि. करणे). ३. ढकलणे; जोर लावणे; धक्का देणे (पुढे ढकलण्यासाठी); खांदा देणे. (क्रि. देणे). [सं.उत्+तल=स्थापन करणे]

**उटाळे** न. १. गाडीचे चाक जागेवरून ढळू नये म्हणून त्याखाली ठेवलेला दगड, उट. २. खांबाच्या खाली व वर द्यायचा धिरा, टेकण; खालचा दगड व वरचे टेकूचे आडवे लाकूड. ३. गुरांचे तोंड उघडून जाभाडांमध्ये ठेवायचे, हात जाण्याजोगे भोक असलेले आडवे नळकांडे.

**उटाळे** न. दरवाजावरील पुढे आलेला बांधकामाचा भाग. (हैद्रा.)

**उटाळे** न. १. किल्ली : 'फेडावया गुणचित्ताचे टाळे । माझे या स्मरणाचे उटाळें ।' – उगी ६८३.२. स्पष्टीकरण; खुलासा.

**उटिंगण** न. आधार; टेकू.

**उटिंगळ** पहा : **उटंगर** (कों.)

**उटिंबर, उटिंबरा** न. पु. टेगूळ; मातीचा ढीग; गाठ.

**उटी** स्त्री. पहा : **उटणे.** १. सुवासिक द्रव्यापासून तयार केलेला पदार्थ (चंदनादिक). (क्रि. करणे). २. उटण्याचा लेप. (क्रि. लावणे) : 'तो जैसा काळलोहें डवरिला । नातरि प्रलयांधकार उटी ओळघैला ।' – शिव ९९९. [का. उटणी]

**उटी** स्त्री. उडवी; एक खांब रोवून त्याच्या भोवती गवत रचून ठेवणे; गवताची गंजी. (कु.) [सं. उट= गवत]

**उटी** स्त्री. १. चाकाची गती बंद करण्यासाठी, चाक जागेवरून हलू नये म्हणून लावण्यात येणारा दगड. २. (ल.) अडथळा : 'जातींच्या मार्गातील स्पर्शास्पर्शतेची उटी काढून टाकून ..' –गांगा १६५. पहा : **उटा, उट**

**उटी** स्त्री. तेज; माहात्म्य; मोठेपणा (क्रि. उतरणे) : 'सर्वेचि इंद्रपणाची उटी उतरे ।' –ज्ञा ९.३२८. पहा : **ऊत** (वा.) **उटी उतरणे** – महत्पदापासून भ्रष्ट होणे.

**उटीजणे, उटिजणे** सक्रि. १. उटी लावणे; माखणे : 'कापुराचेनि परागें उटीजती । मोतियांचेनि रसें न्हाणीजेती ।' – शिव २८१. २. घासून स्वच्छ करणे : 'न घडितांचि आरिसा । उटिजे काई ।।' –अमृ ७.६२.

**उटीव** वि. खरवडून काढलेले; घासलेले; घासून स्वच्छ केलेले.

**उटुट, उटूट** पु. ध्यास; नाद.

**उटुट, उटूट** न. उट्टे; सूड. (वा.) **उटुट काढणे, उटूट उगवणे** – सूड उगवणे; उट्टे काढणे; बदला घेणे.

**उटे** न. (विरू.) पहा : **ऊट्टे;** वाईट कर्माचे प्रायश्चित्त; सूडाचे कृत्य; पारिपत्य : 'बहुत लोकांस तुवां पीडिलें । त्याचे उटे आज निघालें ।' – हरि ९.८१.

**उटेरेटे** न. उठाठेव; उपद्व्याप. पहा : **उटारेटा** :'आतां सांडिलें उटेरेटें ।' – शिव १३६.

**उट्टे** मोबदला; वचपा; भरपाई; तोडीस तोड; सूड; खरडपट्टी :'पण आज येऊं दे तरी, म्हणजे त्याचं सगळं उट्टं काढतें.' – तोबं अं. २ प्र. १ [सं. आ+वृत्त] (वा.) **उट्टे काढणे, उट्टे उगवणे, उट्टे येणे, उट्टे फेडणे** – जशास तसे करणे; खोड मोडणे :'आठवुन सगुण तिळतिळ काढीन उटें तें ।' – प्रला १५७.

**उठकट, उठकर** स्त्री. हकालपट्टी. पहा : **उठकळ**

**उठकळ, उठकळा** स्त्री. १. उठण्यास होणारे कारण; उठण्याची निकड, गरज. (क्रि. आणणे, लावणे, येणे). २. उठण्याची बुद्धी; हुटुटी; सुरसुरी (मनातून किंवा बाहेरच्या काही कारणाने येणे). (क्रि. लागणे, येणे). ३. हकालपट्टी; पराभव. ४. (गाव, कुटुंब इत्यादिकांचे) स्थलांतर; बारा वाटा होणे; एखाद्याने उठून जावे म्हणून लावलेला तगादा. (वा.) **उठकळ येणे**– दुसरीकडे जाण्याचा हुकूम होणे, भाग पडणे; स्थलांतराचा हुकूम.

**उठकळ, उठकळा** स्त्री. कंटाळा; त्रास; दगदग; टेकीला येणे; मेटाकुटीला येणे.

**उठकळणे** अक्रि. एकसारखे काम करून अंग खुडकणे; थकवा येणे, वाटणे; दमणे; कंटाळणे.

**उठकळे, उठकले** न. हकालपट्टी; पराभव :'मारौनि गजरथांची दळें । वीरांचें उठकळें केले ।' – शिव१०६१.

**उठणे** अक्रि. १. उभे राहणे; बसणे याच्या उलट. २. (ल.) वर येणे; आकाशात वर जाणे (धूर, धुरळा). ३. जागे होणे; शुद्धीवर येणे (झोपेतून, मूर्च्छेतून). ४. स्पष्ट दिसणे; उमटणे (ठसा, रंग, छाप वगैरे) :'उत्तम गुण तत्काळ उठे ।' – दास १९.६.२०. ५. वर येणे; दिसायला लागणे; बाहेर पडणे; उद्भवणे (पुरळ, साथ, संकट, बातमी वगैरे). ६. ताजेतवाने होणे; फुलणे; टवटवीत होणे; आनंदित होणे (मनुष्य, प्राणी, वनस्पती वगैर); खुलून दिसणे (रंग वगैरे). ७. खुणा पडणे; उठून दिसायला लागणे (वण, वळ, चाबकाचा मार, दातांचा चावा). ८. उत्पन्न होणे : 'उठति घनपटलें ।'– ज्ञा ८.२०. ९. पूर येणे :'जसें महाप्रळयीं जळ । उठलिया भरे ब्रम्हगोळ ।' – विसिंउ ११.८६. १०. वाढणे. ११. क्षोभ होणे (पित्तादिकांचा). १२. नवीनच गोष्ट प्रसिद्ध होणे; प्रचारात येणे. १३. उभे होणे; ताठ होणे; तयार होणे (इमारत वगैरे) :'तैं राजवाडा उठे ।' – विक ११. (वा.) **उठून जाणे** – परवानगीशिवाय निघून जाणे; पळून जाणे; रागाने चालते होणे. **माणसातून उठून जाणे** – १. रीतभात सोडणे; अनीतीच्या मार्गाला लागणे. २. परपुरुषाबरोबर निघून जाणे (स्त्रियांच्या बाबतीत) :'खरेंच का रूपमाया सेनापती उठून गेल्या.' – बाय ४.३. **उठून दिसणे** – स्पष्टपणे नजरेला येणे. **उठला ठाव देववत नाही** – उठून जेवायचे पानही मांडता येत नाही, इतक्या निर्बलतेचे द्योतक. **नित्य उठून, रोज उठून** – दररोज नेमाने; नित्य. [सं. उत्+स्था]

**उठणे** अक्रि. एखाद्याने मर्यादा सोडून आचार वर्तन करणे. उदा. माणसातून उठणे.

**उठणे** उक्रि. वस्ती वगैरे उठून जाणे; ओसाड पडणे. उदा. गाव उठणे.

**उठणे** अक्रि. खर्च होणे; खलास होणे; संपून जाणे. (व.)

**उठणे** उक्रि. १. करवणे; उरकणे; पार पडणे (काम वगैरे) :'माझ्याच्यानें पहिल्यासारखे कामही उठत नाही.' – विवि ८.८.१५३. २. प्रवृत्त होणे (वाईट करण्यास). ३. वाटणे; मनात येणे :'झोंबी घ्यावी ऐसे उठे ।' – दास २.६.१५.

**उठणे** अक्रि. १. बरखास्त होणे; संपणे (सभा, बैठक वगैरे). २. उडून जाणे (एखाद्यावरील मन); उद्विग्न होणे; त्रासणे; कंटाळणे.

**उठणे** अक्रि. १. (सैन्य वगैरे) चालू लागणे; बाहेर पडणे; सज्ज होणे; हल्ला करणे :'भट दशसहस्र उठले जे आज्ञाकर सुयोधनाचे हो ।' – मोभीष्म ६.६१. २. बंड करणे (एखाद्याविरुद्ध); सामना देण्यास तयार होणे.

**उठणे** अक्रि. १. दुखायला लागणे (डोके, कपाळ, मस्तक, शीर इ.). [सं. उत्+स्था]

**उठणे** सक्रि. आकसाने आळ येणे; कुभांड रचणे (मनुष्यावर, घराण्यावर, वाईटावर उठणे वगैरे).

**उठतबसत** क्रिवि. खुरडत; कसेबसे; मोठ्या कष्टाने; थोडे चालत व थोडी विश्रांती घेत; थांबून थांबून; धीरे धीरे (काम करणे, जाणे). अति अशक्ततेचे द्योतक.

**उठताबसता, उठतापडल्या, उठल्याबसल्या, उठल्यासुटल्या** क्रिवि. क्षणोक्षणी; हरघडी; सदासर्वदा; जेव्हा पहावे तेव्हा; एकसारखे.

**उठताबसता उपवास, निराहार, उठताबसता नवरात्र** नवरात्रीतील घटस्थापनेच्या दिवशी व शेवटच्या उपास दिवशी करण्याची पद्धत.

**उठतीबसती सुवासिनी** - नवरात्रात घट बसतात त्या दिवशी व नवरात्र उठते त्या दिवशी सांगायची सुवासिनी.

**उठपळ** स्त्री. १. उठसूट, एकसारखे पळून जाणे (असंतोषी नोकर किंवा सून वगैरेंनी). (क्रि. लावणे). २. (ल.) त्रासदायक; जुलमी वागणूक; गांजवणूक (पळून जायला लावण्याइतकी); हाल करणे; छळ करणे. (क्रि. लावणे). ३. अस्थिरता; असंबद्ध वागणूक; चंचलता; उतावळी. (क्रि. करणे, लावणे, मांडणे). ४. जायला निघणे. (क्रि. करणे). क्रिवि. एकसारखा; पुन्हापुन्हा; मध्ये न थांबता; उतावीळपणाने.

**उठपाय** क्रिवि. एकसारखे; पुन्हापुन्हा. पहा : **ऊठपाय**

**उठबशी, उठबसी, उठबैस** स्त्री. १. उठण्याबसण्याची मेहनत; पुन: पुन्हा उठणे व बसणे. २. खळबळ; चळवळ (अस्थिरताद्योतक). ३. नसता खटाटोप, उठाठेव. ४. बैठका (व्यायामाचा एक प्रकार). (वा.) **उठबस करणे** – आदरातिथ्य करणे.

**उठवण** स्त्री. कुणबी समाजातील देवकृत्य; देवक उठवणे.

**उठवण** स्त्री. तोटा; आपत्ती; चणचण. :'.... खाण्यापिण्याची वगैरे सरंजामाची उठवण मोडली.' – पाणिबख १५.

**उठवण, उठवणूक, उठवळ** स्त्री. बसले असता स्वत: उठवत नाही, दुसऱ्याने उठवायला लागावे अशी अवस्था (गुरे, घोडे इत्यादींची); उठून उभे राहण्याची सुद्धा शक्ती नसणे :'आतां सर्वथा उठवण्या ।' – एभा ११.१२०९. (क्रि. घेणे). २. (ल.) आपत्ती; दारिद्र्य; दैन्य;

दुर्बल दशा. (वा.) **उठवण मोडणे, उठवणूक मोडणे** - १. शक्ती परत येणे. २. दारिद्र्य, निराशा यापासून सुटका होणे. **उठवणीस येणे** – अतिशय अशक्त होणे; मरायला टेकणे. **उठवण घेणे** – दुसऱ्यांनी उठवावे लागणे; (सामा.) अतिशय दमणे; थकणे : 'वैरणचारा महाग याजकरितां घोडी व उंटे उठवणीस येऊन, अस्थिचर्मे जाहालीं.' – भाब ५६.

**उठवणकर, उठवणकरी, उठवणकरू, उठवणेकर, उठवणेकरी, उठवणेकरू** वि. उठवणीस आलेला (मनुष्य, बैल); बिछान्याला खिळलेला (रोगाने, वार्धक्याने).

**उठवणी** स्त्री. हकालपट्टी : 'इथून तुमची उठवणी होऊ नये एवढ्याकरिता एक युक्ति सांगतो.' – कदिगे ३.

**उठवळ** स्त्री. हकालपट्टी; उच्चाटन; अवनती (वा.) **उठवळ येणे, उठवळ लागणे** – उच्चाटनाची वेळ : 'फीमेल ट्रेनिंग कॉलेजला उठवळ आली आहे.' – केले १.५१.

**उठवळ** वि. १. आळशी; कामचुकार (उठवणकऱ्याप्रमाणे वागणारा). २. चळवळ्या; उच्छृंखल. ३. बेफिकीर; छचोर : 'दोघींपैकी एक बाई उठवळ आहे म्हणून तिला औषध देण्याचे ते नाकारतील की काय?' – खपा १७६.

**उठविणे, उठवणे** उक्रि. उठणे यांचे प्रयोजक. १. उचलणे; वर करणे; उच्च स्थितीला नेणे; उंच करणे; उभे करणे. २. जागृत करणे; जागे करणे; उठायला लावणे. ३. चेतना देणे; प्रवृत्त करणे; क्षोभविणे; उठावणी करणे. ४. दुखायला लावणे (डोके). ५. (कंडी) पिकवणे; जाहीर करणे (बातमी, गोष्ट). ६. उत्पन्न करणे; काढणे : 'जे उठवी शब्दांकुर । वदे वैखरी अपार ।' – दास १.३.२. ७. पार पाडणे; बजावणे : 'सूचना होतील त्याप्रमाणे नोकरी उठविण्याची आहे.' – स्वारीनियम (बडोदे) २४. ८. चोरणे; लांबवणे : 'चोरट्यांनीं स्वयंपाकाचीं दोन भांडीं उठविलीं.' – विवि ८.११.२०८. ९. रक्कम कर्ज काढणे; उचल करणे; खर्च करणे. [सं. उत्थापन] (वा.) **घरातून उठविणे** – नादी लावून पळविणे : 'ह्या स्वतंत्र बायका केव्हा कोणच्या म्हाताऱ्याला घरांतून उठवतील कांहीं नेम नाहीं.' – बाय २.१. **जन्मातून उठविणे** – आयुष्याचे मातेरे करणे (जार कर्मामुळे) : 'माझ्या पोरीला अशी जन्मांतनं उठवलीन्.' – निचं १२५.

**उठसूट** पहा : **उठता बसता; उठल्यासुटल्या**

**उठळ** वि. निरुपयोगी; आळशी. पहा : **उठवळ**

**उठंगार, उटंगार** पु. महापूर. (गो.)

**उठाउठी** क्रिवि. ताबडतोब; त्वरेने; लवकर; तत्काळ; लागलीच; झटकन; त्वरित; एकदम; जलदीने : 'आतां उठाउठी । असकेयां ब्रम्हगोळकां देइनु मोठी ।' – शिव ९२१. [उठणेचे द्वि.]

**उठागीर** वि. १. (निंदाव्यंजक) प्रवासी; मुशाफिर; उपऱ्या; भटक्या; तात्पुरती वस्ती करणारा. २. उचल्या.

**उठाठेव** स्त्री. १. रिकामी लुडबूड, खटपट; पंचाईत; दुसऱ्याच्या कामात ढवळाढवळ. (क्रि. करणे) : 'यांना काय करायची आहे साऱ्या साखरपेंडीची उठाठेव?' – एल्गार ४४. २. बरदास्त; सरबराई; व्यवस्था : 'घायाळ समशेर बहादूर कुंभेरीस आला, तिथे सुरजमल्ल जाट याणे त्याची बहुत उठाठेव करून घोडी व पालखी देऊन वाटेस लाविला.' – भाब १६२. ३. कामाची दगदग; खटाटोप; खटपट. ४. इकडच्या तिकडच्या कुचाळक्या करणे; भलतेसलते, बऱ्या वाईट अफवा उठविणे.

**उठाण** न. गडबड; दंगा : ' ... ते प्रसंगी ताम्राचे उठाण विशेष देखोन तुम्हांस या प्रांतीच्या राज्यरक्षणास ठेवून आपण स्वार होऊन कर्नाटक प्रांतीं गेले.' – मासपमा १८८.

**उठाण, उठाणे** न. १.उठवणी; उसळी; उमेद; तीव्र प्रवृत्ती : 'कीं ते समयीं मनाचें उठाण ।'– यथादी १०.२५८. २. उन्नतता; उठावरदारपणा (स्तनांचा) : 'उठेत वक्षोरुह हे उठाणें ।' –सारुह २.५६.[सं. उत्थान्]

**उठाण, उठाणे** न. सूचक लक्षण, चिन्ह : 'तों देवकीस वरिती विरश्री उठाणें ।' – कृष्णजन्म (देवनाथ) २३.

**उठाणू** न. गळू; बेंड (शरीरावर उठणारे) : 'हे हेंगाडं उठाणू' – काढा १६.

**उठापटक** स्त्री. उठणेबसणे; एकत्र व्यवहार करणे; धडपड : 'ज्या सहजपणानं तो शाळेतल्या बरोबरीच्या पोरांसोबत उठापठक करीत होता...' –धग ३२.

**उठापायी, उठोपायी** पहा : **ऊठपाय**

**उठाबशी** पहा : **उठबशी** (वा.) **उठाबशा करणे** – अनेक उठाबशा लागोपाठ काढणे; बैठका मारणे : 'कान पकडून उठाबश्या काढणे ही सामान्य शिक्षा होती.' – माजी २९. **उठाबस करणे** – पहा : **उठबस करणे** : 'त्यांच्यापैकी कुणी आला की त्याची उठाबस करायला गावातील शिष्ट मंडळी एका पायावर तयार.' – पापू २३.

**उठारेठा, उठारेठ, उठारेठी** पहा : **उटारेटा**

**उठाव** पु. १. वर आलेला भाग. २. शरीराची ठेवण, स्वरूप; ठसठशीतपणा : 'आणा धरोनि मृग हा, कैसा दिसतो मनोरम उठावें ।' – मोवन ११.१९. ३. उचल; सरसावणे : 'किंवा अमृत क्षीरसागरी । येती लहरींवरी लहरी । तैसी द्रौपदी राजकुमरी । उठाव करी दुसरेने ।।' – हरि ३४.२८. ४. (शिल्प) उठावाची नक्षी; उचलून दिसणारे काम; वर दिसणारी, कोरलेली आकृती. उदा. उठावाचा नकाशा.

**उठाव** पु. १. खर्च. २. ग्राहकाने नेणे; विक्री. उदा. मालाचा उठाव.

**उठाव** पु. पदांमध्ये बदललेल्या चालीवरून पुन्हा मूळच्या चालीवर व ध्रुवपदावर येणे. (वणी येथील गोविंद कवीच्या पदांतून असे उठाव आढळतात.)

**उठाव** पु. हकालपट्टी : 'कुमकेचा विचार घडल्यास रास्ते यांचा उठाव करितील.' – ऐलेसं ६०२४.

**उठाव** पु. जागृती; बंड : 'पूर्वबंगालमधील उठावाचे मूळ' – अबांदे १०.

**उठाव** पु. प्रसिद्धी : 'नोबेल पारितोषिकांनी यांपैकी काहींना अधिक उठाव मिळाला इतकेच.' – छांदसी ९६.

**उठावण** स्त्री. आक्रमक किंवा जोरदार कृती : 'ऐसी उठावण चमत्कारिक केली की, साध्या तिय्यात अमीरबक्षाला खाल्ला.' –व्यव ११९.

**उठावणी** स्त्री. पहा : **उठविणे.** १. उत्तेजन; प्रोत्साहन; प्रेरणा; पुढाकार : 'देवळात काकडआरती आमच्या बाबांच्याच उठावणीने

होत असे.' – माजी २१. २. जोराने पुढे सरसावणे; उचल करणे. ३. बंडखोरी; डोके वर काढणे; हल्ला करणे; स्वारी करणे :'इंग्रज लोक जितक्या वेळा उठावणी करतील तितक्या वेळा त्यांना चोपून काढायचे.' – इंप १४४. ४. उद्युक्त होणे; पुढे होणे. ५. जागृती. ६. उभारणी; सजावट; रचना; बांधणी :'शिवापूरच्या बागायतीसाठी दुसऱ्या धरणाची उठावणी केली.' – श्रीयो १४३. ७. तळ हलविणे; निघण्याची तयारी करणे; कूच करणे. ८. उठवणे; दारिद्र्य, संकटे यातून वर काढणे. ९. उचलणे (ओझे). [सं. उत्थापन]

**उठावणी** स्त्री. शिफारस; स्तुती; प्रशंसा. (को.)

**उठावणी** स्त्री. जैन किंवा वैष्णव यांच्यामध्ये मृताच्या तिसऱ्या दिवशी करण्याचा विधी.

**उठावणे** अक्रि. १. पुढे होणे; उद्युक्त होणे; तयार होणे; सरसावणे; एखाद्या उद्योगासाठी आवेशाने लागणे; मनापासून कामाला लागणे :'पत्रिका वाचितांचि गोपाळा । पुढें भीमकी देखे डोळां । बाह्या पसरूनि उतावेळा । आलिंगना उठावला ।।' – एरुस्व ४.६२. २. हल्ला करणे; छापा घालणे; स्वारी करणे; युद्धार्थ चाल करून जाणे :'काळरात्रीचीं कटकें। उठावलीं जैसी ।।' – ज्ञा ११.१९९. [सं. उत्थापन]

**उठावणे** सक्रि. नक्कल करणे; उतरून घेणे. (गो.)

**उठावदार** वि. डोळ्यांत भरणारा; लक्ष वेधून घेणारा; चांगला उठाव असलेला; आकर्षक; ठळक.

**उठावदार चित्र** पृष्ठभागाच्या वर आलेले चित्र; उठावाचे चित्र.

**उठावरेघ** स्त्री. (भूशा.) नकाशामध्ये उंचसखलपणा दाखविण्यासाठी वापरण्यात येणारी छोटी रेघ.

**उठावा** पु. पहा : **उठाव, उठावणी.** १. निघून जाण्याकरिता उठणे; सैन्याचा तळ हलवणे; कूच करणे; बाहेर पडणे :'आता उठावा करी ताता । नातरी त्यजीन मी जिविता ।' – कथा १.५.११२. २. शत्रूविरूद्ध उठणे; हल्ला; चढाई :'दीधला वीरभद्रें उठावा ।' – उषा ११५२. ३. (अज्ञात स्थितीतून, दुखण्यातून) बाहेर येणे. ४. बहार; उत्कर्ष :'फुन वसंताचा उठावा । तो आनूंचि दिसें ।।' – शिव २५९. ५. विस्तार; वाढ :'तैसें जेथूनि हा आघवा । संसारतरूचा उठावा ।' – ज्ञा १५.२०२. ६. प्रोत्साहन; उत्तेजन :'उल्हासु वीरांचिया चित्तां । उठावा दीधला मागुता ।' – एभा ९.१३२. ७. आवेश; वेग :'ऐसा दृढ वैराग्यउठावा । तेणें विहिताग्नि बोळवावा ।।' – एभा १८.६५. [सं. उत्+स्थापय्]

**उठावाचा नकाशा** ज्या नकाशात डोंगर, नद्या, पर्वत इ. भाग पृष्ठभागापासून उंचसखल दिसतील असे कोरले आहेत असा नकाशा.

**उठाळणी** पहा : **उत्तेजन, उठावणी** :'चाळीस हजार घोडा मर्द दिली उठाळणी ।' – ऐपो ८५.

**उठाळणे** प्रोत्साहन; आवेशाने पुढे होणे; चढाई करणे; दुःस्थितीतून डोके वर काढणे. पहा : **उठावणी** (व.)

**उठाळून बोलणे** मोठ्याने बोलणे. (माण.)

**उठित** वि. मशागत केलेली; लागवडीला आणलेली, वहित (जमीन). (व.) [सं. उत्थित]

**उठिंगण** न. आधार.

**उठिंगर–ळ** न. आपटल्याने आलेली सूज; टेंगूळ; गळू.

**उठी** स्त्री. उठायला लावायाची निकड; उठण्याची, निघून जाण्याची निकड :'तुझे स्वरूप पाहतां दृष्टी । भयातें उठी उठावें ।' – नव १४.७२.

**उठी का बठी** मुलींचा एक खेळ.

**उठीनिलिया** क्रिवि. उठले असता; उठल्याने :'एकी प्रेमें उत्कंठिता । पहाविया उठीनिलियां असांसिता ।' – शिव ६००.

**उठू** स्त्री. कामाची सक्ती, निकड, तगादा, लकडा. (क्रि लावणे, मांडणे, करणे). [उठचे द्वि.]

**उड** न. नक्षत्र. पहा : **उडुगण** :'शशी पोळला शाम काया उडें ... जेवि लाह्यात ।' –मुरासुंकां ५८.

**उडकी, उंडकी** स्त्री. उचकी; हुंदका (क्रि. येणे) :'डोळे झांकले जिव्हा आड पडली । नेदी हुंकारा बोळखी मोडली । उडकी हृदयांतु प्रवेसली । प्राणु सांडी वेळोवळां ।।' – त्रिपु. २.२४.८४.

**उडकी** स्त्री. लहान उडी : 'उडकिया देऊ लागला' – क्रि. २.६.२१

**उडकी** स्त्री. पाट; विधवाविवाह.

**उडगण** स्त्री. गोगलगाय :'उडगण घडों जाय भिन्ती । तृणें लोटितां पडे पुढती ।।' – मुविराट ५.३०.

**उडगण** पु. न. नक्षत्रे; चांदण्या. [सं. उडुगण]

**उडगणे** उक्रि. झाडणे; केर काढणे. [का. उडगु=झाडणे]

**उडगा** पु. समुद्रकाठी उथळ पाण्यात खडकात राहणारा खेकडा.

**उडणारा रंग** उजेडात ठेवला असता कमी, नाहीसा होणारा, विटणारा रंग.

**उडणारी शाई** (हवेच्या परिणामामुळे) पुसट, नाहीशी होणारी शाई.

**उडणे** अक्रि. १. भरारी मारणे; आकाशमार्गे गमन, संचार करणे (पक्षी वगैरेंनी) :'हें विपायें आगींत पडे । तरी भस्म होऊनि उडे ।' –ज्ञा १३.११०५. २. आघात प्रत्याघातादी कारणाने स्थान सोडणे; मूळ स्थानापासून अन्यत्र जाणे; वर बाजूला उडी मारणे. ३. उल्लंघन करणे; ओलांडून जाणे; वरून उडी मारून जाणे :'आडमार्गें उडोनि भिंती ।' – मुविराट ४.२४. ४. उंचावरून खाली उडी मारणे. ५. झडप, झेप घालणे; तुटून पडणे; रागाने, आवेशाने चालून जाणे. ६. संभोगार्थ उडी मारणे–चढणे (पशु वगैरेंच्या बाबतीत – पशूनरांनी माद्यांवर). ७. (ल.) गर्व करणे; मद येणे; ताठा चढणे :'ज्यांच्या बळें उडसि तें तिकडेचि मनेंहि तुजकडे देहें ।' – मोउद्योग ४.१०९. ८. (ल.) वर मान करणे; भरभराटणे :'सत्कीर्ति न दे उडों नवसुचेतें ।' – मोमंभा २.४०. ९. भरधाव पळणे (घोडा वगैरे); वेगाने जाणे. [सं. उड्डान]

**उडणे** अक्रि. १. नाहीसे होणे; निघून जाणे; संपणे :'ते रात्री येतां सूर्यापुढें । स्वकायेंसी सगळी उडे ।' – एभा २०.२८१. २. एकदम अदृश्य होणे; दिसेनासे होणे. ३. कोमेजणे; निस्तेज होणे; रंग विटणे; अस्पष्ट होणे; फिक्का होणे. ४. खपणे; खलास होणे; खर्च होणे (द्रव्य, जिन्नस); झपाट्यात संपणे :'तिच्या दोन हजार प्रती दोन दिवसांत उडाल्या.' – दुर्दम्य १६२. (धैर्य, धीर) खुंटणे, सुटणे; (पाणी वगैर) आटणे. ५. मन विटणे; तिटकारा येणे; प्रेम नाहीसे होणे :'तिचा आज जीवच उडून गेला होता.' – अस्तंभा १८८. ६. दुभते जनावर दूध देत नाहीसे होणे; कोरडे पडणे; भाकड होणे :'दुभतीया दोनि

गाइ : तीया दुभेति जव उडेति तव असेति' : – गोप्र ८७. ७. एखाद्याची चाकरी, रोजगार सुटणे. ८. दोष, विरोध वगैरे दूर होणे; मावळणे; आरोप नाहीसा होणे (शास्त्रादी विषयांवरील). ९. निसटून जाणे; पळून जाणे :'पुढें धरितां मागें पेंचला । मागे धरितां पुढे उडाला । ऐसा सांपडतचि गेला । ठाइंठाइं ।।' – दास १७.४.३. १०. (शाप.) वाफ होऊन जाणे; बाष्पीभवन होणे.[सं. उड्डान] (वा.) **उडत जाणे** – (ल.) खिजगणतीत नसणे; महत्त्व न देणे; न मानणे.

**उडणे** अक्रि. १. बंदूक, तोफ पेटणे; गोळी सुटणे; स्फोट होणे; फुटणे. २. युद्ध, भांडण वगैरे जुंपणे.

**उडणे** अक्रि. १. मजा, गंमत, भांडणतंटा, अव्यवस्था वगैरे उत्पन्न होणे. २. सुरू होणे, वाढणे, माजणे :'चालिले उडत गर्जत ।' – दावि २६८.

**उडणे** अक्रि. बळावर, आशेवर काम करणे; अवलंबून कार्य करणे (द्रव्य, सत्ता, वचन वगैरेवर).

**उडणे** अक्रि. नापास होणे; स्पर्धेत पराभूत होणे :'मुलगा गणितात कधीकधी उडतो.' – खेकडा १३७.

**उडतउडत** क्रिवि. १. उड्या मारीत; नाचतबागडत; एकाच क्रमाने; वेगाने नाही अशा प्रकारे (जाणे, येणे). २. अनिश्चितपणे; अनिर्धारिकपणे; संदिग्धपणे; अस्पष्टपणे (सांगणे, बोलणे, ऐकणे). ३. कर्णोपकर्णी (एकाकडून दुसऱ्याला अशी बातमी इ. येणे). ४. संक्षेपाने, सारांशरूपाने; अधूनमधून :'तिने उडत उडत जबाब दिला.' – विवि ८.३.८२.

**उडतक** न. घोड्याच्या अंगावरील गाशाखालील वस्त्र.

**उडत कोंबडा** पु. मुलींचा एक खेळ.

**उडतघुमा** वि. (भोवऱ्याच्या खेळात) दूर उडून तेथे फिरत राहील अशा तऱ्हेने टाकलेला; उडून घुमतो असा टाकलेला (भोवरा).

**उडतपगडा** पु. मुलींचा एक खेळ.

**उडतपगडे** न. सोंगट्याच्या खेळातील एक डाव (क्रि. करणे)

**उडतबातमी** स्त्री. बाजारबातमी; गप्प; भुमका; सहज समजलेले पण संशयित वर्तमान; कर्णोपकर्णी ऐकलेली वार्ता.

**उडतरुमाल** पु. १. मर्दुमकी करणाऱ्या कनिष्ठ समजल्या जाणाऱ्या जातीच्या लोकांसाठी योजिलेला किताब. २.लढाई थांबवण्याची खूण.

**उडत हत्यार** न. तोफांची मारगिरी; गोलंदाजी.

**उडता नाच** गोव्यातील कलावंतिणीचा नाच.

**उडता पील** उफाड्याने वाढणारे मूल; थोराड मुलगा; धडाडीचा, पुढे नावारूपास चढेल अशी चिन्हे दाखवणारा तरुण; हुषार, मुलगा.

**उडती पाटी** १. बलुत्यांपैकी एक हक्क; धान्य उफणताना महार जी पाटी घेत असत तिला उडती पाटी म्हणत. धान्य उफणणाऱ्या महाराला त्या पाटीभर धान्य दिले जात असे. २. चांभारपाटी.

**उडती वार्ता** पहा : **उडत बातमी** :'उडति वार्ता हे निजकथा ।'– दावि २८७.

**उडते ऊन** कोवळे ऊन; सकाळचे ऊन.

**उडते पाखरू** १. उडणारा पक्षी. २. (ल.) चंचल, अस्थिर माणूस; हंगामी. (वा.) **उडत्या पाखराची पिसे मोजणारा, उडत्या पाखराची मेज करणारा** – फार चलाख, हुषार मनुष्य; पाताळयंत्री मनुष्य; नुसत्या तर्काने एखादी गोष्ट अचूक ओळखणारा : 'उडत्या पाखरांची शेटां मोजप.' (गो.)

**उडते वेतन** चौरी किंवा रुमाल उडविण्याच्या मानाबद्दल सरकारातून मिळत असणारे वेतन :'... भिकाजी केशव यास उडतें वेतन पावावयाची नेमणूक आहे ...' – पेदभा ४५.६५.

**उडते साल** एक वर्षाआडचे वर्ष.

**उडदण, उडदाण** न. उडदाची मळणी झाडल्यावर राहिलेला भुसा, भुसकट.

**उडदणी, उडदाणी** वि. उडदाच्या रंगाचे, काळसर.

**उडदळ** स्त्री. उडीद पेरण्यास योग्य अशी जमीन; जेथे उडीद पेरला आहे अशी जमीन.

**उडदा बेगम, उडदा बेगण** – (बुद्धिबळ खेळ) मोगली संप्रदायी बुद्धिबळातील एक मोहरे. यात घोड्याच्या ऐवजी उडदाबेगम हे मोहरे असून त्याची गती ३।। घरे असते. या उडदाबेगणीच्या खेळात पटावर १०० घरे असतात.

**उडदा बेगमी, उडदा बेगी** हत्यारबंद स्त्री; उडदाबेगणी. (हिं.)

**उडदा मुहूर्त** लग्न, मुंज वगैरे समारंभास आरंभी सुवासिनी उडीद दळण्याचा जो समारंभ करतात तो; उडीद भरडण्याचा मुहूर्त, काळ.

**उडदावळ** स्त्री.१. उडीद पेरलेली जमीन; उडदाचे शेत. पहा : **उडदळ**. २. उडदी रंगाचे लुगडे (काळ्या अंगावर पांढऱ्या चौकटी असणारे).

**उडदी** स्त्री. वर्दी किंवा ताकीद :'तो यांनी महालांत गावगन्ना द्वाही घराघरात उडद्या फिरविल्या होत्या ....' – होकै ९९.

**उडदी** वि. उडदाच्या रंगाचे.

**उडदी लुगडे** पांढऱ्या चौकटी असलेले काळे लुगडे.

**उडदे** पु. उडदाच्या दाण्यासारखे कीटक. (व.)

**उडद्या मुरूम** उडदासारखा बारीक, काळा मुरूम.

**उडप** न. वाघाला मारण्याकरिता एखादे मेलेले किंवा त्याने मारलेले जनावर ठेवून त्याभोवती केलेले काट्यांचे कुंपण. (गो.)

**उडपाल** न. मोठ्या तंबू शेजारी स्नान, स्वयंपाक वगैरे करण्याकरिता ठोकलेला लहान तंबू.

**उडपाल** न. कांबळ्याच्या खोळीवर (पर्जन्यनिवारणार्थ) जे दुसरे वस्त्र घेतात ते. [सं. उर्ध्व+पल्लव]

**उडया, उडये** पु. पहा : **उडवा, उडवी, उडवे**

**उडलटप्पू** वि. निरुद्योगी. पहा : **उडाणटप्पू**

**उडली, उंडी, उलडी, उलांडी** स्त्री. (नाविक) होडी उलटू नये म्हणून तोल सांभाळण्यासाठी तिच्या बाहेरील बाजूला दोन वाकडी लाकडे जोडून त्यांच्या शेवटाला जोडलेले एक आडवे लाकूड. हे नेहमी पाण्यात असते.

**उडवणी** स्त्री. १. पसरणे; फेकून देणे; उधळणे. २. दुसऱ्याने सांगितलेली गोष्ट उडवून देणे; अवहेलना करणे; अव्हेर करणे; हेटाळणी. ३. निरास :'ये विषयीं उडवणी पंचकोस । बोलिलेली दासानी अभंगषट्क ते ।' – दावि ३१३. ४. टाळाटाळ.

**उडवणे, उडविणे** उक्रि. १. **उडणे** याचे प्रयोजक. पहा : **उडणे** २. **दूर फेकणे;** अस्ताव्यस्त करणे; विस्कळीत करणे; चारी दिशांना उधळून लावणे; पळवून लावणे : 'मुकूट शिरींचा उडविला ।' – मोदोहारामायण ६९. ३. उधळपट्टी करणे; बेसुमार खर्च करणे : 'आपल्या नादीं लागून हवा तेवढा पैसा उडवील असें तिला वाटलें.' – विवि १०.५-७.१२३. ४. टाळणे; अव्हेरणे; सोडणे; टाकून देणे. ५. हेटाळणे; अव्हेर करणे; झिडकारणे. ६. चोरणे; लांबविणे; नाहीसे करणे : 'हातवह्या फिर्यादीने उडविल्या.' –विक्षिप्त ३.९५. ७. मारणे (फटके इ.); आघात करणे : 'निर्गुणास जन्म कल्पिला । अथवा निर्गुण उडविला ।।' – दास ९.३.२६. चाबूक उडवणे; चाबकाचे फटके मारणे. ८. चोरून नेणे; पळवून नेणे : 'तिला उडवून नेण्याचा प्रयत्न करणे ही गोष्ट श्लाघ्य आहे.' – विवि १०.५.-७.१२३. ९. आटोपणे; जलद काम करणे; त्वरित संपवणे : 'लॅटिन भाषांतर विद्यार्थ्यास दिले असतां ते जॉन्सनने कसें उडवून दिले याविषयीं मागे सांगितलेंच आहे.' – निमा ६५६. १०. फजीत करणे : 'नका आमची जास्त उडवू.' – चंद्रग्रहण ४०. ११. पदभ्रष्ट करणे; काढून, हाकून लावणे : 'आपण स्वत : टोळीचा नायक होऊन तुम्हांस उडवून देणार नाहीं.' – कोरकि २७८. १२.स्फोट करणे; उडविणे (शोभेची व सुरुंगाची दारू इ.) १३. नष्ट करणे; ठार मारणे : 'शत्रूवर नेम धरून सोजीर उडवितां येतील.' – इंप १५०.[सं. उड्डायन] (वा.) **उडवून घेणे** – भिल्ल जमातीतील वाङ्निश्चयानंतरचा एक विधी. या विधीत नवरानवरीला एका कमरेइतक्या उंच धरलेल्या अधांतरी फळीवर बसवून गाणे गात तालावर वर उडवतात व पुन्हा फळीवर झेलतात. **उडवून देणे, लावणे** १. ठार मारणे : 'पहारेकऱ्यांना आणि शिपाईबंदीला उडवून दिले की...' – केस्व ४८. २. दुर्लक्ष करणे; हेटाळणे.

**उडवलाउडवला, उडविलाउडविला** वि. दूरदूर; इकडेतिकडे; मधूनमधून; विलग; तुरळकतुरळक. (को.) [उडविणेचे द्वि.]

**उडवा, उडवी, उडवे** पु. स्त्री. न. १. ढीग; रास; गंजी (पिकांची, गोवऱ्यांची) : 'नाना निधानचि निदैवा । होये कोळसयाचा उडवा ।' – ज्ञा १८.७२५; 'भाताचे भारे आंब्याच्या खळ्यावर रचून त्याच्यावर उडव्या लावल्या.' – आआशे १३६. २. (गोवऱ्या वगैरेंची) रास ठेवण्यासाठी केलेले कूड. (व.) ३. कोणत्याही धान्याच्या वाळलेल्या ताटांचा (झोडपणीसाठी) रचलेला ढीग, बुचाड : 'आच्च्या तीन वझ्यानं आपला उडवा भरते.' – धग ५८. [का. उड्डी=ढीग]

**उडवाउडव, उडवाउडवी** स्त्री. १. टाळाटाळी; कोलवाकोलव. २. हेटाळणी; अवमान. ३. उधळपट्टी; अव्यवस्थित खर्च. ४. अस्ताव्यस्त करणे (ठेवलेला जिन्नस); अस्ताव्यस्तपणा; अव्यवस्था; विस्कळीत रीतीने केलेली फेकाफेकी. ५. निरास करणे; लागू होऊ न देणे (दोष).[उडविणेचे द्वि.] (वा.) **उडवाउडवी करणे** – मूळ मुद्दा सोडून भलतेच उत्तर देणे; खरे माहीत असून ते सांगण्याची टाळाटाळ करणे : 'पण त्यानं अशीच उडवाउडवी करून मला वाटेला लावावं.' – पलको ३९२.

**उडवागी** स्त्री. तिरस्काराने वागवणे; अवहेलना करणे; अनादर करणे (एखाद्या माणसाचा किंवा त्याच्या भाषणाचा). (क्रि. करणे)

**उडवार्ता** स्त्री. उडत बातमी; अफवा; उडत उडत आलेली हकीगत; जनवार्ता : 'दुसरी उडवार्ता ऐकली की, राजश्री मल्हारबा होळकर फौजसुद्धा झांसीस दाखल जाले.' – मइसा १.८.

**उडव्या** वि. १. उधळपट्टी करणारा; खर्चिक; अतिव्ययी. २. चुकारपणा करणारा; टाळाटाळ करणारा.

**उडंग, उंडिगू** पु. त्रास. [क. उंडिग]

**उडंत** स्त्री. वानराची लढाई.

**उडंत्री** स्त्री. सुताचा ताणा मागावर चढवण्यापूर्वी पाजणी (उकी) करण्याकरता लागणारे लाकडी घोडे; बैली. [कर्ना.]

**उडाउडी** क्रिवि. चढाओढीने; घाईघाईने; उड्या पडून; चुरशीने.[उडीचे द्वि.]

**उडाऊ** वि. अतिशय खर्चिक; उधळ्या. पहा : **उडव्या**

**उडाऊछप्पी, उडाऊछप्पू** वि. टाळाटाळी करणारा; चुकारतट्टू.

**उडाण** स्त्री. उडी; धाव. (ना.) [सं. उड्डान]

**उडाण** न. १. उठाणू; गळू. २. (ल.) बंड; उठवलेले काहूर: 'रोज उठवण्या आणावे म्हणजे या मावल्याचें उडाण फुटेल.' – पेद ६.१४७.

**उडाण** पु. शेताचा, जमिनीचा एकीकडचा, विलग असलेला तुकडा.

**उडाणखटोले** (उडाण्खटोले) न. विमान. [हिं. उडनखटोला]

**उडाणटप्पू** वि. १. एकाच ठिकाणी, कामात फार वेळ न टिकणारा; भटक्या; अस्थिर; चंचल वृत्तीचा. २. खुशालचंद; रिकामा; बेजबाबदारीने भटकणारा. ३. चालचलाऊ; हंगामी (उद्योग, नोकरी).

**उडाणवीर** पु. कोणत्याही अवघड कामात बेधडक उडी घालणारा माणूस. (को.)

**उडापी** वि. तात्पुरता; हंगामी.

**उडाफा** पु. १. एका ठिकाणी थोडे, त्यापुढे काही अंतरावर थोडे असे असण्याची स्थिती (विशेषत : जमिनीसंबंधी); निरनिराळ्या ठिकाणी एकाच मालकाची असलेली जमीन; अंतराअंतरावर असलेले जमिनीचे लहान लहान तुकडे; काही जमीन एका गावात व त्याच खातेदाराची किंवा इनामदारांची दुसऱ्या गावात असलेली काही जमीन. २. पंक्तीत पाने वगळून बसणे; अधेमधे बसणे (बैठकीत वगैरे). ३. कळपातील गुरे इकडेतिकडे पुंजक्यानी पसरलेली असणे.

**उडाफी** वि. उर्मट.

**उडाफू** वि. १. तात्पुरते; हंगामी; क्षणिक (काम, स्थिती). २. अस्थिर; चंचल मनाचा, वृत्तीचा; बेभरवशाचा (माणूस).

**उडाले** न. उडत बातमी; अफवा; ऐकीव बातमी : 'परंतु उडालें आहे की खंडागळा मोडून सुटला – दोघे लेक धरले ऐसे वर्तमान उडालें आहे.' – पेद ३८.१८५.

**उडावणी** पहा : **उडवणी**

**उडाळ** वि. १. अस्थिर; चंचल. २. लक्ष उडालेला, मनातून, लोभातून गेलेला; मन विटलेला; पराङ्मुख. (राजा.)

**उडिया, उरिया** वि. ओरिसा प्रांतातील (व्यक्ती, भाषा. इ.).

**उडी** स्त्री. १. एका जागेवरून, मधे पाय न टेकता दुसऱ्या जागी वेगाने जाणे; झेप; उडणे; (क्रि. घालणे, मारणे, टाकणे). २. (ल.) संकल्प; इच्छेची मर्यादा. ३.(ल.) आटोका; आवाका; पल्ला; कार्यक्षमता; आकांक्षा; उमेद. (वा.) **उड्या पडणे** – झटून, तुटून पडणे (मला पाहिजे, मी करतो म्हणून); गर्दी होणे; जोराची चढाओढ लागणे; चुरस लागणे (एखाद्या गोष्टीबद्दल) :'उंच वस्त तात्काळ विके । जाणत्या लोकांच्या कौतुकें । उड्या पडती ।' – दास १२.७.२५. **उड्या मारणे** – १. गर्व वाहणे; ऐट करणे; फुशारकी मारणे; बढाई मारणे; उद्दामपणे वागणे. २. उनाडक्या करणे. ३. चैन करणे. ४. विवक्षित मर्यादा ओलांडून, उल्लंघून जाणे. ५. गाळणे (मुद्याचा भाग, नाटकातील भाग, ग्रंथातील विशिष्ट भाग). **(बळावर, जिवावर) उड्या मारणे** – दुसऱ्याच्या आश्रयावर, आधारावर, अवलंबून मोठमोठ्या गोष्टी करणे; गर्व वाहणे; मोठमोठ्या कार्याला हात घालणे. **उडी घेणे** – बेधडक भाग घेणे; सर्वस्वानिशी आणि परिणामाची पर्वा न करता स्वतःला झोकून देणे (एखाद्या कार्यात) :'आर्यसमाजाने या आंदोलनात उडी घेण्याचे ठरविले.' – हैस्वाआ १०५.

**उडी** स्त्री. दुसऱ्याचा बैल कामाकरिता आणल्याबद्दल धान्याच्या किंवा पैशाच्या रूपाने द्यायचे मूल्य; भाड्याने जनावरे आणून शेती करणे. (राजा.)

**उडीद** पु. एक द्विदल धान्य. याचे झुडूप अथवा वेल हात दीड हात उंच वाढते. उडदाचा रंग काळा असून डाळ पांढरी असते :'उडदांमाजी काळे गोरे । काय निवडावे निवडणारें ।' – व्यं १४.

**उडीद** पु. नेम धरण्यासाठी बंदुकीच्या नळीवर असलेली माशी. लहान उंचवटा.

**उडीदमुहूर्त** पु. १. विवाहाच्या आदल्या दिवशी करायचे एक देवकार्य. यावेळी गणपती प्रीत्यर्थ उडीद दळण्यात येतात. २. (ल.) विवाहसमारंभाचा आरंभ.

**उडीदान** न. पु. उडीदाचे केलेले खाद्य पदार्थ. :'मज उडीदान न साहे ।' – लीचपू ४६४.

**उडीव** पहा : **उडवा** २ :'गोसावियासि तीकोपाध्यांचीय उडीवां बारा वरिखेपर्यंत अवस्थान.' – गोप्र ६.

**उडुकदुडूक** क्रिवि. उडतउडत; अव्यवस्थित : 'आम्ही उडुकदुडूक लेहून दिल्हे आहे ते कोणास न दाखविणे.' – पुरंद ३.१७८.

**उडुगण** पु. तारकापुंज; नक्षत्रांचा समूह. [सं.]

**उडुप** पु. १. चंद्र. २. नौका. [सं. उडु+प]

**उडुपति, उडुराज** पु. चंद्र :'तंव उडुराज उदेला गगनीं ।' – रास १.१००. [सं.]

**उडेलटप्पू** पहा : **उडाणटप्पू**

**उड्डाण** न. लाठीच्या खेळातील घोटच्यावरील वार चुकविण्याकरिता बचावाची पद्धत.

**उड्डाण** न. आकाशात घेतलेली झेप. पहा : **उडी** :'एकेंचि उड्डाणें सातांहि सागरां । प्रदक्षिणा कीजें ।' –ज्ञा १०.२५०. [सं. उड्डयन]

**उड्डाण पट्टी** विमान अवकाशात झेपवण्यासाठी व उतरवण्यासाठीचा मार्ग.

**उड्डाणबैठक** स्त्री. (व्याया.) बैठक मारून वर उठताना उडी मारणे व नंतर पुन्हा खाली बसणे.

**उड्डियान** न. हृदयस्थान; अनाहतचक्र. [सं.]

**उड्डियानबंध** पु. योगातील एक बंध; हठयोगात मूल, उड्डियान व जालंदर असे बंधाचे तीन प्रकार आहेत.

**उड्या** वि. १. उडी मारणारा. २. धमक असलेला; हुषार; चलाख.

**उढणे** पहा : **उडणे** ५. :'... देशमुख त्यापासून द्वाही देत असतां उढोन जिवे मारला.' – शिचसाखं २.११६.

**उढा** पु. बांबूची एक जात.

**उणखुण, उणखूण** स्त्री. १. हेतू; मनोगत; कामना :'नायट्यांभेण । न मोडिजे नागांची आण । तैसी पाळी उणखुण । स्त्रियेची जो ।।' –ज्ञा १३.८०१. २. वर्म; रहस्य :'म्हणोनि एक एकाधीन । जाणती उणखूण येरयेरां ।' – निगा १७७. ३. प्रत्यय; अनुभव :'तें शोधित सत्त्वाचें लक्षण । हे मी जाणें उणखूण ।' – एभा ११.७२५. ४. ओळखण्याचे लक्षण; चिन्ह; खाणाखुणा :'एकोनियां उणखुणेसी । चरफडी जैसी विव्हळ ।' – एभा २३.९७३.

**उणवट** वि. अल्प मोलाचे; कमी किंमतीचा. [सं. ऊन+वत्]

**उणवाई** स्त्री. कमतरता; कमीपणा; तोटा; टंचाई. (को.) [सं. ऊन]

**उणा** वि. १. कमी; अपुरा; नेहमीपेक्षा कमी; विवक्षित परिमाणापेक्षा कमी :'काय उणें कां करितोसि चोरी ।' – तुगा ११९. २. अपुरा; अपूर्ण; सदोष (कार्य, सामग्री); अपुरी असलेली (गोष्ट). ३. हलका; कमी योग्यतेचा, प्रतीचा :'म्हणौनि आसुरी उणी । संपदा नव्हे ।।' – ज्ञा १६.२५६. ४. मानहानिकारक; अयोग्य; एखाद्याचे व्यंगदर्शक (शब्द, भाषण इ.) :'बोले शब्द उणा विदेह पिसुणामध्यें तदा त्या गुणा ।।' – आसी ५१. ५. नपुंसक :'वडील बाईल म्हणे उण्या । धाकटी बाईल म्हणे सुन्या ।।' – नामदेवनाटक १९. ६. गैरहजर; अविद्यमान. [सं. ऊन]

**उणाअधिक** वि. अयोग्य; गैर :'गावात काही उणाअधिक प्रकार झाला म्हणजे अण्णा खवळत.' – एल्गार ४४.

**उणाअप्रा** वि. अपुरा; विवक्षित मापाहून कमी (कापड). पहा : **उणा**.

**उणाक, उणाख** वि. हलक्या प्रतीचे; कमी किंमतीचे (हलके, विटणारे वस्त्र, माल वगैरे) :'त्याप्रमाणे उणाख आणि मध्यम शालजोड्या पाहून पाठवून देणे.' – पेद १८.७२.

**उणाके, उणाखे** न. हलके वस्त्र :'बाजी नारायण पुरंदरे यांना उणाखीं मिळाली होतीं.' – भात्रै १०.३.१२७.

**उणाखट** वि. हलका (भारी नव्हे असा); हलक्या किंमतीचा :'त्यास बंगाल्यापैकी रेशमी जिन्नस उणाखट, तापते, मुगठे, गुदर, कचे रेशीम बहुत करून येत असते ...' – नाग १.२०५.

**उणादुणा** वि. १. अपमानकारक; कमीअधिक; तिरस्कारदर्शक; मर्मभेदक (शब्द, बोलणे). २. सरासरी. पहा : **उणापुरा** [सं. ऊन+द्विगुण.]

**उणारणे** सक्रि. पेरणे; वर फेकणे; उधळणे :'रामाची राणी सीता । कशी रावणानं नेली । गळ्यात रत्नहार । मोती उणारीत गेली ।।' – वलो. (व.)

**उणाव** पु. कमीपणा. पहा : **उणवाई**

**उणावणे** अक्रि. १. कमी होणे; कमीपणा, उणीव, न्यूनता येणे; पूर्व

स्थितीपेक्षा ऊणा होणे (पर्जन्य, रोग इ.) : 'ज्येष्ठ अंधत्वे उणाविला ।।' – मुआदि २५.८६. २. तीव्रता कमी होणे; शिथिल होणे. ३. उतरणे; खालावणे; अवनती होणे; क्षीण होणे. [सं. ऊन]

**उणावळ** स्त्री. उणीव; सूट; कमीपणा; टंचाई; कमतरता.

**उणावा** पहा : **उणावळ** : 'का अजून काही उणावा आहे?' – जैत ४९.

**उणांग** वि. कमी; हलका; हलक्या दर्जाचा. (गो.) [सं. ऊन+अंग]

**उणीदुणी–री काढणे** दोष, उणिवा काढणे : 'एकमेकांची उणीदुरी काढू लागते.' – युगान्त १३२.

**उणीव** स्त्री. १. कमीपणा; उणेपणा. २. दोष; व्यंग. [सं. ऊन]

**उणुखुणु** पु. लहानशा इच्छेचे संकेत : 'उणुखुणु पुसीलेया न बने । तेथ दुखकरी ।' – ज्ञाप्र ९९०.

**उणे** न. १.कमीपणा; कमतरता; दोष; व्यंग; अपुरेपणा; वैगुण्य : 'दैत्यीं देवां आणिलें उणें ।।' – ज्ञा ९.४५०.

शअ. वाचून; शिवाय; वीण : 'जीव घेतलिया उणें चालों नेणसी साजणें ।।' – अमृ २.३९. [सं. ऊन] (वा.)**उणे आणणे** – दोष लावणे; कमीपणा आणणे; लाजविणे : 'वरि झळकति दिव्य कळस । उणे आणति उडुगणास ।' **उणे घेणे** – आपल्या कमीपणाबद्दल मनास लावून घेणे; दु:ख पावणे; स्वत:ला कमी समजणे. **उणे पाहणे, उणे काढणे** – दोष पाहणे; व्यंग काढणे; नावे ठेवणे.

**उणे** वि. वजा करायचा, कमी करायचा (भाग, अंश); ऋण (अंश).

**उणेउत्तर, उणेभाषण** न. अपमानकारक, तिरस्कारव्यंजक, मानभंग करणारे उत्तर.

**उणेचिन्ह** न. एका संख्येतून दुसरी संख्या वजा करायची असता या दुसऱ्या संख्येमागे करावयाचे आडव्या रेषेचे (–) ऋणचिन्ह.

**उणुदुणे, उणेदुरे** वि. अपमानकारक; निंदाव्यंजक; कमीअधिक; पाणउतारा करणारी (भाषण); घालूनपाडून बोललेले. दोष. पहा : **उणादुणा** : 'भाऊसाहेब काका साहेबांना उणुदुरे बोलत असलेले पाहून नमूताईंना जरा राग आला.' – हाच का धर्म ३३.[उणेचे द्वि.] (वा.) **उणुदुणे काढणे** – पहा : **उणीदुरी काढणे** : 'स्वत: करणे टाकून दुसऱ्याच्या करण्यात उणेदुणे काढत बसतील.' – कोउ ८३. **उणेदुरे बोलणे** – अपमानकारक बोलणे : 'नवरा मारतो व सासू सारखी उणेदुरे बोलते असे ती सांगत होती.' – परिपूर्ती ३१.

**उणेपणा** पु. दोष; कमीपणा.

**उणेपाणे, उणे पाताळे** न. दोष : 'एकमेकांची उणीपाणी काढण्यांतच जर आपला असा वेळ जायचा तर उद्या रणागणांवर काय होणार?' – डाव जिंकला. 'त्यांचे कशाला उणेंपाताळें काढतेस?' – नामदेव नाटक ७६.

**उणेवाईट** न. दोष : 'काय उणेवाईट आहे तुझ्यात?' – व्यंमाक ४.

**उत्** अ. एक उपसर्ग. वर, उंच, बाहेर, श्रेष्ठ या अर्थी शब्दास जोडतात. उदा. – उत्क्रांती, उत्तीर्ण इ. [सं.]

**उत** उअ. अथवा : 'अर्जुन म्हणे उभार रे सिंहत्व त्यजुनियां न कुतरा हो । उत राहो, क्षण पाहो, जा यमभट हो । तळीं न उतरा हो ।।' – मोवन ९.४३. [सं.]

**उतक** स्त्री. चूल.

**उतकटित** वि. कोरलेले.

**उतकड** न. पेंडस; फुळका; सुखडी सोलण्याचे कोकणातील हत्यार. मुसळापेक्षा थोड्या जाड अशा तीन फूट लांबीच्या मुठीवर पंजासारखा फाळ बसवलेला असतो. ही मूठ जमिनीत दीड फूट खोल पुरतात. या फाळावर तीन धावांत नारळ सुखडीतून बाहेर येतो : 'गोठ्यातल्या उतकडावर तो सुखडी सोलीत होता.' – रथ २.

**उतकवळी** स्त्री. उत्कट आलिंगन : 'घेताय उतकवळी ।' – शिव ५९६.

**उतटणे** अक्रि. १. तडकणे; उकलणे; उलणे; उसवणे; ताणून फाटणे; फुटणे; तटतटणे (ताणल्याने, आतून जोर झाल्याने बंद इत्यादी) : 'मग शिवणी जैशी उतटे ।।' –ज्ञा ६.२६६. २. घट्ट होणे; दाटणे; अतिशय ताण बसून तुटणे : 'हे चोळी गेली उतटौनि । तेचि जाणिलें मियां ।।' – शिव २२५.

सक्रि. उकलणे; फाडणे; ताणून तोडणे इ. [सं. उत्+तन्]

**उतटणे** अक्रि. उचंबळणे; ओथंबणे; भरून येणे; विदीर्ण होणे : 'कीं हे सुखाचीं तारूवें लोटलीं । आक्षे आनंदे उतटलीं ।' –दास १.७.३१. [सं. उत्+तट= वर येणे]

**उतणणे** उक्रि. गवत काढून टाकणे; गवत, झाप इत्यादिकांनी आच्छादिलेल्या घरावरील तण किंवा झाप काढून टाकणे. [सं. उत्+तृण]

**उतणणे** अक्रि. गर्वाने फुगून जाणे; ताणणे. [सं.उत्+तन्]

**उतणे** अक्रि. १. उकलून वर येणे (दूध, कढी वगैरे) : 'जैसे उतलें आगीं पडे । ते नलगेचि होमा ।।' – ज्ञा १८.१९३. २. पू वगैरे येणे (डोळ्यांतून). ३. ओठादी अंगावर पुटकुळ्या, फोड येणे (तापामुळे, वस्तरा लागून). ४. बिब्बा वगैरे लागल्यामुळे चिघळणे; फुगून वर येणे : 'कोणे सवतीनें भरला भिलावा उतला ।' – निर्गुणाचा पाळणा १२. ५. खतखतणे; खदखद होणे (आगीवाचून शिजल्याप्रमाणे); (काही चूर्णांवर लिंबाचा रस घातला असता होते तसे) फेस येणे. ६. भरून वाहणे : 'कोपावेशें झाले कल्पांतीचे समुद्रसें उततें ।।' – मोभीष्म ९.२६. ७.(ल.) गर्वाने फुगून जाणे : 'किंबहुना ऐसेसें । उतणें जें संपत्तिमिसें ।' – ज्ञा १६.२२९. ८. उसळणे; उचंबळून वर येणे : 'कल्पांतींचे जसे जलचि उतते ।' – मोवन १०.३९. ९. माजणे; फुगणे; ताठणे; जोराने वाढणे (पीक, गवत, भाजी वगैरे). १०. अतिशय समृद्ध होणे; कल्पनेबाहेर बहर येणे (धान्य, फळ वगैरेस).[सं. उत्+तन्] (वा.) **उतू जाणे** – खर्च होणे, नुकसान होणे; दूध वर येऊन वाया जाणे. उतास येणे; वर येणे (दूध इ.); फेस येणे; (ल.) रहस्य असणे; आटोकाट; अतिशय प्रेम असणे.

**उतणेमातणे** अक्रि. उन्मत्त होणे; वाटेल तसे वागणे : 'उतले, मातले माडी प्यालेल्या कुळवाड्यासारखे.' – पडघ २७.

**उततणे** अक्रि. उचंबळणे. पहा : **उतणे** ८. [सं. उत्+तन्]

**उतती** स्त्री. खारीक : 'बादामे आकरोटे खिसमिस । उतत्या आणवील्या सवंगा ।।' – सारुह ३.४८. [का. उत्तुते=खारीक]

**उतप** वि. (प्र.) उताप; उघडे; ज्यावर चांगले ऊन येत आहे असे; छायारहित. [सं. उत्+तप्]

**उतफती** वि. उत्पाती; दंगेखोर; पेंढारा : '... रावसाहेबांकडील लोकांनी

उतफती कांटेगारीस उठले.' – ऐलेसं ८०५. [सं. उत्पात]

**उतफाळणे** सक्रि. फाडून टाकणे; फाडून तुकडे तुकडे करणे; चिंध्या करणे; वाभाडे काढणे. [सं. उत्फालन]

**उतमाच, उतमाज, उतमात** पु. स्त्री. १. उच्छाद; उपद्रव; उच्छृंखळपणा. (ना.व.) २. माजोरीपणा; गर्व; मस्तवालपणा : 'नसती उतमात करायला काही ना काही क्षुल्लक कारण हवं असतं यांना.' – पैआ १८.

**उतरचट** वि. वारंवार चढण किंवा उतरण असलेले; उंचसखल; स्त्री. चढण्याउतण्याची क्रिया.

**उतरट** वि. उतार असलेला; उतरता. [सं. उत्+तृ]

**उतरड** स्त्री. १. ढाळ; उतार. २. उसाच्या लाकडी चरकातील नराचा आस ज्यात फिरतो तो आडवा दांडा; अडवट. [सं. उत्+तृ]

**उतरड, उतरंड** स्त्री. निवडुंगावर वाढणारा एक तऱ्हेचा वेल. ह्याच्या रसाने अगर चूर्णाने चामड्यावरील केस निघून जातात. [का. उतरणी]

**उतरड, उतरंड, उतरण** स्त्री. १. खाली मोठे व वर लहान अशा रीतीने एकावर एक भांडी, गाडगी ठेवून केलेली रचना : 'मनोरथांच्या उतरंडी । उतरी रची ।।' – ज्ञा १३.११४. २. घोड्याचे एक वाईट लक्षण (कपाळावर एकावर एक असे तीन उलटे भोवरे असणे) [सं. उत्+तृ.] (वा.) **उतरंडीचा वाघ –** घरात शौर्य दाखविणारा भेकड मनुष्य. **उतरंडी उतरणे –** दुसऱ्याच्या कामात ढवळाढवळ करणे.

**उतरण** स्त्री. १. उतार असलेली जमीन; उतरड; ढाळ. २. उतार; उतरता रस्ता. ३. (उत्तरायणातील) उत्तरेकडून वाहणारा वारा. ४. वय, संपत्ती वगैरेस लागलेली ओहोटी; कमी होत जाणे; अवनती; हीन स्थिती. ५. (यंत्र) क्षितिजपातळीशी कलती अशी पातळी; ६. पिकविण्याकरिता झाडावरून आंबे उतरवणे.

न. ज्या ठिकाणी नदीतून पायाने चालत जाता येते अशी जागा; उतार.

**उतरण** स्त्री. पानवेलीचे वेल जोमाने चढावेत म्हणून वर्षातून एकदा पुन्हा गुंडाळून पुरतात ती क्रिया.

**उतरण** स्त्री. बरीच वर्षे जगणारी एक औषधी वेल. हिला जोडफळे येतात. त्यात रेशमासारखा कापूस असतो. हिच्या पानांचा रस खोकल्यास देतात.

**उतरणावळ** स्त्री. १. नक्कल करण्याची मजुरी. २. गलबत, होडी, गाडी वगैरेतून ओझे उतरून दुसरीकडे नेऊन ठेवल्याबद्दल द्यायची मजुरी. ३. नावेतून पलीकडे नेण्याबद्दलचे भाडे. ४. मुक्काम केल्याबद्दलचे भाडे. ५. झाडावरून फळे अलगद काढण्याबद्दल द्यायची मजुरी.

**उतरणे** सक्रि. १. जमिनीवर ठेवणे; वरचा पदार्थ खाली आणणे, ठेवणे. २. मुक्कामावर ओझे वगैरे ठेवणे; खाली, रिकामे करणे; माल काढून ठेवणे (गाडीतून, गलबतातून). ३. खाली आणणे; खाली येण्यास मदत करणे. ४. उंची कमी करणे; ठेंगणे करणे. ५. पलीकडे नेणे; पार करणे (नदीतून वगैरे) ६. उतरून घेणे; पाहून काढणे; चित्र काढणे; छबी काढणे; प्रतिमा काढणे; नमुन्याबरहुकूम करणे; कृती, हावभाव वगैरेची नक्कल करणे. ७. धारा, भाव, मागणी वगैरे कमी करणे; प्रमाण अल्प करणे. ८. अपकर्म करणे; दर्जा, हुद्दा, योग्यता कमी करणे; गर्व नाहीसा करणे. (ताशेरा इत्यादिद्वारा). ९. तीव्रता कमी करणे; शांत करणे (विष, मादक पदार्थ वगैरेंची). १०. नारळ, मीठ, मोहऱ्या वगैरे पदार्थ अंगावरून ओवाळून टाकणे : 'ज्यासी हृदयीं ध्याती पद्मजधूर्जटी । त्यावरोनि यशोदा उतरी दृष्टी ।' – हरि. १३.१६१. ११. नाक, कान, जीभ वगैरे अवयव कापून टाकणे : 'या खड्गें हें शिर उतरीं हा देह पडूं दे रणीं ।' – विक २९. १२. (नदी, समुद्र इ.) पार जाणे; पलीकडे जाणे : 'बहु दुस्तर विपदंबुराशि उतराया ।' – मोकर्ण ७.२३. १३. अंगावरून काढणे (कपडे, दागिने वगैरे). १४. (उतरते, छप्पर, पडवी, सोपा वगैरे) तयार करणे; बांधून सिद्ध करणे. १५. काढून टाकणे (घराचा वरील भाग इ.) १६. कापून टाकणे, साफ करणे (दाढी, मिशा वगैरे). १७. (पत्त्याच्या खेळात) पान टाकणे. १८. झाडावरून फळे वगैरे काढणे. १९. वरून खाली येणे (घाट, जिना वगैरे). [सं. उत्+तृ]

**उतरणे** अक्रि. १. (जिना, घाट, पर्वत वगैरेवरून) खाली येणे : 'उतरलें उदक पर्वत वळघे ।' – ज्ञा १०.६९. २. मुक्काम करणे; थांबणे; वाहनातून खाली येणे. ३. व्याधी, रोग वगैरेतून पार पडणे. ४. परीक्षेत यश मिळविणे; उत्तीर्ण होणे; पास होणे. ५. संकटातून पार पडणे : 'तुम्हां जड भवार्णवीं उतरिता न दासा पडे ।' – केका १२१. ६. विशिष्ट दिशेकडे वळणे. ७. गरोदर स्त्री प्रसूतीपासून मोकळी होणे, हातीपायी सुटणे. ८. (लहान मुलींच्या खेळाच्या प्रारंभी) चकून पार पडणे. (वा.) **उतरून टाकणे –** १. तबल्यावरील वाद्या, साज वगैरे काढून टाकणे. २. ओवाळून टाकणे (आजारी माणसावरून खाद्य पदार्थ, प्राणी वगैरे). ३. (सामा.) खाली काढणे.

**उतरणे** अक्रि. (संगीत) ध्वनी विशिष्ट पट्टीच्या (पातळीच्या) खाली येणे. (तबला, तंबोरा, सतार, सारंगी इ.).

**उतरणे** अक्रि. लागणे; उत्पन्न होणे : 'जयाचिया दृष्टी उतरे' – विसिंपू २.१६.

**उतरणे** अक्रि. अपमानास्पद वागणूक देण्यासाठी किंवा पैज इ. हरण्याचा परिणाम म्हणून मिशा, कल्ले काढून टाकणे.

**उतरणे** अक्रि. पान्हवणे; पान्हा सोडणे : 'आमच्या म्हशीला कोंडा पुढे ठेवावा लागतो. त्याशिवाय ती उतरत नाहीं.' – खेस्व १७१.

**उतरणे** अक्रि. हिशेब, माप, भविष्य इत्यादी बरोबर जमणे, पटणे; ताळा पडणे; मुळाबरहुकूम नक्कल तयार होणे : 'आता ग्रंथकारांच्या म्हणण्याप्रमाणे भाषांतर उतरले आहे.' – विवि ८.८.८४.

**उतरणे** अक्रि. १. धैर्य, राग, भीती, ज्वर, दर, भाव इत्यादी कमी होणे. २. कोमेजणे, निर्जीव होणे; निकृष्टावस्थेप्रत जाणे; म्लान होणे, सुकणे (चेहरा) : 'करितां अधर्म सद्यः स्वपितृसुहज्जन मुखप्रभा उतरे ।' – मोआदि ९.५७. ३. प्रकृती खालावणे; वस्त्र जीर्ण होणे; शरीर, मासे, मोत्ये वगैरेंचा तजेला नाहीसा होणे. ४. फळ वगैरे अधिक पिकणे.

**उतरणे** अक्रि. १. अढी वगैरे बरोबर पिकून तयार होणे. २. योग्य रीतीने बनणे, तयार होणे.

**उतरणे** अक्रि. मर्जीतून जाणे; नाखुषी होणे.

**उतरणे** अक्रि. मनाला पटणे; योग्य वाटणे; पसंत होणे : 'हें नाटक लोकांच्या पसंतीस उतरले.' विवि ९.८.१७५.

**उतरणे** अक्रि. मोती वगैरेचे छिद्र मोठे होणे; वेजी उतरणे.

**उतरणे** अक्रि. नाहीसे होणे; फिटणे : 'तें सुतकें सूतक उतरें' – एभा. २१.१२५.

**उतरता** वि. १. उतरण असलेला; उताराचा.२. क्षीण होत चाललेला; अधोगतीस गेलेला; खाली येणारा. ३. अदृश्य होत असलेला; मावळता. ४. क्रमाने खाली येणारा. ५. (गंजिफा, पत्ते इ. खेळात) दहिल्याच्या मागे नवल्याने त्याच्या मागे अठ्ठ्याने हुकूम व्हावे अशी उतरती पाने. (वा.) **उतरत्या पायरीस लागणे** – ऱ्हास होत जाणे. **उतरती कळा लागणे** – ऱ्हास होणे. **उतरता काळ** सामर्थ्य, सत्ता कमी होत जातात असा काळ. **उतरता पाया** अवनत स्थिती; अवनती; अधोगती; हीन स्थिती. **उतरती कमान** निकृष्टावस्था; अपकर्ष; वाईट दिवस; क्षय; ऱ्हास. **उतरती कळा, उतरती दशा, उतरती पायरी** विपन्नावस्था; ऱ्हास; खालावलेली स्थिती : 'उच्चावस्था प्राप्त झाली कीं त्याबरोबरच उतरती कळा लागावयाची.' – विवि. ८.९.१६१.

**उतरती बाजू** १. उतरण; उतरत येणारी बाजू, याच्या उलट चढती बाजू. २. दशावतारी गंजिफांतील परशरामापासून पुढील पाच बाजू.

**उतरती भाजणी** (ग.) भारी परिणामाच्या अंकास हलक्या परिमाणाचे रूप देणे. जसे : – रुपयाचे पैसे करणे, किलोमीटरचे मीटर करणे.

**उतरती वेळ** १. खाली जाणारा दिवस; दोन प्रहर टळल्यानंतर सायंकाळपर्यंतचा काळ. २. खालावलेली स्थिती; वार्धक्याचा काळ.

**उतरती श्रेढी** (ग.) पदांची एक मालिका. यामध्ये संख्या क्रमाक्रमाने लहान होत जातात.

**उतरती सीमान्त उपयोगिता** स्त्री. विशिष्ट मर्यादेनंतर घेतलेल्या प्रत्येक शेवट नगाची कमी होत जाणारी उपयुक्तता.

**उतरत्या प्रत्ययाचा सिद्धान्त** पु. विशिष्ट मर्यादेनंतर दिलेल्या प्रत्येक मात्रेपासून क्रमाने कमी होणाऱ्या परिणामांचा नियम.

**उतरपराई** (प्र.) उत्तरपराई. तारुण्यानंतरचा काळ; आयुष्याचा उत्तरार्ध; उतरती कळा. [सं. उत्तर + परार्ध.]

**उतरपेठ** उतारपेठ; मोंढा; मुख्य व्यापारी ठिकाण; व्यापाराचे जिन्नस ज्या ठिकाणी अनेक ठिकाणाहून येऊन पुन्हा निरनिराळ्या ठिकाणी पाठविले जातात अशी व्यापाराची जागा.

**उतरल, उतरला** पु. दाराच्या चौकटीवरील कोनाडा.

**उतरवट** वि. १.किंचित उतार असलेला; उतरण; उतरता (भूमिभाग). २. अधोगतीला लागलेला.

**उतरवटा** पु. उतार असलेली जमीन; उतरण; उतार.

**उतरवण** न. उतार; उतरण; सखलपणा.

**उतरवणी** भाताची पेज; कांजी.

**उतरवा** पु. उत्तरेचा; उत्तरवा; 'उत्तरवा वारा फार, याकरितां वरत्या येत नाही...' –पेद ३३.१५३.

**उतरवाट** उतार असलेली वाट.

**उतरविणे** सक्रि. उतरणे प्रयोजक. १.खाली आणणे, काढणे; खाली यायला लावणे. पहा : **उतरणे** : 'तिरंदाजानें गलबताचें निशाण उतरावयाचा व किनाऱ्याकडे जावयाचा हुकूम सोडला.' – कोरकि ९. २. तयार करून घेणे. कातरणे; कमी करणे; नाहीसा करणे. (बडोदे)

**उतरवेठ** : स्त्री. मालाची उतारपेठ : 'की धर्माची उतरवेठ ।' ऋव. ५१.

**उतरंग** न. दरवाजाच्या चौकटीवरील लाकूड. (को.)[सं. उत्तर + अंग.]

**उतरा** पु. पडण्याची, उतरण्याची क्रिया; पडणे : 'नसतां अधिमधिं उतरा । नसतींच विघ्नें येती घरा । – नव १४.१२६.

**उतराई** वि. (कृपा, कर्ज, वचन इ.) उपकारांची फेड केलेला; ऋणमुक्त; कर्जफेड केली आहे असा : 'होऊनियां उतराई । लया जाय ।।' ज्ञा १५.५८६.[सं. उत्तीर्ण] (वा.) **उतराई होणे** – उपकार फेडणे : 'गुरुसी उतराई होतां । न देखों कवणियाही पदार्थां ।' –एरुस्व ५.९५.

**उतराई स्त्री.** १.गाडीतून माल उतरण्यास पडलेली मजुरी. २. नावेची जकात, भाडे. [हिं.] ३. उतरून काढण्याची (नक्कल, चित्र, आंबे वगैरेंची) मजुरी. ४. उतार वयाचे दिवस. (क्रि. लागणे, जडणे.) (राजा.)

**उतराण** स्त्री. (नाविक) उत्तरेकडून वाहणारा वारा. पहा : **उतरण** [सं. उत्तरायण.]

**उतराणवारा, उतरावारा** पहा : **उतराण** : '....वारासुद्धा न लागे. उतराण वारा. मुंबईकडे जाणे न होय.' – ऐलेसं २६६७.

**उतरी** स्त्री. अंगवस्त्र; उपरणे; उत्तरीय : 'बरवा मिरवे उतरी जोडा ।।' उषा १८४६. [सं. उत्तरीय.]

**उतरीव** वि. खाली पडू न देता काढलेली. (आंबे वगैरे फळे).

**उतरून घेणे** नक्कलणे; मुळाबरहुकूम लिहून घेणे.

**उतरूनसर** क्रिवि. आपणाजवळ हुकूम असून त्या खालील एक पान नसता त्या खालचे एक अगर अनेक पाने हुकूम करण्याकरिता हुकूम व त्याच रंगाचे दुसरे कोणतेतरी पान अशी दोन पाने उतरणे.

**उतल** वि. उथळ : 'अमृतसिंधु खोलु । उतलु कायसा ।।' –राज्ञा १८.१६.

**उतली** मूस : 'तें ऐक्याची आहे उतली ।' – राज्ञा ८.६३. भरून वाहणारी : 'माजि उतलिये बोडी ।' –ज्ञाप्र ७०७.

**उतव** पु. नदीला येणारा पहिला पूर; उथव.

**उतव** पु. १. कांबळे वगैरे सुकत घालण्यासाठी लहान मंडपीसारख्या तीन चार काठ्या बांधून तयार केलेली चौकट; भाळी; मंडपी. (को.) २. चुलीच्या वरच्या बाजूला स्वयंपाकाच्या वस्तू ठेवण्याची जागा. (हेट.)

**उतव** पहा : **ऊत** १. कढ; फसफस; उकळी; फसफसून बाहेर येणे (दूध, कढी, भात, आमटी इ.) २. ऊत; चेव; उन्माद; भर.

**उतवडा** पु. (कृषि.) एकाच सरीत बाजरीबरोबर अंबाडी तूर, मूग, मटकी वगैरे धान्य मिसळून पेरणे. [क. उतू = नांगरणे.]

**उतवणी, उतवणे** स्त्री. न. आधणाचे पाणी; उकळी आलेले पाणी.

**उतवणे** अक्रि. १. आधण; कढ येणे; उकळी येऊन बाहेर पडणे (दूध वगैरे.). २. उड्या मारणे; चेवणे; उन्मादणे. [सं. उत्तपन]

**उतवल** वि. उतावीळ.

**उतविणे** उक्रि. रेशमी वस्त्र, तापता वगैरे तापलेल्या खापरावर पसरून सळईने विवक्षित घड्या पाडणे. पहा : **उतू** [ हिं. उतू = कापडाच्या घड्या, चूण.]

**उतळ, उतळवट** पहा : **उथळ, उथळवट** : 'लक्षानलक्ष कनक पात्रें।

उतळें विस्तीर्णे चित्रविचित्रें । - वेसीस्व ११.७८ [सं. उत् + तल]

**उतळणे** अक्रि. गदरणे; पिकण्याची लक्षणे दिसू लागणे; उजळणे (पाडाचा आंबा वगैरे.) (को.)[सं. उत् + तल.]

**उतळताप** पु. तापाने होणारा भडका; दाह; संताप. (गो.) [सं. उत् + तल + ताप.]

**उतळपातळ** स्त्री. गप्पा; फालतू बडबड; बाता; प्रौढी.

वि. अपुरे; थोडे; विरळ; तुरळक (पाऊस, पिके, इमारती, झाडे वगैरे). [पातळचे द्वि.]

**उतळवाइ** क्रिवि. उतावीळपणे : 'ना आइ : गोसावीयांचेया दर्शना तैसें सीणभाग फेडूनि जावें : गोसावीयांचेया दर्शना उतळवाइ जावें.' - लीचउ १८५.

**उतळी** स्त्री. शिबडे; शिष्टर.

**उताट, उताटकी** स्त्री. १. फुटायला, बाहेर पडायला होणे. २. (ल.) उतावळी; अविचार; अस्थिरता; हावरेपणा; वळवळ; चळवळ; चूळबूळ. (क्रि. येणे). [सं. उत्+तट्.]

**उताटणे** अक्रि. १. तटकन फुटणे (फळ); आतून भरून आल्यामुळे फळाच्या बाहेरची साल फाटणे; तटतटून येणे; भरगच्च होणे. (को.) २. (ल.) अतिशय औत्सुक्यपूर्ण होणे; प्रबल इच्छा होणे. ३. गर्वाने ताठणे.

**उताडा** पु. पक्वावस्था; पूर्णावस्था; तयार होणे : 'उताडा पिकाचा आलियावरी ।' - यथादी १८.३०६७.

**उताणखाट** स्त्री. १. उताणी पडलेली खाट. २. (ल.) तापट, उर्मट, माजोरी माणूस. [सं. उत्तान.]

**उताणणे** अक्रि. वर्णन करणे; जाहीर, प्रसिद्ध करणे : 'उताणितां तुझी कीर्ति । उणाव नसें आम्हातें ।' [सं. उत्+तन्]

**उताणा** वि. १. वर तोंड केलेला; जमिनीला पाठ लावलेला; उलथापालथा, उपडा याच्या उलट (चीत मनुष्य, पात्र, पान इ.). २. (ल.) सुस्त निरुद्योगी; ढिला. [सं. उत्तान.] (वा.) **उताणा चालणे** - गर्वाने फुगणे; ताठणे; छाती काढून प्रौढीने, आढ्यतेने चालणे : 'तैसा विद्यावयसा माजें । उताणा चालें ।।' - ज्ञा. १३.७१ **उताणा पडणे** - १. उताणा होऊन पडणे; तोंडघशी पडणे; खाली येणे. (श्रीमंत सावकार इत्यादींनी दिवाळे काढले असता असे म्हणतात.) : 'हे जुनें लोक गेले म्हणजे पंडित उताणे पडतील.' - लोश २०१. २. दरिद्री होणे : हीन स्थितीस येणे. ३. आजारी होणे. ४. रिकामे पडणे; निरुपयोगी होणे. ५. अपयश पावणे; पराभूत होणे; कोणतेही काम अंगावर येणे.

**उताणापाताणा** क्रिवि. खालीवर, उलथेपालथे; पोटावरून पाठीवर; गडबडा फिरवून अगदी चीत. (क्रि. करणे, पाडणे, होणे.). [उताणाचे द्वि.]

**उताणे रांगा** स्काऊटच्या मुलांचा एक खेळ.

**उतान, उत्तान** वि. १. उताणा : 'महींस पाडिला करींद्र तो उतान कौतुकें ।' - गजगौरी ५९. २. आढ्यतेचा; गर्विष्ठ : 'बहु फुरकटलासे बोल बोले उताने ।' -कृष्णकौतुक १५. [सं. उत्तान.]

**उतानी, उतान्ही** स्त्री. इच्छा; आवड : 'ऐंसीं जियें ज्ञानी । मुनीश्वरांची उतान्हीं ।' -ज्ञा १३.१६६. [सं. उत्+तृष्णा]

**उताप** वि. उन्हातील; सावली नसलेला; उघडा. [सं. उत् + तप्.]

**उतापती** स्त्री. उलटून हल्ला; फेरहल्ला. [सं. उत् + तप्]

**उतापती काटेमारी** लांडगेतोड; कत्तल; ससेहोलपट.

**उतार** पु. पलिकडील तीरास चालत जाता येण्यासारखी पाण्यामधील वाट : 'तो पव्हण्याहूनि पायउतारा. ।' - ज्ञा ५.१६५.

**उतार** पु. १. एखाद्या औषधाची तीव्रता, जोर कमी करण्याकरिता दिलेले औषध. २. विषावरील वगैरे औषध, मंत्र, उपाय, इलाज, प्रतिकार 'जेणें विष पाजिलें दुर्धर । तोचि करूं धांवे उतार ।' -हरि १४.१६२.

**उतार** पु. संतोष दाखविण्याच्या वेळी अंगावरील पोशाख अथवा दागिने बक्षीस देणे.

**उतार** पु. १. कमी होणे; ओसरणे (नदीचा पूर, रोगाची तीव्रता, दु : ख, वैभव, कीर्ती, संपत्ती वगैरे.) ऱ्हास; शांती; शमन. २. पालट होणे; बदलणे; तीव्रता कमी होणे : 'परंतु जनकोजी शिंदे यांचे बुद्धीस उतार पडेना.' - भाब ९५. [सं. उत्+तॄ - उत्तार]

**उतार** पु. १. जमिनीचा उतरतेपणा; ढाळ; उतरण : 'सपाटीवरून चाललेल्या प्रवाहाला अकस्मात उतार लाभावा तसं झालं माझ्या आयुष्याचं.' - एल्गार २६. (वा.) **उतार खाली असणे, उतार पडणे** - १. अपकर्षास लागणे; निकृष्ट स्थिती प्राप्त होत जाणे; ओहोटी लागणे; उतरती कळा लागणे; मंदी येणे. २. कमी होणे : 'काल दिलेल्या औषधानं काही उतार पडलेला नाही.' - दुर्दम्य २.६३. ३. सरासरी पीक मिळणे : 'लागणीच्या बटाट्यांना पोत्यास तीनचार पोती उतार पडला.' - गार ६०. **उतार खाली चालणे** - गती कमी करणे.

**उतार** पु. चौघड्याच्या अखेरीस वाजविण्याची जलद गती, बाजा.

**उतार** पु. होडीचे , तरीचे भाडे; होडीतून पलीकडे जाण्याचे भाडे; नोर.

**उतार** वि. १. वृद्धत्व आलेला; उतार वय होण्याच्या मार्गाला लागलेला. २. हीण; हिणकस; दुय्यम प्रतीचा. ३. नाशाच्या पंथाला लागलेला, मोडकळीला आलेला; ऱ्हास होण्याच्या मार्गाला लागलेला; मंदीचा; तोट्यात चाललेला. सामा. शब्द. - उतार खर्च - पत्र - पान - औषध - गोळी - पुडी - मात्रा - मोल - मोली - डाव - बाट - रंग - काळ - चावडी - मंत्र - मार्ग - मसलत - बेत.

**उतार** १. नक्कल : 'उतार ग्रंथाचा असे लिहिवणें ।।' दावि - २५०. २. उतारा; एका ग्रंथातील दुसऱ्या ग्रंथात घेतलेला भाग : 'त्याचि कथेचा आला कांहींसा या उतार कवनांत ।' - मोअनुशासन ८.९८.

**उतार** न. १. पहा : **उत्तर** (गो.) २. प्रतिध्वनी. ३. उत्तर; वचन.

**उतार** पु. प्रवास; प्रवासखर्च : 'उताराला पैसे पाठविलेस तर मुंबईला येईन.' - रथ २७६.

**उतारकरी, उतारकरु** पु. १. मुशाफिर; प्रवासी; पांथस्थ; तात्पुरता मुक्काम करणारा - केलेला. २. द्रव्य वगैरे देऊन नदीपार जाणारा.

**उतारकाळ** पु. म्हातारपण : 'केदाराश्रमस्वामीचा उतारकाळ झालेला.' - दहिंदू २३८.

**उतारघाट** पु. नदीच्या पात्रात जाण्यासाठी बांधलेल्या पायऱ्या.

**उतारघात** पु. विश्वासघात. (गो.)

**उतारचढ** स्त्री. १. तीव्रता कमी अधिक होणे; प्रमाण कमी अधिक होण्याची क्रिया (आजार, रुग्ण वगैरेंची); क्षय आणि वृद्धी; उत्कर्षापकर्ष. २. एखाद्या प्रदेशाचा उंचसखलपणा. ३. किमती कमीजास्त होणे; भावात बदल. ४. ताप कमीअधिक होणे.

**उतारचावडी** स्त्री. १. खेड्यातील पांथस्थ वगैरे ज्या जागेत उतरतात ते ठिकाण; चावडी; डाकबंगला; धर्मशाळा. २. (ल.) पाहुणे उतरण्याची जागा; अतिथिघर.

**उतारचिठी** स्त्री. १. जलमार्गावरून प्रवास करण्याचा परवाना. २. नक्कल; रद्द केलेले पत्र (पूर्वी वरील श्रीकार खोडून, फोडून पत्र रद्द करण्याची पद्धत असे.). ३. विष वगैरे उतरावे म्हणून बांधलेली, मंतरलेली चिठ्ठी, कागद. ४. कोणत्याही लेखाची नक्कल. ५. (उप.) कामावरून काढून टाकल्याचा आदेश.

**उतारजमीन** स्त्री. सखल होत जाणारी जमीन; उतरण.

**उतारडी** स्त्री. उतरंड : 'एक अमुकीए उतारडी अमुकीए मडकां असें ।' – लीचउ १४०.

**उतार तसरीफ** एखाद्याचा सन्मान करण्याकरिता स्वतःच्या अंगावरून काढून दिलेली वस्त्रे. पहा : **उतार ३**

**उतारतळ** पु. माणसे, गाड्या उतरण्याची गावाबाहेरील जागा; अड्डा; गाडीतळ; वाटेतील मुक्कामाची जागा.

**उतारतेज** वि. १. ज्याचे तेज कमी झाले आहे असा. २. क्षीण; निस्तेज.

**उतारतोंड** न. घाट उतरण्यास सुरुवात होते ती जागा; उतरणीचा आरंभ.

**उतारदिवस** पु. १. आयुष्याचे अखेरचे दिवस; वार्धक्य. २. आपत्काळ.

**उतारपातार, उतारवितार** पु. १. सर्वसामान्य प्रवासखर्च. २. तरीचे भाडे; वाहनाचे भाडे; उतार. ३. मार्गावरील कर, जकात वगैरे.

**उतारपान** न. १. (गंजीफा पत्त्यातील खेळात) खेळलेले, खेळायचे पान. २.हिशेब पुढे चालू केलेले, करायचे पान.

**उतारपेठ** स्त्री. १. निरनिराळ्या ठिकाणचा माल विकण्यासाठी येतो व खरेदी केला जातो असे बंदर, व्यापारी शहर : 'आचाराचें मूळपीठ । वेदांची उतारपेठ ।' – ज्ञा १७.२७४. २. पहा : **उतारतळ**

**उतारपोशाख** पु. १. अंगावरून उतरून बक्षीस दिलेली वस्त्रे. २. अंगावरून काढून टाकलेली जुनी वस्त्रे. पहा : **उतार ३**

**उतारबंद** पु. कोणत्याही गोष्टीची नक्कल काढली आहे असा कागद. वि. १. उतारावर असलेली; उताराची. २. अपकर्षाप्रत जाणारी.

**उतारबंदर** न. १. जलमार्गावरील प्रवासी व माल उतरण्याचे ठिकाण. २. जलमार्गावरील ओरवा करण्याचे, नांगर टाकण्याचे स्थळ. पहा : **बंदर**

**उतारबाजी** स्त्री. १. पत्त्याच्या डावातील दहिल्यापासून खालचे पत्ते. २. अंगावर येणारा, हार येत असलेला खेळ. ३. चौघड्याच्या अखेरी जलद वाजविण्याची गत; बाजा. पहा : **उतार ६**

**उतारबाजू** स्त्री. (पत्त्याच्या खेळात) प्रथम पान खाली टाकणारी, उतरविणारी बाजू.

**उतारमणी, उतारमोहरा** पु. विष उतरविणारें रत्न.

**उतारमान** पु. १. पाणउतारा; अपमान; अप्रतिष्ठा, अवहेलना. २.वृद्धावस्था; आयुष्याची उत्तरावस्था.

वि. (व्यापक) अवमानित; अपमानित; मानखंडना केलेला.

**उतारमाल** पु. होडीतून पलीकडे पाठवण्याचा माल.

**उतार मोडणे** पहा : **उतार (न) राहणे** : 'अलीकडील मुख्याचा उतार मोडला परंतु नेहमी सूचनेस असता आपलेविशी अंतःकरणापासून आहेत.' – ऐसंसाख ११.६२.

**उतार न राहणे** अक्रि. राबता बंद असणे; जाऊन भेटण्याची सुगमता नसणे : '... अशाश्वती आणि उतार राहिला नाही अशी गोष्ट आहे.' – ऐसंसाख ११.६२.

**उतारवय** न. म्हातारपण; वृद्धावस्था. [सं. उत्तरवय]

**उतारवस्त्र** न. १. जीर्णवस्त्र; फाटलेले कपडे. २. दुसऱ्याने अंगावरून काढलेली किंवा टाकून दिलेली वस्त्रे : 'उमदीं तरीं ते उतार वस्त्रें । घालूं नये रे अंगावर ।' –दावि ४३९.

**उतारवेळ** स्त्री. दोन प्रहर दिवस टळल्यावरची वेळ; संध्यासमय.

**उतारा** पु. उतरण्याची जागा; जानोसा; 'जुन्या सरकार वाड्यासमोरील वाड्यात खानदेशाच्या मंडळींना उतारा दिला होता.'– सयाजी १.१५७.

**उतारा** पु. अंगावरून ओवाळून टाकण्याचा पदार्थ (भूतबाधानिवारणार्थ) व ती क्रिया : 'ज्या महद्भूत संचरले अंगीं । त्यासि पंचाक्षरी नसे जगीं । भगवंत भेटीवाचून वेगीं । उतारा त्यासि असेचिना ।।'–जै ८१.५८.

**उतारा** पु. विष वगैरेवरील औषध, उपाय, इलाज.

**उतारा** पु. एखादा उखाणा, कोडे यांचे उत्तर, किल्ली.

**उतारा** पु. रचना, धाटी व सदृश शब्द असलेले परंतु विरुद्ध अर्थी श्लोक, पद्य वगैरे; किंवा समानार्थक परंतु भिन्न शब्द व रचना असलेले पद्य.

**उतारा** पु. १. नक्कल; प्रत; प्रतिमा; उतरून घेतलेला ग्रंथाचा किंवा भाषणाचा भाग. (क्रि. करणे). २. हुंडी वगैरे कागदपत्रांची नक्कल उतरून घ्यायची वही.

**उतारा** पु. नावेचे भाडे.

**उतारा** पु. नदी वगैरेतून पार जाण्याजोगा रस्ता. पहा : **उतार १**

**उतारा** पु. पाणउतारा याचा संक्षेप; अपमान; अप्रतिष्ठा; मानहानी

**उतारा** पु. अंगावरून काढून टाकलेली वस्त्रे, जीर्ण वस्त्रे अगर सन्मानाकरिता अंगावरून काढून दिलेली वस्त्रे.

**उतारा** पु. झाडावरील फळे उतरण्याकरिता द्यायची मजुरी; उतरणावळ.

**उतारा** पु. बडतर्फी.

**उताराखाली पडणे** कमी होऊ लागणे; हटणे : 'श्रीकृपेनें व्यथा उताराखाली पडली...'– ऐलेसं ८३७.

**उताराबाग** क्रिवि. उताराच्या अनुरोधाने. (व.)

**उतारी** स्त्री. १. (गंजिफांचा खेळ) आपले सर्व हुकूम एकदम लागोपाठ खेळून घेणे; देणीघेणी संपल्यावर जर तिगस्त झाली नसेल किंवा तिगस्त होऊनही खेळण्यास वाट नसेल तर उतारी करावी लागते. (क्रि. करणे.); पान टाकण्याची क्रिया. उतरणे; उतरायचे, उतरलेले पान. २. (ल.) उतरती कळा.

**उतारी** स्त्री. उतारू; प्रवासी; तात्पुरता मुक्काम करणारा. पु. होडीवाला; तरीवाला; नावाडी.

**उतारी** पु. सर्प; विंचू यांच्या विषावर उपाय करणारा; मांत्रिक.

**उतारी** वि. प्रत्युत्तर करणारा. (गो.)[सं. उत्तर]

**उतारू** वि. उतारकरी; प्रवासी; तात्पुरती वस्ती करणारा. (वा.) **उतारू होणे** – उद्युक्त होणे; तयार होणे. (माळवी)

**उतारूपातारू** पु. प्रवासी; वाटसरू. [उतारूचे द्वि.]

**उताऱ्या** वि. १. नदीवरून लोकांना उतरून नेणारा; नावाडी; होडीवाला २. झाडावरून आंबा इ. फळे उतरविणारा.

**उतावळ, उतावळी** स्त्री. १. घाई; गडबड; आतुरता; अति उत्कंठा; त्वरा; अधीरपणा. २. (विशेषत : ) उतावळी नावाची हळव्या जोंधळ्याची एक जात; हुलगे.

**उतावळा, उताविळा, उतावीळ, उतावेळ** वि. अधीर; बडबड्या; घाई करणारा; उत्सुक; उत्कंठित; विलंब न खपणारा : 'नगरा आला श्रीकृष्ण । नगरनागरिक जन । उतावेळ कृष्णदर्शन । करावया धाविन्नले ।।' – एरुस्व ६.१६; 'म्हणा मज उताविळा गुणचि घेतला धावरें ।' – केका ४५; 'मदन जाहला उतावीळ' –कथा १.४.४०. [देशी–हेमचंद्र, सं. उत्ताप]

**उताळे** न. तलावाला घातलेल्या बांधाला पाणी कमी करता यावे म्हणून दारे ठेवलेली असतात. एरवी पाण्याची पातळी कायम ठेवण्यासाठी फळकुटांची जी दारे लावतात ती : 'खोऱ्यांनी माती दूर सारली जाऊ लागली. उताळी काढण्यात आली.' – शेलूक ९५.

**उतांबणे** अक्रि. साठणे : 'एकेकाजवळनी पैसा इतका उतंबलाय्....' – रैत १३७.

**उती** स्त्री. उद्भव; उठाण. पहा : **उत्त** : 'ऐसा न घटेविषयाची उती ।' – भाए ७३३.

**उती** स्त्री. उक्ती; वचन ए : 'ऐसी वसिष्ठादिकांची उती ।' – भारा बाल २.१०४. [सं. उक्ति]

**उतीव** वि. उकळणारे; उकळून वर येणारे पहा : **उतणे**

**उतीव, उतव** पु. जाळामुळे भांड्यातील पदार्थाला धुरासारखा येणारा वास. (गो.)

**उतुतणे** अक्रि. १. अंगावर पुरळ उठणे. २. (ल.) घाईत असणे.

**उतू** पु. शिवणीनुसार घडी घालून मोड पाडण्याची क्रिया.

**उते** न. जमीन भाजल्याशिवाय तिच्यात भाताचा रोह टाकून काढलेले पीक. नुसती नांगरट करून भाताचे केलेले रोप. (को.)

**उतो** अ. आणखी. [सं. उत]

**उतोटी** भाताची रोपे उगवलेली उतार जमीन; ज्या जमिनीवर उते करतात ती जमीन.

**उतोति – ती** स्त्री. खारीक. पहा : **उतती** : 'अशोक वृक्ष उतोतिया ।' –हरि १०.१५७. [का. उत्तुत्ते, उत्तोत्ते = खारीक.]

**उत्कट** वि. १. प्रचंड; जोरदार; अधिक; पुष्कळ. २. चांगले; सुरेख; उत्कृष्ट : 'उत्कट भव्य तेंचि घ्यावें'– दास १९.६.१५. ३. भावना चेतविणारे.

**उत्कटासन** न. १. योगासनाचा एक प्रकार. पायांच्या बोटांवर भार सांभाळून दोन्ही टाचांवर दोन्ही कुल्ले ठेवून बसणे व दोन्ही हात जोडणे. २. (मल्लखांब) बोंडावर ढुंगण ठेवून पाय मल्लखांबाच्या बाजूस लावून केलेले आसन. [सं.]

**उत्कड** पु. कुदळीचे पाते (फाळ) पुढे बसविलेले मुसळासारखे हत्यार. याचा उपयोग जमिनीत खड्डा करण्याकरिता, खोदण्याकरिता किंवा उलटे पुरून नारळ सोलण्याकरिता करतात. (को.)[सं.]

**उत्कथित** वि. शिजवलेले; उकडलेले; कढवलेले. [सं. उत्कथित.]

**उत्कर** पु. १.ढीग. २. केरकचरा.

**उत्कर्ष** पु. भरभराट; चलती; वाढ; भर; समृद्धी : 'भक्तीच्या उत्कर्षे मुक्तीचें तें पिसें ।।'– तुगा ५४७. [सं.]

**उत्कर्षण** न. (तत्त्व.) अव्यवहित निगामी अनुमानाचा आधारविधानापासून त्यात अनुस्यूत असलेला निष्कर्ष फलद्रूप करण्याचा एक प्रकार. [सं.]

**उत्कर्षबिंदू** पु. (सास.) एखाद्या घटनेचा, घटनामालिकेचा किंवा अनुभवाचा तीव्रतर किंवा उच्चतम बिंदू; नाटकातील निर्णायक क्षण; क्रमाक्रमाने चढतवाढत जाऊन शेवटी लाभलेला उत्कट क्षण. [सं.]

**उत्कर्षसीमा** स्त्री. (सास.) वाङ्मयात ज्या भावनेचा आविष्कार करायचा असेल तिची जास्तीतजास्त पराकाष्ठा. हा कळस गाठणारा प्रसंग.

**उत्कलन** न. उकळणे; उकळी.

**उत्कलनांक** पु. (भौ.) एखादा द्रव उकळण्याच्या वेळचे त्याचे तपमान; ज्या तपमानास एखाद्या द्रवाचा बाष्पदाब त्याच्या सभोवतीच्या वातावरणाच्या दाबाइतका असतो ते तपमान. [सं.]

**उत्कलिका** स्त्री. १. उकळी; एकाएकी उत्पन्न होणारी तीव्र इच्छा. [सं.]

**उत्कळ** स्त्री. उत्कंठा; उतावीळपणा; अधीरपणा; औत्सुक्य; घाई. पहा : **उत्कलिका** [सं. उत् + कल्]

**उत्कळित** न. युद्ध; कलह : 'उदयलेंसे जें उत्कळित ।'– ज्ञा. १८.१६२८. [सं. उत् + कल्.]

**उत्कंठा** स्त्री. उत्कट इच्छा; आशा; उत्सुकता; अधीरता; आतुरता.

**उत्काडे** क्रिवि. परसाकडे. [का. उक्कड = गावाची कड]

**उत्कीरक** पु. ओरखडणाऱ्या पक्ष्यांचा एक वर्ग. या पक्ष्यांना तीक्ष्ण नख्या असतात व त्यायोगे त्यांना ओरखडता येते. [सं. उत्+कॄ.]

**उत्कीर्णक अणी** स्त्री. (पुरा.) छिन्नी.

**उत्कीर्ण कदलिका** स्त्री. (पुरा.) भिंतीत कोरलेले दगडी किंवा लाकडी घोडे.

**उत्कीर्णलेख** पु. (पुरा.) कोरीव लेख. [सं.]

**उत्कीलन** न. १. गुंतागुंत सोडवणे; मोकळे करणे. २. (बंधनापासून) मोकळे करणे; सोडविणे, सोडणे. ३. फुलणे; उमलणे; पसरणे; उघडणे; विस्तृत करणे. [सं. उत् + कील्]

**उत्कुण** पु. ढेकूण. [सं. मत्कुण.]

**उत्कृष्ट** वि. १. अत्यंत सुंदर; चांगले; फार उत्तम; नामी. २. अत्युत्कट. [सं.]

**उत्कृष्ट मुद्रा** (अर्थ.) आंतरराष्ट्रीय बाजारपेठेत पत असलेले चलन.

**उत्केंद्र कोन** (ग.) केंद्रापासून बाजूला वळलेला, दूर सरकलेला कोन.

**उत्केंद्रता** स्त्री. (शाप.) केंद्रापासून सरकणे, दूर होणे. [सं.]

**उत्क्रम** पु. १. उलटी व्यवस्था, क्रम, पद्धत; व्युत्क्रम. २. (ल.) अव्यवस्था; अनियमितता; पद्धतशीरपणाचा अभाव. [सं.]

**उत्क्रमण** न. (न्याय.) कायद्याचे उल्लंघन; हुकमाचे, आज्ञेचे अतिक्रमण. [सं.]

**उत्क्रमण** न. खालून वर जाणे; बाहेर निघणे, पडणे; उडणे; वर चढणे; निघून जाणे. उदा. प्राणोत्क्रमण = मरण : 'कीं बिंबीं ऐक्यपण । तेंचि ज्ञानियाच्या चिदंशाचे उत्क्रमण ।' – यथादी ३.७६०. [सं.]

**उत्क्रामी भ्रंश** (भूशा.) ज्यामध्ये खडकांची फारकन क्षितिजसमांतर झाली आहे असा स्तरभंग. हा दक्षिणगामी अथवा वामगामी असू शकतो.

**उत्क्रांत** वि. १. बदलाच्या परिवर्तनाच्या ओघात एका विशिष्ट अवस्थेला आलेला. २. उत्क्रमण केलेला; वर किंवा बाहेर चाललेला; निघून गेलेला; वर उडून चाललेला. [सं. उत्+क्रम्-कान्त]

**उत्क्रांतमति–ती** वि. व्यापक बुद्धीचा; ज्ञानी.

स्त्री. व्यापक, अफाट बुद्धी : 'नाहीं पारु गुरुभक्ती । परी गा उत्क्रांतमती ।' – ज्ञा १३.४५२.

**उत्क्रांति–ती** स्त्री. १. हळूहळू होणारा बदल, परिवर्तन; निसर्गक्रमानुसार टप्प्याटप्प्याने होणारा बदल, विकास, वाढ; क्रमाक्रमाने विकसित होणे. २. (समाज.) मानवी समाज आणि संस्कृती यात अश्मयुगापासून अंतराळयुगापर्यंत झालेला विकास, परिवर्तन, स्थित्यंतर. [सं. उत्+क्रम]

**उत्क्रांति–ती** स्त्री. १. निसर्गक्रमामध्ये जीवसृष्टीचा प्रगत टप्प्यापर्यंत होणारा विकास. २. हळूहळू कालानुक्रमे होणारी प्रगती. [सं.]

**उत्क्रांति–ती** स्त्री. १. बदल. २.(उप.) अपकर्ष : 'श्रीमंतीतून गरिबींत जेव्हा उत्क्रांति होते तेव्हा प्रथम दागिने नाहीसे होतात.' – मानाप ५.[सं.]

**उत्क्रांति–ती** स्त्री. ऊर्ध्वगती; मरण. [सं.]

**उत्क्रांतिक्रम युक्ति–क्ती** (ग्रंथ) ग्रंथवर्गीकरणात एखाद्या विषयाचा विकासक्रम दाखविण्यासाठी योजलेली क्लृप्ती.

**उत्क्रांतिधेनु–नू** स्त्री. मरणसमयी सुखाने मृत्यू यावा, पापक्षालन व्हावे म्हणून ब्राम्हणाला अर्पण केलेली गाय. [सं.]

**उत्क्रांतिवाद** पु. १. विकासवाद; मूळ द्रव्यातील शक्तीची क्रमाक्रमाने वाढ झालेली आहे व हा पूर्वापार क्रम किंवा सरणी सोडून मध्येच उपटसुळासारखे काही निर्माण झाले नाही असे मत. २. नैसर्गिक घडामोडींमध्ये त्यांना तोंड देऊ शकणारे वनस्पती व प्राणी टिकून राहतात. त्यांतील समर्थ घटकांचे पुढच्या पिढीमध्ये आपोआप संक्रमण होते व मागच्यांपेक्षा प्रगत पिढी निर्माण होते. अशा तऱ्हेने एकाच घटकांनी बनलेल्या पूर्वजांपासून एकमेकांपासून सर्व बाबतीत अगदी निराळे असणारे जीव जन्माला येतात, हे तत्त्व. [सं.]

**उत्क्वथनांक** पु. (शाप.) द्रवरूप पदार्थांचे वायूत रूपांतर होण्याचे उष्णतामान. [सं.]

**उत्खनक** पु. (पुरा.) १. उत्खननासाठी उपयोगी पडणारी साधने, उपकरण इ. २. उत्खनन चालू करणारा मनुष्य. [सं.]

**उत्खनन** न. १. जमिनीतील पूर्वसंस्कृतीचे अवशेष शोधून काढण्यासाठी केलेले खोदकाम. २. खणणे; उकरणे. [सं.]

**उत्खननशास्त्र** न. (पुरा.) पुरातत्त्वविद्येची एक शाखा. उत्खनन करताना लागणाऱ्या अवशेषांच्या थरांवरून त्या ठिकाणी पूर्वी नांदत असलेल्या संस्कृतीचा काल ठरवण्यात येतो.

**उत्खनित अवशेष** (पुरा.) उत्खननातून सापडलेले प्राचीन संस्कृतीचे अवशेष. यात मानवाने बनवलेली दगडाची धातूची हत्यारे, घरेदारे, भांडीकुंडी, अलंकार, दफनपद्धती, आहार-पद्धती, मूर्ती, खेळणी, नाणी इत्यादींचा समावेश होतो.

**उत्खात** वि. उखडलेला; नष्ट केलेला; नायनाट केलेला; मुळासकट उपटलेला; खणलेला. [सं. उत् + खन्]

**उत्छाह** समारंभ; सोहळा; उत्सव : 'श्री रामनौमी' उत्साछ आला' – दावि १४ [सं. उत्सव]

**उत्तती** स्त्री. खारीक. पहा : **उतती** (तंजा.)[क.]

**उत्तप** वि. उघडा; प्रकाश असलेला; मोकळा; छायारहित; सर्वदा सूर्यकिरणांनी तापत असणारा.

न. उघडी व पूर्ण प्रकाश असणारी अशी जागा. [सं. उत्+तप्]

**उत्तपा** पु. तांदूळ व उडीद यांच्या आंबवलेल्या पिठाचे जाड धिरडे.

**उत्तप्त** वि. अतिशय तापलेले. [सं.]

**उत्तम** वि. १. अतिशय चांगले; उत्कृष्ट. २. प्रथम; मुख्य; वरिष्ठ. [सं.]

**उत्तमखर्ग** हातघाई; निकर. (व.)

**उत्तमगति–ती** स्त्री. १. मोक्ष; निर्वाणपदप्राप्ती. २. चांगले मरण (क्षेत्र, तीर्थ वगैरे ठिकाणी); शुभकाळी मरण येणे. ३. चांगली प्रगती (शास्त्र वगैरे मध्ये). [सं.]

**उत्तमद्रव्य** १. (धर्मशास्त्र) उच्च वर्णाचे (चोरलेले) धन, संपत्ती, २. सुवासिक औषधी पदार्थ. [सं.]

**उत्तमपुरुष** पु. १. चांगला, श्रेष्ठ पुरुष; परमेश्वर; पुरुषोत्तम. २. (व्या.) प्रथम पुरुष. [सं.]

**उत्तमर्ण** पु. १. धनको; सावकार. याच्या उलट अधमर्ण. २. पेढीवाला हुंडीवाला. [सं. उत्तम+ऋण]

**उत्तमश्लोक** वि. पुण्यकीर्ती; विख्यात; कीर्तिमान; कीर्ती पसरलेली आहे असा; पुण्यश्लोक. [सं.]

**उत्तमसाहस** न. (धर्मशास्त्र) १.सर्वात मोठा दंड; १००० किंवा १०८० पण. (नाणे). २. देहान्तशिक्षा; सर्वांत मोठी शिक्षा (डाग देणे, हद्दपारी, मालमत्तेची जप्ती, अवयवच्छेदन व मृत्यू या मुख्य शिक्षा होत). ३. देहांत शासनार्ह गुन्हा; सर्वात मोठा गुन्हा. ४. अतिशय कष्टाचे कार्य; अत्यंत धाडसाचे काम.

**उत्तमांग** न. डोके; मस्तक : 'इयें उत्तमांगें होतीं फुडीं ।' – ज्ञा ११.४१८.

**उत्तमोत्तम** वि. अतिशय उत्तम; उत्कृष्ट; फारच चांगला. [सं.उत्तमचे द्वि.]

**उत्तर** न. १. जबाब; विचारलेल्या गोष्टीबाबत आपले म्हणणे सांगणे : 'तो किमपि न दे उत्तर उत्तरदिशेसी सोडूनी ।' – मोविराट ३.५९. २. वाक्यरूप, पदरूप शब्द; भाषण. ३. (बायकी) गाणे किंवा एखादा हलका प्रबंध यातील एकेकवार धोकण्याजोगे लहान लहान विभाग असतात त्यापैकी प्रत्येक : 'साठा उत्तराची कहाणी पाचा उत्तरीं सुफळ संपूर्ण.' ४. (ग.) गणितश्रेढीत ज्या अंतराने संख्या एकापुढे एक चढत किंवा उतरत जातात ते अंतर; दोन पदांतील अंतर; उदाहरणाचे इष्टफल. ५. (कायदा) प्रतिवादीचा वादीस जबाब; समर्थन, साक्षी वगैरेंचा जबाब. ६. उलट जबाब; हाजीर जबाब. [सं.]

**उत्तर** वि. १. पेक्षा अधिक, जास्त या अर्थी : एकोत्तर, एकोत्रा, त्रिहोत्रा, चोहोत्रा, पंचहोत्रा पंचोत्तरशत, क्रोशोत्तर योजन, अंगुलोत्तर हस्त. २. पुढील; नंतरचा; दुसरा; पूर्वच्या उलट; दूरचा याअर्थी – उत्तरार्ध, उत्तरश्लोक, उत्तररात्र. ३. श्रेष्ठ; वरचढ; अधिक चांगला याअर्थी : राजोत्तरप्रधान, नरोत्तर नारी, गुरूत्तर शिष्य, स्वाम्युत्तर सेवक, शास्त्रोत्तर वेद, ज्ञानोत्तर भक्ती. ४. नंतरचा याअर्थी – उत्तर काळ, उत्तरव्यथा – यातना, व्यय, आयुष्य, वय.
शअ. नंतर; मागाहून. उदा. इतउत्तर; तदुत्तर. [सं.]

**उत्तर** स्त्री. दक्षिणेच्या समोरची दिशा; पूर्वेकडे तोंड करून उभे राहिले असता डाव्या हाताला येणारी दिशा. [सं.]

**उत्तर** पु. एक अलंकार. जेव्हा वक्ता प्रश्नोत्तरासह आपल्या मनातील भाव, वृत्ती व्यक्त करतो तेव्हा हा अलंकार होतो. यात विचारलेले प्रश्न किंवा उत्तरे अनुमानिता येतात. उदा. 'हस्तिदंत व्याघ्रचर्म कैसे येथ मिळे तुला । सुनेचे जोंवरी रम्य विलास दिसती मुला ।।' – यावरून प्रश्न तर्किता येतो; व 'काय कठिन? दैवगती, सुख काय? प्रेमळा अशी पत्नी ।।' यात प्रश्न आणि उत्तर ही दोन्ही आहेत. [सं.]

**उत्तर** पु. उंबरठा : 'कांतान्यें कांतीला । उत्तर जडीला ।' – स्त्रीगीतमाला २०.

**उत्तर** न. १. इनाम जमीन; मालकीची जमीन. २. समासात उत्तरपदी, जसे : – देवोत्तर, ब्रह्मोत्तर : 'ब्रह्मोत्तरतें ब्राह्मणीं दिन्हलें' – शके ११२८चा पाटणशिलालेख.

**उत्तर अक्षांश** जी स्थळे विषुववृत्ताच्या उत्तरेस असतात त्यांचे अक्षांश.

**उत्तरकथा, उत्तरभाग** स्त्री. पु. एखाद्या गोष्टीचा, व्याख्यानाचा शेवटचा भाग; उपसंहार. [सं.]

**उत्तरकदंब** न. (ज्यो.) क्रांतिवृत्ताचे उत्तरेकडील केंद्र.

**उत्तरकर्म, उत्तरकार्य, उत्तरक्रिया** न. स्त्री. और्ध्वदेहिक; प्रेतसंस्कार : 'माझे उत्तरकार्य मी आपल्या हातून आटोपणार.' – विवि १४.१०.२१९. [सं.]

**उत्तरकाल** पु. १. भविष्यकाळ. २. मृत्युकाळ; अखेरचे दिवस; वृद्धावस्था. २. नंतरचा, मागाहूनचा, पुढील काळ. [सं.]

**उत्तरकुरू** पु. १. पृथ्वीच्या नवखंडांपैकी एक खंड; उत्तरेकडील, उत्तरध्रुवाजवळचा प्रदेश. २. उत्तरध्रुववृत्त.

**उत्तरकोन** पु. उत्तरेकडील कोपरा, दिशा. [सं.]

**उत्तरखंड** न. १. आर्यावर्त. पहा : **उत्तरदेश.** २. पुढील, उत्तर भाग (ग्रंथ, प्रदेश, शहर वगैरेचा). [सं.]

**उत्तरगति–ती** स्त्री. १. सुटका; मुक्तता. २. मोक्ष [सं.]

**उत्तरगोल** पु. क्रांतिवृत्ताचा उत्तरेकडील भाग. यात मेषेपासून कन्येपर्यंतच्या राशींचा अंतर्भाव होतो. [सं.]

**उत्तर गोलार्ध** भूमध्यवृत्ताने पृथ्वीचे दोन भाग पडतात. त्यापैकी उत्तरेकडील भाग. [सं.]

**उत्तरजीवित्व** न. १. नैसर्गिक परिस्थितीला तोंड देऊन सगळ्यांच्यापेक्षा जास्त जगणे, टिकाव धरणे. २. (समाज.) संस्कृती, समाज, अर्थव्यवहार यांत सबल असेल तोच टिकतो. दुर्बलांना हा अधिकार नाही. [सं.]

**उत्तरजीवित्वाधिकार** पु. (न्याय.) भागीदाराच्या मृत्यूनंतर मागे हयात असणाऱ्याचा संबंधित मालमत्तेवरील मालकीहक्क.

**उत्तरजीवी** वि. मागे जिवंत राहणारी (व्यक्ती); पश्चात जगणारा; अनुजीवी. [सं.]

**उत्तरज्या** स्त्री. (ग.) त्रिज्येतून भुजज्या वजा केली असता येणारे अंतर; धनु व ज्या यांची मध्यरेषा.

**उत्तरडी** स्त्री. १. उतरंड. २. धान्य ठेवण्याची खोली; कोठी. (तंजा.)

**उत्तरण** न. १. उतरणे; वरून खाली येणे. २. नदीच्या पलीकडे जाणे; नदी ओलांडणे; पैलतीरी जाणे. [सं.]

**उत्तरणे** अक्रि. जबाब देणे; उत्तर देणे : 'चंद्रिका खालच्या मानेने उत्तरली.' – निचं ९.

**उत्तरत्र** क्रिवि. १. नंतर; मागाहून; पुढे. २. पलीकडे. ३. भविष्यकाळात. [सं.]

**उत्तरदशा** स्त्री. १. पुढे येणारी, नंतरची स्थिती. २. उतार वय; वार्धक्य. [सं.]

**उत्तरदायित्व** न. जबाबदारी; 'पुस्तकात ज्या उणिवा राहून गेल्या असतील त्यांचे उत्तरदायित्व माझ्याकडेच आहे.' – लोस. [सं.]

**उत्तरदायी** वि. १. जबाबदार; जिम्मेदार. २. उत्तर देणारा; जाब देणारा.

**उत्तरदिनांकित** वि. नंतरची, पुढील तारीख घातलेला (धनादेश).[सं.]

**उत्तरदिनांकित धनादेश** (अर्थ.) पुढची तारीख घातलेला धनादेश. बँकेत आपल्या खात्यावर अजून रक्कम जमा व्हायची असेल तर असा चेक देण्याची पद्धत आहे.

**उत्तरदिवस** पु. १. पुढील दिवस; नंतरचा दिवस. २. उद्याचा दिवस; भविष्यकाळ. [सं.]

**उत्तरदेश** पु. आर्यावर्त; उत्तरेस हिमालयापर्यंत व दक्षिणेस विंध्य पर्वतापर्यंत आणि पूर्वपश्चिम दिशांना समुद्रांनी मर्यादित असलेला प्रदेश.

**उत्तरध्रुव** पु. १. उत्तरध्रुवाचा तारा. २. पृथ्वीचा सर्वात उत्तरेकडील बिंदू. [सं.]

**उत्तरध्रुववृत्त** न. उत्तरध्रुवबिंदूपासून २३ ।। अंशावरून जाणारे अक्षवृत्त.

**उत्तरपत्र** न. उत्तरासाठी पत्र; जोडपत्र; जोडकार्ड.

**उत्तरपत्रिका** स्त्री. परीक्षेतील प्रश्नांना दिलेली लेखी उत्तरे एकत्र असणारी वही. [सं.]

**उत्तरपद** न. (व्या.) समासातील दुसरे, शेवटचे पद. [सं.]

**उत्तरपराई, उत्तरपऱ्हाई** स्त्री. उतारवय; वृद्धावस्था.

**उत्तरपक्ष** पु. (कायदा) १. प्रतिवादी; त्याची बाजू. २. (भांडणतंट्यात) विरुद्ध बाजू व तिचे जबाब – समर्थन, आरोपांचे निरसन, खंडन. पूर्वपक्ष यांच्या उलट. ३. (न्यायतर्क.) उपप्रमेय; गौणप्रमेय; उपनय (प्रतिज्ञा, हेतू, उदाहरण, उपनय व निगमन या न्यायशास्त्राच्या पाच अंगांपैकी चौथे). ४. चांद्रमासातील दुसरा पंधरवडा; कृष्णपक्ष; वद्यपक्ष. ५. (सामा.) प्रत्युत्तर; पूर्वपक्षखंडन; शंकांचे समाधान. [सं.]

**उत्तरपंथ** पु. १. संसारापासून विरक्त होऊन परलोकसाधनार्थ तीर्थयात्रा. अरण्यवास, तपश्चर्या इत्यादी करावे म्हणून अवलंब करायचा मार्ग : 'श्रीपाद श्रीवल्लभ नाम ऐसें । झाले त्रिमूर्ति कैसे । पितयातें

म्हणतसे । जाऊ उत्तरपंथासि ।।' – गुच ५.५६. २. हिमालयात बद्रिकाश्रमाजवळ असलेले स्थान. हा मार्ग स्वर्गाकडे जातो व मानवाला तो दुर्लंघ्य आहे अशी समजूत आहे. (वा.) **उत्तरपंथास लागणे –** मरणोन्मुख होणे. [सं.]

**उत्तरपंथी सरदार** शिंदे – होळकर हे सरदार. पेशवाईत हे उत्तरेकडे असत.

**उत्तरपालवी** स्त्री. ज्या ठिकाणाहून उत्तरेकडील भाग दूरवर दिसत आहे व दक्षिणेकडील बाजू टेकडी झाडे वगैरेंनी संरक्षित आहे अशी जागा; उत्तराभिमुख अशी. दक्षिण पालवीच्या उलट. (को.)

**उत्तरपाषाण युग** न. (इति.) पाषाणयुगांच्या नंतरचा, पुढचा भाग.

**उत्तरपूजा** स्त्री. १. पूजेचा शेवटचा भाग. २. एखाद्या तात्पुरत्या स्थापन केलेल्या देवतेचे विसर्जन करतेवेळी करायची पूजा; विसर्जनविधी. [सं.]

**उत्तरप्रत्युत्तर** न. उत्तरावर पुन्हा उत्तर, जबाब याप्रमाणे चाललेला वाद; वादप्रतिवाद. [सं.]

**उत्तरबस्ती** स्त्री. १. ओटीपोट. २. मूत्रमार्गात बस्ती देण्याची नलिका.

**उत्तरभाग** पु. पुढील, दुसरा भाग. [सं.]

**उत्तरभोजन** न. रात्रीचे जेवण : 'उत्तर भोजन अगत्य करावे.' – सप्र १५.२.

**उत्तरमात्रा, उत्तरमात्री** क्रिवि. प्रत्येक शब्दागणिक; प्रतिक्षणी; प्रतिव्यवहारी : 'तुला उत्तरमात्रां शिकविलें पाहिजे.' – शाको.

**उत्तरमूलोद्योगशाला** स्त्री. मूलोद्योगशाळेतील वर्गाच्या पुढील वर्ग असलेली शाळा.

**उत्तरमीमांसा** स्त्री. ब्रह्मसूत्रे; षड्दर्शनांतील एक दर्शन; वेदान्त. [सं.]

**उत्तरराग, उत्तररागिणी** पु. स्त्री. उत्तररात्री (रात्र संपायच्या वेळी) गायचे मालकंस, बसंत, सोहनी इत्यादी राग, रागिणी. [सं.]

**उत्तररात्र** स्त्री. मध्यरात्रीनंतरचा काल, विभाग; पहाटेचा कालभाग; मध्यरात्र व सूर्योदय यांमधील वेळ. [सं.]

**उत्तरलेखापरीक्षा** (शाव्य.) एखादा व्यवहार किंवा व्यवहाराची मालिका पूर्ण झाल्यानंतर लगेच किंवा काही कालानंतर त्यासंबंधीचा हिशेब.

**उत्तरलोक** पु. वरचा लोक; देव, ऋषी व साधू यांचे निवासस्थान.[सं.]

**उत्तरवय** न. वृद्धावस्था; म्हातारपण; उत्तरपराई. [सं.]

**उत्तरवयस्क** वि. वृद्ध; म्हातारा; वयातीत.

**उत्तरवर्ती** वि. १. वारस म्हणून येणारा; मागून पदावर, गादीवर बसणारा. २. पाठीमागून येणारा; नंतर असणारा; लगेच पुढे असणारा.

**उत्तरवादी** पु. (कायदा) प्रतिवादी.

**उत्तरविधान** न. उत्तरक्रिया; और्ध्वदेहिक : 'तिघांसी देवोनि दहन । उत्तरविधान करविलें रायें ।' – भाराबाल १.७०. [सं.]

**उत्तरवेठ** पहा : **उतारपेठ** : 'कीं धर्माची उत्तरवेंठ कीं सिद्धीची ओळगवट' – ऋ ११.

**उत्तरवेदी** स्त्री. यज्ञामध्ये ज्या वेदीवर मुख्य सोमादी द्रव्यांचे हवन होते ती.

**उत्तरव्यवस्था** स्त्री. १. भविष्यकाळची तजवीज; पुढील तरतूद. २. मृत्युपत्र. ३. उत्तरक्रिया; और्ध्वदेहिक किंवा त्यासंबंधी तजवीज.

**उत्तरसंगीतपद्धति–ती** स्त्री. हिंदुस्थानी संगीतपद्धती. [सं.]

**उत्तरसाक्षी** पु. प्रतिवादी पक्षातर्फे आलेला साक्षीदार.

**उत्तरहीन** वि. निरुत्तर; उत्तर देता येत नाही असा.

**उत्तरक्षम** वि. (ग.) सोडवता येण्यासारखा; ज्याचे बरोबर उत्तर मिळू शकेल असा.

**उत्तरा** स्त्री. १. नक्षत्रमालिकेतील बारावे नक्षत्र; उत्तराफाल्गुनी. २. उत्तरदिशा. [सं.]

**उत्तराकांक्षी वाक्य** (भाषा.) ज्यातून उत्तराची अपेक्षा आहे असे वाक्य.

**उत्तराण** पहा :**उतरण, उतराण**

**उत्तराणी** पु. आघाडा. [क. उत्तरणी]

**उत्तराधिकार** पु. वारसाहक्क, मनुष्याच्या मृत्युनंतर त्यांच्या मालमत्तेच्या स्वामित्वाचा, मालकीचा हक्क. [सं.]

**उत्तराफाल्गुनी** स्त्री. नक्षत्रमालेतील बारावे नक्षत्र; उत्तरा. [सं.]

**उत्तराभाद्रपदा** स्त्री. नक्षत्रमालेतील सव्वीसावे नक्षत्र. [सं.]

**उत्तराभास** पु. (कायदा) अप्रस्तुत; असंबद्ध; टाळाटाळीने दिलेले उत्तर; खोटा जाब. [सं.]

**उत्तराभिमुख** वि. ज्याचे तोंड किंवा दर्शनी भाग उत्तरेकडे आहे असा : 'बाहेरी पद्मासन रचुनी । उत्तराभिमुख बैसोनि ।' – ज्ञा ८.९२. [सं.]

**उत्तरायण** न. (ज्यो.) सूर्य किंवा इतर ग्रहनक्षत्रे यांचे उत्तरेकडे जाणे; दुसरे अयन; हा अयनकाल; मकरवृत्तापासून कर्कवृत्तापर्यंत सूर्याच्या क्रांतीस लागणारा सहा महिन्यांचा काळ. (डिसेंबर २२ ते जून २२ किंवा माघ ते आषाढ). [सं.]

**उत्तरायणपात, उत्तरायणबिंदु–दू** पु. क्रांतिवृत्तापासून फिरणारा सूर्य ज्या संपातातून विषुवाचे उत्तरेस जातो तो पात किंवा बिंदू ; वसंतारंभपात. [सं.]

**उत्तरायणमार्ग** पु. १. सूर्य मकरवृत्तापासून कर्कवृत्ताकडे जातो तो मार्ग. २. ब्रह्मलोकाचा मार्ग पहा : **अर्चिरादि मार्ग** [सं.]

**उत्तरारणी** स्त्री. अग्निमंथन करण्याची वरची अरणी. खालची अधरारणी.

**उत्तराराधना** न. स्त्री. मुख्य पूजेनंतरची पुन्हा करायची पूजा, प्रार्थना.

**उत्तरार्ध** पु. दोन अर्धांपैकी दुसरा अर्ध; ग्रंथादिकांचे जे दोन भागांतील त्यातील दुसरा भाग. [सं.]

**उत्तरावस्था** स्त्री. अखेरची अवस्था; वार्धक्य; ऱ्हास; नाश : 'क्षीणपणाचा सुमुहूर्त । काळ आरंभ करी जेथ । ते हे उत्तरावस्था येथ ।' – एभा २२.५२४. [सं.]

**उत्तराशा** स्त्री. उत्तरदिशा : 'जन कथिति, धेनु कुरूंनी वळिल्या येऊनि उत्तराशेला ।' – मोविराट नव ३०५. [सं.]

**उत्तराषाढा** स्त्री. नक्षत्रमालिकेतील एकविसावे नक्षत्र. [सं.]

**उत्तरांग** न. १. शेवटचा भाग; अंग; उपसंहार; कोणत्याही कामाच्या प्रधानभागानंतरचा भाग. २. (संगीत.) रागाच्या प,ध,नी, सा ह्या चार स्वरांचा समुदाय. ३. (तत्त्व.) एखाद्या गोष्टींची नंतरची बाजू; जर .... तर ..... प्रकारच्या विधानातील तर .... नंतरचा भाग; ज्या दोन संख्यांचे गुणोत्तर सांगितले जाते त्यातील दुसरी संख्या. [सं.]

**उत्तरांगवादी राग** (संगीत) ज्या रागाचा वादी स्वर त्याच्या उत्तरांगामध्ये असतो असा राग. ह्या वर्गात येणाऱ्या रागांचा गानसमय रात्री १२ वाजल्यापासून दिवसाच्या १२ वाजेपर्यंत असतो.

**उत्तरी** स्त्री. १. उत्तरक्रिया करते समयी गळ्यात जानव्यासारखे बांधण्यात

येणारे एक फडके. २. अंगवस्त्र; उपरणे; ओढणी; उत्तरीय. ३. स्नानसंध्यादी कर्मसमयी रामनामांकित पट्ट्यासारखे गळ्यात घालावयाचे वस्त्र. [सं. उत्तरीय]

**उत्तरीय** न. १. उपरणे; ओढणी; शेला; उपवस्त्र; अंगवस्त्र: 'बहुविस्मित नृपमुनि सुर म्हणती उडवूनि उत्तरीयांतें ।।' – मोभीष्म १२.१४. २. पहा : **उत्तरी.** ३. विशिष्ट प्रकारचा झगा; रोमन रहिवाशांचा सैल झगा; लोकरी उपरणे; टोगा. [सं.]

**उत्तरीय तपासणी** व्यक्तीला अनैसर्गिक किंवा संशयास्पद मरण आल्यास त्याचे कारण ठरविण्यासाठी होणारी प्रेताची तपासणी : 'उत्तरीय तपासणीपूर्वी प्रेताची ओळख पटवून घेणे आवश्यक असते.' – गुमा ४३.

**उत्तरेकडील ढोंग** (इति.) तोतयांचे सांकेतिक नाव.

**उत्तरोत्तर** क्रिवि. १. हळूहळू; दिवसानुदिवस; क्रमाक्रमाने; पुढेपुढे. २. अधिकाधिक : 'ऐसा हा उत्तरोत्तरु । ज्ञानबीजाचा विस्तारु ।' – ज्ञा ४.१९१. [सं. उत्तरचे द्वि.]

**उत्तल उंची** (स्था.) घराच्या पायापासून गच्चीपर्यंतची उंची.

**उत्तलीय** पु. (भू.) समुद्रकिनाऱ्यालगतचा उथळ पाण्याचा पट्टा. हा सर्वसाधारणपणे ओहोटीच्या खुणेपासून ते समुद्रात १०० पुरुष अथवा ६०० फूट खोल असतो. [सं.]

**उत्तंभित** वि. १. वर उचललेले; सरळ उभे केलेले. २. पुढे आलेले; उन्नत (स्त्रियांचे स्तन). ३. उभारलेले, वर केलेले (कान). [सं.]

**उत्तंस** वि. भूषण; अलंकार; तुरा. सामा. शब्द – कुलोत्तंस = कुळाला भूषण; राजोत्तंस = राजश्रेष्ठ. [सं.]

**उत्तान** वि. भडक; भावना उद्दीपित करणारा; अश्लील. [सं.]

**उत्तान** वि. १. उताणा; तोंड वर केलेला. २. उथळ. ३. सरळ; स्पष्ट; गूढ नव्हे असा (श्लोकार्थ, अभिप्राय इ.). [सं.]

**उत्तानकूर्मासन** न. कुक्कुटासन घालून दोन्ही हातांची मिठी मानेत घातली असता होणारे आसन. [सं.]

**उत्तानमंडूकासन** न. बेडकाप्रमाणे केलेले आसन. [सं.]

**उत्तानवंचित संयुक्त हस्त** (नृत्य.) कोपरे व खांदे वाकडे करून दोन्ही हात त्रिपताक करणे, मग त्यांचे तळहात तिरकस दिसतील असे ते ठेवणे.

**उत्तानार्थ** पु. सरळ, सहज समजणारा अर्थ; सोपा, उघड अर्थ.
वि. गूढ नसलेला; उघड; स्पष्ट (अर्थ इ.). [सं.]

**उत्ताप** न. उजेडाची व उघडी जागा.
वि. उघडी; उजेडाची; छायारहित; मोकळी; उन्हाची (जागा).[सं.]

**उत्तीर्ण** वि. १. (नदी, घाट, संकट इ.) उतरून पार गेलेला; कार्यातून पार पडलेला : 'जें शतमखोत्तीर्ण करा । आरूढोनि असे ।।' – ज्ञा १०.२४०. २. परीक्षेत पास झालेला; जय मिळालेला; विजयी. ३. उतराई; ऋणमुक्त : 'देऊनि मज उत्तीर्णे । जालीं आजी ।।' – ज्ञा १६.३३.[सं.] (वा.) **उत्तीर्ण होणे** – १. विजयी होणे; पास होणे. २. मरणे : 'तेथ उत्तीर्ण होईल प्राणें ।' – ज्ञा १.२०२. ३. उतराई होणे : 'उपासनेचे उत्तीर्ण व्हावे ।' – दास १५.१०.३३.

**उत्तुंग** वि. अतिशय उंच; (ल.) अलौकिक कर्तबगारीचा (माणूस).[सं.]

**उत्तुंगता भीति–ती** उंच जागी जाण्यास वाटणाऱ्या भीतीची मानसिक विकृती.

**उत्तू** पु. पहा : **उतू**

**उत्तेजक** वि. चेतना, उत्तेजन देणारे; हुरूप आणणारे; प्रोत्साहक; चेव, क्षोभ, कोप आणणारे; हुशारी, तरतरी देणारे (भाषण, पेय, प्रसंग इ.).
न. उद्दीपित करणारे, उत्साह देणारे पेय, औषध वगैरे. [सं.]

**उत्तेजन** न. १. जागृती; चेतना; प्रोत्साहन; उद्दीपन; स्फूर्ती; आवेश, चेव, क्षोभ येणे. २. प्रलोभन; आकर्षण. (क्रि. देणे). [सं.]

**उत्तेजनात्मक नियोजन** न. उत्तेजित करण्यासाठी, प्रोत्साहनाच्या हेतूने आखलेली कार्याची रूपरेषा.

**उत्तेजनार्थ** वि. प्रोत्साहन देण्यासाठी दिलेले. (पारितोषिक).

**उत्तेजनक्षमता** स्त्री. उत्तेजकाला प्रतिसाद देण्याची शक्ती, सामर्थ्य.

**उत्तेजित** वि. १. उत्तेजन दिलेला; उत्साही; आवेश, चेतना आणलेला; हुरूप, स्फूर्ती मिळालेला. २. प्रवर्तित; प्रवर्धित; गती वाढवणारा. ३. क्षुब्ध; उद्दीप्त. [सं.]

**उत्तोल** पु. शरीराचा हातावर वगैरे सांभाळलेला तोल : 'उत्तोल सांभाळण्याची क्रिया जर चांगली साधली तरच त्याचे हातून कामें होण्याची आशा असते.' – व्याज्ञा ३.२८१.

**उत्था** स्त्री. उत्पत्ती; जन्म; उठावणी. समासात उपयोग. उदा. मायोत्थसंसार (मायेपासून ज्याची उत्था झाली आहे तो); ज्वरोत्थ; अज्ञानोत्थ. [सं. उत्+स्था; उत्थ=उत्पन्न]

**उत्थान** न. १. उभे राहणे; उठणे. २. उदय. जसे :– पुनरुत्थान = पुन्हा उठणे. ३.प्रेरणा : 'मनाचं उत्थान धर्मानं करायला पाहिजे.' – पुत्र १५. ४. जागृती; प्रबोधन. [सं.]

**उत्थापक** वि. १. उभा करणारा; प्रवृत्त करणारा; संस्थापक; उत्पादक. २. उठविणारा. [सं.]

**उत्थापणे** उक्रि. १. स्थानभ्रष्ट करणे; उठवून लावणे. या व इतर अर्थी पहा :**उत्थापन** : 'असुर सुरां ते उत्थापिती । ते गाऱ्हाणें हरिशीं देती । इंद्र चंद्र प्रजापती । तेही चरफडती हरिपदा ।' – एरुस्व १.७९. २. जागेवरून काढणे, हलविणे. ३. मोठेपणा आणणे. ४. उत्तेजना देणे. [सं. उत्थापय]

**उत्थापन** न. १. उठवणे; उभे करणे. २. मोठेपणाला आणणे; वर आणणे : 'संस्कृत भाषेला उत्थापन देण्याच्या उद्योगास ...' – निअ ८६. ३. देव, मूर्ती इत्यादींचे विसर्जन करणे; देवकोत्थापन. ४. उत्तेजन; उठावणी. ५. खडी ताजीम; स्वागतार्थ उभे राहणे, सामोरे जाणे. (क्रि. देणे, घेणे). ६. उठवणे; अभ्युत्थान; स्थानभ्रष्ट करणे; काढून टाकणे (राज्य, नोकरी इत्यादिकांवरून). पहा : **उत्थापणे.** ७. (ग.) एका पदाऐवजी दुसरे पद, अंकाबद्दल अक्षर घालणे; बदली ठेवणे, आणणे. [सं.]

**उत्थापित** वि. १. उभा राहिलेला; उभारलेला; उठवलेला; स्थापलेला; कायम केलेला. २. काढून टाकलेला; दूर केलेला. [सं.]

**उत्थापी चेता** (वै.) उद्दीपित करणारा ज्ञानतंतू; हर्षणी चेता.

**उत्थापी पेच** ज्यामुळे पेच जागेवर फिरून बसविलेली वस्तू वरखाली होऊ शकते असे पेच. उदा. मोटार गाडी उचलण्यासाठी वापरलेला पेच.

**उत्थित** वि. उठलेला; उभा राहिलेला; वर आलेला. [सं.]

**उत्थित पद्मासन** पद्मासन घालून नंतर दोन्ही हात व हाताची बोटे साफ उघडून जमिनीवर टेकून, हाताच्या बोटांवर व तळहातावर सर्व भार देऊन आसन उचलून धरण्याची क्रिया. [सं.]

**उत्थिति–ती** स्त्री. १. उत्थान; उभे राहणे; वर येणे. २. उभे राहण्याची, वर येण्याची स्थिती. [सं.]

**उत्थितोर्ध्वपद्मासन** शीर्षासन करून उभ्या पायांची हळूहळू एकेक मांडी घालून तशाच स्थितीत पद्मासन करणे. याने मान, डोके, कोपर यांवर ताण बसतो व डोक्याचे पांढरे झालेले केस काळे होतात.

**उत्पत्ति–त्ती** स्त्री. १. जन्म; संभव; उद्भव; अस्तित्वात येणे; निर्माण होणे :'जे वेळीं ही लागे उत्पत्ती । ते वेळीं स्थिती प्रळयो हारपती ।' – ज्ञा. ११.४९६. २. प्रादुर्भाव; उत्थान; उदय. सामा. शब्द – बीजोत्पत्ती, रोगोत्पत्ती. ३. उत्पत्ती, स्थिती व संहार (लय) या तीन अवस्था प्रत्येक प्राण्याला असतात. ब्रह्मा, विष्णू व महेश (शिव) या अनुक्रमे वरील तीन अवस्थांच्या अधिष्ठात्री देवता आहेत. [सं.]

**उत्पथ** पु. वाईट मार्ग :'जो न मानी वेदशास्त्रार्थ । तो उत्पथामाजीं पडे ।' – एभा १९.५२७. [सं.]

**उत्पथी झडप** (यंत्र.) एखाद्या यंत्रव्यवस्थेमध्ये द्रव किंवा वायूचा दाब पाहिजे तेवढा ठेवण्यासाठी असलेली झडप.

**उत्पन्न** वि. जन्मलेले; उत्पत्ती पावलेले; उद्भूत; तयार झालेले.
न. १. फल; मिळकत; प्राप्ती (शेतकी, नोकरी, धंदा, व्यवसाय या पासून). २. नफा; खर्च वजा जाऊन शिल्लक; लाभ. ३. मूळ ठिकाण; मूळ कारण.[सं.] (वा.) **उत्पन्नास येणे** – प्राप्ती होण्याच्या अवस्थेस पोचणे; नफा, फायदा मिळू लागणे; फलदायक होणे.

**उत्पन्नणे** अक्रि. उत्पन्न होणे; उदय पावणे.

**उत्पन्नजन्य** वि. कमी अधिक उत्पन्नामुळे होणारी (लवचिकता).

**उत्पन्न परिणाम** पु. (अर्थ.) प्राप्तीमुळे होणारा लाभ.

**उत्पन्नभक्षी** वि. हातातोंडाशी गाठ असलेला; रोजच्या रोज मिळवून खाणारा; आलेले उत्पन्न लागलीच खाणारा; काही शिल्लक न टाकणारा किंवा टाकण्यास असमर्थ.

**उत्पन्नभोक्ता** वि. १. वडिलोपार्जित संपत्तीवर निर्वाह करणारा. २. हातातोंडाशी गाठ असलेला; उत्पन्नभक्षी.

**उत्पन्नविनष्ट, विनाशी** वि. १. उत्पन्न झाल्याबरोबर नष्ट होणारा; लागलीच नाश, मृत्यू पावणारा. २. क्षणभंगुर; अल्पायुषी. ३. निर्जीव.

**उत्पल, उत्पळ** न. १. कमळ; राजीव; पंकज :'पूजीसी नीलोत्पलीं । जीवभृंगांच्या ।।' – ज्ञा १७.६. २. एक उपरत्न. हे नील वर्णाचे असून सुंदर, स्वच्छ, पारदर्शक आणि कठीण असते.

**उत्पवन** न. हवेत उडणे :'घुटिका तोंडी घालीति आणि उत्पवन करीति ।' – लीच १.३४.

**उत्पाटणे** सक्रि. नाहीसे करणे; नाश करणे; उपटून टाकणे :'जे येवढें झाड उत्पाटी । ऐसे कायि असे ।।' – ज्ञा १५.२१०. [सं. उत्+पट्]

**उत्पाटन** न. उच्चाटन; उपटणे; खणून काढणे; निर्मूलन करणे. सामा. शब्द – वृक्षोत्पाटन, केशोत्पाटन. [सं.]

**उत्पाटित** वि. उपटलेले; नाहीसे केलेले; उखडून टाकलेले.

**उत्पात** न. १. भयसूचक चिन्ह, खूण; अपशकुन; भावी अरिष्टांचे सूचक चिन्ह :'झाले उत्पात बहुल तेव्हां चळचळ वसुंधरा हाले ।' – मोभीष्म १०.३८. उत्पातांचे काही प्रकार – भूकंप, उल्कापात, तडित्पतन, वृक्षोन्मूलन वगैरे. २. अनर्थ; संकट :'एका क्षुद्र आयुष्यात केवढाले उत्पात.' – रथ २७७. ३. खोड्या; दंगे; पीडा; त्रास (राजा, चोर, बंड इत्यादींचा). [सं. उत्+पत्]

**उत्पातप्रलय** पु. प्रलयकालचा, जगाच्या अखेरीचा अनर्थ; भयंकर, सर्वव्यापी संकट. [सं.]

**उत्पातित जल** उर्ध्वपातन करून शुद्ध केलेले पाणी.

**उत्पाती** वि. १. व्रात्य; खोडकर; द्वाड (मूल). २. साहसी; मोठा उद्योगी; हिय्येदार. ३. विध्वंसक :'१९४२ ची उत्पाती चळवळ गांधीजींना मान्य नव्हती.' – माजी ५०९. [सं. उत्पात]

**उत्पाद** पु. १. उत्पन्न केलेला माल, वस्तू. २. उत्पन्न करणे.

**उत्पादक** पु. १. पिता; निर्माणकर्ता; वस्तू निर्माण करणारा :'भारतात उत्पादक श्रम करणाऱ्या लोकांच्या संख्येपैकी ७२ टक्के लोक शेतीत राबतात.' – लोस ६९. २. संस्थापक; काही कार्य, मूळ गोष्ट काढणारा, आरंभ करणारा.
१. वि. फलदायक. २. (अर्थ.) उत्पन्न करणारा; उत्पादनक्षम; विक्रीसाठी माल तयार करणारा; धनोत्पादक. [सं. उत्+पद्]

**उत्पादककाल** पु. एखाद्या उत्पादनाला प्रत्यक्ष लागणारा कालावधी.

**उत्पादकता** स्त्री. (अर्थ.) ज्याला विनिमयमूल्य आहे असा माल किंवा सेवा उत्पादन करण्याची क्षमता.

**उत्पादक वस्तु** (अर्थ.) वस्तूच्या उत्पादनासाठी आवश्यक दुसरी उत्पादित वस्तू.

**उत्पादकारक** पु. उत्पादक साधक.

**उत्पादगणना, गणति–ती** उत्पादन केलेल्या मालाची मोजणी.

**उत्पादणे** सक्रि. १. घडवणे; जन्मास आणणे; निर्माण करणे; तयार करणे; बनवणे. २. प्रकट करणे :'शिकल्या शब्दांचे उत्पादितों ज्ञान । दर्पणींचे धन उपखायां ।' – तुगा १५५९. [सं. उत्पादन]

**उत्पादन** न. १. उत्पत्ती; उत्पन्न करण्याचा व्यापार, क्रिया; निर्माण करणे. २. (अर्थ.) उत्पन्न केलेला माल (कारखाने, व्यापार, शेतकी यांपासून). ३. सर्जन; उत्पन्न; उपज; पैदास; तयार माल. [सं.]

**उत्पादित** वि. उत्पन्न केलेला; जन्माला आणलेला. [सं.]

**उत्पादितभाव** पु. प्रेरणा केलेली भावना.

**उत्पाद्य** वि. उत्पन्न करण्यास योग्य; उत्पन्न करायचे ते.

**उत्प्रणोद** पु. १. ऊर्ध्वगामी, वर उचलणारा रेटा अथवा जोर. २. (भूशा.) भूकवचाचा, भूपृष्ठाचा वर आलेला भाग.

**उत्प्रवासन** न. परदेशात रहावयास जाणे.

**उत्प्रवासी** पु. (कायदा.) स्वदेश सोडून इतरत्र कायम वास्तव्य करण्याचा इरादा असलेली व्यक्ती. [सं.]

**उत्प्रवाह** बाहेर वाहणारा ओघ; निर्गत प्रवाह. [सं.]

**उत्प्राणिद** न. उर्ज्ज व प्राण यांचा संयोग.

**उत्प्रेरण** न. (शाप.) वितंचक किंवा त्यासारख्या पदार्थाच्या साहाय्याने दुसऱ्या पदार्थात रासायनिक बदल होण्याची प्रक्रिया; निदेशन. उदा. डायजेस्टने तवकिराची साखर बनणे. यामध्ये निदेशक स्वत : बदलत नाही.

**उत्प्रेषण लेख** (शाव्य.) वरच्या न्यायालयाने खालच्या न्यायालयाला आवश्यक ते अभिलेख पाठविण्यासंबंधी दिलेला आदेश. [सं.]

**उत्प्रेक्षण** न. दृष्टान्त, उदाहरण देणे; दाखला देणे. [सं.]

**उत्प्रेक्षणे** सक्रि. (काही एक गोष्ट) उत्प्रेक्षाविषय करणे; एखाद्या गोष्टीचा दाखला, उदाहरण देणे. [सं. उत्प्रेक्षा]

**उत्प्रेक्षा** स्त्री. १.(सास.) एक अर्थालंकार. उपमेयावर जणू हे उपमानच आहे अशी संभावना ज्यात केलेली असते तो अलंकार. स्वरूप (उत्प्रेक्षित वस्तू पदार्थ असेल तर), हेतू (क्रियेचे कारण असेल तर), व फळ (क्रियेचे फळ असेल तर) असे उत्प्रेक्षेचे तीन प्रकार आहेत. उदा.– असें बोलोनी नळें रंजवीला । अंजुळीमाजी हंस बैसवीला । गमे चंपककुसुमौघ हार झेला । पाठवाया युवतीस सिद्ध केला ।।' – नल ८१. २. कल्पना; तर्क; युक्ती :'आइकतयां उत्प्रेक्षे सळु चढे ।' – ज्ञा १०.२६८. [सं.]

**उत्प्रेक्षित** वि. उत्प्रेक्षा दिलेले; तुलना केलेले; दाखला देऊन स्पष्ट केलेले. [सं.]

**उत्प्लवन** न. उड्डाण; उडी; भरारी :'देखें उत्प्लवनासरिसां । पक्षी फळासि झोंबे जैसा ।' – ज्ञा ३.४१. [सं.]

**उत्प्लवबांध** पहा : **उत्प्लवमार्ग**

**उत्प्लवमार्ग** पु. धरणातील जादा पाणी काढून टाकण्यासाठी केलेला पाट, मार्ग; सांडवा. [सं.]

**उत्प्लवी चलनफुगवटा** (अर्थ.) चलनविस्तार अमर्याद होऊन किंमतीचे मान निरंकुश वाढत राहते. चलनाची क्रयशक्ती क्षीण होत जाते. तशाही परिस्थितीत चलनविस्तार चालू राहून वास्तव व्यवहारात चलन पूर्णत : निष्प्रभ होते अशी चलनफुगवट्याची स्थिती.

**उत्फती** उत्पाती, दंगेखोर, पेंढारा.

**उत्फालन** न. उड्या मारण्याची क्रिया :'मारी मूषक थोर कोण कुहरी राहोन तें मांजरी । उत्फालेन करी करून मजला पीडा शरीरी करी ।।' – विठ्ठलकृत रसमंजरी. [सं. उत्फाल]

**उत्फुल्ल, उत्फुल्लित** वि. उलगडलेले; प्रसन्न; विस्तारलेले; उघडलेले; विकासलेले; उमललेले (पुष्प, नेत्र) :'अनावर आनंदाने उत्फुल्ल होण्याऐवजी..' – विजी ९६. [सं.]

**उत्फुल्लिका** स्त्री. मुलींचा एक प्रकारचा खेळ; बसफुगडी. [सं.]

**उत्याचे भात** जमीन भाजल्याशिवाय नुसती नांगरट करून त्या जमिनीत काढलेले भात. [क. उतु]

**उत्रवाट** पु. उत्तरीय :'बांधिलें गुंफामठ । वस्त्रें कमंडलू योगवट । पाटसूताचे उत्रवाट ।सामग्री देतसे ।।'–कालिका १७.७९. [सं. उत्तरीय+पट]

**उत्रात** स्त्री. संक्रांत :'आवतनी उत्रात गधडावर बसेलशे – यंदाची संक्रांत गाढवावर बसली आहे.' – संशोधन ऐलेच २५६, २६६. (खा.) [सं. उत्तरायण]

**उत्रापावलाक** क्रिवि. प्रत्येक शब्दागणिक व पावलाबरोबर; हरघडी. (गो.) [सं. उतर+पाद]

**उत्सन्न** वि. मृत; नष्ट :'कुलघातकांच्या या वर्णसंकरकारक दोषांनीं पुरातन ज्ञातिधर्म व कुलधर्म उत्सन्न होतात.' – गीर ६१०. [सं. उत्+सद्]

**उत्सर्ग** पु. (वै.) शरीरातून बाहेर टाकलेली वस्तू; विष्ठा; मळ. [सं.]

**उत्सर्ग** पु. १. बाहेर टाकणे; टाकून देणे; त्याग; दान; अर्पण. सामा. शब्द – मलोत्सर्ग, मूत्रोत्सर्ग, वृषोत्सर्ग वगैरे :'संक्रमण उत्सर्ग । विण्मूत्राचा ।।' –ज्ञा १३.११९. २. नियम; विधी; रीत. उदा. उत्सर्गशास्त्र. ३. धर्म करणे; विहीर, धर्मशाळा इ. देवाला अर्पण करणे. [सं. उत्+सृज्=टाकणे]

**उत्सर्गतः** क्रिवि. १. सामान्यतः ; साधारण, ढोबळ मानाने. २. नियमानुसार. [सं.]

**उत्सर्गव्यूह, उत्सर्जक संस्था** (वै.) प्राण्यांच्या शरीरातील नको असलेले मलमूत्रादी पदार्थ बाहेर टाकण्याची क्रिया करणाऱ्या अवयवांचा समूह किंवा अवयवांची संस्था.

**उत्सर्जन** न. १. टाकणे; त्याग करणे; सोडून देणे. पहा : **उत्सर्ग** २. वेदाध्ययन थांबविण्याच्या वेळी करायचे कर्म; यज्ञोपवीत धारण करणारांचे एक प्रतिवार्षिक कर्म; श्रावणीतील एक कर्म. [सं.]

**उत्सर्जन तंत्र** बाहेर टाकण्यासाठी, उत्सर्जनासाठी उपयुक्त अशी संरचना व कार्यक्षम अवयव. [सं.]

**उत्सर्जित** वि. उत्सर्जन केलेला; त्याग केलेला. [सं.]

**उत्सव, उत्साव** पु. १. आनंद; आल्हाद; उत्साह :'या ब्राम्हणांसि आम्हा सुहृदांसि पर्दी बसोनि उत्सव दे ।' – मोशांति ४.६६. २. आनंदाचा दिवस; समारंभ; सण. पहा : **उत्साह** :'आणिखी होतसे रिणदार तंटा । उत्साव भारी कारणें ।' – दावि ४९४. ३. नाचरंग; खेळ; विलास. ४. धार्मिक, सामाजिक इ. मंगल प्रसंग. [सं.]

**उत्सवमूर्ति–र्ती** स्त्री. १. मिरवणुकीत न्यायची देवाची प्रतिमा; भोगमूर्ती. २. केवळ शोभेचा, दिखाऊ माणूस, वस्तू :'राष्ट्रपतीला उत्सवमूर्ती करून ठेवण्याची पद्धत पडत आहे.' – लोका ४९. ३. (ल.) सभासमारंभात जिचा सत्कार करण्यात येतो ती व्यक्ती. [सं.] वि. (थट्टेने) नेहमी नटूनथटून असणारा; उत्सवाला, मानाला मात्र पुढे असणारा.

**उत्संक, उत्संकल, उत्संखळ, उत्संगळ** वि. अनिर्बंध; उच्छृंखल; उतावळा; अमर्याद; अप्रतिबद्ध; स्वैरवर्तनी (पोर, सासुरवाशीण इ) :'तंव श्रीकृष्ण म्हणती ऐसें । हे उत्सृंखळ बोलणें कायसें ।' – ज्ञा ६.१६२. [सं. उत्+शृंखला]

**उत्संग** पु. १. मांडी; जवळचे स्थान :'संतोषा उत्संगी । दिधलें घर ।।' – ज्ञा १२.१५०. २. सान्निध्य; सहवास :'जयांचियें दिठीचिया उत्संगीं ।' – ज्ञा ९.४७७. [सं.]

**उत्संगसंयुक्तहस्त** (नृत्य.) अराल हात उताणे करून बाहू वाकविणे व उजवा अराल हात डावीकडे व डावा हात उजवीकडे ठेवणे.

**उत्संस्करण** न. (पुरा.) एका समाजाने दुसऱ्या समाजाची सांस्कृतिक वैशिष्ट्ये उचलल्यामुळे त्यांच्या प्रसाराची होणारी प्रक्रिया.

**उत्सादन** न. १. पतंग उडवणे (६४ कलांपैकी एक). २. नाश करणे. ३. वर जाणे, चढणे. ४. खोल नांगरणे. [सं. उत्+सद्]

**उत्सादित** वि. नाहीसे केलेले, नष्ट, रद्द केलेले.

**उत्सार, उत्सारण** पु. न. भाज्य संख्येपैकी जेथपर्यंत भागाकार झालेला आहे त्यापुढील आकडे; पुढे भागायचा प्रत्येक आकडा, पद. [सं. उत्+सृ]

**उत्सारण** न. (एखादा पदार्थ) बाहेर काढून टाकणे; बहिर्निष्कासन. [सं.]

**उत्साह** पु. १. अनुकूल भाव; उल्हास; उत्सुकता. २. आनंद; संतोष; समाधान. ३. सण; सोहळा; आनंदाचा समारंभ; मंगलप्रसंग; उत्सव; आनंददायक कार्यक्रम. वसंतोत्सव : 'असो गोकुळी झाला आनंद । उत्साह करिती परमानंद ।'–हरि १२.१४४. ४. उमेद; हिंमत; नेट; निकर; धैर्य : 'धर्म म्हणे, आजोबा उत्साहें कौरवार्थ भांडावें ।' – मोभीष्म १.७४. ५. वेग; जोर; आवेश : 'तो उत्साहो न संवरे । इंद्रिय ओघां ।' – ऋ ६३. [सं. उत्+सह]

**उत्साहबुद्धि–द्धी** स्त्री. मनाची उमेद, ईर्षा; उत्सुकता; तत्परता; काम करण्याची आवड : 'उत्साहबुद्धि न मनाप्रति दे उठाया ।' [सं.]

**उत्साहभंग, उत्साहनाश** पु. १. आनंदाचा विरस; निराशा. २. आनंददायक कार्यक्रमाचा बिघाड; त्यात आलेले विघ्न.

**उत्साहमूर्ति–र्ती** पु. पहा : **उत्सवमूर्ति**. १. व्यवहारात पुढे असणारा, ज्याला नेहमी पुढे करण्यात येते असा माणूस; कारभारी; फिरता व्यापारी; प्रचारक; प्रतिनिधी; आनंदाने पुढे होऊन काम करणारा; कामात इतरांना उत्साह वाटेल असे वागणारा. [सं.]

**उत्साहवान, उत्साही** वि. १. उमेद असलेला; आनंदी; उत्साहाने काम करणारा. २. तत्पर; उत्सुक; दीर्घोद्योगी. [सं.]

**उत्साहशक्ति–क्ती** स्त्री. उमेद; आत्मविश्वास; धमक; जयाबद्दलची खात्री; युद्धोपयोगी तीन शक्तींपैकी एक. दुसऱ्या दोन म्हणजे प्रभुशक्ती आणि मंत्रशक्ती. [सं.]

**उत्साहित** वि. १. उत्साही; आनंदित; प्रमुदित; उत्साह पावलेला, आणलेला. २. संतोषित; खूष झालेला; समाधान पावलेला.

**उत्सिक्त** वि. उतू गेलेला; वाहून गेलेला; भरून गेलेला. [सं. उत्+सिच्]

**उत्सुक** वि. १. उत्कंठित; आतुर. २. अधीर; उतावीळ; मनापासून तयार. तत्पर; राजी; सज्ज; सिद्ध; जिज्ञासू. [सं.]

**उत्सुकता** स्त्री. उत्कट इच्छा; तीव्र इच्छा; उतावीळपणा.

**उत्सृत विहीर** (स्था.) कूपनलिका; जमिनीत पाण्याचा झरा सापडेपर्यंत यंत्राने छिद्र पाडून वर आणलेल्या झऱ्याच्या पाण्याची विहीर; हापसा.

**उत्सृष्ट** वि. टाकलेले; सोडून दिलेले; त्यक्त; उत्सर्जन केलेले. [सं.]

**उत्सृष्टपशु–शू** पु. देवतेसाठी सोडलेला, अर्पण केलेला बैल, पशू. [सं.]

**उत्सेक** पु. १. उकळून वर येणे; ऊत. २. भर; वाढ. ३. गर्व; ताठा. [सं. उत्+सिच्]

**उत्सेदणे** सक्रि. नाश करणे; मोडणे; विध्वंस करणे : 'कोणी एक ज्ञानी म्हणविती । अहंब्रह्म पूर्ण जाणती । आणि सगुणभक्ती उत्सेदिती । ते तरलेचि न तरती अभिमानें ।।' – संवि २२.७८. [सं. उत्सादन]

**उत्सेध** वि. उंच; श्रेष्ठ : 'सप्त निगूढे रक्तवर्णे । उत्सेध नेटकीं साही स्थानें ।' – मुआदि १६.१८.

**उत्सेध** पु. (वै.) सूज आल्यामुळे, रक्तस्राव झाल्यामुळे किंवा इतर कारणांनी उंचावलेला शरीराचा भाग, उंचवटा; टेंगूळ. [सं.]

**उत्स्थलांतर** न. विशेषतः स्वतःचा देश सोडून दुसऱ्या देशात कायमचे राहण्याच्या दृष्टीने केलेली वसाहत, व्यवस्था.

**उत्स्फूर्त** वि. मनातून आलेला; स्वतःला सुचलेला; आयत्यावेळी सुचलेला; सहजस्फूर्त. [सं. उद्+स्फूर्त]

**उत्क्षेप** पु. बाहेर टाकणे; वर फेकणे; बाहेर घालवणे. [सं.]

**उत्क्षेपण** न. वर उडविण्याची क्रिया. [सं. उत्+क्षिप्]

**उत्क्षेपक** पु. एखादी वस्तू हलविण्यासाठी किंवा उचलण्यासाठी जोर, ताकद किंवा दाब वाढवणारे उपकरण, साधन.

**उत्क्षेपणी जलसेतू** (स्था.) वक्रनलिकेच्या आकाराचा कालवा, नहर.

**उत्क्षेपणे** उक्रि. दूर फेकून देणे; वर उडविणे. [सं. उत्+क्षिप्]

**उत्क्षेपभुवई** स्त्री. नृत्यात एकाच वेळी एक किंवा दोन्हीही भुवया वर चढविणे; रागावणे, तर्क करणे, पाहणे. हेला–लीला वगैरेंच्या वेळी हा अभिनय करतात.

**उत्क्षोभ** पु. राजकारणात अथवा सामाजिक परिस्थितीत प्रचंड, अचानक आणि हिंसक उलथापालथ.

**उथव** स्त्री. भरती; पूर : 'आतां उथव आल्यामुळे एक होऊं पहात नाहीं काय?' – सुदे ८४. [सं. उत्+स्था]

**उथळ** वि. १. साधारण सखल; कमी खोल; फार खोल नसलेले (पात्र, नदी, तळे इ.). २. (ल.) साधाभोळा; मोकळ्या मनाचा; निष्कपटी; भाबडा. ३. वरवरचे ज्ञान असलेला; ज्याने नीट अभ्यास केलेला नाही असा. [सं. उत्स्थल]

**उथळणे** अक्रि. उसळणे; उचंबळून येणे; जोराने वर येणे; उत्पन्न होणे : 'उथळोनि प्रेमा । कृष्णिं मिळाल्या त्या रामा ।' – रास १.१२२७.

**उथळपातळ** क्रिवि. किंचित; थोडेथोडे; विरळविरळ.

**उथळबुडाचा** वि. १. अल्पज्ञानी; खोल विचार न करणारा. २. हुरळून जाणारा; अल्पसंतुष्ट; भोळसर : 'आमच्यातहि उथळ बुडाची कांही मंडळीं आहे.' – लोटिकेले १.३९७.

**उथळवट** वि. साधारण उथळ, सखल; फार खोल नसलेले.

**उथळा** पु. वृक्षावर पाऊस पडल्यानंतर खाली पडणारे पावसाचे थेंब. (को.)

**उथळा, उथळी, उथळे** पु. स्त्री. न. १. खांबाच्या वर व खाली बसवण्याकरिता तयार केलेला चौकोनी लहान व उंच दगड किंवा लाकूड; खांबाचा तळखडा, बैठक : 'टेबलात बसविलेल्या उभ्या फिरत्या दांड्याच्या खालच्या बाजूस टोक असून ते उथळ्यांत फिरते.' – पदार्थविज्ञान १.४३. २. (बांधकाम.) दगडी किंवा काँक्रीटचा चाफा.

**उथळापाठ** वि. उथळी किंवा गोडी भातजमीन जेथे आहे असे (खेडे).

**उथळी** स्त्री. विशिष्ट प्रकारचे भात पिकणारी गोडी जमीन. (को.)

**उथाण** न. १. हवेचा कोंदटपणा ; अभ्रे आली असता होणारी हवा; गदमद; उकाडा. (क्रि. येणे). २. भाद्रपद महिन्यातील ऊन. [सं. उत्+स्थान]

**उथारा** पु. त्रास; कटकट : 'तूं आठवे अवतारीं । घेणे पळसी समुद्रमाझारीं । दैत्यांचिया उथाराथरी । सीणसी तुं ।।' – कालिका ४.१३१.

**उथाळा, उथाळी, उथाळे** पु. स्त्री. न. पहा : **उथळा.** खांबाच्या खालचा व वरचा दगड, लाकूड; खांबाची बैठक; तोळंबा : 'पद्मरागाचे तोळंबे स्वयंभ । वरी दिव्य हिऱ्यांचे खांब । निळ्यांची उथाळीं सुप्रभ । उपमा नाहीं तयातें ।।' – हरि २.१७. [सं. उत्+तल]

**उथाळी** स्त्री. खोलगट भाग; टोपण : 'माणिकांची उथाळी दोहीं सेवटीं ।' – रुस्व १७३.

**उद्, उत्** अ. एक उपसर्ग. १. वरचढपणा; श्रेष्ठत्व; वर्चस्व. उदा. उत्तर, उद्वाहन, उद्गार, उद्दिष्ट. २. वियोग; विभाजन; बिघाड; दूरीकरण; अपसारण (पासून–मधून). उदा. उत्सर्जन, उत्क्षेपण. ३. वर; ऊर्ध्व; उंच. उदा. उत्थान, उत्तिष्ठ. [सं. उद्]

**उद** न. पाणी (फक्त समासाच्या आरंभी). [सं.]

**उदईक** क्रिवि. उद्या. [सं. उदय]

**उदईक** न. उदक घालून दिलेले दान : 'अकलेकर २५, परंचेकर २५ व दुसरे १०; येणेप्रमाणे ६० रूपये उदईक घातले.' – ब्रच ३५.

**उदक्** क्रिवि. उत्तरेकडे. उदा. उदङ्मुख. ज्याचे तोंड उत्तरेकडे आहे असा. [सं.]

**उदक** न. पाणी; जळ; नीर; अंबू : 'करूं जातां उदकपान । घोटासवें आठवे कृष्ण ।' – एरुस्व ५.६२. [सं. उद्=वर येणे, ओले करणे] (वा.) **उदक येणे** – (डोळ्यात, नेत्रांत, नयनांत) दु :ख होणे; वाईट वाटून रडणे; अश्रू येणे. **उदक सोडणे, उदक घेणे** – १. मालकी सोडणे; त्याग करणे; सोडून देणे; टाकून देणे : 'गोप्रदानांबद्दल सोळा रुपयांच्या रकमेचे उदक सोडले जाईल.' – गोप्रदानाचे नियम (बडोदे ) २. २. कोणत्याही गोष्टीचा संकल्प केल्याचे द्योतक म्हणून मंत्रपूर्वक पाणी सोडणे; संकल्प करणे. ३. संकल्पाचे उदक सोडून जेवण्यास आरंभ करणे. **उदक हातावर घालणे** – एखाद्याला दान करणे; अर्पण करणे; दुसऱ्याला देऊन टाकणे. **उदकापाण्याने करून टाकणे** – एखादे कार्य, समारंभ, उत्तरक्रिया अतिशय थोड्या खर्चात व गाजावाजा न करता फक्त विधीस बाध येऊ न देता उरकून टाकणे.

**उदक** न. उदकदत्त जमीन : 'या दिवसांत कितेक इनाम व उदक माधवसिंगजीही दिधले होते ....' – हिंगणे दभा २.३०.

**उदकक्रिया** स्त्री. उत्तरक्रिया; तिलांजली; तर्पण.

**उदकघात** पु. बंधारे घालून पाणी अडवणे व अशा रीतीने जोर उत्पन्न करून योग्य वेळी योग्य प्रमाणात वाटेल तेथे पाणी सोडणे यासंबंधीचे ज्ञान, विद्या; ६४ कलांतील एक कला.

**उदक घेऊन वचप** निघून जाणे. (गो.)

**उदकदान** न. १. उत्तरक्रिया; तिलांजली; तर्पण; उदकक्रिया. २. पाण्याची सोय करणे (विहीर, तळे इ. बांधून).

**उदकप्रक्रिया** स्त्री. (शाप.) पाण्याच्या साहाय्याने विशिष्ट संयुक्त द्रव्यातील मूलद्रव्ये वेगळी करणे. [सं.]

**उदकमेह** पु. एक रोग. यात पाण्यासारखी पुष्कळ लघवी होते.

**उदकवाद्य** न. १. जलतरंग; जलतरंगाकरिता वापरायची भांडी. २. जलतरंग तयार करणे किंवा ते वाजविण्याची कला.

**उदकशांत, उदकशांति–ती** स्त्री. घरात कोणी आजारी असल्यास अथवा काही अरिष्ट घडल्यास त्याच्या शांत्यर्थ चार ब्राह्मण बोलावून त्यांच्याकरवी काही विशिष्ट (बौधायन सूत्रात सांगितल्याप्रमाणे) सूक्ते पठण करायचा व जलसिंचन करायचा विधी. [सं.]

**उदकाकडे, उदवाडे उदवाडे–उत्काडे** क्रिवि. बर्हिदिशेकडे; शौचास, परसाकडे. (गो.)

**उदकाडी** स्त्री. उदबत्ती; अगरबत्ती.

**उदकील** वि. पूर्व दिशा.

**उदकुंभ** पु. पाणी भरलेला घट; पाण्याचा घडा, कळशी (धार्मिक विधीत उपयोग) : आली घरासि युवती उदकुंभ ठेवी.– आकू १०. २. (चुकीने मृत्कुंभाबद्दल) मातीचा घट; मडके; पाण्याचा घट : 'त्याणीं उदकुंभाची प्रार्थना केली आहे.'– पेद ३८.९८. [सं.]

**उदकुंभदान, उदकुंभश्राद्ध** न. मृताच्या अकराव्या दिवसापासून एक संवत्सरपर्यंत (अब्दपूरित श्राद्धापर्यंत) मृताला उद्देशून दररोज करायचे श्राद्ध. यात ब्राह्मणास उदकुंभाचे दान करतात. ते श्राद्ध रोज करणे शक्य नसल्यास एकच दिवस श्राद्ध करून दररोज नुसते उदकदान व आमान्न दान करतात अथवा वर्षाचे धान्य एकदमच देतात.

**उदगयन** न. सूर्याचे उत्तर दिशेकडे जाणे. पहा : **उत्तरायण** : 'उदगयन होय तोंवरि मी शरतल्पीं असाचि राहेन ।' – मोभीष्म ११.१२४. [सं.]

**उदगा, उदगामादगा** वि. रागीट; उद्धट; माजोरी.

**उदगिरी** स्त्री. एक क्षुद्र देवता : 'उदगिरि देवी म्हणे स्वामीसी । देवा तूं उदयगिरिवरी पावलासी । आमुचा पूजामान चालवी जनासी । तुझ्या भजनासी विश्व लाऊं ।'– सप्र ५.२२.

**उदग्गोल** पु. क्रांतिवृत्ताचा उत्तरेकडील अर्धा भाग. [सं.]

**उदग्र** वि. १. ऊर्ध्व; सरळ उभा. २. क्षितिजरेषेशी काटकोनात असलेला. ३. (समाज.) समाजातले वर्ग, गट यांचा दर्जा, सत्ता, स्थान यांना सरळ रेषेत वर नेणारी किंवा खालच्या पातळीवर आणणारी प्रक्रिया.

**उद्घाट** पु. उपक्रम; सुरुवात : 'यंदा सारेच गोष्टीचा उद्घाट चिरंजीव बाजी राऊ उत्तरप्रांती गेले असता करावयाचा नव्हता.'– पेद ३३.३२७.

**उदटणे** अक्रि. पसरणे.

**उदधि–धी** पु. समुद्र; सागर : 'जैसा गंगेसी उदधि । निरंतर ।।' – ज्ञा २.२४१. [सं.]

**उदनी** स्त्री. उडवीमध्ये पाणी जाऊ नये म्हणून ती वर निमुळती करीत नेतात आणि गवत किंवा पेंढा यांनी तीं शिवतात, असा केलेला उडवीचा निमुळता भाग. (गो.) [सं.]

**उदप** पु. पाण्यातील जीवजंतू; पाण्यात वास करणारा प्राणी : 'मग उदपासि म्हणे उदधी । तुम्ही सीत कोरावें स्वबुद्धी ।।'– कंथा २.१४.११६. [सं.]

**उदफाळणे** उक्रि. फाडून तुकडे करणे; चिरून, फाडून टाकणे; धुव्वा उडवणे. [सं. उत्स्फालन]

**उदफूल** न. उदाचे फूल; उदाची लाही; लोखंडी तव्यावर लोह उदाला आच देऊन त्याची पंचपात्रात धरलेली वाफ. ही वाफ तुंब्याच्या

फुलासारखी व शुभ्र असते. [फा.]

**उदबत्ती** स्त्री. उदकाडी; अगरबत्ती; ऊद, धूप व इतर काही सुगंधी पदार्थ वाटून त्यांचा लेप एका काडीस देतात. ही पेटवली म्हणजे सुगंधी धूर हवेत पसरतो.

**उदमस्त, उदमात** वि. उन्मत्त; बेफिकीर; गर्व अवहेलना करणारा; माजोरी. (को.)[सं. उन्मत्त]

**उदमी** पु. १. उदीम करणारा; व्यापारी; क्रयविक्रय करणारा; दुकानदार. २. उद्यमी; उद्योगी; पुढारी : 'ब्राह्मणांनींच उदमी व्हावें असें आम्हीं म्हणत नाहीं.'– लोटिकेले ४.२२८. [सं. उद्यम]

**उदमीचाल** स्त्री. १. व्यापारी पद्धती. २. व्यापारी लोकांची राहणी, चालीरीती वगैरे. ३. व्यापारी लोकांचा डाव.

**उदमेख** पु. उद्योगीपणा; आवड; हौस; तत्परता; उत्सुकता; आतुरता. (क्रि. करणे.) (को.) [सं. उन्मेष]

**उदमेखी** वि. उत्सुक; आतुर; आवड असलेला वगैरे.

**उदमेखून** क्रिवि. १. मुद्दाम; निक्षून; आवर्जून. २. मनाचा पूर्ण निश्चय करून; स्वत:च्या आवडीनें; पूर्ण कल्पना येऊन. सहज किंवा यदृच्छेने याच्या उलट.

**उदम्ल** न. (शाप.) प्राणवायू नसलेले आम्ल. [सं.]

**उदय** पु. १. उगवणे; क्षितिजावर येणे; दिसणे (सूर्य, तारे इ.) : 'पूर्व दिशे उदयाला भानू आला उदयाचला ।'– पला २२. २. दृश्य होणे; दिसू लागणे (शुक्र, बुध इत्यादी ग्रह सूर्यापासून दूर झाल्यामुळे.). ३. उत्पन्न होणे; प्रादुर्भाव ; उद्भव; वर येणे; फुटणे (फुले, अंकुर, विकार वगैरे. जसे : पुष्पोदय, कामोदय, क्रोधोदय इ.). ४. उठणे; बाहेर येणे; फुटणे (केस, घाम, इत्यादी शरीरावर जसे :– घर्मोदय). ५. उत्कर्ष; भरभराट; महत्पद प्राप्त होणे; वर डोके काढणे. [सं.] (वा.) **उदयास येणे**– प्रसिद्धीला येणे; अभ्युदय होणे.

**उदयगिरि–री, उदयाचल–ळ** ज्या पर्वताच्या आडून सूर्यचंद्राचा उदय झालेला दिसतो तो (काल्पनिक) पर्वत; ज्या भागातून उदय होतो तो भाग : 'उठि लौकर वनमाळी उदयाचळीं मित्र आला ।'– होला १६. [सं.]

**उदयलग्न** न. (ज्यो.) उदय पावत असलेली रास; राशीचा उदय. [सं.]

**उदयांसी** क्रिवि. दुसऱ्या दिवशी : 'उदयांसीं फीटे तवं तेथें असति :' – लीच १.१०.

**उदयोन्मुख** वि. १. दिसू लागणारी; प्रथम प्रादुर्भूत होणारी : 'उदयोन्मुख परमसहिष्णुतेत व कार्यदृष्टित्वांतच पंडितजींच्या भावी यशाचे बीज आहे.'– स्वभा २८. २. (ल.) ज्याच्यामध्ये भावी विकासाची चिन्हे दिसतात असा; ज्याच्या उदयाची चाहूल लागली आहे असा (लेखक); प्रकाशात येऊ लागलेला (कवी इ.). [सं.]

**उदर** न. १. पोट; कोठा; जठर : 'उकार उदर विशाल ।'– ज्ञा १.१९. २. पोटफुगी; विकाराने फुगलेले पोट; पोटातील एक रोग. उदा. जलोदर, वातोदर, सर्पोदर वगैरे. ३. (कृषि.) (पाण्याचे अजीर्ण) कांदे, बटाटे इत्यादी भूमिगत पिकांना पाणी फार झाले तर सूज येते व तो भाग कुजतो त्याला म्हणतात. ४. गर्भाशय; कूस; कुक्षी : 'अगा वासुदेवाचिये तपप्राप्तीं । श्रीकृष्ण देवकी उदरा येती ।' – एरुस्व १.१०. [सं.] (वा.) **उदरी येणे**– एखादा ग्रह जन्मराशीस येणे; यथेच्छ खायलाप्यायला, उपभोग घ्यायला मिळण्याजोगी दशा येणे (निंदाबोधक). **उदरी शनी, शनैश्वर येणे**– (ज्यो.) शनी जन्मराशीस येणे, चांगली दशा प्राप्त होणे; ऐश्वर्य मिळणे.

**उदर** स्त्री. (नाविक.) उत्तर दिशा; धुरू दिशा. [सं. उत्तर]

**उदर** न. (नृत्य.) पोटानें केलेले निरनिराळे अभिनय. नृत्यामध्ये उदराच्या चार प्रकारच्या अवस्था होतात– क्षाम, खल्ल, पूर्ण व सम. [सं.]

**उदरणे** अक्रि. ओकणे : 'दुदाची बालकें मारिती । तीं रक्तासवें दुद उदरती ।' – ख्रिपु २.१३.३०. [सं. उद्+गॄ]

**उदरतलपाद** वि. (प्राणि.) गोगलगाय इत्यादी पोटाने सरपटणारे (प्राणी).

**उदरदरी** स्त्री. पोट; पोटाची खाच.

**उदरनिर्वाह, उदरपूर्ती, उदरपोषण, उदरप्रवृत्ति, उदरवृत्ति** पु. स्त्री. न. १. चरितार्थ; उपजीविका; पोषण; उदरंभरण; क्षुधाशांती : 'भिक्षा मागुनी क्षेत्राभीतरीं । उदरनिर्वाह करितसे ।।' – नव १३.६०; 'उदरप्रवृत्तिकारणें । मोळ्या आणून विकीतसे ।।' – संवि २१.१४. २. उपजीविकेचे, चरितार्थाचे साधन; जीवन; पोटापाण्याची सोय. ३. पोट भरणे; केवळ जगणे; जीव जगविणे; पोट चालविणे.

**उदरपिशाच्च** पु. अतिशय खादाड; आधाशी; खाबू.

**उदरभरण** न. १. अन्न सेवन करणे, खाणे, जेवणे; भोजन. पहा : **उदरनिर्वाह** : 'उदरभरण नोहे जाणिजे यज्ञकर्म ।' २. कसातरी निर्वाह करणे.

**उदरसूत्र** न. (ग.) (वर्तुळाचा) व्यास; वर्तुळाच्या मध्यबिंदूतून जाणारी परिघमर्यादित रेषा. [सं.]

**उदरंभर, उदरंभरी** वि. १. भोजन भाऊ; पोटभरू; पोटार्थी; खादाड : 'पीतां मरंद उदरंभर बंभराचे ।' – नल ३८. २. स्वार्थसाधू; आपमतलबी : ' बरेच प्रोफेसर... उदरंभरी लोक आहेत.'– लोटिकेले २.५१४. ३. पोट भरण्याखेरीज काही न करणारा; स्वत :च्या निर्वाहाखेरीज अन्यत्र न पाहणारा (देश–समाज–सेवा इ. इतर काही न करणाऱ्याला म्हणतात).

**उदराची खाच** पोटाची खळगी 'आपुली खांच उदराची'– संग्रामगीते १३३.

**उदराडकान** स्त्री. वनस्पतीविशेष. पहा : **उंदीरकानी** (गो.)

**उदरी** वि. १. ज्याला उदररोग झाला आहे असा; पोट फुगलेला. २. अतिशय लठ्ठ; दोंदील; पोट पुढे आलेला. ३. उदराचा; उदरा–पोटासंबंधीचा.[सं.]

**उदर्क** न. परिणाम; शेवट.

**उदर्क** पु. वाढ; उत्कर्ष.

**उदर्क** पु. पुढे होणारी गोष्ट; भवितव्य; भविष्य. [सं. उद+ अर्क= सूर्य]

**उदर्ककाळ** पु. भविष्यकाळ.

**उदर्कचिंतन** न. पुढे होणाऱ्या गोष्टीबद्दलचा विचार.

**उदर्कफल** न. परिणाम; पर्यवसान; निष्पत्ती; शेवट.

**उदर्गत** स्त्री. उपाय; इलाज. (गो.) [सं. उद्धार +गति]

**उदव** उद्गा. उदय असो. पहा : **उदो** १. देवीचे भक्त भिक्षेला निघाले म्हणजे देवीपुढे 'उठ ! तुझा जय होवो' अशा अर्थाचा हा शब्द उच्चारतात. उदयोस्तु (देवीला नैवेद्य दाखवताना म्हणतात.). २. उजेड या अर्थी

निंदाव्यंजक उद्गार. [सं.उदय] (वा.) **उदव करणे, उदव लावणे–** (उप.) उजेड पाडणे; पराक्रम करणे; महत्कृत्य करणे.

**उदवणे** पहा : **उदव करणे**

**उदवणे, उदविणे** उक्रि. उदाच्या धुराने सुगंधित करणे; ऊद जाळणे; उदाचा वास लावणे, धुरी देणे (केस, ताईत, पाणी वगैरेंना) : 'लहानपणी मंगलदिवशी न्हाऊन केस उदवीत मी उभी राहायची.' – ययाती २७२.

**उदवात** पहा : **उदबत्ती** (गो.)

**उदश्रु–श्रू** वि. रडणारा; रडका. [सं. उद्+अश्रु]

**उदसणे** सक्रि. उदास, ओसाड करणे : 'त्याने असे का सगळे उदसून टाकले ?'– डोह ८०.

**उदळणे** अक्रि. उसळणे; उधळणे : 'जैसी खळाळिचेया उदका । सरिसीं उदळे चंद्रिका ।'– राज्ञा १५.४६५.

**उदंड** वि. क्रिवि. पुष्कळ; भरपूर; अनेक; असंख्य; फार (संख्या, परिमाणवाचक) : 'तयाच्या ठायीं उदंड । अज्ञान असे वितंड ।' – ज्ञा १२.६९२. [सं. उद्+ दंड]

**उदंत** पु. १. इत्यंभूत वार्ता; साद्यंत वृत्तांत, हकीगत : 'आईकिजे सर्व उदंत कानीं ।' –सारुह ६.८. [सं.]

**उदंत** पु. १. शुद्ध अंत :करणाचा मनुष्य. २. उद्योग करून पोट भरणारा माणूस. [सं.]

**उदंबर** पु. उंबर; औंदुबर : 'वाढितां उदंबरे सरिसें । पूरकांसी ।।' – ऋ ८२. [सं. उंदुबर]

**उदंमुळ** वि. उन्मत्त. (गो.)

**उदा** वि. निळसर; उदी रंगाचा. (ना.)

**उदाणी, उदाणे** स्त्री. न. ऊद जाळण्याचे भांडे; धूपदाणी; ऊददाणी.

**उदाणू, उदानू** वि. (नंदभाषा) तीन; व्यापारी भाषेतील सांकेतिक संख्यावाचक शब्द : 'मुळु उदानु अंगुळु ऐसी । नंदभाषा सांगितली त्यासी ।'– भावि ४२.४५.

**उदाणे** न. भर, बहर : ' जें विचारांचे उदाणें' –ज्ञा. ८.१४१.

**उदात्त** वि. १. उच्च; श्रेष्ठ (मनाची अवस्था); मोठा; दाता; उदार. २. स्पष्ट, व्यक्त (स्वर); तीव्र, तीक्ष्ण (आघात); उंच; मोठा कर्कश; (आवाज); वैदिक संस्कृतच्या तीन आघातांपैकी सर्वांत उंच आघात.

**उदात्त स्वर** पु. (भाषा.) तीव्र, उंच स्वर. वैदिक भाषेच्या संदर्भातच हा शब्द वापरतात. वैदिक भाषेतील आघातव्यवस्था.

**उदात्तीकरण** न. १. मन क्षुद्र विचारांच्या पलीकडे फार वर जाणे; मन उच्च पातळीवर जाणे; सामान्य विचारांना उच्च स्वरूप देणे; भावना उच्च, उन्नत पातळीवर जाणे; भावनांचे एक प्रकारे परिष्करण होणे. २. माणसांच्या शृंगार, वात्सल्य इ. मूलभूत भावनांचे, सहज प्रवृत्तींचे शोधन करून त्यांचा सर्जनशील कामासाठी उपयोग करणे. [सं.]

**उदान** पु. १. पाच प्राणवायूंपैकी एक वायू. हा कंठातून मस्तकात चढतो : 'उर्ध्वमुखें कंठाकडे फुगारा । जो धरी पोटांत वारा । त्या प्राणाचिया प्रकारा । उदान नामें जाणावें ।।'– यथादी १७.१००२. २. मृत्युसमयीचा श्वास, धाप; ऊर्ध्व.[सं.] (वा.) **उदान लागणे–** फार खाल्ल्यामुळे, रोगामुळे श्वासोच्छ्वास मोकळेपणाने करता न येणे; दम लागणे; श्वास कोंडणे.

**उदानका** पु. पैसा. (नंदभाषा)

**उदार** वि. १. मोठ्या मनाचा; कनवाळू; थोर मनाचा; धर्मात्मा : 'जियें उदारें ज्ञानमकरंदें ।'– ज्ञा १.१८. २. मोकळा; धीट; प्रशस्त; उघड्या मनाचा. संकुचित, कुढा, कृपण, कंजूष, अरुंद यांच्या उलट. (माणूस, भाषण, स्वभाव, होडी, जागा, गाडी, खोली वगैरे). ३. सढळ; खर्चिक; दानशील. चिक्कू, कृपण याच्या उलट. [सं.]

**उदारकर्ण** वि. १. कर्णासारखा उदार; दानशूर; मोठा दाता. २. (उप.) कृपण व कंजूष (मनुष्य).

**उदार धोरण** खुल्या दिलाचे, प्रतिपक्षावर अधिक विश्वास ठेवण्याचे, मोठ्या मनाचे धोरण : 'लॉर्ड कर्झन यांच्या कारकीर्दीचे धोरण रिपन साहेबांच्या उदार धोरणाच्या अगदीं उलट झालें आहे.'– लोटिकेले ३.४०.

**उदार पक्ष** (राज्य.) व्यापक विचारांच्या लोकांचे (लिबरल) मंडळ; प्रागतिक पक्ष.

**उदारमतवाद** पु. (समाज.) १. प्रगती व सुधारणा यांना अनुकूल असे राजकीय व सामाजिक विचार मांडणारी सरणी, मत. २. प्रतिपक्षीयांच्या विचारांचा आदर करणारी विचारसरणी. ३. जे सुख किंवा सवलती स्वत:ला हव्या त्या इतरांनाही मिळाल्या पाहिजेत असे मानणे. अन्याय किंवा रुढीविरुद्ध जाणे. ४. कोणत्याही प्रकारची विषमता असू नये व मतमतांतरबद्दल व्यापक दृष्टी असावी असे प्रतिपादणारे मत; प्रागतिकता. [सं.]

**उदारमतवादी** वि. (राज्य.) राजकीय व सामाजिक विचारांच्या बाबतीत पुरोगामी व सुधारक; इतरांच्या मतांबद्दल आदर व सहिष्णुता असणारा; विचाराने व वर्तनाने उदार; नेमस्त; मवाळ : 'सर्व प्रकारची चौकशी करण्याकरितां लॉर्ड डरहॅम या उदारमतवादी मुत्सद्याची रवानगी करण्यात आली.'– वस्त्र ६४. [सं.]

**उदारलक्षण** वि. १. उठावदार; रुबाबदार; मर्दानी (चेहरा, लक्षणे). २. भाग्यशाली; मोठेपणाची (लक्षणे, चिन्हे).

**उदार शिक्षण** न. उदारपणाचे शिक्षण; ज्यामुळे मनाचा विशेष विकास होतो व बुद्धी व्यापक होते असे शिक्षण.

**उदाराचे पोते** न. दुसऱ्याची मालमत्ता चैनीने व सढळ हाताने खर्च करणारा मनुष्य; हलवायच्या घरावर तुळशीपत्र ठेवणारा.

**उदारांग** वि. (उप.) प्रशस्त शरीराचा; तुंदिलतनू; लठ्ठ; भव्य शरीराचा.

**उदारीव** न. उदारपणा.

**उदावर्त** पु. आतड्याचा एक रोग; पोटातील आतड्यांमध्ये अडथळा झाल्यामुळे होणाऱ्या वेदना, रोग. [सं.]

**उदावादा** पु. पूर्णत्व; प्रकटपणा : 'तैशा चहूंभुजीं उदावादा । सगुण देखोनि गोविंदा ।'– एभा ११.१४७५.

क्रिवि. सढळपणे; उघडउघड : 'म्हणौनि इंद्रिये तेचि संपदा । वेचितांहीं उदावादा ।'– ज्ञा १३.३०६. [सं. उदयवादित्व]

**उदास** वि. १. उद्विग्न; दु :खी; खिन्न; आकर्षण नसलेला; निरुत्साही; नाराज; कष्टी : 'झाला कंठस्फोट आळवितां । उदास आतां न करावें ।'–

तुगा ७०९. २. बेपर्वा; निष्काळजी; बेफिकीर; तटस्थ : 'तरि जो या देहावरी । उदासु ऐसिया परी ।'– ज्ञान १३.५९४. ३. नि:स्पृह; उपेक्षाबुद्धी; निरपेक्ष. ४. विरक्त; नि:संग; निर्विकार : 'केवळ पापीहि प्रस्तावले । उदासपंथ देखोनिया ।'– सप्र १२.१४. ५. व्यर्थ; फुकट : 'तुका म्हणे माझी पुरवावी आस । विनति उदास करूं नये ।।'– तुगा ८२८. ६. ओसाड; निस्तेज; निरानंद; भयप्रद; भयाण जागा, (गाव, घर. ७. निष्क्रिय.

पु. गोसाव्यांचा एक पंथ. पहा : **उदासी**[सं.] (वा.) **उदास करणे–** उदासीनता स्वीकारणे; अंगाबाहेर टाकणे : '...उदास न करितां सदरहू ऐवजाची तरतूद करून द्यावी.'– ऐलेसं ४१८७. **उदास जाबसाल करणे किंवा जाबसाल उदास करणे–** शुष्क उत्तर देणे : '...आपले तर्फेनें उदास जाबसाल करावा, पैका येकंदर देऊं नये.'– ऐसंसाखं ७.१९.

**उदासणे** अक्रि. उद्विग्न; उदास, खिन्न होणे : 'खेडींपाडीं भलताच लुटितो कुणब्याचा जीव उदासला.'– अफला ६८. (वा.) **उदासता करणे–** उदासीनता करणे; अंगाबाहेर टाकणे : '...त्याजमुळे आपण उदासता केली आहे.'– पेद ११.४६.

**उदासन** पु. उदासीनता; बेपर्वाई : 'जेतुके कष्ट मज भोगले । जे इजिप्तांतु साहिले ।। तेया होउनि अदिक जाहाले । उदासन तुझें ।।'– ख्रिपु १.१४.११२.

**उदासनी** स्त्री. उदासपणा : 'चटपटी लागली उदासनी मना ।'– दावि २३६.

**उदासमातगा** वि. बेफिकिर; बेदरकार; उदासीन; अनास्थेखोर : 'विचारे करून पाहता येथील कारभार उदासमातगा आहे.'– पेद २०.१३२.

**उदासवचन** न. खिन्न मनाने केलेले भाषण : 'उदासवचनें ऐकोनि सत्वरी । अश्रुपात नेत्रीं वाहती ।।'

**उदासवाणा** वि. खिन्न झालेला.

**उदासस्थिति–ती** स्त्री. निष्काळजीपणाची वृत्ती; बेफिकिरी; खिन्नता.

**उदासिनीकरण** न. (रसा.) एखाद्या द्रवातील अम्लता किंवा अल्कता नाहीशी करण्याची क्रिया. [सं.]

**उदासी** पु. १. गोसाव्यांचा पंथ; या पंथातील गोसावी, बैरागी. २. शिखांचा एक प्रमुख पंथ; त्याचा अनुयायी; नानकपुत्र असेही या पंथाचे नाव आहे. याचे चार भेद आहेत–बाबाहसन, फूल, गोंदा व अल्मस्त. सर्वांची एक सभा असून तिला बडा आखाडा असे नाव आहे. हे लोक ब्रह्मचर्य पाळतात.

**उदासी** स्त्री. उदासपणा; नाराजी : 'मघाच्या पाहुण्याचा चेहरा पाहून त्याच्यात जी एक उदासी आली होती ती पार नाहीशी झाली होती.'– बाविबु २२४.

वि. निराश; खिन्न; उदासीन; निष्काळजी; बेफिकीर. पहा : **उदास** : 'तप करिती अरण्यवासी । त्यासी करितोसी उदासी ।।'– गुच २.१३६.

**उदासीन** वि. १. विरक्त; वीतरागी : 'उदासीन जो तापसी ब्रह्मच्यारी ।।'– राम ५०. २. खिन्न; दु:खी. ३. निष्काळजी; बेपर्वा : 'तंव नोहावें यागादिकीं । उदासीन ।।'– ज्ञा १८.१५२. ४. तटस्थ; नि: पक्षपाती; ज्याला कोणी शत्रू किंवा मित्रही नाही असा; मध्यवर्ती; मध्यस्थ: 'तये देहबुद्धीचें लक्षण । सुहृददुर्हृद उदासीन । त्रिविध त्रिगुण करी मन । देहाभिमान उपजवी ।।'– एरुस्व १३.५१. [सं.]

**उदासीन जाती** (वन.) एका विशिष्ट प्रकारच्या स्थलाबद्दल व पादपसमुदायाबद्दल विशेष आस्था (निष्ठा) न दर्शवणारी जाती.

**उदासीनता** स्त्री. १. वैराग्य; विरक्ती : 'उदासीनता तत्त्वता सार आहे ।।'– राम ५७. २. बेपर्वाई.

**उदासीन वायू** (रसा.) कोणत्याही रासायनिक प्रक्रियेत क्रियाशील नसलेला वायू. [सं.]

**उदाहरण** न. १. दाखला; दृष्टांत; नियम, विधान इ. स्पष्ट करणारी किंवा पटवणारी गोष्ट : 'अक्षरें तिसऱ्या पादीं । उदाहरण शेवटीं ।' – वृत्तदर्पण ११. २. नमुना; कित्ता. ३. (ग.) गणितातील नियमाप्रमाणे सोडवण्याचा प्रश्न; (सामा.) प्रश्न. [सं.]

**उदाहरणीकरण** न. (तत्त्व.) सामान्य विधान एखाद्या विशिष्टाला लागू करून दाखविण्याची क्रिया. [सं.]

**उदाहृत** वि. उदाहरण देऊन सिद्ध केलेले, स्पष्ट केलेले, सांगितलेले. [सं.]

**उदाळणे** अक्रि. उसळणे; उडणे; उडवणे; वर येणे. पहा : **उधळणे** : 'जैसी खळाळीचिया उदका । सरसीं उदाळे चंद्रिका ।'– ज्ञा. १५.४९८. [सं. उद्+दल्]

**उदित** वि. १. उगवलेला, उदय पावलेला; वर आलेला (ग्रह, तारा इ.) : 'नाना उदितें दिवाकरें ।'– ज्ञा १७.१७८. २. फुगलेला; मोठा झालेला. ३. (नशीब) उघडलेला; उत्कर्ष पावलेला; अनुकूल (दैव, भाग्य) : 'कोण्या काळें होईल नेणों भाग्य उदित वो ।' –तुगा ११७. ४. (मनोविकार) उत्पन्न झालेला; उठलेला; प्रबल झालेला : 'परि साचोकारें उदितें । प्रेमभावें ।।'– ज्ञा १०.११५. ५. काही कृती करायला निघालेला; सज्ज; उद्युक्त; तयार; तत्पर : 'युद्धा येईल विराटदळ । म्हणोनि योद्धे उदित सकळ ।'– मुविराट ६.४४. ६. सांगितलेले; बोललेले (भाषण) : 'घालविलें मज रायें मानुनिया मदुदितें हितें अहितें ।'–मोवन १.२०. ७. जागा झालेला. [सं.]

**उदितकार्य** न. आकस्मिक उद्भवलेले अंगावर पडलेले कार्य.

**उदितकाळ** पु. भाग्याचा काळ; उत्कर्ष; भरभराट; पैसा इत्यादींच्या दृष्टीने चांगला काळ; उत्कर्षाचा काळ. [सं.]

**उदित ग्रह** (ज्यो.) १. जेव्हा ग्रह आपल्याला दिसतो तेव्हा तो ग्रह उदित आहे असे समजतात. २. फलज्योतिष्यात एखाद्या स्थानात आरंभी एखादा ग्रह असल्यास त्या स्थानात तो उदित आहे असे म्हटले जाते.

**उदिते** न. ज्योत; तेज : 'तेणें विझौनि जाये उदितें । अग्निचें जेव्हां ।।'– राज्ञा ८.२११.

**उदिदिन** न. (शाप.) एक रासायनिक द्रव्य. यापासून रंग काढतात.

**उदिन** न. (शाप.) उज्ज व कर्ब यांचा संयुक्त पदार्थ.

**उदिपणे** अक्रि. १. उगवणे; उदयाला येणे; निघणे; उत्पन्न होणे : 'सूर्यापासूनि प्रभा उदिपे । ते प्रभाचि सूर्य केवि म्हणिपे ।'– स्वादि १४.१.५. २. पेटणे; प्रकाशणे : 'मग इंधनिं आगि उदिपे ।'– राज्ञा ११.६८२. [सं. उद्+दीप्]

**उदिमदार** पु. व्यावसायिक; उदमी; व्यापारी : 'तों सन्निधीं येऊनि उदिमदार'- दावि ४२९.

**उदिमी** पु. व्यापारी. पहा : **उदमी** : 'वेदशास्त्रसंपन्न झाला । त्यावरि पोट भरूं लागला । तरी तो उदिमी थोर झाला ।'- एभा ११.५४८. [सं. उद्यम] वि. व्यापारासंबंधी, धंद्यासंबंधी.

**उदी** वि. उदासारखा; पिंगट; तपकिरी : 'तेथील खडक चमत्कारिक उदी रंगाचा असे.'- पाव्ह ४१.

स्त्री. १. उदाची राख. पिराजवळ जाळलेल्या उदाची राख प्रसाद म्हणून घेतात : 'वानुनि प्रताप श्रद्धाउदी देऊं ।' - दावि ३५३. २. उदाच्या राखेची शपथ (मुसलमान लोक घेतात). ३. अंगारा. ४. उदी रंगाचे वस्त्र. [फा. ऊद] (वा.) **उदीवर हात ठेवणे**- उदीची शपथ घेणे; उदीला स्पर्श करून शपथ घेणे : 'तुमचा विश्वास साहेबाचे ठायी आहे. त्याची उदीवर हात आम्ही ठेवितो.' - ऐलेपाम्युप्र ७३.

**उदीचि-ची** स्त्री. उत्तरदिशा : 'उदीची प्रतीची तथा मुख्य प्राची । दिसे दक्षिणेमाजि विश्रांति ज्याची. ' [सं.]

**उदीचीन, उदीच्य** वि. उत्तरेकडील. [सं.]

**उदीम** पु. १. कामधंदा; व्यापार; व्यवहार; देवघेव; उद्योग : 'तुम्ही काहिं उदीम न करा.'- पंच १.३५. २. (व्यापक) शेतीचे उत्पन्न, पीक; बागाईत; मळा. ३. उपद्व्याप; भानगड. (व.) ४. (सामा.) व्यवहार ; काम; योजना : 'मग रामासि म्हणे नारद । हा उदीम जाहला फलद । जंबुद्वीपाचा तुटला कंद । भूपाळांचा ।।'- कथा २.१४.३७.[सं. उद्यम] (वा.) **उदीम करणे**- १. व्यापार, उद्योगधंदा करणे. २. (ल.) व्यापारात खोट, नुकसान येणे; व्यापारात फसणे.

**उदीमधंदा-व्यवसाय-व्यापार, उदीमपादीम** पु. धंदा; व्यवहार.

**उदीमपट्टी** स्त्री. व्यापारावरील सरकारी कर.

**उदीमी** पु. व्यापारी : 'हे टाकूनि उदिम्या तोंडावरी ।'- दावि २६२. वि. व्यापारधंद्यासंबंधी (जिन्नस, माल, व्यवहार इ.).

**उदीय** स्त्री. सकाळ; पहाट.

**उदीयां** क्रिवि. सकाळी; उजाडताना :'ते उदीयां उठी : पालवा पीळा घे :'- दृपा ५०.

**उदीसर** वि. उदी, तपकिरी रंगाचे.

**उदुलहुकुम** पु. आज्ञाभंग; बंडखोरी; हुकमाची अवज्ञा : 'निर्मलकरास ताकीद जाहालिया तो उदुलहुकुम करणार नाही.'- पुणे अखबार भाग १.११२. [फा.]

**उदुंबर** पु. औदुंबर; उंबर; एक वृक्ष. [सं.]

**उदुंबरमशक** पु. अव. उंबरातील किडे.

वि. या किड्यांप्रमाणे गर्दी असलेले; थवे असलेले, बुजबुजलेले; भरलेले.

**उदे** न. पाण्यातील एक जनावर. पहा : **ऊद** (राजा.)

**उदेउदे** उद्गा. उदोउदो करणे; अतिशय स्तुती करणे; प्रस्थ माजविणे; जयजयकार करणे. पहा : **उदो, उदव** [सं. उदय]

**उदेग** पु. उद्योग; खटपट : 'पुढेहि दिनप्रतीनें राजश्री प्रतिनिधी ये गोष्टीचा उदेग करितात.'- पेद १०.८३. [सं. उद्योग]

**उदेग** पहा : **उद्वेग** : 'राजिक देविक उदेग चिंता । अन्न वस्त्र देहममता ।।'- दास ११.३.५.

**उदेजणे** अक्रि. १. उदय पावणे; उगवणे : 'जसा अनेक होळियां दिनेश हो उदेजुनी । प्रकाशनी पदार्थ ही अपार रश्मिच्या गणीं ।'- हस्तामलक ९. (शिवरामकृत). २. उत्पन्न होणे : 'अरिष्टें उदजियेती काळें ।'- मुआदि २६.९८. [सं. उदय]

**उदेणे** अक्रि. १. उगवणे; उदय पावणे : 'जो उदेला गांवेंसीं खाये । दोहींतें यया ।।'- ज्ञा १५.४७३. २. उत्पन्न होणे; बाहेर निघणे : 'हाणीतसे फडफडां ध्वनि हो उदेला ।'- नल ९०. ३. नशीब फळफळणे; उत्कर्ष पावणे : 'अघटितघटणेनें दैव किंवा उदेले ।'- सारुह २.११२. [सं. उद्+इ]

**उदेती** स्त्री. उगवती; पूर्व दिशा. (गो.)

**उदेल-ला** उदाचे तेल; उदाचा अर्क.

**उदेला** क्रिवि उदयाला; उद्या : 'गोष्टी चालत्या उदेला रंगाचा समारंभ करण्याचा.'- शादवे २५.

**उदेव** पहा : **उदय** : 'सूर्य उदेवो करी तेथौनि ।'- ख्रिपु १.१.८५. (गो.)

**उदेवणे** अक्रि. उदय पावणे. पहा : **उगवणे** (गो.) [सं. उदय]

**उदेसलिफ** पु. भुईकोहळा. [फा.]

**उदै** क्रिवि. उद्या : 'उदै करील अयोध्याप्रवेशु ।'- कृमुरा ७३.९०.[सं. उदय]

**उदैजणे** अक्रि. उगवणे; उदय पावणे. पहा : **उदेजणे** : 'उदैजणें केतूचें जैसें ।'- ज्ञा १६.३१९. [सं. उदय]

**उदैणे** अक्रि. १. उदयाला येणे; उगवणे; 'तंवं उदैला दिनकरू ।'- दाव ३१६. २. उत्पन्न होणे : 'कांईं सांघांल उदैलें । तें जाणवेना ।।'- शिव ११५. ३. जागा होणे.

**उदो** पु. १. उदय : 'तवं उदो जाला दीनकरू ।'- उषा २८.१२. २. प्रादुर्भाव; उत्पत्ती. ३. विजय; उदयोस्तु, जागी हो असा शब्द; आनंदाची आरोळी. पहा : **उदव, उदे उदे** : 'नाहीं जाळीत भणदीं । उदो म्हणोनि आनंदी ।'-तुगा १८१६. ४. जयजयकार : 'उदो बोला उदो. सद्गुरू माउलीचा वो.'- श्रीयो २.१८६. ५. उत्साह; उल्हास : 'मन उदो नाही.'- गस्तो १०६.[सं. उदय] (वा.) **उदो उदो करणे**- टिमकी वाजवणे; खुशामत करणे; मोठेपणा देणे; स्तुती करणे.

**उदो** पु. नाश : 'सुकृताचा उदो केला । गोंधळ घाला इंद्रियें ।।'-तुगा ४०९. गोंधळ घालायच्या वेळी दिवटी पाजळून तेल वगैरे जाळतात व उदो उदो म्हणतात. या क्रियेला उद्देशून पेटवणे, जाळणे, नाश करणे असा अर्थ झाला असावा.[सं. उदय] (वा.) **उदो करणे**- जाळून टाकणे; नाश करणे.

**उद्गत** वि. १. उगवलेला; उत्पन्न झालेला; निघालेला; उद्भूत. २. वर गेलेला, चढलेला. ३. बाहेर आलेले ; (ल) पाठ असलेले : 'कर्मकांड तरी जाणे । मुखोद्गत पुराणें ।।'- ज्ञा १३.८२९.

**उद्गदणे** अक्रि. उफाळणे; खवळणे; उसळणे; आवाज़ करणे. [सं. उद्+गद्]

**उद्गम** पु. १. उगम; मूळ; प्रारंभ; प्रादुर्भाव; जन्म; झरा (लक्षणेने व शब्दश:- नदी, चाल, भांडण, रूढी, भाषा इत्यादींचा). २. वर जाणे, चढणे, उडणे. [सं. उद्+गम्=जाणे] ३. बाहेर जाणे. (देशाच्या).

**उद्‌गमन** न. १. (तत्त्व.) विशेष गोष्टींवरून सामान्य सिद्धांत काढणे. २. (समाज.) समारंभपूर्वक एखाद्या प्रतिष्ठित पदावर-जागेवर प्रतिष्ठापना. [सं.]

**उद्‌गमन पद्धती** (तत्त्व.) प्रयोग, अनुभव वा प्रयोगजन्य पुरावा यावरून सर्वसामान्य सिद्धांत काढण्याची पद्धती.

**उद्‌गम प्रमाणपत्र** (अर्थ.) निर्यातिक देशाच्या सीमाशुल्क अधिकाऱ्याने तो माल कोणत्या देशातून निर्यात होत आहे हे दाखविण्याकरिता सही करून दिलेला लेख, प्रमाणपत्र.

**उद्गाता** पु. १. यज्ञातील सामगान करणारा ऋत्विज : 'उद्गाता कौत्समुनी पिंगळ अध्वर्यु त्या मखी होता ।' – मुआदि ७४. २. नवीन विचार प्रथम सांगणारा; प्रवर्तक. [सं. उद्+गै= गाणे]

**उद्‌गामी** वि. वर जाणारा, चढणारा, निघणारा, अनुमानशक्तीचा एक भेद; दुसरा भेद अवगामी. [सं.]

**उद्‌गार** पु. १. उच्चार; बोलणे; तोंडातून निघालेला ध्वनी, शब्द; बोधवचन : 'मियां घाले तेणें उद्‌गारें । लागति गर्जो ।।'– राज्ञा १०.१०९. २. विकारप्रदर्शन. उदा. क्रोधोद्गार, आनंदोद्गार, आश्चर्योद्गार वगैरे; अहाहा, वाहवा इ. तोंडातून निघणारे विकारांचे ध्वनी. ३. तोंडातून असंकल्पित असा निघालेला ध्वनी, उच्चार; सहज, चुकून तोंडावाटे निघालेला विशिष्ट गोष्टींचा बोध करून देणारा शब्द. ४. ढेकर; ओकारी; वमन. [सं. उत्+गॄ]

**उद्‌गारणे** अक्रि. १. उच्चारणे; बोलणे. २. आवेशाने, जोराने बोलणे; क्रोधाने बोलणे, शब्द करणे; विकारवश होऊन उद्गार काढणे.

**उद्‌गारवाचक** वि. भावना व्यक्त करणारा.

**उद्‌गारवाचक चिन्ह** लेखनात उद्‌गारवाचक शब्द किंवा विधान दाखविण्यासाठी त्याच्या शेवटी लिहिण्यात येणारे (!) हे चिन्ह.

**उद्‌गारवाची** वि. मनातील निरनिराळे भाव व्यक्त करण्याकरिता उच्चारलेली (अव्यये); केवलप्रयोगी (अव्यये). उदा. अहाहा, अबब, अरेरे वगैरे.

**उद्गिरण** न. सुरुंग लावून खडक वगैरे फोडणे. [सं.]

**उद्गीरण** न. वमन; ओक; ओकारी. [सं. उद्‌गिरण]

**उद्गीर्ण** वि. ओकलेले; तोंडातून बाहेर पडलेले. [सं. उद्‌गीर्ण]

**उद्‌घाट** पु. वरील मार्ग : 'एक मध्यमेचेनि उद्‌घाटें । लंघुनि तिन्ही पीठे ।' वछा १५०.

**उद्‌घाटण, उद्‌घाटन** न. १. एखादी वस्तू, मूर्ती, संस्था सर्वांसाठी समारंभपूर्वक खुली करणे. (क्रि. होणे, करणे.) २. उघडणे; खोलणे; उलगडणे (कपाट, झाकण, तसबीर इ.). ३. फोडणे; उघडकीला आणणे; प्रसिद्ध करणे. उदा. मर्मोद्‌घाटन, गुह्योद्‌घाटन ४. स्पष्ट करणे; विवरण करणे; चर्चा करणे. [सं. उद्+घट्]

**उद्‌घाटित** वि. १. उघडलेला; उघड केलेला; उलगडून दाखवलेला; उद्‌घाटन केलेला. २. स्पष्ट केलेला; विवेचिलेला. [सं.]

**उद्‌घृष्टता** स्त्री. (संगीत.) नीरस उद्‌घोष करणे. [सं. उद्+घृष्ट]

**उद्‌घोष** पु. १. घोकणे; पुन :पुन्हा म्हणणे (स्मरणात राहण्याकरिता, पाठ करण्याकरिता). २. (ल.) तीच तीच गोष्ट पुन :पुन्हा सांगणे; एकाच विषयावर एकसारखे बोलत राहणे. ३. लोकवार्ता; वदंता; लोकोक्ती; बातमी. ४. दवंडी; जाहीर करणे; गर्जना. ५. घोष; घोसरा; उत्कंठा. [सं.]

**उद्घोषणा** स्त्री. (शाव्य.) राज्याच्या प्रमुखाने जाहीर केलेली गोष्ट, निवेदन. [सं.]

**उद्दंड** पहा : **उदंड** : 'तेयाचां ठायि उद्दंड । अज्ञान असे उघड ।'– राज्ञा १३.६९०.

**उद्दंड** वि. अतिशय तापट; क्रूर : 'मानसिंग होताही मोठा उद्दंड... एका ज्योतिषाशी भांडण होऊन त्याने त्याला गोळी घातली.'– चंद ६२.

**उद्दाम** वि. १. धीट; धारिष्टवान; बेदरकार; दांडगा; साहसी. २. उर्मट; गर्विष्ठ; उन्मत्त; मस्त; बेफाम. ३. जोराचा; मजबूत; टवटवीत; जोमदार (अंकुर, कलिका, पुष्प वगैरे). ४. मोठा; ठसठशीत; ठळक (दागिना, रत्न वगैरे). ५. अतिशय गहिरा; तजेलदार; चकचकीत (रंग). ६. उग्र; तीव्र (वास). ७. मोठा; पहाडी; भरदार; गंभीर; सुस्वर (आवाज, ध्वनी). ८. भयानक : 'त्या उद्‌दाम मानवी घटनेचे स्वरूप...'–विजी ११.[सं. उद्+दम्]

**उद्दामपणा** पु. माजोरीपणा; दांडगेपणा; उन्मत्तपणा : 'पण आमच्या मतें तें निर्भिड आहे. असे म्हणण्यापेक्षा ते उद्दामपणाचें आहे... असे म्हणणे अधिक योग्य...होईल.'–लोटिकेले ३.३५४.

**उद्दित** वि. उदित; उल्हसित; तेजस्वी; शोभिवंत : 'हरुषें निर्भर उद्दित । सुप्रसन्नवदनु ।'– दास १.२.९. [सं. उदित]

**उद्दिष्ट** वि. १. योजलेले; ध्येय; संकल्पिलेले; मनात ठरवलेले; विचार करून ठाम बनवलेले; अभिप्रेत. २. विवक्षित; निर्दिष्ट; उल्लेखित; दिग्दर्शित; वर्णन केलेले. [सं. उत्+दिश्]

**उद्दिष्ट** न. (संगीत.) इच्छित स्वरांच्या प्रस्तारातील अमुक स्वरूपाच्या स्वररचनेचा प्रकार कितवा हे सांगणे. [सं. उत्+दिश्]

**उद्दीपक** वि. १. पेटविणारे; चेतना देणारे; प्रवर्तक; प्रोत्साहन देणारे; जागृत करणारे; मनोवृत्ती उचंबळविणारे; स्फुरण देणारे. २. (वै.) उत्तेजक (द्रव्य, औषध इ.). [सं. उत्+दीप्]

**उद्दीपणे** अक्रि. चेतना होणे; प्रकट होणे; प्रवर्तक होणे; वाढत जाणे; प्रकाशणे : 'कां जागृती जंव जंव उद्दीपे ।'– ज्ञा १८.११०४.

**उद्दीपन** न. १. प्रज्वलन; चेतविणे; पेटविणे. २. प्रकाशन; प्रकाश; उजेड. ३. (ल.) प्रवर्तन करणे; जागृत करणे (क्रोध, लोभ इ. विकार). ४. (ल.) ज्यामुळे चेतना, जागृती होते असा उत्तेजक पदार्थ. उदा. क्रोधोद्दीपन, कामोद्दीनप, हर्षोद्दीपन इ. ५. (वै.) हालचाल करणे, विचार करणे इत्यादी कार्यासाठी मिळणारी प्रेरणा, चेतना. [सं.]

**उद्दीपनविभाव** पु. (सास.) काव्यनाटकादिकांतील नायकनायिकांच्या निरनिराळ्या कृती, त्याचप्रमाणे देशकालपरिस्थिती हे रसनिष्पत्तीसाठी उद्दीपनविभाव समजले जातात. रसाचे उद्दीपन यामुळे होते. [सं.]

**उद्दीपित** पहा : **उद्दीपक**

**उद्दीप्त** वि. पेटलेला; भडकलेला. [सं.]

**उद्देश** पु. १. प्रयोजन; हेतु; इच्छा; मनातील कार्य; अभिप्राय; आशय; मतलब : 'ऐसा योगयुक्तीचा उद्देशु ।'– ज्ञा ५.६१. २. दिग्दर्शन; वर्णन 'उद्देशें एक दोनी । जायिजती बोलोनी ।' – ज्ञा १.१०४. ३. उद्देशून :

'म्हणौनि मागां भाव जैसे । आपुले सांगितलें तुवां उद्देशें ।'– ज्ञा १०.१८८. [सं. उद्+ दिश्]

**उद्देशकारण** न. (न्याय.) हेतू; प्रयोजन; मतलब; न्यायशास्त्रातील कारणांतील एक प्रकार : 'प्रक्षालन हें (साबणाचें) उद्देशकारण होय.'– न्यायप ५८.

**उद्देशणे** उक्रि. मनात योजणे; विचार करून ठरविणे; संकल्प करणे. २. नाव घेऊन किंवा उल्लेख करून उच्चारणे, बोलणे. ३. प्रयोजन, हेतू असणे; बेत असणे; ठरवणे. [सं. उद्देश]

**उद्देशपत्रक** न. एखाद्या संस्थेची उद्दिष्टे विशद करणारी पुस्तिका. [सं.]

**उद्देशी अनुक्रिया** (मानस.) उद्दिष्टसिद्धीकरिता सुरुवातीला केलेली प्राथमिक अनुक्रिया.

ऐच्छिक वर्तन करताना होणारा कंपप्रकार.

**उद्देश्य** न. १. संकल्पित कार्य, बेत, मनातील हेतू. २. ज्याविषयी संकल्प करायचा ते. ३. (व्या.) वाक्याचा एक भाग; वाक्यात ज्या अर्थाला उद्देशून विधान केलेले असते किंवा ज्याविषयी वक्ता बोलतो ते. कर्तरि प्रयोगात कर्ता, कर्मणि प्रयोगात कर्म. वाक्याचा दुसरा भाग विधेय होय. [सं.]

**उद्देश्यवाचक** वि. (व्या.) कर्तृबोधक, उद्देश, हेतू दाखवणारा (शब्द). [सं.]

**उद्देश्यवाद** पु. विशिष्ट कार्य विशिष्ट हेतूकरिता घडले आहे असा वाद; हेतुवाद.

**उद्देश्यविधेयभाव** पु. कर्तृपद आणि क्रियापद यांमधील संबंध. [सं.]

**उद्देश्यविस्तार** पु. कर्तृपदाची विशेषणे किंवा तत्संबद्ध शब्द वगैरे : 'उद्देश्यविस्तार व विधेयविस्तार हे पाठ मुलांना फार मनोरंजक वाटतात.' – अध्यापन ९७. [सं.]

**उद्धट** वि. १. उर्मट; दांडगा; असभ्य; बेपर्वा; अविनयशील : 'पहिलेच श्रीमदें उद्धट । त्यावरी मांडिले कपट ।'– एभा १.३४६. २. उद्भट; पाणीदार; बलवान : 'अतिरथि उद्धटवीर । पाठीसीं चालती कृष्णकुमर ।'– हरि ३३. ११८. [सं. उद्धत]

**उद्धटाई** स्त्री. धिटाईची, बेपवाईची वागणूक; दांडगेपणा; बेपर्वाई; मग्रुरी.

**उद्धटित अंगहार** (नृत्य.) उजवा हात उद्वेष्टित करून मग अपविद्ध करणे, मग उजवा पाय निकुट्टित करून हीच सर्व क्रिया डाव्या हाताने व पायाने करणे. मग उरोमंडल हात करून नितंब, करिहस्त व कटिच्छिन्न ही क्रमाने करणे. [सं.]

**उद्धड** न. मस्तकविरहित धड. (वा.) **उद्धड करणे–** ठार करणे. [सं. उत्+प्रा.धड]

**उद्धत** वि. १. मस्त; गर्विष्ठ; उर्मट; उद्धट : 'उद्धत त्या जाती । द्रव्यें रंगल्या उद्धती ।' – तुगा ३११८. २. साहसी; धीट : 'हे संग्रामीं अति उद्धत ।' – ज्ञा १.१९४. [सं.]

न. उपमर्द : 'सख्याचें उद्धत । सखा साहे निवांत ।' –ज्ञा ११.५७४.

**उद्धरगत** पहा : **उद्धारगत.**

**उद्धरण, उद्धरणी** न. स्त्री. १. बाहेर काढणे; वर काढणे (खाली पडलेला पदार्थ.). २. उपटून, निखळून काढणे (वृक्ष इ.). ३. अग्निहोत्र्याने कुंडात पुरून ठेवलेला अग्नी बाहेर काढणे; सकाळ-संध्याकाळ कुंडातील अग्नी प्रज्वलित करणे. ४. सुटका करणे; बचाव करणे; अधोगतीपासून सोडवणे; संरक्षण करणे. ५. शापापासून बचाव करणे; (उःशाप देऊन) उद्धार करणे; पुन्हा योग्यतेला चढविणे; मुक्ती देणे; मोक्ष. ६. देऊळ वगैरेची दुरुस्ती करणे. चालू करणे; पुनरुज्जीवित करणे; पुनरुद्धार करणे (वृत्ती, धर्म, हक्क, मालमत्ता इत्यादींचा) : 'तव अधिक शक्त उद्धरणीं । मी' – स्वासा [सं. उद् + हृ]

**उद्धरणे** उक्रि. १. सोडविणे; सुटका करणे; वर काढणे; मुक्त करणे : 'उन्नतगजेंद्रउद्धरण । गर्भसंरक्षण परीक्षितीचें ।।'– एभा २.३०५. २. वैभवाच्या स्थितीला नेणे; स्वर्गादी उत्कृष्ट लोकी पोहोचणे; मोक्ष देणे; मुक्त करणे : 'राम उद्धरूनि गौतमजाया ।'३. (विपरीत लक्षणा) शिव्या देणे (वडील माणसांना). (वा.) **एखाद्याचे पितर उद्धरणे** – वाडवडिलांना, पितरांना शिव्या देणे. [सं. उद्धरण]

**उद्धरता** पु. उद्धार करणारा. [सं. उद्धर्तृ]

**उद्धराम्ल** न. (शाप.) एक प्रकारचे अम्ल -घटक उज्ज व हर.

**उद्धर्ता, उद्धारक** वि. सुटका करणारा; मुक्त करणारा. [सं.]

**उद्धव** पु. उत्साह; आनंद : 'निजतत्त्व कथुनि ब्रह्मादि सुरासि विपुल उद्धव दे ।'– विमाहा ३.३९. [सं. उद् +हु]

**उद्धवणे** सक्रि. प्रज्वलित करणे : 'अनुतापु वैश्वानरा । उद्धवतु इंद्रिए जोहरा । आंतु कवण वांचे ।।'– ऋ ५६. [सं. उद् + धू]

**उद्धळण** न. फासणे; चोपडणे; माखणे; उडवणे; उधळणे : 'भस्म उद्धळण लक्ष्मीचा भोग । शंकर श्रीरंग उभयरूपीं ।।'– तुगा २०५०. [सं. उद् + धूल्]

**उद्धाट** पु. १. घर्षण. २. (ल.) घोष : 'तैं कळिमळांचीं मळगटें । नामोद्धाटें नासती ।।' – एभा ४.२५३. [सं. उद + हन्–हत ]

**उद्धाटन** न. १. पहा : **उद्घाटण, उद्घाटन**.२. (सभा इत्यादींना) औपचारिक सुरुवात करणे. [सं.]

**उद्धाटन** न. (भाषा.) तोंड उघडून हवेच्या निःसारणाचा मार्ग मोकळा करण्याची कृती ; हवेला बाहेर जाण्याची वाट.

**उद्धाटन समारंभ** सभा, संमेलन इ. सुरू होण्यापूर्वी, नवीन इमारत, पूल इ. वापरण्यास सुरुवात करण्यापूर्वी प्रतिष्ठित पाहुण्यांच्या हस्ते करण्यात येणारा औपचारिक समारंभ.

**उद्धात** वि. फाकलेला; पसरलेला : 'उद्धातया रंगाचा हीरा ते मानकुलाचि ।'– भाए ६४५. [सं. उद् + हा= सोडणे]

**उद्धार** पु. पहा **: उद्धरण**. १. वर, बाहेर काढणे. २. मुक्ती; मोक्ष; सुटका; सोडवणूक; हीन स्थितीतून वर आणणे; गर्भवास चुकवणे. ३. पुनरुज्जीवन; पुनर्जन्म. ४. आलापन (राग, रागिणी वगैरे) : 'रागोद्धार करितां प्रत्यक्ष । दीप लागले लक्षानुलक्ष ।' – शनि २२८. ५.वेचा; अवतरण (एखाद्या ग्रंथातील).[सं. उद्+हृ किंवा धृ] (वा.) **उद्धार करणे** – (उप.) शिव्या देणे; पितर उद्धरणे.

**उद्धार उत्खनन** (पुरा.) पुरातन वस्तू सुरक्षित रीतीने बाहेर काढण्यासाठी केलेले पद्धतशीर प्रयत्न.

**उद्धारक** वि. १. वर काढणारा; उद्धार करणारा; उद्धर्ता. २. (सामाजिक)

जुन्या मताचा; दुर्धारक. सुधारक या संज्ञेविरुद्ध. [सं.]
**उद्धार करणे** सक्रि. १. हीन, पतित अवस्थेतून वर काढणे; सुधारणा करणे. २. मोक्ष देणे.
**उद्धारकर्ता** वि. उद्धार करणारा. [सं. उद्धार+कर्तृ]
**उद्धारकोष्टक** न. (ग्रंथ.) वर्गीकरणामध्ये अवतरण या अर्थी येणारे चिन्ह.
**उद्धारगत** स्त्री. १. उद्धार; चांगली स्थिती प्राप्त होणे. २. मुक्ती मिळणे; सुटका होणे. [सं. उद्धार +गति]
**उद्धारण, उद्धारणे** पहा : **उद्धरण, उद्धरणे.**
**उद्धावन टाकी** पाण्याच्या जोराने जागा धुऊन काढण्याची सोय असलेली, पाणी साठविण्याची टाकी. सामान्यत: संडासात अशा टाक्या असतात.
**उद्धूलन** न. १. उधळणे; इतस्तत; फेकणे; पसरणे (माती, राख, भस्म, गुलाल, बुक्का इ.). २. (ल.) उधळपट्टी करणे; बेसुमार खर्चणे. [सं. उद्+धूल्]
**उद्धृत** वि. १ सुटका केलेला; मुक्त केलेला; रक्षिलेला; वर चढवलेला; उत्कर्ष केलेला. पहा :**उद्धरण**. २. अवतरण; अवतरून, उतरून घेतलेले (वाक्य वगैरे). [सं.]
**उद्ध्वस्त पहा : उध्वस्त** 'शत्रूची धावपट्टी उद्ध्वस्त करण्याची फार गरज होती.' –आभ ३६४.
**उद्बंध** पु. (स्था.) (घुमटांचे दोन डेरे एकत्र जुळल्याने होणाऱ्या) जंघाकोनावरील पट्टी.
**उद्बंध, उद्बंधन** पु. न. टांगून ठेवणे; लोंबकळत ठेवणे. [सं. उद्+बंध्]
**उद्बीज** वि. एकदम उत्पन्न झालेले, आलेले (टोळ, टोळधाड, मुंग्यांचा थवा, कृमीकीटक वगैरे).
न. एकदम होणारा, दिसू लागणारा घोळका; पुंज (मुंग्या, ढेकूण इत्यादींचा). [सं. उद्भिज्ज]
**उद्बुद्ध** वि. १. माहिती करून दिलेला; जाणीव असलेला; ज्ञान झालेला. २. जागृत; उज्जीवित; चेतना दिलेला; उत्तेजित. ३. ताकीद दिलेला; पूर्वसूचित; समजावणी मिळालेला. [सं.]
**उद्बोध, उद्बोधन** पु. न. १. शिकवण; शिक्षण; समजावणी. २. सूचना; ताकीद. ३. जागृती; निजून उठणे; चेतना :'निखिळ उद्बोधांचेचि आपणपें घडे।' – ज्ञा ९.९६. ४. (विशेषत: उद्बोध) ज्ञान; माहिती; समज; जाणीव. [सं. उद्+बुध्]
**उद्बोधक** वि. १. ज्यापासून बोध घ्यावा असे; शिकवण देणारे; ज्ञान देणारे. २. सूचक; द्योतक; गमक; ज्ञापक. उदा. शरण आल्याचे – दाती धरलेले तृण; अनर्थाचे – उल्कापात वगैरे; राजत्वाचे–छत्र, ध्वज वगैरे; ताप आल्याचे – अंग ऊन होणे वगैरे; मृत्यूजवळ आल्याचे – वृद्धत्व, अशक्तता इत्यादी ही त्या त्या स्थितीची उद्बोधक लक्षणे होत. ३. उत्तेजक; मादक; दाहक, अम्ल (जिभेचे), सौंदर्य (इच्छेचे, कामाचे) यावरून (सामा.) प्रवर्तक, उद्दीपक, उत्तेजक, चैतन्यदायक. [सं. उद्+बुध्]
**उद्बोधकारक** वि. शिकवणारे, जागृत करणारे (वाङ्मय, कलाकृती इ.)
**उद्बोधणे** अक्रि. जागृत होणे :'साच ज्ञान उद्बोधें । कोवळें जें ।।' – ज्ञा १८.१४३६.
**उद्बोधन** न. १. (तत्त्व.) उद्बोधित करण्याची प्रक्रिया; युरोपमधील १८ व्या शतकातील एक तात्त्विक मतप्रवाह. या मतप्रवाहाने पारंपारिक तत्त्वे आणि मूल्ये यांच्याकडे संशयवादी दृष्टिकोनातून पाहण्याचा पायंडा पाडला, व्यक्तिवादाकडे लोकांचा कल झुकविला आणि सार्वजनिक मानवी उत्कर्ष, अनुभवप्रधान वैज्ञानिक पद्धतीचा अवलंब आणि अनिर्बंध बुद्धिप्रामाण्यावर अढळ श्रद्धा यांवर भर दिला. २. (शिक्षण) प्राप्त ज्ञानाची उजळणी व त्यात अद्ययावत ज्ञानाची भर. ३. स्वत : चे विचार भोवतालच्या परिस्थितीला जुळतील असे त्यांचे आधुनिकीकरण. ४. आग्रहाने उपदेश करणे; मन वळवणे; हितोपदेश करणे. [सं.]
**उद्भट** वि. १. शूर; धाडसी; बलवान; धारिष्टवान; धैर्याचा : 'राजकुमर वीर उद्भट।' – मुआदि ३१.२९. २. प्रचंड; अफाट; मोठा; विस्तृत :'आंसडोनि बळ उद्भटें । मधें उघडिला तडतडाटें ।' – मुसभा ७.५५. ३. श्रेष्ठ; उत्कृष्ट; थोर; प्रख्यात :'जे स्वगुणी उद्भट । घेऊनि सत्व चोखट।' – ज्ञा १४.२१८. ४. कठिण; कठोर; खडतर : 'पुराणीं उपदेश साधन उद्भट । आम्हां सोपी वाट वैकुंठींची ।।' – तुगा २११९. ५. उन्मत्त. पहा : **उद्धट** [सं.]
**उद्भव–उद्भाव** पु. १. उत्पत्ती; प्रादुर्भाव; प्रारंभ; जन्म : 'भुवनोद्भवारंभस्तंभ । भवध्वंस ।।' – ज्ञा १८.६. २. प्रकट होणे; बाहेर पडणे. ३. हेतू. [सं. उद्+भू]
**उद्भवणे** अक्रि. १. उत्पन्न होणे; प्रारंभ होणे; निर्माण होणे; जन्म पावणे. २. प्रकट होणे. (क्वचित सकर्मक प्रयोग). [सं.उद्+भू]
**उद्भावणे, उद्भाविणे** सक्रि. १.उत्पन्न करणे; अस्तित्वात आणणे; जन्माला घालणे. २. प्रकट करणे; उघड करणे. [सं. उद्+भू]
**उद्भावन** न. १. विचार; बोलणे; सांगणे. २. उत्पत्ती; जन्म; उत्पादन. ३. प्रकट करणे; उपस्थित करणे; प्रदर्शन. [सं. उद्+भू]
**उद्भावन** न. अनवधान; असावधान; अनास्था. [सं.]
**उद्भासन** न. १. (भौ.) उजेडात ठेवणे; उघड्यावर ठेवणे. २. (भूशा.) खडकाचा उघडा पडलेला भाग. [सं.]
**उद्भिज, उद्भिज्ज, उद्भिद** न. वृक्ष, वनस्पती इ. सृष्टी :'जैसी मही हे उद्भिजें।' – ज्ञा ६.४४.
वि. जमिनीत उगवणारे; जमिनीतून वर येणारे; अंकुर फुटणारे; बाहेर पडणारे (वृक्ष, वनस्पती इ.). [सं. उद्+भिद्]
**उद्भिज कटिबंध** पृथ्वीच्या ज्या भागात वनस्पती वाढतात तो प्रदेश.
**उद्भिज कोटी** वनस्पतिवर्ग. प्राणिवर्गाच्या उलट :'सेंद्रिय रसायनशास्त्रात उद्भिज्ज व प्राणिज या सेंद्रियकोटींतील यच्चयावत पदार्थांचा समावेश होतो.' – सेंपू प्रस्तावना १.
**उद्भिज्ज** पु. (वन.) निसर्गातील वायू, पाणी, खनिजे यांचे शोषण करणारे व सूर्यापासून अन्न बनवण्यास लागणाऱ्या उर्जेचा वापर करणारे वनस्पतीतील हरितद्रव्ययुक्त, स्वावलंबी, सजीव घटक. [सं.]
**उद्भूत** वि. १. उत्पन्न झालेला; जन्मलेला. २. प्रकट झालेला; निघालेला; बाहेर पडलेला; आविर्भूत. [सं.]
**उद्भेद** पु. १. फुटून बाहेर पडण्याची क्रिया (जमिनीतून अंकुर येतात त्याप्रमाणे). २. विकसन; उमलणे; फुलणे; दृश्य होणे. [सं. उद्+भिद्]

**उद्भ्रंश** पु. लोकभाषेतील शब्द संस्कृतमध्ये उचलण्याची प्रक्रिया – मभामू १०.

**उद्भ्रांत** वि. संभ्रमित; बावरलेला; गोंधळलेला; गडबडलेला. मनस्ताप पावलेला; विव्हळ. [सं. उद्+भ्रम्]

**उद्यत** वि. १. तयार; तत्पर; उत्सुक; उद्युक्त; सिद्ध : 'जे जाहले असती उद्यत झुंजावया ।' – ज्ञा १.२११. २. उगवलेला; वर आलेला (सूर्य वगैरे). [सं.]

**उद्यतदंड, उद्यतबाहू** वि. हात वर केलेला; हात उगारलेला; कडक; शिस्तीचा; कठोर (राजा, न्यायाधीश). [सं.]

**उद्यत्कार** वि. प्रकाश देणारा : 'उद्यत्कारु सूर्य जैसा ।' – अमृ ६.३.

**उद्यम** पु. उद्योग; उद्योगधंदा; व्यापार. पहा : **उदीम** : 'जैसें भाग्याचिया भडसें । उद्यमाचेनि मिसें ।' – ज्ञा ६.३५४. [सं.]

**उद्यमशील** वि. उद्योगी; मेहनती; परिश्रम करणारा; कष्टाळू; उत्साही.

**उद्यमी** वि. उद्योगी; नेहमी कामात असलेला; मेहनती; कष्टाळू. [सं.]

**उद्या** क्रिवि. उदयीक; दुसऱ्या दिवशी. [सं. उद्+इ]

**उद्याकडे** क्रिवि. उद्या; उद्यापर्यंत : 'म्हातारेबुवा, बादशहाचा एक सरदार आपल्या लष्करासह आज–उद्यांकडे ह्या बाजूनें जाणार असल्याचे सेनापतीसाहेबांना खबर लागली आहे.' – स्वप १९०.

**उद्याचा आदितवार** कधी न येणारा दिवस = एखादी गोष्ट करायचे मनात नसले म्हणजे उद्याच्या आदितवारी करू असे उत्तर देणे.

**उद्याणी** स्त्री. मांडणी : 'हे नवमाध्यायीं उद्याणी । केली होती ।।' – राज्ञा १६.६०.

**उद्यान** न. बाग; बगीचा; उपवन : 'कीं अभिनव उद्यान । विवेकतरूचें ।।' – ज्ञा १.२८. [सं.]

**उद्यानकुंज** पु. बागेतील एकांत असलेली जागा. [सं.]

**उद्यानबंगला** पु. खेड्यातील घर; बागेतील बंगला.

**उद्यानभोजन** न. वनभोजन : 'तथापि चार सहा महिन्यांतून एखादे वेळेस तरी त्यांना शिष्टसंप्रदायाप्रमाणे उद्यानभोजन, खाना, चहापार्टी वगैरे द्यावी लागत असेच.' – नपुक २६.

**उद्यानविद्या** स्त्री. फलोद्यानासंबंधीचे शास्त्र.

**उद्यानविज्ञान** न. (वन.) फलोद्यानांची रचना करण्याचे शास्त्र. फळझाडे, फुलझाडे व इतर शोभिवंत झाडे यांची कलात्मक रचना करून बागा, उपवने, वाटिका, इ. तयार करण्याची विद्या. [सं.]

**उद्यानोपाहार** पु. पाहुण्यांना बागेत दिलेले भोजन.

**उद्यापन** न. १. आरंभलेले व्रत संपल्यावर त्या व्रताची सांगता; त्यासंबंधी विधी, कर्म. २. धर्मशाळा, सरोवर, अश्वत्थ इत्यादिकांचा विधिपूर्वक उपयोग करायच्या पूर्वी करण्याचा विधी. ३. (ल.) गाशा गुंडाळणे; हानी; आपत्ती; अरिष्ट; संकट; कार्यनाश. [सं.]

**उद्यापित** वि. योग्य विधीने विसर्जन केलेला; विधिपूर्वक उपयोगात आणलेला (तळे, धर्मशाळा वगैरे). [सं.]

**उद्युक्त** वि. १. तयार; सिद्ध; सज्ज; प्रवृत्त. २. गढलेला; गुंतलेला. [सं. उद्+युज्=जोडणे]

**उद्युत्कार** वि. उदय, प्रकाश करणारा. पहा : **उद्योतकर** [सं. उद्+दयुत् = प्रकाशणे]

**उद्योग** पु. १. कारखानदारी. २. काम; धंदा; नोकरी; रोजगार. ३. कार्य; व्यवसाय. ४. खटपट; प्रयत्न; मेहनत; श्रम. ५. (अर्थ.) विशिष्ट वस्तूचे उत्पादन करणारी एक संस्था वा अशा अनेक संस्थांचा समूह. [सं. उद्+युज् = जोडणे – योग] (वा.) **उद्योग चालवणे, उद्योग करणे** – काम हाती घेणे; कामधंदा चालवणे, सुरू करणे.

**उद्योगधंदा** पु. चरितार्थासाठी करायचे (नोकरी सोडून इतर) काम.

**उद्योगपति–ती** पु. निरनिराळ्या उद्योगधंद्यांचे किंवा उद्योगसमूहांचे मालक, धनी. उद्योगात वा कारखानदारीत फार मोठी गुंतवणूक केलेले व त्यांची मालकी असलेले कारखानदार : 'उद्योगपती हा पूर्णपणे स्वतंत्र असत नाही.' – कराअ. [सं.]

**उद्योगवेळ, उद्योगवेळा** पु. स्त्री. दिनमानाचे आठ भाग धरून पाडलेला एक भाग. हा पावणेचार घटिकांचा असतो.

**उद्योगी** वि. १. नेहमी कामात गुंतलेला, गर्क असलेला. २. मेहनती; कष्टाळू. ३. ज्याला कामधंदा आहे असा. आळशी याच्या उलट. ४. (उप.) उपद्व्यापी; नसते लचांड उपस्थित करणारा. जसे :– 'उद्योगी बाळ'. [सं.]

**उद्योजक** पु. उद्योगक्षेत्रात नवीन उपक्रम सुरू करणारा, प्रयोगशील कारखानदार. [सं. उद्+युज्]

**उद्योतकर, उद्योतकार** वि. पु. उदयकर्ता; प्रकाशक; दीपक : 'वडिला अव्यक्ताचिया वंशा । उद्योतकारु सूर्य जैसा ।।' – अमृ ६.३. [सं. उद्योत+कृ]

**उद्र** पु. ऊद; पाणमांजर. [सं.]

**उद्रस** वि. बेचव; नीरस; शुष्क; शिळे; वाळलेले. [सं. उद्+रस]

**उद्राण** न. मुक्ती; मोक्ष. पहा : **उद्धरण** : 'पोवाडा गात्याला उद्राण । ऐकत्याला घडो पुण्य ।' – ऐपो ६३. [सं. उद्धरण]

**उद्रिक्त** वि. अतिशय समृद्ध असलेले; रगड; वाजवीपेक्षा जास्त; गडगंज. [सं. उद्+रिच्]

**उद्रेक** उद्रेक् पु. १. उसळून वर येणे; स्फोट; आवेग. २. वृद्धी; वैपुल्य; अतिरेक. ३. वेग; वेदना; यातना; कळ; मुरडा (पोटातील विकारामुळे मलमूत्रविसर्जनापूर्वी होणारा). ४. आकस्मिक प्रेरणा; लहर; उमाळा (पोटातून येणे या बरोबर प्रयोग). [सं.]

**उद्वर्तन** न. १. सुगंधी द्रव्ये लावून स्वच्छ करणे; उटणे लावणे (देवमूर्ती, शरीर इत्यादींना); प्रक्षालन. उदा. करोद्वर्तन : 'कितिएक गोपस्त्रिया । विलेपन करित होतिया । उद्वर्तनादि क्रिया । संपादितां ।' रास १.२१४. २. कामावरून हाकून देणे; उच्चाटण. ३. सुटका; ताटातूट; फाटाफूट : 'राजश्रीचे आईसाहेबापासून उद्वर्तन जाले.' – पुरंदभा १.२०२. [सं.]

**उद्वर्तन ऊरू** (नृत्य) नृत्यात सूचीपाद करून मांडी वर उचलणे.

**उद्वर्तनफलक** पु. तार किंवा सूत ओढण्याची पट्टी, जंत्री.

**उद्वर्ध** पु. (वै.) १. अधिक प्रमाणात झालेली वाढ (एखादा अवयव, हाड इ.ची). २. मूळ वस्तूपासून उद्भवलेली वाढ. एका पदार्थापासून दुसरी गोष्ट सरळ उगवणे. जसे :– झाडाची फांदी. [सं.]

**उद्वस, उद्वसु, उद्वसे, उद्वस्त** वि. १. ओस; शून्य; उजाड; निर्जन; ओसाड;

उद्ध्वस्त; रिकामा; उदास : 'ययापरी उद्वस्त समस्त । पांढरी पडली ।' – गीता २.२२७१; 'नाना उद्वसें जे वनें ।' – दास ८.५.८. २. अस्ताव्यस्त; अव्यवस्थित; घोटाळ्याचा; गोंधळ झालेला (व्यवहार, काम) (राजा.). ३. व्यर्थ; फुकट : 'नातरी पाहावया दिवसु । वातीचा कीजे सोसु । तेव्हढाही उद्वसु । उद्यमु पडे ।।' – अमृ ६.२९.

**उद्वस्कंध** पु. सप्तस्कंधातील सूर्यमंडळापासून चंद्रमंडळापर्यंत ज्याची मर्यादा असा तिसरा स्कंध. [सं.]

**उद्वहन यंत्र** (सामान, माणसे इत्यादींना) एका मजल्यावरून दुसऱ्या मजल्यावर चढवणारे किंवा खाली आणणारे यंत्रचलित साधन; लिफ्ट.

**उद्वार्चन, उद्वार्जन** पहा : **उद्वर्तन**

**उद्वासन** न. १. मूर्तीच्या ठिकाणी प्राणप्रतिष्ठा केलेल्या देवतेचे विसर्जन, उत्थापन : 'एवं पूजेचे उद्वासन ।' – एभा ३.८४३. २. काढून टाकणे (अधिकारापासून); उच्चाटन. [सं. उद्+वस्]

**उद्वाह** पु. विवाह; लग्न. [सं.]

**उद्वाहक** पु. विजेचा पाळणा; लिफ्ट. [सं.]

**उद्विग्न** वि. उदास; खिन्न; अस्वस्थ; दुःख – संकट – भयग्रस्त; काळजीने व्याप्त; चिंताक्रांत; विषण्ण; व्यग्र; त्रस्त; वीट आलेला. [सं. उद्+विज्]

**उद्वृत्त** वि. धर्मबाह्य, अशास्त्र वर्तन करणारा; बहकलेला; उच्छृंखल; चैनी; स्वैरवर्तनाचा; निसवलेला; अवगलेला. [सं. उद्+वृत्त]

**उद्वृत्त, उद्वृत्तशंकु** पहा : **उन्मंडलशंकु**

**उद्वेग** पु. उद्विग्नपणा; खेद; अस्वस्थता; खिन्नता; कंटाळा; काळजी, भीती, दुःख यांपासून त्रास : 'विसरू कामाचा तुका म्हणे झाला । उद्वेग राहिला जावें यावें ।।' – तुगा ७५. [सं. उद्+विज्]

**उद्वेगणे** अक्रि. उद्विग्न होणे; खिन्न होणे; अस्वस्थ होणे : 'मज हांसतील ते संत । जिहीं देखिलेति मूर्तिमंत । म्हणोनि उद्वेगलें चित्त । अहाच भक्त ऐसा दिसे ।।' – तुगा ७१६. [सं. उद्+विज्]

**उद्वेप** पु. उपद्व्याप : 'देहींचा सोडोनि खटाटोप । शिवें धरिला दारूण कोप । केला मल्लयुद्ध उद्वेप । जाज्वल्यमान ।' – कथा ७.८.५.

**उधई** स्त्री. पांढरी मुंगी; वाळवी. या मुंग्या जमिनीत वारुळे तयार करून किंवा भिंती–तुळ्यांवर घरे करून राहतात : 'उधयानीं खादलें शरीर । वरू ते उगवले तरुवर । तेव्हां अस्थिमय प्राण साचार । यास्तव न मरे सर्वथा ।।' – सवि १०.११६.

**उधट, उधंट** पहा : **उद्धट** : 'उधटेआं देवां जगझंपू ।' – शिव १५४; 'ज्या सासुरां वर्तति गे उधंटा ।' – सारुह ७.१२८.

**उधड** पु. ठेका; मक्ता. (व.) [सं. उद्+धृत्]

**उधड–डा** वि. उक्ता; बिनहिशोबी; अंदाजाने : 'जमादारास लागवड खर्चाबद्दल दरमहा १ रुपयाप्रमाणे उधड देण्यांत यावा.' – (बडोदे) पहिलवान कुस्ती नियम ८.

**उधडणे** उक्रि. १. उसवणे; उकलणे; फोडणे. २. (साल, काठ वगैरे) फाडणे; चिंधड्या, चिरफाळ्या करणे : 'मधें उधडिला तडतडाटें ।' – मुसभा ७.५५. ३. (ल.) धुडकावणे; हाकलणे; उच्चाटन करणे : 'उधडिला सिंह कोल्ह्यांनीं ।' – संग्रामगीते ८१. ४. (चांभारी) मेलेल्या जनावरांचे कातडे काढणे. (व.)[सं. उद्+धृ]

**उधडमाप** न. अंदाजी वजन, माप, हिशेब; उक्ते माप.

**उधणी, उधवणी** स्त्री. गवाक्ष; धारे; धुराडे; झडप : 'उधणी म्हणजे उडवीचे पाखे' – आआशे ३७८. [सं. उद्+धू]

**उधणे** अक्रि. वर येणे; प्रकट होणे : 'नेंदिजे चि संशृती । माथा उधों ।' – राज्ञा १४.४९.

**उधम** न. गडबड; कल्ला; दंगा : 'त्याने ... वेश्यागृहात घुसून खूप उधम केला.' – अहिल्या १०.

**उधमणे** अक्रि. उकळी येणे; बुडबुडे येणे. [सं. उद्+ध्मा]

**उधर** क्रिवि. सरसकट; उघड. (खा.)

**उधरण** न. भेट; आहेर; नजराणा : 'उधरण रंगी आणि द्राक्ष फळें बहुता प्रकारें । रामापुढें ठेविताती सकळिक पक्वानें सारें ।' – बगाथा ६२९. [सं. उद्+हृ]

**उधरणे** अक्रि. १. ओकणे; ओकारी येणे. [सं. उद्+हृ]

**उधरणे** सक्रि. उद्धार करणे : 'जना उधरी नाथ लोकत्रयाचा ।' – राम २५. [सं. उद्+हृ]

**उधरागती** स्त्री. उद्धारगती; मोक्ष; मुक्ती : 'नरदेही येऊन सकळ । उधरागती पावले केवळ । येथे संशयाचें मूळ । खंडोन गेलें ।।' – दास १.१०.२०. [सं. उद्धार+गति]

**उधर्ता** वि. उद्धारकर्ता : 'भूतें भूत धर्ताचि धर्ता अधर्ता ।' – राक १.१. [सं. उद्धृ]

**उधल** वि. वण असलेले. पहा : **उधेल**

**उधवटा** वि. कठीण. पहा : **उधट** : 'देव्हूडियां । वेणिआं उकलैलियां । उधवटां गांठीं सूटलियां ।।' – शिव ७१६. [सं. उद्धत]

**उधवणी** पहा : **उधणी** : 'उधवणीचें जेवीं तोंड । उभळी धुंवाचे उभड ।' – ज्ञा १६.२९४.

**उधवणे** अक्रि. पेटणे.

**उधवणे, उधविणे** अक्रि. १. उसळणे; उधळणे; वर येणे, जाणे, होणे, करणे : 'नातरी वडवानळु सांदुकला । प्रलयवातें पोखला । सागर शोषूनि उधवला । अंबरासी ।।' – ज्ञा १.९०. २. वाढणे : 'मग तो न सांवरे जैसा उधवला ।' –ज्ञा ३.२०४. ३.उगवणे; उद्भवणे : 'तैसिया सर्वांगीं उधवती अणियां । रोमांचियां ।।' –ज्ञा ६.२६४. ४. वर जाणे; उठणे; पसरणे : 'सांगें भुवनत्रयाची काजळी । जे गगनामाजि उधवली ।' – ज्ञा ४.१७५. ५. उभे करणे; उचलून ठेवणे (जातण, पाटी इ.); नीट ठेवणे. पहा : **उदवणे** [सं. उद्+धू]

**उधवी** स्त्री. १. धुराडे : 'उधविचें तोंड । उगलीत घूमाचे उभड ।' – राज्ञा १६.२९२. २. आगीटी.

**उधसणे** सक्रि. उकरून काढणे; उसकटणे; उसकणे.

अक्रि. वर येणे; उसळणे : 'सर्वांचे दुबळेपण उधसून वर आले.' – उपेअं १९.

**उधळ** स्त्री. अवास्तव खर्च; बेसुमार खर्च; उधळमाधळ; उधळपट्टी. [सं. उद्+धूल]

**उधळखोर, उधळपट्ट्या, उधळपांड्या, उधळमाणक्या, उधळमाथळ्या, उधळवाल्या** वि. उधळपट्टी करणारा; अवास्तव

खर्चिक; अति खर्च करणारा; उधळ्या; बेसुमार, बेदाद, शक्तीबाहेर, निष्कारण खर्च करणारा :'ह्या गुणांचा योग्य उपयोग करण्यासारखा रोजगार नसल्यामुळे त्या (अस्पृश्यजाती) बेलगामी, उधळमाणक्या, स्वाभिमानशून्य झाल्या आहेत.' – गांगा १२०.

**उधळमाणकी, माधळ** स्त्री. उधळणे, वर फेकणे, उडविणे.

**उधळठक** (चुकीने). पहा : **उजळठक**

**उधळण, उधळणी** न. स्त्री. १. अवास्तव खर्च. २. उधळणे, वर फेकणे, टाकणे; उडविणे :'विभूतीचें उधळण शितिकंठ नीळा ।' – शंकराची आरती. [सं. उद्+धूलन]

**उधळणे** सक्रि. १. वर फेकणे; उडवणे; पसरणे (धूळ, गुलाल, राख वगैरे). २. वारवणे; वारा घालणे. ३. (ल.) पळवून लावणे; दाणादाण करणे; दशदिशा करणे; हाकून लावणे; पिटाळून देणे (सैन्य, गर्दी वगैरे). ४. अतिशय खर्च करणे; उधळपट्टी करणे :'लग्नात पैसा उधळताना त्यांनी कुठंच कसूर केली नाही.' – एल्गार ५३. ५. (सामा.) नाहीसे होणे, जाणे :'अहो या लोहाचा जिनस परिसेसीं जरी मिळे । तयाच्या संसर्गे अखिल मग लोहत्व उधळे ।' – सारुह ५.६२. ६. (सभा इ.) मोडून टाकणे; बंद पाडणे; विस्कटून टाकणे. ७. दळलेल्या धान्याचे जात्याला चिकटलेले कण झाडून टाकणे.

अक्रि. १. दशदिशा पळणे (सैन्य, समाज वगैरे) ; 'शिकारीला गेलेले स्त्रीसैन्य उधळलेले दिसते.' – बाय ४.२. २. अनावर होणे; बुजून पळणे (भ्यालेला घोडा, बैल वगैरे). ३. उनाडणे; भटकणे; फिरणे (मूल वगैरेंनी). ४. आवेशाने एखादी क्रिया करणे (मारणे, शिव्या देणे वगैरे). ५. जोराने बाहेर पडणे; बळावणे (एखादा रोग). ६. बुडणे; अजिबात नाश होणे (पीक वगैरे). ७. पळून जाणे; नाहीसे होणे (एखादे कूळ, भाडेकरी वगैरे).[सं. उद्+धूल] (वा.) **उधळा घालणे** – १. उड्या मारणे; हैदोस घालणे; दांडगाई मांडणे. २. पळवून लावणे (मंत्राने, जादूने वगैरे). [सं. उद्+धूल]

**उधळपट्टी** स्त्री. १. मनस्वी, फाजील, प्रमाणाबाहेर खर्च; निष्कारण व्यय.

**उधळभवानी, मावशी** स्त्री. खर्चिक स्त्री; उधळी.

**उधळमाख** स्त्री.उधळपट्टी; उधळमाधळ :'आम्ही पैशाची अशी उधळमाख करतो.' – विविध १८.८.३६, (१५).

**उधळमाधळ** स्त्री. उधळ; उधळपट्टी; नको त्या ठिकाणी खर्च; आटोपशीरपणा नसणे :'कथात तसली उधळमाधळ करून वाचकाला दिपविण्याची संधी ...' – शेलूक (प्र.) १.

**उधळवाफ** स्त्री. १. ओल कमी झाल्यामुळे पेरण्यास अयोग्य अशी जमिनीची स्थिती; किंचित कोरडेपणा. २. पेरणीचा हंगाम गेल्यानंतरचा काळ. ऐनवाफ, घातवाफ यांच्या उलट.

**उधळवावली** क्रिवि. आल्या पायी परत; मागल्या पायी माघारे :'उधळवावलीं जावें कीं ...' – पैठणच १४३.

**उधळा** पु. १. भुरळ; मोह :'हा रजोगुणाचा उधळा । पडे ज्ञानियाचां डोळा ।' – उगी ७३८. २. मंतरलेली राख; भस्म; धुरळा. पहा : **उधळण** :'कनककमळांचां कचोळा । कीजे परागाचा उधळा ।।' – शिव ७८१.

**उधळा, उधळ्या** वि. पुष्कळ खर्च करणारा; उधळपट्टी करणारा. पहा : **उडव्या** : 'धर्म करी त्याला उधळ म्हणती । न केल्या बोलती पोटपोशा ।।'

**उधळाउधळ** पहा : **उधळणे १,३**

**उधा** वि. उधळ्या.

**उधाइणे** न. प्रकट होणे. पहा :**उधवणे** :'म्हणौनि आळविला तंव बोखटा । उधाइला हा ।।' – राज्ञा ११.४४७. [सं. उद्+धृ]

**उधाण, उधान** न. १. अमावस्या-पौर्णिमेला येणारी मोठी भरती; पूर्ण भरती :'भरलें रतिसागरीं विषय उधान । करूं कुठवर करीं अपिधान ।।' – प्रला १३९. २. (सामा.) भर; ऊत :'बादशहाचा हा गळेकापू प्रकार पाहून माझ्या देहांतल्या एकूण एक धमन्यांतील रक्त सारखे उधाण पावत आहे.' – स्वप ७६. ३. पशूंच्या ठिकाणी दिसून येणारे कामोद्दीपन. ४. तारुण्याचा भर. ५. भरभराट; उत्कर्ष वगैरे. [सं. उत्थान] (वा.) **उधाण येणे** – भरती येणे; उचंबळून येणे : 'उत्साहाला उधाण यावं तर त्याच वेळी .....' – किरि ४३.

**उधाणी** स्त्री. वाद; चर्चा :'भेटीसरसीचि उधाणी प्रवर्तली ।' – लर २०. [सं. उद्+वाणी]

**उधाणे** अक्रि. बहरणे; प्रफुल्ल होणे; उत्कर्ष पावणे; विकसणे; बहर येणे : 'जेथ पद्में प्रेमा मोददती । आनंदमकरंदे उधाती ।।' – ज्ञाप्र ४१२.

**उधानणे** अक्रि. १. तारुण्याच्या भरात येणे. २. भरती येणे.

**उधानाचे पाणी** पौर्णिमा-अमावास्येस येणारे मोठ्या भरतीचे पाणी.

**उधाय** अक्रि. ओसंडणे :'घवघवीत दैवी चहुकडे उधाय ।'– ऋ.

**उधार** पु. १. पतीवर किंवा खात्यावर जिन्नस आणणे; आणलेला जिन्नस :'मज उधार न घालावा संनिधानाचा ।' – भाए १४५. २. ऋण; कर्ज; पतीवर आणलेल्या मालाबद्दलचे येणे-देणे :'याचा धरी नियत इंदु उधार साचा.' – सारुह ८.१३१. ३. बिनव्याजी कर्ज; उसनी आणलेली रक्कम; वस्तू.

वि. अवकाशाचा; वायद्याचा; विलंबाचा :'संसार म्हणजे सर्वेच स्वार । नाहीं मरणास उधार ।।' – दास ३.९.१.

क्रिवि. पतीवर, जबाबदारीवर (देणे, घेणे, आणणे, नेणे).[सं. उद् + आ + हृ; किंवा उद् + धृ] (वा.) **उधार बोलणे** – वर वर बोलणे :'कांहीं कल्पिसी संदेहो । उधार बोलणें कृत्रिम स्नेहो ।।'– मुंशु १२९.

**उधार** पु. (प्र.) उद्धार. अवतरण; उतरून घेतलेला मजकूर; सारांशरूपाने घेतलेला लेख :'सूर्याजी भोसले यांचे तहनाम्याचा दाखला आहे त्यांत पहिले यांचे तहनाम्याचा उधार आहे.' – मइसा ७.२२३. [सं. उद्धार]

**उधारणे** अक्रि. कोरून काढणे.

**उधारपट** पु. पतीवर माल घेतलेल्या गिऱ्हाइकांची नोंद; उधारीची यादी.

**उधारपट्टा** पु. (अर्थ.) परतफेडीच्या बोलीने वस्तू, सेवा इ. पुरवणे.

**उधारपाधार** पु. पतीवर माल देणे, घेणे; उधारीचा व्यवहार.[उधारचे द्वि.]

**उधार समाकलन पद्धति** स्त्री. (ग.) उधार घेण्याची पद्धत.

**उधारा** वि. उताणा; तोंड वर केलेला.

**उधारा** पु. उतारा. (गो.)

**उधारी** स्त्री. काही मुदतीने पैसे देऊ करून माल नेणे; उधार व्यवहार; उधार; उचल; उचापत; ऋण; देणे.

**उधावणे** उक्रि. उद्भवणे; वाढणे; जोर येणे. पहा : **उधवणे** : 'अधिकांचि

विरोहज्वरुं । उधावतु दिसे ।।' – शिव ८३२. [सं. उद्+धू]

**उधासणे** अक्रि. उफाळणे; क्षुब्ध होणे. पहा : **उधसणे** : 'बेडकानें उडी मारल्यामुळे सागराचे पाणी उधासेल काय?' – स्यूत २३८.

**उधाळा** पु. १. उधळणे; डोळ्यात काही उधळून गेले असता होणारी स्थिती; उधळणे; धुंदी : 'मज कैसा पडला मोहाचा उधाळा ।।' – उगी ३८८. २. भुकटी; रक्षा; भस्म : 'घाली रूपाचा उधाळा ।' – उगी ३६२. [सं. उद्धूल]

**उधाळी** स्त्री. उडी. (क्रि. मारणे.)

**उधांग** न. उसंत; अवकाश. (व.)

**उधी** स्त्री. १. निर्णय. २. वाढ : 'तैसी तेथ सत्त्वशुद्धी । आगळें ज्ञानासि उधी ।' –राज्ञा १४.२२०.

**उधृता** वि. वर धरलेली.

**उधेल** वि. खवले, वण असलेला.

**उधोपानस्य** पु. कोठीवाला : 'कारकून उधोपानस्या आणोन ।' – रामदासी २.३२.

**उध्वस्त** वि. समूळ नष्ट केलेला; अस्ताव्यस्त; उधळलेला; इकडेतिकडे करून टाकलेला; नाश केलेला. [सं.]

**उनउनीत** वि. गरमागरम : 'तो पदार्थ त्याला उनउनीत खायला मिळेल की नाही ....' – पाषाण २४५.

**उनखुन** स्त्री. मनोमन संकेत : 'कही उनखुन चुकली ।' – लीचपू २९.

**उनत** वि. सज्ज : 'दोन्ही अरणी उनत जालिया ।' – लीचपू ४६०.

**उननी** न. आधण आलेले पाणी. (व.)[सं. उष्ण + वन – वणी]

**उनवणी** न. उष्णोदक.

**उनंत** वि. थोर; मोठा : 'जुंझा लागौनी उनंत ।' – उषा ८२७.[सं. उन्नत]

**उना, उनी** अक्रि. आला–आली. (खा.)[हिं. आना]

**उनाइनें** ऐकून. (भिल्ली.).

**उनाड** वि. १. अनिर्बंध; भटक्या; खोड्या काढणारा; कामधाम न करणारा; उडाणटप्पू; मोकळा; सुटलेला; स्वैर (मनुष्य, मूल). २. जंगली; रानटी (बैल, वनस्पती वगैरे). ३. स्वैर, व्यभिचारी. (को.)

क्रिवि. १. स्वैरतेने, अनिर्बंधपणे, स्वच्छंदपणे (भटकणे). २. आपोआप, न लावता (उगवणे). [सं. उद्+नट्, नाट्]

**उनाडकी** स्त्री. उनाडटप्पूपणा; खोडकरपणा.

**उनाडघेवडा** वि. उनाड : 'उनाडघेवडी सगळ्या गावात हिंडते.' – आआशे २३२.

**उनाडचाळा** पु. स्वैरवर्तन; खोडकरपणा; व्रात्यपणा; उनाडकी.

**उनाडझाड** न. रानटी, जंगली झाड; तण.

**उनाडणे** अक्रि. स्वैरपणाने फिरणे, भटकणे; खोड्या करीत फिरणे; उनाडक्या करीत राहणे.

**उनाडबाहुला** वि. भटक्या, उनाडक्या करीत फिरणारा; स्वैर; स्वच्छंदी.

**उनाडभाजी** स्त्री. जंगली माठ.

**उनाडमैना** स्त्री. स्वैरिणी स्त्री; चवचाल बाई.

**उनारणे** सक्रि. पेरणे; इकडेतिकडे फेकणे : 'ती मोती उनारत गेली.' – जसा ३१८.

**उनारणे** अक्रि. भाजलेल्या कणसांतील दाणे चोळून काढणे. (व.)

**उनारी** पेरण्याच्या वेळी गव्हाचे किंवा ज्वारीचे दाणे चाड्यात एका विवक्षित क्रमाने सोडण्याची क्रिया. [व.]

**उनिदिया, उनीदा** वि. जागृत : 'उनीदेयाचें पहुडणें । निरोधाचें वेल्हावणें ।' – राज्ञा १२.६४. पहा : **उन्निद्रा** [स. उन्निद्र]

**उनी** वि. लोकरी; गरम : 'शंकरच्या अंगावरील लालभडक उनी ब्लँकेट व्यवस्थित केलं.' – माणूस ३४७. [सं. ऊर्ण]

**उनीद** वि. ज्याची झोप उडाली आहे असा. पहा : **उनिदिया**

**उनून** वि. गरम; उनउनीत; पुष्कळ ऊन; खूप तापलेले. पहा : **उन्हून**

**उने** न. १. खोटेपण : 'जरि न करी तरि या बोलाचें उनें असे.' – पर २.१.२. २. उणेपण : 'तुझेया मोक्षपदा कारणें । मानूनि चहु मुक्तीचें उनें.' – ऋम ६९१.

**उनैदा** स्त्री. निद्रानाश : 'बाबासि उनैदा होइल.' – अली ८३.

**उन्चह** जे काही.

**उन्नत** वि. उन्मत्त; उद्धत; मग्रूर : 'तमाम अमीर राजे रजवाडे जाट यांनी मुलूख आटोपून अति उन्नत जाले.' – ऐसंसाखं ७.४३.

**उन्नत** वि. उंच; उच्च; श्रेष्ठ; वर आलेला; भरभराटीला आलेला; उठावदार. [सं. उद्+नम्]

**उन्नत, उन्नतांश** न. पु. १. (ज्यो.) खस्थ पदार्थाचे क्षितिजापासून होणारे कोनात्मक अंतर. २. समुद्रसपाटीपासूनची उंची.

**उन्नति–ती** स्त्री. १. उंची. २. श्रेष्ठपणा; मोठेपणा; अधिकार. ३. उत्साह : 'कां परिसु जालिया हातीं । लोहालागीं सर्व संपत्ति । वेंचितां ये उन्नती ।' – ज्ञा १८.६००. ४. उदय : 'दिवसाचिये उन्नती । भानु जैसा ।।' – ज्ञा १७.१३३. ५. वृद्धी; प्रगती; विकास; उत्कर्ष; आधिक्य : 'ते कथेची संगति । भावाची संपत्ति । रसाची उन्नति । म्हणिपेल पुढा ।।' – ज्ञा ४.२११. ६. पहा : (ज्यो.) : **उन्नतांश.** ७. उद्धटपणा. [सं. उद्+नम्–नति]

**उन्नत्र** न. उज्ज व नत्र यांचे संयुक्त द्रव्य.

**उन्नद्ध** वि. गर्वाने फुगलेला : 'वक्रदंत जरासंध । शाल्वपौंड्रक उन्नद्ध ।।' – एरुस्व ५.३७. [सं. उद्+नह्]

**उन्नयन** न. १. वर नेणे; उचलणे; दूर नेणे; लांबविणे. २. वर येणे; मोठेपणा देणे : 'वास्तवाच्या उन्नयनाला जागा नाही.' – पासंग ७८. ३. (सास) उदात्तीकरण. [सं.]

**उन्नयनकोन** पु. (ग.) क्षितिजसमांतर रेषेवर पडणाऱ्या लंबरेषेने तिच्याशी केलेला कोन.

**उन्नाद** पु. वाढ.

**उन्नायी** पु. (स्था.) वर नेणारा, चढवणारा विजेचा पाळणा; लिफ्ट.

**उन्नाव, उन्नाह** पु. वृद्धी; वाढ; भरती : 'काय प्रलयांबूचा उन्नाहो । वोघु मानी ।।' – ज्ञा १८.४१३. [सं. उद्+नी]

**उन्निद्र** वि. जागा : 'उन्निद्रेयाचे पहुडणें ।' – ज्ञा १२.६४.

**उन्निद्रा** स्त्री. जागृती. [सं. उद्+निद्रा]

**उन्निद्रित** वि. जागृत : 'उन्निद्रितें एके निद्रितें ।' – ज्ञा ११.१२८.

**उन्फा** पु. रोजचा शिधा; भत्ता; रोजमुरा : 'तितक्यांस चार मिष्टान्न उन्फे चालविले.' – चित्रगुप्त. [फा. उल्फा]

**उन्मज्जन** न. पाण्यातून वर येणे. [सं.]

**उन्मत्त** वि. १. गर्विष्ठ; उद्धट; अतिशय उर्मट; मस्त; माजलेला; दांडगा; रागीट : 'ऐसें होय तया उन्मत्ता ।' – ज्ञा ३.११५. २. धुंदी असलेला; नशा चढलेला; झिंगलेला; शुद्धी गेलेला (मद्य इ. च्या सेवनाने). [सं.]

**उन्मत्तकरण** (नृत्य.) उजव्या पायाची बोटे आकुंचित करून तो टाचेवर उभा करणे; हंसपक्ष हात फिरवून उताणे करून व बाहू पसरून ठेवणे.

**उन्मत्तद्रव्य** न. मद्यादी मादक पदार्थ : 'कां उन्मत्तद्रव्य सेविलें । तेणें अनेक भासों लागलें ।।' – दास १०.६.१५. [सं.]

**उन्मत्तभैरव** पु. एक मात्रा, रसायन.

**उन्मत्तवायु–यू** पु. भ्रम; उन्मादवायू; वेड; बडबड; एक वातविकार; वेडाची लहर, झटका. [सं.]

**उन्मन** वि. १. लीन; ऐहिक विचारापलीकडे गेलेला; परमेश्वरचिंतनात निमग्न; उन्मनी अवस्थेत असलेला : 'तुका म्हणे मन उन्मन जों होय । तोंवरि हे सोय विधि पाळीं ।' – तुगा २७६८. २. देहभान हरपलेला. [सं.]

**उन्मनस्क** वि. खिन्न; अस्वस्थ. [सं.]

**उन्मनावस्था** स्त्री. (तत्त्व.) मनाची उच्चतम आध्यात्मिक अवस्था; तन्मयावस्था; काव्योन्माद. काहींच्या मते ईश्वरी साक्षात्कारामुळे मनाची होणारी अवस्था, स्थिती. [सं.]

**उन्मनी** स्त्री. जागृती, स्वप्न, सुषुप्ती आणि तुरीया याहून पलीकडील पाचवी अवस्था; मनाचा लय झालेली स्थिती; मनाच्या पलीकडे नेणारी (अवस्था); समाधीची (अवस्था). ह्या अवस्थेत वृत्ती मायेच्या उपाधीपासून मुक्त होऊन ब्रह्माच्या ठिकाणी लीन होते. परमेश्वराच्या ठिकाणी लय, तंद्री : 'उन्मनी ते निवृत्ति जाण । जेथें विरे जाणपण । विज्ञान तें ।।' – दास ७.४.५०. [सं. उद्+मनस्]

**उन्मळण** न. उपटून पडणे; उन्मूलन : 'अंगवायो सुटला तेणें द्रुमां । मार्गी उन्मळणें जालीं ।' – कृमुरा १४.१. [सं. उद्+मूलन]

**उन्मळणे** उक्रि. १. उपटणे; समूळ उच्छेद करणे : 'गळा बांधूनियां उखळासी दावें । उन्मळीं त्या भावें विमळार्जून ।' – तुगा २०. २. भडभडून येणे; कळमळणे; मळमळणे. [सं. उन्मूलन] (वा.) **उन्मळून जाणे** – (संकट, दु:ख इत्यादींनी) खचणे.

**उन्मळणे** अक्रि. उमलणे; उघडणे; विकासणे; फुलणे. पहा : **उन्मिळणे** : 'तियें उन्मळितां मावळे । नवलावो ।।' – अमृ ७.१८४. [सं. उन्मीलन]

**उन्मळित** वि. उघडलेले; विकासलेले : 'पाहिलें ताटस्थ उन्मळित लोचन ।' – तुगा ११७. [सं. उद्+मीलित]

**उन्मंडल** न. विवक्षित स्थलींच्या मध्यान्ह रेखापाताच्या क्षितिजाला त्या स्थलाचे उन्मंडल म्हणतात; दिनमान मोजण्याकरिता दक्षिणोत्तर कल्पिलेले वृत्तविशेष.

**उन्मंडलशंकु–कू** पु. सकाळी सहा वाजता सूर्याच्या उन्नतांशाची भुजज्या. [सं.]

**उन्माद** पु. १. गर्व; ताठरपणा; उद्धटपणा; माज (विद्या, संपत्ती इत्यादीयोगे). २. धुंदी; बेशुद्धी; उत्कट मनोविकार; कैफ (मादक पदार्थांमुळे येणारा). ३. भ्रम; वेड; वातविकार. [सं. उद्+मद्]

**उन्माद** पु. १. गर्भाशयाचा आजार. २. (मानस.) भावनांच्या अनावर प्रक्षोभामुळे होणारा मानसिक विकार; वेडाचा झटका. [सं.]

**उन्मादक** वि. १. कैफ आणणारे; गुंगी आणणारे; मादक. २. वासना चाळवणारे. [सं.]

**उन्मादणे** अक्रि. उसळणे; वर येणे; वाढणे : 'रांधवणी चुलीपुढे । पऱ्हे उन्मादती खातवडे ।' – ज्ञा १३.५६३. २. उन्माद येणे; माजणे; मस्ती येणे. [सं. उन्माद]

**उन्मादवायु–यू** पु. भ्रम; वेड. पहा :**उन्मत्तवायु–यू** [सं.]

**उन्मान** न. १. वजन करण्याची क्रिया; वजन करणे. २. वजन; भार (वस्तूचे). ३. वजन करण्याचे प्रमाण; माप–वजने (किलो, ग्राम इ.). ४. वजन करण्याचे साधन (तराजू, काटा). [सं. उद्+मा]

**उन्मार्ग** पु. चुकीचा रस्ता; वाईट वाट. [सं.]

**उन्मार्गी** वि. बहकलेला; वाईट मार्गाने जाणारा.

**उन्मिळणे** अक्रि. विकासणे; उघडणे; फुलणे. [सं. उन्मीलन]

**उन्मीलन** न. १. उघडणे; उमलणे; विकासणे; फुलणे : 'जेथ उन्मीलन होत आहे दिठी ।' – ज्ञा ११.१४१. २. प्रगट करणे; दाखविणे; व्यक्त करणे; अनाच्छादित करणे : 'जगदुन्मीलनाविरल । केलिप्रिय ।।' – ज्ञा १८.४. ३. ग्रहण सुटणे. ४. डोळ्यांची उघडझाप; लुकलुक.

**उन्मीलित** वि. १. उन्मीलन झाले आहे असे; विकासलेले, फुललेले (फूल). २. उघडलेले (डोळे). ३. सुटलेले (ग्रहण). [सं.]

**उन्मुक्त** वि. मोक्ष मिळालेला; स्वतंत्र; निर्बंधरहित. [सं.]

**उन्मुक्तपणे** क्रिवि. मोकळेपणाने; स्वैरपणाने.

**उन्मुक्ति–क्ती** स्त्री. मोकळीक; करातून, कायदेशीर आरोपातून, शिक्षेतून किंवा नोकरीतून मिळालेली सूट. [सं.]

**उन्मुख** वि. सज्ज; तत्पर; प्रवृत्त झालेला; तयार झालेला. उदा. मरणोन्मुख, विषयोन्मुख. [सं. उद्+मुख]

**उन्मूलन** न. नायनाट; समूळ उपटून टाकणे; निर्मूलन; उच्छेद; नाश. [सं.]

**उन्मूलित** वि. उपटलेले; नाश केलेले. [सं.]

**उन्मूळणे** सक्रि. मुळासकट उपटून टाकणे : 'जे संसारातें उन्मूळी ।' – ज्ञा १३.१७२. [सं. उद्+मूल]

**उन्मेख, उन्मेष** पु. १. डोळ्यांची उघडझाप; उघडण्याची क्रिया; निमेष (मिटणे) याच्या उलट. २. उघडणे; फुलणे; विकासणे (डोळे, फूल वगैरे). ३. बुद्धीचा विकास; ज्ञानप्राप्ती; ज्ञानसंपादन : 'तऱ्ही उन्मेखाचिये पेठे । गुणा अवंकणी भरीन बुद्धीचि साटे ।' – ऋ १४; 'मग नवी विरूढी फुटेल । उन्मेषाची ।।' – ज्ञा २.७९. ४. ज्ञान; बुद्धी; प्रकाश; जागृती : 'जयाचेनि विवेककिरणसंगें । उन्मेखसूर्यकांतु फुणगे ।' – ज्ञा १६.८. ५. तेज; चमक. ६. प्रकटपणा; उघडपणा : 'जें किरीटीं तुज निकें । तें पूस पां उन्मेखें । मनाचेनि ।।' – ज्ञा २.२८६. ७. (ल.) प्रतिमेचे धुमारे; किरणशलाका. [सं. उन्मेष]

**उन्मेखून** क्रिवि. मुद्दाम; आवर्जून; निश्चयाने; दाटून; बुद्धया; जाणूनबुजून. [सं. उन्मेष]

**उन्मेखे** क्रिवि. स्पष्टपणे; उघडपणे; आवर्जून : 'आतां असोत ही वाक्यें । सिंधु केंवी उपसूं नखें । हें सांगितलें उन्मेखें । तुज प्रती ।।' – कथा १.१४.८९.

**उन्मोचन** न. (अर्थ.) अर्थव्यवहारातील एखाद्या देयभारातून वा दायित्वातून मुक्त करणे.

**उन्ह** न. उन्ह; सूर्यप्रकाश; पहा : **ऊन** : 'उन्हाचेनि मिषें तोंडें । आगीचि गिळी ।।' – ज्ञा १७.१४१. [सं. उष्ण] (वा.) **उन्हात ठेवणे –** उन्हात तापत ठेवणे. **उन्हातील पाला होणे –** कोमेजणे; म्लान होणे; जीव सुकणे : 'जाहला उन्हांतील पाला ।' – संग्रामगीते ११८. **उन्हात घर बांधणे –** मुलाची आगळीक करणाऱ्याला शिक्षा देण्यासाठी गमतीने वापरतात : 'बांधू हं! त्याचं उन्हामध्ये घर । बाळ माझं खेळकर ।' – माजू.

**उन्हउन्हीत** वि. उनून; ऊन; गरम.

**उन्हणे** अक्रि. उन्हात तापणे; ऊन होणे; उन्हात ठेवणे, उन्हं देणे या रूपातच क्वचित हे क्रियापद आढळते. [सं. उष्ण]

**उन्हतिन्ह** वि. ऊनऊन : 'उन्हतिन्ह जेउं सुदूले ।' – लीचपू ३७.

**उन्हन, उन्हून** वि. कढत; वाफ येत असलेला; उनून : 'मेक्सिको येथील लोकांच्या देवता मांसभक्षक असल्यामुळे तेथील लोक उन्हन उन्हन ताजें मांस आणि रक्त त्यांच्या तोंडात कोंबतात.' – आगर ३.१५. [सं. उष्ण]

**उन्हवण** न.ऊन पाणी. पहा : **उन्हवणी** : 'आंतु घालितां हात पोळे । तेणे उन्हवणें घर न जळे ।' – एभा १०.४८४.

**उन्हवणी, उन्हाणी** स्त्री. १. ऊन पाणी : 'कुंथावयाची आवडी ओवा । उन्हवणी रडवी बाळें ।।'– तुगा ३२५७. २. सूर्यप्रकाशात तापवलेले पाणी : 'मोहरिया वाटुनि उन्हाणियासि दिधलिया तुं मरसिल ।' – पंच ३.१८. २. उष्णता. [सं. उष्ण+वन = पाणी]

**उन्हसाण** न. गरमपणा. (गो.)

**उन्हळ** स्त्री. उन्हाने लाकडात पडलेली भेग.

**उन्हाचा कढ** सूर्याची प्रखर उष्णता.

**उन्हाटणे** अक्रि. उन्हाने करपणे; सुकून जाणे (फळे वगैरे).

**उन्हातान्हाचा** क्रिवि. भर दोन प्रहरी; मध्यान्ही; ऊन कडक असताना. [उन्हचे द्वि.]

**उन्हारी** स्त्री. रब्बी; वसंत ऋतूतील पीक; वसंत हंगाम : 'जलद आलियापुढें उन्हारीची जोतपात होईल. नाहींतर उन्हारी पडेल.' – पेद २९.२५.

**उन्हाळ ऊस, वांगी** उन्हाळ्यात होणारी ऊस–वांगी वगैरे पिके.

**उन्हाळणे** अक्रि. १. उन्हापासून त्रास होणे. २. ऊन लागून तडकणे (लाकूड). ३. उन्हाळे लागणे; उन्हापासून एक विकार होणे. [सं. उष्णकाल]

**उन्हाळपावसाळ** क्रिवि. उन्हाळ्यात आणि पावसाळ्यात; बारमाही; सबंध वर्षभर.

**उन्हाळभावई, उन्हाळभावळी, उन्हाळभावी** स्त्री. वैशाख वद्य अमावस्या. (व.)

**उन्हाळमैत्री** स्त्री. उन्हाळ्यापुरती, चालत्या काळापुरती मैत्री; हंगामी मित्रत्व. (व.)

**उन्हाळसावली** स्त्री. १. उन्हाळ्यात राहण्याकरिता बांधलेले घर; उन्हाळी बंगला; बाराद्वारी. २. (थट्टेने) छप्पर; झोपडी. ३. उष्णतेपासून बचाव; आसरा.

**उन्हाळा** पु. १. ज्या दिवसांत ऊन कडक असते ते दिवस; फाल्गुनापासून ज्येष्ठापर्यंतचे चार महिने. २. उष्मा; उकाडा. ३. वारंवार मूत्र विसर्जन करावे अशी भावना व जळजळ होणे; शारीरिक पीडा; उष्णतेचा विकार. (क्रि. लागणे). ४. आईबापावाचून उघडे पडणे; निराश्रितपणा; पोरकेपणा. ५. नाहीसे होणे; नाश पावणे; अभाव; करपणे; जळणे; खराब होणे (शेत, बाग, मळा वगैरे) : 'प्रीतीचा उन्हाळा राया ।' – संग्रामगीते ८१.[सं. उष्णकाल] (वा.) **उन्हाळा करणे –** नाश करणे; उजाड करणे : 'मी म्हणतें नुसते दागिने नेले असते तरी बरें. पण घराचा उन्हाळा केला.' – नामदेव नाटक ७६. **उन्हाळे पाहणे –** १. वयाने जास्त असणे. २. जास्त अनुभव असणे.

**उन्हाळी** स्त्री. १. हवेतील उष्णता; उन्हाळ्यातील उष्णता; उकाडा. २. एक मूत्रविकार; उन्हाळे. (क्रि. लागणे, होणे). ३. एक वनस्पती; रानटी तीळ. हिची फुले लाल व पांढऱ्या रंगाची असून शेंगा चपट्या व पाने लहान व लांबट असतात. काढाचा सर्पणासाठी उपयोग होतो. शिवाय व्रण, खोकला, विष, दमा, अर्श, ज्वर, वायू वगैरेचा नाश करण्याचे गुण यामध्ये आहेत.

**उन्हाळी पड** (कृषि.) उन्हाळ्यात पीक न घेता जमीन तशीच ठेवणे.

**उन्हाळीपावसाळी** स्त्री. खेळातील दोन पक्षांपैकी कोणी डावाला सुरुवात करायची हे ठरविण्यासाठी खापरी किंवा पैसा याला एका बाजूने थुंकी लावून तो वर फेकतात. त्या खापरीची किंवा पैशाची कोरडी बाजू ती उन्हाळी व थुंकी लागलेली ओली बाजू ती पावसाळी. त्यापैकी एकाने कोणतीतरी बाजू मागायची व मागितलेली बाजू वर आल्यास त्याने प्रथम खेळायचे असते. पहा : **ओली सुकी**

**उन्हाळीभात** न. वायंगणे भात.

**उन्हाळू** न. उन्हाळ्यातील पीक. (माळवी)

**उन्हाळे** पु. अव. उष्णतेचा, लघ्वीचा विकार; उन्हाळी : 'मुरडा हागवण उन्हाळे ।' – दास ३.६.३०.

**उन्हाळे, उन्हेरे** न. उष्ण पाण्याचा झरा. [सं. उष्ण+आलय]

**उन्हीत** वि. पहा : **उनउनीत** (गो.)

**उन्हू देणे** सक्रि. तापू देणे.

**उन्हून** वि. गरम. पहा : **उन्हन**

**उन्हेत** न. सूर्याची उष्णता; ऊन. (गो.)

**उन्हेरी कारंजे** अत्युष्ण पाण्याचा व वाफेचा फवाऱ्यासारखा झरा.

**उन्हेरे** पहा : **उन्हाळे**

**उन्होटी** स्त्री. उबारा.

**उप** अ. एक उपसर्ग. हा पुढील अर्थी योजतात. १. अनुगमन. उदा. उपदेश, उपालंभ. २. अधिकपणा. उदा. उपपरार्ध. ३. हीनपणा, गौणत्व. उदा. उपस्त्री, उपपत्नी, उपपुराण. . दुय्यम; गौण. उदा.

उपसचिव, उपायुक्त. ५. कमी प्रतीचा, तीव्रतेचा, गुणाचा. हा आम्लात किंवा त्या रसायनात (प्राणवायूचा) कमीपणा आहे असे दाखवतो. उदा. नत्रस अम्लापेक्षा उपनत्रस अम्ल हे कमी अम्लजन असते. ६. समीपता; सान्निध्य. उदा. उपकंठ, उपनदी, उपांत्य. ७. पहिलेपणा. उदा. उपक्रम. ८. दाक्षिण्य; आदर. उदा. उपचर्या. ९. साम्य. उदा. उपधातू, उपव्याघ्र. १०. शेवट; नाश. उदा. उपरती. ११. विकार. उदा. उपलेप. १२. स्वीकार. उदा. उपगम, उपाकर्म. १३. व्यापणे. उदा. – उपहास. १४. समूहत्व; संमेलन; संकलन. उदा. उपार्जन. १५. शक्ती. १६. अध्ययन; अध्यापन. उदा. उपाध्याय. १७. उद्योग. १८. कडे; वर; खाली. उदा. उपनयन. १९. निरर्थक, स्वार्थी म्हणूनही कधी हा उपसर्ग लागतो. अप या उपसर्गाचे काही अर्थ याचेही आहेत.

**उपअपराध** पु. क्षुल्लक अपराध.

**उपकणा–था** पु. नावेचा आतील कणा.

**उपकथा** पु. १. आडकथा. २. चातुर्याची गोष्ट, कुळकथा.

**उपकथानक** न. मूळ कथानकाला पूरक असणारी कथा.

**उपकर** पु. १. विशेष कामाकरिता बसवलेला कर, पट्टी. २. अर्थसंकल्प जाहीर झाल्यानंतर विशेष उत्पन्नाचे साधन म्हणून सरकारने बसवलेला कर. ३. दुय्यम कर; करावर घेतलेला कर :'जमीन महसुलावर उपकर बसविणे .....' – अम १८६. [सं.]

**उपकरण** न. १. साधन; हत्यार; एखाद्या कामासाठी वापरले जाणारे, विशिष्ट प्रकारे बनवलेले यंत्र. २. साहित्य; सामग्री; परिवार; घटकावयव; घटकद्रव्य :'हे यज्ञोपकरण सकळ ।' – ज्ञा ३.१२८. ३. देवाच्या पूजेची भांडी (घंटा, ताम्हन, धूपार्ती इ.) :'आणि उपकरतीं आपुलीं । उपकरणें आथि जेतुलीं ।' – ज्ञा १३.४०७. ४. (अव.) पंचाग तयार करताना केलेली निरनिराळी गणिते, फले (तिथिशुद्धी, अब्दप इ.). ५. राजभूषणे; राजचिन्हे (छत्र, चामर इ.). ६. शास्त्रीय प्रयोगसाहित्य. [सं. उप+कृ]

**उपकरणसामग्री** स्त्री. अनुष्ठानास अगर देवपूजेस लागणारे साहित्य किंवा भांडी :'माता निरोपी कैकेयीतें । उपकरणसामग्री लागेल येथें । सिद्ध करूनि ते देई ।।' – रावि ३.९८. [सं.]

**उपकरणे** अक्रि. १. उपकार करणे; उपयोगी पडणे; कामास येणे :'आपुला अथवा परावा । ठायी उपकरसी पांडवा ।' – ज्ञा १८.१३५९. २. सेवा करणे. [सं. उप+कृ]

**उपकर्ता** वि. उपकार, कल्याण करणारा; मदत करणारा; उत्कर्ष करणारा; उपयोगी पडणारा; उपकारकर्ता; भरभराटीस आणणारा. [सं. उप+कृ]

**उपकंठ** क्रिवि. गळ्यापर्यंत; आकंठ (खाणे, वर जीव येणे). शअ. जवळ; शेजारी :'तरी अस्तुगिरीचिया उपकंठीं । रिगालिया रविबिंबापाठीं ।' – ज्ञा १२.३५. [सं.]

**उपकंडिका** स्त्री. छेदकाचा पोटभाग. [सं.]

**उपकंस** पु. (ग.) लहान कंस; कंसातील कंस. [सं.]

**उपकार** पु. १. निरपेक्ष मदत; साहाय्य :'जयां उपकार होते केले ।' – ज्ञा १.१८३. २. कृपा; दया; आभार; मेहेरबानी. ३. हित; कल्याण; फायदा; अडचणीच्या, संकटाच्या प्रसंगी दुसऱ्याच्या उपयोगी पडणे. [सं. उप+कृ] (वा.) **उपकार ठेवणे** – उपकाराची फेड न करणे. **उपकार बाळगणे, उपकार न विसरणे, उपकार स्मरणे** – उपकाराबद्दल कृतज्ञ असणे :'तेल आणुनि द्यावें घरा । तुमच्या उपकारा न विसरूं ।' **उपकारांनी बांधणे** – दुसऱ्यास ऋणी करून ठेवणे. **उपकारांनी मारणे** – १. अतिशय उपकार; न फिटणारे उपकार करणे. २. उपकार करून एखाद्यास वश करून घेणे; मिंधा करून ठेवणे.

**उपकारक** वि. १. साहाय्यकारी; अनुकूल; मदत करणारा. २. हितकारक; कल्याणप्रद (औषध, क्रिया इ.). [सं. उप+कृ.]

**उपकारी** वि. १. दुसऱ्याचा फायदा, बरे करणारा; उपकार करणारा; उपकारक; उपकार करण्याचा स्वभाव असलेला; परोपकारी. २. आभारी; कृतज्ञ. ३. साहाय्यक; साहाय्यकारी; हातभार लावणारा.

**उपकार्य** वि. ज्याला मदत करायची, ज्यावर उपकार करायचा असा.

**उपकालवा** पु. मुख्य कालव्याचे पाणी आजूबाजूच्या भागांत पोचवण्यासाठी काढलेला पाट.

**उपकुल** न. मुख्य गटाशी संबंधित परंतु काही बाबतीत वेगळा असणारा गट. [सं.]

**उपकृत** वि. मदत, उपकार केलेले; ज्यावर कृपा, दया केली आहे असा; ऋणी; आभारी. [सं.]

**उपकृति–ती** स्त्री. उपकार, हित, कल्याण.

**उपकेशगच्छ** पु. जैन धर्मातील एक संप्रदाय. असे एकंदर गच्छ (संप्रदाय) ८४ आहेत. श्रीमालच्या उहडाने ओस नगरी स्थापली तेव्हापासून त्या ठिकाणच्या जैन समाजाला उपकेश हे नाव पडले. ओसवाल जैन या गच्छाचे आहेत. [सं.]

**उपकेंद्र** न. १. एका मोठ्या केंद्राच्या आधीन काम करणारे दुसरे केंन्द्र, साहाय्यक केंद्र. २. (विद्युत.) जिथे निरनिराळ्या वीजनिर्मिती केंद्राकडून आलेली वीज ग्रहण केली जाते व तिचा दाब कमी करून ती अन्य ठिकाणी वितरीत केली जाते असे केंद्र. [सं.]

**उपक्रम** पु. १. आरंभ; सुरुवात; हाती घेतलेले नवे काम :'प्रकृति परिहार उपक्रमी ।' – ज्ञा १०.२८. उपक्रमाच्या उलट उपसंहार (शेवट) :'उपक्रमोपसंहारौ' – गीर २१. २. प्रवेश; शिरकाव (एखाद्या विषयात); प्राथमिक अवस्था; सूतोवाच. ३. ओघ; संदर्भ :'उपक्रमें वदे । तुका वर्मासी तें भेदे ।।' – तुगा ३५१५. ४. उद्योग करणे; उपाय करणे; चालविणे. ५. नव्याने हाती घेतलेले काम, व्यवहार; चालू केलेले काम. ६. उपाय किंवा प्रयत्न करणे. [सं. उप+क्रम् = जाणे]

**उपक्रमणिका** स्त्री. (ग.) संख्या, घटना एकामागून एक येण्याची, घडण्याची स्थिती; उपश्रेढी. [सं.]

**उपक्रमणे** उक्रि. उपक्रम, आरंभ करणे; हाती घेणे :'ऐसैसां अफाटीं कर्मीं । समारंभु उपक्रमीं ।।' – ज्ञा १४.२३४. [सं. उपक्रम]

**उपक्रमशीलता** स्त्री. १. स्वत:हून एखादी नवीन गोष्ट करण्याची वृत्ती. २. पुढाकार घेण्याची क्षमता. ३. कामे स्वीकारण्याची वृत्ती. [सं.]

**उपक्रमक्षमता** पहा : **उपक्रमशीलता**

**उपक्रमा** स्त्री. योजना.

**उपक्रमात्मक प्रवेश** (नाट्य.) ज्या विषयावर नाटक आधारित आहे तो विषय सूचित करणारा प्रवेश.

**उपक्रमी, उपक्रामक** पु. प्रवर्तक, अनिश्चिती स्वीकारणारा संयोजक.

**उपक्रांत** वि. आरंभलेले; उपक्रमलेले; चालू; सुरू. [सं.]

**उपखणे** अक्रि १. शेवट होणे; नाश पावणे; क्षय पावणे : 'पैं जगीं जीवनासारिखें । वस्तू अंग वरी उपखें । परी जातें जीवित राखे । तृणाचेंही ।।'– ज्ञा १६.१५६. २. व्यर्थ होणे : 'परी जहालीही वृष्टि उपखे ।'–ज्ञा ११.९५. ३. खर्चणे : 'आणि आपण जालिये जोडी । उपखों नेदी कवडी ।'– ज्ञा १८.६५३. ४. उपेक्षा करणे : 'निलेख उपखी देहाते.'– इप्र ८५. [सं. उप+क्षि–क्षय्]

**उपखणे** अक्रि. उगेच बसणे. [सं.उप + क्षि–क्षय्]

**उपखर्च** पु. किरकोळ, बारीकसारीक, अवांतर खर्च.

**उपखंड** पु. (कायदा.) कायद्यातील कलमाचा पोटभाग; कराराच्या, दस्तऐवजाच्या एखाद्या भागाचा पोटविभाग. [सं.]

**उपखा** स्त्री. १. उपेक्षा; कमीपणा; उणीव : 'गृहीं उपखा न पडी ।'– उगी ३५०. २. खंड; खळ : 'तव माझिया श्रवणसुखा । मध्येंचि पडेल कीं उपखा ।।'– स्वादि १२.२.६८. [सं. उपेक्षा]

**उपखा** पु. १. श्रम; 'तेथ चंद्रासि काय किरीटी । उपखा पडे ।' – ज्ञा ९.११५. २. क्षय; नाश; खर्च : 'किंबहुना इया भाखा । द्वैताचा जेथ उपखा ।।'– अमृ २.५४
वि. व्यर्थ; निरर्थक.

**उपखा** पु. सहवास; वस्ती; अधिवास : 'पडिला चारि देहाचा उपखा । चुकला परमार्थसुखा ।।'– ऋ ८.

**उपखाडी** स्त्री. (भूशा.) समुद्रकिनाऱ्याच्या आत पाणी घुसून तयार झालेली छोटी खाडी.

**उपगण** पु. उपवर्ग; पोटवर्ग; गौण प्रकार; भाग. [सं.]

**उपगणे** अक्रि. कंटाळणे. पहा : **उबगणे**

**उपगत** वि. मिळालेले; लब्ध; प्राप्त; सफल : 'तेथें कष्ट केले बहुत । न होयचि काय उपगत ।।'–गुच ४५.४४.

**उपगळा** पु. मानेजवळचा भाग.

**उपगळिये** स्त्री. मांडीवर मान; कड : 'गोसावी पहुडले असती । उपगळिये घेऊन उठविले.'– लीच १.६.

**उपगुरु–रू** पु. गुरूस मदत करणारा; त्याच्या हाताखालचा; दुय्यम शिक्षक; मालचाट्या. [सं.]

**उपगृह** न. (स्था.) दुय्यम घर; मुख्य घराजवळ बांधलेली जागा, घर.

**उपग्रह** पु. (ज्यो.) मोठ्या ग्रहाभोवती फिरणारा लहान ग्रह; गौण ग्रह; दुय्यम ग्रह. उदा. चंद्र, राहू, केतू. [सं.]

**उपग्रह** पु. अग्निबाणाच्या साहाय्याने अवकाशात सोडलेला यंत्रसंच. [सं.]

**उपग्रहपेशी** स्त्री. (वै.) गुणसूत्राच्या मूळ आकारापासून बाजूला काढलेला खंडांश. [सं.]

**उपघात** पु. दुर्दैवाचा फेरा; दैवदुर्विलास; संकट; आपत्ती; अपघात. [सं. उप + हन् = घात]

**उपचडा** पु. उमाळा; आवेग : ' उपचडे सुटती तिजला बहू ।'

**उपचय** पु. (वन.) पिष्ट, प्रथिन, मेद इत्यादी पदार्थ किंवा प्राकल (कोशिकेतील सजीव पदार्थ), काष्ठ, तूलीर (कौशिकावरण) इत्यादी बनवण्याची विधायक प्रक्रिया. [सं.]

**उपचय** पु. १. साठा; संचय; गोळा करणे. २. वाढ; वृद्धी. [सं. उप + चि]

**उपचयस्थान** न. (ज्यो.) कुंडलीतील ३, ६,१०,११ ही स्थाने. उन्नतीस कारणीभूत असणारी स्थाने म्हणून यांना महत्त्व आहे. [सं.]

**उपचार** पु. श्रम खटपट; उपाय; प्रयत्न : 'मग नानाहेतुप्रकारें । यथोचितें उपचारें ।'–ज्ञा ४.७१. [सं. उप +चर्]

**उपचार** पु. पूजेतील प्रकार. पहा : **षोडशोपचार** : 'देवांगण मिरवणियां । अंगोपचार पुरवणियां ।'– ज्ञा १७.२०३. [सं. उप + चर्]

**उपचार** पु. १. चिकित्सा पद्धतीतील प्रकार. पहा : **सप्तोपचार** २. वैद्यकीय चिकित्सा; औषधी योजना; इलाज; उपाय : 'तें उपचारा– वेया । रसु पाहे । देतु वैद्यनाथु ।'–ऋ २२. [सं. उप+ चर्]

**उपचार** पु. १. गौरव; आदरसत्कार; आतिथ्य; संभावना; सेवा : 'उपचार करोनि मग राजाला ।'– दावि ३९२. २. रुढी; रिवाज; चाल. उदा. लोकोपचार, शिष्टोपचार : 'मरों टेंकला विप्र पुत्रोपचारें । हरीचें वदे नाम लोकोपचारें ।'– नामसुधा ५९. [सं. उप + चर्]

**उपचार** पु. शब्दाचा वाच्यार्थापासून दूरान्वय; उपमा रूपक इ. वापरणे; लाक्षणिक भाषण; आलंकारिक भाषण. [सं. उप + चर्]

**उपचार** पु. सामग्री; साधने; साहित्य : 'कां वसंतीं बरवा आरामु । आरामींहीं प्रियसंगमु । संगमीं आगमु । उपचारांचा ।।' – ज्ञा १८.३४५.

**उपचारणे** सक्रि. उपचार करणे : 'तो तुवां उपचारिलों ।'–विसिंपू २.२२.

**उपचारपद्धति–ती** स्त्री. रोगावर उपचार करणाऱ्या ॲलोपथी, होमियोपथी, आयुर्वेद यांसारख्या निरनिराळ्या पद्धती; विशिष्ट उपचारशास्त्र. [सं.]

**उपचारबोल** पु. निरर्थक भाषण; औपचारिक, तोंडदेखले बोलणे; शिष्टाचार म्हणून वरवरचे, मनापासून नसलेले भाषण : 'उपचारबोल हा कायसा वृथा ।'– दावि २८६.

**उपचारभरण** न. साधनसामग्री : 'हेचि यज्ञोपचारभरण । अज्ञान घृत ।।'– ज्ञा ९.२४०. [सं.]

**उपचारहोडे** वि. क्षणिक.

**उपचित** वि. गोळा केलेले;एकत्र केलेले; जमवलेले; ढीग घातलेले; संगृहीत; संकलित. [सं. उप + चि]

**उपज** पु.स्त्री १. उत्पन्न; निपज; पैदास; नफा; फायदा; प्राप्ती. २. उत्पत्ती; जन्म; मूळ; उगम (निपजबरोबर बहुदा प्रयोग).३. (संगीत) आपल्या कल्पनाशक्तीने नवीनच घेतलेली तान. ४. शास्त्रादी व्यवहारात आपल्या बुद्धीने शंका, समाधान इत्यादी काढणे; नवीन कल्पना; शोध; संशोधन. [सं. उत् +पद्. ]

**उपजणे** अक्रि. १. उत्पन्न होणे; जन्मणे; उद्भवणे : 'ऐसा उपजे नित्य सद्भावो । तोही आपणपांचि ।।'– ज्ञा ६.३९. २. पासून निघणे; मिळणे; प्राप्त होणे : 'श्रीरामभजनीं बैसली प्रीत । तेजोमय शरीर दिसत । तेणें इंद्रासि भय उपजलें बहुत । म्हणे पद निश्चित घेईल हा ।।'–संवि २.१८२. पहा : **उपज**

**उपजत** वि. जन्मत:, जन्मापासून असणारा; सहज; जातीचा; निसर्गत: प्राप्त (गुण, दोष, शरीरप्रकृती वगैरे). उदा. उपजत बुद्धी -दुर्गुम- खोड-स्वभाव.

क्रिवि. १. जन्मत:; जन्मापासून; उदा. उपजत आंधळा- रोगी-मुका-शहाणा-लंगडा वगैरे : 'मांजर... यांचें भय मुलांमध्यें जसें स्वाभाविक उपजत असतें.'- नीति २६४.

**उपजत खोड** जन्मल्यापासून असलेला दुर्गुण (शारीरिक, मानसिक).

**उपजत गुण** स्वाभाविक, अंगाचा, जातीचा धर्म; जन्मापासूनचा गुण.

**उपजत बागी** मूळचाच, जातीचाच घोड्यावर बसण्यात पटाईत.

**उपजत बुद्धि-द्धी** जन्मत:च काही गोष्टी करण्याची प्राणिमात्रांची प्रेरणा; न शिकवता केवळ प्रेरणेने करता येणाऱ्या गोष्टी : 'जी उपजतबुद्धी असते तिला अनुसरून त्यांची दिनचर्या असते.'- लोटिव्या २५८.

**उपजत रांगणे** १. उपजल्यापासून रांगणे. २. एखाद्या वस्तूची एकदम भारी किंमत सांगणे.

**उपजत स्वभाव** अंगस्वभाव; जन्मत: असलेले गुणधर्म- स्वभाव; स्वाभाविक प्रवृत्ती.

**उपजनिपज** स्त्री. १. जन्म आणि वाढ; उदय आणि प्रगती (व्यक्तीसंबधी). २. आरंभ आणि शेवट; उत्पत्ती आणि लय (एखाद्या गोष्टीचा). ३. (संगीत) तानेचा एक प्रकार.

**उपजयोग्यता** स्त्री. (कृषि.) जमिनीची उत्पादनक्षमता.

**उपजरणे** अक्रि. अंग धरणे; पुष्ट होणे; भरास येणे. [सं. उप + जृ]

**उपजरा** पु. पुष्टी : '... घोडी उपजऱ्यास येत नाहींत.'- आदि महा ११४. [सं. उप + जृ]

**उपजविणे** सक्रि. पिकवणे; उत्पन्न करणे; जन्म देणे : 'वीर्यदानें उपजविता । अन्नदानें प्रतिपाळिता । संकटीं प्राणरक्षिता । तिघे पिते बोलिजेती ।।'- मुआदि १५.१५४.

**उपजंघा** पु. घोड्याच्या पायाचा रोग.-अश्वप २.३८. [सं.]

**उपजा** पहा : **उबजा**

**उपजाऊ** वि. सुपीक; पिकाऊ : 'त्या (मुलखात) उपजाऊ जमिनीचे वैविध्य आहे.'- आआ ८६.

**उपजाणीव** स्त्री. सुप्त मनात असलेली जाणीव.

**उपजाति-ती** स्त्री. (साहित्य.) इंद्रवज्रा व उपेंद्रवज्रा या दोन वृत्तांच्या मिश्रणाने झालेले एक वृत्त. याच्या प्रत्येक चरणात अकरा अक्षरे असून यती पदान्ती असतो. उदा. 'हा बाण गेला वरती मण्याला । धरून पृथ्वीवर आणण्याला ।' [सं.]

**उपजाति-ती** स्त्री. पोटजाती; उपवर्ग; पोटवर्ग. [सं.]

**उपजापक** वि. चुगल्या करणारा; मागे निंदा करणारा; लावालावी करणारा. [सं. उप + जल्प्]

**उपजारीस येणे** अक्रि. भरास येणे.

**उपजीवक, उपजीवी** वि. १. (एखाद्यावर) उपजीविका करणारा; पोट भरणारा; अवलंबून असणारा : 'आणि ग्रंथोपजीविये । विशेषीं लोकीं इयें । दृष्टादृष्टविजयें । होआवें जी ।।'- ज्ञा १८.१८०१. २. निर्वाहाचे साधन असलेले : 'ते दैवी सुखसंभवी । तेथ दैवगुणें येकोपजीवीं ।'- ज्ञा १६.६७. [सं. उप+जीव्]

**उपजीवन, उपजीविका** न. स्त्री १. निर्वाह; पोषण ; उदरनिर्वाह. २. जगण्याचे साधन; पोट भरण्याच्या उपाय. (अन्न आणि भक्ष्य.) ३. आश्रय; आधार; रक्षण; पालन; धारण (शरीराचे.). ४. रक्षणाचे साधन. (शक्ती, अन्न इ.). [सं. उप+जीव]

**उपजीविका** स्त्री. १. निर्वाहाचे साधन. २. प्राप्ती; लाभ : 'आमच्या मनसाबीयाची उपजीविकाहि हेच ।'- पेद ३.५५. ३. जगणे; पोट भरणे; निर्वाह. [सं.]

**उपजीव्य** न. निर्वाहाचे साधन; आश्रय; पोषक द्रव्य; जीवन; जीवाचा आधार. [सं.]

**उपजीव्य विरोध** १. आश्रयदात्याशी विरोध; पालनकर्त्याशी वैर. २. उपजीविकेचे साधन सुटणे.

**उपट** स्त्री. १. अन्नाची रेलचेल; समृद्धी. २. वीट; शिसारी; आकंठतृप्ती. (क्रि. घेणे.) [सं. उत्+पत्](वा.) **उपट घेणे, उपट जेवणे-** ओ येई तो खाणे; अधाशीपणे खाणे.

**उपट** स्त्री. १. पुनरुत्थान; उठाव; वर डोके काढणे : 'उपट खाल्ली पतीच्या दैवानें ।।'- मसाप १.१.२. २. उसळी, उशी (चेंडूची). [सं. उत्+पत्] (वा.) **उपट खाणे-** १. उलटणे (रोग इ.); जोरावणे; उलटून पुन्हा हल्ला करणे (शत्रूने). २. चेंडू उडणे; उशी येणे.

**उपट** पु. आघात.

**उपट** स्त्री. दोन्ही हातांत धरलेल्या सोट्यांचा मार, आघात, हल्ला. (क्रि. खाणे, घालणे) : 'तों वजिराचें सामान थोडकें, त्यास यांची उपट सोसेनाशी झाली ।।'- भाव ४९.

**उपट** वि. वाकडातिकडा, अडचणीचा.

**उपटआसन** न. अर्धासन; गरुडासन; एक गुढगा उभा व एक गुढगा पाडून बसणे; उपट बसणे. [सं. उत् + पत् + आसन]

**उपटखुंटा** पु. उपटजात्याचा खुंटा.

**उपटजाते** न. कोठेही हलविता -नेता येण्यासारखे जाते; जमिनीत कायम न पुरलेले जाते.

**उपटणी** स्त्री. उपटणे; वेचणे; वर काढणे. (शेण, तृण, केस इ.).

**उपटणे** सक्रि. १. उपटून काढणे; मुळासकट वर काढणे. २. (एखाद्यापासून द्रव्य वगैरे) कपटाने, युक्तीने काढणे; लाटणे; लुबाडणे : 'माझी खुशामत करून तुला पैसा उपटणे असेल.'- विवि ८.२. ४०. ३. हिसकून घेणे; लांबवणे; चोरणे; न कळत घेणे; पळवणे. ४. आपटून मारणे; तुटून पडणे; हल्ला करणे; कोसळणे : 'जें पाखिरू एकु चांचुवाडां । धरौनि उपटिलें ।।'- शिव ८६७. [सं. उत्पाटन]

अक्रि. १. (खिळा, खुंटी, झाड वगैरे भिंतीतून) बाहेर येणे; वस्तू खेचून बाहेर काढणे किंवा वेगळे करणे. २. प्रकट होणे; उजेडात येणे; अचानक येणे; दिसू लागणे; (अंमल) सुरू होणे : 'अरे बापरे ! घातवार, व्यतिपात, संक्रांत, क्रिंकांत, मरी आई, बारावा बृहस्पती, साडेसाती सारी एकदम उपटली !'-भाव ८९. ३. उत्पन्न होणे; प्रादुर्भाव होणे (एखादी साथ वगैरेचा); पुन्हा उद्भवणे (रोग). ४. उडणे; आपटून वर येणे : 'आपणचि चेंडु सुटे । मग आपणयां उपटे ।।'- अमृ ९.५७.

५. एखाद्यावर तुटून पडणे; रागावणे : 'रथें रथूं दाटी गजें गजां उपटी ।'– शिव ८८१. ६. अचानक घडणे; उद्भवणे : 'आत्याचे प्रकरण उपटले.'– कलंदर ३५०. [सं. उत्+पत्]

**उपटणे** सक्रि. टाकी लावणे. (तंजा.) [सं. उत् + पट]

**उपटसरी, उपटसळी, उपटसुरी, उपटसुळी** स्त्री. एक वेल; उपळसरी; अनंतमूळ; श्यामा. (को.)

**उपटसुंभ, उपटसुंभा, उपटसुंबा, उपटसुंब्या** वि. १. उडाणटप्पू; कामधंदा नसलेला. २. तात्पुरता; उपरी. ३. हक्क नसता अधिकाराच्या जागेवर आलेला; तोतया; अधिकार नसताना लुडबुडणारा; बेकायदेशीरपणे अधिकारावर आलेला; आगंतुक; संबंध नसलेला : 'जडजंबाळ तथाकथित विचारवंत आणि उपटसुंभ प्राध्यापक.'– छांदसी ११. ४. (उप.) अविवाहित; ब्रह्मचारी.

**उपटसूळ** वि. १. आकस्मिक; क्रम सोडून असा : 'मध्येंच उपटसुळासारखें कांहीं निर्माण झालेलें नाहीं.'– गीर १६८. २. विघातक; तापदायक; मध्ये लुडबुड करणारा; भांडखोर; उडाणटप्पू; ढवळाढवळ करणारा. ३. उपटसुंभ; अलबत्या-गलबत्या : 'मरतेवेळीं एखाद्या उपटसुळास विनाकारण आपली दौलतही त्यास देतां येणार नाहीं.'– लोटिकेले ४.२७. (वा.) **उपटसूळ खांद्यावर घेणे–** मूर्खपणाने भानगडी, त्रास, लचांडे पाठीमागे लावून घेणे; नसते झेंगट मागे लावून घेणे.

**उपटा, उपाटा** पु. १.उचल; दुसऱ्यास फसवून पैसे उपटणे; लबाडीने कर्ज उभारणे; ठकबाजी करून पैसा काढणे. (क्रि. मारणे.) २. लुबाडणे; लांबवणे; उचलेगिरी करणे; पळवणे. (क्रि. देणे.)

**उपटाउपट, उपटाउपटी** स्त्री. १. युक्तीने, कौशल्याने, जबरीने अथवा फसवेगिरीने द्रव्य इ. काढणे; लुबाडण्याचा धंदा; उपटण्याचा व्यापार. [उपटचे द्वि.]

**उपटी** स्त्री. प्रहार; आघात; घाव : 'कोपे इंद्रु आला हातुपीटीं । तो खांडेयाचा उपटीं ।'– शिव ४५२.

**उपटीव** वि. उपटून काढलेले (तोडून किंवा कापून न काढता काढलेले पीक, केस वगैरे); उन्मळून पडलेले; उपटलेले (झाड).

**उपटून खांद्यावर घेणे** पहा : **उपटसूळ**

**उपटून जेवणे, उपटून खाणे** आधाशीपणे खाणे; ओ येईतो खाणे.

**उपट्ट** क्रिवि. काठापर्यंत भरलेला. (गो.)

**उपट्या** वि. फसव्या; लुबाडणारा; फसवणारा; खिसेकापू; उचल्या; भामटा; अट्टलसोदा.

**उपट्या भुईमूग** ज्याचे झाड उपटले असताना झाडाबरोबर उपटून आलेल्या शेंगा वेचता येतात अशा जातीचा भुईमूग; घुंगऱ्या भुईमूग; दाणे तांबड्या रंगाचे असून, त्याचा तेलाचा उतारा अधिक असतो.

**उपड** स्त्री. अडचण; नड; उणीव; कमताई : 'आंतील आंत खायास व पाणी पायच्या माणसांस उपड आहे, असें असोन कडव्या माणसांवांचून होतच नाही म्हणऊन लिहितां' – मइसा १०.१५६.

**उपडणे** सक्रि. पहा : **उपटणे** १. उपटणे : 'आरेंरे टाकौनि घोडा । भणती यांचिआं जटै उपडा ।' – शिव १४१. २. आपटून मारणे : 'मग उपडिला खडकीं । हंसु जैसा ।।' –ज्ञा १८.७९८.

अक्रि. बाहेर, वर येणे; खेचून बाहेर काढणे; उन्मळून पडणे; मुळासकट उपटून पडणे; नष्ट होणे : 'उत्तम अधर्मीं संचरती । ऐसे वर्णावर्णा मिसळती । तेथ समूळ उपडती । जातिधर्म ।।'– ज्ञा १.२५०. [सं. उत्+ पत्]

**उपडथवी–थावी** स्त्री. पाण्यातील भोवरा; लाटा एकमेकींवर उलथून पडणे; खळबळ : 'कीं बुडतां भवार्णवीं । वीर एतां उघडथवी । तेवीचि काकुळती दावी । कृपावंतापुढें ।।' – ऋ १०१; 'संसाराचेया डोहाआंतु उपडथावीं असे जावों पाहातु ।'– उगी १०४.

**उपडवणे** प्रयोजक सक्रि. पहा : **उपडणे** : 'एकां उपडविलें । समूलांतें ।।' – राज्ञा १३.२२६.

**उपडहंडी, उपडहांडी** स्त्री. १. पाणी गार करण्याकरिता फडके बांधून उलटे टांगलेले भांडे. (ना.) २. पहा : **उकडहंडी**

**उपडा, उपडी** वि. तोंड खाली केलेला; पालथा; अधोमुख. उताणा याच्या उलट. उलटी (गो. कु.) : 'होडी केव्हा उपडी होईल....' – कलंदर ६३.

**उपडा तांब्या** स्त्री. रजस्वला, विटाळशी असल्याचे द्योतक.

**उपडी मांडी** स्त्री. लिहिण्याकरिता मांडी दुमडून घातलेली बैठक.

**उपडी सरणे** (लहान मुलाचे) पालथे होऊन पोटावर सरपटणे.

**उपणणी** स्त्री. धान्यातील भुसा, टरफले काढण्याकरिता धान्य वारवणे; वाऱ्याने उडविणे; वरून खाली ओतणे; उफणणे. [सं. उद् + पवन]

**उपणणे** अक्रि. १. मनात येणे : 'परसनाएकासि ऐसें उपनले जे श्रीप्रभुचेया दरसिनासि जावों' – लीच ३.५९. २. उत्पन्न होणे : 'निगालेआं चैतन्यनाथां । अंतौरां उपणलीं अवस्था ।'– शिव ७४३. [सं. उत्पन्न]

**उपणणे** उक्रि. १. टरफल; भुसा वगैरे काढण्यासाठी धान्य वारवणे; उंचावरून टोपलीने हळूहळू ओतणे (सुपाने पाखडणे, उधळणे. झडपणे किंवा पटकणे नव्हे) : 'कीं भूस बीज एकवट । उपणितां राहे घनवट ।' – ज्ञा २.१३०. २. क्षुद्र, तुच्छ लेखणे; कस्पटाप्रमाणे मानणे. ३. विवरण, फोड करून सांगणे : 'हे कथा उपणितां तुज नारे । जाण कीं अखमसेतुजनारे ।।' – वामनविराट ६.८५. [सं. उत्+पू–पवन]

**उपणवटी, उपणवाटी, पाटी** स्त्री. उथळ बुरडी, पाटी (धान्य उपणण्याकरिता घेतात ती).

**उपणा** पु. १. संधि-वातविकाराने हातापायांना विकृती झाली असता शेकण्याकरिता वाफवलेला निरगुडी वगैरे वनस्पतींचा पाला; नारळाचा कीस वगैरेंची पेंड (क्रि. शिजवणे, करणे, लावणे, बांधणे.) २. बरोबर न शिजलेला भात (हेटाळणी करता वापरतात.) [सं. उत्+पू किंवा उत्+ पर्ण]

**उपणी, उंपणी** स्त्री. पेरणी. [सं. वप]

**उपणे** न. वारवलेले, उपणलेले धान्य; उपणून साफ केलेले.

**उपणे, उंपणे** उक्रि. पेरणे. [सं. वपन]

**उपतप्त** वि. तापलेला; तापविलेला. [सं. उप+तप]

**उपतरणे** (प्र.) पहा : **उबदरणे**

**उपतलविभाजन** न. (तत्त्व.) मुख्य अथवा गौण घटकांचे त्यांच्या उपघटकात केलेले विभाजन. [सं.]

**उपताप** पु. त्रास; दगदग; परपीडा; जिकीर चिंता; कष्ट : 'जिहिं परोपतापु घडे । परावा जीउ रगडे ।'– राज्ञा १६.३२५. [सं.]

**उपतिष्ठणे** अक्रि. १. मनात बिंबणे; परिणामकारक होणे; वजन पडणे (उपदेशाचे); संस्कार होणे. २. उपस्थित होणे, समोर येणे; हजर असणे; प्रकट होणे : 'इंद्रादि देवता घरीं पुरवती वस्तुजात ।। उपतिष्ठीत न चिंततां ऋद्धिसिद्ध ।।' ३. उभे राहणे (पाप इ.); प्राप्त, साध्य होणे; फळास येणे; सत्कृत्याचे अथवा दुष्कृत्याचे फळ प्राप्त होणे : 'तुका म्हणे साधन सुलभ गोमटें । परि उपतिष्ठें पूर्वपुण्यें ।' – तुगा २२७७. ४. मान्य होणे; रुचणे : 'बहुत परिश्रम केला, परंतु उपतिष्ठला नाही.' – होकै ३९. [सं. उप+स्था- तिष्ठ]

**उपतिष्ठित** वि. मनात भरलेला; बिंबलेला; ठसलेला; रुचलेला; संस्कार, परिणाम झालेला (उपदेश, बोलणे, शिक्षा). [सं.]

**उपत्रळ** वि. पुरून उरणारा (एखाद्या पदार्थाचा भाग).

**उपदंश** पु. गर्मीचा विकार; गुह्येंद्रियाचा रोग; एक गुप्तरोग. [सं.]

**उपदंशी** वि. ज्याला उपदंश झाला आहे असा.

**उपदान** न. केलेल्या सेवेबद्दल बक्षिसादाखल दिलेली रक्कम. कर्मचाऱ्यांना केलेल्या सेवेबद्दल एकमुठीने देण्यात येणारी रक्कम. [सं.]

**उपदाने** न. अव. हिंदुधर्मीय मृताच्या वर्षश्राद्धाला दान करावयाच्या वस्तू. उदा. आमान्न, उदकुंभ, वस्त्र, छत्र, उपानह, कमंडलू, यष्टी, लोहदंड, दीप, तांबूल, चंदन, माला, तिल, सिद्धस्थाली, ऊर्णावस्त्र, व्यजन, धेनू ही उपदाने और्ध्वदेहिक कर्मात द्यायची असतात. [सं.]

**उपदिष्ट** वि. १. शिकवलेले; सांगितलेले; उपदेशलेले (कर्म, मंत्र इ.) २. ज्याला उपदेश दिला आहे किंवा शिकविले आहे तो (शिष्य इ.) न. शिकवलेले ज्ञान; उपदेश दिलेला मंत्र.

**उपदेव** पु. मुख्य देवतांहून इतर गंधर्व, विद्याधर, अप्सरा इत्यादी देवता; किरकोळ, गौण देवता. [सं.]

**उपदेश** पु. १ शिक्षण; ज्ञान; शिकवण; पाठ; बोध; कसे वागावे यासंबंधी हिताचे सांगणे; मोठ्यांनी लहानांना, ज्ञानी माणसांनी अज्ञानी माणसांना, गुरूने शिष्याला केलेले मार्गदर्शन : 'अधिकार तैसा करूं उपदेश ।'– तुगा. २. सल्लामसलत; युक्ती; सूचना; निर्देश. ३. गुरुमंत्र; मंत्रदान. सामा. शब्द मंत्रोपदेश, हितोपदेश, गुरूपदेश इ. [सं. उपं+दिश्]

**उपदेशक** पु. १. धर्मप्रचारक. २. नीतीची शिकवणूक देणारी व्यक्ती. [सं.]

**उपदेशक, उपदेष्टा** वि. १. उपदेश करणारा; शिकविणारा; हितबोध करणारा; मंत्र देणारा, सांगणारा; सल्लामसलत देणारा (शिक्षक, गुरू, मित्र). २.ख्रिस्तीधर्माचा उपदेश करणारा; उपदेशिका : 'त्यांना दिसून आलें कीं हा परदेशीय उपदेशक जें सांगतो तें आपल्या पवित्र ग्रंथामध्ये सांपडतें.'– ज्ञानोदय ७.५.१९१८. [सं. उप+दिश्]

**उपदेशणे** उक्रि. १. ज्ञान, बोध, देणे; मंत्र शिकवणे, सांगणे : 'जेणें उपदेशिला रघुनाथ । तो बृहद्वासिष्ठ श्रेष्ठ ग्रंथ' – हरि १.१००. २. (सामा.) माहिती, ओळख करून देणे; पढवणे : 'केवळ जें वेदांत ज्ञान । रामासि उपदेशिला ब्रह्मानंदन ।' ३. सल्लामसलत देणे; सूचना करणे; कानउघाडणी करणे.

**उपदेशपाठ** पु. धार्मिक उपदेश, प्रवचन. [सं.]

**उपदेशशास्त्र** न. धर्मविषयक प्रवचन कसे करावे यासंबंधीचे शास्त्र.

**उपदेशी** वि. १. शिकवलेला; पढवलेला. २. सल्ला दिलेला; हिताहित सांगितलेला. ३. मंत्र सांगितलेला; उपदेश घेतलेला : 'संतसंग करितां म्हणती हा उपदेशी । येरा अभ्यागासी ज्ञान नाहीं ।।'– तुगा ३३४९.

**उपदेष्टणे** सक्रि. सांगणे; उपदेश करणे : 'जे मी आपणांस विश्वासाने सांगेन किंवा उपदेष्टीन त्याचा आपण अपमान करावयाचे नाहीत.'– पेद ४२.४५ [सं. उप+दिश्]

**उपदेष्टा** पु. पहा : **उपदेशक**

**उपद्रव** पु. १. पीडा; त्रास; जाच; छळ : 'त्रिविध मुख्य आधवे । उपद्रवांचे मेळावे ।' – ज्ञा १३.३४४. २. बाधा (पिशाच्चादिक); संचार. ३. (कायदा) अपकार; नुकसान; घाण; अडथळा. ४. रोग; शरीरदोष. ५. जखम : 'तेही एथ उपद्रव केला.' – लीच १.४४. (व.) ६. उंदरांचा त्रास. ७.(ल.) उंदीर.[सं. उप+द्रु] (वा.) **उपद्रव करणे–** त्रास देणे; नुकसान होईल असे करणे : 'खानाने पंढरपूरच्या देवस्थानाला उपद्रव केला.'– श्रीयो १.२०४.

**उपद्रवणे** सक्रि. १. त्रास देणे; पीडा देणे : 'आणि अभिचारिकीं तिहीं । उपद्रवीती जेतुलें कांहीं ।'– राज्ञा १६.३९८. २. खून करणे; ठार करणे : 'आमचे पीते वाटे चोरीं उपद्रवीले.'– लीच १.४२.

**उपद्रवमूल्य** न. दुसऱ्याला त्रास देऊन किंवा कामात कटकटी निर्माण करून लाभ पदरात पाडून घेण्यासाठी स्वतःचे महत्त्व वाढविणे : 'या रितीने उपद्रव्यमूल्य वाढवावे, असा हा खेळ आहे.'– मटा २२.६.८३.

**उपद्रवशामक** वि. पीडा, त्रास, वेदना नाहीशा करणारा; उपद्रव थांबवणारा. [सं.]

**उपद्रवी, उपद्रवीक** वि. १. भूत बाधेने पछाडलेला; पिशाच्चबाधेसंबंधी (पीडा, रोग). २. रोगकारक (अन्न); अपथ्य; शरीरात बिघाड करणारे; न पचणारे. ३. त्रासदायक; पीडाकारक; कंटाळवाणा. ४. अनर्थकारक; भयोत्पादक; संकटे उत्पन्न करणारी (सत्ता, व्यवस्था, राज्यपद्धती, कारभार). ५. ज्यास पिशाच्चबाधा झाली आहे असा. [सं. उपद्रव]

**उपद्रवी जीव** उपद्रव देणारा; त्रासदायक प्राणी (ढेकूण, पिसवा वगैरे).

**उपद्रष्टा** पु. १. यज्ञादी कर्मांमध्ये न्यूनाधिक काही कर्म होईल ते पाहून जिथल्या तिथे यथास्थित करण्यासाठी म्हणून असलेला व्यवस्था पाहणारा ऋत्विज. २. (सामा.) व्यवस्थापक; चौकसनीस. [सं.]

**उपद्रुत** वि. उपद्रव पावलेला; ग्रहण लागलेला. [सं.]

**उपद्वीप** न. १. द्वीपकल्प; बेटासारखा भाग. २. आकाराने लहान बेट. ३. पुराणांतील सात मुख्य द्वीपांखेरीज इतर सप्तद्वीपांविरहित सांगितलेली द्वीपे. [सं.]

**उपद्व्याप** पु. १. अतिशय त्रास; कष्ट; परिश्रमपूर्वक प्रयत्न; खटपट; रक्ताचे पाणी करणे. २. पीडा; जिकीर; त्रास; छळ (क्रि. देणे.). ३. व्याप; खटाटोप; पसारा; सिद्धता; तयारी (धंदा, समारंभ, कारभार इत्यादीची). ४. रिकामा उद्योग; नको ते करणे; दुसऱ्याला त्रास होईल असे कृत्य; भानगड : 'मिशनऱ्यांच्या उपद्व्यापामुळे तो समाज खवळला.'– निअ २७८; उलाढाल; उचापत.

**उपद्व्यापी** वि. १. मेहनती; कष्टाळू; अतिशय काम करणारा; फार खटपटी. २. व्रात्य; खोडकर; त्रासदायक; उचापत्या; भानगड्या.

**उपधातु–तू** पु. १. तांबे, सोने, रूपे इत्यादी मुख्य सात धातूंखेरीज इतर धातू– स्वर्णमाक्षिक, तारमाक्षिक, मोरचूत, कासे, पितळ, शेंदूरी, शिलाजित. २. अश्मीभूत, प्रस्तरीभूत पदार्थ; खनिज द्रव्य. ३. शरीरातील मुख्य धातूशिवाय बाहेर पडणारे सात धातू– दूध, रज, वसा, घाम, वात, केस, ओजस. [सं.]

**उपधान** न. १.अर्पण करणे; देणे; नेणे. २. (सामा.) उपाधी, सान्निध्य यायोगे एका व्यक्तीचे गुणधर्म दुसऱ्या व्यक्तीला प्राप्त होणे; गुणधर्मांची देवघेव; एखाद्याचे स्वभावगुणधर्म यांची छाया दुसऱ्यावर पडणे; गुणपरावर्तन. [सं. उप+धा]

**उपधान्य** न. तांदूळ, गहू इ. मुख्य धान्ये सोडून इतर किरकोळ व कमी महत्त्वाचे धान्य; गौणधान्य. (अठरा उपधान्ये.)

**उपधायक** वि. देणारा; उपधान करणारा; पोचवणारा. उदा– गुणोपधायक, फलोपधायक, हितोपधायक. [सं.]

**उपध्मानीय** पु. अर्धविसर्गपूर्वक पकार आणि फकार; प आणि फ. यापूर्वी येणारा विसर्ग. [सं. उप+ध्मा]

**उपध्रुवप्रदेशीय** वि. ध्रुवप्रदेशाशेजारचा.

**उपध्वनि–नी** पु. प्रतिध्वनी; मुख्य आवाजामागून निघणारा बारीक आवाज; प्रतिशब्द ; पडसाद. [सं.]

**उपनगर** न. शहरालगतची स्वयंपूर्ण वसाहत, आसपासचा भाग. [सं.]

**उपनणे** अक्रि. पहा : **उपणणे** १. उपजणे; जन्माला येणे; उत्पन्न होणे : 'तंव कृपा उपनली जगन्नाथा । तें परिएसा पां ।'– ऋ ३६. २. झडप घालणे; पडणे : 'जेयांवरी दृष्टी उपनली । चैतन्यनाथाची ।।'– शिव ५८३. [सं. उद्+पद्]

**उपनणे** सक्रि. (कृषि.) वारवणे. पहा : **उपणणे**

**उपनयन** न. विधिपूर्वक विद्याग्रहणासाठी मुलाला गुरुजवळ नेणे; व्रतबंध; प्रथम यज्ञोपवीत धारण करण्याचा विधी; मौंजीबंधन; जानवे घालणे; मुंज. त्रैवर्णिकांस आठव्या वर्षी वेदाधिकारास योग्य करण्यासाठी हा संस्कार करतात. सोळा संस्कारांपैकी एक : 'या उपरी उपनयन । गुरुद्वारां गायत्री ग्रहण ।'– एभा १७.२७१. [सं. उप+नी]

**उपनाणे** न. उपचलन; जे नाणे कायदेशीर किमतीपेक्षा कमी असते, वाटेल त्याला टंकसाळीतून पाडून मिळत नाही, दुसऱ्या नाण्याच्या अमुक पटीने किंवा हिश्शाने मानले जाते व देवघेवीत विशिष्ट मर्यादेपर्यंतच कायदेशीर रीतीने वापरता येते असे नाणे. ज्यातील धातूची किंमत किमतीपेक्षा कमी आहे असे नाणे. [सं. उप+नाणक]

**उपनाम, नाव** न. कुळाचे नाव; आडनाव; टोपणनाव; गोत्रनाम. [सं.]

**उपनामक** वि. उपनावाचा; टोपणनावाचा; आडनावाचा. उदा. वैशंपायनोपनामक; पंडितोपनामक, एतदुपनामक. [सं.]

**उपनाव** न. अधिकार; पदवी : '.... राजश्री फत्तेसिंग भोसले याजवर कृपाळु होऊन सरंजाम, त्यास, उपनाव सेनापती सेवकास दिल्ही.'– पेद १२.४.

**उपनाह** न. १.पोटीस. २. मलम; औषध. [सं.]

**उपनिधि–धी** पु. ठेव; दुसऱ्याजवळ विश्वासाने ठेवलेली वस्तू, संपत्ती; अनामत वस्तू. [सं.]

**उपनिवेशन** न. वसाहतीकरण; निवसन.

**उपनिषद्** न. १. गुरुचरणाजवळ बसून मिळवलेले ज्ञान; गूढज्ञान. २. वेदांच्या ब्राह्मण ग्रंथांना जोडून असणारा वेदांतपर भाग; वेदसारांश असणारा ग्रंथ; वेदज्ञानकाण्डात्मक भाग. एकंदर १०८ उपनिषदे मानतात. त्यापैकी पुढील दहा उपनिषदे मुख्य आहेत– ईश, केन, कठ, प्रश्न, मुंड, मांडुक्य, तैतिरेय, ऐतरेय, छांदोग्य व बृहदारण्यक : 'अतिगुह्यज्ञान परात्पर । जे उपनिषदांचे भांडार ।'– एभा १३.७१२. [सं. उप+नि+सद्]

**उपनीत** वि. व्रतबंध, मुंज झालेला; वेदाधिकारी. [सं.]

**उपनेत्र** पु. चष्मा. दृष्टिदोष दूर करण्यासाठी काच किंवा गार यांचा उपयोग करून हा तयार करतात. चाळिशी; डोळ्यांची आरशी : 'जे न देखती नेत्र । तें देखती उपनेत्र ।'– यथा ४.३३२. [सं. ]

**उपन्यसनीय** वि. प्रतिपाद्य; पुढे मांडायचा, विचार करायचा, (विषय, मुद्दा वगैरे). [सं. उप+न्यस्]

**उपन्यस्त** वि. १. पुढे मांडलेला; दाखवलेला; उघड केलेला; प्रतिपाद्य. २. जवळ ठेवलेला. [सं.]

**उपन्यास** पु. १. वस्तू, मुद्दा व्यवस्थित रीतीने पुढे ठेवणे, मांडणे; विशद करणे; प्रतिपादन; स्पष्टीकरण करणे; समोरासमोर ठेवणे. २. प्रस्तावना करणे; विषयप्रवेश करणे; आरंभ; सुरुवात; उपक्रम : 'या वादाचा आज येथें उपन्यास करण्याचे कारण इतकेंच कीं ...' – लोटिकेले ४.८३. ३. सान्निध्य; निकटता; जवळ असणे. [सं.]

**उपपति–ती** पु. यार; जार; धगड; सग्या; राखा; पतीखेरीज दुसरा उपभोक्ता; व्यभिचारिणीशी संबंध असलेला पुरुष. [सं.]

**उपपत्ति–त्ती** स्त्री. १. पुरावा; कार्यकारणभाव; उगम; तत्त्वनिर्णय; विषयसिद्धता; सिद्धतेची प्रमाणे; युक्तिवाद : 'अंगाचिया अनुपपत्ति । आटलिया उपपत्ति ।'– अमृ ५.५५. २. सिद्धांत; तत्त्वांचे प्रतिपादन; विशदीकरण; मीमांसा; विवेचन; शिस्तवार मांडणी; योग्य समजूत : 'शिस्तवार जी मांडणी करितात तिला उपपत्ति किंवा उपपादन असें म्हणतात.'– गीर २३. ३. सिद्ध केलेली गोष्ट; सप्रमाण, संयुक्तिक सिद्धी. ४. (ग.) उदाहरण सोडविण्याच्या रीतीने स्पष्टीकरण. ५. (भूमिती) प्रमेयसिद्धता. ६. साधने; सामग्री; साहित्य (निर्वाह, कारभार इत्यादीचे). ७. युक्ती; कल्पना : 'उपपत्ती शार्ङ्गी दाविता जाहला ।।' – ज्ञा ११.७०४.[सं. उप+पद्] (वा.) **उपपत्ती येणे–** पटणे; मान्य होणे; प्रतीती; अनुभव : 'मज नये हे उपपत्ती । याचिलागीं ।।'– ज्ञा २.४९. **उपपत्ती लावणे–** योग्य खुलासा करणे; कार्यकारण संगती लावून दाखविणे.

**उपपत्नी** स्त्री. रखेली; अंगवस्त्र; पत्नीखेरीज दुसरी उपभोग्य स्त्री. [सं.]

**उपपद** न. १. गौणपद (सामासिक शब्दातील.) पहा : **उपपद समास, उपशब्द** २. कोणत्याही विद्येमध्ये किंवा कलेमध्ये प्रावीण्यदर्शक संज्ञा. बी. ए., एम. ए., काव्यतीर्थ, पुराणरत्न इ. ३. पदवी; बिरुद; बहुमानदर्शक किंवा पराक्रम; विशेष कृत्यदर्शक उपनाम; टोपणनाव. जसे – विक्रमादित्य, आहवमल्ल इ. : 'विलियम जो विजयी या उपपदाने

प्रसिद्ध आहे....' -निमा ५५२. ४. इंग्रजीत नामापाठीमागे लागणारे पद. उदा. ए, ॲन, दि. [सं.]

**उपपद तत्पुरुष** (व्या.) दुसरे पद धातुसाधित असलेला तत्पुरुष समास.

**उपपदधारी** वि. पदवीधर : 'चालू असणारा शिक्षणक्रम किंवा त्यातून तयार झालेले उपपदधारी लोक यांपैकी कोणीहि अद्याप आपल्या गुणांनी विशेष लोकमान्य झालेले आमच्या ऐकिवांत नाहीं.' – लोटिकेले २.२३३.

**उपपदार्थ** पु. एक पदार्थ तयार करीत असताना त्याच्या काही अवशेषांतून जो दुसरा पदार्थ निर्माण होतो तो.

**उपपन्न** वि. १. सिद्ध केलेले; स्पष्ट केलेले; ज्यांची उपपत्ती आहे असे. २. साधनांनी युक्त; समृद्ध; संपन्न; श्रीमंत; सधन. [सं.]

**उपपर्ण** न. पानाच्या देठांशी फुटणारा दोन पानांचा अंकुर.

**उपपातक** न. दुय्यम, तिय्यम प्रतीचे पातक; गोवध, कन्याविक्रय, नास्तिक्य इत्यादी पापे. ही एकंदर ४९ आहेत. [सं.]

**उपपातालीय** वि. (भूशा.) मध्यम खोली असलेल्या ठिकाणी ज्यांची निर्मिती झाली आहे असे (अग्निज खडक). [सं.]

**उपपात्र** न. पाणी पिण्याचे लहान भांडे. पंचपात्री, फुलपात्र, पेला इत्यादी.

**उपपादक** वि. सांगणारा; दाखवणारा; सिद्ध करणारा; उघड करून देणारा; स्पष्ट दर्शवणारा. [सं.]

**उपपादणे** उक्रि. १. उल्लेखणे; मांडणे; विवरण करून सांगणे; स्पष्ट करणे; विवेचन करणे; शिकवणे : 'भक्ति ज्ञान विरक्ति । जिथे शास्त्रें उपपादिति । तिथे बोलावि महति । यथार्थवादें ।।'. २. सिद्ध करणे; स्थापित करणे. [सं. उपपादन]

**उपपादन** न. १. मांडणी; उल्लेख; विवेचन; प्रतिपादन; उपपत्ती : 'शिस्तवार जी मांडणी करितात तिला उपपत्ति किंवा उपपादन म्हणतात.' – गीर २३. २. सप्रमाण सिद्धता; स्थापना. [सं.]

**उपपादित** वि. १. उपपादिलेले; सांगितलेले; विवेचन केलेले; स्पष्टीकरण केलेले. २. सिद्ध केलेले. ३. स्थापित (सिद्धान्त). [सं.]

**उपपाद्य** वि. सांगायचा; मांडायचा; स्पष्ट करायचा; विवेचन करायचा (विषय, मुद्दा); सिद्ध करण्याची (गोष्ट). [सं.]

**उपपुर** पु. उपनगर; शहराबाहेरची लहान वस्ती : 'भवतिं उपपुरें । गुढ्या गोपुरें ।' – आसु १३. [सं.]

**उपप्लव** पु. १. हाणामार; लुटालूट; जाळपोळ (शत्रू, लुटारू वगैरेंकडून होणारी). २. जुलूम; जबरदस्ती; अन्याय (जुलमी राजा, निर्दय माणूस यांजकडून). ३. (सामा.) पीडा; उपद्रव; त्रास; संकट; अरिष्ट : 'यांचे घरावर (आम्ही) उपप्लव (करणार) तेव्हा यांनी (परस्पर) पुण्यास लिहून उत्तरें आणलीच असतील.' – होकै ४६.

**उपबर्व्हे** स्त्री. (प्र.) उपबर्ह. उशी : 'बाहू हे उपबर्व्हे काय करणें उंशा अम्हां सद्गुणा ।।' – निमा-सुभद्राचंपु ४.२०.[सं. उपबर्ह = उशी]

**उपबल** न. पाठबळ : 'उपबल त्यास हिंमतबहाद्दर अनुपगीर गोसावी याचें आहे.' – मशियांका ४२८. [सं.]

**उपबंध** पु. १. तरतूद. २. अट; कलम; शर्त. ३. करारातील मुख्य अट.

**उपबाधक** वि. पीडाकारक : 'याचि कारणे उपबाधका । होती तुज अनेका ।।' -गुच ३.२०. [सं. उप+बाध्]

**उपबाधा** स्त्री. पीडा; दु :ख. [सं.]

**उपभुक्त** वि. १. उपभोग घेतलेले; वापरलेले; आस्वाद घेतलेले. २. अनुभवलेले; उमजलेले; स्वत:ला माहीत असलेले. [सं. उप+भुज्]

**उपभोक्ता** वि. १. उपभोग घेणारा; वापरणारा; मालकी हक्क गाजवणारा. २. अनुभव घेणारा; स्वत:च्या अनुभवाने जाणणारा. ३. ग्राहक. [सं.]

**उपभोक्ता** पु. (अर्थ.) गरजांच्या समाधानासाठी वस्तूंचा, सेवांचा विनियोग करणारी, उपभोग घेणारी व्यक्ती. [सं.]

**उपभोक्ताधिक्य** न. उपभोक्त्याला (त्याने) दिलेल्या वस्तूंपासून मिळणाऱ्या संतोषापेक्षा घेतलेल्या वस्तूंपासून मिळणाऱ्या संतोषाचा अधिकपणा.

**उपभोक्त्याचे भाटक** न. (अर्थ.) उपभोक्त्याला मिळणारे भाडे, खंड.

**उपभोग** पु. १. आस्वाद; विलास; सुख भोगण्याची क्रिया; उपयोग; भोग; भोगवटा. २. अनुभव; स्वत: अनुभवाने मिळवलेले ज्ञान (सुखदु : खाचे). ३. रतिसुख; संभोग. ४. (अर्थ.) मालाचा खप, उठाव; गरजांच्या समाधानासाठी वस्तूंचा, सेवांचा केलेला विनियोग : 'उत्पादन व उपभोग यांमध्ये मोठी खिंड पाडता कामा नये.' – साको (उ) ११. [सं. उपभुज]

**उपभोगणे** उक्रि. १. आस्वाद घेणे; वापरणे; उपयोग करणे; उपभोग घेणे. २. अनुभव घेणे; पडताळून पहाणे; अनुभवणे. ३. रतिसुख देणे; संग करणे; संभोगणे. [सं. उपभोग]

**उपभोगप्रदर्शन** न. उपभोगाच्या दिखाऊपणावर, आकर्षकतेवर भर देणे.

**उपभोगी** वि. उपभोग घेतलेले; आस्वाद घेतलेले; अनुभवलेले. [सं.]

**उपभोग्य** वि. १. उपभोगायचे; वापरायचे; उपभोग करायचे. २. अनुभव घ्यायचे; उपभोगास योग्य असे. ३. ज्याचा उपभोग घेता येतो असा; जीवनाला आवश्यक : 'आता उपभोग्य वस्तू पुष्कळ व त्यांचे उत्पादनही पुष्कळ.' – धरागा ३३७. ४. उपयोगात आणून संपणारा; ज्याचा वापर दैनंदिन आयुष्यात करता येतो असा (माल). [सं.]

**उपभोजन** न. अल्पाहार; उदक घेणे. [सं.]

**उपमणे, उपमिणे** सक्रि. उपमा देणे; तुलना करणे; सारखेपणा दाखवणे : 'तैसें ज्ञान हें उपमिजे । ज्ञानेंसीचि ।।' – ज्ञा ४.१८०; 'त्यासीं उच्चै:श्रव उपमणें ।।'– वेसीस्व ८.११२.

अक्रि. सारखे असणे, दिसणे; जुळणे; बरोबरी करणे. [सं. उप+मा]

**उपमणे, उपमिणे** अक्रि. उडणे; अंतरिक्षात वर जाणे : 'तेथे होमधूम्र प्रगटला । तो गगनमार्गेसीं उपमला । जणउ (जाणो) निघाला । महादेवासी ।।' 'अंतरिक्षीं वीज लवें तैशी गगनीं उपमिलीं ।।' – वसा २४.

**उपमरडणे** अक्रि. बदलणे; पालटणे : 'लोणार तीर्थि घागरि भरीलि । गुढघेयावरि धरिती : आणि वासना उपमरडली.' – लीचउ १७७.

**उपमर्द** पु. १. मानखंडना; अपमान; इज्जत घेणे. २. (व्यापक) बेमुर्वत. कृत्य; अविचारी आचरण. [सं. उप + मृद्]

**उपमर्दणे** अक्रि. नाश पावणे; चुरडला जाणे : 'तैसा माझेनि प्रसादें । जीवकणु जयाचा उपमर्दे ।' – ज्ञा १८.१२७२.

सक्रि. १. अंग चेपणे, रगडणे. २. तुडवणे; पिळणे; त्रास देणे; पीडा करणे. ३. अपमान करणे; इज्जत, अब्रू घेणे. [सं. उप+मृद्]

**उपमर्दन** न. १. अंग चोळणे, रगडणे, दाबणे. २. तुडवणे; पिळणे; त्रास देणे; पीडा करणे; जुलूम करणे. [सं. उप+मृद्]

**उपमा** पु. तिखटमिठाचा सांजा; उपीट.

**उपमा** स्त्री. साहित्यशास्त्रातील एक अर्थालंकार.

**उपमातणे** न. उपमा देणे; सादृश्य दाखवणे : 'भणओनि उपमातु कमठ । जगामाजी ।।' –शिव ३९१. [सं. उप+मा]

**उपमाता** स्त्री. १. दाई; अंगावर पाजणारी बाई; धात्री : 'अडचण असल्यास मूल पाजण्यास उपमाता ठेवावी.' – बालरोग चिकित्सा ४. २. संगोपन करणारी दुसरी बाई. ३. सावत्र आई; मानलेली आई; पालनकर्ती. [सं.]

**उपमान** न. १. ज्याच्याशी तुलना करायची ते; दृष्टांत, उदाहरणादाखल घेतलेली वस्तू. तोंडाला चंद्राची उपमा देतात तेथे चंद्र हे उपमान असते. २. अनुमानाचा एक प्रकार, सादृश्य अनुमान.

**उपमानगम्य** वि. सादृश्याने प्रतीत होणारी, समजणारी; तुलनेने समजणारी.

**उपमानव** पु. मानव सदृश प्राणी.

**उपमानवी** वि. नीतिमत्ता, बुद्धी याबाबतीत सामान्य लोकांपेक्षा खालच्या पातळीवर असणारा (माणूस, व्यक्ती). [सं.]

**उपमानित्र** न. (यंत्र.) प्रमाण दाखवणारे यंत्र. [सं.]

**उपमानोपमेयभाव** पु. उपमान आणि उपमेय यांचा परस्पर संबंध; दोन तुल्यवस्तूमधील परस्पर संबंध. [सं.]

**उपमाला** स्त्री. (ग्रं.) समान विषयावर एकामागून एक अशी प्रकाशकाने प्रसिद्ध केलेली पुस्तके. या सर्वांना समान ग्रंथनाम किंवा प्रत्येक प्रकाशनाला वेगळे नाव असून सर्व प्रकाशने मिळून एक नाव दिले जाते.

**उपमिणे** अक्रि. उपमा देणे, तुलना करणे.

**उपमित** वि. उपमा, दृष्टान्त; उदाहरण दिलेले; तुलना केलेले.

**उपमिति–ती** स्त्री. १. तुलनेने प्राप्त झालेले ज्ञान; दृष्टांताने झालेली सिद्धी. २. सारखेपणा; सादृश्य. ३. प्रतिकृती; प्रतिमा; सारखी वस्तू. [सं.]

**उपमीजणे** उक्रि. उपमा देणे; तुलना करणे : 'क्षीरसागराचा पाटु । जमुने जलां होतां गोटु । तरी उपमीजतां दानवशिरसाटु । नारदें आळंगिता ।।' – शिव ६१. [सं. उप+मा=मोजणे]

**उपमेय** न. ज्याचे साम्य, तुलना वगैरे दाखवायचे ते; उपमानाची उपमा ज्यास द्यायची ते; तोंडाची चंद्राशी तुलना करताना तोंड उपमेय. [सं.]

**उपमेयोपमा** स्त्री. एक अर्थालंकार.

**उपयुक्त** वि. उपयोगी; कामाचे; वापरण्यालायक; सहायक; सोयीचे; लाभाचे; उपकारक. [सं. उप+युज्]

**उपयुक्तता** स्त्री. (तत्त्व.) वस्तूचा उपयोग हाच तिच्या श्रेष्ठतेचा एकमेव निकष मानणारे मत. हितकारिता, उपकारत्व; उपयोगिता. [सं.]

**उपयुक्ततावाद** पु. (तत्त्व.) जे उपयुक्त तेच नैतिक असे प्रतिपादणारा वाद; कोणत्याही कृतीची खरी किंमत तिच्या उपयुक्ततेवर असते असे समजणारी विचारसरणी. [सं.]

**उपयुक्ततावादी** वि. वस्तूंचा उपयोग हेच तिचे एकमेव मूल्य मानणारा.

**उपयोग** पु. १. वापर; उपयुक्तता; योजना; साहाय्यकता; उपकारकता; मदत : 'तो काइसेया नांव योगु । तेयाचा कवण उपयोगु ।'– राज्ञा ५.१७६. २. गरज; जरुरी; प्रयोजन; सापेक्षता. [सं.]

**उपयोगणे, उपयोजणे** उक्रि. उपयोग करणे; वापरणे : 'तेंच योग्य प्रकारें उपयोगिल्याने पाटलिपुत्रांतहि त्यास उपयोगी पडलें.' – चंद्रगुप्त १८३. [सं. उपयोग]

**उपयोगी** वि. १. साहायक; उपयुक्त. २. जरुरीचे; गरजेचे. [सं.]

**उपयोजक** वि. १. (तत्त्व.) उपयोग करून घेणारा; उपयोगात आणणारा. २. शास्त्रनियमांचा प्रत्यक्षात वापर करणारा. [सं.]

**उपयोजन** न. नियम, कायदे यांची अंमलबजावणी, व्यवहारात उपयोग.

**उपयोजित** वि. प्रत्यक्ष किंवा व्यावहारिक उपयोगाशी संबंधित असलेले. उदा. उपयोजित गणित.

**उपयोजित शब्दसंग्रह** नेहमी वापरात असणाऱ्या शब्दांचा संग्रह.

**उपर** पु. १. बोलबाला; कीर्ती; जोरा; वरचष्मा; शह; दबाव; सरशी; जय : 'राजश्री पंतप्रधान याचा उपर दाखऊन माणसें घेऊन जावी हे गोष्ट काये आहे?' – पेद २३.३०६. २. आक्षेप : 'ती ही गोष्ट एकीकडे राहून हाच उपर लिहिला ते पक्षीं दैवाची गोष्ट ।' – ऐलेसं ४६६५.

**उपर** पु. १. वजन, छाप, श्रेष्ठत्व ठेवणे; वर्चस्व; वरचढपणा : 'जयाचेनि सावायें । जीव ब्रह्मउपर लाहे ।।' – अमृ २.१६. २. (नाविक) उत्तर दिशा.

क्रिवि. १. नंतर; मागाहून; तदुत्तर; उपरांत : 'त्यजिल गुरुभजन कसें हें आयकिल्याहिं उपर माणूस ।' – मोवन १०.६७. २. काठापर्यंत. ३. उत्तर दिशेला.

शअ. १. वर; वरची बाजू; ऊर्ध्व; उंच : 'मी तळु उपरु म्हणता ।' – राज्ञा १३.४१७. २. आणखी; पलीकडे; अधिक; पेक्षा : 'उपरमला भीष्म, विदुर कृष्णहि कथितां अशाहि उपर मला ।।' – मोउद्योग ९.६७. ३. नंतर. उदा. याउपर, त्याउपर वगैरे : 'सरैल उपरा प्रतिरात्रि दिनु । सकलै दिशां उजुबाडु होउनु ।' – ख्रिपु. २.४४.१९४. (वा.) **उपरांत असणे** – (सोंगटी) तिफाशी सोंगट्यांच्या खेळात सोंगटी लागल्यापुरते दान पडून वर उरणाऱ्या दानामध्ये मारता येण्यासारखी दुसऱ्या बाजूची सोंगटी बसलेली असणे. ही दाने सर्व दसप्यादापासून पुढे येतात. **उपर करणे** – उपराळा; मदत करणे : 'जाटाचा उपर सिखानी बहुत केला.' – पेदभा २९.५५. **उपर करून दाखविणे** – श्रेष्ठता प्रस्थापित करणे : 'त्याचा उपर करून दाखवाव....' – पेद २०.६१. **उपर ठेवणे, उबर ठेवणे** – १. वरचष्मा राखणे. २. आस्था, अगत्य राखणे : '.. गुपचूप याजकडील हरयेक कामाविसी उपर ठेवीत जाणे' – होइसापखं १.१४७. **उपर येणे** – १. किनाऱ्याकडे. २. उत्तर दिशेकडे : 'सुवर्णदुर्गानजीक फिरंगी याची १७ गलबते पाणी भरावयास लागली होती, पाणी भरून उपर आली.' – पेद १६.१३.

**उपरकाठी** स्त्री. अनवाणी चालताना एखाद्या लहान काठीवर पाय पडला असता तिचे टोक चटकन उडून पायाच्या तळाला आघात करते. त्यामुळे विषारासारखे होणारे मोठे दुखणे.

**उपरखणी** स्त्री. घराची माडी, मजला.

**उपरगुढी** वर, उंच उभारलेली गुढी : 'फडफडिती उपरगुढिआं । फूजितीं वाघवडाइआं ।।' – शिव ५२७.

**उपरचा वारा** (नाविक) उत्तरेकडून येणारा वारा. [उपर = उत्तर]

**उपरछक्का** पु. तिफाशी सोंगट्यांच्या खेळातील एक संज्ञा. सोंगटी लागायला पुरेसे दान असून अधिक सहा पडले तर त्याला म्हणतात. उदा. १६,१७,१८ इत्यादींतील सहा.

**उपरछडी** स्त्री. (विशेषत: पाण्यात) हवेत मारलेली कोलांटी उडी; खाली डोके वर पाय करून मारलेली उडी.

**उपरटपका, उपरटप्पा, उपरठपका** पु. दुसऱ्यावर उपकार केले असताना आभाराऐवजी मिळालेला दोष, निंदा, दूषण वगैरे; अयोग्य, अस्थानी, दोषारोपण.

**उपरटप्पी, उपरटप्प्याचा** वि. पोकळ; वायफळ; अर्थहीन व रसहीन (भाषण, गप्पा, वादविवाद).

**उपरडकवळ** स्त्री. उत्कर्षयुक्त आलिंगन : 'ना तरि घेताएं । उपरडकवळीं । मकरध्वजू ।' – शिव ५९७.

**उपरणा, उपरणे** पु. न. एकेरी पांघरावयाचे उपवस्त्र; अंगावर घेण्याचे वस्त्र; उत्तरीय. [सं. उपावरण] (वा.) **उपरणे झाडून निघणे** – १. मोकळे होणे, एखाद्या गोष्टीपासून संबंध तोडणे. २. रागाने निघून जाणे. **उपरणे झटकून मोकळे होणे** – संबंध तोडून टाकणे.

**उपरत** वि. पराङ्मुख; परावृत्त; बाजूला झालेला (रणापासून, भांडणापासून) : 'धांवुनि कर्ण म्हणे रे दावुं नये पृष्ठ संगरोपरतें ।' – मोद्रोण १२.३३. [सं. उप+रम्]

**उपरतणे** अक्रि. थांबणे; शांत होणे; स्थिर होणे : 'तया सुखासी दृष्टांत । देतां सरलें वस्तुजात । उपरतलें चित्त । ठाईंचा ठाईं ।।' – स्वादि १.२.५६. [सं. उप+रम्]

**उपरतविणे, उपरतवणे** अक्रि. आतले उघड करून दाखविणे; उफराटे फिरविणे; घडी उघडी करून दाखविणे; उलगडणे; उकलून दाखवणे : 'यालागीं त्याग संन्यास । पुसावेयाचें घेउनि मीस । उपरतविलें दूस । गीतेंचे तें ।।' – राज्ञा १८.८२. [सं. उत्+परा+वृत्त–वर्त]

**उपरता** वि. क्रिवि. १. वरचा; वरला; वरील : 'आणीकही शाखा उपरता । जिया सनकादिकनामें विख्याता ।' – ज्ञा १५.२०५. २. उलट; उफराटे; विपरीत : 'तें विसरलासि हें उपरतें । संहारूं आदरिलें ।।' – ज्ञा. ११.३८४. [सं. उपरित: ]

**उपरति–ती** स्त्री. १. विरक्ती; वैराग्य; विषयापासून निवृत्ती; सुखाविषयी उदासीनता : 'उपरति होऊनि चित्ता । निरवधि तल्लीनता । निरंतर ।।' – ज्ञा २.१७३. २. थांबणे; बंद होणे; शांत होणे; खळ; खंड; उपरम. [सं. उप+रम्]

**उपरत्न** न. मुख्य नऊ महारत्नांशिवाय इतर काही कमी प्रभावी रत्ने, उदा. तोरमल, स्फटिक, काचमणी, भीष्ममणी, मुक्ता–ज्योतिरस, राजवर्त, राजमय, ब्रम्हमय, जलकांत, हंसगर्भ, विभवकर, सौभाग्यकर, विषहर, श्रीकांत, हंसमाली, कौस्तुभ, चिंतामणी, राजमणी, धूलीमरकत, भुजगेशमणी, खंज, सीमंतमणी, स्पर्शमणी, तित्तिर, शिला, कर्पूराश्मा, शक्तिचूर्णक, नीलकंठ, गरुड, परीस, केदार, स्यमंतकमणी, केयूर इत्यादी २५ मुख्य उपरत्ने व १०० किरकोळ रत्ने आहेत. एकंदर ८४ रत्नांपैकी ९ महारत्ने व बाकीची ७५ उपरत्ने समजतात. [सं.]

**उपरदवडा** पु. १. वाजवीपेक्षा जास्त मागणी; फाजील हाव. २. वरचढपणा; वरचष्मा; वर्चस्व : 'उगिच गाल फुगवून रूसावें, आला दिवस उपरदवडा ।' – प्रला १६२. ३.अधिकार; सत्ता; प्रभुत्व. (क्रि. करणे, घेणे, चढवणे, चालवणे, होणे, चढणे, चालणे.) ४. वाजवीपेक्षा जास्त मोबदला, मागणी; थोडे देऊन फार काढण्याची प्रवृत्ती. आवळा देऊन कोहळा काढणे. (क्रि. करणे). ५. एखाद्याचे बरे करू गेल्यास त्यात यश न येऊन याने माझे वाईट केले असा दोष (ठपका) येणे.

**उपरदुवा, उपरपगडा, उपरपव, उपरपंजा** पु. तिफाशी सोंगट्यांच्या खेळात मेलेली सोंगटी लावण्यापुरते दानावर उरणारे दान. उदा. – पवबारांमधील पव किंवा पगडा, दसदोवारामधील दोन किंवा दुवा, पंधरा, सोळा किंवा सतरामधील पंजा म्हणजे पाच किंवा सहा इत्यादी; दुवा, पगडा, पव, पंजा ही खेळातील दोन, एक, एक, पाच ही दाने.

**उपरप्यादी** स्त्री. बुद्धिबळात एका प्याद्याने शत्रूच्या राजाला शह देऊन लागलीच दुसऱ्या प्याद्याने प्यादेमात करणे. पहा : **प्यादी**

**उपरबाहेरचा वारा** (नाविक) वायव्य दिशेकडून येणारा वारा.

**उपरम** पु. १. थांबणे; बंद होणे; शेवट; विश्रांती; विराम : 'कासया जयो उपरमु ।' – गीता १.२३४२. २. शांती; विरक्ती; वैराग्य : 'केले होती वृथा श्रम । चित्ता उपरम न होतां ।।' – तुगा ३३१६. ३. आनंद; संतोष : 'ऐसा ज्याच्या नामाचा महिमा । वर्णितां देव पावलें उपरमा ।।' – हरि १६.८. [सं.]

**उपरमणे** अक्रि. १. थांबणे; शांत होणे; बंद होणे; स्थिर होणे. २. रममाण होणे; आनंद पावणे; संतुष्ट होणे; उपक्रीडणे; प्रफुल्लित, ताजातवाना होणे : 'उपरमोनि पाहे सुंदरी । तंव अंगीं आदळला श्रीहरी ।।' – एरूस्व ७.६३. ३. विसावणे; विरमणे : 'शिव आणि श्रीधर । त्यांचे भक्तीस उपरमति तत्पर ।।' ४. मरणे; मृत्यू पावणे. ५. लय पावणे : 'आप तेजी उपरमे ।' तसा ६३८. [सं. उप+रम्]

**उपरमाडी** स्त्री. घराचा वरचा मजला, माडी; उपरखण; माडीवरची माडी : 'पहाया वैदर्भी मग उपरमाडीवरि चढे ।' – सारुह ७.८४.

**उपरवळ्या, उपरवाळ्या** क्रिवि. १. वरून; उंच ठिकाणाहून; उंचावरून. २. वर; उंच; डोक्यावर. सं. [उपरि+वलनैं] (वा.) **उपरवळ्या अंबट मागणे** – कारणाशिवाय दुसऱ्याच्या भानगडीत पडणे; खांद्यावर उपटसूळ घेणे; विकत श्राद्ध घेणे.

**उपरवाया** क्रिवि. कारणाशिवाय; जरुरीशिवाय. [सं. उपरि+वि+इ.] (वा.) **उपरवाया अंबट घेणे** – कारणाशिवाय भांडणे.

**उपरवाळा** पहा : **उपरवळ्या**

**उपरसाल** स्त्री. बाहेरची साल, कातडी, चामडी.

**उपरसाळ** स्त्री. एक प्रकारचे भात. [सं उपरि + शालि]

**उपरसाळी, उपरसीळी** स्त्री. एक औषधी वेल; गोपी, शामा, शारिवा; अनंता. पहा : **उपळंसरी**

**उपरंडणे** उक्रि. पालथे करणे; उपडणे; उपडे करणे. पहा : **उपरांडणे**

**उपरा** वि. (त्या ठिकाणाशी) संबंध नसलेला; परका; घर नसलेला; अपरिचित : 'आपण उपरा म्हणून दुसऱ्या गावात जगणार.' –फकिरा ६६.

**उपरा** पु. बहार; मोसम; बहर. (राजा.)

**उपराउपरी** क्रिवि. तातडीने; एकामागून लगेच दुसरे अशा प्रकारे; झटपट; लागलीच; ताबडतोब; तडक : 'सिंहनाद केला वीरीं । उपराउपरी धाविन्नले ।।' – एरुस्व ८.२०.

**उपराग, उपरागिणी** पु. स्त्री. गौण राग, रागिणी : 'राग उपराग भार्यासहित । सामगान एक करिती ।' –एवि ३६.६९.

**उपराग** पु. ग्रहण : 'चंद्रासि लागति कळा उपराग येतो ।'– नळ ५.[सं. ]

**उपराज्यपाल** पु. केंद्रशासित प्रदेशाच्या कारभारावर देखरेख करण्यासाठी केंद्रसरकारने नेमलेला दुय्यम राज्यपाल. [सं.]

**उपराट, उपराठ** वि. उलटे : 'ना उपराठिं ज्ञानपदें । तेचि अज्ञान ।।' – राज्ञा १३.८४८. [सं. विपरीत ]

**उपराठणे** पहा : **उफराठणे** : 'उपराठतां गेलीं प्राणें ।'–गीता २.१२६०.

**उपराठा** पहा : **उफराटा** : 'तो उपराठा गमे ।' – गीता १२.१३७.

**उपराम** पु. १. थांबणे; बंद होणे; विराम; विश्राम. पहा : **उपरम** २. संतोष; आनंद. ३. वैराग्य. [सं.]

**उपराष्ट्रपति–ती** पु. भारतीय संविधानाप्रमाणे राष्ट्रपतींच्या खालोखालचा, प्रसंगी त्यांची जागा घेऊ शकणारा पदाधिकारी; राज्यसभेचा पदसिद्ध सभापती. [सं.]

**उपराळ** वि. अधिक; फाजील; वाजवीपेक्षा जास्त.

**उपराळ** स्त्री. ओहळाखालची स्मशानभूमी.

**उपराळणे** अक्रि. भरून वाहणे (भांडे, नदी). उदा. उपराळून येणे, भरणे, चालणे.

**उपराळा** पु. १. खोटा आरोप; निंदानालस्ती; आळ; खोटी सबब. २. कुरापत; आगळीक; निमित्त (कज्जा, युद्ध इत्यादींना). ३.तक्रार [गो.]

**उपराळा** पु. १. दोन्ही बाजूंना सारखे ओझे करण्याकरिता जनावराच्या पाठीवरील एका बाजूला घातलेले (लाकडे इत्यादींचे) वजन. २. वाजवीपेक्षा अधिक सामग्री, संग्रह (माळ, द्रव्य वगैरेचा); राखून ठेवलेला जिन्नस; खर्च भागवून उरलेला माल, द्रव्य, पदार्थ इत्यादी; जरूर लागल्यास उपयोग करता येईल अशी तरतूद (दारूगोळा, सैन्य इ.). ३. ठरावीक वजनापेक्षा अधिक असलेला माल. ४. वर्चस्व; वरचढपणा (वादात, भांडणात). ५. विकत घेतलेल्या मालावर ठरलेल्या वजनापेक्षा थोडा अधिक मिळणारा माल (गुळाची ढेप, लाकडाचा गठ्ठा इत्यादींचे अधिक वजन भरते ते वाणी काही न आकारता देत असत). ६. जनावराच्या ओझ्यावर टाकलेले किरकोळ जिन्नस (काटक्या इ.); किरकोळ भरती. ७. भरपाई; वजावट; मोबदला. (क्रि. करणे.) : 'कच्च्या गड्यास कांहीं टोल्यांचा किंवा वद्यांचा उपराळा द्यावा.' – कुबडी चेंडू (बडोदे) १७. ८. एखादा जिन्नस वजन करताना दुसऱ्या पारड्यात घातलेले वजन, दडपण. ९. (ल.) आटापीट; खटाटोप : 'ब्रह्मसूत्राची भार–दोरी गळां । मंत्रोपदेश भिक्षेचा सोहळा । लेहण्यावाचण्याचा उपराळा । पोट भरावयाकारणें ।।' – स्वादि ३.३.१०.

**उपराळा** पु. साहाय्य; मदत; कुमक : 'आणि स्वामीसही परम असाध्य होऊन त्याचा उपराळा ताम्राकडून होणार ।' – मराआ.

**उपराळे करणे** सक्रि. धाड आणणे, घालणे : ' .... आणि घर वगैरे जिंदगीवर उपराळे केले.' – पेद ४४.१४.

**उपरांडणे** उक्रि. पालथे करणे; सांडणे; पाडणे; उलथून पाडणे (गाडा, गलबत इत्यादी).

**उपरांत, उपरांतिक** क्रिवि. १. नंतर; मागाहून : 'तो मजकूर वाचल्याच्या उपरांतहि त्याची बरील रंगेल वृत्ति जर तशीच कायम राहिली तर या गोष्टीबद्दल त्याची मोठी तारीफ करणें रास्त होईल.' – निमा ६२४.
शअ. शिवाय; आणखी; वर : 'बस्स! उपरांत नाहीं. अगदीं हरा शिवा!' – भा ४. [सं. उपरि]

**उपरि** शअ. पहा : **उपर, उपरी.** १. वरती; वरच्या बाजूस : 'उपरि सकंटक साचे परंतु सांचे जयांत सुरसाचे ।' – नळ ३५. २. वर. ३. यानंतर; यावर; अधिक; याशिवाय; जास्त; पुढील. विशेषतः एतत् किंवा तत् लागून प्रयोग. उदा. एतदुपरि; तदुपरि.
वि. उत्तर; पुढील : 'यज्ञवैभव खंडाच्या उपरिभागांत आरंभीचे अध्याय एक ते बारा पर्यंत ब्रह्मगीता.' – गीर ४. [सं.]

**उपरिचिठ्ठी** स्त्री. १. निरनिराळ्या विषयांचे कागदपत्र एकत्र पाठवावयाचे असतील तर त्यातील विषयांची साधारण कल्पना येण्यासाठी त्यांचा निर्देश करणारे त्याच्यावर लावलेले एक छोटे टिपण. २. (अर्थ.) विमेदाराला विमापत्राचा, ते तयार होत असतानाच्या काळात लाभ मिळावा म्हणून दिलेली तात्पुरती विमाचिठ्ठी.

**उपरितन** वि. वरचा. [सं.]

**उपरिनामित, उपरिनिर्दिष्ट** वि. वर उल्लेखिलेला. [सं.]

**उपरिनिवासी** वि. अन्य वनस्पतीच्या आधारा ने वाढणारी. (वनस्पती)

**उपरिपत्र** न. मुख्य मजकुराबरोबर पाठवले जाणारे स्पष्टीकरणात्मक, परिचयात्मक पत्र. [सं.]

**उपरिभूमि–मी** स्त्री. १. उंचावर असलेली जागा, जमीन (माडीवरील, डोंगरावरील). २. वरची खोली. [सं.]

**उपरी** वि. १. गावात जमीन, वतन नाही असा; मिरासदार नसणारा; तात्पुरता राहणारा; स्वत :ची मालकी नाही अशा जागी राहणारा. २. (ल.) उडाणटप्पू; संबंध नसलेला : 'एखादा उपरी पोर धरून आणून स्वर्गाचे दरवाजे मोकळे करून घेतल्याचे सुख मानून घ्यावयाचें' – लोटिकेले ४.१८. ३. खंडाने, मोलाने जमीन करणारा; खंडेकरी; खेडूत. थलकरी याच्या उलट. ४. वरिष्ठ; वरचा : 'चित्त्यास शिकारीचे सवईसाठीं उपरी अधिकाऱ्याच्या परवानगीनें नेणें.'–चिमा (बडोदे) २८.
क्रिवि. नंतर; पुढे; वर. पहा : **उपरि** : 'उपरी बोले रामललना ।' – रावि २०.१३९. (पत्रांतून) आशीर्वाद उपरी, विनंती उपरी इ.

**उपरी** पु. स्त्री.ओटा : 'मग गोसावी उपरीयेवरि पहुडू स्वीकारीला.' – लीच १.४. माडी : 'मग ते सप्तखणांची उपरी । तेथें ठेविली राये कुमरी ।।' – कथा १.६.३५.

**उपरुद्ध** वि. अडथळा केलेला; प्रतिबंध केलेला; अडवलेला. [सं. उप+रुध्]

**उपरू** वि. उपरी; श्रेष्ठ : 'तो गोडिया घे उपरू ब्रह्मविद्येतें ।'–उगी ७९५.

**उपरे** क्रिवि. आधिक्याने; श्रेष्ठत्वात : 'एऱ्हवीं दैत्यकुळ साचोकारें । परि इंद्रही सरी न लाहे उपरें ।' – ज्ञा ९.४५२.

**उपरे** न. (कासार व्यय.) जोडाच्या भांड्याचा वरचा भाग. [सं. उपरि]

**उपरोध** पु. १. व्याजोक्तीचे छद्मी भाषण; मर्मी लागेल असे भाषण; टोचून

बोलणे; आडून, घालूनपाडून बोलणे : 'उपरोधु जी सन्मुख । तुजसीं करूं।' - ज्ञा ११.५४३. २. प्रतिबंध; अडथळा; अडचण; जुलूम; त्रास : 'हेंही उपरोधें करणें । तरी आर्तभय हरणें ।' - ज्ञा १३.२८९. ३. भीड; संकोच; भीती; शंका; चोरी : 'तुका म्हणे अहो रखुमाईच्या वरा । उपरोध कां धरा माझा आतां ।' - तुगा १२४३. ४. आग्रह; हट्ट : 'बालक स्तनपानीं उपरोधु करी ।' - ज्ञा ११.७९. [सं.]

**उपरोधिक, उपरोधी** वि. छद्मी; व्याजोक्तीचे; निंदागर्भ; उपरोधपूर्ण; वरमण्यासारखे (भाषण, लेख). [सं.औपचारिक]

**उपरोधिक** वि. उपरी अधिक; यापेक्षा अधिक : 'पुढेहि सर्व प्रकारे आश्रा आपलाच आहे. उपरोधिक त्याहावेसें नाही.' - पेदभा २९.२३७.

**उपर्जन, उपर्जना** स्त्री. जमिनीची, संपत्तीची, मालमत्तेची वाढ; उत्कर्ष; भरभराट : 'पंच विषयवासना । अनुक्रमें वर्ते नाना । तेथें स्थूल देह उपर्जना । कारण होय ।' - सिंस १.१५६. (को.)[सं. उप+अर्जव]

**उपल** पु. दगड; रत्न; उत्पल. [सं.]

**उपल** पु. झरा; झिरपा; उमाळा.

**उपलखणे** सक्रि. कळणे, जाणवणे : 'आपुले आपणेयां उपलखति ना ।' लीचउ १९१.

**उपलग** वि. उपयोगी. [सं.]

**उपलगू** वि. उपरी; तात्पुरता : 'अलीकडे उपलगुं खोत पांचसात झाले नेहमी खोत वतनदार नाहींत.' - आठइति ६६. [सं. उप+लग्]

**उपलट** न. १. घाई; गडबड : 'आजपर्यंत अशीं लग्नं झालेलीं असतील पण तीं इतक्या उपलटानं झालेली नाहींत.' - झांकली मूठ ६०. २. उपद्व्याप; भानगड.

**उपलप्रक्षेप** पु. १. दगडमार; धोंडमार. २. (ल.) प्रतिपक्षावर मुद्दे किंवा प्रमेयांचा भडिमार करून त्यास गोंधळून टाकणे; काही बऱ्यावाईट युक्त्यांनी खंडन करणे. ३. आपला पराभव होत असताना प्रतिपक्षावर जोरजोराने तुटून पडून, असंबद्ध भाषणे करून आपला पराभव लपविण्याचा प्रयत्न करणे. ४. खोटा आरोप करणे; आळ घालणे; अपशब्द बोलणे. [सं.]

**उपलब्ध** वि. सापडलेले; मिळालेले; प्राप्त; अर्जित; मिळण्याजोगा; मिळण्यासारखा. [सं.]

**उपलब्धता** स्त्री. (अर्थ.) वस्तू किंवा पदार्थ मिळण्याची शक्यता; वस्तू मिळण्याजोग्या असणे. [सं.]

**उपलब्धि-ब्धी** स्त्री. १. प्राप्ती; अर्जन; हस्तगत होणे; स्वाधीन होणे. २. ज्ञान; जाणकारी; गोचरता; इंद्रियापासून मिळालेले ज्ञान; माणसाच्या स्वाधीन असलेले ज्ञान. ३. अस्तित्व; प्रत्यक्षता. [सं.]

**उपलभणे, उपलंभणे** अक्रि. प्राप्त होणे; मिळणे : 'परी देहाचें मोटकें उभें । आणि चेतना तेथ उपलभे ।' - ज्ञा १५.३७३. [सं. उप+लभ्]

**उपलभ्य, उपलभ्यमान** वि. १. उपलब्ध असलेले; प्राप्त होण्यासारखे; जिवंत; हयात; ज्ञात; चालू. २. साठणारे; लाभणारे; प्राप्त होणारे; फायद्या-नफ्यासारखे मिळणारे. [सं.]

**उपलवण** न. मिष्ट, रुचकर पदार्थ; पक्वान्न : 'नवरसांची उपलवण ।' - विपू १.१६. [सं.]

**उपलवणी** स्त्री. विस्तार; वर्णन : 'म्हणोनि इया वाहणी केली म्यां उपलवणी ।' - ज्ञा १३.८५३.

**उपलवणे, उपलविणे** उक्रि. १. प्रसार, विस्तार करणे : 'मौक्तिकांचिआं वेलीं फुललियां । कीं क्षीरसागरां लहरी उपलवलियां ।' - शिव ५९२. २. विवेचन; विस्तार; व्याख्यान, वर्णन करणे : 'हेचि आनिभ्रांति । प्रमेय उपलवूं पुढती । परी तूं प्रतीती । याची घे पां ।।' - ज्ञा १४.८६. ३. फुलणे; उकलणे; फुलवणे; विकास करणे : 'जैसी चंद्रमयाची घडी उपलविती ।।' - ज्ञा ११.२२३. ४. उघड करणे; व्यक्त करणे : 'तेथें जाणो कोटी सूर्य घडीं । उपलविली चोखडी । तैसी तेजपरवडी । श्यामांग चतुर्भुज ।' - स्वादि १०.३.१३. ५. प्रसन्न होणे : 'तेणें हरिखें आतां उपलवला । निरूपील ।।' - ज्ञा ६.४८८. [सं. उत्+प्लु]

**उपलक्षण** न. १. (सास.) लक्षणा; अंशावरून संपूर्णाचा, व्यक्तीवरून वर्गाचा व वर्गावरून जातीचा निर्देश करणे. २. दृष्टान्तपर भाषण; तुलना : 'तें दीपाचें उपलक्षण । निर्वातींचिया ।।' - ज्ञा ६.३५८. ३. तात्पुरता संबंधाच्या आधारे ओळख, निर्देश. उदा. 'कावळा बसला आहे ते घर.'

**उपलक्षणात्मक** वि. औपचारिक; दिग्दर्शक; निमित्तमात्र; लाक्षणिक. प्रत्यक्ष कृती न करता हेतू उघड करण्याइतकीच कृती करण्यापुरता : 'उपलक्षणात्मक सत्याग्रह करणारांची मुक्तता करण्यास हरकत नाही.' - केले ८.१२.४१. [सं.]

**उपलक्षणे** उक्रि. मनात धरून, हेतू-उद्देश धरून बोलणे; रोख ठेवून बोलणे; अर्थ असणे.

**उपलक्षित** वि. अप्रत्यक्षपणे सुचवलेला; रूपकाने किंवा उपलक्षणाने सांगितलेला. वक्रोक्तीने सांगितलेले, संकल्पित. [सं.]

**उपलक्ष्य** वि. अनुमेय; संकल्पित; गर्भितार्थ काढण्याजोगे; गृहीत मानण्यासारखे. [सं.]

**उपला, उपली** पु. शेणी, गोवरी. (हिं.) [सं.]

**उपला** पु. नवा पाक्षिक वायदा. पहा : **उपेता**

**उपलाण, उपलाणा, उपलाणी, उपलाणू** वि. खोगीर, जीन न घातलेला (घोडा) : 'कीं जीव नृपाचे वारु उपलाणें ।' - ज्ञा १८.४६४; 'जैसे वारू उपलाणी । वश्य करी अश्वसाहणी ।' - एभा २०.२१६. [सं. उत्+पर्याण = घोड्याचा साज, खोगीर] (वा.) **उपलाण बसणे** - खोगीर; जीनाखेरीज घोड्यावर बसणे : 'एक उपलाणी बैसले । पायबंद सोडूं विसरले । तेणें गुंतोनि खालीं पडिलें । पायबंद बसती पाठीवरी ।।' - जै ७६.६०.

**उपलाणणे** उपलवणे; खाली उडी मारणे. [सं. अत्प्लवन्]

**उपलाणी** क्रिवि. वरवर : 'पंत उपलाणी हसत म्हणाले.' - फकिरा १४६.

**उपलाणी** वि. १. उपरा; बाहेरचा; थोडा वेळ राहणारा; वाटेल तेव्हा वाटेल त्या गावी जाणारा : 'जे फिरस्ते नेमलेल्या गावी बहिवाटीप्रमाणे न येता वाटेल तेथे भटकतात, त्यांना आपण उपलाणी म्हणू.' - गांगा ८१. २. बिनआधारी. (व.)

**उपलाणे, उपलाने** न. बिनीचे घोडदळ; घोडेस्वार; बिनी. पहा : **हुलसार, हुलस्वार.** : 'धाडुनी इंद्रियांचे उपलाणें । विषयाचे घाली

घालणें । होठेशी ब्रम्हचर्यातें जिणें । पाचारूनि ।।' – ज्ञाप्र ७३७.
[सं. उत्+पर्याण = खोगीर]

**उपलाशे** वि. उपरी; पूर्ण लाभ न मिळणारे. (गो.)

**उपलिप्त** वि. लेप केलेला; लावलेला; फासलेला; माखलेला; सारवलेला; लपेटलेला. [सं. उप+लिप्]

**उपलेप, उपलेपन** पु. न. १. चोळणे; माखणे; लावणे; फासणे; लेप करणे. २. लेप; गिलावा; गिलाव्याचा पदार्थ.

**उपवक्ता** पु. मुख्य वक्त्यानंतर बोलणारा वक्ता. [सं.]

**उपवड, उपवढ** स्त्री. जाग; जागृती : 'नाना उपवढ होतां खेंवो । नुरे स्वप्नसंभ्रमाचा ठावो ।' – ज्ञा १५.२६४.

**उपवढणे** अक्रि. जागे होणे : 'नोहे हर्षशोकांसि कारण । उपवढलिया जाण । जिया परी ।।' – ज्ञा १५.२९४. [का. उप्पवडिसु]

**उपवणे** अक्रि. तरंगणे; पोहणे : 'एयाचें आसन अंतरक्ष उपवत असे.' – लीच २.१६.

**उपवणे** अक्रि. नाहीसा होणे; गुप्त होणे. (व.) [सं. उत्+प्लु=उडणे]

**उपवधू** वि. विवाहयोग्य (तरुण) : 'जस्टीस शहांचा एखादा मुलगा उपवधू असेल.' – दौ ११.

**उपवन** न. उद्यान; बगीचा. २.(ल.) रमणीय स्थान. [सं.]

**उपवर** वि. १. लग्नास योग्य वयाची; विवाहास योग्य (मुलगी) : 'उपवर परी उपायचि नाहीं ।' – रामदासी २.१३६. २. विवाहाचा सामान्य काल अतिक्रमून विवाह न होता राहिलेली. (मुलगी). ३. ऋतुप्राप्त झालेली : 'पैठणांत पत्नी जाली उपवर ।' – रामदासी २.७४. ४. संभोगक्षम : 'राधिकेचा मानस जाणून उपवर झाला सखा ।' – पला २. [सं. उप+वृ]

**उपवर्ण** पु. ध्वनिविचारात एकाच ध्वनीच्या परिस्थितीनुसार होणाऱ्या वेगवेगळ्या रूपांपैकी प्रत्येक. [सं.]

**उपवर्धी** वि. वाढणारा; वृद्धिजनक; भर पडून वाढणारा. [सं.]

**उपवस्त्र** न. १. मुख्य पोषाखावर घ्यायचे वस्त्र; उपरणे; पांघरायचे वस्त्र. २. (ल.) रखेली; राख; अंगवस्त्र. [सं. उप+वस्=आच्छादन करणे]

**उपवाणिज्यदूत** पु. परराष्ट्रात राहणाऱ्या आपल्या प्रजाजनांचे हित पाहण्यासाठी एखाद्या राष्ट्राने नेमलेल्या अधिकाऱ्याचा मदतनीस.

**उपवंश** पु. (समाज.) दोन निरनिराळ्या वंशांच्या संकरांतून निर्माण झालेली एक नवी शाखा; वंशाचा एक पोटविभाग. [सं.]

**उपवारा** पु. उकाडा; उबारा : 'रंगमाहालीं होतो उपवारा । कोणी प्रियकर आणवा राजेंद्राचा थारा ।' – पला ४.२६.

**उपवास** पु. (यज्ञभूमीजवळ, यज्ञारंभाच्या पूर्वीच्या दिवशी सायंकाळी जाऊन व्रतस्थ राहणे हा मूळ अर्थ यावरून) संबंध दिवस (अहोरात्र) भोजन न करणे; उपोषण; लंघन; अन्ननिवृत्ती; भोजनाभाव; निरशन. अर्ध्या दिवसाच्या निरशनालाही हा शब्द लावतात. उदा. सोमवार – शनवारचा उपवास. [सं. उप+वस्]

**उपवासी** वि. १. उपास केलेला; उपोषण केलेला. २. भोजन न केलेला; उपाशी राहिलेला. (वा.) **उपवासी मरणे** – भुकेने व्याकूळ होणे; भुकेने आसन्नमरण होणे : 'वाटे जातां घडी घडी । पाहे पोह्यांची गाठोडी । मनांत म्हणें घरीं बाळें रोकडीं । उपवासी मरतील ।।' – हरि २९.६१. [सं. उपवास]

**उपविद्या** स्त्री. ब्रह्म ज्ञानविरहित इतर भौतिक विद्या, ज्ञान; भौतिक शास्त्र; ईश्वर, धर्मशास्त्र या विरहित; व्यावहारिक ज्ञान. [सं.]

**उपविधि–धी** पु. (कायदा) १. पोटकायदा; मुख्य कायद्याला जोडून असणारे नियम. २. स्थानिक प्राधिकरणाने केलेली नियमावली. [सं.]

**उपविष** न. विषाचा एक गौण प्रकार. रुईचा चीक, त्रिधारी निवडुंगाचा चीक, कळलावी, कन्हेर, गुंज, अफू, धोतरा या सात उपविषाच्या जाती होत. [सं.]

**उपविष्ट** वि. (सामा.) १.बसलेला; स्थापन झालेला; आलेला; दाखल झालेला. २. जवळ, शेजारी बसलेला. [सं. उप+विश्]

**उपवीख** न. विषावरील उतारा : 'महात्मेनि वीख घेतले । मग तेयासि लोकें उपवीख केले.' – लीचउ ३३.

**उपवीत** न. त्रैवर्णिकाने वापरावयाचे यज्ञोपवीत; जानवे.
[सं. उप+वे = विणणे].

**उपवृक्कि** स्त्री. प्राण्याच्या शरीरातील नलिकारहित ग्रंथीतून निघणारा, रुधिराभिसरण व स्नायूंचे चलन वलन यांवर परिणाम करणारा स्राव.

**उपवेद** पु. मुख्य चार वेदाशिवाय इतर गौण वेद. जसे : – ऋग्वेदाचा आयुर्वेद (काहींच्या मते अथर्ववेदाचा ); यजुर्वेदाचा धनुर्वेद; सामवेदाचा गांधर्ववेद; अथर्ववेदाचा स्थापत्यवेद, शिल्पशास्त्र. [सं.]

**उपवेश, उपवेशन** पु. १. (सामा.) बसणे; बसलेपणाची स्थिती. २. जवळ बसणे. [सं.]

**उपवेसन** न. अन्नत्याग : 'म्हणौनि मी उपवेसनी बैसला ।' – पंचो २४.२२.

**उपव्यवसाय** पु. मुख्य व्यवसायाव्यतिरिक्त असलेला इतर दुय्यम व्यवसाय; जोड व्यवसाय. [सं.]

**उपव्याधि–धी** स्त्री. (वै.) प्रमुख आजाराबरोबर उत्पन्न झालेले इतर विकार; एखाद्या मोठ्या रोगाने शरीर कमकुवत झाल्यामुळे होणारे आनुषंगिक विकार. [सं.]

**उपशब्द** पु. शब्दाचा अर्थ विशद, विस्तृत करण्याकरिता तत्सदृश किंवा त्याच अर्थी जो दुसरा शब्द, प्रतिशब्द जोडतात तो. उदा. पोथी–पुस्तक, लाकूड– फाटा, गवत–काडी, भाकरी–बिकरी वगैरे. [सं.]

**उपशम** पु. १. उतरणे; कमी होणे. २. मंदावणे; ओसरणे; शांत होणे. ३. घट; सूट. [सं. उप+शम्]

**उपशम, उपशांति–ती** पु. स्त्री. १. शांती; निग्रह; लय; शेवट : 'जितया मान मोडिली । उपशमाची ।।' – ज्ञा ३.२५२. २. विराम; थांबणे : 'मागेन उपशम व्याधीचा ।' –गुच २.२१३; 'मायेशीं होय उपशांति । केवळ उरे ज्ञाप्ति ।' ३. नाश : 'आपणावर येणाऱ्या संकटांचा उपशम केवळ स्वतंत्रतेनें होत नाहीं ...' – इंमू ३१०. [सं. उप+शम्]

**उपशमणे** अक्रि. शांत करणे; नाहीसे होणे : 'जो शरीरभावातें उपशमी । तो अधियज्ञु एथ गा मी ।' – ज्ञा ८.३७. [सं. उप+शम्]

**उपशमन** न. १. शांती; उतार; कमी होणे; उपशम. पहा : **उपशम** : 'दावितसे स्फोटकासी । म्हणे उपशमन केवी होय ।' – गुच ५०.५५. २. उतार पाडणारे, शांत करणारे औषध; उतारा; इलाज;

तोडगा : 'महादेव तमोगुण । त्या तमांसि उपशमन । तुझीये चरणींचे रज जाण ।।' – एरुस्व ४.५३. [सं.]

**उपशामक** वि. वेदना कमी करणारा; दाह शांत करणारा; मानसिक त्रास कमी करणारा. [सं. उपशम]

**उपशास्त्र** न. न्यायमीमांसादी षट्शास्त्राहून इतर दुय्यम दर्जाची गायन, वैद्यक वगैरे शास्त्रे किंवा त्यावरील प्रत्येक ग्रंथ. [सं.]

**उपशांत** वि. शांत झालेला; थंड झालेला : 'तया स्वांत: करणाजता । सकळकामोपशांता ।' – ज्ञा ६.८१. [सं.]

**उपशांति–ती** पहा : **उपशम** [सं.]

**उपशिक्षक** पु. १. शिक्षकाने आपल्या साहाय्याकरिता, शिक्षणाचे काम करण्याकरिता अगर विद्यार्थ्यांवर नजर ठेवण्याकरिता हाताशी घेतलेला वरच्या वर्गातील हुशार विद्यार्थी; उपगुरू; मालचाट्या. २. दुय्यम शिक्षक; सहायक शिक्षक. [सं.]

**उपशीर्ष** न. अर्थसंकल्पातील दुय्यम शीर्ष; पोटशीर्ष; पोटसदर. [सं.]

**उपशीर्षक** न. १. (ग्रंथ.) ग्रंथाच्या मुख्य नावाव्यतिरिक्त त्यातील विषयाचे स्पष्टीकरण देणारे नाव. २. दुय्यम, पोटमथळा.

**उपशीर्षदंड** पु. (स्था.) दरवाजा व खिडकी यांच्यावरचे आडवे लाकूड.

**उपश्रुत** स्त्री.वर्तमान; बातमी; बोलवा : '...... त्यांची पूर्णाहुती अर्थानिशीं प्राणानिशी होणार याप्रमाणें उपश्रुत निघाली, ती लिहीली आहे.' – ऐलेसं ७९३०.

**उपश्रुति–ती** स्त्री. १.परोक्ष किंवा भवितव्यातील गोष्टीविषयी प्रश्न पाहण्याकरिता रात्री चांभार, परीट इ. च्या घराजवळ जाऊन उभे राहिले असता आतून साहजिक निघालेला बरावाईट शब्द. असा शब्द आपल्या गोष्टींवर प्रकाश पाडतो अशी मानण्याची पद्धती, पडताळा. २. आपल्या प्रस्तुत गोष्टीसंबंधी एखाद्या अप्रस्तुत व्यक्तीच्या मुखातून सहज निघणारा बरावाईट शब्द आपल्याकडे लावून घेणे. ३. सांगोवांगी, कर्णोपकर्णी आलेली देशांतराची अनिष्ट बातमी (भविष्यकालीन किंवा वर्तमानकालीन वाईट गोष्टीची). ४. जनवार्ता; वदंता; भुमका. [सं. उप+श्रु = ऐकणे]

**उपश्लिष्ट** वि. शेजारी ठेवलेला; जवळ असलेला; संसर्ग असलेला; चिकटलेला; उपश्लेष असलेला. [सं. उप+श्लिष्]

**उपश्लेष** पु. सान्निध्य; जवळ असण्याची स्थिती; जवळपणा.

**उपष्टंभ** पु. पाया; आधार; निमित्त; आश्रय. [सं. उप+स्तंभ्]

**उपष्टंभक** वि. आधार, धीर देणारा; आश्रय देणारा; साहाय्य करणारा; सावरणारा; हात देणारा. [सं.]

**उपष्टीव** क्रिवि. विनाकारण; बिनआधारी. (व.)

**उपसण, उपसणी, उपसणे, उपसा, उपसाभर** क्रिवि. उपसाउपसी वगैरे वर्णव्यत्यासाने उपसण इत्यादी शब्दापासून हे शब्द साधले आहेत. पहा : **उसपणे**

**उपसपंप** पु. द्रवपदार्थ बाहेर उपसून काढणारे उपकरण (डब्यातले घासलेट, विहिरीतील पाणी इ.) : 'डब्यातील घासलेट उपसण्याचा पंप, विहिरीतून पाणी वर खेचण्याचा पंप हे सर्व उपसपंप होत.' – विप्र १५३.

**उपसभापति–ती** पु. सभापतीच्या अनुपस्थितीत सभापतीचे काम पाहणारी व्यक्ती. [सं.]

**उपसमीप** क्रिवि. जवळ; सन्निध; शेजारी : 'चित्त जो उपसमीपचि वासी । राघवीं करील तो उपवासी ।'. [सं.]

**उपसरण** न. जवळ येणे; शेजारी येणे; पुढे सरणे. [सं. उप+सृ]

**उपसरणे** न. क्रि. च्या जवळ किंवा पुढे जाणे.

**उपसर्ग** पु. १. उपद्रव; त्रास; पीडा; विघ्न; उपाधी : 'तेथें दैत्यीं उपसर्ग केला लोकां । रचिली द्वारका तुका म्हणे ।' – तुगा ९९. २. दुश्चिन्ह; अनिष्टसूचक गोष्ट (उत्पात, उल्कापात इ.). [सं. उप+सृज् ]

**उपसर्ग** पु. १. (व्या.) शब्दांच्या मागे लागणारे अव्यय; उपपद. उदा. अति, अनु, उप, परा, प्रति, सम् इत्यादी. [सं.]

**उपसर्पण** न. जवळ येणे; जाणे; सान्निध्य; आगमन : 'धनालागी नीचसेवन । उपसर्पण हीनाचे ।।' – एरुस्व १३.३१. [सं. उप+सृप्]

**उपसवे** क्रिवि. जवळ; सन्निध : 'आपण बैसे उपसवें नेटीं' – नव १६.४०.

**उपसळा** वि. खोडकर; त्रासदायक; उपद्रव देणारे; वाईट वर्तनाचे (मूल वगैरे). [सं. उप+शल्य]

**उपसळी** पु. १. उपसर्ग; त्रास; उपद्रव; उद्वेग (उंदीर, मांजर, कुत्रा वगैरेपासून होणारा). २. कटकट; त्रास (मुले वगैरेंचा); छळवाद; सतावणी. (क्रि. आणणे, देणे). [सं. उप+शल्य]

**उपसंजाति** स्त्री. (विधी.) उपस्थिती, हजर होणे.

**उपसंपादक** पु. वृत्तपत्राच्या संपादकीय विभागात काम करणारा कर्मचारी; संपादनाची जबाबदारी उचलणारा संपादकाहून कनिष्ठ दर्जाचा सहायक. उदा. – संपादक, कार्यकारी संपादक, सहसंपादक, उपसंपादक, सहायक संपादक इ. [सं.]

**उपसंहरणे** अक्रि. शांत होणे; ओसरणे; लोपणे; नाश पावणे; संपणे : 'तो घोष तरी उपसंहरला ।।' – ज्ञा १.१६१. [सं. उप+सम्+हृ]

**उपसंहार** पु. १. संकोच; एकत्रीकरण; गुंडाळणे; आटपणे; आवरणे : 'प्रपंचाचा उपसंहार होय तेथें आत्यंतिक।' २. सारांश; शेवट; समाप्ती. ३. ग्रंथाचा अखेरचा भाग; शेवटचे शब्द; सिंहावलोकन : 'ग्रंथाचे तात्पर्य काढणे असल्यास (एकंदर) सात गोष्टी साधनभूत असून ... पैकीं उपक्रमोपसंहारौ म्हणजे ग्रंथाचा आरंभ आणि शेवट या पहिल्या दोन गोष्टी होत.' – गीर २१. [सं.]

**उपसंहार** पु. पारिपत्य; नाश : 'त्यांचा उपसंहार करोन मग कूच करणार.' – ऐलेसं ६४२९.

**उपसंहृत** वि. १. गुंडाळलेला; एकत्र केलेला. २. समाप्त केलेला; शेवट केलेला. [सं. उप+सम्+हृ]

**उपसा** पु. १. बाहेर काढणे; पाणी वर काढण्याची क्रिया : 'विहिरींच्या पाण्याचा उपसा चार मोटा अखंड करीत होत्या.' – श्रीयो ३.१४१. २. (पाणी, धान्य, पैसा इत्यादींच्या संचयातून) बाहेर काढण्याची क्रिया. [सं उत्सृप]

**उपसागर** पु. समुद्राचा जमिनीत शिरलेला मोठा व रुंद भाग; तीन बाजूंनी जमिनीने वेढलेला लहान समुद्र. उदा. बंगालचा उपसागर.

**उपसाण, उबसाण** स्त्री. कुबट वास; कुजकी घाण. (क्रि. येणे, पडणे). (को.) [क. उब्बे = वाफ, उष्णता]

**उपसातुपसी** स्त्री. १. वर्दळीवर येऊन आवेशाने म्यानातून तलवारी बाहेर

काढणे; वर्दळीवर येणे; हमरीतुमरी. २. रिकामे करणे; बाहेर काढणे. [उपसणेचे द्वि.]

**उपसाभर** स्त्री. घरातील कष्टाची कामे : 'मी .... येथील संसाराची उपसाभर करीन.' – माआ ५१.

**उपसामग्री, उपसाहित्य** स्त्री. न. किरकोळ उपकरणे; सामान; साहित्य; सामग्री; द्रव्य वगैरे : 'करावया बैसला हवन । तेथे उपसामग्री आणून । जगन्माता देत असे ।।'; स्वयंपाकातील उपसाहित्य म्हणजे मीठ, मिरची,हिंग इत्यादी साहित्य. [सं.]

**उपसामी** वि. साधू; विरक्त : 'येरू उपसामीयांचा रावो ।।' – उषा १४३५. [सं. उपशमी]

**उपसारणिक** (ग.) दोन मापांतील किंवा दोन सटांतील कनिष्ठ भाग.

**उपसारा** पु. १. वाटेल तिकडे संचार; मोकळे, स्वैर वावरणे. २. प्रशस्त जागा; मोकळी जागा. [सं. उप+सृ=सर]

**उपसारा** पु. १. घरातील किरकोळ सामान, अडगळ वगैरे; प्रवासाची सामग्री, जिनसा : 'गवत, लाकूडफाटे यास उपसाऱ्यास जागा करू.' – पेठे दप्तर १.८. २. किरकोळ कामे; बारीकसारीक कामे; अडकामे.

**उपसारिणी** स्त्री. मुख्य वाहिनीला जोडलेल्या नळ्या (उपवाहिन्या).

**उपसावणे, उपसाहणे** उक्रि. सोसणे; सहन करणे; पोटात घालणे; क्षमा करणे : 'परि जाणतां उपसाहावे । बोलांचे पाणिपद निहाळावें ।।' – शिव ३६५. [सं. उप+सह्]

**उपसाह** पु. सहन करण्याची क्रिया.

**उपसाहित्य** न. लागलागवड; अवांतर किरकोळ लागणारे सामान : '... त्याचे उपसाहित्य देखील द्यावे लागते.' – पेद १७.४. [सं.]

**उपसिद्धांत** पु. एक गोष्ट केल्याने आपोआप सिद्ध होणारी दुसरी गोष्ट : '(भूमितीमधील) एखादा उपसिद्धान्त सोडविण्यास वेळ लागला तर ....' – कुंडली ६९. [सं.]

**उपसिलिक** वि. ज्यामध्ये मध्यम प्रमाणात सिलिका आहे असा (खडक).

**उपसूचक** पु. सभेपुढे आणलेल्या ठरावामध्ये काही फेरफार सुचवणारा; उपसूचना मांडणारा; किरकोळ सूचना करणारा. [सं.]

**उपसूचना** स्त्री. सभेमध्ये चर्चा चाललेल्या विषयावरील मूळ ठरावात दुरुस्ती, फेरफार किंवा तहकुबीसंबंधी मांडलेला प्रस्ताव. [सं ]

**उपसूत्र** न. (ग्रंथ.) ग्रंथालयातील वर्गीकरण आणि तालिकीकरणाचे पोटनियम.

**उपसृष्टि–ष्टी** स्त्री. (प्राणिवर्ग, वनस्पतिवर्ग यांची) उपकोटी. [सं.]

**उपसेचन** न. तोंडी लावणे; तोंडी लावण्याचे साधन; पक्वान्न रुचकर करणारी वस्तू (चटणी, मसाला वगैरे) : 'उपसेचन म्हणिजे साधन । तें तोंडीं लावितां अन्न गिळे ।।' – यथादी ११.४१८. [सं. उप+सिच्]

**उपस्कर** पु. १. एखादे कार्य पूर्ण करण्याकरिता लागणारे साहित्य, वस्तू, पदार्थ; साधन; बाब; अवश्य नसलेली पण उपयोगी अगर शोभा, सौंदर्य वाढवणारी वस्तू. २. तोंडी लावण्याचा पदार्थ; मसाला; मिसळण; व्यंजन. ३. गृहकृत्यास उपयोगी पडणारी कोणतीही वस्तू (सूप, केरसुणी, मुसळ इ.); साधन; साहित्य. [सं.]

**उपस्कारपत्र** न. (ग्रंथ.) ग्रंथालयात वाचनसाहित्य (ग्रंथ, हस्तलिखिते इत्यादी) आल्यानंतर त्यावर काही संस्कार, प्रक्रिया कराव्या लागतात. उदा. शिक्के मारणे, पाने कापणे, सूचिलेखन, वर्गीकरण इत्यादी. या सर्वांची नोंद ठेवायचे प्रक्रियापत्र.

**उपस्तरण** न.(याज्ञिक) स्रुव्यात किंवा हवन करायच्या पात्रात होमद्रव्य घेण्यापूर्वी त्या पात्रात दर्वीने तूप घालणे. [सं.]

**उपस्त्री** स्त्री. रखेली; राख; अंगवस्त्र. [सं.]

**उपस्त्रीत्व** न. (समाज.) एखाद्या पुरुषाजवळ लग्नाशिवाय स्त्रीने राहणे, संबंध ठेवणे. [सं.]

**उपस्थ** पु. न. १. स्त्री किंवा पुरुष यांचे जननेंद्रिय; लिंग; योनी; मैथुनेंद्रिय; पंचकर्मेंद्रियांपैकी एक. २. रथामध्ये सारथ्याने बसायची जागा; गाडीवान बसण्याची जागा.
वि. जवळचा; शेजारचा. [सं. उप+स्था]

**उपस्थनिग्रह** पु. संभोग, मैथुन न करणे; विषयोपभोगापासून अलिप्तता; ब्रह्मचर्य; विषयनिवृत्ती; असिधाराव्रत. [सं.]

**उपस्थान** न. १. प्रार्थनेचा एक प्रकार; गूढार्थक मंत्राने उपासना, प्रार्थना. २. असे गूढ मंत्र, स्तोत्र. ३. उभे राहून हात जोडून, मंत्र पठण करून देवतांची स्तुती करणे. [सं.]

**उपस्थान** न. १. उठणे; वर येणे; उद्भवणे; उत्पन्न होणे. २. घडून येणे; घडणे (कर्म, व्यवहार इत्यादी). [सं.]

**उपस्थापक** पु. सामुग्रीप्रमुख.

**उपस्थापन** न. १. उपस्थित करणे; जवळ आणणे; उभे करणे; घडवून आणणे; उत्पन्न करणे; बनाव बनवणे. २. पूजा; सेवा. [सं.]

**उपस्थापित** वि. घडलेले; झालेले; स्थापन केलेले. [सं.]

**उपस्थित** वि. १. उद्भवलेला; उत्पन्न केलेला; प्राप्त झालेला; पोचलेला; घडलेला (प्रसंग, गोष्ट, कर्म इ.) : 'आमच्या देशांत हजारों सभा दरवर्षी उपस्थित होतात ....' – निमा २७५. २. ज्ञात; माहीत असलेला; हयात; ताजा असलेला; मलिन न झालेला; रूढ; चालू (अभ्यास, विधी). ३. प्रत्यक्ष असलेला, आलेला; हजर.[सं. उप+स्था] (वा.) **उपस्थित होणे** – हजर असणे, येणे (सभा इत्यादीला). निर्माण होणे; उद्भवणे (प्रश्न इ.) **उपस्थित करणे** – निर्माण करणे; काढणे (प्रश्न इ.).

**उपस्थिति रोजी** हजेरीबद्दल दिलेला रोजगार.

**उपस्थिति–ती** स्त्री. १. जवळ असणे; हाताशी असणे; ताजे असणे; स्मरणात असणे; तयार असणे; ताजेपणा; नवेपणा; स्मरण (विद्येचे, अभ्यासाचे, शास्त्राचे) : 'वाचलेल्या ग्रंथांची उपस्थिति चांगली राहण्यास त्याचा (ग्रंथसंग्रहांचा) किती उपयोग आहे हेंही सर्वांच्या सहज लक्षांत येणार आहे.' – निमा ५१५. २. विद्यमानता; अस्तित्व; उपस्थितपणा; हजर असणे; उत्पन्न होणे; चालू असणे (प्रसंग, कार्य वगैरे). ३. मनात येणे; स्मरण होणे. [सं. उप+स्था]

**उपस्नातक** पु. विद्यापीठाच्या पदवीसाठी अभ्यास करणारी व्यक्ती; पदवीपरीक्षेच्या आधीची परीक्षा उत्तीर्ण झालेली व्यक्ती. [सं.]

**उपहत** वि. १. मारलेला; इजा, जखम झालेला; नष्ट केलेला; उद्ध्वस्त; ताडित. २. निस्तेज; हतवीर्य; पीडित; दुःखी : 'जैसा राजकुमरु पदच्युतु । सर्वथा होय उपहतु ।' – ज्ञा १.२७०. [सं. उप+हन्]

**उपहति-ती, उपहंति-ती** स्त्री. १. निस्तेजता; अपमान; अनादर; मानहानी : 'जैसी भातारेंहीन वनिता । उपहती पावे सर्वथा ।' - ज्ञा २.१९९. २. नाश; खालावलेली, कष्टप्रद स्थिती.

**उपहमीदार** पु. (अर्थ.) १. भाग, रोखे यांच्या विक्रीची हमी घेणाऱ्याचा दुय्यम अधिकारी. २. गलबताचा वगैरे विमा उतरवणाऱ्या हमीदाराचा दुय्यम अधिकारी.

**उपहसित** वि. ज्याचे हसे, उपहास, थट्टा फजिती झाली आहे असा; अपमानित; छी: थू: झालेला. [सं. उप+हस्]

**उपहसित** न. नाक फुगणे, कुटिल दृष्टी, स्पष्ट शब्द व मान हलणे यांनी युक्त असे हसणे; उपहासपूर्ण हास्य; निर्भर्त्सनायुक्त हास्य. [सं.]

**उपहार** पु. १. फराळाचे सामान; फराळ; भक्ष्य : 'मीचि होईन सुआरु । वोगरीन उपहारु ।' -ज्ञा १३.४२१. २. देणगी; नजराणा; बक्षीस; भेट; आहेर : 'वस्त्रें अलंकार सुमनें । नाना उपहार बलिदानें ।' - एरुस्व ६.८४. [सं. उप+आहार]

**उपहारगृह** पहा : **उपाहारगृह**

**उपहारणे** उक्रि. अर्पण करणे; देणे : 'तेंचि भस्म ईश्वरासि । उपहारावे तुम्ही हर्षी ।' - गुच ४०.८१.

**उपहारसूचिपत्र** (न.)भेट म्हणून आलेल्या वाचनसाहित्याची यादी.

**उपहास** पु. १. थट्टा; चेष्टा; फजिती; हसे; थू; निंदा; अपमान; निर्भर्त्सना : 'विरोधु वादुबळु । प्राणितापढाळु । उपहासु चाळु । वर्मस्पर्शु ।।' - ज्ञा १३.२७१. २. उपहास होतो अशी स्थिती; उपहासक्षम अवस्था, योग्यता. [सं. उप+हस्]

**उपहासक** वि. उपहास, थट्टा करणारा; निंदा करणारा. [सं. उप+हस्]

**उपहासणे** अक्रि. थट्टा, चेष्टा, निंदा, फजिती इ. करणे; हसणे; अनादर, अपमान करणे. [सं. उपहास]

**उपहासास्पद** वि. थट्टेचा विषय झालेला; थट्टेला पात्र. [सं.]

**उपहासिका** स्त्री. विनोदी कविता; व्यंगोक्तिपूर्ण कविता; कुचेष्टा, टवाळी करणारी कविता. [सं. उपहास]

**उपहास्य** वि. थट्टा करण्यास योग्य, पात्र; चेष्टा करण्यालायक; उपहासास्पद; निंद्य; तिरस्कार्य; त्याज्य.

न. थट्टा (उपहास अप.) : 'उपहास्य केले समर्थांचें ।' - रामदासी २.३.[सं.]

**उपहास्यता** स्त्री. १. (उपहास या अर्थी चुकीने) थट्टा; चेष्टा. २. (वास्तविक अर्थ) उपहासार्हता; निंदास्पदता. [सं.]

**उपहित** वि. १. जवळ असलेले; जवळ ठेवलेले (पदार्थ, भक्ष्य इ.) : 'जैसें कां उपहिता (अंबोण) म्हैसी खाय ।' - ज्ञा १७.१५४. २. संसर्गयुक्त; आरोपित : 'तैसें उपाधी उपहित । थोकोनि ठाके जेथ ।' - ज्ञा १५.५११. ३. उपाधियुक्त; उपाधिबद्ध. सामा. शब्द - मायोपहित (चैतन्य), घटोपहित (आकाश) : 'आणि कुटस्थु जो अक्षरु । दाविला पुरुषप्रकारु । तेणें उपहिताही आकारु । चैतन्या केला ।।' - ज्ञा १६.४३. [सं. उप+धा=ठेवणे]

**उपहुड** पु. जागृती; उदय : 'ऐसा उदयाचळिचा उपरवाळां । उपहुडु जाला चंद्रमंडळा । जैसी रासी जाली गगनाचा खळा । चाकोरा पीकांची ।' - नरुस्व ४९१.

**उपहुडणे, उपहोडणे** अक्रि. झोपेतून जागे होणे; उठणे : 'पाहातेआं पाहारा दधिमंथनीं । गौळनी गातीं श्रीचक्रपाणीं । तो ध्वनि आयकौनि श्रवणी । देओ उपहौडले ।।' - वछा ३१

[क. पवडिसु = आडवे होणे].

**उपळ** पु. पाषाण; दगड. पहा : **उपल** : 'जडा उपळा अवचटे । लागती श्रीचरणेशीं झटें ।' - ज्ञाप्र ४०५. [सं. उत्पल]

**उपळ, उपळी, उपळण** पहा : **उपळणे, उपळजमीन** स्त्री. फार पाऊस पडल्याने जागोजाग झरे फुटून पाणी बाहेर येण्यासारखी होणारी जमिनीची अवस्था. पहा : **उपळणे; उपळजमीन**

पु. १. असे जमिनीतून बाहेर येणारे झरे. २. (ल.) घोणस किंवा फुरसे चावल्यामुळे रक्त वाहू लागते ती अवस्था. ३. (व्यापक) (स्त्रियांस) विटाळ अतिशय होण्याची अवस्था; धुपणी. ४. जोराने वर येणे; उफाळणे; उत्पन्न होणे; जोर करणे (दमा, खोकला, ताप, दुखणे, रोग इ.).

[सं. उद्+प्लु]

**उपळजमीन** स्त्री. पावसाचे पाणी अतिशय जिरल्यामुळे जिला पाझर फुटले आहेत अशी जमीन.

**उपळण** न. तोडगा; मंत्रतंत्र; 'मग रामभाऊकडे जाऊन उपळण टाका. त्याचा हटकून गुण येतो.' - खेस्व १७१.

**उपळणे** अक्रि. १. पाणी जिरून साचल्यामुळे (जमिनीतून) पाझर फुटणे; उपळी होणे. २. शरीराच्या छिद्रातून किंवा हिरड्यांतून वगैरे रक्त वाहू लागणे. ३. जमीन भिजून सैल झाल्यामुळे वर उपटून येणे; उफळणे; उपटले जाणे (झाड वगैरे).

**उपळवट, उपळवटा** स्त्री. १. पाणी फार जिरल्यामुळे पाझर फुटलेली जमीन; उपळ जमीन; भिजलेली, मुरलेली जमीन. २. (ल.) (विशेषत: उपळवट) चंगळ; गडगंज; समृद्धी. (क्रि. करणे, येणे, होणे).

वि. १.उपळ असणारी; ओलाव्याची; मुरलेली (जमीन). २. नेहमी पाझर असलेली (जमीन).

**उपळवणी** न. १. जमिनीतून वाहणाऱ्या पाझराचे उपळीचे पाणी. २. (ल.) संपत्ती, मान; सन्मान; सुख इ. (क्षणिकत्व दर्शविण्यासाठी).

**उपळसरी, उपरसाळ** स्त्री. आयुर्वेदातील औषधी. पहा : **अनंतमूळ** श्यामा; दुद्रोळी; उपरसाळ (चुकीने) आस्वली. हिच्या दोन जाती आहेत - एक पांढरी व दुसरी काळी. वेल काळसर तांबूस रंगाचा असून पाने तरवारीच्या आकाराची, अर्धबोट रुंद व तीन अंगुळे लांब असतात. ही रक्तशोधक आहे. हिला उपटसुटी, लहान कावळी, शेत कावळी, शेंबवेल अशीही नावे आहेत.

**उपळी** स्त्री. झरा; पाझर : 'धगीने शरीराला घामाच्या उपळी लागायच्या.' - इंधन २०. पहा : **उपळ** [सं. उत्+प्लु]

**उपळी** स्त्री. गाडीच्या साटीच्या दोन्ही बाजूंना समांतर असणाऱ्या सहा पट्ट्यांपैकी प्रत्येक. (खा.)

**उपळी** स्त्री. पाषाणमय जमीन; दगडी जमीन. पहा : **उपळ** : 'असो हे सोमकांत उपळीं । जेवि द्रविजे चंद्रकळी ।'-ऋ २४. [सं. उत्पल]

**उपज्ञा** स्त्री. मूळचे ज्ञान; उपजत बुद्धी; आद्यज्ञान. [सं.]

**उपंगळीए** क्रिवि. पाठकुळी; मानेच्या मागील बाजूस; पाठीवर : 'मग

उपंगळिए घेऊन गांवातु नेलें.' – वृद्धाचार १९.

**उपंढर** पु. १. दंभ; ढोंग : 'ना ते आनुरागेवीण । उपंढर श्रीचरणध्यान ।' – ज्ञाप्र ४११. २. दंभस्फोट; ढोंगाची उघडकी; अव्यवस्था : 'लोकांपासीं भावार्थ कैचा । आपण जगवावा तयाचा । सेवट उपंढर कोणाचा । पडोचि नये ।।' – दास १९.८.२३.

**उपंढर** वि. उघडे : 'झाकिले तरि उपंढर पडे । दुर्गंधी सुटे जिकडेतिकडे ।।' – दास १५.९.३९.

**उपंढर** वि. पांढरा; निस्तेज; फिका : 'तोहि उपंढरू ऐसा । मज वाटतुसे ।।' – ऋ ८६. [सं. उद्+पंडुर=पांढरा]

**उपाइणे** अक्रि. १. आरंभ होणे; आरंभणे; उत्पादणे; घालणे; जवळ येणे : 'आता उत्तरखंड उपाइलें । ग्रंथाचें ऐका ।।' – ज्ञा १०.४०. २. उत्पन्न होणे; मिळणे; प्राप्त होणे : 'तेचि आमुचे देणें उपाइलें ।' – ज्ञा १०.१३२. ३. विस्तार करणे, पावणे : 'तेंचि येक वेगळालें । येथ चिन्हीं अळंकारलें । सांगिजैल उपाइलें । भेदलेपणें ।।' – ज्ञा १८.६९५. वि. आवडते; उत्कृष्ट. [सं. उप+इ= जवळ जाणे.]

**उपाइ येणे** १. घोडा वगैरे जनावराने पुढील पाय उभारून मागील पायांवर उभे राहणे. २. क्रोधावेशाने दुसऱ्यावर चालून जाणे; निकरावर येणे.

**उपाइल** वि. १. सविस्तर. : 'सांघिजैल उपायिलें । भेदलेपणे ।।' – ज्ञा १८.६९२. २. विस्तृत. [क. उप्पक.]

**उपाइले** वि. १. उत्कृष्ट; आवडते : 'तैसें आत्मसुख उपाइलें । जयासि आपणपेंचि फावलें ।' – ज्ञा ५.१०८. २. प्रशस्त; मोठे.

**उपाकरण, उपाकर्म** न. १. प्रतिवर्षी यज्ञोपवीत धारण करण्याचा विधी; श्रावणी. २. वेदाध्ययनास आरंभ करतेवेळी करायचे कर्म; वेदाध्ययनास आरंभ. ३. साधन; उपक्रम; उपाय : 'त्यांत त्यांचें उपाकरण हें असें कीं त्यायोगानें भाऊरावांची एकेक कळा ग्रासली जात असे.' – भाकोच. [सं.]

**उपाख्यान** न. गोष्टीत गोष्ट; आख्यानांतर्गत उपकथा; दृष्टांतकथा; मोठी गोष्ट सांगताना मध्येच प्रसंगाने सांगायची लहान गोष्ट. [सं.]

**उपाग्रसर** पु. (ग.) प्रमाणात असलेल्या दोन संख्यांपैकी (युग्मापैकी) दुसरी संख्या; पहिलीस अग्रसर म्हणतात.

**उपाट** क्रिवि. तोंडोतोंड; सांडेपर्यंत; वाहण्यासारखे भरलेले पाण्याचे भांडे, संपत्ती. पहा : **उपट** १ [सं. उत्+पत्]

**उपाटणे** अक्रि. अचानक येणे : 'पन गावात कदी नाय ते कालच पोलिस उपाटले.' – शेलूक १०.

**उपाड** न. १. उचल; उचापत; उधार : 'वर्षप्रतिपदेनिमित्त व्यापारी वार होणाऱ्या उपाडाची रीतसर बिलें तयार होऊन .....' – ऐरापु २.४७. (बडोदे) २. खप; विक्री; उठाव (मालाचा) : 'कमी उपाड झाल्यास त्याजबद्दल सरकारांतून नुकसान मिळणार नाही अशी शर्त ठेवावी.' – स्वारीनियम (बडोदे) ९६. [सं.उद्+पत्]

**उपाडा** पु. उच्छेद; पराभव; पाडाव : 'आवडी नावडीचा उपाडा । करूनि निधडा भोजनीं ।।' – एभा ११.९३६. [सं. उत्+पद्]

**उपाणे** न. उखाणा; कोडे.

**उपात्त** वि. गृहीत; मिळविलेला; धरलेला; स्वीकृत; स्वीकारलेले. [सं.]

**उपादान** न. १. ग्रहण; स्वीकार; घेणे; कबूल करणे; मान्य करणे; मान्यता; मंजुरी. २. प्राप्ती; संपादन : 'एथ अविद्यानाशु हें स्थळ । तेणें मोक्षोपादान फळ ।' – ज्ञा १८.१२४३. ३. साक्षात् कारण; समवायीकारण. पहा : **उपादानकारण** (जसे घटास माती) : 'येर आत्मतत्त्व उदासीन । ते ना हेतु ना उपादान ।' – ज्ञा १८.३०६.[सं.]

**उपादानकारण** (तत्त्व.) समवायीकारण; घटक द्रव्य : 'कार्याचे उत्पत्तीस ज्या जड द्रव्याची आवश्कता असते त्यास उपादान कारण म्हणतात. पुस्तकांचे कागद, शाई, दोरा हे; मेजाचे लाकूड खिळे हे, उपादान कारण होय.' – न्यायप २६. [सं.]

**उपादान द्रव्य** न. (तत्त्व.) उपादान कारण; ज्या कारणाचे कार्य बनते असे द्रव्य. [सं.]

**उपादानलक्षणा** स्त्री. ज्या लक्षणेने वाक्यार्थाचा अन्वयबोध व्हावा म्हणून शब्दांच्या मुख्यार्थासह त्या मुख्यार्थाने सूचित केलेला इतर अर्थ ग्रहण करतात तिला उपादान लक्षणा म्हणतात. : 'शोकीं बुडवूं पाहे स्वावासा पर असा परावासा ।' (स्वावासा= आपल्या घरातील मनुष्यास) – मोभीष्म ३.४८; 'तो चमत्कार पाहण्यास पाचशे गाडी लोटली होती.' येथे गाडी या शब्दात त्यातील मनुष्ये अंतर्भूत होतात. [सं.]

**उपादेय** वि. स्वीकार करण्यास योग्य; मान्य करण्यालायक; स्वीकारार्ह; ग्रहणार्ह; ग्रहण करण्यास योग्य : 'सर्वज्ञही जे होती । हेयोपादेयही जाणती ।' – ज्ञा ३.२३३.

**उपाध** स्त्री. संकट; त्रास; पीडा; दु :ख. पहा : **उपाधि** : 'जाणतियां पाठीं लागता उपाध । नेणता तो सिद्ध भोजनासी' – तुगा ३५६. [सं. उपाधि]

**उपाधपण, उपाध्यपण, उपाधीक, उपाद्धीक** न. स्त्री. १. उपाध्यायाची वृत्ती; काम; पौरोहित्य; जोसकी; भिक्षुकी. २. उपाध्यायाला मिळणारी बिदागी, वेतन, प्राप्ती, दक्षिणा. [सं. उपाध्याय]

**उपाधपेठ, उपाधपेठी** वि. १. उपाध्यायास लग्न, मुंज वगैरे प्रसंगी देतात तसे (सणंग, पागोटें वगैरे). २. हलक्या प्रतीचे; कमी किमतीचे; अगदी साधे; क्षुल्लक; टाकाऊ.

**उपाधवंत** वि. स्थूल; उपाधियुक्त. [सं. उपाधिवत्]

**उपाधि–धी** स्त्री. पदवी; किताब; टोपणनाव; अन्वर्थक नाव; विशेषण (आवडीने किंवा उपहासाने दिलेले). [सं.]

**उपाधि–धी** स्त्री. नाराजी : 'विष्णूस्वामिसी एसणी उपाधि काइसी.' – लीच १.३४. [सं.]

**उपाधि–धी** पु. स्त्री. १. पदार्थाच्या स्वरूपात, प्रकृतिधर्मात बदल घडवून आणणारे द्रव्य, वस्तू. उदा. रंगद्रव्याने पाण्यास रंगीत स्वरूप येते. येथे रंगद्रव्य हा उपाधी होय. २. एखाद्या पदार्थापासून विशेष कार्य निर्माण होण्यास कारणीभूत असे काही एक; (सामा.) कारण, उत्पादक, प्रवर्तक, परिणामकारक, कार्यकारक गोष्ट. उदा. अग्नीपासून धूर होतो त्याला आर्द्रेंधनसंयोग उपाधी असे म्हणतात. ३. प्रसंग; कारण; निमित्त; प्रयोजन. ४. विशेष गुणधर्म; गुणविशेष. ५. (वेदांत) जग; माया; बाह्यपाश; संग : 'करिली नावडतेया त्याग । उपाधीचा ।।' – ज्ञा १७.३६२. ६. प्रपंच; संसार : 'जीवु तैसा उपाधि । आवडे लोकां ।।'

– ज्ञा ४.२९. ७.विकार; विचार. ८. त्रास; अडथळा; उपसर्ग; उपद्रव; अडचण; आपत्ती; संकट; भानगड; लिगाड : 'रायाच्या मनीं नव्हतें, पडूं नये उपाधीला ।' – ऐपो ४१०. [सं.]

**उपाधि–धी** स्त्री. चळवळ; खटपट : 'उपाधीसी विस्तारावे । उपाधींत न सांपडावें ।' – दास ११.५.९. [सं.]

**उपाधि–धी** स्त्री. (तत्त्व.) कारणघटक; साध्याच्या व्यापक असूनही साधनाचा अव्यापक असणारा धर्म; जातिभिन्नधर्म. [सं.]

**उपाधि–धी** स्त्री. निकाल; पारिपत्य : 'कमलधीखान व कित्येक मोंगल याचे आप्त दिल्लीकडून बोलावून येकदा उपाधी बरे प्रकारे करावी या विचारात आहेत.' – पेद १०.२३.

**उपाधिक** न.उपाध्येपण; उपाध्येपणाची वृत्ती किंवा वतन : 'त्यावरून कलहवृद्धि होऊन उपाधिक तुम्ही अमानत ठेवले ते येक वर्ष अमानतच राहिले.' – पेठेदभा २.३.

**उपाधिनिरास** पु. उपाधी नाहीशी करणे; विकार नाहीसा होणे. [सं.]

**उपाधिस्थूळ** वि. ऐश्वर्ययुक्त :'परमाणुभव देव ते उपाधिस्थूळ ।' – लीचपू ३७५.

**उपाधीक** वि. (प्र.) औपाधिक. उपाधी असलेले; उपाधीसंबंधी. [सं.उपाधि]

**उपाध्यक्ष** पु. अध्यक्षास मदत करणारी किंवा त्याच्या अनुपस्थितीत त्याचे काम पार पाडणारी व्यक्ती. [सं.]

**उपाध्यक्ष** पु. (राज्य.) (भारताच्या राज्यघटनेप्रमाणे) विधानसभेने आपल्या सदस्यांपैकी निवडून दिलेली व अध्यक्षांच्या अनुपस्थितीत विधानसभेचे संचालन करणारी व्यक्ती.

**उपाध्या, उपाध्याय** पु. पुरोहित; भटजी; भिक्षुक; धार्मिक कृत्य चालविणारा; तीर्थक्षेत्राची स्थळी यात्रा व इतर धर्मकृत्ये यथासांग घडविणारा. जसे : – कुलोपाध्याय, ग्रामोपाध्याय, तीर्थो-पाध्याय : 'सांगे उपाध्या संध्यावंदन ।' – दावि २१. २.(ल.) भामट्या. ३. वेदादी विद्या शिकविणारा; गुरू.[सं. उपाध्याय] (वा.) **(एखाद्या वस्तूस) उपाध्या भेटणे** – वस्तू चोरीला जाणे. **उपाध्याचे सणंग, उपाध्याचे पागोटे** – पहा : **उपाधपेठ**

**उपाध्येपणा** पु. भिक्षुकी; उपाध्यायाची वृत्ती. पहा : **उपाधपण**

**उपानयन** न. घोड्यावर स्वार बसला असता घोड्याने पुढचे दोन्ही पाय वर करणे ही खोडी. [सं.]

**उपानह** पु. पादत्राण; पायतण; जोडा : 'जे कां हृदए उपानहौ सदैवीं । मैळविजति ।।' – ऋ ३५. [सं.]

**उपापणे** क्रि. पहा : **उपणणे**

**उपाय** पु. १. युक्ती; आजार, अडचण, त्रास इ.दूर करण्यासाठी केलेली योजना; इलाज; तजवीज; उपयुक्तक्रिया विनियोग : 'तूंतें करूनि पुढें । जे उपायें घेतली दवडे । तयां ठाकसी बहुवें पाडे । मागांचि तूं ।।' – ज्ञा १७.१२. २. साम, दाम, दंड, भेद यांपैकी प्रत्येक; एखादी गोष्ट मिळविण्याचा मार्ग.

**उपायचतुष्टय** न. साम, दाम, दंड, भेद हे राजनीतीतील चार उपाय. [सं.]

**उपायन** न. १. देणगी; भेट; नजराणा; आहेर; उपहार : 'समर्पिलि उपायनें । राया कृष्णजीतें ।।' – रास १.११९. २. वायन; वाण. [सं.]

**उपाययोजना करणे** सक्रि. तजवीज करणे; एखादी गोष्ट साध्य करण्याच्या दृष्टीने पावले उचलणे; सुरळीत व्हावी म्हणून काळजी घेणे.

**उपायी** वि. उपाय योजणारा; युक्त्या काढण्यात तरबेज; कल्पक बुद्धीचा; युक्तिबाज; प्रयत्न करणारा. [सं. उपाय]

**उपायी** क्रिवि. १. पुढील पाय उचलणे : 'उडी मारून त्याजवर बसते वेळी तो उपायी (दोन पायांवर) उभा राहील.' – अश्वप २२६. २. निकरावर येणे : 'चिनी सरकार विशेष उपायीं न येता सामोपचारानें, शिस्तीने झगडत आहे.' – के १६.४.३०.

**उपायोज** पु. (यंत्र.) मूळ यंत्राला जोडता येणारे भाग. उदा. यंत्रे, हत्यारे, मापक, दर्शक इ.

**उपार** पु. उपाहार; उतारा; देवादिकांना किंवा भूतपिशाचादिकांना तांदूळ, साखर वगैरे अर्पण केलेले पदार्थ. [सं.उप + आहार]

**उपारुण किरण** अवरक्त किरण. या किरणांच्या उपयोगाने पुरातात्त्विक वस्तूंच्या अस्पष्ट बारकाव्यांचे स्पष्ट ज्ञान होऊ शकते.

**उपार्जणे, उपार्जिणे** सक्रि. १. मिळवणे, संपादन करणे : 'जेणें प्रकृतीचें भोगिजे । उपार्जिलें ।।' – ज्ञा ८.३३. २. आर्जव करणे; खुशामत करणे. [सं. उप+अर्ज्]

**उपार्जन** न. संपादन; मिळविणे; प्राप्त करून घेणे : 'जया राज्य द्रव्य करणे उपार्जना । वश दंभमाना इच्छे जाले ।।' – तुगा १०६५. एका गोष्टीची भर दुसऱ्या गोष्टीत करणे. [सं. उप+अर्ज्]

**उपार्जनपट** पु. वृत्तिपत्र; इनामपत्र.

**उपार्जना** स्त्री. १. आर्जव, खुशामत; खुषमस्करी; याचना; नीचसेवा. २. मिळविणे; संपादन करणे. [सं. उप+अर्ज्]

**उपार्जना** स्त्री. द्रव्यार्जन : 'उपार्जनेचा शीणु नेणे बाळु ।' – विसिं १८.१३३.

**उपार्जना करणे** द्रव्यखंडणी किंवा खर्चाला देणे : 'येणें करून सुज्जाअतदौला व पातशहा व रोहिले तुमची उपार्जना करीतील.' – ऐसंसाखं ७.४५.

**उपार्जित** वि. १. संपादलेले; मिळवलेले : 'उत्पन्न झालेले उपार्जित गुण.' – नीतिशास्त्रप्रवेश ३२१. २. जमा झालेले; देय असलेले (उत्पन्न, पैसा इ.). सामा. शब्द – पूर्वोपार्जित, आत्मोपार्जित.

**उपालिंग** न. अनिष्ट दृश्य; भेसूर आकृती : 'रुक्मिणीची पाहुनी सर्वांगे । जरी देवांची बरव सोंगे । तरी तिथें हातातोंडाचीं उपालिंगे । विवसिये सारखीं ।।' – रुस्व १९७. [सं.]

**उपाव** पु. युक्ती; इलाज. पहा : **उपाय** : 'येविषई असे उपावो ।' – विसिंपू २.४८.; 'आतां हें न चलें कांहीं । उपाव सांगतां देही ।।' – ब गाथा ६१३. [सं. उपाय]

**उपाव जाणे** अक्रि. उधळून जाणे; उपाई जाणे : 'नाथाजी लोणार यासी जखमा लागून घोडी बोर उपाव गेली.' – ऐलेसं ८१९०.

**उपावणे** अक्रि. १. पायांच्या टाचा वर करून अंगठ्यावर भार देऊन उभे राहणे; पायाच्या बोटांवर उभे राहणे. २. मागल्या पायावर उभे राहणे (घोड्याने). पहा : **उपाई – यी येणे.**

**उपाशी,उपाशीपोटी, उपाशेपोटी, उपाशीतापाशी, उपाशीवनवाशी** वि. क्रिवि. न जेवलेला; रिकाम्या पोटी; अन्नविरहित; न जेवता; न खाता; अनशवे पोटी: 'हिंदुस्थानची स्थिती कशी आहे हें उपाशीपोटीं आम्हास जितकें समजतें तितकें .. समजणें कठीण आहे.' – लोटिकेले २.३९९. [सं. उप+वस्]

**उपास** पहा : **उपवास** (वा.) **उपासाची चूल करणे** – जेवणाचा स्वयंपाक झाल्यावर निराहाराचे पदार्थ शिजवण्यासाठी सारवून चूल सोवळी करणे. **उपास पडणे** – वेळेवर जेवायला, खायला न मिळणे.

**उपासअनास, उपासतापास** पु. १. उपवासादी व्रतनियम; कडक व्रत. २. (ल.) देहदंडन; कष्ट. [उपास द्वि.] (वा.) **उपासीतापासी बसणे** – काही न खाता राहणे; जिवाचे हाल करून घेणे. **उपासतापास करणे** – काहीही न खाता कडक व्रतें इ. करणे.

**उपासक** पु. उपासना, पूजा करणारा; भक्त; सेवेकरी. [सं.]

**उपासकबंधुत्व** न. उपासकांमधील बंधुभाव : 'त्यांच्यामध्ये उपासकबंधुत्वाची बुद्धी जागृत होते.' – लोटिकेले १.४८७.

**उपासकर, उपासकरी** पु. उपास करणारा.

**उपासणे** सक्रि. उपासना, आराधना करणे; प्रार्थणे; पूजा करणे; सेवा करणे; भक्ती करणे : 'आम्हीं हा स्वधर्मुचि विहिला असे । यातें उपासा मग आपैसे । पुरती काम ।।' – ज्ञा ३.८८. [सं. उप+आस्]

**उपासतान** स्त्री. १. उपास आणि तहान. २. (ल.) कष्ट; देहदंडन. (वा.) **उपासतान काढणे** – अन्नपाण्याशिवाय काळजीने, कष्टाने, दुःखाने दिवस काढणे. **उपासतान पाहणे** – एखाद्याची काळजी वाहणे; त्याच्या अन्नपाण्याची तजवीज करणे.

**उपासन** न. उपासना; पूजा; पूजन; अर्चन; आराधना; होमहवन इत्यादी. पहा : **उपासना** : 'मग उपासन जिहीं आणिलें । योगाग्नीचें ।।' – ज्ञा ४.१२२. [सं.]

**उपासना** स्त्री. १. भक्ती; पूजा; अर्चा; सेवा; आराधना : 'मुख्य उपासनालक्षण । नाना कवित्वलक्षण । नाना चातुर्यलक्षण । बोलिले असे ।' – दास १.१.१०. २. सेवा; नेमधर्म (गुरुमंत्र जपण्याचा इ.). सामा. शब्द – ज्ञानोपासना, कर्मोपासना. ३. उपास्यदैवत : 'उपासना तेथ उभी आहे ।' – रामदासी २.७९. [सं. उप+आस्]

**उपासनाकांड** न. वेदाच्या तीन कांडांपैकी ज्यामध्ये उपासना सांगितली आहे तो भाग; यजुर्वेद. [सं.]

**उपासनानिरूपण** कृत कर्माचे अखेरीला जे देवतेला समर्पण करतात ते.

**उपासनामार्ग** ईश्वरप्राप्तीसाठी चिंतन, ध्यान इत्यादींचे आचरण : 'उपासना मार्गाने जाणाऱ्या भक्तांना भक्तिमार्गी म्हणतात.' – टिसू ३८.

**उपासनायंत्र** ग्रह व देवता यांची उपासनेसाठी धातूवर किंवा कागदावर काढलेली विशिष्ट आकृती : 'नातरी उपासनायंत्र । तैसें दिसे सैन्यसूत्र । भीमकी मध्यपीठ पवित्र । कृष्णक्षेत्र निजबीज ।।' – एरुस्व ६.५५.

**उपासपारणी** धरणी पारणी; उपाशीपोटी.

**उपासपारणे** न. उपास करणे व सोडणे; उपासतापास. (क्रि. करणे, धरणे, मांडणे, लागणे.).

**उपासमर, उपासमार, उपासमारा** स्त्री. पु. १. पुरेसे अन्नपाणी न मिळणे; अन्नावाचून मरणे किंवा मारणे; अन्नान्नदशा. २. अर्धपोटी ठेवणे; कंजूषपणा करणे; एखाद्याला कोणतीही वस्तू पुरेशी न देणे.

**उपासमाजगा, उपासमाजरू** वि. पहा : **उपासमातगा.** उपासमार होत असूनही कामधंदा न करणारा; अन्नान्नदशा असूनही माजलेला. (माण.व.)

**उपासमातगा** वि. अविचारी; प्रत्यक्ष घरात खायला नसल्यामुळे उपासाची पाळी आली असली तरी वरून उद्दामपणाची वागणूक करणारा; कुवत नसताना मुजोरी करणारा; वरून खोटा दिमाख दाखवणारा : 'विचारें करून पाहतां येथील कारभार उपासमातगा आहे.' – पेद २०.१३८.

**उपासंग** पु. बाण ठेवण्याचा भाता; तूणीर; शरधी : 'या सैन्याबरोबर ..... उपासंग .. इ. साधनें होतीं.' – हिंलद २२. [सं.]

**उपासित** वि. ज्याची पूजा, भक्ती, अर्चा इ. केले आहे असा; सेवा केली आहे असा; आदरिलेला; पूजिलेला. [सं.]

**उपासी मरणे** अक्रि. भुकेमुळे व्याकूळ होणे; खायला प्यायला न मिळून मृतप्राय होणे.

**उपास्ति–स्ती** स्त्री. १. उपासना; भक्ती; पूजा; अर्चा; सेवा; आराधना : 'तैसीं दोनही मतें । सूचितीं एका कारणातें । परी उपास्ति ते योग्यते आधीन असे ।।' – ज्ञा ३.४०. [सं. उप+आस्]

**उपास्य** न. ज्याची उपासना करायची ती देवता; आराध्य दैवत. वि. पूजा करण्यास योग्य; पूजनीय. [सं.]

**उपास्यदैवत** न. १. उपासनेची देवता; आराध्यदैवत. २. (ल.) पूज्य व्यक्ती.

**उपाहान** पहा : **उपानह**

**उपाहार** पु. १. फराळ; जेवणातील मुख्य पदार्थांशिवाय इतर पदार्थ; अल्पाहार. २.फराळ करणे. [सं. उप+आहार]

**उपाहारगृह** न. ज्या ठिकाणी खाण्याच्या वस्तू, चहा, कॉफी इ. पेये विकत मिळतात व बसून खाता येतात असे दुकान; हॉटेल. [सं.]

**उपाहारयान** न. आगगाडीतील चहा, खाद्यपदार्थ मिळण्याचा डबा. [सं.]

**उपाहूत** वि. ज्याला आव्हान दिले आहे असा.

**उपाळा** पु. १. उमाळा; उपळी; आवेग; क्षोभ; उकळी : 'फुटली शरिरांत ह्या काम उपाळा । कर शांत नृपाळा ।' – प्रला १२७. २. अश्रू; पाणी. पहा : **उपळ** : 'आम्हांस टाकुन जाशी नृपाळा । पशुपक्षांच्या नेत्रीं उपाळा ।' – प्रला २५९. [सं. उत्+प्लु]

**उपाळिंग** न. गौण शरीरावयव : 'तरि तियें हातातोंडाची उपाळिंगे । विवसीयें सारिखी ।' – रुस्व १९७.

वि. हाताची बोटे झडलेला : ' सासार्जुन तो उपाळिंगु' – लीचउ १४५.

**उपाळी** स्त्री. उपहास; थट्टा; निंदा; चेष्टा; टवाळी; मस्करी.

**उपांग** १. गौण अंग; भाग; लहान अवयव; भेद; प्रकार; शाखा; मोठ्या कार्याला सहायभूत असलेले लहान कार्य; आनुषंगिक विधि : 'मोहरी पांवे मृदंग । डफडीं सनया उपांग । मिरवत जातसे श्रीरंग । नंदयशोदेसहित

पै ।।' – हरि ११.२२२. २. साधन, साहित्य, सामग्री यापैकी गौण वस्तु; (संगीत), साथ; उपसाहित्य : कां गीत रहातां उपांगा । वोहटु पडे ।।' – ज्ञा. १८.१०९३. ३. उपशास्त्र; मुख्य शास्त्राची, विद्येची पुरवणी, जसें : – वेदांचे उपांग, पुराण, न्याय, मीमांसा व धर्मशास्त्र. ४. जोडलेला, अनुबंधी (भाग); अंगभूत, आनुषंगिक (भाग). ५. शरीरावर किंवा अवयवावर वाढलेला गौण किंवा कमी प्रतीचा अवयव. उदा. केस, खवला, काटा इ. [सं.]

**उपांगभूत** वि. आनुषंगिक, जोडून असलेला; घटकावयव असलेला.

**उपांगराग** पु. (संगीत) मूळचा जो राग असेल त्याच्या स्वरांमध्ये थोडा बदल करून तयार होणारा त्या रागाचा पोटभेद. [सं.]

**उपांगललिता** स्त्री. आश्विन शुद्ध पंचमीला (ललितापंचमीला) पुजायची एक देवता : 'बाळंभट तिमाजीपंत यांचे घरास आले तो त्याचे घरौ उपांग – ललिता होती.' – ऐसंसाखं ४.६८.

**उपांगवियोग** पु. एखाद्या वस्तूचे भाग निरनिराळे करणे, मोकळे करणे, उलगडणे; पृथक्करण. [सं.]

**उपांत** पु. १. शीव; किनारा; काठ; कड; शेवट. २. डोळ्याचा कोपरा; अपांग. [सं.]

**उपांत, उपांतिक** वि. जवळचा; शेजारचा; शेवटाजवळील; काठावरचा. [सं.]

**उपांतराल** न. १. मुख्य किंवा मोठ्या अवकाशातील खंड; अंतराळाचा एक भाग. २. (शिक्षण.) मोठ्या सुट्टीशिवाय असणारी अल्पकालीन छोटी सुट्टी. [सं.]

**उपांतिम, उपांत्य** वि. शेवटचे असेल त्याच्या जवळचे; अखेरीच्या अलीकडचे; उपांत्य (वर्ण, स्वर) : 'अंतिम तो अंतिम, तो उपांतिम होऊ शकत नाहीं.' – लोटिकेले ३.२४८. [सं.]

**उपांशु–शू** क्रिवि. हळू; हलक्या आवाजात; शब्द बाहेर न उमटता. [सं.]

**उपिकणे** अक्रि. अविकणे; पिकून अधिक होणे; वाजवीपेक्षा अधिक पक्व होणे. [सं. उत्+पच्]

**उपिट, उप्पिट्टु** न. १. फोडणीचे लाह्याचे पीठ. २. तिखटमिठाचा सांजा. [क. उप्पु=मीठ+इट्टु=पीठ]

**उपिठणे** अक्रि. आर्द्रता कमी झाल्यामुळे किंवा सारखे भाजले न गेल्यामुळे भाकरी वगैरेस भेगा पडणे; पिठुळणे. [सं. उत्+पिष्ट]

**उपीठ** वि. उपिठलेली (भाकरी, खापरपोळी इ.) [सं. उत्+पिष्ट]

**उपीत घेणे, उपीत पिणे** अक्रि. १. उच्छृंखळपणे, अविचाराने वागणे. २. अतिशय घाईत असणे. [सं. उत्+पत्]

**उपीवणे** अक्रि. गुप्त होणे; नाहीसे होणे. (व.) [सं. उत्+पत्]

**उपेखणे** पहा : **उपेक्षणे** : 'तरि कैसें तिये वरि स्वामियान । उपेखुनु बोलिलें ।' – ख्रिपु २.३६.३७. २. (सक्रि.) दुर्लक्षित करणे, हयगय करणे, चालढकल करणे.

**उपेखा** पु. उपेक्षा; हयगय : 'परि उपेखया जाति वायाणी । तुजवीण देवा ।।' – राज्ञा १०.१४५. [सं. उपेक्षा]

**उपेग** पु. १. उपयोग; प्रयोजन; जरुरी; गरज; फळ : 'एथ एकचि उपेगा जाये । परमामृत ।।' – ज्ञा २.६७. २. उपकार.

**उपेगा, उपेगी** वि. उपयोगी, कामाचा : 'येन्हवीं परादिका चौघी । जीव मोक्षाच्या उपेगीं ।' – अमृ ३.२. (वा.) **उपेगा येणे, उपेगा जाणे** – उपयोगी पडणे : 'येथें येतां न भागा त्वरित हरजगा तीर्थ आले उपेगा ।' – ब ६८७.

**उपेड** वि. जेथून दूरवरचे दृश्य दिसेल अशी उंचावर असलेली; उंचाड; उंचवट (जमीन). (राजा.)[सं. उत्+पीठ]

**उपेणे** न. १. वस्ती; वास; विश्रांतिस्थान; राहण्याची जागा; : 'नाना रुची केली उपेणी । कीं पाचि प्रभेची वाणी ।' – ऋ ८३; 'स्वर्गा करौनि उपेणें । मागिजे सुखाचें केणें ।' – शिव. ८५८. २. जवळ जाणे, येणे : 'उपेणें करितां कुसुमाकरां । झाडें वेधेति शृंगारा । तेथ कोकिळांचे पांति दर्दुरा । केवि लाभे ।।' – ऋ ५२. [सं. उप+इ]

**उपेत** वि. जवळ गेलेला. [सं. उप+इत]

**उपेता** पु. पाक्षिक वायदा : 'प्रामिसरी नोट आज एकदा ९५८६ रू. पर्यंत गडगडली. उपेता उर्फ नवा पाक्षिक वायदा तर ९५८२ पर्यंत पडला.' – के २७.१.३८.

**उपेय** वि. उपायाने प्राप्त करून घेण्यासारखी; साध्य (गोष्ट) : 'म्हणौनि उपेयही हातीं । जालया उपायस्थिती ।' – ज्ञा १८.१२४५.

**उपेक्षक** वि. उपेक्षा, अव्हेर; दुर्लक्ष, टाळाटाळी करणारा.

**उपेक्षणीय, उपेक्ष्य** वि. उपेक्षा करण्यास योग्य; कानाडोळा करण्यासारखा; लक्ष न देण्यासारखा. [सं.]

**उपेक्षणे** उक्रि. १. उपेक्षा करणे; दुर्लक्ष करणे; हेळसांड करणे; अव्हेर करणे : 'जेवीं नव्हे या बुद्धी उपेक्षिला ।' – ज्ञा १०.१६१. २.खिजगणतीत नसणे; त्याग करणे; सोडणे : 'उपेक्षू नको गूणवंता अनंता । रघूनायका मागणें हेचि आतां ।' – राक. [सं. उप+ईक्ष्]

**उपेक्षा** स्त्री. १. अनास्था; हयगय; दुर्लक्ष; अनादर; अव्हेर : 'किंवा उपेक्षेवरी । वाळुनि सांडिले ।।' – ज्ञा १८.१५४२. २. चालढकल; कानाडोळा; डोळेझाक (गुन्ह्याकडे, दोषांकडे). ३. त्याग; सोडणे. [सं. उप+ईक्ष्]

**उपेक्षित** वि. दुर्लक्षित; उपेक्षा केलेला; वाईट वागणूक देण्यात आलेला; अव्हेरलेला; त्याग केलेला. [सं.]

**उपेंद्र** पु. इंद्राचा धाकटा भाऊ; विष्णू : 'उपेक्षिसी तूं मज कां उपेंद्रा ।' – सारुह १.९. [सं.]

**उपेंद्र** न. उत्पन्न : 'येथील प्रासादाचें वास्तुशांतीचें उपेंद्र आम्ही गुंजवणेकर पुरोहित यांनी शके १५८५ मध्यें घेतलें आहे.' – ऐसंसा १.३०.

**उपेंद्रवज्रा** स्त्री. एक समचरण वृत.

**उपैणे** न. वसति; मुक्काम :'माझेया आग्रहकारणें । जाणदृष्टी केलें उपैणें ।' – रुम ६७८.

**उपैणे** अक्रि. प्रयाण करणे; नाहीसे होणे. [क. पयन]

**उपोत्पादन** पु. एका मुख्य वस्तूचे उत्पादन करीत असता वाया जाणाऱ्या वस्तूपासून जी दुसरी वस्तू निर्माण होते ती; उपफल; आडउत्पन्न. [सं.]

**उपोद्घात** पु. १. आरंभ; सुरुवात; प्रस्तावना. २. परिचय; विषयप्रवेश. ३. (न्याय.) ग्रंथातील प्रतिपाद्य विषयाला अनुरूप असे ग्रंथ–प्रकरण

नाम; अवतरणप्राय ग्रंथांश. ४. उदाहरण; दृष्टांत; खुलासा. ५. पृथक्करण; विवरण; स्पष्टीकरण; तत्त्वशोधन. [सं.]

**उपोद्बलक** वि. सबळ; दुजोरा देणारा : 'ढेन्यांच्या प्रतिपादनाला हा उपोद्बलक पुरावा आहे.' – लोक्षि (प्र) १६.

**उपोद्बलन** न. मंजूर करणे, मंजुरी.

**उपोषण** न. उपास; उपवास; निराहार; निरशन. [सं. उप+वस्]

**उपोषणमंडळ** न. (ख्रि.) पुनरुत्थानाच्या सणाच्यापूर्वी करायचे चाळीस दिवसांचे उपोषण; लेन्ट या सॅक्सन शब्दाचा पर्याय. लॅन्ट म्हणजे वसंत. हे उपवास वसंतात येतात म्हणून यांना वसंतोपवास असेही म्हणतात : 'उपोषणमंडळाचा आरंभ ॲशवेन्स्डे (राखेचा बुधवार) या दिवशी होतो.' – उमं ५.

**उपोषित** वि. १. उपवास केलेला. २. उपाशी. [सं. उप+उषित]

**उपौढणे** अक्रि. जागा होणे; उठणे : 'तो ध्वनी आइकोनि श्रवणिं । देओ उपौढले ।' – वह ३११.

**उप्तरणे** अक्रि. फुगणे; सुजणे; उतणे. पहा : **उबतरणे** (व.)

**उप्पट** स्त्री. चपराक; थप्पड : 'माझ्या एका हाताची उप्पट खाऊन दाखवा.' – आआशे १८१.

**उप्परमाडी** स्त्री. दुसरा वरचा मजला; दुमजली घर; पहा : **उपरमाडी** : 'ईश्वर त्याची मस्ती मोडी, आता कैसीं उप्परमाडी ।' – अमृत ५२.

**उप्पीठ** न. आंबट सांजा; उपमा; तिखटमिठाचा सांजा. (तंजा.)

**उप्पुपिंडी** पहा : **उप्पीठ** [तेलुगु].

**उप्रांतिक** क्रिवि. यानंतर; यापुढे : 'उप्रांतिक तीर्थरूपांसमागमें स्वार होऊन आपले भेटीस राजपुरीं येऊन विदित जाले पाहिजे.' – पेद ३.९५. [सं. उपर+अंतिक]

**उफका, उफखा** पु. नाश. पहा : **उपखा**

**उफका** स्त्री. उपेक्षा : 'उफकेन जो रिगे । तो नागवला' – राज्ञा १३.५८२.

**उफखणे, उफगणे** अक्रि. रिकामा होणे; रिक्त होणे; संकोच पावणे : 'आणि फुंके भाता फुगे । रेचलिया सवेंचि उफगे ।' – ज्ञा १३.६६५. पहा : **उपखणे** [सं. उप+क्षि]

**उफणणे** अक्रि. उतणे : 'सिरेवर बिबवा घातला. गुण तरी आला नाही. परंतु उफहून दुःख अधिक जाले.' – नाग १.२६७.

**उफट** वि. १. निस्तेज; फिकट; फिक्का (रक्तनाशामुळे). २. रोगट; आजारी. [सं. उत्+स्फट = तुटी]

**उफटणे, उफडणे, उफंडणे** अक्रि. (आजारामुळे किंवा काळजीने) फिके पडणे; निस्तेज होणे; पांढरे पडणे.

**उफणणे** उक्रि. उपणणे; तूस वगैरे वेगळे करण्यासाठी घडवंचीवरून धान्य हळूहळू खाली ओतणे; वारवणे; वाऱ्याने भूस उडवणे; पाखडणे. [सं. उत्+पवन]

**उफणणे** अक्रि. १. जोराने वर येणे; वाढणे (पीक, झाड, मूल वगैरे). २. उतणे; अंगावर उठणे (पुरळ, फोड, बिबा, शेर, ज्वर, वस्तरा इ. उठणे, उतणे). ३. कुजणे; नासणे (फळे वगैरे); आंबणे; फुटणे (दूध वगैरे). ४. फुगणे; ताठणे (गर्वाने). ५. उपटणे; तोडणे : 'नमोजी स्वच्छंदा सकल भवबंधा उफणिता ।।' – वामन (व्याधाख्यान) २३. पहा : **उपणणे** [सं. उत्पन्न]

**उफर, उफरा** पु. बाज; बार; बहर; पीक (वृक्ष, लता, शेत इत्यादींना येणारा). (राजा. कु.)[सं.उत्+भृ]

**उफर, उफरा** पु. उपणणे; वारवणे. [सं. उपरि]

**उफरणे** उक्रि. उपणणे; वारवणे; वाढवणे. (राजा. कु.)

**उफराटणे, उफरांडणे** अक्रि. १ उलटे होणे; उलटे करणे; अंग, तोंड विरुद्ध दिशेला फिरणे; उरफाटे होणे; उलट बाजूला जाणे; विपरीत होणे. २. डोळे चढले जाणे, फिरणे (मृत्यूपूर्वी किंवा बेशुद्धीने). डोळे या शब्दाबरोबर किंवा नुसता प्रयोग.

सक्रि. उफराटा, उलटासुलटा करणे; वरचे अंग खाली व खालचे वर असे करणे. (धक्का इत्यादीने). [सं. उत्+परावृत्]

**उफराटा** वि. क्रिवि. १.उलटा; विपरीत; जगावेगळा; परावृत्त; मागे; विरुद्ध : 'अहा कटकटा हें बोखटें । इये मृत्युलोकींचे उफराटें ।' – ज्ञा ९.५१५. २. (ल.) चुकीचा. ३. उलट; प्रत्युत्तरदर्शक : 'बरवेपणें मोठी । होतें लक्ष्मीचें पोटीं । कृष्ण देखोनियां दृष्टी । तेही उफराटी लाजली ।।' – एरुस्व १.७३. [सं. उत्+परावृत्]

**उफराटसुफराट** वि. उलटा सुलटा; वरील बाजू खाली व खालील बाजू वर असा; आतील बाजू बाहेर व बाहेरील बाजू आत असा; पुढील बाजू मागे व मागील बाजू पुढे असा; व्यस्त; व्युत्क्रम [सं. उत्+परावृत्त; सु+परावृत्त]

**उफराटा न्याय** विचित्र, विपरीत न्याय; अन्याय.

**उफराटी गंगा** १. उलट दिशेने वाहणारी गंगा. संसाररहाटी, माया यास उपमा देतात : 'उफराटीगंगा पाहतां मिळणें । सकळांस तेथें ।।' – दास ११.७.११. २. योग्य, तर्कोचित घटनेच्या विरुद्ध विपरीत गोष्ट होणे.

**उफराटी दुनिया** उलटे जग; अव्यवस्था; बेबंदशाही; अनिर्बंधता; अन्यायाचरण; विपरीत स्थिती.

**उफराटी बाहुली** अगदी डोळ्यांजवळ धरल्याशिवाय दिसत नाही अशी दृष्टी; अधुदृष्टी; मंददृष्टी; दूरचे दिसत नाही अशी नजर.

**उफराटे भांडण** कृतघ्नतेचे भांडण; उपकार विसरून केलेले भांडण; अन्यायाचे भांडण; उपकार, प्रेम करणाऱ्याशी वितुष्ट.

**उफराटे शहाणपण** मूर्खपणा.

**उफराट्या, उलट्याकाळजाचा** वि. निष्ठुर; निर्दय; कृतघ्न; अति धाडसी; अविचारी (मनुष्य).

**उफलणे** अक्रि. १. फुलणे; विकासणे; उमलणे : 'फट्टदिशी त्याचे भाग्य उफलायचे.' – माजी ७१. २.(ल.) उघडणे; विस्तीर्ण होणे; उलणे. ३. पाझर फुटणे; द्रव येणे (हृदयाला). ४. उदयाला येणे; उघडणे; अनुकूल होणे (दैव). [सं.उत्+फल्]

**उफळणे** अक्रि. १. वर उडणे; जोराने जाणे; उसळणे; वर जाणे : 'जो अंबरीं उफळता खुर लागलाहे ।' – नळ ३१. २. नांगरणे; फाळाने उकरली जाणे (जमीन). पहा : **उपळणे** [सं. उत्+फल्]

**उफा** स्त्री. अफवा; वदंता; ऐकीव बातमी; आवई. (व.)[फा. अफवा]

**उफाट** वि. १. स्पष्ट; फटफटीत : 'त्याची सून अगदीं उफाट गोरी आहे हो.' – खेस्व ६०. २. वाजवीपेक्षा जास्त. [सं.उत्+स्पष्ट]

**उफाट, उफाड, उफाडा** पु.१. जोर; वेग; शीघ्रगती : 'उफाड जोड करीतु । पांचविशें धारे वावडतु ।' – शिव ५३४; 'ते व्याधीचिया उफाडा । देतां सत्कथा काढा ।।' – एभा १०.१५. २. उत्साह. [क. उबटे] [सं. उत्+फल्]

**उफाट्टे** वि. पहा : **उफराटा** (गो.)

पु. जोर; आवेग.

**उफाडणे** अक्रि. त्वेषाने वर येणे; उडणे; उफळणे :'व्याघ्र निज छायेसि उफाडे ।।' – विसिंपू ७.४६.

**उफाडाचे (बल)** जोराचे; आवेगाचे; शक्तीचे : 'खान जानवाचे व खासियाचे उफाडाचे बल कललेच आहे.' – पुरंदभा १.२१०.

**उफाड्याचा** वि.१. लवकर वाढणारा; जोराचा. २. भरदार; सुदृढ बांध्याचा; दणकट; फार सशक्त (वृक्ष, मनुष्य, पीक, मूळ इ.) :'कशी उफाड्याची पोर आहे ती.' – मोर ११.

**उफाड्याची जमीन, शेत** लवकर व जोरदार पीक येणारे शेत.

**उफाड्याचे हाड** सशक्त, जोराने वाढणारे शरीर.

**उफाड्याने वाढणे, वाढीला येणे** अक्रि. लवकर, जोराने वाढणे.

**उफाणणे** अक्रि. सुजणे. पहा : **उफणणे**

**उफाणा, उफान** पु. न. १. उकळी; कढ; ऊत. (क्रि. येणे.) २. उतू जाणे; कढ वर येणे. (क्रि. जाणे.)

वि. उधळ्या. [सं. उत् + पर्वन्]

**उफाणेगिरी, उफानगिरी** स्त्री. १. चंगळ; चैन; समृद्धी; गडगंज. २.(ल.) उधळपट्टी; उधळेपणा; एखादी गोष्ट वाजवीपेक्षा जास्त असणे; ऊत येणे.

**उफार** पु. १. उपाहार; फराळ. (गो.). २. नैवेद्याचे अन्न :'टांके चौदा उपभोगासी उफारासी.' – म. शिला १.६. [सं. उप+आहार]

**उफारशेट्या** पु. कृतघ्न; उपकारकर्त्यावर उलटणारा, मित्रावर उलटणारा मनुष्य.

**उफाल** पहा : **उफाळ** :'बेहडे यांस उफाल ऐवज राहील तो तुम्ही रदकर्जी घेत जाणें.' – समारो ३.१६४.

**उफालग** वि.फालतू; जरूर नसलेला.

**उफावणे** अक्रि. वर येणे :'ईश्वरकृपेनें तो पाषाण कमरेपासून सुटला त्याचे योगानें वर उफावला.' –स्त्रीच २.११३. [सं. उत्+ स्फाल्]

**उफाळ, उफाळा** पु. १. उकळी; ऊत; उत्साह; जोर; आवेश. पहा :**उफाड** :'पुण्याच्या पुण्यप्रदेशांत उफाळ्याला आलेला तो एरंड ..' – इंप ८९. २. एकदम वर येणे; जोराने उठणे; जोराने बाहेर येणे; उसळी; ऊत (पाणी वगैरेंना). (क्रि. निघणे, येणे) :'नंदाचे मूल काळें । त्यांसि नेलें काळें । कोण्हीयेका काळे । चालिलें उफाळें ।।' – दावि २४१. ३. शिल्लक; वाढ.

**उफाळ, उफाळा** वि. अधिक; वाजवीपेक्षा जास्त; पुरून उरलेले; शिलकी ठेवलेले. [सं. उत्+फल्]

**उफाळणे** अक्रि. पहा : **उफळणे** १. उकळी येणे; ऊत येणे. २. वर येणे; वर चढणे (जाळ वगैरे) :'केला जरि पोत बळेंचि खालें । ज्वाला तरी ते वरती उफाळे ।' – वामन. ३. उसळणे; वर उडणे (पाणी वगैरे) :'कोठें गुप्त कोठें प्रगटे । जैसे जीवन उफाळे आटे ।' – दास ९.८.२७. ४. गर्वाने फुगणे, ताठणे. ५. फार वाढणे; वाजवीपेक्षा जास्त होणे. ६. नांगरणे; उकरणे. ७. उधळणे; धावणे :'जैसा सिंह उफाळला हिमगिरीच्या गव्हरापासुनी ।' – आसी ६३. ८. जोर करणे; चाळवणे :'पावसाळा आला की त्यांचा दमा उफाळतो.' – आपा ६०. ९. भडकणे; संतापणे :'रामसिंगाला पाहताच राजे उफाळले.' – श्रीयो १.४८४.

**उफाळणे** पहा : **उपणणे**

**उफिटणे** पहा : **उपिठणे**

**उफेणणे, उफिणणे** अक्रि. अधिक होणे; कुजणे; नासणे; अविकणे (फळ वगैरे) पहा : **उफणणे** [को.]

**उफेवणे, उफेणे** अक्रि. वर येणे (पाण्यातून); पृष्ठभागावर येणे; तरंगणे; उसळणे. पहा : **उफणणे.** [गो.कु. राजा.]

**उबग** पु. १.वांती; ओकारी; उमळ. २. (ल.) उमाळा; दुःखाचा आवेग; दयेचा पाझर; कीव. [सं. उत्+पच्]

**उबग** पु. कंटाळा; त्रास; वीट; उद्वेग :'भागलिया आला उबग सहज । न धरितां काज आलें मनीं ।' – तुगा १८५५. [क.उब्बेग]

**उबगट** पहा : **उबट**

**उबगणे** अक्रि. गुदमरणे; दरदरून घाम येणे; गदमदणे; उष्णता व गर्दी यामुळे घाबरणे; गदगदणे. [क.उब्बे=उष्णता, वाफ]

**उबगणे** अक्रि. कंटाळणे; त्रासणे; वीट येणे; ओकारी येणे :'एथ अर्जुन म्हणे कट कटा । उबगिलों मागिल्या संकटा ।' – ज्ञा ११.४५२. उक्रि. १. उपेक्षा करणे; तिरस्कार करणे; हयगय,आबाळ, हेळसांड करणे :'उणे किमपि भाविका उबगशील तूं देव कां ।' – केका २०. २. टाकणे; त्याग करणे :'मग उबगून विषयांसी ।' – पांप्र ५.२७१.

**उबगवटु** पु. कंटाळा; त्रास.

**उबगवाणा** वि. तिटकारा येईल असा; कंटाळवाणा; दुःखदायक.

**उबजणे** पहा : **उमजणे**

**उबजणे** पहा : **उभरणे** (व.)

**उबजणे** अक्रि. (क्व.) भातावर आधण घालून त्याचे उबजे करणे. पहा : **उबजा**

**उबजणे** अक्रि. तापणे. [सं. उत् + तप ]

**उबजरणे** अक्रि. क्षीण झालेली शक्ती पुन्हा येणे; तजेला येणे; पुनरुज्जीवन होणे; नवीन उत्साह धारण करणे; टवटवीत होणे (प्राणी, बनस्पती). [सं. उत्+जृ]

**उबजरा** पु. टवटवी; ताकद; उत्साह परत येणे. (क्रि. येणे, आणणे.). (वा.) **उबजऱ्यास येणे** पुनरुज्जीवन होणे :'त्येच्यात बघा, लहान पोरगं उबजऱ्याला इना. दिवसंदिवस खंगत चाललंय तें.' – बाब ३.

**उबजळणे** अक्रि. कंटाळणे; त्रासणे; वीट येणे :'उबजळली बाळा । गेली सवतीच्या माहेरां ।' [सं. उत्+ज्वल्]

**उबजळा** पु. कंटाळा; त्रास; वीट; कंटाळणे; डोके उठणे; त्रासणे. (क्रि. देणे,आणणे, लावणे, लागणे.).

**उबजा** पु. उकड्या तांदूळ; भातावर आधण घालून ते भात खापरात भाजून

निववून कांडलेला तांदूळ. [क. उब्बे=उष्णता, वाफ]

**उबजे** न. उबजे करण्यासाठी आधणाचे पाणी घालून ठेवलेले भात.

**उबट** वि. १.किंचित उष्ण; कोंबट. २. घाण; दुर्गंधी येणारा (अर्धवट कुजल्यामुळे धान्य वगैरे पदार्थ). ३. चांगले जून होण्यापूर्वी पिकवल्यामुळे नासलेले (फळ वगैरे). [क. उब्बे=उष्णता]

**उबटणे** अक्रि. १.नासणे; कुजणे; बुरसणे व त्यामुळे दुर्गंधीयुक्त होणे (फळे वगैरे). २. जून होण्यापूर्वी पिकवल्यामुळे खराब होणे. ३. पिकण्यापूर्वी नासणे (फळ वगैरे); उबट होणे. [क. उब्बे]

**उबटाण, उबठाण, उबसाण** स्त्री. १. कुजलेल्या वस्तूंची दुर्गंधी. २. ओलसर, उष्ण व बंद जागेला येणारी दुर्गंधी.

**उबड** वि. अमाप; भरपूर : 'अधर्माचे उबड पीक । धर्म रंक त्या गावीं ।' – तुगा १.७९२.

**उबडण** न. निर्माण होणे; उगम; आरंभ. [सं. उद्भवन]

**उबडणे** अक्रि. १. उद्‌भवणे; उत्पन्न होणे : 'कीं उबडला देखौनि सोच्यु । काळवंडैला ।।' – ऋ ४०७. २. प्रकाशणे : 'जयाचे उजियेडें । तारागण उबडें ।' – ज्ञा १३.९२७. [सं. उद्भवन]

**उबडणे** सक्रि. उपडे करणे; पालथे करणे; सांडणे : 'यशोदा मायबाई । कृष्णाला या सांग कांहीं । गवळ्याच्या राधिकेचं । टाके उबडूनि दहीं ।।' – वलो. [सं. उत्पतन]

**उबडणे** उक्रि. नाश करणे; नाश पावणे; नाहीसे करणे; घालविणे.

**उबडणे** अक्रि. विरमणे; घालवणे; नाश होणे, करणे : 'दोरीचे अज्ञान तरी गेलें । सर्पबुद्धीसि ही उबडले । परी भयकंपादि राहिले । संस्कारें भले दृढ असती ।।' – रंयोवा ९.२३६.

**उबडहांडी** पहा : **उपडहंडी १** (ना.)

**उबडा** वि. उपडा; पालथा; अधोमुख : 'तैसें विषयांचेनि कोडे । जेणें परत्रा केलें उबडें ।' – ज्ञा १६.४५२.

**उबणे** अक्रि. १. उकाडा होणे; तापणे; गरम असणे, होणे; उष्णता पावणे. २. गुदमरणे; गदमदणे; कोंडल्यासारखे वाटणे; खतखतणे. ३. (ल.) त्रासणे; अस्वस्थ होणे. ४. उष्णता व ओलसरपणा यामुळे खराब होणे; कुजणे; नासणे (फळे वगैरे). ५. कुबटणे; उबटणे; बुरसणे (धान्य वगैरे); उबेने विकृत होणे. ६. पिकणे; पुवळणे (गळू वगैरे). ७. निर्णय न घेता तसेच ठेवणे. [का. उब्बे] (वा.) **उबत ठेवणे** – पिकण्यासाठी उबेत ठेवणे; वाफवून देणे (तंबाखू, गळू वगैरेंना).

**उबणे** अक्रि.थांबणे; ओसरणे; उघडणे (पाऊस वगैरे). (को.) (प्र.) पहा : **उभणे**

**उबदरणे** अक्रि. १. गुदमरणे; गदमदणे. २. (ल.) त्रास, हाल सोसणे. ३.(गळू वगैरे) पिकणे. ४. ऊब येणे. [क. उब्बे]

**उबदार** वि. गरम; उष्ण; ऊब असलेले, उष्णता उत्पन्न करणारे (कापड वगैरे). [का. उब्बे]

**उबदारणे** अक्रि. सुकू लागणे; गरम होणे : 'माळावर वाळू पडलेले गवत सूर्याच्या पहिल्या किरणांनी उबदारले.' – बन २.

**उबदारी** स्त्री. भरभराट : 'जो जो आबाकडून पैसा घेऊन गेला ..... तो कधीच उबदारीला आला नव्हता.' – मिरास २४४.

**उबर,उबार** पु. अब्रू; प्रतिष्ठा; लौकिक; कीर्ती; वजन; उबार : '.... राजश्री साहेब व सरकारकून तुमचा उबर राहणार नाहींत, म्हणोन दबावीत.' – पुरंदभा ३.१३७.

**उबर,उबार** पु. आधार; दम; सामर्थ्य; हिंमत; अवसान; बाकी : 'सेरीकर बहुत जबून जाले आहेत. कांहीं उबर राहिला नाही.' – पेद ३१.१३; 'खासगीच्या महालांत उपद्रव दिला म्हणजे उबार राहणार नाही.' – पेद २०.४३.

**उबरणे** अक्रि (खरूज, जखम, गळू वगैरेतून) पाणी बाहेर येणे; उतणे, पुरळ बाहेर पडणे; चिघळणे; वाहणे; पिकणे; वाहायला लागणे; पूर्ण फूलणे (देवी, गोवर इ.); दाठरणे.

**उबरणे** अक्रि. आकाराला येणे; वाढणे; वर व्यवस्थित दिसू लागणे (मुडी इ.). [सं. उद्+भृ–भर]

**उबरा** पु. ओढ्याच्या किंवा नदीच्या काठी पाण्यासाठी खणलेला झरा. (को.) [सं. उद्+भृ]

**उबरा** वि. जो पदार्थ खाल्ला असताना अंगावरील जखमेत पू वाढतो, जखम उबरते असा (पावटा, भोपळा वगैरे पदार्थ). (राजा.)

**उबलक, उबलख, उबलंग** वि. क्रिवि. १. असंख्य; मुबलक; फार समृद्ध. २. बेहिशेबी, बेअंदाजी; मोघम. ३. अनिश्चितपणे; मोघमपणे. ४. (सौदा, किंमत इ.) पक्का न ठरवता.

**उबलणे** अक्रि. अस्वस्थ होणे; गलबलणे : 'तिचा जीव उबलून आला.' – पेरणी ५१.

**उबली** स्त्री. दरवाजावर असलेली छावणी; दरवाजातील कोनाडा; वस्तू ठेवण्यासाठी दरवाजावर मारलेली फळी; दारूस्ती. (कु.) [सं. उंबर]

**उबले** न. दाराची चौकट; दरवाजा. (कु.)[सं. उंबर]

**उबवण** न. आंबे वगैरेंची आढी घालण्याकरिता वापरण्यात येणारे गवत. (कु.) [का. उब्बे]

**उबवण** स्त्री. (पशु.) अंड्यांना, त्यांची लवकर वाढ व्हावी म्हणून उष्णता–उब देणे; बॅक्टेरिया, इतर रोगबीजे, गर्भ इत्यादींची उबवणपात्रात वाढ करण्यासाठी त्यांना उष्णता पुरवणे.

**उबवणपात्र** न. (पशु.) अंडी, बॅक्टेरिया इत्यादींची वाढ करण्यासाठी वापरले जाणारे विशिष्ट प्रकारचे पात्र.

**उबवणी केंद्र** मोठ्या प्रमाणावर कृत्रिम रीतीने अंडी उबवण्याचे केंद्र.

**उबवणे, उबविणे, उबावणे** सक्रि. १. ऊब देणे; उष्णता देणे. २. गुदमरविणे; गदमदविणे. ३. उष्णता देऊन पिकवणे (आंबे आढीत घालून वगैरे). ४. उष्णता देऊन वाढविणे (अंडी वगैरे). ५. पिकविणे (गळू वगैरे).

अक्रि. पहा : **उबणे** [का. उब्बे]

**उबवणे** क्रि. सतावणे; त्रासविणे; उबगविणे.

**उबवरा** वि. पुरेशी ऊब न जिरल्यामुळे चिवट, चबचबीत झालेला (भात, खिचडी). [का. उब्बे]

**उबवले** न. अतिशय उष्मा होत असलेली, हवा येत नाही अशी बंद जागा. [का. उब्बल]

**उबशी** वि. दमेकरी. (गो.)

**उबस** स्त्री. दमा. (गो.)[क. उब्बस = दमा]
**उबसळ** स्त्री. भांड्यांना झिलई देण्याचे गोल रंध्यासारखे हत्यार.
**उबसाण** स्त्री. उबट किंवा कुजट घाण; उबटाण.
**उबळ** स्त्री. आवेग; खोकल्याची उसळी; ढास : 'प्रत्येक खोकल्याची उबळ येण्यापूर्वी मुलास सूचना होऊन तें आईकडे पळते.' – गृहवैद्य ४४. [क. उब्बळ]
**उबळणे** अक्रि. १. अतिशय उष्णतेमुळे (फळ वगैरे) कुजणे, नासणे. २. गर्भ नासणे, गर्भपात होणे. [क. उब्बे]
**उबा** स्त्री. उष्णता; ऊब. पहा : **ऊन** : 'तेवीचि वन्हित्व आंगी । आणि उबे उबगणे आगी ।' – ज्ञा १८.२२०. [का. उब्बे]
**उबागळी** स्त्री. समृद्धी; रेलचेल; आधिक्य. (व.)
**उबागी** कु. ताठा; गर्व : 'तुम्हां चढलासे उबागी । हरिदास गाय रंगीं ॥' – बगाथा ६११. पहा : **उबगणे** [क. उब्बु = सुजणे, फुगणे]
**उबाणा** पु. खटाटोप; परिश्रम : 'कामाचा उबाणा फार झाला.' – जनाबाई (नित्यपाठ) २. (व.) [क. उब्बण]
**उबार** स्त्री. (जमाखर्च) रोजखर्ड्यावर पूर्वदिवशी निघालेली शिल्लक दुसऱ्या दिवशी जमा धरतात ती; हातातील शिल्लक.
वि. १. फाजील; जास्त; अधिक. (व.)२. बाकी; उधारी. ३. हातातील शिलकेसंबंधी.
**उबार** वि. उंच. (गो.)[सं. उपरि]
**उबार** पु. १. विश्वास : 'स्वामीनीं आज्ञापत्रीं लेखन केलें होते कीं, याजपासीं बोलावयास कोन्हाचा उबार न धरणें.' – पेद २६.२०६. २. पर्वा; किंमत: 'मज्यालसीचाही उबार राहिला नाही.' – आंपव्य ३३.
**उबार** अब्रू; प्रतिष्ठा.
**उबारडेंग** वि. ऐतोबा; फुकट्या; आयतोबा; ऐतखाऊ; उनाड; भटक्या. (ना.) [सं. उद् + भृ]
**उबारणे** सक्रि. १. उबवणे (अंडी वगैरे). २. पिकविणे; अढी लावणे (फळे वगैरेंची).
अक्रि. १. उष्णता व आर्द्रता यांच्या योगाने नासणे; कुजणे (फळे किंवा इतर पदार्थ). २. उष्मा होणे; गदमदणे : 'ग्रीष्मकाळ दाखवी उष्णा । उबारोनि माझिया प्राणा । कासावीस करीतसे ॥' – मुआदि ४८.७५. ३. खरूज; जखम, पुटकुळ्या वगैरेंतून पू वाहणे; फोड इ. टरटरून फुगणे. [क. उब्बे]
**उबारणे** उक्रि. पहा : **उभारणे**. १. आकारात आणणे; तयार करणे (वाफा वगैरे). (राजा. कु.) २. अस्ताव्यस्त करणे (केस किंवा काही वस्तू). (राजा. कु.) ३. (प्र.) उभारणे; शिवायच्या कपड्याचे भाग एकत्र करून दोरा घालणे. [सं. उद्+भृ]
**उबारा** पु. १. उष्णता; ऊब; उष्मा; उन्हाळा; उकाडा : 'तंव येरीकडे धनुर्धरा । आसनाचा उबारा ।' – ज्ञा ६.२२१. २. (ल.) संपत्ती; द्रव्य; मालमत्ता. ३. (ल.) पराक्रम; तेज : 'तो माझेआं भुजांचा उबारा । कांई साहिल ॥' – शिव ८९३. ४. (सामा.) पहा : **ऊब**. ५. (ल.) आश्रय : 'मातें तुझाचि उबारा ।' – रामदासी २.१७२. [सं. उष्मतर]
**उबारा** पु. आधिक्य; समृद्धी : 'जैसा कस्तूरियेचा निकरा । तेथें परिमळाचा उबारा ।' – विसिंपू ७.१०६. [सं. उद्+भृ]
**उबारा** स्त्री. रोजगुदस्त हातची शिल्लक.
वि. १. जास्तीची, आवश्यकतेहून अधिकची असलेली. २. उधारी; येणे रक्कम.
**उबारी** स्त्री. उंचवटा. (गो.)[सं. उपरि]
**उबाल, उबाळा, उंबाळ** न. पु. पसारा; विस्तार; फोफावणे; अतिशय दाट माजणे (तण, झाडझुडूप) : 'महामोहाचे उंबाळ ।' – भाए ३०७. [क. उब्बर = आधिक्य, फुगणे, माजणे]
**उबावणे** अक्रि. १. उकाडा होणे; उष्मा होणे; गदमदणे. २. उष्णतेने किंवा उबेने नासणे, कुजणे (फळे वगैरे). [क. उब्बे]
**उबाळ** पु. स्त्री. १. उन्हाळा. (गो.) २. आकाशाची अभ्राच्छादित स्थिती. पहा : **उबाळा** [क. उब्बे]
**उबाळ** स्त्री. ढास. पहा : **खोकल्याची उबळ**
**उबाळणे** अक्रि. १. उकळणे; शिजणे. २. उष्णतेने नासणे, कुजणे (फळे वगैरे). [क. उब्बे]
**उबाळा** पु. १. हवेतील उष्णता; उष्मा; गर्मी. २. उन्हाळा. [क. उब्बे]
**उबाळा** पु. १.पाण्याचा कढ, ऊत, उकळी. (क्रि. येणे). २. उमाळा; आवेग (सुख,दुःख, करुणा इ.) (क्रि. येणे) ३. जाळ, ज्वाळा उठणे, उसळणे (विस्तवाची)(व.) : 'उठती वन्हीचे उबाळे ।' – दास १६.६.८. [क. उब्बु = वर उडणे, फुगणे]
**उबाळा** पु. १. भांड्याच्या बुडाला आकार देण्याचे हत्यार. हे जमिनीत उभे पुरून त्याच्या माथ्यावर भांडे ठेवून हातोड्याने ठोकतात. २. (सोनारी धंदा) आंगठी, जोडवे वगैरेंना वाटोळा आकार देण्याचे हत्यार. (को.)
**उबाळी** स्त्री. अंगठी, जोडवे यांना गोल आकार देण्यासाठी ज्या दांड्यावर ठोकतात, तो दांडा.
**उबाळू न.** उन्हाळ्यात उष्णतेमुळे होणारे गळू, बेंड.
**उबीन** स्त्री. (सोनारी धंदा) चांदी.
**उबीर** पु. बांधकामाकरिता किंवा गिलाव्याकरिता केलेला चिखल. (गो.) [सं. उद्+भृ]
**उबूर** पु. पार करणे; तरून जाणे. [फा.]
**उबेजणे, उबेणे** अक्रि. उबणे; उकडू लागणे : 'अथवा पक्वानें भुकेलिं । गंगेसि तृशा उपजलि । काइ चंद्रकळा उबेजली । व्यजनाते इच्छिल ॥' – रास ५.८०८. [क. उब्बे]
**उबेणे** वि. उत्स्फूर्त : 'शास्त्राधारू की उबेणे?' – लीचपू २१०.
**उबो** वि. १. उभा. (गो.) २. (ल.) उभे गंध लावणारा (वैष्णव). [सं. ऊर्ध्व]
**उब्या** पु. विस्तव; जाळ. (व.) [क. उब्बे]
**उब्हत** स्त्री. वैभव; मोठेपणा; थोरवी. [फा.]
**उब्हतमंझिलत** वि. वैभवसंपन्न. [फा.]
**उभ** वि उभय; दोघे. [सं. उभय]
**उभ** स्त्री. उभारणी; उत्पत्ती. [सं. ऊर्ध्व किंवा सं. उद्भव]
**उभउभ्या** क्रिवि. उभाउभी; ताबडतोब; तत्काळ : 'अविश्वासें कवळिल्या

चित्ता । अभिमानें म्हणे मी साता । तेव्हा उभउभ्या पळे अस्तिकता । देखे नास्तिकता सर्वत्र ।।' – एभा २३.३१०. [उभचे द्वि.]

**उभक** न. बैल किंवा रेडा ज्याभोवती फिरतो ते रहाटगाडग्याचे उभे लाकूड. (को.) [स. ऊर्ध्व+काष्ठ]

**उभकुडी** स्त्री. पांढरी माती पाण्यात कालवून तिने भिंतीला दिलेले सारवण.

**उभगात** न. खाटेच्या चौकटीची जी दोन उभी गाते (लाकडे) त्यापैकी प्रत्येक. याच्या उलट आडगात.

**उभजणे** अक्रि. कंटाळणे; त्रासणे; खेद पावणे : 'तैं सुविद्यता तोखे । उभजेहीना ।।' – ज्ञा १४.३२९. [क. उब्बकिसु] [सं. उद्+भज्]

**उभट, उभंड** वि. १. उभा. २. उंच; उंचवट (भांडे, पगडी); रुंदीच्या मानाने उंची अधिक असणारा (चेहरा, भांडे इ.). ३. उभ्या अंगाचा; उंचेला; उभ्या ठेवणीचा. ४. उभड; वर; स्पष्ट; जाहीर : 'उभंड निंदा धरिली मुखीं ।' – दावि १६४.

**उभड, उभडा, उभंड** पु. १. उमाळा; उसळी; उबळ; ढास; गहिवर; आवेग : 'त्याचेनि दुःखे उभड आला ।' – मुबन ८.८१. २. खालून वर उसळणारा प्रवाह (पाणी, रक्त इत्यादीचा); झरा; लोट; पूर : 'जैसा प्रळयांबूचा उभडु ।' – ज्ञा १६.१३८; 'पहिलिया संकल्पजळाचा उभडा ।' – ज्ञा ७.६९.

**उभडणे** अक्रि. १. उत्पन्न होणे; प्रादुर्भाव होणे. २. उमाळा; पूर येणे; उसळी येणे; वाढणे : 'देहीं शीतकळा उभडे । कां उष्णता अत्यंत चढे ।' – एभा २८.५९९.

**उभणी, उभनी** स्त्री. उभार; उभारणी; प्रसंग; हकीगत; बनाव : 'तन्हीं आइकतु रसाळ । उभणी ते ।' – शिव ७६०; 'तेयां भीतरी उभनी गोमटी ।' – शिव ५६९.

**उभणे** उक्रि. १. उभारणे. उभारले जाणे; रचणे; रचले जाणे; तयार होणे; करणे : 'तेव्हेंळी मायाभूमिकेचेनि पसारे । उभिली लिंगदेहांचीं धवळारें ।' – शिव. ९३. [सं. उद्+भवन्]

**उभणे** अक्रि. थांबणे; ओसरणे (पाऊस वगैरे); बंद पडणे; खळणे.

**उभय** वि. १. दोघे; दोन; द्वय; दुक्कल; जोडी; जुळे.याचा उत्तरपदाशी समास होतो. उदा. उभयब्राम्हण (दोन जे ब्राम्हण); दोन स्वामी ज्याचे तो उभयस्वामिक, उभयसत्ताक इ. २. ज्या वर्गात दोन गोष्टी असतात किंवा दोनच व्यक्ती, पदार्थ इत्यादीसंबंधी विधान असते तेथे त्या दोनही अभिप्रेत असता वापरायचा शब्द : 'एका उभएगंगातीर तैसें । तांबा जाळीं जळत दिसे ।' – सव ४४४.

**उभयकुल** न. विवाहसंबंधाने जोडलेली दोन्ही कुले; माहेर व सासर.

**उभयखुरी, उभयमुखी** वि. गाय विताना वासरू बाहेर पडतेवेळी दोन्ही बाजूंना दोन (गाईचे व वासराचे) खूर किंवा तोंडे दिसतात म्हणून त्या स्थितीत असलेली (गाय) : 'तंव पुढें देखे कामधेनु । उभयखुरी प्रसवतां अर्धक्षणु । राहिला तेथें ।।' – कथा ३.६.८३.

**उभयगामी** वि. दोन्ही दिशांकडे, बाजूंकडे जाणारा.

**उभयचर** वि. जलस्थलवासी; पाण्यात व जमिनीवर किंवा हवेत राहणारा (प्राणी). [सं.]

**उभयतः** क्रिवि. दोहीकडे; दोन्ही बाजूंनी; दोहोंकडून. [सं.]

**उभयतः पाशरज्जू** (ल.) दोन्ही बाजूंनी येणारी अडचण; इकडे नई इकडे वई अशी स्थिती; शृंगापत्ती. (सामा.) पेच; पंचाईत.

**उभयता** सना. दोघेजण; दोन्ही; उभय; द्वय. [सं. उभयतः]

**उभयतोमुख** वि. दोन्ही दिशांनी पाहणारा; द्विमुखी; दोन दर्शनी बाजू असलेला; दुतोंड्या. [सं.]

**उभयतोमुखी** स्त्री. १. पहा : **उभयखुरी.** २. दोन प्रवाहांनी वाहणारी नदी, झरा. [सं.]

**उभयतोवाही–वाहिनी** वि. दोन प्रवाहांनी वाहणारा (प्रवाह, नदी). [सं.]

**उभयत्र** क्रिवि. दोन्ही बाजूंनी; दोन्ही ठिकाणी; दोन्हीकडे; इकडे आणि तिकडे. [सं.]

**उभयदर्शी** वि. दोन्ही बाजू पाहणारा, लक्षात घेणारा, दोन्ही बाजूंचा विचार करणारा. [सं.]

**उभयद्वारे** न. शरीराची मलमूत्रोत्सर्गाची दोन गुह्यद्वारे.

**उभयधर्मी** वि. दोन्ही प्रकारचे गुणधर्म एकाच ठिकाणी असणारा. [सं.]

**उभयनिष्ठ** वि. दोन्ही बाजूंविषयी प्रेम, अगत्य असणारा; दोन्ही पक्षांना सांभाळणारा.

**उभयपण** न. द्वैत; द्वयत्व.

**उभयपराङ्मुख** वि. दोहोंपैकी कोणतीही गोष्ट न स्वीकारणारा; दुराग्रही; हट्टी. [सं.]

**उभयपक्ष** पु. दोन्ही बाजू, पक्ष, तट.

क्रिवि. दोहोकडे; दोहीकडे; इह आणि परलोक : 'तयांसी लाभे प्रत्यक्ष । महा आनंद उभयपक्ष ।' – गुच ५१.६५.

**उभयपक्षीसमान** वि. १. दोन्ही बाजूंनी, दोन्ही दृष्टींनी सारखा; दोहो बाजूंना चालण्यासारखा; दोन्ही बाजूसंबंधी अगत्य बाळगणारा. २. निःपक्षपाती; पूर्वग्रहविरहित; निःस्पृह; निर्विकल्प. ३. दुतोंड्या; वेळ पाहून वागणारा; दोन्ही डगरीवर हात ठेवणारा; सव्यसाची.

**उभयलिंगी** पु. स्त्री–पुरुष दोन्ही लिंगी प्राणी, वनस्पती; स्त्रीकेसर – पुंकेसरयुक्त पुष्प; विरुद्धगुणयुक्त पुरुष.

वि. १. ज्या प्राण्यांत, वनस्पतीत, जातीत स्त्री व पुरुष जननेंद्रिये एकाच शरीरात असतात असे (प्राणी, वनस्पती). २. हिजडा; षंढ.

**उभयलोक** पु. स्वर्गलोक व मृत्युलोक; इहपर लोक : 'जेणें करितां उभयलोक । संतुष्ट होती ।।' – दास ११.३.२.

**उभयविकल्प** पु. दोन पर्याय (हा अथवा तो).

**उभयविध** वि. १. दोन प्रकारचा, दोन तऱ्हांचा, दोन स्वभावांचा वगैरे. २. (ल.) स्त्री – पुरुषयुक्त. पहा : **उभयलिंगी** ३. सकर्मक व अकर्मक दोन्ही जातींचे (क्रियापद). ४. दुतोंड्या; आत–बाहेर वेगळे असणारा; दोन्ही डगरींवर हात ठेवणारा; एकनिष्ठ नसणारा. [सं.]

**उभयशौच** न. मन व शरीर या दोहोंची शुद्धी : 'गृहस्थें व्हावया निष्पाप । ठाके तो करावा जपतप । उभयशौचांचे स्वरूप । अति साटोप करावें ।।' – एभा १८.३१८. [सं.]

**उभयसाधारण, उभयसामान्य** पहा : **उभयपक्षी समान**

**उभयस्वामिक, उभयसत्ताक** वि. दोन धनी असलेला; दोघांच्या सत्तेखाली असलेला. [सं.]

**उभयग्र** पहा : **एकस्पर्शरिषा गाठबिंदु**

**उभयान्वयी** वि. १. दोघांना जोडणारा; दोन्ही बाजूंचा; उभयपक्षनिष्ठ; दोन्ही पक्षांशी संबंध ठेवणारा; दुतोंड्या :'उत्तर हिंदुस्थानातले उपद्‌व्यापी ... संस्थानिक, कर्नल हस्करासारखे त्यांचे हस्तक व प्रो. रशब्रुक वुल्यम्ससारखे उभयान्वयी स्वार्थसाधक त्यांचे स्तोम माजणार कसें?' – केसासं २.१९३. [सं.]

**उभयान्वयी अव्यय** (व्या.) दोन शब्द किंवा वाक्ये जोडणारा शब्द. उदा. आणि, व, जर, तर, परंतु इ.

**उभयान्वित** वि. १. दोन्ही बाजूंनी जोडलेला; दोन्ही बाजूंशी संबंध असलेला. २. पहा : **उभयान्वयी अव्यय** [सं.]

**उभयार्थ** वि. १. दोन अर्थ होतात असा; द्व्यर्थी; दोन तऱ्हांनी लावता येईल असे :'हे बोलणें खग मनीं उभयार्थ लेखी ।' – नळ १२२. २. (ल.) अनिश्चितार्थ; संशयितार्थ; दुटप्पी; दुरोखी (वचन, भाषण). [सं.]

**उभयालंकार** पु. (सास.) मिश्र अलंकार; शब्दालंकार आणि अर्थालंकार यांचे मिश्रण :'शृंगार, शृंगालय केसरी हो । सांगा अनंगा नटकेसरी हो। कासे विकासे पट केसरी हो । श्रीशंकली पंकजकेसरी हो ।।' – वामन. [सं.]

**उभयां** क्रिवि. उभाउभी; उभा असतानाच, उभ्याउभ्या :'एकां उभयांचि प्राण गेले ।' – ज्ञा १.१३५. (वा.) **उभयां घालणे** – उभ्याने अंग टाकणे :'तैसेचि आपणयातें उभयां घातलें.' – लीचउ २१६.

**उभरण** पहा : **उभवण**

**उभरणी** पहा : **उभणी, उभारणी,उभवणी.**

**उभरणे** उक्रि. १. उफणणे; पाखडणे; वारवणे. २. उतणे (बिब्बा वगैरे). (व.) ३. (धान्य, वाळू वगैरे) ओतणे; रिकामे करणे. [सं. ]

**उभरंग** पु. फिक्का, फिकट रंग; अस्पष्ट, विटलेला रंग.
वि. फिकट रंगाचे; विटलेले; विटलेल्या रंगाचे (वस्त्र).

**उभरा** वि. फिक्का; फिकट; विटलेला.

**उभरा चाप** (स्था.) बाहेरच्या बाजूने गोलाकार व उंच असलेली कमान.

**उभराभरी, उभराउभरी** स्त्री. (भरीवर भर) गर्दी; दाटी; लांबलचक यादी; रांग; पंक्ती :'आतां काय करूं या वरि । रिगैन परमेश्वरांचा मंधिरीं । दोषांची उच्चारीन उभराभरि ।सासर्दोती फुडां ।।' – ख्रिपु २.३७.६४. (वा.) **उभराभर करणे –** उभारणे; गोळा करणे :'मीं गावां जाइन : उभराभरि करिन. ' – लीचउ २५६.

**उभरिणे** सक्रि. उभे करणे; थांबवणे.

**उभला, उभले** पु. उंबरठा; उंबरा; दारवंठा :'वाणसियेचें उभलें । कोण न रिगे ।।' – ज्ञा १३.७०१. पहा : **उंबरा**

**उभवट** स्त्री. उभारणी; बांधा; ठेवण :'म्हणे धाकटी उभवट माझी नवी तरणी माती ।' – पला ७६.

**उभवण** न. पाऊस निवारण करण्याचे साधन; छत्री, इरले .

**उभवण** स्त्री. उभारणे; उभे करणे.

**उभवण, उभवीण** स्त्री. (विणकाम) ताणा; उभेदोरे.

**उभवणी** स्त्री. १. उभारणी; उठावणी; रचना; स्थापना; बांधणी. पहा : **उभणी** :'जेवीं का नटाची रावोराणी । दोघें खेळती लटिकेपणीं । तेवीं प्रकृतिपुरुषउगवणी । मिथ्यापणी जो जाणे ।।' – एभा ११.२७. २. (ल.) (दारिद्र्य, आजार वगैरे पासून) मुक्तता; ऊर्जितावस्था; वर डोके काढणे; उठणे; उठवणे; पायावर उभे करणे. ३. धंदा, व्यापार वगैरेंची स्थापना, उभारणी. ४. पसारा; ज्याची उभारी केली आहे ती वस्तू, गोष्ट :'असो हे उभवणी मायामय । जेणे रचिली ।।' – विसिंपू ४.७९.

**उभवणे, उभविणे** सक्रि. १. उभारणे; उभे करणे; रचणे; स्थापन करणे :'गगनावरी उभवावें । घडें केवीं ।।' – ज्ञा १०.१२; 'मठ मंडप उभविले ।' – मुआदि २७.५२. २. थांबविणे; उभे करून ठेवणे. ३. पाऊस थांबेपर्यंत आश्रय घेणे; थांबणे; पर्जन्य टाळणे. ४. उपयोगानंतर उभे करणे, जागेवर ठेवणे (जाते वगैरे). ५. विस्कटणे; उभे करणे; विखुरणे (केस वगैरे). [सं. ऊर्ध्व+भू – भवन]

**उभवणे** अक्रि. १. उभे राहणे; उभे करणे; ताठ, सरळ होणे; स्थापित होणे; रचले जाणे :'वाळूवाळूत कुणीतरी उभवून ठेवल्यासारखे घोळके ....' – गणूराया १. २.(ल.) आजारातून उठणे; गरिबीतून किंवा अज्ञात स्थितीतून वर येणे; स्वतःच्या पायावर उभे राहणे. ३. बंद होणे; थांबणे (पाऊस). [सं. ऊर्ध्व]

**उभविता** वि. उभवणी, उभारणी करणारा :'यांचा प्रभु तोचि उभविला तनया ।' – मोमंभा २.२६. दारिद्र्यापासून, आजारापासून सोडविणारा; ऊर्जितावस्थेस आणणारा.

**उभसिंग** वि. उभ्या शिंगाचे :'चवरियांचे पाडे उभसिंग :' – रुस्व ७४५.

**उभस्वना** स्त्री. निर्भर्त्सना; चारचौघांत फटफजिती; उपहास. (को.) [सं. उद्+भर्त्सन]

**उभळ** स्त्री. कोंड्यातून सुपाने पाखडून वेगळी काढलेली कणी. [सं. उद्+भल्ल्]

**उभळ, उभळी** स्त्री. १. खोकल्याची ढास. पहा : **उबळ** :'उभळीचा उजगारा । उबगु सेजारिल्या घरा ।।' – एभा ९.२७०. [क. उम्मलु]. २. तीव्र उत्कंठा; उत्सुकता; उतावळी.

**उभळण** स्त्री. उबळ.

**उभळणे** अक्रि. १. सुपाने कोंडा वगैरेतून कणी वेगळी करणे; पाखडणे. २. नवीन जात्यात थोडे दळून ते चालू करणे व ते कसे चालते ते पाहणे; जात्यातील घास काढून टाकणे. [सं. उद्+भल्ल्]

**उभळणे** अक्रि. उकळणे (मद्य वगैरे). [क. उब्बे]

**उभळणे** अक्रि. उत्कंठित, अधीर, उतावीळ होणे. (राजा.)

**उभळा** वि. उभारलेला.

**उभंड** पहा : **उभट, उभड**

**उभा** वि. १. ताठ; खडा; आडवा नसलेला; न वाकलेला; न बसलेला. २. सरळ दिशेत असलेला; लांबीच्या अनुषंगाने सरळ रेषेत असणारा (रस्ता). याच्या उलट आडवा (रस्ता). ३. चालू; सुरू असलेला (धंदा वगैरे). ४. न कापलेले; शेतात उभे असलेले (पीक वगैरे). ५. तयार; उत्सुक; पुढे आलेला सिद्ध. ६.सतत; अढळ; जागृत; पक्का; तीव्र (द्वेष, दावा वगैरे). ७. संपूर्ण; सर्व; अथपासून इतिपर्यंत (संवत्सर, साल, वर्ष वगैरे). ८. सारखा चालू असलेला; खळ न पडणारा; फार वेळ टिकणारा; अविरत (पाऊस, वारा वगैरे). ९. सरळ धारा पडत आहेत

असा (पाऊस). १०. थेट समोरून येणारा, तोंडावर येणारा; विरुद्ध दिशेकडून येणारा (वारा वगैरे). ११. गती नसलेला; थांबलेला; स्थिर. [सं. ऊर्ध्व] (वा.) **उभा करणे** – पुन्हा सुरुवात करणे, नव्याने आरंभ करणे (काम, धंदा वगैरे). **उभा खाणे** – फायलावर घेणे; हजेरी घेणे :'तातुल्याच्या हाताला गावतो तर मला उभा खाता.' – पक्षिणी १०. **उभा जाळणे** – अत्यंत हाल करणे; अतिशय त्रास देणे; छळणे. **उभा ठाकणे** – १. उत्पन्न होणे; समोर येणे :'संगतीच्या लोकांचा भोग । उभा ठेला ।।' – दास १२.९.२४. २. (एखादे काम करायला) तयार होणे :'थोडासा प्रतिकार झाला तरी त्यांचे सहर्ष स्वागत करून मारामारीला उभं ठाकणं ...' – एल्गार ७. **उभा ठेवणे** – पहा : **उभा करणे. उभा नासणे** – सर्व नाश होणे; तात्काळ नासणे :'जे शब्दी वदोनी उभा । संसारनासी ।।' – दास १.२.९. **उभा धरणे** – निर्बंधात ठेवणे; कडक शिस्तीत वागविणे; जाचणूक करणे; त्रास देणे; (धनकोने रिणकोस, मुलाने आईस वगैरे). **उभा राहणे** – १. मिळणे; प्राप्त होणे; लाभणे (फायदा, नफा वगैरे); परत मिळविणे; वसूल होणे; संपादन करणे. २. घडणे; जवळ येणे; निकट येणे (एखादी गोष्ट किंवा कृत्य); प्राप्त होणे; आवश्यक होणे. ३. साहाय्य करण्यास पुढे येणे; तयार होणे; सिद्ध होणे :'बहुत जन वास पाहे । वेळेसी तत्काळ उभा राहे ।' – दास १९.४.११. ४. एखाद्या संकटातून वर येणे; नशीब काढणे. ५. पोटात गोळा उभा राहणे; संकट येणे; उपस्थित होणे. ६. आड येणे; अडचण, प्रतिबंध होणे; पुढे येणे. ७. उत्पन्न होणे; मिळणे; प्राप्त होणे (किंमत वगैरे) :'या मालाचे रुपये पाच हजार उभे राहिले की, माझे वडील भाग्योदय मानतील.' – विवि १०.५.१९७. ८. अनुकूल होणे :'उभे राहिलें भाग्य बिभीषणाचे ।' – राक १.७१. ९. थांबून राहणे. १०. निवडणुकीत उमेदवार म्हणून नाव देणे.

**उभाईत** वि. दोघांच्या मालकीचा. पहा : **उभागत** (को.)[सं. उभयता]

**उभाउभी** क्रिवि. त्वरेने; घाईघाईने; लवकर; तात्काळ; झटपट; वेगाने: 'उभाउभी फळ । अंगी मंत्राचिया बळ ।।' – तुगा २४७२. [उभाचे द्वि.]

**उभा करणे** सक्रि. १. थांबविणे; थांबवून ठेवणे; गती बंद करणे; स्तब्ध करणे. २. बंद करणे; तात्पुरता थांबविणे; काही काळ थोपविणे (धंदा, काम वगैरे). ३. रचणे; उभारणे; तयार करणे. ४. (बायकी) धुताना लांब वस्त्र एका पदरापासून दुसऱ्या पदरापर्यंत सारखे करून घेणे. ५. उत्पन्न करणे; आणणे :'शिवाजी महाराजांच्या नेत्रातून देखील अश्रू उभे केले.' – इंप १०६. ६. आडवी पडलेली वस्तू लंब रेषेत काटकोनात ठेवणे. ७. गोळा करणे; मिळविणे.

**उभा झडपा, सूळ** सरळ लंब रेषेत असलेला डोंगराचा कडा, सुळका.

**उभा खो खो** एक भारतीय खेळ.

**उभागत** वि. समाईक; वाटण्या न केलेले; दोन मालकांचे (शेतातील उभे पीक इ.) पहा : **उभाईत**

**उभा छेद** (शाप.) एखादी वस्तू उभी (ओळंब्यात) वरपासून खालपर्यंत कापली असताना दिसणारे दृश्य.

**उभाट, उभाड** वि. उंच; उंच बांध्याचा (मनुष्य वगैरे); सरळ, वर वाढणारे. व पसरणारे (झाड वगैरे) :'महाभूतांचे एकावट । सैरा वेंटाळु उभाट ।' – राज्ञा १३.४६.

**उभाट्या** पहा : **उभेट्या**

**उभाड, उभाडांग, उभाड्याचा, उभाटा** वि. वयाच्या मानाने अधिक उंच; उफाड्याचा; विशेष वाढ झालेला; जोमदार; चांगला तयार, सशक्त (मुलगा, झाड इ.).

**उभा दावा** हाडवैर; अक्षय, कायमचे वैर.

**उभा दांडा** १. उभा, सरळ खांब. २.(ल.) सरळ व्यवहार; सरळ वर्तन; युक्तीचे, कुशलतेचे वर्तन.

**उभा दोरा** धावदोरा; कच्ची शिवण.

**उभा नाहणे** अक्रि. सर्वांगावरून ओघळणे; पाझरणे; निथळणे (घाम, रक्त वगैरे).

**उभा पाऊस** मोठा, सरळ धारांनी पडणारा पाऊस; न खळणारा पाऊस.

**उभा पाहारा** १. खडा पाहारा; अत्यंत काळजीपूर्वक, डोळ्यांत तेल घालून केलेली राखण. २. सारखे उभे राहणे; बसायला फुरसत न मिळणे; एकसारखे कष्ट; विश्रांतीचा अभाव :'दिवसभऱ्याच्या उभ्या पहाऱ्यात अंग भरून येऊन रात्रीं मेलं केव्हां एकदा आडवी होईन असं होऊन गेलं, – नाट्यछटा (फाटक) २. ३.(ल.) एकसारखी केलेली चाकरी, सेवा; एखाद्या आजाऱ्याची एकसारखी केलेली शुश्रूषा.

**उभा बाजार** १. या टोकापासून त्या टोकापर्यंत सर्व बाजार; सगळी बाजारपेठ. २. भरबाजार; बाजाराचा मध्यभाग, चव्हाटा.

**उभा मार्ग** १. राजरस्ता; सार्वजनिक रस्ता; रहदारीचा रस्ता; मोठा रस्ता; हमरस्ता. २. या टोकापासून त्या टोकापर्यंत सर्व, सगळा रस्ता. ३. सरळ रस्ता; आडवा नसलेला, वाकडातिकडा नसलेला रस्ता. ४. (ल.) सरळ प्रामाणिक वर्तन, व्यवहार. (वा.) **उभ्या मार्गाने जाणे, येणे** – सरळ मार्गाने, न थांबता जाणे; वाकडेतिकडे न जाणे.

**उभा माल** तयार झालेले पण न कापलेले शेतातील पीक.

**उभार** स्त्री.१. उंची; उभट, उंचट, उभ्या आकाराचा; डौल (पात्र, पागोटे इ.चा). २. उभारणी; रचना :'ब्रम्हांड पिंडउभार । पिंडब्रम्हांड संव्हार ।' –दास १२५.१४. ३. बायकांच्या चोळीचे पुढील दोन तुकडे.

पु. १. उत्साह. २. गर्व; ताठा.

वि. १. उंच, वर आलेले, भरलेले :'उभार छाती तरतरित । सुरूप गुणाने अशी जी कांता ती पाणी करते झरझरित ।' – प्रला १६८. २. आडवे नसलेले; सरळ; उंचवट (पात्र, पागोटे इ.). [सं. उद्+भृ]

**उभार** पु. १. उबार; ऊर; पुरेसा होऊन अधिक राहिलेला; अवशिष्ट पदार्थ. २. घोड्याच्या तोबऱ्यातील घोड्याने खाऊन उरलेले दाणे; चारण्याच्या दाण्यातून पुढे दुसऱ्या वेळी चारण्यासाठी काढून ठेवतात ते दाणे. पहा : **उबार**

**उभार** पु. उभा धागा.

**उभारक** पु. (यंत्र.) यंत्रसामग्री व तत्सम बांधकामाची उभारणी करणारी व्यक्ती, यंत्र इ.

**उभारणी** स्त्री. १. मांडणी; रचना; बांधणी; पसारा; विस्तार. पहा : **उभवणी.** २. उभे राहण्याची क्रिया.

**उभारणी** स्त्री. घटना; हकीगत; प्रसंग इ.

**उभारणी** स्त्री. उसाचा रस कढविताना त्याला येणारी उकळी. [सं. उद्+भृ]

(वा.) **उभारणीस येणे** – तयार होण्यापर्यंत पोचणे; सिद्ध होण्याच्या अवस्थेस येणे.

**उभारणी** स्त्री. तयारी; इच्छा :'आपल्या मुखचर्येवरून तर आपली देण्याची उभारणी दिसते.' – मंजु ३१.

**उभारणी कारागीर** (स्था.) इमारतीचे बांधकाम करणारा, उभारणी करणारा मजूर, कारागीर.

**उभारणी मोगर** (यंत्र.) ठोकून गट्ट करण्यासाठी वापरात येणारा हातोडा.

**उभारणी यंत्र** (यंत्र.) ठोकून गट्ट करण्याचे यांत्रिक साधन.

**उभारणे** उक्रि. १. उभे करणे; रचणे; स्थापन करणे; सरळ लंबरेषेत बसविणे :'परि महाभूतांचे दळवाडें । उभारी भलें ।।' – ज्ञा ५.७८. २. चालू करणे; सुरू करणे; गती देणे (धंदा, काम वगैरे); स्थापना करणे :'लॉर्ड रेडिंग यांनीं लष्करी कोर्टें उभारण्याची चुकी केली.' – के १०.६.३०. ३. वर आणणे; ऊर्जितावस्थेस आणणे; पुढे आणणे (व्यापार, धंदा). ४. प्रवृत्त करणे; पुढे करणे. ५. वर उचलणे; उंची वाढविणे (ठेंगण्या वस्तूची किंवा इमारतीची). ६. उत्पन्न करणे; कल्पिणे; मनाशी बांधणे (तर्क, कल्पना, पद्धती वगैरे) :'म्हणुनि तर्क उभारिती कामिनी ।'. ७. एखादे शिवायचे वस्त्र तुकडे जोडून व धावदोरा घालून एकत्र करणे; कच्चे काम करणे; एखादा सांगाडा तात्पुरता रचणे. अक्रि. १. उठणे; उभे राहणे; ताठ, खडा, सरळ होणे :'पालवितो करीं उभारूनि बाहे । कृपावंता पाहे मजकडे ।'. २. उभे राहणे; सरळ होणे (केस वगैरे). ३. वर येणे; उठणे; उत्पन्न होणे; बाहेर पडणे (पुळी, गळू वगैरे) :'तो तसा गिळितसा न उभारे ।' – गजेंद्र मोक्ष (रघुनाथ पंडित) ३७.

**उभारणे** सक्रि. (अर्थ.) १. एखादी कंपनी, संस्था, उपक्रम सुरू करणे. २. नवीन कंपनीसाठी लागणारे भांडवल उभारण्यासाठी कर्जरोखे किंवा भाग विक्रीस काढणे.

**उभारत** क्रिवि. १. समायिक मालमत्ता, भांडवल, मालकीची वस्तू वगैरेंचे निरनिराळे मालकीचे विशिष्ट भाग प्रत्यक्ष न पाहता एकत्रित रीतीने. २. अनिर्णित; विचार चालू असताना; शेवटास गेले नसताना; निकालात न निघता. ३. सामान्यत; विशिष्ट व्यक्तीस उद्देशून नसलेले; सर्वसाधारण (भाषण). ४. पक्का ठरलेला नसताना (पगार वगैरे); दोन्ही बाजूंनी निश्चितपणे मान्य केलेली नसताना (किंमत, अट वगैरे); नक्की न तोलता; अमोज; अमाप (धान्य वगैरे). पहा : **उभाईत**

**उभारतपणा** पु. निःपक्षपातीपणा; निःस्पृहता.

**उभारा** पु. १. उभारणी; रचना; विस्तार; मांडणी :'तरी सत्यचि गा धनुर्धरा । सर्व कर्मांचा उभारा ।' – ज्ञा १८.३०४. २. स्थिती; अस्तित्व :'शीत उष्ण पर्जन्यधारा । अंगी न लागती अंबरा । तेवी साधूचा उभारा । द्वंद्व संभारानिर्द्वंद्व ।।' – एभा ११.९४७. ३ शरीराची ठेवण, बांधा :'अंगे सर्वांग सुकुमार । मनोहर उभारा ।' – एरुस्व १५.५०. ४. पोकळ अवसान; उठावणी; आकार; डौल :'तुका म्हणे उभाऱ्यानें । खरे कोण मानितसे ।' – तुगा ३१८६. ५. फैलाव; दरवळणे; पसरणे; प्रसार; विस्तार :'जैसा कस्तुरीचा निकरा । तेथे परिमळाचा उभारा । तैसा ज्ञानाने शिष्यवरा । जन्मलासि तूं ।।'. ६. चालू स्थिती; अस्तित्व :'ऐश्वर्येसी ईश्वरा । जियेचे आंग संसारा । आपलाही उभारा । आपणचि जो ।।' – अमृ १.२९. [सं. उद्+भृ]

**उभारा** पु. १. इच्छा; मनोविकाराची प्रवृत्ती; उमाळा :'वनि व्याघ्र वृकादिक सारे हिंसेचा त्यजति उभारा ।' – देप ८८.४. २. उसाचा रस कढविताना त्याला येणारी उकळी, ऊत. (क्रि. येणे) :'रसास उभारा येतो म्हणजे ... रस उतू जाऊ लागतो.' – कृषि ४७२. (वा.) **उभारा धरणे** – पुढाकार घेणे; उद्युक्त होणे :'परित्राणाय साधूच्या उभारा, धरीं निवठाया सर्व भूमिभारा ।' – कृष्णजन्म (देवनाथ) ३. [सं. उद्+भृ]

**उभारा, उभाळा** पु. नालबंदाची ऐरण, ठोकळा.

**उभारी** स्त्री. बैलगाडीत भरती जास्त व्हावी म्हणून उभी लावलेली काठी; खुंटाच्या खाचरात कापूस वगैरे भरण्याच्या वेळी खाचराच्या टोकावर भोवताली दोन हात लांबीची लावण्यात येणारी उभी दांडकी. (व.) [सं. उद्+भृ – भर]

**उभारी** स्त्री. उमेद; इच्छा; निश्चय; टणकपणा :'त्यांची सारी उभारी, सारा करारीपणा लोळागोळा होऊन पडला होता.' – विभूत २१.

**उभारी** स्त्री. उत्साह; नेट; जोर; तरतरी; हुशारी. (क्रि. धरणे.) :'अरि भारी भारी अवघड उभारी धरितसे ।' – द्रौपदी (किंकर) ४३. (वा.) **उभारी धरणे** – पुढे येणे; प्रगती करणे :'रॉय यांच्यासारखा नेता लाभूनसुद्धा ज्यांना भारतात उभारी धरता आली नाही ...' आआ १०७.

**उभारू** पु. आजार, गरिबीचे दिवस इ संपणे.

**उभा लगाम** कमानदार लगाम.

**उभावणे** पहा : **उभणे, उभविणे** :'नीलांकुरोद्रेक मध्यें उभावे ।' – मुद्रलार्या भाषांतर (हरिराज) ८७.

**उभावे** न. उभारलेली रचना; मांडव; उभे राहणे :'गगनावरि उभावें । घडे केवि ।।' – राज्ञा १०.१२.

**उभा शिवार** न. कापलेले, उभे पीक. (वा.) **उभा शिवार टाकून जाणे, पळणे** – परचक्र वगैरे आले असताना पीक काढून न घेता, काही बरोबर न घेता पळून जाणे.

**उभास** पहा : **उभासणे**

**उभासणे** अक्रि. भास होणे; दिसणे :'भूपाळ जो मम मनोमुकुरीं उभासे ।' – दस्व २०८. [सं. उद्+भास]

**उभा सूळ** पहा : **उभा खडपा, उभा कडा**

**उभासोट** वि. क्रिवि. अगदी सरळ उभा; उभाच्या उभा.

**उभा होणे** अक्रि. थांबणे; तात्पुरता बंद होणे; विश्रांती घेणे.

**उभाळ** पु. १. हुंदका :'येती दुःखाचे भरूनि उभाळ ।' – ऐपो ४७०. २. मनोविकाराची उसळी.

**भाळ** ज्वाळा. (व.) पहा : **उबाळा**

**उभाळा** पहा : **उभड** :'दुःखाचे डोंगर उभाळा सुटला.' – ऐपं ३३६.

**उभांग** (उभाङ्ग) वि. उंचट; सामान्यापेक्षा अधिक उंच असलेला; उंचेला; उभार; अंगापिंडाने चांगला.

**उभिणे** अक्रि. उभारणे :'गुढीया उभिलीया' – लीचपू १७.

**उभी** क्रिवि. उभ्या उभ्या; घाईने :'मनादिकें व्यापारु । सांडिती उभीं ।।' – ज्ञा. १८.७३७.

**उभीउभी** पहा : **उभाउभी** :'चिमणगावच्या ठाण्यांत नेऊन उभीउभी सेंभर

रुपये घेतले.' – पेद २०.७७.

**उभी कुडी** उंच, सडपातळ बांधा; उभी ठेवण.

**उभी चतुर्थी, उभी चौथ** वद्य पक्षातील चतुर्थी; संकष्ट चतुर्थी. या दिवशी सकाळपासून चंद्र उगवेपर्यंत उभे राहण्याचे काहींचे व्रत असते.

**उभी चाकरी** त्रासदायक, जिकिरीची चाकरी, सेवा.

**उभी दुपार** भर दोन प्रहर; ऐन दुपारची वेळ; ऐन मध्यान्ह.

**उभी धाव** सरळ, वर डोंगरावर चढणे :'उभी धांव घ्यावी गिरी तो चढावा ।' – दावि १४५.

**उभी पट्टी** नेहमीच्या ठरावीक वसुलाखेरीज अधिक वसूल करण्याकरिता बसविलेली पट्टी किंवा कर.

**उभी पेट, पेठ** या टोकापासून त्या टोकापर्यंतचे सर्व शहर, बाजार. पहा : **उभा बाजार**

**उभीया** क्रिवि. उभ्याने; उभे राहून :'भुतानंदा : उभीया पुरीया रवा :' – लीचउ १९.

**उभी रास** १. मोजमाप न करता, न विभागता, जशीच्या तशीच ठेवलेली धान्याची रास. शेतातून आणलेले धान्य प्रथम नुसते ढीग करून ठेवलेले असते त्याला म्हणतात. २. (ल.) सर्व मालमत्ता, संपत्ती, जिंदगी.

**उभी विळी** ज्या विळीचे पाते मोडता येत नाही किंवा मिटता येत नाही अशी विळी.

**उभी संघटना** स्त्री. (अर्थ.) एकाच क्षेत्रातील एकाहून एक वरच्या संस्थांची किंवा खात्यांची संघटना.

**उभे** न. १. उभारणी; मांडणी :'म्हणोनि समभागें शुभाशुभें । मिळोनि अनुष्ठानाचें उभें ।' – ज्ञा १८.२४७. २. नुसते गुंडाळून घेण्यासाठी स्त्रिया वापरतात ते वस्त्र.

**उभेकडी** वि. वरून खाली अशा प्रकारे एका ओळीत असलेला: 'धनगरणींनीं उभेकडी सारवणे घातली.' – बनगर ८९.

**उभे काम** जरूरीचे, अगत्याचे, निकडीचे काम.

**उभे कुंकू** वैष्णव स्त्रिया लावतात त्या पद्धतीचे, उभ्या गंधासारखे (बदामी आकाराचे) लावलेले कुंकू.

**उभे कुंड** (चांभारी धंदा) चामडे भिजत ठेवण्याकरिता लागणारे रांजणाच्या आकाराचे खापराचे कुंड.

**उभे खाणे** सक्रि. सर्व–समूळ नाहीसे करणे :'लोह उभें खाय माती । तें परिसाचिये संगती । सोनें जालया पुढतीं । न शिविजे मळें ।।' – ज्ञा १८.१४०८. (वा.) **उभे नेसणे, उभे घेणे, उभे लावून घेणे, उभे लावणे** – वस्त्र बदलण्यापूर्वी दुसरे एखादे जुने वस्त्र अंगाभोवती गुंडाळणे; स्नान करण्याकरिता लहानसे वस्त्र नेसणे. आडवे नेसणे. याच्या उलट. या दोन वाक्प्रचारांचे अर्थ कोकण व देश या प्रांतात परस्परविरुद्ध आहेत. कोकण प्रांतात आडवे नेसणे याचा अर्थ व्यवस्थितपणाने व पद्धतीरपणाने नेसणे असा होतो; तर देशावर, आडवे नेसणे याचा अर्थ आड लावून घेणे, तात्पुरते किंवा लहान वस्त्र नेसणे असा होतो.

**उभेटा** पहा : **उभंट, उभट**

**उभेट्या** क्रिवि. उभ्याने. (गो.)

**उभेणे** अक्रि. १. उभे राहणे :'उठोनि उभेला सन्मुखी ।' – दावि ४०१. २. उभारणे :'रामराज्याची उभेली गुढी ।' – दावि १६७.

**उभेदीघ** वि.उंच नीच :'मोटे धाटे : उभेदीघ : भीक्षा का मागत असां :' – लीचपू ६.

**उभे दुखणे** आंथरूणाला न खिळविणारे, साधे दुखणे; किरकोळ दुखणे.

**उभे दोन प्रहर** पहा : **उभी दुपार** :'आपल्या झोपड्यांवर उभ्या दोन प्रहरी चांगलें ऊन पडतें.' – पाव्ह २७.

**उभे धावेने** क्रिवि. दौडता दौडता; विसावा न घेता :'केवळ उभे धावेने चार महाल आलियाने शत्रुचें पारपत्य जाहलें ऐसे नाहीं.' – मइसा ८.१७९.

**उभेपण** न. १. उभे असलेली स्थिती. २. (ल) जिवंतपणा :'आतां उभयां उभेपण नाहीं जयाचें । या पडिलिया गहन कवन तयाचें ।' – ज्ञा ८.६३.

**उभे पळणे** उभ्या उभ्या न थांबता एक सारखे पळत जाणे.

**उभे पीक** शेतात तयार झालेले पण न कापलेले पीक :'या जागेत उभी पिके असून ...'– डुकराची शिकार (बडोदे) २०.

**उभे फुटून** झाडाला वर जाणाऱ्या फांद्या येऊन.

**उभेया** क्रिवि. (ल.) जिवंतपणी :'उभेयां उभेपण नाहि जेयाचे । पडिलेयां गहन कवण तेयाचे ।।' – राज्ञा ८.६२.

**उभे वर्ष** साद्यंत, आरंभापासून शेवटपर्यंतचे वर्ष .

**उभे वारे** १. गडबड, गोंधळ. २. उदासीनता. (क्रि. सुटणे).

**उभे वैर** पहा: **उभा दावा**

**उभे सुकणे** १. झाड उभ्या स्थितीत असतानाच वाळणे. २.सर्व शरीर दुःखाने, काळजीने कृश होणे, वाळणे :'लेंकूरूंवाचेनि दुःखें । जेवि माउली उभी सुकें ।' – ऋ ४६.

**उभे सैर** उभ्या उभ्या; उभ्याने :'नादाचेनि घर्घरीं । बैसलीं वीरांचीं दांतेरीं । किरकिरोनि वाली कुंजरीं । उभे सैरीं उसांडला ।।' – भारा बाल २०.४८.

**उभौ** वि.दोन; दोघे :'कां उभौ येकलीं वर्णितां ।।' – दावि २५७.[सं.]

**उभ्या घाईने** १. क्रिवि. उतावीळपणाने; अतिशय घाई; उत्कंठेने (हाक मारणे, ओरडणे). (क्रि. करणे) २. मोठ्या कळकळीने; आग्रहाने; जोराने (धावणे, विनवणे इ.)

**उभ्या जन्मात** सबंध आयुष्यात; कारकीर्दीत : 'धृतराष्ट्राने ही करामत उभ्या जन्मात एकदाच केली' – भा ३९.

**उभ्याने** क्रिवि. मग्रूरीने; अविनयाने.

**उभ्या पायाने** अतिशय तत्परतेने : 'शंकरजी व परशुराम हे दोन महत्त्वाकांक्षी ब्राह्मण नेहमी बाईसाहेबांच्या तैनातीत उभ्या पायाने असतात.' – स्वप १३१.

**उभ्या मालाची पाहणी** शेतातील पिकाचा अंदाज.

**उमकळणे** सक्रि. अधांतरी ठेवणे; लोंबकळत ठेवणे, टांगणे. (गो.) [सं. उत्+कलन=धरणे]

**उमका, उमखा** स्त्री. उत्कट इच्छा; प्रवृत्ती; आवेग : 'शिवाय विकत घेण्याची उमका अन् पैसा साऱ्यांच्याच पालकांजवळ नसे.' – सांज ९०. [सं. उद्+मनीषा]

**उमग** पु. १. आढळ; शोध (लपलेली, हरवलेली गोष्ट); ठावठिकाणाचे ज्ञान, माहिती. (क्रि. पडणे, पाडणे). :'कुंतीचा भाउ मग स्थिर राहे घेत आप्तलाभा उमग ।' – मोकृष्ण ४९.६. २. समज; समजूत.

पहा : **उमज** [सं. उद्+मज्ज]

**उमग पडणे** १. ज्ञान होणे; पूर्णपणे लक्षात येणे :'आले कुठून आणि जातात कोठे याचा उमग लोकांना पडेपर्यंत ....' - उअं २०. २. सवड होणे; निकाल होणे :'तेव्हां नागमंगली राहून कर्जवाम पट्टणांतून अतिसंकटें काढून आणून चार दिवस त्यास खर्चाचा उमग पडे ऐसे करूं.' - पेद २८.२५५.

**उमगणे, उमंगणे** उक्रि. १. आढळणे; दिसणे; सापडणे; शोध लागणे. २. शोधणे; धुंडाळणे; ओळखणे; समजणे : 'काळातें दमणार मी उमगितें धुंडोनिया बाळ जी ।।'- आपू ९.
अक्रि. उघडकीला येणे; जाहीर होणे; गुप्त न राहणे; उलगडा होणे; प्रकाशात येणे. [सं. उद्+मज्ज्]

**उमगा** वि. उमगायची (गोष्ट); गुपित; गुप्त (गोष्ट). [कर्ना.]

**उमग्या** वि.उमगून, शोधून काढणारा; माग, तपास लावणारा; धुंडाळणारा.

**उमच** स्त्री. उपकारांची परतफेड; कृतज्ञता; प्रत्युपकार. [सं. उद्+मज्जन]

**उमचणें** उक्रि. उपकारातून बाहेर पडणे; मोकळे होणे; सुटणे; उपकाराची फेड करणे; उसने फेडणे :'आणि दान जया द्यावें । तयातें ऐसेंया पाहावें । जया घेतलें नुमचवे । कायसेंनही । - ज्ञा १७.२७८.

**उमचळणे** अक्रि. उमळणे; उन्मळणे; लवंडणे; उपटून येणे; उलथून पडणे (झाड वगैरे). उमचळून पडणे असा सामान्यत: प्रयोग.

**उमज** पहा : **उमट** :'त्यास आम्ही मराठे-उमज गुप्त काये जाणो?'- पेठेदभा २.२.

**उमज** पु. १. समज; समजूत; बोध; ज्ञान; माहिती; उमग :'तुम्ही बहु भले मला उमज होय ऐसे कथा ।' - केका १००. २. आकलनशक्ती; शहाणपणा; अक्कल :'कासवीचे परी पाहें दृष्टीं मज । विज्ञानी उमज दावुनियां ।।' - तुगा १०८०. (क्रि. दाखविणे, पडणे, देणे.) [सं. उद्+मज्ज्] (वा.) **उमज पडणे** - पूर्णपणे लक्षात येणे.

**उमज** पहिली नांगरणी. नांगरणीचे जे उमज, दुरो, तास, अडास हे चार प्रकार त्यापैकी पहिला प्रकार. [कु.]

**उमजणे** उक्रि. १. समजणे; लक्षात येणे; समजूत पटणे; माहीत होणे :'असें उमजता भले न गुरुभाव तो टाकिती ।' - केका ९७. उमजणे व समजणे यामधील फरक समजणे- केवळ सामान्य ज्ञान होणे, उमजणे पूर्णपणे समजणे, आतील रहस्य माहीत होणे. २.आजारातून उठणे; टवटवीत होणे. ३. जागृत होणे; सावध होणे :'जयां दोघांमाजि येखादें । विपाये उमजलें होय निदें ।।' - अमृ १.१४. ४. मापाचा उतार पाहाणे. (गो.) [सं. उद्+मज्ज्]

**उमजसमज** स्त्री. वरवर, सामान्य समजूत, ज्ञान.

**उमजीक** वि. १.तत्काल उमजणारा. २. (ल.) बुद्धिवान; हुशार; चलाख; तीक्ष्ण, तीव्र बुद्धीचा.

**उमजून सांगणे** नीट खोलून, खुलासेवार सांगणे :'यैसे त्यांस उमजून सांगितले तेव्हा मग पावणसें रु. मात्र प्राप्त जाले.' - चंचूद १३७.

**उमट** पु. १. आढळ; शोध; थांग; प्रकटता; प्रसिद्धी; परिस्फुटता (क्रि. पडणे) :'... आजी कांहीं उमट तो पडला नाही. तथापि आम्ही सावधपणे आहों.'- ऐलेसं ८९३. २. स्पष्ट; ठळक; प्रामुख्याने पुढे येणे, दिसणे (अज्ञात गोष्ट). ३. निश्चित; पूर्ण कल्पना; ज्ञान; समज. (क्रि. पडणे, होणे.). ४. उबळ; मळमळ; उबक; आवेग. [सं. उन्मृष्ट]

**उमट खाणे** अक्रि. पहा : **उमटणे** :'कलघटगीकडे किंवा मिश्रीकोटाकडे येण्याच्या शत्रूच्या आवाया आहेत त्यात जिकडे उमट खातील तिकडे आम्हीहि जाऊं.' - ऐलेसं १६७२.

**उमटणे, उमंटणे** अक्रि. १.दिसणे; आढळणे; प्रकट होणे; जाहीर होणे; उघडकीला येणे :'हा राजकुमरु उमंटला ।' - उभा ४८.४२. २. स्पष्ट होणे; बाहेर पडणे; स्वच्छ होणे; पूर्ण होणे; लक्षात येणे (ध्वनी, आवाज वगैरे) :'शब्द ना उमटती पुढती.' - संग्रामगीते ७२. ३. वर येणे; उठून दिसणे, स्पष्ट होणे :'तैसें अवयेवु उमटलें । बालिपें आडौनि ।' - शिव ७२०. ४. उत्पन्न, उद्भूत होणे; उद्भवणे :'ऐसी वाट पाहे कांही निरोप कां मूळ । काहो कळकळ तुम्हां उमटेचिना ।' - तुगा ४५२. ५. (ठसा, चित्र, प्रतिबिंब इ.) उठणे; स्पष्ट दिसणे; स्वच्छ, अंकित होणे :'जेथ हें संसारचित्र उमटे ।' - ज्ञा ५.१५६. ६. बाहेर पडणे, येणे :'वरुणावती बाहेर सप्त योजन, द्वार केलें उमटावया ।।' - पांप्र १०.१४७. ७. उपटणे; उपटून काढणे. (गो.) [सं. उन्मथ्]

**उमटरेखक** पु. १. समुद्धर्ता. २. चित्रे वा अक्षरे काढणारा.

**उमटरेखन** न. उठावकाम; नक्षीचे उठावकाम; उठावचित्र.

**उमटा** पु. आवड; नाद (किंचित तिरस्कारव्यंजक). (ब.) [सं. उद्+मन्]

**उमडणे** अक्रि. जोर होणे :'वेदना उमडून येऊन तो खाली कोसळला.' - मुखवटे १३६.

**उमडणे** अक्रि. उपजणे; आढळणे; प्रकट होणे; जाहीर होणे; दिसू लागणे; उत्पन्न होणे :'विपायें घुणाक्षर उमडे ।' - राज्ञा १७.२९९. (गो.)

**उमण** पहा : **ओमण**

**उमणणे** अक्रि. मापणे; मोजणे. पहा : **उमाणणे** [सं. उद्+मा]

**उमत** स्त्री. उमेद :'आता एक उमत हाय तंवरका घसासा राबू.' - रैत ७.

**उमतणे** उक्रि. ओतणे. (माण.) [सं. उद्+मथ्]

**उमती** स्त्री. उमेदी; ज्वानी; तारुण्य :'छान छबेली सुरत फाकडी पुढी उमतीमधे येणारू ।' - पला ४.४०. [सं. उद्+मद्]

**उमथणे** अक्रि. उलटणे; लोटणे :'काळ लोहाचा डोंगरू उमथला.' - जांस्व २६१. (गो.)

**उमथा** वि. पालथा; उपडा.

**उमदगी** स्त्री. मोठेपणा; थोरवी; मातब्बरी; संपन्नता. [फा.]

**उमदणे** अक्रि. डबडबणे; भिजणे :'ते स्वेदे उमदली दिसे ।'- सव ३६६.

**उमदळणे** अक्रि. वांती होणे; उमळणे; उलटून पडणे; मळमळणे; कालवाकालव होणे; ढवळणे : 'अति झाले, कोठे तरी उमदळून पडलेच पाहिजे, अशा मनाच्या स्थितीत मी होते.' - पलको ५८१ [सं. उद्+मूलन]

**उमदा** वि. १. थोर; उदार; श्रेष्ठ; शूर; पराक्रमी; विश्वासू; मोठ्या मनाचा. २. भव्य; सुंदर; देखणा; पाणीदार (माणूस, वस्तू). [फा.]
**उमदा** पु. जागरण; व्याप; श्रम. (व.)[सं. उद्+मद्]
**उमन** स्त्री. पहिली नांगरणी. पहा : **उमज.** (कु.)
**उमन** पु. उखाणा. [सं. उद्+मन्]
**उमप, उमाप** वि. पुष्कळ; अगाध; अतिशय; खूप; अमूप; अगणित :'डाहाळिया जाती उमपा ।' – ज्ञा १५.१४४. [सं.उद्+मा]
**उमपणे** उक्रि. वर येणे; उडणे :'मग ते निघाली तेथोन । तत्काळ उमपली गगन ।।' – कथा १.६.१५९. [सं. उद्+मा]
**उमर** पहा : **उंबर**
**उमर, उम्मर** स्त्री. वय; आयुष्य :'विसां आंत उम्मर, नरम कंबर, पितांबर पैठणचे नेसल्ये ।' – प्रला २२९. [फा. उम्र]
**उमरजी** मर्जी.
**उमरठ, उमरठा** पु. दाराच्या चौकटीची खालची बाजू; उंबरठा. पहा : **उंबरा** [सं. उंबर]
**उमरडणे** अक्रि. बदलणे; नाहीसा होणे :'तंववरि वासना उमरडली तरि काइ.' – लीचउ ९६१.
**उमरडणे** क्रि. १. दहन करणे. २. वाकविणे. [क. मुरुण्टु]
**उमरडणे** सक्रि. १.ओलांडणे; उल्लंघन करणे; त्याग करणे : 'स्वर्गाची आडवंगी । उमरडोनि ।।' – ज्ञा १३.१६२. [सं. उद्+ मृद्]
**उमरदराज** पु. चिरंजीव; पुत्र; मुलगा. [फा.]
**उमरा** पु. उंबरठा. पहा : **उंबरा** [सं. उंबर]
**उमरा** पु. अमरावतीकडील आखूड धाग्याचा कापूस.
**उमराव** पु. सरदार; मानकरी; श्रेष्ठजन; अमीर; खासा :'राजेबहादर रंगराव होळकर स्वतां आदि उमराव.' – ऐपो २६७. [फा. अमीर अव.]
**उमरावजादा, उमरावजादी** पु. स्त्री. सरदाराचा मुलगा, मुलगी.
**उमरावसभा** स्त्री. ब्रिटिश पार्लमेंटचे वरिष्ठ सभागृह.
**उमलणे** अक्रि. १. विकासणे; फुलणे :'तें उमललें अष्टदळ । ठेऊं वरी ।।' – ज्ञा १५.६. [क. मलर] २. भेग पडणे; फुटणे; उकलणे. ३. सैल होणे; विरघळणे (कपड्यावरचा मळ, चुन्याची कळी, मातीचे ढेकूळ वगैरे). ४. फुगणे; लाही होण्याजोगे फुगणे (भिजत घातलेले धान्य वगैरे). ५. प्रफुल्लित होणे; उल्हासयुक्त होणे (मन वगैरे). ६. प्रकट होणे; उत्पन्न होणे :'परी एकी केधवां गेली । शाखा कोडी केधवां जाली । हें नेणवे जेवीं उमललीं । आषाढ अभ्रें ।।' –ज्ञा १५.१२५. उक्रि. १. उचलणे; उखळणे (वाकवून घट्ट बसविलेले खिळ्याचे टोक वगैरे). २. सुटे करणे; उघडणे; खोलणे (कोयंड्याची मिळविलेली दोन टोके वगैरे). ३. क्षार लावून तापवून सांधणे, एकत्र करणे; डाग देणे (सोन्याच्या दागिन्यांची टोके). ४. सोलणे; मोकळे करणे; काढून टाकणे (धान्य भिजवून त्याची साले वगैरे). [सं. उद्+मील्]
**उमला** पहा : **उंबला** :'उमले व डोंगळे यांचे विष जालीम असते.' – प्राणिमो ११८.
**उमला** पु. झाडावरील लाल मुंगी किंवा मुंगळा.
**उमली लागणे** वाजवीपेक्षा अधिक भिजून कुजायला लागणे :'...पिकास उमली लागोन पिकें बुडालीं.' – ऐलेसं ८३४२. पहा : **उमले**
**उमले** न. १. आधण घालून भिजत ठेवलेले भात, जोंधळे वगैरे (लाह्या वगैरे करण्याकरिता). २. सपीट, रवा वगैरे काढण्याकरिता भिजत ठेवलेले गहू. (व.)[सं. उद्+मील्]
**उमले** न. मळमळ. [सं. उद्+मल्]
**उमष, उमस** पु. १. श्वास; दम; उमास. २.उसंत; विसावा; विश्रांती; अवकाश; स्वस्थता; स्वास्थ्य :'सत्व उर्मी अंत:करणासही । उमस घेवो नेदी ।' – ज्ञाप्र १३५; '... ८० हजार फौजेचा मेळ असता उमष (इंग्रजानें) खाऊ दिला नाहीं.' – इसहोकै ११.
**उमस** पु. १. स्फूर्ती; उद्भव; विस्तार :'वाग्देवतेची स्तुति । वाचाचि जाहली वदती । तेथें द्वैताचिये संपत्ती । उमस चित्तीं उमसेना ।।' – एभा १.२८. २. स्फुरण; उद्‌भव; प्रादुर्भाव. [सं. उद्+मिष्]
**उमस** स्त्री. मळमळ.
**उमस** पु. उमज; समज; जाणीव :'म्हणोनि आत्मा आत्मलाभें । नांदऊनि शब्द शोभे । येईल ऐसा न लभे । उमसु घेवों ।।'– अमृ ६.९४.
**उमसणे** उक्रि. १. गर्भधारणा होणे. २. उल्लंघणे
**उमसणे** उक्रि. १. सांगणे; उघड करणे; प्रकट करणे :'जीवु जावो परि नुमसे । ठेविला ठावो ।।' – ज्ञा १३.२०३. २. प्रकट होणे; दिसणे; माहीत होणे : 'एवं द्वैतासीं उमसों । नेदुनि ऐक्यांसि विसकुसों ।' – अमृ २.६९.
**उमसणे** सक्रि. आवरणे. [का. मुसुकु]
**उमळ** स्त्री.१.मळमळ; ओकारी बाटणे :'आता एक दोन दिवसात त्यांना विशेषच खोकल्याच्या उमळी येतात.' – पलको ४५५. २. उबळ. पहा : **उमाळा** [सं.उद्+मूल्]
**उमळ, उमळट** स्त्री. पहा : **उपळ** १. पावसाचे पाणी जिरून जमिनीतून झरे वाहू लागण्याची स्थिती. २. फुरसे, घोणस वगैरे चावले असताना अंगातून रक्त वाहू लागण्याची स्थिती. ३. अकाली गर्भस्राव होणे. ४. उष्णता व आर्द्रता यामुळे फळे कुजून त्यातून रस वाहायला लागण्याची स्थिती. ५. मऊ होणे (कळीचा चुना, मातीचे ढेकूळ इ.).[सं. उद्+मूल्] (वा.) **उमळ पडणे, उमळट पडणे** – अतिशय पाऊस पडल्यामुळे पीक कुजायला लागणे.
**उमळणे** अक्रि. आळ घेणे; हट्ट करणे :'उमळतें अर्ध्या रातीं मागे बाई चंद्र हातीं ।' – वलो ८८. (व.)
**उमळणे** अक्रि. उत्पन्न होणे; फुलणे; उमलणे; बहरणे (कळी वगैरे). [सं. उद्+मील्]
**उमळणे** अक्रि. धुणे; खळबळणे (वस्त्रे, भांडी वगैरे). (कु.गो.) [सं. उद्+मल्]
**उमळणे** अक्रि. १.पोटातील कोवळ्या गर्भाला उष्ण विकृती झाल्यामुळे तो स्रवणे, बाहेर पडणे. २. उलथणे; उपटून येणे :'इया उमळती दाढा । दांतांसहित ।।' – ज्ञा १३.५६५. ३.पाझरणे :'त्याच्या श्रमलेल्या शरीरातून घाम नुसता उमळत होता.' – वर्षा १२९. ४. भरून येणे :'मन अकारण उमळते.' – अधांतर ३५. [सं. उद्+ मूल्]
**उमळवटी** स्त्री. ओकारी; कंटाळा :'पहिल्या पहिल्यांदा तांदूळ किती घ्यायचे, डाळ किती घ्यायची, तिखटमीठ किती घालायचं वगैरे माहिती विचारून मी आईला उमळवटी आणली.' – वत्सला १३९. [सं. उद्+मल्]
**उमळशीक** स्त्री. उत्कंठा; आतुरता; औत्सुक्य. (गो.)

**उमळा** वि. बुळबुळीत; पचपचीत; गिळगिळीत; लिबलिबीत; बेचव (पातळसर अन्न, ज्यातून रस पाघळत आहे असे फळ वगैरे). (राजा.)

**उमळावण** स्त्री. मळमळ; पोटात ढवळण्याची क्रिया; तोंडाला ओकारीपूर्वी पाणी सुटते ती स्थिती. (क्रि. येणे.). (राजा.)

**उमळी** वि. स्वतंत्र; निर्वेध.

**उमंडणे** अक्रि. उमटणे; भास होणे; उत्पन्न होणे; सापडणे. पहा : **उमटणे** :'मृगजळ येथ उमंडे । तेथे असे पां कोरडे ।' – अमृ ६.३४.

**उमा** पु. मुका; चुंबन. (गो.)[क. उम्मु=चुंबन]

**उमा** वि. खेडवळ; अडाणी; साधा; भोळा; अशिक्षित.

**उमाइणे** अक्रि. कोमेजणे; म्लान होणे :'....आणि गौराइसें आली : कोमाइली : उमाइली : ऐसीं गोसावी देखीलीं :' – लीच ३.४७.

**उमाठ,उमेठ** वि. उंच; उंचवट; वर आलेली; फुगलेली (जमीन).

**उमाठा** पु. १. उंचवटा; उंच जागा; डोंगराचा माथा. २. द्वार; उंबरठा :'एक श्रवणाच्या राजबिदीस आले । तेथून हरिरूप निर्धारिलें । एक कीर्तनाच्या उमाठीं ठाकलें । प्रेमें हरिरूप विलोकिती ।।' – हरि २३.२२६. ३. (ल.) प्रसिद्वी; (विशेषत:) कुप्रसिद्धी; बोभाटा; बभ्रा; एखादी गोष्ट उघडकीला येणे. (क्रि. पडणे, होणे). (वा.) **उमाठ्यास येणे** – स्पष्ट ठळक दिसू लागणे. उघडकीस येणे.

**उमाड** स्त्री. तुफान; वादळ; खवळणे; क्षुब्धपणा (समुद्राचा). (को.) [सं. उद्+मद्–उन्माद]

**उमाडणे** अक्रि. उसळणे; फडफडणे :'तेथ ध्वजू ऐसा आवडे । संत हृदयेंरथी जवं उमाडें ।' – ज्ञाप्र ४१३.

**उमाडा** पु. पहा : **उमाळा, उबळ**. १. मळमळ; खळबळ (पोटातील); पोटात ढवळणे. २. जोराची उकळी; ऊत; उडणे (पाणी). ३. (ल.) हुंदका; आवेग; उमाळा (दु:ख इ. विकारांचा). [सं. उद्+मद्]

**उमाणणे, उमानणे** उक्रि. १. मोजणे; मापणे :'हा संसारु उमाणितें माप । कां अष्टांगसामग्रीचें द्वीप ।' – ज्ञा ६.४६३. २. (ल.) हिशोब देणे; झाडा देणे. ३.ताडून पाहणे; तुलना करणे :'तयांची उमाणितां कीर्ति । उणीव दिसे आपाडे ।' – मुआदि ११.९३. ४.(ल.) अटकळ करणे; अजमास करणे :'करीं गिरी धरूनि उमाणिली । महेंद्रमहिमा ।।' –ज्ञा १०.२८९. [सं. उद्+मान]

**उमाणणे** सक्रि. लपविणे. [का. माजु]

**उमाणा** पु. १. माप :'उमाणा घेऊनि परेशीं । सुरवाडिजे ।।' – ज्ञा १८.५२२. २. तुलना; बरोबरी :'चंद्रासि घे उमाणे । रसरंगी भुलवणे ।' – ज्ञा १३.११५८. [सं. उद्+मा–मान]

**उमाणा, उमाणे, उमान, उमाना** पु. न. १. उखाणा; हुमाणा; कोडे; कूट प्रश्न :'पुरुषेंवाचुनी जाली । आपणा आपण व्याली । पोटीचे घेऊनि गेली । उमाणें माझें ।।' – दावि ५०२.

**उमाणी, उमाणे** स्त्री. न. माप; मोजणी; झडती; अटकळ; अनुमान :'कर्ता कर्तव्या घे उमाणे ।' – ज्ञा १८.५००.[सं. उद्+मद]

**उमाना** पु. पहा : **उमाणा**

**उमाप** वि. अगणित; अतिशय :'दानाचं पुण्य आणि तुमचे श्रम दोन्हींच्या बळावर उमाप धान्य मिळेल.'– गणगोत १९२. [सं. उद्+मा]

**उमापणे** पहा : **उमाणणे**

**उमास, उमासा** पु. १. मळमळ; पोटातील खळबळ; पोटात ढवळणे; कालवणे. (क्रि. येणे.). २. उमाळा; आवेग; उकळी; लाट (हर्ष, शोक वगैरेचा) :'अभिमानाचे अळेपिळे । महत्त्व उमासे येती बळे ।' – एभा ८.२१२. ३. उद्भवण्याची स्थिती, तयारी (वादळ, रोग, गळू वगैरेची); घुमसणे; पिकणे; तयार होणे. ४. खोकल्याची उबळ. ५. जंत झाल्यामुळे होणारा अन्नद्वेष. (क्रि. येणे.) [सं.उद्+मथ्]

**उमास, उमासा** पु. १. श्वास; उच्छ्‌वास; सुस्कारा; उसासा. (क्रि. टाकणे) : 'अपरिमित तियेला येति तेणे उमासे ।' – सारुह ३.६३. २. विश्रांती; उसंत; दम; विसावा :'सैन्य पळाले दशदिशा । म्हणती त्राहें त्राहें जगदिशा । भीमें आकांत मांडिला कैसा । पळतां उमासा घेऊ नेदी ।।' – जै १३.६३. ३. घेरी; बेशुद्धी :'उमासा येऊनि पडिला वनीं । परी दृष्टीसि कोठे न दिसे पाणी ।।' – महिपती कथासारामृत २४.१९०. [सं. उद्+मिष्] (वा.) **उमज, उमाज खाणे** – विश्रांती घेणे; दम टाकणे.

**उमाह** पु. महापूर :'काइ प्रळयांबुचा उमाहो ।' – राज्ञा १८.४१०.

**उमाळ** वि. क्रिवि. अतिशय; अमोघ; अगणित; काठोकाठ; अलोट :'याजवर मागून उमाळ गोळ्या पडूं लागल्या.' – भाब १३८.

**उमाळणे** अक्रि. (हृदय) भरून येणे :'मी उमाळून म्हणालो, चल घरी.' – वासू.

**उमाळा, उमाळी** पु. स्त्री. १. मळमळ; पोटातील खळखळ; कळमळ; उमळ. २. हुंदका; उकळी; आवेग; उसळी; लहर (राग, प्रेम, दु :ख, शोक वगैरे विकारांची) :'उमाळा आल्यासारखा त्यानं चेहरा केला.' – रथ २२७. ३. तीव्र इच्छा, उत्कंठा :'देहे खंगतां सर्व जाळी उमाळी ।' – दावि १७८. ४. उकळी; कढ; ऊत (पाणी, दूध वगैरे पदार्थांचा). ५. सुटका; सोडवणूक; मुक्तता; मोकळीक (एखादा धंदा, कार्य वगैरेतून). (क्रि. पडणे). ६. लोट; गर्दी; हल्ला; उठाव :'तो देखौनि यादवांचा उमाळा । एरी सिंहनादु दीन्हला ।।' – शिव १०४१. ७. उद्भव; जोर; श्रेष्ठत्व; प्रभाव :'जेयांचा देखौनि उमाळा । पळे महामोहाचा पाळा ।' – शिव. ३८४.[सं. उद्+मूल] (वा.) **उमाळा पडणे** – अतिशय पाऊस झाल्यामुळे पिके कुजायला लागणे. पहा : **उमळ पडणे. उमाळी पडणे, उमाळी येणे, उमाळीस पडणे, उमाळीस येणे, उमाळ्या पडणे, उमाळ्या येणे, उमाळ्यास पडणे, उमाळ्यास येणे** – उघडकीला येणे; माहीत होणे; दिसणे; आढळणे; बभ्रा होणे.

**उमाळा** वि. ओंगळ; मळका; घाणेरडा. [सं. उद्+मल्]

**उमाळा** पु. ज्वाला; झोत; लोळ; तरंग (आग, वीज वगैरेचा) :'कोटी रविशशी तेज उमाळा ।।' – दावि ३३५. [क. उम्मळ=उष्णता]

**उमेठ** न. पहा : **उमेठा** :'भूतांचीं उमेठें धडाडिता ।' – राज्ञा ७.१७७.

**उमेठा** पु. १. समुदाय; गट; जमाव; मेळावा :'उमेठेयां देवां निचनवा । आठाइतेआं देवां बंबाळु दीवा ।।' – शिव १५३.

वि. १. सामुदायिक; एकगट. २. अतिशय; पुष्कळ : 'किंबहुना सात्विकां आठां । चाचरू मांडतां उमेठा ।' – ज्ञा १८.१६०७.[सं.उद्+मित्]

**उमेद** स्त्री. १. आशा; धीर; भरवसा; खात्री; विश्वास. २. आकांक्षा; हिंमत; उत्साह; धैर्य; हौस; अवसान; ईर्षा :'अब्दालीचीं बोलावणीं बहुत उमेद लावून गेलीं.' – ऐलेसं १.३४. ३. तारुण्य; ज्वानी; वय : 'आबाजी आपले उमेदीत आलियावरी त. ।।म ।। देखमुखी करावयास आले.' – मइसा १७.५[फा. उमीद] (वा.) **उमेदीस येणे** – १. वयात येणे; पणात येणे (स्त्री वगैरे). २. जोमात, भरभराटीस येणे (कार्य वगैरे). ३. बहर येणे (झाडाला वगैरे).

**उमेदगी** स्त्री. उमेदवारी :'हे उमेदगीची व रसायतीची कोण वजे (तऱ्हा) ते दर्याप्त करावी.' –ऐलेसं ७.३५७. [फा. उमीद]

**उमेदणी, उमेदनी** स्त्री. मळणी झाल्यावरची खळ्यातील कामे (वारवणी, वाळवणी, मापणी, साठवणी वगैरे). (को.) [सं. उद्+मथ्; किंवा उद् + मर्दन]

**उमेदवार** वि. पु. १. धीट; आशापूर्ण; हिंमतवान; निश्चयी; धीराचा. २. वयात आलेला; तरुण; पूर्ण वाढ झालेला (मनुष्य, पशू, झाड वगैरे) :'गडी पहला उमेदवार ।' – मोर ९. ३. इच्छुक; गरजू; पदान्वेषी :' तुम्ही इकडील लक्ष्यांत राहून कल्याणचे उमेद्वार असावें,' – मइसा ८.४. अर्जदार; नोकरी मिळण्याकरिता खटपट करणारा; निवडणुकीला उभा राहणारा. ५. काम शिकण्यासाठी राहिलेला; शिकाऊ; कच्चा (नोकर). ६. परीक्षा देण्यास आलेला. ७. नवशिक्या. ८. विवाहेच्छुक तरुणतरुणी. [फा. उमीदवार]

**उमेदवार-प्रशिक्षण** व्यवसायात शिरू इच्छिणाऱ्या विद्यार्थ्यास व्यवसायाच्या ठिकाणी दिले जाणारे शिक्षण.

**उमेदवारी** स्त्री. १. (राज्य.) उमेदवार म्हणून निवडणुकीला उभा राहणे. २. शिकाऊ म्हणून किंवा हंगामी काम करणे.

**उमेदवारी** स्त्री. १. आशावादीपणा; आकांक्षा; खात्री; निश्चय; दृढता; हिंमत; विश्वास :'त्यांची उमेदवारी पेशवे सर करूं सहजांत.' – ऐपो २७७. २. तारुण्य; ज्वानी; पूर्ण वाढ; जोम; जोर :'हे आपले उमेद्वारीला आल्यानंतर त्यांचे लग्न केलें.' – मदरु १.११. ३. कच्ची, पसंतीच्या अटीची नोकरी; शिकाऊ नोकरी; उमेदवार बनून राहणे. [फा. उमीदवार]

**उमेदवारी लेख** उमेदवारीसंबंधी अटी, नियम इत्यादी ज्यात नमूद केले आहेत असा लेख.

**उमेदी** स्त्री. ज्वानीचा, मनोविकाराचा भर :'शृंगार घालितां उमेदी चढे ग । खेळतां गंजिफा येते रडे ग ।।' – प्रला १४६. पहा : **उमेद**

**उमेराघामेरा** वि. घामाने थबथबलेला, भरलेला, डवडवलेला, डबडबलेला; घाबराघुबरा; घामाघूम. [घामेराचे द्वि.]

**उमेरा चक्री भोवरा** मुलींचा एक खेळ.

**उमेळा** वि. ओंगळ; मळका; घाणेरडा.(ना.) [सं. उद्+मल्]

**उमैठ** वि. १. रसाळ. २. भडक :'उमैठा बोलीं सांघैन तरी । जाणतां कोपावें ना ।' – रुस्व ७४. [सं. उन्मिष्ट]

**उमोप** वि. अतिशय; पुष्कळ; अगणित; अमोज. पहा : **उमाप** : 'तुझेचि करुणार्णवा मन धरी उमोप द्रवा ।' – केका २०.

**उम्दगी** स्त्री. थोरवी; मातब्बरी; श्रेष्ठपण. पहा : **उमदगी** :'जमियतच्या सर्दारास दोनी सर्कारच्या बुजुर्गी व उम्दगीवर प्रतेष्ठतेचे व इज्जतीचे रस्म अमलात येतील.' – पेअ ५८. [फा.]

**उम्द** पु. आधार.

**उम्दा** वि. १. थोर; विश्वासू; उत्कृष्ट. पहा : **उमदा** :'दोन उम्दे मनुष्य दिली दोस्ती जाहीर करावयास रवाना करीत आहों.' – पेअ ६५. २. भारी; उंची; किंमतवान; बहुमोल :'तलफ चुकऊन पोशाख दिधला खूप उम्दा भर्जरी ।' – पला ८९. [फा.]

**उम्दान** वि. उत्तम; फक्कड. [फा. उम्दा]

**उम्देतुल्मुल्क** पु. दौलतीचा (राज्याचा) खांब. विठ्ठल शिवदेव विंचूरकर यांना दिल्लीच्या बादशहानें ही पदवी दिली होती. [फा.]

**उम्मस** वि. हूड; आडदांड. (ना.)

**उम्मस** पु. उसंत; विश्रांती. पहा : **उमासा** :'स स सपना सारिखा परी नाहीं कीं उम्मस ।' – दावि २१४.

**उम्मीदवार** आशा, अपेक्षा बाळगणारा; शिकाऊ; उमेद असलेला. पहा : **उमेदवार**.

**उम्याराघाम्यारा** पहा : **उमेराघामेरा** :'जाते दर्शनाला झाले उम्यारीघाम्यारी ।' – जसा ४४१.

**उम्हळ, उम्हळणे, उम्हास, उम्हाळा** पहा : **उमळ, उमळणे, उमाळ** :'हल्लीच्या तापाचीं मुख्य लक्षणे ... वांत्या व उम्हांसे .. हीं होत.' – लोटिकेले १.५७५; 'विरह दुःखाचे कितीदा उम्हाळे ।' – टिक ५९.

**उम्हाट** पहा : **उमाटा**

**उयला** पु. पावट्याचा सोलाणा. (को.)

**उयशी** स्त्री. (प्र.) उशी; डोक्याखाली ठेवण्याची गिर्दी :'सीतेला वनवास । बाळ दोन्ही डाव्या कुशीं । केली गोट्याची उयशी । लागे झोप रोज कशी ।।' – वलो ११०. (व.)

**उर** स्त्री. हौस. [क. उर = उतावळेपणा]

**उरउरीत** क्रिवि. उरलेला; वेगवेगळेपणाने; अलग :'सांगायासी लोकां । उरउरीत उरला तुका ।।' – तुगा ३८०७. [सं.उर्वरित]

**उरउळी** स्त्री. १. रोवळी (तांदूळ धुण्याची); दुरडी (कु.) २. तेल घालण्याचे नरसाळे. [क. उरळि–वाटोळे भांडे]

**उरक, उरका** पु. काम त्वरित करण्याचे सामर्थ्य, कौशल्य, उत्साह; आटोप; आवरशक्ती. [क. उर=उतावळेपणा] (वा.) **कामाचा उरक पडणे** – संपविण्याची जबाबदारी अंगावर येणे, पडणे.

**उरक** पु. आटोप; जोर; उत्कर्ष; जोम; उत्साह; उल्हास :'भीतरिं अवस्था व्यापिलें । उरकें वागेंद्रिय कोंदलें ।।' – ऋ ४३. [क. उर्कु=पराक्रम]

**उरकडणे** सक्रि . पुरे करणे; उलगडणे :'याप्रमाणे या प्रांतीचा कार्यभाग उरकडीला ....' – पेद १५.४.

**उरकणे** सक्रि. १. पुरे करणे; पार पाडणे; संपविणे; शेवटाला जाणे. २. भानगडीत पडणे; ढवळाढवळ करणे.

अक्रि. १. आटपणे; संपणे; शेवट होणे; नाहीसे होणे. २. (ल.) मरणे. ३. आटोक्यात येणे; पसंतीला येणे; यथायोग्य होणे; सोपे होणे.

**उरकता** वि. लवकर संपणारा.

**उरकता मार्ग, उरकता रस्ता, उरकती वाट** लवकर संपणारी वाट (सरळ, छाया असलेली, जवळची, सोपी म्हणून).

**उरकमणे** सक्रि. स्वच्छ करणे; घासूनपूसून काढणे; निर्मळ करणे (भांड्यांचे खरकटे, कपड्याची घाण वगैरे).

अक्रि. विलग होणे; सुटणे; निघून येणे (भांड्याला, वस्त्राला लागलेली खरवड, कपच्या, घाण, मळ वगैरे).

**उरकाउरक** स्त्री. घाईघाईने, गर्दीने काम संपवण्याची, आवरण्याची क्रिया; आटपाआटप; आवराआवर. [उरकचे द्वि.]

**उरकुडा** पु. पहा : **उकिरडा** (व.)

**उरग** पु. सर्प; साप; नाग :'तरी सरोवर तरंगीं । सांडिलें आकाश मेघीं । कां चंदनाचे उरगीं । उद्यान जैसें ।।' –ज्ञा १७.२२५. [सं.]

**उरगळी** वि. ज्यांच्या डोळ्यावर, उरावर व गळ्यावर मण्यासारखे चिन्ह आहे असा (घोडा). हे घोड्याचे अशुभ लक्षण होय.

**उरगुडे–ढे** न. खेड्यातले देऊळ :'जेणें कैलासदुर्गा पाडिलें । सत्यलोकीं ठाणें घातलें । सोनकानें उरगुढें घेतले । वैकुंठीचें ।।' – शिव. १६०. [का. उरु =गाव+गुडि= देऊळ]

**उरच्छद** पहा : **उरस्त्राण**

**उरजणे** अक्रि. बलवान होणे; बलिष्ठ होणे; सुस्थितीत येणे; उत्कर्ष होणे. [सं. ऊर्ज्]

**उरजा** स्त्री. जोपासना; निगा; काळजी; सुव्यवस्था. (क्रि. राखणे.)

**उरण** पु. मेंढा; बकरा :'तैं उमजसील न उरे व्याघ्रवे वीर्य लेशहि उरणीं ।' – मोकर्ण २८.८३. [सं.]

**उरण, उरणी** स्त्री.एक वृक्ष, वेल :'केळी कल्हार निंबुणी । मालती मोगरे उरणी ।।' – कथा २.१५.१४२.

**उरणे** अक्रि. १. शिल्लक, बाकी राहणे; मागे राहणे; पुरून राहणे; अवशिष्ट राहणे; जास्त होणे :'तेथें लोक कैंचे उरती ।' – उषा १७६७. २.शक्य होणे; परवडणे; पुरवणे :'ज्या इंद्रियास जो भोग । तो तो करी येथासांग । ईश्वराचें केलें जग । मोडितां उरेना ।।' – दास १७.५.२८.[सं. उत्+पृ]

**उरता** स्त्री. बाकी; शिल्लक; अवशिष्ट; अंश. (क्रि. राहणे, देणे, राखणे, ठेवणे, धरणे, बाळगणे.)

**उरता** स्त्री. अरुता (अप.) १. भीड; मुरवत; आक्षेप. २. खोळंबा होणे; उणीव भासणे. ३. अरुता; सबब :'त्यांच्याकडून तो माल न आल्यामुळें येणाऱ्याची उरता न सांगतां बाजारांत जसा भाव असेल त्याप्रमाणें घेऊन द्यावा लागतो.' – मुंव्या २५१. (वा.) **उरता ठेवणे** – भीड ठेवणे; पर्वा करणे. **उरता धरणे** – खोळंबून राहणे; वाट पाहणे. **उरता न धरणे** – मान न राखणे; भीड न धरणे; वाट न पाहणे.

**उरता** स्त्री. अपेक्षा; वांछा; इच्छा :'त्यास आपले अभयेपत्राकरिता । उरता धरली आहे.' – पेद.

**उरता करणे** सक्रि. बाकी ठेवणे; अंशत: फेड करणे.

**उरदाणा** पु. घोड्याच्या तोबऱ्यातील शिल्लक राहिलेला हरभरा, घास.

**उरध** न. हृदय; मन :'पाण्यामधी मासा । त्याच्या उरधी सांगड ।' – जसा २०१. [सं. हृदय]

**उरपणे, उरवणे, उरंबणे, उरमणे** अक्रि. उरी फुटणे; उरी भरणे; अति श्रम केल्यामुळे छातीत दुःख उत्पन्न होणे (घोडा, बैल वगैरेंच्या)

**उरपतणे** अक्रि. परतणे :'भाकरी उरपतीत सरू म्हणाली ...' – पधों १६३.

**उरफाटणे, उरफाटफारफाट, उरफाटसुरफाट, उरफाटा, उरफाटासुरफाटा** पहा : **उफराटा**

**उरफी** वि. जाणलेली; ज्ञात.

**उरफोड** स्त्री. अतिशय श्रम; अतिशय कष्ट. पहा : **उरस्फोट, उरस्फोड** [सं. उरस्+स्फुट्]

**उरबंद** पु. गोरबंद; घोड्याच्या गळ्यात बांधण्यासाठी खोगिराला लावलेला पट्टा.

**उरम** न. एक पक्वान्न. हे मऊ व नरम असते.

**उरमटणे** अक्रि. उर्मट, मगरूर होणे; अरेरावी दाखवणे; दिमाख मिरवणे.

**उरमटाई, उरमठाई** स्त्री. अरेरावी; उर्मटपणा; मगरुरी; बेपर्वाई; उद्धटपणा.

**उरमरडणे** अक्रि. भरीला पडणे; गर्विष्ठ होणे : 'जरी भलते गोष्टीस त्याणी उरमडून गोष्ट सांगितली तरी पारपत्य करतील.'– पेद ६.१४१.

**उरमाल** पहा : **रूमाल** (को. गो.)

**उरमोडा** पु. जनावरास होणारा एक रोग, याने जनावर छातीत आखडते. [सं. उरस् + मोटन]

**उरला सुरला, उरसुरा, उरलापुरला** वि. अवशिष्ट राहिलेला; शिल्लक; शेष. [उरणेचे द्वि.]

**उरवई** स्त्री. शिल्लक; बाकी; अवशेष; पुरून उरलेली गोष्ट. [सं. उर्वरित]

**उरवणे** अक्रि. घोडा इ. अतिशय मेहनत पडल्यामुळे उरी फुटणे.

**उरवणे, उरविणे** उक्रि. बाकी ठेवणे, राहू देणे; शिल्लक ठेवणे; मागे टाकणे; बाकी राखणे; राखून ठेवणे :'तन्हि कुरुपांडवयुद्धारंभसमय यश तिचें न तें उर्वी ।।' – मोकर्ण ८.१५. [सं. उर्वरित]

**उरवळी, उरोळी** स्त्री. रोवळी; तांदूळ वगैरे धान्य, कडधान्य धुण्याकरता बांबूचे किंवा धातूचे केलेले सच्छिद्र पात्र; दुरडी. [क. उरळि = बाटोळे भांडे]

**उरवी** स्त्री. पृथ्वी. [सं. उर्वी]

**उरशी** स्त्री. वयात आलेली स्त्री; तरुणी. [सं. उरस्]

**उरसिज** न. स्तन; उरोज; वक्षोज; पयोधर :'येईल बहूपचारें वंध्योरसिजासि काय ओलावा ।' [सं.]

**उरस्त्राण** न. छातीवर चढविण्याचे चिलखत. [सं.]

**उरस्फोट, उरस्फोड** स्त्री. १.अतिशय श्रम, कष्ट; जिवापाड मेहनत; अत्यंत नेटाचा प्रयत्न; रक्त आटवणे; आतडी तोडणे (एखादा विषय फोडून सांगताना); माथेफोड. २.अत्यंत कळकळीची विनंती :'पदरीं धरिसी । किति करिसी उरस्फोड ।' [सं. उरस्+स्फोट] (वा.) **उरस्फोट करून घेणे, उरस्फोड करून घेणे, उरस्फोड करणे** – जीव तोडून सांगणे; जिवापाड मेहनत करणे.

**उरळणे** पहा : **उराळणे**

**उरंग** वि. १. विटलेल्या, हीन रंगाचा. २. शिळा; नावडीचा :'ते आवडी कां उरंगु । आतां जाली ।' - उगी १४०. [सं. उद्+रंग]
**उरंगणे** अक्रि. विटणे; हीनरंग होणे :'उरंगे ना साडेपन्हर सोनें ।'-दाव २९.
**उरंडा** पु. वरवंडा; ढीग :'पाथरांचे उरंडे यापरी । जाहाले येरुसालेआंतु ।' - खिपु २.४२.१३२. [सं. वरंड]
**उर:सर** पु. उराने सरपटणारा प्राणी; सर्प; नाग; साप.
**उर:स्थल** न. वक्ष:स्थल; वक्षप्रदेश; छाती. [सं.]
**उर:क्षत** पु. छातीत होणारा एक रोग; एक प्रकारचा क्षयरोग. यामुळे छातीत व कुशीत पीडा होते. [सं.]
उरा पु. नदीच्या पात्रातील कमी पाणी असलेली किंवा उघडी पडलेली जमीन, उतार; भाट [सं.उर्वरित]
**उराउरी** क्रिवि. १. छातीला छाती लावून; अतिशय प्रेमाने. २. झटपट; झटकन; झडकर; एकदम; ताबडतोब; तत्काल :'चांग तें उराउरी मागों ।' - ज्ञा ११.५४९. [ऊरचे द्वि.]
**उराक, उन्हाक** स्त्री. स्वाद नसलेली दारू. (गो.) [पोर्तु. उन्हाक]
**उराचा तख्ता** पु. भरदार छाती.
**उराचा पांजरा, उराचा पिंजरा** क्षीणतेमुळे छातीवरील सर्व हाडे दिसणे; छातीचा सापळा.
**उराची शिंप, शिंपी** (निंदाव्यंजक) खोल छाती; छातीचा खळगा.
**उराझुरा** वि. एकलकोंडा; अलग राहणारा; दूरदूर असणारा; मनमोकळा न वागणारा; कुढा; आतल्या गाठीचा. (क्रि. वागणे). [उरणेचे द्वि.]
**उराटी, उराठी** स्त्री. (घोड्याच्या) उराला बांधायचा खोगिराचा बंद, गाठ; बांडगे याच्या उलट. [सं. उरस्+अठी=गाठ]
**उराटी, उराठी** स्त्री. उंच, उभी चढण.
**उराटी, उराठी** स्त्री. १. एक सर्पविशेष. २. एका जातीचा साप चावला असता येणारी रक्ताची गुळणी; झेंडू. [सं. उरस्]
**उराड** न.१. अतिशय वर आलेली छाती. २.ऊर यालाच हीनार्थक शब्द; छाताड. ३. छातीवर येणारे वजन किंवा दाब. (क्रि. लागणे.) (वा.) **उराड काढून चालणे** – छाती पुढे करून गर्वाने चालणे. ४. जनावरांच्या छातीचे हाड.
**उराडी** स्त्री. १. भरलेली, प्रशस्त छाती; रुंद, विशाल उरोभाग. २. (खाटीक) उराचे हाड; जनावरांचे ऊर.[सं. उरस्] (वा.) **उराडी धरणे** इ. वाक्प्रचार **ऊर** शब्दापुढे पाहावे.
**उरावरचा गोहो, धगड** १. ज्या व्यक्ती अगर वस्तूविषयी एखाद्याला सतत भीती वाटते ती वस्तू; उरावरील दडपण; धोंड. २. नवरा; जार.
**उरावरचा दगड** जबाबदारी; भार.
**उरावरचा हात** पु.वरील अधिकारी.
**उरासा** पु. पडसे; सर्दी. पहा : **उरूसा, उरोसा** :'हातामधी फूल धरलं, उराशानं नाक भरलं.' – बगाणी १३९. (खा.)
**उराळणे, उराळ होणे** अक्रि. १. गाडीत मागे अतिशय भार झाल्यामुळे जू बैलांच्या मानेवरून वर उचलले जाणे,तरंगणे. २. गाडीत मागे फार भार होणे. पहा : **उलाड**
**उराळा** पु. खांबाशिवाय तयार केलेला मंडप. [सं. ऊर्ध्व+आलय]
**उरिण** वि. कर्ज नसलेला; ऋणमुक्त :'देउनि मज उरिणें । जालिं आजि ।।' – राज्ञा १६.३३.
**उरी** स्त्री. तूट; उणीव :'ज्याच्या अनुभवाभीतरीं । नाही अनुमानासी उरी ।' – एभा १९.३३.
**उरी** स्त्री. बाकी; अवशेष; शिल्लक; शेष :'जंव भरली आथी उरी । बळाची ते ।।' – ज्ञा १८.४२६. [सं. उर्वरित]
**उरी** स्त्री. आश्रय; ठाव; थारा; ठिकाण; जागा :'तैसे तातलीये लोही । तुषारां उरी नाहीं ।' – ज्ञाप्र ७०२.
**उरी** स्त्री. १. भीड; मर्यादा; मुरवत :'आपणांस जें मानेना । तेथें कदापि राहावेना । उरी तोडून जावेना । कोणीएकें ।' – दास १२.२.१४. २. अवसान; टिकाव; धडगत; स्थिती :'एरिकेच्या निजघायीं । यादवांसि उरी नाहीं । दुधड तोडूनियां पाही । पडती ठायीं परस्परें ।।' – एभा ३०.१४९. ३. इच्छा; हेतू. [म. उरणे]
**उरु** स्त्री. जंघा; मांडी. [सं. ऊरू]
**उरु** वि.विशाल; मोठा; थोर. [सं.]
**उरुक** उत्कर्ष : 'मोतियांचे झुळंबुके : तेजाचेनि उरुक ।' – शिव ४२४.
**उरुज** पु. उन्नती; बढती; महत्त्व. (माळवी.)
**उरुद्रोणी** पु. घोड्याचा एक रोग. याने घोड्याच्या दोन्ही पायात सूज येते.
**उरुके** न. वेलीचा अंकुर; धुमारा; वेल.
**उरुये** वि. श्रेष्ठ :'ना तरि धेनु श्वान । एक उरुयें, एक हीन ।' – ज्ञा ५.९३.
**उरुळी,** स्त्री. रोवळी.
**उरूफ** वि. उर्फ; उपनावाचा; टोपणनावाचा.[अर. उर्फ]
**उरूबरू, उरूबुरू** क्रिवि. समोरासमोर; समक्ष; प्रत्यक्ष. स्त्री. उपस्थिती; हजेरी; समक्षता. [फा. रूबरू]
**उरूस** पु. १. पिराचा उत्सव; पुण्यतिथी; जत्रा. २.लग्नातील मेजवानी. [अर. उर्स्]
**उरेबकसोटा** पु. (मल्लविद्या) कुस्तीतील एक डाव. [हिं.]
**उरोगामी** पु. सरपटणारा प्राणी; अशा प्राण्यांचा वर्ग. [सं.]
**उरोग्रह** पु. एका रोगाचे नाव; स्तन ताठरणे. [सं.]
**उरोज** पु. स्तन; स्त्रीचा स्तन. [सं.]
**उरोटा** पु. १.बाकी उरलेले; अवशिष्ट; शिल्लक. २. विहिरीजवळचे पाण्याचे टाके.
**उरोटा पुरोटा** पु. कमी पडेल ते पुरे करणे. [म. उरणे]
**उरोध** पु. व्याजोक्ती; उलट अर्थी बोलणे; उपरोध. [सं. उपरोध]
**उरोमुरो** वि. उरले सुरलेले. न. लांबविणे; चोरणे; खाणे; चापणे. [म. उरणे+मुरणे]
**उरोरोग** पु. छातीचा एक रोग. [सं.]
**उरोळी** स्त्री. १. वरंबा; शेताच्या सीमा दाखविणारे सीमेवरील ढीग. २. रोवळी.
**उर्जा** स्त्री. १. टवटवी; तजेला; निगा (क्रि. ठेवणे, राखणे.) २. पाणी; वाफ; वीज आदींची शक्ती, जोर. [सं. ऊर्जस्]
**उर्जित** वि. भरभराटीचा; मोठा, उन्नत, बलिष्ठ, विकसित. [सं.]
**उर्जित करणे** सन्मान करणे; सत्कार उन्नती.

**उर्जी** पु. शेतीसंबंधी खर्च; मशागतीचा खर्च. [क.]
**उर्ण** कातीण :'उर्णाचिया गळा बांधियेली घेरी.' – मुक्ता ४. [सं.]
**उर्णनाभिका** स्त्री. कोळी (कीटक). नाभीतून तंतू काढणारा (कीटक).
**उर्णपट** पु. बुरणूस; लोकरीचे वस्त्र. [सं. उर्णपट]
**उर्णा** स्त्री. लोकर. [सं. उर्णा]
**उर्ता** स्त्री. काळजी. [क.]
**उर्दाबेगनी** स्त्री. जनानखान्यातील सशस्त्र अंगरक्षक स्त्री; दासी; सेविका. [तु. उर्दू+बेगम]
**उर्दू** स्त्री. १.सैन्याचा तळ. २. भाषाविशेष; हिंदुस्थानी भाषा. ३. बाजार.
**उर्द्ध** वि. सरळ; उभा. [सं. ऊर्ध्व]
**उर्धपथ** ईश्वराचा मार्ग :'जे उर्धपथुनि लोटले। कृपेपासौनि सुटले। ते माया भुलौनी लाविले। प्रवृत्ति मार्गी।' – ज्ञाप्र २५०.
**उर्फ** उपनाव; टोपण नाव; सर्वपरिचित नाव. [अर. ऊर्फ]
**उर्फाटा** वि. उलटा; पहा : **उफराटा**
**उर्बुद** (रोग) पु. शरीरावर उत्पन्न होणारी गाठ, गळू, आवाळूं (कर्करोग).
**उर्मट** वि. उद्धट; अरेराव; आडदांड.
**उर्मटपणा** पु. उद्धटपणा; मस्तवालपणा. [सं. उन्मत्त]
**उर्मी** स्त्री. १.लाट; लहर. २. उमाळा; मनोविकारांची उसळी.[सं. ऊर्मि]
**उऱ्या करणे** १. वल्गना करणे. उड्या मारणे, २. भलत्याच मागण्या करणे.
**उर्वरित** वि. उरलेले; अवशिष्ट; बाकी; मागे टाकलेले. [सं.]
**उर्वी, उर्वीमंडळ** स्त्री. न. पृथ्वी; धरित्री; जमीन. [सं.]
**उन्हाई** स्त्री. पडसे (ना.)
**उल** लघुत्वदर्शक प्रत्यय. उदा. कोयती– कोयतुल. (गो.)
**उल–ळ** पु. कांदा; पातीचा कांदा. (कों.)
**उलकटणें** सक्रि. १. उलथणे; उलटापालट करणे; उलगडणे; उचकटणे; विस्कटणे. २. उकळणे; मोकळे करणे. ३.संपविणे. [सं. उत्+कल्]
**उलखणें** अक्रि. १. झिजल्यामुळे सोन्याच्या दागिन्याची लाख दिसू लागणे. २. लाख निघून जाणे; सांधा निखळणे. [सं. उद्+लाक्षा]
**उलगडणें** सक्रि. १. मोकळे करणे; सोडविणे. २. एखाद्या वस्तूचे भाग वेगवेगळे करणे. ३. उघडणे. ४. संपविणे; पार पाडणे. अक्रि. १. सुटणे; मोकळे होणे. २. मोडणे; भाग वेगळे होणे; ३. बंधन सुटणे; विस्कटणे ५. एखादा मौसम संपणे. [सं. उद्+लग्]
**उलगडा** पु. १.सोडवणूक; खुलासा. २. निकाल; निर्णय; व्यवस्था. ३. मुक्तता; फेड. [सं. उद्+लग्]
**उलगणे** अक्रि. संपणे; बंद होणे; थांबणे.
सक्रि. खलास करणे; नेणे; संपविणे; आटोपणे; पुरे करणे.
**उलगवाडी** स्त्री. समाप्ती; शेवट; अंत. [म. उलग]
**उलगाउलग** स्त्री. निरवानिरव; आवराआवर.
**उलगाड** वि. उजाड; पीक उपटल्यामुळे उजाड.
**उलगिडा** पु. गावचे नोकर.
**उलगी** पु. चाकर. [का. ऊलिग]
**उलघाल** स्त्री. १. अस्वस्थता. २. भानगडीचा व्यवहार. [म. उलगडणे+घालणे]
**उलझा** पु. १. अनिर्णित गोष्ट, बांधा, गुंता. २. निर्णय लावणे. [व.]
**उलझा** अपरोक्ष, पाठीमागे.
**उलट** पु. स्त्री. १. परतणे; प्रत्यागमन. २. ओसर; आहोटी; ज्वार–भाटी. ३. डोके वर काढणे; पुनरुज्जीवन; उचल खाणे. ४. पुन्हा येणे; पुनरुद्भव. ५. माघार; विन्मुखता; भंग (वचन). ६. त्याग; विमुखता. ७. ओकारी; वांती. ८. फेड; परत करणे; मोबदला देणे.
वि. विरुद्ध; उफराटे; प्रतिकूल. क्रिवि. मागे; परत; विरुद्ध [सं. उद्+दे लट्]
**उलट** वि. उफराटे; व्यस्त.
**उलट अपील** पु. न. (विधि.) प्रतिपक्षाच्या अपिलाविरुद्ध अपील. [म. उलट+इं. अपील]
**उलट अहेर** पु. मिळालेल्या अहेराबद्दल परत अहेर करणे.
**उलट इन्साफ** पु. फेरनिवाडा.
**उलट उत्तर** न. प्रत्युत्तर; जबाब; प्रतिभाषण
**उलटकर** वि. उलटण्यासारखा; डळमळीत; अस्थिर; कच्चा आधार असलेला. (दगड, लाकूड इ.).
**उलट कारवाई** स्त्री. (विधि.) विरुद्ध न्यायालयीन कार्य. [म. उलट+सं. कार्यवाही]
**उलट घेणे** हरकत घेणे; प्रतिकार करणे.
**उलट ढाल** स्त्री. १. सैन्याचा रोख विरुद्ध दिशेला वळविणे. २. विरुद्ध पक्षास मिळणे; फितूर होणे; वचनभंग करणे.
**उलटणी** स्त्री. एखादी क्रिया परत करणे, पुन्हा करणे; फेरतपासणी; फेरमोजणी; उजळणी इ. [सं. उद्+दे. लट्)
**उलटणी** स्त्री. १. कलाटणी; उलटणे; दिशा बदलणे. २. (ल.) टोमणा; खोचक उत्तर देणे.
**उलटणे** सक्रि. १. पालथे करणे; उपडे करणे. २. (वस्त्र इ.) आतील बाजू बाहेर करणे. ३. उजळणी करणे; केलेलीच क्रिया पुन्हा करणे. ४. तडीस नेणे.
अक्रि. १.पालथे होणे; विरुद्ध दिशेस फिरणे, जाणे; मागे फिरणे. २. पुन्हा उचल खाणे; पुन्हा सुरू–चालू होणे. ३. संपणे; मागे पडणे; निघून जाणे (वय, मोसम, हंगाम).
**उलटणे; उलटवणे** अक्रि.सक्रि. प्रत्यावर्तन होणे – करणे.
**उलट तपासणी** स्त्री. (विधि.) विरुद्ध पक्षाच्या वकिलाने प्रश्न विचारणे. [म. उलट+तपासणी]
**उलटपुलट** स्त्री. फिरवाफिरव करण्याची क्रिया.
**उलटबाजी** स्त्री. प्रतिकार; विरोध.
**उलटभेट** स्त्री. परतभेट; भेटीस येऊन गेलेल्याकडे आपण भेटीस जाणे.
**उलटमान** पु. सन्मानिताने सन्मान करणाऱ्याचा सन्मान करणे.
**उलटलढाई** स्त्री. फेर हल्ला; फेर उठावणी.
**उलटवारा** पु. विरुद्ध दिशेकडून येणारा वारा.
**उलटहुकूम** पु. १. पहिल्या हुकुमावरून दिलेला तोच हुकूम. २. पहिला हुकूम रद्द करून दिलेला हुकूम.

**उलटहुंडा** पु. वधूपित्याने वराकडून मुलीबद्दल घ्यावयाचे द्रव्य.

**उलटा** वि. विपरीत; परिवर्तित; पालथा; आतील बाहेर, इकडील तिकडे, वरची खाली, खालची वर, मागची पुढे, पुढची मागे इ. बाजू बदललेला. [का. उरुळु]

क्रिवि. विरुद्ध; परत.

**उलटामोल** पु. तोड उत्तर; किल्ली.

**उलटापहारा** पु. विपरीत काळ; फिरलेला काळ.

**उलटापालट** स्त्री. १. अव्यवस्था; फेर रचना. २. उत्पात. ३. मोठ्या प्रमाणावर झालेला किंवा केलेला फेरबदल.

**उलटापालटा** वि. बाजू बदललेला. (आतील बाहेर, बाहेरील आत, वरची खाली, खालची वर, इकडची तिकडे, तिकडची इकडे इ.); वेडावाकडा.

**उलटी** स्त्री. १. वांती; ओकारी. २. विरुद्ध स्थिती किंवा गती; उफराटा प्रकार. ३. उलटी उडी; कोलांटी. ४.(ल.) वचन मोडणे; विपरीत वागणे.

**उलटी अंबारी** स्त्री. भिक्षेची झोळी. (वा.) **उलट्या अंबारीत बसणे**– भिकेस लागणे.

**उलटी दुनिया** स्त्री. सार्वत्रिक बेबंदशाही; गोंधळ; विरुद्ध न्याय.

**उलटी पूजा** स्त्री. अपमान; उपहास.

**उलटी बाहुली** स्त्री. दूरचे न दिसण्याचा दोष.

**उलटी शिवी** स्त्री. शिवीबद्दल प्रतिशिवी; अपशब्दास अपशब्द.

**उलटीसुलटी (हजामत)** स्त्री. खरडपट्टी; अपशब्दांनी केलेली संभावना.

**उलटी सूज** स्त्री. शरीराच्या खालच्या बाजूकडून वर वाढत जाणारी सूज.

**उलटून** क्रिवि. १. प्रत्युत्तरादाखल; परत; विरुद्ध बाजूने. २. अपमान करून. ३. अवमर्यादा करून. ४. उर्मटपणे.

**उलटे दान** न.परतभेट; परत दिलेली देणगी किंवा बक्षीस.

**उलटे शहाणपण** न. गैरवाजवी सल्ला.

**उलडू** पु. उगव.

**उलणे** अक्रि. १. फाकणे; आतील दाबाने फाटणे; दुभंगणे; उतटणे. २. उचंबळून येणे; सदगदित होणे. [सं. उत्+लू]

**उलंडणे** उक्रि. १. लवंडणे; सांडणे; उघडे करणे. २. उपटून येणे; उलटून येणे. ३. भरून वाहणे; तुडुंब भरणे. ४. निजणे; आडवे होणे; खाली पडणे. ५. टाकून देणे; त्यजणे. ६. उचंबळणे. ७. उल्लंघणे. [सं. उत् + लुंठ्]

**उलंडा** वि. (नाविक) कलंथा; (चाक फिरविण्यासाठी) मुठीचा दांडा. [सं. उत् + लुंठ्.]

**उलंडी** स्त्री. (नाविक) होडी स्थिर राहावी, उलटू नये म्हणून तिच्या एका अंगाला जो लाकडाचा सांगाडा बांधून पाण्यात टाकलेला असतो तो.

**उलथ** पु.स्त्री. शेवटचा भाग; गावाचे किंवा टेकडीचे दूरचे टोक. [सं. उद्+स्थळ]

**उलथ** वि.१. स्पष्ट; 'जाग्रती उलथ नव्हे स्वप्न । साक्षात्कारचि तो परिपूर्ण ।' – दावि १८६. २.उत्तर; जबाब; टोमणा.

**उलथणी** स्त्री. कलाटणी.

**उलथणे** अक्रि. दुभंगणे; फाटणे. [सं. उत्+तल]

**उलथणे** न. कलथा; सराटा. [सं. उत्+तल]

**उलथणे** सक्रि. १. उलटणे; उलटे, उताणे करणे. २. आतली बाजू बाहेर व बाहेरची आत करणे. ३. खालीवर करणे; हुडकणे; चाळविणे. ४. उठणे; लोटणे. ५. पुन्हा करणे. ६. उरकणे; व्यवस्था लावणे.

अक्रि. १. उलटे होणे. २. परतणे; पुन्हा देणे. ३. (ल.) आकस्मिक मरणे. ४. समूहाने येणे. (वा.) **उलथे जाणे** – मरणे. [सं. उत्+तल]

**उलथा** वि. १. उताणा; तोंड वर असलेला.

पु. १. कलथा; सराटा; उलथणे. २. प्रतिपक्षी; विरुद्ध बाजूचा मनुष्य. ३.(ल.) ठसा. ४. उखळीच्या तळाशी असलेले धान्य वर काढण्याची क्रिया. ५. जबाब; उत्तर. ६. उलट गोष्ट. [सं. उत्+तल्]

**उलथा पसा** पु. उताणी ओंजळ. (भिक्षेसाठी).

**उलथी** स्त्री. उलटण्याची क्रिया; उलटी.

**उलपा–फा, उलपो** पु.शिधा.(राजा.) [फा.]

**उलफा** शिधा (कोरडा).

**उलफुली** स्त्री. टाकळ्यासारखे एक झाड, याची भाजी करतात. (गो.)

**उलवण** उपशम.

**उलमत** वि. उन्मत्त. [सं. उन्मत्त]

**उलमा** पु. विद्वान पंडित. [अर. उलमा]

**उलमी** स्त्री. एक प्रकारची होडी. (को.)

**उलव** स्त्री. चाहूल, हालचाल, जाग. [कर्ना.]

**उलवण** न. (वस्त्रो.) कापड विणल्यानंतर फणीत राहिलेले धागे, दोरे.

**उलवणे, उलैणे, उलौणे** बोलणे. (गो.)

**उलसमार** स्त्री. जेवणानंतर येणारा आळस. (गो.)

**उलसा, उलिसा, उलुसा** वि. अल्प; थोडा; किंचित्; इवला. एवढासा, लहानसा. [सं. अल्पीयस्]

**उला** पु. वैल, अवेल (चुलीचा). (व.)

**उलागीर** वि. १. प्रवासी; उपऱ्या. २. आगंतुक. ३. अचानक येणारे भूत. ४. अनावश्यक; फाजील. [सं. उद्+लग्]

**उलाघाल, उलाढाल** स्त्री. १. अस्वस्थता. २. भानगड; खटपट. ३. खळबळ; क्रांती. [सं. उद्+घात्]

**उलाढाल** स्त्री. (पैशाची) देवघेव; देवाण–घेवाण; व्यवहार.

**उलाघाल्या, उलाढाल्या** (उलाघाल्या, उलाढाल्या) वि. चळवळ्या; खटपट्या; नसत्या उठाठेवी करणारा. [सं. उद्–घात]

**उलाट** पु. १. वांती; २. कोलांटी. [सं. उद्+लट्]

**उलाटयंत्र** न. तोफ.

**उलाड** वि. उलार; (मागील भागातील वजनामुळे) उलटण्यासारखी (गाडी). [सं. उद्+लुट्]

**उलाल, उलाळ** पु. मोठा आवाज.

वि. उंच; वर. [सं. उद्+लल्]

**उलाळ** न. उडी. [सं. उद्+लुट्]

**उलाळणे** अक्रि. उड्या मारणे. [सं. उद्+लुट्]
**उलांडणे** सक्रि. १. ओलांडणे; उल्लंघणे; सांडणे; पालथे होणे.
**उलिंग-गे** न. नियमित काम; सेवा; चाकरी. [क. उळीग]
**उलिंगवाडी** स्त्री. चोरी; वाटमारी; चोरांची वस्ती.
**उलिंगी** पु. चाकर; सेवक; नोकर. [उग का.]
**उलु-लू-क** पु. घुबड; दिवाभीत. [सं.]
**उलूखल** न. उखळ. [सं.]
**उलुब्ध** १. हिम्मत. २. मोठया हिमतीचा.
**उलेढाले** न. द्रव्य प्राप्तीसाठी केलेले बरे-वाईट उद्योग; संसारातील दगदग.
**उलेमा** पु. इस्लामी आचार्य. [अर. उलमा]
**उल्का** स्त्री. १. तुटणारा तारा. २. पेटलेली चुडी; कोलीत. [सं.]
**उल्कापात** पु. १. तारे तुटणे. २. (ल.) अनर्थ.
**उल्कासम, उल्कासंबंधी** वि. निखळलेल्या ताऱ्याप्रमाणे.
**उल्फा भोजन** न. लग्नानंतरचे भोजन :- 'लग्नानंतर उल्फा भोजनाचे निमंत्रण येते.' - ऐरापुविवि १९१.
**उल्ब** न. गर्भावरील खोळ, वेष्टण. [सं.]
**उल्बण** न. १. त्रिदोषांचा प्रकोप. २. आपत्ती; मोठे संकट, दुःख; आकांत. [सं.]
**उल्मुक** न. कोलीत; मशाल. [सं.]
**उल्लळा** उठावा, उसळी : 'आढाउ उठावले उल्लाळे घालत.' - शिव ९५.
**उल्लंघणे** उक्रि. ओलांडणे; पलीकडे जाणे. २. मर्यादाभंग करणे.
**उल्लंघन** न. १. ओलांडणे; पलीकडे जाणे. २. आज्ञा किंवा नियम मोडणे; मर्यादातिक्रम. [सं.]
**उल्लंघित** वि. ओलांडिलेले; अतिक्रांत. [सं.]
**उल्लसणे** अक्रि. प्रकाशणे; शोभणे; उद्दीपित होणे; उघड होणे; प्रकट होणे. [सं.]
**उल्लसित** १. प्रफुल्लित; आनंदित. २. सतेज; सुशोभित.
**उल्लळणे** सक्रि. १. माखणे; लेप करणे. २. वर्तुळाकार फिरणे. [सं. उद्+लालय्]
**उल्लाट** वि. उग्र.
**उल्लास** पु. १. आनंद; उत्साह. २. सुस्वभाव; प्रसन्नता. ३. हौस; आवड. [सं.]
**उल्लासणे** अक्रि. आनंदित होणे. [सं. उत्+लस्]
**उल्लासी** वि. उत्साही; प्रसन्न. [सं.]
**उल्लाळ** पु. १. (आनंदाने) उडी २.उसळी; उमाळा. ३. उत्साह; हर्ष. [सं. उत्+लाल्]
**उल्लाळणे** पहा : **उल्लळण**
**उल्लिखित** वि. उल्लेखिलेले. [सं.]
**उल्लिंग** वि. नागडा; नंगा; विवस्त्र. [सं.]
**उल्लू** न. घुबड.
वि. १. मूर्ख; मंद; अविचारी. २. धुंद; वेडा. ३. अधीर. (वा.) **उल्लू बनणे**- वेडा, अधीर होणे.
**उल्लूपणा** पु. अविचार.
**उल्लेख** पु. नावाऐवजी एखादे अचूक विशेषण किंवा उपाधी योजणे. (उदा. कृष्णाऐवजी वासुदेव). [सं.]
**उल्लेख** पु. १. निर्देश; उच्चार; (लेखनात) निर्देश किंवा समावेश करणे. लिहून व्यक्त करणे.
२. न. दिग्दर्शन; प्रस्ताव.
**उल्लेख** पु. एक अर्थालंकार, व्याख्या : - एकच वस्तू निरनिराळ्या दृष्टीने निरनिराळी दर्शविणे यास उल्लेख म्हणावे. [सं.]
**उल्लेखपत्र** न. रेकॉर्ड.
**उल्हाटणे** उक्रि. सक्रि. नष्ट करणे.
अक्रि. उलटणे : 'ना तरी भेडा उल्हाटे । विवसीजरीं !' - ज्ञा ७.९१.
**उल्हा, उल्हाणे** पु.न. वैल, अवेल. (व.)
**उल्हाट शक्ति** स्त्री. कुंडलिनी नाडी. [सं.]
**उल्हाणा देणे** टोमणा देणे; दोष देणे.
**उल्हास, उल्हासणे, उल्हासी** पहा : **उल्लास, उल्लासणे, उल्लासी** [सं.उत्+लस्, लष्]
**उल्हाळ** पहा : **उल्लाळ**
**उवगा** पु. वेळू; बांबू.
**उवणे** उक्रि. उद्भवणे; उगवणे.
**उवले** वि. प्रसन्न; शुद्ध.
**उवस** पु. दमा. (गो.)
**उवळ** वि. १.पीळ उकललेली (दोरी). २. स्पष्ट : 'मावळवितु विश्वाभासु । उवळ ।।' - ज्ञा १६.१ [सं. उद्+वल्]
**उवळणें** अक्रि. पीळ उकलणे; सैल होणे. [सं. उद्+वल्]
**उवळणें** अक्रि. १. पिकण्यापूर्वी नासणे. २. पाझर फुटणे. ३.विषारी सर्पदंशाने शरीराच्या छिद्रातून रक्त वाहणे. ४. नीट न बडविलेला बैल पुन्हा वीर्ययुक्त होणे.
**उवळा** वि. १. पाडाला येण्यापूर्वीच उष्णतेमुळे पिकलेले (फळ); स्वादहीन; लिबलिबीत. २. निरुत्साही; मंद.
**उवळा-उंवळा** वि. पुरेसा पीळ नसलेला. (दोर, दोरखंड). (राजा.)
**उवाइणे- उवायिणे** अक्रि. १. प्रसन्न होणे. २. शांत होणे.
सक्रि. १. खुलासा करणे; विवेचन करणे; विस्ताराने सांगणे. २. उभारणे; तयार करणे. [सं. उप+आ+हित]
**उवाइला-उवायिला** पु. अभिप्राय; हेतू; आशय वि. विस्तीर्ण; मोठा; प्रशस्त.
**उवाड** पु. उत्साह.
**उवाय** पु. १. सुख; आनंद. २. विकास; उसळी; उत्कर्ष. ३. सामर्थ्य.
**उवार** पु. पूर (गो.)
**उवाव** पु. १. हर्ष; उत्साह. २. उत्कर्ष; भर; उसळी; विकास. ३. सामर्थ्य. ४. अवकाश; वाव.
**उवावी** पु. अवकाश; वाव; प्रसार; उत्कर्ष; आटोप.

**उवाहणे** क्रि. प्रकटणे.

**उवीळ** पीळ सैल झाला आहे अशी (दोरी). [सं. उद्+वल्]

**उवेड–ढ** वि. उलगडा, खुलासा करणारा.

**उवेडा–ढा पु.** १. वेढा उठविणे : 'जै अमरावतीचे आला धाडा । तै म्यां एकलेनि केला उवेडा ।' –ज्ञा ११.३८७; 'न करिता रे उवेढा । केवी जाऊं पाहसी पुढां ।' – एरुस्व ८.२८. २. उलगडा; मोकळीक. ३. परचक्र, पराभव.

**उवेर–री** स्त्री. उरलेला भाग; शेष. [सं. उर्वरित]

**उवेला** वि. उवांनी युक्त; उवा असलेला (माणूस, डोके).

**उवेळे,** ओवळे, वापरलेले वस्त्र : 'पोरु आपुलें उवेळें एथ वाओं आला ।' –लीचपू ३०४.

क्रि.वि. आडवेळेला [का.]

**उशागति** स्त्री. १. पलंगाची अथवा अंथरुणाची उशाकडील बाजू. २. क्षेत्राची वरची बाजू. [सं. उच्छीर्ष+गत]

**उशाळ** पु. उसाच्या मळ्यातील आठ इसमांवरील मुख्य. (कर्ना.)

**उशिटणें** उक्रि. उष्टे होणे किंवा करणे. [सं. उच्छिष्ट]

**उशि (सि)टा** वि. उष्टा; उपभुक्त; वापरलेला. [सं. उच्छिष्ट]

**उशिणी** स्त्री. उसनवारी; उधारी.

**उशिना** वेगाने; अधिक जोर लावून : 'उशिना घाइं जूझावे ।' – राज्ञा २.१९०

**उशिरा** क्रिवि. विलंबाने; उचित काल निघून गेल्यावर; दिरंगाईने.

**उशी,उशिशी** स्त्री. डोक्याखाली द्यावयाची लहान गादी. [सं. उच्छीर्ष]

**उशी** स्त्री. उसळी; उडी. [सं. उत्+सृ]

**उशीपायती** १. सदैव सन्निध असणे. २.(ल.) सेवा करणे; संरक्षण करणे. ३. ला त्रास देणे; मध्ये येणे.

**उशीर** पु. १. अतिकाल; दीर्घ काल; २. दिरंगाई; खोळंबा; विलंब. ३. अवधी; अवकाश. [सं. उत्+चिर]

**उशीर** पु. सुगंधी मुळे असलेले गवत; वाळा.

**उश्रम, उश्रमा** पु.१. उसासा; दम. २. विश्रांती; विसावा.३. राग; रुसवा; गाऱ्हाणे. (व.)[सं. उत्+श्रम्]

**उश्रमा** स्त्री. १. पृच्छा; प्रत्युत्तर : 'त्यावर बाबांनी (महादजी शिंदे यांनी) उश्रमा केली की..' – मरिउ २.४५. २. याचना; मागणी : 'उश्रमा न करी कवणापुढे' – दावि ४५६.

**उश्रामा** पु. कृतज्ञता; केलेल्या उपकाराची आठवण. [सं. उत्+स्मृ]

**उश्राप** पु. पहा. **उःशाप** [सं. उश्शाप]

**उश्वास** पु. उसासा; बाहेर टाकलेला श्वास. [सं. उत्+श्वास]

**उषःकाल** पु. पहाट; सूर्योदयापूर्वीचा दोन घटकांचा कालावधी. [सं.]

**उषःपान** न. मलशुद्धीसाठी पहाटे उठल्याबरोबर पाणी पिणे. [सं.]

**उषा** स्त्री. प्रभात; उषःकाल; (प्रभातकालचा) संधिप्रकाश. [सं. उषस्]

**उष्टणे** सक्रि. उचकटणे; उपटणे; अलग करणे.

**उष्टर** पु. उंट.

**उष्टरखाना** पु. उंटाचा तबेला; उंटांचे खाते.

**उष्टवण, उष्टावण** न. १. लहान मुलांच्या प्रथम अन्नप्राशनाचा विधी. २. उष्टे खाणे. [सं. उच्छिष्ट+वृत्]

**उष्टवणी** न. ज्याने उष्टी खरकटी भांडी धुतली ते पाणी.[म. उष्टे पाणी]

**उष्टा** वि. १. खालेल्ल्या अन्नातील उरलेला भाग. २. खरकट्या हाता–तोंडाचा. ३. टाकलेला; सोडलेला. ४. वापरलेला; अशुद्ध; भ्रष्ट; विटाळलेला.

**उष्टाउपास** पु. धड जेवणही नाही व धड निरशनही नाही.

**उष्टा नवरा** पु. बिजवर.

**उष्टामाष्टा** वि. पानात उरलेला.

**उष्टावणे, उष्टाविणे** उक्रि. १. उष्टे करणे; स्वाद पाहण्यासाठी खाणे. २. विटाळणे.

**उष्टावळ** स्त्री. पंगत जेवून उठल्यावर जे उष्टे राहते ते; उष्टे अन्न; उष्टे खरकटे. : 'जेविले जे संत मागे उष्टावळी । अवघ्या पत्रावळी करूनी झाडा ।।' – तुगा २०३०.

**उष्टा विटाळ** पु. उष्ट्या अन्नाचा किंवा माणसाचा विटाळ. (स्पर्शदोष).

**उष्टी कल्पना** दुसऱ्याची कल्पना.

**उष्टी पत्रावळ** स्त्री. दुसऱ्याने उपभोगलेली स्त्री.

**उष्टी हळद** स्त्री. हिंदूंच्या लग्नातील एक विधी. यात वधूच्या अंगास लावून उरलेली हळद वराच्या अंगास लावतात.

**उष्टे** न. १. ज्यात भोजन केले ते पात्र. २. जेवणानंतर पात्रात उरलेले अन्न. [सं. उच्छिष्ट]

**उष्टे खरकटे** न. उष्टावळ. (वा.) **उष्टे खरकटे करणे** – भोजनानंतर स्वयंपाकाची, भोजनाची भांडी व जागा स्वच्छ करणे.

**उष्टे खळी** स्त्री. उष्ट्या पत्रावळी टाकण्याची जागा.

**उष्टेवारो** उकिरडा. (गो.)

**उष्ट्र** पु. उंट. [सं.]

**उष्ट्रलगुडन्याय** पु. उंटाला मारावयाची काठी; ज्याचे त्याच्याच हातून शासन.

**उष्ट्रसेना** स्त्री. सांडणीस्वारांचे पथक.

**उष्ट्रासन** न. एक योगासन.

**उष्ट्री** वि. उंटाची; उंटासंबंधी. [सं. उष्ट्र]

**उष्ण** वि. १. तापलेले, ऊन. २. रागीट; तापट; उतावळा. ३. शरीरात उष्णता उत्पन्न करणारा.

न. १. गरम हवा. २. शरीरातील उष्णता. [सं.]

**उष्णकटिबंध** पु. पृथ्वीच्या गोलावरील कर्कवृत्त व मकरवृत्त यांच्या मधला प्रदेश.

**उष्णकाल** पु. उन्हाळा.

**उष्णवीर्य** वि. शरीरात उष्णता उत्पन्न करणारे (औषध.).

**उष्णता** स्त्री. उष्णपणा; ऊन; गरमपणा.

**उष्णताद्रव** पु. द्रवरूप उष्णता.

**उष्णताधारणशक्ति–क्ती** (शाप.) उष्णता टिकून राहण्याची शक्ती.

**उष्णतापरिमाण** न. (शाप.) उष्णतेचे माप.

**उष्णतापारण** न. (शाप.) तारेने, नळीने उष्णता वाहून नेणे, पार नेणे.

**उष्णतामान, उष्णमान** न. (शाप.) १. एखाद्या पदार्थाच्या अंगी असलेली उष्णता; एखाद्या प्रदेशातील हवेची उष्णता; तापमान; उष्णतेची तीव्रता. २. सरासरी उष्णता; सरासरी उष्णता दर्शविणारे माप.

**उष्णतामापक** न. (शाप.) पदार्थातील उष्णता मोजण्याचे, यंत्र. [सं.]

**उष्णतामापन** (शाप.) पदार्थातील उष्णता मोजण्याची क्रिया. [सं.]

**उष्णतायंत्र** न. (शाप.) उष्णतेने चालणारे इंजिन. [सं.]

**उष्णतारोधक** वि. (शाप.) उष्णता वाढण्यास प्रतिबंध करणारा; उष्णताप्रतिरोधक.

**उष्णतालेख** पु. (शाप.) कमीअधिक होणाऱ्या उष्णतामानाची नोंद करणारा आलेख. [सं.]

**उष्णतावहन** न. (शाप.) एका परमाणूची उष्णता त्याच्या अतिनिकट परमाणूस मिळण्याची क्रिया; उष्णतेचे संक्रमण. [सं.]

**उष्णताविसर्जन** न. (शाप.) उष्ण पदार्थातून उष्णता बाहेर पडण्याची क्रिया. [सं.]

**उष्णताविस्तृति–ती** स्त्री. (शाप.) उष्णता सर्वत्र पसरण्याची क्रिया.

**उष्णतोत्पादक** वि. (शाप.) उष्णता उत्पन्न करणारा. [सं.]

**उष्णदर्शक** वि. (शाप.) उष्णता दाखवणारा. [सं. उष्ण+दृश्]

**उष्णमापक** न. (शाप.) उष्णतेची तीव्रता मोजण्याचे.यंत्र [सं.]

**उष्णमाळी** पु. सूर्य.

**उष्णवात** पु. उष्णतेमुळे होणारा वातविकार.

**उष्णवायू** पु. १. उष्णतेने पोटात गुबारा धरणे. २. आंबट, करपट ढेकरा येणे. [सं.]

**उष्णवास** पु. पंचाग्निसाधन :'उष्णवास जळवास । शीतवास अरण्यवास ।।'– दास ४.१. १२. [सं.]

**उष्णवीर्य** वि. शरीरात उष्णता उत्पन्न करणारे, उष्ण परिणामकारक (औषध). [सं.]

**उष्णावणे** अक्रि. तापणे; गरम होणे : 'ऐसेंचि बोलतां उष्णावले.'– दावि ४०८. [सं. उष्ण]

**उष्णांक** पु. (शाप.) १. एक किलोग्राम पाणी ०° पासून १° पर्यंत तापविण्यासाठी लागणारी उष्णता; उष्णतेचा एकक; कॅलरी. २. उष्णता मोजण्याचा घटक; प्रत्येक अन्नपदार्थात शरीराला उष्णता पुरविण्याची असलेली विशिष्ट शक्ती. [सं.]

**उष्णांशु** पु. ज्याचे किरण उष्ण आहेत असा; सूर्य. [सं.]

**उष्णिका** स्त्री. पाणी किंवा इतर पदार्थ गरम करण्याचे उपकरण. [सं.]

**उष्णीष** न. पागोटे; शिरोवेष्टण; रुमाल; मंदिल : 'मेघाचे उष्णीष ती आपल्या शिरोभागी धारण करील.'– डाली ८०. [सं.]

**उष्णोदक** न. तापलेले पाणी; ऊन पाणी; गरम पाणी. [सं.]

**उष्णोपचार** पु. (शाप.) १. धातूंना किंवा मिश्रधातूंना अपेक्षित परिणाम साधण्यासाठी ठरावीक प्रमाणात उष्णता देणे. २. एखाद्या रोगावर करायचे गरम वाफारा, शेक यासारखे उपचार.

**उष्मज** वि. उष्म्यापासून उत्पन्न झालेला (जंतू, प्राणिवर्ग). [सं.]

**उष्मा** पु.स्त्री. १. उष्ण; उष्णता : 'कां कस्तुरीसगट परिमळ । उष्मेसगट अनळ ।।' – अमृ १.४२. २. उकाडा; दाह; गरमी. [सं.]

**उष्माघात** पु. सूर्यकिरणांची प्रखर तिरीप लागून येणारा भयंकर ताप; तीव्र उन्हाचा चटका लागून होणारा आजार. [सं.]

**उष्मामिती** स्त्री. (वै.) आहार्य द्रव्यातून मिळणारे उष्मांक मोजण्याचे शास्त्र. [सं.]

**उष्मालाट** स्त्री. असाधारण उष्ण हवामानाचा बसणारा फटका.

**उष्मांक** पहा : **उष्णांक**

**उस** उद्गा. हाय; दुःखोद्गार; एकाएकी दुःख झाल्यामुळे किंवा कळ वगैरे निघाल्यामुळे निघणारा उद्गार. (क्रि. म्हणणे, करणे.). [ध्व.]

**उसउस, उसउसो** अस्वस्थता, गडबड, धांदल. (गो.)

**उसकटणी** स्त्री. उसकटाउसकट; उचकाउचक.

**उसकटणे** सक्रि. १. अव्यवस्थित करणे; इकडेतिकडे टाकणे; विस्कटणे; उचकटणे (व्यवस्थित रचलेल्या वस्तू); अस्ताव्यस्त करणे; बिघडवणे (घडी वगैरे.). २. उलगडणे (भाग); मोकळे करणे (एखादे यंत्र, घड्याळ वगैरे). ३. (विंचरलेले केस, गवताची गंजी) विस्कटणे; इकडेतिकडे पसरणे. [सं. उत्+ शकल]

**उसकटाउसकट** स्त्री. अव्यवस्था; घडामोड; बिघाड; मोडतोड. पहा : **उसकटणे**

**उसकणे** सक्रि. विसकटणे; अव्यवस्थित करणे : 'जैसा उदक कुंभ साचार येथे । तो मळ उसके जेथे तेथें ।'– नव १२.९. [सं. उत्+ध्वक्= जाणे, हलणे]

**उसकी** स्त्री. उचकी. (गो.)

**उसण, उसणावळ** स्त्री. कमरेत किंवा पाठीत उठणारी कळ, लचक, तिडीक. (क्रि. भरणे, निघणे, चालणे.) (वा.) **उसण उतरणे**– १. मंत्र वगैरे टाकून पाठीत भरलेली लचक उतरणे. २. (ल.) एखाद्याचा दिमाख उतरणे; ऐट उतरणे, जिरवणे.

**उसण, उसणवार, उसणवारी, उसणा, उसणे, उसणेवाण** पहा : **उसना**, : 'मुष्टिभर पोहे उसणे आणूनि । विप्रा हातीं देतसे ।'– हरि २९.४९; 'तुझ्या पुत्राचा नंदन । त्यासी मारिले जैसा मत्कुण । तुजलागीं सांगतां न घेसी उसन् । तरी मग आजा कायसा ।।'– जै ८७.४६.

**उसणा** विरुद्ध, उलटा : 'मोरोपंत रोजकीर्द घालीत नाहीत त्यास ते चित्तावरच घेत नाहीत. सारा जाबसाल उसणा करितात.'– ऐलेसं. ३५५१.

**उसणणे** अक्रि. बरळणे : 'तैसे देवाचां गुणीं विसंवतां । मि बियाळ बोले उसणतां ।'– रुस्व ३७.

**उसणाघाई, उसिणाघायी, उसिणेघाई** क्रिवि. घावला घाव किंवा माऱ्यास मारा देऊन; समोरासमोर; उसने न ठेवता : 'निष्कपटा होआवे । उसिणा घाई झुंजावे ।' – ज्ञा २.१९०; 'उसणें घाई वीर सकळ । हाणताती परस्परें ।'– हरि २४.१४.

**उसणूण उठणे, उसणावणे** अक्रि. झोपेतून ओरडत उठणे. (माण. व.)

**उसणे पारणे फेडणे** उट्टे काढणे; सूड उगवणे : 'केल्या गोष्टीचा शेवट

उसने पारणें फेडलें तरच आम्ही समदुःखी....'– ऐलेसं ३६२.
**उसती** स्त्री. उशी. (व.) [सं. उत्+शीर्ष]
**उसनवट, उसनवारी** स्त्री. उधारी; कर्ज; ऋण.
वि. उसनवार; उसना दिला– घेतलेला; कर्जाऊ; उधार.
**उसनवट, उसनवार, उसनवारी** वि. क्रिवि.उधारीने; परत बोलीने; कर्जाऊ; भाड्याने (आणणे, देणे, घेणे वगैरे).
**उसनवार** वि. (ग्रंथ) ग्रंथालयातून बाहेर दिले जाणारे (वाचनसाहित्य).
**उसनवारी** वि. क्रिवि. उधारीने; परत बोलीने; कर्जाऊ; भाड्याने (आणणे, देणे, घेणे इ.).
**उसना** वि. १. परत देण्याच्या बोलीने आणलेला (पदार्थ, वस्तू) : 'म्हणे ऊसनें आणिलें मेळऊनि'– कचेसुदा. ४. २.कर्जाऊ; उधार (व्यवहार, व्यापार). ३. (ल.) उदासीन; लक्ष, मन लावून काम न करणारा; उपरा; चुकार; हलगर्जी (नोकर, नातेवाईक वगैरे). ४. हलगर्जीचे; बेफिकीरीचे (काम). ५. वरवर; दिखाऊपणाचे; मायावी (भाषण) : 'पण हा उसना दम दहा पावलंसुद्धा टिकेना.'– एल्गार १९. (वा.) **उसनी गोष्ट सांगणे** – आपल्याला जी गोष्ट करता येणे शक्य आहे, ती दुसऱ्याला करायला सांगणे.
**उसने** न. सूड; बदला : 'उसनें संभाजीचें घ्यावें'– ऐपो १८. (वा.) **उसने घेणे, उसने उगवणे, उसने फेडणे** – सूड घेणे, बदला घेणे, परत करणे; फेड करणे.
**उसनेपासने** वि. उधार; कर्जाऊ; मागून आणलेले; परत बोलीचे; उसनवार. [उसनेचे द्वि.]
**उसने वाण** १. कोणी जे काही केले असेल त्याचा मोबदला देणे; प्रत्युपकार; परत भेट; परत फेड. २. सूड; बदला.
**उसपण, उसपणी, उसपा** स्त्री. १. काढून टाकणे; बाहेर काढणे; उपसणी; उपसा (होडीतील, डबक्यातील) पाणी, भांड्यातील दूध, तूप, तेल वगैरे. २. कोरडे, रिकामे करणे (बादली, चमचा, पळी, टोपली, हात वगैरेच्या साहाय्याने). ३. बाहेर काढणे; वर काढणे; मोकळे करणे; उघडे करणे; म्यानातून तरवार, गवसणीतून, आच्छादनातून वस्तू वगैरे)[सं. उत्+सृप] (वा.) **अंगावर उसपणे**– रागावून, टाकून बोलणे, धावून जाणे. **कामधंदा उसपणे**– कामधंदा उरकणे, पार पाडणे, संपवणे. **शिंग उसींणे** – शिंगे उगारणे, शिंगे उगारून मारायला धावणे.
**उसपणे** सक्रि. उपसाउपस करणे; काढून टाकणे; बाहेर काढणे (भांडे वगैरेतून वस्तू इ.) : 'एका कणालागि उंदिरु । असिका उसपे डोंगरु ।'– राज्ञा १८.६०४.
**उसपाउसपी** स्त्री. एकदम जोराने बाहेर काढण्याची क्रिया (पाणी, म्यानांतून तरवार वगैरे). [सं. उत्+सृप्]
**उसपाभर** क्रिवि. १. निष्कारण किंवा व्यर्थ वरचेवर बाहेर काढणे व पुन्हा भरणे. २. (ल.) उठाठेव; रिकामी दगदग; त्रास.
**उसबकी** स्त्री. रस्सा करण्याचा एक प्रकारचा मसाला.
**उसबु** स्त्री. वाळू : 'लाज्या लाह्या कीं लेप्या लालु । कानुडे तयासी वदती आरळु । सिकता वाळु उस्क्या उसबु वालु । नदीतीर खड्या म्हणणे कीं ।।' – दावि ५४. [का.]
**उसमटणे** अक्रि. गुदमरणे. पहा : **घुसमटणे** (गो.)
**उसर, उसरा, उसरी** स्त्री. १. वाळलेली भाजी; सुकवलेली भाजी (आळू, मेथी, गाजरे इ.); सुकलेल्या आंब्याच्या फोडी; वाळलेल्या पालेभाजीला पळवा म्हणतात. २. (ल.) खंगलेले, सुकलेले, कृश, वाळलेले शरीर : 'तत्सुख हे मत्सुख तनु होतचि होती तदाधिनें उसरी ।' – मोआदि ३५.४. (वा.) **उसर करणे**– वाळवणे; कृश करणे; निगा न राखून, त्रास देऊन किंवा छळ करून (जनावर, मनुष्य यास) कृश करणे; हयगय करणे.
**उसरत, उसरपत** स्त्री. निवांतपणा; उसंत; विश्रांती; रिकामपण; फुरसत: 'तारामती भावे काम करीं । उसरत नाहीं दिवसरातीं ।'; 'ऐसा करितां येरझारा । उसरपत नाहीं भवसागरा । माजीं बुचकळ्या देत असे ।।' (गो.) [सं. उत्+सृ]
**उसरमा** पहा : **उश्रमा** : 'उसरमा मनीचा वदतां नये ।'– विठ्ठलकृत रसमंजरी ५०.
**उसरा** वि. वाळलेला; कृश. [सं. उपर]
**उसराण** न. उसाचे शेत; ऊस लावण्याची जमीन.
**उसरी** पहा : **उशिरा**
**उसरे** न. सुकलेले वांगे.
**उसल** पु. श्वास. [का. उसलु= श्वास]
**उसल, उंसल** स्त्री. उसाची जमीन; उसाचे शेत. [सं. इक्षु+आलय]
**उसलणे** अक्रि. जोराने वर येणे : 'समुद्रजल उसलत । आकाश वेन्ही ।।'– राज्ञा १.१५५.
**उसवण** पहा : **उसण**
**उसवणी** स्त्री. शिवण काढून टाकणे; टाके उलगडणे, उसवणे.
**उसवणे, उसविणे** उक्रि. १. शिवण काढून टाकणे; टाके उलगडणे; दोरा काढणे; उघडणे (शिवण्याच्या उलट क्रिया.) २. घरावरील शिवलेले गवत काढून टाकणे.(को.) [सं. उस् + सिव् = शिवणे]
**उसवणे** अक्रि. सूज उतरणे, ओसरणे. (राजा.) [सं. उत्+सिव्= सुजणे]
**उसवसी** स्त्री. उशी : 'गादी मिळंल, झालंच तर दोन उसवस्या मिळत्याल.'– पेरणी ६४.
**उसवा** पु. नदीच्या पुलाबरोबर वाहून आलेली लाकडे, गवत इ. जेथे लागतात ते ठिकाण. [सं. उद् + सु]
**उसवास** पहा : **उच्छ्वास** : 'कित्येक भटजींनी फक्त आपल्या उपयोगाकरिता त्या हौदाच्या उसवासानजीक एक लहानसा चोरहौद बांधून...– जोफु १२१.
**उससणे** अक्रि. १.उसासा टाकणे; श्वास टाकणे : 'मग उससौनि किरीटी । वास पाहिली ।।'– राज्ञा ११.२४९. २. वाढणे; उत्पन्न होणे; जिवंत होणे; जीवन पावणे; प्रकट होणे : 'तंव आयुष्यनदी उससे । दिहाचि दिहा ।।'– ज्ञा १७.१३२.
**उससा** पु. उच्छ्वास; सुस्कारा; उसासा : 'वागर्था पडत मिठी ।

उससाचिया ।।'- ज्ञा १८.१६०६. [सं. उत् +श्वस.]

**उससी** पहा : **उसवशी** : 'करूनि असिधारांची उससी ।'- ज्ञाप्र ७७०.

**उसळ** स्त्री. मसाले घालून कडधान्याचा केलेला खाद्यपदार्थ, केलेले तोंडी लावणे. [क. उसळि=उसळ]

**उसळणी** स्त्री. पहा : **उसळी** [सं. उत्+शल्]

**उसळणे** उक्रि. उसळ करणे.

**उसळणे** अक्रि. १. वर उडणे (तुषार, लाटा, कण); वर जाणे : 'जैसीं प्रळयाचेनि समीरें । वृक्षपर्णे उसळती ।।' - मुवन १०.१०६. २.वर उडी मारणे; उंच जाणे : 'स्वरथावरूनि बाणाघातें उसळोनि पावती पतन ।'- मोउद्योग १३.११२. ३. क्रोधाने अंगावर धावून जाणे; फार रागावणे; उखडणे : 'हाक देओनि उसळला ।'- शिव १०६७ . ४. जोराने जलद वाढणे (मूल, शेत, झाड वगैरे); एकदम वर येणे (पाण्यातून, गर्दीतून). ६. वर उसळी घेणे; आपटला असताना जमिनीवरून वर उडणे (चेंडू वगैरेंनी). ७. निघणे; उत्पन्न होणे; वाहणे : 'हालविशी कर्णयुगुलें तेथूनि जो कां वारा उसळे ।।'- गुच १.२. [सं. उत्+ शल्=वर उडणे]

**उसळपा** पु. १. सरपणाचा ओंडा; फोडलेले जळाऊ लाकूड. (राजा.) २. (सामा.) ओंडा; ओंडका. [सं. उत्+सृप्]

**उसळवट** वि. झरे, पाझर असलेली जमीन; उसळीची जमीन. [सं. उत्+शाल्+वत्]

**उसळवाटी** क्रिवि. उसळून सळसळ आवाज करीत : 'काई सांगौ या परौती । उदके उसळवाटीं कढती ।।'- शिव ७४९. [सं. उत् + शल्+वत्]

**उसळी** स्त्री. १. पाण्याचे तुषार, तरंग, लाटा वगैरे हवेत उडणे. २. उडी; उशी (पाण्यातून वगैरे). (क्रि. खाणे, मारणे.). ३. (ल.) बंधनातून जोराने बाहेर पडण्याची क्रिया. ४. (ल.) क्रोधाची लहर; रागाचा आवेश; प्रेम वगैरे विकारांची लाट; आवेग. ५. जोराने वर येण्याची किंवा उडण्याची क्रिया. (क्रि. खाणे.). पहा : **उसळणे, उसाळी** [सं. उत+शल्]

**उसळी चिन्ह** (भूशा.) अवसादी खडकांच्या अध:प्रतलावर उमटणाऱ्या खुणांपैकी एक. एखादी परकी वस्तू. उदा. दगडगोटा, हाड, प्राण्यांचे कवच, शंखशिंपला आदी पाण्याच्या हालचालींमुळे तेथे साठलेल्या अवसादावर उसळी मारून वर येतात, त्यांची खूण तेथे उमटते. वर साठणाऱ्या दुसऱ्या थराच्या खालच्या बाजूसही त्याचा छाप उमटतो. त्याला 'उसळी चिन्ह' असे म्हणतात.

**उसळून पडणे** संतापून हल्ला करणे : 'सुधारकांवर ते वारंवार उसळून पडले आहेत.'- केका ८.

**उसळ्या** पु. जाळण्याचे लाकूड; सरपण.

**उसंग** स्त्री. (प्र.) उत्संग, मांडी : 'जननीयां घेतला उसंगा'- उषा ७.६३. [सं. उत्संग]

**उसंडी** स्त्री. उसळी; जोराची उडी : '(मासा) वर उसंडी मारीत नाही- मोठा बेरकी दिसतोय्.'- एकाको ५५.

**उसंत, उसंध, उसंधी** स्त्री. १. विसावा; विश्रांती; आराम. (क्रि. खाणे, येणे.) : 'म्हणौनि व्यापारा हातीं । उसंत दिहा ना राती ।'- ज्ञा १४.२४१. २. फुरसत; स्वस्थता; रिकामा वेळ : 'कदा उसंत नाही'- ज्ञाप्र १४२. [सं. विश्रांत, उत्=सन्धि]

**उसंतणे** उक्रि. १. आक्रमण करणे; उल्लंघन करणे; पलीकडे जाणे : 'चाले झडझडा उसंतूनी वाट । पाहे पाळतूनी उभा तोचि नीट वो ।'- तुगा ११२. २. दूर करणे; संपवणे : 'परि नोसंतितां विवसी । भेटी नाहीं निधीसी ।'- ज्ञा १७.३११. ३. थांबणे; बंद होणे : 'आंग मोडामोडी । कार्यजातां अनावडी । नुसंति परिवडी । जांभैयांची ।।'- राज्ञा १४.१७९. ४. विसावा घेणे. ५. आश्रय करणे : 'भार्या म्हणे प्राणेश्वरा । उसंतूं नको शोकसागरा । मी सांगेन त्या विचारा । अत्यादरें अनुष्ठी ।।' - मुआदि ३८. २२. ६. शेवटास नेणे; पुरे करणे. निस्तरणे : 'तुका म्हणे आपुलालें । उसंतिलें ज्यांणीं तें ।।'- तुगा १२०८. [सं. विश्रांत]

**उसंबणे** अक्रि. आवेगाने स्फुंदणे; हुंदके देणे; हुंदके देऊन रडणे. [सं. उत्+स्फुंदन]

**उसातले वाड** १. उसाचा शेंडा. २. (ल.) हुषार, होतकरू मुलगा.

**उसाबर, उसाभर** स्त्री. १. धंदा; काम; मेहनत; कष्ट. २. भानगड; उठाठेव; संबंध : 'त्यांना या उसाभरीचा वीट आला होता असे नव्हे.'- व्यंमाक १००. ३. खटाटोप; व्यवस्था : 'हितं तुज्या उसाभरीला सोनाबाई न्हावू दे.'- रैत ९६. (वा.) **उसाभर करणे-** काळजी घेणे; व्यवस्था ठेवणे; लक्ष देणे : 'दिवसभर उसाभर करावी लागती त्येंची.'- भुज ३२.(माण.)

**उसार-रा** पु. रिकामी, मोकळी जागा (गलबत, घर यांमध्ये).

**उसाली** स्त्री. १. उसळी. २. उशी. ३. झेप : 'मुझफरखाल हरकोठे उसाली खाऊन जातील तर जाऊ न द्यावे '- पेद १८.१९१.

**उसास** पहा : **उच्छ्वास**

**उसासणे** अक्रि. १. उसासा टाकणे; दम घेणे : 'मग देओ भणे हो हो कां उसाससी; राहे राहे का पळिसी ।'- शिव १०६८. २. उसळणे; वर येणे : 'सागरी लहरी उसासे । उसासली ते सेंवचि नासे ।' - एभा २८.२८६. ३. उमटणे; उन्नत होणे; ज्वानीस येणे; फुलणे; भरणे (स्त्रीचे स्तन) : 'संगीन कुच भरदार सजिव सजदार गुलगेंद उसासले ।'- प्रला ११३. ४. टाकणे; त्याग करणे : 'लक्ष्मी उसासिली ।'- भाए १११. [सं. उत्+श्वस्]

**उसासणे** अक्रि. टोचणे; मारणे; भोसकणे : 'कां हो मज उसासिले ?'- एउगी १११.

**उसासणे** अक्रि. उल्हसित, आनंदित होणे : 'जे दुष्कृतीं चित्त उसासे ।'- राज्ञा १४.२४८.

**उसासा** पु. १. दीर्घ श्वास; सुस्कारा. २. विसावा; विश्रांती : 'पाठीं व्याघ्रादि तामसा । योनी तो अळुमाळु ऐसा । देहाधाराचा उसासा । आधी जोही ।।'- ज्ञा १६.४१५. ३. पाण्याच्या नळात हवा येण्याकरिता ठेवलेले उंच छिद्र. पहा : **उच्छ्वास**[सं. उत्+श्वस] (वा.) **उसासा टाकणे-** दीर्घ श्वास सोडणे.

**उसासा असासा** पु. जोराचा सुस्कारा, श्वास (क्रि. टाकणे.). [उसासाचे द्वि.]

**उसासी** स्त्री. उशी. [सं. उत्+शीर्ष]

**उसाळ** पहा : **उसाळा** : 'अपरोक्षज्ञानाचेनि उसाळे ।'–दास ५.३.४८.

**उसाळणे** सक्रि. हर्षविणे; आनंदित करणे. [सं. उत्+शल्]

**उसाळा** पु. उल्हास; उत्साह; आवेग; जोर; उमाळा. 'तेथें ऋषिकुळ सकळ नाचती निर्मळ उछायाचेनि उसाळे.'– दास ५.३.४८. [सं. उत्+शल्]

**उसाळी** स्त्री. उडी. पहा : **उसळी** : 'रोधिले चित्त घे उसाळी । कथा संपता अवलोकीं ।'– मुआदि १३.१७.

**उसां** क्रिवि. उशाला : 'मौनेच येऊनि मोक्षदानी । सत्यभामेचे शिर उचलूनी । उसां आपुली मांडी देऊनी । चक्रपाणि बैसला ।।'– हरि २६.११३. स्त्री. उशी; उसे; उशाला घ्यायची वस्तू. (कु.) [सं. उत्+शीर्ष]

**उसिटणे** सक्रि. उष्टे करणे : 'ऐसा उपाधि उसिटिलें । काइ बानूं ।।'– राज्ञा १८.२१.

**उसिटे** पहा : **उष्टे** : 'उसिटे लाहावेयाचे सायासु । तेथ सेवेची कवणी आसु ।' – दाव २५३.

**उसित जाणे अक्रि** श्वास, ठसका लागणे. पहा : **असूत** (क्रि. जाणे.) : 'उचकी लागली उसित गेला । पीत्त उसळलें उलाट जाला ।'– दास २.६.३३. [सं. उत्+सिक्थ]

**उसिसी** स्त्री. उशी : 'चंपक परागाची उसिसी । तेथ भीमकी बैसविली कैसी । नवल भूतली चंद्रिका जैसी । मृगी कुंकुमाची ।।'– रुस्व ४५७.

**उसीगा** मांडी : 'सातां पाताळांचा उसीगां : आरेरे पारिकेन्हो रिगां ।'– शिव १००३.

**उसीर, उसीरू** पहा : **उशीर** .'आता न लावावा उसीर.'– वेसीस्वा ३.५.

**उसीसे** न.उसे : 'मांडी उसीसे करूनि श्रीमुख अवलोकीत देह त्येजीलें ।'– लीच १.२५.

**उसीसे** न. उसासा; श्वास; दमा: 'कीं संसाराचेनि त्रसे । जे करौनि होते उसीसें ।'– ऋ ६०. [सं. उत्+श्वस्]

**उसुलवार** वि. जोराने वाढणारा; वर येणारा; वाढाळू (झाड, मूल वगैरे). (को.) [सं. उत्+शल्]

**उसू** वि. सैल; फट राहिलेला; घट्ट न बसलेला; शिथिल; पोकळ (खुंटी, दादरा, दार वगैरे.). (को.)[सं. उत्+सिव्-स्यूत]

**उसूपणे** सक्रि. उपसणे : 'कव्हणी एकू : केशवनायकाचिये घरीचा बान्हीवां उसूपें'– लीच ४.५६.

**उसूल** पु. वसूल; जमा; उत्पन्न. [फा. वुसूल्]

**उसूळ** पु. उकळी : 'च्याला उसूळ आला बग.' – खळाळ ७७.

**उसे** न. १. बिछान्याची डोक्याकडची बाजू. पहा : **उशागत**. २. उशी; गिरदी; निजताना डोक्याखाली घेतलेला आधार. [सं. उत्+शीर्ष] (वा.) **मांडीचे उसे करणे**– आपल्या संरक्षणासंबंधी सर्वस्वी एखाद्यावर विश्वास ठेवणे.

**उसे, उसेपोट** न. बेंबीखालचा पोटाचा भाग.

**उसेती** स्त्री. (नाविक.) भरतीची वेळ.

**उस्करणे** उक्रि. (प्र.) उस्तरणे. विस्कटणे; विस्कळीत करणे; अस्ताव्यस्त करणे; विखरणे : 'वीण रेसभरही उस्करली नाहीं.'– झांकली मूठ (हडप) ११. [सं. उत्+ शकल]

**उस्कलणे** सक्रि. हाकलून, हाकून देणे : 'चुलतभावाला उस्कलून लावा म्हंता ?'– रैत ५.

**उस्कारा, उस्कारासस्कारा** पु. उसासा; सुस्कारा; जोराचा श्वास; दम. (क्रि. टाकणे.) [सं. उत्+श्वास]

**उस्क्या** स्त्री. वाळू; रेती. पहा : **उसबु**: 'लाज्या लाह्या कीं लेप्या लालु । कानुडे तयासी वदतु आरळु । सिकता वाळु उस्क्या उसबु वाळु । नदीतीर खड्या म्हणणे कीं ।।' – दावि ५४. [क. उसुकु=वाळू]

**उस्तभविणे** सक्रि. भर देणे; उठविणे; उद्युक्त करणे; प्रवृत्त करणे : 'दादोसी महदायिसां उस्तभवीले : द्वारावतीए जावे ऐसे' – लीच ३.५२. [सं. उत+स्तभ्]

**उस्तर** पु. उष्ट्र; उंट. [सं. उष्ट्र]

**उस्तरखाना** पु. उष्ट्रखाना; उंटखाते; उंटाची पागा.

**उस्तरणे** सक्रि. १. घरावरील कौले, गवत वगैरे आच्छादन काढणे; छपरावरील ओमन वगैरे काढणे. २. विस्कटणे; उलगडणे; उघडे करणे. ३. उसवणे; वीण काढून टाकणे; दोरा काढणे. ४. नासधूस करणे; मोकळे; अलग करणे; भाग वेगळे वेगळे करणे. [सं. उत्+स्तृ]

**उस्तरपलाण–णा–णे** न. उंटावरील खोगीर, आसन. [सं. उष्ट्र+ पल्याण]

**उस्तराउस्तर** स्त्री. मोठ्या प्रमाणावर व सर्वत्र उस्तरण्याची क्रिया; उलगडणे; उस्कटणे; मोकळे करणे; उघडे करणे वगैरे. पहा: **उलथापालथ, उस्तरणे** [सं. उत्+स्तृ]

**उस्तरे** न. ठसका; उशीत. पहा : **असूत, असूद.** (क्रि.जाणे.)(गो.)

**उस्तवार** वि. रीतसर; व्यवस्थित : 'खानाची व चिरंजीवाची भेटी होऊन उस्तवार स्नेह व करारमदार व्हावा.'– ईएमपी १७२.

**उस्तवारी** स्त्री. १. डागडुजी; दुरुस्ती; व्यवस्था; मजबुती; पुनर्घटना : 'लोकांचे कर्जाचा मार्ग होऊन आपली उस्तवारी होईल.'– मइसा १३.९७. २. उपचार; तैनात; शुश्रूषा : 'जखमींची वगैरे पथ्यपाण्याची उस्तवारी बरीच आहे.' – ज्ञा ११.६०७१. ३. मशागत; लागवड (शेत, जमीन वगैरेची) : 'जमिनीची नीट उस्तवारी ठेविल्यास ती सुधारते.'– शे ३.२. ४. उठाठेव; चौकशी. (माण.) [फा. उस्तुवारी]

**उस्तळणे** अक्रि. उचंबळणे; आवेशात येणे : 'स्वातंत्र्यप्राप्तीच्या योजना तो अगदी उस्तळून सांगत असतो.'– माजी १९९.

**उस्ताद, उस्तादगिरी, उस्तादी** पहा : **वस्ताद** [हिं. गु.]

**उस्तावर करणे** पहा : **उस्तवारी करणे** : 'मी तिची उस्तावर करत्येय तोच गणूभावजी नि आतेसासूबाई आल्या.'– पडघ १२४.

**उस्ते** न. पहाटेचा किंवा सकाळचा संधिप्रकाश; झुंजुमुंजू.(कों.)[सं. उषा]

**उस्फवणे** सक्रि. उचकवणे; फितवणे : 'तो आपल्याविरुद्ध उस्फवतो'– अगतिका ७०.

**उस्मर** पु. उल्लेखः 'याचा उस्मर मराठी वाङ्मयात दिसत नाही.' – स्त्रिकावा ९. [सं. स्मृ]

**उस्मरणे** अक्रि. १. सुस्कारा टाकणे; श्वास टाकणे. २. हुंदके देणे; स्फुंदणे. ३. धापा टाकणे. ४. दु:ख, खेद व्यक्त करणे.

**उस्मरणे, उस्मारणे** उक्रि. १. आठवणे; आठवण करणे; स्मरण करणे; पुन:पुन्हा पुढे आणणे. २. उल्लेख करणे; सांगणे; दिग्दर्शित करणे. [सं. उत्+स्मृ-स्मरति]

**उस्तरा** पु. १. विश्रांती; दम; श्रमानंतरचा विसावा. (क्रि. घेणे.). २. दीर्घ श्वास सोडणे; सुस्कारा टाकणे. (क्रि. टाकणे.).

**उस्मस्थड** न. बागाईत जमिनीशेजारची पडीत जमीन.(गो.)

**उस्मारा, उस्रमा** पु. १. उपकाराचे किंवा अपकाराचे स्मरण, आठवण, जाणीव, दिग्दर्शन. उदा. उस्मारा टाकणे, उस्रमा करणे. २. (सामा.) उल्लेख; कथन; दिग्दर्शन. [सं. उत्+स्मृ]

**उस्रा** स्त्री. गाय : 'राखिता कळप या वनि उस्रा' – वामन विराट ८.४८.

**उस्राप** पहा : **उ: शाप** (कु.)

**उस्वास, उस्वासा** पहा : **उश्वास,** उस्वास: 'श्वास उस्वास कोंडला । तेणें प्राणी जाजावला ।।' – दास ३.१.३९.

**उहरवणे** अक्रि. उद्धार करणे; पलीकडे नेणे : 'एकिं पाखाण वाऊनि उहरविलि । समुद्रीं कटकें ।।'– राज्ञा १०३५.

**उहीपुहा** स्त्री. वाटाघाट; साधकबाधक विचार; चर्चा : 'हे उहीपुही जे ऐसी ।' – राज्ञा ६.८९.

**उहू, उह** पु. १. व्यूह; विभू; कट; युक्ती; बेत; तर्क; कल्पना (क्रि. रचणे.) २. परिस्थितीप्रमाणे मूळ सामान्य रीतीच्या वाक्यात विशेषानुरोधाने केलेला फरक; हेतू कायम ठेवून शास्त्रवचनात जरूर तो बदल करणे. (उदा. एकवचनाच्या ठिकाणी अनेकवचन, पुल्लिंगाच्या ठिकाणी स्त्रीलिंग, अमुक शब्दाबद्दल विष्णू इ. नाव. यज्ञोपवीत धारण करावें हें सामान्यवचन, येथे दोन यज्ञोपवीतें धारण करावी असा उहू केला पाहिजे.). ३. प्रथम उल्लेख; प्रस्ताव; प्रस्तावना; परिस्फोट; विषयाची मांडणी. (क्रि. काढणे.) [सं. ऊह]

**उहू** स्त्री.१. सून. २. धाकटी भावजय. (खा.)[सं. वधू]

**उळ** न. फूल : 'उठणें की पडणें । कुचभाराचें कोण जाणे । फांकणें की सुकणे । जाउळा (जातीपुष्प)चें ।।' – अमृ ४.८. [सं. पुष्प]

**उळउळी, उरउळी** स्त्री. अव. पिसा; पिसवा. (गो.)[क हुलु]

**उळउळीत** वि. किंचित तापलेले; कोंबट. (गो.) [क. उळगु=जाळणे]

**उळकंबणे, उळकुंबणे** पहा : **ओळकंबा**

**उळकंबा, उळकुंबा** पु. झोका; हेलकावा.

**उळगवणे** सक्रि. देवविणे : 'श्रीकरी ताडपत्रिका उळगविली ।'– श्रीकृच ५५.५८. [का. ओलगिसु.].

**उळगाऊ, उळगी** वि. उळिगाकरिता योग्य; आहेर किंवा इतर देणगी देण्यासारखे (वस्त्र वगैरे.). [क. उळ= उंची वस्त्र]

**उळगी, उळिगी** स्त्री. १. एखाद्या कामाचे ओझे, भार; एखाद्याचे उपकार फेडण्याचे ओझे. २. बिगार : 'तरी कर्मप्रवृत्तीहीलागीं । तया आयासु नाहीं आंगीं । जे प्रवृत्तीचेही उळिगीं । लोकुचि आथी ।।'– ज्ञा १८.४५८. [का. ऊळिग =सेवा]

**उळपात** स्त्री. १. कांद्याची पात. [क. उळिळ् =कंद, कांदा]

**उळमळणे** अक्रि. लटपटणे : 'भोवळ आल्यामुळे ती उळमळू लागली.' – धाधो ३८४.

**उळवई, उळवयी** स्त्री.गाडीच्या चाकांच्या तुंब्यातील (ज्यात कणा असतो ते) लोखंडी कडे, वसवी, आवण. [कर्ना.]

**उळंबणे** उक्रि. अवलंबणे; मिळवणे; आश्रय करणे; आधार घेणे; प्राप्त होणे : 'भगवंताचिये भक्ति । स्वर्गसुखातें उळंबिती ।।'– रास १.६३२. [सं. अवलंब]

**उळंबळणे** अक्रि. काठोकाठ भरून वाहणे; तुडूंब भरणे (भांडे, नदीचे पात्र वगैरे). [सं. उत्+लंब]

**उळा** पु. हवळा; हुळा; भाजलेला ओला हरभरा : 'तैसा बरवा उळेया जोगा चणा : असे ' – लीचउ १३. [क. उळगु= जाळणे.]

**उळाक** वि. वात्रट; उडाणटप्पू : 'उळाक मनाच्या पाडीनं वैरण सगळी तुडवून टाकली हुती.' – गोता ३४.

**उळिग** स्त्री. भोवरा : 'आठहि पाहार जैसें पायां । उळिग घापे ।।' – ज्ञा १७.२०२. [क. उळ्लु=वाटोळे फिरणे, गुंडाळणे]

**उळिग, उळीग** स्त्री. १. सेवा; चाकरी. पहा : **उळगी** : 'उळिग मी करीन। आंघोळीचें ।।' – ज्ञा १३.४२०. २. काम; व्यवसाय; धंदा : 'चतुर्वर्णा घातली । सिनानीं उळिगे ।।' – ज्ञा १८.८१०. ३. बिगार; पडलेले काम. ४. उपकाराचे ओझे. (क्रि. वारणे) : 'तरी कर्मप्रवृत्तीहीलागीं । तया आयासु नाहीं आंगीं । जे प्रवृत्तीचेही उळिगी । लोकुचि आथी ।।' – ज्ञा १८.४५८. [क. उळिग सेवा, काम]

**उळिग, उळीग** स्त्री. सण; श्राद्धपक्ष इ. नैमित्तिक विशेष.(चि.)

**उळी** स्त्री. (सुतारी धंदा) किकरे; पटाशी. (व.)[क. उळि]

**उळी** वि. पातीचा (कांदा) : 'आवो उळीचा कांदा उळीचा कांदा होय म्हणे ।' – गोप्र ७३.

**उळोगार** पु. ओघळ. (गो.)

**उळ्ळा** पु. एक प्रकारचे गवत. (कर्ना.)

**उक्षण** न. नांगरणी. (गो.) [सं. उत्+खन्]

**उक्षण** न. सिंचन; औक्षण. पहा : **अवोक्षण** [सं. उक्ष्=शिंपडणे]

**उक्षतरण** न. आक्सफोर्ड शहर : 'वर्तमानकाळीं उक्षतरण नगरीं वास करणाऱ्या महावैदिकाची माहिती ....' – निमा ४२४.

**उक्षित** वि. सिंचित; भिजवलेले; ओले केलेले : 'स्वपरक्षतजोक्षित ते जेविं वसंतीं पलाशतरु फुलले ।' – मोभीष्म २.९. [सं. उक्ष्=शिंपडणे]

**उक्षी** त्री. एक औषधी वनस्पती. ही झाडे डोंगराळ जमिनीत होतात. याच्या फळाचे चूर्ण पत्री, जायफळ इ. पदार्थाच्या चूर्णाबरोबर पंडुरोगावर देतात.

**उं** स्त्री. एक कृमी (केसातील).

**उंका** वि. १. उघडा; नागडा; हीन. (को.) २. मोकळा; सुटा.

**उंकी** स्त्री. पाजणी; मागावर विणण्याकरिता खळ देऊन तयार केलेले उभे धागे. [क. उंकी, उंके]

**उंगणे** अक्रि. आंघोळ करणे : 'आनें उंगीनें रामाभोक्ति केतली.आणि अंग धुवून रामाची सेवा करी.' – भिल्ली भाषा २७. (भिल्ली)[सं. अवगाह]

**उंगली** स्त्री. (हाताचे किंवा पायाचे) बोट [हिं.] (वा.) **उंगली चालवणे** – (शरीरावरून) हात फिरवणे; अंगुली स्पर्शाने स्त्री वश होते का हे पाहणे : 'उंगली चालवून पहायची. पोरगी फितली तर फितली'– वासू ३२.

**उंच** वि. १. जमिनीपासून किंवा उभे राहण्याच्या स्थानापासून आकाशात पुष्कळ अंतरावर असणारा, पोचणारा; उन्नत; उत्तुंग; उच्च. २. श्रेष्ठ (गुण,पदवी, किंमत यामध्ये); वरिष्ठ पदवीचा, योग्यतेचा (चतुरस्रता, थोरपण वगैरे संबंधाने); सन्मान्य: 'चातुर्येवीण उंच पदवी ।' – दास १४.६.७. पहा : **उंचा, उंची**. ३. (संगीत.) वर चढणारा (तान, स्वर); ऊर्ध्वगामी; तीव्र; वरपर्यंत गेलेला. ४. फारच उभट चढणीचा. ५. खोल (विहीर, खाच, चर वगैरे). (राजा.)६. फार मौल्यवान; किंमतवान : 'कष्ट करितां सेत पिकें। उंच वस्त्र तत्काळ विकें।' – दास १२.७.२५. [सं. उच्च] (वा.) **उंच टाचा करून वागणे** – अमंगल, अपवित्र पदार्थांवर पाऊल पडून नये म्हणून चवड्यावर चालणे; (ल.) गर्वाने वागणे; तोऱ्यात असणे.

**उंच** क्रिवि. फार वर; हवेत; उंचावर. [सं. उच्च]

**उंचकपाळ्या** वि. नशीबवान (उंच कपाळ भाग्याचे निदर्शक असते या कल्पनेवरून).

**उंचखाल** क्रिवि. उंचसखल; वरखाली; खाचखळग्यामध्ये; खाचखळग्याची.
वि. विषम; नतोन्नत; खालीवर असणारी (जमीन).

**उंचट** वि. १. उंच; चढावाची (जमीन); उभट; चढणीचा. २. किंचित उंच; वाढलेला. [सं. उच्च +वत्]

**उंच दरवाजा** पुढील मोठा दरवाजा : 'उठल्या अवाई उंच दरवाजा लाविला ।' – ऐपो ६८.

**उंचदर्पण** पु. सूर्यकांत; सूर्य : 'उंच दर्पणीं अग्नी निघतो ।' – दास १६.५.१९.

**उंच नाक** न. प्रतिष्ठा; मान्यता; प्रौढी : 'उंच नाकेश्वशुरागारी । वागे न ऐसें करावें ।।' – जै १७.६५. (वा.) **उंच नाक करून** – १. प्रतिष्ठेने; मान्यतेने. २. निर्लज्जपणाने; बेशरमपणाने.

**उंचनीच** क्रिवि. १. खालीवर असे; खडबडीत; उंचसखल. २. लहानथोर; श्रेष्ठकनिष्ठ; गरीब श्रीमंत : 'उंच नीच काहीं नेणें भगवंत ।' – तुगा ३६९१.

**उंचपट** न. चढण असलेला रस्ता; चढणीवरील जागा.
वि. किंचित वर; थोडे उंचावर.

**उंचपडे, उंचवडे** वि. वर असणारे, महत्त्वाचे : 'याहीपासून उंचवडें । गुढले फळाचेनि बुडे ।' – ज्ञा १५.१९६.

**उंचपुरा** वि. उंचापुरा

**उंचलो** वि. वरचा. (गो)[सं. उच्च]

**उंचवट** वि. १. किंचित उंच. २. थोडा चढ असलेला; उंचावर असलेला. याच्या उलट बसकट. [सं. उच्च + वर्ती]

**उंचवटा, उंचवळा** पु. उंच भाग; टेकाड; उंचाड; टेंब. २. अंगावरील, एखाद्या वस्तूवरील उंच भाग; टेंगूळ. ३. सपाट पृष्ठभागावरचा थोडा उंच भाग; ओटा : 'तो उंचवटा देखिला । तितल नीट.' – ऋ ७२.

**उंचवणे** उक्रि. उंच असणे.

**उंचशिरा** वि. ज्याचे शिर उंच आहे असा; उंच बांधणीचा; चांगला उंच : 'चौथा मजला उंचशिरा करी बहार आकासीं ।' – प्रला ९५.

**उंचश्रवा** पु. इंद्राचा घोडा : 'उंचश्रवा न सवरेची' – उषा १६७९.

**उंचसखल** वि. खडबडीत

**उंचस्कंध कुऱ्हाड** (पुरा.) ताम्रपाषाणयुगातील सिंधू संस्कृतीच्या काळी वापरात असलेली, पूर्वभारतात सापडणारी, दगडी किंवा तांब्याची उंचस्कंध (उभा खांदा ) असलेली कुऱ्हाड.

**उंचा** वि. १. उच्च प्रकारचा; महत्त्वाचा; अधिक योग्यतेचा; नामी; गुणाने श्रेष्ठ असा : 'नीचिये कुळीचा उंचा वंद्य होय ।' – तुगा २४२०. २. अधिक मौल्यवान; किंमतवान. [सं. उच्च]

**उंचाड** न. उंचवट्याची जागा; लहान टेकडी; चढणाची जागा; टेंब; टेकाड. वि. उंच; उन्नत; तुंग; भव्य. पहा : **उंचवट** [सं. उच्च]

**उंचापुरा** वि. उंच व सुदृढ; भव्य; धिप्पाड; पूर्ण वाढलेला : 'जी उंचीपुरी व धट्टीकट्टी जवानमाणसे असत तीच युद्धात उतरत.' – आआ ३२. [सं. उच्च+पूर्ण]

**उंचाफेर** पु. घोड्याची एक प्रकारची चाल – अश्वप १९४.

**उंचावणी** स्त्री.१. उठावणी : ' करोनि शब्दांची उंचावणी । मग लंचु खंडिला तिसा नाणी ।' – ख्रिपु २.४५.३३. २. (ल.) गौरव; मोठेपणा. [सं. उच्चय]

**उंचावणे** अक्रि. १. उंच होणे; वाढणे : 'एथ उंचावे तेणें नाम । नैमित्तिक होय ।।' – ज्ञा १८.११४. २. वक्षःस्थल उन्नत होणे. ३. उंच जाणे, उडणे; भरारी मारणे. ४. (ल.) सुस्थिती प्राप्त होणे; उत्कर्ष होणे. ५. फुगून जाणे : 'तेवी प्रिय वस्तु पाये । आणि सुखें जो उंचावे ।' – ज्ञा १३.८०६.
सक्रि. १. चढविणे; वर उचलणे; उठवणे; उंची वाढवणे; वर करणे : 'शेष धावला तत्क्षणा । उंचावूनि फणा ।' – कृष्णाचा पाळणा १०. २. मोठेपणा आणणे : 'आम्हां मानवातें उंचवीती मातें ।' – टिक १३५.

**उंची** स्त्री. १.पदार्थाच्या खालच्या भागापासून वरच्या भागापर्यंतच्या व्याप्तीचे प्रमाण, माप; तळापासून शेंड्यापर्यंतचे प्रमाण. २. (विहीर वगैरेची) खोली. (राजा.)
वि. अधिक चांगला; सरस; श्रेष्ठ; जास्त किमतीचा. 'महाराष्ट्रांत ही एकच उंची संस्था होती.' – केले १.२९८. [सं. उच्च]

**उंची** शअ. वर; उंचीवर; शेंड्यावर; कळसावर; उपरि. उदा. पर्जन्यकाळीं मीठ चुलीउंची ठेवावें म्हणजे पाघळत नाही.' (राजा.) [सं. उच्च]

**उंची देणे** सक्रि. हरभऱ्याच्या झाडावर चढवणें; हुरळावयास लावणे;

चढविणे; गर्वाने फुगविणे; भर देणे . (व.)

**उंचीव** स्त्री. उंची; उंचपणा : 'उंचिवे जैसा प्रचंड ताळ.' – मुसभा ८.३८. [सं. उच्च]

**उंचून** क्रिवि. वरून; उंचावरून; शेंड्यावरून; डोक्यावरून. (क्रि. वाढणे, टाकणे.).

**उंचेला** वि. उंच; उंच नसलेला; उंचसर; वर आलेला; उन्नत; उत्तुंग; उंचसा. [सं. उच्च]

**उंचोडा** वि. उंच : 'जेवि मार्ग मिरवे उंचोडा ।' – ऋम ७६३.

**उंछवृत्ति–त्ती** स्त्री. शेत कापून नेल्यावर राहिलेले दाणे टिपून त्यावर निर्वाह करणे; रस्ता, बाजार इ. ठिकाणी पडलेले धान्याचे कण वेचून त्यावर निर्वाह करणे : 'ऐक त्यांचे जीविकावर्तन । शिल कां उंछवृत्ती जाण ।' – एभा १७.४१४.

पु. अशा प्रकारे निर्वाह करणारा, उंछवृत्तीने राहणारा तपस्वी. [सं.]

**उंट** पु. १. पाठीवर एक किंवा दोन मदारी असलेला, लांब व उभट मानेचा, सपाट पायांचा, रवंथ करणारा, चतुष्पाद, सस्तन, पाळीव पशू. ओझे वाहाणे इत्यादी कामासाठी उपयोगी. वाळवंटाच्या प्रदेशात उंटाशिवाय दुसरे कोणतेही जनावर वाहतुकीला उपयोगी नसते. २. बुद्धिबळाच्या खेळातील एक मोहरे. याची गती सर्व बाजूंनी तिरपी असते व तिची मर्यादा पगाच्या अखेरपर्यंत असते. [सं. उष्ट्र] (वा.) **उंटावरचा शहाणा** – मूर्खपणाची मसलत देणारा. (रांजणात रेडकाचे डोके अडकले असताना एका उंटावर बसून जाणाऱ्याने आत येण्याकरिता घराची भिंत पाडण्यास सांगून नंतर रेडकाची मान कापून मग रांजण फोडावा असा सल्ला दिला, या गोष्टीवरून) : 'तिसरे एक उंटावरील असे विचारतात ...' – लोटिकेले ४.४१. **उंटावरून शेळ्या हाकणे** – बसल्या जागेवरून न उठता दुसऱ्याकडून काम करून घेणे; अतिशय आळस किंवा हलगर्जीपणा करणे. **उंटावर बसून दक्षिण दिशेस जाणे** – एक अपशकुन; दुश्चिन्ह . **उंटभर सुया कबूल करणे** – काहीतरी भलतीच व जी बहुधा करायची नाही अशी गोष्ट कबूल करणे; एखाद्याची समजूत करण्याकरिता वेळेपुरती अशक्य अटही मान्य करणे : 'यांनी उंटभर सुया कबूल करून शेवटी ... हा तंटा कसातरी मिटला.' – प्रति आत्म ४८८. **उंट कलावर बसणे** – अदमास न लागणे. उंट केंव्हा पुढचे पाय आधी दुमडून खाली बसतो तर केव्हा मागचे पाय दुमडून बसतो. ही अनिश्चितता असल्यामुळे वर बसणाऱ्याला अनपेक्षितपणे धक्के खावे लागतात. या अर्थी हा वाक्प्रचार रूढ झाला : '.. एवंच कोण्या कलावर उंट बसेल कळेना.' – होकै १०३.

**उंटअळी** स्त्री.एक प्रकारची अळी. एका ठिकाणाहून दुसरीकडे जाताना या अळीचा वर उचलेला मधला भाग उंटासारखा दिसतो.

**उंटप्रवेश** पु. १. उंटाने केलेला प्रवेश. २. (ल.) चंचुप्रवेश; थोडासा शिरकाव : 'हिंदुस्थानांत कापडाच्या धंद्यात गिरण्यांचा उंटप्रवेश होण्यापूर्वी कसब या दृष्टीनें हा धंदा पराकोटीस पोचला होता. ' – के १५.८.४१.

**उंटमान्या** वि. उंटासारखी ज्याची मान आहे असा; विशोभित; उंटाड.

**उंटवान** पु. उंट हाकणारा; सारवान.

**उंटाचे बोथे** न. शिकवलेले उंटाचे पिल्लू.

**उंटाड** वि. न शोभण्यासारखी उंची असलेला; उंटासारखा उंच. [सं. उष्ट्राढ्य]

**उंड** पु. पोटात उठणारा वायूचा गोळा.

**उंड** स्त्री. उंडीण वृक्ष. याच्या फळातील बियांचे तेल काढतात.

**उंडकी लागणे** सक्रि. गोळी मध्ये येणे; (शेती) पाभरीचे बेर (भोक) माती लागून बंद होणे आणि त्यामुळे खाली धान्य न पडणे.

**उंडगणे** अक्रि. उनाडणे; भटकणे : 'आस्ट्रेलियांत पुष्कळदां पुरुष घरांत चुल्लिकाराधन करीत असून, बायका रस्त्यांतून बाजारहाट करीत उंडगत आहेत असा चमत्कार दृष्टीस पडतो.' – महाराष्ट्र २६.६.१९३०. [क. उडिग= फटिंग]

**उंडगळ, उंडगा, उडगा** वि. निरुद्योगी; कामचुकार; उडाणटप्पू; भटक्या (मुलगा) : 'शक्यतर उंडगा मासा मारण्याचा मी प्रयत्न करी.' – माआ ३३३. [क. उंडिग]

**उंडगा, उंडगादगड** पु. १. ओबडधोबड, खडबडीत धोंडा; ठोकळा; आडा. २. दांडगा, उद्धट मुलगा. [क. उंडिग]

**उंडगेपणा** पु. काम न करता भटकत राहणे; उनाडपणा.

**उंडगे मासे** ज्यांना पिले झाली नाहीत असे मासे.

**उंडण, उंडणी** स्त्री. कीड; आळी : 'उंडणी लंघू न शके भिंतीसी ।' – एभा ५.९३.

**उंडण, उंडणी** स्त्री. उंडी; उंडीचे झाड. हे झाड कोकणात होते. याची पाने सुरंगीच्या पानांसारखी मोठी, गुळगुळीत, स्वच्छ असून पत्रावळी करता येण्यासारखी असतात. फूल पांढरे, सुवासिक असते. फळे सुपारीएवढी. बियांचे तेल जाळायच्या उपयोगी पडते. त्यास उंडेल म्हणतात. हे खरजेवर औषधी आहे. [सं. पुन्नाग]

**उंडरणे** अक्रि. माजणे; मातणे; उन्माद येणे.(व.) [क. उंडिग]

**उंडल** स्त्री. उंड; उंडणीचे झाड व तिचे फळ. पहा : **उंडण**

**उंडलीण** स्त्री. उंडीण.

**उंडलेल** न. उंडीच्या बियांचे तेल; उंडेल.

**उंडवळ** वि. कामचुकार. पहा : **उंडगळ**

**उंडळ** स्त्री. उंडी; एक झाड व त्या झाडाचे फळ.

**उंडा** पु. १. भिजवलेल्या पिठाचा गोळा (भाकरी, पोळी करण्यासाठी तयार केलेला). २. उडीद व तांदूळ यांच्या पिठाचे गोळे करून शिजवून एक खाद्यपदार्थ तयार करतात तो : 'खाजी करंजी, घ्याजी दाजी, आग्रह करिती, साखरमांडा, उंडा भर पुरणाचा धोंडा।' – अमृत ७३. ३. गोळा : 'तोचि दधी भाताचा उंडा वामकरी ।' – दाव ३८५. ४. लाडू; गुंडाळे (उंडी=लाडू). (कर्ना.) ५. आळवाच्या पानांच्या वड्या करण्याकरिता पानांस पीठ लावून ती गुंडाळून त्यांचे किंवा कळण्याचे लांबटगोल आकाराचे गोळे करतात ते. नंतर ते शिजवून, कापून, तळून वड्या करतात.

**उंडारकी** स्त्री. उनाडकी : 'धाकटा भाऊ गावात उंडारक्या करायचा.' – एस्पुडा ४९.

**उंडारणी** स्त्री. १. माज; मस्ती; गर्व; ताठा; ऐट; अभिमान; खुमखुमी. २. स्वैर वर्तन. ३. उनाडकी; उणगणे; खेळणे.

**उंडारणे** अक्रि. १. माजणे; मस्तीला येणे; उद्धट होणे. २. स्वैर वर्तन

करणे : 'छिनाल छबकड्या उंडारतात.' – इंप ६२. ३. उनाडकी करणे; उडाणटप्पू बनणे. [क. उंडिग]

**उंडी** स्त्री. उंडा याचं लघुत्ववाचक. पहा : **उंडा**. १. गोळा; घास : 'जैसी थापे लोणियाची उंडी ।' – ज्ञा ११.४५७. २. भाताची मूद; पिंड; घास : 'ना तरी भस्माग्निच्या तोंडी । न पुरे भाताची उंडी ।' – ज्ञाप्र ७०३. ३. बळी; नैवेद्य : 'नवसियां देती उंडी । बाळकांची ।।' – ज्ञा १७.९७. ४. खीर करण्यासाठी तांदूळ इत्यादिकांच्या पिठाच्या केलेल्या गोळ्या. ५. आमिष; पिठाची गोळी : 'उंडीस देखोनि मासा भुलला । गिळितां कंठी गळ टोचला ।' – मवि २.१६०. (वा.) **उंडी उकळणे, उंड्या उकळणे** – भिक्षा मागणे; आगंतुकी करणे (दुसऱ्यावर अवलंबून असणाऱ्याबद्दल वापरतात).

**उंडी** स्त्री. उंडीण झाड व त्यांचे फळ; ज्याच्या बियांपासून जाळायचे किंवा खरजेवर लावायचे तेल काढतात असे कोकणात होणारे एक झाड : 'गावात उंड्या गोळा करून अर्धेलीच्या करारावर गाळण्याचा त्यांचा मुख्य व्यवसाय होता.' – एल्गार ३६. पहा : **उंडण** (कों.)

**उंडीण** पहा : **उंडण**

**उंडीबकाल** वि. भोजनभाऊ. (राजा.)

**उंडूगाडा** पु. भरीव चाकाचा गाडा. (व.)

**उंडेकार** वि. पाव करणारा, विकणारा. (गो.) [क. उंडे]

**उंडेल** न. उंडिणीच्या फळातील बियांचे तेल. याचा जळणाकडे व गुरांच्या अंगावर माशा बसू नयेत म्हणून उपयोग करतात. (कों.)

**उंदरनळी** स्त्री. मेटाच्या वरच्या बाजूला असणाऱ्या नळ्यांपैकी प्रत्येक नळी; गुडघ्याच्या सांध्याच्या वरच्या बाजूला असलेली नळी. (माण.)

**उंदरी–उंदिरी** स्त्री. उंदराची मादी.

**उंदरी** स्त्री. डोक्यावरील केस गळून पडतात असा रोग; चाई; कातरी. मनुष्येतर प्राण्यालाही हा रोग होतो. (लोकर गळून पडते).

**उंदऱ्या** स्त्री. अव. १. विशाखा नक्षत्र. २. त्यात पडणारा पाऊस. विशाखा नक्षत्राजवळ सूर्य असताना पडणाऱ्या पावसामुळे उंदीर, साप वगैरे विषारी प्राणी व वनस्पती उत्पन्न होतात अशी समजूत आहे.

**उंदऱ्यामांजऱ्या** स्त्री. १. विशाखा व अनुराधा ही दोन नक्षत्रें. २. त्या नक्षत्रात पडणारा पाऊस; विशाखा नक्षत्रांतील पावसामुळे जे विनाशक प्राणी, वनस्पती उत्पन्न होतात ते अनुराधा नक्षत्रातील पावसामुळे नाहीसे होतात.

**उंदीर** पु. घरात, शेतात, मालाच्या कोठारात बिळे करून राहणारा, कुरतडणाऱ्या प्राण्यांच्या जातीतील साधारण मुठीएवढा प्राणी; आखू; मूषक हा पिकांची, धान्याची वगैरे नासाडी करतो. प्राचीन भारतीय ग्रंथकारांनी उल्लेखिलेल्या उंदरांच्या जाती – सालन, पुत्रक, कृष्ण, हंसिर, चुछुंदर, अलस, कषायदंत, कलिंग, अजित, कपिल, कोकिल इ.; घरगुती, रानटी व पिकाच्या हंगामाच्या वेळी उत्पन्न होणारे असे उंदराचे तीन प्रकार आधुनिक प्राणिशास्त्रज्ञांनी केलेले आहेत. (वा.) **उंदीरतोंडी करणे** – उंदराप्रमाणे ठिकठिकाणी कुरतडून भोसके पाडून टाकणे. **डोंगर खणून, पोखरून उंदीर काढणे** – मोठे प्रयास करून फार थोडी कार्यनिष्पत्ती होणे; अचाट परिश्रमाचे अल्प फळ.

**उंदीरकानी** स्त्री. लहान वेल. हिची फुले गुलाबी रंगाची असून पाने उंदराच्या कानासारखी असतात. ही वेल फार उष्ण असून चीक पाचक असतो. सर्पदंशांवर व पुरुषत्व प्राप्त होण्यासाठी फारच गुणकारी असते. उंदराच्या विषावर या वनस्पतीचा रस पोटात घेतात.

**उंदीरखाद** स्त्री.१. उंदरांचा शेतास उपद्रव : 'कीडखाद टोळखाद व उंदीरखाद आसमानी सुलतानी जाहाली असतां व स्वारीमुळे नुकसानी जाहाली असतां चौकसी करून मजुरा घ्यावयाची चाल आहे.' – हकिकत तर्फ नाते तालुके रायगड (मसाप २.१८३). २. एक सरकारी कर. सरकारी कोठारातील धान्य उंदीर खात असत म्हणून ते नुकसान भरून काढण्याकरिता हा कर बसवितात.

**उंदीरखुरी, उंदीरनखी, उंदीरगेळ** स्त्री. १. जनावरांच्या खुरांच्या वर पाठीमागच्या बाजूला पुढे आलेला मांसल भाग. २. (काही ठिकाणी) खुरांची दोन गेळे.

**उंदीरबिब्बी** कर्नाटकात गणेशचतुर्थीच्या दुसऱ्या दिवशी येणारा कनिष्ठ समजल्या जाणाऱ्या जातीतील सण. या दिवशी गोड कडबोळी तळून नैवेद्य दाखवतात व तो दुसऱ्या दिवशी पहाटे शेताच्या सीमेवर नेऊन ठेवतात. उंदरांनी शेताची नासाडी करू नये म्हणून हा सण पाळतात.

**उंदीर मांजर** न. मुलींचा एक खेळ.

**उंदीरवासा** पु. घरातील भिंतीचा वरील भाग आतील बाजूस उतरता असल्यास छप्पर व वासा यामध्ये उंदराला फिरायला जागा राहाते म्हणून तेथे असणाऱ्या वाशास हा शब्द लावतात. ही जागा बहुधा उंदरांचा त्रास वाचविण्यासाठी चुन्याने भरून काढतात.

**उंदीरसांध** उंदरांना वावरण्यास असलेली मोकळी जागा.

**उंब** पु. एक मोठा वृक्ष.

**उंबई** पहा : **ओंबी** (ना.)

**उंबत्रा** पु. उंबरा; उंबरठा; दाराच्या चौकटीचे खालचे किंवा वरचे लाकूड. [सं. उंबर]

**उंबर** पु. १. एक वृक्ष. याला अंजिरासारखी फळे येतात. हिरव्या फळांची भाजी करतात. याचे लाकूड चिवट असते. सालीचा रस औषधी असतो. २. उंबरवडा; वायनासाठी भोक न पाडता केलेला वडा.
न. १. उंबराचे फळ. २. एक पक्वान्न. पिकलेले केळे तांदळाच्या पिठात कुस्करून आत साखर घालून त्याच्या गोळ्या करून त्या भज्याप्रमाणे तुपात तळतात. ३. फणसाचे गरे कुस्करून त्यात तांदळाचे पीठ भिजवून ते पुरीप्रमाणे थापून तेलात अथवा तुपात तळतात : 'पुरिया उंबरवाणे तळिती ।' – वसा ८. [सं. उदुंबर]

**उंबर** स्त्री. उमर; वय : 'एवढी उंबर झाली भेट दिली नाही कोणाला ।' – ऐपो १८. [फा. उम्र]

**उंबर** वि. दमट; ओलसर; पावसाळ्यात बहुतेक पाणी साचणारी, पाणथळ (जमीन). अशा जमिनीत पावसाळी पीक होत नाही, उन्हाळी पीक मात्र होते. (राजा.)[क. उब्बे]

**उंबरघाट** पु. (उंबरा हाच कोणी घाट यावरून) पुढील दाराच्या चौकटीचे खालचे लाकूड. (वा.) **उंबरघाट ओलांडणे, सुटणे** – (उप.) घरातून बाहेर पडणे. घरातून क्वचित बाहेर पडणाऱ्या व्यक्तीला योजतात.

**उंबरठा, उंबरडा** पु. १. घराच्या पुढच्या दाराच्या चौकटीचे खालचे लाकूड; उंबरा. २. उंबऱ्याच्या आसपासचा प्रदेश. ३. (ल.) घर. [सं. उंबर+स्था]

(वा.) **उंबरठा चढणे** – शिरणे; प्रवेश करणे. **उंबरठा न चढणे** – मुळीच न जाणे; प्रवेश न करणे; जाण्याचे बंद करणे.

**उंबरपट्टी** स्त्री. घरपट्टी.

**उंबरवट** पु. उंबरा; घराच्या दाराच्या चौकटीचे खालचे लाकूड : 'ते राजद्वार नमस्करोनि । देखे उंबर वटु ।' – ऋ ६०.

**उंबरा, उंमरा** पु. १. दाराच्या चौकटीचे खालचे लाकूड, दगड इ. २. (ल.) घर; वस्ती. [सं. उंबर] (वा.) **उंबरा चढणे** – घरांत जाणे. पहा : **उंबरठा चढणे. उंबऱ्याची साल काढणे, उंबऱ्याची माती राहून न देणे, उंबरा झिजविणे** – एखाद्याच्या घरी एकसारख्या येरझारा घालणे ; वरचेवर जाणे.

**उंबराचे फूल** (ल.) (उंबराचे फूल अदृश्य असल्यावरून) दुष्प्राप्य, दुर्मिळ वस्तू; क्वचित भेटणारा मनुष्य : 'आतांशा अगदीं उंबराचंच फूल झालं आहे.' – सागोप्र ३.१.

**उंबरेड** पु. उंबरठा. (व.)

**उंबऱ्या** वि. उंबरासारखा लाल रंगाचा (घोडा).

**उंबला, ओंबील** पु. (झाडावर वगैरे आढळणारा) १. तांबडा मुंगळा, मुंगी. २. वाळवी.

**उंबले** न. पोहे किंवा लाह्या करण्यासाठी आधण घालून ठेवलेले भात. [क. उब्बे]

**उंबळ –ळी** न. पावसाळ्यात जमिनीतून झरे वाहू लागणे. (गो.)

**उंबळणे** सक्रि. १. साबण वगैरे लावून (घरीच) कपडे धुणे. २. सुपाने विशिष्ट प्रकारे हालवून कण्या व पीठ किंवा कोंडा वेगळा करणे. पहा : **उभळणे.** (गो.)[क. उब्बळ=कोंडा]

**उंबळणे** सक्रि. (सोनारी) सोन्याचे बारीक तुकडे करून ते एकमेकांवर ठेवून त्या तुकड्यांना मोरचूद वगैरे लावून ते शेगडीत तापवून त्याचा आकार न बदलता ते एकजीव होतील असे करणे.

**उंबळा** पु. उचला, तात्पुरता, आटोपशीर संसार. (कर.)

**उंबळे** वि. धुतलेले, खळबळलेले (वस्त्र). (गो.)

**उंबारणे** अक्रि. ढगाळणे : 'आभाळ अजून उंबारलेले होते.' – जांदि ६८.

**उंबाळा** पु.पेरू. (को.)

**उंबी** स्त्री. धान्याचे (गहू वगैरेचे) ओले कणीस; ओंबी. [सं. उंबी]

**उंबील** पहा : **उंबला**

**उंबूर** पु. बाजरीचा हुरडा; निंबूर; लिंबूर. (व.) [सं. उंबी = हुरडा]

**उंवला** पु. हरभरे, पावटे वगैरेचा सोलाणा. (राजा.) [सं. उद्+वल्]

**उंवाळ्लला** वि. १. ओवारलेला. २. (ल.) वाईट स्वभावाचा, कोणास नको असलेला. (गो.)

**उंशील, उशेल** न. उसाचा फड; उसाचे शेत; उसाची लागवड. (राजा.) [सं. इक्षु]

**उंहूं** उद्गा. नव्हे, नाही, नको या अर्थी; नकारार्थी अव्यय : 'उपसी परि गांभीर्ये आपण न उहूं म्हणोनि त्या विटवी.' – मोसभा ५.८६.

**उ:शाप, उश्शाप, उश्राप, उच्छाप** पु. शापनिवृत्ती; शापमोचन; शापाची तीव्रता कमी करणारे वचन, वर. [सं. उत्+शप्]



**['ऊ' वर्णाने सुरू होणारे काही शब्द येथे न आढळल्यास 'उ' वर्णाखाली पाहावेत.]**

**ऊ** १. मराठी वर्णमालेतील सहावा वर्ण; मराठी स्वरमालेतील सहावा स्वर. स्थानपरत्वे ऱ्हस्व किंवा दीर्घ. उदा. भूशिर, मूर्ती इत्यादींमध्ये ऱ्हस्व; तू, शूर इत्यादींमध्ये दीर्घ. २. शंकर – चंद्रवाचक शब्द.

**ऊ** स्त्री. एक माप (८उवा=१ यव).

**ऊ** सना. (तृतीय पुरुषी एकवचनी.) तो, ती, ते : 'बाद ऊ अवलाद व अहफाद त्यासी करणे.' – मईसा १५.३६४. [फा. ऊ= तो]

**ऊ** स्त्री. केसांत किंवा मलीन वस्त्रात उत्पन्न होणारा व चावणारा एक लहानसा सहा पायांचा व काट्याची सोंड असलेला किडा. [सं. यूका]

**ऊ टिचणे :** ऊ मारणे.

**ऊख** पु. ऊस. [सं. इक्षु]

**ऊचवड** पहा : **उंचवट** : 'जे अवसरा पैलीकडे । ब्रह्मस्वरूप ऊचवडें ।' – ज्ञाप्र ५३५.

**ऊचा** पहा : **उंच** : 'देवता एकी उचा : एकी निचा.' – चक्रसूत्र ४५.

**ऊचा चौफेर** घोड्याची एक चाल.

**ऊट** स्त्री. १. गाडीच्या चाकाला गतिरोध करण्यासाठी आडवा लावलेला दगड; ठेपा; टेका; आधार (क्रि. देणे). पहा : **उटी.** २. चाकाला येणारा अडथळा (दगड, उंचवटा, बांध यांचा). (क्रि. लागणे). (वा.) **ऊट उतरणे** – १. ताठा, गर्व नाहीसा करणे; नम्र करणे; वठणीला आणणे. २. भिकेला लावणे; धुळीला मिळवणे; नाश पावणे. ३. (संकट, अपमान इत्यादींच्या) उताराला लागणे.

**ऊठ, ऊड** पु. जोंधळ्यावरील एक रोग.

**ऊठउठी** पहा : **उठाउठी** : 'एक म्हणती ऊठउठी । चाल घेऊं हरीची भेटी । घालूं हरिचरणी दृढ मिठी । प्रेम पोटीं न समाये ।' – हरि १६.१८८.

**ऊठना उबड** पुरून उरण्याइतका जिनसांचा पुरवठा. (क्रि. होणे). (व.)

**ऊठपाय** क्रिवि. १.एका पायावर तयार (जायला, करायला); सदा उभा. २. (ल.) उठल्याबसल्या; उठल्यासुटल्या; सदानकदा; सारखे तेच; फिरून फिरून.

**ऊठबशी, ऊठबस, ऊठाबशी** स्त्री. १. उठणे व बसणे; वारंवार उठण्याबसण्याची क्रिया; शाळेतील शिक्षेचा एक प्रकार; २.(तालीम) व्यायामाचा एक प्रकार; बैठका मारणे. (क्रि. काढणे). पहा : **ऊठबैस**

**ऊठबैस** स्त्री. १. अस्थिरता; चंचलता. २. वावर; जाणे येणे. ३. मान देणे. ४. तब्बेत सांभाळणे. (क्रि. करणे). पहा : **ऊठबशी**

**ऊठसूट** क्रिवि. परतपरत; नेहमीनेहमी; जेव्हाकेव्हा : 'ऊठसूट माझी उलटतपासणी करायला लागलीस.' – ऑक्टो १२७.

**ऊठी** स्त्री. बाकी; उचल; उचापत.

**ऊड** स्त्री. भिंतीतील लहान खिडकीच्या आतील भिंतीच्या रुंदीपर्यंतचा उतरता व पसरट होत जाणारा भाग (जास्त उजेड येण्यासाठी

ठेवलेला). (को.)

**ऊड** स्त्री. माया; कपट; दगा; धोका : 'प्रभु सूड घेइल पुढती अति ऊड करिन ।' – आप ६२. [सं. कूट]

**ऊणखूण** स्त्री. १. वर्म; रहस्य; गुपित; न कळणारी गोष्ट. पहा : **उणखूण** : 'हे जिव्हारांची ऊणखूण । तुज संपूर्ण सांगितली ।' – एभा ११.१५६०. २.प्रचीती; वाटाघाट; खात्री पटवणें; चर्चा : 'रिघोनि सद्गुरूस शरण । काढून शुद्ध निरूपण । याची करिसी ऊणखूण । प्रत्यक्ष आतां ।' – दास ६.१०.५२. ३. कमीअधिकपणा.

**ऊत** पु. पहा : **उतणे.** १. पदार्थ कढू लागला म्हणजे त्यातील पाण्याचा अंश, फेस वगैरे वाफेच्या जोराने वर उचलला जाण्याची क्रिया; उधाण; उकळी : 'भीमाचें यश लाजवि सुरभिक्षीराचियांहि ऊताते ।' – मोकर्ण ३८.२६. २. (ल.) फणफणाट; झणका; ताठा; डौल; उन्माद. (क्रि. येणे, जिरणे, जिरवणे.). ३. उत्कर्ष; भरभराट; मर्यादेबाहेरची स्थिती; अतिशयपणा (तारुण्याचा, संपत्तीचा, चिलटांचा इ.). ४. उसळी; आतून वर येणे : 'यमुनेच्या डोहावरी आला ऊत । काळ्या कृतांत धुधुकारें ।' – तुगा ५१. ५. (ल.) समुद्राची भरती : 'ये धर्मचमू भासे क्षुब्धाब्धीच्या उतासमा, राया ।' – मोभीष्म ९.१४. ६. उचंबळलेली मनोवृत्ती; गहिवर; आवेग. [सं. उत्] (वा.) **ऊत मारणे** – चेव नाहीसा करणे, मोडणे; फुगवटा (दुधावर आलेला) पाणी घालून नाहीसा करणे. **ऊत येणे** – अति होणे; अतिशयितता; परमोत्कर्ष; आत न मावण्याइतके पुष्कळ वाढणे : 'रूसी-जपानी युद्धाचे वेळी जपानातल्या आबालवृद्धांच्या देशाभिमानाला खरोखरीच ऊत आलेला दिसला.' – के

**ऊतककर** पु. (वन.) खोड, फांद्या व मुळे यांतील वाहक घटकांच्या सान्निध्यात असणारा आणि सतत नवीन वाहक घटक बनविणारा कोशिकांचा समूह.

**ऊतमात** पु. उन्माद; माज; उद्धटपणा; बेफिकिरी; रागीटपणाचे कृत्य; धुंदी; उर्मटपणा. (क्रि. करणे, मांडणे, उतरणे, जिरणे, जिरवणे.).

**ऊति-ती** स्त्री. (वै.) एक किंवा अनेक प्रकारच्या पेशी, त्यातील आंतरपेशीय पदार्थांसह एकत्रित होऊन संरचनात्मक शारीरवस्तू तयार करतात. हा शरीररचनेतील प्रमुख घटक आहे. हा वनस्पती किंवा प्राणी यांच्या शरीरबांधणीचे कार्य करतो. [सं.]

**ऊतिजनन** न. (वै.) ऊतींची उत्पत्ती होणे आणि त्या वेगळ्या ओळखता येणे या क्रिया. [सं.]

**ऊतिमृत्यु-त्यू** पु. (कृषि.) झाडांच्या पेशी कवकजन्य किंवा सूक्ष्मजंतूंच्यामुळे होणाऱ्या रोगाने मरणे. [सं.]

**ऊतिशास्त्र** न. (वै.) प्राण्यांच्या आणि वनस्पतींच्या ऊतींच्या अतिशय सूक्ष्म भागांचा अभ्यास करणारे शास्त्र, सूक्ष्मशरीररचनाशास्त्र.[सं.]

**ऊद** पु. विस्तवावर टाकला असता सुवास देणारा एका वृक्षाचा सुगंधी चीक (धूपासाठी जाळतात तो).ऊदाचे प्रकार १. भीमसेनी. २. जनार्दनी. ३. लोहबंदी. ४. कवड्या.

**ऊद** पु. एक वृक्ष विशेष. [अर.]

**ऊद** पु. मांजराच्या जातीचा एक प्राणी.

**ऊदकाडी, ऊदबत्ती** स्त्री. १. ऊदाने माखलेली काडी. पहा : **उदबत्ती** २. (उप.) बोंबील. (बोंबिल भाजत असता घाण सुटते म्हणून).

**ऊदफूल** न. उदाचे फूल. मडक्यात ऊद जाळतात व त्याच्या धुरापासून घनीकरण क्रियेने हे तयार करतात.

**ऊदाइन** न. (शाप.) बेंझाईन : एक जंतूनाशक औषध.

**ऊदान** पु. मरण; तीव्र ज्वर; सन्निपात : 'ऊदानाच्या सुकाळीं बडबड जवळीं ।' – गस्तो ५०.

**ऊदाम्ल** न. (रसा.) हे आम्ल शक्तिमान आहे. हे पोटात गेले असता मूत्रमार्गाच्या अंतस्त्वचेतील श्लेष्ममय पदार्थाला रोगबीजरहित करून उत्तेजित करते.

**ऊदिन** न. (शाप.) बेंझिन. दगडी कोळशाच्या डांबरात सापडणारे द्रव्य.

**ऊदिल अल्कहल** न. (रसा.) हा जाई, मोगरा इत्यादींच्या अत्तरात सापडतो. याला सौम्य सुगंध येतो. भानिल कर्बिनल.

**ऊदिल प्रायोज्जित** वर्णहीन सुंगधी द्रव्य; कडू बदामाचे तेल.

**ऊन** न. लोकर : 'दुलया उनाच्या, शालनामाच्या संजापदार.' – प्रसुतिकृत्यादर्श १. [सं. ऊर्णा]

**ऊन** वि. कमी; उणे; अपुरे; थोडे; न्यून. उदा. एकोन, पाऊण. [सं.]

**ऊन, ऊन्ह** न. सूर्याचा ताप; तेज; किरणांचा प्रकाश; ओघ; ओपाळी : 'सभ्य जनीं हित पृच्छक, सोसार्तहि कोण गा । नये ऊनीं ।' – मोसमा ४.१०८.

वि. गरम; कढत; उष्ण.[सं. उष्ण] (वा.) **ऊन खाणे** – उनात बसणे. **ऊन तावणे** – सूर्यकिरण जास्त प्रखर होणे. **ऊनतहान म्हणणे, ऊनतहान पाडणे, ऊनतहान मानणे** – (नकारार्थी प्रयोग) काही संकटांची वगैरे पर्वा न करता कामाला लागणे; काही सबबी न सांगता ताबडतोब निघणे.

**ऊन ऊन आग** वि. १. जळजळीत; कडक; होरपळण्यासारखे; चटका बसण्यासारखे. २. (ल.) ताजे; गरम; उष्ण; नवे कोरे; नुकतेच केलेले.

**ऊनपाऊस** पु. १. ऊन आणि पाऊस; नागवा पाऊस; सूर्याचे ऊन पडले असताना पडणारा पाऊस. २. (ल.) सुखदु:खाचा, हर्षामर्षाचा चक्रनेमिक्रम; चांगल्या वाईट दिवसांचे रहाटगाडगे.

**ऊनपारखा** वि. आयुष्यातील अडचणींचा अनुभव नसणारा; नाजूक; श्रीमंतीत लोळणारा.

**ऊनवारा** पु. झळई; अहळी; ऊन, दाह करणारा वारा. (वा.) **ऊनवारा लागणे, ऊनवारा सोसणे** १. (नकारार्थी प्रयोग) संसारातील अडीअडचणींना पारखा असणे. २. (होकारार्थी प्रयोग) सर्व संकटांना तयार असणे; सर्व प्रकारची परिस्थिती सहन करणे. **ऊन उतरणे, ऊन परतणे** – ऊन कमी होणे.

**ऊनव्यापक विभाजन दोष** (तत्त्व.) अव्यापक विभाजन दोष; विभाजन प्रक्रियेचा एक दोष; आवश्यक असणारा पोटविभाग विभाजनाच्या प्रकियेत गाळल्यामुळे उत्पन्न होणारा दोष. उदा. त्रिकोणांची समभुज आणि समद्विभुज त्रिकोणात केलेली विभागणी.

**ऊनाशाही** वि. माळव्यातील ऊना या गावी तयार होणारी (तलवार).

**ऊनित** वि. उणे, कमी असणे. पहा : **ऊन**

**ऊनोक्ति-क्ती** स्त्री. १. अर्थाच्या रास्त वजनापेक्षा कमी वजनाचे शब्द वापरणे. २. हीनतादर्शक, लघुतादर्शक शब्दयोजना : 'मोठ्या गोष्टीला लहान स्वरूप देणे हे ऊनोक्तीचे लक्षण आहे.' – हास्य ३२. [सं.]

**ऊन्य** न. (ग.) वजाबाकीमध्ये वजा करायची संख्या. [सं.]

**ऊपाळणे** सक्रि. उपाळणे; उपटणे : 'किती ये ऊपाळती लाग वेगे.' – राक २५. [सं. उत्पाटन]

**ऊब** स्त्री. १. निर्वातस्थळी, कोंदटपणामुळे उद्भवणारी उष्णता; गरमपणा. २. शिजणाऱ्या पदार्थापासून निघणारी वाफ. ३. विस्तवाची अथवा तापलेल्या पदार्थाची उष्णता, धग : 'तेवींचि वन्हित्व आंगी । आणि उबे उबगणे आगी ।' – ज्ञा १८.२२०. ४. प्राण्यांच्या अंगची उष्णता. ५. उष्ण हवा; गरमी, उकाडा. ६. (ल.) विद्या, संपत्ती इत्यादीचा गर्व, ताठा त्यामुळे अंगी असलेला आत्मविश्वास, धमक, भरवसा. ७. सुख; साधन; आधार. (वा.) **ऊब जिंकणे** – भीड किंवा दरारा चेपणे; भीती नाहीशी होणे; परिचय, स्नेह होणे. **ऊब जिरवणे** – रग उतरविणे; नांगी तोडणे; हड्डी नरम करणे. [क.उब्बे=उष्णता, वाफ]

**ऊर** पु. न.१. पोटावरचा आणि गळ्याखालचा पुढल्या अंगाचा भाग; छाती : 'किंवा व्याघ्र व्याघ्रा भेदी प्रखरें शिलीमुखें उर गा ।' – मोभीष्म ९.२४. २. (स्त्रियांचे) स्तन; वक्षःस्थल : 'तों तों तिचा ऊर भरींव दिसोनि येतो.' – नळ ७०.[सं. उरस्](वा.) **ऊर उलणे** – अतिशय दुःख होणे : 'परतेल काय ऐकुनि हें साध्वींचीं उरेचि उलतिल कीं ।' – मोवन १२.९८. **ऊर काढून चालणे** – ऐटीत चालणे; बेमुर्वत वागणे. **ऊर दडपणे** – भय, लाज, मत्सर वगैरेंनी धैर्य नाहीसे होणे; उत्साह नष्ट होणे; भीती वाटणे. **ऊर दबणे, ऊर बसणे** – गांगरून जाणे; भयचकित होणे. पहा : **ऊर उलणे, ऊर दाटणे, ऊर भरणे**– (दुःख, प्रीती यामुळे) गहिवरून येणे; छाती भरून येणे; बांध बसणे. **ऊर पिकणे** – १. कफ दाटणे व त्यामुळे घसा बंद होणे; अतिश्रमाने छातीला ताण बसणे. २. (ल.) त्रास, छळ होणे. **ऊर पिकवणे** – त्रास देणे : 'पदोपदीं येऊनिं शीकवीला । तथापि तेणे उर पीकवीला ।।' – सारुह २.१४. **ऊर फाटणे** – कल्पनातीत दुःख होणे. पहा : **ऊर उलणे, ऊर दबणे :** 'फाटे उर शोकाने बहु निंद्य क्षत्रधर्म त्या वाटे ।।' – मोअश्व ५.३९. **ऊर फुटेपर्यंत काम करणे** – सहन होणार नाही इतके श्रम करणे. **ऊर फुटणे** – १. दुःख असह्य होणे. २. (स्त्रियांना उद्देशून) स्तनांचा उद्गम होण्याच्या वयाला येणे. ३. हृदयविकार होणे; छाती फुटून निकामी होणे (घोडा). ४. शोकाने, काळजीने व्याकूळ होणे; दुःख असह्य होणे; उरी फुटणे. ५. हिंमत चालणे, होणे.(व.) **ऊर फोडणे, ऊर फोडून काम करणे** – १. अतिशय श्रम करणे. २. आहाराबाहेर काम करून गळाटणे; मेट्यास येणे. **ऊर बडवणे** – छातीवर हात मारून शोक करणे; दुःखशोक प्रदर्शनार्थ छातीवर हात मारणे. **ऊरस्फोड करणे, ऊर फोडणे** – अतिशय श्रम करणे. **ऊरापोटी करणे, उरापोटी धरणे, उरापोटावर उचलणे** – १. अतिशय श्रम करून काम करणे, चालविणे, उचलणे. पहा : **ऊर फोडणे** : 'अहो! उरापोटीं करीन कसें तरी झालं ।' – एकच प्याला. २. प्रेमाने वागवणे; छातीशी धरणे; घट्ट मिठी मारणे. **ऊराला हात लावणे** – सत्यता, आत्मविश्वास, निश्चय, धमक दाखवण्यासाठी छातीला हात लावणे. **ऊरावर घालणे** – (शिवी) मनात नसताना नाइलाजाने एखाद्याला देणे, देणे भाग पडणे : 'गोणीभर होन ब्राह्मणांच्या उरावर घातले.' – नामदेव नाटक १०५. **ऊरावर असणे** – एखाद्यावर अधिकार चालवणे – सत्ता असणे; एखाद्याच्या डोक्यावर असणे. **ऊरावर घेणे** – १. अतिशय कठीण काम पार पाडण्यासाठी अंगावर घेणे, स्वीकारणे. २. (ल). (शिवी–स्त्रियांच्या बाबतीत) संभोग देणे, **उरावर धोंडा ठेवणे.** – १. (ल.) स्वतःचे मनोविकार दाबून धरणे; मन घट्ट करणे; भावना दडपणे. २. एखाद्याला अतिशय कठीण काम करायला सांगणे; (पूर्वी मोगलाइत सरकारी वसूल करण्यासाठी शेतकऱ्यांच्या उरावर धोंडा ठेवीत असत यावरून) सक्ती करणे : 'कोणी तुमच्या उरावर धोंड ठेवली होती?' – नाकु ३.१५. **ऊरावर बसणे** – १. छातीवर बसणे; बोकांडी बसणे. २. (ल.) टाळता न येणारे काम अंगावर येऊन पडणे, त्यामुळे असहाय्यता येणे. ३. मागे लागून निकडीने काम करून घेणे. ४. पुरुषाने एखाद्या स्त्रीवर बलात्कार करणे; स्त्रीसंभोग करणे. **ऊरावर हात ठेवणे, ऊरावर हात लावणे, सांगणे, ऊरावर हात ठेवून किंवा लावून बोलणे** – शपथपूर्वक वचन देणे; एखाद्याबद्दल खात्रीने सांगणे. **ऊराशी धरणे** – १. आलिंगन देणे. २. नम्रपणाने प्रार्थणे. ३. काही झाले तरी (हाती घेतलेले काम) शेवटाला नेण्याचा निश्चय करणे. ४. स्वीकारणे; पत्करणे; आपले म्हणणे न सोडणे. **ऊरावर शेगडी** – अतिशय दुःख, विवंचना; त्रास. **ऊराशी बाळगणे** – (इच्छा) मनात ठेवणे; एखादी इच्छा किंवा ध्येय डोळ्यांसमोर ठेवणे. **ऊरास लावणे, ऊरी पोटी धरणे** – दादा – बाबा करणे; मन वळविणे. पहा : **ऊराशी धरणे. ऊरावर डोंगर घेणे, ऊराउरी डोंगर घेणे** – कठीण काम स्वीकारणे; अतिशय दगदग करणे; न पेलणारी जबाबदारी स्वीकारणे. **ऊरावर डोंगर, ऊरी डोंगर पुरी काट्या घेणे** – (छातीवर पर्वत घेणे व नदीच्या पुरातून काटेकुटे ओढून काढणे) पोटासाठी अगदी दगदगीचे काबाडकष्ट करून सर्व तऱ्हेचे उपाय करून पाहणे. **ऊरीपोटी करणे** – अतिशय श्रम करणे. पहा : **ऊरापोटी करणे. ऊरी फुटणे** – पहा : **ऊर फुटणे** : 'इतका अभ्यास करून उरीं फुटायचं आहे कां काय?' – गी. **ऊरी भरणे** – १.दमणे : 'उरीं भरली ऊरपोट । केली चळवळ झाली घाबरी ।।' – पला २. २. स्त्रियांच्या स्तनांचा उद्गम होणे; ऊर भरणे.

**ऊर** पु. ऊत; और; नदीचा पूर. [सं. पृ–पुर्]

**ऊर** स्त्री. १. उरलेले, जास्त झालेले काम, पदार्थ, गोष्ट; बाकी; शिल्लक; शेष. २. तूट; उणीव; उरता. [सं. उर्वरित]

**ऊर** पहा : **उर** : 'ऊरीं आदललेयां मरण ।' – ज्ञा ८.६८.

**ऊरछिद्र** न. (यंत्र.) भात्यामध्ये हवा खेचण्यासाठी ठेवलेले छिद्र.
**ऊरतूट** स्त्री. (उराशी धरण्यात, मिठी मारण्यात अडथळा, प्रतिबंध, व्यत्यय यावरून) वियोग; विरह. (क्रि. करणे, होणे).
**ऊरदुखी** स्त्री. १. उरातील दु:ख. २. (ल.) मत्सर; हेवा.
**ऊर न पूर** उरणे न पुरणे, प्रसंगी न पुरण्यासारखे किंवा पुरून न उरण्यासारखे सामान, सामग्री; उणीव, तूट, कमतरता.
**ऊर पाकीट** (शिवण.) छातीवरचा खिसा.
**ऊरपुटी** क्रिवि. पाठीकडे हात वळवून : 'बांधौनि ऊरपुटी मागधु पाडिला.' – गस्तो. [सं. उरस्+पट]
**ऊरपूर** स्त्री. १. शिल्लक; शेष; पुरून उरलेले : 'ऊरपूर म्हणून, वल्लभभाईचा विनोद सदा सज्ज असतो.' – स्वामी ४३. २. पुरुन उरण्याइतकीं सामग्री; भरपूर समृद्धी; आधिक्य.
**ऊरफोड** स्त्री. उरस्फोड; अतिशय दगदगीचे व संकटमय काम; परिश्रम; श्रम; उद्योग.
वि. असे श्रम पडणारे, फार मेहनतीचे (काम).
**ऊरभेट** स्त्री. छातीला छाती लावणे; मिठी मारून भेटणे.
**ऊरसूर** स्त्री. शिल्लक; बाकी; अवशेष.
वि. शिलकी; उरलेले; राहिलेले. [ऊरचे द्वि.]
**ऊरु–रू** पु. स्त्री. गुडघ्याचा वरचा भाग; मांडी : 'तरि ऊरू या जघनासी । जडोनि घालीं ।।' – ज्ञा ६.१९२. [सं.]
**ऊरूकर्म** न. (नृत्य.) मांड्यांनी केलेला अभिनय, नृत्यामध्ये ऊरुकर्मे पाच आहेत – स्तंभन, कंपन, वलन, विवर्तन, उद्वर्तन. [सं.]
**ऊरुमूल, ऊरुमूलसंधी** १. मांडीचा कमरेशी संलग्न असलेला भाग. २. जांघ; वंक्षण; कटिसंधी; आडसंधी.
**ऊरुस्तंभ** पु. एक वातरोग; वाताने खालचे अंग जाणे; पुष्कळ दिवसांचा मांड्याचा पक्षाघात. [सं.]
**ऊरू, ऊर** न. ग्रामनामवाचक सामासिक शब्दातील अंत्यभाग म्हणून येते. उदा. देव +ऊर=देवूर, चंद्र +ऊर = चांदूर. [सं. पुर]
**ऊरूबरू** क्रिवि. समक्ष; समोर. पहा : **ऊरूबुरू** [फा. रूबरू]
**ऊर्ज** पु. हिंमत; शक्ती; ताकद; तेज. [सं. ऊर्जस्]
**ऊर्जस्वल** वि. तेजस्वी; भरभराटीला आलेला : 'जगीं जें जें ऊर्जस्वल नियत त्या त्या अवनती ....' – श्रीकृ. [सं.]
**ऊर्जा** स्त्री. (शाप.) शरीर, यंत्र किंवा वस्तू यांच्यामध्ये असलेली शक्ती. तिचे उपयोजन झाल्यास कार्य घडून येते. [सं.]
**ऊर्जा** स्त्री. १. पूजा; व्यवस्था : 'हे गोष्टीने देवास ऊर्जा सांगसंपादन नाही यासस्तव मोईन वाढवून दिल्ही असे.' – पेद ३१.६५. २. उस्तवारी; संरक्षण. पहा : **उरजा** [सं. उर्जस्]
**ऊर्जा अपक्षेपण** न. (शाप.) ऊर्जेचे निस्सरण. उदा. गरम वस्तू हळूहळू गार होणे. [सं.]
**ऊर्जा अक्षय्यता** स्त्री. (भौ.) ऊर्जेचे सुयोग्य संकलन आणि समायोजित वापर.
**ऊर्जादायी प्रक्रिया** स्त्री. (शाप.) ऊर्जा निर्माण करणारी, रासायनिक बदल घडवून आणणारी क्रिया. उदा. श्वसन.
**ऊर्जानिर्मिति–ती, ऊर्जामुक्ति–क्ती** स्त्री. (शाप.) विश्लेषणात्मक किंवा विध्वंसक प्रक्रियेने पदार्थातील ऊर्जा अलग करण्याची प्रक्रिया. उदा. ज्वलन, श्वसन इ. [सं.]
**ऊर्जाशीर्ष** न. (भौ.) शक्ती निर्माण करणारा मुख्य भाग.
**ऊर्जा समाकलन** न. (शाप.) शक्ती एकत्र करणे, गोळा करणे.
**ऊर्जित** न. उत्कर्षाचा काळ; यशाचा काळ; चढती कळा; बढती; भरभराट; कल्याण.
वि. शक्तिमान; चढता; उत्कर्षाचा. [सं.]
**ऊर्जित कळा, ऊर्जित काळ** भरभराटीचे दिवस; अभ्युदयाचा काळ.
**ऊर्जितावस्थेला येणे** क्रि.उत्कर्ष होणे.
**ऊर्ण** न. लोकर; तंतू; धागा. [सं.]
**ऊर्णतंत** पु. कोळ्याच्या (किड्याच्या) जाळ्याचा धागा : 'हस्त (हत्ती) बांधीजे उर्णतंते । लोभें मृत्य भ्रमरांते.' – दास २.१०.१५.
**ऊर्णतंतु – तू** पु. लोकरीचा धागा. [सं. उर्णातन्तु]
**ऊर्णन** न. १. (भू.)मृदा व मृदेतील कलील एकत्र येऊन त्याचे गोळे होण्याची प्रक्रिया. २. चिकणमाती अथवा मृदूकणांचे खाऱ्या पाण्यात तयार होणारे निक्षेप.
**ऊर्णनाभी** पु. कोळी, किडा. यांच्या शरीरातून लोकरीसारखा धागा निघतो. पहा : **उर्णनाभी** : 'ऊर्णनाभीचा तंतूसूत्री । जरि उचलिजेल धरित्री ।।' [सं.]
**ऊर्णा** स्त्री.१. लोकर (मेंढी, ससा, उंट इत्यादींचे केस). २. लोकरीचे कापड (शाल, घोंगडी). ३. दोन भुवयांमधील नाकाच्या मुळाशी असलेले केस. या ठिकाणी भोवरा असणे हे सार्वभौमत्वाचे लक्षण समजतात. [सं.]
**ऊर्णाफलक** पु. (शिक्षण.) लोकरी कापडाचा केलेला फळा. हा काही माहिती लावून ठेवण्यास उपयोगी पडतो.
**ऊर्ता** स्त्री. वाट पाहणे; थांबणे. पहा : **अरुता** (व.)
**ऊर्ध, ऊर्ध्व** क्रिवि. वरती; उंच; वर.
वि. १. वरील; उंचावरचा; उत्तम (गती) : 'तैसे मध्य ऊर्ध अध। हे जे गुणभेद ।' – राज्ञा १४.२७६. २. (ग.) उभा; लंब. [सं. ऊर्ध्व]
**ऊर्धगति–ती** स्त्री. १.वर चढणे; उंच उडणे, जाणे; आकाशात भराऱ्या मारणे. २. मुक्ती; मोक्ष : 'विचारें ऊर्ध्व चढती । तयासीच ऊर्ध्वगति ।।' – दास १७.३.२२. [सं. ऊर्ध्वगति]
**ऊर्धमुख** वि. वर तोंड करून पाहणारा.
क्रिवि. वर तोंड करून : 'ऊर्धमुखें भेद तुटतो.' – दास २०.३.२२. [सं. ऊर्ध्वमुख]
**ऊर्ध्व** पु. १. मरणापूर्वी लागलेला श्वास; घरघर. 'बाळ्याला ऊर्ध्व लागून तो अगदी मृत्युपंथाला लागला होता.'– स्फुगो. १.२६. २. एक रोग; श्वास; दमा; छाती भरून येणे. **उर्ध्व लागणे** शेवटची घरघर लागणे : ३. खस्वस्तिक.
क्रिवि. वरती; उंच; वर.
वि. वरील; उंचावरचा. [सं.]

**ऊर्ध्वखनन** न. (भूशा.) खजिनपदार्थाच्या खालच्या बाजूने वरती खणण्यास सुरवात करणे. [सं.]

**ऊर्ध्वगोल पृष्ठ** (भूशा.) टेकडीची उंच कड; उंच गोलाकार पृष्ठ.

**ऊर्ध्वदृष्टि–ष्टी** वि. वर किंवा आकाशाकडे, वरच्या दिशेकडे नजर लावलेला (माणूस); वरडोळ्या; दूर दृष्टीचा; उदात्त हेतूचा; गर्विष्ठ; महत्त्वाकांक्षी; थोर मनाचा.

स्त्री. १. आकाशाकडे असलेली नजर. २. (ल.) कपट; महत्त्वाकांक्षा; अभिमान; उच्च हेतू. [सं.]

**ऊर्ध्वदेह** पु. मरणोत्तर आत्म्याला प्राप्त होणारा देह.

**ऊर्ध्वदेहिक** न. उत्तरक्रिया. पहा: **और्ध्वदेहिक**

**ऊर्ध्वनाडी** वर जाणारी नाडी; सुषुम्ना. पहा : **इडा** [सं.]

**ऊर्ध्वपंथ** पु. वरचा मार्ग; वरची दिशा; स्वर्गाला किंवा आकाशात जाण्याचा रस्ता. [सं.]

**ऊर्ध्वपातन** न. पाणी अथवा इतर द्रवपदार्थ यास उष्णता देऊन वाफ करणे व त्या वाफेचे पुन्हा द्रवात रूपांतर करणे.

**ऊर्ध्वपान** न.(सांकेतिक) दारू पिणे अथवा मादक पदार्थ सेवन करणे. [सं.]

**ऊर्ध्वपुंड्र** पु. कपाळी लावलेला चंदनाचा उभा टिळा; उभे गंध : 'ऊर्ध्वपुंड्र भाळ । कंठीं शोभे माळ । कापिजे कळिकाळ । तया भेणे ।।' – तुगा २२१४. [सं.]

**ऊर्ध्वबाहू** पु.सतत वर हात ठेवणाऱ्या बैराग्यांचा एक पंथ. [सं.]

**ऊर्ध्वमस्तक** न. डोक्यावरची कवटी. [सं.]

**ऊर्ध्वमंडल** न. (नृत्य) दोन्ही हात वर करून वाटोळे फिरणे. [सं.]

**ऊर्ध्वमुख** वि. वर जाणारा.

**ऊर्ध्वमुख शवाधान** (पुरा.) प्रेत उताणे पुरण्याची पद्धत.

**ऊर्ध्वमुखी गोम** (घोड्याच्या अंगावरील) गोमेसारखा केसांच्या अग्रांचा वर वळवलेला झुबका. हा अशुभकारक समजतात.

**ऊर्ध्वमूळ** वि. वर मुळे असलेला; उलटा.

न. १.देह; शरीर. २.प्रपंच; जगत. [सं. उर्ध्वमूल]

**ऊर्ध्वरेखा, ऊर्ध्वरेषा** स्त्री. १. तळहातावरील किंवा तळपायावरील वर जाणारी सरळ रेघ. २. (ग.) लंब रेषा; उभी रेषा.

**ऊर्ध्वरेतस्क, ऊर्ध्वरेता** पु. हनुमान, भीष्म इ. चिरब्रह्मचारी.

वि. नैष्ठिक, आजन्म ब्रह्मचारी; ज्यांचा कधीही वीर्यपात होत नाही असा : 'तेथ वसति सनकादिक। ऊर्ध्वरेते देख महायोगी ।' – एभा २४.२१७; ' तो राघवप्रिय विरक्त । ऊर्ध्वरेतस्क वज्रदेही ।।' [सं.]

**ऊर्ध्वलोक** पु. १.स्वर्ग; इंद्रलोक. २.स्वर्गातील अनेक लोक (चंद्रलोक, ब्रह्मलोक इ.)

**ऊर्ध्ववाट** स्त्री. स्वर्गाची वाट; ऊर्ध्व पंथ : 'प्राणांशीं दुजायींच्या दाउन ऊर्ध्ववाट माघारे फिरती ।' – ऐपो २६९.

**ऊर्ध्ववात, ऊर्ध्ववायू** पु. उचकी, ढेकर किंवा घरघर.

**ऊर्ध्वसंख्य बाहू** (नृत्य.) पाहणाऱ्याच्या मुखाआड न येता, लोंबत सोडलेले बाहू वर नेणे. [सं.]

**ऊर्ध्वसीमा** स्त्री. (शाप.) वरची (जास्तीत जास्त) मर्यादा. उदा. पर्वताची उंची, रासायनिक विक्रियेचे तापमान इ. [सं.]

**ऊर्ध्वस्कंध** पु. (शिंपी.) काखेच्या समपातळीत कण्यापासून तसेच खांद्यावरून काखेच्या पुढील दुबेळक्यापर्यंत घेतलेले माप. [सं.]

**ऊर्ध्वस्वस्तिक** पहा : **खस्वस्तिक**

**ऊर्ध्वाधर** वि. खस्वस्तिक व अध:स्वस्तिक यांच्याकडे टोके असलेला; लंब, सरळ रेषेत उभा. [सं.]

**ऊर्ध्वासन** न. (योग.) चौऱ्याऐंशी आसनांपैकी ताठ उभे राहणे हे एक आसन. [सं.]

**ऊर्ध्वी** पहा : **ऊर्ध्वनाडी**; सुषुम्ना नाडी. : 'मग ऊर्ध्वीचिया रिगानिगा । पुढती तेचि शक्ति पै गा ।' – ज्ञा १८.३३७. [सं. ऊर्ध्व]

**ऊर्फ** वि. मुख्य नावाऐवजी वापरण्यात येणारे व्यवहारातले नाव दर्शवताना वापरण्यात येणारे उभयान्वयी अव्यय. प्रसिद्ध नावाचा; सामान्यतः दुसऱ्या नावाचा; टोपण नावाचा; अथवा; म्हणजे. उदा. बाळाजी जनार्दन ऊर्फ नाना फडणीस. पहा : **उर्फ** [फा.]

**ऊर्मि–र्मी** स्त्री. १. लाट; उसळी; तीव्र भावना; उकळी; तरंग; लहर (पाण्याची ) : 'तुका म्हणे गंगासागरसंगमीं । अवघ्या झाल्या ऊर्मी एकमय ।' – तुगा ४०१६. २. वेग; प्रवाह. ३. (ल.) आकस्मिक उत्कंठा; इच्छा; आवेग; वृत्ती (मनाची) : 'किं क्रोधऊर्मी दारुण । सद्विवेकें आवरिजे ।' [सं. ऊर्मि]

**ऊर्मिका** स्त्री. (लहरींप्रमाणे चमकणारी) अंगठी: 'उद्योत तो उत्कट ऊर्मिकांचा'– सारुह ८.१५२. [सं.ऊर्मि= लाट]

**ऊर्मी** स्त्री. गुर्मी : 'संस्थानिकाने ऊर्मी धरून भेटीस न आला तेव्हा पारपत्य करावेसे जाले.' – पेद २०.७०.

**ऊर्वी** पहा : **उर्वी**

**ऊलगुलान** न. सर्वक्षेत्रांत एकाच वेळी उठाव करणे.

**ऊला** वि. पहिली.

**ऊवजा** पु. देवळातील पुजारी : 'बसवण ऊवजा'– पळसशिला १.१

**ऊषर** स्त्री. खाजण; खारी जमीन. [सं.]

**ऊषरा** स्त्री. (वन.) १.वनस्पतींची वाढ होण्यास आवश्यक त्या परिस्थितीच्या अभावी नापीक राहिलेली जमीन. २.बीज न बनवणारे (फूल). उदा. लागवडीतील केळ, अळू. इ.

**ऊष्मवर्ण, ऊष्मा** पु. श,ष,स या अक्षरांना ही संज्ञा त्यांच्या उच्चारावरून लावतात. हे ऊष्म म्हणजे उष्णता उत्पन्न करणारे अथवा प्रखर उच्चाराचे. कोणी ऊष्मवर्णात 'ह' चा ही समावेश करतात. [सं.]

**ऊष्माप्रसरणगुणांक** पु. (भौ.) उष्णतेमुळे वस्तूच्या आकारमानात होणाऱ्या वाढीचे प्रमाण सांगणारा गुणांक.

**ऊष्मारोधी काच** (शाप.) अधिक तापमानात टिकू शकेल अशी काच.

**ऊष्मालाट** स्त्री. एखाद्या प्रदेशात अपवादात्मक रीतीने अनेक दिवस वाढत राहिलेले तापमान.

**ऊष्मा वाहकता** (भौ.) उष्माअभिसरणाची क्षमता.

**ऊष्मांतरण** न. उष्णता एका ठिकाणाहून दुसरीकडे नेणे, पोचवणे. [सं.]

**ऊस** पु. १. साखर, काकवी, खडीसाखर, गूळ इ. ज्याच्या रसापासून तयार होतात अशी गवताच्या वर्गातील एक वनस्पती. २.उसाचा फड; उभे पीक (वा.) **ऊस खतविणे** – उसाला खत घालणे. **ऊस सोजळणे, ऊस साळणे** – उसाची पाने, पाती सोलणे. **ऊस रंगणे** – उसाचा गाभा लाल पडणे; उसावरील एक रोग. ३. **उसापोटी काऊस** = सूर्यापोटी शनैश्चर; जन्मदात्यास त्रासदायक. (व.)

**ऊस** स्त्री. एक प्रकारची खारी माती. [सं. ऊषर]

**ऊसदार** न. पुढील दार; त्याच्या आसपासची जागा; शेजारचा प्रदेश. परसदार याच्या उलट.

**ऊह, ऊहू** पु. १. तर्क; अजमास; अंदाज; तर्कज्ञान; कार्यकारण संबंध : 'नांदीश्राद्धात बाईसाहेबांचा ऊह कसा आणावा असा प्रश्न केला.' – माप्र ५७. २. परिस्थितीनुरूप केलेला बदल (शास्त्रवचनात वगैरे). पहा : **उहू १.** ३.उपक्रम; ऊहापोह; सूतोवाच : '... टिपूचे मसलतीचा ऊह निघताच लिहिण्यात आलें...' – ऐलेसं ४११६. ४. वाटाघाटी : 'राजेश्री त्रिंबकराव नारायण यांस समागमे न्यावे असा ऊहू जाला आहे.' – ऐलेपाम्सु प्र ८०. (वा.) **ऊह चाळणे, ऊहू चाळणे** – प्रतिपादन करणे : 'अर्थी असत्याचा बडिवारू। सद्भावें केला जो सद्गुरू। त्यासि मिथ्या नास्तिक विचारू। एकांती नरू ऊहू चाळी।' – एभा २३.२२७. **ऊहू करणे** – उपक्रमास सुरूवात करणे. '...सविस्तर जाल्या जाबसालाचे ऊहू करूं ...' – पुरंदभा ३.४९.

**ऊहापोह ऊहापोही** पु. स्त्री. वाटाघाट; साधकबाधक विचार; शहानिशा; विचारपूर्वक करायची योजना; काळजीपूर्वक चर्चा, विवरण : 'त्या तत्त्वांचा पूर्ण ऊहापोह करून आमच्या ऋषींनी मागेच निर्णय केला आहे.' – लोटिकेले ४.१२५. [सं.]

**ऊहू** वाटाघाटी; उहापोह : 'राजेश्री त्रिंबकराव नारायण यांस समागमे न्यावे असा ऊहू जाला आहे.' – ऐलेपाम्युप्र.८०.

**ऊळ** स्त्री. कांद्याचे रोप; पातीच्या कांद्याची गड्डी. [क. उळ्ळि]

ऊं

ऊं उद्गा. १.(प्रश्नार्थी) काय; असे कसे. २. नको या अर्थाचा सौम्य असंमतिदर्शक अनुनासिक ध्वनी. ३. (अवमानार्थी) थू; हट्; वा, शू : 'ऊं! तो काय मूर्ख आहे.' – मृ २०. ४. असे; अँ; बेसावधपणापुळे गोष्ट घडल्यानंतर ती स्पष्ट ध्यानात आली असताना निघणारा उद्गार. ५.धिक्कारदर्शक, तुच्छतादर्शक उद्गार. त्यात विशेष काय, या अर्थी.

**ऊंट** पु. पहा : **उंट**

वि. (ल.) लांबटांग्या; बारीकमान्या उंच व किरकोळ (माणूस).

**ऊंधा** वि. उलटा; विरुद्ध. (खा.)

**ऊंहूं** उद्गा. (ध्वनि.) छे; नव्हे; नको (असंमतिदर्शक).



ऋ मराठी वर्णमालेतील सातवा, वैदिक व संस्कृत भाषेत आढळणारा, नंतरच्या अवस्थांत नष्ट झालेला 'र' या व्यंजनाशी मिळता स्वर.

**ऋक्** पु. चार वेदांपैकी पहिला वेद; ऋग्वेद : 'म्हणोनि ऋग्यजुःसामु। हे तीन्ही म्हणे मी आत्मारामु।' –ज्ञा ९.२७७. [सं.]

**ऋक्** स्त्री. ऋग्वेदातील ऋचा, मंत्र; सूक्तातील एक भाग; वेदातील छंदोबद्ध रचना. [सं.]

**ऋख** न. नक्षत्र : 'चांदीं ऋखै जैसिं। दिनोदइं।।' – राज्ञा १५.२८२.

**ऋखी** पु. ऋषी : 'ऋखीं पळो लागले.' – श्रीकृच १६.

**ऋग्वेद** पु. चार वेदांपैकी पहिला वेद. ऋग्वेदाची एकंदर सूक्ते १०२८ असून एकंदर ऋचा १०५८० व अक्षरसंख्या ४३२००० आहे. चारी वेदात ऋग्वेद मोठा आहे. ऋग्वेद हा हौत्रवेद असून यज्ञातील होता नामक ऋत्विजाने यातील मंत्र म्हणायचे असतात. [सं.]

**ऋग्वेदी** पु. ऋग्वेदाला अनुसरणारी ब्राम्हण वर्गातील एक शाखा. [सं.]

**ऋचा** स्त्री. १. ऋग्वेदसूक्तातील एक मंत्र, श्लोक : 'बोलती निषेधनियमे जिया ऋचा यजुःसामें।'– ज्ञा १५.१६६. २. वेदांतील मंत्र : 'ऋचा श्रुति स्मृति। अधेय स्वर्ग स्तबक जाती।' – दास १२.५.४. ३. (संगीत.) यज्ञसमारंभप्रसंगी निमंत्रित देवता – इंद्र, वरुण, अग्नी वगैरेंना यज्ञाचा नैवेद्य अर्पण केल्यानंतर त्यांचे मनोरंजन करण्यासाठी गाऊन म्हणता याव्यात अशा रचना. [सं.]

**ऋजु–जू** वि.१. सरळ; प्रत्यक्ष; उजू. २.(ल.) प्रामाणिक; निष्कपटी; साधा; अकृत्रिम; सच्चा. [सं.]

**ऋण** न. १. कर्ज; देणे; रीण; परत द्यायच्या बोलीने (सव्याज किंवा तसेच) घेतलेले द्रव्य इ. २. (ल.) उपकार; अपरिहार्य कर्तव्य; पहा : **ऋणत्रय** : 'ऋण फेडावया अवतार केला। अविनाश आला आकारासी।' – तुगा १०.[सं.](वा.) **ऋण करणे** – कर्ज काढणे; कर्ज करणे. **ऋण काढणे** – पहा : **कर्ज काढणे. ऋण फिटणे** – कर्जमुक्त होणे; उपकाराची फेड होणे : 'मेलों रणांत म्हणजे तुमचे याचेहि सर्व ऋण फिटलें।' – मोभीष्म ११.७४. **ऋण फेडणे** – कर्जाची सर्व रक्कम परत करणे; उपकारकर्त्याच्या उपकारांतून मुक्त होणे.

**ऋण** न. १. (ग.) बाद किंवा वजा करायचा अंक, रक्कम. २. वजाबाकीचे चिन्ह; उणे चिन्ह; उणी संख्या; वजा करायची संख्या. ३.(भौ.) विजेचा एक प्रकार; अपसारक विद्युत; धनविद्युतच्या उलट ऋणविद्युत; जवळ असलेल्या दोन पदार्थांपैकी एकावर ऋणवीज असेल तर दुसऱ्यावर धनवीज उत्पन्न होते. [सं.]

**ऋण अग्र** न. (विद्युत.) विद्युतघटामधील ऋण विद्युतभारित अग्र.

**ऋणकरी** वि. १. कर्ज देणारा; सावकार; उत्तमर्ण. २. कर्ज घेणारा; देणेदार; ऋणको; अधमर्ण. ३. ज्यापासून काही उपयोग नाही पण ज्याला उगीच पोसावे लागते असा, कुचकामाचा माणूस; आळशी, आइतखाऊ अशाला निंदेने म्हणतात. ४. ज्याच्याकडून आपल्याला नेहमी मदत होते व जो सारखा आपल्यावर कृपा करीत असतो अशा माणसाला कृतज्ञतादर्शक बुद्धीने म्हणतात. ५. (ल.) एखाद्या गोष्टीबद्दल हटून बसणारा; हट्टी; आग्रही; घेतल्यावाचून न जाणारा. [सं. ऋण+कृ]

**ऋणको** पु. कर्ज असलेला; कूळ; अधमर्ण; रीणकरी. [सं. ऋण]

**ऋणकोन** पु. (भूमिती.) घड्याळाचा काटा फिरतो त्या दिशेच्या विरुद्ध बाजूला होणारा कोन.

**ऋणग्रस्त** वि. कर्जबाजारी, कर्जात बुडालेला. [सं.]

**ऋणग्रस्तता** स्त्री. कर्जात बुडणे, रुतणे; कर्जबाजारीपणा. [सं.]

**ऋणघातकी** वि. अवसानघातकी; ऐन वेळेवर माघार घेणारा. (ना.)

**ऋणचित्र** न. कॅमेऱ्याच्या छायापट्टीवर मिळणारे चित्र.

**ऋणचिन्ह** न. (शाप.) उणे चिन्ह (–). पहा : **ऋण** २. [सं.]

**ऋणत्रय** न. देवऋण, पितृऋण, ऋषिऋण. ही तीन ऋणे. [सं.]

**ऋणत्वरण** न. (भौ.) विरुद्ध दिशेने होणारी वेगवृद्धी.

**ऋणन** न. (ग्रंथा.) बाहेर दिलेले वाचनसाहित्य कुणाच्या नावावर आहे त्याची ग्रंथालयात केलेली नोंद.

**ऋणनिर्देश** पु. आभारप्रदर्शन.

**ऋणपत्र** न. १. (अर्थ.) कर्जरोखा; सार्वजनिक कर्जाचा रोखा. शासनाच्या माध्यमाने किंवा कंपनीने जारी केलेले दीर्घ मुदतीचे व ठरावीक व्याजाचे रोखे, बंधपत्र इ. [सं.]

**ऋणपत्र** न. (ग्रं.) देवघेव नोंदवही; वाचकाला घरी वाचायला दिलेल्या पुस्तकाची ज्यात त्याच्या स्वाक्षरीसह नोंद करतात ते पत्र.

**ऋणपत्रधारक** पु. कर्जरोखा बाळगणारा, धारण करणारा. [सं.]

**ऋणपत्रनिधि–धी** पु. कर्जरोख्याच्या विक्रीतून जमा झालेली रक्कम.

**ऋणपत्रव्याज** न. कर्जरोख्यावर मिळणारे व्याज.

**ऋणपद** न. (ग.) वजा करायची राशी, पद. पहा : **ऋण** २. [सं.]

**ऋणपरिवर्तन** न. (अर्थ.) रोखीत रूपांतरित करायच्या रोख्यांच्या मोबदल्यात कमी व्याजदराने नवीन शासकीय कर्जरोखे जारी करणे.

**ऋणबद्ध** वि. कर्जाने बांधला गेलेला; ऋणग्रस्त. [सं.]

**ऋणबंध, बंधन** पु. न. कर्जाचे बंधन; कर्जाचा जाच. [सं.]

**ऋणमार्जन गृह** न. जेथे बँकांचे कर्ज निकालात काढतात ते कार्यालय.

**ऋणमुक्ति–क्ती** स्त्री. कर्जाची फेड; कर्जाचे निवारण; कर्ज देऊन टाकणे. [सं.]

**ऋणमोचन, ऋणमोक्ष, ऋणशोधन** पहा : **ऋणमुक्ति**

**ऋणमोचित** वि. १. ऋणमुक्त. २. (कायदा) धनकोने कर्ज फेडले असता जो धनकोचा नोकर होतो तो. [सं.]

**ऋणरोखा** पु. १. शासनातर्फे किंवा एखाद्या कंपनीतर्फे जारी करण्यात आलेले ठरावीक व्याजाचे दीर्घकालीन बंधपत्र, कर्जरोखा.

**ऋणलेख** पु. (अर्थ.) कर्ज घेतल्याची मान्यता देणारा स्मरणलेख. [सं.]

**ऋणलेखा** पु. कर्जाच्या देण्याघेण्यासंबंधीच्या व्यवहाराचे लेखी हिशेब.

**ऋणवई – वै** वि. ऋणी; ज्याने कर्ज घेतले आहे असा.

**ऋणवईपणा** पु. ऋणीपणा : 'निळा म्हणे ऋणवईपणा । होतसां नारायणा उत्तीर्ण ।' – निगा १९०.

**ऋणविचरण** न. (शाप.) गतिमान पदार्थाची घड्याळाच्या काट्याच्या विरुद्ध दिशेने फिरण्याची क्रिया.

**ऋणविद्युत** स्त्री. विजेचा एक प्रकार. पहा : **ऋण** [सं.]

**ऋणविमोचन** न. कर्जमुक्ती; कर्जाच्या जबाबदारीतून मोकळे होणे.

**ऋणवैपण** ऋणीपणा : 'ते ऋणवैपण देखोनि आगीं । मी आपुलियाचि उत्तीर्णत्वालागीं ।' – ज्ञा ८.१३१.

**ऋणव्यवस्थापन** न. (अर्थ.) कर्जाच्या व्यवहाराचे नियमन, प्रशासन.

**ऋणसमायोजन** न. (मानस.) विकीरक उद्दीपकाकडे दुर्लक्ष करण्याची सवय करणे; अकारण समायोजन.

**ऋणसंख्या** स्त्री. शून्याखालची संख्या.

**ऋणसेवा** स्त्री. (अर्थ.) दीर्घ मुदतीच्या कर्जावर दरवर्षी द्यावी लागणारी कर्जफेडीची रक्कम व कर्जनिवारणनिधीत करायचा भरणा. [सं.]

**ऋणहर्ता** वि. ऋण फेडणारा; परमेश्वराचे एक विशेषण. (ख्रिस्ती वाङ्मयात.) प्रयोग. [सं.]

**ऋणाईत, ऋणाईतस्वरूपी, ऋणायतस्वरूपी, ऋणायीतस्वरूपी** पु. १. (सामा.) ऋणकरी. २. काही उपयोग नसताना पोसावा लागणारा ऋणकरी : 'उगीच ऋणायतस्वरूप्यासारखे डोक्याला हात टेकून चारचौघे येथे येतात तेथे बसू नका.' – मोर ४. ३. घेणेदार; कर्जदार : 'एक म्हणे हा माझा ऋणावित । भला सांपडला येथ ।' – एभा २३.५२१.

**ऋणादान** न. १. सावकारीचा धंदा; पैसे उसने देण्याचा व्यवसाय. २. कर्जवसुली. ३. कर्जफेड. [सं.]

**ऋणानुबंध** पु. १. चालू सुखदुःखाचा पूर्वजन्माशी ऋणसंबंध; इष्टानिष्ट फल देणारा पूर्वसंबंध; प्राक्तन; योगायोग; ईश्वरी सूत्र. २. स्नेहसंबंध; घरोबा; मैत्री : 'मजपासुनिया सुखदुःखाशा मुळीच वर्जावी । सरला ऋणानुबंधचि ईशस्मरणींच वेळ योजावी ।।' – वनवासी फूलटिक

**ऋणानुबंधी** वि. स्नेही; मित्र; घसट असलेला; लागाबांधा असलेला.

**ऋणिया** वि. १. कर्जदार; देणेकरी; ऋणको : 'परी मेचु ये होईजेल । ऋणिया तुज ।।' – ज्ञा १८.३०१. २. धनको; सावकार : 'जैसा समर्थु आणि ऋणिया । मार्गी आला बाइणिया । न लोटे तैसा प्राणिया । पडे तो भोगु ।।' – ज्ञा १८.२५२. [सं. ऋण]

**ऋणी** वि. १. ऋणासंबंधी. २. देणेदार; ऋणको : 'आमुचा तू ऋणी ठायींचाचि देवा । मागावया ठेवा आलों दारा ।।' – तुगा १२१९. ३.(ल.) उपकारबद्ध; उपकृत : 'त्याचे आपण ऋणी नाही काय?' – लोटिकेले ४.१४४. (वा.) **ऋणी असणे** – उपकार आठवणे; कृतज्ञ असणे.

**ऋत** न. १. (तत्त्व.) ऋग्वेदातून आलेला शब्द; वैश्विक किंवा विश्वव्यापी संरचनेचा नियम; संपूर्ण विश्वाच्या मुळाशी असलेला चित्तत्त्वाचा अधिकार. २. सत्य; खरेपणा. [सं.]

**ऋतु–तु–तू** पु. १. निसर्गातील वातावरण (उन, वारा, पाऊस इ.) यामुळे निर्माण होणारा विशिष्ट मोसम. भारतीय कालगणनेनुसार वसंत, ग्रीष्म, वर्षा, शरद, हेमंत व शिशिर असे सहा ऋतु; निसर्गाधारे उन्हाळा, पावसाळा आणि हिवाळा असे तीन ऋतु. २. स्त्रियांचा मासिक विटाळ. ३. हंगाम, मोसम. ४. सहा ही संख्या.

**ऋतुकाल** पु. १. गर्भधारणेचा काळ. हा रजोदर्शनापासून १६ दिवसांचा काळ : 'नेमिले जाण । स्वदारागमन ऋतुकाळीं ।' – एभा २१.१९६. २. ऋतुपरत्वे येणारा काल; ऋतू चालू असलेली वेळ; हंगाम; मोसम : 'ऋतुकाळें फळे येती पूर्ण । त्यांसि दृष्टिभेटी हाटी जाण ।' – एभा २३.९८. [सं.]

**ऋतुगण** पु. ऋतूंचा समुदाय; सारे ऋतू. [सं.]

**ऋतुचक्रनिष्ठ पुराणकथा** स्त्री. ऋतूंच्या अस्तित्वावर आधारित लोककथा.

**ऋतुचर्या** स्त्री. निरनिराळ्या ऋतूंतील राहणी. [सं.]

**ऋतुत्रय** न. तीन ऋतु; उन्हाळा, पावसाळा, हिवाळा : 'पै ऋतुत्रय आकाशें। धरूनियाहि जैसें ।।' – ज्ञा १४.२९१. [सं.]

**ऋतुदर्शन** न. रजोदर्शन; स्त्रियांना प्रथम प्राप्त होणारा ऋतु; विटाळ; नहाण; ऋतुप्राप्ती. [सं.]

**ऋतुदान** न. स्त्रीसमागम : 'अर्धरात्रीनंतर भार्येस ऋतुदान करावे.' – सुसु १७. [सं.]

**ऋतुपति–ती** पु. ऋतूंचा राजा; श्रेष्ठ ऋतू; वसंतऋतू : 'जैसें ऋतुपतीचे द्वार। वनश्री निरंतर।' – ज्ञा ३.१००. [सं.]

**ऋतुपर्याय** पु. ऋतूंचे परिवर्तन; अनुक्रम; ऋतूंचे पुन्हा पुन्हा येणे; ऋतूंत बदल. [सं.]

**ऋतुप्राप्ति–प्ती** स्त्री. रजोदर्शन, ऋतू प्राप्त होणे; नहाण येणे : 'मुख्य मुख्य स्मृती आणि सूत्रें या ग्रंथातून मुलींचा लग्नाचा काळ आठ वर्षापासून ऋतुप्राप्तीपर्यंत सांगितला आहे.' – लोटिकेले ४.११५.

**ऋतुमती** स्त्री. १. विटाळशी; प्रथम ऋतू प्राप्त झालेली कन्या; न्हाणोली. २. विटाळ प्राप्त झाल्यापासून १६ दिवसांपर्यंत गर्भसंभव होण्यास किंवा गर्भधारणेला योग्य स्त्री : 'व्रत व श्राद्ध सांग होऊन ऋतुमतीची इच्छाही पूर्ण होईल.' – सुसु १७. [सं.]

**ऋतुशांति–ती, ऋतुशांत** स्त्री. प्रथम रजोदर्शनसमयी अनिष्ट मासादिकांचे दूषित फलनाशार्थ करायची शांती; गर्भाधानविधी : 'कारण पुढे शुक्राचा अस्त आहे. म्हणून कुटुंबाची ऋतुशांति करून घ्या.' – कफा ९.

**ऋतुस्तर** पु. (भूशा.) वाच्यार्थाने एका वर्षात साठणारा अवसाद. परंतु अलीकडे 'हिमनदीतील बर्फ वितळून तयार होणाऱ्या सरोवरातील अवसाद' असा त्याचा मर्यादित अर्थ होतो. ऋतुमानाप्रमाणे अवसादांमध्ये बदल होऊन उन्हाळ्यात भरडकणी व हिवाळ्यात सूक्ष्मकणी अवसाद साठतात.

**ऋतुस्तर कालगणना** (पुरा.) हिमयुगकालाच्या शेवटी प्रत्येक हिवाळ्यात गर्द मातट पाण्याचे थर बसत असत. या थरांवरून त्या कालाचे अनुमान करण्याची पद्धत.

**ऋतुस्नात** वि. १. विटाळशीपणानंतर स्नान करून शुद्ध झालेली. २. (चुकीने) ऋतुमती; रजस्वला. ३. संभोगयोग्य; उपभोग्य : 'कां शुनी जैशी ऋतुस्नात। तिसीं भोगूं येती श्वान बहुत.' – एभा १०.५२२.

**ऋतुस्नान** न. पाळी संपल्यावर चौथ्या दिवशी करायचे स्नान.

**ऋतुस्रावचक्र** न. (वै.) एका मासिक पाळीनंतर दुसऱ्या मासिक पाळीची सुरुवात होईपर्यंतच्या काळात होणाऱ्या शारीरिक बदलांचे चक्र. सामान्यत: हा चांद्रमासकाल (२८ दिवस) असतो.

**ऋतूद्भव, ऋतूद्भावक** वि.आर्तवजनक; ऋतु प्राप्त करून देणारे (औषध वगैरे). [सं.]

**ऋतू संपादणे** ऋतुदान करणे; संभोगणे : 'दिवस पांचवा ऋतु संपादुन मग जा गुणराशी' – पला ९२.

**ऋत्विज** पु. यज्ञयाग, होमहवन इ. कर्म करणारा, त्यात भाग घेणारा.

**ऋद्धि–द्धी** स्त्री. १.ऐश्वर्य; संपत्ती; भरभराट; योगाने मिळवलेली समृद्धी; लक्ष्मी : 'कीं तपोबळें ऋद्धी। पातलिया भ्रंशे बुद्धी।' – ज्ञा १.१८८. २. ऐश्वर्याचा, भरभराटीचा काळ. [सं.]

**ऋद्धिसिद्धि–द्धी** स्त्री. १. गणपतीच्या दोन दासी, परिचारिका; सामान्यत: ऋद्धी. पहा : **रूद्धिसिद्धि.** २. ऋद्धी आणि सिद्धी (अष्टमहासिद्धी); संपत्ती आणि यश. [सं.]

**ऋषभ** पु. १. बैल; पोळ; वसू. २. (संगीत.) (शुद्ध) सात स्वरांपैकी दुसरा स्वर; सा, रे, ग पैकी रे हा स्वर. पहा : **स्वरसप्तक**
वि. श्रेष्ठ : 'व्यथा न देती पुरुषा हे जया पुरुषर्षभा ।।' – गीता २.१५. [सं.]

**ऋषि–षी** पु. १. मुनी, तपस्वी. २. धर्मशास्त्र जाणणारा, रचणारा, महात्मा. ३. देवमाणूस; सात्त्विक माणूस; धर्मपरायण व्यक्ती.

**ऋषिऋण** न. मनुष्यप्राण्याला असलेल्या ऋणत्रयापैकी एक ऋण. ऋषितर्पण व वेदाध्ययन यांनी ऋषिऋण फिटते. [सं.]

**ऋषिधान्य** न. मुख्य अठराधान्ये खेरीज करून सावे, वरी, देवभात वगैरे किरकोळ धान्य.

**ऋषिपंचमी** स्त्री. भाद्रपद शुद्ध पंचमी. या दिवशी अरुंधतीसह सप्तऋषींची पूजा करतात. हे व्रत सर्व स्त्रियांनी, विटाळशी असताना चुकून घरात काही वस्तूला स्पर्श झाल्यास तो दोष नाहीसा होण्यासाठी करायचे असते. या दिवशी स्त्रियांनी बैलांच्या कष्टाने तयार झालेला कोणताही पदार्थ खायचा नसतो. [सं.]

**ऋषिमार्ग** पु. शास्त्रविहित आचार, वर्तन; शुद्ध, सात्त्विक वर्तन; लाभ होत असताही निषिद्ध, अन्याय्य कर्म सर्वथा न करणे. [सं.]

**ऋषिमार्गी** वि. शुद्ध वर्तन ठेवणारा; ऋषिमार्गाने जाणारा.

**ऋषियज्ञ** पु. पंचमहायज्ञांपैकी एक यज्ञ; ब्रह्मयज्ञ. इतर यज्ञांमध्ये प्रत्यक्ष अवदान किंवा बलिदान असते परंतु या यज्ञात ऋषिप्रीत्यर्थ वेदाध्ययन करणे हेच हवन होय. [सं.]

**ऋषिसंख्या, ऋषिसंख्याक** वि. सात ही संख्या. सात ऋषीवरून ही संज्ञा पडली आहे : 'खदिरवृक्षांचे शास्त्रसंख्याक। पळसाचे ऋषिसंख्याक। ऐसियापरि सम्यक्। यज्ञक्रिया अवलंबीली ।।' – जै ९२.४९.

**ऋषेश्वराचा कारभार** पु. दिरंगाईचा, सावकाशीचा, अव्यवस्थित चालणारा कारभार.

**ऋष्टि–ष्टी** स्त्री. लढाईचे एक शस्त्र; तलवार किंवा भाला. [सं.]

**ऋक्ष** पु. अस्वल; रीस. [सं.]

**ऋक्ष** न. तारकापुंज; नक्षत्र. [सं.]



मराठी अक्षरमालेतील आठवा वर्ण. ऋ, ऌ, (ॡ) या स्वरांनी आरंभ होणारे शब्द मराठीत नाहीत.



मराठी अक्षरमालेतील नववा वर्ण. वैदिक व संस्कृत या भाषांत केवळ 'क्लृप्ति' या शब्दात आढळणारा, नंतरच्या अवस्थांत नष्ट झालेला 'ल' या व्यंजनाचा मिळता स्वर. ॡ (दीर्घ) असा वर्ण मुळात नाही – शब्ददिठी शब्दमिठी, मा. गो. वैद्य



**['ए' पासून सुरू होणारे काही शब्द येथे न आढळल्यास 'ये', 'वे' खाली पहावेत.]**

**ए** मराठी अक्षरमालेतील दहावे अक्षर. मराठी स्वरमालेतील दहावा स्वर. परंपरेप्रमाणे अ नंतर इ किंवा ई तसेच आ नंतर इ किंवा ई आल्याने बनणारा संयुक्त स्वर. संस्कृतमध्ये पुढील स्वराशी संधी होताना अय् असे रूप होते. स्थानपरत्वे ऱ्हस्व किंवा दीर्घ. उदा. वे, हे, घे, वेष यांत दीर्घ. देतो, केळं, पेला, शेंग यांत ऱ्हस्व. पुढे आ आल्यास त्याचा य होतो. जसे : - दे + आ = द्या, घे + आवा = घ्यावा.

**ए** उद्गा. परिचयातील माणसाला हाक मारण्यासाठी योजायचे एकवचनी, उभयलिंगी संबोधन. जसे : - अरे, अग. [सं.]

**एउता** क्रिवि. इकडे; या बाजूला, दिशेने : 'आणि पात्र : तेया एउते लोटीति ।' - लीच ४.३५. [क. इत्त] [सं. अत्र]

**एक** वि. आद्यसंख्यावाचक; सर्व संख्यांमध्ये पहिली संख्या; अंकगणिताचा मूळ संख्याघटक. २. एकटा; अद्वितीय; कोणी बरोबरीचा नसणारा. ३. अपरिचित नामाबद्दल प्रारंभी वापरण्यात येणारा शब्द. जसे : - कोणी तरी, अमूक, एखादा. ४. विवक्षित एक; सर्वांत वरचढ. उदा. एक शहाणा, एक लबाड. ५. सारखे; एकरूप; एकच. ६. अतिशय किंवा एकसारखा; अव्याहत. जसे : - एक पाऊस = न थांबणारा, एकसारखा पडणारा पाऊस, एक घोळ, एक गोंधळ. ७. (संख्यावाचक अथवा प्रमाणवाचक शब्दाबरोबर योजतात) अजमासे; जवळजवळ; सुमारे; कमजास्त. जसे : - शंभरएक रुपये शिल्लक असतील, पाच एक, वीस एक इ. ८. न फिरणारे; निश्चित; अन्यथा न होणारे; सतत एक. उदा. एकवचनी, एकपत्नी. ९. दुसरा; निराळा; स्वतंत्र; वेगळा; भिन्न; एक नव्हे असा. [सं.] (वा.) (आपल्या ठिकाणी) **एक म्हणविणे** – स्वतःबद्दलचा अभिमान किंवा मोठेपणा राखणे, प्रस्थापित करणे; आपण कोणी मोठे आहोत असे मानणे. **एक असणे, एक होणे, एक पडणे** – एकजूट करणे; एकत्र असणे; एकी असणे. **एक धरून बसणे** – विशिष्ट गोष्टीसंबंधी हेका धरून बसणे; हट्ट धरणे. **एक करता बेक होणे** – इच्छित न घडता भलतेच होणे; एक करायला जाता दुसरे काहीतरी होणे. **एकाचे एकवीस होणे** – वंशविस्तार होणे; एकाचे दोन करणे; भलतेच सांगणे; वाढवून सांगणे. **एकाचे एकवीस पाचाचे पंचवीस करणे** – फुगवून सांगणे; पदरचे घालून सांगणे; तंतोतंत खरे न सांगणे. **एक नाही दोन नाही** – मौन स्वीकारणे; गप्प बसणे; कोणाच्या अध्यातमध्यात नसणे (तटस्थ वृत्ती स्वीकारणे). **एका माळेचे मणी** –(शब्दशः एका माळेतील एक सारखे मणी). एका वृत्तीचे, स्वभावाचे, पेशाचे वगैरे; सदृश अशा अनेक व्यक्ती; समानधर्मी.

**एकअक्षीय** वि. एकच आस असलेला; एका आसावरच पडलेला (दाब).

**एकउंटी** वि. (बुद्धिबळ) आपला एक उंट शिल्लक ठेवून प्रतिपक्षावर प्यादेमात करणे.

**एकएक** वि. प्रत्येकजण; एकएकटा; एका वेळी एक; प्रत्येकातला, अनेकातला एक; एकामागून एक; एकेकजण; निरनिराळा; स्वतंत्र; वेगळा.

**एकएकटा, एकएकला, एककटा, एककला** वि.१ पहा : **एकएक** २. एकला; स्वतःच एकटा; वेगवेगळा; बरोबर कोणी नसलेला; सोबत-मदत पाहिजे असलेला; दुसऱ्याची जरूर असलेला.

**एकक** न. १. एकच एक वस्तू किंवा व्यक्ती. एकेक, प्रत्येक. २. ज्यांचे अस्तित्व एकच मानले जाते अशा व्यक्तींचा, वस्तूंचा समूह. ३.मोजण्याचा किंवा मापण्याचा मूलभूत घटक : 'फ्यादमचा एकक म्हणून उपयोग केला जातो.' - महासागर १९१. ४. मात्रा; नग.[सं.]

**एकक घटक** (शाप.) ज्याचे पुन्हा विभाजन करता येत नाही असा वस्तुमान, वजन इ. मोजण्यासाठी वापरायचा लहानात लहान घटक.

**एककट्टा** क्रिवि. एकमताने : 'मंडलिकाच्या बाजूने एककट्टा राहिलेल्या या मतदारांच्या ...' - के ३१.१०.१९३९.

**एककतार** उद्गा. कवाइतीमधील एक हुकूम, बोल. हा हुकूम मिळाल्यावर सर्वांनी एका सरळ रेषेत एकमेकापासून ६ इंच अंतरावर आणि सर्वांत उंच मनुष्याच्या डाव्या हाताला, उंचीच्या प्रमाणात एकाखाली एक असे उभे राहणे.

**एक करणे** क्रि. मिसळणे; एकत्रित करणे.

**एककरपद्धति-ती** स्त्री. (अर्थ.) सर्व कर काढून टाकून फक्त जमिनीच्या उत्पन्नावरच कर बसविण्याचे तत्त्व; सर्व करांचे एकीकरण. [सं.]

**एककल्ली** वि. १. हेकेखोर; संकुचित मनाचा; एकाच ठरावीक मतांना, सवयींना, पद्धतींना किंवा गोष्टींना अगदी हट्टाने चिकटून राहणारा; प्रसंगानुसार वागण्याचे ज्ञान नसलेला; कोत्या मनाचा; तारतम्य विसरणारा : 'कादर, इतका कसा एककल्ली झालास तू !' - एल्गार. २. एकाच विषयाकडे स्वाभाविक कल असलेला; एकांगी; एकदेशीय.

**एककानी** वि. एक काना असलेली (बंदूक).

**एककामी** वि. एकच काम करण्यास लायक. हरकामीच्या उलट.

**एककालिक** वि. १. एकाच कालखंडात घडणाऱ्या (घटना इ.); एकाच कालाशी संबंधित. २. ज्यात परिवर्तनाची शक्यता नाही असा अतिशय मर्यादित वेळात घडणारा. [सं.]

**एककालिक, एककालीन** वि. समकालीन; एकाच वेळचे; एका वेळी झालेले, आलेले; समवयस्क; समशिक्षित. [सं.]

**एककालिक अभ्यास** (समाज.) एकाच कालखंडातील सामाजिक घटनांचा अभ्यास, संशोधन इत्यादी.

**एककांद्या लसूण** पु. स्त्री. न. एकच कुडी (पाकळी) असलेला, एक प्रकारचा लसूण. यात अनेक पाकळ्या नसून एकच गड्डा असतो.

**एककी रीति-ती** (ग.) एककाचा उपयोग करून उदाहरण सोडवण्याची पद्धत.

**एककेंद्री** वि. सर्व अधिकार असणारी एकच मध्यवर्ती सत्ता आहे असा.

**एककेंद्रीय वलये** (भूमिती) एकच मध्यबिंदू असलेली वर्तुळे.

**एकक्रयाधिकार** पु. (अर्थ. ) एखाद्या वस्तूसाठी असलेल्या बाजारपेठेत त्या वस्तूचा एकच खरेदीदार असण्याची स्थिती. [सं.]

**एकखटा-ट्टा** क्रिवि. एकत्र; एका ठिकाणी करून; आखबंद; घाऊक; ठोक. [सं. एक+कृत]

**एकखती – खंती** वि. दुसऱ्या विजातीय रंगाची एकेरी छडी, रेघ, सळई उठविलेला (रेशमी खण, लुगडे). [म. एक+अर. खत्त=रेषा]

**एकखंडात्मक** वि. (ग्रंथ.) ज्याचा एकच खंड असतो असे (पुस्तक,ग्रंथ).

**एकखांबी** वि. १. एकाच खांबावर उभा असलेला (तंबू, घर वगैरे). २.(ल.) एकटाच कर्ता पुरुष असलेले (कुटुंब, घर). (वा.) **एकखांबी तंबू** – एकाच माणसाच्या खटपटीने, आधाराने उभी असलेली संस्था, चळवळ इ. : ' 'समाजस्वास्थ्य' हा एकखांबी तंबूच होता.' – उद्र २५.

**एकखेप** क्रिवि. एकपाळी; एकवार; पुन्हा एकदा.

**एकगजब** पु. एकगर्दी; गोंधळ; हलकल्लोळ; पहा : **गजब**

**एकगजर** पु. एकत्रित जोराचा आवाज; आरडाओरड; कल्ला; गलका.

**एकगट, एकगट्ट–गट्टा** क्रिवि. १. एकत्र; एका ठिकाणी; सर्व मिळून. २. एकजुटीने; सर्व एकत्रित होऊन; संघ करून.

**एकगाहा** क्रिवि. एकजूट; एकत्र : 'जाट व ही फौज एकगाहा करून मातबर झुंज शत्रूशी करून नामोहरम करावा असें आहे.' – ऐलेसं ३४.

**एकगुणी** वि. एकपट : 'तुम्हा जाली एकगुणी : आम्हां जाली दुणी :' – लीचउ १४३.

**एकगेळी** वि. अखंडखुरी; खूर विभागले नाहीत असा (घोडा) : 'त्याच्या (घोड्याच्या) पायाचा आकार मूळचाच चांगला असून एकगेळी पसरट खुराच्या योगाने पाय फार सुंदर दिसतात.' – मराठी तिसरे पुस्तक (१८७३) १०६.

**एकगोत्री** वि. सगोत्री; एकच गोत्र असलेले.

**एकघटकी** वि. एक परिणामी.

**एकघाई** स्त्री. नगाऱ्याची घाई. जोरात आणि जोशात वाजविणे (नगारे) : 'एकघाई लागली वाद्यांतराची कैसी : कानी पडिले नाइकीणे द्वारकेसी' – रुस्व ९२८.

**एकघात शून्य** (ग.) ज्याच्या मागेपुढे कोणतीही संख्या नाही असे शून्य.

**एकच** वि. पूर्ण; विलक्षण.

**एकचएक** वि. केवळ एक; अगदी एक; निव्वळ एक; दुसरे जोडीला नाही असे. [एकचे द्वि.]

**एकचक्रीय** वि. (वन.) १. प्रत्येक प्रकारच्या अवयवाचे एकच मंडल असलेले. उदा. धोतरा, सदाफुली इ. चे फूल. २. एक वर्ष किंवा त्याहूनही कमी जीवनकाल असलेली (वनस्पती); वर्षायू.

**एकचढ** वि. वरचढ; एकाहून एक श्रेष्ठ.

**एकचढ एक** एकावर एक ताण : 'काय एकाचढी एक कारटीं निपजलीं आहेत.' – भाबं ४४.

**एकचर** वि. एकलकोंडा; एकटा फिरणारा; तुटक राहणारा. [सं.]

**एकचाकी गाडी** स्त्री. एक चाक असलेली गाडी; ढकलगाडी.

**एकचार** पु. १. एकी. (गो.) २. संकर; मिश्रण. [सं. एक+आचार]

**एकचाल – ली** वि. १. एका चालीचा, सवयीचा, (गाण्यात) रागाचा, धाटणीचा. २. एकमार्गी; ठरावीक मतांना, सवयींना, पद्धतींना चिकटून बसणारा; एककल्ली. ३. सरळ; प्रामाणिक; छक्केपंजे माहीत नसणारा.

**एकचित्त** वि.१. एकमताचे; एकमेकांशी जुळणारे; सर्वसंमत. २. एकाग्र; सावधान; लक्षपूर्वक.

न.१ एकाग्र असणारे चित्त; ऐकमत्य; सर्वांची एकदम तयारी. २.(ल.) जेवायला बसलेली मंडळी उठताना सर्व एकदम जेवून उठतात त्यावेळी सर्वांचे झाले काय या अर्थी एकचित्त झाले काय? असे विचारतात : 'सर्वांचे भोजन संपलें असें पाहून नैमित्तिक गोठगस्ते कामदार यांनी एकचित्त जाहल्याबद्दल हात जोडून श्रीमंतांस कळविले म्हणजे श्रीमंत खाशा स्वाऱ्या हात धुऊन ऐनेमहालाच्या बाहेर जातात.' – ऐरापु २.१७. [सं.]

**एकछत्री** वि. एकाच राजाच्या किंवा मालकाच्या ताब्यातील, अधिकारातील; एकतंत्री; एकसत्ताक (कारभार, राज्य इ.).

**एकछत्री राज्य** १.एका सार्वभौमाच्या सत्तेखालचा अंमल, प्रदेश; ज्या प्रदेशावर दुसऱ्या कोणाची सत्ता नाही असा प्रदेश. : 'हें भरतखंड इंग्लिश लोकांच्या एकछत्री राज्याखालीं आहे.' – के २ (ल.) एकजण करील ती पूर्वदिशा.

**एकजखी** वि. एकाच शाखेचे वंशज : 'दादोबा व आपण एकजखी भाऊ, दोघांचे आजे सखे एकोदर बंधू आहेत.' – शारोज १७५.

**एकजड** क्रिवि. एकत्र; एका ठिकाणी; संघटितपणे : 'ते आल्यावर सर्व जमाव एकजड करून बेदरावर रवाना करणार.' – मइसा ५.१२७.

**एकजती, एकमती** स्त्री. एकमत; एकी; एकोपा (अनेक व्यक्तींमध्ये);पूर्ण मतैक्य; अविभक्तता.

क्रिवि. एकमताने; एकजुटीने.

**एकजथा** पु. एकत्व; एकोपा (जातीचा, कुळाचा); एककुटुंब; एकजात. क्रिवि. एकगठ्ठा; घाऊक; ठोक.(गुज. एकजथे.)

**एकजदी** वि. एका ठिकाणी असलेले; एकत्र : 'त्यांनीं एकजदी भाऊ निमे कुलकर्णीचें विभागी म्हणोन कलह मांडला.' – समारो ३.१२३.

**एकजन्मी** वि. १. सबंध आयुष्यभर पुरणारे; अतिशय टिकाऊ; पुष्कळ काळ चालणारे. २.आयुष्यात एकदाच केलेले; ज्याची जन्मात पुनरावृत्ती होत नाही असे. ३. जे करण्याला, पार पाडण्याला सबंध आयुष्य लागते असे.

**एकजरा** क्रिवि. अणुमात्रही; मुळीच; जरासुद्धा; यत्किंचितसुद्धा : 'यांस तफावत एकजरा न करणें.' – मइसा ८.१५९. [फा. यक्+जर्रा]

**एकजात** वि. १. एकाच जातीचा, नमुन्याचा; एकसारखा. २. (ल.) सजातीयात निर्भेळ; चांगले. ३. सुंदर. ४. सजातीय; एकापासून उत्पन्न झालेले (बंधू, बांधव).

क्रिवि. निव्वळ; केवळ; सर्वच्या सर्व. [सं. एक + जाति]

**एकजातीय** वि. एकप्रकारचे, तऱ्हेचे, जातीचे, वर्णनाचे, धर्माचे, वर्गाचे, नमुन्याचे, एकसारखे.

**एकजातीयता** स्त्री. गुणधर्म व घटक या दृष्टीने सारखे असणे.

**एकजिनसी** वि. एकाच प्रकारचा, तऱ्हेचा प्रवृत्तीचा : 'महाराष्ट्रातील समाज एकजिनसी व्हायचा असेल ....' – आव्हान ८७.

**एकजिनसीपणा** पु. १. एकाच प्रकारचा, तऱ्हेचा असणे; सारखेपणा : 'पोशाख, आहार यांच्यात एकजिनसीपणा येतो.' – समाज ७६. २. (अर्थ.) परिपूर्ण स्पर्धा व परिपूर्ण बाजार या संकल्पनेमधील एक गृहीतक. एखाद्या वस्तूची सर्व परिमाणे सर्वार्थाने समान, परस्परांमध्ये

संपूर्ण पर्यायी असतात. वस्तुपरिमाणाची सरूपता.

**एकजिन्नस** वि. एकाच प्रकारचा, तऱ्हेचा; एकजात; एकाच साच्यातला. (माल, वस्तू वगैरे); सर्व ठिकाणी सारखा.

**एकजीव** वि. पूर्ण मिसळलेले; पूर्ण एक झालेले : '(आमची आळी) समाधानी, संकुचित आणि एकजीव ...' – डाली ११.

**एकजूट** स्त्री. एकी; मिश्रण; एकोपा; एकजथा; पूर्ण ऐक्य : 'ही एकजूट झाली तर आपलंही स्वप्न साकार (होईल).' – श्रीयो २.२९५. क्रिवि. एकमताने; एकोप्याने.

**एकझडपी** वि. एकच फळी किंवा झडप आहे असे (दार, खिडकी).

**एकट, एकटका** क्रिवि. एकटा; दुसरा कोणी बरोबर नसताना; एकला : 'झालिया राज्यलोट । चोराकुळित होईल वाट । कोणी नवजावें एकट । अवघी एकवाट करावी ।।' – एभा ३०.३५९; 'हिंडे मार्ग भ्रमोनि एकटका ।' – मोआदि ३१.३६.

**एकटक, एकटंक** क्रिवि. टक लावून; सतत; एकसारखे; खळ न पडता (पाहणे, रडणे, वर्षणे); स्थिर नजरेने; रोखून : 'राजे एकटक पंताजींच्याकडे पाहत होते.' – श्रीयो २३४.

**एकटणे** उक्रि. १. एकवटणे; एकत्र करणे; वेचणे; गोळा करणे (फुले, धान्य इ.) २. कासावीस होणे; गुदमरून येणे.(व.) पहा : **एकाटणे** ३. गर्दी होणे; एकत्र होणे; सरभेसळ होणे; मिसळणे.

**एकटदुकट** क्रिवि. एकटाच; एकट्याने; बरोबर इतरांना न घेता : 'महार-जागले खळें मागण्याला एकटदुकट कधीही जात नाहीत.' – गांगा ६९.

**एकटप्पी** क्रिवि. एका टप्प्यात; न थांबता; एकाच पल्ल्यात.

**एकटप्पी–प्प्या** वि. एक टपाचा; आतील किंवा खालचा टप (कलंडा) आणि वरील टप यांपैकी कोणता तरी एक टप असलेला (तंबू.)

**एकटा** वि. एकला; दुसरा कोणी बरोबर नाही असा.

**एकटाक** वि. एकला; दुसरा कोणी बरोबर नाही असा; सोबत नाही असा; निराधार; ज्याला कुणाची मदत नाही असा.

**एकटाकी** वि. १. एका आकाराचा, घाटाचा, रंगाचा; (सामा.) एका स्वरूपाचा. २. खंड न पडता लिहिलेला; एकाच व्यक्तीने लिहून पूर्ण केलेला; एकाच मनुष्याने एकाच टाकाने लिहिले असताना सारख्या वळणाचे दिसणारे (अक्षर) किंवा अशा अक्षरांचा (लेख, पुस्तक): 'मराठ्यांचा एकटाकी संपूर्ण इतिहास लिहून काढलेला आहे.' – मागोवा ८३. ३. एकच टाका दिलेला (व्रोण इ.).[सं. एक + टंक्]

**एकटाकी मोर्तब** हात न उचलता लिहिलेला मोर्तब.

**एकटा टिकोजी, एकटा प्राणी, एकटा एकसुरा** १. फटिंग; एकलकोंडा; एककल्ली; माणूसघाण्या. २. ब्रम्हचारी; प्रपंच नसणारा मनुष्य.

**एकटादुकटा** वि. एखाददुसरा; बहुतेक एकटा क्वचित दुकटा.

**एकटांगी रोग** (पशु.) कमी वयाच्या गुरांत किंवा वासरांत दिसून येणारा रोग. या रोगात जनावर लंगडते. स्नायू असलेल्या भागावर सूज येते.

**एकटांग्या** वि. १. एक पाय असलेला; एका दिशेने जाणारा.(व.) २. (ल.) एककल्ली (मनुष्य).

**एकटिका** एकटा; एकला; अन्य कोणी बरोबर नसलेला : 'तो गातां तरि एकटिका । परि स्वरें पुरुतां नोका ।।' – शिव १६८.

**एकठय, एकठांय, एकठावण, एकठे** क्रिवि. एकाच ठिकाणी; एका स्थळी; एकत्र. (क्रि करणे.) (कु.गो.)

**एकठशी** वि. एकाच प्रकारचा; चाकोरीतला; ज्यात काही बदल नाही असा : 'एकठशी जीवनाला वैतागलेल्या ...' – माजी १८४.

**एकठोक** क्रिवि. १. सर्व एकत्र; सरसकट; एकदम. २. घाऊक; एकसट्टा; ठोकळ; किरकोळ नव्हे असे.

**एकडकाठी** स्त्री. (विणकाम) हातमागावरील ओव्या किंवा वह्या ज्याला टांगायच्या अशी धनुकली किंवा गज; ढेकणी; कपाळकाठी.

**एकडा** क्रिवि. एकदा : 'पण एकडा हुषार झालेला महादा ...' – वानगी ८८.

**एकडा** पु. एक; एकाचा आकडा.

**एकडाल** (संगीत) स्वरक्रमात बदल न करता मंद्र अथवा मध्य सप्तकातील स्वरापासून आरंभ करून निदान सात स्वरांची घेतलेली (तान.)

**एकडाव** क्रिवि. एकदा; एकवेळ : 'एकडाव मला शृंगारपूर बघायचं होतं.' – श्रीयो १.३२४.

**एकडेंगा** पु. खेकडा : 'मऊ मऊ चिखल .. त्यावरील तुरूतुरू धावणारे एक –डेंगे.' – शेलूक ९.

**एकडोळसां** न. एक जातीचा मासा. (कु.)

**एकडोळा** पु. १. एक डोळा. २. (ल.) एकुलता एक मुलगा. वि. एकच डोळा असलेला.

**एकडोळी करोटी, करवंटी** शेंडीकडील बाजूची, एकडोळा (भोक) असलेली, नारळाची करवंटी; नरोटी.

**एकढाळी छप्पर** (स्था.) एकाच बाजूने उतरते असलेले छप्पर.

**एकतत्त्ववाद** पु. अद्वैतवाद; जगात एकच सत्यस्वरूप आहे, मग ते भौतिक असो, अगर आध्यात्मिक असो असा सिद्धांत. [सं.]

**एकतत्त्वी** क्रिवि. एका बाबतीत; एका गोष्टीत; एका ठिकाणी; एका मुद्द्यावर (जीव धरणे, मन लावणे, अनुसंधान धरणे, चित्त देणे इ.) [सं. एक + तत्त्व]

**एकतत्त्वी होणे** एकाचाच किंवा एका पक्षाचाच कारभार चालणे : '.. एकतत्त्वी जाले हें बरें.' – ऐलेसं ९७.

**एकतया** क्रिवि. एकाग्रपणे; एकचित्ताने : 'त्यांची नामें कोण कोण । तेंही ऐके एकतया ।' – मुआदि १४.३५. [सं.]

**एकतरफा** वि. १. एका धन्याचा, राजाचा (प्रदेश). २. एका बाजूचा; पक्षपाती; एकदेशीय (विधान).
क्रिवि. १. एका बाजूस; एका भागी. २. एका बाजूचा; प्रतिपक्षी हजर नसताना (न्याय).

**एकतरफी–तर्फा–तर्फी** वि. १. एकाबाजूचा; पक्षपातीपणाचा : '...आणि तोंवर तीच एकतर्फी निर्णय घेऊन म्हणाली ....' – इंधन ३२. २. प्रतिपक्षाच्या अनुपस्थितीत दिलेला (निर्णय, निकाल): दुसरी बाजू ऐकून न घेता दिलेला (निर्णय). पहा : **एकतरफा** 'या दुसऱ्या मुद्द्याकडे प्रकृत निबंधांत फारसें लक्ष दिलें नाही त्यामुळें हल्लींचा लेख जरा एकतर्फी झाला आहे.' – लोटिकेले ४.११७.

**एकतऱ्हा** स्त्री. एक (विचित्र, चमत्कारिक, नवीन) प्रकार, रीत, धाटणी, पद्धत : 'परंतु दिवस एकतऱ्हेचे होते.' – ऐलेसं ५२४.

**एकतऱ्हेचा** वि. वेगळ्या प्रकारचा; चमत्कारिक; विचित्र; विक्षिप्त.

**एकतळ** वि. एकपदरी; एकेरी : 'सियाळेया दिसां एकतळेन वस्त्रेंसीं असति.' – लीच १६.

**एकतंड** क्रिवि. एकसारखा; सतत; अखंड. (व.)[सं. एक +तन्]

**एकतंत** क्रिवि. अखंड; एकसारखा; सतत (वेळ, जागा, क्रिया इ.)

**एकतंत्र** क्रिवि. एकदम; एका वेळी; एकाच साधनाने; एकसूत्री; एकसाधनी.

वि. एकसत्ताक; एकसूत्री; अनियंत्रित; एकमुखी; एकाच व्यक्तीच्या धोरणाने, तंत्राने; पहा: **एकतंत्री** : 'सर्व कारभार एकतंत्र करण्याची जी इंग्रजी कामगारांची हौस आहे.' – लोटिकेले १.१२२. [सं.]

**एकतंत्री** वि. १. एकाच सत्तेचे; एकाच तंत्राने चालणारे; एकहाती; एकमार्गी; एकतंत्र. २. एकपक्षीय; हुकूमशाही (राजवट). ३. (ल.) (चांगल्या अर्थी) सुरळीत; व्यवस्थित. ४. (ल.) (वाईट अर्थी) अनियंत्रित; स्वैर; जुलमी.

**एकता** स्त्री. एकोपा; एकी; ऐक्य; एकरूपता; सारूप्य : 'न भिन्न तनु त्या भले भजति एकता पाहुनी.' – केका १०८. [सं.]

**एकताटी, एकताट्या** वि. १.एकाच ताटातील; एकाच ताटात जेवणारे २. (ल.) एकाच जातीचे; समानधर्मी; समान आचाराचे. (वा.) **एकताटी जेवणे** – अगदी सलोख्याने असणे; भेदभाव न ठेवणे.

**एकतान** वि. एकाग्र; तन्मय; लक्षपूर्वक; एकाच गोष्टीकडे मन लागून असलेले. जसे: – गायनेकतान, शृंगारेकतान, अध्ययनेकतान, विषयेकतान, परमार्थेकतान, सत्कर्मेकतान : 'साऱ्या वृत्ती श्रद्धा आणि भक्तीने एकतान झालेल्या. ' – जज ५३.

**एकतानता, एकतानपणा** स्त्री. पु. एकाग्रता; तन्मयता; अनन्यवृत्ती : 'वेळ आपल्या गतीनें एकसारखा एकतानपणें जातच असतो.' – वज्रा २१३.

**एकतार, एकतारा, एकतारी** वि. १. एका – एकेरी तारेचा; एका धाग्याचा; दोन धागे पिळून दुहेरी न केलेल्या धाग्याचा (विणलेला पितांबर, वस्त्र वगैरे). २. एका नमुन्याचे, फर्म्याचे, मजकुराचे; एकसारखे; एकाच प्रकारचे : 'मग कैसा केला विचार । पत्रें लिहिली एकच तार ।' – ऐपो १०६. ३. एकच एक; तेच तेच; कंटाळवाणे.

**एकतारा, एकतारी** पु. स्त्री. वीण्यासारखे एक तंतुवाद्य. याचा भोपळा गोल व चापट असतो, दांडी कळकाची असून बोटभर व्यासाची व हात दीडहात लांबीची गोल असते. भोपळा एका बाजूने कातड्याने मढविलेला असतो. घोडी भोपळ्याच्या मध्यभागी लावतात. दांडीला एक खुंटी लावून तिला एक तार गुंडाळलेली असते व ती षड्जात लावलेली असते. ती घोडीवरून भोपळ्याच्या बुडाशी जो दांडीचा भाग असतो त्याला लावलेल्या बारीक खुंटीला खिळवितात. भजनी लोक, गोसावी, भिकारी वगैरे गाताना या वाद्याचा उपयोग करतात.

**एकतारी** स्त्री. १.(संगीत) बांबूच्या ३ फूट लांबीच्या नळीवर खालच्या बाजूला चामड्याच्या पातळ पडद्याने मढवलेला भोपळा बसवलेला असतो. या दोन्हीवर एकच तार ताणून बसवतात. गायकाचा हिच्यात मिळवलेला स्वर छेडण्यासाठीच तिचा उपयोग असतो. हिला 'एकतंत्री वीणा' असेही म्हणतात. २. एकनिष्ठा : '... तेण्हेच प्रमाणा पुढेंही एकतारीने चाकरी करूं.' –मइसा १.४५.

**एकताल** पु. (संगीत) एका तालाचे नाव. यात मात्रा बारा व विभाग सहा आहेत : 'मंगलाचरणाला एक जीवाचा एकताल आणि भरतवाक्याला रुद्रताल हा ठरलेला.' – भा ३८. [सं.]

**एकताल, एकताली** वि. १. (संगीत) एक तालाचा (ध्रुपद इ.). २. ज्यातून एकच नाद निघतो असे वाद्य (तास, झंगट इ.).

**एकताळामण** पु. एक माप. या मणाचे वजन सुर्ती १५४० रुपये भार असे.

**एकताळी पिटणे** हाहाकार होणे : 'ऐसी एकताळी पीटली । सत्यलोकिं ।।' – राज्ञा १.१५७.

**एकतीस** वि.तीस अधिक एक मिळून होणारी संख्या; ३१ ही संख्या. [सं. एकत्रिंशत्]

**एकतीस पाव** पावणे आठ (पुरा मासा नाही, एक गुंज कमी); नपुंसक.

**एकतुक** वि. एकटा; एकला; एकाकी : 'अशी ग मी संसारी एक तुका । खर्च नाहीं केला रुका ।' – पला ४.२०.

**एकतुका** वि. सारखे; समान; सदृश : 'ऐसें एकतुकें पांचभौतिक। पडती बहुवस टांक।' – ज्ञा ७.२५.

**एकतूक** वि. सारख्या वजनाचा; सारखा. [क. तूक]

**एकतोंडी** वि. एका बाजूला तोंड असलेला, मोकळा असलेला.

क्रिवि. एका बाजूने; विरूद्ध बाजूला कोणी नसताना; एकांगी (वाद, तक्रार, पुरावा, कैफियत). (वा.) **एकतोंड करणे** – तोंड देणे; समोर होणे; रुजवात करणे.

**एकत्यारी** स्त्री. अखत्यारी; मुखत्यारी : 'कोणा एकाची प्राबल्यता होऊन एकत्यारी झाल्याविना स्थिरता होता दिसत नाहीं.' – ऐलेसं ८१३२.

**एकत्र** क्रिवि. १. एका जागी, ठिकाणी; मिळून. २. अविभक्त (कुटुंबाच्या संदर्भात); भागीदारीने. ३. एकीकडे; एका बाजूला:' एकत्र केशव वसे अपरत्र वैरी । अन्यत्र पर्वत शतक्रतु भीत भारी ।' – नीति १८.

**एकत्र कुटुंब** (कायदा) मूळ एखाद्या पुरुषापासून जो वंशविस्तार झालेला असतो त्या वंशातील पुरुष, त्यांच्या बायका व अविवाहित मुले असे सर्व मिळून बनलेले एक कुटुंब; ज्याच्या मालमत्तेची वाटणी झालेली नाही, असे कुटुंब.

**एकत्र कुटुंबपद्धति–ती** स्त्री. वाटणी वगैरे न करता एकत्र राहण्याची पद्धती; सर्व भावांनी आपल्या बायकामुलांसह एका घरात राहणे. [सं.]

**एकत्रित** वि.एकत्र केलेला; एकत्र झालेला. [सं.]

**एकत्रीकरण** न. एकत्र करणे; दृढीकरण. [सं.]

**एकत्रीकृत** वि. एकत्र केलेले; मिळवलेले; मिसळलेले. [सं.]

**एकत्रीकृत निधी** कर व इतर महसुली उत्पन्न ज्यात जमा होते तो निधी.

**एकत्रीकृत शाळा** (शिक्षण.) व्यवसायशिक्षण आणि नेहमीचे शिक्षण जिथे दिले जाते अशी शाळा.

**एकथाट** पु. सारखी किंवा एक प्रकारची व्यवस्था, चाल, रीत, मांडणी.

**एकथोक, एकथोप** क्रिवि. १. एकदम एका वेळी सर्व (घेणे, थोडेथोडे अनेकवार न घेता); एकरास. २. घाऊक; सरसकट; उक्ता; एकठोक.

**एकदट** क्रिवि. एकदम; एकमेकांस लागून; एका ओळीने; एकत्र : 'तंव डौंडीची वीरघंटा । सनसनितीं जेंगटा । वाजितांती एकदटां । एके वेळें ।' – शिव ५२२.

**एकदम** क्रिवि. १. ताबडतोब; तत्क्षणी; अकस्मात; थेट; विलंब न लावता; न थांबता; विसावा न घेता; २. एका पर्यायात; एका दमात; एक सपाट्यात, झेपेत. ३. एका वेळी; एक समयावच्छेदेकरून.

**एकदरें** न. एका दांडीची शिडी : 'मिया त्यागाचे केले एकदरें : जें टाकावेया चवरें मुक्तिदुर्गाचे.' – उगी २२५.

**एकदल** वि. एकदळ. एक पानाचे, एक पाकळीचे (झाड, फूल इ.)

**एकदशांश** दहावा हिस्सा.

**एकदंडी** क्रिवि. एका हप्त्यात; एका दमात; एकाच वेळी; एका ठायी. पु. एकच काठी बाळगणारा संन्यासी. : 'न्मस्कारी व्याकुल एकदंडी : जवलाची देओ देखति ना' – वछा १९३.

**एकदंत** पु.(गणपतीला एकच दात असतो यावरून) गणपती; गजानन; विनायक : 'प्रथम नमन तुज एकदंता ।– तुगा ४१९३. [सं.]

**एकदा** क्रिवि.१. एके वेळी; एके काळी. २. एकदम; एकसमयावच्छेदेकरून; युगपत. ३. एकवार; एकवेळ; पुन्हा नाही अशा रीतीने. ४. केव्हातरी. [सं.]

**एकदाचा** क्रिवि. कसेतरी; कसेबसे; सायासाने; एकवार; फक्त एकवेळ; पुन्हा कधीही नाही. (क्रि. होणे, करणे इ.) उत्सुकता, काळजी यांचा शेवट दर्शविणारा प्रयोग. [सं.]

**एकदाट** वि. भरगच्च; दाट : 'कणेंविण सोपटें । कणिसें लागलीं आथि एकदाटें ।'– राज्ञा ९.४२५. [क. दट्ट]
क्रिवि. एकदम : 'बाण सुटती एकदाट.' – उह १३५६.

**एकदाणा** पु. एक खडा असलेली नाकातील चमकी; मुगवट. (तंजावर).

**एकदाणी** वि. सर्व दाणे एकसारखे असलेले (धान्य) : 'कुणब्याजवळील दाणा एकदाणी असतो.' – गांगा १४९.
स्त्री. सोन्याचे मणी सोन्याच्या कड्यांनी गुंफून केलेला, स्त्रियांनी गळ्यात घालायचा दागिना; एकेरी मण्याची माळ; एक पोतीचा व एक सोन्याचा मणी ओवलेली माळ.

**एकदाणे** न. एकदाणी माळ; एक प्रकारची माळ. यात काचेच्या पोतीमध्ये मधोमध एक सोन्याचा मणी असतो : 'एकदाण्याची खरबुजी तऱ्हा सादर ।' – अफला ५५.

**एकदिग्गत–दिग्गामी** वि.एकाच दिशेने गेलेला. [सं.]

**एकदिग्गामी प्रेरणा** (यंत्र.) एकाच दिशेकडे कार्य करणारी प्रेरणा, शक्ती; सरूप प्रेरणा. याच्या उलट भिन्नदिग्गामी किंवा विरूप प्रेरणा.

**एकदिन, एकदिवस** क्रिवि. एके दिवशी; कधीतरी : 'एकेदिनीं परंतू पिल्लास त्या कळाले.' – गदिमा.

**एकदिल, एकदील** वि. एकमताचा, एक विचाराचा (स्नेही, समाज, गट इ.); एकचित्त; सर्वांचा एकच निश्चय किंवा ध्येय असलेला; एकनिष्ठ : 'श्रीमंत व नबाब एकदील, तेव्हां हैदरखानाचा मज्कूर किती आहे.' – ऐलेसं ६.२८९८; 'नऊलाख सैन्य एकदिल घोडा शिरा । तीस हजार अबदागिरी बरोबर चाले ढिगारा ।।' – ऐपो १११.
पु. स्नेह; ऐकमत्य; संतोष : 'फौजेचा एकदील करून .... पत्राचे उत्तर जरबेचे आले असता इकडूनही सरंजाम जावयास दिवसगत लागणार नाही.' – ऐलेसं ११.२१०२. [फा. यक्+दिल्]

**एकदिली** स्त्री. वि. स्नेह; ऐकमत्य; मैत्री. एकमताचा, एकविचाराचा : 'सलूख एकदिली आहे.' – दिमरा १.१२३.

**एकदी** क्रिवि. परवा; नुकतेच; एके दिवशी.

**एकदीस** क्रिवि. एके दिवशी. (कु.गो.)

**एकदुःखसुख** वि. सुखदुःखात वाटेकरी असणारे; समसुखदुःखी; ज्यांचे सुखदुःख एक आहे असे. [सं.]

**एकदेश** पु. एक अंश; एक पक्ष; एक भाग : 'गळां पडति ज्यांचिया तवगुणैकदेश भ्रमें । तिहीं तुजचि दावितां भजति'– केका ३२.

**एकदेशतः** क्रिवि. एकपक्षी : 'वरील निरूपण केवळ एकदेशतः झाले ।'– ५२. [सं.]

**एकदेशित्व** न. मर्यादित्व; संकुचितता.

**एकदेशी** वि. १. एकाच देशाचे; समदेशी. 'तेणें एकदेशियें परी व्यापिलें । लोकत्रय ।।' – ज्ञा ५.३६. २. पूर्णपणे लागू न पडणारे; एकांगी; मर्यादित; एकरूपी (दृष्टांत, उपमा, तर्क इ.) : 'अगा एकदेशी दृष्टांत । दृष्टीत कीर असे वर्तत ।।' – विपु ७.३८. ३. एकाच बाजूचे; एकपक्षीय (विचार, विधान इ.) ४. आपले मत सिद्ध करण्यासाठी आपल्या विरुद्ध बाजूचे विचारात घेतलेले (मत). ५. एककल्ली; संकुचित विचाराचा; कोणाशी न पटणारा (माणूस, विचार, मत): 'एकदेशी होतों अहंकारें आथिला । त्याच्या त्यागें झाला सुकाळ हा ।।'– तुगा ४०४६. ६. सार्वत्रिक, सार्वदेशीय नव्हे असा; एकाच जागेला चिकटून असलेला; अल्पव्यापी. 'सर्वव्यापक अयोध्यावासी । किंवा आहे एकदेशी । सांगे मजपासी निश्चयें ।।' [सं.]

**एकदेशीय** वि. एकदेशी असणारा; संकुचित विचारांचा; एककल्ली.

**एकदेशीयता** स्त्री. संकुचितपणा; एकांगीपणा; विशिष्ट विषयाबाहेर न जाणे : 'आपल्या आचारविचारांना त्यांनी एकदेशीयतेची बाधा येऊ दिली नाही.'– संवासा २५.

**एकदोरी** स्त्री. १. एकसूत्र; एक ओळ. २. (ल.) एकमत; एकसत्ता. वि. सरळ; सारखे.

**एकधा** क्रिवि. एकप्रकाराने, मार्गानें: 'एकधा दशधा विभागता । ऐक नृपनाथा सांगेन ।।'– एभा ३.१०६. [सं.]
वि. एका प्रकारचा.

**एकधा, एकाधा** वि. कोणी एक; कोणताही एक : 'तेविंचि एकाधा प्रसादु ।'– राज्ञा १४.२३०.

**एकधातुचलनपद्धति–ती** स्त्री. (अर्थ.) नाणी पाडण्याच्या कामी एकाच धातूचा उपयोग ज्या पद्धतीत होतो ती पद्धती. केवळ सोने किंवा रूपे यांचे चलन असून सोने व रूपे यांचे एकसमयावच्छेदे चलन नसणे.

**एकधातुमान** न. (अर्थ.) चलनासाठी प्रमाणमूल्य म्हणून एकाच धातूचा– सोन्याचा किंवा चांदीचा उपयोग करणे.

**एकधान्य** न. ज्यामध्ये एकाच जातीचे धान्य खाऊन राहायचे असते असे चातुर्मासात आचरायचे व्रत; एकाच प्रकारच्या धान्यावर निर्वाह. [सं.]

**एकधार** क्रिवि. सतत; सारखा; न थांबता; अविरत : 'पाऊस एकधार

लागला होता.'– राणीचे पुस्तक ६५. [सं.]

**एकधारी** वि. एका बाजूला धार असलेले; एका बाजूने चालणारे (हत्यार, तलवार वगैरे).

**एकधारी रोखण** सुताराचे एक हत्यार; रंधा. (कु.)

**एकधाऱ्या** पु. एक प्रकारचा रंधा. यात पाते डाव्या कडेला खेटून असते. त्यामुळे एका बाजूला खाच पाडता येते. (खा.)

**एकधोतरी** वि. एकच वस्त्र असलेला.

**एकधोरणी** वि. एकच हेतू, उद्देश, धोरण असलेला.

**एकनती** स्त्री. (भूशा.) खडकांचा क्षितिजसमांतर किंवा नकळत कलता थर एखाद्याच ठिकाणी जरा जास्त अंशाने कलता होऊन पुन्हा पूर्ववत होतो तेव्हा तयार होणारी रचना.

**एकनळा** क्रिवि. वि. १. लागोपाठ; खंड न पडता; एकामागून एक (मुलगे किंवा मुली होणे): 'लग्नाआधींच मी गर्भिण । एकनळ मुलगे झाले तीन ।' – पला ४.१९. २. एक नाळ असलेले जुळे (मूल).

**एक नंबरचा** वि. अव्वल दर्जाचा; पहिल्या प्रतीचा.

**एकनाड, एकनाडी** स्त्री. १. मुलगा किंवा मुलगी यांच्या जन्मनक्षत्रावरून आद्य, मध्य व अंत्य अशा तीन नाडी ठरलेल्या असतात. ज्या मुलामुलांची वरीलप्रमाणे एकच नाडी असेल त्यांचा विवाह होत नाही. २.(ल.) जवळचा संबंध : 'सामाजिक सुधारणा आणि कायदा यांच्यामध्ये अपरिहार्य एकनाड असल्यामुळे' – आलेख ९३.

**एकनाड** वि. १. एकनाड असलेले जुळे (मूल) २. (ल.) एकाच आवडीनिवडीचे, मताचे, कलाचे.

**एकनिक** वि. एकट; एकटा.

**एकनिकी** स्त्री. जूट; एकी, एकपणा.

**एकनिगम** पु. कंपनीप्रमाणे अधिकार मिळालेला पुरुष.

**एकनिरवडी** वि. एकाच वेळी, एकाच कामात, एकाच झटक्यात निरवलेले, संपविलेले, उरकलेले.

**एकनिश्चय** पु. दृढनिश्चय; निर्धार; दृढश्रद्धा; विश्वास.
वि. दृढनिश्चयी; करारी.

**एकनिष्ठ** वि. १. एकाच व्यक्तीवर, तत्त्वावर, वस्तूवर श्रद्धा असलेला; एकावरच दृढनिष्ठा ठेवून चालणारा; अढळ श्रद्धावान : 'श्रीकृष्ण बोलावें तुवां तैसें । एकनिष्ठ ।।' – ज्ञा ३.१८. २. (उप.) अट्टल; पक्का; पुरा. जसे :– 'एकनिष्ठ लबाड, एकनिष्ठ लुच्चा इ. [सं.]

**एकनिष्ठ काशीकर** पुरा लबाड; अविश्वासू.

**एकनिष्ठता, एकनिष्ठा** स्त्री. १. एकाच व्यक्तीवर, तत्त्वावर पूर्ण श्रद्धा, अढळ विश्वास असणे; एकनिष्ठ असल्याचा गुण; पुरी श्रद्धा; मनःपूर्वकता. २. एकस्थिती; अचांचल्य :'जयां विषयाच्या ठायीं । एकनिष्ठता कहीं नाहीं'– ज्ञा २.११३. [सं.]

**एकनिष्ठपणे** क्रिवि. एकाच तत्त्वाला धरून.

**एकनेत्री** वि. एकाच डोळ्याला होणारा (मोतीबिंदू); एकाच डोळ्याने पाहता येते असा; एकच भिंग असणारा (चष्मा वगैरे).

**एकपट** वि. एकदा घेतलेले; एक या प्रमाणात; एखाद्या संख्येला एकाने गुणून मिळणारे (उत्तर). [सं. एक +प्रति]

**एकपण–णा** न पु. एकत्व; ऐक्य : 'ऐसी सर्व भूतमात्रीं । एकपणाची मैत्री ।'– ज्ञा १२.१४८.

**एकपतिपत्नित्व** न. (समाज.) एका पुरुषाला एका वेळी एक पत्नी आणि एका स्त्रीला एका वेळी एक पती असण्याची प्रथा.

**एकपत्नी** वि. १. एकच बायको असणारा; दुसरे लग्न न करण्याचा बाणा बाळगणारा; एक बायको असताना दुसरी न करणारा. २.धर्मपत्नी वाचून इतर स्त्रियांशी संबंध न ठेवणारा; व्यभिचारी नसणारा.[सं.]

**एकपत्नीव्रत** न. १. संपूर्ण आयुष्यात एकाच स्त्रीशी विवाह करण्याचे व्रत; एकभार्याव्रत; एकविवाह व्रत. २. लग्नाच्या स्त्रीशीच संबंध ठेवायचा असा बाणा : 'एकबाण एकवचन । एकपत्नीव्रत पूर्ण । चौदा वर्षे भरल्याविण । कदापि आगमन घडेना ।।'– रावि १२.११२.

**एकपथी वक्र** (भूमिती) एकेरी प्राचलातून परिमितपणे दाखवता येणारे निर्देशक ज्याला असतात असा वक्र.

**एकपद** न. (बीज.) ज्या पदात एकच रक्कम असते ते पद. याच्या उलट संयुक्त पद जसे : –३ क्ष, ५ अब, ६ अबक ही एकपदे होत. परंतु अ+ब हे संयुक्त पद होय. [सं.]

**एकपदरी** वि. १. एका बाजूचा पदर चांगल्या प्रकारचा असून दुसऱ्या बाजूचा पदर साधा असणारे (लुगडे, पागोटे इ.) २. एकेरी; एका घडीचे (वस्त्र.) ३. एकच सर, पदर असलेला (गोफ, माळ इ.) ४. एकेरी; अरे तुरे असे (बोलणे). (वा.) **एकपदरीवर येणे–** (एखाद्याशी बोलताना) एकेरीवर येणे; अरेतुरे करणे.

**एकपदी मार्ग** एकाच माणसाला जाता येण्यासारखी वाट; पाऊलवाट; एका ओळीने जाण्यासारखा मार्ग; एक कतार (सैन्याचा रस्ता), ओळ.

**एकपरी** क्रिवि. एक प्रकारे; एका दृष्टीने : 'हे सार्वजनिक आरोग्याच्या दृष्टीने एकपरी बरेच झाले.'– गांगा २.

**एकपर्णी** एका पानाचे. (झाड, फूल इ.)

**एकपद्धति–ती** स्त्री. (राज्य.) एकाच राजकीय पक्षाच्या हाती राज्याची सर्व सत्ता असून, इतर पक्षांना बंदी असलेली शासनपद्धती. [सं.]

**एकपक्षी** वि. विशिष्ट; एकजातीय; एका बाजूचे.
क्रिवि. एका अर्थी; एका बाजूने; एका दृष्टीने; कोणा एका पदावर अवलंबून (बोलणे, असणे इ.)

**एकपंक्तिरचना** स्त्री. संख्या, अक्षरे, वस्तू इत्यादींची सरळ रेषेत मांडणी.

**एकपंगत** स्त्री. एके ठिकाणी, एका पंक्तीला बसून जेवणे; एकत्र भोजन. [सं. एक+पंक्ति]

**एकपंथी** वि. एकमार्गी; एककल्ली; धोपटमार्गी; एका पद्धतीचा; साधा; एकच क्रम आचरणारा.

**एकपाकळी** वि. ज्या फुलाच्या पाकळ्या अगदी जुळलेल्या, एकमेकांना चिकटलेल्या असतात असे (फूल.) जसे : – गोकर्णी.

**एकपाखी** वि. एकच पाखे असणारे; ज्याच्या छपराला एकच बाजू आहे असे (घर) : 'दोनेक कासरे अंतरावर एक एकपाखी कौलारू झोपडं होतं.'– बाविबु १४२.

**एकपाठी** वि. १. एकवेळ वाचून किंवा ऐकून पाठ म्हणणारा. २. (ल.) अत्यंत बुद्धिवान; विलक्षण स्मरणशक्तीचा.

**एकपाठी, एकपाठ्या** वि. १. लागोपाठ; एकामागून एक; पाठोपाठ

जन्माला येणारी (भावंडे, एखाद्या कुटुंबातील मुले).

**एकपाणी** न. पाण्याचे एकच साधन (विहीर, तलाव इ.) असणे.

**एकपात्र** न. जेवणाचे पान आणि द्रोण एकाच जातीच्या पानाचे असण्याचे व्रत. त्याच्या उलट भिन्नपात्र.

**एकपात्री** वि. ज्यात एकच पात्र आहे असा; ज्यात एकच व्यक्ती, सर्व पात्रांचा अभिनय करते असा (नाट्यप्रयोग).

**एकपाददृष्टि –ष्टी** स्त्री. (ज्यो.) पूर्ण दृष्टीचे एक चतुर्थांश फल असलेली दृष्टी. प्रत्येक ग्रह आपल्या स्थानापासून ३ऱ्या व १० व्या स्थानावर व तत्रस्थ ग्रहांवर एकपाद दृष्टीने पाहतो. प्रत्येक ग्रहाला द्विपाद, त्रिपाद व पूर्णदृष्टीही असते. [सं.]

**एकपाद शिरासन** न. १. (योग) उजवी मांडी मोडून बसून नंतर डाव्या पायाखालून डावा हात घालून तो पाय हळूहळू मानेवर चढविणे. २. (मल्लखांब) बोंडावर बसून डावा पाय मानेवर ठेवून हात जोडणे. [सं.]

**एकपार्श्विक** वि. एकच बाजू असलेला; एकाच बाजूस घडणारा.[सं.]

**एकपावटी** क्रिवि. एकवेळा; एकदा.

**एकपावली वाट** पहा: **एकपदी मार्ग**

**एकपांक्त** वि. एक जातीचा; ज्याच्याशी सहभोजन होते असा; एका पंक्तीत बसून भोजन करण्यास योग्य. [सं. एक + पंक्ति]

**एकपिकी** वि. वर्षातून एकवेळ पीक, बहर येणारी (जमीन, झाड); एकप्रसू.

**एकपिंडता** स्त्री. सेंद्रिय एकात्मता.

**एकपुट** क्रिवि. सबंध; एकदम; एकवेळ; एकठोक.(ना.)

**एकपुटी** वि. एकच पुट देऊन तयार केलेले. (रसायन इ.)

**एकपुठा** पु. एक जमाव, संघ; एका संस्थेची, कामाची, विचारांची मंडळी.

**एकपुडी** वि. एकपूड (कातडी आच्छादन); एकेरी कातडे असलेला. (मृदंग, पखवाज) [सं. एक+ पुट]

**एकपुती** वि. एकच मुलगा असलेली (स्त्री.) [सं. एक+पुत्र]

**एकपेट्या, एकपेटा** पु. एकी; एकात्मता; सख्य : 'सिंदे व नाना फडणिसांचा पेट्या एक' – इसंहोकै ६.

**एकपेडी** स्त्री. एकदाणी; एकसर. (कु.)
वि. एक पेड असलेली. (वेणी, दोरी)

**एकपेशी, एकपेशीय** वि. एक पेशी असणारे; एकपेशीमय. (प्राणी)

**एक प्रकार, एक प्रकारचा** वि. १. निराळ्या प्रकारचा; निराळ्या वर्गाचा; विलक्षण; विचित्र; अनन्यसाधारण : 'लौकिक एकप्रकारें जालिया उत्तम नाहीं' – मरि २.९५. २. एकाच तऱ्हेचा.

**एकफणी** वि. एका विणीचा; एका तऱ्हेचा. (कपडा)

**एकफरमा** वि. एका आकाराचा, ठेवणीचा, जातीचा, स्वरूपाचा. (सैन्याच्या रांगा, लिहिण्यातील अक्षरे वगैरे).
पु. आकृती, आकार यांत ऐक्यता; एक स्वरूप; एक आकार.

**एकफसली** वि. वर्षाला एक पीक देणारी (जमीन); एकपिकी.

**एकफावट** क्रिवि. एकदा;एकवेळ. पहा: **एकपावटी** (गो.)

**एक–ब–एक** क्रिवि.१. एकूण एक; सर्व : 'एक–ब–एक हुजुर मालूम जाहलीं.' – ऐलेसं १५.३१. २. एकाएकी; एकदम: 'त्यांनीं मीर इमाम यास जठचरक येथें एक–ब–येक येऊन गांठलें.' – मइसा ५.११४. [फा. यक् ब यक्]

**एकबगी** क्रिवि. एकप्रकारे : 'परि तें एकबगीं थोडें । केलिया प्रतिकारामाजि वडें ।' – ज्ञा ११.४०४. [एक+बगा=प्रकार]

**एकबरी** वि. एकेरी पन्ह्याचे, रुंदीचे, डबल पन्हा नसलेले. (कापड)

**एकबर्दा** पु. तेल विकणारा. ठग लोक याला अशुभसूचक मानीत.(ठगी.)

**एकबागी** वि. मानेवर एका बाजूला भोवरा असणारा (घोडा). हे घोड्याचे अशुभ लक्षण किंवा खोड समजतात.

**एकबाट** पु. संकर; सरभेसळ; जमाव; गोकुळ; गोलंकार; खिचडी.
क्रिवि. सरभेसळीने; भेदविचाररहित.

**एकबाणी** वि. ज्याचा कुठलाही बाण व्यर्थ जात नाही असा.

**एकबारी** वि. १.एकदाच बार, आवाज करणारा, वाजणारा (फटाका बंदूक इ.) २. वर्षाला एकच बहर किंवा बार येणारे (फळझाड). ३. एका बाराचे काढलेले (गुलाबपाणी इ.) ४. सर्व एक रुंदीचा; एकेरी पन्ह्याचें, रुंदीचे. ५. एका दमात गाठायचा, करायचा (पल्ला, दौरा इ.) : 'बंडखोरांपैकी घोडदळाची तुकडी ३६ मैलांचा एकबारी पल्ला मारून दिल्लीजवळ येऊन धडकली.'– सन १८५७.१९७.

**एकबाल** पु. नशीब; सुदैव; भरभराट.

**एकबीच** वि. एक टाकून एक, सम. जसे :– २, ४,६, ८.

**एक बीच हात** (कवाईत) सम अंक (२,४,६) म्हटलेल्यांनी आपला उजवा हात ताठ, जमिनीशी समांतर करून खांद्याच्या पातळीवर समोर, बोटे एकमेकांशी लागलेली, अंगठ्याचा अग्रभाग वर आणि करंगळी जमिनीकडे अशा स्थितीत नेणे.

**एकबीज जुळे** (वै.) एका फलितांडाचे विभाजन होऊन निर्माण होणारे जुळे भाऊ किंवा बहिणी. फक्त दोन मुले किंवा दोन मुली अशाच जोड्या असतात. फक्त एकबीज जुळ्याचाच वंशदाय सारखा असतो.

**एकबुरजी** वि. १. एक खांबी (राहुटी, तंबू). २. (ल.) एकाच माणसावर अवलंबून असणारे. (काम, कारस्थान)

**एकबुंदकी, एकबुंदी** वि. एका जुन्या चलनी रुपयाचे नाव. या रुपयाच्या पृष्ठभागावर एक बुंद (ठिपका) असे.

**एकबेक** वि. सम–विषम (रंग, पदे).

**एकबेरजी** स्त्री. १. जमाखर्चाची पहिली नोंद. याच्या उलट दुबेरजी. या नोंदीवरून पुढे खातेवारी दुबेरजी, तिबेरजी केली जाते. उदा. एकबेरजी कलम, रक्कम, लिहिणे, हिशोब. २. एकनोंदी हिशेब; बारनिशी. याच्या उलट दुबेरजी. ३. सर्व रकमांची एकूण बेरीज.
वि. अशा प्रकारे ठेवलेला (हिशेब, प्रकरण इ.)

**एकबेरजी दप्तर** १. निरनिराळ्या खात्यांचा जमाखर्च, हिशेब व नोंदणी एकत्र ठेवणारी कचेरी, खाते. २. खतावणी; निरनिराळ्या खात्यांच्या खतावण्यांच्या रकमांचे हिशेबी दप्तर. यावरून एकंदर सरकारी जमाखर्चाच्या हिशेबाचे पत्रक तयार करता येत असे.

**एकबोटी गंध** न. एका बोटाने कपाळाला लावलेले आडवे किंवा उभे गंध. याच्या उलट दुबोटीगंध.

**एकभक्त** वि. १. एकाच देवाची भक्ती करणारा. २. (ल.) एकाच धन्याची सेवा करून राहणारा; एकाचीच मनधरणी करणारा. [सं.]

**एकभाज** वि. एकदाच भाजलेले.

**एकभाव** पु. १. मनाची एकाग्रता; एक विचार; ठाम मत. २. एक दर; एक ठरावीक किंमत.

**एकभाषिकता** स्त्री. एकच भाषा बोलता, वाचता, लिहिता येणे.

**एकभाषित** न. एकानेच केलेले भाषण; नाटकातील एकपात्री भाषण. [सं.]

**एकभुक्त, एकभुक्ति-क्ती** न. स्त्री. दिवसरात्र मिळून एकदाच किंवा माध्यान्ही एकदाच जेवून राहण्याचे व्रत: 'दशमीव्रत एकभुक्त साचार । एकादशी उपोषण हरीजागर ।।'
वि. दिवसातून एकदा जेवणारा. [सं.]

**एकभोग** वि. जो एकाच माणसाच्या मालकीचा असून त्यात हिस्सेदार नाहीत असा. (भाग)

**एकमजला, एकमजली** वि. १. एकच मजला असलेले (घर). २. एकच पदर असणारे. (पातळ, लुगडे, पागोटे इ.)

**एकमजली** क्रिवि. मध्ये न थांबता एकदम मुक्कामापर्यंत (जाणे, चालणे इ.).

**एकमत** न. मतैक्य; सर्वांची मते जुळणे; अविरोध; एक विचार; अभिन्नता; एकजूट.
वि. एकमताचे, विचाराचे. [सं.]

**एकमध्य** वि. (ग.) समकेंद्र; एककेंद्र; मध्यबिंदू एक असणारे. [सं.]

**एकमय** वि. १. सर्वव्यापी; सर्वाधिष्ठित. २. एकरूप : 'तुका म्हणे गंगासागर संगमीं । अवघ्या झाल्या ऊर्मि एकमय ।।'- तुगा ४०१६. ३. सर्व, एक समान (जातीचे प्रकारचे, गुणाचे). जसे :- एकमय धर्म, आचार, स्थिती, प्रकार.
क्रिवि. एकत्र; सर्व मिळून; एकजुटीने. [सं.]

**एकमसूदी** वि. थोर; अद्वितीय मुत्सद्दी; धोरणी; ज्याबद्दल दुमत होणार नाही असा; अद्वितीय : 'नाना फडनवीस एकमसूदी तर्क त्याने काढिला.'- ऐपो २७६.

**एकमंगल, एकमंगळ** न. (उप.) अनेक जातीचे लोक एकत्र येणे; सबगोलंकार; संकर; काला.

**एकमानपद्धति-त्ती** स्त्री. (ग.) त्रैराशिकाऐवजी एक रीत. या रीतीत प्रथम दिलेल्या प्रमाणावरून एका वस्तूची किंमत काढून नंतर त्यावरून इष्ट राशीची किंमत काढतात. याला एकमान गणित असेही म्हणतात. २. एक हे एकक प्रमाण मानून केलेली मोजमापाची पद्धत. [सं.]

**एकमापांकी** वि. (ग.) दुसऱ्या एककाशी सहज जुळणारे (परिमाण).

**एकमार्गी** वि. १. एकाच मार्गाने, रीतीने जाणारा; केवळ आपल्या मताप्रमाणे चालणारा; एककल्ली; चाकोरीतला; आग्रही : 'आमचे बालपणाचे जीवन फारच साधे, बाळबोध व एकमार्गी असे.'- माजी ६. २. एकाच दिशेने चालू असलेली किंवा एकाच दिशेने जाण्याची परवानगी असलेली (वाहतूक). [सं.]

**एकमाही** वि. एक महिन्याचा (हिशेब, वसूल, रोजमुरा, बेगमी इ.).

**एकमांस, एकहाड** वि. एका हाडामासाचा; एका रक्ताचा; एका कुटुंबातील; एक पिंड; सपिंड; सगोत्र.

**एकमुख** क्रिवि. १. सन्मुख : 'तेणे एकांती नेऊनि देख । व्यासासि केलें एकमुख.' - एभा १.५५३. २. तत्पर : 'माझ्या भजनीं एकमुख । माझिया निजभावें अतिभाविक ।।'- एभा १३.७४८.
वि. एक विचाराचे; एक जुटीचे; एक. [सं.]

**एकमुखी** वि. १. एका तोंडाचा; एका चेहऱ्याचा, रूपाचा, बाजूचा (देवमूर्ती, मुखवटा, रुद्राक्ष वगैरे). २. एकस्वरूपी; एक जातीय; एक तंत्री, एकाच अधिकाऱ्याच्या हाती असणारी (सत्ता) : 'सध्यां हिंदुस्थानांत एकमुखी राज्यपद्धती प्रचलित आहे.'- के २.१२.३० ४. एकाच्याच तंत्राने चालणारा, ज्याला एकच वरिष्ठ आहे असा. ५. एकमताचा; सर्वांचा :'आपण जे जे करू त्याला जनतेचा एकमुखी पाठिंबा आहे.' - आव्हान १२५

**एकमुखी रुद्राक्ष** पु. १. ज्याला एकच मुख आहे असा रुद्राक्ष. २. (ल.) एकतंत्री; जो एकाकडूनच माहिती, सूचना, सल्ला वगैरे घेतो असा माणूस, राजा, न्यायाधीश, अधिकारी वगैरे : 'सरकारी शाळांच्या एकमुखी रुद्राक्षानें सर्व शिक्षणक्रम सुरू ठेवणें बरोबर नाहीं.' -लोटिकेले ३.३९

**एकमुठाण** न. एकी; एकमत; जूट; कट ; संघ.

**एकमुठी, एकमुठीचा, एकमूठ** क्रिवि. १. एका मुठीने; एकरकमी; एका हाताने; एका वेळी : 'एका मुठीनें म्यां हजार रुपये दिल्हें.'-मोल २. कामाच्या किंवा व्यवहाराच्या एका वेळी, एका उरकात, एका झटक्यात.
वि. १. एकाच्याच सत्तेखाली असणारा (राजाच्या, मंत्र्याच्या, मालकाच्या वगैरे) ; एकमुखी. २. एका विचाराचे; पक्षाचे; एकमत झालेले. (वा.) **एकमुठी घालणे** - एकमताने, एकत्र जाणे, वागणे.

**एकमुठीने** क्रिवि. एकाच्याच हाताने; एकाच वेळी : 'पेरण्या एकमुठीने झाल्या नाहीत.' - गार ३०.

**एकमुठीने असणे** एकत्र, किंवा एकजुटीने असणे : 'कोणास जाऊं देऊं नये एकमुठीनें सारें असावें.' - ऐलेसं ५५२

**एकमुद्राक्षर** न. कळफलकाच्या साह्याने प्रत्येक अक्षर साच्यातून स्वतंत्रपणे काढून त्यांची जुळणी करण्याचे यंत्र. एकाक्षर मुद्रणयंत्र. [सं.]

**एकमुलाण** न. एकमत.

**एकमुस्त** क्रिवि. एकमुठी; एकदम; एकरकमी : 'सर्व रकम एकमुस्त पाठविली असती तर पेंटीच्या मालकांसहि अंदेशा आल्यावाचून राहिला नसता.'- श्रमसाफल्य ५.३. [फा. यकमुश्त]

**एकमुळा** वि. एकटा; एकुलता; एकलकोंडा.

**एकमुळी** स्त्री १. एकच मुळी, एकच रोपटे. कुटुंबात एकच मूल जिवंत राहिले म्हणजे त्याला म्हणतात. (क्रि . राहणे) २. (शेतकरी लोकांत) गावातील एक धान्याचे पीक, शेत, लागवड; शेतकीचा एकच उद्योग.
वि. आपल्याखेरीज दुसऱ्या धान्याला जागा न देणारे (जोंधळा, गहू इ. पीक.)

**एकमूल्य** वि. (रसा.) संतृप्त उत्कर्षातून एक उज्ज परमाणू निःसारित केल्यानंतर राहणारा संयुक्त मूलक : 'संतृप्त उत्कर्षातून उज्जाचा एक परमाणू काढला असल्यास त्याचा एक अवयव असंतृप्त राहील व त्यास एकमूल्य म्हणता येईल.-' ज्ञाको क १३० [सं.]

**एकमेक** वि. परस्पर; अन्योन्य : 'एकमेकातें साटोपें लवूनियां विंधिती.' - भुवन ४.१९१. [एकचे द्वि.]

**एकमेक, एकमेकाशी, एकमेकात** क्रिवि. परस्परांमध्ये; एकमेकांबरोबर; आपआपसांत; आपणांमध्ये; तुम्हामध्ये; त्यांच्यामध्ये.

**एकमेकी** स्त्री. मेळ, जम. (गो.)

**एकमेव** वि. एकच एक; केवळ एक. [सं.]

**एकमेळ, येकमेळ** पु. हिशेबातील जमाखर्चाचे आकडे जुळणे; मिळणी; ऐक्य; एकजूट; संघ; एकत्रपणा; सर्वांचा एक समूह; एकात एक मिसळून जाणे : 'तिसऱ्या किंवा धाकट्या आळीचा हक्क मागण्याला सर्व पुरुष एकमेळाने शिवारात जातात.' –गांगा.

वि. एकवट; एकत्र : 'प्रळय वन्हितुळ तेजाळ। कीं द्वादशादित्य येकमेळ।' – मुआदि ५.२५.

**एकमेळणी, एकमेळी** क्रिवि. सर्व मिळून; एकत्र; एकजुटीने; समुदायाने : 'सच्चिदानंद एकमेळीं। तेचि त्रिवळीं ललाटीं।' – एरुस्व १.६१.

**एकमेळी** वि. एकतर्फी; एककल्ली. (गो.)

**एकमोडी** वि. एकमार्गी; एककल्ली; एक प्रकारचा, स्वरूपाचा, जातीचा.

**एकमोल** न. एकमंगल; संकर; गोतमकाला. (को.)

**एकमोली** वि. एकसारखी किंमत असणारा (पदार्थ).

**एकमोहरे** क्रिवि. एकत्र; एकमार्गी. एका बाजूस वळलेले : 'मन धांवे सैरावैरा। मन मारूनि केलें एकमोहरा।' – नाम २०२०.

**एकयोनि–नी** वि. एकाच आईपासून जन्मलेले; सख्खे (भाऊ). [सं.]

**एकर** पु. जमीन मोजण्याचे एक विशिष्ट माप. ४०४४.८६ चौरस मीटर म्हणजे एक एकर. [इं.]

**एकरकम** स्त्री. निरनिराळ्या बाबींची एकत्र बेरीज.

**एकरकम, एकरकमी** क्रिवि. एकदम; एका रकमेने; एकमुठी; एकठोक : 'एकरकमी पुष्कळ पैसा मिळविण्यास देशांतरीं फिरल्याशिवाय इलाज नाहीं.' – माप्र ९.

**एकरक्तसंबंध** पु. (वै.) सामान्यत: एकाच रक्तसंबंधापासून किंवा सारख्या पूर्वजांपासून निर्माण झालेल्या व्यक्तींचा किंवा प्राण्यांचा एकमेकांशीं असणारा संबंध. [सं.]

**एकरदन** पु. (एक दात असलेला) एकदंत; गणपती : 'उठोनि वेगी एकरदन। दिधलें सकळांशी दर्शन।' – गणपतीची भूपाळी ६. [सं.]

**एकरस** वि. एकाच गोष्टीत सुख मानणारे, पावणारे; एका विकाराचे; एका भावनेचे; समरस.

पु. १. एकात्मता. २. (ल.) परब्रह्म : 'भेदु लाजोनि आवडी। एकरसीं देत बुडी।' – अमृ १.९. [सं.]

**एकरंग, एकरंगी** वि. १. एकाच रंगाचा; दोन्ही बाजूंना एक रंग असणारा (पागोटे, सखलाद इ.). २. अंगावर एकच रंग असलेला; दुसऱ्या कोणत्याही रंगाचे ठिपके वगैरे नसलेला; निर्भेळ रंगाचा (घोडा). असा घोडा कुलक्षणी, अशुभलक्षणी समजतात.

स्त्री. न. १. सोंगट्यांच्या तिफाशी खेळातील डाव. प्रतिपक्षाची सही होण्यापूर्वी आपली सही होऊन डाव बसून पक्क्या सोंगट्या उठून गेल्या व नंतर कच्च्या सोंगट्या उठून जाण्यापूर्वी प्रतिपक्षाची सही झाल्यास त्याला एकरंगी असे म्हणतात. २. सख्य; स्नेह; अविरोध : 'नबाब मनसूफ व राव पंतप्रधान यांची कदीमापासोन दोस्ती व एकरंगी, जुदागी नाही.' – मइसा१९.८; 'पुत्रपौत्रपर्यंत एकरंग केलें.' – ऐटि २.८०.

**एकराजक** वि. एकराज्य; एकतंत्री, एकाच्याच सत्तेखाली असणारे; स्वसत्ताक (राज्यपद्धती) : 'सर्वांच्या तोंडीं लोकसत्ताक संस्थान चांगलें कीं एकराजक चांगलें हा वाद झाला.' –निमा ८३. [सं.]

**एकराज्य** न. एकसत्ता; एकतंत्री कारभार; एकाच्या हाती असलेली अनियंत्रित सत्ता; एकछत्री राज्य. [सं.]

**एकरात्र** क्रिवि. १. एका रात्रीचा काल; चार प्रहर; सूर्यास्तापासून सूर्योदयापर्यंत. २. संबंध दिवस, अहोरात्र, चोवीस तास व्यापून. [सं.]

**एकराशि–शी, एकरास** वि. १. एकाच राशीचे; ज्यांची रास एकच आहे असे. २.(ल.) एका गुणाचे, जातीचे, पक्षाचे; सारख्या मानाचे; एकसारखे : 'बायकोपासून ममीपर्यंत एकरास.' – फाटक नाट्यछटा. ३. एकाच राशीतील, संघातील, समूहातील (धान्य, पदार्थ इ.); एकजात. [सं.]

**एकराष्ट्र** न. समान वांशिक, भाषिक, ऐतिहासिक इ. घटक मिळून झालेला लोकसमूह. निरनिराळी वांशिक, सांस्कृतिक इ. पार्श्वभूमी असलेले पण एकाच राज्यात वास्तव्य करून असलेले लोक; या सर्वांचा मिळून झालेला देश: 'छप्पन देश मोडून त्यांचा एकजीव अथवा एकराष्ट्र होण्याचा समय आला आहे.' – लोटिकेले १.४७५. [सं.]

**एकराष्ट्रीयत्व** न. १. सर्व राष्ट्र (त्यातील सर्व लोक) एक आहे अशी भावना; राष्ट्राभिमान; राष्ट्रभक्ती. २. एकाच राष्ट्राचे नागरिक असल्याची जाणीव : 'एकराष्ट्रीयत्वाची भावना राष्ट्रात निर्माण झाल्यास स्वातंत्र्य काय लांब आहे?'– टिसू ३८. [सं.]

**एकरूप** वि. एका रूपाचे, आकाराचे; सदृश; समरूप; अविभक्त; न बदलणारे; अविकारी : 'जयजय देवैकरूप। अतिकृतकंदर्पसर्पदर्प।' –ज्ञा १८.८. (क्रि. होणे.)

क्रिवि.१.एकसारख्या पद्धतीने; बदल न करता; तंतोतंत सारखा. २.यत्किंचितही; बिलकुल : 'तुजे भरवशावर मी आहे ही गुमराई एकरूप मनांत न आणिता सांगितलें' – होकै १६१. [सं.]

**एकरूपता, एकरूपत्व** स्त्री. न.अभेद; ऐक्य; एक होऊन जाणे; एकजिनसीपणा. [सं.]

**एकरूप–रूपांतरण** न.(ग.) एका संख्येचे किंवा पदावलीचे दुसऱ्या समान राशीमध्ये होणारे रूपांतर.

**एकरूप सट** (ग.) एकमेकांशी पूर्ण जुळणारी आकड्यांची मांडणी.

**एकरूपीकरण** न. १. एकत्रीकरण. २.समरूप, सारखे करणे. ३. संकर.

**एकरेषीय रक्तसंबंध** पु.(वै.) एकाच पूर्वजापासून क्रमाने झालेल्या संततीमधील रक्तसंबंध.

**एकरोखी** वि. १. एककल्ली; एकमार्गी; एकाच विषयाकडे चित्ताचा, मनाचा कल असणारा. २.एकाच (वरच्या) बाजूला वेलबुट्ट्या वगैरे भरतकाम केलेले आहे असे. (चीट, वस्त्र)

**एकरोखी शिवार** न. गावाच्या एकाच बाजूला असलेल्या जमिनी.

**एकल** वि. १. एकला; एकटा : 'एथ एकलेआ चालतां। भय नाहीं सर्वथा।' – ऋ ७. २.(बैदुलाचा खेळ) एक या अर्थाने. [सं.]

**एकल** न. (संगीत) एकट्यानेच गाण्यासारखी किंवा वाजवण्यासारखी चीज; एकपाठी गायन वा वादन.

**एकल काजा, एकल कांजा, एकल खाजी** (गोट्या – बैदुलाचा खेळ) एक गोटी दुसरीला मारताना मोजण्याच्या कामी एक या संख्येबद्दल योजतात.

**एकलकोंडा, एकलकोंड्या, एकलकोट, एकलटिका, एकलटुका, एकलटुरा, एकलनिपशा** वि. एकांतप्रिय; एकटा राहणारा; माणूसघाण्या; समाजात न मिसळणारा : 'आदिवासी समाज जंगलात कोंडला गेल्यामुळे एकलकोंडा झालेला आहे.' – भाप्र २३१, मनमिळाऊ नसणारा. हा शब्द निंदाव्यंजक असा वापरतात.

**एकलग** वि. क्रिवि. १. एकीकडे; बाजूला असणारे. सलग याच्या उलट (घर, झाड इ.) २. सलग; एकास एक चिकटून.

**एकलगी** वि. एका लगीवर उभारलेले; एकपाखी. याच्या उलट दुलगी.

**एकलतान** स्त्री. गोट्यांचा एक खेळ : 'येथे मुलांना .... एकलतानीचा खेळ माहीतच नाही.' – गार १५२.

**एकलपायी** वि. जोडीदार, मदतनीस नसलेला; एकटा : 'एकलपायी कुणब्याने कुणबीक जितकी निभावता येणे शक्य होते.'... गांगा १५९.

**एकल सट** (ग.) एकचएक, एकाकी संख्या–मेळ.

**एकलहरी** वि. सापाची एक विशिष्ट जात. हा चावल्याने एक लहर येऊन मृत्यू येतो : 'मेष कुंजर जटिल एकलहरी । आज्ञा होतां घेती झुंझारी । टाळ मृदंग वाजता कुसरी । रागोद्धार करिती पैं ।।' – हरि ३४.१४९.

**एकलक्षी** वि. ज्यासंबंधी आदर किंवा काही हेतू आहे अशी एकच वस्तू डोळ्यांपुढे ठेवणारा; एकधोरणी; एकमार्गी. [सं. एक+लक्ष्य]

**एकलंगी पेच** पु. (मल्लविद्या) जोडीदाराच्या दंडावरून आपला हात घालून त्याचा हात आपल्या पाठीवर दाबून धरून जोडीदाराचा हात ज्याबाजूने दाबून धरला असेल त्याच आपल्या पायाने त्याच्या पिंडरीला आपल्या पिंडरीने व पायाच्या चौडच्याने धरून आपली मान जोडीदाराकडे वळवून त्याला चीत करणे. फारसी भाषेत पिंडरीला लंग म्हणतात व हा डाव पिंडरीने करायचा असल्याने त्याला हे नाव पडले आहे.

**एकलंगीची सवारी** (मल्लविद्या) आपल्या एका पायाने जोडीदाराच्या पायात बाहेरून पाय घालून त्याच्या गुडघ्याच्या वाटीजवळ मांडीकडील बाजूला पाय घालून तोच आपला पाय आपल्या दुसऱ्या पायाच्या गुडघ्याच्या लवणीत घालून ज्या आपल्या गुडघ्याच्या लवणीत आपल्या पायाचा पंजा घातला आहे, त्या आपल्या पायाचा पंजा जोडीदाराच्या ढोणशिरेवर टाचेकडील बाजूला घालून त्याला चीत करणे.

**एकला** वि. १. एकटा; फक्त; केवळ : 'तरी अवधान एकलें दीजे ।' – ज्ञा ९.१. २. सामर्थ्यहीन; एकाकी. [सं. एकल]

**एकलाग** पु. अनुसंधान.

**एकलाधी** स्त्री. ऐक्य; एकमत; एकरूपता; एकबुद्धी : 'मग अहंकारासि एकलाधी । करूनि जिवितावधी । वहाविलें बुद्धि । – ज्ञा १३.४९.

**एकलासी** स्त्री. दिलजमाई; मैत्री; सलोखा : 'राजश्री चतुरसिंग भोसले रास्ते यांची एकलासी ' – ऐलेसं १४.७५५४. [फा. इख्लास्]

**एकलि एकटीक** अगदी एकटी : 'एकि बाइल एकलि एकटीक.'–गोप्र ४३.

**एकलिंग** न. पाच कोसांच्या परिघात असलेले एकमेव शिवस्थान. हे विशेष प्रतीचे सिद्धिस्थान समजले जाते. [सं.]

**एकलिंगजी** पु. मेवाडात उदेपूर शहरापासून एक मैलावर असलेले एक देवस्थान. हे देवस्थान मेवाडात फार प्रसिद्ध आहे. रजपूतलोक भेटीच्या वेळी 'जयएकलिंगजी' म्हणून नमस्कार करतात.

**एकलोंब्या** वि. एकच लोंबी असलेला( भाताचा, साळीचा एक प्रकार).

**एकलौता, एकलौती** वि. १. एकुलता–एकुलती; एकटा–एकटी : 'कां एकलौतिया बाळका । वरि पडौनि ठाके अंबिका ।' – ज्ञा १३.५०३. २. एकपुती; एक पोर असलेली : 'गुरु बहुतांची माये । परि एकलौति होऊनि ठाये ।' – ज्ञा १३.४१०. [हिं.]

**एकवचन** न. १. एकच बोलणे; न फिरणारे वचन. २. (व्या.) नामाच्या ज्या रूपावरून त्याच्या एकत्वाचा बोध होतो किंवा ज्या नामावरून एकाच वस्तूचा बोध होतो ते. [सं.] (वा.) **एकवचनात बोलणे** – अनादराने, एकेरी बोलणे; अरेतुरे करणे, म्हणणे.

**एकवचन, एकवचनी** वि. १. (व्या.) पदार्थाचे एकत्व दाखविणारा; एकवचनात असणारा. २. वचनाचा धड; बोलल्याप्रमाणे करणारा; सत्यप्रतिज्ञ.

**एकवट** क्रिवि. एकत्र; एका ठिकाणी; संयुक्त; सर्व मिळून; एकवटून; संमिश्र; एकंदर : 'रथ जोडिले एकवट । – एरुस्व ८.१४. [सं. एक+क. ओड्डो]

**एकवटणे** अक्रि. एकत्र होणे; गोळा होणे; मिसळणे; मिळणे : 'हे तिन्ही एकवटले । तेथे शब्दब्रह्म कवळलें ।' – ज्ञा १.२०.

सक्रि १. गोळा करणे; एकत्र करणे; जमविणे. २. मिसळणे; काला करणे.

**एकवटा** पु. १. एकवटलेली स्थिती, अवस्था; संयुक्तपणा. २. एकजूट; संघ, एकोपा; एकी; मिलाफ. ३. एकट्याचा जिन्नस; माल; घाऊक घेतलेला माल; एकवट्याचा, ठोक घेतलेला जिन्नस.

**एकवडा, एकवढा** वि. एकटा; एकला : 'मग नेणें बहु थोडें । न पाहे मागे पुढें । मार्गामार्ग एकवढें । करीत चाले ।।' – ज्ञा १८.३२५. २. एकेरी. ३. एकत्र केलेला.

**एकवडे, एकवट** वि. एके ठिकाणी – संयुक्त

**एकवत** न. १. (बायकी) एकभुक्त; उपास; उपवास. २. एकच पदार्थ खाऊन रहाण्याचे व्रत : 'अलोणी ताकभाताचे एकवत कीजे ।' – लीचपू ३३१. [सं. एकव्रत]

**एकवत** क्रिवि. एकत्र : 'कोठें नेणों हा फावला एकांत । सदा किलकिल भोवतीं बहुत । दोघे एकवत बोलावया मात । नाहीं लाज धरिली दिला हात वो ।।' – तुगा १११. [सं. एक +वृत्त्]

**एकवद** न. एकत्र; एकवाक्यता; ऐक्यता; एकवत् : 'एऱ्हवीं मध्योर्ध्व अध । हे नाहीं जेथ भेद । अद्वयासीं एकवद । जया ठायीं ।।' – ज्ञा १५.७३. [सं. एक +वृत्]

**एकवर्ण** पु. वर्णसंकर; जातिभेद न पाळणे; सबगोलंकार. [सं.]

**एकवर्ण, एकवर्णी** वि. एकरंगी; एक रंगाचा (बैल, गाय, पक्षी वगैरे).

**एकवर्णसमीकरण** न. १. (बीज.) समीकरणात अव्यक्त पद असते ते. जसे :– क्ष + अ = ३ ब,याच्या उलट अनेकवर्णसमीकरण. २. ज्यात अव्यक्तपदांचे प्रथम घात मात्र येतात ते. [सं.]

**एकवर्णित्र** न. (भौ.) एकरंगी प्रकाश प्रक्षेपित करणारे यंत्र, साधन उदा. सूर्यप्रकाशात हिरवा कागद धरल्यास सर्वत्र हिरवे दिसते.

**एकवशी, एकवशास** पहा : **एकोशी, एकोशास**

**एकवसा** पु. एकीकडील जागा; एकांतस्थळ; आडजागा. आडवळणी. [सं. एक+वस्]

**एकवस्तुवाद** पु. (तत्त्व.) सर्व विश्वातील विविध वस्तू, व्यक्ती, घटना एकाच वस्तूपासून निष्पन्न होतात असा सिद्धांत. [सं.]

**एकवस्त्र, एकवस्त्रपरिधान, एकवस्त्रस्नान** न. तीर्थाच्या ठिकाणी नवरा व बायको यांनी एकच वस्त्र नेसून किंवा दोघांनी तेच वस्त्र नेसून करायचे स्नान. हे तीर्थाच्या ठिकाणी पुण्यकारक मानले जाते.

**एकवळा** पु. १. एकोपा; ऐक्य; समूह; संघ; जमाव : 'नातरी अंवसेच्या दिवशीं । भेटली बिंबें दोनी जैशीं । तेवीं एकवळा रसीं । केला एथ ।।' – ज्ञा ११.५. २. मैत्री; स्नेह.

**एकवंक** न. एकनिश्चय; एकवाक्यता : 'याचेनि एकवंके जगासि वादु ।।' – ज्ञा १३.१६. [सं. एक+वच]

**एकवंकी** स्त्री. एकरूपता; भेदरहितता; सारखेपणा; एकत्व; तादात्म्य : 'मज एकवंकी याची स्थिती । आवडतु असे ।।' – ज्ञा ४.१२.

**एकवंकी** स्त्री. पायातील एक दागिना : 'निजपादिचेनि ओलें । सोनें पीका निगाले । तें एकवंकी सासिनलें । श्रीचरणक्षेत्री ।।' – ऋ ८७.

**एकवंद** न. एकमत; मतैक्य : 'एकवंद ऐसें जालें : जें हा वरु होए' – लीचपू ३२.

**एकवंशता** स्त्री. सपिंडता; सहजातसंबंध. [सं.]

**एकवाक्यता** स्त्री. १. एकमत; एकार्थ; एक निष्कर्ष (निरनिराळ्या पुस्तकांचा, वचनांचा, विधानांचा); ऐकमत्य. २. ऐक्य; मेळ; जूट : 'सर्व लोकांची, सर्व बाबतीत, सर्व विचारांची एकवाक्यता होणे कधीही शक्य नाही.' – लोटिकेले ३.२४६. [सं.]

**एकवाट, एकवाटी** वि.; क्रिवि. १. एकटा; एकत्र; संयुक्त; समरस : 'तयांमार्गें कुंजरथाट । गळां सांखळ्या एकवाट ।।' – एरुस्व ६.५२; दृश्य, द्रष्टा आणि दृष्टी । देखतां तिन्ही एकवाटी' – एभा २.३५८. २. एकदम : 'तैसें तें घनदाट । उठावलें एकवाट ।' – ज्ञा १.८९.

**एकवाढ** स्त्री. जेवणाराच्या पानात पुरेसे अन्न एकदम वाढून ठेवणे.

**एकवादी** स्त्री. एक वादी असणारी (चप्पल) : 'पट्ट्याचा लेंगा आणि शर्ट, पायात एकवादी ...' – वासू १४६.

**एकवार** क्रिवि. एकदा; एकवेळ.

**एकवार्षिक** वि. वर्षातून एकदाच होणारी. (वनस्पती, पीक, वस्तू इ.) [सं.]

**एकविचार** पु. एकमत; ठाम, निश्चित मत; निश्चय. [सं.]

**एकविध** वि. क्रिवि. १. एकाच तऱ्हेचा; एकाच प्रकारचा. २. (ल.) एकनिष्ठ (भक्त); सरळ; साधा : 'एकविध आम्ही न धरूं पालट । न संडू हे वाट सापडली ।' – तुगा ७५३. [सं.]

**एकविधभाव** पु. एकमत; एकविचार; एकभाव; ऐक्य; एकोपा.

**एकविध रूपांतरण** न. (ग.) एका संख्येचा किंवा संकेतचिन्हाचा त्याच प्रकारात होणारा बदल.

**एकविधा भक्ति–क्ती** स्त्री. एकाच देवतेवर असलेली श्रद्धा, भक्ती; एकाच ईश्वराची पूजा. [सं.]

**एकविषयिका** स्त्री. एकाच विषयावर तपशिलाने लिहिलेले पुस्तक, प्रबंध अथवा निबंध.

**एकविषयोन्माद** पु. (मानस.) एकाच विषयाचे वा वस्तूचे अतोनात वेड; एकाच विषयाच्या मागे लागणे, त्याचा ध्यास घेणे.

**एकविसणी** वि. एकदाच तापवून निववलेले; चुलीवरून खाली काढून निवू दिलेले (पाणी).

**एकवीरा वृत्ती** स्त्री. एकावलंबित्व; कुटुंबात कर्ता पुरुष असला की तो मरेपर्यंत सर्व त्याच्यावर अवलंबून असून त्याला मदत करण्याची अगर त्याचे काम पुढे चालविण्याची वृत्ती नसणे.

**एकवीस** वि. २१ संख्या; २० अधिक १ ही संख्या. [सं. एकविंशति]

**एकवेळ** स्त्री. दिवसाच्या दोन (सकाळ, दुपार) भागांपैकी एक, सकाळ किंवा दुपार. [सं. एक+वेला]

**एकवेळ** पु. मरण.

**एकवेळ, एकवेळा** क्रिवि. १. एकदा; एकवार. २. एकदम. [सं. एक+वेला]

**एकव्यसनी** वि. एकमताचे; सारख्याच सवयीचे; एकाच राहणीचे (लोक इ.).

**एकशक्तिवाद** पु. (तत्त्व.) विश्वातील सर्व घटना एकाच शक्तीमुळे घटित होतात असे मत. [सं.]

**एकशफ** वि. अखंडखुरी; एकगेळी; खुराला भेग नसलेला (घोडा, गाढव इ.).

**एकशय्या** स्त्री. १. एकाच अंथरुणावर निजणे. २. (ल.) अतिस्नेह; दाट मैत्री; प्रेमाचे संघटन. [सं.]

**एकशरीर** वि. एका रक्ताचा, मांसाचा, हाडाचा; सपिंड; सगोत्र. [सं.]

**एकशिवडा** वि. काटकुळा; सडपातळ; किडकिडीत. (गो.)

**एकशिवडा** पु. नदीतील एक मासा.

**एकशिसाल** स्त्री. डोक्याचा एक भाग दुखणे; अर्धशिशी. (गो.)

**एकशिक्षकी शाळा** स्त्री. एका शिक्षकाने सर्व वर्ग चालवायचे या पद्धतीने चाललेली शाळा.

**एकशिंगी** वि. एकशिंग असलेला (पशू). [सं. एक +शृंग]

**एकशी** (एकृशी) वि. एकत्र केलेली; एकवटलेली : 'कमजादा पावतीचा हिशोब करून बरोबर एकशी पावती करावी.' – थोमारो २.१४३.

**एकशीरफाल्त** वि. शीघ्रकोपी, रागीट (एक +शिर+पोर्तुगीज फाल्त = उणे, इंग्रजी फॉल्ट = दोष). (गो.)

**एकशेज** क्रिवि. एका ओळीने; रांगेने; एकदंडाळी (बसणे, मांडणे वगैरे).

**एकशेवडी** वि. सरळसोट, बिनफांद्यांचे (झाड). (को.)

**एकशेंगकापशी** स्त्री. देवकापशीचे झाड. याच्या बोंडात एकच बी असते.

**एकशौक्तिक** न. मोती तयार करणारे एकशिंपली कालव. ही गोड्या पाण्यात असतात. [सं.]

**एकश्रुति–ती** वि. एकाच स्वरातील; एकसुरी : 'नाहींपेक्षा या एकश्रुति संगीतांत त्यांना इतकी गोडी वाटली नसती.' – छिप्र १५०. [सं.]

**एकसडी** वि. एकच टाहाळा, खांदी असणारा (हरभरा, तूर, मेथीची भाजी वगैरे).

**एकसडी** वि. एकदाच सडलेले, कांडलेले (तांदूळ).

**एकसत्ताक** वि. एकाच्याच हाती सर्व सत्ता असलेले (राज्य); एकराज्य; एकराजक. याच्या उलट लोकसत्ताक : 'एकसत्ताक राज्य असल्यास अप्रिय कायद्याच्या योगाने असंतोषजन्य बंड उत्पन्न होण्याचा संभव

असतो.'– लोटिकेले ४.९३. [सं.]

**एकसमयावच्छेदेकरून** क्रिवि. एकदम; एका काळी; एकाच वेळी.

**एकसमयाविच्छिन्न** क्रिवि. एकसमयावच्छेदेकरून : 'एकसमयाविच्छिन्न हल्ला करून मोठी लढाई होऊन पराजयातें पावविलें.' – ऐलेसं ७१३७.

**एकसमात्र** वि. एकाच उभ्या पातळीने दोन सारखे भाग करता येणारा (अवयव). उदा. घेवडा, वाटाणा.

**एकसर** पु. (बायकी) एकदाणी; एकावली; एकपदरीमाळ. [सं.]

**एकसर, एकसरा, एकसरी, एकसरे** क्रिवि. १. एका ओळीत, रांगेत, ओघात : 'पळते जाहले एकसरें ।' – रावि २७.९७. २.(ल.) एकदम; एकाचवेळी; एकाएकी : 'हाक दिधली महावीरीं । बाण सुटले एकसरी । – एरुस्व ८.४९. ३. पूर्णपणे; सर्वस्वी : 'तुटे संशयाचें मूळ । येकसरां ।।' – दास १.१.२८.

वि. एकसारखा; निव्वळ; निर्भेळ : 'तें ब्राम्हण एकसर साबडें । माणुस नेणें फुडें ।' – शिव २०४; 'होती देहबुद्धि एकसरी ।' – ज्ञा १०.२१. [क. सरि=साम्य] [सं. एक +सृ – सर]

**एकसरणे** अक्रि. १. अनुसरणे; एकदम पुढे सरणे; निष्ठा ठेवणे : 'रिगतां वल्लभापुढें । नाहीं अंगीं जीवीं सांकडें । तिये कांतेचेनि पाडें । एकसरला जो ।।' – ज्ञा १३.६०७. २. एकवटणे; एकत्र होणे : 'वाराया धांवे प्रभु तों एकसरोनि सर्व कोपानें । भोजांधक सात्यकिला वेष्टिति अत्यंत मत्त जो पानें ।' – मोमौसल १.५०. ३. एकीकडे सरणे; पाठीमागे पळणे; पाय काढणे. ४. एका बाजूला होणे; फितूर होणे : 'त्याचा यांचा सलामासलाम होऊन येकसरोन आमच्याच लोकावरी फिरले.' – पेद ३४.३७.

**एकसरा** पु. सराची माळ ; 'प्रियेलागी एकसरा । म्हणौनि न बंधेचि दुसरा ।' – उह २६९.

**एकसरी जोडणी** (भौ.) ज्यामुळे सर्व विद्युतप्रवाह प्रत्येक भागातून त्याचे विभाजन न होता पार होईल अशा प्रकारे केलेली विद्युत्परिपथातील भागांची रचना.

**एकसष्ट–सट** वि. ६१ ही संख्या. [सं. एकषष्टि]

**एकसष्टी** स्त्री. एखाद्या व्यक्तीच्या वयाला साठ वर्षे पुरी झाल्याबद्दल करण्यात येणारा घरगुती धार्मिक विधी किंवा सार्वजनिक समारंभ.

**एकसहा, एकसा** क्रिवि. एकसारखा; अखंड; सर्रास : 'सुपीं तोचि संग घेईं धडपुडी । एकसा गधडी नास केला ।।' – तुगा २६१.

वि. समान; सारखा; एकाच प्रकारचा, जातीचा. [फा. यकसां]

**एकसंघ एकसंङ्घ** वि. (वन.) फुलातील सर्व केसरदलांचा एकच स्तंभ (जुडगा) असलेले (फूल किंवा केसरमंडल) उदा. जास्वंद.

**एकसंध, एकसंधी** वि. जोड किंवा सांधा नसणारे; तुकडा नसलेले; अखंड; बिनजोडी (भांडे, नाव, दगड, फळी, वस्त्र इ.); बळकट : 'पक्षनेतृत्व अधिक एकसंध झाले.' – रालो ९०.

**एकसंस्थ** वि. एका ठिकाणी असणारा; एकस्थानगत : 'कर्तबगारी व उंची एकसंस्थ झाल्याचे अब्राहम लिंकनचे उदाहरण...' – विविवृ २८.२.१९४०. [सं.]

**एकसाथ** क्रिवि. सर्वांनी मिळून; एकदम. [हिं.]

**एकसान, एकसा** वि. १. सतत; सारखा. २. अनन्य; एकनिष्ठ : 'धन्याची एकसान चाकरी केली हे सुकृत पदरीं आहे.' – ऐलेसं ४०९.[फा. यकसाँ]

**एकसारखा** वि. सदृश; साम्य असणारा; एकमेकांप्रमाणे (रूप, आकार, गुण वगैरे) असणारे.

क्रिवि. १. अखंड; न थांबता; सतत; एकसा; एकाच प्रकारे. २. एकाच क्रमाने. [सं. एक +सदृश]

**एकसाली** वि. एक वर्षाचा; एक वर्ष जगणारा; एक वर्षासंबंधी.

**एकसाक्षिक** वि. एक साक्षीदार असलेला; एकाने पाहिलेला. [सं.]

**एकसांगी** स्त्री. एकदा, फक्त एक वेळ सांगणे, आज्ञा करणे.

**एकसांज** क्रिवि. एक वेळ; एकदा (दिवसातून) : 'शाळेत सुमारे रोज तीन तास एकसांज द्यावे.' – गांगा १८८.

स्त्री. एक वेळ दूध देणे (गाईने).

**एकसुईचा** वि. शेंडा, बुडखा, देठ, डौल वगैरे एकाच प्रकारचे असणारे (नारळ, सुपारी, गहू, तांदूळ, मका वगैरे पीक); एकसोयीचा; एकसारखा; एकसडा.

**एकसुती** क्रिवि. एकाप्रकारे; एकसारखे; एकतंत्री; पूर्वीप्रमाणे; अखंड. [सं. एक+सूत्र]

**एकसुरा** वि. फटिंग; एकटा; कुटुंब, घरदार नसणारा; एकलकोंडा.

**एकसुरी, एकसूर** वि. एकच सुराचा; कंटाळवाणा; एकचएक; तोचतोच; ज्यामध्ये कधी फरक होत नाही असा : 'यशवंताला या एकसुरी जीवनाचा कंटाळा आला.' – हाकांध ४९.

**एकसुरी उच्चारण** न.आवाजात बदल न करता परत परत एखादा स्वर उच्चारणे; एकाच सुरात उच्चार करणे.

**एकसूत** न. एक रांग, पद्धत, रीत वगैरे; एक मासला; एक फरमा.

**एकसूत्रता** स्त्री. सुसंगतपणा.

**एकसूत्रमणी** पु. एकाच माळेचे मणी. म्हणजे सर्व सारखेच : 'रांगडे एकसूत्रमणि' – पेद ९.४८.

**एकसूत्री** वि. सुसंगत; निश्चित तत्त्वाला धरून असलेला. २. एकाच्याच मताने चाललेला. ३. एकाच सुतात ओवलेला. ४. एकच सूत्र, कलम असलेला; एककलमी.

**एकसूत्रीपणा** पु. सुसंगतपणा; निश्चित तत्त्वाला धरून असणे.

**एकसैपाक** पु. १. दिवसाचा एकच स्वयंपाक. २. सर्व घराचा एक स्वयंपाक.

**एकसोईचा** वि. एकनिष्ठ : 'तुमचा कारभार एकसोयीचा' – ऐलेसं ५२४.

**एकसोय** वि. एक बाजूला; व्यवस्थित; नीट; सोयीस्कर. (व.)

**एकसोस** पु. जीव, श्वास कोंडणे; आवाज बंद होणे (एखाद्या जोराच्या आवेगामुळे).[सं. एक+श्वस्] (वा.) **एकसोस धरणे** – कंठ दाटणे; गहिवरणे; बोलता न येणे; सद्गदित होणे.

**एकस्तर कर** (अर्थ.) वस्तूवरील विक्रीकराची आकारणी ही विक्रीच्या प्रथम स्तरावर किंवा अंतिम स्तरावर करणे. मूळ उत्पादन आणि अंतिम ग्राहक या साखळीत वस्तूंची विक्री अनेक स्तरांवरून होते. अशा वेळी प्रत्येक स्तरावर कर आकारण्यापेक्षा एकाच स्तरावर आकारणे हे महसूलप्रमाण, सोय, कार्यक्षमता या दृष्टींनी इष्ट असते.

**एकस्पर्शरेषा गाठबिंदू** पु.(भूमिती) दोन वक्र ज्या बिंदूत मिळतात तो बिंदू.

**एकस्वाधिकार** पु. (अर्थ.)एखाद्या वस्तूच्या उत्पादनाचा, एखाद्या

बोधचिन्हाचा, उत्पादित वस्तूच्या विशिष्ट नावाचा कायद्याने स्वाधीन ठेवलेला विशेषाधिकार.

**एकहस्त भुजासन** (मल्ल.) मल्लखांबाच्या बोंडावर बसून डाव्या हातावर डावा पाय घेऊन हात मागे मानेवर ठेवणे.

**एकहात फुगडी** स्त्री. मुलींचा एक खेळ.

**एकहाती** वि.एकाच्याच हाताने बनलेले, पार पाडलेले, चालविलेले; दुसऱ्या कोणाची लुडबूड नाही असा; एकतंत्री; एकसूत्री (कारभार, वहिवाट, काम इ.): 'पहिला एकहाती शब्दकोश फार ...'-पासंग२.

**एकहारी** वि. एकेरी; एकाच पंगतीत; बरोबरीने : 'हे चैतन्यासे शेजारीं । वसति ज्ञानाच्या एकाहारीं ।'- ज्ञा ३.२५१.

**एकहेळा** क्रिवि. सहज, एकदम. 'जाइजे वैकुंठी एकहेळा' – नाम ७१७. [क. हेळु=सांगणे]

**एकळी** स्त्री. एक काटेरी झुडूप.

**एकंकार** पु. १. जुळणी; जोडणी; मिसळणी. २. सर्व एक करणे; सरमिसळ; संकर : 'याप्रमाणे धर्मासंबंधे एकंकार करणारा हुकूम कलकत्याहून सुटला आहे.' – माप्र १६. ३. गर्दी; गुंतागुंत; गोंधळ; गोलंकार. पहा : **एकाकार**

वि. एकरूप; समान; एकसारखा; एकाकार : 'रावरंक समसमान उंचनीच एकंकारी.' – पला ६५.

**एकंग** पु. काठीचा खेळ : 'एकंग लकडी, फरीगदका, लाठीचे हात..(विद्यार्थ्यांकडून) करवून घ्यावी.'- संव्या ५२.

**एकंदर** स्त्री. न. १. एकत्र करणे; एकवट करणे; संमिश्र करणे; एके ठिकाणी आणणे; बेरीज; मिळवणी. २. स्नेह; सोबत; संगत; मैत्री. वि. क्रिवि. १. एकत्र; जुटीत; सहवासात; मिश्रणात : 'तरी वैराग्याचेनि आधारें ।जिहीं विषय दवडूनि बाहिरें । शरीरीं एकंदरें । केलें मन।।'- ज्ञा ५.१५१. २. एकरकमी सर्व; एकत्र करून; एखाद्या; एकूण. जसे : – एकंदर जमा– आकार, ताळा, पक्क, पट्टी; एकंदरीचा हिशोब– बेरीज–वही. ३. सर्व मिळून; ५. एकत्र; एका ताफ्यात: एकवट. ४. ठोक; एकूण; एकगट्टी; एकगोळा. पुन्हा पुन्हा करण्याचे कारण न ठेवता; एकवार; एकदाच (ताकीद, इशारा वगैरे). ६. (नकारात्मक) कधीही नाही; बिलकूल; केव्हाही अशक्य या अर्थाने : 'तू माझ्या घरी एकंदर येऊ नको.'= कधीही, केव्हाही येऊ नकोस.- पया ४८५. [सं. एकत्र]

**एकंदर** न. प्रत्यक्ष न होता परंपरेने झालेला, अप्रत्यक्ष संबंध, स्पर्श, विटाळ. [सं. एक+अंतर]

**एकंदर गट** पु.सर्व मिळून एकत्र; एकरकमी; एक जिनसी सर्व; एक जुटीने, मेळ्याने, समूहाने.

**एकंदर भाव** पु. सरासरी दर; किंमत.

**एकंदर विक्री** स्त्री. घाऊक, ठोक, एकदम, एकजिनसी विक्री.

**एकंदर सरासरी** स्त्री. बेरजांची सरासरी (एखाद्या मोठ्या हिशेबाच्या).

**एकंदरी** स्त्री. १. एकूण; गोळाबेरीज; सर्व मिळवणी; हाशील. २. सारांश; तात्पर्य. (गो.)

**एकंदरीत – ने** क्रिवि. शेवटी, अखेरीला; थोडक्यात; सारांश; सर्व बाजूंनी पाहिले तर.

**एकंदरे** वि. एकाग्र. पहा : **एकंदर**

**एकंस्थान** न. १. पाहिले स्थान (संख्यावाचनातील, एकं, दहं, शतं वगैरेपैकी). रकमेतील उजवीकडील पहिले स्थान हे एकंस्थान असते. २. एकमूल्य; एक प्रमाण; एकक; मूलमान : 'पाणी एकंस्थानी कल्पून म्हणजे विवक्षित आकारमानाच्या पाण्याचे वजन एक असे धरून तेवढ्याच आकाराच्या दुसऱ्या पदार्थाचे वजन त्याच्या कितीपट आहे हे काढितात.'- पदार्थव १.१२०. [सं.]

**एका** पु. १. (पत्ते, गंजीफा) एक संख्येचा, एक ठिपका असलेला पत्ता; एक्का; एक्क्या. २. (ल.) श्रेष्ठ पुढारी, माणूस; सर्वात अधिक कर्तबगार. ३. (वाद्य) एकताल; ठेका; ४. एकी; एकोपा; सख्य : 'दक्षिणचे सर्व दौलतदार यांचा एका जाला हें वर्तमान इंग्रजांस समजतांच बहुत विचारात पडून सर्द आहेत.'–मइसा १९.१०. [सं. एक]

**एकाएक** वि. एकटाच : 'पव्हे मार्कंडेयो एकाएकी ।'- ज्ञा ११.१८६.

**एकाएकी** वि. पूर्णपणे एक; भेदरहित : 'मी तूं म्हणतां वेगळे न हो । मुळीचे आहों एकाएकी ।।'- निगा १७८. [सं. एक–एकक]

**एकाएकी** क्रिवि. एकदम; अवचित; कल्पना नसताना; अकस्मात : 'मी तपासि गेलिया दूरी । एकाएकीं येईल झडकरी।।'- कथा १.४.५५. [फा. यकायक]

**एकाकार** १. भेसळ; सरभेसळ; मिसळ; खिचडी; एकरास. २. गोंधळ; गर्दी; बाजार. ३. गोलंकार; भिन्न गोष्टींचे एकीकरण; एकरूपता; संकर (निरनिराळ्या जातींच्या, दर्जाच्या लोकांचा). ४. ऐक्य; एकाकृती : 'मोडूनियां नामरूप मुद्रा । जीव आणिशी एकाकारा ।।'- एभा १९०८.

वि. १. सारखा कस, ओढा, प्रवृत्ती असलेले (मन, वासना इ.). २. अभिन्न; एका आकाराचे, रूपाचे, घडणीचे : 'जीव शिव एकाकार । तैसे मिनले दोन्ही अधर ।।'- एरुस्व १.५७. ३. एकाग्र; दृढ; एकनिष्ठ; स्थिर; निश्चल (मन). [सं.]

**एकाकिया** वि. पु. एकटा : 'वायु गुरू केला मियां : असे एकाकिया पवनु जैसा'- उगी २७९

**एकाकी** क्रिवि. एकाएकी ; अकस्मात; एकदम : 'तिसरे मजल्यावरूनि घातली उडी कारंज्यावरि । एकाकीं हालचाल न होतां गेलि वार्ता दुरवरि ।।'- ऐपो ३०८.

**एकाकी, एकांकी** वि. १. संगत, सोबत नसलेला; एकुलता; तेवढा एकच; एकटा; एकला : 'जैसें कां स्वप्न मोहा । तो एकाकी देखे बहुधा ।'- ज्ञा१४.८५.२.(बीज.)एकपदी.३.(शाप.)सलग (वनस्पतिशास्त्र); असंयुक्त; निर्भेळ (रसायनशास्त्र).[सं. एकाकितम्]

**एकाकी गाठबिंदू** (भूमिती) ज्याच्या सापेक्ष रेषा वक्ररेषेचे समीकरण पूर्ण करतात असा वक्ररेषेबाहेरचा बिंदू.

**एकाकी पदार्थ** (भौ.) मूलद्रव्य.

**एकाकेच** क्रिवि. एकरकमेने : '... रूपये तुमचे येतील एकाकेच सरकारातून अवघी बाकी देतील.'- होइसाखं १२.१७५.

**एकाखडी** वि. वर्णमालेतील एक एक अक्षर प्रत्येक चरणाच्या आरंभी घेऊन केलेले काव्य. (जसे :- कक, खख, गग) : 'एकाखडी बोला कशि गत झाली बाजीला । कक काशीबाई गहिंवरे । खख खबर गेली

पुनिया रे ।''– ऐपो १२. [सं. एक + अक्षर]

**एकाग्र** वि. एकतान; एकलय; एकाकडेच ओढले गेलेले (मन, अंतःकरण); एकाच विषयाला वाहिलेले; अचंचल; स्थिर. [सं.]

**एकाग्रता** स्त्री. एका गोष्टीत पूर्ण लक्ष.

**एकाघायी** क्रिवि. एका घावात; एका झटक्यात; एका वेळी; एका तडाख्यात.

**एकाच नावेत** क्रिवि. त्याच परिस्थितीत; त्याच सुखदुःखांना पात्र असे.

**एकाची एक** वि. एकमत; एकदिल. अनेक व्यक्तींच्या समूहाबद्दल योजतात.

**एकाट** वि. बाजूला पडलेला; ज्याचा इतरांशी संपर्क नाही असा : 'हे अत्याचार एखाद्या एकाट खेड्यात घडत.'– बंद १५.

**एकाटणे** अक्रि. एकवटणे; एक होणे. (वा.) **एकाटून येणे** – (जीव) कासावीस होणे. (व.)

**एकाड, एकाठ** वि. विचित्र; विलक्षण; चमत्कारिक; लहरी; स्वच्छंदी; एककल्ली. (को.)

**एकाडा** पु. महाराष्ट्रातील न्हावी लोकांची पंचायत.

**एका तागडीची पारडी** स्त्री.सारख्या कौशल्याच्या, गुणदोषाच्या (चोरांच्या, लबाडांच्या, खोट्यांच्या) जोडीला म्हणतात; समदुर्गुणी माणसे (निंदाव्यंजक); एका माळेचे मणी; पूर्णपणे सारखे.

**एका ताटातला** एकाच ताटात बसून जेवणारा; अतिशय घरोबा किंवा मैत्री असणारा; एकाच अन्नाचा (मित्र, सोबती); एका ताटी जेवणे.

**एकात्म** वि. एकजीव.

**एकात्म अधिकारश्रेणी** स्त्री. अधिकारपदाच्या महत्त्वानुसार क्रमवार एकत्र केलेली श्रेणीबद्ध व्यवस्था.

**एकात्म करणे** एकजीव करणे; एकभाव निर्माण करणे; भावनात्मक ऐक्य निर्माण करणे.

**एकात्मक संविधान** न. (राज्य). ज्या राज्यात सत्तेचे एकच केंद्र असते अशा एकमुखी किंवा एकात्म राज्याची घटना. अशा घटनेत मध्यवर्ती शासनसंस्थेत विभागांना भागीदारी नसते. इंग्लंड व फ्रान्स ही अशी राष्ट्रे आहेत.

**एकात्मता** स्त्री. १.एकपणा; अभिन्नपणा; एकरूपता; बाहेरून वेगळ्या वाटणाऱ्या गोष्टीमागील एकच मुख्य तत्त्व; तादात्म्य; 'उदकपणें पंडुसुता । तरंगाची एकात्मता । न मोडेचि जेवी ॥' – ज्ञा १८.११७१ २.समाजातील सर्व घटक एक होण्याची, समरस होण्याची क्रिया. [सं.]

**एकात्मवाद, एकात्मकेश्वरवाद** पु. एका परमात्म्यानेच सर्व विश्व व्यापले आहे, ईश्वर एकच आहे, त्या वाचून काही नाही असे मत; अद्वैतवाद. [सं.]

**एकात्मीकरण** न. भिन्न भिन्न, धार्मिक, वांशिक अगर भाषिक गटांचे एकरूप होणे; वेगळेपणाचा लोप होणे.

**एकादश** वि. १. अकरा ही संख्या. २. अकरावा : 'आतां यावरी एकादशीं । कथा आहे दोन्ही रसीं ।' – ज्ञा ११.१.३. भागवताचा अकरावा स्कंध : 'कोणी एकादश केला।'– मुक्तेश्वरकृत एकनाथाची आरती.[सं.] (वा.) **एकादशस्थानी असणे** – अतिशय स्नेहभावाने असणे; जीवश्च कंठश्च असणे.

**एकादशनी** स्त्री. कोणत्याही मंत्राचे अकरा वेळा आवर्तन; विशेषतः रुद्राची अकरा आवर्तने, यांत नमक अकरा व चमक एक वेळा म्हणतात.(विरू.) एकादसणी. [सं. एकादश]

**एकादश भाव** पु. (ज्योति.) कुंडलीतील ११वे स्थान. याला आय, लाभ असेही म्हणतात.

**एकादश रुद्र** पु. शिवस्वरूप अकरा देव. पहा : **अकरा रुद्र**. या अकरा रुद्र देवतांची साधारण नावे अशी – वीरभद्र, शंभू, गिरीश, अजैकपात्, अहिर्बुध्न्य, पिनाकी, अपराजित, भुवनाधीश्वर, कपाली, स्थाणू व भव.

**एकादशी** स्त्री. शुक्ल व वद्य पक्षाच्या प्रतिपदेपासून अकरावी तिथी. हिचे स्मार्त आणि भागवत असे दोन प्रकार आहेत. ज्या वेळी दोन दिवस एकादशी असते त्यावेळी पहिली स्मार्त आणि दुसरी भागवत असे धरतात. दर महिन्यातील शुक्ल आणि कृष्ण पक्षातील एकादशीची जी निरनिराळी नावे आहेत ती अनुक्रमे पुढीलप्रमाणे – चैत्र–कामदा, पापमोचनी; वैशाख – मोहिनी, वरूथिनी; ज्येष्ठ – निर्जला, अपरा; आषाढ – शयनी, योगिनी; श्रावण – पुत्रदा, कामिका; भाद्रपद – परिवर्तिनी, अजा; अश्विन –पाशांकुशा, इंदिरा; कार्तिक – प्रबोधिनी, रमा; मार्गशीर्ष – मोक्षदा, फलदा; पौष – प्रजावर्धिनी, सफला; माघ – जयदा, षट्तिला; फाल्गुन – आमलकी, विजया. [सं.] (वा.) **एकादशी घडणे** – एकादशी नसून उपास करावा लागणे; खायला न मिळणे.

**एकादशीवात** स्त्री. चार बोटांच्या रुंदीवर २५० फेरे घेऊन (५००सुताची) कापसाची एक वात तयार करतात. अशा दोन वाती आषाढी एकादशीपासून एक वर्षभर एकादशीला लावतात.

**एकादा– एकाध– वि.** कोणीएक; एखादा: 'तेवींचि एकाधा प्रासादु । कां करावा अश्वमेधु ॥'– ज्ञा १४.२३०.

**एकाधा** क्रिवि. एकदा : 'एकाधा कापडवीये आसन होए' – लीच १.४९.

**एकाधिकार** पु. कुलमक्ता; एकाच व्यक्तीच्या, संस्थेच्या हातात अधिकार, सत्ता असणे; एखाद्या बाबतीत एकाच व्यक्तीला सर्व अधिकार देऊन इतरांना मना करणे; पूर्ण ठेका :'नवीन मनूंत कै. गणपतराव यांच्याइतका वाकबगार नट एकहि नसल्याकारणाने त्यांच्या नाटकांचा एकाधिकार म्हणजे मोनापली नसतांहि त्यांची नाटकें कोणीच करण्यास धजत नसत.' – गणपतराव जोशी २०९. [सं.]

**एकाधिकार खरेदी** एखाद्या संस्थेस, व्यक्तीस, विशिष्ट वस्तू खरेदी करण्याचे सर्व अधिकार असणे. इतरांस ती खरेदी करण्यास मनाई असणे. सामान्यतः जनतेस आवश्यक अशा वस्तूंची किंवा शेतकऱ्याला रास्त भाव मिळावा म्हणून शासन अशा वस्तू, धान्य इ. खरेदी करते.

**एकाधिकार प्रमाण** (अर्थ.) विशिष्ट वस्तूचे उत्पादन व विक्री याविषयी असलेल्या अधिकाराचे प्रमाण.

**एकाधिकारी** पु. एखाद्या वस्तूच्या निर्मितीचा, विक्रीचा व इतर व्यवहाराचा पूर्ण अधिकार असलेली व्यक्ती.

**एकाधिकारी भांडवलशाही** (राज्य.) भांडवलशाहीच्या विकासाची विशिष्ट अवस्था. या अवस्थेत उत्पादनाची व वितरणाची सर्व व्यवस्था

काही थोड्या मोजक्या भांडवलदारांच्या किंवा परस्परावलंबी महामंडळाच्या हाती केंद्रीत होऊन औद्योगिक क्षेत्रातील त्यांचे इतर लहान प्रतिस्पर्धी अस्त पावतात.

**एकानएक, एकानेक** क्रिवि. झाडून सर्व. पहा : **एकूणएक**

**एकानुसंधानी** वि. एक अनुसंधान, ध्येय, उद्देश असणारा; एकावधानी; एकदृष्टी; एकदेशी. [सं. एकानुसंधान]

**एकान्न** न. १. एक जेवण; दिवसातून एकच वेळ जेवून राहणे. २. एकधान्य; कोणत्यातरी एका धान्यावर राहणे. ३. एकत्र जेवणखाण करणे. (कर.)

**एकापक्ष, एकापक्षी** क्रिवि. एका अर्थी; एका बाजूने, दृष्टीने.

**एका पायावर तयार असणे** अत्यंत उत्सुक असणे.

**एकापासोळीचा, एकाफासोळीचा** वि. लुकडा; रोड; अशक्त. याच्या उलट दुहेरी हाडाचा, लंगर हाडाचा.

**एकामतीएकाजती** क्रिवि. करार करणाऱ्या सर्व व्यक्तींवर व्यक्तिशः व सामुदायिक बंधनकारक होईल अशा रीतीने.

**एकामी, एकामे** क्रिवि. १. विराम न घेता; इतर काहीही न करता; ताबडतोब; सर्व उरकून; आटपून; एका झटक्यात; दुसरीकडे न वळता (उरकणे, सुरू करणे, करणे). २. एकदाच; पुनरावृत्तीची वेळ येणार नाही अशा प्रकारे (जाणे, करणे). ३. एकदम; सर्व मिळून; एकत्र; एका वेळी; युगपत्; (येणे, जाणे, करणे) :'वर्षति एकामेंचि प्राणहर प्रखरनैकशस्त्र गणीं ।' – मोकर्ण (पराडकर प्रत) १९.२१.

**एकामेळी** क्रिवि. एकत्र.

**एकायतन** न. १. एकस्थान; एकमेव ठिकाण; अधिष्ठान; आश्रयस्थान :'जे तपोतेजाचिया राशी । कीं एकायतन ज्ञानासी ।' – ज्ञा ४.६२. २. (ल.) ब्रह्म. [सं.]

**एकार** पु. रस्त्याची (दुसरीपेक्षा) उंच असणारी बाजू; एका बाजूला उंचवटा असणारा असा रस्ता. (व.)

वि. १. (ओझ्यामुळे) एका बाजूला कललेला, खचलेला. २. एककल्ली (माणूस).[सं. एकीकृत; एक+कार.] (वा.) **एकार जाणे, एकार होणे, एकार कलणे** – एकीकडे खचणे; खाली येणे (जनावराच्या पाठीवरील ओझे, गलबत, होडी); झोक जाणे; पुढे येणे. (वा.) **एकार बसणे** – १. कलून, रेलून बसणे. २. (ल.) अलग राहणे; बाजूला राहणे; एकीकडे बसणे.

**एकारणी** स्त्री. पहिली नांगरणी. [सं. एक]

**एकारणे** अक्रि. १. एकांगी बनणे; एकाच बाजूचा विचार होणे :'आमचे वाङ्मय लष्करी शिस्तीत जणू एकारले.' – नप्रप्र ९५. २. (ओझे अधिक झाल्यामुळे) एकीकडे झुकणे, कलणे, दबणे; (गोणी, पडशी, गलबत यांचे) एक अंग खाली येणे. ३. गुंतागुंत होणे; सर्व एक होणे; एकवटणे (दोरी इ.) ४. एकीकडे फुगणे; खाली येणे; लोंबणे; मोठे होणे (वृषण इ.).

सक्रि. एकत्र करणे; रास करणे; गोळा करणे.

**एकारत, एकारती** स्त्री. एका वातीचे, आरतीचे निरांजन. [सं.]

**एकारलेपणा** पु. एकाच पक्षाला, धर्माला, बाजूला, मताला प्रमाणाबाहेर महत्त्व देणे, असणे; एकांगी दृष्टिकोन असणे :'हिंदुस्थानात जातीयवाद, अलगपणा ... एकारलेपणा यांना स्थान राहणार नाही.' – नौतेने २२५.६.

**एकारी** स्त्री. एक चाकोरी खोल असलेला रस्ता; एका बाजूने उंचवटा असणे :'अधूनमधून एकारीचा रस्ता लागला होता.' – पेरणी २०.१. पहा : **एकार**

**एकार्णव** पु. कल्पांतीचा जलप्रलय; प्रलयकाळी सर्वत्र प्राणीच पाणी होऊन झालेला महासमुद्र : 'जो एकार्णवातेंही जिरवी ।'– ज्ञा १०.२७१. २. एक जमाव; एक घोळ; अनेक लोकांचा जमलेला समूह, ज्यामध्ये जातगोत वगैरे भेद करता येत नाही असा. [सं.]

**एकावटणे** अक्रि. एक होणे; एकत्र येणे; संघटित होणे :'हे मार्ग तरी दोन्ही । परी एकवटतीं निदानीं ।' – राज्ञा ३.३८.

**एकावद** स्त्री. कीर्ती :'तेणें कोळियें त्रिजगती । एकावद केली ।।' – राज्ञा १८.१७०९.

**एकावदी** स्त्री. ऐक्य :'मग अहंकारेंसिं एकावदी । करूनि जीविता अवधी ।' – राज्ञा १३.५०.

**एकावन, एक्कावन्न** वि. ५१ ही संख्या; पन्नास आणि एक मिळून होणारी संख्या. [सं. एकपंचाशत्]

**एकावयवी** (भाषा) एकच अवयव (उच्चारणक्षमता) असलेला (शब्द.)

**एकावली** स्त्री. १. एक अर्थालंकार; पदांची श्रेणी. यांत पहिल्या वस्तूशी दुसऱ्या वस्तूचा, दुसरीशी तिसरीचा असा साखळीप्रमाणे विशेषणरूप संबंध असतो :'राज्यांत समृद्ध पुरें, उंच पुरांतिल गृहें, गृहात जन। उद्योगशील सारे, उद्योग स्तुत्य देति विपुल धन ।।' (यात राज्य, पुरे, गृहे, जन, उद्योग आणि धन अशा सहा पदार्थांची एक श्रेणी.) – अर्थालंकारांचे निरूपण १७९. २. पहा : **एकावळी** :'नवरत्नांचें देवाचें पदक आणखी एकावली कोठें आहेत?' – नाना ८३.[सं.]

**एकावळी** स्त्री. गळ्यातील एक अलंकार; एक पदरी माळ; कंठा, हार: 'जेथ अहंकारा उरवी जाहली । एकावळीची काढली । दोरी जैसी ।।' – ज्ञा १३.५३१. [सं. एक+आवली]

**एकाश्म** वि. अखंड दगडाचा, एकाच दगडाचा (खांब). [सं.]

**एकासणे** सक्रि. ग्रासणे :'लोटे एकासिलें उदक' – एभा ११७७.

**एकासरे** क्रिवि. एका पद्धतीने, वृत्तीने :'तुका म्हणे तरे । भवसिंधु एकासरें ।' – तुगा १९७०.

**एकासीती संख्या** वि. एक्याऐंशी :'एकासींती प्रकारी.' – गद्य २४९.

**एकाह** पु. एक संबंध दिवस; चोवीस तास. [सं.]

**एकाहत्तर** वि. ७१, सत्तर अधिक एक ही संख्या. [सं. एकसप्तति]

**एकाहार** क्रिवि. १. एकीकडे; अलग; पृथक (होणे, असणे). २. एकाजवळ (अनेकांपैकी) असणे; एकाच्या ताब्यात. [सं.]

**एकाहार** पु. एक ओळ, पंक्ती; ऐक्य :'उबगला आर्दी एकाहारा । येवों पाहें ।।' – ज्ञा १८.२९१.

**एकाहारठी, एकाहारसून** क्रिवि. वि.एकीकडून; एका शेवटाकडून; एका बाजूने. (कु.)

**एकाहारी** वि. एकाच ओळीतला; सारख्याच योग्यतेचा :'चारुस्थळी एका हारी । एकांगाची ।।' – अमृ १.२.

**एका हिशेबी** क्रिवि. एका अर्थी; एका प्रकारे; एकांशी.

**एकाक्ष** वि. एका डोळ्याचा; एकडोळ्या; एका डोळ्याने आंधळा.
पु. (ल.) १. कावळा. २. शुक्राचार्य. [सं.]

**एकाक्षर, एकाक्षरी** वि. एका अक्षराचा; एक अक्षर असलेला. जसे :- एकाक्षरी कोश. [सं.]

**एकाक्षर यमक** (अलंकार) श्लोकाच्या सर्व चरणात अखेरीस येणारे समान एक अक्षर. उदा. स्वजन गवसला तो त्याजपाशी नसे तो। कठिण समय येता कोण कामास येतो।' रनल

**एकांक** पु. लीळाचरित्रातील चक्रधरस्वामींच्या एकाकीपणाचा कालखंड.

**एकांककार** पु. सर्वांना सारखे करून टाकणे; बरीवाईट वैशिष्ट्ये नष्ट करून टाकणे; सबगोलंकार.

**एकांकिका** स्त्री. एक प्रवेश किंवा एक अंक असलेले नाटक. [सं.]

**एकांकिता** स्त्री. एकटेपणा : 'तोडुनि आसेचे सूत्र : साधावी एकांकिता.' - मूप्र २३८०.

**एकांग** न. एक अंग, अवयव.
वि. पहा : **एकांगी**

**एकांग झुंज** द्वंद्वयुद्ध; दोघांचे युद्ध : 'एकांग झुंजें झुंजती। एकमेकां निकरेंसीं।' - मुआदि ४४.७२.

**एकांगबाजी** स्त्री. पट्ट्याच्या कसरतीपैकी एक. यात फक्त एकाच हातात पट्टा किंवा तलवार घेऊन हात करावयाचे असतात.

**एकांगवीर** पु. १. अनुयायी, सैन्य किंवा कोणी मदत नसलेला; मदतीची अपेक्षा न करणारा; कोठल्याही सैन्यपथकात सामील नसलेला; एकांडा वीर. काश्मिरातील राजतरंगिणीत 'एकांगवीर' या लढाऊ कामगाराचे वर्णन येते. पहा : **एकांड्या** : 'सन्नद्धकरितां दळभार। येथें लागेल उशीर। मी एकला एकांगवीर। भीमकी घेऊनि येईन।।' - एरुस्व ५.१. २.(ल.) वादात कोणाची मदत न घेता एकटाच स्वसमर्थन करणारा : 'पांचही दर्शनांशीं झुंजार। हा वेदांतासि साजे बडिवार। जो एकांगवीर। ख्यातिवादियां।।' - विसिंपू ७.१४. ३. कोणाच्या मदतीची अपेक्षा न करणारा, धाडसी, उत्साही माणूस. [सं.]

**एकांगी** वि. १. एकाच बाजूला सुंदर रंग, बेलबुट्टी वगैरे असलेले (चीट, रेशीम, मलमल, कापड इ.) २. एकालाच पुरेसा (पलंग, चटई इ.). ३. एकच गुण, बुद्धी, व्यवहार, ज्ञान इ. असलेला; एकदेशी; एकाच बाजूकडे लक्ष देणारा; दुसरी बाजू न पाहणारा. ४.कृश; सडपातळ; बारीक.(राजा.) [सं.]

**एकांगी** स्त्री. द्वंद्वयुद्ध; पृथक्युद्ध : 'समागमें दहापंधरा तोफा घेऊन आपली फौज सोडून एकांगीस यावें याजप्रमाणें बाहेर आले.' - भाब १३४.

**एकांगी** स्त्री. १. तरवारीच्या खेळातील एका हाताचे नाव. २. धाडस : 'तुम्ही भेटीस येऊन हिंमत धरून एकांगी करून कार्य संपादणे.' - मदरू १.२७.

**एकांगी खण** एक बाजू चांगली असणारा चोळखण. उदा. मुंग्यांचा खण.

**एकांगी घर** एकाच बाजूला उताराचे छप्पर असलेले घर; एकपाखी घर.

**एकांगी झाड** एका बाजूला वाढणारे, फुटणारे झाड.

**एकांगी पान** एकाच बाजूला चांगले असणारे (विशेषत: केळीचे किंवा विड्याचे) पान.

**एकांगी भांडण** ज्यात एकच पक्ष भांडत आहे असे भांडण; भांडणातील एका बाजूची कैफियत.

**एकांगी होणे** एकट्याने धाडसाने पराक्रम करणे : 'येक आंगी वीर होऊन इंग्रजांचे पारपत्य यांजकडून पडणें दिसत नाहीं.' - हिंदखं २.७८.

**एकांगुळ** वि. एक डोळा गारोळा आणि एक पांढरा असणारा (घोडा); एक मंडलिया. ही एक घोड्याची खोड आहे - अश्वप १.९४.

**एकांडा** पु. एकटा स्वार : 'नित्य नवे गणतीस लागती एकांडे देशावरले.' - प्रभाकर-खर्ड्याचा पोवाडा.
वि. इतरांत न मिसळणारा; एकटा राहणारा; अगदी एकटा: 'कुणबिकीच्या कामात एकांडा माणूस निरुपयोगी असतो.' - काआ ७१.

**एकांडा शिलेदार** स्वत:च्या हिंमतीवर सर्व काही करू पाहणारा; दुसऱ्याचे सहकार्य न घेणारा कार्यकर्ता, राजकीय पुढारी इत्यादी.

**एकांडेपणा** पु. अलगपणा; एकलकोंडेपणा; फटकून वागणे : 'मुंबईच्या नेमस्त प्रांतिक कमिटीच्या एकांडेपणाचा तीव्र निषेध करून... कॉंग्रेसचे द्वार सर्व राजकीय पक्षांस यामुळें मोकळें झालें.' - लोटिकेले ३.३३१.

**एकांड्या** पु. १. ज्यांचे अंड विभागलेले न दिसता एकच दिसते किंवा ज्यांचे अंड एका बाजूला लोंबत असते असा घोडा. असे अंड असणे हे एक अशुभ लक्षण समजतात. - अश्वप १९६. २. पहा: **एकांगवीर** कोणत्याही पलटणीत सामील झालेला नसून स्वतंत्रपणे लढणारा; स्वतंत्र शिलेदार; शूर, धाडसी पुरुष : 'नित्य नवे गणतीस लागती एकांडे देशावरले.'- ऐपो २१६. ३. एकटाच काम पार पाडणारा; दुसऱ्याची मदत न घेणारा (हरदास, गवई इ.) [सं.]

**एकांत** पु. १. खाजगी जागा; गुप्त जागा; वर्दळीपासून अलिप्त असलेली जागा; कोणाचा उपद्रव होणार नाही असे स्थळ; निवांत स्थान : 'बहुतकरूनि एकांतें। बैसिजे गा।।' - ज्ञा ६.१८०. २. निश्चित स्थान; कायम स्थान : 'जें आकाराचा प्रांतु। जें मोक्षाचा एकांतु।' - ज्ञा ६.३२२. ३. खाजगी मसलत; खलबत; एकीकडे विचार; गुजगोष्ट. लोकांत याच्या उलट.[सं.] (वा.) **एकांत करणे** - १. खलबत, गुजगोष्टी करणे : 'नळें तुजशीं एकांत काय केला' - नल ११७. २. एकांतात, एकमेकांच्या सहवासात असणे; अगदी सलगी करणे; एखाद्याजवळ एकटे राहणे : 'सुशीलेनें काफर्शी एकांत केला व तेथें ती त्याच्या अगदी जवळ बसली.' - सुदे २३०.

**एकांत कोठडी** एकीकडची, निर्जन खोली (तुरुंगातील तळघर वगैरे); अंधारी; अंधाऱ्या कोठडीत कोंडण्याची स्थिती; एकांत तुरुंगवास.

**एकांतर-रा** वि. एक सोडून एक असे; एक दिवसाआड (ज्वर).
न. एक दिवसाआड जेवण्याचे व्रत; धरणेपारणे : 'अथवा एकांतरा कृच्छ्री। चांद्रायणें मासोपवासीं। शोषोनि गा धातुराशी। करिती तपें।।' - ज्ञा १७.३६४. [सं.]

**एकांतर खंड** (भूमिती) (वर्तुळाचे वगैरे) एकाआड एक असे विभाग.

**एकांतरित गट** (ग.) एकाआड एक असे आकडे घेऊन केलेला गट.

**एकांतिक** वि. १. परब्रह्मी लीन; ब्रह्मरत. २. अतिरेकी; दुसऱ्या बाजूकडे पूर्ण दुर्लक्ष करणारा. [सं.]

**एकांतिक धर्म** ज्यात विष्णू हाच अंत म्हणजे अंतिम तत्त्व मानला जातो असा भागवत धर्म : 'हा भागवत किंवा नारायणीय धर्म त्यासच सात्वत किंवा एकांतिक धर्म अशी दुसरी नावे आहेत.' - गीर.१०.

**एकांतिकपणा** पु. एकाच गोष्टीची अतिशयितता; अतिशयोक्ती: 'एकांतिकपणा हा विनोदात हृद्य असला तरी तो शास्त्रात हृद्य न होता उव्देगजनक होतो.'- के १४.५.४०

**एकांतिक राज्यघटना** मध्यवर्ती कायदेमंडळाचा सार्वभौम अधिकार व तदितर गौण विभागांना अधिकाराचा अभाव; सार्वभौमाधिकार अविभक्त असून मध्यवर्ती संस्थेखेरीज इतर कोणालाही कायदे करण्याचा अधिकार नसणे.

**एकांती** क्रिवि. खाजगीत; गुप्तपणे.

**एकांती लोकांती** क्रिवि. खाजगी व सार्वजनिक रीतीने. क्वचित एकांत लोकांत असाही प्रयोग करतात. (वा.) **एकांती लोकांती सांगणे** - एकीकडे व प्रसिद्धपणे, चारचौघांत सांगणे.

**एकांशिक, एकांशी** वि.एका भागासंबंधी; एकांगी; मर्यादित स्वरूपाचा; विशिष्ट विषयापुरता; संकुचित [सं. एकांश]

**एकांशी** क्रिवि. काहीसे; एका तऱ्हेने; एका बाजूने; एका बाबतीत.

**एकिहेळा** क्रिवि. १. एक वेळ; एकदा :'ते एकिहेळां घे पां आपवें ।' - ज्ञा ९.२९९. २. एकदम; अकस्मात् :'हें लटिकें केवीं म्हणिजें । एकिहेळां ।।' - ज्ञा ४.३९.[एक + हेळा; तुल. प्रा. हेला= शीघ्रता.]

**एकिंदा** पु. एकी; ऐक्य; सख्य; मैत्री; जूट :'मुख्यांचा एकिंदा साबित आहे. विलग पडणार नाही.' -मइसा १०.१२१. [सं. एकता]

**एकी** स्त्री. १. ऐक्य; सख्य; मैत्री; स्नेह; गट्टी; एकमेळ; एकदिल. २. अभेद; अद्वैत; अविभक्तता (हेतू, भाव, हित, उद्योग यांमधील). ३. (एकीबेकी खेळात) विषम संख्या. ४. लघ्वी; मुतणे; लघुशंका. शाळांतून विद्यार्थी लघ्वीला जाताना परवानगी मागताना (एक बोट दाखवून) म्हणतात. ५. एक याचे अनेकवचन :'एकी म्हणती काय झालें?' - राजवाडे ग्रंथमाला. [सं. एक]

**एकी** क्रिवि. एकाने गुणून. उदा. एक एकी एक. पाच एकी पाच पाढ्यात म्हणतात.

**एकी** शअ. बाबतीत :'सगळं गाव म्हणतं मास्तर यळंला येतो; मग माझ्याएकीच का असं?' - बनगर ४१.

**एकीकडचा, एकीकडील** वि. एका बाजूचा, (दिशेचा, भागाचा वगैरे) मुख्य रस्त्यापासून लांब असलेला.

**एकीकडून, एकीकडने** क्रिवि. १. एका बाजूने, दिशेने, भागाने; एका बाजूला, अंगाला, भागाला. २. एकदम सर्व मिळून; एकंदर सगळे.

**एकीकडे, एकीकडेस** क्रिवि. १. अनेक कडा, बाजू यांतून एका ठायी, एका अंगी. २. एका बाजूला. पहा : **एकीकडून** १. ३. बाजूला; वहिवाटीच्या रस्त्यापासून दूर; लांब; पलीकडे. ४. (ल.) प्रस्तुत भाषणादींचा प्रस्तावक्रम, त्यापासून अलग, दूर.

**एकीकरण** न. १. संमिश्रण; संकलन; मिश्रण, एक करणे; मिलाप करणे. २. अभेद; अद्वैत; एकाकार; एकरूप; ऐक्य. [सं.]

**एकीकाष्ठा** क्रिवि. एकत्रपणे; तौलनिक पद्धतीने विचार करून; पराकाष्ठेने विचारदृष्ट्या; तात्त्विकदृष्ट्या :'तैसें दृश्य कां द्रष्टा । या दोन्ही दशा वांझटा । पाहतां एकी काष्ठा । स्फूर्तिमात्र तो ।।' - अमृ ७.२४४. [सं. एक+काष्ठा =दिशा, सीमा]

**एकीन** स्त्री. खात्री; विश्वास; दृढमत :'व -वाजिबी ताकीद होईल हे एकीन समजोन.' - मइसा १५.१५२. [फा. यकीन]

**एकीबेकी** स्त्री. १. बायका-मुलांचा समविषम ओळखण्याचा एक खेळ. (सरी ब्यस्सा खेळ, सम विषमांकांचा खेळ) यात मुठीत पैसे वगैरे घेऊन दुसऱ्याला ते सम आहेत की विषम आहेत असे विचारतात, त्याने सांगितलेले (मोजून पाहता) खरे ठरले तर मुठीतील सर्व पैसे इ. त्याला द्यायचे, खोटे आल्यास दुसऱ्यापासून तितके आपण घ्यायचे. 'एकीबेकी पोरा सांग झडकरी' - भज ११४. २. जूटफूट; समेट आणि भांडण.

**एकीभवन** न. दोन किंवा अधिक पदार्थ एकजीव होणे; पूर्णपणे मिसळणे; संकलन; संमिश्रण; एकीकरण. २. (समाज.) दोन संस्कृती, समाज यांचे एकीकरण. [सं.]

**एकीय** वि. एकटा; एकला; एकासंबंधी. [सं.]

**एकीसवा** क्रिवि. १. एकसारखा; एकत्र. २. एका बाजूला; एकीकडे :'सकळहो तुम्ही व्हा गे एकीसवा । तुका म्हणे जीवा धीर नाहीं ।' - तुगा २.

**एकीहेळा** क्रिवि. अकस्मात.

**एकुटपणा** पु. एकटे राहणे; एकाकी पडणे :'पण अशी एकुटपणाची वेळ त्याला (मेंढक्याला) क्वचित येत असे.'- बनगर२३.

**एकुणऐंशी** वि. (८०-१)=७९ ही संख्या. सत्तर आणि नऊ मिळून होणारी संख्या. [सं. एकोनाशीति]

**एकुणचाळीस** वि. (४०-१)= ३९ ही संख्या; तीस आणि नऊ मिळून होणारी संख्या. [सं. एकोनचत्वारिंशत्]

**एकुणतीस** वि. (३०-१)= २९ ही संख्या; वीस आणि नऊ मिळून होणारी संख्या. [सं. एकोनत्रिंशत्]

**एकुणनव्वद** वि. (९०-१)= ८९ ही संख्या; ऐंशी आणि नऊ मिळून होणारी संख्या. [सं. एकोननवति]

**एकुनपन्नास, एकुणपन्नास** वि. (५०-१)= ४९ ही संख्या; चाळीस आणि नऊ मिळून होणारी संख्या. [सं. एकोनपंचाशत्]

**एकुणवीस, एकुणीस, एकोणीस** वि. (२०-१)=१९ ही संख्या; दहा आणि नऊ मिळून होणारी संख्या. [सं. एकोनविंशति]

**एकुणशंभर** वि. (१००-१) ९९ ही संख्या; नव्वद आणि नऊ मिळून होणारी संख्या; नव्याण्णव.

**एकुणसत्तर, एकुणहत्तर** वि. (७०-१)=६९ ही संख्या; साठ आणि नऊ मिळून होणारी संख्या. [सं. एकोनसप्तति]

**एकुणसाठ** वि. (६०-१)=५९ ही संख्या; पन्नास आणि नऊ मिळून होणारी संख्या. [सं. एकोनषष्टि]

**एकुणात, एकुनात, एकुणहात** स्त्री. १. हिशेब पुरा केल्यावरची, अखेरची, एकूण रक्कम; हिशेबा अखेरी रक्कम, शिल्लक :'शेवटी एकुणात देत जावो.' - खाजगी खातें अंमलदाराचे अधिकार (बडोदे) १८५. २. या पुऱ्या केलेल्या रकमेवर मालकाने करायची सही किंवा रेघ, लेख. ३. या सहीवर एक विशिष्ट खूण म्हणून काढतात ती रेघ.४. (ल.) भाषणातील प्रमाणभूत सार; सार-सिद्धांत; तात्पर्य.

**एकुनएर, एकुणयेर, एकुनेर** क्रिवि. परस्पर; एकमेक : 'लोक पुसती एकुनेराला ।' - ऐपो १३०.(कुण.)

**एकुलता, एकुलता एक** वि. एकटाच.

**एकूक** वि. क्रिवि. प्रत्येक; सर्वांपैकी प्रत्येक वेळी एक याप्रमाणे. (कु.).

**एकूटपण** न. एकाकी राहणे :'देवा, आता हे एकूटपण पुरे.' – काआ ७४.

**एकूण, एकून** क्रिवि. १. तर मग; असे आहे तर; सारांश; एकंदरीत :'एकूण त्या वृषलीच्या भाच्याला राज्यावर बसविण्याकरिता तूं असला नीचपणा केलास काय?' – चंद्रगुप्त १७९. २. सर्व मिळून एकंदर संख्या किंवा बेरीज :'पांचा जणांनी पांच पांच रुपये दिले एकूण पंचवीस झाले.' – मोल. ३. अट्टल (बोलण्याचा निष्कर्ष काढून आलेले मत म्हणून); पक्का; वस्ताद. उदा. एकूण लबाड – लुच्चा – सोदा – मूर्ख. [सं. एक +अनु]

**एकूणएक** क्रिवि. १. एकच; तेच ते; सर्व सारे एकच. २. प्रत्येक; कोणी न वगळता; सर्वजण.

**एकूणएकच** क्रिवि. सारखेच.

**एकूणजमा, एकूणबेरीज** स्त्री. (अनेक रकमांची) एकंदर बेरीज; एकंदर रक्कम. (वा.) **एकूण क्षेत्रफळ सारखेच–** (लांबी कमी करून रुंदी त्या मानाने वाढविली तरी क्षेत्रफळ सारखेच राहणार या वरून)एकूण एक = एकीकडे कमी तर दुसरीकडे जास्त; एकंदर बरोबरी.

**एकूणीस** क्रिवि. एकंदरीत :'एकूणीस हरएक प्रकारे दौलतेस अपाय ..' – ऐलेसं ९९.

**एके** (ग.) एकवेळा; एकाने गुणायचे असताना योजायचा अवयव; पाढ्यात एकपट दाखविण्यासाठी वापरायचा शब्द. जसे : – तीन एके तीन.

**एकेक, एकेकटा** प्रत्येकजण; एकएकटा; एकामागून एक.

**एकेचाळ, एकेचाळीस, एकेताळ, एकेताळीस** वि. ४१ ही संख्या. चाळीस आणि एक मिळून होणारी संख्या. [सं. एकचत्वारिंशत्]

**एकेठंय** क्रिवि. एका ठिकाणी; एके जागी; एकत्र. (कु.)

**एकेरा, एकेरी** वि. १. दुहेरी, घडीचा किंवा पिळलेला नव्हे असा; एक पदरी (कापड, कागद, सूत वगैरेला लावतात); विरळ विणीचे (सणंग). २. कोता; बारीक; दुबळा (गाण्याच्या कामी गळा आवाज वगैरे). ३. एकवचनी; अरेतुरे असा सलगीचा (उल्लेख, संबोधन) : 'तूं मला शिवकुमारी या एकेरी नांवाने हाक मार गडे!' – विवि ८.२.३०. ४. एक एक; स्वतंत्र, दोन दोन, तीन तीन अशा प्रकारे संबद्ध नव्हे असा. (वा.) **एकेरीवर येणे** – अरे तुरे म्हणणे, एकेरी नावाने संबोधणे (अनादरयुक्त) २. (ल.) चिरडीस जाणे, चिडणे.

**एकेरापट** पु. (मल्लविद्या) एक पेच; जोडीदाराच्या एका पायाला गुडघ्याच्या लवणीत हात घालून उचलून आपले डोके जोडीदाराच्या बगलेजवळ छातीला दाबून जोडीदाराला चीत करणे.

**एकेरा हुलकस** (मल्लविद्या) एक पेच. आपण आपल्या जोडीदाराला खाली आणून त्याची मान आपल्या छातीने दाबून आपला एक हात जोडीदाराच्या बगलेत घालून आपल्या दुसऱ्या हाताचे कोपर जोडीदाराच्या बाहेरील मुंढ्यावर ठेवून आपल्या दोन्ही हातांनी मिठी घालणे व ज्या बाजूचा आपला हात जोडीदाराच्या मुंढ्यावर ठेवला असेल त्या बाजूचा आपला पाय जोडीदाराच्या गुडघ्यापासून घोट्यापर्यंत तटवणे व जोडीदाराच्या बगलेतून घातलेल्या हाताने झटका देऊन जोडीदारास चीत करणे.

**एकेरी** वि. एकएक वस्तू (धागा, फूल, मणी) वापरून केलेला; फक्त एकाच साधनाने काम करणारा; एकच पदर असलेला (हार, इ.).

**एकेरी आवाज** कोता आवाज.

**एकेरी कथानक** (सास.) ज्यामध्ये मूळ कथेला जोडून उपकथानक येत नाही अशी कथा; कथेची मांडणी.

**एकेरी करणे** सलगी दाखविणे :'त्यानं एकेरी केल्यावर पाटणकरनं एकदम चमकून पाहिलं.' – झाकोळ ७०.

**एकेरी कारकून** १. हलक्या दर्जाचा कारकून. याला शिपाई, प्यादे इ. नेमणूक नसते. याचे काम निव्वळ कारकुनीपलीकडे काही नसते. २. (निंदाव्यंजक) धोपटमार्गी.

**एकेरी नोंद** १. जिथे एकाच खात्यात व्यवहार नोंदले जातात अशी साधी हिशेब नोंदण्याची पद्धत. २. (अर्थ.) व्यापारव्यवहारातील फक्त एकाच बाजूची दखल घेणारी लेखापालनाची पद्धत. यामध्ये रोखीची आणि ऋणको व धनकोची व्यक्तिगत खाती यांची नोंद असते.

**एकेरी पाड** (स्था.) गवंड्यासाठी बांधलेला एकेरी विटांचा माळा.

**एकेरी फूल** (वन.) पाकळ्यांचे एकच वर्तुळ असलेले फूल.

**एकेरी येणे** १.चिरडीस येऊन अरे–तुरे म्हणणे. २. अनादराने संबोधणे.

**एकेरी वहिवाट** कीर्दीत (जमाखर्च) एकदाच बार करणे.

**एकेरी सरकत** (ग.) एकपाती; एकभागी; एकेरी प्रमाणभाग; वाटणी.

**एकेरी होन** होन या नाण्याचा एक प्रकार.

**एकेश्वरवाद** पु. ज्यात एकाच ईश्वराचे अस्तित्व (विधान) असते, त्याला एकेश्वर असे नाव आहे. जग निर्माण करणारी व त्याचे नियंत्रण करणारी एकच सर्वश्रेष्ठ शक्ती आहे असे मत. [सं.]

**एकैक** वि. १. प्रत्येक; एकामागून एक; विलक्षण असे एकेक:'हें सांघों काइ एकैक । देखें श्वासोश्वासादिक ।' – राज्ञा ५.४५. २. एकएक; एकेक :'एकैके वेळें जाते दुखणें । ते आम्ही केले पुसवणें ।।' – शिव ८१६. [सं.]

**एकैकसमाकारी** वि. (ग.) एकसारखा आकार असणारी.

**एकोटी** स्त्री. भाकरी भाजण्यासाठी तव्याप्रमाणे उपयोगात आणायची वाटोळी मातीची खापरी. (खा.) [सं. एकवर्ती]

**एकोणीस** वीसपेक्षा एक कमी; १९ अशी लिहिली जाणारी संख्या.

**एकोणीस विश्वे** एकशेएक हिश्यांनी. १८ विश्वे ही कमालमर्यादा. त्याहीपेक्षा एक विश्व्याने अधिक :'यावरून १९ विश्वे तर नानांस विदित नसता ...' – मशियांका २८६.

**एकोता** पु. एक कुळाचार. हा विधी एका रात्रीत उरकायचा असतो. यात पूजा करणाराला 'भगत', स्त्रियांना 'गवरणी', जेवणाला 'भोजन भरणे' हरभऱ्याच्या डाळीच्या केलेल्या मुटकुळ्याला 'नारळे' व भाताला 'मोगरा' म्हणतात. महाएकोता असा आणखी एक प्रकार आहे.

**एकोत्तर** वि. एकाने अधिक; वेगळा असा एक. [सं.]

**एकोत्तरा, एकोत्रा** पु. द.म.द.शे. एक रुपया व्याजाचा दर, व्याजाचा हफ्ता प्रारंभीच कापून घेण्याची रीत :'जे एकोत्तरेयाचिया वाढी । जळतिये आगी घालिती उडी ।' – ज्ञा ९.५४. [सं. एक+ उत्तर]

**एकोत्तिष्ठता** स्त्री. एकोदिष्ट श्राद्ध; प्रेतनिवृत्यर्थ करायचे श्राद्ध. [सं.]

**एकोत्री, एकोत्रे** स्त्री. उजळणीचा एक प्रकार, संख्यांच्या वर्गाचा पाढा. जसे : – बे बे चार, तीन त्रिके नऊ, चार चोक सोळा, पाचा पाचा

पंचवीस इ.

**एकोदर** वि. सोदर; सख्खी; एका आईची; एकाच उदरातून उत्पन्न झालेली (मुले) :'कच बोले आदरें । तुम्ही आम्ही एकोदरें ।।' – पांप्र ५.९९. [सं.]

**एकोदरशे, एकोदर्शे** वि. एकशे एक (१०१). हुंडी, लेख वगैरेंतून हा शब्द येतो :'अश्वपति नरपति राजे होती । एकोदर्शे राणी तया वर्णू नाही मिती ।' – वसा १३.

**एकोद्दिष्ट** न. १. मृताच्या उत्तरक्रियेत सपिंडी श्राद्ध होण्यापूर्वी अकराव्या दिवशी करायचे श्राद्ध. २. चुलता, भाऊ इ. निपुत्रिक मृत झाले असल्यास केवळ त्यानाच उद्देशून (म्हणजे त्रयीचा उल्लेख न करता) हे श्राद्ध केले जाते. एकोत्तिष्ठ असाही शब्द रूढ आहे. [सं.]

**एकोन्माद** पु. (मानस.) एकाच विशेष विषयाचे वेड. [सं.]

**एकोपा, एकोवा** पु. एकी; एकमत; जूट; संघटना :'राष्ट्राच्या अभ्युदयाकरिता एकोप्याने प्रयत्न करण्याची जरूरी आहे.' – लोटिकेले ३.२४६.

**एकोशास, एकोशा, एकोस** क्रिवि. एकीकडे; आडवळणी; एकांती; रस्त्यापासून बाजूला (गाव वगैरे). [सं. एक+वस्]

**एकोसा** पु. जनावरांच्या आचळास होणारा एक रोग.

**एकोळ** क्रिवि. एकवेळ; एकदा :'जें जन्मशतीं ओळगिजे । एकोळ यावेया' – ज्ञा ९.२०५.

**एकोळा** वि. एकसमूह; एकवट :'एकोळा करोनि लागु वळावीला ।' – भात्रे १०.३.११४.

**एक्कडेन** क्रिवि. एकीकडे; एकत्र. (गो.)

**एक्कल काजा** मुलांचा गोट्यांचा खेळ. एक या अंकाबद्दल म्हणतात.

**एक्का** पु. तबल्यावरील एक ठेका. (को.)

**एक्का** पु. १. एक दिवस अहोरात्र भजन; भजनसप्ता; खळ न पडता एक दिवस अहोरात्र करायचे नामस्मरण, भजन. (व.) २. एकी; एकमत; जूट; एकविचार :'पुढें स्वराज्यामधीं असून एक्का नसून बेबंदी झाली होती.' – गापो ९४. [सं. एक]

**एक्का** पु. हातावर तोलून धरण्याचा लाकडी मल्लखांब.

**एक्का** पु. मेणबत्तीची बैठक; भिंतीला लावून ठेवायचा दिवा.

**एक्का, एक्या** पु. १. पत्त्यातील पानांपैकी ज्यावर एक चिन्ह आहे असे पान (गंजिफ्यात प्रत्येक रंगाचा एक एक्का असतो). हे पान सर्वात भारी मानण्यात येते.'एक्का म्हणे राजालाही मारतो.' – के २६.७.३०. २. (ल.) अद्वितीय, श्रेष्ठ माणूस. [सं. एक]

**एक्का** पु. एका बैलाची (क्वचित घोड्याची) गाडी; छकडा : '(दिल्ली येथील) श्रीमंत लोक प्रात:काळी मोठाले बैलांचे रथ किंवा येक्के यांत बसून यमुनास्नानास जातात.'– तीर्थयात्रा प्रबंध ६९. [सं. एक]

**एक्का करून बसणे** एकत्र जमून बसणे :'... फौजेने एक्का करून बसल्यावर मागती बक्षीं वगैरे आणिले.' – ऐलेसं ५३५५.

**एक्कुलगा** पु. रानडुक्कर :'भला जंगी एक्कुलगा रान सोडून बाहेर धावला.' – श्रीयो १.३०२.

**एक्केचाळीस** वि. चाळीस अधिक एक ही संख्या; ४१ ही संख्या.

**एक्बालपन्हा** वि. दैववान; नशीबवान. [फा. इकबालपनाह]

**एक्याण्णव** वि. नव्वद अधिक एक, ९१ ही संख्या. [सं. एकनवति]

**एक्यांयशी** वि. ८१, ऐंशी अधिक एक मिळून होणारी संख्या.

**एक्रार** पु. करार; कबुली; इक्रार :'ऐसें स्पष्टवादें पुसतां मुल्जीम होऊन एक्रार केला.' – मइसा २०.६५. [फा. इक्रार]

**एक्सान, एकसा** वि. क्रिवि. एकसारखा :'जमाना एकसा नाही.' – मइसा ५.८५. [फा. यक्सान्]

**एखरा** पु. कोळिस्त्याचे बी, त्यास तालीमखाना असेही म्हणतात.

**एखाद, एखादा** वि. कोणीतरी; कोणीएक; अनेकांपैकी (कोणताही) एक; अमुक; विशिष्ट नव्हे तो; एकादा-एकाधा :'एखादें फुटकें नशीब म्हणूनी प्रेतास शृंगारिते.' – वाग्वै. २. (अध्याहार होऊन) एखाद्या वेळी; एखाद्या प्रकारे:'एखाद्या होईलसुद्धा.' – रथ १९४.

**एखाददुसरा** वि. कोणी एखादा (क्वचित आढळला तर); एकदोघे आणखी; कदाचित एक जास्त (आतापावेतो सांगितल्यापेक्षा).

**एख्लास, एख्लासी** (एखलास्, एख्लासी) पु. स्त्री. स्नेह; आदर; मैत्री. पहा : **इख्लास** [फा. येख्लास]

**एगान** स्त्री. (जरतार धंदा) एकेरी तार. एकाच तारेला पीळ दिलेला असल्यास तिला एगान म्हणतात.

**एगानगत** स्त्री. ऐक्य; स्नेह :'दुनियाईंत दोंही दौलतींची एगानगत मषहूर.' – मइसा ५.३१. [फा. यगानगत]

**एजोब** पु. (ख्रि.) वनस्पतिविशेष. जुन्या कराराच्या काळी याच्या डहाळ्यांचा उपयोग शुद्धीकरणाच्या विधीमध्ये रक्त किंवा पाणी शिंपडण्याकरिता करीत असत :'एजोबाने स्वच्छ करा मज निर्मल ते मी होईन हो.' – उसं १८४. [हिब्रू]

**एटक** न. १. गाडीची साटी आणि बुटे यांना जोडणारा दांडा. २. खूबी; युक्ती; तंत्र.:'ज्याला माहीत नाहीं हें एटक त्यानें गाडी उलटविली म्हणून समजा !' – खेस्व १७१.

**एटाल** न. विटेचा तुकडा; विटकर :'ते टाकीति एटाले । पैशून्याचिं ।।' – राज्ञा १६.३१९.

**एटोल** क्रिवि. इतका वेळ; वादूळ. पहा : **एढोळ.**(व.)

**एठ, एठा, यठ** क्रिवि. येथे; या ठिकाणी :'तंवं भणे यादवराओ । एठ हाचि उपाओ।।' – शिव ७४१. [सं. इत्थ]

**एठाठी** क्रिवि. येथून. (चि.) [सं. इत:+इत:]

**एड** स्त्री. टाच. घोड्याला मारण्याकरिता टाचेच्या मागच्या बाजूला लावलेली दातेरी. (क्रि. देणे.) [हिं.एडी=टाच]

**एडका** पु. १. मेंढ्याची एक जात. याला शिंगे येतात, ती मजबूत असून त्याला टक्कर देऊन लढण्याला शिकवितात :'एडका मदन तो केवळ पंचानन.' – भज ११२. २. मुंग्या पकडण्यासाठी धुळीत वाटोळी खळी करून तिच्यात बसणारा किडा, याला मोर असेही म्हणतात. [सं. एडक]

**एडगुळबेडगुळ** वि. ओबडधोबड.(व.) [बेडगुळचे द्वि.]

**एडला** क्रिवि. एव्हाना; एवढ्या वेळात. (चि.) [सं. इयत्वेला]

**एडिपस गंड** (मानस.) लहान मुलाच्या आईवर असणाऱ्या वाजवीपेक्षा

अधिक प्रेमामुळे निर्माण होणाऱ्या मानसिक विकृतीला फ्राइड या मानसशास्त्रज्ञाने हे नाव दिले आहे.

**एडी** स्त्री. टाच. पहा : **एड** (व.) [हिं. एडी]

**एडी** स्त्री. घोड्याची दुडकी चाल.

**ए डी सी** पु. उच्च पदस्थाच्या तैनातीला असणारा लष्करी अधिकारी. (हा अधिकारी त्याच्या सर्व सुखसोयींकडे लक्ष देऊन त्यांची बडदास्त ठेवतो); शरीरसंरक्षक; अंगरक्षक. [इं.]

**एडुक, एडूक** पु. हाडे, दात, केस वगैरे काही स्मारक म्हणून पुरून झाल्यावर त्यावर उभारलेला मनोरा किंवा इमारत; स्तूप; डागोबा. बुद्धाच्या अवशेषांची अशी एडुकस्थाने असतात :'एडूकचिन्हा पृथिवी न देवगृहभूषिता.' – गीर ५५६. [सं.]

**एढवळ, एढोळ,** क्रिवि. आतापावेतो; एवढा वेळ; इतक्या उशिरापर्यंत; वाढूळ. पहा : **एटोळ.** [सं. इयत्वेला]

**एढा** क्रिवि. येथे. पहा : **एठ, एठा.** (राजा.)

**एढाढी** क्रिवि. येथून. (राजा.)

**एणाक्षी** स्त्री. मृगनयना; हरणासारखे डोळे असणारी सुंदर स्त्री. [सं.]

**एणांक** पु. चंद्र; ज्यावर हरिणाचे चिन्ह आहे तो; मृगलांछन:'होता द्रोण कृपाख्ययुक्त सह तो एणांक तारांगणीं ।' – वामन–विराट ५.१३. [सं.एण= हरिण+अंक = चिन्ह]

**एणे** सना. तृतीया १. येणे; याने :'कथितो सर्वार्थपद जप्य महामंत्र मी तुला एणें । वश होइजेल देवें जेविं मधुरगीत मोहितें एणें ।' – मोअनुशासन ५.१३. २. या; अशा. उदा. एणेकरून, एणेपरि वगैरे रूपे होतात :'एणेंपरि परिसतांच तया अनन्या ।' – नल १२१.

**एतत्, एतद्** सना. हा, ही, हे. पुढीलप्रमाणे समासात हा शब्द येतो. एतदतिरिक्त (एतत्+अतिरिक्त) = याहून वेगळा, याहून वरचढ. एतदंतर्गत = यात समाविष्ट झालेले; यातील; याचे. एतत्कृत = याने केलेले. एतदर्थ = याकरिता; म्हणून. एतदर्थक = या अर्थाचा. एतदनंतर = यानंतर. एतदनुरूप = या प्रकारे; याप्रमाणे. एतदवधि = येथपर्यंत; इतके. एतदारभ्य = यापुढे वगैरे. [सं.]

**एतदर्थ** वि. विशिष्ट कामापुरता नेमलेला.

**एतद्देशीय** वि. या देशातील; या देशात, येथील लोकांकडून होणारी (पुस्तके, इतर कामे वगैरे) :'एतद्देशीय ग्रंथावर साहेब मजकुरांनी जो टीकालेख लिहिला....' – लोटिकेले २.१९३. [सं.]

**एता** क्रिवि. आता. (राजा.)

**एतादृश** वि. यासारखा; असा. [सं]

**एतावत** वि. इतका; एवढा. उदा.एतावत्काल. [सं.]

**एतावता** क्रिवि. १. म्हणून; एकंदरीत; यामुळे; इतक्याने; येवढ्याने : 'एतावता निष्पन्न काय होतें कीं, औरस पुत्र नसल्यास स्वर्गप्राप्तीसाठीं दत्तकपुत्र घेण्याची जरूर नाहीं.' – लोटिकेले ४.१५. २. तथापि; असे आहे तरी; अद्याप. [सं.]

**एतावधि–धी** क्रिवि. एथपर्यंत; एथपावेतो; होताहोईतो; एवढा; इतका. [सं. एतद्+अवधि]

**एतुला** वि. एवढा; इतका; असा :'लाडका करिसी यास एतुला.' – आकृ २८. [सं. इयत्]

**एथ** सना. १. सर्व. २. मी. चक्रधरस्वामींनी स्वत:बद्दल केलेला प्रयोग. एथौनि= माझ्याकडून :'ते एथौनि तुम्हांसि सांघिजैल.' – लीच १.२.

**एथ** हे ठिकाण या अर्थाचा मूळ शब्द. त्याला प्रत्यय लागून अव्यय व विशेषणे तयार होतात. जसे : – एथुनि, एथे, एथला, एथपर्यंत इ.

**एथ** याठिकाणी; या स्थळापासून :'एथ मृत्युसी ही करूनि चढावा ।' – राज्ञा ११.३८३.

**एथचा, एथला, एथील** वि. या जागेचा, भागाचा, प्रांताचा, दिशेचा वगैरे; येथील. [सं. अत्र]

**एथपर्यंत, एथपावेतो, एथवरी,** क्रिवि. हा पावेतो; या (वेळ किंवा स्थळ) पर्यंत; हा काळ पावेतो; एवढा वेळ; एढोळ.

**एथून, एथोन** क्रिवि. यापुढे; या स्थळापासून किंवा काळापासून पुढे.

**एदगिरी** वि. नागपूर जवळ असलेल्या एदगीर गावचे (शेला, धोतरजोडी इ. वस्त्र).

**एदेन –अदन** वि. ख्रिस्ती पवित्र शास्त्रात वर्णिल्याप्रमाणे मानवाचे मूळ पूर्वज आदम व हव्वा यांना ज्या बागेत ठेवले होते त्या बागेचे नाव; आनंदोद्यान; नंदनवन :'परमेश्वर देवानें त्यास एदेन बागांतून काढून लाविले.' – उत्प २.२३.[हिब्रु एदेम=आनंद किंवा सुख; इं. इडन.]

**एदो** वि. एवढा. (गो.) [सं. इयत्]

**एधवळा, एधोळ, एधोळा** क्रिवि. एव्हाना; इतका वेळ; एवढा वेळपर्यंत; एढवळ; एढोळ; एवढ्यावेळी. (कुण.)

**एधवा** क्रिवि. [illegible] आता; यावेळी. [सं. अद्य]

**एधष्ट, एधष्ठ** क्रिवि. पाहिजे तितके; यथेष्ट; भरपूर; पुरेपूर. [सं. यथेष्ट अप.]

**एनकेन(तेन) प्रकारे** क्रिवि. कोणत्यातरी प्रकाराने; कशाही रीतीने; वाटेल तसे; कशामुळे तरी; कसे तरी; कसेही. [सं. एनकेनप्रकारेण]

**एनातीमामूल** स्त्री. ठरावीक देणगी. [अरबी इनायत + फारसी मामूल]

**एनिमा** पु. बस्ती; बस्तीचे एक औषध किंवा पिचकारी; शौचविधीचे एक साधन. [इं.]

**एन्हा घेणे** अक्रि. हिसका घेणे; व्यर्थ त्रास घेणे. (व.)

**एप्रिल** पु. इंग्रजी वर्षाचा चवथा महिना. हा मराठी चैत्र–वैशाखाच्या सुमाराला येतो. [इं.]

**एर (एऱ्)** वि. बाकीचे दुसरे इतर (विशिष्ट सांगितल्यानंतर राहिलेले); अन्य; भिन्न :'एर परिवारू अपारू। तो कवनु जाणे ।' – शिव ५२. २. (ल.) गौण; किरकोळ; सटरफटर.
३. क्रिवि. एरवी :'एर सिद्ध तैसा येथें । उपाये मी ।' – ज्ञा १८.१२२२.

**एर, एरी** पु. एका जातीचा मासा. हा भरलेल्या पोत्याच्या आकाराचा असून पाण्यात कोलांट्या घेत फिरतो. त्याची एकच बाजू पाण्यावर दिसते.

**एर–री–रु–रे** सना. तो; ती; हा; ही :'मग एरी कानिआं परतली ।' – शिव १७५; 'शिर लोटिलेयां जैसें । एर आंग ।।' – राज्ञा १८.१२७; 'एरें उवाइलेनि चित्तें । बाह्य सख्य यया सुखापुरतें ।' – राज्ञा १०.६२६. [सं. अपर]

**एरएर** सर्व; एकमेक :'ऐसें एराएरीं अवघें गोसावीयांपुढें सांघितले ।' –

लीचपू ४१४.

**एरक** स्त्री. तंबाखूची जुडी. (खा.) [सं. एरका = तृणविशेष]

**एरका, एरिका** स्त्री. एक प्रकारचे गवत; लव्हाळा; मोथा: 'ब्रम्हशापाची एरिका । तीरीं निघाली होती देखा । ते मुष्टीं घेऊनि क्रोधतवका । एकमेकां हाणिती ।' – एभा ३०.१४६. [सं . एरक]

**एरकान** पु. घोड्याचा एक रोग. याला पिळा असेही म्हणतात. हा रोग खोकल्यापासून होत असून याने शरीर पिवळे होते. – अश्वप २.२३०.

**एरखाई** स्त्री. मुलींचा सागरगोट्यांचा एक खेळ.

**एरझारणे** अक्रि. आतबाहेर, वरखाली करणे : 'तो एकला प्राण एरझारे ।' –ऋव ६२३.

**एरडबेरड** वि. बेडौल; प्रमाणशीर नसणारा.(मा.) [बेरडचे द्वि.]

**एरडवती** स्त्री. एरंडाची पाने : 'एरडवती लुगडां बांधौनि.. आंग सेकिजे.' – वैद्यवल्लभ ३.

**एरडा** न. एका जातीचे मासे. (कु.)

**एरणी** स्त्री. (केसांची) वेणी; पेड. [क. एरळ्.]

**एरणी** स्त्री. वरातीपूर्वी वरमातेला देण्याची ऐरण; झाल : 'एरणी सोनयाचीं पदकीं ।' – मधउ ४२.

**एरमीठ** न. नेहमीचे खाण्याचे मीठ. समुद्रमीठ (शेंदेलोण वगैरे खनिज नव्हे).

**एरये** सना. **एकमेक** : 'एरयेहीं वस्त्रें वाइलीं.' – लीच १.३५.

**एरवण** स्त्री. (प्रभु समाजात) वरातीत लागणारी रोवळी; झाल.

**एरवती** स्त्री. मालतीची वेल, फूल : 'चंदनलता चंद्रपुष्पीं : एरवतीया अनंगचांपी.' – रुस्व ८१८.

**एरवा, एरव्हा** क्रिवि. तेरवाच्या पुढचा दिवस; चालू दिवसांपासून मागे किंवा पुढे चौथ्या दिवशी. कोणी पाचवा दिवस समजतात, कोणी तेरवा म्हणजे एरवा मानतात. [सं. अपरश्वस्]

**एरवाळी** क्रिवि. १. नेहमीच्या वेळेच्या अगोदर : 'नानी, भुका तरी लागायला नकोत एवढ्या एरवाळी.' – व्यंमाक २७. २. लवकर; अगोदर : 'तिनं एरवाळी निगायला बजावलं व्हतं.' – मळणी ७८.

**एरवी, एरव्ही, एरी, एऱ्हवी, एऱ्ही** क्रिवि. १. उगीच; सहज; कारणाशिवाय. २. सहजासहजी; अचानक; श्रमाविना. ३. नाहीतर; किंवा : 'ऐसें बसता कोपाळ । एऱ्हवीं पुढें पळाल ।' – शिव ४८४. ४. इतर बाबतीत; हे सोडून.

**एरशेर** वि. असातसा, फालतू; सामान्य (माणूस, गोष्ट). [एरचे द्वि.]

**एरंड** पु. एक औषधी झाड. याच्या मोगली व सुरती (तांबडा व पांढरा) अशा दोन जाती आहेत. सुरती एरंडाच्या बियांचे (एरंड्यांचे) तेल काढतात. मोगली एरंड शेताच्या कुंपणाला लावतात.

**एरंड** पु. मुलांचा एक खेळ.

**एरंडकाकडी** स्त्री. पोपई. नागपूरकडे एरणपपई असे पपईला नाव आहे.(माळवी)

**एरंडमूळ** न. सुरती एरंडाचे मूळ, मुळी. ही मुळी औषधी असते.

**एरंडासारखा** वि. (ल.) उंची असणारा पण निरुपयोगी.

**एरंडी** स्त्री. १. सुरती एरंडाचे झाड; एरंडाची एक वेगळी जात.२. एरंडाचे बी. हे एक गळिताच्या मुख्य धान्यांपैकी आहे. याच्या तेलाचा उपयोग दिव्यासाठी व औषधासाठी आहेच पण त्यापेक्षा यंत्रांना वंगण म्हणून विशेष होतो. [सं. एरंड]

**एरंडे** न. एक हलके रेशीम (सोवळ्यांच्या वस्त्रांसाठी); टसर रेशीम. (रेशमाचे किडे एरंडाची पाने खातात यावरून). [सं. एरंड]

**एरंडेल** न. एरंड्यांपासून काढलेले तेल. हे रेचक म्हणून घेतात.

**एरंड्या साप** सापाची एक जात. एरंडीच्या बीवर जसे ठिपके असतात तसे ठिपके या सापावर असतात.

**एरांस** पु. दाय; वारसा; जमीनजुमला. [इं. इन्हेरिटन्स]

**एरिद** पु. यारीद; सहायक; दुय्यम अधिकारी. कारकून : 'बाजीच्या एरीदियास हुजूर तूर्त पाठविणे.' – मइसा १७.९.

**एरिंग** स्त्री. कानातील एक लोलकासारखा दागिना; डूल; कर्णभूषण. [इं. इअरिंग]

**एरीकडे** क्रिवि. इकडे; तिकडे; दुसरीकडे : 'एरीकडे श्रीचक्रपाणी । काई करिते जाले ।' – शिव ८५२.

**एरीमोहरे** क्रिवि. उलट बाजूला; दुसऱ्या तोंडाकडे : 'जैशी ते शुकाचेनि आंगभारें । नळिका भोविन्नली एरी मोहरें ।' – ज्ञा ६.७६.

**एरीवानी** क्रिवि. दुसऱ्या बाजूला : 'मग एरवानी उलथे : तव एर अंग सावध होए' – लीचउ १२१.

**एरुमेर** परस्पर; एकमेक. (कु.)

**एरोदस** पु. गोड ओवा. ही पर्शियामधील वनस्पती आहे.

**एल** पु. एका जातीचा मासा. हा सर्पाकृती असतो. [इं.ईल]

**एलकडी** वि. एकेरी; एककडीचा : 'घोड्याचे लगाम बहुधा एकेरी किंवा एलकडी असतात.' – भूभ ३९.

**एलकाक्रीडित भौमिचारी** न. (नृत्य.) पायाच्या अग्रतलावर नीट उभे राहून व उंच उडी मारून पुन्हा जसेच्या तसे उभे राहणे. अशी क्रिया वारंवार करणे.

**एलकावणे** अक्रि. शेंदणे; वर घेणे; ओढणे (विहिरीतून किंवा खड्ड्यातून पाणी वगैरे).

**एलकी** स्त्री. चमक; वेदना; उसण. (क्रि. भरणे). [प्रा.]

**एलगार, एल्गार** पु. निकराचा हल्ला; निश्चयपूर्वक जोराचा प्रयत्न; चढाई; दौड : 'दर्यातून आरमार व खुस्कीने लष्कर घालून चौतर्फा एलगार करून अवकाश घेऊ न देता त्याने आक्रमिली स्थळें ....' – मराआ ६. [फा. इल्गार = मोहीम, तुर्की ईल्घार]

**एलची, एलाची** स्त्री. वेलदोड्याचे दाणे; वेलदोडा. [सं. एला]

**एलची, येलची** वि. व्रात्य; खोडकर; फाजील; पाणचट.(व.) [सं. एला]

**एलटी, एलाटी** स्त्री. (विणकाम) चाळ्याच्या (वहीच्या) खालवरच्या दोन पट्टया. या चाळ्यातून ताण्याचे दोरे जातात.

**एलणे, एलावणे** अक्रि. १. चेष्टा करणे; नखरा करणे. २. स्वैर वागणे. (व.) [सं. एलायति]

**एलपाड्या** वि. (ना.) नाना तऱ्हा करणारा; नकल्या; चेष्टा करणारा.

**एला** स्त्री. मोठ्या बीचा वेलदोडा; वेलदोड्याचा दाणा किंवा झाड. वेलदोड्यात एला आणि एलणी असे दोन किरकोळ भेद आहेत. [सं.]

**एलानदाज** पु. जासूद; पत्र किंवा हुकूम नेणारा :' मग मुजरह एलानदाज व महार देऊन रुपये १५०० सेवेसी पाठविले.' – ब्रच २०१. [फा.]

**एलापा, एलाफा** पु. तांदळाचे एक पक्वान्न; घारगा. (गो.)

**एलिफंट घास** (पशु.) एक प्रकारचे गवत; गजराज गवत. याच्या काड्या जोंधळ्यासारख्या असतात व पात जोंधळ्यापेक्षा लांब असते. याचा गुरांच्या चाऱ्यासाठी उपयोग करतात.

**एलु** पु. ठगाशिवाय एखादा मनुष्य. (ठगी)

**एले** न. (नांगर, कुळव किंवा पाभर यांची ) दांडी व जोखड यांना एकत्र बांधायची कातड्याची वादी. ही कोडकातून ओवलेली असते. [सं. वल्ली]

**एल्वी** पु. दूत; वकील; प्रतिनिधी; हेजीब :'शाहमजकुरास तोफा–तायफ देऊन एल्वीची रुख्सत करणार आहे.' – दिमरा २.५. [तुर्की ईल्ची]

**एल्हावणे** अक्रि. ढोंग करणे.(ना.)

**एवढा** वि. १. इतका मोठा; इतक्या आकाराचा, परिमाणाचा. २.पहा : **इतका.** (एवढा, जेवढा, तेवढा, केवढा वगैरे शब्दांचा वर्ग आणि इतका, जितका, तितका, कितका वगैरे शब्दांचा वर्ग यात फरक असा की, पहिला आकार, गुण परिमाण दाखवतो तर दुसरा संख्यापरिमाण दर्शवितो). (वा.) **एवढ्याचे एवढे करून सांगणे** – फुगवून, तिखटमीठ लावून सांगणे. [सं. इयत्]

**एवढेपणी** क्रिवि. या वयात :'एवढेपणी मुसलमानणीखेरीज कोणी मेंदी लावीत नाही.' – पाक २४.

**एवढ्यांदा** क्रिवि. इतक्या मोठ्याने, जोराने किंवा मोठा आवाज करून; दणदिशी.

**एवं** क्रिवि. याप्रमाणे; याप्रकारे; असे :'एवं थितिया मातें चुकले ।' – ज्ञा ९.३३०. [सं.]

**एवंगुणविशिष्ट** वि. अशा गुणांचा; अशा गुणांनी भरलेला. [सं.]

**एवंच** क्रिवि. सारांश; एकूण; तात्पर्य; मिळून; एकंदरीत. [सं.]

**एवंप्राय** वि. अशा प्रकारे.

**एवं वा** पर्याय :'परमेश्वरशास्त्री एवं वा नाही' – लीचउ ४८४.

**एवंविध** वि. या प्रकारचा :'जी एवंविधा तूतें । मी देखतसें हें निरुतें ।' – ज्ञा ११.२१२. [सं.]

**एवंसंज्ञ** पहा : **एवंविध** :'अर्जुना एवंसंज्ञ । सर्वत्र जाण यज्ञ ।' – राज्ञा १६.९८.

**एवाका, एवांका** पु. अधिकाराची व्याप्ती; आवाका; विस्तार; सार :'ते महासिध्दांचा एवाका । सिद्धांतकक्षा अनेका ।' – राज्ञा १८.१२३६.

**एवाडी** वि. एका पायास अधिक (पाचवा) पाय फुटला आहे असा (घोडा). हे घोड्याचे अशुभ लक्षण मानले जाते.

**एवाळे** न. पाणसाप; वयाळे; हेवाळे. (गो.) [सं. व्याल]

**एवि, एवीं** क्रिवि. असे; या तऱ्हेने; याप्रमाणे :'मार्कंडराय ऋषि एविं बोलतीं ।' – वसा ११. [सं. एवम्]

**एवीच, एव्याच** क्रिवि. मुकाट्याने; स्तब्धतेने; उगीच (पाहणे, लक्ष देणे):'आपुलाले तुम्ही पुसा । सेवा एव्याच सरिसा । स्थिरावल्या कैसा । काय जाणों विचार ।।' – तुगा ३१६१. (को.)[सं. एवम्]

**एवीतेवी** क्रिवि. कोणत्याही प्रकारे; कसेही झाले तरी; काही असले तरी (होऊ नये झाले, आता जसे होईल तसे होऊ दे असा भाव) :'एवीतेवी अग्रलेख डोंगऱ्यांच्याच नावावर खपणार होता.' – अक्षर १३१.

**एवैम** अ. एकूण :'एवैम (गद्याण) १०' – पांढरशिला ३.३०.

**एव्हा** क्रिवि. आताच्याआता; या वेळी; तूर्त; या समयी.

**एव्हा एव्हा** क्रिवि. सुमारे हा वेळ; या घटकेला (मागे). (राजा.)

**एव्हाना** क्रिवि. हा वेळ पावेतो; आता पावेतो.

**एव्हाशी** क्रिवि. आता; या घटकेला; आताच; इतक्यात :'खबरदार मला एव्हाशीच आपली म्हणाल तर!' – बाय ४.३.

**एशेल, एषेल** न. खाण्याचे तेल; गोडे तेल. (व.)

**एषणा** स्त्री. मिळण्याची इच्छा. [सं.]

**एषा** स्त्री. ईर्षा; बरोबरी. [सं. ईर्षा]

**एषादिक** सना. विशिष्ट लोक दर्शविण्यासाठी व्याजोक्तीने हे सर्व लोक, हे मोठे लोक, शिष्ट. 'अस्मादिक' प्रमाणे रूप. [सं.]

**एष्य** वि. १. आगामी; भावी. २. (ज्यो.) अनुपभुक्त; जिच्यामधून अद्यापि ग्रह गेला नाही अशी (रास). [सं. इ = जाणे]

**एसकर** वेशीवरील पहारेकरी. (वेसकर).

**एसणा, एसना** वि. असा; असला; इतका; अशा तऱ्हेचा; एवढा :'तव बलिभद्रु बोलिला । एसना तुं जुझारू भला ।'– शिव ९१९; 'एसणी आंगीं असता प्रौढी ।' – गीता १.१४७२. [सं. अदस् एष]

**एसाळ** पु. त्वेष; आवेश :'स्वामी विंधितो एसाळें । साही कोदंडें विशाळे ।'– उह १५२०.

**एसी** स्त्री. जवस; अळशी :'एसी आपजवीलीया ... एसी घालौनि कीजती तीए एसौलें' – लीचपू ५८२.

**एसूर** स्त्री. कांदा घालून केलेली मिरच्यांची पूड; काळे तिखट.[क. एसर]

**एसोले** न. धिरड्यासारखा एक खाद्यपदार्थ :'धीडरें काइसें जी : ये एसोले म्हणीजेति तीयें एसोलें : उडीदां जोन्हळेयांची तीयें ढीडरीं :' – लीच ४.४९.

**एहतियात** स्त्री. १.सावधगिरी; दक्षता; जागरूकता २. (ल.) दूरदृष्टी; काळजी :'करनूल संस्थान इकडील व तिकडील सालाबाद पेचकषीचे, याजकरितां येयाची एहतियात करणे आवल म्हणोन बोलिले.' – मइसा ७.३७. [फा.]

**एहसान** स्त्री. १. कृपा; उपकार:'इतके दिवस परभारें दौलतीवर एहसान होत गेली.' – मइसा ५.३१. २. साऱ्याची माफी. [अर. इहसान]

**एहसानमंद** वि. कृतज्ञ; आभारी :'पातशहा आपला एहसान्मंद होऊन पातशाहीचा बंदोबस्त आपले हातून करून घेई ऐशी कारस्ती जी होईल ती करावीच करावी.' – ऐच ११५.

**एहंकी, एहेंकी** क्रिवि. असे; याप्रमाणे :'लोक मान आलस्यो साम्यो ऐहंकी आखताहा । = लोक मला आळशी शाम्या असे म्हणतात.' – भिल्ली भाषा ३०.

**एहेंडे** क्रिवि. याप्रमाणे; असें; अशी : 'बाय इं बोरें एहेडें काहा? = बाई, ही बोरे अशी का?' – भिल्ली भाषा २७.

**एहेंतेहें** क्रिवि. इकडे तिकडे; येथे तेथे : 'आन एहेतेंहे फिरतलो = आणि इकडे तिकडे भटकलो.' – भिल्ली भाषा ३६.

**एळ** स्त्री. समुद्रकाठ. (गो.)[सं. वेला]

**एळ** वेलदोडा. पहा : **एला.** (गो.)

**एळकोट, एळकोटभेर** पु. (खंडोबाचे भगत देवापुढची तळी उचलताना किंवा भिक्षा मागताना एळकोट किंवा एळकोटमल्हार असे ओरडतात त्यावरून) एकजुटीने प्रयत्न; निकराचा प्रयत्न. २. (निंदाव्यंजक) गोंधळ; गडबड; अव्यवस्था. [क. एळु=सात]

**एळकोटमल्हार** पु. नाश; उचलबांगडी : 'मी इकडे जयवंतरावाचा एळकोट मल्हार करतो.' – चंद्रग्रहण नाटक ६१.

**एळणी** स्त्री. मातीचे भांडे (थाळी, वाटीसारखे). (व.)

**एळव** उद्गा. कंटाळा, नापसंती दर्शविणारा उद्‌गार.(तंजा.) पु. अमंगळ काम. [त. एळवु]

**एळवणी** स्त्री. आमटी. पहा : **अळवणी** (माण.)

**एळागोट** पु. अव. दंडातील व हातातील दागिने : 'जिजाने .. एळागोट विकले.' – आआशे ११७.

**एळिया, एळयाबोळ** पु. एक औषध; बोळाचा एक प्रकार; काळा बोळ. [सं. एलीयक]

**एक्षकर्दम** पु. एक उटी : 'ऐसा एक्षकर्दमु गोसाविया कारणें करीति' – गोप्र ९९.

**एंकोल** पु. स्त्री. एक सरळ वाढणारे मोठे झुडूप.

**एंगरट** वि. अक्कलशून्य. (व.)

**एंडी** स्त्री. एरंडीची पाने खाऊन वाढणाऱ्या किड्यापासून मिळणारे रेशीम. त्या रेशमापासून केलेल्या वस्त्रांना एंडी म्हणतात : 'फिकट पिवळ्या रंगाची एंडीची मेखला नेसून ..' – सीपो १२७.

**एंडी** स्त्री. मासे धरण्याचे पोत्यासारखे एक जाळे. (गो.)



**ॲ** इंग्रजी भाषेच्या संपर्कामुळे मराठीमध्ये हा उच्चार आलेला आहे. 'अ' स्वरावर अर्धचंद्र स्वरूपात हा उच्चार दाखवला जातो. उच्चारस्थानाचा विचार करून 'ए' नंतर हा स्वर घेतला जातो. काही भाषाशास्त्रज्ञ त्याचे स्थान 'अ' नंतरचे मानतात. वर्णक्रमानुसार अकरावे स्थान.

**ॲटहोम** पु. मित्रमंडळींना छोटी मेजवानी, फराळ, उपाहार. या वेळी पदार्थ मांडून ठेवलेले असतात. पाहुण्यांनी लागेल ते खावे. गाणे नाच, खेळ वगैरे करमणुकीचे प्रकारही फराळासोबत असतात : 'त्यांना या औपचारिक गोष्टी आवडतच नसत. ॲटचे नाव काढले कीं, अंण्डरसन साहेबांचे डोके उठत असे.' – नपुक २३. [इं.]

**ॲडमिरल** पु. नौसेनेचा आरमारांवरचा प्रमुख अधिकारी. [इं.]

**ॲहं** उद्गा. नापसंती, असंमती, नकारदर्शक उद्‌गार.



**['ऐ' ने सुरुवात होणारे काही शब्द येथे न आढळल्यास 'अइ', 'अय', 'आइ' खाली पाहावेत.]**

**ऐ** मराठी वर्णमालेतील बारावे अक्षर. आघातयुक्त अ चा नंतर येणाऱ्या आघातरहित 'इ'शी संयोग होऊन झालेला संयुक्त स्वर. आघातरहित स्वर व्यंजनाकडे झुकत असल्यामुळे उच्चारदृष्ट्या अय् असा. कित्येक शब्दांत तसे पर्यायी लेखनही संभवते. जसे : – भैया, भय्या.

**ऐ** उद्गा. अगबाई; दुःख, शोक याचा उद्‌गार. पहा : **अइ** : 'मज हरिपु ऐ जहर कहर करी लहर आलि बाई धराधरा ।' – राला.

**ऐकटपत्र** न. दोघांच्या संमतीचा कागद; समेट पत्र: 'आमच्या दोघांच्या सहीचें ऐकटपत्र लिहून मागीतलें.'– मानू २८८.[सं. एक+ पत्र]

**ऐकणा** वि. ऐकणारा; ज्याला चांगले ऐकू येते असा; कानाचा धड : 'कान वचन मीचि श्रोता । मीचि जाण शब्दार्थता । ऐकणाहि मज परता । नाहीं तत्त्वतां श्रवणाचा ।।'– एभा १३.३४५.

**ऐकणे** उक्रि. १. कानांनी शब्द, ध्वनी जाणणे, समजणे; कान देणे; श्रवण करणे. २. लक्षपूर्वक ऐकणे; काळजीने श्रवण करणे; अवधान ठेवणे. ३. लक्ष देणे; मान्य करणे (एखादी सांगितलेली गोष्ट); ध्यान ठेवणे; नीट चित्त देणे; बरहुकूम वागणे; आज्ञा पाळणे; हुकूम मानणे. [सं. आकर्णन] (वा.) **ऐकून घेणे** – १. दुसऱ्याचे बोलणे सहन करणे. २. लक्षपूर्वक पूर्णपणे ऐकणे.

**ऐकभट्टी** स्त्री. (विनोदाने) ऐकण्याचे काम; कर्णद्वारे ग्रहण करणे (याच्या उलट अभ्यासाने ग्रहण करणे); ऐकण्याचा अभ्यास; ऐकीव अभ्यास. वि. ऐकीव; केवळ कानावर आलेली (जनवार्ता, अफवा, बातमी).

**ऐकमत्य** न. सर्वांचे एकमत असणे; कोणताही मतभेद नसणे; मतांचे, विचारांचे, आवडीनिवडीचे एकस्वरूप; एकीकरण; एकवाक्यता; एकी; एकोपा : 'राष्ट्रीय सभेत ऐकमत्य होण्यापूर्वी, प्रत्येक प्रांतात, प्रत्येक जिल्ह्यात, प्रत्येक खेड्यात तें झालें पाहिजे.' – टिसू ४०. [सं.]

**ऐकवणी** स्त्री. १. ऐकायला लावणे; कबूल करायला लावणे. २. विवरण; विवेचन; फोड. (क्रि. करणे.)

**ऐकवणे** ऐकू शकणे; ऐकून काही परिणाम, त्रास न होणे.

**ऐकवणे** उक्रि. (ऐकणे प्रयोजक.) १. ऐकायला लावणे; म्हणून दाखवणे. २. स्पष्ट शब्दांत सांगणे; सुनवणे.

**ऐकाहिक** वि. १. एका दिवसाचे; उरकण्यास एक दिवस लागणारे (काम). २. एकच दिवस पाळायचा (उपास वगैरे). ३. एकच दिवस टिकणारे; क्षणिक; क्षणभंगुर. ४. दररोज येणारा; रोज थोडाबहुत असणारा; सान्निपातिक (ज्वर वगैरे). [सं. एक + आहिक (अहन्)]

**ऐकांतिक** वि. १. अतिरेकी; टोकाचा; दोन परस्परविरोधी मतांत तोल न राखणारा : 'या दोन ऐकांतिक प्रणाली असून...' – सासं ३२९. २. (तत्त्व.) एकाच मताचा पुरस्कार करणारा; एकाच बाजूने विचार करणारा; एकच बाजू पाहणारा. [सं.]

**ऐकीव** वि. १. ऐकलेले; ऐकून माहीत झालेले; दुसऱ्याकडून समजलेले; स्वतः न पाहिलेला किंवा अनुभवलेला. २. (ल.) प्रत्यक्ष पुरावा, साधन नसणारे; कमी विश्वासार्ह.

**ऐकीव पुरावा** १. प्रत्यक्ष पाहिलेली हकीगत न सांगता केवळ ऐकलेली गोष्ट सांगणे; सांगोवांगी गोष्ट. २. (कायदा.) साक्षीदाराने प्रत्यक्ष जी घटना पाहिली नाही, पण इतरांकडून तोंडी समजली आहे अशा गोष्टींवर आधारलेला पुरावा. हा सामान्यतः विश्वसनीय समजला जात नाही.

**ऐक्य** न. १. एकरूपता; एकोपा; एकी; अद्वैत; सारखेपणा; एक होणे : 'ऐक्याचें ऐक्यपण सरे । जेथ अद्वयकणु हों विरे ।'– राज्ञा १८.९९९. २. एकदिल; एकचित्त; एकभाव; मिलाप; जूट; ऐकमत्य (उद्देश, स्वभाव, इच्छा वगैरेचे). ३. (तत्त्व.) ऐक्यमत; ऐकज्ञान; जीवात्मा व परमात्मा यांचे अद्वैत असते असे मत; सृष्टी व परमेश्वर यांची एकरूपता; ईश्वरमयत्ववाद. ४. (वेदांत) ब्रह्म; अद्वैत : 'ऐक्य जीव तो ब्रह्मांश । जेथें पिंडब्रह्मांड निरास ।' – दास ११.१.३५. ५. (ग.) बेरीज; जमा; रास. [सं. ] (वा.) **ऐक्यास येणे**– एकत्र होणे; संमीलन होणे; परस्पर जुळणे : 'कीं वेदांतशास्त्रींच्या श्रुती । ऐक्यास येती परस्परें।।'

**ऐक्यता** पहा : **ऐक्य १,२** : 'ऐक्यता नाही म्हणजे इंग्रजी राज्यास त्यापासून कांहीं भय नाहीं' –लोटिकेले २.१५.

**ऐक्यत्रयी** स्त्री. सत्यम्, शिवम्, सुंदरम् ही तीन अंतिम मूल्ये. ही मूल्ये ज्या साहित्यकृतीत एकत्र येतात ते वाङ्मय श्रेष्ठ प्रतीचे समजले जाते.

**ऐक्यभंग** पु. दुफळी; दुभंगणे; एकी नाहीशी होणे.

**ऐक्यभाव** पु. १. (राज्य.) विशिष्ट उद्देश व हितसंबंध यासाठी एखाद्या वंशाचे, वर्णाचे झालेले एकमत, दृढ ऐक्य. २. एकरूपता; ब्रह्मरूपता: 'अथवा ऐक्यभावाचेनि पैसें । दुजे मानुनि आत्मा ऐसें ।' – ज्ञा १६.७१. [सं.]

**ऐक्याकार** वि. एकाकार पहा : **एकंकार** : 'दुजे शिळेवरी रेखीं मकार दोहीस करी ऐक्याकार ।'– रावि २३.१५६. [सं.]

**ऐगूबैगू** पु. अलबतेगलबते; ऐबतेगैबते; कोणीतरी माणसे.

**ऐचण, ऐंचण, ऐतण** स्त्री. १. पडझड; अडचण; अडगळ; सटरफटर वस्तू. २. खेचाखेच; गर्दी. ३. अडचणीची, गर्दीची अवस्था, जागा. ४. गवत, रान, झाडझुडूप माजलेली जागा.

**ऐचेआ** वि. आजचा; विद्यमान; चालू : 'जें येती वरूसेंवेरी । ते ऐचेआ दिवसा भितुरी । दाविले तुवां ।।'–ख्रिपु २.२.१५९. (गो.)

**ऐच्छिक** वि. १. इच्छिलेले; इष्ट. २. मर्जीवर ठेवलेले; पाहिजे ते; मर्जीनुसार. ३. स्वच्छंदी; अविचारी; बेलगाम; उच्छृंखल. ४. नियमबद्ध नसलेले; मर्जीनुरूप; वैकल्पिक; वाटेल तसे; काहीतरी; लहरी; अशास्त्रीय. ५. हेतुपुरःसर, बुद्धिपुरःसर केलेले; पूर्वयोजनेनुसार, योजून केलेले; जाणूनबुजून केलेले. ६. (शिक्षण.) नेमून दिलेल्या विषयांतून निवडून घ्यायचा (विषय.) [सं.]

**ऐच्छिक क्रिया** स्वतःच्या इच्छेनुसार करता येणारी क्रिया. उदा. बोलणे.

**ऐच्छिक वर्तन** (मानस.) इच्छेनुसार केलेले वर्तन.

**ऐच्छिक विषय** (शिक्षण) परीक्षेकरता नेमलेल्या दोन किंवा अधिक विषयांपैकी आपल्या इच्छेने निवडलेला विषय : 'एम्.ए. च्या परीक्षेस देशी भाषा या विषयाची निदान ऐच्छिक म्हणून तरी गणना करण्यात आली.'– केले १.९२.

**ऐच्छिक स्नायू** (वै.) आपल्या इच्छेने मज्जातंतूंकडून संवेदना मिळताच आकुंचन –प्रसरण पावून शरीराची हालचाल करण्यास मदत करणारा स्नायू.

**ऐजन** सदर.(ऐति. शब्दकोश.)

**ऐट, ऐटा, ऐटी** स्त्री. १. अक्कडबाजी; रुबाब; भपका; दिमाख; छानछोकी; डौल; तोरा. २. नखरा; आविर्भाव (मुद्रेचा, वागण्याचा, चालण्याचा, कृतीचा). ३. तडफ.

**ऐटणे** अक्रि. ऐट करणे.

**ऐटबाज** वि. भपकेबाज; नखरेबाज; दिमाख दाखवणारा; नखरा, आविर्भाव करणारा; छानछौक; अक्कडबाज.

**ऐटबाजी** स्त्री. भपका; छानछोकी; नखरा; डौल.

**ऐटूपणा** पु. आपला अधिकार, पैसा, देखणेपणा यांचे प्रदर्शन: 'सेक्रेटरीचा हा ऐटुपणा....'– जुआ ११४.

**ऐडैणे** अक्रि. वेड्यासारखे होणे : 'अवस्था देखौनि उद्धवदेव ऐडैल'– श्रीकृच ३४.

**ऐतखाऊ, ऐतगब्बू, ऐतमारा, ऐताजी, ऐतोळा** पहा: **आयतोबा**

**ऐतखोरपणा** पु. काम न करता चैनीने राहण्याची सवय; आळशीपणा : 'आम्ही आमचा ऐतखोरपणा टिकविण्याचा प्रयत्न करीत आहोत.'– आआशे २६९.

**ऐतरेय** पु. १. एक वैदिक ऋषी; इतरा नावाच्या स्त्रीचा मुलगा. २. ऋग्वेदाच्या शाकलशाखेचे (आरण्यक). ३. ऐतरेय आरण्यकाच्या दुसऱ्या भागातील (उपनिषद).४. ऋग्वेदाचा ब्राह्मण ग्रंथ. या ग्रंथाचे कर्तृत्व ऐतरेय ऋषींकडे आहे.

**ऐतवार** पु. आदितवार; रविवार; सूर्याचा वार : 'आठ दिसाच्या ऐतवारी कापूर माझ्या हाती.'– जसा ६५.

**ऐता** सना. तो, ती, ते; हा, ही, हे; हा येथे; हा एक; इथे (तो,ती, ते) आहे. (कुण.)

**ऐतार** वि. श्रेष्ठ; अधिकतर; उच्चतर : 'सौंदर्य देखोनि ऐतार । श्रीमूर्ती वेधले मुनीश्वर ।'– रुस्व ३३४. [सं. उच्चतर] पु. स्त्री. श्रेष्ठत्व, उच्चत्व : 'या गाता तरंगाचिया नदी : चढती ऐतारा पै' – रुस्व १५९.

**ऐतिहासिक** वि. इतिहासाशी संबंध असलेला; इतिहासातील घटनांवर आधारलेला.जसे:–ऐतिहासिक पोवाडे, कादंबरी; ऐतिहासिक सत्य. [सं.]

**ऐतिहासिकता** स्त्री.एखादी गोष्ट पौराणिक किंवा दंतकथा नसून ऐतिहासिक वस्तुस्थिती असणे;इतिहाससिद्धता;ऐतिहासिक खरेपणा.

**ऐतिहासिक भाषाविज्ञान** (भाषा.) भाषेत कालानुक्रमाने होणाऱ्या बदलांची नोंद करणारे शास्त्र.

**ऐतिहासिक भौतिकवाद**(राज्य.)१.अर्थकारण हे सर्व समाजव्यवस्थेचे मूळ असून यात वर्गसंघर्षाद्वारे बदल घडतो व नवा सत्ताधारी वर्ग उदयास येतो हे सांगणाऱ्या मार्क्सवादी तत्वज्ञानाचा भाग.२.जगातील

घटनांच्या इतिहासावर (जे खरोखर आहे व घडते त्यावर)आधारलेल्या अभ्यासातून मिळणारे तत्वज्ञान.

**ऐतिहासिक समाजशास्त्र**(समाज.)सामाजिक जीवनाचा उगम,त्यातील अवस्था आणि त्यांचे नियम व कायदे यांचा अभ्यास करणारे शास्त्र.

**ऐतिह्य** न. लोकपरंपरेचा प्रवाह; परंपरा; परंपरागत गोष्ट; लोककथा; दंतकथा. [सं.]

**ऐती, ऐतिका** स्त्री. तयारी. पहा : **आयती** 'तेथें होमांची ऐती करिती।'- वसा २१ (गो.); 'प्रधानेसी म्हणे इओसे । यांथे मंधिरी नेइजे । भोजनाची ऐतिका करविजे । तैयां कारणें ।'- ख्रिपु १.१४.११.

**ऐदान** स्त्री. न. पहार : भली दांडगी एक ऐदान आणली.' – ऊन ३९.

**ऐदी** वि. आळशी; जड; मंद; सुस्त; अजागळ; अव्यवस्थित; कामाचा कंटाळा असणारा; खुशालचेंडू : 'ऐदी होण्याची चटक मलाही थोडीशी लावशील तर बरें होईल.'- बाय २-२.

**ऐन** पु. एक वृक्ष, झाड. पहा: **अइन**

**ऐन** अ. जोर दाखविण्यासाठी या उपपदाचा उपयोग करतात. अचूकपणा, पूर्णता, अतिशयितता वगैरे अर्थ हा शब्द लागल्यापासून होतात. जसे:- ऐन उन्हाळा, ऐनवेळ इ. प्रधान, मुख्य, मूळ, आरंभीचे, मूलभूत वगैरे अर्थ 'ऐन' हे उपपद शब्दास लावल्यास होतात. जसे :- 'ऐन कर्ज, ऐन खर्च इ.'

वि. पूर्ण भर असलेला मूळ; प्रत्यक्ष मुख्य; सर्वोत्तम; सर्वांत महत्त्वाची : 'बातमी चहूंकडील राखोन हुशार राहून टिपूचे मुलखात हंगाम सुरू करावा ही ऐन मसलत आहे.' – ऐलेसं ४३५०.

**ऐन** स्त्री. चांगली कुळी; चांगली वर्तणूक; सभ्यपणाचे वागणे.

**ऐन** न. (जुने रूप यैन) १. मुद्दल; मूळ रक्कम; भांडवल.(कर्ना. को.) २. मूळचा ठरलेला शेतसारा: 'साठ लाखांची बेरीज यैन व इजाफा मिळोन सिद्ध केली.'- मइसा ७.५३.

**ऐनक** पु. न. चष्मा; डोळ्याला लावायची आरशी; उपनेत्र. [अरबी ऐन= डोळे]

**ऐन कमाविशी जमा** शेतसाऱ्याशिवाय, इतर उत्पन्नाच्या बाबी पूर्वीपासून चालत आलेल्या असतील त्या.

**ऐन कारभारी** वरिष्ठ (व्यवस्थापक, मंत्री, कोठारी, घटक इ.)

**ऐन काळी** जमिनीवरील सारा, कर.

**ऐन घाई** घाईचा, गडबडीचा कळस, परमावस्था.

**ऐन जमा** १. ठरलेला किंवा नेहमीचा वसूल, सारा; अवांतर सोडून मुख्य वसूल. याच्या उलट खेरीज जमा; शिवाय जमा; कमाविस जमा. २. मूळचा, नेहमीचा वसूल (एखाद्या वर्षी कमीजास्त झालेला नव्हे असा).

**ऐन जमाबंदी** साऱ्याची आकारणी.

**ऐन जिन्नस** १. जमिनीचे धान्यादी उत्पन्न. याच्या उलट नक्त सारा. उत्पन्न विकून पैसा केलेला नव्हे तर जसाच्या तसाच सरकारात भरायचा शेतीतील माल. सामासिक शब्दात- ऐनजिन्नसधारा, ऐनजिन्नसवसूल. २. (ल.) खुद्द; जातीने : 'तरी ऐन जिन्नस पदाजी यादवाचे दोघे बेटे एकोजी व कुसाजी गनिमाकडे आहेती.'- मइसा १५.१.

**ऐनजिन्नसी, ऐनजिनसी** वि. १. प्रत्यक्ष मालाच्या रूपात ऐनजिनसासंबंधी (धारा, वसूल, जकात वगैरे): 'स्वराज्यातील नेमणुकीचा बहुतेक भाग ऐनजिन्नसी मिळत असल्यामुळे ...'- गांगा १४३. २. त्याच जातीचे, प्रकारचे (धान्य, कापड, दागिना वगैरे शब्दांबरोबर योजतात.) ३. खुद्द. पहा : **ऐनजिन्नस २**

क्रिवि. मुद्देमालासह; प्रत्यक्ष कृती करीत असता.

**ऐनत** स्त्री. उधार दिलेला माल (अधिक किंमत आकारून); रक्कम व्याजी देण्याच्याऐवजी उधार दिलेल्या मालावरच अधिक किंमत आकारून देणे.

**ऐन तरम** जमिनीच्या वर्गवारीप्रमाणे बसविलेला मूळ धारा, सारा.

**ऐनदानी** वि. उदार मनाचा. [फा.]

**ऐन नक्द, ऐन नकद, ऐन नगद, ऐन नक्त** पैशाच्या रूपाने येणारा सारा किंवा ऐनजिनसी साऱ्याची पैशात किंमत.

**ऐनपैन, ऐणपैण** स्त्री. १. निर्वाळा देणे; खात्रीपूर्वक सांगणे. (क्रि. करणे, घालणे, पडणे). २. हुज्जत; हेकटपणाचे बोलणे.

**ऐनफाजील** जमाबंदी हिशेबातील एक सदर. यात शेतकी किंवा बागाईतखेरीज येणारे जादा उत्पन्न येते. जसे :- आंबराई, टरबुजवाडी, पाणभरा जमीन, कुरण वगैरेंचे उत्पन्न.

**ऐन बाबती** सरकारला द्यायचा मुख्य कर; राजाला द्यायचा चतुर्थांश.[फा.]

**ऐन मुलकी** मूळ धारा, वसूल, सारा.

**ऐन मोकासा** चौथाईतील सरदारांची नेमणूक बाब. पहा: **चौथ**

**ऐन वाफ** पेरणीचा हंगाम; ऐन वेळ; पेरणीचा नक्की हंगाम; पेरणीचा भर.

**ऐन वेळ** १. अगदी आणीबाणीचा प्रसंग; मोक्याची वेळ. २. अगदी योग्य वेळ.

**ऐन सोदा** अट्टल लुच्चा; लबाड; हरामी; ऐन अट्टल.

**ऐना** पु. १. आयना; आरसा : 'ऐना निंदितसे निर्मासिक ।' – दावि २६३. २. (ल.) शोभादायक वस्तू; अलंकरण; भूषण : '--- करून निघे निज मंदिरचा ऐना.'- प्रला १२३. ३. विशेषतः अव. - ऐने, चष्मा, उपनेत्र, डोळ्यांची आरशी. [फा.]

**ऐना की बैना** शिमग्यात वर्गणी गोळा करायला निघालेल्या मुलांनी म्हणायचा संकेत.

**ऐनात** स्त्री बक्षीस :'घोडा त्यांचा त्यास ऐनात करून दिला.'- नाग २.११२.

**ऐनाती** स्त्री. मूळ ठरविलेल्या शेतसाऱ्याचा प्रकार; ऐन-आकार. [फा.]

**ऐनी** वि. लोखंडी : 'ऐनी गोळे १०,००० खर्च झाले.'- ऐलेसं ११९४.

**ऐनेमहाल, ऐनामहाल** पु. आरसेमहाल; आतून सर्व बाजूंनी मढविलेला दिवाणखाना : 'ऐनामहाल जो रत्नखचित ।' – दावि ३५८; 'त्याचप्रमाणें ती सुभानजीबरोबर नागोज्याच्या गढीत त्याच्या खास ऐनेमहालांत आली.'- स्वप ३९.३. [फा.]

**ऐनेर, ऐनेर** न. लहान मुलांचा एक रोग. याने गर्भिणी आईचे स्तनपान करणाऱ्या मुलाला श्वास, अग्निमांद्य, ओकारी, ग्लानी, खोकला, घेरी येणे ही लक्षणे होतात. पोट मोठे होते. याला वैद्यकात पारिगर्भिक असे म्हणतात.

**ऐपत** स्त्री. संपन्नता; आर्थिक सामर्थ्य, शक्ती, योग्यता, साधन; मालमत्ता; पैसाअडका :'जो तो आपल्या ऐपतीप्रमाणे काहीतरी (देवाला) अर्पण

करीत असतो.'– एल्गार ८. [फा. आफियत]

**ऐब** पु. १. व्यंग; दोष; चूक; खोडः अपूर्णता. पहाः **अयब** : 'नाक लागलें तर फारसा ऐब दिसणार नाही.'– ऐलेसं ४.६५०५. २. कमीपणा. (क्रि. लागणे) [अर.]

**ऐबतेगैबते, ऐबूगैबू** वि. साळकोजी माळकोजी; सटरफटर; कोणीतरी; ज्यांचा काही संबंध नाही असे. पहाः **ऐगूबैगू**

**ऐबी** वि. १. खोडकर; व्रात्य. (ना.) २. ओशाळा; मिंधा. (कु.)

**ऐम, ऐमा** स्त्री. मुसलमानी राज्यात धार्मिक किंवा विद्वान मुसलमान लोकांना दिलेल्या इनाम जमिनी. या जमिनी ब्रिटिश सरकारने इनाम, तबदिली हक्कासुद्धा मान्य केल्या. [फा.]

**ऐममौझा** धार्मिक इनाम गाव. [फा.]

**ऐरण** स्त्री. सोनार, लोहार वगैरेंचे एक हत्यार; घडकाम करण्याचे साधन. यावर धातूचे जिन्नस ठोकून त्याला पाहिजे तो आकार देतात. सामान्यतः ८ ते १० शेर वजनाचा व ५ इंच लांबी व रुंदीचा, वर रुंद व चौकोनी असून खाली निमुळता असलेला लोखंडी ठोकळा एका लाकडी लांबट ठोकळ्यात बसविलेला असतो. याला वरच्या बाजूला एक इंच जाडीचा पोलादी भाग असतो : 'जैसे ऐरणीवरी घण । तैसे हाणिती उसणपण ।।'– कथा १. १३.९८.[सं. अरणि, अघरिणी] (वा.) **ऐरण देणे** – एखाद्याला 'ऐरणी दिव्य' करायला लावणे. तापून लाल झालेली ऐरण मोकळ्या हातांनी उचलून काही पावले चालून दाखवणे. आपण गुन्हेगार नाही असे सिद्ध करण्यासाठी किंवा आपल्या एकाद्या हक्काच्या शाबितीसाठी अशा प्रकारचे दिव्य करून दाखविण्याची जुन्या काळी वहिवाट होती : 'खून फरादिया केलियावरी हर दो नफरीं नेम केला जे सिषेस यैरण द्यावी. जो खरा होई तेणें खावी.'– शिचसाखं २.११४.

**ऐरण** स्त्री. शेताच्या बांधावर असणारा, हद्द दाखविणारा दगड किंवा मातीचा ढीग.

**ऐरण, ऐरीण** स्त्री. १. इरण; नरवेल. २. आयरणी; सोनामुखीची एक जात. [सं. अरणि]

**ऐरण गारणे** (सोनारी) ऐरणीला ठोकून ठोकून गुळगुळीतपणा आलेला असतो, तो घालविण्यासाठी कुरुंदाचा चुरा हातोड्याने ऐरणीवर घासणे.

**ऐरणघण सांधा** वि. शरीरातील सांध्याचा एक प्रकार.

**ऐरण मेघ** वादळी पाऊस ज्यापासून निर्माण होईल असा ढगाचा शिरोभाग. हवेचे ऊर्ध्वगामी प्रवाह स्थितविराच्या (स्ट्राटोस्फियर) तळापर्यंत गेल्यावर तेथे या ढगांच्या माथ्याची बऱ्याच वेळेस पसरण होऊन ऐरणीसारखा आकार तयार होतो. ह्यामधील हिमकणांच्यामुळे ऐरणीचा आकार थोडासा पसरट होतो.

**ऐरणमैरण** स्त्री. एक वनस्पती. हिची पाने यकृताच्या आकाराची असून त्यांचा यकृतविकारावर उपयोग होतो.

**ऐरणरिकीब सांधा** शरीराच्या सांध्याचा एक प्रकार. याच्या आकारामुळे याला हे नाव मिळाले आहे.

**ऐरणी** पहा : **ऐरण** : 'सर्पाची जे वाकली फणी । तेचि पिटावया ऐरणी। कातरी केलिया जोडोनि । सर्पाच्याच ।।'– कथा ३.१७.९२.

**ऐरणी, ऐरिणी** स्त्री. १. लग्नात वरातीच्या पूर्वी वेळूच्या परडीत (झालीत) कणकीचे दिवे लावून त्यात उमामहेश्वराची पूजा करून वरमातेस दान करतात ते पात्र : 'भीमकें मांडिले विंदान । भव ऐरणी संपादन । कृष्णासी वंशपात्रदान । विधि विधान वेदोक्त ।।'– एरुस्व १६.१५८. २. अग्निपात्र : 'विरहा नलें तातली । चंद्रकळा होए चुळचुळी । ते ऐरणी करतळी । घेईन मी ।।'– शिव १९६. [सं. अरणि]

**ऐरणीदान** न. लग्नात वंशवृद्धीसाठी वधूपक्षाकडून वरमातेस दिले जाणारे वंशपात्राचे (झालीचे) दान.

**ऐरणीपूजन** न. ऐरणीदान करण्यापूर्वी वंशपात्राचे करायचे पूजन.

**ऐराण** १. ओसाड मैदान. २. एकलकोंडेपणाची भावना.

**ऐरावत** पु. इंद्राचा हत्ती; समुद्रमंथनातून काढलेल्या चौदा रत्नांपैकी एक : 'अर्जुना मी गा ऐरावतु ।–ज्ञा १०.२३८. [सं.]

**ऐरावती लक्ष्मी** गजांत लक्ष्मी; हत्ती बाळगण्याइतकी श्रीमंती : 'मदमत्त झालेल्या द्वीपेंद्रानें एखादे वेळीं क्वचित् प्राणनाश केला म्हणून ऐरावती लक्ष्मीचा अनादर करणें योग्य नाही.'– किरकोळ लेखसंग्रह (चिपळूणकर).

**ऐऱ्हा** क्रिवि. या बाजूला : 'आधीं अविवा ऐऱ्हां नीरसे तेहळीं सुधु आल्या ब्रम्ही पैसे ।'– ज्ञाप्र ६४२.

**ऐल, ऐला, ऐलाड, ऐलाडी, ऐली** वि. अलीकडचा; अलीकडला : 'उताराचिये सांगडी । ठाके ते ऐलीच थडी ।' – ज्ञा १८.२५५. क्रिवि. १. या बाजूला; अलीकडे : 'प्रवृत्ति माघौति मोहरे । समाधि ऐलाडी उतरे ।' – ज्ञा ६.१९१. २. आधी; अगोदर, पूर्वी :'तेवि तो उडुनाथ । केवल श्रीकृष्णप्रीत्यर्थ । सांडूनि काळ नियत । ऐलाडचि उदैला ।।'– रास १.१०७.

**ऐलपैल** क्रिवि. या व त्या बाजूला; जवळच्या व दूरच्या दोन्ही काठांवर; अलीकडे पलीकडे.
वि. (अलीकडचा व पलीकडचा) इतर; अवांतर; किरकोळ; मिश्र; सटरफटर; क्षुल्लक (वस्तु, काम, शब्द, मनुष्य इ.)

**ऐलफैल** स्त्री. १. बंड; उठाव; बेभानपणाचे, आज्ञा मोडण्याचे कृत्य. २. खोड्या; उपद्व्याप; बेमुर्वत वर्तन; उद्दाम भाषण. (क्रि. करणे, बोलणे.) [फैलचे द्वि.अर. फियल = कर्म]

**ऐलसैल** वि.मोकळा; दडपण दूर झालेला. [सैलचे द्वि.]

**ऐलाड** पु. अलीकडील भाग :'ऐलाड हुडाचे, पैलाड हुडाचे.'– ज्ञागा२७.

**ऐलाडिल** वि. या बाजूचा :'गोसावी ऐलाडिल वडवेन्हीं बीजें केलें.' – लीच ४.६.

**ऐलान** पु. शासन; कायदा; वटहुकूम.(माळवी) [अर. एअलान]

**ऐलीकड** स्त्री. ही बाजू (इहलोक); अलीकडची बाजू.

**ऐलीकडचा, ऐलीकडून, ऐलीकडे** पहा : **अलीकडचा,अलीकडील** : नाणावे पैलाड येतां हि जीव । ऐलिकडे उठता त्यावें घरा ।' – दावि १४८

**ऐलीकडी** क्रिवि. १. पूर्वी; अलीकडे :'जेवीं वसंताऐलीकडी । वृक्षासि होय पानझडी ।' – एभा ३.१५५. २. अंतःकरणाकडे.

**ऐवज** पु. १. मालमत्ता; संपत्ती; द्रव्य; किंमती वस्तू; मौल्यवान पदार्थ; रोकड किंवा माल :'पाडुरंग आणितां ध्यानांत । तों ऐवज आठविला मनांत ।'. २. सुस्थिती; टिकाऊपणा; भक्कमपणा; दमदारपणा.

३. तत्त्वांश; सामर्थ्य; उत्साह; उमेद; पाणी. ४. किंमत; मूल्य (कोणत्याही वस्तूची पैशाच्या रूपात). ५. रोख वसुली; रोख उत्पन्न, जमा; एकंदर रक्कम. [फा. इवझ्=बदला]

**ऐवजदार, ऐवजशीर** वि. समर्थ; उपयुक्त; चांगल्या स्थितीत असणारा; कार्योपयोगी (वस्तू, पदार्थ, पशु वगैरे).

**ऐवजमोबदला** पु. १. एखाद्याच्या मालकीची वस्तू दुसऱ्याच्या ताब्यात त्याच्या वस्तूबद्दल असणे; ऐवजाची अदलाबदल करणे. २. देवघेव; मोबदला देणे. (क्रि. करणे). ३. ठेवीवर पैसा उसनवार काढणे; गहाणकर्ज. (क्रि. करणे, देणे, ठेवणे. याच्या उलट हातावर आणणे, काढणे, येणे).

**ऐवजमोबदल्याचे लिहिणे** हिशेबाचे एक खाते; ठेवी ठेवल्याचे व पैसे उसने आणल्याचे हिशेब ठेवणे; निरनिराळ्या प्रकारच्या वसुलीपोटी, ठेवीपोटी, कर्जापोटी दिलेल्या घेतलेल्या रकमांचा हिशेब ठेवणे.

**ऐवजी** शअ. बदली; जागी; मोबदल्यात. [फा. एवझ]

**ऐवट** वि. १. भरीव; जड (दागिने वगैरे); अवजड; मोठा अवाढव्य; अजस्र (झाड, खांब, इमारत वगैरे); जाड; दणकट; ओबडधोबड (कापड वगैरे). हा शब्द पुष्कळ वेळा फार व्यापक अर्थानेही योजलेला दिसून येतो. जसे :- अगडबंब - थोराड माणसांना, असभ्य, ग्राम्य, असंस्कृत भाषणाला, विविध प्रकारच्या व्यापक कामाला, दिखाऊ मोठ्या वस्तूंना हे विशेषण लावलेले आढळते. २. जड; मंद; मूर्ख; ओबडधोबड (माणूस).

**ऐवार** न. रानातील गुरांचा वाडा.

**ऐश** न. आमिष :'ऐंशाचिया आसा । मिनु झोंबिनला जैसा ।' - ख्रिपु १.१७.३७. (गो.) [सं. आमिष]

**ऐश, ऐष** स्त्री. चैन. [अर.]

**ऐश-आरा** वि. चैनीची सजावट करणारा.

**ऐशआराम, ऐशाराम, ऐशारामी** पु. स्त्री. चैन, सुख आणि स्वास्थ्य; ख्यालीखुशाली; वैषयिक सुखोपभोग; करमणूक; विलास; मनोरंजन. [अर. ऐश्+फा.आराम्]

**ऐशानी** स्त्री. ईशान्य दिशा; उत्तर व पूर्व यामधील दिशा. [सं.]

**ऐशी, ऐंशी** वि. दहाच्या आठपट; ८० ही संख्या. [सं. अशीति]

**ऐशी** उद्गा. आनंदोद्गार. भले शाबास; वाहवा; छान.

**ऐशी** वि. १. अशी; यासारखी. २. (ल.) अतिशय; फार (निंदाव्यंजक)

**ऐशीतैशी** स्त्री. एखाद्या गोष्टीची आपण पर्वा करत नाही, तिला किंमत देत नाही हे दाखवण्यासाठी वापरण्यात येणारा शब्द :'तर भाषेची ऐशीतेशी, उलटीसुलटी करीन मीहि.' - मर्ढे ११८.

**ऐश्वर** वि. ईश्वरी; दैवी; ईश्वरासंबंधी :'ऐश्वरकळा साजती । पाहुन शत्रु लाजती ।' - ऐपो ३१८. [सं.]

**ऐश्वर्य** न. १. वैभव; प्रतिष्ठा; सत्ता; इच्छित प्राप्तीचे सामर्थ्य :'आइका यश श्री औदार्य । ज्ञान वैराग्य ऐश्वर्य ।' - ज्ञा ६.३७. २.प्रभुत्व; वर्चस्व :'तुज विश्वेश्वराचिया ठायीं । ऐश्वर्य केलें ।।' - ज्ञा ११.५६९. ३. ईश्वरी अंश, गुण, सामर्थ्य :'हा आमुचा ऐश्वर्ययोगु । तुवां देखिला कीं चांगु ।' - ज्ञा ९.८७. ४. समृद्धी; संपत्ती. [सं.]

**ऐश्वर्यपीठ** न. ऐश्वर्यस्थान; संपत्तीचे, वैभवाचे माहेरघर :'की ऐश्वर्यपिठींची देवी सुंदर.'

**ऐश्वर्ययोग** पु. ईश्वरी सामर्थ्य; वैभव. पहा : **ऐश्वर्य** ३.

**ऐश्वर्यवान** वि. १. मोठा; विख्यात; प्रतिष्ठित. २. संपत्तिमान; भरभराटीत असणारा. ३. भाग्यशाली.

**ऐश्वर्याचा प्राणी** पु. देवाची कृपा असणारा; भाग्याचा पुतळा; दैवाचा भोपळा.

**ऐषमहाल** पु. करमणुकीच्या व चैनीच्या साधनांनी सज्ज ठेवलेला महाल. [अर. ऐशमहाल]

**ऐष्टिक** वि. यज्ञीय; हव्य; इष्टीसंबंधी (कर्म वगैरे). [सं.]

**ऐस** न. आमिष. पहा : **ऐश** (कु.)

**ऐसपैस** क्रिवि. १. विस्तीर्ण; प्रशस्त; अमर्याद; मोकळाढाकळा. २. आसमंतात. पहा : **आसपास**

**ऐसपैस** पु. लपाछपीच्या एका खेळाचे नाव.

**ऐसा, ऐसे** वि. क्रिवि.१.असा; असे :'ऐसेआ आपदा अनिर्वाच्या । भोगितातिआ ।' - ऋ १०. २. सारखा :'लोकबंधू जो होय रवी ऐसा ।' - नल ७. [सं. ईदृश]

**ऐसात येणे** अक्रि. कोणतीही (अयोग्य) गोष्ट करण्याच्या भरात, जोरात, आवेशात येणे. (कु.)

**ऐहिक, ऐहलौकिक** वि. या लोकातील; इहलोकासंबंधी (सुख, भोग इ.); पृथ्वीवरचा. पारलौकिक याच्या उलट:'तेसें ऐहिक तरी न नशे ।' - ज्ञा २.२३३. [सं. इह-ऐहिक]

**ऐहिकनिष्ठ** वि. (समाज.) धर्मनिरपेक्ष; पारलौकिक नव्हे तर या जगाशी संबंधित; इहवादी.

**ऐहेर** पु. अहेर :'नाना दीठि घालूनि ऐहेरा । आवंतुं जाइजे सोइरा ।' - राज्ञा १७.२८५.

**ऐहेव** स्त्री. अविधवा; सुवासिनी; सौभाग्यवती स्त्री :'आघवेनि गांवदारी । ऐहेव जैसी ।।' - राज्ञा १३.८२०.

**ऐंडा, ऐंडी, ऐंढा** पु. भात झोडण्यासाठी हातात घेतलेली कवळी. पहा: **आयंडा**

**ऐंद्र** वि. १. (ज्यो.) सत्तावीस योगांपैकी सव्विसावा योग. हा अशुभ मानला जातो. २. इंद्रासंबंधी; इंद्रलोकातील. [सं.]

**ऐंद्रजाल** न. इंद्रजाल; जादुगिरी; गारुड. [सं.]

**ऐंद्रजालिक** पु. जादूचे खेळ करणारा; गारुडी.
वि. जादूसंबंधी; इंद्रजालासंबंधी. [सं.]

**ऐंद्रस्थान** न. (नृत्य.) दोन्ही पाय वाकडे करून आडवे ठेवणे व यात अंतर चार ताल ठेवणे, कंबर गुडघ्यांच्या रेषेत येईल इतकी वाकविणे, हत्ती सारख्या प्राण्यावर चढणे वगैरे गोष्टी या स्थानात उभे राहण्याने सूचित केल्या जातात. [सं.]

**ऐंद्राग्न** वि. इंद्र व अग्नी - देवतांसंबंधी. (पुरोडाश, ऋचा इ.) [सं.]

**ऐंद्रिय, ऐंद्रियक** वि. इंद्रियासंबंधी (व्यापार); इंद्रियग्राह्य; इंद्रियसंवेद्य.

**ऐंद्रिय साधन** ज्ञानवाहक संवेदनस्थानांना मदत करणारे उपकरण.

**ऐंद्री** स्त्री. १. इंद्राधिष्ठित दिशा; पूर्वदिशा. २. इंद्रपत्नी. ३. (ज्यो.) ज्येष्ठा.



['ओ' ने सुरू होणारे काही शब्द येथे न आढळल्यास 'वो', 'व', 'उ' खाली पहावेत.]

**ओ** १. मराठी वर्णमालेतील तेरावे अक्षर. २. संस्कृतमधील मुळात अ + उ, ऊ असा बनलेला, स्वर आल्यास अव् होणारा संयुक्त स्वर. संदर्भानुसार ऱ्हस्व किंवा दीर्घ. जसे :- तो, कोट, नको यात दीर्घ; तोळा, घोडा, बडोदे यात ऱ्हस्व. प्राचीन मराठी वाङ्मयात ॐ, वो ही अक्षरे पर्यायाने येतात.

**ओ** पु. १. प्राथमिक ज्ञान, प्रारंभ. २. प्रतिसाद. (वा.) **ओ चं ठो**– पहा : **ओ का ठो न कळणे** : 'वाचायला येण्याच्या नावाने ओ चं ठो म्हटले तरी चालेल.' – पलकोघे ७३. **ओ का ठो न कळणे** – काहीही न समजणे; मुळीच आकलनबुद्धी नसणे. **ओ म्हटल्या ठो न कळणे** – संपूर्ण अज्ञान असणे; काहीही न कळणे : 'आमच्यासारख्यांना काय? ओ म्हटल्या ठो काहीसुद्धा कळत नाही.' – दुर्दम्य १२४. **ओच्या नावाने शून्य काढता येत नाही** – पहा : **ओच्या नावाने पूज्य. ओच्या नावाने वषट्कार** – काही लिहिता वाचता न येणे; ओम्पैकी ओ अक्षरसुद्धा न येणे. **ओच्या नावाने पूज्य** – ज्याला ओचे शून्य (गाठही) काढता येत नाही असा; अक्षरशत्रू; मद्दड असा माणूस. **ओ देणे** (देवाने, कर्माने, प्रारब्धाने) नशिबाने हात देणे; दैव उदयाला येणे. **ओ देणे** (चोरांनी, भुतांनी, वाघांनी इ.) सुळसुळाट होणे; पाळतीवर असणे; धावून, चालून येणे (हाक मारल्याप्रमाणे – वाघ, भूत इ. नी). **ओ येईपर्यंत** – ओकारी येईपर्यंत (जेवणे, खाणे).

**ओ** सना. ती; वो : 'नाचत गेली ओ कांती वनाला।'– मसाप १.२.१९. (साष्टी, होळी)

**ओ** हा, तो, : 'पेन ओ ठोगेहे एहे जाईन केडो होवही आली नाहां।' – पण हा ठकवितो हे जाणून कोणी धावून आले नाही.' – भि १४. (खा.)

**ओ** अ. उद्गा. हाक मारली असताना उच्चारायचा ध्वनी.
पु. स्त्री. १. हाकेला द्यायचे उत्तर. (क्रि. देणे) २. ओकारी होत असताना होणारा आवाज; ओकारी; वांती. (क्रि. येणे). [ध्व.] (वा.) **ओ देणे**–१. – मदतीला जाणे. २. उपयोगी पडणे.

**ओइचिले** वि. एवढेसे; कमी : 'आतां येणेंसीं कवण भीडे। हें पांडवसैन्य कीरु थोकडें। ॐइचिले अपाडें। दीसतसे।।' – राज्ञा १.११९. [क.उयृ].

**ओइरण** स्त्री. १.दळण्यासाठी जात्यात एकवार घालायचे धान्यादिकांचे परिमाण. २.गोठ्यात दोन गातड्यांच्यामध्ये वैरण घालण्यासाठी राखलेली जागा.

**ओइरणे** अक्रि. तांदूळ आधणात घालणे; धान्य दळण्याकरिता थोडे थोडे जात्यात घालणे. पहा : **वैरणे**

**ओइंचणे** उक्रि. पाखडणे; धान्य सुपात घेऊन विशिष्ट प्रकारे हलवून कण्या, रेव वगैरे काढणे, वैचणे, वेचणे अशीही या शब्दांची रूपे आहेत. (को.)

**ओउळ** स्त्री. न. १. बकुळीचे झाड. २. बकुळीचे फूल. (को.) [सं. बकुल]

**ओऊळदोडा** पु. बकुळीचे फळ.

**ओक** पु. शीतकटिबंधात होणारा एक वृक्ष. मराठी बायबलात याला अल्ला, अल्लीन, एला, एकोन असे प्रतिशब्द आढळतात.

**ओक** स्त्री. १. वांती; वमन; ओकारी; उलटी. २. कर्नाटकातील कार्तिक स्वामीच्या देवस्थानाच्या शेजारी सापडणारा खडूसारखा एक पदार्थ. (स्वामी पळून जात असताना पार्वती त्यांच्या मागे लागली. तेव्हा त्यांनी तिचे प्यालेले दूध ओकून टाकले) ३. वांतीबरोबर बाहेर पडलले पदार्थ. [ध्व.]

**ओकट** वि. वकट; एक या अर्थी : 'ओकट, लेंड मुंड नाल पुढें आणि लेंका। भक्तीबळें खेळ खेळू जनार्दनी एका।।' – भज ११३.

**ओकटे** न. १. उपाधी; संकट; पीडा. २. घुबड (निंदार्थक योजतात). ३. प्रेताची तिरडी; ताटी. ४. एक प्रकारचे भूत अगर पिशाच्च. ५. कोणतीही अशुभदायक किंवा असह्य गोष्ट, अपशकुनी वस्तू. (ओखटे)

**ओकणे** अक्रि. ओकाबोकी नावाच्या सोंगट्याच्या खेळात पटावर सोंगटी नसलेले दान पडले असताना सोंगटी परत करणे. पहा : **ओकबोक**

**ओकणे** अक्रि. १. वांती होणे; उलटी होणे; उलटून काही, पाडणे. २. पाट फुटून पाणी बाहेर जाणे.
उक्रि. १. (ल.) आवेशाने उच्चारणे, तोंडाबाहेर काढणे (शाप, शिवी) : 'मत्तेज क्षांति मला म्हणती अहाहा न ओक शापाते।' – मोआदि ३२.२२. २.अन्यायाने मिळविलेले द्रव्य किंवा लाच वगैरे परत करणे; हरामाने खाल्लेला पैसा परत करणे. ३. बाहेर काढणे; ओघळणे (माळेचे मणी किंवा मोती). ४. (ल.) मनातील गोष्ट कोणाला तरी उत्सुकतेने सांगणे : 'कोणाच्या जवळी ओकूं!' – संग्रामगीते १२. ५. (ल.) बोलून टाकणे. (पोटात डाचत असलेले). [क. ओक्करिसु]

**ओकती** स्त्री. विहिरीतून पाणी बाहेर काढण्याचे एक साधन. दोन खांबामध्ये किंवा एका बेळक्यामध्ये एक लाकडी दांडी असून एका बाजूला वजनासाठी दगड व दुसऱ्या बाजूला बांबू जोडून खालच्या टोकाला पोहरा लावलेला असतो : 'त्या डोहावर माची बांधून तिथं धोंडीच्या आजोबानं ओकती बसविली होती.' – पधों २६. [को. ओगसू = फेकणे, फेकविणे]

**ओकबोक** स्त्री. दुफाशी सोंगट्यांनी खेळण्याचा एक डाव.

**ओकम** पु. जुन्या दोरीचा काथ्या; पिंजलेला ताग.

**ओकर** स्त्री. रंगीत माती. उदा. काव, गेरू, पिवडी इ. [इं.]

**ओकर** पु. ओकारी : 'हा ओकरू ओकरू होए म्हणे.' – गोप्र ९९.

**ओकरा** वि. ओकणारा; ओकण्याचा स्वभाव असलेला.

**ओकळी** पु. तांबडा रंग; होळी, उत्सव किंवा लग्नसमारंभात एकमेकांच्या अंगावर शिंपडतात तो तांबडा रंग. [क.]

**ओका, ओके** वि. १. उघडे; नागडे; बुच्चे; भुंडे; नेहमीचा अलंकार अगर वस्त्राशिवाय (शरीर, अवयव इ.). (सामा.) बोका या शब्दाबरोबर प्रयोग : 'नाही तरी कान, गळे, हात ओकेबुके कधीच राहावयाचे नाहीत.' – भाऊ २.३. २.सुने; उदास; भकास; शून्य : 'सगळें घर आपली सखी येथे नाही त्यामुळे ओकेओकेसें झालें आहे.' – रप्र ७४.

**ओकाओक, ओकाबोक** स्त्री. अतिशय, एकसारखी वांती होण्याची क्रिया; (सामा.) वांती; ओकारी. (क्रि. होणे.) [ओकचे द्वि.]

**ओकारणे** अक्रि. १. मळमळणे; ओकणे :'मी पहिल्यांदा ओकारले तेव्हापासून ..' – असे हे ११६. २. (ल.) कंटाळणे; त्रासणे; किळस येणे. [क. ओक्करिसु = ओकणे]

**ओकारवाणा** वि. अमंगळ; ज्याच्याकडे पाहिले असता ओकारी येईल असा घाणेरडा :'ओकारवाणा मुखभाग दावी। जे जे वदे गोष्टिही ते वदावी।' – वामन रुक्मि ११५.

**ओकारा, ओकारी** पु. स्त्री. १. वांती; कळमळून, उन्मळून येणे; उलटी. पहा : **ओक**. २. (विशे.ओकारा) तोंडात घातलेला घास पुरता गिळला न जाता बाहेर पडतो तो. ३. (ल.) त्रास; मळमळ; कंटाळा; वीट; किळस. (क्रि. येणे.) [क. ओक्करिसु= ओकणे.]

**ओकांबा** पु. रातांबा; कोकंब; कोकम. (बेळ.)

**ओकांबा** पु. कोरडी वांती; वांतीपूर्वी येणारा उमासा :'आमटी नाही म्हणून धाकटीने ओकांबे काढले असते.' – तचां ४०.(राजा.)

**ओके** वि. सुने; रिकामे :'त्या ओक्या घरात तिचं मनस्वी कौतुक झालं.' – रथ ११४.

**ओकेओके** वि. सुनेसुने; भकास; मोकळेमोकळे :'उगीच आपले ओकेओके वाटत होते.' – वेज ३६. (वा.) **ओक ओके वाटणे** – उदास वाटणे; सुने वाटणे; चैन न पडणे.

**ओक्साबोक्शी** क्रिवि. हमसाहमशी; अनावर होऊन उमाळा येतो असे मोठ्या आवेशाने आणि हेल काढून (रडणे) :'तिचा शोक तिला आवरेना, आणि ती ओक्साबोक्शी रडू लागली.' – माबा [सं.वक्षस्चे द्वि.]

**ओख** स्त्री. आंब्याची बाठ; कोय :'आंब्याची ओख म्हणजे आठी वाटून एरंडेलात कढवावी.' – फचि ३४.

**ओखट** वि. वाईट; किळसवाणे :'कुंतीचा माद्रीचा उत्तम। माजाचि ओखटा कुसवा।' – मोस्त्री ३.११. [सं. उच्छिष्ट]

**ओखट पाखरू** न. घुबड. (तंजा.).

**ओखटवण, ओखटवणी, ओखटवाणी** न. स्त्री. १. गुरे धुतलेले पाणी. २. भांडी घासलेले खरकटें पाणी. पहा : **ओखटवर्ण** : '... एका भक्कम घमेल्यात पंगतींतलें सारें उष्टे खरकटें एकत्र करून घातलेलें मसालेदार ओखटवणी !' – समग्र सावरकर, खंड तिसरा ३४९.

**ओखटवर्ण ओखटवाणा** वि. वाईट; घाणेरडे; खराब; ओंगळ; किळसवाणे (पाणी, जागा, माणूस, वस्तू).

**ओखटा** पु. आईबाप गावी गेले असताना किंवा त्यांचा वियोग झाला असताना त्याबद्दल वाटणारी खंती (लहान मुलाची) ; ध्यास; हाय. (क्रि. धरणे, करणे.)

**ओखटे** न. पहा : **ओकटे**. १. घुबड. २. पीडा; संकट, अशुभ: 'तों पुढें आणिक संकट। दैवें ओढवलें दुर्घट। तेथें चिंतावला वैकुंठनाथ। म्हणोनि ओखटे वाटलें।।' – जै ६१.६१. फसवणूक. [क. उरूगु.]

**ओखड, ओखद, ओखाड, ओखाद** न. रोगनिवारणार्थ औषध; इलाज; दवा : 'जाणतसां द्रोणाला धृष्टद्युम्नांख्या दिव्य ओखद हो।' – मोभीष्म ३.१४. [सं. ओ.]

**ओखदी** वि. औषधी; औषधविषयक; औषधोपयोगी; दुखणे नाहीसे करणारे. [सं. ओषध]

**ओखळणे** अक्रि. ओसरणे. (कु.) [सं. उत्+स्खलन]

**ओग** पु. १. जुलाब :'हातीं तो खुब ओकां आन ओगां टेक्यो' – मग त्याला पुष्कळ वांत्या व जुलाब झाले. – भि २५. (भि.) २. वेग; वेदना; (विंचू, साप इ.) चढणे :'वृश्चिक नांगीवरी मधुबिंदु। देखोनि धावे मतिमंदु। चाखों जातां खेदु। ओग आला।' – मुरंशु ३६३. [सं. आवेग]

**ओग** पु. उपाहार; नैवेद्य :'सारंगधरासि पांच लाडू ओगाचे फिटती.' – लीचपू ९१.

**ओगडावण** न. हरविणे; नाहीसे होणे. (गो.)

**ओगर** पु. १. पानात वाढण्यासाठी मोठ्या भांड्यातून पळीने काढलेली (भाताची) रास, मूद. २.घास :'काळयवनाचा ओगरू। पुरडैला देतुसें ढेकरूं।।' – शिव४४०. ३. भात; अन्न :'रोगु जाये दुधें ओगरें। तरि निंबु कां पियावा।' – ज्ञा ४.२२०. ४. वाढपी. ५. पक्वान्न. [क. ओगर = भात]

**ओगरणे** सक्रि. अन्न वगैरे वाढणे :'काळापुढे त्वदनयें ओगरिलें स्वकुल ताट कळलें कीं।' – मोभीष्म ६.२७.

**ओगराळे** न. वाटीला मागे दांडी लावलेले एक पात्र. यातून भाताच्या मुदी पाडतात व पातळ पदार्थ वाढतात :'आज ब्राम्हणास केशरीभाताचे जेवण व वर ओगराळे भरून प्रत्येकास रुपये दक्षिणा.' – ज्योफु १३१.

**ओगळ** पहा : **ओळक**

**ओगा** पु. जोंधळा काढल्यावर कणसासकट त्याच्या ताटांच्या पेंढ्या बांधून खळ्यात घालतात तो ढींग. [क. ओग्गु = रास, ढीग]

**ओगोत** पु. १. वेळ. (कुण.)२. उशीर.

**ओग्राण** न. सामानसुमान ठेवण्याची खोली. (तंजा.) पहा : **उग्राण**

**ओघ** पु. १. प्रवाह; लोट; लोंढा :'तो उत्साहो न संवरे। इंद्रिय ओघां।' – ऋ६३. २. लहानशी नदी; नदीचा फाटा; ओहोळ. ३. (ल.) परिपाठी; परंपरा; वहिवाट; क्रम; लौकिक, रूढ पद्धती. ४. (संगीत) द्रुत, जलद ताल; आलाप घेणे. ५. समुदाय; जमाव.[सं.] (वा.) **ओघ येणे** – प्रवाह येणे; लाट येणे. **ओघात पडणे** – पहा : **ओघास येणे**. **ओघाबरोबर वाहत जाणे** – प्रवाहतपतित होणे; प्रवाहाप्रमाणे जाणे; सामान्य जनरीतीप्रमाणे वागणे :'तथापि ओघाबरोबरच जाणारे लोक अधिक असतात.' – लोटिकेले २.४५०. **ओघास येणे** – पद्धतीत समाविष्ट होणे; प्रसंगामुळे एखादा विषय किंवा प्रश्न मुद्दाम न आणता संभाषणात येणे; क्रमाने प्राप्त होणे :'तिचा नाश करणे ओघास आलें तर ती गोष्ट निराळी.' – विवि १०.५.

**ओघ तक्ता** संघटनेतील अधिकाराची श्रेणी दाखवणारी आकृती.

**ओघपत्र** न. (अर्थ.) १. उत्पादनसंस्थेच्या व्यवहारात साधनसामग्रीची आवक, त्या सामग्रीचा उत्पादनप्रक्रियेत विनियोग या दोनही प्रवाहांचा आलेख. २. संस्थेच्या अर्थव्यवहाराच्या संदर्भात निधीची आवक आणि त्या निधीचा विनियोग वा खर्च – या प्रवाहांचा आलेख.

**ओघमानु** पु. सन्मान : 'तुमचा बंधू म्हणौनि सुकीचा ओघमानु केला.' – धउ.

**ओघरणे** अक्रि. फोडणी देणे : 'तक्रें ओघरिलीं।' – राक
[क. ओग्गरिसु= फोडणी देणे, मसाला लावणे]

**ओघवती** वि. प्रवाही; अस्खलित (लेखन, वाणी).

**ओघळ** पु. स्त्री. १. पाण्याचा लहानसा प्रवाह; ओहोळ; ओढा; पऱ्ह्या; झिरपा; झरा; पाट. २. पातळ पदार्थ वाहिल्याची खूण. ३. डोंगरातील पाणी वाहून पडलेला चर; ओघळण; हरळ, दरी,खळगा:'तीन प्रसिद्ध दरोडेखोर कोठेतरी ओघळींत भुयार करून दडून राहिले होते.' – के ९.४.१९४०. ३. (ल.) ठपका : 'तो त्यांच्याशी इमानानं वागला होता. एवढासादेखील ओघळ येऊ दिला नव्हता.' – पेरणी ११३.

**ओघळणे** उक्रि. १. माळेतून निसटणे; बाहेर पडणे. २. ढिगातून थोडासा अंश काढून घेणे.
अक्रि. १. पाझरणे; बारीक प्रवाहाने सरणे; गळणे. २. मोत्याचे वेज मोठे होणे; दागिन्यांच्या वजनाच्या भाराने कान, नाक यांचे भोक मोठे होणे, खाली उतरणे. ३. माळेतून मणी, मोती वगैरे बाहेर पडणे; गळून पडणे; तुकडे पडणे. ४. सुटणे; बारगळणे; वगळला जाणे.

**ओघळनिघळ** पु. (भिंतीवरून, तोंडावरून, जमिनीवरून) वेडावाकडा, अनियमित मार्गाने वाहणारा प्रवाह. [ओघळचे द्वि.]

**ओघळी** स्त्री. १. लहानसा ओघळ; झरा; पाट; स्राव. २. पाण्याच्या प्रवाहामुळे पडलेला चर; घळण; हरळ.

**ओघाओघाखाली** क्रिवि. चालू प्रवाहात; (एक पद्धती) अमलात असताना (देणे, करणे, इ.).

**ओघाओघाचा** क्रिवि. प्रवाहाचा किंवा पद्धतीचा.

**ओघाओघाने** क्रिवि. पद्धतीने; जोडीने; क्रमाने.

**ओघाळा** पु. ओढा:'ओघाळेया पूर्वे रामनाथा दक्षिणे पिंपळु' –गोप्र १६७.

**ओच ओळखणे** नुसता ओ येत असणे; ज्याला एकच गोष्ट माहीत आहे म्हणजे कोणताही विषय अथवा वस्तू यांच्या एकाच अंगाचे किंवा रीतीचे ज्याला ज्ञान आहे, त्याविषयी निराळ्या रीतीचे विचारच ज्याच्या मनात येत नाहीत अशा रेम्याडोक्या, महामूर्खाबद्दल योजतात.

**ओचका** पु. एखाद्या गोष्टीचा उत्कट ध्यास; एखादी गोष्ट हटकून होईल अशी भीती वाटल्यामुळे होणारा भास; स्वप्न पडायला कारण होईल इतका मनावर बसलेला पगडा; धसका.

**ओचकारणे** अक्रि. बोचकारणे; ओरबाडणे; नखांनी बोचकारे काढणे.

**ओचणे** पहा : **ओइंचणे**

**ओचा** पु. १. वस्त्राचा लोंबता घोळ; नेसलेल्या वस्त्राचा सोगा. २. धोतराचा किंवा नऊवारी लुगड्याचा सोगा कमरेशी खोवल्याने पडणारी घडी; धोतराच्या किंवा लुगड्याच्या खाली लोंबणाऱ्या निऱ्यांतील एक टोक कमरेच्या बाजूला खोचल्यामुळे निऱ्यांचा होणारा झोळ : 'उत्सुकतेने केलेला विडा जसाच्या तसाच ओच्यात राहिला.' – पलकोघे ३०५. [सं. अंचल]

**ओचापदर** पु. १. नट्टापट्टा : 'ओचेपदराला किती वेळ घेशील?' – आक्टो. १२. २. ओचा आणि पदर : 'आपला ओचापदर ढळला.' – कलंदर १२.

**ओच्छेद** स्त्री. छाया; सावली.(को.)

**ओज** स्त्री. १. काळजीपूर्वक केलेला उपचार, संस्कार; पदार्थ उत्तमप्रकारे टिकावा म्हणून घेतलेली काळजी; निगा, केलेला सांभाळ. (क्रि. राखणे): 'शरीरसुखाचेनिं ओजें। सत्य संसार भाविला ।।' – मुआदि २०.६६. २. (एखाद्या कामाची) आस्थेने पूर्तता करणे; नीट उरकणे; पार पाडणे. ३. कुशलता; चातुर्य; व्यवस्था; टापटीप. ४. व्यवस्थित मांडणी, स्थिती; बरी रीत. ५. सवय (राजा.) [क. ओजिसु]

**ओज** न. १. चैतन्य; उत्साह; तेज; प्राणशक्ती; जीवन. २. धातूवरील चमक, झिलई. ३. पाणिदारपणा; धैर्य; पुरुषार्थ; पौरुष. ४. कळा; तेज; पाणी. ५. (साहित्य) एक काव्यगुण; काव्योत्कर्षसाधक असे भाषेचे जे तीन गुण (प्रसाद, ओज व माधुर्य) सांगितले आहेत . त्यापैकी भाषेतील जोरदारपणाचा गुण. उदा. अमर तो मरतो अति लौकरी। चपळ तो पळतो धरितां करीं। उखळला खळ लाघवलक्षणीं। विलपती लपती सुर त्या क्षणीं।।' – नृसिंह वामन. [सं. ओजस्]

**ओजगी** पु. अशोक वृक्ष.(राजा.)

**ओजणे** अक्रि. काळजी घेणे; निगा राखणे. [क. ओजिसु]

**ओजणे** अक्रि. प्रकाशित होणे; अंगी तेज, सामर्थ्य येणे : 'म्हणौनि जे बुद्धियोगें ओजले।' – ज्ञा २.२७७. [सं. ओजस्]

**ओजली** वि.वजनदार; जड. पहा : **ओझे** (गो.) [सं. वर्य]

**ओजविणे** सक्रि. काळजीने, आस्थेने संपविणे, पुरे करणे; (एखादा धंदा किंवा गोष्ट) योग्य रीतीने करणे; (माणसे) गुणसंपन्न किंवा कार्यक्षम करणे.

**ओजस्विता** स्त्री. तेजस्वीपणा.

**ओजस्वी** वि. तेजस्वी.

**ओजळचा गरबा.** गुजराथेतील गरब्याचा एक प्रकार.

**ओजी** स्त्री. (स्था.) S या इंग्रजी अक्षराप्रमाणे वरखाली सारखी वळणे असलेली नक्षी.

**ओझडणे** पहा : **ओझरणे** : 'त्यांची पर्जन्यधारीं देखा। पुष्पें ओ(वो)झडी झाली रुखा।।' – मुआदि ४.१०५.

**ओझर** पु. १. धार; झिरपा; पाझर; ओघळ; पाट. २. लोंढा; प्रवाह; ओढा : 'पाण्याचे मोठमोठे ओझर खडकावर आपटून आपटून वाहत असत.' – मोचन ९. [सं. अव+क्षर्]

**ओझरणे** अक्रि. १. पाझरणे; स्रवणे; गळणे; झिरपणे. २. – ओढे नाले बनणे. २. (सूज) कमी होणे; उतरणे; ओसरणे.

**ओझरणे** उक्रि. घासटणे; खरडणे; पुसून टाकणे– जाणे.

**ओझरता** क्रिवि. १. अर्धवट; निसटता; वरवर;
(क्रि. पाहणे, लागणे, पडणे, जाणे, दिसणे, क्वचित दाखवणे)
२. नीट लक्ष न देता; वरवर; पुसट : 'तिनं ओझरतं ऐकलं होतं.' – पूपु ६.
वि. अस्पष्ट; वरवरचा; घाईगर्दीत झालेला. [सं. अव+क्षर]

**ओझा** पु. १. उपाध्याय. २. एक हिंदी आडनाव. [सं. उपाध्याय]

**ओझिक** वि. १. ओझे वाहणारा; हमाल. २. न दमता नेणारा; भारी वजन सहन करणारा. ३.(ल.) न कुरकुरता कुटुंबाच्या अडचणी पार पाडणारा;

सोशिक.

**ओझीरोखण** स्त्री. सुताराचे एक हत्यार; एक प्रकारचा रंधा. (कु.)

**ओझील** वि. भार सहन करणारा; जबाबदारी पत्करून पार पाडणारा; कोणतीही मोठी गोष्ट अंगावर घेणारा : 'या कार्यास मोठं ओझील मनुष्य पाहिजे. तो ऐवज तर कोणांत नाहीं.' – मइसा ५.७८.

**ओझीलपण** न. जडत्व; वजन; भार : 'फलाचेनि ॐझीलपणे ।' – राज्ञा १५.१९८.

**ओझे** न. १. भार; बोजा; वजन; जड पदार्थ. २. (ल.) एखाद्याने आपल्यावर केलेल्या उपकाराचा भार; काळजी; जबाबदारी; कर्तव्य यांचा भार : 'तुजवर घातलें गडाचें ओझें ।' – ऐपो ४२. ३. धान्य, गवत, वगैरेचा बांधलेला बोजा, गठ्ठा; मनुष्य किंवा पशू इत्यादिकांनी वाहण्याजोगा काष्ठ, दगड इ. परिमित असा पदार्थ. ४. टोपली; हारा. (गो.) [क. ओज्जे] [सं. वाह्य]

**ओझेकरी** पु. ओझे वाहणारा; हमाल; हेलकरी.

**ओझेपाझे** न. सामानसुमान. 'स्टेशनावर गेल्याबरोबर तिकिटे वगैरे काढून ओझ्यापाझ्याची व्यवस्था लावून.....' – पलकोघे२५६.

**ओझेभर** वि. भरपूर: 'नवऱ्याला ओझेभर पगार आहे.'–मावा १६०.

**ओझेरी, ओझेल,ओझेली** वि.१ ओझेकरी, हमाल. (गो.) २.पुष्कळ ओझे नीटपणे वाहणारा (तट्टू ,बैल इ.)३.कोणतेही कामाचे ओझे अंगावर पडले तरी न कंटाळता निर्वाह करणारा,मोठी जबाबदारी घेणारा नायक.

**ओझोन** पु.(रसा.)रंगहीन वायू. रैणव ऑक्सिजनचे एक रूप. हा वायू प्राणवायूचे संयुग आहे. (०३) हा फिकट निळसर असून याला एक प्रकारचा चमत्कारिक वास असतो.समुद्रकिनाऱ्यावर आणि डोंगरमाथ्यावर या वायूचे प्रमाण जास्त असते.हा उत्साहवर्धक आहे.या वायूचे गुरुत्व ऑक्सिजनच्या दीडपट जास्त आहे. [इं]

**ओट** पु. उटी.गाडीच्या चाकाला टेकण म्हणून लावलेला दगड.

**ओट** न.थंड हवेत उगवणारे एक प्रकारचे धान्य व गवत. [इं]

**ओट, ओटंब** ओट आंबा. गोमंतक– कर्नाटकामधील आंब्यासारखे एक झाड.

**ओटभरण,ओटभरणी** पहा : **ओटीभरण**

**ओटमील** न. ओट या धान्याचे पीठ:'ओटमीलची लापसी....उकळण्यात किती वेळ जाणार?'–सप्र ५२–५३.

**ओटंगण** पु.टेकायचा लोड,गिर्दी,तक्या वगैरे; टेकण.

**ओटंगणे** सक्रि.अवलंबून राहणे; स्वीकारणे; अनुसरणे; 'आम्हिं तनु मनु जीवें, तूझेया बोला ओंटंगावे.'–रा ३.१२. [क. ओट्टु.]

**ओटा** पु.१.दगड, विटा वगैरेंनी बांधलेला घरापुढील कट्टा,चबुतरा; स्वयंपाक करण्यासाठी बांधलेला कट्टा. २.ओटी; ओसरी.३.गच्चीपुढील वरवंडी किंवा लहानशी भिंत.४.पार;वरंबा; उंच ताटवा:'ओटे लावी रविकांतू । पार्यातकांचे ॥ – शिव२५४.
[क. ओट्टु = एकत्र करणे; ढीग, रास]

**ओटा** पु. कोबी इ. वनस्पतींना लागणारी पांढरी कीड.

**ओटा** पु. धोतराचा किंवा लुगड्याचा घोळ, झाल : 'आम्ही त्याला आता तुमच्या ओट्यात टाकतो.'– श्रीयो १.११५. पहा : **ओटी.** (वा.) **ओटे खोचणे** – तयारीला लागणे; कटिबद्ध होणे; धावपळ करावी लागणे : 'कारण नसताना ओटे खोचायची पाळी आणशील.'– असे हे ३९. **ओट्यात घालणे**– दत्तक देणे; स्वाधीन करणे; पदरात बांधणे. **ओट्यात घेणे**– दत्तक घेणे.

**ओटारणे** अक्रि. १. ओटा नावाच्या किड्याने खाल्ल्यामुळे झाडाची वाढ खुटणे. २. (ल.) लहान मूल, रोप इत्यादींची कोणत्याही कारणाने वाढ खुंटणे; अवथणे.

**ओटाळी** स्त्री. दोन –दोन, तीन–तीन ऊस एका जागी बांधण्याचे काम.

**ओटी** स्त्री. माजघरापुढे किंवा मागे भिंत न घातलेली पडवी; सोपा.

**ओटी** स्त्री. १. (गाय, म्हैस इ.) जनावरांची कास. २. बेंबीच्या खालचा व गुह्यांगाच्या वरचा भाग. [क. उडि=कंबर, कटिप्रदेश]

**ओटी** स्त्री. १. लुगडे किंवा धोतराचा घोळ, खोळ; पदराचा किंवा उपरण्याचा घोळ; खोलगट भाग; ओटा. २. स्त्रीच्या लुगड्याच्या ओच्यात किंवा पदरात तांदूळ, सुपारी, हळकुंड, नारळ इत्यादी घातलेले पदार्थ; ओटीत घालायचे पदार्थ. [क. उडि=ओचा, ओटी] (वा.) (वा) **भरल्या ओटीने** – १. सुखरूप प्रसूत होऊन मुलांसह. २. सवाष्णपणी. **ओटी करणे** – (गाय इ.) गाभण असताना विण्याच्या पूर्वी. ओटी (कास) परिपुष्ट होणे. **ओटी भरणे**– सुवासिनीच्या ओटीत फळे, फुले, तांदूळ वगैरे घालणे; ओटीभरण विधी करणे : 'आजचा ओटीभरणाचा समारंभ काहीसा मामींच्या हौसेखातर ... व्हावयाचा होता.'–झांमू. २. वाङ्निश्चयाच्या वेळी वधूच्या ओटीचा विधी करणे. ३. (ल.) जीवदान देणे (मुलास, नवऱ्यास). **ओटीत घालणे** – १. दत्तक देणे. २. पदरी बांधणे. ३. आश्रयार्थ स्वाधीन करणे; हवाली करणे. ४. (चूक इत्यादी) माथी मारणे. **ओटीत घेणे**– १. दत्तक घेणे; दुसऱ्याचे मूल सांभाळण्यासाठी स्वीकारणे. २. आपला म्हणणे; आपुलकीचा भाव ठेवणे. **ओटीत देणे**– दत्तक देणे; स्वाधीन करणे.

**ओटीपोट** पहा : **ओटी २** : 'खाली मान घालून ती आपल्या ओटीपोटाकडे पाहत होती.'– कलंदर १२.

**ओटीभरण** न. १. गर्भाधान. २. गर्भारशीला आठव्या महिन्यात (किंवा आधीही) तिच्या पती समवेत बसवून अनेक सुवासिनी मिळून तिच्या ओटीत तांदूळ, नारळ वगैरे पदार्थ घालतात तो विधी (सुखाने प्रसूती व्हावी म्हणून.). पहा: **ओटी भरणे**

**ओटो** पु. अत्तर; सुवासिक तेल. [इं.]

**ओटोळा** पु. शेतातील माळा; अटाळी; माचा. पहा : **अटोळी** : 'ओटोळ्याजवळी पातला ।'– दावि ३४७.

**ओठ** पु. ज्याने दातांची कवळी झाकली जाते असा नाकाच्या खालचा व हनुवटीच्या वरचा मांसल भाग; अधर. [सं. ओष्ठ](वा.) **ओठ करपणे** – फजिती होणे; पराभव होणे : 'कुरुगुरुसवें झगडतां त्या सुरगुरूचेही ओठ करपावे ।'– मोविराट ६.९०. **ओठ चावणे** – (अतिशय राग आला असता मनुष्य स्वत:चा ओठ चावतो यावरून) त्वेष येणे; मोठा राग येणे: 'त्या उपरि ओठ चावुनि शकुनि प्रेषी कराल करवाल ।' – मोशल्य ४.२९. **ओठ निपटणे**– प्रसूतीनंतर मुलाच्या

ओठावरून मालिश करणे : 'मला वाटते सुईणीने तिचे ओठ नीट निपटले नसतील.'– खेस्व. **ओठ पिळला तर दूध निघणे**– लहान वयाच्या माणसाने शक्तीबाहेर काम केल्यास त्याला म्हणतात : 'ओठ पिळला असता तर खरंच दूध निघालं असतं.'– तोबं २०. **ओठाचा जार न वाळणे**– बाल्यावस्थेत असणे; लहानपण न संपणे; तरुणपणात येण्यापूर्वीच्या स्थितीत असणे : 'ओठाच्या वरचाही जार अजूनी नाही तुझ्या वाळला ।'– कुशलवाख्यान ४१. **ओठात एक व पोटात एक असणे** – बोलायचे वेगळे आणि खरोखर मनात वेगळे असणे; बोलल्याप्रमाणे मनात नसणे. **ओठातून की पोटातून** - अंत:करणापासून की नुसते वरवर (बोलणे). **ओठापर्यंत येणे**– १. (कोणतीही गोष्ट) प्राप्त होण्याची संधी येणे. २. सांगून टाकावे अशी तीव्र इच्छा होणे. **ओठाबाहेर काढणे**– अर्थ बोलून दाखवणे.

**ओठणे** अक्रि. वर येणे; बाहेर पडणे; उठणे; ठळकपणे दिसणे शिक्का किंवा ठसा. पहा : **वठणे**

**ओठरणे** अक्रि. १. पहा: **ओटारणे** २. दुर्मुखणे.

**ओठवणे, ओठविणे, ओठावणे, ओठाविणे** अक्रि. १. बोलून दाखवणे; ओठांनी उच्चार करून दाखवणे. (इतर रूपे ओटावणे, (कु.) ओठ्यणा, (चि.) ओठायणां).२. ओठांची तुच्छतादर्शक हालचाल करणे; हिणवणे.

उक्रि. (वेडावण्यासाठी) ओठ काढून दाखविणे; वरमण्याजोगे बोलणे; टोमणा मारणे; खरडपट्टी काढणे; दोष देणे; टिंगल करणे. (को.)

**ओठंगण** न. भांडी ठेवण्यासाठी असलेली बैठक.

**ओठंगण, ओठंगणे** न. १. ज्यावर तोल टाकता येईल, टेकता येईल, रेलता येईल असे लोड, भिंत, खांब वगैरे. २. (ल.) आधार; आश्रय; पाठिंबा; टेकू; आश्रयदाता; पुरस्कर्ता.

**ओठंगणे** अक्रि. १. रेलणे; टेकणे; तोल देणे : 'दूर वनीं जाउनि तो ओठंगुनि तरुसि बैसला क्षत्ता ।' – मोआश्रम ४.४४. २. (ल.) अवलंबून राहणे (आश्रय, संरक्षण, आधार यासाठी); उत्सुक असणे; भिस्त ठेवणे. ३. झेपणे; आवाक्यातील असणे; उरकण्यासारखे, व्यवस्था लावता येण्यासारखे असणे. ४. अडखळणे; अडथळा येणे : 'ओठंगलेले श्वास मोकळे होतात.'– विभूत १२२. ५. लोंबणे.

**ओठंबा** पु. आधार. [सं. उत्संभ]

**ओठाण** न. पडवी; सोपा; ओटी : 'लाडीने ओठाणातील दाराला खिळा मारून अडकवलेले घासलेट तेलाचे टमरेल काढले.'– सराई २२.

**ओठाल** वि. जाड ओठाचा; बाबर ओठ्या.

**ओठाळी** स्त्री. घोड्याच्या खालच्या ओठाला बांधायची काढणी, दोरी.

**ओठाळे** पहा : **उठाळे**

**ओठिंग, ओठिंगणे** पहा: **ओठंगण, ओठंगणे**

**ओड** वि. खोल.

स्त्री. खोली. न. भातपेरणीला योग्य जमीन.

**ओड** स्त्री. सुरमाडाला येणारे तंतुयुक्त फळांचे घोस.

**ओडगाडू** वि. नादान; कर्तृत्वशून्य : 'ओडगाडूमध्ये डोई खुपसून राहीले आहेत. या सर्वांचा उच्छेद करून...'– हिंगणे दभा २.२९.'

**ओडघणे** सक्रि. टेकवून ठेवणे, उभी करून ठेवणे : 'खाट तिनं घडी करून भिंतीला ओडघून ठेवली होती.' - राकाधाका १६९.

**ओडण** न. १. ढाल : 'कोणी शिरीं धरिती ओडण ।'– जै. ३३.४५. २. (ल.) पांघरूण; आच्छादन : 'जडेचे ओडण जोडण । करीत पळती तपोधन ।।' – शिव २७२. ३. पहा : **ओढण.** ४. निवारण्याचे साधन: 'आंगावरि पडता पाषाण। न सुवावे केवि ओडण।' – राज्ञा ९.४८७. [क. ओड्डु] [सं. अवगुंठन]

**ओडणखांडे** न. ढाल– तरवार : 'ते ओडणखांडे घेउनि पूढां खोलत निगाले ।।'– स्थापो ४४. [क. ओडण कंडेय.]

**ओडणझडपा** पु. ढालतलवारी बाळगणारा; योद्धा: 'ओडणझडपेयाचा आवारु'– स्थापो ७६.

**ओडणा, ओडाणा, ओडणे** पु. वि. १. विकारामुळे येणारा वीट; नापसंती; तिरस्कार. २. एखाद्या उद्योगाविषयी, कामाविषयी तिरस्कार, उद्वेग. पहा: **अवढणा, अवढणे**

**ओडणी** स्त्री. (पोटातील) वेग; कळ. (कुण. राजा.)

**ओडप** पु. भंग (तंजा.) [क. ओडक=भेग]

**ओडर** स्त्री. जास्वंद; जपा.(फूल) [सं. ओड्म]

**ओडव** पु. रचना; मांडणी; रसपरिपाक : 'ओडउ (ओडवु प्र. ए. व.) वोडवीन थोरु'– मूप्र २४५.

**ओडवण** स्त्री. न. १. ढाल; पहा : **ओढण** २. (ल.) आडकाठी; संरक्षण : 'जन झुगारिती निंदेचे पाषाण; पुढें केलें क्षमाओडवण ।।' – हरि २०. १५.

**ओडवणे** अक्रि. १. पुढे होणे; पुढे करणे; प्राप्त होणे: 'शुद्धमती घाली जीवन । राजा प्रक्षाली चरण । सकलतीर्थे आली धावोन । तळीं माथा ओडविती ।।'– हरि २४.१३८. २. (ल.) वर्णन करणे : 'तैसी ओडओं कथासंगती ।।'– दाव १५.

**ओडवणे** सक्रि. झाकणे; आच्छादित करणे : 'परि तुम्ही डोइचि ओडवावी की :'– चक्रसूत्र १२. [क.ओढ्नु]

**ओडवणे** पहा : **ओठवणे**

**ओडवन** न. प्राप्ती; लाभ : 'परदेवता ओडयन मेळवी हें न घडे.'– आभा १५.

**ओडवी** स्त्री. देवीच्या नावाने जेवायला घालतात ती कुमारी. (गो.)

**ओडसणे** सक्रि. झाडझुडूप छाटून जागा मोकळी करणे. पहा: **अडसणे** (गो.)

**ओडंबर** न. १. चमत्कार. पहा : **आडंबर** : 'नभीं धूम्राचे डोंगर । उचलती थोर थोर । तैसे दावी ओडंबर । माया देवी ।।'– दास ७.४.४०. २. अवडंबर; पसारा : 'मुख्य बिंबी होये आकारु । तरी प्रतिबिंबाचा ओडंबरु । दिसे दर्पणी ।'– विसिं ७.४.

**ओडंबरी** स्त्री. गारुडी विद्या; गाथा; ऐंद्रजाल; जादू : 'कीं विषाचे शीतलपण । कीं ओडंबरीचें भूषण । कीं गंधर्वनगरीचें सैन्य । तैसें जाणू स्वर्गसुख ।।'– हरि १३.२६.

**ओडंबरीचे लेणे** १. जादूने उत्पन्न केलेला अलंकार, वस्तू. २. तकलादू वस्तू; खोटा, नकली दागिना.

**ओडंबा** स्त्री. वाळवी. पहा: **वाळिंबा.** आळंबा. (गो.)

**ओडाण** वि. ओढाळ; भटक्या; उनाड.(राजा.)

**ओडियाण** पु. १. हठयोगाशास्त्रातील एक बंध : 'बंधु पडे किरीटी । ओडियाणु तो'– ज्ञा ६.२१०.२. कटिप्रदेश. [क.उडि सं. उड्डीयन.]

**ओडोर–री** पु. मालक, राजा. [क.औडेय.]

**ओढ** स्त्री. १. खेच; आकर्षण; आस्था; लगत; (घट्ट करण्यासाठी किंवा ओढण्यासाठी दिलेला) हिसका. (क्रि देणे.) : 'इतर धर्माचे पाद्री लोक नीच मानलेल्या लोकांवर प्रेमाचे जाळे पसरवून त्यांस आपल्यात ओढीत. या त्यांच्या ओढीला विरोध करणारा आजपर्यंत कोणी नव्हता.'– दयानंद सरस्वती २३९. २. ताण, जोर, दाब (लांबवण्यासाठी); आवळ. (क्रि. घालणे, बसणे, पडणे.) ३. ओढायचा दोर; ओढण्याचे कोणतेही साधन. ४. ओढत नेण्याचा किंवा वर काढण्याचा पदार्थ. ५. ओढण; वजन; ओढण्याची शक्ती. ६. ज्यावरून ओझे ओढत नेतात तो रस्ता, रस्त्यावर त्या वजनाने उमटणारा चर, रेघ, घासर, खरड. ७. अडचणीची परिस्थिती; पैशाची चणचण; सावकारांचा तगादा, निकड, चिमट. ८. अतिशय मेहनतीमुळे व थकण्यामुळे शरीराला येणारा ताठरपणा. ९. नदी किंवा प्रवाह याचा जोर, ताण. १०. सुरमाडाची पोय. जेथे पावसात किंवा ओलीत एखादा बांधकामाचा भाग येत असेल तेथे याचा बांधायच्या दोरीसारखा उपयोग करतात. ११. कल; प्रवृत्ती; गती; झोक; – कडे प्रयत्न. १२. आकर्षण; मोह; पाश; अंगावर घेतलेले काम वगैरेचा जोर (जग, धंदा, कुटुंब याबाबत); ओढणारी शक्ती. (माया, प्रेम, इच्छा, आशा इ.); कळकळ; स्नेह; सहानुभूती. १३. मागे राहणे; जोराचा विरोध करणे; निष्ठुरपणे प्रतिबंध करणे; वेगाने सुटणे; जोराचा प्रवाह; ओघ. (क्रि. घेणे.) १४. जनावर लावून एका वेळी ओढत आणलेला एक किंवा अनेक लाकडांचा समुदाय. १५. वरील लाकडांना बांधायची दोरी. १६. बैलरहाट किंवा तेल्याचा घाणा यांच्या जोखडाला व बैलाच्या मागे जो वेसनेकड असतो त्याला बांधायची दोरी किंवा दांडी; ओढाळा. १७. तहान. १८. मनाची हौस. (वा.) **ओढ असणे** – खेचण्याइतका जोर असणे. **ओढ काढणे**– संकटात दिवस काढणे. **ओढ देणे**– ताणून धरणे; लांबणे : 'पुढे दोन वर्षे पावसाने ओढ दिली.'– व्यंमाक १४७. **ओढ बसणे**– खेचले जाणे; आवळले जाणे; ताण बसणे. **ओढ लागणे** – तळमळ वाटणे; (एखाद्या ठिकाणी) तीव्रतेने जावेसे वाटणे. **ओढी ओढ असणे**– दुःखावर दुःख येणे; संकटावर संकट येणे. **ओढीत ओढ**– (वारणे, करून घेणे इ.) एक संकट भोगत असताना दुसरे वारणे किंवा ओढवून घेणे.

**ओढ** स्त्री. सलग खोली; अरुंद, लांब खोली : 'ओसरीला लागून एक दहा खणांची लांबच लाब ओढ होती.'– आभाळाची सावली ७३.

**ओढक** वि. १. खेचणारा : 'परि ओढोनि ने त्यासि देव ओढक सा ।' – मोभीष्म ४.४२; प्रतिबंध करणारा; मागे मागे येणारा (इष्ट कृत्यात मूर्खपणाने नसते अडथळे आणणारा.) २. (ल.) हट्टी; हेकेखोर.

**ओढकर** पु. लाकूड, दगड वगैरे बाजारात बैलावरून अगर स्वतः ओढत नेऊन त्याच्या मजुरीवर उपजीविका करणारा; गाडीवान.

**ओढकाठी** स्त्री. उसाच्या चरकाच्या (जोखडाच्या दोन भागांना जोडणारा) दांडा. (को.)

**ओढगस्त** वि. अडचणीत अगर बिकट परिस्थितीत असलेला; अडकित्यात सापडलेला; द्रव्याच्या अभावामुळे पेचात आलेला.

स्त्री. पैशाची अडचण; खर्चाची ओढाताण : 'काका ओढगस्तीत दिवस काढताहेत.'– कलंदर १३८.

**ओढगस्तपणा** पु. खर्चाची ओढाताण : 'ओढगस्तपणाच्या दुर्गुणांना तो बळी पडला आहे.'– गांगा १२२.

**ओढग्रस्त, घस्त** पहा : **ओढगस्त** : 'किती निराशा, कसले कसले अपमान, केवढी ओढग्रस्त !'– गणगोत ११२.

**ओढण** न. एक चर्मवाद्य; ड्रम.

**ओढण** न. ढाल. पहाः **ओडण** : 'माझ्या देहाचे ओढण। आड असतां तुम्हा विघ्न । स्वप्नीही परि नाहीं जाण ।'– मुरंशु ९.

**ओढण** स्त्री. १. संपवलेल्या हिशेबाची बाकी पुढील मितीला ओढणे. २. पिढीजात किंवा वर्षानुवर्षे चालत आलेली वहिवाट, पद्धत, मत, चाल, परंपरा, रूढी. ३. जोराचा अडथळा; मागे पाय. (क्रि. घेणे.) ४. बायकांच्या नेसलेल्या लुगड्याचा आतल्या पदराचा जो एक कोन ओढला असता नेसणे घट्ट होते ती गाठ.

**ओढण** न. १. वर खेचण्याचा दोर; ओढणदोर; तंबूच्या तणाव्याचा दोर; कसणे; ढोलाचा ताल वरखाली उतरविण्याची दोरी; गाडीचा दोर. २. प्रयासाने, श्रमाने ओढणे; खेचण्यास पडणारा अतिशय त्रास.

**ओढणगाठ** स्त्री. ओढणाच्या शेवटास दिलेली गाठ.

**ओढणबाकी** स्त्री. (सरकारी वसुलामधील) सालोसाल पुढे ओढलेली बाकी. (अप.) ओडबंकी.

**ओढणशिल्लक** स्त्री. नवीन हिशेबापर्यंत ओढलेली मागची शिल्लक.

**ओढणी** स्त्री. १. स्त्रियाचा डोक्यावरून व खांद्यावरून घेण्याचा जरीच्या कापडाचा अथवा शालीचा किंवा शेल्याचा बुरखा; चादर; पदर. २. लेहंगा किंवा झगा यावरून घ्यायचे वस्त्र. [सं. अवगुंठन]

**ओढणी** स्त्री. स्मरणी माळ, त्या माळेतील एक एक मणी ओढायचा असतो यावरून : 'त्या स्फटिक मण्यांना एकत्र गोवून त्यांची कवीने ओढणी किंवा स्मरणी बनविली होती.'– के २२.१२.१९३९.

**ओढणी** स्त्री. आकर्षण : 'अशी ओढणीही यापूर्वी लागली नव्हती.'– माजूवा ११२.

**ओढणी** स्त्री. १. ओढ; हिसका. २. (बटव्याची वगैरे) ३. (कर.) औताची सर्वांत पुढची जागा. ४. रांगोळ्याचा लोखंडी आकडा.

**ओढणे** अक्रि. १. मागे घेणे; ओढून धरणे; घासाघीस करणे. २. हट्ट धरणे; ठेका धरणे. ३. (भात शिजताना) आकसून जाणे. ४. पेटक्यामुळे (अवयव) आखडणे; आकुंचित होणे ५. एखाद्याचा भाग असणे; एखाद्याच्या खाली येणे, मोडणे; समाविष्ट असणे. ६. मन इ. मोहित होणे, एखाद्याकडे वळणे, जाणे; कल, ओढा असणे. (वा.) **ओढता घेणे**– १. अडवून घेणे; घासाघीस करणे; ताणून धरणे. २. एखाद्या गोष्टीपासून मागे घेणे, सरणे. **ओढता धरणे, ओढून धरणे** – १. अडचणी आणि अडथळे दाखवणे, आणणे. २. (एखादा सौदा किंवा व्यवहार जुळविण्यात) आपल्याच मूळच्या अटीला चिकटून राहणे. **ओढून पाहणे**– आपल्याच अटी खऱ्या, पुऱ्या करण्याबद्दल प्रयत्न

करणे; घासाघीस करणे. **ओढून बोलणे**– लांब हेल काढून बोलणे. **ओढून येणे**– १. (गळवामध्ये पू.) जमणे; मुख धरणे; तोंड पडणे. ३. अकस्मात येणे; ओढवणे (एखादी आपत्ती). ३. एखाद्या आजाराचा जोर होणे, विकोपाला जाणे.

**ओढणे** सक्रि. (नाविक) गलबत पावसाळ्याच्या दिवसाच्या प्रारंभी किनाऱ्यावर ओढून आणून ठेवणे.

**ओढणे** अक्रि. १. खेचणे; सरकविणे; लोटणे; जवळ घेणे, करणे; आपल्याकडे आणणे; ताणणे: 'परि ओढुनि ने त्यासी देव ओढकसा ।'– मोभीष्म ४.४४. २. (शेतजमिनीतील डिखळे फोडून साफ करण्यासाठी दाताळे किंवा गुढे वगैरे जमिनीवर) फिरवणे. ३. (रेषा, ओळी) काढणे; आखणे. ४. ओढ बसणे (फोड, उष्णता, रोग वगैरेपासून डोळा इत्यादी) ५. (दुखणे, आजार, दारिद्य यामुळे शरीर) क्षीण होणे; आक्रसणे : 'अम्मीचा चेहरा खूप ओढला होता.' – वीज ८. ६. (गुडगुडी, सिगारेट, विडी इत्यादीचा) धूर काढणे; अंमल करणे. ७. (स्तन) पिणे; चोखणे. ८. (तपकीर) हुंगणे; सुंगणे. ९. (भाषेची अर्थाकरिता) ओढाताण करणे, वाटेल तो अर्थ बसवणे. १०. लावणे; बंद करणे (दार, खिडकी इ.) ११. (काठी, छडी इ.) मारणे. १२. नेसणे : 'नित्य ओढिती धौत वस्त्रें ।'– मुसभा २४.३७. १३. लांबणीवर पडणे : 'इकडे पर्जन्य ओढला आहे, या उपरि पुनर्वसूचा लागेल तरी राहिले पेरे पेरतील.'– ऐलेसं ४३०९.[सं. वह–वोढ–ओढ] (वा.) **ओढून आणणे** – १. गर्वाने किंवा रागाने ताठून बसणे. २. कां कूं करीत मागे राहणे. **ओढून काढणे**– बाहेर खेचणे; मोठ्या युक्तीने बाहेर काढणे, जबरीने जवळ आणणे, घेणे. **ओढून घेणे**– १. (एखादे संकट अथवा अडचण) स्वतःवर बळेच आणणे. २. आपल्या बाजूचे करणे: 'हीच मुले आपल्याकडे ओढून घ्यावयाची आहेत.'– इंप ४२. ३. (गंजिफा) घेणी घेणाराने राजाबरोबर जे पान टाकले असेल त्यावरील बंद दुसऱ्याजवळ असल्यास त्याने राजाबरोबरचे पान मारून ओढून घेणे. हा ओढून घेण्याचा हक्क घेणी घेणाऱ्याच्या उजव्या हातच्या खेळाडूला असतो. **ओढून टाकणे**– रागाने, दांडगाईने ओढून ढकलणे किंवा झुगारून देणे. (मनुष्य, वस्तू इ.). **ओढून बळकट करणे**– (दोरीची सैल व मोकळी गाठ घट्ट व न सुटेल अशी आवळणे यावरून) फाजील शहाणपणाने स्वतः ला फसविणे; उद्देश बाजूला सारणे; हट्टाने किंवा पड न खाल्ल्यामुळे (अटी, करार, परिस्थिती) अधिक बिकट करून घेणे. **ओढून विकणे**– १. जास्त किंवा अवाच्यासवा किंमतीस विकणे. २. (ल.) स्वतःची योग्यता फार मोठी मानणे; अभिमानाने आत्मप्रतिष्ठा चढविणे.

**ओढत** स्त्री. हलाखीची, ओढगस्त स्थिती.

**ओढतोड** स्त्री. ओढाताण : 'ओढातोडीशीं आम्हांस गरज काय ?'– ओंकार १८९.

**ओढदांडा** पु. वस्तू जोराने खेचण्यासाठी तिला असलेला दांडा.

**ओढदोरा** पु. पिशवीच्या तोंडाची उघडझाप करण्याचा दोरा; कसणी; कशाचा दोरा.

**ओढप** स्त्री. जोराचा ताण; ओढताना लागणारा जोर; शक्ती.

**ओढपट्टी** स्त्री. (विणकाम) कापड गुंडाळायच्या दांड्याला लावलेली अडकवणी; मागाची एक विशेष उपयोगाची खुंटी.

**ओढमाणकी** स्त्री. गाडी भरल्यानंतर वरील वेष्टण आवळण्याकरिता लाकडाचा छिद्रे व कप्पी असलेला एक ठोकळा. त्यातून दोरी दोन्ही बाजूंनी ओढून बांधतात. (वा.) **ओढमाणक्या घेणे**– ताणून धरणे; आढेवेढे घेणे; एखाद्या गोष्टीला संमती देताना पुष्कळ वांधे घालत बसणे.

**ओढव** पु. गायनातील चढता सूर. (क्रि. करणे).

**ओढव** स्त्री. मोटेच्या विहिरीची धाव (उतरती जमीन).

**ओढवण** न. पर्वतावरून निघणाऱ्या ओढ्याचे कोरडे पात्र.

**ओढवण** न. पांघरूण. पहा : **वोढवण**

**ओढवणे** अक्रि. १. आपोआप घडणे; – कडे जोराने वळणे; नाईलाजाने ओघाला येणे; जोराने हलणे, सरणे,येणे; गुदरणे; प्राप्त होणे; झोका बसणे; अकस्मात येणे (देव, मृत्यु, संकट, पीडा, उपाधी इत्यादिसंबंधी योजतात व त्यात प्रेरकत्व, अधीश्वरत्व गर्भित असते. (टीप – देव, प्रारब्ध याअर्थी योजले असता दुःख किंवा संकट असा अर्थ होत नाही. जसे – मूर्ख जरी असला तरी ओढवले म्हणजे ऐश्वर्य भोगायला सापडते). २. (व्यापक) निश्चयपूर्वक, बेत ठरवून अंगावर येणे, कोसळणे (संकटे, साधू, रानटी जनावरे, भिकार अथवा अपरिहार्य अडचणी वगैरे संबंधाने योजतात); भोगाला येणे. ३. वळणे; जाणे; कलणे; प्रवृत्त होणे; (कोणत्याही दिशेकडे) ओढणे; होरा वाहणे (मन, अंतःकरण, चित्त वगैरे संबंधाने योजतात); (रागाने व निंदापूर्वक) आगमन करणे; येणे (आपल्या स्वतःवर संकट इ.).

**ओढवणे** सक्रि. १. (पदार्थ घेण्यासाठी) हात पुढे करणे. [सं. वह]

**ओढवणे** सक्रि. १. आटवून टाकणे; क्षीण करणे. २. स्वाधीन करणे:'शरीर ओढवी पांचाजणा । म्हणवी पवित्र कुलांगणा ।' – मुसभा १५.२२.

**ओढवणे** अक्रि. ओणवे होणे.

**ओढा** पु. १. पहा : **ओढ.** १,२,९,११, १२, (वा.) **ओढा ओढणे** - एखाद्याच्या विषयी प्रीती बाळगणे. २. (दोर, गज) बळकट व स्थिर करणे. ३. दुसऱ्या ठिकाणी लावलेल्या भाताच्या रोपांतून वाळलेल्या पात्या ओढून काढणे; लावणी केल्यानंतर नवी पात फुटू लागते तेव्हा जुनी सुकलेली पात काढून टाकणे. ४. घरगुती कामे; कामाचा रगाडा, ढीग. (क्रि. ओढणे). (वा.) **ओढा ओढणे लागणे** – ओढ निवारावी लागणे किंवा मसलत सांभाळण्याची जबाबदारी पत्करावी लागणे: 'मोठा वोढा श्रीरंगपट्टणकराकडील ठाण्याचा वोढा वोढणे लागला.' – पेद २८.१४५. **ओढ्यात ओढा वारणे** – एक गोष्ट करीत असतानाच दुसरी जरुरीची गोष्ट त्यात उरकणे. ५. खांब व तुळई यांना बळकटीसाठी जोडण्यात येणारे लाकूड. ६. फोड, गळू इत्यादींना ताण बसून ते फुटण्यासाठी लावायचा लेप; सूज इत्यादीवर लावायचे औषध.

**ओढा** पु. १. नारळ, सुपाऱ्या वगैरे एका ठिकाणी जमा करणे. २. पऱ्हा; नाला; हरळा. विशेषतः पावसाचा बरड जमिनीतील वाहणारा लहानसा प्रवाह व त्याचे कोरडे पात्र. ३. खोगिराच्या तंगाची अथवा पठाडीची दोरी. ४. रहाटाला बैल अगर रेडा जोडण्याकरिता बांधलेल्या जोखडाला

मागे दोरांनी बांधून वेसणेकडाला जोडलेला बांबू [सं. अवकर्षक]

**ओढा** पु. राशीतून जेवढा कवेत मावेल तेवढा गठ्ठा ओढून घेण्याचा कुलकर्ण्यांचा हक्क.

**ओढाओढ–ढी** स्त्री. १. चोहोंकडून किंवा जोराची खेचाखेच, ओढ. २. (ल.) सर्व बाजूंनी निकड, तारांबळ, त्रास. ३. पैशासाठी आलेला तगादा. ४. संसारास भासणारी पैशाची टंचाई. [ओढचे व्दि.]

**ओढाखोडा** पु. लहान ओढे अथवा डोंगराच्या घळीतून वाहणारे प्रवाह; या प्रवाहाची सुकलेली पात्रे, घळण, चर वगैरे [ओढाचे व्दि.]

**ओढाण** वि. ओडाळ.

**ओढाताड, ओढाताण** स्त्री. १. जोराची खेचाखेच; सर्व बाजूंनी, इकडून तिकडून ओढणे; वाटेल तसे खेचणे. २. (ल.) मानसिक खळबळ; गोंधळ; (सर्व बाजूंनी कामाचा ताण किंवा उद्दिष्टांमध्ये परस्परविरोध असताना होणारी) तारांबळ, धांदल. ३. घासाघीस; कां कूं करणे; जिकीर.

**ओढामाणकी** स्त्री. बळेच मागे घेणे; नको नको म्हणणे; इच्छा असताना नाही असे ढोंग करणे. (क्रि. धरणे, लावणे, करणे). पहा : **ओढमाणकी**

**ओढावण** स्त्री. वंशपरंपरेने चालत आलेली पद्धती, रीत, वहिवाट; आचार.

**ओढावण, ओढावणे** न. १. एक प्रकारची हातगाडी. २. लाकडाचा ओंडा.

**ओढावण, ओढावणे** न. ओढ्याचे कोरडे पात्र.

**ओढावारा** पु. प्रतिबंध; मर्यादा :'नाही ओढावारा। पडिला प्रसंग तो बरा ।।' – तुगा २०२७.

**ओढाळ** वि. १. अनिर्बंध; उनाड; भटक्या; गोठ्यातून पळून जाणारे; कळपातून निसटून एकटे चरणारे; स्वतःची गव्हाण सोडून शेजारच्या गव्हाणीवर हल्ला करणारे :'नाही त्या यमासी करुणा। बाहेर काढितां कुडी प्राणा। ओढाळ सांपडे जैसे धान्या। घोर यातना धरीजेतो ।।' – तुगा ७०२. २.(ल.) निष्प्रतिबंधक; चंचल; भटके (मन); उनाड; द्वाड; स्वैर (मूल).

**ओढाळकी** स्त्री. स्वैराचार; भटकेपणा; ओढाळपणा.

**ओढाळा** पु. जोखड व वेसनेकड यांच्या टोकाला दोरीने बांधायची दांडी. पहा : **ओढ** १६. (कों.)

**ओढाळी** स्त्री. प्रेम; प्रीती; लघळपणा :'भ्रताराचे भाग्य देखती। लटकीच प्रीति वरिवरिं दाविती। ज्या ओढाळी अत्यंत करिती। भ्रताराशीं वंचनार्थ ।।' – हरि २९.१७. पहा : **ओढाळकी.**

**ओढिस्त** वि. १. अडचणीची; टंचाईची; ओढगस्त (परिस्थिती इ.) २. अडचणीत, पेचात सापडलेला; कावलेला; मट्ट्यास आलेला.

**ओढी** स्त्री. १. सवय; कल :'ओढाळाची ओंगळ ओढी। उगी खोडी नवजाय।' – तुगा ३११९. २. धनुष्याची दोरी; गुण :'वोढोनि धनुष्याची ओढी। त्र्यंबक मोडिलें कडाडी।' – एभा ११.७३५. ३. लळा; माया. (गो.) पहा : **ओढ** ४. हिसका; झेप; आकर्षण. पहा : **ओढ** :'ओढी घेता तडाडी।' – आसी ६५.

**ओढीक** वि. १. ओझे चांगल्या रीतीने ओढणारा; मोट इ. ओढणारा. २. अडकित्यात सापडलेला; अडचणलेला; ओढगस्त; संकटग्रस्त; चारी बाजूंनी कावकाव झालेला; कावलेला. ३. आपले म्हणणे न सोडणारा; तोणून धरणारा (दुकानदार). ४. हळू हळू पैसा सोडणारा; घट्ट मुठीचा; चिकट; कद्रू; कृपण.

**ओढीताडी** क्रिवि. ओढाताण करून; ओढून व मारून :'ओढीताडी पीडियले।' – मुसभा १५.१३३.

**ओढील, ओढीळ** स्त्री. ज्या टोकांनी कमरेभोवती लुगडे आवळतात त्याच्या दोन टोकांपैकी प्रत्येक. पहा : **ओढण** ४.

**ओढून चंद्रबळ** १. (शब्दशः) कोणत्याही शुभकार्याच्या वेळी अवश्य लागणारे लग्नकुंडलीतील चंद्राचे बळ अनुकूल नसताना ओढूनताणून ते अनुकूल करून घेणे. २. मारूनमुटकून बळेच संपादन केलेली गोष्ट (धैर्य, उमेद); नसते अवसान; उसने अवसान. ३. भाषणाची, वाक्यांची ओढाताण करणे; दुरान्वय लावणे. (क्रि. आणणे). ४. आवडणाऱ्या वस्तूविषयी वरवर नावड दाखविण्याचे ढोंग करणे; आग्रहाची आवश्यकता. (क्रि. आणणे) :'ओढून चंद्रबळ नको आणायला.' – मोर ३२. ५. महत्त्वाचा, परिणामाचा उगाच बाऊ दाखविणे. (क्रि. आणणे.) (वा.) **ओढून चंद्रबळाचा** – १. बळेच आणलेला; वर दाखविलेला, धरलेला; कृत्रिम. २. अयोग्य रीतीने हक्क सांगितलेला, दाखविलेला. ३. बळेच ओढाताण, बळजबरी केलेला.

**ओढूनताडून, ओढूनताणून** क्रिवि. १. जोराने खेचून; वेडेवाकडे प्रयत्न करून; काहीतरी जुळवाजुळवी करून. २. काहीतरी करून; कष्टाने; बळेच; मोठ्या मेहनतीने. (वा.) **ओढूनताणून चंद्रबळ आणणे** – पहा : **ओढून चंद्रबळ**

**ओढे** न. १. उट्टे, सूड. (क्रि. काढणे, घेणे, उगवणे.) :'नगर पीडिलें त्याचे ओ(वो)ढें। आज काढीन एकदां।' – मुआदि ३८.८३. २. (व्यापक) वचपा; मोबदला. (क्रि. येणे, काढणे.).

**ओढेखोडे** पु. अडचणी:'आपण राहिले आहेत तेथून मोगलाचे लष्कर तीन साडेतीन कोस लांब आहे. त्यामध्ये ओढेखोढे फारच आहेत.' – पेदमा १.७४.

**ओढ्या** वि. (विनोदाने) पाट किंवा मोहोतूर लावलेल्या बायकोचे पहिल्या नवऱ्यापासून झालेले (मूल); पोटाखालील (मूल).

**ओढ्या, वढ्या** पु. ओढ्याच्या काठावरील गुराख्यांचा देव.

**ओढ्या जगन्नाथ** समुद्रातून ओढून आणलेली जगन्नाथाची मूर्ती. जगन्नाथपुरीला तिची पूजा करतात.

**ओणखुचे** सक्रि. पाठ टेकणे. (गो.)

**ओणत, ओणय** स्त्री. भिंत. (गो.)

**ओणव** स्त्री. शरीर पुढे कलणे; झोक; ओणवी स्थिती.

**ओणवणे, ओणावणे** (ओणव्णे, ओणाव्णे) अक्रि. १. पुढच्या अंगाला कमरेशी खाली वाकणे. २. शरीराच्या दुर्बलतेमुळे अथवा म्हातारपणामुळे पाठीला बाक येणे. [सं. अय किंवा उप+नमन]

**ओणवा** वि. कमरेपाशी शरीर वाकवून उभा राहिलेला; वाकलेला. [सं. अवनत]

**ओणोली, ओणोळी** स्त्री. हनुवटी.(गो.)

**ओत** पु. १. ऊत; कढ वर येणे; ओतास जाणे. २. पूर आलेल्या नदीचा फुटलेला एक प्रवाह, ओघ. (क्रि. फुटणे.) [सं. अवस्तूत]

**ओत** पु. (वस्त्रोद्योग) मागावर विणण्याचे आडवे सूत : 'मी आघवियेची सृष्टी। आदिमध्यातीं किरीटी। ओतप्रोत पटीं। तंतु जेवीं।।' – ज्ञा १०.२६४. [सं. ओतु]

**ओतकाम** न. धातूचा रस साच्यात ओतण्याचे वगैरे काम; धातुशिल्पाचे, टाईप, नाणी इ. बनवण्याचे काम.

**ओतणी** स्त्री. १. उंचावरून भांड्यातील पातळ पदार्थ (भट्टीत, साच्यात) ओतणे; स्राव; लोट. २. वितळलेल्या धातूकरिता केलेला साचा.

**ओतणे** उक्रि. १. एका पात्रातील पाणी, धान्य इ. पदार्थ ते पात्र वाकडे करून दुसऱ्या पात्रात पाडणे किंवा घालणे. २. साच्यात धातूचा पातळ रस ओतून आकार देणे; प्रतिमा तयार करणे : 'मुकुट कुंडलें श्रीमुख शोभतें। सुखाचें ओतले सकळही।' – तुगा २. ३. ऊत येणे. पहा : **उतणे** [सं. अव+स्तरण]

**ओत घेणे** सक्रि. भर घेणे; साहाय्य करणे. (व.)

**ओतन** न. (वितळवलेले धातू किंवा काच) विशिष्ट आकार येण्याकरिता साच्यात ओतणे. [सं. अवतत]

**ओतना** पु. स्त्री. वेळ; खेप : 'यादव होते थोकलें। ऐसाहीं तिनि ओतनें (ओतना) जुंझीनिले।।' – शिव ९७५. २. युद्ध. [क.होत्तु]

**ओतपली** स्त्री. कोवळे ऊन : 'ज्ञानाची ओतपली पडिली।' – ज्ञा ७.१२८.

**ओतप्रोत** क्रिवि. १. (वस्त्रोद्योग) उभे-आडवे (तंतू); बाणा आणि ताणा; लांबीकडून व उंचीकडून; एकमेकांशी काटकोनात असणाऱ्या दिशांना : 'मी आघवियेचि सृष्टी। आदिमध्यांती किरीटी। ओतप्रोत पटीं। तंतु जेवीं।।' – ज्ञा १०.२६४. २. अंतर्बाह्य; सर्वत्र; चोहो बाजूंनी : 'घायाळ कीजे तरटमार। तैसें ओतप्रोत दुःख फार।' – एभा १०.६७५. ३. सढळ; पूर्ण; पुष्कळ; भरपूर; काठोकाठ : 'त्या गोष्टीत करुणरस ओतप्रोत भरला आहे.' – पाव्ह (प्रस्ता.)

**ओतमुद्रा** स्त्री. साच्यातून काढलेली प्रतिमा, पुतळा : 'लेनिन ह्यांची ओतमुद्रा घेतलेली ध्वजा...' – क्रेबु ११६.

**ओतयंत्र** न. साच्यातून हवी ती वस्तू बनवून देणारे यंत्र.

**ओतल** पु. न. पाणी तापविण्यासाठी मातीच्या चुलाणात कायमचे बसविलेले कढई किंवा गंगाळासारखे मोठे पात्र; वतल. (सोलापूर) काही ठिकाणी पाणी भरण्याच्या अथवा तापविण्याच्या रुंद तोंडाच्या भांड्याला किंवा माठालाही म्हणतात.

**ओतले** न. ओतीव मूर्ती : 'मुगुटकुंडलें श्रीमुख शोभलें। सुखाचे ओतलें सकळही।' – तुगा १.४.

**ओतवणी** न. भाकरीचे पीठ नीठ वळता यावे म्हणून त्यात घालायचे आधणाचे पाणी.

**ओतवर** वि. उतावळा; अतिशय उत्सुक; उत्कंठित; भावोत्कट : 'नाना फलीं ओतवरा होतु। श्रीकृष्णभेटी लागीं।।' – दाव १५४. [क. ओत्तु]

**ओतशाळा** स्त्री. १. (सामा.) ओतकामाचा कारखाना. २. टाईप (टंक) ज्या ठिकाणी पाडले जातात ती जागा; टंकशाळा.

**ओताऊ** वि. ओतीव; ओतलेले; तयार केलेले.

**ओताणा** पु. सोनाराचे एक हत्यार; काकता. पहा : **काकणता**

**ओताम** क्रिवि. इतक्यात : 'आन तियाल मारा आं ओताम उंदऱ्यो आख्योव – त्याला मारणार इतक्यात उंदीर म्हणाला.' – भिल्ली १७. (भि.)

**ओतारी** पु. ओतकाम करणारा; धातूचा रस ओतून वस्तू बनविणारा; भांडी घडविणारा; धातूच्या मूर्ती तयार करणारा : 'देव घडिला सोनारी। देव ओ(वो) तिला ओ(वो) तारीं।।' – दास ६.६.२७.

**ओतारी** पु. धातू साच्यात ओतण्याचे काम करणारी व्यक्ती.

**ओतीव** वि. १. ओतून बनविलेले; साचा घालून तयार केलेले; ओताऊ : 'ओतीव हे न घटिताकृती बोलिजेली।' – नल ७३.२. २. (ल.) सुंदर; शुद्ध; अस्सल : 'ओंतीव श्रीमुख सुखाचे सकळ। वामांगी वेल्हाळ रखुमादेवी।' – तुगा ३.

**ओतीव थालीपीठ** भांड्यात फोडणीस टाकलेली पातळसर भाजणी शिजून झालेले थालीपीठ. तव्यावर थापून तयार केलेले नव्हे.

**ओतीव लोखंड** न. बीड.

**ओतू** पु. आडवा धागा. पहा : **ओत** : 'ऋग्वेदातील मंत्रात (६.९.२.) तंतू (उभा धागा). ओतू (आडवा धागा), ही पदे आली असून ती वस्त्रासच लाविली आहेत.' – लोटिकेले ३.४६.

**ओतु** पु. मांजर; बिडाल; मार्जार : 'नकुळ म्हणे व्याघ्रशिरीं विधला हा वामपाद ओतूनीं।' – मोसभा ७.२६. [सं.]

**ओत्सा** वि. १. क्षुद्र; कमीपणाचा; कमी योग्यतेचा; हलका. २.उणा; पाहिजे त्यापेक्षा थोडा; किंमतीत हलका; लहान बांध्याचा. [हिं.ओछा]

**ओथरणे** सक्रि. देणे. [सं. उद्+तृ -तर]

**ओथवळा** पु. मोठा थेंब.

**ओथळा** पु. ठिपकणे; पावसाच्या सरीने झाडांची पाने वगैरे पडतात त्यांचा खच. पहा : **ओथंबा** ४. (को.)

**ओथंब** पु. तटस्थ : 'एथ कव्हणी ओथंबु साक्षि होते?' – श्रीकृच ५२.

**ओथंबणे** अक्रि. १. वाकेपर्यंत लोंबणे (फांदी). २. फळांच्या भाराने खाली वाकणे (फांदी); स्वतःच्या भाराने खाली वाकणे (फळ); खाली लोंबणे (ढग). ३. पासून लोंबणे; झोके घेणे. ४. एखाद्या पातळ पदार्थाने, रसाने वगैरे थबथबणे. ५. (रक्तातिशयामुळे) शरीराचा अवयव अतिशय खाली लोंबणे. (को.) ६. वर चढणे; टेकणे; आश्रय मिळविणे. उक्रि. खाली दाबणे; वाकविणे (तक्ता, फळी, फांदी इ.). [सं. अव किंवा उत् + स्तंभ]

**ओथंबा** पु. १. (झाडाला, वेलीला) आश्रयासाठी लावलेला टेकू, मेढ. २. (ल.) आश्रय; आधार; आश्रयदाता; आधारकर्ता; ठेपा : 'तोहि सर्वसाक्षी ओथंबा।' – निगा २९. ३. शोक; हेलकावा. (क्रि. घेणे). ४. ओथेंबे; पावसाची सर संपल्यावर झाडाच्या पानांवरून पावसाचे पाणी टपटप गळते ते थेंब. (गो.) ५. खाली झुकलेले पोळे: 'दोन्ही ओथंबे तुसते रव रव हालत होते.' – तीर्थमहा १४३.

**ओथिजणे** अक्रि. थिजलेले पातळ होणे : 'अव्यक्तपण थिजले। मग तेंचि विश्वाकारें ओथिजलें' – राज्ञा ९.६५.

**ओथिंवळा, ओथिळा** पहा : **ओथळा** [क. ओत्त.].

**ओद** पु. ऊत; बहर; उत्कर्ष; विपुलता : 'तया ओदा स्फुटती कमोदें अरुवारें : कंदर्प कामकळेची' – मूप्र २२१९.

**ओदन** पु. शिजवलेले तांदूळ; भात. उदा. शाल्योदन, दध्योदन. [सं.]

**ओदर** पु. धूर; वास : 'न लवीं वो कुर्पुरु। सर्वांगीं येतुसें ओदरूं।। ' – शिव ८३२. [सं. उद्+धृ]

**ओदुण** न. गुंडाळी; दुघडी : 'कृष्णजिनाचें ओदुण केले।' – शिव १४२. [सं. द्विगुण]

**ओनामा** १.ॐ नमः सिद्धम् चा संक्षेप किंवा अपभ्रष्ट रूप (ॐ = ब्रह्म). अर्थ – सिद्धास नमस्कार, जिनास नमस्कार. श्रीगणेशाय नमः हा सनातनी वाक्प्रचार. त्यास प्रतिरूप असा हा जैन वाक्प्रचार. २. (ल.) प्रारंभ; पहिला धडा; सुरुवात; मूलतत्त्व : 'संस्थानें वगळून बाकीच्या राहिलेल्या हिंदुस्थानाला डोमिनियन स्टेटस लागू करतो असे कोणी म्हणेल तर त्याला राज्यघटनेचा ओनामाहि कळत नाही, असे म्हणावें लागेल.' – सासं २.४५०.[सं. ॐ नमः] (वा.) **ओनामा नसणे** – प्राथमिक ज्ञान, कमीत कमी माहितीही नसणे : 'ज्यास लढाई म्हणजे काय याचा ओनामसुद्धा ठाऊक नाही....' – केस्व ३३१.

**ओनामासीधं** पहा : **ओनामा** [ॐ नमः सिद्धम्' चा अपभ्रंश.]

**ओनाम्या** वि. १. ओनामा शिकणारा; कोणत्याही विद्येचा नव्यानेच प्रारंभ करणार.२. ओनामा शिकविणारा; पंतोजी. [सं. ॐ नमः]

**ओप** स्त्री. पु. न. १. उजळा; जिल्हई; चकाकी. (क्रि. देणे, घेणे, बसणे). : 'बाळसूर्याची ही ओप। जया पाहतां पारुषे।।' – मुसभा १४.४९. २. मुलामा; वर्ख; गिलिट (अलंकार, दागिने वगैरेंना). (क्रि. देणे, घेणे, बसणे): 'प्रभु मद्देहा, गेहा शोभा दे, कुशल जेविं ओप नगा।' – मोअनु ७.९९. ३. धुणे; निर्मळ करणे; शुभ्रता; निर्मळपणा (कापड धुऊन उन्हात टाकून वर पुनःपुन्हा पाणी शिंपडून खळ घालविणे). (क्रि. देणे, घेणे, बसणे.) : 'दुग्धसमुद्रीं ओपिलें। कीं निर्दोष यश आकारलें। तैसें शुभ्र वस्त्र परिधान केलें। ध्यानीं मिरवलें भक्तांच्या।।' – हरि १.८. ४. सकाळच्या व थंडीच्या दिवसातील मंद सूर्यप्रकाश; कोवळे ऊन; उन्हाचा ताव (या सूर्यप्रकाशात लोक आनंदाने ऊन खात बसतात.); सूर्यस्नान. (क्रि. घेणे, घेत बसणे.). (चि. को.) ५. वाफ; बाष्प. ६. किंचित उष्णता (पदार्थाला देणे); किंचित तापवणे. [क. ओप=तेज] (वा.) **ओप देणे** – सुशोभित करणे; नटविणे; खुलविणे; चकाकी देणे; शोभा आणणे : 'तू मत्स्यवंशी कुळदीपकी रे। न हें तुला देइल ओप कीरें।।' – वामन विराट ६.२९.

**ओपटणे** अक्रि. कृश, अशक्त, किरकोळ होणे; खंगणे; फिकटणे; रोडावणे; वाळणे. (को.)

**ओपणी** स्त्री. झिलई देण्याचे एक हत्यार; सळई.

**ओपणी** स्त्री. विकणे; विक्री. पहा : **ओपणे**

**ओपणी** स्त्री. (वपणे) पेरणे; लावणी टुपणी; लावणी बेणणी : 'शेताची ओपणी असो, मशागत असो ... देवाचा कौल घेतल्याशिवाय तो त्या कार्याला हात घालणार नाही.' – अमागो ४०.

**ओपणी** स्त्री. १. समर्पण; सुपूर्त करणे. २. वधूपिता वरपित्याच्या व वधूमाता वरमातेच्या मांडीवर वधूला बसवतात तो विधी.

**ओपणे** सक्रि. पूर्ण करणे; संपवणे; व्रतादिकांचे उद्यापन करणे.

**ओपणे** उक्रि. १. एखाद्याच्या हवाली करणे, हाती देणे; सोपविणे : 'नृपें तयाच्या करी ओपिला निज कन्येचा कर।' – विक ३७. २. (सामा.) देणे; अर्पण करणे; नजर करणे; वाढणे; घालणे : 'जें जयासी पाहिजे अन्न। तें तें तयांसी ओपित।' – हरि २४.५८. ३. विकणे; विकत घेणे. [क. ओपितु] [सं. अर्पण] (वा.) **ओपून घेणे** – कबूल करून घेणे.

**ओपणे** न. देणगी; लाभ : 'घेवोनि जाय ओपणे धर्ममोक्षाचें।' – भाए ७५३.

**ओपणे** अक्रि. १. निर्मल, शुभ्र, स्वच्छ करणे; धुणे : 'दुग्धसमुद्रीं ओपिलें। कीं निर्दोष यश आकारलें। तैसे शुभ्र वस्त्र परिधान केलें। ध्यानी मिरवलें भक्तांच्या।।' – हरि १.८. पहा : **ओप** ३. २. वाळत घालणे; ऊन देणे.

**ओपते** न. धुण्यासाठी भिजवून ठेवलेले कापड, वस्त्र.(को.)

**ओपनर** पु. बाटलीचे बूच किंवा डब्याचे झाकण उघडण्यासाठी वापरायचे साधन :'.... वेटरला प्रथम ओपनर आणायला सांगितला. बाटलीचं बूच मी काढून टाकलं.' – आर्फियस २०. [इं.]

**ओपल** न. १. (भूशा.) सिलिका खनिजगटातील एक खनिज. सजल सिलिका. ह्याच्या काही जातींच्या पृष्ठभागावर विविध रंगछटा दिसतात. म्हणून त्या जाती किंमती खडे म्हणून विकल्या जातात. रेडिओलारिआ डायटम्स इ. सजीवांवरील कवच ह्याच खनिजाचे असते. २. पांढरट निळा मौल्यवान खडा. पहा : **शिवधातू** [इं.]

**ओपला** स्त्री. तलवारीच्या धारेचा एक प्रकार. (वा.) **ओपेला येणे** – (जनावर) वाफेला येणे; संभोगाची इच्छा उत्पन्न होणे.(कर.)

**ओपवणी** स्त्री. ओप, झिलई, चकाकी, मुलामा देणे; वस्त्रावर केलेली ओपण्याची क्रिया (ते पांढरे शुभ्र करण्यासाठी).

**ओपविणे** सक्रि. १. निर्मळ करणे; उन्हात वाळविणे; शुभ्र करणे. २. झिलई, मुलामा देणे. ३. उजळ करणे; लखलखीत, चकचकीत करणे.

**ओपसर, ओपसरा** (ओपसर्) पु. १. रत्नाच्या खाली, त्याचे तेज वाढविण्यासाठी दिलेला चकाकीत वर्खाचा तुकडा किंवा पूट.२. झिलई; उजळा; चकाकी. (क्रि. देणे.) [क. सीरे=कापड].

**ओपसळई** स्त्री. धातूंना झिलई, चकाकी देण्याची गारेची किंवा शिंपेची कांडी अथवा कवडी; ओपणी. या गारेच्या सळईला एका बाजूला निमुळते टोक असते आणि दुसऱ्या बाजूला दांडी असते. २. कोंदण; रत्नाखाली बसवलेला वर्खाचा तुकडा : 'ओपसळईचे बळ। घेउनि मिरवे कीळ.' – अमृ १३७.

**ओपळी, ओपाळी** स्त्री. हिवाळ्यातील सौम्य ऊन; उन्हाची तिरीप; प्रातःकाळचे कोवळ ऊन. पहा : **ओप** ४ (क्रि घेणे, बसणे.) (वा.) **ओपळीस बसणे** – प्रातःकाळचे कोवळ ऊन खायला बसणे.

**ओपा** पु. तेज; तजेला; झिलई. पहा : **ओप** : 'छत्रचामरें ढळती ज्यावर कनक ओपा ओपती.' – प्रला ११७.

**ओपाडा** पु. खाचर; लहान शेत : 'ती भाताच्या ओपाड्यात हुती.' – रैत १४२.

**ओपार** स्त्री. तिखटमिठाचा सांजा; उपमा. (गो.) [क. उप्पु = मीठ]

**ओपारा, ओपरेकरी** पहा : **ओवांडा, ओवांडेकरी**

**ओपावणे** अक्रि. टाचा उंच करून पायाच्या चवड्यावर उभे राहणे. (राजा.) [सं. उत् + पद्]

**ओपावणे** सक्रि. खालचा आधार सुटून वर तरंगणे (पाण्यात पाय, जमिनीतील लावणीची रोपे). [सं. उत्+प्लवन्]

**ओपासिरा** पहा : **ओपसर** :'उपाधिचा दुसरा। घालितां ओपासिरा।' – राज्ञा १५.७६.

**ओपियम** स्त्री. अफूच्या कच्च्या बोंडावर उभा छेद घेऊन काढलेला चीक. हा गुंगी आणणारा तसाच औषधीही आहे. [इं.]

**ओपीव** वि. ओप देऊन पांढरे स्वच्छ केलेले (वस्त्र).

**ओफट** वि. रोगामुळे किंवा काळजीमुळे निस्तेज झालेले (मुख, शरीर किंवा माणूस).

**ओफटणे** अक्रि. पांढरे, फिके पडणे. पहा : **उफटणे**

**ओफणे** न. १.भूतबाधेचा झटका. २. रागाची लहर (क्रि. येणे, चढणे, जाणे, उतरणे).

**ओफरे** न. १. भूत; पिशाच्च इत्यादींचे अंगात येणारे वारे; फेफरे; चाळे; वेडेचार; झटका; भूतबाधा. (प्रां.) २. (ल.) मनाचा उच्छृंखलपणा; रागाचा झटका.

**ओफाडा** पु. भाजी लावण्यासाठी केलेले खाचर; १०–१५ रोपे लावतात ती वाडी व १०–१५ वाड्यांचा ओफाडा; वाफरे; लहान शेत.(को.)

**ओबक** पु. ओकारी; ओकारीमधील आवाज; ओकांबा. (क्रि. करणे, होणे.) [ध्व.]

**ओबड** वि. वेडावाकडा; खडबडीत :'रचनेने ढोबळ, ओबड .. अशी वास्तू म्हणजे ... ' – शसौ ८०.

**ओबडधोबड** वि. वेडेवाकडे; प्रमाणरहित; रांगडा; खडबडीत; खरखरीत; बेढब. पहा : आबडधोबड :'ओबडधोबड बायकोला कसली भीती नाही.' – मोर १९. [सं. उद्भट]

**ओबरट** वि. (प्रां.) खडबडीत; जाडेभरडे (कापड, सूत वगैरे).

**ओबळणे** (ओबळ्णे) सक्रि. नुसते पाण्यात खळबळणे; साधारण धुऊन वाळत टाकणे. पहा : **ओंबळणे**

**ओब्जाडणे** सक्रि. लाथांनी बडवणे; मारून जेरीला आणणे.

**ओभाण–णे** न. पाणलोट; पूर; वेग :'जेथ प्रपंचाचीं वळणें। कर्मा अकर्माची ओभाणें।' – राज्ञा ७.७१.

**ओभावणे** सक्रि. नाहीसे करणे. पहा : **उभविणे** :'ओभाणी वो मधुकरु। विसारीं वो चकोरू। ' – शिव ८३९.

**ओम्, ॐ** (ओम्) अ = विष्णू, उ = शिव, म = ब्रम्हा. ह्याप्रमाणे तिन्ही देवांचे वास्तव्य या शब्दात आहे. १. वेद, पुराण, पोथी, स्तोत्र इ. म्हणण्यापूर्वी व संपवल्यानंतर उच्चारला जाणारा पवित्र शब्द; प्रार्थनेच्या वेळी प्रारंभी उच्चारायचा शब्द. जसे:– ओम् नमोजी गणनायका।, ओम् श्रीरामरक्षास्तोत्रमंत्रस्य। २. आरंभ; उपक्रम. ३. प्रणवब्रह्म; शब्दब्रह्म; एकाक्षर ब्रह्म :'ॐ नमोजी आद्या।' –ज्ञा १.१. ४. वैदिक काळी (मांडुक्य उपनिषदात) अ = वैश्वानर, उ = तेजस, म = प्राज्ञ, आम् = अतर्क्य, अवाच्य व ज्यामध्ये सर्व जगाचा समावेश होतो असा अर्थ होता. ओम् हे अक्षर प्रथम उपनिषदात आढळते.

**ओम्पुण्या, ओमपुण्याहम्** १. मी प्रणवरूप, पुण्यस्वरूप आहे अशा अर्थाचा मंत्र. एखाद्या मंगल संस्कारापूर्वी स्वस्तिवाचन नावाचे कर्म केले जाते. त्यामध्ये यजमानाला ब्राम्हण 'ओं पुण्याहं' असा आशीर्वाद देत असतात :'चिरब्रह्मेसि लग्न लाविशी। ओं पुण्येसी तत्त्वतां।' – एभा ८.१. २. लग्नमंत्राचा आरंभ; पुण्याहवाचनाच्या वेळी म्हणण्यात येणारे मंत्र: 'ॐ पुण्याहं म्हणोनियां जाण। लाविलें उभयतांचें लग्न।' – जै ५६.२०.

**ओम् भवति** बाई भिक्षा वाढा (भिक्षां देहि) असा भिक्षा मागताना म्हणायचा मंत्र. (ल.) भिक्षा (मागणे); भिक्षाटन. (वा.) **ओम् भवति करणे** – ('ॐ भवति भिक्षां देहि।' या मुंजीतल्या प्रयोगावरून) भिक्षा मागणे.

**ओम् भवति पक्ष** पु. १. भिक्षावृत्ती; भीक मागण्याचा पेशा :'ब्राम्हणाची मुख्य दीक्षा। मागितली पाहिजे भिक्षा। ओं(वो) भवति या पक्षा। रक्षिलें पाहिजे।।' – दास १४.२.१. २.(ल. उप.) अर्ज विनंत्या करून (स्वराज्य) मागणाऱ्याचा एक पक्ष; मवाळ पक्ष.

**ओम** स्त्री. प्रकाशाची पूर्वप्रभा; तेज. (व.) (वा.) **ओम जिंकणे** – पाणी जोखणे; सामर्थ्य ओळखणे.

**ओमण, ओमणे** न. घराच्या छपरावर आडव्या रचलेल्या कारव्या : 'पारिजातकाच्या काठ्यांनी घराची ओमणे करून ....' – भाप्र १०८. पहा : **ओंबण, ओंबणे, ओंबळणे**

**ओममापी** पु. (भौ.) विद्युतप्रवाहरोध मोजण्याचे साधन.

**ओमळणे** पहा : **ओंबणे, ओंबळणे**

**ओमेगा** पु. ग्रीक मुळाक्षरातील शेवटचे अक्षर, चिन्ह.

**ओमेरा** पु. मुलींचा एक खेळ (मुलांच्या हुतूतू सारखा). शिवायला जाणाऱ्या मुलींनी; 'ओ मेरा। चक्री भोरा। भो – भोरा। भो– भोरा ।' असे म्हणायचे. [ध्व.]

**ओय** उद्गा. कळ उठली किंवा काही दुःख झाले असताना एकदम उच्चारला जाणारा शब्द; दुःखोद्गार. दुःसह वेदना झाली असताना हा उद्गार निघतो. [ध्व.]

**ओय** स्त्री. १. रेघ; ओळ :'लक्ष्मण देरा रथ हानजी ओईन.' – जसा३२१. २. वळणे लावणे.

**ओयरा** पु. १. स्वयंपाकघर. पहा : **ओवरा** (को.) २. (काही प्रांतांत) माजघर.

**ओयरा** पु. १. वैरा; एका दिवसाच्या स्वयंपाकासाठी डाळ, तांदूळ इ. काढून ठेवलेला शिधा. २. ह्या शिध्यापैकी (बायकांनी) संचय म्हणून काढून ठेवलेला भाग. [सं. अव्यवहार]

**ओयल** वि. रागीट. (गो.)

**ओर** पहा : **ओरी, ओवरी**

**ओर** पु. (पाण्याचा) पूर; लोंढा. पहा : **औंर**

**ओरक, ओर्क, ओरग** न. बाजाची पेटी; हार्मोनियम. [इं. ऑर्गन]

**ओरकरा,ओरकल** पु. स्त्री. न. सोन्याचा कस लावण्याची कसोटी (चौकटीत बसवलेली); कसोटीचा दगड; निकष. [क. ओरेकल]

**ओरखडणे, ओरखाडणे** उक्रि. १. चीर पाडणे; रेघ ओढणे; पृष्ठभाग

किंचित दुखवणे; ओरबडणे; ओरखाडा काढणे; ओचकारणे. २. (ल.) जमीन वरवर नांगरणे. ३. वेडेवाकडे, आडवेतिडवे लिहिणे, रेघोट्या मारणे; खरडणे; तासणे.

अक्रि. अपक्व ज्ञान असणे; शास्त्रादिकांचा वरवर अभ्यास करणे.

**ओरखडा, ओरखाडा** पु. चीर (शरीरावर नख, काटा इत्यादिकांनी पाडलेली); जोराने ओढल्यावर पडणारी चीर, रेघ, ओचकारा; बोचकारा. [सं. आ+रेखा]

**ओरट, ओरड** पु. भाजल्या जाणाऱ्या, गरम तेलात टाकलेल्या मिरच्यांचा वास; खकाणा; मिरच्या दळताना येणारा दु:सह वास, त्याचे नाकातोंडात जाणारे बारीक कण; विझणारी मेणबत्ती इत्यादींचा तीव्र, असह्य वास. [क. रुटु=दु:सह होणे]

**ओरटघाण, ओरडघाण, ओरटाण, ओरडाण**(ओरटघाण्, ओरडघाण्) स्त्री. सहन न होणारी घाण; उग्र वास; दुर्गंधी.

**ओरड** स्त्री. १. आक्रोश; गलका; गलबला. पहा : **अरड**. २. असंतुष्टपणा बोलून दाखवणे; तक्रार : 'हिंदुस्थानातील इंग्रज राज्यकर्ते यांच्याजवळ ओरड करून काही एक मिळायचे नाहीं.' – लोटिकेले १.२५७. ३. भिऊन, चिडून, इतरांचे लक्ष वेधावे म्हणून मोठ्याने केलेला आवाज; अनेकांनी एकदम केलेला आवाज; गिल्ला; बोभाटा; वेदनेने किंवा दु:खाने किंचाळणे.

**ओरडणे** अक्रि. आरडणे; रडणे; आक्रोश करणे; हंबरडा फोडणे.

**ओरडा** पु. गलका; ओरड.

**ओरडाआरडा** पु. मोठ्याने ओरडणे; सर्वांनी मिळून केलेला आक्रोश.

**ओरडाओरड** स्त्री. एकदम ओरडणे; जोराने ओरडणे; कल्लोळ.

**ओरडी** स्त्री. ओवरी; खोली : 'मुलगा तोफान करितो म्हणून त्याच्या आईने त्यास मारलें आणि त्यास ओरडीत पुरून ठेवून बाहेरच्या बारण्यास सांकळ दिली.' – मौज २.६.३०. [गुज.]

**ओरडेल** न. घाणेरडे तेल; तळणातील शिल्लक राहिलेले तेल.

**ओरण, ओरणे** पहा : **वैरण, वैरणे**

**ओरप** पु. स्त्री. १. (केसांतील उवा मारण्यासाठी) केसांतून फणी जोराने ओढणे, विंचरणे. (क्रि. करणे, घालणे.) २. (सामा.) ओरपणे या अर्थी प्रयोग; जोराने ओढणे, खेचणे. ३. नागवणूक; लूट; लुबाडणी. (क्रि. घेणे, करणे). ४. ओरपण्यामुळे मिळालेली गोष्ट; लूट; लुबाडलेले द्रव्य. (क्रि. काढणे.)

**ओरपणे** उक्रि. १. जोराने भुरका मारणे; भुरक्याचा आवाज काढून खाणे. २. (डहाळीची पाने फुले इ.) ओरबाडणे; (जटा झालेल्या केसांतून, दोऱ्यांतून इ.) जोराने बोटे ओढणे; (शेत जमीन) वर वर नांगरणे; त्यातील गवत, झुडपे, कुंदा इ. काढणे. ३. (दुखवलेल्या भागावर डागण्यासाठी) तापविलेली लोखंडाची सळई जलदीने ओढणे; पावसाळ्यात दिवसभर गारठ्यात राहिल्यामुळे पायास होणारी सर्दी घालविण्यासाठी तळव्यावर ओला कपडा ठेवून अगर ताक लावून वरून तापविलेली लाल लोखंडाची सळई वगैरे फिरविणे. ४. जोराने ओबडधोबड रीतीने बोचकारणे; खाजवणे. ५. (ल.) लुटणे; नाश करणे; बुचाडणे; नागवणे. [सं. ओरफ= ओरखडा]

**ओरपा** पु. दरवडा; धाड : 'गावीं ओरपें दरडें पडों लागले.' – गोप्र ३९.

**ओरपे, ओरपेकार** पु. लुटारू; दरोडेखोर : 'आले आले ओरपेकार.' – लीचपू ३४३.

**ओरफडणे** पहा : **ओरपणे** २, ३, ४.

**ओरफुल** न. गिलीट; मुलामा. (गो.)

**ओरबडणे, ओरबाडणे** सक्रि. १. (झाडाची पानेफुले इ.) वाटेल तशी खेचून तोडणे. २. नखांनी ओरखडे काढणे. ३.(ल.) धसमुसळेपणाने, दांडगाईने वस्तू इ. हस्तगत करणे.

**ओरबडा, ओरबाडा** पु. ओचकारा. पहा : **ओरखडा**

**ओरबार** पु. खटपट : 'म्हणौनि स्वप्निचिया ओरबारा' – राज्ञा ८.३४.

**ओरय** स्त्री. एक डोंगरी धान्य; वरी. (गो.).

**ओरवा** पु. १. पाण्यात जहाज (काही दिवसांकरिता) नांगरणे : 'जेथें ओरवा करावयाचा तेथे आले म्हणजे नांगर खाली सोडतात.' – मराठी २ रे पुस्तक ४.६१. २. (जहाज) नांगरून केलेला मुक्काम : 'मार्गात दोन तीन ठिकाणी ओरवा करावा लागला.' – अरु ४९.३. ३. (जहाज) नांगरण्याची जागा; गलबताच्या मुक्कामाला सोयीचे ठिकाण.

**ओरस** पु. उपरम; ओसर; ओहोटी : 'तेव्हा पंचतत्त्वांचा नाश । दश प्राणांचा ओरस । होवोनि राहे येक अंश । सर्वात्मपणे ।।' – कथा ७.२.४२. [सं. अव+सृ]

**ओरस** पु. १. उत्साहाची परमावधी; अत्यानंद :'तैसा भरला ओरसु । करितां मठ प्रवेशु ।' – ऋ ६१. २. स्नेहोत्कर्ष; प्रेमाचा उद्रेक; (गाई इ.चा) पान्हा फुटणे : 'गोवर्धनी ज्या गाई चरती । त्या ओरसा येऊनि वत्से चाटिती ।' – हरि १०.२६७. (क्रि. येणे). [सं. अव+रस]

**ओरसणे** अक्रि. पान्हा फुटणे. पहा : **वोरसणे**

**ओरळी** स्त्री. बांध; वरूळी : 'जेयां कस्तुरिअेंची बुडवती । कापुराची ओरळी भवंती ।।' – शिव ३०८. पहा : **ओरंबा** [क. ओर=काठ]

**ओरंगणे** उक्रि. १. विटणे; नासणे. पहा : **वोरंगणे** २. कपडा इत्यादींचा रंग विटणे. [सं. अव+रंग]

**ओरंगळ** स्त्री. वरंघळ; उतार. [क. वार=उतार]

**ओरंट** पु. आचका; पेटका; कळ; चमक.

**ओरंडी** स्त्री. गोट; काठ; कठडा; कठड्याची भिंत. पहा : **वरवंडी** [क. ओर=काठ; शेवट]

**ओरंबा** पु. मातीचा ढीग; (बागेला घातलेला) मातीचा वरंबा, धक्का, वरवडी. (क्रि. घालणे). [क. ओर=कंठ, कड]

**ओरा** पहा : **ओयरा**

**ओरा** पु. विशिष्ट मिठाई; लहानसा गोड लाडू : 'पाण्यास लागलेला साखरेचा ओरा (म्हणजे लाडू) जसा पाणी शोषून घेतो .....' – मराठी ६वे पुस्तक, पृ. २२७. (१८७५). [हिं. ओला]

**ओरा** पु. १. ओहरा. २. शेतामध्ये नांगरण्याच्या सोयीसाठी पाडलेले जमिनीचे मोठे तुकडे. (को.) ३. नांगराची एक रेघ अथवा थोड्याशा रेघा (तास). ३. अशा प्रकारे नांगरलेला शेताचा अंडाकृती भाग. पहा : **आरा**

**ओरी** १. पहा : **ओवरी**. २. पहा : **ओरय**

**ओरंगउटंग, ओरँगोटँग** पु. शेपूट नसलेला लांब हाताचा एक वानर. हा मलाया, बोर्निओ, सुमात्रा इ. देशांत आढळतो.

**ओल** स्त्री. १. कापडाचा तुकडा (एकेरी पन्ह्याचे ५-७ हात लांबीचे उपरणे, पलंगपोस) २. ख्रिश्चन बायांची ओढणी. (गो.)

**ओल** स्त्री. १. भिजलेली स्थिती; ओलावा; दलदल; आर्द्रता :'दानव रुधिराचिया ओला ।' - शिव २. २. (ल.) वाच्यता; सुलभपणा (काम करण्यास जागा, सवड) उदा. तेथे काही ओल आहे = आशा करण्यास जागा, अनुकूल स्थिती, साधन, सोयी आहेत. ३. दयाळूपणा; दयार्द्रता :'भीतरि नाही प्रेमाची ओ(ल)ळ । तया केवि वोलवती वियोगिचे बोल ।' - ऋ ९९. [सं. आर्द्र] (वा.)**ओल धरणे** - जमिनीत पडलेल्या पावसाच्या पाण्याची वाफ होण्यापूर्वी जमीन नांगरणे. **ओलीला ओल मिळणे** - जमिनीत ओलावा वाळून गेला नाही तो पुन्हा पाऊस पडणे.

**ओल** स्त्री. मुलांचा एक खेळ. चार, पाच मुले एकत्र बसून उभी पोकळ मूठ करतात, एक मुलगा आपल्या हातातील खडा कोणातरी एकाच्या मुठीत टाकतो व मग ओल की पोल असे डाव आलेल्या मुलाला विचारतो व त्याने ज्याच्या हातात खडा असेल त्याचा तो हात धरल्यास त्याची हार जाऊन ती खडा धरणाऱ्यावर येते.

**ओल** स्त्री. हमीदाखल ठेवलेली वस्तू (गुरे, माणसे इ.); तारण; तहाच्या अटी पाळाव्या म्हणून शत्रूकडून खातरजमेसाठी मनुष्य, गुरे, द्रव्य इ. मागून घेऊन अटी पूर्ण होईपर्यंत ताब्यात ठेवणे :'कोट किल्ले दिले ओलिला त्रिंबकजीसाठी ।' - ऐपो ३८३. [क. ओलु = तारण]

**ओल** स्त्री. आधार :'सांवळिये तेजीं भक्तिपथु ओल.' - ज्ञागा ९६.

**ओलगणे** सक्रि. सेवा करणे; आधार घेणे; भेटणे; मिळणे; प्राप्त होणे :'भगतिभावें ओलगतां:केवि वर्णावीं सायुज्येता.' - वछा १६९. [क. ओलम]

**ओलट** वि. दमट; भिजलेले; सर्द; ओलसर.

**ओलट** स्त्री. ओले जळण, सरपण.

**ओलटा** पु. होलटा; हिरवी फांदी; ओल्या लाकडाचा बारीक तुकडा; दांडके; दंडुका (हा फळ पाडताना वापरतात). (को.)

**ओलणि, ओलणी** स्त्री. १. चिकसा; अंगाला लावण्याचे उटणे :'ओलणी तेल चीकसा आणिला.' - लीचपू ११५. २. पडदणी :'श्रीचरण प्रक्षाळीति :ओलणि देति.' - लीचपू २८.

**ओलणे** अक्रि. १. द्रव पावणे; ओले होणे. २. सक्रि. पाणी घालून ठेवणे:'गारी ओलुनि ठेविली होती.' - लीचउ ८८.

**ओलपटणे** उक्रि. ओलटा किंवा अशीच वस्तू (फळे वगैरे पाडण्यासाठी) फेकणे अथवा फेकून मारणे.(को.)

**ओलपटणे ओलपटा** न. होलटा. पहा : **ओलटा** (को.)

**ओलपाटा** पु. (सामा.) काठी; लहान लाकूड; लाकडाचा तुकडा.

**ओलकट** स्त्री. १. ओलट; ओली जागा; किंचित ओलसर असलेली जमीन. २. ओले लाकूड.(कु.)

**ओलवण** न. १. ओला करण्याचे साधन; (भात, भाकरी इ. कोरडे अन्न खाताना) तोंडाला ओलावा आणण्यासाठी खावे लागणारे ओले पदार्थ. जसे:- दही, दूध, ताक, पाणी (माती अगर कणीक भिजविण्यासाठी). २. पाण्याचा शिडकाव; गहू, वरी वगैरेंना लावण्याचे थोडे पाणी. ३. ओलेते; लवकर किंवा थोड्या पाण्यात स्नान होण्यासाठी आड लावून घ्यायचे, नेसायचे लहान ओले वस्त्र. ४. ओला चारा; ओले गवत (विशेषतः उन्हाळ्यातले) [सं. आर्द्रयण]

**ओलवणी** स्त्री. १. पहा : **ओलवण** २. हिरवळ जमिनी; चराऊ रान; वाळवंटातील हिरवळीचा प्रदेश.(राजा.)

**ओलवणे, ओलविणे** सक्रि. १. पीठ इ. पदार्थ दुधाने अथवा पाण्याने भिजवणे; (गव्हास) पाणी लावून ते ओले झाल्यावर एखाद्या जाड फडक्यात घट्ट बांधून सुमारे बारा तास दडपून ठेवणे. (माण.) २. (स्नानाच्या वेळी) नेसलेले वस्त्र भिजवणे किंवा भिजविण्यासाठी दुसरे वस्त्र वापरणे. ३. (शेताला) ओल, पाणी देणे :'मग पुण्यकाळी ओलवले.' - ज्ञागा २१३.

**ओलवत** स्त्री. दलदलीतील मधून मधून आढळणारी हिरवळ; भाजीपाला; झाडेझुडपे; ओलवण.(को.)

**ओलवाहू** वि. पाणी मिळणारी जमीन; बागाईत; ओलावा धरणारी जमीन;. अशा जमिनीतील पीक. कोरडवाहूच्या उलट.

**ओलसर** वि. थोडासा ओला; दमट; भिजट; सर्द.
स्त्री. ओलावा; दमटपणा. [सं. आर्द्र+सदृश]

**ओलंगर, ओलंगार** पु. झिरप; पाझर; हळू हळू (पाणी द्रव इ.) वाहणे, ठिपकणे.(प्रां.)

**ओलंडणी** पहा : **ओलांडिणी**

**ओलंडणे, ओलांडणे** सक्रि. उलंडणे (उलटा होणे) या अर्थी चुकीने योजतात. पहा : ओलांडणे.

**ओलंडा** पहा : **ओलांडा**

**ओला** वि. १. भिजलेला; न वाळलेला. कोरडा याच्या उलट. २. ताजा; हिरवा; न सुकलेला; ३. भरभक्कम; भरगच्च; पुष्कळ दळ, गर असलेले; रसाळ; रसभरित. ४. (ल.) फलदायक; लाभदायक; किफायतशीर; उत्पादक. ५.(ल.) पैसेवाला; मालमत्ता असलेला. (वा.) **ओले कोरडे पाहणे** - (खाण्यामध्ये) चव घेत, चाखतमाखत बसणे; चोखंदळपणा करणे. **ओले जाळणे** - १. हिरवे, कच्चे (जिवंत) जाळणे. २. (ल.) फार जुलूम करणे; निरपराधी, निर्दोष व्यक्तींचा छळ करणे.

**ओला इसप-ब** सारखे पाणी गळते असा इसप; त्वचारोगाचा एक प्रकार.

**ओलाकचकचीत** वि. अतिशय भिजलेला; ओलाचिंब.

**ओला गोळा** (ल.) मठ्ठ; मद्दड; फार कच्चा. अडाणी.

**ओलाचा** वि. पाटाच्या किंवा पावसाच्या पाण्याखेरीज केवळ जमिनीतील ओलीमुळे उगवलेला, लावलेला (ऊस इ.)

**ओलाचिंब** वि. अतिशय ओला; थबथबणारा.

**ओलाणी** स्त्री. वस्त्रे वाळविण्यासाठी, ठेवण्यासाठी बांधलेली दोरी. [सं. अवलंबिनी]

**ओलाणी, ओलाणे** स्त्री. न. लामणदिव्याची साखळी; दिव्याची साखळी. [म. अवलंबिनी]

**ओलाणी, ओलाणे** स्त्री. न. स्नानाच्या वेळी भिजविण्याकरिता घेतलेले वस्त्र, ओलेते; पडदणी. [सं. आर्द्रयण]

**ओलादंड** पु. १. पाण्याचा सतत वाहणारा पाट. २. (ल.) सतत, वर्षभर असणारा बाग; आगर.

**ओला दुकाळ–दुष्काळ** पु. अतिशय पावसाने पिकाची हानी झाल्यामुळे पडलेला दुष्काळ.

**ओलादेठ** पु. हिरवे नाजूक रोपटे किंवा दांडा; ताजे कोवळे गवत; एखाद्या धान्याचे पीक.

**ओला नायटा** पु. वाहणारा व चरत जाणारा नायटा; गजकर्ण.

**ओला मसाला** पु. रोज तयार करायचा ताजा मसाला. विशेषत: मांसान्नात वापरतात.

**ओलावणी** स्त्री. १. भिजवणे; पाणी शिंपडणे; ओले करणे. २. (ल.) शांती; थंडावा.

**ओलावा** पु. १. ओल; ओलसरपणा; आर्द्रता : 'जीवनाचा झाला ओलावा अंतरी । विश्व विश्वंभरी मावळले ।' – तुगा ४०५५. २. (ल.) किफायत; लाभ; नफा. ३. फायद्याचा, यशाचा संभव, शक्यता; आशादायित्व; आशेला जागा. उदा. धनाचा अथवा पैक्याचा ओलावा. ४. अंत:करणात असलेली सदयता, दयार्द्रता, कनवाळूपणा, जिव्हाळा : 'स्नेहाचा निजचित्ती लेशहि येवू न देचि ओलावा ।' – मोआदि ५.१०५. ५. अप्रकट द्रव्यांश, तत्त्वांश, तत्त्व, सत्त्व. उदा. बुद्धीचा, शहाणपणाचा ओलावा. ६. आधार : 'मीचि गा पांडवा । एया त्रिभुवनासी ओलावा.' – ज्ञा ६.२९७.

**ओलाव्याचा** वि. १. भिजट; दमट; सर्द; ओलसर. २. भरीव, फायदेशीर इ. अर्थी. पहा : **ओला** ३, ४, ५. उदा. ओलाव्याचा व्यवहार, व्यापार, धंदा, रोजगार, चाकरी; ओलाव्याची ममता, प्रीती, मैत्री, बोलणे. याच्या उलट कोरडा.

**ओलासा** पु. पहा : **ओलावा;** ओलीचा आश्रय.
वि. ओलीचा आसरा असलेले; आर्द्रतायुक्त.

**ओलांडणी** स्त्री. उतरण; उल्लंघन; पलीकडे जाणे.

**ओलांडणी** स्त्री. रस्ता ओलांडण्याची जागा दाखविण्यासाठी पट्ट्या मारून केलेली व्यवस्था. रस्ता ओलांडण्याची ठरावीक जागा.

**ओलांडणे** उक्रि. १. स्पर्श न करता (मध्ये आलेल्या वस्तू) वरून पलीकडे जाणे, पलीकडे पाय टाकणे; उल्लंघन करणे. २. नदी वगैरे उतरणे, पार जाणे. ३. देश उल्लंघून जाणे; पादाक्रांत करणे; मधून जाणे. [सं. उल्लंघन]

**ओलांडा** पु. १. गळू; करट. २. केसतूड झालेल्या माणसाने, ती जावी म्हणून सात गाठी मारलेल्या एका पिवळ्या चिंधीत सात बिब्बे, हळकुंड, तांदूळ घालून रस्त्यात फेकायची पुरचुंडी. ३. ही चिंधी ओलांडली असताना होणारा रोग, विशेषत: उपदंशादी रोग. ओलांडा ओलांडण्याने अथवा उपदंश झालेल्या रोग्याने जेथे लघुशंका केली असेल तेथे दुसऱ्याने लघुशंका केली असता त्याला तो रोग चिकटतो, अशी समजूत आहे. (क्रि. बाधणे) ४. रस्त्याच्या मधोमध येणारा खड्डा (जो ओलांडणे भाग असतो तो); चर. [सं. उल्लंघ्]

**ओलांडा** पहा : **उलंडी**

**ओलांतरणे** अक्रि. उशिरामुळे गमावणे; फसणे : 'ऐसा ओलांतरला कार्जी ।' – राज्ञा ६.४३५.

**ओलित** न. पाण्याखाली येणारी जमीन; भिजणारी जमीन : 'ओलिताचे क्षेत्र किती टक्क्यांनी वाढले?' – अम १८७.

**ओलिवटा** पु. वाहता रस्ता : 'जन्ममरणाचा ओलिवटा ।' – ज्ञा ८.१४२.

**ओलिस, ओलीस** न. आपल्या अटी दुसऱ्या पक्षाने मान्य कराव्या म्हणून त्याची मूल्यवान वस्तू अगर महत्त्वाची व्यक्ती आपल्याकडे ठेवून घेणे : 'क्रांतिकाऱ्यांनी मुंबईच्या बहुसंख्य जनतेला आपल्याकडे ओलिस धरले होते.' – सैस्वा ३५४.

**ओलिसेले** न. तलम वस्त्र; अतिशय मृदू व नाजूक वस्त्र : 'मृणाळसुतांचे ओलिसेले । तुआं खांचटे भणोनि वैढूं सांडिले । तिएं चंद्रकळेसी काई जालें । कैसी धोटे साहतीसे ।।' – शिव ६९३.

**ओली** स्त्री. आवळी; आवळ्याचे झाड : 'दिसती सहजसिद्धा ओली.' – वछा ४४४.

**ओली** स्त्री. (वस्त्राचा) काठ; शेवट; पदर : 'वालिपेचिआं ओली ।' – शिव १७५. २. पहा : **ओलिसेले** [सं. आलि, आवलि]

**ओली आग** स्त्री. पुष्कळ पाऊस पडल्याने आलेली आपत्ती; ओला दुष्काळ. २. (ल.) अतिशय रागीट व्यक्ती.

**ओलीकाडी** स्त्री. हिरवे पीक, शेत, गवत; धान्याची हिरवी रोपे.

**ओलीकिच्च** वि. ओलीचिंब; पूर्ण भिजलेली : 'पाऊस झीम बसला, शेतं ओलीकिच्च झाली.' – खळाळ ८६.

**ओलीकूस** स्त्री. बाळंत झाल्यानंतर स्त्रीचा गर्भाशय. (अशा वेळी पुन्हा लवकर गर्भ राहण्याचा संभव असतो.).

**ओली कोरडी भाकर** अल्पस्वल्प, जाडेभरडे अन्न : 'प्रामाणिकपणाने मिळविलेल्या ओल्या कोरड्या भाकरीला जी रुचि असते ती दुसऱ्याचे मिंधे होवून मिळविलेल्या पक्वान्नाला नसते.' – निबंधचंद्रिका.

**ओली खरूज** १. वाहणारी खरूज. २. (ल.) सतत त्रास देणारा इसब, व्याधी, जंजाळ.

**ओलीगार** वि. ओलाव्याने गार झालेली; ओली : 'आकाशात ओलीगार काजळी दाटली होती.' – राकाधाका १४४.

**ओली जखम** स्त्री. पूर्ण बरी न झालेली, न भरलेली जखम; खपली न धरलेली जखम.

**ओली द्राक्षे** ताजी द्राक्षे. वाळलेल्या द्राक्षांना मनुका म्हणतात : 'बाईस ओली द्राक्षें पाहिजेत. १० शेर पाठवावी.' – ऐलेसं ५९१८.

**ओली पाती** दाण्याच्या पहिल्या विक्रीच्या वेळी महारणीला द्यायचे दाणे.

**ओली पार्टी** मद्यपानाच्या कार्यक्रमासहित खाणेपिणे, भोजन इ.

**ओली बाळंतीण** बाळंत होऊन जिला दहा दिवसांहून अधिक दिवस झाले नाहीत अशी स्त्री.

**ओली बोली** जेवूनखाऊन वर पगार घेण्याचा करार : 'मी एका खानावळीत ओल्या बोलीनं कामास होत्यें.' – वळवाचे पाऊस. याच्या उलट सुकी बोली किंवा कोरडा पगार – म्हणजे जेवण वगैरे न देता केवळ पैसे देणे.

**ओली भांग** (ही भांग कोरडीपेक्षा जास्त अमली असते ह्यावरून) (ल.) दुष्ट, स्वच्छंदी, तामसी मनुष्य.

**ओली भिक्षा** शिजवलेल्या अन्नाची शिक्षा; माधुकरी. याच्या उलट कोरडी भिक्षा म्हणजे धान्य, दाणे वगैरे.

**ओली ममता, ओली माया** खरेखुरे सात्त्विक प्रेम; जिव्हाळ्याचे प्रेम.

**ओलीव** पु. एक प्रकारचा वृक्ष. हे वृक्ष साधारण २ ते १० मीटर उंचीचे असतात.

**ओली सवाशीण** न्हाती-धुती सवाष्ण. कोरी म्हणजे नहाण न आलेली.

**ओलीसाउला, ओलीसाउले** पु. न. तलम, सपूर, रेशमी वस्त्र; शेला : 'तो ओलिसाउला घेतला.' – लीचउ १४३.

**ओली सुकी करणे** खेळायला सुरुवात करताना प्रथम कोणी खेळायचे हे ठरविणे. खापरी घेऊन तिची एक बाजू ओली करून ती वर फेकायची असते व 'ओली की सुकी' असे एका पक्षाने मागायचे असते. त्याच्या मागणीप्रमाणे बाजू वर पडल्यास त्याचा डाव ठरतो. 'उन्हाळी-पावसाळी' असेही याला म्हणतात.

**ओले** न. १. आलेते; भिजलेले वस्त्र. २. ओला चारा (गुरांकरिता). वि. शिजलेले; रसयुक्त. पहा: ओला. [सं. आर्द्र] (वा.) **ओले कातडे डोईवर ठेवणे** – वादीप्रतिवादींनी खरे सांगावे म्हणून त्याना करायला लावायचे दिव्य : 'जमा दाखवितात ती पाहणे. काही तजावत तफावत मनात येईल तर ओली कातडी या ब्राम्हणाचे डोईवर ठेवावी. म्हणजे असेल ते सांगून देतील.' – मशिंयाका ५१९.

**ओले** पु. अव. गारा : 'स्वैपाकात फार वेळ घालवूं नका. आतां ओले पडतील.' – हिप्र १७९. [हिं. ओला = गार]

**ओले अंग** नुकत्याच बाळंत झालेल्या स्त्रीचा देह, शरीरावस्था.

**ओलेकच्च** वि. अतिशय ओले; चिंब ओले : 'रात्रीच्या पावसाने ओलेकच्च झाले होते.' – मिरास २००.

**ओलेकुष्ट** न. रक्तपिती; पू वाहत असलेले कोड; महारोग.

**ओले जाळणे** वाळल्याबरोबर ओले जाळणे म्हणजे अपराध्यांबरोबर निरपराध्यालाही शिक्षा भोगायला लावणे, अन्याय करणे.

**ओलेता** वि. (स्नान करण्याकरिता अथवा झाल्यानंतर) ज्याने ओले वस्त्र वेढले आहे असा; ओले अंग असलेला; आर्द्रवत.

**ओलेते** न. ओले वस्त्र; भिजलेला कपडा.

**ओलेपाले** न. ओला चारा. पहा : **ओले** २.

**ओले हळदकुंकू** (सुगंधी) खोबरेल किंवा फुलेल यात घोटून तयार केलेले हळद किंवा कुंकू.

**ओल्या रोग** पु. अति ओलाव्यामुळे वनस्पतींना होणारा एक रोग.

**ओल्ली** स्त्री. बांबूच्या कांबीची केलेली टोपली, रोळी; (पदार्थ ठेवण्यासाठी) बांबूचे पात्र. (गो.)

**ओल्लो** उद्‌गा. ओहो; आश्चर्यार्थी उद्‌गार : 'ओल्लो, बचंभट, आम्ही तुमचीच इच्छा केली होती.' – मोर २२. [इं.]

**ओल्हावण** न. ओलवण; उत्तेजन : 'कीं प्रमोदासी ओल्हावन। मन्मथाचे ।।' – शिव ६२४. पहा : **ओलवण**

**ओल्हावणे** सक्रि. भिजवणे; ओलावणे; ओले करणे : 'असो मायां वन्दूनि उदक। ओल्हाविलें द्वय अंबक।' – मुआदि २२.२९.[सं. आर्द्रयण]

**ओल्हांटणे, ओल्हांटा** पहा : **ओलपटणे**

**ओवण** स्त्री. १. ओवणे; छिद्रातून किंवा छिद्रे पाडून आत दोरा घालणे; गुंफणे : 'देवाचा प्रसाद रत्नाच्या ओवणी। शोभतील गुणी आपुलीया ।।' – तुगा १९५१. २.शिवण; टाका घालणे. [सं.उप+वे]

**ओवणी** स्त्री. ओवलेली जिन्नस; एकत्र केलेली स्थिती; गुंफणे; माळ : 'रविमंडळा भंवती। जरि तारागणांची ओवनी दीसेंती ।।' – शिव ३९९.

**ओवणे** उक्रि. १. सुईत वगैरे दोरा घालणे; गुंतविणे; गुंफणे; धागा घालणे, अडकविणे. २. शिवणे; टाके घालणे. ३. (ल.) श्लोक, वाक्य इत्यादींत नवीन अक्षर किंवा शब्द, पदे घालणे, संबद्ध करणे. ४. माळेत फुले घालणे. [सं. उप+वे-विणणे]

**ओवर** न. दंपती; वधूवर; नवरा-बायको (विशेषत: लग्नाहून परत आलेली अथवा कुलदेवतेच्या दर्शनाला जाणारी). [सं. वधूवर]

**ओवर** पु. पडवी; खोली : 'जो आत्मबोधाचेया ओवरां। पवढला असे ।।' – राज्ञा ६.६९. पहा : **ओवरे**

**ओवरजत्रा, ओवरयात्रा** स्त्री. नूतन वधूवरांनी कुलदेवतेच्या दर्शनास जाणे. (क्रि. भरणे).

**ओवरजेवण** न. नवरीच्या बापाने नूतन वधूवरांना केलेली मेजवानी.

**ओवरभरणी** पहा : **ओवरजत्रा**

**ओवरा** पु. स्वयंपाकघर; खोली. पहा : **ओयरा** : 'ओवरा ओसरी भूमि माळिवरी उपरिया।' – कथा १४. [क. ओवरि, सं. उपगृह.]

**ओवरी, ओवरे** स्त्री. १. मुख्य देवळाच्या बाहेरील आवाराच्या भिंतीत गोसावी, यात्रेकरी, देवाची पुजारी मंडळी यांना तात्पुरते राहण्यास बांधलेली खोली, पडवी, सोपा. काहींच्या मते हा शब्द 'वाव' पासून झाला असावा. कारण ओवरीची रुंदी एक वाव असते. २. (सामा.) खोली; ओसरी : 'रत्नांचिया चित्रशाळेया। चिंतामणीचिआं ओवरियां।' – शिव ५९६. [सं. उपवारिक]

**ओवरे** न. फुलांचे मखर; फुलांच्या माळा : 'कनक-कमळें कल्हारें। पार्यांतकें सेंदुआरें। गुंफीवु कीजेती ओवरें। अशोका तळवटीं ।।' – शिव ६३१.

**ओवसणे** अक्रि. १. (बायकी) व्रत (वसा) घेणे, करणे. २. संक्रांतीचे वाणे वाटणे. [सं. उपास = पूजा करणे]

**ओवसा** पु. देवतेच्या प्रसादार्थ किंवा केवळ पुण्यार्जनार्थ किंवा काही विशिष्ट कामनेच्या साफल्यार्थ केलेले व्रत किंवा नियम.

**ओवळ** वि. भ्रष्ट : 'सांवळ्याशा गोपी केल्या ओवळ्या' – नाम २५२.

**ओवळणे** अक्रि. (वस्त्र) थोडेसे धुणे; खळबळणे. [सं. उद्+वल्]

**ओवळणे** अक्रि. (आंबे इ.) अर्धवट पिकून खाली गळणे; उमटणे; उमळणे; उबटणे.(को.)

**ओवळा** वि. अगदा पवित्र (सोवळा) व अगदी अपवित्र यांच्या मधल्या स्थितीतला; सोवळे न नेसलेला; अशुद्ध; अपवित्र; बिनधुतलेल्या धोतराला किंवा स्नान न केलेल्या मनुष्याला शिवलेला (मनुष्य). संध्या, भोजन, यज्ञ, इतर धार्मिक कृत्ये करण्यासाठी स्नान करावे लागते ते न केलेला. सोवळ्यातील माणसाने इतर माणसे, वस्त्रे इत्यादींना शिवले तर ओवळेपणा येतो. सोवळा असताना कासोटा सुटल्यासही माणूस ओवळा होतो. तेव्हा अनेक गोष्टींनी माणूस किंवा वस्तू ओवळी होते.: 'सदा पवित्र ज्वाला माळी। त्यास ओवळें कोण म्हणेल ।।' – हरि ३२.५३. [सं. अमंगल]

**ओवळ्याभोवळ्या** स्त्री. लहान मुलींचा खेळ; स्वत:भोवती गरगर फिरणे. [भोवळचे द्वि.]

**ओवंडकरू, ओवंडेकरी, ओवांडकरी** (ओवाण्डकरू, ओवण्डेकरी) वि. ओवंडा धारण करणारा; परक्या ठिकाणची शेती करणारा.

**ओवंडणे** अक्रि. मागे फिरणे; परत येणे :'मग ओवंडति स्वर्गस्थ । पूर्वपुरुष' – ज्ञा १.२५२.

**ओवंडा** पु. १. ज्या गावात मालक राहतो त्या गावच्या शिवारात नसणाऱ्या जमिनीचा मालकी हक्क किंवा लागवड. २. अशा प्रकारची लागवडीत आणलेली किंवा ताब्यात आलेली जमीन. ३. (यावरून) स्वत:च्या घरापासून दूर असलेले काम, धंदा; एखाद्या कामाचा काही भाग एकीकडे करणे व दुसरा दुसरीकडे करण्याची तऱ्हा, प्रकार; दूर राहून करायचा व्यवसाय.

**ओवा,ओव्हा** पु. १.(गाई, म्हशी यांची) कास; ओटी. (ना.) २. पान्हा : 'वो(ओ)हा दाटल्या बहुस्तनीं। ' – भुवन १२.६७. [सं. ऊधस्]

**ओवा** पु. एक प्रकारचे औषधी झाड आणि त्याचे बी. झाडाची उंची १ ते १ ।। हात असून बीचा रंग पिवळसर. पोटदुखीवर उपयोगी. [सं. यवानी]

**ओवासणे** अक्रि. ओवरजत्रा करणे; नवीन जोडप्याने देवास जाणे.(कु.)

**ओवाळणी** स्त्री. १. तोंडाभोवती फिरविणे (हात, आरती वगैरे); आरती करणे. २. कथा झाल्यानंतर श्रोत्यांनी हरिदासावरून नाणे वगैरे ओवाळून आरतीच्या ताम्हनात टाकणे. ३. कोणाही ओवाळणेकऱ्याच्या ताम्हनात टाकायचा पैसा; ओवाळून टाकलेले द्रव्य, देणगी, भेट, बक्षीस. ४. (ल.उप.) फजिती; खरडपट्टी :'पुढील सालीं साहेबाची असल्या प्रकारची ओवाळणी करण्याची पाळी न येवो म्हणजे झाले.' – लोटिकेले २.२१४. ५. स्वत:चा हक्क सोडून एखादी अतिशय मौल्यवान वस्तू दुसऱ्याला देऊन टाकली हे दाखवणारी क्रिया. (वा.) **ओवाळणी काढणे–** (बायकी) ओवाळून टाकणे, उतरून टाकणे (पैसा, कापड इ.) :'असल्या पैशाची ओवाळणी काढावी माझ्या बाळावरनं .' – झांमू.

**ओवाळणे** उक्रि. १. लामणदिवा घेऊन किंवा तबकात निरांजन, पैसा, सुपारी, अक्षता घालून ते माणसाच्या अगर देवाच्या तोंडाभोवती त्याच्या उजवीकडून डावीकडे फिरविणे (अमंगल, इडापिडा जाण्यासाठी, पूजेच्या वेळी, अगर मंगल प्रसंगी). २. स्त्रियांचे न्हाणे किंवा पुरुषांची आंघोळ झाल्यावर त्यांची वडील माणसे शेवटचा तांब्या घालून मग पुरुष असल्यास उदंड आयुष्याचा हो, मुलगी असल्यास चांगला पती मिळो व सुवासिनी असल्यास जन्मसावित्री – पुत्रवती हो असे आशीर्वाद देऊन हातात पाणी घेऊन स्नान करणाऱ्याच्या अंगाभोवती फिरविणे. ३. भोवती ओवाळून टाकणे; क:पदार्थ मानणे; बली देणे :'ओवाळोनि आखतां। दावावियां वसंतां।' – शिव ८१७. ४. काळजी वाहणे. [क. ओयु= पाळणे] [सं. उद्वलन किंवा अवज्वलन]

**ओवाळलेला** वि. वाईट; तिरस्कृत. (कु.)

**ओवाळून टाकणे** सक्रि. कुचकिमतीचे म्हणून फेकून देणे :'काय देउं उपमा तुळणेस दिसेना काहीं। ओवाळुन काय टाकावी वाटें लवलाहीं।' – प्रला ९२.

**ओवांडाकरी, ओवांडदार** पहा : **ओवंडेकरी** :'गावकऱ्यांपेक्षा ओवांडदाराकडून महार जागले दिढीने बलुते घेतात.' – गांगा ६९.

**ओवी** स्त्री. १. मराठीतील चार चरणांचा एक छंद. महाराष्ट्र संतकवींचा हा छंद अत्यंत आवडता आहे. यात वर्ण व मात्रा यांची संख्या अनियमित असते: 'पहिली माझी ओवी। पहिला माझा नेम। तुळशीखाली राम। पोथी वाचे ।।' – हा एक प्रकार; मुख्यत: प्रकार दोन १. साडेतीन चरणी, २. साडेचार चरणी, चरणांन्ती यमक. २. या छंदात रचलेले गीत बायका दळताना, मुलांना थोपटताना किंवा झोपाळ्यावर बसून म्हणतात :'ओविअें गातातित यादवांचा राणा।' – वछा ३३. (वा.) **ओव्या गाणे** (ल.) भलतीच स्तुती करणे. [त. ओडवि]

**ओवी** स्त्री. (वस्त्रोद्योग) विणकामातील प्रत्येक ताणा जिच्यातून ओवला जातो व जिच्यामुळे विणताना तो खालीवर केला जातो ती; वही. नेहमी ओव्या असा अनेकवचनी प्रयोग करतात. [सं. वे = विणणे]

**ओवीकार** पु. विहीर बांधणारा :'राषसभुणींचा वासरा ओवीकारु' – बिडकिन शिला १.२.

**ओव्हरकोट** पु. कोटावरून किंवा कपड्यावरून घालायचा पायघोळ डगला; थंडीचा कोट. [इं.]

**ओव्हरटाईम** पु. ठरावीक कार्यालयीन वेळेनंतर कार्यालयात बसून केलेले काम:'हक्काचे पैसे मिळाल्याशिवाय ओव्हरटाईमला बसणार नाही.' – कसा ४७. [इं.]

**ओशट, ओशेट** न. १. तेलकटपणा; बुळबुळीतपणा; स्निग्धता. २. कोणताही बुळबुळीत अथवा तेलकट पदार्थ ३ स्निग्ध द्रव्य. ३. मांस :'बामणींची लांकडे ओशटाखालीं जाळीत नाहीत.' – होया ४३. (कुण.) ४.(ल.) लाच.
वि. १. तेलकट, बुळबुळीत, स्निग्ध (हात, वस्त्र, पाय इ.) २. ओशट पदार्थाचा वास असलेला. [सं. अवशिष्ट, उच्छिष्ट]

**ओशटपणा** पु. बुळबुळीतपणा; चिकटपणा :'संसाराचा ओशटपणा चिकटलेला होता.' – चार्वाक ७३.

**ओशत, ओशद** स्त्री. १. (झाड, दिवा, पलंग, माणूस अथवा इतर वस्तू यांची) सावली; छाया; ओशेटा. तिच्यामध्ये बसू नये अगर उभे राहू नये कारण ती वाईट आहे अशी भावना. (को.) २. (सामा.) सावली; छाया; पडछाया.

**ओशाळ** न. आशा; अभिलाष :'अंतरींचे ओशाळ न तुटे.' – नाम १७९७.

**ओशाळ** वि. निलाजरी; निसवलेली; स्वैर (स्त्रीसंबंधी योजतात). पहा : **ओशाळा**
पु. ओशाळेपणा; लज्जा; खजिलपणा; शरमिंधेपणा; मोकळेपणा न वाटणे अशी अवस्था :'नसतां ओशाळ महीपाठीं। कळिकाळातें मारूं काठी।' – नव २१.३३.

**ओशाळगत** स्त्री. मिंधेपणा.

**ओशाळणे** अक्रि. १. लाज वाटणे; शरमणे; ओशाळा होणे. २. दबेल, दराऱ्याखाली असल्याप्रमाणे राहणे.

**ओशाळा** वि. खजील; शरमिंधा; दबेल (उपकारामुळे वगैरे); लाजलेला (आपले दुष्कर्म उघडकीस आल्यामुळे) :'कित्येकांना हजारों रुपयांची बक्षिसें, घरेंदारें देऊन ओशाळें करून ठेवले आहे.' – विक्षिप्त ३.१४०. (वा.) **ओशाळे असणे** – एखाद्याने उपकार केल्यामुळे त्याच्याविरुद्ध बोलू न शकणे. **ओशाळे वाटणे** – संकोच वाटणे; स्पष्टपणे बोलण्याचा किंवा मोकळेपणाने वागण्याचा धीर न होणे.

**ओशाळी, ओशाळीक, ओशाळगत** पहा : **ओशाळ**

**ओशाळेपणा** पु. संकोच. पहा : **ओशाळ**

**ओशेटा** पु. १. सावट; मोठ्या झाडाची सावली (हिच्याखाली वनस्पतींची वाढ होत नाही). पहा : **ओशत, ओशद.** २. झपाट्याने जात असताना होणारे अस्पष्ट ज्ञान; अंधुक दिसणे (मनुष्य, झाड इ.चे).

**ओषण** पु. (रसा.) प्राणवायूत विद्युत्स्फुल्लिंग सोडला म्हणजे हा वायू तयार होतो. याला चमत्कारिक वास येतो. याचा कर्बयुक्त पदार्थाशी संयोग होऊन निरनिराळी रासायनिक द्रव्ये होतात. पहा : **ओझोन.**

**ओषणऊदिन** पु. एक पांढरे स्फोटक द्रव्य. हे ऊदिनचे प्राणीदीकरण होऊन तयार होते.

**ओषध** पहा : **औषध**

**ओषधी** स्त्री. १. औषधी वनस्पती : 'राजासि विशल्य करी देउनि इलुसीच ओषधी राजा ।।' – मोभीष्म ८.८. २. (सामा.) झाड; झुडूप; वनस्पती; एकवर्षायू झाड; एक वेळ फळ येऊन मरते ते झाड. ३. उद्‌भिज्ज पदार्थ. वि. औषधी गुणयुक्त; औषधाला उपयोगी. [सं. औषध]

**ओषधी ग्रंथ** सर्व तऱ्हेच्या वनस्पतींची विविध माहिती संकलित करून देणारा ग्रंथ.

**ओषधीनाथ** पु. चंद्र.

**ओषधीय आवरण** वरून पाहिले असता पूर्ण झाकलेले दिसणारे व वनस्पतींच्या अवयवांनी व्यापलेले जमिनीवरील क्षेत्र.

**ओषधीश** पु. चंद्र.

**ओषिक** वि. ओसाड. [सं. उपिर]

**ओष्ठ** पु. ओठ. [सं.]

**ओष्ठ अटनी** (वै.) वरच्या ओठाच्या मध्यावरून सुरू होणारी लंब प्रखात, सरळ लांब खाच.

**ओष्ठ आखादणे** मुका घेणे : 'कोन्ही ओष्ठही नाचतां । मुख मुखी घालुनि आखादिलें ।' – भोल.

**ओष्ठपादी** पु. (प्राणि.) या वर्गातील प्राण्यात अगदी पुढच्या दोन पायांचा उपयोग ओठांप्रमाणे चर्वण करण्यास होतो. उदा. घोणी इ. प्राणी. [सं.]

**ओष्ठपुट** न. ओठ (खालचा किंवा वरचा); ओठाचा पुडा : 'तिये बरवी ओष्ठपूटे । बिंबफलां पासौनी ।' – शिव ४११; ओठ मिटल्यावर होणारी ओठांची आकृती. [सं.]

**ओष्ठभाषा** स्त्री. ओठांची भाषा; बहिऱ्यांशी बोलताना स्पष्ट उद्‌गाराला अनुसरून ओठ हलविण्याची क्रिया.

**ओष्ठरोग** पु. ओठांचे रोग : 'वातादि पृथक तीन दोषांनी तीन, त्रिदोषापासून एक आणि रक्तजन्य, मसिजन्य, मेदजन्य व अधिपातजन्य या चार दोषांनी चार असे एकंदर आठ ओष्ठरोग.' – योर २.४४९.

**ओष्ठामृत** न. ओठातील अमृत; चुंबनाच्या वेळी मिळणारे सुख. [सं.]

**ओष्ठी** वि. (वन.) एक किंवा दोन (वरचा व खालचा) ओठ असलेल्या तोंडाप्रमाणे आकार असलेला, ओठ असलेला (पुष्पमुकुट, संवर्त).

**ओष्ठ्य** वि. (भाषा.) ज्या वर्णोच्चारात दोन्ही ओठ एकमेकांना लागतात असा (वर्ण); ओठांचा, ओठांनी उच्चारला जाणारा (वर्ण). उदा. उ, ऊ, प, फ, ब, भ, म.

**ओष्णावणे, ओष्णणे** अक्रि. झोपेत बोलणे, बरळणे, बडबडणे, ओसणणे, जाबडणे. [सं. उत्स्वप्न]

**ओस** वि. १. निर्जन; लोकांनी सोडून दिलेले; ओसाड (गाव, शहर); पडित (जमीन). २. रिकामा; शून्य : 'ओस जाल्या दिशा मज भिंगुळवाणें ।' – तुगा १५५६. [सं. अ+उषित]

**ओस** स्त्री. १. भात झोडल्यावर त्या तृणाच्या पेंढ्या बांधताना कवळी टोकाला धरून झाडली म्हणजे तिच्यातून आखूड, कुजका खाली पडणारा तृणांश. २. नारळ, केळ इत्यादिकांचे काढून टाकलेले सोपट किंवा काथ्या. (को.)

**ओस** पु. नाकाच्या आतील हाड. (को. कु.)

**ओस** न. दव; धुके. (हिं.)

**ओस, ओसंग** न. पु. (प्रा.) १. झाडाची सावली. २. दाट झाडी; झुडूपाचा अंधार; सावट.

**ओसग, ओसगो** स्त्री. अशोकाचे झाड. [सं. अशोक]

**ओसट** न. सावट; झाडाची छाया.

**ओसडणे** उक्रि. लुटणे; नागविणे. (मावळी) [सं. अवशातन]

**ओसण** न. बैल, रेडा यांच्या नाकातील वेसण.

**ओसणणे, ओसणवणे, ओसणावणे** अक्रि. १. झोपेत बोलणे. पहा : **ओष्णावणे** : 'उपेसी न वाटे ऐसें । की हें स्वप्न देखतसें । गोष्टी करी रतिरसें । बोलतसें ओसणतां ।।' – हरि २८.४४. २. बडबडणे; बरळणे. [सं. उत्स्वप्न]

**ओसणे** अक्रि. भंग पावणे; कमी होणे : 'त्या धारदार करुण किंकाळ्यांनी गारव्याची लय ओसली.' – इंधन १७.

**ओसत, ओसद** स्त्री सावट. ( राजा) पहा : **ओशत.**

**ओसपटणे, ओसपाटणे** उक्रि. १. पाणउतारा करणे, होणे. (को.) २. शक्तीपेक्षा जास्त काम केल्याने अतिशय थकणे.

**ओसर** पु. स्त्री. १. एकीकडे होऊन किंवा बाजूला सरून दुसऱ्याला जाण्यासाठी दिलेली वाट; जागा. (क्रि येणे, देणे.) २. नदीच्या पुराच्या पाण्याची ओहोट. [सं. अव+सृ; अवसर]

**ओसर** पु. अवसर : 'शामाजीपंतास पत्र लिहिले कीं तारापूर पावेतो जाऊन येकदोन दिवस ओसरानें राहून पारपत्य होय ते करणें.' – पेद ३४.१६३.

**ओसर** पु. (भूशा.) आजूबाजूच्या भूप्रदेशाशी असंबद्ध असा वाळू व गोट्यांचा नागमोडी वरंधा. हा भूतकालीन हिमनद्यांमुळे अस्तित्वात आलेला आहे.

**ओसर, ओसरा** पु. १. पुराचे पाणी इ. पार वाहून जाणे; कमी होणे; उपरम; उतार. २. तहकुबी; मंदी (व्यापार इ.ची); खंड; खाडा (क्रि. घेणे, खाणे).

**ओसरणे** अक्रि. १. (नदीचा पूर, पाणी) कमी होणे; खाली जाणे, उतरणे; (पाऊस, ताप, सूज) कमी होणे; (श्रीमंती, कीर्ती, वैभव, तारुण्य, जोम इ. स) उतरती कळा लागणे; (पाऊस, अभ्रे) जाणे, नाहीसे होणे : 'क्षणें शोकिले जलार्णव । सूर्य उगवतां तम सर्व । जाय जैसें ओसरोनी ।।' – मोल; (बाजार, जमाव, गर्दी) पातळ होणे; मागे जाणे, हटणे, बाजूला होणे, करणे : 'हा शूर दूर ओसर म्हणणार महाप्रभाव हा रविला ।' – मोभीष्म १०.९२. २. रिकामा होणे : 'जैसा वृष्टि करूनियां आणाया तोय मेघ ओसरला ।' – मोकर्ण ३५.४०. ३. मागे घेणे, दूर होणे : 'गुरुकृपेसवें । ओसरलें प्रपंचजात अघवें ।' – राज्ञा ११.६४६. [सं. अवसरण]

**ओसरा, ओसरी** स्त्री. माजघराच्या पुढील अगर मागील, तीन बाजूंनी भिंत असलेली मोकळी जागा; ओटी; पडवी; सोपा :'पृथ्वी रुसोनि ओसरां राहे।' – एभा २२.४२०. [सं. अवसर]

**ओसवा** पु. झाडाची सावली. पहा : **ओस**

**ओसळणे** अक्रि. झोपेत बरळणे. पहा : **ओसणणे**.(तंजा.)

**ओसंग, ओसंगा** पु. मांडी; ओचा :'बाळ ओसंगा घेतला। केला नमस्कार धर्मासी।' – जै ८१.७०. [सं. उत्संग] (वा.) **ओसंगी घालणे, ओसंगी देणे** – एखाद्याच्या आश्रयाखाली जाणे, देणे, हवाली करणे. **ओसंगी असणे, पडणे, राहणे, निघणे** – आश्रय करणे; स्वाधीन होणे; लीन होणे; आधार घेणे :'तुका म्हणे पांडुरंगा। तुझ्या निघालो ओसंगा।' – तुगा.

**ओसंगळ** स्त्री. १. मांडी :'घेई प्रेत ओसंगळी।' – हआ १०.१५. २.(ल.) आश्रय; संरक्षण; छत्र; कृपा; आच्छादन. बहुधा विभक्तिप्रत्यय लावूनच उपयोगात आणतात. उदा. ओसंगळीने, ओसंगळीचा, ओसंगळी.

**ओसंगा** पु. मदतगार; मेढा; प्रोत्साहक. [सं. उत्संग]

**ओसंड, ओसंडे** पहा : **वशिंड**

**ओसंडणे, ओसांडणे** (ओसण्डणे, ओसाण्डणे) अक्रि. १. पडणे; सांडणे; गळणे :'जया स्वानंद ओसंडे। सर्व ही इंद्रियद्वारें।' – विसिंपू १.४३. २. वरून वाहणे; भरपूर भरून वाहून जाणे. पहा : **वोसंडणे** :'कैसा मुक्ताचा निजबोधू। घेवो जातां रसस्वादू। रसत्व लोपूनि स्वानंदकंदू। परमानंदु ओसंडे।' – एभा ११.३१५. [सं.उत्सन्न]

**ओसंडणे** उक्रि. बाहेर फेकणे; देणे; त्यागणे :'जे हें माझे मत अव्हेरुनी। ओसंडिती।।' – ज्ञा ३.१९४. [सं. उत्सन्न]

**ओसंडणे** पहा : **ओसणणे**

**ओसंबणे** अक्रि. स्फुंदत स्फुंदत रडणे. (राजा.)

**ओसा** पु. ओस पडलेला भाग; (पीक असलेल्या शेतातील) पडित जमिनीचा तुकडा; शेतातील रिकामी, पीक न उगवलेली जागा.

**ओसाई** स्त्री. पडसावली :'विटाळाची ओसाई पडे.' रुस्व ३८०.

**ओसाड** पु. वाऱ्यामुळे घरात येणारे पावसाचे पाणी; झड:'ओसाड आत येऊ नये म्हणून दार लावून घेते.' – शिळान ४९.

**ओसाड** स्त्री. सुकतीच्या वेळी नदीचे पाणी जोराने उसळते ती पाण्याची स्थिती. (गो.)

**ओसाड** वि. उजाड; निर्जन; माणसांनी सोडलेले; मनुष्यवस्ती नसलेले; वाईट :'ओसाड अरण्यात जाऊन पडल्यास आपली काय दशा होईल ....' – लोटिकेले ४१४८. [सं. उत्सद्]

**ओसाडा** पु.वाऱ्याने आणलेले पावसाचे तुषार, पाणी.

**ओसाडा** पु. पडदा :'तंव भीत भंगा चहुकडे। बानलगा वस्त्राचे ओ(वो)साडे।' – ऋ ६८३. ३. [सं. अव+शाट=वस्त्र]

**ओसाडी** स्त्री. पाण्याची लाट; (होडीवर, बांधावर) आपटून उडणारे पाणी.

**ओसाडी** स्त्री. ओसाडपणा; उजाडी; निर्जनता; शुकशुकाट; जेथे माणसे, पशू इत्यादींची वस्ती नाही असा प्रदेश.

**ओसाडी** स्त्री. एक प्रकारची वनस्पती. हिच्यामुळे खाज सुटते.

**ओसाडीचा लांडगा** १. भयाण व एकांत स्थलीचा लांडगा. २. (ल.) जेथे रक्षण करण्यास कोणी नाही अशा ठिकाणी नाश करण्यास टपून बसलेला माणूस.

**ओसाण, ओसाणे** न. केर; कसपट; पुरात वाहून आलेली वस्तू :'वरि तराति ओसाणें। सुखदु:खांचीं।।' – राज्ञा ७.७१.

**ओसार** स्त्री. (बांधकाम) भिंतीची जाडी. पहा : **असार** [गु.]

**ओसारा** पु. तहकुबी; खाडा; खंड.

**ओसावणे** अक्रि. १. कमी होणे. २. अशक्त होणे :'कैसीं दिहूं दिहूं ओसावली। वैदर्भी हें।।' – शिव ८३७. [सं. अवसद्]

**ओसीक** वि. लागवडीखाली नसलेली मोकळी जमीन; ओसाड; पडीक :'सलास सबैनचे पाडणीस ओसीक जमीन आहे. ती मोजणीत आली नाही.' – पेंडसे कु ४६.

**ओस्णावणे, ओस्णवणे** अक्रि. स्वप्नात बरळणे; झोपेत बडबडणे. (कु.)

**ओस्ते** न. सावट. पहा : **ओस, ओसट** (को.)

**ओहकर** न. १. म्हशीचे पारडू. (व.) २. (ल.) शेवटचे मूल (हे आईच्या मागे मागे असते तेव्हा त्यास म्हणतात.)

**ओहट, ओहटी, ओहटे** पु. स्त्री. न. १. ओहोटी; समुद्राच्या पाण्याची सुकती; भरती उतरणे; चंद्रसूर्याच्या – विशेषत: चंद्राच्या आकर्षणाने समुद्राचे पाणी वाढल्यानंतर पुन्हा उतरते त्याला 'ओहोटी' म्हणतात. २. विराम; उपरम; तहकुबी :'मग पांडवीं ओहटु केला। दळभारू मागौता परतेला।' – शिव ८८४. [सं. अप+घट्ट] (वा.) **ओहट वळणे** – ओहोटीला सुरुवात होणे :'तो इतक्यात ओहट वळला. त्यास आज्ञेप्रमाणे शंभर माणूस दरवाज्याच्या वाटेने कोटांत पाठविले.' – पेद ५४.१४१.

**ओहटणे** अक्रि. १. मागे हटणे; कमी होणे. २. ओसरणे; आटणे; ओहोटी लागणे. ३. (ल.) उतरती कळा लागणे.

**ओहटळ** पु. उतार :'आंतु पोकळ असे : खाली ओहटळ असे.' – सूत्रआ ९९.

**ओहोटी** पहा: **ओहोट**

**ओहड, ओहडणे** पहा : **ओठणे**

**ओहण** न. पर्वतावरील लहानसा ओढा, प्रवाह; बहाळ; पऱ्हया, त्याचा पाट, (शेतात पाणी देण्यासाठी काढलेला).(को.)

**ओहदा** पु. १. हुद्दा; (मुलकी किंवा लष्करी) अधिकाराचे स्थान; (सरकारी) नेमणूक. २. कर्तव्य; ठराव; हक्क :'पातशहाकडून वस्त्रे घेवून जावीं हा ओहोदा आमचा आहे.' – दिमरा १.१३१. [फा.]

**ओहदादार, ओहदेदार** पु. वरिष्ठ अधिकारी; सरकारी नोकर; हुद्दा धारण करणारा.

**ओहम, ओम** न. (शाप.) विद्युत्प्रतिरोधाचा एकं; विद्युत्प्रतिबंध मोजण्याचे मूलमान. (हे ओहम नावाच्या जर्मन शास्त्रज्ञाने शोधून काढले, सन १७८७-१८५४.) [इं.]

**ओहममापक** न. (शाप.) विद्युद्रोधनामुळे उत्पन्न होणारा प्रतिरोध मोजायचे विद्युत-यंत्र.

**ओहममापी** पु. (विअ.) विद्युतप्रवाहाला असलेली रोधकता दर्शविणारे मापक.

**ओहमा** पु. (प्र.) वहमा; वहीम; संशय. [फा. वहीम]

**ओहमाय** स्त्री. वधूची आई; बायकोची आई; सासू.

**ओहर** न. वधूवर; नवरानवरी: 'मिरवावया दोघें वधूवरें। वरात काढिली कंसासुरें। रथावरी बैसविलीं ओहरें। आपण धुरे सारथी जाहला।' – हरि २.१२८. [सं. वधू +वर]

**ओहर** पु. १. समुद्राच्या भरतीचे पाणी जमिनीत शिरून तयार झालेला चर; फासू; पोहडी; पोई; पोईंड; आखात.(को.) २. समुद्राचा दूरवर गेलेला फाटा.

**ओहरणे** उक्रि. (प्र.) होरणे. १. (खड्डा, चर, खाच इ.) बुजवणे; भर घालणे; भरणे. २. (ल.) आच्छादून, मढवून काढणे (दागदागिने, वस्त्रालंकार वगैरेंनी). पहा : **होरणे** ३. निमुळते होणे : 'ऐसा सुवृत ओहरत जंघायुग.' – वछा २२३

**ओहरभरणी, ओहरभरणे** पहा : **ओवरयात्रा, ओवरभरणी.**

**ओहरा** पु. नांगरटीचा तास; तुकडा. पहा : **ओरा** (को.)

**ओहवा** स्त्री. हसू : 'हं उनात्रने वागात ओहवां आल्हे = हे ऐकून वाघाला हसू आले.' – भि १७. (भि.)[सं. उप+हास्]

**ओहळ** पु. १. नाला; ओढा; पन्हाळ; झिरपणी; वाहणी : 'इतर ओहळ आणि भागीरथी। वरकड गज आणि ऐरावती।।' – रावि २५.६८. २. पर्वतावरील ओढा व त्याच्यापासून झालेला चर, घळण. [सं. वह] (वा.) **ओहळ उडून राऊत होणे** – १. संकट पार पडल्यावर मग धाडशी बनणे. २. (ल.) आपल्या हितकर्त्यांकडून आपले काम झाले म्हणजे मग त्याच्यावर उलटणे.

**ओहळखोवळ** पु. अव. ओढे–नाले; दरी–खोरी; खाच–खळगे. [ओहळचे द्वि.] (वा.) **ओहळीखोवळी शिरणे** – मुख्य मुद्दा सोडून भलतेच बोलणे; आडमार्गाला जाणे.

**ओहळणे** अक्रि. १. झिरपणे; वाहणे; ठिबकणे; स्रवणे. २. भोक मोठे होत जाणे (मोती इत्यादींचे); वेज सैल होणे. पहा : **ओघळणे** ३. वाहत्या पाण्यात धुणे : 'हे वस्त्र ओहोळौनि आणा गा.' – लीचपू ३०४.

**ओहळणे** उक्रि. उलटणे; लवंडणे; उलथणे.(को.)

**ओहळी** स्त्री. लहानसा ओढा; पाट; पाझर. पहा : **ओहळ** (को.)

**ओहा** पु. गाईम्हशीची ओटी; कास. पहा : **ओव्हा**

**ओहाणे** न. ओहळाची जागा.

**ओहिरी** पहा : **ओवरी.** : 'तेयां निश्चयाची ओहिरी।' – राज्ञा ८.६०.

**ओही** स्त्री. वारूळ; बीळ : 'मुंगी म्हणाली माझ्या ओहींत बोट ठेवलं तर सोडीन का?' – मवि ९.६.

**ओहो, ओहोहो** उद्गा. आश्चर्य, कौतुक, आनंद, आठवण यांचा दर्शक उद्गार; वाहवा. [ध्व.]

**ओहोट, ओहोटणे, ओहोटी, ओहोळ, ओहोळणे, ओहोण, ओहोर, ओहोरणे, ओहोरा, ओहोळी** पहा : **'ओह'** ने आरंभ होणाऱ्या शब्दांखाली. जसे :– ओहट, ओहटणे.

**ओहोटी मैदान** ओहोटीच्या वेळी मोकळी असणारी व भरतीच्या वेळी पाण्याने भरणारी समुद्राजवळची दलदलयुक्त जमीन.

**ओहोणी** स्त्री. भावजय : 'ओहोणीचेया खांदावरूनि दुर्ग वेंघला.' – लीचपू ३७२.

**ओहोबाप** पु. (लग्नप्रसंगी) वधूपिता.

**ओहोमाय** स्त्री. वधूमाता, ओहोबाप व ओहोमाय हे शब्द नवऱ्या मुलाच्या मातापितरांनाही लावतात.

**ओहोळ** पु. लहान ओढा; ओहळ, नाला.

**ओहोळकट** लहान ओढा.

**ओहोळणी** स्त्री. ओढणी; परकरावर लुगड्यासारखे नेसायचे लहान वस्त्र. (तंजा.) [सं. अवगुंठन]

**ओहोळी धूप** (कृषि.) पावसाच्या पाण्याने होणारी जमिनीची धूप.

**ओहों** क्रिवि. दूर : 'तों ओहों चोरांआ गियो = ते दूर चरायला गेले. – भिल्ली ९.

**ओह्मा** ओ देणे : 'नालवितां उठी। ओह्मा म्हणौनि।।' – राज्ञा १४.१८०.

**ओळ** स्त्री. १. रांग; पंगत; मालिका; पंक्ती; २. लेखणीने ओढलेली रेष अथवा लिहिलेली अक्षरांची पंक्ती. (क्रि. पाडणे, ओढणे.) ३. दर्जा : 'ज्या बलुतेदारांचा जितका उपयोग त्या मानाने त्यांची प्रतबंदी लागून जे तीन वर्ग झाले त्या वर्गाला ओळ म्हणतात.' – गांगा १४. ४.(ल.) मार्ग; पद्धत; रीत; ओघ; शिस्त; सभ्यपणाची वागणूक : 'त्या रुक्मिणी–कृष्णापासून जरी इतिहास पाहिला तरी तुम्हा वहिनी दादांना एकच ओळ कां ग!' – गडकरी वेड्यांचा बाजार. [सं. आवलि] (वा.) **ओळीस येणे** – बोलण्याच्या ओघास येणे; प्रवाहात पडणे, सापडणे; पाळी येणे. **ओळ लावणे** – शिस्त किंवा वळण लावणे; नीट वागायला शिकवणे : 'तसेच एखाद्या चोरट्या सुनेस ओळ लावण्याकरिता तापल्या पळीने डागणे' – आगर ९८.

**ओळ** पु. फटका : 'तिथंच पडलेला धांडा (ती) घेते व सारा संताप म्हशीच्या पाठीवर ओढते. राठ कातडीच्या म्हशीला त्या ओळाचं काहींच वाटत नाही.' – मक १९६१.

**ओळ** स्त्री. ओढा; पन्हाळ; नाला.

**ओळक–ग** पु. १. दांडा लावलेली किंवा न लावलेली नारळाची करवंटी; बेली; डवली (बाहेर पाणी काढण्यासाठी किंवा ताक, कढी इ. वाढण्यासाठी); नारळाची पळी. (राजा.) २. ह्यासारखे धातूचे किंवा लाकडी पात्र; पळी; ओगराळे.

**ओळकंबणे, ओळकुंबणे** अक्रि. १. (झाडाची फांदी इ. स.) लोंबणे; झोके घेणे; लटकणे; लोंबकळणे. २. फार वेळ लटकल्यामुळे रक्त साकळणे (पायाचे, मानेचे इ.). ३. भारावणे, स्वतःच्या वजनाने खाली वाकणे.

सक्रि. झोके देणे; पुढे मागे करणे; हेलकावे देणे. [सं. अवलंबन]

**ओळकंबली पाटी** आढ्याला टांगलेली टोपली; अन्न वगैरे सुरक्षित ठेवण्याकरिता शिंक्यासारखी केलेली एक पाटी.

**ओळकंबा, ओळकुंबा** पु. १. झोका; लटकण्याची, लोंबण्याची, उलटण्याची क्रिया (क्रि. घेणे, मारणे); हेलकावा. २ लोंबण्यासाठी आधार (घेणे).

**ओळकंबे** न. झोळणा; शिंके; लोंबती पट्टी, दोरी.

**ओळकी** स्त्री. लहान ओळक; डवली; बेली.

**ओळख** स्त्री. १.परिचय; ज्ञान; माहिती (वस्तू, मनुष्य याविषयी) : 'ओळखी जालेंया बुधीं का हसीं.' – शिव ७८. २. आठवण; स्मरण; याद; अभिज्ञान. ३. खूण (वस्तू अथवा पदार्थ ओळखण्यासाठी

केलेली); ओळखीचे साधन. ४. जामीन (कर्जदारासाठी घेतलेला). [सं. अवलक्ष, उपलक्ष] (वा.) **ओळख पटविणे, ओळख देणे** – उधार घ्यायचे किंवा पैसे द्यायचे असताना घेणाराच्या व देणाराच्या ओळखीचा तिसरा माणूस जामीनकीदाखल पुढे उभा करणे; एखाद्या व्यक्तीला बोलणाऱ्यांनी आपण कोण याची माहिती किंवा आठवण देणे, खात्री करून देणे. **ओळख पटणे** – अमुक व्यक्ती इ. कोण ते निश्चित आठवणे; परिचय नसलेली किंवा न आठवणारी व्यक्ती अमुकच अशी खात्री पटणे. **ओळख पडणे** – चांगली माहिती होणे; परिचय होणे :' त्यांची माझी पुढे चांगली ओळख पडली.' – पलकोघे ३७६.

**ओळखचिन्ह** न. १. एखाद्या व्यक्तीची बरोबर ओळख पटवून देणारे चिन्ह. उदा. चेहऱ्यावरील तीळ, मस, व्रण इत्यादी. २. बँकेतील पैसे घेणाराला दिलेली खूण; बिल्ला.

**ओळखण** स्त्री. १. खूण; चिन्ह. ओळख ३. (क्रि. करणे.). २. ओळखीसाठी दिलेली वस्तू (क्रि. देणे). ३. (भली खोड मोडली याअर्थी) कायमची आठवण. (व.) [सं. उपलक्षण]

**ओळखणे** उक्रि. १. जाणणे. २. माहीत आहे असे दाखविणे; स्मरणे; याद असणे. [सं. उपलक्षण]

**ओळखदेख, ओळखपाळख, ओळखभेट** स्त्री. ज्ञान, परिचय; माहिती; सख्य; ओळख (दाट परिचयाचा अथवा तोंडओळखीचा या दोहोंनाही लावतात) :'...पंतांची आणि विठोबादादांची ओळखभेट झाली नव्हती म्हणून नाहीं?' – .. भक्तमयूरकेकावली प्रस्तावना.

**ओळखपत्र** न. व्यक्तीचे नाव, हुद्दा, संबंधित संस्थेच्या संघटनेच्या संदर्भात आवश्यक असणारी त्या व्यक्तीची किमान माहिती आणि त्या व्यक्तीचे छायाचित्र असलेले कार्ड. शैक्षणिक संस्था, उद्योगसंस्था, व्यावसायिक संस्था, सेवासंस्था, कचेऱ्या यांमधून काम करणाऱ्या व्यक्तींना अशी ओळखपत्रे दिली जातात.

**ओळखपरीक्षा** स्त्री. संशयित गुन्हेगारांपैकी खरा गुन्हेगार ओळखण्यासाठी त्या सर्व गुन्हेगारांना फिर्यादीसमोर किंवा गुन्ह्याच्यावेळी हजर असलेल्या व्यक्तींसमोर उभे करणे; ओळख परेड.

**ओळखंबणे, ओळखंबा** पहा : **ओळकंबणे, ओळकंबा**

**ओळखीचा** वि. १. माहितीचा; परिचयाचा; ठाऊक असलेला (मित्र). २. सगासोयरा; मित्र; परिचित :'अंतरंगीचा हा ओळखीचा चोर.' – भा १७.

**ओळखीदेखीचा, ओळखीपाळखीचा, ओळख्यादेख्या, ओळख्यापाळख्या** पहा : **ओळखीचा**

**ओळख्या** वि. ओळखीचा; ओळखणारा :'ज्याने पत्र दाखविले तो गृहस्थ ओळख्या नव्हता.' – ऐलेसं ३४२३.

**ओळग** पु. १. आसरा; निवाऱ्यांची जागा; आश्रय. २. सेवा :'रायासि मंडळिकांचीया ओळगा होती.' – लीचपू ५३५. ३. नेमून दिलेले काम :'जो जिए ओळगेचा तो तिए ओळगे न देखो.' – लीचपू २२५. ४. सेवेकऱ्यांची सभा :'गोसावीयांचीए ओळगे अवघेचि बैसले.' – लीचउ १२८. [सं. अवलग]

**ओळगणा, ओळंगणा** वि. आश्रय घेणारा; चिकटणारा; सेवक.

**ओळगणे, ओळंगणे** अक्रि. पहा : **वोळंगणे** १. पासून लोंबणे; झोके घेणे; वेंधणे. २. (ल.) आधार, आश्रय घेणे; चढणे; आरोहण करणे :'फळें तांबूल सुगंध सुमनें । भोगोपचारें ओळगे ।' – मुआदि ३७.७७; अश्वावरी वीर ओळंगले ।' ३. शरण जाणे; सेवा करणे; राबणे :'तें ओळगे श्रीचरण ।' – शिव ८८; ४. प्रसन्न होणे; वश होणे; प्राप्त होणे :'ओळगो देआं श्रीचक्रधरा ।' – दाव ४६६. ५. आपण होऊन प्राप्त होणे :'आणि मुक्तिसायुज्यता । वोधेंचि ओळंगे ।' – विसिंपू १.२७. [सं. अव+लग्]

**ओळगणे, ओळखणे, ओळंगणे, ओळंघणे** उक्रि. मिठी मारणे; बिलगणे (हिसकून घेण्यासाठी); चिकटणे; (क्वचित) वळंगणे; प्रसन्न होणे; आनंदी–खूष होणे; आलिंगणे :'तेहवेळीं कुचपर्वतांचा घाटीं । ओळगतां डोळे जालें आयेतुटी ।' – शिव ५६०. [सं. अवलग्, आलिंगन]

**ओळगवट** स्त्री. सेवकवर्ग; आश्रयस्थान :'कीं धर्माची उत्तर पेठ । कीं सिद्धीची ओळगवट ।।' – ऋ ३१. [सं. अवलग्]

**ओळगवणे** अक्रि. १. आश्रय देणे; मुक्काम करणे :'ऐसें पेणें ओळगवती ।' – स्थान १२. २. सक्रि. देणे; अर्पण करणे :'हा धुवा .. सर्वज्ञासि ओळगविला.' – जती ३.

**ओळगावणे** (ओळगाव्‌णे) उक्रि. शरण जाणे; आश्रय करणे :'ओळगावेआ परेशु । नाहीं ब्रम्हादिकां सौरसु ।।' – ऋ २६.

**ओळगीया** पु. सेवक :'रेइनाएकाचा ओळगीया.' – लीचउ १२६.

**ओळण** (ओळण्) स्त्री. दिवा अडकविण्याची कडी, दोरी इ.; साखळी. पहा : **ओलाणी, ओलाणे**. (राजा.)

**ओळणे** (ओळ्‌णे) अक्रि. १. एखाद्याकडे ओढले जाणे, वळणे :'ओळ खगावरि घनसा ।' – मोआदि ३६.४८. २. अनुकूल होणे; प्रसन्न होणे :'कौरव म्हणती कोण देवो । आजी आम्हां ओळता ।।' – मुसभा १४.९३. ३. अनुग्रह करणे; उपदेशणे; कृपा करणे :'एणें श्रीकृष्णघनें शमवाया सर्व ताप ओळावें ।' – मोमोसल २.९१.

**ओळणे** (ओळ्‌णे) उक्रि. स्रवणे; पाझरणे; झरणे :'तेणे धातु आदि करोनी । अमृत ओळतांती ।।' – वछा ३२६.

**ओळत** स्त्री. भिंत (घराची). (गो.)

**ओळदांडी** स्त्री. बैल गाडीची आखरी व सांटा आवळणाऱ्या आळ्याला पीळ घालून तो पीळ न सुटण्यासाठी त्यात अडकविलेली दांडी; आवळदांडी.

**ओळसा** पु. वळसा; फेरा; वेढा :'कोल्हाळ चुकविला । त्रिगुणांचा ओळसा ।।' – भज २२.

**ओळंग** पु. ओघळ :'माझे गोरे गाल इतके लालबुंद होत असत की, त्यावरून रक्ताचे ओळंग वाहू लागतात कीं काय असें वाटें.' – वहन ५.

**ओळंगणा** वि. चिकटणारा.

**ओळंगर** पु. लहानसा ओघळ; लहान झिरपा. (राजा.)

**ओळंगा** पु. आश्रय. पहा: **ओळग**

**ओळंबणे** सक्रि. ओळंबा लावून भिंत वगैरे सरळ रेषेत आहे की नाही हे नक्की करणे.

**ओळंबणे** अक्रि. १. पहा : **ओळकंबणे**. २. वाकेपर्यंत लोंबणे (फांदी

इ.). ३. ओळंबा नावाचा विकार होणे. [सं.अवलंबन्]

**ओळंबळणे** अक्रि. पात्रात पाणी अधिक झाल्यामुळे ते पाणी बाहेर वाहू लागणे. २. अधिक झालेले पाणी इ. दाबाने बाहेर टाकणे; उचंबळणे; उतू जाणे (नदी, भांडे इ.).

**ओळंबा** पु. (गवंडी) १. गवंड्याचे एक हत्यार; एका दोरीला लावलेले गोल वजन (शिसे, दगड वगैरेचे). हे वजन लोंबकळत ठेवून दोरी स्थिर झाल्यावर सिद्ध होणारा उभा लंब (भिंत सरळ रेषेत आहे की नाही पाहण्यासाठी). २. त्रास. (व.) ३. गाडीचा सोल ज्यातून जातो तो भाग. ४. (ल.) ठपका; मर्मभेदक खरडपट्टी. [सं. अवलंबन्] (वा.) **ओळंबा येणे** – शब्द लागणे; टपका-ठपका लागणे :'नंतर तुकोजीराव होळकरांनी चौघाहि पुत्रांस बोलावून काही एक विचार दुर्भाषणे बोलून म्हटलें, श्रीमंतांचा मजला ओळंबा आला ते पक्षी मला उदईक लढाईत मरावयाचे.' – होकै ११.

**ओळंबी** स्त्री. गाय, बैल इ. जनावर अशक्त झाले असताना मानेखाली रक्त उतरून जमलेला गोळा किंवा त्यामुळे पडलेला दाब; रक्त साकळून झालेला विकार. (कों.) [सं. अवलंबन, अवलंबक]

**ओळंबा, ओळंबो** पु. वाळवी; अळंबी. पहा : **वाळिंबा** :'कोप आलिया ओळंबयासी। केवीं स्पर्शे अग्नीसी। श्रीगुरुकृपा असे जयासी। काय करील यवन दुष्ट।।' – गुच १४.२४. (गो.)

**ओळा** पु. वळण; रीत; तऱ्हा; शिस्त; पद्धत; मोळा; शिक्षण; सवय :'पोरीच्या जातीला कामाचा ओळा अवश्य हवा.' – कुस ८.

**ओळा** ओवळा :'तूं ओळी हो आणखी तेवढी धुणीं धुऊन आण.' – संस १३.

**ओळिंबा** पु. वाळवी :'हे असो परिमाणुचेनि लाभें। पाताळ लंघीति ओळिंबे।' – राज्ञा १८.६०६.

**ओळिंबे** म. शिंके :'पक्ष्यांच्या घरातील जागा स्वच्छ राखण्यासाठी अंड्रीसबाबा एक शिपतरासारखे ओळिंबे बांधीत.' – स्यूतस्यो १२२. [सं. अव+लंब]

**ओळी** स्त्री. १. पहा : **ओहळ, ओहळी** (राजा.) २. पाण्याचा लहानसा पाट; लहानशा ओढ्याचे सुकलेले पात्र.

**ओळी** स्त्री. योगशास्त्रातील परंपरा :'वज्रोळी अमरोळी .. इया ओळी नाथांचिया.' – लीचउ ४४६.

**ओळीचा** वि. १. विद्वत्ता, कुलीनता, संपत्ती वगैरेंनी बरोबरी करणारा; समान योग्यतेचा. २. सभ्य चालीरीतींचा.

**ओळींबा** पु. तिवड्याला बैल जुंपण्याकरिता घातलेले लोखंडी कडे. पहा : **ओळंबा** (माण.)

**ओंऊळ** स्त्री. न. बकुळ वृक्ष; त्याचे फूल.

**ओंऊळदोडा** पु. बकुळ वृक्षाचे फळ.

**ओंकार** पु. १. ओंकाराचे चिन्ह (ॐ) :'तेथ ओंकाराचीए पाठी। पाये देत उठाउठीं' – राज्ञा ६.३०३. २. हुंकार; होकार :'विद्याधरी मदनओंकारा सारिखे कूजती.' – शिव [सं.]

**ओंकारध्वनि** (नी) पु. अग्रेसर; सर्वश्रेष्ठ; प्रथम स्थान असलेले. हा पहिला ध्वनी त्यावरून :'हरिभाऊ हे मराठी साहित्यातील ओंकारध्वनि आहेत असे यथार्थपणे म्हणता येईल.' – हरिव्यवा ५५. [सं.]

**ओंकारेश्वर** पु. १. बारा ज्योतिर्लिंगांपैकी एक स्थान. हे मध्य प्रदेशात इंदूरनजिक नर्मदेवर आहे. २. पुण्यातील मुठानदीकाठचे ब्राम्हणांचे पूर्वीचे स्मशान. (वा.) **ओंकारेश्वरावर गोवऱ्या जाणे** – स्मशान या शब्दावरून, मरणकाल जवळ येणे; अतिवृद्ध होणे :'गोखले काय आणि टिळक काय दोघांच्याहि गोवऱ्यां आतां बहुतेक ओंकारेश्वरावर गेल्या आहेत, असें म्हणावयास हरकत नाहीं.' – लोटिकेले ३.३०४. **ओंकारेश्वरावर पोचवणे** – अंत्यविधीसाठी स्मशानात घेऊन जाणे; (ल.) एखाद्याचे मरण पाहणे.

**ओंकीर** पु. डोळ्यांतील मळ.पहा : **उकीर** ३. (गो.)

**ओंगण** म. गाडीच्या, रहाटाच्या कण्याला किंवा सांध्याच्या ठिकाणी फार घर्षण होऊ नये म्हणून लावण्यात येणारे तेल, बेरी, चरबी; वंगण :'ह्या व असल्याच समाधानाच्या गोष्टींचे तिच्या कष्टमय संसाराच्या गाड्याला ओंगण होते.' – स्मृति १०. [सं. अंजन]

**ओंगल** वि. (सांकेतिक. गुन्हेगार जातीत रूढ) एक हजार ही संख्या (१०००).

**ओंगळ** वि. १. वाईट; घाणेरडे; किळसवाणे; अमंगळ; घाण खपणारा (पदार्थ, माणूस). २. (ल.) कडक; त्रासदायक; रागीट; अशुभकारी : 'बहिरोबा आहे ओंगळ । त्याचा नवस पाहिजे फेडला ।।' ऐपो ४८. [सं. अमंगल]

**ओंगळवाणा** वि. अमंगल; अशुभ; वाईट; घाणेरडा; किळसवाणा.

**ओंगळसोंगळ** वि. वाईटसाईट; किळस उत्पन्न करणारा.[ओंगळचे द्वि.]

**ओंजळ** स्त्री. १. बोटे चिकटवून व करंगळीच्या टोकापासून मनगटापर्यंत हातांच्या कडा एकमेकांना जोडून होणारी पोकळी; जुळलेले दोन पसे २. पितरांना द्यायची तिलांजली : 'पुत्र देईल पित्या ओंजळी ।' वसा १७.[सं. अंजली] (वा.) **दुसऱ्याच्या ओंजळीने पाणी पिणे** – दुसऱ्याच्या तंत्राने, कलाने, मिनतवारीने, मिंधेपणाने वागणे; परस्वाधीन असणे.

**ओंटळा** पु.धोतराची अथवा लुगड्याची ओटी. (पुष्कळसे पदार्थ भरल्यामुळे मोठी दिसणारी.)(कों.)

**ओंड** स्त्री. एक झाड.

**ओंड** स्त्री. १. सुरमाडाची पोय, लोंगर, फलसमुदाय २. (नाचणीवरील) टरफल; टरफलासह नाचणीचे दाणे.

**ओंड** वि. खोल (पाणी, विहीर, खड्डा, खाचर) : 'महाराष्ट्र भाषेचे प्रयोग ठरविण्याच्या ओंड पाण्यात त्यानी शिरावे म्हणजे पुष्कळअंशी हितोपदेशांतील अव्यापारेषु व्यापार करूं जाणाऱ्या वानरासारखीच अवस्था'. – निमा. ११७ [क. औडु=गढूळ पाणी, तळाचे पाणी, गाळ] (वा.) **ओंड करणे** – जास्त खोल करणे. (को.)

**ओंडकर, ओंडकूर** पु. लाकडाचा ठोकळा, खोड : 'खांद्यावर एक मोठे ओंडकर घेऊन येतो.'– तुफान नाटक ७१.[क. ओडक=फोडलेली, मोडलेली स्थिती]

**ओंडका, ओंडकी, ओंडके** पहा : **ओंडकर** : 'मध्यावर ठेवलेला उंच ओंडका धुमसत होता.'– रथ २२९

**ओंड जमीन** स्त्री. सखल, पाणी साठवून धरील अशी भातखाचराला

उपयोगी पडणारी जमीन.

**ओंडण** वि. ओंड; खोल आणि पुष्कळ पाणी मावण्याजोगे (भातखाचर). उखरच्या उलट.

स्त्री. न. खोलगट शेतजमीन (पसरट द्रोणासारखी); खाचर. (को.)

**ओंडपणा** पु. खोली : 'एके बाजूचा ओंडपणा कमी केला.' - भू ९९

**ओंडवण** न. खोलगट व सखलवट अशी जमीन, तळ, खाचर; पसरट द्रोणासारखा भूप्रदेश.(को.)

**ओंडा** पु. पाण्याचा लोंढा; ओढा.[क. ओडि = झुळुझुळु वाहणे, झिरपणे]

**ओंडा** पु. गोबर, माती वगैरे घालून तयार केलेली जागा. जसे: - अळवाचा ओंडा, भाजीचा ओंडा.

**ओंडा** पु. १. लाकडाचा ठोकळा, तुकडा, खांब, २. केळीचे लोंगर तोडून घेतल्यानंतर जमिनीवर वाढलेला केळीचा भाग. हा भाग तोडला म्हणजे त्यालाही ओंडाच म्हणतात. ३. झाडाचे खोड; खोडाचा भाग, तुकडा. ४. (ल.) मूर्ख; मठ्ठ. ५. ग्रामदेवतेपुढे होळीच्या सणात नाचविण्यात येणारा पोफळीचा दांडा. हा ओंडा होळीच्या नेमावर पुरायचा असतो. [क. ओडे-खांड, तुकडा.]

**ओंडा** वि. खोल (पाणी इ.) पहा : **ओंड**

**ओंडापट्टी** स्त्री. सरकारी कामासाठी जे ओंडे कापतात त्याची मजुरी भागवण्यासाठी बसवलेला कर.

**ओंडा** पहा : **ओंडकर.**

**ओंढ** वि. खोल; खोलगट (विहीर, खड्डा, भातशेती इ.).

**ओंढ्यालोंबी** स्त्री. गव्हाचे कणीस.

**ओंदण** न. कोठार, दुकान इत्यादीच्या फळ्या, (दाराऐवजी) बसविण्याकरिता खाचणी घेतलेले वरचे, खालचे व बाजूचे लाकूड. (को.)

**ओंध, ओंद** स्त्री. १. मळभ; ढगांमुळे आलेली अंधारी; झापड; काहूर. (क्रि. घालणे.) (को.) २. रागाने, दुःखाने, काळजीने वगैरे किंवा काही अनिष्ट घडल्यामुळे कोणाशी काही न बोलता व काही न करता ढोपरात मान घालून खिन्नपणे बसण्याची स्थिती. होंद असाही शब्द रूढ.(को.) [सं. अन्ध.]

**ओंधट** वि. १. काळोखीचा; अंधारी आलेला; उदासवाणा (दिवस); अंधारी; अंधाराची (खोली). २. अंधुक; अस्पष्ट; सहज न ओळखू येणारा (पदार्थ, वस्तू). ३. कोंदट; मलिन.

**ओंफट** पु. वैदिक विधीतील एक क्रिया, उपहासात्मक उल्लेख : 'करीत ओंफट लक्षेवेळा' - नाम १३२. **ओंफस होणे-** (श्रम) वाया जाणे; निष्फळ होणे; फिसकटणे; 'पण पुढे सारेच ओफंस झाले' - पलको ८४.

**ओंब** पु. इमारती लाकडाचे एक झाड.

**ओंबकळणे** अवि. झोके घेणे; हेलकावणे; लोंबकळणे.

**ओंबकळा, ओंबकाळा** पु. लोंबकळा; झोका; ओळकंबा.

**ओंबट** वि. कोंबट; सोमट; सोमाळा; गरमनरम.

**ओंबट** न. कणीस (राळा, वरी, सावा इत्यादीचे).

**ओंबण** नं. अंबोण. पहा : **अंबवण**

**ओंबण** न. १.घराच्या छपरावर आडव्या रचलेल्या कारव्या, रिफा, कामट्या इ. (गवत कौले घालण्यासाठी). २. पांझरण.[सं. उद्बंधन.]

**ओंबणे** उक्रि. १. ओंबण पसरणे; वाशावर ओंबण घालणे. २. ओमणे; बांधणे.(कु.)

**ओंबळणे** उक्रि. खळबळणे; चुबकणे; हळूहळू धुणे, बुचकळून काढून वाळत घालणे; पिळणे; घासणे: 'तिने आपले नाकतोंड त्याच्या अंगावर ओंबळले.' - फुदे २०८.

**ओंबी** स्त्री. १. गव्हाचे कणीस; लोंगर; लोंबी; ओला दाणा. २. ओंबीतील काढून भाजलेले गहू.

**ओंबी टाकणे** (गव्हाला) कणीस येणे.

**ओंबील** पु. एक प्रकारचा तांबडा मुंगळा; डोंगळा (बहुधा झाडावर आढळणारा); वाळिंबा. पहा : **उंबील**

**ओंब्या** स्त्री. पाटील, कुलकर्णी वगैरेंचा शेतातील ओंब्या घेण्याचा हक्क.

**ओंलतेर** न. निजण्यासारखी विश्रांती घेण्याची खुर्ची; आरामखुर्ची. [इं. आर्मचेअर.]

**ओंवड** ल. बकुळीचे झाड; वोवल. पहा : **ओऊळ** (कों.)

**ओंसणे** उक्रि. ओस (काथ्या, सोपट) काढणे; खरपुडी किंवा साल काढणे; सोलणे (नारळ, पोफळ, शेंग, अंबाडीची काडी इ.) (कों.)



ऑ इंग्रजी भाषेच्या संपर्कामुळे मराठीमध्ये हा उच्चार आलेला आहे. याचा उच्चार ऑफ, ऑर्डर इ. शब्दांमध्ये मिळतो. आया स्वरावर अर्धचंद्र स्वरूपात हा उच्चार दाखवला जातो. उच्चार स्थानाचा विचार करून 'ओ' नंतर हा स्वर घेतला आहे. वर्णमालेतील स्थान चौदावे. काही भाषाशास्त्रज्ञ याचे स्थान 'आ'नंतर मानतात.

**ऑतॉ** पु. भात शिजताना येणारा कड, ऊत. (गो.)

**ऑपेरा** पु. संगीताच्या माध्यमातून सादर केलेले नाट्य; संगीतिका: 'त्याचा संगीत नाट्याचा, संगीतकाचा म्हणजे ऑपेराचा अभ्यास चांगला झालेला' - नटश्रेष्ठ ११. [इं.]

**ऑर्डर** स्त्री. १. व्यवस्था; क्रम; परंपरा. २. बंदोबस्त; जम. ३. आज्ञा. ४. (व्यापारी) मागणी; माल मागणीची नोंद : 'कित्येक व्यापाऱ्यांनी विलायती मालाच्या दिलेल्या आर्डरी रद्द केल्या.' - के. ३१.५.३०. [इं.]

**ऑर्डर्ली** पु. लष्करी अमलदारास लष्करखात्यातून तैनातीकरिता दिलेला फौजी नोकर; हुजऱ्या. (अप.) अडली. [इं.]

**ऑलिव्ह** पु. एक फळझाड. भूमध्यसमुद्राच्या आजुबाजूला याची लागवड होते. याच्या बियांचे तेल काढतात. काही ठिकाणी फळांचे लोणचे घालतात. फळांपासून रंग तयार होतो. आलिव्हचे पान, फांदी, माळ ख्रिस्ती लोकांत शांततेचे निदर्शक मानतात. [इं.]

**ऑंकी** उअ. ते की; असे की. [फा.]

**ऑंगर** न. १. वाटेच्या तोंडाला लावलेले दुबेळ्याचे लकूड. यातून माणसांना जाता येते, पण गुरांना जाता येत नाही. २. कुंप करण्यासाठी रांगेने पुरलेली दुबेळक्याची लाकडे किंवा फांद्या यांपैकी प्रत्येक.

**ऑंगोगडी, ऑंगोगड्या** क्रिवि. प्रतिव्यक्तीवर निरनिराळा अन्वय होईल असे (देणे, सांगणे.). प्रत्येकी; निरनिराळ्या व्यक्तीला स्वतंत्रपणे.(कों.)

**ऑंथडा** पु. हिसका, हासडा.



**[औ ने प्रारंभ होणारे काही शब्द येथे न आढळल्यास 'अउ–ऊ', 'आउ–ऊ', 'अव–आव्' मध्ये पाहावेत.]**

**औ** मराठी अक्षरमालेतील पंधरावे अक्षर. आघातयुक्त 'आ'चा, नंतर येणाऱ्या आघातरहित 'उ'शी संयोग होऊन झालेला संयुक्त स्वर. आघातरहित स्वर व्यंजनाकडे झुकत असल्यामुळे उच्चारदृष्ट्या 'अव्' असा. कित्येक शब्दांत तसे पर्यायी लेखनही जसे :– लौकर–लवकर, चौदा–चवदा, इ. 'ओ' वर एक मात्रा देऊन हे अक्षर काढतात.

**औक** न. आयुष्य :'औक चितीती पुरविता' – जसा ७ [सं. आयुष]

**औकत** स्त्री. सामर्थ्य; शक्ती; पात्रता. [फा. औकात]

**औकात, औकाद** पु. स्त्री १. गुजारा; चरितार्थ : 'एणेकरून आपला औकात चालत नाहीं.' – मइसा १८.४८. २. निर्वाहसाधन :'त्यांचा योगक्षेम चालवयाची काही औकात नाही.' – मइसा १७.३९. पहा : **अवकाळ** [फा.]

**औकाफ** पु. अव. मुसलमानी धार्मिक संस्था; मुसलमानी धर्मादाय संपत्ती; मुसलमानी देवस्थानांची मालमत्ता. [फा. वक्फ]

**औकाळ, औकाळी** पहा : **औकात, औकाद**

**औगत** स्त्री. प्रसूतीनंतरच्या पहिल्या दहा दिवसांत मृत झालेली बाळंतीण. ही सामान्यतः पिशाच होते अशी समजूत आहे. [सं. अव किंवा आ+गत]

**औगात, औघात** क्रिवि. १. अकस्मात; एकाएकी. (क्रि. येणे, ओढवणे.) २. अल्लाद; न लागता. (ओलांडून जाणे, उडी मारणे). (कु.) [सं. अव +घात]

**औचाट** वि. अवजड (ओझे); कठीण (काम); न समजणारे (भाषण).

**औचित** वि. उचित; योग्य :'औचिता करौनि धरा। मग लेखा येईल ।।' – शिव ६९६. [सं. उचित]

**औचिता** वि. हळवे; लवकर पिकणारे (भात).(चि.)

**औचित्य** न. १. युक्तता; योग्यपणा; उचितपणा; शोभण्यासारखे असणे; एखादी गोष्ट करताना स्थल, काल व परिस्थिती यांच्याकडे लक्ष देण्याचा गुण. २. (सास.) साहित्याच्या विविध घटकांमधील सद्‌भिरुचीला धरून असणारा गुण. [सं.]

**औचित्यपूर्ण** वि. प्रसंगाला धरून असलेला; प्रसंगाला योग्य असा.

**औचित्यभंग** पु. प्रसंगाला न शोभेल असे वर्तन; औचित्याला सोडून वागणे; अनुचित वर्तन.

**औजसद्रव्य** न. अल्ब्युमिन; एक पौष्टिक द्रव्य. [सं.]

**औजाफलक** पु. (मानस.) अंक, अक्षर आणि होय व नाही हे शब्द लिहिलेला किंवा छापलेला फलक. त्यावर व्यक्तीने एक अग्रिका फक्त धरून ठेवायची. ती कोणत्या तरी दैवी शक्तीने फिरते किंवा हलते असे समजण्यात येते. प्लंचेटचा फलक.

**औजार** न. शीड इ. पहा : **अवजार** [फा.]

**औज्ज्वल्य** न. उज्ज्वलता; चकचकीतपणा; तेज; चमक; झळाळी. [सं.]

**औट** वि. १. साडेतीन :'औट हात तुझी जागा। येर सिणसी वाऊगा।' – तुगा २६९२. २. (योग) साडेतीन (मात्रा) :'तैशी ते कुंडलिनी। मोटकी औट वळणी।' – ज्ञा ६.२२३. [सं. अर्धसप्त]

**औट** पु. तोरा; गुर्मी :'वरकडाशी जसे औट धरून करितात तसें तुम्हांशीं करितात.' – ऐलेसं १०२.

**औट** पु. जळाऊ लाकडांचा किंवा इमारती लाकडांचा ढीग, रास; पाण्याने भिजू नयेत म्हणून घराभोवती पाख्याखाली रचून ठेवलेली लाकडे :'औटातून मी दोन मेढी काढल्या.' – आआशे ३२६. पहा : **अवट**

**औट** पु. उत्सवप्रसंगी करायच्या दारूकामातील एक प्रकार :'अचानक आकाशात औट उडाला. त्याच्या सप्तरंगी ठिणग्या उडाल्या.' – स्वामी ३८७.

**औट, औटभर** न. १. बैलांना त्रास न देता झालेले दिवसाचे नांगरटीचे काम; एक नांगरभर; खुटणभर. (क्रि. नांगरणे.) २. (ल.) एक शेत, वावर किंवा त्याची लांबी. (व.)

**औटकी** स्त्री. अवटी याचे काम, अधिकार, धंदा. पहा : **अवटकी**

**औटकी** स्त्री. उजळणीचा प्रकार; अवटकी; साडेतीनचे पाढे कोष्टक.

**औट घटकांचा आनंद** (साडेतीन घटकांचा म्हणजे) अल्पकाळ टिकणारे सुख, आनंद; क्षणभंगुर सुख.

**औट घटकांचे राज्य, औट घटीचे, घडीचे राज्य** (किरीटी रामराजाने आपल्या अबदागिऱ्याला साडेतीन घटका राज्य दिल्याच्या गोष्टीवरून अथवा शिराळशेटच्या गोष्टीवरून) थोडा वेळ मिळणारा अधिकार; सुख; पाण्यावरचा बुडबुडा; क्षणभंगुर अंमल.

**औट घटकेचा** थोडा वेळ टिकणारा; क्षणिक :'तुमच्या औट घटकेच्या लटक्या सुखासाठीं ..' – बंप ३१.

**औटघडी** वि. क्रिवि. अल्प काळचे; थोडा वेळ टिकणारे.

**औटडे** न. (साडेतीन हाताचे) शरीर :'बंदी बंदाची कौपीन। बहिरवास औटडें ।।' – तुगा ४०२०.

**औटपद, औटपीठ** न. १. (योग.) द्विदल अग्निचक्रावरील एक स्थान; त्रिकूट, श्रीहट, गोल्हाट, औटपीठ ही महाकारणस्थाने. त्यांपैकी एक :'शोषूनि सहस्र दळाचे पाट। औटपीठ आणि गोल्हाट। क्रमोनिया श्रीहट। आली उद्धट ब्रम्हस्थाना।' – एभा ६.१२९. २. कोल्हापूर, तुळजापूर, मातापूर ही तीन व सप्तशृंग अर्धे, मिळून देवीची साडेतीन स्थाने :'नाना औटपीठें ओंकारें दर्शना आलीं।' – सप्र ५.१८.

**औटमात्रा** स्त्री. ओंकार; प्रणव.

**औटहाऊस** न. पडघर; पडशाळा; चाकर लोकांसाठी बांधलेली स्वतंत्र खोली. [इं.]

**औटाण** न. गैरवेळ; अवेळ; गैरहंगाम. [सं. अव +स्थान]

**औटावी** वि. १. औट (मात्रा) मधील अर्धी; ओंकाराच्या साडेतीन मात्रांपैकी शेवटची अर्धमात्रा :'देवा तूं अक्षर। औटाविये मात्रेसि पर।' – ज्ञा ११.३०७. २. माया; ब्रह्मस्वरूप. आउटाविए, आउठावे अशी रूपेही आढळतात :'आउटाविए पदीं आरोहण।' – तुगा ४०३५.

**औटिक, औटीक** वि.; क्रिवि. चमत्कारिक; कौतुकास्पद; नवल

वाटण्याजोगे (बोलणे).

**औटी** स्त्री. तासायच्या किंवा कापायच्या लाकडावर पाडलेली खूण.

**औटी** पु. वजनमापांवर देखरेख करणारा अधिकारी.

**औटी, आवटी** पु. १. सोनाराचा शिक्का. २. एक ग्रामाधिकारी. त्याच्याकडे गावात विक्रीसाठी येणारे धान्य मोजून घेण्याचा व त्याचप्रमाणे अधिकृत नियमाप्रमाणे बाजाराची मापे तपासण्याचा अधिकार असतो.

**औठडे** पहा : **औठे**

**औठणे** अक्रि. ओसरणे; ओहोटी लागणे. पहा : **ओहटणे**

**औठा** वि. साडेतीन :'औठां वरिखां : गोसावीयांचेया दर्शना गेले :' – लीचउ १८७.

**औठाण** व. गळू; टेंगूळ. पहा : **उठाणू**

**औठी** पहा : **ओहोटी**

**औड** पु. शेतकामाकरिता निश्चित केलेला एक तुकडा; आवड.

**औड, औडभर** पहा : **औट, औटभर**

**औडक चौडक** पु. लहान मुलांचा एक खेळ.

**औडुव** पु.(संगीत) (प्र.) औडव. पाच स्वर. संगीतातील एक राग.[सं. ]

**औडुवतान** स्त्री. पाच स्वरांची तान.

**औडुवत्व** न. रागालापातील वर्ज्य दोन स्वर न येण्याची दक्षता ठेवणे.

**औत** पु. १. आहुति–आहुत (अप.) २. बली. ३. (ल.) अतिशय कष्टमय स्थिती; आसन्न मृत्यूची अवस्था. (व.) (वा.) **औत घेणे** – अति श्रम होणे; त्रास होणे; मरणोन्मुख होणे – स्थितीस येणे.

**औत** न. पु. १. आऊत; शेतकी वगैरे धंद्याचे साधन. सामान्यतः नांगर, कुळव, पाभर इ. जी बैलांनी फिरवायची साधने त्यांना औत म्हणतात :'जे कर्ता जीव विंदाणीं। कादूनि पांचही खाणी। घडित आहे करणीं आउतीं दाहे।' – ज्ञा १८.४५४. २. एका नागराने नांगरली जाईल इतकी जमीन. सुमारे ८० बिघे. ३. शेतकामाच्या बैलांची एक जोडी. (व.) ४. भंडाऱ्याचा माडाची पोय कापण्याचा कोयता. (कों.) ५. साधन; हत्यार (सोनार, कासार, कुंभार इ. धंद्याला लागणारे); आयुध; शस्त्र. ६. सूप, टोपली, रोवळी, पंखा इ. बांबूच्या वस्तू. प्रभु जातीत वरातीच्या वेळी बांबूच्या हातरीवर वरीलपैकी जे साहित्य ठेवतात त्याला औत म्हणतात. (राजा.) ७. मासे पकडण्याचे जाळे; आवत. आऊत असाही प्रयोग आढळतो. [सं. आयुध, आ+युत=जोडला जाणारा] (वा.) **औत चालणे** – नांगर चालू असणे. **औत धरणे** – शेतकाम चालू करणे. **औत भरणे** – शेतकीची हत्यारे साफसूफ, तयार करून ठेवणे. **औत सुटणे, औत पडणे** – काम बंद करणे.

**औतकरी** पु. नांगर धरणारा; शेतकरी; औत्या.

**औतकाठी** स्त्री. (सामा.) औत; शेतकीची हत्यारे.

**औतकी** स्त्री. प्रत्येक नांगरामागे ठराविक धान्य मिळण्याचा पाटलाचा हक्क.

**औतपट्टी** स्त्री. १. प्रत्येक नांगरावरील सरकारी कर. नांगऱ्यावरही असा जादा कर बसवीत. २. ताडाच्या तोडणीच्या प्रत्येक कोयत्यावरील कर.

**औतपादीक** वि. उपटसुंभ; आकस्मित.

**औतबंदी** स्त्री. प्रत्येक नांगरावर कर बसविण्याची पद्धत; नांगरबंदी. खानदेशात याला 'ओटबंदी' म्हणतात.

**औतभरणा** पु. (समुच्चयाने) १. शेतकरी वर्ग. २. शेतकीची हत्यारे. ३. नांगरावरील सरकारी कर. पहा : **औतपट्टी**

**औतून कज्जा आणणे, औतून कटकट करणे** भांडण उकरून काढणे; भांडणाला आमंत्रण देणे.

**औते** न. अंबाडी, ताग, केतकी यांचा एक इंच पेराचा दोर. (खान.)

**औत्पातिक** वि.अशुभ; अमंगलसूचक; पीडादायक. [सं.]

**औत्पादिक** वि. आकस्मिक; उपटसुंभ :'ग्रंट डफचाच इतिहास वाचणाऱ्या गृहस्थांस मराठ्यांचा अभ्युदय हा केवळ औत्पादिक वाटण्याचा संभव आहे. पण वस्तुतः तो तसा नाही.' – लोटिकेले २.२२९. [सं.]

**औत्या** पु. १. शेतकरी; नांगर धरणारा; नांगऱ्या; आवत्या. २. (ल.) औत धरण्याच्या वयाचा पुरुष. ३. चाकर; सालदार; आवत्या (खान.): 'बिहीरांहीं आवत्यो रिईने तो आखे तो काम केवां.' = दुसऱ्याच्या येथे चाकर राहून तो सांगेल ते काम करावे.' – भि ३५.

**औत्सर्गिक** वि. सर्वसाधारण; विशिष्ट नाही असा; निश्चित निर्देश केला नाही असा. [सं.]

**औत्सुक्य** न. उत्सुकता; उत्कंठा; धाधावणे; उतावीळपणा : 'विविधा औत्सुक्यांची दाटी ।' – ज्ञा १८.१५५६. [सं.]

**औदक** वि. पाण्यातील जंजिरा; पाणकिल्ला; जलदुर्ग. [सं.]

**औदरिक, औदर्य** वि. १. पोटातला; पोटासंबधीचा; आतड्यासंबंधीचा. २.खादाडखाऊ, आधाशी. [सं.]

**औदर्य** वि. पु. पुत्र, मुलगा.

**औदंबर, औदंबरी** पहा : **ओडंबर, ओडंबरी**

**औदार्य** न. दातृत्व; दानशीलता : 'तैसा औदार्याचा कुरुठा ।' – ज्ञा ५.१२. [सं.]

**औदासीन्य** न. १. उदासीनपणा; निरानंदावस्था; सुखाचा अभाव. २. बेफिकिरी; अलिप्तपणा; निष्काळजीपणा; तटस्थपणा. [सं.]

**औदास्य** न. १. पहा : **औदासीन्य** २. अंतर, अंतराय : 'ऐसें दोघां औदास्य पडिले' – इप्र. १६.१३

**औदांडो, औधांडो** पु. १. मोठा जोराचा वादळी पाऊस व वारा. २. मोठा पूर.
वि. अतिद्वाड; उर्मट; हालमस्त. [सं. अव+दण्ड]

**औदी घालणे** सक्रि. बुडविणे; लुबाडणे; पुरा नक्षा उतरवणे : 'तिपान्ना म्हणाला, 'काय न्हाई त्यालाच औदी घालायचा.' – भेटी ४४.

**औदुंबर** पु. (प्र.) उदुंबर, औदुंबराचे झाड; उंबर;
वि. उंबराविषयी, उंबराचे (काष्ठ, पर्ण, पुष्प इ.) [सं. उदुंबर]

**औदुंबर** न. तांबे : 'औदुंबर सुवर्ण रजत । काष्ठाचेही असे पवित्र । ऐसें असे निर्मळपात्र । वामहस्तीं उदक बरवें ।।' गुच – ३६.२७७ [सं.]

**औंदुबर** पु. वानप्रस्थविशेष. सकाळी उठल्या बरोबर ज्या दिशेला पाहिल, त्या दिशेकडील फळे इ. वर राहणारा.

**औदुंबरपंचमी** स्त्री. माघ वद्य पंचमी.

**औदुंबरी माळ** स्त्री. उंबराची माळ (अठांगुळाच्या वेळेस स्त्रीच्या गळ्यात घालतात. ही एक लोकरूढी आहे.) : 'औदुंबरी माळ गळां न घाली' – सारुह २.३५.

**औद्धत्य** न.उद्धटपणा; दांडगेपणा; वरचढपणा : 'तैसें मौढ्य घणावे । औद्धत्य उंचावे ।' – ज्ञा १६.३९१ [सं.]

**औद्धारिक** वि. १. उद्धारासंबंधीचा २. दायभागासंबंधीचा. न. हिस्सा.

**औद्योगिक** वि. १. उद्योगासंबंधी; कारखाने, उत्पादनाचे मोठे धंदे यासंबंधीचा; यंत्राचा उपयोग करून होणाऱ्या उत्पादनसंबंधीचा.

**औद्योगिक अरिष्ट** न.(अर्थ) १. संप,, टाळेबंदी, कच्चा माल आणि ऊर्जा यांचा अभाव किंवा अतिअनिश्चित पुरवठा यामुळे उद्योगधंद्यामध्ये निर्माण झालेली आणिबाणीची स्थिती. २. चलनवाढ, किंमतवाढ, मागणीचा अभाव, बेरोजगारी यामुळे उद्योगधंद्यावर येणारी संकटे.

**औद्योगिक कर्षित्र** न. (यंत्र.) कारखानदारीत ओझी इकडून तिकडे वाहण्यासाठी उपयोगात येणारे वाहन; ट्रक्टर.

**औद्योगिक क्रांति-ती** स्त्री. (अर्थ.) विज्ञान, तंत्रज्ञान यांमुळे उत्पादनपद्धतीत बदल होऊन अर्थव्यवस्थेत झालेले परिवर्तन.

**औद्योगिक तंटा** (अर्थ.) औद्योगिक क्षेत्रात, एखाद्या उद्योगसंस्थेमध्ये व्यवस्थापन, सेवकवर्ग आणि कामगार संघटना यांच्यामध्ये निर्माण झालेले मतभेद, तंटे, संघर्ष इत्यादी.

**औद्योगिक न्यायाधिकरण, न्यायालय** उद्योगधंद्यातील तंटे वगैरे सोडवण्यासाठी शासनाने नेमलेले न्यायमंडळ.

**औद्योगिक पुरातत्त्व** न. (पुरा.) आदिमानवाने केलेल्या दगडी आयुधांच्या निर्मितिपद्धतीवरून आणि त्यांच्या वर्गीकरणांवरून केलेली अनुमाने.

**औद्योगिक प्रशिक्षण** उद्योगधंद्यांना उपयोगी पडावे यासाठी देण्यात येणारे विशेष शिक्षण; व्यावसायिक शिक्षण.

**औद्योगिक मंदी** (अर्थ.) औद्योगिक उत्पादनांना मागणी कमी होत गेल्याने किंवा मागणी नसल्याने निर्माण झालेली स्थिती.

**औद्योगिक मानसशास्त्र** औद्योगिक प्रश्नांच्या सोडवणुकीसाठी उपयोगात आणलेले मानसशास्त्राचे प्रायोगिक ज्ञान, तत्त्वे.

**औद्योगिक लोकशाही** (अर्थ.) उद्योगाच्या संचालनात कामगारवर्गाला सहभाग देऊन निर्णय घेण्याची पद्धती.

**औद्योगिक वसाहत** उद्योगधंद्यांच्या, कारखान्यांच्या उभारणीसाठी राखून ठेवलेली स्वतंत्र जागा, ठिकाण.

**औद्योगिक शिक्षण** उद्योगधंद्याविषयी ज्ञान देणारे शिक्षण : 'औद्योगिक शिक्षण घेणे हा राष्ट्रभक्तीचा पहिला पाठ आहे.' – के १६-४-३०.

**औद्योगिक समाजजीवन** (अर्थ.) मोठ्या प्रमाणावर झालेल्या औद्योगीकरणामुळे समाजजीवनावर झालेला परिणाम; अशा परिणामामुळे बदललेल्या समाजजीवनाचे विश्लेषण, अभ्यास वगैरे.

**औद्योगिक समाजशास्त्र** औद्योगिक प्रभावाखाली असणाऱ्या आणि उद्योगधंद्यांनी नियमित केलेल्या सामाजिक संबंधाचे समाजशास्त्रीय विश्लेषण करणारी समाजशास्त्राची एक शाखा.

**औद्योगिक संबंध** (अर्थ.) उद्योगधंद्यात मालक, चालक, सेवक आणि कामगार संघटना यांच्यातील परस्परसंबंध.

**औद्योगीकरण** (अर्थ.) देशामध्ये मूलभूत, पायाभूत उद्योगांची उभारणी करून त्यातून लहानमोठ्या उद्योगधंद्यांचा विस्तार करणे.

**औधत्य** न. उद्धटपणा.

**औधिया** स्त्री. चोऱ्या करणारी बैराग्यांची एक जात. त्या जातीतील माणूस.

**औपचारिक** वि. १. उपचाराविषयीचा २. ओढूनताणून; कसातरी; तोंडदेखला; वरवरचा; शिष्टाचार म्हणून पाळलेला : 'सर्व व्यवहार औपचारिक चालला होता, त्यांत प्रेम राहिले नव्हतें.' -इंप ४२.३. अलंकारिक; रूपकात्मक. ४. खुशामतीचे; प्रशंसात्मक; (भाषण).[सं.]

**औपचारिक प्रस्ताव** रीतसर, नियमानुसार, मांडलेला प्रस्ताव, सूचना.

**औपनिवेशिक स्वराज्य** वसाहतीचे स्वराज्य.

**औपपत्तिक** वि. तात्त्विक विचारांवर भर देणारे; प्रत्यक्ष कार्यावर भर नसलेले; उपपत्तीविषयक. [सं.]

**औपम्य** न. सादृश्य; तुल्यता; सारखेपणा. [सं.]

**औपरोधिक** वि. उपरोधयुक्त; लागेल, वर्मी लागेल, झोंबेल असे (भाषण); ज्यातील खरा अर्थ गर्भित असून शब्दार्थ किंवा वाच्यार्थ निराळा असतो असे बोलणे, भाषण इ. शालजोडीतील (मारणे.) [सं.]

**औपसर्गिक** वि. १. शकुनासंबंधाचा. २. अशुभसूचक. ३. रोगपरिणामरूप. पु. कफवातदिकांचा प्रकोप.

**औपाधिक** वि. उपाधीसंबंधी; उपाधी जडलेला; मायिक : 'दाविजे तेवीं औपाधिका । बोली इया ।।'' – ज्ञा १५.४७०. [सं.]

**औपासन** पु. स्मार्ताग्नी किंवा गृह्याग्नि; विवाहामध्ये 'गृहप्रवेशनीय' होम होतो तो अग्नी. हा अग्नी आमरणान्त संरक्षण करायचा असतो व यावर सकाळ-संध्याकाळ हवन करायचे असते. 'सांडोनि वैश्वदेव औपासन । सदा भक्षिती परान्न ।।'' – कथा ४.१६.३६ [सं.]

**और** पु. न. १. ऊर, ओर; नदीचा पूर : 'पुनर्वसु – पुष्यात औरावर औरे आली. ' – आआशे १६८. २. खाडीत किंवा नदीच्या पात्रात आलेली समुद्राची भरती. [सं.आ.+पूर]

**और** वि. १. अन्य; दुसरा; तद्‌भिन्न. २. विलक्षण; विचित्र; मजेदार; अजब. ३. छान; सुंदर.
क्रिवि. आणखी; शिवाय. [हिं.]

**औरत** स्त्री. स्त्री; पत्नी. [फा.]

**औरस** पु. धर्मविधीने लग्न लावलेल्या स्त्रीला स्वतःपासून झालेला पुत्र; स्त्रीच्या ठायी स्ववीर्याने उत्पन्न झालेले अपत्य; अस्सल. दत्तकाच्या उलट : 'गांधारि उगीच रहा. होऊं दे द्यूत औरसा मान्य ।' -मोसभा ६.८७
वि. १. छातीसंबंधी. २. स्वीय; अस्सल. ३. पराक्रमी. [सं. उरस्]

**औरस** स्त्री. (चुकीने) लग्नाची बायको; पाटाची नव्हे.

**औरसचौरस** क्रिवि. १. सभोवार; चोहोकडे; चारी बाजूंना; आसपास; २. लांबीरुंदीने; उभेआडवे (क्षेत्रादिकांचे प्रमाण) ; लांबीने रुंदीला गुणून; आडवातिडवा : 'औरसचौरस दोन हात लांब रुंद जागेत.... – काच ९१. [चौरसचे द्वि.]

**औरस पुत्र** पु. विवाहित स्त्रीपुरुषाची संतती; धर्मपत्नीपासून स्वतःला

झालेला पुत्र. पहा : **औरस** [सं. उरस्]

**औरंग** न. सिंहासन; तख्त. [फा.]

**औरंग** न. व्यापारी जिन्नस तयार होण्याचे किंवा एकाच मोठ्या प्रमाणात असण्याचे व निर्माण होण्याचे ठिकाण. ईस्ट इंडिया कंपनीच्या व्यापारात वखारींना हा शब्द लावीत असत. [हिं.]

**और्ध्वदेहिक** न. (प्रेताविषयीचे) उत्तरकार्य; क्रियाकर्म; प्रेतसंस्कार. वि. उत्तरक्रियेसंबंधी. [सं.]

**और्व** वि. मांडीचे

पु. वडवानल. [सं.]

**औलाद** स्त्री. १. संतती; संतान; प्रजा. २. वंश; कुळी : 'सरकार, कुत्र चांगल्या औलादीचं हाय.' – व्यंमाक ५. [फा.]

**औलाद** स्त्री. कटकट; पीडा.

**औलियाई** वि. उच्च. [फा.]

**औशी** क्रिवि. संध्याकाळी : 'दळणाचं टोपलं औशी झोपतानाच जात्यापाशी ठेवलं होतं.' – सीए ३२.

**औषध** न. १. रोगनिवारण करणारा पदार्थ; ओखद; दवा; ज्याच्या सेवनाने रोगनिवृत्ती होते असा झाडपाला, मुळी, काष्ठ, धातू, रस, रसायन, मात्रा इ. २. (ल.) कार्यसिद्धीचे साधन; उपाय; इलाज. ३. दारू (शोभेची – बाराची) : 'हवाया नळे भरभराटे। औशधकळा गाजली।।' – वेसीस्व ७.८८. ४. (संकेताने) सोमल, अफू इत्यादी अंमली पदार्थ. [सं.] (वा.) **औषध करणे –** औषध लावणे, घेणे; उपाययोजना करणे. **औषधाला नसणे –** औषधापुरतेही नसणे; संपुष्टात येणे; मुळीच नसणे; अत्यंत अभाव असणे. **औषधावाचून खोकला जाणे** – अनायासे ब्याद टळणे.

**औषधपत्र** न. डॉक्टरांनी रोग्यासाठी लिहून दिलेला औषधयोजनेचा कागद.

**औषधपाणी** न. औषध; औषधउपचार; उपाययोजना (व्यापकपणे). (क्रि. देणे, घेणे, करणे).

**औषधपेटी** स्त्री. औषधे ठेवण्यासाठी वेगवेगळे कप्पे केलेली पेटी.

**औषधालय** न. औषधे मिळण्याचे ठिकाण, दुकान.

**औषधि–धी** स्त्री.१. फळे पिकेपर्यंत जी झाडे जगतात ती; एक हंगाम जगणारी झाडे. २. (सामा.) झाड; वनस्पती; जडीबुटी.

वि. औषधासंबंधी; गुणकारी; औषधाला उपयोगी. [सं. औषधि]

**औषधिद्रव्य** न. (वै.) औषधनिर्मितीसाठी वापरली जाणारी द्रव्ये. [सं.]

**औषधी क्रियाविज्ञान** न. (वै.) वनस्पतीपासून उपलब्ध झालेल्या औषधिद्रव्यांच्या, शरीरावर होणाऱ्या परिणामांची (प्रभावाची) माहिती देणारी विज्ञानशाखा.

**औषधी द्रव्य** औषध युक्त किंवा औषधाची वस्तू, पदार्थ.

**औषधी द्रावण** औषधी पाणी; जखम धुण्याचे द्रावण.

**औषधी शास्त्र** वनस्पतीत कोणते औषधी गुणधर्म आहेत ह्याचा विचार करणारे शास्त्र.

**औषधोपचार, औषधोपाय** पु. रोगावर औषधयोजना; दवा.

**औष्णिक** वि. उष्णतेसंबंधी; उष्णतेवर अवलंबून असणारी. [सं.]

**औष्णिक एकक** (शाप.) उष्णता मोजण्यासाठी किंवा दोन उष्णतामानांची तुलना करण्यासाठी वापरलेले माप. उदा. सेल्सिअस.

**औष्णिक केंद्र** उष्णता निर्माण करणारे केंद्र; ज्या ठिकाणी उष्णता उत्पन्न होते असे केंद्र. [सं.]

**औष्णिक विद्युत** दगडी कोळशासारख्या पदार्थापासून उष्णता मिळवून तयार करण्यात येणारी वीज; उष्णतेपासून मिळवलेली वीज.

**औष्णिक विद्युतकेंद्र** कोळसा जाळून त्या उष्णतेपासून पाण्याच्या वाफेच्या साहाय्याने जनित्र फिरवून वीज निर्माण करणारे केंद्र.

**औष्णिक विश्लेषण** (रसा.) उष्णता एकदम बाहेर टाकल्यामुळे किंवा शोषून घेतल्यामुळे मूलद्रव्याच्या घटकांत होणारा रासायनिक बदल.

**औष्णिकगतिकीशास्त्र** न. (भौ.) वस्तूच्या अस्तित्वाचे उष्णता आणि शक्ती यांच्याशी असलेले समीकरण मांडणारे शास्त्र. उदा. तपमान, दाब आणि कार्य यांचा परस्परांशी असलेल्या संबंधाचा वस्तूच्या कार्यावरील परिणाम.

**औसत** वि. मधील; सरासरी. [फा.]

**औसा** पु. तात्पुरती झोपडी : 'कलिंगडे पिकायला लागल्यापासून मला साखरपट्टीत औसा घालून राहणे भाग पडले होते.' – आआशे ३४९.

**औसा** पु. पुजारी. [सं. उप+आस्]

**औसाफ** पु. १. लौकिक; कीर्ती : 'परशुरामपंत यांस छत्रपतींनीं मारविलें सबब विश्वासराव यास मारिले ही गोष्ट बेहिशेबाची, आमचे घराण्याचे औसाफास योग्य न जाले.' –ऐलेसं ११.६१२५. २. गुण; लायकी. [फा.]

**औसिकम** पु. हरणाच्या रंगाचा घोडा. – अश्वप १.१०४.

**औक्ष** न. आयुष्य; जीवित; जीवनमर्यादा. [सं. आयुष्य]

**औक्षण, औक्षवण** न. आरती ओवाळणे; आरती वगैरे ठेवलेले तबक किंवा लामणदिवा; लग्नकार्याच्या अथवा इतर शुभप्रसंगी देवाची मूर्ती किंवा ज्याचे मंगलकार्य असेल त्याला सुवासिनीने ओवाळण्यासाठी घेतलेले दीपादियुक्त ताम्हन. (सामा.) ओवाळणे. पहा: **अक्षवाण** : 'त्यांचें सुवासिनी स्त्रियांकडून औक्षण होते.' – ऐरापुविवि २६. (क्रि करणे.) आयुष्यवर्धक विधी. [सं. आयुष्य+वान्]

**औक्षवंत, औक्षवान** वि. चिरायू; चिरंजीव; आयुष्यमान; दीर्घायुषी; उदंड आयुष्याचा. (कुण. बायकी) [सं. आयुष्यवंत, आयुष्यवान्]

**औंजार** पु. उपद्व्याप. (गो.)

**औंदा** क्रिवि. यंदा; ह्या वर्षी; चालू साली : 'औंदा सुटला पायजे सातवीतनं.' – मिरास ५२. (कुण.) [फा. आयंदा]

**औंध** स्त्री. काळोखी; अंधारी. पहा : **ओंध.** [सं. अंध]

**औंस** पु. अडीच तोळे. १ औंस = २ जेवणाचे चमचे (टेबलस्पून). २. औंस = दारूचा एक पेला (वाइन ग्लास). [इं.]

**औंस** पु. विभाग : 'हे कठिण पांच औंस.' – वह ६.२५. [सं. अंश]

मुद्रणस्थळ : शासकीय फोटोझिंको मुद्रणालय, पुणे

# महाराष्ट्र राज्य मराठी साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई
## प्रकाशित कोश वाङ्मय



आह्मां घरीं धन शब्दांचीं च रत्नें । शब्दांचीं च शस्त्रें यत्न करूं ।
शब्द चि आमुच्या जीवाचें जीवन । शब्दें वांटूं धन जनलोकां ।
तुका म्हणे पाहा शब्द चि हा देव । शब्दें चि गौरव पूजा करूं ।।